श्रीकाशीनाथोपाध्यायविरचित

# धर्मसिन्धु

[ मराठी भाषान्तरासहित ]

भाषान्तरकार

लक्ष्मण नारायण जोशी.

प्रकाशक

लक्ष्मण नारायण गोडबोले,

बुकसेलर आणि पब्लिशर,

लक्ष्मीरोड, बुधवार, पुणें शहर.



किंमत सहा रुपये.

# प्रस्तावना

प्रस्तुतचा 'धर्मसिन्धु' हा ग्रंथ, रत्नागिरी जिल्ह्यांतील गोळवल गांवच्या अनंतोपाध्याय नांवाच्या गृहस्थांचे विद्वान् पुत्र काशीनाथोपाध्याय, या कऱ्हाडे ब्राह्मण विद्वद्वर्यांनीं सुमारें १३९ वर्षांपूर्वीं म्हणजे शके १७१२ मध्यें श्रीक्षेत्र पंढरपूर येथें लिहिला. या ग्रंथांत नेहमीं व्यवहारांत लागणाऱ्या अशा धर्मशास्त्राचा विस्तारपूर्वक निर्णय—निर्णयसिन्धु, पुरुषार्थचिंतामणि, कालमाधव, हेमाद्रि, कालतत्त्वविवेचन, कौस्तुभ, स्मृत्यर्थसार वगैरे प्राचीन ग्रंथाधारें—केला असून, त्या प्राचीन ग्रंथांतून जे संदिग्ध असे निर्णय दिलेले आहेत—ते, या ग्रंथकारास शास्त्रसंमत असून जे योग्य वाटले—त्यांचा स्पष्ट निर्णय केला आहे आणि तो काशीपासून रामेश्वरापर्यंत सर्व विद्वानांस मान्य झाला आहे. या ग्रंथाइतका सरळ, सुबोध, स्पष्ट व सर्व विद्वानांना मान्य असा दुसरा ग्रंथच नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

या ग्रंथाचे परिच्छेद म्हणजे भाग तीन आहेत, त्यांपैकीं पहिल्या भागांत सामान्य कालनिर्णय सांगून, दुसऱ्यांत चैत्रापासून पुढील फाल्गुनापर्यंतच्या बारा महिन्यांतील व्रतें व इतर धर्मकृत्यें यांसंबंधीं पूर्णविवेचनपूर्वक विचार केला आहे. म्हणजे कोणत्या व्रतास तिथि व नक्षत्रें कशा प्रकारचीं असावींत, अयनसंक्रांतींचे पुण्यकाल आणि सूर्यादि ग्रहांच्या पीडांचे निरसनोपाय व त्यांचीं दानें इत्यादिकांचा स्पष्ट निर्णय केला आहे. तिसऱ्या परिच्छेदाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे जे दोन पोटभाग आहेत, त्यांतील पूर्वभागांत मिश्र-विषय म्हणजे नित्यकर्मे, सोळा संस्कार, अग्निहोत्र, देवप्रतिष्ठा म्हणजे देवतांची स्थापना व अर्चा, निरनिराळ्या देवतांस प्रिय पुष्पें नवीन वस्त्र धारण करण्याचा मुहूर्त, गृहारंभ म्हणजे नवीन घर बांधण्यास आरंभ करण्याचा मुहूर्त, गृहप्रवेशवास्तुशांति म्हणजे नवीन घरांत राहण्यास जाण्याचा मुहूर्त, प्रयाण म्हणजे यात्रा, उद्योगधंदा किंवा रोजगार यांनिमित्त प्रवासास जाणें यांजकरितां मुहूर्त आणि त्यासंबंधींचे अपवाद, कलियुगांतील

वर्ज्यावर्ज्य गोष्टी वगैरे सर्वांचा निर्णय केला आहे. उत्तरार्धांत जीवत्पितृकांचे निर्णय, श्राद्धाधिकार, त्यांचा काल, श्राद्धपद्धति, जननाशौच व मृताशौच यांचा तर फारच स्पष्ट निर्णय दिला आहे. दुर्मरण, अंत्येष्टी म्हणजे मृतां-संबंधींच्या क्रिया व दानें वगैरेंचा निर्णय, संन्यासग्रहणाचे प्रकार, संन्याशाचे धर्म, विधवांचे आचारधर्म वगैरेंचा पूर्ण निर्णय दिला आहे.

हा ग्रंथ मूळचा संस्कृत भाषेंत असल्यामुळें, संस्कृत न समजणाऱ्या बहुजनसमाजास धर्मशास्त्रासंबंधीं हरएक प्रकारचा निर्णय समजण्याची जिज्ञासा असूनही तो समजण्यास भारी अडचण पडते. यास्तव सदरहू ग्रंथ आम्हीं संस्कृतज्ञ विद्वानांच्या साहाय्यानें रा० लक्ष्मण नारायण जोशी यांचेकडून मराठी भाषेंत भाषांतर करवून, मूळ ग्रंथासह छापिला आहे. मूळ ग्रंथांतील संस्कृत शब्दांना मराठींत जे बरोबर प्रतिशब्द आहेत तेच यांत दिले आहेत. उदाहरणार्थ, पिता, माता, स्वसा, पितामह, प्रपितामह वगैरे जे मूळचे शब्द ते न देतां, बाप, आई, बहीण, आजा, पणजा इत्यादि मराठींतील प्रचारांतले शब्द देऊन, भाषांतर केलें आहे.

सारांश काय कीं, भाषांतर जितकें सरळ व सुबोध होईल तितकें तें करण्याचा यांत शक्य तेवढा प्रयत्न केला आहे. ग्रंथांतील मूळचा विषय धर्मशास्त्राचा आहे आणि मानवी प्रयत्न चुकीस पात्र आहे, या गोष्टी विद्वानांनीं मनांत आणून, यांत आढळणारे दोष आम्हांस कळविल्यास ग्रंथप्रकाशक व भाषांतरकार असे दोघेही त्यांचे अत्यंत आभारी होऊं आणि याची पुन्हा आवृत्ति काढण्याचा प्रसंग आल्यास ते दोष दुरुस्त करण्याचा अवश्य प्रयत्न करूं.

पुणें–लक्ष्मीरोड
आश्विन शुद्ध १ शके १८४७.

ग्रंथप्रकाशक
**लक्ष्मण नारायण गोडबोले.**

# विषयानुक्रमणिका.

## तृतीय परिच्छेदः

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |

## तृतीय परिच्छेदोत्तरार्धः

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |

॥ श्रीलक्ष्मीकेशव प्रसन्नोऽस्तु ॥



# धर्मसिन्धु

## [मराठी भाषांतरासह]

### भाषान्तरकाराची प्रार्थना.

श्रीमन्मङ्गलधाम विघ्नहर तो वन्दूनिया तात्प्रिया ।
वाग्देवी स्तवितों यथार्थ कळण्या सिन्धूस धर्माचिया ॥
भार्षी संस्कृत ग्रन्थ त्या नटवितों वेषें मराठीचिया ।
जिज्ञासूंस फलास देउं नित ही सौमित्रसूरिक्रिया ॥ १ ॥
लक्ष्मीमाते तात नारायणातें । वन्दूनीया भाकि आशीर्वचातें ॥
सिद्धी व्हाया ग्रन्थकर्तृत्वकार्मी । देवर्षींचें साह्य मागें सदा मी ॥ २ ॥
गोडबोले लक्ष्मणानें । ज्ञापिलें अनुवादना ॥
स्नेहांकितास सन्मानें । अर्पी तत्फल हें जना ॥ ३ ॥

---

### प्रथमपरिच्छेदः ।

विघ्नेशं वन्दनं कुर्वे धर्मसिन्धुसुबोधने
कृष्णस्य मे प्रयत्नस्य सिद्धिः सुष्ठु भवत्विति ॥ १ ॥

धर्मसिन्धु सुबोध व्हावा येवढ्यासाठीं मीं जें कार्य हातीं घेतलें आहे, त्याकरितां विघ्नेशाला वन्दन करतों.

श्रीविठ्ठलं सुकरुणार्णवमाशुतोषं । दीनेष्टपोषमघसंहतिसिंधुशोषम् ॥
श्रीरुक्मिणीमतिमुषं पुरुषं परं तं । वन्दे दुरन्तचरितं हृदि संचरन्तम् ॥२॥

वन्दे प्रतिघ्नन्तमघानि शंकरं । धत्तां स मे मूर्ध्नि दिवानिशं करम् ॥
शिवां च विघ्नेशमथो पितामहं । सरस्वतीमाशु भजेऽपि तामहम् ॥२॥

श्रीलक्ष्मीं गरुडं सहस्रशिरसं प्रद्युम्नमीशं कपिम् ।
श्रीसूर्यं विधुभौमविद्गुरुकविच्छायासुतान्षण्मुखम् ॥
इन्द्राद्यान्विबुधान्गुरूंश्च जननीं तातं त्वनन्ताभिधम् ।
नत्वार्यान्वितनोमि माधवमुखान्धर्माब्धिसारं मितम् ॥३॥

करुणेचा सागर, तत्काळ संतुष्ट होणारा, दीनांचे मनोरथ पुरविणारा, पातकांच्या राशीरूपी समुद्राचें शोषण करणारा, लक्ष्मीरूपी रुक्मिणीची बुद्धि आकर्षण करणारा आणि प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयांत राहात असूनही ज्याच्या चरित्राचा ठाव लागणें कठीण आहे, असा जो परम पुरुष श्रीविठ्ठल, त्याला मी वन्दन करतों १. पातकांचा नाश करून, भक्तांचें कल्याण करणारा जो शंकर त्याला मी नमस्कार करतों. तो शंकर आपला वरदहस्त रात्रंदिवस (अक्षयीं) माझ्या मस्तकावर ठेवो. पार्वती, गणपति, ब्रह्मदेव आणि सरस्वती—या सर्वांचें मी तत्काळ नमन करतों २. श्रीलक्ष्मी, गरुड, शेष, प्रद्युम्न, नारायण, मारुति, सूर्य, चंद्र, मंगल, बुध, गुरु, शुक्र, शनि, कार्तिकस्वामी, इन्द्रादि सर्व देव, गुरु, माता, अनंत नांवाचा बाप व थोर असे जे माधवादि धर्मशास्त्राचे निबंधकार—त्या सर्वांना प्रणिपात करून, मी धर्माब्धिसार या नांवाचा ग्रंथ रचितों. या ग्रंथांत पाल्हाळ करण्यांत येणार नसून, संक्षेपाचाही आश्रय करण्यांत येणार नाहीं.

दृष्ट्वा पूर्वनिबन्धान्निर्णयसिन्धुक्रमेण सिद्धार्थान् ॥
प्रायेण मूलवचनान्युज्झित्य लिखामि बालबोधाय ॥४॥

निर्णयसिंधु वगैरे प्राचीन ग्रंथांतलीं मूळ वचनें सोडून, निर्णयसिंधूच्या क्रमानेंच त्या ग्रंथांतील वचनांचे प्रसिद्ध असे अर्थ, अज्ञानी जनांना समजण्यासाठीं मी लिहितों.

तत्र कालः षड्विधः । वत्सरः अयनं ऋतुः मासः पक्षो दिवस इति । वत्सरः पञ्चधा । चान्द्रः सौरः सावनो नाक्षत्रो बार्हस्पत्य इति । शुक्लप्रतिपदादिदर्शान्तैश्चैत्रादिसंज्ञैर्द्वादशभिर्मासैश्चतुःपञ्चाशदधिकशतत्रयदिनैः सतिमलमासे त्रयोदशभिर्मासैश्चान्द्रो वत्सरः। चान्द्रस्यैव प्रभवो विभवः शुक्ल इत्यादयः षष्टिसंज्ञाः। मेषादिषु द्वादशराशिषु रविभुक्तेषु पञ्चषष्ट्यधिकशतत्रयदिनैः सौरो वत्सरः संपद्यते षष्ट्युत्तरशतत्रयदिनैः सावनः। वक्ष्यमाणैर्द्वादशभिर्नाक्षत्रमासैर्नाक्षत्रो वत्सरः स च चतुर्विंशत्यधिकशतत्रयदिनैः स्यात् मेषाद्यन्यतमराशौ बृहस्पतिनाभुक्ते बार्हस्पत्यः। स च एकषष्ट्यधिकशतत्रयसङ्ख्यदिनैर्भवति कर्मादौ संकल्पे चान्द्रवत्सर एव स्मर्तव्यो नान्यः अयनं द्विविधं दक्षिणमुत्तरं च सूर्यस्य कर्कसंक्रान्तिमारभ्य-षड्राशिभोगेन दक्षिणम् । मकरसंक्रान्तिमारभ्य राशिषट्कभोगेनोत्तरायणम् । ऋतुर्द्विविधः सौरश्चान्द्रश्च । मीनारम्भो मेषारम्भो वा सूर्यस्य राशिद्वयभोगा-

त्मकोवसन्तादिषट्संज्ञकःसौरऋतुः। चैत्रमारभ्यमासद्वयद्वयात्मको। वसन्तादिषट्संज्ञकश्चान्द्रः। मलमासेतुकिंचिदूननवतिसङ्ख्यैर्दिनैश्चान्द्रऋतुः। श्रौतस्मार्तादौचान्द्रर्तुस्मरणंप्रशस्तम्। मासश्चतुर्धा। चान्द्रः सौरः सावनो नाक्षत्रइति। शुक्लप्रतिपदादिरमान्तः। कृष्णप्रतिपदादिः पूर्णिमान्तोवा चान्द्रोमासः। तत्रापि शुक्लादिर्मुख्यः। कृष्णादिर्विन्ध्योत्तरएवग्राह्यः। अयमेवचैत्रादिसंज्ञकःकर्मादौस्मर्तव्यः। केचिन्मीनराशिमारभ्यसौराणां चैत्रादिसंज्ञामाहुः। अर्कसंक्रान्तिमारभ्योत्तरसंक्रान्त्यवधिः सौरोमासः। त्रिंशद्दिनैः सावनः। चन्द्रस्याश्विन्यादिसप्तविंशतिनक्षत्रभोगेन नाक्षत्रोमासः। प्रतिपदादिपौर्णिमान्तः शुक्लपक्षः। प्रतिपदादिदर्शान्तःकृष्णपक्षः। दिवसःषष्टिघटिकात्मकः।

इति श्रीधर्मसिन्धुसारे प्रथमोद्देशः ॥ १ ॥

**कालभेद**—वर्ष, अयन, ऋतु, महिना, पक्ष व दिवस—असे कालाचे सहा प्रकार आहेत. चांद्र, सौर, सावन, नाक्षत्र आणि बार्हस्पत्य—असे वर्षांचे पांच प्रकार आहेत. शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत जे दिवस, त्यांचा एक महिना होतो. याप्रमाणें चैत्रादि बारा महिन्यांचें—म्हणजे ३५४ दिवसांचें—आणि अधिक महिना जर असेल जर तेरा महिन्यांचें एक चांद्रवर्ष होतें. प्रभव, विभव, शुक्ल इत्यादि साठ संवत्सरांचीं नांवें या चांद्रवर्षांचींच आहेत. सूर्यानें मेषादि बारा राशि भोगिले असतां, ३६५ दिवसांचें एक सौरवर्ष होतें. ३६० दिवसांच्या वर्षाला सावनवर्ष म्हणतात. पुढें जें बारा नक्षत्रांचें वर्ष सांगण्यांत येणार आहे, त्याला नाक्षत्रवर्ष असें म्हणतात. तें ३२४ दिवसांचें होतें. गुरूनें मेषादि बारा राशी भोगिल्या म्हणजे त्याला बार्हस्पत्यवर्ष असें म्हणतात व तें ३६१ दिवसांचें असतें. धार्मिक कर्मांत चांद्रवर्षांचाच उच्चार करावा; इतर वर्षांचा करूं नये. दक्षिणायन व उत्तरायण असे अयनाचे दोन भेद आहेत. सूर्य जेव्हां कर्कादि सहा राशि भोगितो तेव्हां दक्षिणायन होतें, व मकरादि सहा राशि भोगितो तेव्हां उत्तरायण होतें. सौर आणि चांद्र असे ऋतूंचे दोन भेद आहेत. मीन किंवा मेष यांच्या संक्रांतीपासून दोन राशी सूर्यानें भोगिल्या असतां, संक्रांतिपरत्वें होणारे जे वसंतादि सहा ऋतु, ते सौरऋतु होत. चैत्रापासून आरंभ करून दोन दोन महिन्यांचा एकेक असे मासपरत्वें होणारे जे वसन्तादि नांवांचे सहा ऋतु, ते चांद्रऋतु होत. अधिकमास जर असेल जर नव्वदांहून कांहीं कमी अशा दिवसांचा चांद्रऋतु होतो. श्रौतस्मार्तादि कर्मांच्या संकल्पांच्या वेळीं, चांद्रऋतूचाच उच्चार करणें योग्य आहे. चांद्रमास, सौरमास, सावनमास व नाक्षत्रमास असे महिन्यांचे चार प्रकार आहेत. शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंतचा, अथवा कृष्ण प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंतचा जो महिना तो चांद्रमास होय. असें जरी आहे तरी, शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंतचा महिना मुख्य आहे. कृष्ण प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंतचा महिना विन्ध्याद्रीच्या उत्तरेसच ग्राह्य मानिला आहे. श्रौतस्मार्तादिकांच्या कर्मांच्या वेळीं, चैत्रादि नांवांच्या या मुख्य महिन्याचाच उच्चार करावा. मीनसंक्रांतीपासून, संक्रांतिपरत्वें होणाऱ्या सौर महिन्यांना चैत्रा-

दिक नांवें आहेत, असें कित्येक म्हणतात. एका सूर्यसंक्रांतीच्या आरंभापासून पुढच्या सूर्यसंक्रान्तीच्या आरंभापर्यंतचा जो महिना, तो सौरमास होय. ३० दिवसांच्या महिन्याला सावनमास म्हणतात. अश्विनी वगैरे सत्तावीस नक्षत्रें चंद्रानें भोगिलीं असतां जो महिना होतो, तो नाक्षत्रमास होय. शुद्ध प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंतचा जो पक्ष तो शुद्ध ( शुक्ल ) पक्ष होय, आणि कृष्ण प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंतचा जो पक्ष तो कृष्णपक्ष होय. एका दिवसाच्या घटका साठ असतात. याप्रमाणें येथें धर्मसिंधुसारचा पहिला उद्देश संपला.

अथसंक्रान्तिनिर्णयउच्यते—मेषेसूर्यसंक्रान्तौप्रागूर्ध्वंचपंचदशपंचदशघटिकाः पुण्यकालः। दशदशेत्येके वृषेपूर्वाः षोडश मिथुनेपराः षोडश कर्केपूर्वास्त्रिंशत् सिंहेपूर्वाः षोडश कन्यायांपराः षोडश तुलायां प्रागूर्ध्वंचपंचदशपंचदश दशदशेत्येके वृश्चिकेपूर्वाः षोडश धनुषिपराः षोडश मकरेपराश्चत्वारिंशत् कुम्भेपूर्वाः। षोडश मीनेपराः षोडश घटिकाद्वयाद्यल्पदिनशेषे मिथुनकन्याधनुर्मीनेष्वपिमकरेऽपिपूर्वाएवपुण्याः। प्रभातेघटिकाद्वयाद्यल्पकाले वृषसिंहवृश्चिककुम्भेष्वपिकर्केपिपराएवपुण्याः। प्रभातेकर्कसंक्रान्तौपूर्वदिनेपुण्यमित्येके। रात्रौसंक्रमेमध्यरात्रादर्वाक्संक्रान्तौपूर्वदिनोत्तरार्धपुण्यम्। मध्यरात्रात्परतः। संक्रान्तौ परदिनस्यपूर्वार्धपुण्यम् निशीथमध्यएवसंक्रान्तौदिनद्वयेपिपूर्वदिनोत्तरार्धपरदिनपूर्वार्धंचपुण्यम्। इदंमकरकर्कातिरिक्तेसर्वत्ररात्रिसंक्रमेज्ञेयम्। अयनेतुमकरेरात्रिसंक्रमे सर्वत्रपरदिनमेवपुण्यम्। रात्रौकर्कसंक्रान्तौपूर्वदिनमेवपुण्यम्। सूर्यास्तोत्तरंघटिकात्रयसायंसंध्या। तत्रमकरसंक्रमेपूर्वदिनंपुण्यम्। सूर्योदयात्प्राक्घटिकात्रये प्रातः। संध्यातत्रकर्कसंक्रान्तौपरदिनंपुण्यमिति। संध्याकालेविशेषोज्योतिःशास्त्रेप्रसिद्धः।

**संक्रान्तिपर्वकाळ**—मेष नांवाच्या संक्रांतीच्या आधींच्या १५ व नंतरच्या १५ घटका पुण्यकाळ. आधींच्या १० व पुढच्या १० घटका पुण्यकाळ असतो असेंही कित्येक सांगतात. वृषभसंक्रांतीच्या आधींच्या १६ घटका, मिथुनसंक्रांतीच्या पुढच्या १६ घटका, कर्कसंक्रांतीच्या आधींच्या ३० घटका, सिंहसंक्रांतीच्या आधींच्या १६ घटका व कन्यासंक्रांतीच्या पुढच्या १६ घटका पुण्यकाळ असतो. तुलासंक्रांतीच्या आधींच्या १५ व पुढच्या १५ घटका पुण्यकाळ. आधींच्या व पुढच्या १० घटका हा काळ असतो असें कित्येक म्हणतात. वृश्चिकसंक्रांतीच्या आधींच्या १६ घटका, धनुसंक्रान्तीच्या पुढच्या सोळा घटका, मकरसंक्रांतीच्या पुढच्या ४० घटका, कुंभसंक्रान्तीच्या आधींच्या १६ घटका व मीनसंक्रांतीच्या पुढच्या १६ घटका पुण्यकाळ असतो. दोन घटकांहून अधिक नाहीं इतका थोडा दिवस बाकी राहिला असतां जर–मिथुन, धन, मीन व मकर, या संक्रांति लागल्या, तर पूर्वींच्याच घटका पुण्यकाळ. सकाळीं २ घटकांहून अधिक नाहीं अशा थोडया वेळीं जर–वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ व कर्क या संक्रान्ति सुरू होतील, तर पुढच्याच घटका पुण्यकाळ. सकाळींच जर कर्कसंक्रांत सुरू होईल, तर

आदल्या दिवशीं पुण्यकाळ धरावा असें कित्येकांचें मत आहे. रात्रीं जर मध्यरात्रीच्या आधीं संक्रांत सुरू होईल, तर पूर्वीच्या दिवसाचा उत्तरार्ध पुण्यकाळ व मध्यरात्री-नंतर जर संक्रांत सुरू होत असेल तर पुढच्या दिवसाचा पूर्वार्ध पुण्यकाळ. मकर व कर्क ( या दोन ) संक्रांतींखेरीज करून इतर कोणत्याही संक्रातीचा रात्रीं आरंभ झाला, तरच हा शास्त्रार्थ जाणावा. मकरसंक्रांत जरी रात्रीं सुरू झाली, तरी दुसऱ्या दिवशींच पुण्यकाळ समजावा. कर्कसंक्रान्त जर रात्रीं येईल, तर आदल्या दिवशींच पुण्यकाळ. सूर्यास्तानंतर ३ घटका सायं संध्याकाळ. या काळीं जर मकरसंक्रान्त सुरू होईल, तर आदल्या दिवशींच पुण्यकाळ. सूर्योदयाच्या पूर्वी ३ घटका जो प्रातःसंध्याकाळ, त्याकाळीं जर कर्कसंक्रांत सुरू होईल, तर दुसऱ्या दिवशीं पुण्यकाळ धरावा, असा जो संधिकाळाचा विशेष संक्रांतिनिर्णय, तो ज्योतिःशास्त्रांत प्रसिद्ध आहे.

**अथदानम् । मेषेमेषदानम् वृषेगोदानम् मिथुनेवस्त्रान्नादिदेयम्कर्केघृतधेनुः छत्रंसुवर्णंचसिंहे कन्यायांगृहंवस्त्रंच तुलायांतिलागोरसाश्वदेयाः वृश्चिकेदीपः धनुषिवस्त्रयानंच मकरेकाष्ठानिअग्निश्च कुम्भेगौर्जलंतृणंच मीनेभूमिर्मालाश्च-देयाः एवमन्यान्यपिदानानिद्रष्टव्यानि अयनसंक्रान्तौमेषतुलासंक्रान्तौचपूर्वं त्रिरात्रमेकरात्रंवोपोष्यस्नानदानादिकार्यम् चरमो-पोषणंसंक्रान्तिमत्यहोरात्रे पुण्यकालवत्यहोरात्रेवा यथापतेत्तथाकार्यम् अयमुपवासः पुत्रवद्गृहस्थभिन्नेन पापक्षयकामेनकार्यः काम्यो नतु नित्यः सर्वसंक्रान्तिषुपिण्डरहितंश्राद्धंकार्यम् अयनद्वयेतुनित्यम् यथातत्तत्संक्रान्तिषुदानादिकंकर्तव्यं तथैवताभ्यःपूर्वमय-नांशप्रवृत्तौतत्तत्संक्रान्त्युचितस्नानदानादिकंकर्तव्यम् ।**

**संक्रान्तिदानें**—मेषसंक्रांतीला बकऱ्याचें दान, वृषभसंक्रांतीला गाईचें दान, मिथुनसंक्रांतीला वस्त्रदान व अन्नदान, कर्कसंक्रांतीला तूप व गाय यांचें दान, सिंहसंक्रांतीला छत्री व सोनें यांचें दान, कन्यासंक्रांतीला घर व वस्त्र यांचें दान, तूळसंक्रांतीला तीळ व दूध यांचें दान. वृश्चिकसंक्रांतीला दिव्याचें दान, धनुसंक्रांतीला वस्त्र आणि वाहन यांचें दान, मकरसंक्रांतीला लांकूड व विस्तव यांचें दान, कुंभसंक्रांतीला गाय, गवत व पाणी यांचें दान, आणि मीनसंक्रांतीला जमीन व फुलांच्या माळा यांचीं दानें करावींत. अशाच प्रकारचीं दुसरीं दानेंही पाहावींत. मकर व कर्क या ज्या दोन अयनसंक्रांति, त्यांच्या आधीं व तूळ आणि मेष याहि संक्रांतींच्या आधीं तीन रात्रीं किंवा एक रात्र उपास करून, स्नानदानादि कर्में करावींत. चवथा उपास—संक्रांतीसह रात्रंदिवस किंवा पुण्यकाळासह रात्रंदिवस घडेल असा करावा. हा उपास पुत्रवान् गृहस्थावांचून, पापाचा नाश करूं इच्छिणाऱ्या गृहस्थानें करावा. हा उपास कामनिक असून, नित्य नाहीं. सर्व संक्रां-तींच्या दिवशीं पिंडश्राद्ध करूं नये. मकर व कर्क या संक्रांतींच्या दिवशीं श्राद्ध नित्य आहे. संक्रांतींना जीं दानें देण्यास सांगितलें, तशींच तीं त्या त्या संक्रांतींच्या पूर्वी अयनांशकाल सुरू झाला म्हणजे, आधीं स्नानादिक कर्तव्यकर्में करावींत व मग द्यावींत.

अयनांशाज्योतिःशास्त्रेप्रसिद्धाः। तेचेदानीं द्वादशाधिकसप्तदशशतसंख्या-केशालिवाहनशकेएकविंशतिरयनांशाइत्येकविंशतितमेदिनेपूर्वमयनांशपर्वका-लइतिपर्यवसन्नोर्थः। एवंन्यूनाधिकशकेऊह्यम्। वृषसिंहवृश्चिककुम्भेषुसंक्रा-न्तिर्विष्णुपदसंज्ञा। मिथुनकन्याधनुर्मीनेषु संक्रान्तिःषडशीतिसंज्ञा। मेषतुलयो-र्विषुवसंज्ञा। कर्कमकरयोरयनसंज्ञा। एतासुचतुर्विधासुउत्तरोत्तरंपुण्याधिक्यं।

**अयनांशनिर्णय**—अयनांश हे ज्योतिःशास्त्रांत प्रसिद्ध आहेत. सध्यां म्हणजे शालिवाहन शकाच्या १७१२ या वर्षी ते अयनांश २१ आहेत; यास्तव संक्रांतीच्या आधीं एकविसाव्या दिवशीं अयनांश—पर्वकाळ होतो असा याचा अर्थ झाला. याप्रमाणेंच कमी अथवा अधिक शक असतां समजावें. वृषभ, सिंह, वृश्चिक व कुंभ या (चार) संक्रांतींना विष्णुपद अशी संज्ञा असून, मिथुन, कन्या, धन व मीन या (चार) संक्रांतींना षडशीति असें नांव आहे आणि मेष व तूळ या (दोन) संक्रांतींना विषुव आणि कर्क व मकर या संक्रांतींना अयन अशीं नांवें आहेत. या ज्या चार प्रकारच्या संक्रांति, त्या उत्तरोत्तर म्हणजे विष्णुपद-संक्रांतीहून षडशीति-संक्रान्त, षडशीतीहून विषुव आणि विषुवापेक्षां अयन नांवाची संक्रांत, या उत्तरोत्तर अधिक पुण्यप्रद होत.

मंगलेषु संक्रान्तित्याज्यघटिकाः—मंगलकृत्येषु सर्वसंक्रांतिष्वविशेषेण पूर्वतः परतश्चषोडशषोडशघटिकास्त्याज्याः चन्द्रादिसंक्रान्तिषुतुपूर्वत्रपरत्र चमिलित्वाक्रमेणद्वेनवद्वेचतुरशीतिःषट्सार्धशतंचघटिकास्त्याज्याःरात्रौसंक्रम-णेग्रहणवद्रात्रावेवस्नानदानादिंकंकर्तव्यमितिकेचित् रात्रौसंक्रमणेपिदिवैवस्ना नादिकंनतुरात्राविति तु सर्वसंमतं बहुदेशाचारश्चैवम् यस्यजन्मर्क्षेरविसंक्रमस्तस्य धनक्षयादिपीडातत्परिहारार्थंपद्मपत्रादियुक्तजलेनस्नानम् विषुवायनयोरह्निसं-क्रमेपूर्वापररात्रौतदन्हिचाध्यापनाध्यायनेवर्जयेत् रात्रिसंक्रमे पूर्वापरदिनयोस्त-द्रात्रौचवर्जयेत् एवंपक्षिणीसंक्रान्तिः द्वादशप्रहरपर्यन्तमनध्यायादिकमिति-तात्पर्यम् अन्योपिविशेषोऽयनसंक्रान्तौवक्ष्यते इतिसंक्रांत्युद्देशोद्वितीयः २

**मंगलप्रसंगीं संक्रांतीच्या त्याज्य घटिका**—लग्नें वगैरे मंगलकार्यांच्या वेळीं, साधारणपणें सर्व संक्रांतींच्या आधींच्या व नंतरच्या मिळून सोळा सोळा घटका वर्ज्य कराव्यात. चंद्रादि ग्रहांच्या संक्रान्तींच्या आधींच्या व नंतरच्या मिळून क्रमानें २। ९। २। ८४। ६ व १५० घटका वर्जाव्यात. संक्रांत जर रात्रीं सुरू होत असेल, तर ग्रहणाप्रमाणें रात्रींच स्नानदानादि कर्में करावींत, असें कित्येकांचें म्हणणें आहे. संक्रान्त जरी रात्रीं सुरू झाली, तरी स्नानादि कर्में दिवसांच करावींत, रात्रीं करूं नयेत हें सर्वसंमत असून, अनेक जागीं असाच परिपाठ आहे. ज्याच्या जन्मराशीला सूर्यसंक्रांत असेल, त्याला धनक्षयादि पीडा होतात. त्यांचा परिहार करण्यासाठीं कमल-पत्रांनीं युक्त असलेल्या पाण्याचें स्नान करावें. विषुव आणि अयन या संक्रांति दिवसास जर सुरू झाल्या, तर आधींच्या व पुढच्या रात्रीं आणि त्या संक्रांतीच्या दिवशीं शिकणें

व शिकविणें हीं कामें करूं नयेत. संक्रांत जर रात्रीं लागेल, तर आधींच्या व पुढच्या दिवशीं आणि त्या रात्रीं शिकणें व शिकविणें हीं वर्ज्य करावींत. याप्रमाणें संक्रांत ज्या काळीं प्राप्त होते ते चार, पूर्वींचे चार व पुढचे चार प्रहर असा एकंदर बारा प्रहरपर्यंत अनध्याय असतो असा याचा अर्थ समजावा. यापेक्षां याची अधिक माहिती अयनसंक्रांतप्रकरणांत सांगण्यांत येईल. याप्रमाणें संक्रांत्युद्देश दुसरा येथें संपला.

**अथमलमासः सद्विविधः अधिमासः क्षयमासश्च संक्रान्तिरहितोमासोऽधिमासः संक्रांतिद्वययुक्तोमासः क्षयमासः पूर्वाधिमासादुत्तरोधिमासस्त्रिंशत्तममासमारभ्याष्टसुनवसुवामासेष्वन्यतमोभवति क्षयमासस्तुएकचत्वारिंशदधिकशतसंख्यैर्वर्षैरेकोनविंशतिसंख्यैर्वावर्षैर्भवति नत्वधिकमासवदल्पकालेन क्षयमासः कार्तिकमार्गशीर्षपौषेष्वन्यतमोभवतिनेतरःयस्मिन्वर्षे क्षयमासस्तस्मिन्वर्षेऽधिकमासद्वयम् क्षयमासात्पूर्वमेकोऽधिमासःक्षयमासानंतरमेकोऽधिमास इति**

**मलमासविचार**—या मलमासाचे अधिक महिना आणि क्षय महिना असे दोन प्रकार आहेत. ज्या महिन्यांत सूर्यसंक्रांति नसते तो अधिक महिना आणि ज्यांत दोन संक्रांति असतात तो क्षयमास होय. एक अधिक महिना झाल्यानंतर दुसरा अधिक महिना तीन महिने होऊन गेल्यावर, आठ किंवा नऊ महिने होण्याच्या आंत केव्हां तरी होतो. एक क्षयमास झाल्यानंतर दुसरा क्षयमास १४१ वर्षांनीं अथवा १९ वर्षांनीं येतो. हा अधिक महिन्याप्रमाणें थोड्या अवकाशानें येत नाहीं. कार्तिक, मार्गशीर्ष अथवा पौष यांपैकींच कोणता तरी एक क्षयमास होतो. या ( तीन महिन्यांवांचून ) दुसरा कोणचाही महिना क्षयमास होत नाहीं. ज्या वर्षीं क्षयमास होतो, त्या वर्षीं त्या क्षयमासाच्या आधीं एक आणि मागून एक असे दोन अधिक महिने येतात.

**अधिकमासोदाहरणम् चैत्रामावास्यायांमेषसंक्रान्तिः ततः शुक्लप्रतिपदमारभ्यामावास्यापर्यन्तंसंक्रान्तिर्नास्ति ततःशुक्लप्रतिपदि वृषभसंक्रान्तिरितिपूर्वः संक्रान्तिरहितोमासोऽधिकवैशाखसंज्ञः वृषभसंक्रान्तियुतस्तुशुद्धवैशाखसंज्ञः**

**अधिक महिन्याचें उदाहरण**—चैत्री अमावास्येला मेष संक्रांति झाली असें समजा त्यानंतर शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत एक महिनाभर संक्रांति नाहीं आणि पुढच्या शुद्ध प्रतिपदेला वृषभसंक्रांति आहे. अशा वेळीं चैत्री अमावास्येनंतरचा संक्रांतिरहित जो महिना, तो अधिक (मलमास) महिना होय. त्याला अधिक वैशाख असें म्हणावयाचें. त्याच्या पुढचा जो वृषभसंक्रांतीनें युक्त महिना, तो शुद्ध वैशाख समजावा.

**अथक्षयमासोदाहरणम् भाद्रपदकृष्णामावास्यायांकन्यासंक्रान्तिः ततआश्विनोऽधिमासः शुद्धाश्विनप्रतिपदितुलासंक्रान्तिः कार्तिकशुक्लप्रतिपदिवृश्चिकसंक्रान्तिः ततोमार्गशीर्षशुद्धप्रतिपदिधनुःसंक्रान्तिः तस्मिन्नेवमासेऽमावा-**

**स्यायांमकरसंक्रान्तिरितिधनुर्मकरसंक्रान्तिद्वययुक्तएकोमासः क्षयमाससंज्ञकः सचमार्गशीर्षपौषाख्यमासद्वयात्मकएकोमासोज्ञेयः तस्यप्रतिपदादितिथीनां-पूर्वार्धेमार्गशीर्ष उत्तरार्धेपौष इत्येवंसर्वतिथीनांमासद्वयात्मकत्वात् अत्र तिथि-पूर्वार्धेमृतस्यमार्गशीर्षेप्रत्यब्दश्राद्धमुत्तरार्धमृतस्यतुपौषे एवंजननेवर्धापनादि-विधिरपि ततऊर्ध्वंमाघामावास्यायां कुंभसंक्रान्तिः ततःफाल्गुनोऽधिमासः शुद्धफाल्गुनशुक्लप्रतिपदिमीनसंक्रान्तिः एवंपूर्वापराधिमासद्वययुक्तः क्षय-मासोयस्मिन्वर्षे तत्रत्रयोदशमासात्मकंकिंचिदूननवत्यधिकशतत्रयदिनैर्वर्षम् तत्रक्षयमासात्पूर्वोऽधिमासः संसर्पसंज्ञः सर्वकर्मार्हःशुभकर्मणिनत्याज्यः अंह-स्पतिसंज्ञः क्षयमासस्तदुत्तरभाव्यधिकमासश्चसर्वकर्मसुवर्ज्यः एवंत्रिवत्सरांतर-स्थः केवलोधिकसोपिवर्ज्यः**

**क्षयमासाचें उदाहरण**—भाद्रपद कृष्ण अमावास्येला कन्यासंक्रांति आली आहे असें समजा; नंतर अधिक आश्विन महिना आला. त्यानंतर शुद्ध आश्विनांतल्या शुद्ध प्रतिपदेस तूळसंक्रांत, कार्तिक शुद्ध प्रतिपदेला वृश्चिकसंक्रांत, त्यानंतर मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला धनु आणि त्याच महिन्यांत अमावास्येला मकरसंक्रांती आल्या असतां, धनु व मकर अशा दोन्ही संक्रांतींनीं युक्त जो एक महिना, त्याला क्षयमास असें म्हणतात. हा मार्गशीर्ष व पौष या दोन महिन्यांचा मिळून एक महिना होतो. या क्षयमासांत ज्या प्रतिपदादिक तिथि येतात, त्यांचे पूर्वार्ध मार्गशीर्ष महिन्यांतले व उत्तरार्ध पौष महिन्यांतले समजावे. याप्रमाणें प्रत्येक तिथि दोन महिन्यांतली असते. या महिन्यांतल्या तिथींच्या पूर्वार्धांत मेलेल्यांचें प्रतिसांवत्सारिक श्राद्ध मार्गशीर्ष महिन्यांत करीत जावें व उत्तरार्धांत मेलेल्यांचें श्राद्ध पौष महिन्यांत करीत जावें. कोणी जन्म पावलें असल्यास त्याच्या वाढदिवसाचा विधिदेखील याच प्रकारानें करावा. क्षयमासा-नंतर माघांतल्या अमावास्येला कुंभसंक्रांत, नंतर अधिक फाल्गुन मास आणि शुद्ध फाल्गुनांतल्या शुद्ध प्रतिपदेला मीन संक्रान्त येईल. याप्रमाणें आधीं एक व मागून एक अशा दोन अधिक महिन्यांच्या मध्यें क्षयमास येतो. अशा क्षयमासयुक्त वर्षाचे तेरा महिने असून, त्या वर्षाचे दिवस दोनशें नव्वदांहून कांहीं कमी असतात. क्षय-मासाच्या आधींच्या अधिक महिन्याला संसर्प असें नांव आहे. तो सर्व कर्मांना योग्य असल्यानें शुभकार्याकरितां त्याज्य नाहीं. क्षयमासाला अंहस्पति अशी संज्ञा आहे. क्षयमास व त्याच्यानंतर येणारा अधिक मास हे सर्व कर्मांना वर्ज्य आहेत. याचप्रमाणें प्रत्येक तीन वर्षांनीं येणारा अधिक महिनाही वर्ज्य होय.

**तत्रवर्ज्यावर्ज्यनिर्णयः–अनन्यगतिकंनित्यंनैमित्तिकंकाम्यंच अधिकमास-क्षयमासयोःकर्तव्यम् सगतिकंनित्यंनैमित्तिकंकाम्यंचवर्ज्यम् तथाहि संध्याग्नि-होत्रादिनित्यं ग्रहणस्नानादिनैमित्तिकं कारीर्यादिकंरक्षोग्रहीतजीवनार्थरक्षोघ्ने-ष्ट्यादिकंचकाम्यंमलमासेऽपिकार्यम्ज्योतिष्टोमादिनित्यंजातेष्ट्यादिनैमित्तिकं पुत्रकामेष्ट्यादिकाम्यंचमलमासोत्तरशुद्धमास्येवकर्तव्यम् आरब्धकाम्यस्यमल-**

मासेप्यनुष्ठानम् नूतनारम्भःसमाप्तिश्चनकर्तव्या तथा पूजालोपादिनिमित्तक-पुनर्मूर्तिप्रतिष्ठां गर्भाधानाद्यन्नप्राशनान्तसंस्कारान्प्राप्तकालाननन्यगतिकान् ज्व-रादिरोगशांतिमलभ्ययोगेश्राद्धव्रतादिकं नैमित्तिकप्रायश्चित्तं नित्यश्राद्धमूनमा-सिकादिश्राद्धानि दर्शश्राद्धंच मलेपिकुर्यात् चैत्रादौमलमासे मृतानांकदा-चिद्बहुकालेनतस्मिन्नेवचैत्रादौमलमासे प्राप्तेमलमासएवप्रतिसांवत्सरिकंश्राद्धं कर्तव्यम् चैत्रादौशुद्धमासेमृतानांतुप्रत्याब्दिकंश्राद्धं मलमासेनकर्तव्यम् शुद्धे एवचैत्रादौकर्तव्यम् शुद्धमासेमृतानांतुप्रथमाब्दिकं मलमासएवकार्यनशुद्धे द्वितीयाब्दिकंतुशुद्ध एव एकादशाहान्तकर्मसपिण्डीकर्मच मलेपिकार्यम् द्वितीय मासिकादिश्राद्धंतुमलेशुद्धेचावृत्त्याद्विवारंकर्तव्यम् एवं च यत्रद्वादशमासिकम-धिकमासेप्राप्तंतस्यमलेशुद्धे च द्विरावृत्तिंकृत्वा ऊनाब्दकालेऊनाब्दिकंचकृत्वा चतुर्दशेमासेप्रथमाब्दिकंकार्यम् यस्मिन्वर्षेक्षयमासाव्यवहितोऽधिकमासःयथा कार्तिकोधिमासस्तदुत्तरोमासोवृश्चिकधनुःसंक्रान्तियुक्तत्वात्क्षयसंज्ञकस्तत्रकार्ति-कमासस्थंप्रत्याब्दिकं पूर्वेऽधिमासेउत्तरेक्षयमासेचकार्यम् यत्रापिक्षयाद्व्यवहि तपूर्वोधिमासोयथाऽऽश्विनोधिमासोमार्गशीर्षः क्षयस्तत्रापि आश्विनमासगतं-श्राद्धमाधिकेशुद्धेच आश्विनेकार्यं द्वयोरपिकर्मार्हत्वादितिभाति व्यवहितक्षय-मासगतंत्वाब्दिकंक्षयमासएवकार्यम् तथाच पूर्वोक्तमार्गशीर्षक्षयोदाहरणेमार्ग-शीर्षगतंपौषगतंचाब्दिकमेकस्मिन्नेवमासे तिथिपूर्वार्धादिविभागं विनैवकार्य-मितिफलितम् ।

**वर्ज्यावर्ज्यकर्मनिर्णय**—जीं केल्यावांचून सोयच नाहीं अशीं जीं—अनन्यगतिक, नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्मे, तीं अधिकमास अथवा क्षयमास यांत करावींत. पुढें करतां येतील अशीं जीं—सगतिक—नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्मे, तीं ( अधिक अथवा क्षय ) या महिन्यांत करूं नयेत. उदाहरणार्थः—संध्या, अग्निहोत्र वगैरे नित्यकर्मे, ग्रहण-स्नानादि नैमित्तिक कर्मे आणि पर्जन्यसंबंधीं करीर्यादि व ब्रह्मराक्षसादिकांबद्दलचीं पीडाशमनार्थ रक्षोघ्नेष्ट्यादि काम्यकर्मे, हीं सर्व अधिक महिन्यांत देखील करावींत. ज्योतिष्टोमादि नित्य, जातेष्ट्यादि नैमित्तिक, पुत्रकामेष्ट्यादि काम्य वगैरे कर्मे मलमासानंतर शुद्ध महिन्यांतच करावींत. आधीं आरंभिलेलें काम्यकर्म अधिक महिन्यांतहि करावें. नवीन कर्मांचा आरंभ व पूर्वी सुरू केलें असलेल्याची समाप्ति—या गोष्टी या मलमासांत करूं नयेत. त्याचप्रमाणें पूजेचा लोप झाल्याकारणानें करावी लागणारी मूर्तींची पुन्हां प्रतिष्ठा, अनन्यगतिक व ज्यांचा कालच येऊन ठेपला आहे अशीं जीं गर्भाधानापासून अन्नप्राशनापर्यंतचीं संस्कारकर्मे तीं, ज्वरादिक रोगनिमित्त शान्ति, अलभ्य योगावर करावें लागणारें श्राद्धव्रतादिक नैमित्तिक प्रायश्चित्त, नित्यश्राद्ध, ऊनमासादि श्राद्धें दर्शश्राद्ध—हीं मलमासांतसुद्धां करावींत. चैत्रादिकांपैकीं एखाद्या अधिक महिन्यांत मेलेल्याचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, पुन्हां तोच चैत्रादिकांपैकीं मलमास आला तरी त्यांतच करावें. शुद्ध महिन्यांत मेलेल्याचें सांवत्सरिक श्राद्ध (पाहिलें वर्ष जर अधिक महिन्यांत पुरें

होत असेल तर ) मलमासांतच करावें, शुद्धमासांत करूं नये. दुसरें अगर पुढील सांवत्सरिक श्राद्धें मात्र शुद्ध महिन्यांतच करावींत. पहिल्या दिवसापासून अकराव्या दिवसापर्यंत करावयाचीं कर्में व त्याचप्रमाणें सपिंडीकर्म—हीं मलमासांत देखील करावींत. द्वितीय मासिकादि श्राद्ध, मलमासांत व शुद्ध मासांत अशीं दोनदां करावींत. याचप्रमाणें बारावें मासिक श्राद्ध जर अधिक महिन्यांत करणें प्राप्त होईल, तर तेंहि मलमासांत व शुद्ध मासांत असें दोनदां करून, ऊनाब्दकालीं ऊनाब्दिक करावींत व बवदाव्या महिन्यांत पहिलें वार्षिक ( सांवत्सरिक ) श्राद्ध करावें. ज्या वर्षी अधिक महिन्याच्या पुढचाच महिना क्षयाचा येईल, त्यावर्षी कार्तिकांत करावयाचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध अधिक महिन्यांत व क्षयमासांत असें दोनदां करावें. उदाहरणार्थः—अधिक कार्तिक महिना येऊन, पुढच्या महिन्यांत वृश्चिक व धनु अशा दोन संक्रांति आल्यामुळें तो जो क्षयमास होतो, त्याप्रसंगीं वरील निर्णय जाणावा. अधिक महिन्याच्या पाठोपाठ जेव्हां क्षयमास नसेल, तेव्हां आश्विन महिन्यांतलें श्राद्ध, ते दोन्ही महिने कर्मार्ह असल्यामुळें अधिक व शुद्ध अशा दोन्ही आश्विनांत करावें, असें मला वाटतें. उदाहरणार्थः—आश्विन हा अधिक महिना येऊन मार्गशीर्ष महिना जेव्हां क्षयाचा येईल तेव्हां, वरील म्हणण्याचें तात्पर्य जाणावें. क्षय महिन्याच्या आधींचा महिना जर अधिकाचा नसेल, तर क्षयमासांत जें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावयाचें, तें क्षयमासींच करावें ! त्याचप्रमाणें वर जें मार्गशीर्षाचें क्षयमासाचें उदाहरण सांगितलें आहे, त्यामध्यें मार्गशीर्ष व पौष या महिन्यांत करावयाचें जें सांवत्सरिक श्राद्ध, तें तिथीचा पूर्वार्ध व उत्तरार्ध असा विभाग न करतां एकदांच क्षयमासीं करावें.

अथमलमासेवर्ज्यानिउपाकर्मोत्सर्जनेअष्टकाश्राद्धानिअधिकेवर्ज्यानिचूडामौंजीबन्धविवाहास्तीर्थादियात्रावास्तुकर्मगृहप्रवेशदेवप्रतिष्ठाकूपारामाद्यु—त्सर्गो नूतनवस्त्रालंकारधारणं तुलापुरुषादिमहादानानि यज्ञकर्माधानमपूर्वतीर्थदेवदर्शनंसंन्यासःकाम्यवृषोत्सर्गोराजाभिषेकोव्रतानिसगतिकमन्नप्राशनं समावर्तनमतिक्रान्तनामकर्मादिसंस्काराः पवित्रारोपणदमनार्पणश्रवणाकर्म सर्पबल्यदिपाकसंस्थाः शयनपरिवर्तनाद्युत्सवःशपथदिव्यादिकर्म एतानि मलमासे वर्ज्यानि नैमित्तिकानिरजोदर्शनशान्तिविच्छिन्नाधानपुनः प्रतिष्ठादीनियदिनिमित्तानन्तरमेवक्रियन्तेतदानमलमासादिदोषः कालातिपत्तौतुशुद्धेएव कर्तव्यानि आग्रयणंदुर्भिक्षसंकटेमलमासेकार्यमन्यथाशुद्धेएव युगादिमन्वादिश्राद्धानांमासद्वयेप्यावृत्तिःक्षयात्पूर्वोऽधिमासः संसर्पसंज्ञकःपूर्वमुक्तः तत्रचूडाकर्म—व्रतबंधविवाहाग्न्याधानयज्ञोत्सवमहालयराजाभिषेकाएववर्ज्याः नान्यानिकर्माणि अपूर्वव्रतारंभोव्रतसमाप्तिश्चमिलमासेनभवति सपूर्वमाघस्नानादेःक्षयमासेप्यारम्भसमाप्तीति मकरसंक्रान्तियुक्तक्षयमासगतपौर्णमास्यांमाघस्नानमारभ्यकुम्भसंक्रान्तियुतमाघपौर्णमास्यांसमापनीयम् एवंकार्तिकेप्यूह्यम् यत्रवैशाखादिरधिकस्तत्रवैशाखस्नानादिमासव्रतानांचैत्रपूर्णिमायामारब्धानांशुद्धवैशाखपौर्णमास्यांसमाप्तिरिति तेषांमासद्वयमनुष्टानम् ।

**मलमासांतलीं वर्ज्य कर्मे**——उपाकर्म, उत्सर्जन आणि अष्टकाश्राद्धें—हीं अधिक महिन्यांत करूं नयेत. चौल, मौंजीबंधन, लग्न, तीर्थयात्रा, वास्तुकर्म, गृहप्रवेश, देवप्रतिष्ठा, विहीर, बाग इत्यादिकांचा उत्सर्ग, नवीं वस्त्रें किंवा अलंकार हीं धारण करणें, तुला-पुरुषादि महादानें, यज्ञकर्म, अग्निस्थापना, पूर्वीं न पाहिलेल्या देवतीर्थादिकांचें दर्शन, संन्यास, काम्यवृषोत्सर्ग, राज्याभिषेक, व्रतें, पुढें केला असतां अडचण नसणारा अन्नप्राशनसंस्कार, सोडमुंज, पूर्वीं होणें राहिलेला नामकर्मादि संस्कार, पोंवतीं वाहाणें, दवणा वाहणें, श्रवणाकर्म, सर्पबलि वगैरे; पाकसंस्था, देवाचें शयन, परिवर्तन (एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळण्याची क्रिया) वगैरे उत्सव, शपथविधि, दिव्य करण्याचीं वगैरें कामें—हीं सर्व अधिक महिन्यांत वर्ज्य करावींत. रजोदर्शनानिमित्त शांति, विच्छिन्नाग्नीचें पुन्हा संधान, पुनः प्रतिष्ठा वगैरे जीं नैमित्तिक कर्में, त्यांच्या बाबतींत, तीं निमित्त झाल्याबरोबर जर केलीं, तर त्यांना मलमासादिकांचा दोष नाहीं; परंतु निमित्त होऊन जर काळ लोटला, तर तीं शुद्ध मासांतच करावींत. दुर्भिक्षादि जर संकट असेल, तर आग्रयण मलमासांत करण्यास हरकत नाहीं. संकट नसल्यास शुद्ध मासांतच करावें. युगादि व मन्वादि श्राद्धें अधिक व शुद्ध अशा दोन्ही महिन्यांत करावींत. क्षयमासाच्या आधीं येणाऱ्या अधिकमासाला संसर्प हें नांव असल्याचें मागें सांगितलेंच आहे. या संसर्पमासांत—चूडाकर्म, व्रतबंध, विवाह, अग्निस्थापना, यज्ञ, उत्सव, महालय, राज्याभिषेक—हीं कर्में करूं नयेत. यांहून इतर कर्में करण्यास हरकत नाहीं. पूर्वीं न केलेल्या व्रताचा आरंभ अथवा समाप्ति हीं मलमासांत वर्ज्य आहेत. पूर्वीं केलेल्या माघस्नानादि कर्मांचा आरंभ अथवा समाप्ति, क्षयमासांत करण्यास हरकत नाहीं. मकरसंक्रांतीनें युक्त असलेल्या क्षयमासांत पौर्णिमेला माघस्नानारंभ करून कुंभ-संक्रांतियुक्त माघमासीं पौर्णिमेला त्याची समाप्ति करावी. कार्तिकमासासंबंधानेंही हेंच जाणावें. वैशाख महिना जेव्हां अधिक येतो तेव्हां वैशाखस्नानादि मासव्रतांचा आरंभ चैत्री पौर्णिमेला करून, त्याची समाप्ति शुद्ध वैशाखांतल्या पौर्णिमेला करावी; म्हणजे हें व्रत दोन महिन्यांचें झालें.

गुरुशुक्रास्तादौसिंहस्थेगुरौचवर्ज्यादियन्मलमासेवर्ज्यमुक्तंतद्गुरुशुक्रास्तबाल्यवार्धकेष्वपिज्ञेयम् तत्रास्तात्प्राक्सप्ताहंवार्धकमुदयानन्तरंसप्ताहंबाल्यमिति-मध्यमःपक्षः पञ्चदशाहपञ्चाहत्र्यहादिपक्षाआपदनापदादिविषयतयादेशविशेषपरतयाचयोज्यअयंवर्ज्यावर्ज्यनिर्णयसिंहस्थेगुरावपिज्ञेयाःतत्रविशेषउच्यते कर्णवेधचौलमौञ्जीबन्धविवाहदेवयात्राव्रतवास्तुकर्मदेवप्रतिष्ठासन्यासाविशेषतो वर्ज्या इति.।

**गुरुशुक्रास्तादिकांतील वर्ज्य कर्में**——पूर्वीं मलमासांत जीं कर्में करणें वर्ज्य असल्याचें सांगितलें आहे, तीं कर्में गुरु व शुक्र यांच्या अस्तांत व त्यांचें बाल्य व वार्धक्य या अवस्था असल्या तरी वर्ज्य करावींत. अस्तापूर्वीं सात दिवस वार्धक्य आणि उदयानंतर सात दिवस

बाल्य मानणें हा मध्यम पक्ष होय. १५ दिवस, ५ दिवस, ३ दिवस वगैरे जे पक्ष सांगितले आहेत, ते आपत्ति, अनापत्ति, स्थलविशेष वगैरे गोष्टींचा विचार करून, ग्राह्य समजावे.

**अथसिंहस्थापवादः मघानक्षत्रगतेसिंहांशगतेचगुरौसर्वदेशेषुसर्वमाङ्गलिककर्मणांनिषेधःसिंहांशोत्तरंगोदादक्षिणेभागीरथ्युत्तरेसिंहस्थेदोषोनास्तिगङ्गागोदामध्यदेशेतुसर्वासिंहस्थेविवाहव्रतबन्धयोर्दोषः अन्यकर्माणिसिंहांशोत्तरंसर्वदेशेषुकर्तव्यानि मेषस्थेसूर्येसर्वदेशेषुसर्वमाङ्गलिककर्मणांसर्वासिंहस्थेनदोषः क्वचिद्वृषस्थितेऽर्केपिदोषाभावउक्तः अत्रसिंहस्थेगुरौगोदावरीस्नानंकन्यागतेकृष्णास्नानंमहापुण्यम् गोदावर्यायात्रिकाणांमुण्डनोपवासावावश्यकौ नतुतत्तीरवासिनाम् गर्भिण्यामपिभार्यायांविवाहादिमङ्गलोत्तरमापगोदावर्यांमुण्डनेदोषोनास्ति गयागोदावरीयात्रायांमलमासगुरुशुक्रास्तादिदोषोनास्ति मलमासेव्रतविशेषोऽन्यत्रज्ञेयः इतिमलमासगुरुशुक्रास्तसिंहस्थगुरुवर्ज्यावर्ज्यनिर्णयस्तृतीय उद्देशः ।**

**सिंहस्थ गुरु असतां वर्ज्यावर्ज्य**—वर सांगितलेला वर्ज्यावर्ज्यनिर्णय, गुरु सिंहस्थ असतांनाहि आहे. गुरु सिंह-राशींत असतांना—कान टोंचणें, चौल करणें, मुंज करणें, लग्न करणें, देवयात्रेला जाणें, व्रतें आरंभणें, वास्तुकर्म करणें, देवप्रतिष्ठा व संन्यास—या गोष्टी मुळींच करूं नयेत, हा यांत विशेष आहे. या नियमाला अपवाद आहेत, ते येणेंप्रमाणें:—मघानक्षत्रांत व सिंहेच्या आधिक अंशांत जर गुरु असेल, तर सर्व देशीं सर्व मंगलकृत्यांचा निषेध सांगितला आहे. सिंहांशांतून गुरु गेल्यावर गोदेच्या दक्षिणे-कडे आणि भागीरथीच्या उत्तर दिशेला सिंहस्थाचा दोष नाहीं. गंगा व गोदा यांच्यामध्यें असलेल्या देशांत सर्व सिंहस्थभर लग्न व मुंज हीं कर्में वर्ज्य आहेत. यांवांचून इतर कर्में सिंहांशानंतर वाटेल त्या प्रदेशांत करावींत. सूर्य मेष राशीचा असतांना सर्वत्र मांगलिकं कर्में करण्यांत सिंहस्थदोष नाहीं. सूर्य वृषभ राशीचा असतांना देखील सिंहस्थ गुरूचा दोष नाहीं, असेंही क्वचित् सांगितलेलें आहे. गुरु सिंहेचा असतांना गोदास्नान आणि कन्येचा असतांना कृष्णास्नान, यांचें महा-पुण्य सांगितलें आहे. गोदातीरीं यात्रिकांनीं मुंडन व उपास हीं अवश्य करावींत. तेथेंच राहणाऱ्यांस या गोष्टी आवश्यक नाहींत. बायको गरोदर असली किंवा विवाहादि मंगलकार्य झालें असलें तरीहि गोदावरीच्या तीरीं मुंडन करण्यांत दोष नाहीं. गया व गोदावरी यांच्या यात्रांना—मलमास व गुरुशुक्रास्त यांचे दोष नाहींत. मलमासाचें विशेष व्रत निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. याप्रमाणें येथें तिसरा उद्देश समाप्त झाला.

**अथतिथिनिर्णयेसामान्यपरिभाषा । तिथिर्द्विविधा पूर्णासखण्डाच सूर्योदयमारभ्यषष्टिनाडिकाव्यासापूर्णा एतदन्यासखण्डा सखण्डापिद्विविधा शुद्धाविद्धाच सूर्योदयमारभ्यअस्तसमयपर्यन्तंविद्यमानाशिवरात्र्यादौनिशीथपर्यन्तं-**

विद्यमानाचशुद्धा तदन्याविद्धा वेधोपिद्विविधः प्रातर्वेधःसायंवेधश्च सूर्योदयो-त्तरंषड्घटिकापरिमिततिथ्यन्तरस्पर्शात्मकःप्रातर्वेधःसूर्यास्तात्प्राक्षड्घटीमित-तिथ्यन्तरस्पर्शःसायंवेधः एकादशीव्रतविषयेतुवेधोवक्ष्यतेक्वचित्तिथिविशेषे वेधाधिक्यम् पञ्चमीद्वादशनाडीभिः षष्ठींविद्धांकरोति दशमीपञ्चदशभिरेकाद-शीवेधकृत् चतुर्दशीअष्टादशनाडीभिःपञ्चदशींविध्यतिविद्धाश्चतिथयःक्वचित्क-र्मणिग्राह्याः कुत्रचित्त्याज्याश्चभवन्ति तत्रसंपूर्णाशुद्धाचतिथिः प्रायेणनिर्णयं-नापेक्षतेसंदेहाभावात् निषेधविषयेसखण्डापिनानिर्णयार्हा निषेधस्तुनिवृत्त्या-त्माकालमात्रमपेक्षते इतिवचनेनअष्टम्यादिषुनारिकेलादिभक्षणनिषेधादेस्तत्का-लमात्रव्याप्ततिथ्यपेक्षणात् ।

**तिथिनिर्णयाची सामान्य परिभाषा**—तिथीचे प्रकार दोन आहेत. एक पूर्णा तिथि व दुसरी सखंडा तिथि. सूर्योदयापासून आरंभ करून साठ घटका जिची व्याप्ति आहे ती पूर्णातिथि. याहून भिन्न ती सखंडा. शुद्धा व विद्धा असे तिचे ( सखंडेचे ) दोन प्रकार आहेत. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत असणारी व शिवरात्र्यादिकांच्या दिवशीं मध्यरात्रीपर्यंत राहणारी ती शुद्धा होय. याहून भिन्न ती विद्धा जाणावी. प्रातर्वेध व सायंवेध अशा दोन वेधांवरूनहि विद्धा तिथीचे दोन भेद होतात. सूर्योदयानंतर सहा घटकांपर्यंत एका तिथीला दुसरी तिथि जर स्पर्श करीत असेल, तर तो प्रातर्वेध होय आणि सूर्यास्तापूर्वी सहा घटकांपर्यंत जर एका तिथीला दुसरी तिथि स्पर्श करील तर तो सायंवेध होय. एकादशीव्रताचा वेध त्या प्रकरणांत सांगितला आहे. कांहीं तिथींना यापेक्षां अधिक वेध असतो. उदाहरणार्थः—पंचमी बारा घटकांनीं षष्ठीला विद्ध करते, दशमी पंधरा घटकांनीं एकादशीला विद्ध करते, चतुर्दशी अठरा घटकांनीं पौर्णिमेला विद्ध करते. विद्ध तिथि कांहीं कर्मांना ग्राह्य आहेत व कांहींना त्याज्य आहेत. संपूर्णा तिथि व शुद्धा तिथि यांसंबंधानें संदेह नसल्यामुळें त्यांच्या निर्णयाची आवश्यकता नाहीं! त्याचप्रमाणें ज्या गोष्टींचा निषेध सांगितला आहे, त्या गोष्टीं-संबंधानें सखंडा तिथींचा देखील निर्णय सांगणें नलगे. कारण, 'निषेध हा निवृत्ति-स्वरूप असून, त्याला कालमात्राचीच केवळ अपेक्षा असते' असें वचन आहे. या वचनालाच अनुसरून, अष्टम्यादि तिथींना नारळ वगैरे खाण्याचा जो निषेध सांगितला आहे, तो त्या तिथींच्या कालापुरताच लागू आहे, हें उघडच सिद्ध होतें.

विहितव्रतादिविषयेतुनिर्णयउच्यते। तत्रकर्मणोयस्ययः कालस्तत्कालव्यापिनी-तिथिर्ग्राह्या यथाविनायकादिव्रतेमध्यान्हादौपूजनादिविधानान्मध्यान्हादिव्या-पिनी दिनद्वयेकर्मकाले व्याप्तावव्याप्तौतदेकदेशव्याप्तौवा युग्मवाक्यादिनापूर्व-विद्धायाःपरविद्धायावा तिथेर्ग्राह्यत्वम् युग्मवाक्यंतु युग्माग्नियुगभूतानांषण्मु-न्योर्वसुरन्ध्रयोः । रुद्रेणद्वादशीयुक्ताचतुर्दश्याचपूर्णिमा । प्रतिपद्यप्यमावा-स्यातिथ्योर्युग्मंमहाफलमिति १ युग्मंद्वितीया अग्निस्तृतीया। द्वितीया तृतीया-विद्धाग्राह्या तृतीया द्वितीयाविद्धाग्राह्येत्येवंद्वितीयातृतीययोर्युग्मम् चतुर्थी

पञ्चम्योर्युग्मम् षष्ठीसप्तम्योर्युग्मम् अष्टमीनवम्योर्युग्मम् एकादशीद्वादश्यो-र्युग्मम् चतुर्दशीपौर्णमास्योर्युग्मम् अमावास्याप्रतिपदोर्युग्ममित्यर्थः क्वचि-च्चतुर्थीगणनाथस्यमातृविद्धाप्रशस्यतइत्यादिविशेषवाक्यैर्ग्राह्यत्वानिर्णयः वच-नवशेनग्राह्यायास्तिथेः कर्मकालेसत्त्वाभावे साकल्यवचनैः सत्त्वभावनीयम् तानिच यांतिथिंसमनुप्राप्यउदयंयातिभास्करः। सातिथिःसकलाज्ञेयास्नानदान-जपादिषुइत्यादीनि इतिसामान्यनिर्णयश्चतुर्थउद्देशः

**व्रतादिकांचा तिथिनिर्णय**--ज्या कर्मांना जो काल सांगितला असेल त्या कर्मांकरितां तत्कालव्यापिनी तिथि घ्यावी. उदाहरणार्थः—विनायकव्रताचें पूजन मध्यान्हकाळीं सांगितलें आहे; यास्तव, मध्यान्ह-काळव्यापिनी तिथी घ्यावी. कर्मकाल जर दोन दिवसांचा असेल अथवा नसेल किंवा अंशतः असेल, तर युग्मवाक्याच्या अनुरोधानें पूर्वविद्धा किंवा परविद्धा तिथि घ्यावी. युग्मवाक्य हें–द्वितीया तृतीया विद्धा घ्यावी, तृतीया द्वितीया विद्धा घ्यावी असें सांगतें. यावरूनच–द्वितीयातृतीयांचें युग्म, चतुर्थीपंचमींचें युग्म, षष्ठीसप्तमींचें युग्म, अष्टमीनवमींचें युग्म, एकादशीद्वादशींचें युग्म, चतुर्दशीपौर्णिमांचें युग्म व अमावास्याप्रतिपदांचें युग्म–अशीं युग्में जाणावींत. गणपतीच्या व्रताविषयीं चतुर्थी तिथि तृतीयेनें विद्ध घ्यावी अशीं जीं विशेष वचनें आहेत, त्यांवरूनच तिथिनिर्णय ठरतो. विशेष वचनांनीं सांगितलेल्या तिथीचा कर्मकालीं जर अभाव असेल, तर सर्वसाधारण वचनाला अनुसरूनच तिथिनिर्णय करावा. 'ज्या तिथीवर सूर्योदय होतो ती तिथि–स्नानदानजपादि कर्मांना पूर्ण आहे' अशा प्रकारचीं सर्वसाधारण वचनें आहेत. याप्रमाणें येथें चौथा उद्देश संपला.

कर्मविशेषेनिर्णयः—कर्माणिद्विविधानिदैवानिपित्र्याणिच दैवानिषड्वि-धानि एकभुक्तनक्तायाचितोपवासव्रतदानाख्यानि मध्याह्नेएकवारमेकान्नभोज-नमेकभुक्तम् रात्रावेवप्रदोषकालेभोजनंनक्तम् याचनांविनातद्दिनेलब्धस्यान्ना,-देर्भोजनमयाचितम् दिनान्तरलब्धस्यापिपाचकस्त्रीपुत्रादिकंप्रतियाचनमन्तरे-णभोजनमयाचितमितिकेचित् अहोरात्रभोजनाभावउपवासःपूजाद्यात्मकःकर्म-विशेषोव्रतम् स्वस्वत्वानिवृत्तिपूर्वकंपरस्वत्वापादनंदानम् तानिचैकभुक्तादीनि-क्वचिद्व्रताद्यङ्गतयाविहितानि क्वचिदेकादश्याद्युपवासप्रतिनिधितयाविहितानि-क्वचित्स्वतंत्राणीतित्रिविधानि तत्राण्याङ्गानांप्रतिनिधिभूतानांचतत्तत्प्रधान-वशेननिर्णयः।

**विशेषकर्मनिर्णय**—दैवकर्में व पित्र्यकर्में असे कर्मांचे दोन प्रकार आहेत. एक-भुक्त, नक्त, अयाचित, उपवास, व्रत आणि दान–या सहा गोष्टी दैवकर्मांत येतात. मध्यान्हीं एकदांच जें एकच अन्न खाणें तें एकभुक्त, रात्रीं प्रदोषकाळीं जें भोजन करणें तें नक्त, याचना केल्यावांचून ज्या दिवशीं जें अन्न मिळेल तें खाणें म्हणजे अयाचित, स्त्रीपुत्रादिकांजवळ याचना न करितां इतर दिवशीं

मिळालेल्या अन्नाचें भोजन देखील अयाचितच होतें, असेंहि कोणी म्हणतात. अहोरात्र भोजन न करणें म्हणजे उपवास. पूजनादि स्वरूपाचें जें विशिष्ट कर्म त्यास व्रत म्हणतात. आपल्या मालमत्तेवरची आपली सत्ता काढून, दुसऱ्याची सत्ता तिच्यावर स्थापन करण्यास दान म्हणतात. हीं जीं एकभुक्तादि कर्में, तीं क्वचित् व्रतादिकांचें अंग, क्वचित् एकादश्यादिकांच्या उपवासांच्या प्रतिनिधिरूपाचीं अंगें व क्वचित् स्वतंत्र अशीं तीन प्रकारचीं सांगितलीं आहेत. अंगरूप अथवा प्रतिनिधिरूप कर्मांचा निर्णय प्रधानकर्मांच्या निर्णयाप्रमाणेंच समजावा.

**स्वतंत्राणांनिर्णयउच्यते तत्रदिनंपञ्चधाविभज्यप्रथमभागःप्रातःकालोज्ञेयः द्वितीयःसङ्गवः तृतीयोमध्याह्नः चतुर्थोभागोऽपराह्नः पञ्चमःसायाह्नः सूर्यास्तोत्तरंत्रिमुहूर्तःप्रदोषः तत्रैकभुक्तेमध्यान्हव्यापिनीतिथिर्ग्राह्या तत्रापिदिनार्धसमयेऽतीतेत्रिंशद्घटिकात्मकमध्यमीदिनमानेनषोडशादिघटीत्रयंमुख्योभोजनकालः ततऊर्ध्वमासायंगौणकालःअत्रपूर्वेद्युरेवमुख्यकालेव्याप्तिः परेद्युरेवव्याप्तिरुभयेद्युर्व्याप्तिरुभयत्रापिव्याप्त्यभावः उभयत्रसाम्येनैकदेशव्याप्तिरिति षट्पक्षाभवन्ति तत्रपूर्वेद्युरेवमुख्यकालेग्राह्यतिथिसत्त्वेपूर्वैव परत्रैवसत्त्वेपरैवे त्यसंदेहः उभयत्रापिपूर्णव्याप्तित्वेयुग्मवाक्यान्निर्णयः उभयत्रव्याप्त्यभावेपूर्वैव गौणकालव्याप्तिसत्त्वात् साम्येनैकदेशव्याप्तौपूर्वा वैषम्येणैकदेशव्याप्तौदिनद्वयेपिकर्मपर्याप्ततिथिलाभेयुग्मवाक्यान्निर्णयः कर्मपर्याप्ततिथ्यलाभेपूर्वैवेति इत्येकभुक्तम्.**

**स्वतंत्रकर्मनिर्णय**—दिवसाच्या पांच भागांपैकीं जो पहिला तो प्रातःकाल, दुसरा संगवकाल, तिसरा मध्यान्हकाल, चौथा अपराण्हकाल आणि पांचवा सायान्हकाल. सूर्यास्तानंतर तीन मुहूर्तांपर्यंत प्रदोषकाल असतो. एकभुक्तकर्माला मध्यान्हव्यापिनी तिथि ग्राह्य समजावी. त्यांत देखील दिवसाचा अर्धभाग गेल्यावर, तीस घटकांचें मध्यम दिनमान धरून, सोळाव्या घटकेच्या आरंभापासून अठराव्या घटकेच्या अखेरीपर्यंत तीन घटका हाच मुख्य भोजनकाल होय. त्यापुढें सायंकाळपर्यंतचा जो काळ तो गौण होय. तिथीच्या व्याप्तीबद्दल निरनिराळीं जीं सहा मतें आहेत, तीं येणेंप्रमाणें:—(१) पूर्वदिवशीं मुख्यकाळीं व्याप्ति. (२) दुसऱ्या दिवशीं व्याप्ति. (३) दोन्ही दिवशीं व्याप्ति. (४) दोन्ही दिवशीं व्याप्तीचा अभाव. (५) दोन्ही दिवशीं अंशतः सारखी व्याप्ति. आणि (६) दोन्ही दिवशीं कमी अधिक अंशानें व्याप्ति. पूर्व दिवशीं जर मुख्य कालीं ग्राह्य तिथि असेल तर पूर्व दिवस घ्यावा, आणि दुसऱ्या दिवशीं असेल तर दुसरा दिवस घ्यावा हें उघडच आहे. दोन्ही दिवशीं जर पूर्ण व्याप्ति असेल, तर युग्मवाक्यावरून निर्णय करावा. दोन्ही दिवशीं जर व्याप्तीचा अभाव असेल, तर गौणकालीं व्याप्ति आहे यास्तव, पूर्व तिथिच घ्यावी. दोन्ही दिवशीं जरी अंशतःच व्याप्ति असेल, तरी पूर्वतिथिच घ्यावी. कमीअधिक प्रमाणाची व्याप्ति असल्यास किंवा दोन्ही दिवशीं कर्मसमाप्तिपुरतीच

तिथि असल्यास युग्मवाक्यावरून तिथिनिर्णय करावा. कर्मसमाप्तिपुरती जरी तिथि नसेल तरी पूर्वींचीच घ्यावी. याप्रमाणें एकभुक्ताचा निर्णय झाला.

अथनक्तम् तत्रसूर्यास्तोत्तररात्रिमुहूर्तात्मकप्रदोषव्यापिनीतिथिर्नक्तेग्राह्या अन्यतरदिनेतद्व्याप्तौतदेकदेशस्पर्शेवासैवग्राह्या भोजनंतुअस्तोत्तरंघटिकात्रयसंध्याकालं त्यक्त्वाकार्यम् संध्याकालेभोजननिद्रामैथुनाध्यायनवर्जनात् यतिभिरपुत्रविधुरैर्विधवाभिश्चनक्तंसायान्हव्यापिन्यांदिनाष्टमभागेकार्यम् रात्रौतेषांभोजननिषेधात् । एवंसौरनक्तमपिसायान्हव्यापिन्यांदिवैवकार्यम् दिनद्वयेप्रदोषव्याप्तौपरा दिनद्वयेप्रदोषव्याप्त्यभावेपरत्रैवसायान्हेदिनाष्टमभागेनक्तंकार्यंनतुरात्रौ साम्येनैकदेशव्याप्तौपरैव वैषम्येणप्रदोषैकदेशव्याप्तौतदाधिक्यवतीपूर्वापिग्राह्या यदिपूजाभोजनपर्याप्तंतदाधिक्यंलभ्यते नोचेत्साम्यपक्षवदुत्तरैव नत्वाधिक्यवशात्पूर्वेति नक्तव्रतभोजनंवैधत्वाद्रविवासरसंक्रान्त्यादावपिरात्रावेवकार्यं रविवारादौरात्रिभोजननिषेधस्यरागप्राप्तभोजनपरत्वात् एकादश्याद्युपवासप्रत्याम्नायभूतंनक्तंतूपवासनिर्णीतादिनएवेति अयाचितस्यत्वहोरात्रसाध्यत्वादुपवासवन्निर्णयः पित्र्याणामपराह्णादिव्यापित्वेननिर्णयस्तत्तत्प्रकरणे वक्ष्यते एकभुक्तनक्तायाचितोपवासानांपूर्वतिथावनुष्ठितानांपरेद्युस्तिथ्यन्तेपारणम् यामत्रयोर्ध्वगामिन्यांतिथौप्रातःपारणमितिसर्वत्रज्ञेयमितिमाधवः इति एकभुक्तादिनिर्णयः पञ्चमउद्देशः

**नक्तनिर्णय**— सूर्यास्तानंतर तीन मुहूर्तपर्यंतची म्हणजे प्रदोषकालव्यापिनी तिथि नक्ताला ग्राह्य आहे. दोन दिवसांतून ज्या दिवशीं वरच्याप्रमाणें व्याप्ति असेल, अथवा वरील कालीं जरी अंशतः व्याप्ति असली, तरी तोच दिवस घ्यावा. भोजन करणें तें सूर्यास्तानंतर तीन घटका संध्याकाळ असतो, तो उलटल्यावर करावें. कारण, संध्याकाळीं भोजन, निद्रा, मैथुन आणि अध्ययन हीं कर्में वर्ज्य आहेत. यति, ज्याला मुलगा झाला नाहीं असा, विधुर आणि विधवा यांना रात्रीं जेवणाचा निषेध असल्यामुळें, त्यांनीं सायाह्नव्यापिनी तिथीला, दिवसाच्या आठव्या भागांत नक्त करावें. तिथि जर दोन दिवस प्रदोषव्यापिनी असली, तर ती दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवस नसल्यास, दुसऱ्या दिवशीं सायान्हकाळीं दिवसाच्या आठव्या भागांत नक्त करावें, रात्रीं करूं नये. दोन्ही दिवशीं सारखीच व्याप्ति असल्यास दुसरा दिवस घ्यावा. कमी अधिक प्रमाणानें असल्यास, पहिल्या दिवशीं जर पूजाभोजनादिक संपूर्ण होईपर्यंत असेल, तर पहिल्याच दिवसाची तिथि घ्यावी, आणि तसें नसल्यास साम्यपक्षास अनुसरून दुसऱ्याच दिवसाची घ्यावी. पहिल्या दिवशीं दुसऱ्या दिवसापेक्षां अधिक काळ व्याप्ति आहे, म्हणूनच केवळ पहिल्या दिवसाची घेऊं नये. रविवार, संक्रांति वगैरे दिवशींही नक्त व्रताचा भोजनविधि करावा. रविवार, संक्रांति वगैरे दिवशीं रात्रींच्या इच्छाभोजनाचा निषेध सांगितला आहे. विधियुक्त भोजनाचा निषेध सांगितलेला नाहीं. एकादश्यादिकांच्या उपासाच्या ऐवजीं करण्याचें जें नक्त तें उपासाच्या दिवसाचा जो निर्णय सांगितला आहे, त्याप्रमाणें करावें. अयाचितकर्म हें अहो-

रात्र साध्य असल्यामुळें, त्याचा निर्णय उपासाप्रमाणेंच समजावा. पित्र्यकर्मे जीं अपराह्णकाळीं करायचीं, त्यांचा निर्णय पित्र्यकर्मनिर्णयाच्या प्रकरणांत जो सांगितला आहे, तो पहावा. एकभुक्त, नक्त, अयाचित आणि उपवास—हीं पूर्व तिथीला केल्यावर, दुसऱ्या दिवशीं तिथि संपल्यावर त्याचें पारणें करावें. दुसऱ्या दिवशीं जर तिसऱ्या प्रहरापर्यंत तिथि संपत नसली, तर सकाळीं पारणें करावें असा माधवाचा सर्वत्र निर्णय आहे. याप्रमाणें पांचवा उद्देश येथें संपूर्ण झाला.

८ अथव्रतपरिभाषा तत्रस्त्रीशूद्राणांद्विरात्राधिकोपवासेनाधिकारः स्त्रीणामपि भर्त्रनुज्ञांविनाव्रतोपवासादौनाधिकारः उपवासदिनेश्राद्धदिनेचकाष्ठेनदन्तधावनंनकार्यं पर्णादिनाद्वादशगण्डूषैर्वाकार्यम् जलपूर्णताम्रपात्रंगृहीत्वोदङ्मुखः प्रातरुपवासादिव्रतंसंकल्पयेत् अपूर्वव्रतारम्भोव्रतोद्यापनंच मलमासेगुर्वाद्यस्ते वैधृतिव्यतिपातादिदुर्योगेविष्टौक्रूरवारेनिषिद्धे दर्शादितिथौ न भवति एवं खण्डतिथावपिनभवति उदयस्थातिथिर्याहिनभवेदिनमध्यभाक् । साखण्डानव्रतानां स्यादारम्भश्चसमापनम् ॥१॥ इतिसत्यव्रतोक्तेः क्षमासत्यंदयादानंशौचमिन्द्रियनिग्रहः । देवपूजाग्निहवनंसंतोषस्तेयवर्जनम् ॥ १ ॥ सर्वव्रतेष्वयंधर्मः अत्रहोमो व्याहृतिभिःकाम्यव्रतविशेषेज्ञेयः यद्देवतायाउपोषणव्रतंतद्देवताजपस्तद्ध्यानंतत्कथाश्रवणंतदर्चनंतन्नामश्रवणकीर्तनादिकंकार्यम् ॥ उपवासेऽन्नावलोकनगन्धादिकमभ्यङ्गताम्बूलमनुलेपनंचत्यजेत् सभर्तृकस्त्रीणांसौभाग्यव्रतेऽभ्यङ्गताम्बूलादिनवर्ज्यम् अष्टैतान्यव्रतघ्नानिआपोमूलंफलंपयः । हविर्ब्राह्मणकाम्याचगुरोर्वचनमौषधम् ॥ १ ॥ प्रमादादिनाव्रतभङ्गेदिनत्रयमुपोष्यक्षौरंकृत्वा पुनर्व्रतंकुर्यात् अशक्तस्योपवासप्रतिनिधिरेकब्राह्मणभोजनंतावद्धनादिदानं वासहस्रगायत्रीजपोवाद्वादशप्राणायामावाप्रायश्चित्तम् स्वीकृतंव्रतंकर्तुमशक्तः प्रतिनिधिनाकारयेत् पुत्रःपत्नीभर्ताभ्रातापुरोहितःसखाचेतिप्रतिनिधयः पुत्रादिःपित्राद्युद्देशेनव्रतंकुर्वन्स्वयमपिव्रतफलंलभते असकृज्जलपानाच्चसकृत्ताम्बूलचर्वणात् । उपवासःप्रणश्येतदिवास्वापाच्चमैथुनात् ॥१॥ स्मरणं कीर्तनंकेलिःप्रेक्षणंगुह्यभाषणम् । संकल्पोनिश्चयोमैथुनाक्रियाचेत्यष्टविधंमैथुनम् प्राणसंकटेष्वसकृज्जलपानेदोषोनास्ति चर्मस्थंजलंगोभिन्नक्षीरंमसूरंजंबीरफलंशुक्तिचूर्णमित्यामिषगणोव्रतेवर्ज्यः अश्रुपातक्रोधादिनासद्योव्रतनाशः परान्नभोजनेचापि यस्यान्नंतस्यतत्फलम् । तिलमुद्गभिन्नचणकादिकोशीधान्यंमाषादिकंमूलकंचेत्येवमादिक्षारगणंलवणमधुमांसादिकंचवर्जयेत् श्यामाकाश्चैवनीवारागोधूमाश्चव्रतेहिताः । व्रीहिमुद्गयवतिलकङ्गुकलायादिधान्यंरक्तेतरमूलकं सूरणादिकन्दः सैन्धवसामुद्रलवणे गव्यदधिसर्पिर्दुग्धानि पनसफलमाम्रफलंनारीकेलंहरीतकीपिप्पलीजीरकंशुण्ठीतिन्तिणीकदलीलवलीधात्रीफलानिगुडेतरेक्षुविकारइत्येतानि अतैलपक्वानि हविष्याणि गव्यंतक्रंमाहिषंघृतमपिक्वचित् अनुक्तव्रतविधिस्थलेमाषादिपरिमितसुवर्णरजतादिप्रतिमापूज्या द्रव्यानुक्तावाज्य-

होमः देवतानुक्तौप्रजापतिः मंत्रानुक्तौसमस्तव्याहृतिभिः संख्यानुक्तावष्टोत्तर-शतमष्टाविंशतिरष्टौवाहोमसंख्या उपवासेकृतेब्राह्मणभोजनतत्साङ्गतार्थम् उद्यापनानुक्तौगांसुवर्णंवादद्यात् विप्रवचनात्कृतसाङ्गता विप्रवचनंचदक्षिणां दत्त्वैवग्राह्यंसर्वत्र गृहीतव्रतत्यागेचाण्डालतुल्यत्वम् विधवाभिर्व्रतादौचित्ररक्ता-दिवस्त्रंनधार्यंश्वेतमेवधार्यम् सूतकादौस्त्रीणांरजोदोषादौज्वरादौचगृहीतव्रतादौ शारीरनियमान्स्वयंकुर्यात् पूजादिकमन्यद्वाराकारयेत् अपूर्वारम्भस्तुसूतका-दौनभवति काम्ये प्रतिनिधिर्नास्तिनित्येनैमित्तिकेचसः । काम्येप्युपक्रमादूर्ध्वं केचित्प्रतिनिधिंविदुः १ नस्यात्प्रतिनिधिर्मन्त्रस्वामिदेवाग्निकर्मसु ; नापिप्रतिनि-धातव्यंनिषिद्धंवस्तुकुत्रचित् १ व्रतादिसन्निपातेदानहोमाद्यविरुद्धंक्रमेणकार्यम् विरुद्धेतुनक्तभोजनोपवासादावेकंस्वयंकृत्वान्यत्पुत्रभार्यादिनाकारयेत् यत्रच-तुर्दश्यष्टम्यादौदिवाभोजननिषेधोव्रतान्तरपारणाचप्राप्ता तत्रभोजनमेवकार्यम् पारणायाविधिप्राप्तत्वात् निषेधस्तुरागप्राप्त भोजनपरः एवंरविवारादौ संकट-चतुर्थ्यादिव्रतेरात्रिभोजनमेवकार्यम् यत्राष्टम्यादौदिवाभोजननिषेधोरात्रौतुरवि-वारादिप्रयुक्तभोजननिषेधस्तत्रार्थप्राप्तउपवासः यत्रतुपुत्रवद्गृहस्थस्यसंक्रा-न्त्यादावुपवासोपिनिषिद्धोभोजनस्याप्यष्टम्यादिप्रयुक्तनिषेधस्तत्राकिंचिद्भक्ष्यं-प्रकल्प्योपवासएवकार्यः चान्द्रायणमध्येएकादश्यादिप्राप्तौग्राससंख्यानियमेन-भोजनमेवकार्यम् एवंकृच्छ्रादिव्रतेपि एवमेकादश्यामेकान्तरोपवासादिप्रयुक्त-पारणायांप्राप्तायांजलपारणंकृत्वोपवसेत् एवंद्वादश्यांमासोपवासश्राद्धप्रदोषा-दिप्रयुक्तपारणप्रतिबन्धेजलपारणंकार्यम् एकादश्यादौसंक्रमे पुत्रवद्गृहस्थस्यो-पवासनिषेधएकादश्युपवासश्चप्राप्तस्तत्रापिकिंचिदापो मूलंपत्रंफलंपयोवाभ-क्ष्यंकल्प्यम् द्वयोरुपवासयोर्नक्तयोरेकभुक्तयोर्वैकस्मिन्दिनेप्राप्तौ अमुकोपवास-ममुकोपवासंचोभयंतन्त्रेणकरिष्यइत्यादिसंकल्प्यसहैवोपवासपूजाहोमानामनु-ष्ठानम् यत्रोपवासैकभुक्तयोरेकदिनेप्राप्तिस्तत्रतिथिद्वैधेगौणकाल्याप्तिमाश्रित्य एकंपूर्वतिथौद्वितयिंशेषातिथौकार्यम् अखण्डतिथावेकंपुत्रादिनाकारयेदित्युक्तम् एवंकाम्यंनित्यस्यबाधकमित्यादिवाक्यैः काम्यानित्यादि बलाबलबाधाबाध-संभवासंभवादिविचार्यानुष्ठानमूह्यम् । इतिसामान्यव्रतपरिभाषोद्देशः षष्टः ६.

**व्रतपरिभाषा**—स्त्रिया आणि शूद्र यांना दोन दिवसांहून अधिक दिवस उपास करण्याचा अधिकार नाहीं. स्त्रियांना त्यांच्या नवऱ्याच्या आज्ञे-वांचून व्रतें, उपास वगैरेचा अधिकार नाहीं. उपासाच्या आणि श्राद्धाच्या दिवशीं काटक्यांनीं दांत घांसूं नयेत. पानें अथवा बारा चुळा यांनीं दांत धुवावेत. उपासाच्या किंवा व्रताच्या दिवशीं सकाळीं पाण्यानें भरलेलें तांब्याचें भांडें घेऊन उत्तरेकडे तोंड करावें व व्रताचा संकल्प करावा. पूर्वीं न केलेल्या व्रताचा आरंभ अथवा व्रताचें उद्यापन, या गोष्टी—गुर्वादि ग्रहांचे अस्त, वैधृति व्यतिपातादि वाईट योग, कल्याणी, मंगळवार आणि शनिवार हे क्रूर वार, निषिद्ध अशा अमावास्यादि

तिथि, वगैरे असतां—करूं नयेत. याप्रमाणेंच खंडा तिथीलाही व्रतारंभ अथवा व्रतोद्यापन हीं करूं नयेत. कारण, 'सूर्योदयाच्या वेळीं असून मध्याह्नपर्यंत जी तिथि नसते, ती खंडा तिथि होय.' 'या तिथीवर व्रतारंभ आणि व्रतोद्यापन हीं करूं नयेत' असें, सत्यव्रताचें वचन आहे. क्षमा, सत्य, दया, दान, शुद्धि, इंद्रियनिग्रह, देवपूजा, हवन, संतोष व चौर्यवर्जन—हे धर्म सर्व व्रतांसंबंधानें लागू आहेत—यांच्याबद्दल जो होम करायचा, तो व्याहृतिमंत्रांनीं करावा, आणि तो काम्यव्रतांसंबंधानें विशेष समजावा. ज्या देवतेसंबंधानें उपोषणव्रत असेल, त्या देवतेचा जप, ध्यान, तिचें कथाश्रवण, अर्चन, नामस्मरण, कीर्तन वगैरे करावींत. उपासाच्या दिवशीं अन्नाला, दृष्टीनें पाहाणें, त्याचा वास घेणें, तैलाभ्यंग करणें, विडा खाणें व उटी लावणें या गोष्टी वर्ज्य कराव्यात. ज्या स्त्रियांचे नवरे जिवंत असतील अशा स्त्रियांना, सौभाग्यव्रतांत तैलाभ्यंग आणि तांबूलादि उपचार वर्ज्य नाहींत. पाणी, मूळ, फळ, दूध, अग्नीला देण्याच्या आहुति (हवि), ब्राह्मणाची इच्छा, गुरूचें वचन आणि औषध, या आठ गोष्टी व्रतभंग करणाऱ्या नाहींत. चुकून जर व्रतभंग झाला असेल, तर तीन दिवस उपास करून, क्षौर करावें आणि पुन्हा व्रत करावें. उपास करण्याची जर अंगीं शक्ति नसेल, तर त्याबद्दल एका ब्राह्मणाला जेवण, तितकेंच धनादि दान, हजार गायत्रीजप अथवा बारा प्राणायाम हें त्याचें प्रायश्चित्त समजावें. आरंभिलेलें व्रत पुढें चालविण्यास प्रकृति अशक्त असणाऱ्यानें, प्रतिनिधीकडून तें करवावें. मुलगा, बायको, नवरा, भाऊ, उपाध्याय किंवा मित्र हे प्रतिनिधि समजावे. या प्रतिनिधींपैकीं कोणाही एकाकडून व्रत करविलें असतां, मूळच्या व्रतेच्छु माणसाला व त्याबरोबरच प्रतिनिधीलाही व्रताचें फळ मिळतें. पुष्कळदां पाणी पिणें, विडा चघळणें व दिवसां झोंप घेणें आणि स्त्रीसंग करणें यांच्यामुळें व्रतभंग होतो. स्त्रीची आठवण करणें, तिच्या गोष्टी बोलणें, तिच्याशीं क्रीडा करणें, स्त्रीकडे पाहणें, स्त्रीशीं गुप्तपणें भाषण करणें, संकेत करणें, निश्चय करणें आणि प्रत्यक्ष संबंध करणें असे मैथुनाचे आठ प्रकार आहेत. प्राणसंकटच जर असेल, तर अनेकदां पाणी पिण्याचा दोष नाहीं. कातड्यांतलें पाणी, गाईवांचून इतर कोणाचें दूध, मसूर, ईडनिंबु, शिंपीचा चुना वगैरे मनाला मोह पाडणाऱ्या वस्तु, व्रति माणसानें वर्ज्य कराव्या. अश्रुपात, राग वगैरेंनीं व्रताचा तावडतोब भंग होतो. परान्नभोजनाचें फळ तें घालणाऱ्याला मिळतें. तीळ व मूग यांवांचून शेंगेंत उत्पन्न होणारीं-हरभरा, उडीद वगैरे धान्यें व मुळा वगैरे खारट पदार्थ आणि मीठ, मध, मांस हीं व्रतांत वर्ज्य करावींत. सातु, देवभात व गहूं हीं व्रताला योग्य होत. साळीचे तांदूळ, मूग, यव, राळे, वाटाणे वगैरे धान्यें, पांढरा मुळा, सुरण वगैरे कांदे, शेंदेलोण आणि समुद्रापासून होणारें मीठ, गाईचें दहीं, तूप व दूध, फणस, आंबा, नारळ, हिरडा, पिंपळी, जिरें, सुंठ, चिंच, रायावळे, साधे आंवळे, हरपररेवडी, हीं फळ, गुळावांचून उंसापासून तयार केलेला कोणचाही पदार्थ—हीं सर्व अतैल असां पक्कीं हविष्यें जाणावींत. गाइच ताक व म्हशीचें तूप हीं देखील हविष्यें आहेत, असेंही कोणी म्हणतात. जेथें व्रताचा

विधि सांगितला नसेल तेथें, पांच गुंजा सोन्याची अथवा रुप्याची प्रतिमा करून, तिची पूजा करावी. जेथें पदार्थ (द्रव्य) सांगितला नसेल तेथें तुपाचा होम करावा. देवता सांगितली नसल्यास प्रजापति देवता समजावी. मंत्र सांगितले नसल्यास समस्त व्याहृतिमंत्र योजावेत. होमाची संख्या जेथें सांगितली नसेल तेथें, १०८।२८ किंवा ८ संख्या समजावी. उपास केला असल्यास, त्याच्या सांगतेसाठीं ब्राह्मणभोजन घालावें. उद्यापन सांगितलें नसल्यास गाईचें अथवा सोन्याचें दान करावें. व्रताची सांगता ब्राह्मणाच्या भाषणानें होते. सर्व ठिकाणीं दक्षिणा दिल्यावर ब्राह्मणाचें वचन घ्यावें. जो व्रतारंभ करून तें मध्येंच सोडतो, तो चांडाळासारखा होय. विधवा वगैरेंनीं व्रताच्या दिवशीं रंगीबेरंगी वस्त्रें धारण करूं नयेत; पांढरीं वस्त्रेंच धारण करावींत. सुतक, विटाळशीपणा व सांथ वगैरे रोग यांचा अडथळा आला असतां, शारीरिक नियम स्वतः पाळावेत व पूजादि कृत्यें दुसऱ्याकडून करवावींत. सुतक वगैरे असतांना नवीन व्रतारंभ करूं नये. काम्यकर्म प्रतिनिधीकडून करवूं नये; नैमित्तिक कर्में केल्यास चालतें. आरंभ केल्यानंतर काम्यकर्माला प्रतिनिधि चालतो असें कोणी म्हणतात. मंत्र, यजमान, देवता आणि अग्निकार्य यांत प्रतिनिधि चालत नाहीं. निषिद्ध पदार्थ कोठेंही प्रतिनिधिस्थानीं योजूं नये. अनेक व्रतें म्हणजे एकाहून अधिक अशीं एकाच कालीं आल्यास, दानहोमादिक जें विरुद्ध नसेल तें, क्रमानें करावें. नक्त, भोजन व उपोषण अशीं जेव्हां विरुद्ध असतील, तेव्हां त्यांपैकीं एक आपण करून, दुसरीं—मुलगा, बायको वगैरेकडून करवावींत. चतुर्दशी, अष्टमी वगैरे दिवशीं, दिवसां जेवणाचा निषेध असतां, दुसऱ्या व्रताची जर पारणा येईल तर, पारणाविधि योग्य असल्यानें भोजन करावें. कारण, भोजनाचा जो विधि सांगितला आहे, तो विधिप्राप्त नसून, रागप्राप्त आहे. रविवारीं संकष्टी चतुर्थी आल्यास रात्रीं भोजन करावें. अष्टमी म्हणून दिवसां जेवणाचा निषेध आणि रविवार म्हणून रात्रीं भोजनाचा निषेध, अशा वेळीं उपास करणें ओघानेंच प्राप्त होतें. सपुत्र गृहस्थाश्रमी म्हणून संक्रांत्यादिकांच्या दिवशीं उपासाचा निषेध आणि अष्टम्यादि तिथींमुळें जेवणाचा निषेध, असा जेव्हां प्रसंग येतो, तेव्हां कांहींतरी थोडें खाऊन उपासच करावा. चांद्रायणव्रतांत एकादश्यादिकांचीं उपोषणें आल्यास, ग्रासमंख्येच्या नियमाप्रमाणें भोजनच करावें. कृच्छ्रादि व्रतांविषयींही हाच नियम जाणावा. एका दिवसाआड करायच्या (एकांतरोपवासव्रत) उपासाचें पारणें एकादशीला जर आलें तर, पाणी पिण्याचें पारणें करून उपास करावा. एकादशी वगैरे तिथींवर संक्रांति आल्यास, मुलगा असलेल्या गृहस्थाला संक्रांतीच्या उपासाचा निषेध आणि एकादशीचा उपास करणें योग्य आहे, यास्तव त्यानें थोडें पाणी, थोडीं फळें, थोडें दूध व थोडीं मुळें यांचें सेवन करावें. दोन उपास, दोन नक्तें अथवा दोन एकभुक्तें एकाच दिवशीं आल्यास 'दोन्ही एकतंत्रानें करतों' असा संकल्प करून, उपास, पूजा, होम वगैरेंचें अनुष्ठान करावें. उपास आणि एकभुक्त हीं एकाच दिवशीं आल्यास, ती तिथि जर द्विधा असेल तर, ज्या तिथीला ज्या कर्माबद्दल गौणकाल असेल तें आदल्या दिवशीं करून, त्या दिवशीं दुसरें कर्म करावें.

तिथि जर अखंड असेल तर, एक कर्म स्वतः करून दुसरें मुलाकडून करवावें. 'काम्यकर्म नित्यकर्माचें बाधक होतें' वगैरे सारखीं जीं वाक्यें आहेत, त्यांवरून दोघांचें बलाबल, बाधाबाध, संभवासंभव वगैरेंचा विचार करून अनुष्ठान करावें. याप्रमाणें येथें सहावा उद्देश संपला.

**९ अथप्रतिपदादिनिर्णयः तत्रप्रतिपन्निर्णयः शुक्लप्रतिपत् पूजाव्रतादावपराह्णव्याप्तिसत्वेपूर्वविद्धाग्राह्या सायाह्नव्यापित्वेपिपूर्वैवेतिमाधवाचार्याः अन्यथाद्वितीयायुताग्राह्या कृष्णप्रतिपत्सर्वापिद्वितीयायुतैवग्राह्या उपवासेतुपक्षद्वयेपिप्रतिपत्पूर्वविद्धैवग्राह्या अपराह्णव्यापिन्यांप्रतिपदिकरणीयस्योपवासादेः संकल्पंप्रातरेवकुर्यात् संकल्पकालेप्रतिपदादितिथ्यभावेपिसंकल्पेप्रतिपदादिरेववक्तव्यानत्वमावास्यादिः एवमुपोष्याद्वादशीशुद्धेत्यादिस्थलेएकादशीव्रतप्रयुक्तसंकल्पपूजादावेकादश्यवेकीर्तनीयानतुद्वादशी संध्याग्निहोत्रादिकर्मान्तरेषुतत्तत्कालव्यापिनीद्वादश्यादिरेवेतिममप्रतिभाति संकल्पश्चसूर्योदयात्प्रागुषःकालेसूर्योदयोत्तरंप्रातःकालाख्यात्रिमुहूर्तस्याद्यमुहूर्तद्वयेप्रशस्तः तृतीयोमुहूर्तस्तुनिषिद्धः। इतिप्रतिपन्निर्णयः सप्तमः ७**

**प्रतिपदानिर्णय**—पूजादि व्रतांना जी शुद्ध प्रतिपदा घेणें असेल, ती अपराह्णव्यापिनी असून पूर्वतिथीनें विद्ध असलेली घ्यावी. 'सायाह्नकालव्यापिनी असतांही ती पूर्वींचीच घ्यावी' असें माधवाचार्य म्हणतात. प्रतिपदा जर अपराह्णव्यापिनी नसेल, तर द्वितीयायुक्त असेल तीच घ्यावी. जी कृष्णप्रतिपदा नेहमीं द्वितीयायुक्त असेल ती घ्यावी. उपासाकरितां जी घेणें, ती दोन्ही पक्षांत पूर्वतिथीनें विद्ध असलेलीच घेणें ग्राह्य आहे. अपराह्णव्यापिनी प्रतिपदेला करायच्या उपासाचा संकल्प सकाळीं करावा. संकल्पाच्या वेळीं प्रतिपदा जरी नसली तरी, संकल्पांत 'प्रतिपद्' असेंच म्हणावें. 'अमावास्यादि' असें म्हणूं नये. 'शुद्ध द्वादशीच उपासाला योग्य आहे' असें ज्या स्थळीं सांगितलें आहे, त्या स्थळीं एकादशीच्या व्रताबद्दल—संकल्प, पूजा वगैरेसंबंधानें—'एकादशी' असेंच म्हणावें; 'द्वादशी' असें म्हणूं नये. संध्या, अग्निहोत्र वगैरे इतर कर्मासंबंधानें त्या त्या काळीं ज्या तिथीची व्याप्ति असेल तिचाच उच्चार करावा असें मला वाटतें. संकल्प करणें तो सूर्योदयापूर्वीं उषःकालीं करावा. सूर्योदयानंतर करणें झाल्यास, प्रातःकाळांतल्या तीन मुहूर्तांपैकीं पहिले दोन मुहूर्त संपण्याच्या आंतच तो करावा; कारण, तिसरा मुहूर्त निषिद्ध आहे. याप्रमाणें येथें सातवा उद्देश संपला.

**१० अथद्वितीयानिर्णयः द्वितीयाशुक्लपक्षेपरविद्धाग्राह्या कृष्णपक्षेतुद्वेधाविभक्तदिनपूर्वभागात्मकपूर्वाह्णप्रविष्टाचेत्पूर्वाग्राह्या अन्यथातुकृष्णपक्षेपि द्वितीयापरविद्धैव। इतिद्वितीयानिर्णयोष्टमउद्देशः ८**

**द्वितीयानिर्णय**—शुद्ध पक्षांतली द्वितीया पुढच्या तिथीनें विद्ध (परविद्ध) अशी घ्यावी. कृष्णपक्षांतली घेणें असल्यास दिवसाचे दोन भाग

करून ती जर पूर्वाह्णप्रविष्टा असेल, तर आधींची घ्यावी. तशी जर ती नसेल, तर कृष्णपक्षांतली द्वितीया देखील परविद्धाच घ्यावी. याप्रमाणें आठवा उद्देश येथें संपला.

११अथतृतीयानिर्णयः तृतीयारम्भाव्रतेपूर्वविद्धाग्राह्या रम्भाव्यतिरिक्तव्रतेषु त्रिमुहूर्तद्वितीयाविद्धापूर्वांन्यक्त्वापरदिनेत्रिमुहूर्तव्यापिनीग्राह्यापूर्वदिनेत्रिमुहूर्तन्यूनाद्वितीयावेधेपरदिनेत्रिमुहूर्तव्याप्त्यभावेपूर्वाग्राह्या पूर्वदिनेत्रिमुहूर्तद्वितीयावेधेपरदिनेत्रिमुहूर्तन्यूनापिग्राह्या गौरीव्रतेतु कलाकाष्ठादिपरिमितस्वल्पद्वितीयायुक्तापिनिषिद्धा परदिनेकलाकाष्ठादिपरिमितास्वल्पापितृतीयापरिग्राह्या यदातुदिनक्षयवशात्परदिनेस्वल्पापिचतुर्थीयुतातृतीयानलभ्यते पूर्वदिनेचाद्वितीयाविद्धातदाद्वितीयाविद्धैवग्राह्या यदाच दिनवृद्धिवशात्पूर्वदिनेषष्टिघटिकातृतीयापरदिनेचघटिकादिशेषवती तदापूर्वांशुद्धांषष्टिघटिकामपित्यक्त्वाचतुर्थीयुतैवगौरीव्रतेग्राह्या । इतितृतीयानिर्णयोनवमः ९

**तृतीयानिर्णय**—रंभाव्रत म्हणजे जें कदलीव्रत, त्याला पूर्वविद्धा तृतीया असेल ती घ्यावी. इतर व्रतांकरितां तीन मुहूर्तपर्यंत द्वितीयेनें विद्ध झालेली दुसऱ्या दिवसाची जी त्रिमुहूर्तव्यापिनी तिथि ती घ्यावी. पहिल्या दिवशीं जर तीन मुहूर्तांहून कमीं असा द्वितीयेचा वेध असेल आणि दुसऱ्या दिवशीं जर तीन मुहूर्त व्याप्ति नसेल, तर पहिलीच ग्राह्य होय. पहिल्या दिवशीं तीन मुहूर्त वेध असून, दुसऱ्या दिवशीं जरी तीन मुहूर्तांहून कमी वेध असला, तरी दुसरीच घ्यावी. गौरीव्रतासंबंधानें—कला घटिका वगैरे थोडा वेळ जरी तृतीया असली, तरी तीच ग्राह्य आहे. दिनक्षय असल्यामुळें दुसऱ्या दिवशीं चतुर्थीयुक्त तृतीया थोडीहि जरी मिळाली नाहीं, आणि आदल्या दिवशींची द्वितीया जरी विद्ध असली, तरी मग ती विद्धा द्वितीयाच ग्राह्य होय. दिनवृद्धीमुळें आदल्या दिवशीं तृतीया साठ घटका असून, दुसऱ्या दिवशीं जर कांहीं घटका उरलेली असेल, तर आदल्या दिवसांची साठ घटकांची तृतीया सोडून, दुसरी जी चतुर्थीयुक्त तीच गौरीव्रताला ग्राह्य आहे. येथें नववा उद्देश संपला.

१२ अथचतुर्थीनिर्णयः चतुर्थीगणेशव्रतारिक्तोपवासकार्येपञ्चमीयुताग्राह्या गौरीविनायकव्रतयोस्तुमध्याह्नव्यापिनीग्राह्या परदिनएवमध्याह्नव्यापिनीचेत्परैव दिनद्वयेमध्याह्नव्यापित्वेदिनद्वयेमध्याह्नव्याप्त्यभावेसाम्येनवैषम्येनवैकदेशव्याप्तौचपूर्वैव तृतीयायोगप्राशस्त्यात् नागव्रतेतुपूर्वादिनएवमध्याह्नव्यापिनीचपूर्वैव उभयदिनमध्याह्नव्याप्त्यादिपक्षचतुष्टयेपञ्चमीयुतैवग्राह्या संकष्टचतुर्थीतुचन्द्रोदयव्यापिनीग्राह्या परदिनेचन्द्रोदयव्याप्तौपरैव उभयदिनेचन्द्रोदयव्यापित्वेतृतीयायुतैवग्राह्या दिनद्वयेचन्द्रोदयव्याप्त्यभावे परैव । इतिचतुर्थीनिर्णयोदशमउद्देशः १०

**चतुर्थीनिर्णय**—गणेशव्रतावांचून इतर उपवासादिकांकरितां पंचमीयुक्त घ्यावी. गौरीविनायकव्रताला मध्याह्नव्यापिनी घ्यावी. दुसऱ्या दिवशींच

जर मध्याह्नव्यापिनी असेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन दिवस जर मध्याह्न-व्यापिनी असेल, दोन्ही दिवशीं जर मध्याह्नव्यापिनी नसेल किंवा दोन्ही दिवशीं जर सारखी अथवा कमी अधिक अशी एकदेशव्यापिनी असेल, तर तृतीयायुक्त प्रशस्त असल्यानें, 'पहिल्या दिवसाचीच घ्यावी. नागव्रताला पहिल्या दिवशीं जर मध्याह्नव्यापिनी असेल तर, ती पहिलीच घ्यावी. दोन्ही दिवशीं जर मध्याह्नव्यापिनी असेल किंवा नसेल, अथवा कमी अधिक असेल, तर पंचमीयुक्त असणारीच घ्यावी. संकष्टचतुर्थी जर चंद्रोदयव्यापिनी असेल तर ती घ्यावी. दुसऱ्या दिवशीं जर चंद्रोदय-व्यापिनी असेल तर ती घ्यावी. दोन्ही दिवशीं जर चंद्रोदयव्यापिनी असेल, तर तृतीयायुक्त असणारीच घ्यावी. दोन्ही दिवशीं जर चंद्रोदयव्यापिनी नसेल, तर दुसरी घ्यावी. याप्रमाणें येथें दहावा उद्देश संपला.

**१३ अथपञ्चमीनिर्णयः पञ्चमीशुक्लपक्षेकृष्णपक्षेचकर्ममात्रेपिचतुर्थीविद्धा ग्राह्या स्कन्दोपवासेतुषष्ठीयुताग्राह्या नागव्रतेपञ्चमीपरविद्धाग्राह्यापरेद्युस्त्रि-मुहूर्तन्यूनापञ्चमीपूर्वेद्युस्त्रिमुहूर्तन्यूनचतुर्थ्याविद्धातदापूर्वैव त्रिमुहूर्ताधिक-चतुर्थीवेधेद्विमुहूर्तापिपरेव। इतिपञ्चमीनिर्णयएकादशउद्देशः ११**

**पञ्चमीनिर्णय**—शुक्लपक्ष व कृष्णपक्ष यांतील सर्व कर्मांना जी पञ्चमी घेणें, ती चतुर्थीविद्धा घ्यावी. स्कंदव्रताला षष्ठीयुक्त घ्यावी. नागव्रताला षष्ठीनें विद्ध असलेली घ्यावी. दुसऱ्या दिवशीं पञ्चमी तीन मुहूर्तांपेक्षां कमी आणि पहिल्या दिवशीं तीन मुहूर्तांहून कमी अशा चतुर्थीनें जर विद्ध असेल, तर पहिल्या दिवसाचीच घ्यावी. पहिल्या दिवशीं तीन मुहूर्तांपेक्षां अधिक अशा चतुर्थीनें विद्ध असून दुसऱ्या दिवशीं जरी पञ्चमी दोन मुहूर्त असली तरी दुसरीच ग्राह्य होय. येथें अकरावा उद्देश संपला.

**१४ अथषष्ठीनिर्णयः षष्ठीस्कन्दव्रतेपूर्वविद्धा अन्यव्रतेषुपरविद्धैवपूर्वेद्युः षण्मुहूर्तन्यूनपञ्चम्यावेधेपूर्वापि षष्ठीसप्तम्योरविवासरयोगेपद्मकयोगः। इति षष्ठीनिर्णयोद्वादशः १२**

**षष्ठीनिर्णय**— स्कन्दव्रताला पूर्वविद्धा षष्ठी घ्यावी व इतर व्रतांना परविद्धा घ्यावी. आदल्या दिवशीं जर सहा मुहूर्तांहून कमी असा पंञ्चमीचा वेध असेल तर ती पूर्वदिवसाचीच घ्यावी. षष्ठी व सप्तमी या दोन्ही जर रविवारीं आल्या, तर पद्मक नांवाचा योग होतो. येथें बारावा उद्देश संपला.

**१५ अथसप्तमीनिर्णयः सप्तमीकर्ममात्रेषष्ठीयुतैवग्राह्या यदापूर्वेद्युरस्तमय पर्यन्ताषष्ठीतिदिवाषष्ठीविद्धानलभ्यतेपरेद्युश्चाष्टमीविद्धातदाचागत्यापरैव एवंतिथ्यन्तरनिर्णयेष्वप्यूह्यम् इतिसप्तमीनिर्णयस्त्रयोदशः १३**

**सप्तमीनिर्णय**—जी सप्तमी षष्ठीयुक्त असेल तीच सर्व कर्मांकरितां घ्यावी. आदल्या दिवशीं सूर्यास्तापर्यंत षष्ठी असल्यानें सप्तमीनें ती विद्ध होत नसेल, आणि दुसऱ्या दिवशीं अष्टमीनें विद्ध होते अशा वेळीं, अष्टमीनें विद्ध होणारीच घ्यावी. इतर तिथींचाही निर्णय याप्रमाणेंच जाणावा. येथें तेरावा उद्देश संपला.

१६ अथाष्टमीनिर्णयः व्रतमात्रेऽष्टमीशुक्लपक्षेपरा कृष्णपक्षेपूर्वा मीलितशिवशक्त्योरुत्सवेकृष्णापिपरा बुधाष्टमीशुक्लपक्षेप्रातः कालमारभ्यापराह्णपर्यन्तंयाह्निमुहूर्तमात्रोपिबुधवासरयोगःसाग्राह्या सायाह्नकालेचैत्रमासेश्रावणादिमासचतुष्टयेकृष्णपक्षेचनग्राह्या सर्वकृष्णाष्टमीषुकालभैरवोद्देशेनकेचिदुपवसन्तितत्रमार्गशीर्षकृष्णाष्टम्यां भैरवजयन्तीत्वात्तद्वन्निर्णयौचित्येनमध्याह्नव्यापिनीग्राह्या दिनद्वयेमध्याह्नव्याप्तौपूर्वैव प्रदोषव्यापिनीतिकौस्तुभे अत उभयदिनेप्रदोषव्याप्तौद्विविधवाक्याविरोधायपरैव पूर्वत्रप्रदोषव्याप्तिरेवपरत्र मध्याह्नेएवतदाबहुशिष्टाचारानुरोधात्प्रदोषगापूर्वैव यत्तुअर्कपर्वद्वयेरात्रौ चतुर्दश्यष्टमीदिवेतिवचनाद्दिवाभोजननिषेधमात्रपरिपालनंनतुकिंचिद्व्रतंतत्रनिषेधस्तुनिवृत्यात्माकालमात्रमपेक्षतइति वचनाद्भोजनकालव्यापिनीमष्टमींत्यक्त्वानवम्यांसप्तम्यांवाभोक्तव्यमितिभाति युक्तमयुक्तंवासद्भिर्विचारणीयम् । इत्यष्टमीनिर्णयश्चतुर्दशोद्देशः १४

**अष्टमीनिर्णय**— सर्व व्रतांत शुक्लपक्षांतली दुसऱ्या दिवसाची अष्टमी घ्यावी व कृष्णपक्षांत पहिल्या दिवसाची घ्यावी. शिवशक्तींच्या उत्सवाला कृष्णपक्षांतली दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. शुक्लपक्षांत सकाळपासून मध्याह्नकालपर्यंत एक मुहूर्तभर जरी बुधवारीं अष्टमीयोग असेल, तरी तो बुधाष्टमीयोगच ग्राह्य समजावा. चैत्रांत, श्रावणादि चार महिन्यांत व कृष्णपक्षांत जर असा बुधाष्टमी योग असेल, तर तो ग्राह्य समजूं नये. सर्व कृष्णअष्टम्यांना कांहीं लोक कालभैरवाचा उपास करतात. मार्गशीर्षांतली कृष्णाष्टमी भैरवजयन्ति आहे, म्हणून तिच्या निर्णयाप्रमाणें सर्वच उपासासाठीं, जी मध्याह्नव्यापिनी असेल तीच घ्यावी. दोन दिवस मध्याह्नव्यापिनी असल्यास पहिल्या दिवसाची घ्यावी. प्रदोषव्यापिनी घ्यावी असें कौस्तुभांत सांगितलें आहे. दोन्ही दिवशीं जर प्रदोषव्यापिनी असेल, तर वाक्याला विरोध येऊं नये म्हणून दुसरी घ्यावी. आदल्या दिवशीं जर फक्त प्रदोषव्यापिनी असेल, आणि दुसऱ्या दिवशीं जर मध्याह्नव्यापिनी असेल तर अनेकांच्या शिष्टाचाराला अनुसरून प्रदोषव्यापिनी अशी जी आधींची तीच घ्यावी. रविवार, पौर्णिमा आणि अमावास्या या दिवशीं रात्रीच्या भोजनाचा निषेध असून, चतुर्दशी व अष्टमी या तिथींना दिवसा भोजनाचा निषेध असल्याचें वचन आहे. यांत भोजनाचा मात्र निषेध पाळावा. कारण, हें कांहीं व्रत नाहीं. 'निषेध हा निवृत्तिरूप असून, कालमात्राची अपेक्षा करतो' असें वचन असल्यानें, भोजनकालीं व्याप्ति असलेली अष्टमी वर्ज्य करून, सप्तमींत अथवा नवमींत भोजन करावें, असें मला वाटतें. याचा योग्यायोग्य विचार सज्जनांनीं करावा. येथें चौदावा उद्देश संपला.

१७ अथनवमीनिर्णयः नवमीसर्वत्राष्टमीविद्धैवग्राह्या । इतिनवमीनिर्णयः पञ्चदशः १५

**नवमीनिर्णय**—अष्टमीनें विद्ध असलेली नवमीच नेहमीं घ्यावी. येथें पंधरावा उद्देश संपला.

१८ अथदशमीनिर्णयः दशमीतूपवासादौनवमीयुतैवग्राह्या पूर्वाविद्धाया अलाभेउत्तराविद्धाऽपिग्राह्या इतिदशमीनिर्णयःषोडशः १६

**दशमीनिर्णय**—उपासासारख्या सर्व कार्यांकरितां नवमीयुक्त दशमीच घ्यावी. नवमी विद्ध नसल्यास एकादशीनें विद्ध असलेली ती ग्राह्य होय. येथें सोळावा उद्देश संपला.

१९ अथैकादशीनिर्णयः तत्रैकादश्युपवासोद्वेधा भोजननिषेधपरिपालनात्मकोव्रतात्मकश्च आद्येपुत्रवद्गृहस्थादीनांकृष्णपक्षेप्यधिकारः व्रतात्मकोपवासस्तुअपत्ययुक्तैर्गृहस्थैश्चकृष्णपक्षेनकार्यः किंतुसमन्त्रकंव्रतसंकल्पमकृत्वायथाशक्तिनियमयुतंभोजनवर्जनमेवकार्यम् एवंतिथिक्षयेशुक्लैकादश्यामपिज्ञेयम् शयनीबोधिनीमध्यवर्तिकृष्णैकादशीषुसापत्यगृहस्थादीनांसर्वेषामधिकारःविष्णुसायुज्यकामैरायुःपुत्रकामैश्चकाम्यव्रतंपक्षद्वयेपिकार्यम् तत्रनकोपिनिषेधः वैष्णवगृहिणांकृष्णैकादश्यपिनित्योपोष्या इदमेकादशीव्रतंशैववैष्णवसौरादीनांसर्वेषांनित्यम् अकरणेप्रत्यवायश्रवणात् संपत्त्यादिफलश्रवणात्काम्यंचभवति केचिन्मुहूर्तादिमितदशमीसत्त्वेदशम्यामेवभोजनंकर्तव्यम् सूर्योदयात्पूर्वमेवप्रवृत्तायांशुद्धाधिकाधिकद्वादशिकायांतुनैरन्तर्येणोपवासद्वयंकार्यमितितिथिपालनमपिवदन्ति तन्नयुक्तम् अष्टमवर्षादूर्ध्वमशीतितमवर्षपर्यन्तमेकादशीव्रताधिकारः शक्तस्यतुअशीतेरूर्ध्वमप्यधिकारः सभर्तृकाणांस्त्रीणांभर्त्रनुज्ञांपित्राद्यनुज्ञांवाविनोपवासव्रताद्याचरणेव्रतवैफल्यं भर्त्रायुःक्षयोनरकश्च अशक्तानांतु नक्तंहविष्यान्नमनोदनंवाफलंतिलाःक्षीरमथाम्बुचाज्यम्। यत्पञ्चगव्यंयदिचापिवायुःप्रशस्तमत्रोत्तरमुत्तरंच १ इतिपक्षेषुशक्तितारतम्येनैकपक्षाश्रयणंनत्वेकादशीत्यागः प्रमादादिनैकादश्यामुपोषणाद्यकरणेद्वादश्यामपिव्रतंकार्यम् द्वादश्यामप्यकरणेयवमध्यचान्द्रायणंप्रायश्चित्तम् नास्तिक्यादकरणेपिपीलिकामध्यचान्द्रायणम् अशक्तपतिपित्राद्युद्देशेनस्त्रीपुत्रभगिनीभ्रात्रादिभिरेकादशीव्रताचरणेक्रतुशतजंपुण्यम् ।

**एकादशीनिर्णय**—भोजननिषेधात्मक आणि व्रतात्मक असे एकादशीच्या उपासाचे दोन प्रकार आहेत. यांतल्या पहिल्या प्रकाराचा अधिकार मुलगा असलेल्या गृहस्थांना कृष्णपक्षांतलीलाही आहे. व्रतात्मक उपास मात्र मुलें असलेल्या गृहस्थांनीं कृष्णपक्षांतलीला करूं नये. व्रतसंकल्प समंत्रक न करतां यथाशक्ति नियमयुक्त असें भोजन मात्र वर्ज्य करावें. तिथीचा क्षय असतांना हाच निर्णय शुक्लपक्षांतही जाणावा. शयनी आणि बोधिनी यांच्या मधली कृष्णपक्षांतली एकादशी करण्यास, मुलें असलेल्या गृहस्थादिक सर्वांना अधिकार आहे. विष्णूची सायुज्य मुक्ति, आयुष्य आणि पुत्र यांची इच्छा करणारांनीं दोन्ही पक्षांत काम्यव्रत करावें. काम्यव्रताला मुळींच निषेध नाहीं. गृहस्थाश्रमी वैष्णवांनीं कृष्णपक्षांतल्याही एकादशीला उपास करावा. हें एकादशीव्रत—शैव, वैष्णव, सौर वगैरे सर्वांना नित्य आहे. हें जर न केलें तर दोष सांगितला आहे. या बाबतींत कांहींचें मत असें आहे कीं, मुहूर्त-

परिमित अशी दशमी असतां, तिच्यांत भोजन करावें, आणि सूर्योदयाच्या पूर्वीं सुरू झालेल्या शुद्धाधिकाधिक द्वादशिकेला नेहमीं दोन उपास करावे, आणि असेंच तिथिपालनही करावें; परंतु हें मत योग्य नाहीं. आठवर्षांनंतर ऐशीवर्षांपर्यंत एकादशी करण्याला अधिकार आहे. शक्ति असल्यास ऐशीवर्षांनंतर हिचें पालन करावें. नवरा असलेल्या स्त्रीनें नवऱ्याच्या आज्ञेवांचून, अथवा बाप वगैरेंच्या अनुज्ञेशिवाय उपवासव्रतादिकांचें आचरण केल्यास व्रत निष्फळ होतें, नवऱ्याचें आयुष्य कमी होतें आणि नरकांत पडावें लागतें. अशक्तासाठीं नक्त, हविष्यान्न, भातावांचून (अनौदन) फळ, तिळ, दूध, पाणी, तूप, पंचगव्य आणि वायु हीं एकाहून एक श्रेष्ठ आहेत. याप्रमाणें आपलें शक्ति-सामर्थ्य पाहून, यांतल्या कोणच्या तरी एका पक्षाचा स्वीकार करावा; पण एकादशी केल्यावांचून मात्र राहूं नये. चुकून जर एकादशीचा उपास टळला, तर तो द्वादशीला करावा. द्वादशीलाही जर करणें घडलें नाहीं, तर शुक्ल प्रतिपदेपासून दररोज एक घांस वाढविण्याचें आणि वद्य प्रतिपदेपासून एकेक घांस दररोज कमी करण्याचें जें (एकमध्य चांद्रायण) व्रत, त्याचें प्रायश्चित्त करावें. नास्तिकपणामुळें न केल्यास–पिपीलिकामध्य–चांद्रायण–प्रायश्चित्त–(वरच्याप्रमाणेंच) करावें. नवरा, बाप वगैरे अशक्त असल्यामुळें–बायको, मुलगा, बहीण, भाऊ वगैरेंनीं जर त्यांच्याकरितां एकादशी व्रत केलें, तर तें करणाराला शंभर यज्ञांचें फळ मिळतें.

२० अथव्रतदिनानिर्णयः तत्रव्रताधिकारिणोद्विविधावैष्णवाःस्मार्ताश्च तत्र-यद्यपियस्यदीक्षास्तिवैष्णवीत्यादिलक्षणयुक्तावैष्णवास्तद्भिन्नाःस्मार्ताइतिमहा-निबन्धेषूक्तं तथापिस्वपारंपर्यप्रसिद्धमेववैष्णवत्वंस्मार्तत्वंचवृद्धामन्यन्तइति सिन्धूक्तमेवसर्वदेशेसर्वशिष्टपरिगृहीतंप्रचरति वेधोपिद्विविधःअरुणोदयदशमी वेधः सूर्योदयेतद्वेधश्च सूर्योदयात्प्राक्चतुर्घटिकात्मकोऽरुणोदयः सूर्योदयस्तु-स्पष्टःतेनषट्पञ्चाशद्घटिकानन्तरंपलादिमात्रदशमीप्रवेशेऽरुणोदयवेधोवैष्णव-विषयः षष्टिघटिकात्मकसूर्योदयोत्तरंपलादिमात्रदशमीसत्वे सूर्योदयवेधः स्मार्तविषयः ज्योतिर्विदादिविवादेनवेधादिसंदेहेतु बहुवाक्यविरोधेनब्राह्मणेषु विवादिषु । एकादशींपरित्यज्यद्वादशींसमुपोषयेत् १ तथाचैकादशीद्विविधा शुद्धाविद्धाच अरुणोदयवेधवतीविद्धातांत्यक्त्वावैष्णवैर्द्वादश्येवोपोष्या अरुणोदयवेधरहिताशुद्धासाचचतुर्विधा एकादशीमात्राधिक्यवती द्वादशीमा-त्राधिक्यवती उभयाधिक्यवती अनुभयाधिक्यवतीचेति अत्राधिक्यंसूर्योदयोत्तरं सत्वम् तत्रोदाहरणम् । दशमीनाड्यः ५५ एकादशी ६०।१ द्वादश्याःक्षय ५८ इयमेकादशीमात्राधिक्यवतीशुद्धावैष्णवैः परोपोष्या स्मार्तगृहस्थैःपूर्वा । अथ दशमी ५५ एकादशी ५८ द्वादशी ६०।१ इयं शुद्धाद्वादशीमात्राधिक्यवती अत्रवैष्णवानांद्वादश्यामुपोषणं स्मार्तानांपूर्वा । अथ दशमी ५५ एकादशी ६०।१ द्वादशी ५ इयंशुद्धाउभयाधिक्यवती । अत्रसर्वैर्वैष्णवैःस्मार्तैश्चपरैवोपोष्या । अथदशमी ५५ एकादशी ५७ द्वादशी ५८ इयमनुभयाधिक्यवतीशुद्धा वैष्णवैः स्मार्तैश्चपूर्वैवोपोष्या । इतिसंक्षेपतोवैष्णवनिर्णयः ॥

**व्रतदिननिर्णय ( वैष्णवांचा )**—वैष्णव आणि स्मार्त असे एकादशीव्रताच्या अधिकाऱ्यांचे दोन भेद आहेत. 'ज्यानें वैष्णवी दीक्षा घेतली तो वैष्णव आणि ती न घेणारा तो स्मार्त होय,' अशी जरी मोठाल्या ग्रंथांतून व्याख्या केलेली आहे, तरी 'ज्याच्या त्याच्या कुलपरंपरेवरूनच वैष्णवत्व आणि स्मार्तत्व हीं ठरतात, असें वृद्ध मानतात,' असें जें निर्णयसिंधूचें म्हणणें, तेंच सर्वत्र शिष्टसंमत असें मानण्यांत येतें. अरुणोदयकालीं दशमीवेध आणि सूर्योदयकाळीं दशमीवेध असे दोन प्रकारचे वेध आहेत. सूर्योदयाच्या आधीं चार घटका अरुणोदय समजावा. सूर्योदय स्पष्टच आहे. ५६ घटकांनंतर एक पळभरही जरी दशमीचा प्रवेश झाला असला, तरी तो अरुणोदयवेध वैष्णवांच्या संबंधानें घ्यावा. ६० घटकांनंतर एका पळाचाही जरी दशमीचा प्रवेश झाला असला, तरी तो सूर्योदयवेध स्मार्तांबद्दल घ्यावा. ज्योतिषी लोकांच्या विवादामुळें जर वेधादिकांबद्दल संशय असेल, किंवा निरनिराळ्या मतांच्या वाक्यांच्या विरोधामुळें जर ब्राह्मणांमध्यें मतभेद असेल, तर एकादशी सोडून, तिचा उपास द्वादशीला करावा. शुद्धा आणि विद्धा असे एकादशीचे दोन भेद आहेत. अरुणोदयाचा जी वेध करते ती विद्धा. ही वैष्णवांनीं सोडून देऊन द्वादशीला उपास करावा. जी अरुणोदयाचा वेध करीत नाहीं, ती शुद्धा. या शुद्धेचे जे चार भेद आहेत, ते येणेंप्रमाणेः—(१) एकादशी-मात्राधिक्यवती, (२) द्वादशीमात्राधिक्यवती, (३) उभयाधिक्यवती, आणि (४) अनुभयाधिक्यवती. येथें आधिक्य म्हणजे दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर तिथि असणें असा अर्थ समजावा. उदा०ः—दशमी ५५घटका, एकादशी ६०घ. १प. द्वादशीचा क्षय ५८, ही एकादशीमात्राधिक्यवती शुद्धा झाली. अशा वेळीं वैष्णवांनीं दुसऱ्या दिवशीं उपास करावा आणि स्मार्तांनीं पहिल्या दिवशीं करावा. दशमी ५५ घ., एकादशी ५८ घ. व द्वादशी ६० घ. १ प. द्वादशीचा क्षय ५८ घ. ही द्वादशी-मात्राधिक्यवती शुद्धा झाली. अशा वेळीं वैष्णवांनीं द्वादशीला उपास करावा आणि स्मार्तांनीं एकादशीला करावा. दशमी ५५ घ., एकादशी ५८ घ. व द्वादशी ६० घ. १ प. ही द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा झाली. अशा वेळीं वैष्णवांनीं द्वादशीला उपास करावा. आणि स्मार्तांनीं एकादशीला करावा. दशमी ५५घ. १ प., एकादशी ६०घ. १ प. आणि द्वादशी ५ घ. ही उभयाधिक्यवती शुद्धा झाली. अशा वेळीं वैष्णव आणि स्मार्त या दोघांनीं दुसऱ्या दिवशींच उपास करावा. दशमी ५५ घ., एकादशी ५७ घ. आणि द्वादशी ५८ घ. ही अनुभयाधिक्यवती शुद्धा होय. वैष्णव आणि स्मार्त या दोघांनीं यांतली पहिलीच उपासाला घ्यावी. याप्रमाणें थोडक्यांत वैष्णव-निर्णय सांगितला.

**अथस्मार्तनिर्णयः तत्रसूर्योदयवेधवतीविद्धातद्रहिताशुद्धाचेतिद्विविधापिप्रत्येकंचतुर्धा एकादशीमात्राधिक्यवती उभयाधिक्यवती द्वादशीमात्राधिक्यवती अनुभयाधिक्यवती अनुभयाधिक्यवतीत्येवमष्टभेदाभवन्ति अत्रोदाहरणानि दशमी ५८ एकादशी ६०।१ द्वादश्याः क्षयः ५८ इयंशुद्धा एकादशीमात्राधिक्यवती। दशमी ४ एकादशी २ द्वादश्याः क्षयः ५८ इयंविद्धाएकादशीमात्रा-**

धिक्यवती। अत्रोभयत्रापिस्मार्तानांगृहिणांपूर्वोपोष्या यतिभिर्निष्कामगृहिभिर्व-नस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैःस्मार्तैरुपवासद्वयंकार्यमि-ति केचित् उभयाधिक्यवतीविशुद्धा। यथादशमी ५८ एकादशी ६०।१ द्वादशी ४ उभयाधिक्यवतीविद्धा। यथा दशमी २ एकादशी ३ द्वादशी ४ अत्रो-भयत्रापिसर्वैः स्मार्तैर्वैष्णवाश्चावशिष्टापरैवैकादशी उपोष्या द्वादशीमात्राधिक्य-वतीशुद्धा यथा दशमी ५८ एकादशी ५९ द्वादशी ६०।१ अत्रशुद्धत्वात्स्मार्ता-नामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यामितिमाधवमतम् हेमाद्रिमतेतुसर्वैःपराद्वादश्ये-वोपोष्या केचित्तुमुमुक्षुभिःस्मार्तैः परोपोष्येत्याहुः द्वादशीमात्राधिकाविद्धा।यथा दशमी १ एकादशीक्षयगामिनी ५८ द्वादश्यावृद्धिः ६०।१ अत्रैकादश्याविद्धे-त्वात् द्वादश्यामेव स्मार्तानामप्युपवासः एवंचोभयाधिक्येद्वादशीमात्राधिक्ये-चस्मार्तानांविद्धायास्त्यागोनान्यत्रवैष्णवानांतुषड्विधामप्याधिक्यावतींत्यक्त्वा-द्वादश्युपोष्याअनुभयाधिक्यवतीशुद्धा। यथा दशमी ५७ एकादशी ५८ द्वादशी ५९स्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्याम् वैष्णवानांतुविद्धत्वाद्द्वादश्या-मुपवासः अनुभयाधिक्यवती विद्धा।यथा दशमी २ एकादश्याक्षयः ५६ द्वादशी ५५ अत्रापिस्मार्तानामेकादश्यामुपवासः वैष्णवानांद्वादश्यामुपवासः अस्मिन्नु-भयानाधिक्यवतीविद्धाचरमभेदे प्रथमभेदद्वयेऽवयतिभिर्मुमुक्षुभिर्विधवाभिःपरो-पोष्य विष्णुप्रीतिकामैरुपवासद्वयंकार्यमितितुल्ययुक्त्याप्रतिभाति इदानींशिष्टास्तुहे-माद्रिमतंनिष्कामत्वादिकंचानादृत्यमाधवमतेनैवसर्वस्मार्तनिर्णयमाविशेषेणवद-न्तिनतुक्वचिदुपवासद्वयंशुद्धाधिकद्वादशिकायां सर्वेषामेकंपरोपवासंवावदन्ति इतिसर्वत्रदेशेषुप्रायोमाधवोक्तानुसारएवप्रचारइतिबोध्यम् एतेनवैष्णवाष्टादश-भेदानांस्मार्ताष्टादशभेदानांचनिर्णयः। सर्वोपिगतार्थोभवतीतिविभावनीयम् वि-स्तरस्तुमहाग्रन्थेष्वनुसंधेयः अत्राष्टादशभेदानांपृथक्पृथगुदाहरणकथनेतन्निर्ण-यकथनेचबालानांव्यामोहमात्रंस्यादितिसनिर्णयः। पृथगेवपट्टेलिखित्वास्था-पितोनुसंधेयः।

**व्रतदिननिर्णय** ( स्मार्तांचा ) सूर्योदयीं वेध असेल ती विद्धा आणि तशी नसेल ती शुद्धा. या प्रत्येकीचे आणखी जे भेद आहेत, ते येणेंप्रमाणें:—( १ ) एकादशी मात्राधिक्यवती. ( २ ) उभयाधिक्यवती. ( ३ ) द्वादशी मात्राधिक्यवती आणि ( ४ ) अनुभयाधिक्यवती. असे एकंदर मिळून जे आठ प्रकार झाले, त्यांचीं उदाहरणें पुढीलप्रमाणें:—(१) दशमी ५८ घ., एकादशी ६० घ. १ प. आणि द्वादशीचा क्षय; अशा एकादशीला मात्राधिक्यवती शुद्धा म्हणतात. ( २ ) दशमी ४ घ., एकादशी २ घ. आणि द्वादशीचा क्षय अशी जी असते तिला मात्राधिक्यवती विद्धा एकादशी असें म्हणतात. या दोन्ही उदाहरणांत, जे गृहस्थ स्मार्त असतील त्यांनीं उपासाला पहिली घ्यावी आणि यति, निष्काम, गृहस्थ, वानप्रस्थाश्रमी, विधवा आणि वैष्णव यांनीं उपासाला दुसरी घ्यावी. विष्णू-च्या कृपेची इच्छा करणाऱ्या स्मार्तांनीं दोन्ही दिवशीं उपास करावे असें कांहींचें

सांगणें आहे. ( ३ ) दशमी ५८ घ., एकादशी ६० घ. १ प. आणि द्वादशी ४ घ. ही जी, ती उभयाधिक्यवती होय. (४) दशमी २ घ., एकादशी ३ घ. आणि द्वादशी ६० घ. १ प. असल्यास ही द्वादशी मात्राधिक्यवती विद्धा असें समजावें. या दोन्ही उदाहरणांत सर्व वैष्णव आणि स्मार्त यांनीं शिल्लक असलेली दुसरीच एकादशी पाळावी. (५) दशमी ५८ घ., एकादशी ५९ घ. आणि द्वादशी ६० घ. १ पळ; ही द्वादशी मात्राधिक्यवती शुद्धा होय. ही शुद्धा असल्यानें, स्मार्तांनीं एकादशीलाच उपास करावा, द्वादशीला करूं नये, असें माधवाचें मत आहे. या बाबतींत हेमाद्रि म्हणतो कीं, सर्वांनीं दुसऱ्या दिवशीं द्वादशीलाच उपास करावा. मोक्षाची इच्छा असलेल्या स्मार्तांनीं दुसऱ्या दिवशीं उपास करावा. असेंही कांहींचें मत आहे. ( ६ ) दशमी १ घ., एकादशी क्षयाला गेलेली ५८ घ. आणि द्वादशीची वृद्धि ५० घ. १ प. ही एकादशी विद्धा झाली असल्यामुळें, स्मार्तांनीं द्वादशीलाच उपास करावा. त्याप्रमाणेंच उभयाधिक्य आणि द्वादशीमात्राधिक्य अशी जी विद्धा एकादशी, ती स्मार्तांनीं पाळूं नये व इतर सोडूं नये. वैष्णवांनीं सहाही प्रकारची आधिक्यवती सोडून द्वादशीलाच उपास करावा. (७) दशमी ५७ घ. एकादशी ५८ घ. आणि द्वादशी ५९ घ. ही अनुभयाधिक्यवती शुद्धा होय. या प्रसंगीं सर्वांनीं एकादशीलाच उपास करावा. द्वादशीला करूं नये. ही विद्धा असल्यानें वैष्णवांनीं द्वादशीलाच उपास करावा. (८) दशमी २ घ., एकादशीचा क्षय ५६ घ. आणि द्वादशी ५५ घ. असा जेव्हां प्रसंग असेल, तेव्हां देखील स्मार्तांनीं एकादशीलाच उपास करावा आणि वैष्णवांनीं द्वादशीला करावा. येथें उभयानाधिक्यवती विद्धा एकादशीच्या शेवटच्या भेदांत पहिल्या दोन भेदांप्रमाणें—संन्यासी, मोक्षेच्छु आणि विधवा—यांनीं उपासाला दुसरीच घ्यावी. विष्णूची कृपा इच्छिणाऱ्यांनीं दोन्ही दिवशीं उपास करावे असें योग्य युक्तिवादानें मला वाटतें. सध्यां सर्वत्र शिष्ट लोक हेमाद्रीचें मत आणि निष्कामत्वादिक यांचा अनादर करून, माधवाच्या मताप्रमाणेंच—त्यांत तिळमात्रहि फरक न करतां—स्मार्तनिर्णय सांगतात. दोन उपास करावे, अथवा शुद्धाधिका द्वादशिकेला पुढल्या दिवशीं उपास करावा असें कोणीही सांगत नाहींत. याप्रमाणें बहुतेक सर्वत्र माधवाचेंच मत प्रचारांत आहे असें समजावें. यावरून, वैष्णवांचे जे अठरा भेद आणि स्मार्तांचे जे अठरा भेद, त्यांचा निर्णय या उदाहरणांनीं अर्थहीन ठरतो हें स्पष्टच झालें. या बाबतींत ज्यास्त माहिती पाहिजे असल्यास मोठाले ग्रंथ पाहावेत. अज्ञानांची भ्रांति दूर व्हावी म्हणून, या पहिल्या परिच्छेदाच्या शेवटीं जो अठरा भेदांच्या उदाहरणांसह एक पट जोडला आहे व त्याचा जो निर्णयही तेथेंच सांगितला आहे, तो पाहावा.

**२५ अथसंक्षेपतोव्रतादिननिर्णयः । जयन्तीव्रतवन्नित्यं काम्यंचैकादशीव्रतम् । अरुणोदयवेधोऽत्रवेधःसूर्योदयेतथा ॥१॥ उक्तौद्वौदशमीवेधौवैष्णव स्मार्तयोःक्रमात् ॥ विद्धात्याज्यावैष्णवेन शुद्धाप्याधिक्यसंभवे ॥२॥ एकादशी द्वादशीवाऽधिकाचेत्त्यज्यतांदिनं। पूर्वंग्राह्यंतूत्तरं स्यादिति वैष्णवनिर्णयः ॥३॥ अस्यार्थः ।** जयन्तीव्रतवत् अकरणेप्रत्यवायश्रवणान्नित्यं संपत्त्यादिफलश्रव-

णात्काम्यंचैकादशीव्रतं तत्रैकादश्यां द्वौ दशमीवेधौ अरुणोदयेदशमीवेधः सूर्योदयेदशमीवेधश्च क्रमाद्वैष्णवस्मार्तयोः वैष्णवानामरुणोदयेदशमीवेधः स्मार्तानां सूर्योदयेदशमीवेध इत्यर्थः षट्पञ्चाशद्घटीमिते अरुणोदयः सूर्योदयश्चस्पष्टः अत्रस्वपारंपर्यप्रसिद्धमेव वैष्णवत्वं स्मार्तत्वंचवृद्धामन्यन्ते इतितदेवग्राह्यम्। वैष्णवेनविद्धैकादशी अरुणोदयेवेधवतीएकादशी त्याज्या द्वादश्युपोष्या आधिक्यसंभवेएकादशीद्वादश्योरुभयोराधिक्ये सूर्योदयोत्तरंसत्त्वे शुद्धापि त्याज्या परैवैकादशी उपोष्या तथा एकादश्याएवाधिक्ये शुद्धमपिपूर्वदिनं त्याज्यं परंग्राह्यं तथैव द्वादश्या एवाधिक्येपिपूर्वदिनं त्याज्यं परदिनं ग्राह्यमित्यर्थः इति वैष्णवनिर्णयः॥ अथ स्मार्तानांनिर्णयउच्यते। एकादशीद्वादशीचेत्युभयंवर्धते यदा॥ तदा पूर्वदिनंत्याज्यं स्मार्तैर्ग्राह्यंपरंदिनम्॥१॥ एकादशीमात्रवृद्धौ गृहियत्योर्व्यवस्थितिः। उपोष्यागृहिभिःपूर्वा यतिभिश्चोत्तरातिथिः॥२॥ द्वादशीमात्रवृद्धौतु शुद्धाविद्धे व्यवस्थिते। शुद्धापूर्वोत्तराविद्धा स्मार्तनिर्णयईदृशः॥ ३ ॥ अस्यार्थः। एकादशीद्वादश्योर्यदावृद्धिः सूर्योदयोत्तरं विद्यमानत्वं तदापूर्वैकादशीशुद्धापिस्मार्तैस्त्याज्या परैवोपोष्या। एकादश्या एववृद्धौतु गृहिभिः स्मार्तैः पूर्वोपोष्या यत्यादिभिरुत्तरा। द्वादश्याएववृद्धौतु शुद्धाविद्धयोर्व्यवस्था एकादशी शुद्धा चेत्साउपोष्या एकादशीविद्धाचेद् द्वादश्येवोपोष्या एवंचोभयाधिक्ये द्वादशीमात्राधिक्येच स्मार्तानां विद्धैकादशीत्यागो नान्यत्रेत्यर्थः। इति स्मार्तनिर्णयः॥

**संक्षेपानें व्रतदिननिर्णय**—एकादशीचें व्रत हें जयन्तीच्या व्रताप्रमाणें काम्य व नित्य आहे. यांत अरुणोदयवेध आणि सूर्योदयवेध असे दोन प्रकारचे वेध आहेत. वैष्णव आणि स्मार्त यांचे दशमीचे दोन वेध अनुक्रमें सांगितले आहेत. वैष्णवांना विद्धा त्याज्य आहे आणि आधिक्यसंभवा असतां शुद्धा देखील त्याज्यच होय. एकादशी अथवा द्वादशी जर अधिक असेल, तर आधींचा दिवस टाकून पुढचा दिवस घ्यावा, असा जो वैष्णवांचा निर्णय आहे, त्याचा अर्थ असा कीं, हें एकादशीव्रत केलें नसतां दोष सांगितला असल्यानें, आणि याचें फल नित्य व संपत्ति वगैरे सांगितलें आहे म्हणून, हें काम्य असें जें एकादशीचें व्रत, तें जयन्तीच्या व्रताप्रमाणें दोन्ही प्रकारचें आहे. एकादशीला दशमीचे जे एक अरुणोदयवेध आणि दुसरा सूर्योदय वेध असे दोन वेध होतात, ते अनुक्रमें वैष्णव आणि स्मार्त यांचे असतात. यावरून अरुणोदयवेध तो वैष्णवांचा आणि सूर्योदयवेध तो स्मार्तांचा असें जाणावें. जो ५६ घटकांनीं परिमित वेध असतो, तो अरुणोदय समजावा. सूर्योदय तर स्पष्टच आहे. वैष्णवत्व किंवा स्मार्तत्व या गोष्टी आपापल्या परंपरेलाच अनुसरून वृद्ध लोक मानतात, आणि म्हणूनच त्या ग्राह्य होत. वैष्णवानें अरुणोदयीं वेध असलेली विद्धा एकादशी सोडावी आणि द्वादशीला उपास करावा. एकादशी व द्वादशी या दोहींचें जर आधिक्य असेल, आणि तें जर सूर्योदयानंतर असेल, तर शुद्धा देखील सोडून देऊन दुसऱ्या दिवशीं उपास करावा. फक्त एकादशीचेंच जर

आधिक्य असेल, तर शुद्ध असलेला असा जो आधींचा दिवस तोही टाकून पुढचाच घ्यावा. त्याचप्रमाणें केवळ द्वादशीचेंच जर आधिक्य असेल, तर पहिला दिवस सोडून घ्यावा आणि दुसरा घ्यावा. हा वैष्णवनिर्णय झाला. आतां स्मार्तनिर्णय सांगतों. 'एकादशी आणि द्वादशी या दोहींचीही जर वृद्धि असेल, तर स्मार्तांनीं पहिल्या दिवसाचा त्याग करून, दुसरा दिवस घ्यावा. केवळ एकादशीचीच जर वृद्धि असली, तर गृहस्थांनीं पहिल्या दिवशीं उपास करावा, आणि संन्याशांनीं तो दुसऱ्या दिवशीं करावा, असा गृहस्थ आणि यति यांच्या बाबतींत निर्णय आहे. द्वादशीचीच जर केवळ वृद्धि असेल, तर पहिली शुद्धा आणि दुसरी विद्धा अशी शुद्धा व विद्धा यांची व्यवस्था समजावी. असा हा स्मार्तनिर्णय आहे.' याचा अर्थ असा कीं, एकादशी व द्वादशी यांची जेव्हां वृद्धि असते, म्हणजे या तिथि जेव्हां सूर्योदयानंतर असतात, तेव्हां आधींच्या दिवसाची एकादशी जरी शुद्धा असते, तरी ती स्मार्तांनीं पाळूं नये; दुसऱ्या दिवशींच उपास करावा. जेव्हां फक्त एकादशीचीच वृद्धि असते, तेव्हां स्मार्त गृहस्थांनीं पहिल्या दिवशीं उपास करावा आणि संन्याशी वगैरेंनीं तो दुसऱ्या दिवशीं करावा. फक्त द्वादशीचीच वृद्धि असेल, तेव्हां शुद्धा एकादशीलाच उपास करावा. एकादशी जर विद्धा असेल, तर द्वादशीलाच उपास करावा. शुद्धा आणि विद्धा यांची अशी व्यवस्था आहे. याप्रमाणें दोन्ही तिथींचें आधिक्य असतां आणि याचप्रमाणें केवळ द्वादशीचेंच आधिक्य असतांना मात्र स्मार्तांनीं विद्धा एकादशीचा त्याग करावा; इतर वेळीं करूं नये. याप्रमाणें येथें स्मार्तनिर्णय संपला.

**२९ अथवेधभेदाः अत्रार्धरात्रोत्तरंदशमीसत्त्वेकपालवेधोद्विपञ्चाशद्घटिकादशमीसत्त्वेछायावेधस्त्रिपञ्चाशद्घटीत्वे दशम्याग्रस्ताख्योवेधश्चतुःपञ्चाशत्त्वे संपूर्णाख्यः पञ्चपञ्चाशत्त्वेवेधःषट्पञ्चाशत्त्वेमहावेधः सप्तपञ्चाशत्त्वेप्रलयाख्योऽष्टपञ्चाशत्त्वेमहाप्रलय एकोनषष्टित्वेघोराख्यः षष्टिघटित्वेराक्षसाख्य इतिवेधभेदानारदेनोक्ता मध्वादिमतानुसारिभिःकैश्चिदेवकेचिदेवानुसृताः माधवाचार्यादिसर्वसंमतस्तुषट्पञ्चाशद्घटीवेधएवेतिज्ञेयम् दशमीपञ्चदशघटीभिरेकादशीदूषिकेतितूपवासातिरिक्तव्रतव्रताङ्गसंकल्पार्चनादौ तत्रापितद्दोषेणनसर्वथात्यागः किंतुप्रातःकर्तव्यंसंकल्पार्चनादिमध्याह्नोत्तरंकार्यमितिध्येयम् ।**

**वेधभेद**—मध्यरात्रीनंतर जर दशमी असेल तर कपालवेध, ५२ घ. असेल तर छायावेध, ५३ घटका असेल तर ग्रस्तवेध, ५४घ. असेल तर संपूर्ण वेध, ५५ घटका असेल तर सामान्य वेध, ५६ घ. असल्यास महावेध, ५७ घ. असल्यास प्रलयवेध, ५८ घ. असल्यास महाप्रलयवेध, ५९ घ. असल्यास अघोरवेध आणि ६० घ. असल्यास राक्षसवेध—असे वेधाचे दहा प्रकार नारदांनीं सांगितले आहेत. मध्वाचार्यांच्या मतानें चालणारे कांहीं लोक यांपैकीं कांहीं वेधांप्रमाणें चालतात. माधवाचार्यादिकांना जो संमत असा एक ६५ घटकांचा तेवढाच वेध आहे. दशमी पंधरा घटकांनीं एकादशीला दूषित करते, असें जें सांगितलें, तें उपासावांचूनच्या व्रतासंबंधानें म्हणजे-व्रताचीं अंगें जीं-संकल्प, पूजा वगैरे, त्यांसंबंधानें होय. असें जरी

आहे, तरी या दोषामुळें तिचा सर्वथा त्याग न करतां, प्रातःकाळीं करायचीं जीं —संकल्प, अर्चन वगैरे कृत्यें, तीं मध्याह्नानंतर करावींत, असें समजावें.

**अथव्रतप्रयोगः** उपवासात्पूर्वदिनेप्रातःकृतनित्यक्रियः दशमीदिनमारभ्यकरिष्येहंव्रतंतव । त्रिदिनंदेवदेवेशनिर्विघ्नंकुरुकेशव१ इतिसंकल्प्यमध्याह्नेएकभुक्तंकुर्यात् तत्रनियमाः कांस्यमांसमसूरदिवास्वापातिभोजनात्यम्बुपानपुनर्भोजनमैथुनक्षौद्रानृतभाषणचणककोद्रवशाकपरान्नद्यूततैलातिलपिष्टताम्बूलवर्जनादयः एकभुक्तानन्तरंकाष्ठेनदन्तधावनं कुर्यात् निशिभूतलेशयित्वाप्रातरेकादश्यांपर्णादिनादन्तधावनंकार्यं नतुकाष्ठेन स्नानादिनित्यक्रियान्तेपवित्रपाणिरुदङ्मुखः वारिपूर्णताम्रपात्रमादायसंकल्पंकुर्यात् ।एकादश्यांनिराहारोभूत्वाहमपरेहनि । भोक्ष्यामिपुण्डरीकाक्षशरणंमेभवाच्युत १ इत्यनेनमन्त्रेणपुष्पाञ्जलिंवाहरौदद्यात् अशक्तस्यतुएकादश्यांजलाहारएकादश्यांक्षीरभक्षएकादश्यांफलाहारएकादश्यांनक्तभोजीत्याद्यूहेनशक्त्यनुसारेणसंकल्पः शैवानांरुद्रगायत्र्यासंकल्पः सौराणांनित्यगायत्र्यानाम्नावासंकल्पः अयंसंकल्पःसूर्योदयोत्तरंदशमीसत्वेस्मार्तैरेकादश्यांरात्रौकार्यः अर्धरात्रादुपरिदशम्यनुवृत्तौसर्वैरेवैकादश्यांमाध्याह्नोत्तरंकार्यः संकल्पोत्तरमष्टाक्षरमन्त्रेणत्रिरभिमन्त्रितंतज्जलं पिबेत् ततःपुष्पमण्डपंकृत्वातत्र । पुष्पैर्गन्धैस्तथाधूपैर्दीपैर्नैवेद्यकैःपरैः। स्तोत्रैर्नानाविधैर्दिव्यैर्गीतवाद्यैर्मनोहरैः ॥ १ ॥ दण्डवत्प्रणिपातैश्चजयशब्दैस्तथोत्तमैः । हरिंसंपूज्य विधिवद्रात्रौकुर्यात्प्रजागरम् ॥ २ ॥

**व्रतप्रयोग**—उपासाच्या आदल्या दिवशीं सकाळीं नित्यकर्म करणें झाल्यावर 'दशमीदिनमारभ्य करिष्येऽहं व्रतं तव। त्रिदिनं देवदेवेश निर्विघ्नं कुरु केशव॥' असा संकल्प करून मध्याह्नीं एकदांच जेवावें. त्याचे नियम येणें प्रमाणें:—काशाचें भांडें, मांस, मसूर, दिवसाची झोंप, पोटभर जेवणें, पुष्कळ पाणी पिणें, दुसऱ्यांदा जेवणें, स्त्रीसंग, मध, खोटें बोलणें, हरभरे, कोद्रु, भाजी, परान्न, सोडत, तेल, तीळ, पीठ, विडा वगैरे सर्व वर्ज्य करावींत. एकभुक्त झाल्यानंतर काटक्यांनीं दांत धुवावेत. रात्रीं जमिनीवर निजून एकादशीला सकाळीं पानें वगैरेंनीं दांत घासावेत. काटक्यांनीं घासूं नयेत. स्नानादिक रोजच्या क्रिया आटपल्यावर हाताच्या बोटांत पवित्रकें घालून उत्तरेकडे तोंड करावें व पाण्यानें भरलेलें भांडें हातीं घेऊन 'एकादश्यां निराहारो भूत्वाहमपरेऽहनि । भोक्ष्यामि पुण्डरीकाक्ष शरणं मे भवाच्युत' ॥ असा संकल्पाचा मंत्र म्हणून, विष्णूला पुष्पांजलि द्यावा. अशक्तानें 'जलाहारः । क्षीरभक्षः । फलाहारः । नक्तभोजी ।' यांपैकीं शक्त्यनुसार कोणचा तरी शब्द 'निराहारो'च्या ऐवजीं उच्चारून संकल्प करावा. शैवांनीं रुद्रगायत्रीसंकल्प करावा आणि सौरांनीं नेहमींच्या गायत्रीचा संकल्प करावा. सूर्योदयानंतर जरदशमी असेल, तर स्मार्तांनीं हा संकल्प एकादशीच्या रात्रीं करावा. दशमी जर अर्धरात्रीनंतर असेल, तर सर्वांनीं एकादशीला मध्याह्नानंतर करावा. संकल्पानंतर अष्टाक्षरमंत्रानें तीन वेळां अभिमंत्रण करून, तें पाणी प्यावें. त्यानंतर,

फुलांचा मंडप करून त्यांत–फुलें, गंध, धूप, दीप, उत्तम नैवेद्य, अनेक प्रकारचीं उत्तम स्तोत्रें, गाणीं, कर्णमधुर वाद्यें, साष्टांग नमस्कार, उत्तम प्रकारचे जयशब्द वगैरेनीं विधिपूर्वक हरीची पूजा करून, रात्रीं जागरण करावें.

एकादश्यांनियमाः पाखण्डिसंभाषणस्पर्शदर्शनवर्जनंब्रह्मचर्यसत्यभाषण-दिवास्वापवर्जनादयः परिभाषोक्ताश्चज्ञेयाः पाखण्डिदर्शनादौतुसूर्यंपश्येत्ततः शुचिः संस्पर्शेनबुधःस्नानाच्छुचिरादित्यदर्शनात् १ संभाष्यतानशुचिषदं-च्चिन्तयेदच्युतंबुधः। इत्यादिप्रायश्चित्तम् उपवासदिनेश्राद्धप्राप्तौश्राद्धशेषसर्वा-न्नेनैकंपात्रंपरिविष्यतत्सर्वान्नावघ्राणंकृत्वापात्रंगवादिभ्योदेयम् कन्दमूलफला-हाराद्यनुकल्पेनोपवासकर्त्रा तुस्वभक्ष्यस्यैवफलादेः पितृब्राह्मणपात्रेषुपरिवेषण-पूर्वकंतच्छेषभक्षणं कार्यम् एकादश्यांयदाभूपमृताहः स्यात्कदाचन। तद्दिनंतु परित्यज्यद्वादश्यामेवकारयेत् १इत्यादिवचनान्निथाचारंवैष्णवपराणि वैष्णवैः षोडशमहालयकरणपक्षेएकादश्यधिकरणकंद्वादश्यधिकरणकंचमहालयंतन्त्रेण करिष्येइति संकल्प्यमहालयद्वयंद्वादश्यांकार्यं काम्योपवासेसूतकप्राप्तौशारीर-नियमान्स्वयंकृत्वासूतकान्तेपूजादानब्राह्मणभोजनादिकंकार्यम् नित्योपवासे सूतकादिप्राप्तौस्नात्वाहरिंप्रणम्यनिराहारादिकंस्वयंकृत्वापूजादिकंब्राह्मणद्वारा कार्यम् दानादेर्लोपो न सूतकान्तेऽनुष्ठानावश्यकत्वम् एवंरजस्वलादिदोषेपि द्वादश्यांप्रातर्नित्यपूजांविधायभगवतेव्रतमर्पयेत्। अज्ञानतिमिरान्धस्यव्रतेनानेनकेशव। प्रसीदसुमुखोनाथज्ञानदृष्टिप्रदोभव॥१॥इतितत्रमन्त्रः दशम्यादिषूक्ता-नांनियमानांभङ्गेदिवास्वापेबहुशोजलपानेमिथ्याभाषणेवा तत्तन्नियमभङ्गानु-द्दिश्यनारायणाष्टाक्षरमन्त्रजपमष्टोत्तरशतसंख्ययाकुर्यात् अल्पदोषे नामशत-त्रयजपः रजस्वलाचाण्डालरजकसूतिकादिशब्दस्यव्रतमध्येश्रवणेऽष्टोत्तरसह-स्रगायत्रीजपः ततोनैवेद्यतुलसीमिश्रितान्नेनपारणंकार्यम् आमलकीफलस्य-पारणायांभक्षणेऽसंभाष्यभाषणादिदोषनाशः पारणंचद्वादश्यूल्लङ्घनेमहादोषाद् द्वादशीमध्येएवकार्यम् स्वल्पद्वादशीसत्त्वे रात्रिशेषेआमाध्याह्नान्ताः क्रियाः सर्वा अपकृष्यकार्याः अग्निहोत्रहोमस्यनापकर्षइतिकेचित् एवंश्राद्धस्यापिनाप-कर्षोरात्रौश्राद्धनिषेधात् आर्तसंकटेश्राद्धेप्रदोषादिव्रतेचतीर्थजलेनपारणंकार्यम् द्वादशीभूयस्त्वेद्वादशीप्रथमपादंहरिवासरसंज्ञकमुल्लङ्घ्यपारणं कार्यम् कला-मात्रायाअपिद्वादश्याअभावे त्रयोदश्यांपारणम् द्वादश्यामध्याह्नोर्ध्वंसत्त्वे प्रातर्मुहूर्तत्रयमध्येएवपारणम् न मध्याह्नादौइतिबहवः बहूनांकर्मकालानांबाधा-पत्तेरपराह्णएवेतिकेचित् द्वादश्यांसर्वमासेषुशुक्लायांकृष्णायांवाश्रवणयोगेशक्ते-नैकादशीद्वादश्योर्द्वयोरप्युपवासःकार्यः अशक्तेनैकादश्यांफलाहाराद्यनुकल्पं कृत्वाश्रवणद्वादश्यामुपवासः कार्यः विष्णुशृङ्खलयोगसत्त्वेतु एकादश्यामेव श्रवणद्वादशीप्रयुक्तमप्युपवासंकृत्वाद्वादश्यांश्रवणयोगरहितायांपारणं कार्यम् द्वादश्याः श्रवणतोन्यूनत्वश्रवणयुक्तायामपिद्वादश्यामेवपारणम् द्वादश्युल्लङ्घने दोषात् विष्णुशृङ्खलयोगादिनिर्णयोभाद्रपदमासगतश्रवणद्वादशीप्रकरणेवक्ष्यते

**दिवानिद्रांपरान्नंच पुनर्भोजनमैथुने । क्षौद्रंकांस्यामिषंतैलंद्वादश्यामष्टवर्जयेत् १ द्यूतक्रोधचणककोद्रवमाषतिलपिष्टमसूरनेत्राञ्जनमिथ्याभाषणलोभायासप्रवासभारवहनाध्ययनताम्बूलादीनिवर्जयेत् एतेचनियमाःकाम्यव्रतेआवश्यकाः नित्यव्रतेतु शक्तिमांस्तुपुमान्कुर्यान्नियमंमविशेषणम् । विशेषनियमाशक्तोह्योरात्रंभुजिवर्जितः १ निगृहीतेन्द्रियः श्रद्धासहायोविष्णुतत्परः । उपोष्यैकादशींपापान्मुच्यतेनात्रसंशयः १ अन्यंभुङ्क्ष्वेतियोब्रूयाद्भुंक्तेवायःसनारकी । एकादशीव्रताद्विष्णुसायुज्यंलभतेध्रियम् १ इत्येकादशीव्रतनिर्णयः कार्यान्तरेष्वेकादशीद्वादशीयुतैवग्राह्या इत्येकादशीनिर्णयोद्देशः सप्तदशः । १७**

**एकादशीनियम**—एकादशीला पाखंडी लोकांशीं संभाषण, स्पर्श किंवा दर्शन हीं वर्ज्य करावीत; ब्रह्मचर्य राखून सत्य भाषण करावें दिवसां झोंप घेऊं नये; वगैरे जे नियम, ते व्रतांच्या परिभाषेंत सांगितले आहेत. एकादशीला पाखंडी, चांडाळ, विटाळशी वगैरेंचें दर्शन झालें असतां, सूर्यदर्शन घ्यावें म्हणजे शुद्धत्व येतें. अशांचा स्पर्श झाला असतां शहाण्यानें स्नान करावें व नंतर सूर्यदर्शन घ्यावें म्हणजे तो शुद्ध होतो. अशांशीं भाषण घडलें तर अच्युताचें म्हणजे सूर्याचें चिंतन करावें. याप्रमाणें वरील गोष्टींबद्दल प्रायश्चित्त आहे. उपासाच्या दिवशीं जर श्राद्धतिथि असेल तर श्राद्ध करून, उरलेलें सर्व अन्न एका ताटांत वाढून, त्या सर्व अन्नाचा वास घ्यावा (अवघ्राण) आणि तें सर्व अन्न गाईसारख्या जनावरांस खाऊं घालावें. कंद, मूळ, फळ वगैरे वस्तु खाऊन उपास करणाऱ्यानें, स्वतः जीं फळें वगैरे खावयाचीं तीं, पितरांच्या जागीं योजिलेल्या ब्राह्मणांच्या पानांवर वाढून, त्यांतून शिल्लक राहिलेलीं खावींत. **'हे राजा, एकादशीला जर श्राद्धतिथि येईल, तर तो दिवस टाकून, द्वादशीला श्राद्ध करावें'** वगैरे वचनें वैष्णवांनीं परंपरेच्या आचारानुसार पाळावींत. वैष्णवांना जर सोळा महालयें करणें असेल, तर तीं **'एकादश्यधिकरणकं द्वादश्यधिकरणकंच महालयं तंत्रेण करिष्ये'** असा संकल्प करून द्वादशीला दोन महालयें करावींत. काम्य उपासाच्या दिवशीं सुतक आलें असतां शरीरसंबंधाचे नियम स्वतः पाळून, सुतक संपल्यानंतर पूजा, दान, ब्राह्मणभोजन वगैरे योग्य कर्में करावींत. नित्य अशा उपासाच्या दिवशीं जर सुतक आलें, तर स्नान करून हरीला नमस्कार करावा आणि निराहारादि नियम स्वतः करून, पूजा वगैरे ब्राह्मणांकडून करावावींत. दानादिक करूं नयेत. सुतक संपल्यानंतर तें कांहीं एक करण्याची आवश्यकता नाहीं. विटाळशीपणा वगैरे दोष असतां याचप्रमाणें करावें. द्वादशीला सकाळीं नेहमींप्रमाणें पूजा करून, भगवंताला व्रताचें अर्पण करावें. **'अज्ञान तिमिरान्धस्य व्रतेनानेन केशव । प्रसीद सुमुखोनाथ ज्ञानदृष्टिप्रदो भव'** हा त्या व्रतार्पणाचा मंत्र होय. दशमी वगैरे दिवशीं सांगितलेल्या व्रताचा जर भंग होईल, म्हणजे त्या दिवशीं जर दिवसां झोंप घेणें होईल, पुष्कळदां पाणी पिणें घडेल अथवा खोटें बोलणें घडेल, तर त्याच्या नियमभंगासाठीं प्रत्येकाबद्दल नारायणाच्या अष्टाक्षर मंत्राचा १० वेळां जप करावा. दोष लहानसा घडला असेल तर २० वेळां तो जप

करावा. व्रतामध्यें जर विटाळशी, चांडाळ, परीट, बाळंतीण वगैरेंचा शब्द ऐकूं आला तर १००८ गायत्रीजप करावा आणि मग नैवेद्य आणि तुळशीचीं पानें यांनीं मिश्र केलेल्या अन्नाचें पारणें करावें. पारण्यांत जर आंवळा खाल्ला तर ज्याच्याशीं भाषण केलें असतां दोष लागतो, तो दोष नाहींसा होतो. द्वादशी मोडली असतां महादोष आहे; म्हणून द्वादशीलाच पारणें करावें. द्वादशी जर थोडी असेल, तर शिल्लक असलेल्या रात्रींत मध्यापर्यंतच्या सर्व क्रिया कराव्या. याला अपकर्ष म्हणतात. कोणी असें म्हणतात कीं, अग्निहोत्र, होम वगैरेंचा अपकर्ष करूं नये. ( अपकर्ष म्हणजे मुळींच न करणें ). याप्रमाणेंच श्राद्धाचाही अपकर्ष नाहीं; कारण, रात्रीं श्राद्ध करण्याचा निषेध सांगितला आहे. मोठें संकट, श्राद्ध, व प्रदोषादिव्रत असतांना तीर्थ-जल घेऊन पारणें करावें. द्वादशी जर बराच वेळ असेल, तर द्वादशीचा हरिवासर नांवाचा पहिला पाद टाकून मग पारणें करावें. द्वादशी जर एक कलाही नसेल, तर त्रयोदशीला पारणें करावें. द्वादशी जर मध्याह्नानंतर असेल, तर सकाळीं तीन मुहूर्तपर्यंतच पारणें करावें; तें माध्याह्नीं वगैरे करूं नये, असेंच बहुतेकांचें मत आहे. निरनिराळया कर्मांचे काल निरनिराळे आहेत. या नियमाला बाध येऊं नये म्हणून, पारणें अपराह्णींच करावें असेंही कोणी म्हणतात. सर्व महिन्यांत जर शुद्ध व वद्य या दोन्ही पक्षांतील द्वादश्यांना श्रवणनक्षत्राचा योग येईल, तर ज्याच्या अंगीं सामर्थ्य असेल त्यानें एकादशी आणि द्वादशी या दोन्ही दिवशीं उपास करावा. अशक्तानें एकादशीला फराळाचा गौणपक्ष धरून, श्रवणनक्षत्राच्या द्वादशीला उपास करावा. जर विष्णुशृंखल योग असेल, तर एकादशीच्याच दिवशीं श्रवणद्वादशीचा उपास करून, श्रवणरहित अशा द्वादशीस पारणें करावें. द्वादशी जर श्रवणनक्षत्रापेक्षां कमी असेल, तर प्रणवयुक्त द्वादशीला देखील पारणें करावें; कारण द्वादशीचें उल्लंघन केलें तर दोष सांगितला आहे. विष्णु-शृंखल योगादिकांचा निर्णय, भाद्रपद महिन्यांतल्या श्रवण-द्वादशीच्या प्रकरणांत सांगण्यांत येईल. दिवसा झोंप घेणें, परान्नभक्षण करणें, एका-हून अधिक वेळ जेवणें, स्त्रीसंग करणें, मद्य चाटणें, काश्याच्या भांड्यांत जेवणें व तेलाचा उपयोग करणें, या आठ गोष्टी द्वादशीला वर्ज्य कराव्यात. द्यूत, संताप, हरभरे, कोद्रू उडीद, तेल, मीठ, मसूर, काजळ, खोटें बोलणें, लोभ, श्रम, प्रवास, ओझें वाहणें, विद्या शिकणें, विडा खाणें वगैरे गोष्टी वर्ज्य कराव्यात. हे नियम काम्य-व्रतांत तर अवश्य पाळावेत. नित्य व्रतांतही सशक्तानें हे नियम पाळावेत. कठीण नियम पाळण्यास जर अंगीं शक्ति नसली तर त्यानें अहोरात्र भोजन वर्ज्य करून, इंद्रियनिग्रह करावा आणि श्रद्धेनें विष्णूचें ध्यान करून, एकादशीचा उपास करावा, म्हणजे त्याचें पाप नाहींसें होतें यांत संशय नाहीं. एकादशीला जो कोणी दुसऱ्यास जेव म्हणून सांगून स्वतः जेवतो तो नरकाला जातो. एकादशीव्रत केल्यानें विष्णूची सायुज्यमुक्ति व संपत्ति, हीं प्राप्त होतात. याप्रमाणें एकादशीव्रताचा निर्णय झाला. इतर कार्यांत, द्वादशीयुक्त अशी जी एकादशी असेल, ती घ्यावी. येथें याप्रमाणें सतरावा उद्देश संपूर्ण झाला.

२८ अथद्वादशीनिर्णयः द्वादशीत्वेकादशीविद्धाग्राह्या अथ अष्टौमहाद्वादश्यः शुद्धाधिकैकादशीयुक्ताद्वादशी उन्मीलनीसंज्ञा द्वादश्येवशुद्धाधिका वर्धतेसावञ्जुली सूर्योदयेएकादशीततःक्षयगामिनीद्वादशीद्वितीयसूर्योदये त्रयोदशीएवमेकाहोरात्रेतिथित्रयस्पर्शात्त्रिस्पर्शासंज्ञाद्वादशी दर्शस्यपौर्णमास्यावायदादिनवृद्धिस्तदापक्षवर्धिनीसंज्ञा पुष्यर्क्षयुताजया श्रवणयुताविजया पुनर्वसुयुताजयन्ती रोहिणीयुतापापनाशिनी एताःपापक्षयमुक्तिकाउपवसेत् श्रवणयुतातुएकादशीवन्नित्या एतास्वष्टसुएकादशीद्वादश्योरैक्यत्वेतन्त्रेणोपवासः पार्थक्येशक्तस्योपवासद्वयम् यस्त्वारब्धव्रतद्वयउपवासद्वयाशक्तश्च तस्य द्वादशीसमुपोषणाद्व्रतद्वयपुण्यलाभः तत्रश्रवणर्क्षयोगोमुहूर्तमात्रोपि ग्राह्यः पुष्यादियोगः सूर्योदयमारभ्यास्तमयपर्यन्तश्चेदुपवासः पारणंतु तिथिनक्षत्रसंयोगोपोषणेउभयान्तेन्यतरान्तेवेतिसर्वसामान्यनिर्णयः इतिद्वादशीनिर्णयोद्देशोऽष्टादशः । १८

**द्वादशीनिर्णय**—जी द्वादशी एकादशीनें विद्ध असेल ती ग्राह्य होय. महाद्वादश्या ज्या आठ आहेत, त्या येणेंप्रमाणें:—(१) जी शुद्धाधिका एकादशीनें युक्त असते ती उन्मीलनी नांवाची द्वादशी होय. (२) जी शुद्धाधिका द्वादशी वृद्धि पावणारी असते तिला अञ्जुली म्हणतात.(३) सूर्योदयीं एकादशी, नंतर क्षय पावणारी द्वादशी आणि दुसऱ्या दिवशीं सूर्योदयीं त्रयोदशी असा एका अहोरात्रमध्यें तीन तिथींचा परस्परस्पर्श होत असल्यामुळें, या द्वादशीला त्रिस्पर्शा द्वादशी असें नांव आहे. (४) दर्श अथवा पौर्णिमा यांची जेव्हां वृद्धि असते तेव्हां तिला पक्षवर्धिनी म्हणतात. (५) जी पुष्यनक्षत्रयुक्त असेल ती जया. (६) जी श्रवणनक्षत्रयुक्त असेल ती विजया. (७) जी पुनर्वसुयुक्त ती जयंती. (८) जी रोहिणीयुक्ता ती पापनाशिनी. ज्या कोणाला पापाचा नाश करून घेऊन मोक्ष पाहिजे असेल, त्यानें द्वादशीला उपास करावा. जी द्वादशी श्रवणनक्षत्रानें युक्त असते, ती एकादशीप्रमाणेंच नित्य आहे. या आठांपैकीं एकादशी व द्वादशी ह्या जर एकाच दिवशीं येतील, तर एकतंत्रानें उपास करावा. निराळ्या आल्यास आणि अंगीं शक्ति असेल तर दोन उपास करावेत. ज्यानें दोन व्रतांचा आरंभ केला आहे, पण ज्याला उपास करण्याची शक्ति नाहीं अशानें जरी द्वादशीचा एकच उपास केला, तरी त्याला उपासाचें पुण्य मिळतें. द्वादशीला जरी श्रवणनक्षत्राचा योग एखादा मुहूर्तभर असला तरी ती घ्यावी. पुष्यादि नक्षत्रांचा योग जर सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत असेल, तर उपास करावा. तिथि व नक्षत्र यांचा संयोग असतांना उपास असल्यास, दोहोंच्या अथवा एकाच्या शेवटीं पारणें करावें असा निर्णय आहे. येथें अठरावा उद्देश संपला.

२९ अथत्रयोदशीनिर्णयः त्रयोदशीशुक्लापूर्वाकृष्णोत्तरा शनिवारादियुक्तांकांचिच्छुक्लत्रयोदशीमारभ्यसंवत्सरपर्यन्तप्रतिपक्षंत्रयोदशीषुशनिवारयुक्तास्वेवचतुर्विंशतिशुक्लत्रयोदशीषुवाकर्तव्यंयत्प्रदोषसमयेशिवपूजानक्तभोजनात्मकंप्रदोषव्रतंतत्र सूर्यास्तमयोत्तरत्रिमुहूर्तात्मकप्रदोषव्यापिनीत्रयोदशी

ग्राह्या दिनद्वयेप्रदोषव्याप्तौसाम्येनतदेकदेशस्पर्शेवाउत्तरा वैषम्येणैकदेशस्प-र्शेतदाधिक्यवतीपूर्वापिग्राह्या यदिदेवपूजाभोजनपर्याप्तंतदाधिक्यंलभ्येतनोचे-त्साम्यपक्षवदुत्तरैव । उभयत्रसर्वथाव्याप्त्यभावेपिपरैव इतित्रयोदशीनिर्ण-योद्देशः । १९

**त्रयोदशीनिर्णय**—शुक्लपक्षांत त्रयोदशी पहिल्या दिवसाची घ्यावी. ज्या त्रयो-दशीला शनिवार असेल, अशा कोणच्या तरी त्रयोदशीला आरंभ करून, प्रत्येक त्रयोदशीला एक वर्षभर, किंवा ज्या शनिवारीं असतील, अशा चोवीस शुक्ल त्रयोदशींपर्यंत, प्रदोषकालीं शिवपूजा, नक्तभोजन वगैरे करण्याचें जें व्रत, त्याला सूर्यास्तानंतर तीन मुहूर्तपर्यंत म्हणजे प्रदोषकालापर्यंत असणारी जी त्रयोदशी ती घ्यावी. त्रयोदशीची व्याप्ति जर दोन दिवस प्रदोषकालीं सारखीच असेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी, कमी अधिक असल्यास अधिक व्याप्तीची घ्यावी; आणि पूर्वदिवसाची देवपूजा जर भोजन संपेपर्यंत असेल, तर पूर्वदिवसाची घ्यावी. तसें नसल्यास समानकालव्याप्तीप्रमाणें दुसरी घ्यावी. दोन्ही दिवशीं जर व्याप्तीचा अभाव असेल, तर दुसरीच घ्यावी. येथें त्रयोदशीच्या निर्णयाचा एकोणविसावा उद्देश संपला.

२० अथचतुर्दशीनिर्णयः चतुर्दशीतुशुक्लापराकृष्णापूर्वा यत्तुप्रतिमासं कृष्णचतुर्दश्यांशिवरात्रिव्रतंकाम्यमनुष्ठीयतेतत्रमहाशिवरात्रिवन्निशीथव्यापि-न्येवग्राह्या उभयत्रनिशीथव्याप्तौपरा प्रदोषव्याप्तेराधिक्यात् कैश्चित्प्रदोषमात्र-व्यापिनीगृह्यते तत्रमूलंचिन्त्यम् यत्तुचतुर्दश्यांदिवाभोजननिषेधएवनित्यत्वा-त्पाल्यतेतत्रभोजनकालव्यापिनींचतुर्दशींत्यक्त्वात्रयोदश्यांपञ्चदश्यां भोक्त-व्यम् शिवरात्रिव्रतिभिस्तुचतुर्दश्यामेवपारणाकर्तव्यानतत्रचतुर्दश्यष्टमीदिवे-तिभोजननिषेधप्राप्तिः विधिप्राप्तेनिषेधाप्रवेशात् इतिचतुर्दशीनिर्णयोद्देशः । २०

**चतुर्दशीनिर्णय**—शुक्लपक्षांतली चतुर्दशी दुसऱ्या दिवसाची घ्यावी आणि कृष्ण पक्षांतली पहिल्या दिवसाची घ्यावी. जे कोणी शिवरात्रीचें काम्यव्रत प्रत्येक महिन्याच्या कृष्णचतुर्दशीला करतात, त्यांनीं त्या व्रताकरितां, महाशिवरात्रीप्रमाणें, मध्यरात्रीं व्याप्ति असणारी चतुर्दशी घ्यावी. तिची व्याप्ति जर दोन्हीं दिवशीं मध्यरात्रीं असेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. कारण, प्रदोष-कालालाच फक्त व्यापणारी जी असेल ती घ्यावी असें कांहींचें मत आहे; परंतु अशा वेळीं मूळाचा विचार केला पाहिजे. चतुर्दशीला दिवसास कधींही जेवण करूं नये असा जो निर्णय, आणि त्याला अनुसरून जे वागतात, त्यांनीं भोजनकालव्यापिनी चतुर्दशी सोडून, त्रयोदशीला आणि पौर्णिमेला जेवावें. ज्यांना शिवरात्रीव्रत असेल त्यांनीं मात्र चतुर्दशीला पारणा करावी. अशांच्या बाबतींत, चतुर्दशी, अष्टमी वगैरे तिथींना दिवसां जेवणाचा जो निषेध सांगितला आहे, तो लागू नाहीं. याचें कारण असें कीं, विधीनें प्राप्त झालेल्या गोष्टींत निषेध हा बाध करूं शकत नाहीं. येथें चतुर्दशीच्या निर्णयाचा विसावा उद्देश संपला.

२१ अथपौर्णिमामावास्ययोर्निर्णयः पौर्णिमामावास्येतुसावित्रीव्रतंविनापरे-ग्राह्ये यत्तुकैश्चिच्छ्रावणीहुताशनीपौर्णिमयोःकुलधर्मादौपूर्वविद्धयोर्ग्राह्यत्वोक्तेः सर्वापौर्णमासीकुलधर्मादौपूर्वागृह्यतेतत्रमूलंमृग्यम् अष्टादशनाडिकातोन्यून-चतुर्दशीसत्त्वेतादृशाचतुर्दशीवेधस्य भूतोष्टादशनाडीभिरितिवचनाददूषकत्व-प्रतीतेरस्तुवातादृशस्थलेकुलधर्मेपूर्वत्रग्राह्यत्वं अष्टादशनाडिकाधिकचतुर्द-शीवेधेतुपूर्वविद्धापौर्णमासीनग्राह्येतिमेप्रतिभाति अमावास्याभौमसोमवारयुता स्नानदानादौमहापुण्या एवंभानुयुतासप्तमी भौमयुताचतुर्थीयत्तुसोमयुतामा-वास्यायामश्वत्थपूजाद्यात्मकंसामवतीव्रतमनुष्ठीयते तत्रअपराह्णपर्यन्तंमुहूर्त-मात्रयोगेपिव्रतंकार्यम् दिनान्त्यषड्घटिकात्मकसायाह्नयोगे रात्रियोगेचनका-र्यमितिशिष्टाचारः यतीनांक्षौरादौउदयेत्रिमुहूर्तव्यापिनीपौर्णमासीग्राह्या तृतीयमुहूर्तस्पर्शाभावेचतुर्दशीयुता इतिपञ्चदशीनिर्णयोद्देशः। २१

**पौर्णिमा व अमावास्या यांचा निर्णय**—पौर्णिमा आणि अमावास्या या तिथि सावित्रीव्रताखेरीज इतर व्रतांना दुसऱ्या दिवसाच्या घ्याव्या. कुलधर्माकरितां जी पौर्णिमा लागते ती श्रावण आणि फाल्गुन या महिन्यांतली पूर्वविद्धा घ्यावी असें सांगितलें असल्यामुळें, कांहींचें असें म्हणणें आहे कीं, कुलधर्मादिकांकरितां पौर्णिमा पूर्व दिवसाचीच केव्हांही घ्यावी; पण त्या बाबतींत मूळ शोधून पाहिलें पाहिजे. चतुर्दशी जर अठरा घटकांहून कमी असेल तर 'चतुर्दशी अठरा घटकांनीं दूषित करते' असें वचन असल्यामुळें, चतुर्दशीच्या वेधाचा दोष येत नाहीं. म्हणून, अशा वेळीं कुलधर्मादिकांकरतां पूर्वदिवसाचीच घ्यावी. चतुर्दशीचा वेध जर अठरा घटकांहून अधिक असेल, तर पूर्वविद्धा पौर्णिमा घेऊं नये असें मला वाटतें. मंगळवार अथवा सोमवार या दिवशीं जर अमावास्या आली, तर स्नानदानादिक केलें असतां मोठें पुण्य घडतें. याप्रमाणेंच आदित्यवारीं येणाऱ्या सप्तमीची आणि मंगळवारीं येणाऱ्या चतुर्थीची गोष्ट आहे. सोमवारीं येणाऱ्या अमावास्येला पिंपळाची (अश्वत्थ) पूजा वगैरे करण्याचें जें व्रत करण्यांत येतें, तें अपराह्णा-पर्यंत, एक मुहूर्तभर जरी योग असला, तरी करावें. हीच सोमवती होय. दिवसाच्या अखेरीस सहा घटकांपर्यंत सायाह्नयोग असतांना आणि रात्रियोग असतांना हें व्रत करूं नये असा शिष्टाचार आहे. संन्याशांच्या क्षौरादिक कर्मांना उदयकाळीं तीन मुहूर्त-पर्यंत असणारी घ्यावी. तिसऱ्या मुहूर्ताला जर स्पर्श होणारी नसेल, तर चतुर्दशीनें युक्त असेल ती घ्यावी. याप्रमाणें येथें पञ्चदशीच्या निर्णयाचा एकविसावा उद्देश संपला.

२२ अथेष्टिकालः पक्षान्ताउपवस्तव्याः पक्षाद्यायष्टव्याः उपवासोन्वाधा-नाख्यंकर्म पर्वणोयश्चतुर्थांशआद्याः प्रतिपदस्त्रयः। यागकालःसविज्ञेयः प्रात-रुक्तोमनीषिभिः १ प्रतिपत्तुर्यचरणेनयष्टव्यमितिस्थितिः। तत्रपर्वप्रतिपदोःपूर्ण-त्वेसंदेहाभावः पर्वण्यन्वाधानस्योत्तरदिनेयागस्ययथोक्तकाललाभात् पर्वणः-खण्डत्वेतुपर्वापेक्षयाप्रतिपदोह्रासवृद्धिघटिकागणयित्वातदर्धंह्रासेपर्वणिवियो-ज्यवृद्धौसंयोज्यसंधिकालंज्ञात्वान्वाधानादिकालोनिर्णेतव्यः यत्रह्रासवृद्धीन-

स्तत्रयथास्थितःस्पष्टएवसंधिः तत्रसंधिश्चतुर्विधःपूर्वाह्णसंधिर्मध्याह्नसंधिरपराह्ण-संधिरात्रिसंधिश्चेति द्वेधाविभक्तदिनस्यपूर्वार्धपूर्वाह्णः अपरार्धअपराह्णः पूर्वाह्णापराह्णसंधिभूतोघटिकाद्वयात्मकोमुहूर्तोमध्याह्नआवर्तनापरपर्यायइतिकौस्तुभे उभयसंधिरेकपलात्मकएवमध्याह्नोनतुघटिकाद्वयात्मकइति प्रायेणेदानींशिष्टाचारः तत्रोक्तरीत्याऱ्हासवृद्ध्यर्धवियोजनसंयोजनेनानिर्णीतःपर्वप्रतिपदोःसंधिर्यदिपूर्वाह्णेमध्याह्नेवाभवति तदासंधिदिनात्पूर्वदिनेन्वाधानंसंधिदिनेयागः यद्यपराह्णेरात्रौवासंधिस्तदासंधिदिनेन्वाधानंतत्परदिनेयागः अथोदाहरणम् पर्वसप्तदशघटीमितंप्रतिपदेकादशघटीमितातत्रषड्घटीमितः प्रतिपत्क्षयस्तदर्धघटीत्रयंपर्वणिवियोजितंजातःसंधिश्चतुर्दशघटीमितः अयंत्रिंशद्घटीमितेदिनमानेपूर्वाह्णसंधिः अष्टाविंशतिघटीमितेतुदिनमानेऽयमेवमध्याह्नसंधिः अत्रसन्धिदिनेयागः पूर्वदिनेन्वाधानम् पर्व १४ प्रतिपत् १९ अत्रपञ्चघटिका वृद्धिः तदर्धसार्धघटीद्वयंपर्वणिसंयोजितं जातःसंधिःसार्धषोडशघटीमितः अयंअपराह्णसंधिः अत्रसंधिदिनेन्वाधानंपरेद्युर्यागः।

**इष्टिकालनिर्णय**—पक्षाचे शेवटचे दिवस उपासाचे आणि पहिले दिवस यागाचे होत. उपास म्हणजे अन्वाधानाचें कर्म होय. पर्वाचा चौथा अंश व प्रतिपदेचे पहिले तीन अंश यांना यागकाल म्हणावें. हा जो प्रातःकाळ तो विद्वानांनीं सांगितला आहे. प्रतिपदेच्या चौथ्या चरणांत याग करूं नये अशी स्थिति ( म्हणजे वहिवाट ) आहे. प्रतिपदा आणि पर्व हीं दोन्ही जर पूर्ण असतील, तर तेथें शंकाच राहात नाहीं; कारण, पर्वाच्या दिवशीं अन्वाधान करावें आणि पुढच्या दिवशीं याग करावा असें जें सांगितलें आहे, त्याला योग्य काळ मिळतो; पण पर्वाचा जर खंड असेल, तर पर्वापेक्षां प्रतिपदेचा ऱ्हास व वृद्धि यांच्या घटका मोजून, त्यांच्या निम्या घटका जर क्षय असेल, तर त्या पर्वांत कमी कराव्या आणि जर वृद्धि असेल, तर त्या पर्वांत मिळवाव्या. त्यावरून संधिकाल जाणून, अन्वाधानादिकांचा निर्णय करावा. जेव्हां क्षय अथवा वृद्धि हीं नसतील तेव्हां जो असेल तो संधि स्पष्टच समजतो. संधीचे जे चार भाग आहेत ते असेः—( १ ) पूर्वाह्णसंधि, ( २ ) मध्याह्नसंधि, ( ३ ) अपराह्णसंधि, आणि ( ४ ) रात्रिसंधि. दिवसाचे बरोबर दोन भाग केले असतां जो पहिला होतो, तो पूर्वाह्ण व दुसरा अपराह्ण. पूर्वाह्णाची शेवटची एक घटका आणि अपराह्णाची पहिली एक घटका मिळून दोन घटकांचा म्हणजे जो एका मुहूर्ताचा वेळ तोच मध्याह्न. यालाच आवर्तन असें कौस्तुभांत दुसरें नांव आहे. जो संधि फक्त एक पळभर असतो तोच मध्याह्नसंधि. दोन घटकांपर्यंत असणारा तो मध्याह्नसंधि नव्हे, असा सध्यां तरी निदान शिष्टलोक याचा अर्थ समजतात. वर लिहिलेल्या रीतीनें क्षय अथवा वृद्धि असतील त्याप्रमाणें ( घटका ) मिळवाव्या अथवा कमी कराव्या, आणि त्यावरून पर्व किंवा प्रतिपदा यांच्या संधीचा निर्णय करावा. हा संधि जर पूर्वाह्णीं अथवा मध्याह्नीं होईल, तर त्या संधिदिवसाच्या आदल्या दिवशीं अन्वाधान करावें, आणि संधि होणाऱ्या दिवशीं

याग करावा. अपराह्णीं अथवा रात्रीं जर संधि होत असेल, तर संधिदिवशीं अन्वाधान करून, त्याच्या पुढच्या दिवशीं याग करावा. याचें उदाहरण असें:—पर्व १७ घ. प्रतिपदा ११ घ. प्रतिपदेचा क्षय ६ घ. यांतला अर्धा भाग म्हणजे ३ घ. पर्वांत कमी केल्या म्हणजे १४ घटकांचा संधि होतो. दिनमान ३० घटकांचें असतांना हा पूर्वाह्णसंधि होईल आणि हाच संधि दिनमान २८ घटकांचें असतांना मध्याह्णींचा होईल. अशा प्रसंगीं संधीच्या दिवशीं याग करून, त्याच्या आदल्या दिवशीं अन्वाधान करावें. पर्व १४ घ. प्रतिपदा १९ घ., वृद्धि ५ घ., २॥ घटका पर्वामध्यें मिळविल्या म्हणजे जो संधि होतो, तो १६॥ घटकांचा अपराह्णसंधि होय. अशा प्रसंगीं संधीच्या दिवशीं अन्वाधान करून, दुसऱ्या दिवशीं याग करावा.

**अथात्रबालबोधनार्थप्रकारान्तरम् सूर्योदयोत्तरंविद्यमानाःपर्वनाडिकाः प्रतिपन्नाडिकाश्चैकीकृताः सत्योर्यदिदिनमानतोन्यूनास्तदापूर्वाह्णसंधिःयदिदिनमानसमास्तदामध्याह्णसंधिःयदिदिनमानादधिकास्तदापराह्णसंधिरिति इत्थं सूर्योदयोत्तरमनुवर्तमानपर्वप्रतिपदोः क्षयवृद्धिभ्यामेवसंध्यवलोकनमिदानीं सर्वत्रशिष्टाचारेषुप्रसिद्धम् कौस्तुभादौचतुर्दशीदिनस्थाउदयात्पूर्वं पर्वणोगतघटिकाउदयादेष्यघटिकाश्चैकीकृत्यैवंप्रतिपदःपूर्वदिनस्थाउत्तरदिनस्थाश्चघटिका एकीकृत्यपर्वापेक्षयाप्रतिपदोवृद्धिक्षयौज्ञेयौ तद्यथा चतुर्दशी २२ पर्व १७ चतुर्दशीदिनस्थाःपर्वनाडिकाः ३८ उत्तरदिनस्थाः १७ एकीकृत्यजाताः ५५ पर्वदिनस्थाःप्रतिपन्नाड्यः ४३ उत्तरादिनस्थाः ११ एकीकृत्यजाताः ५४ अत्रैकाघटीप्रतिपत्क्षयस्तदर्धमर्धघटीपर्वणिवियोजिताजातः संधिः सार्धषोडशनाड्यः अयमपराह्णसंधिः प्रथममतेत्वत्रपूर्वाह्णसंधिःस्थितः तथा चतुर्दशी २४ पर्व १७ पूर्वं गतनाड्य. ३६एष्ययोगेजातः ५३ प्रतिपत् ११ गतैष्ययोगेजाताः ५४ अत्रपूर्वोक्तरीत्याक्षयोदाहरणेएवैकाघटीवृद्धिस्तदर्धसंयोजनेसार्धसप्तदशनाडीमितोपराह्णसंधिः एवंचपूर्वमतैतन्मतयोरत्यन्तविरोधः वृद्धिक्षयादिसर्ववैपरीत्यात् अत्रमतेघटीद्वयाधिकावृद्धिःक्षयोवानसंभवतीति परेऽह्णिघटिकान्यूनास्तथैवाभ्यधिकाश्चयाइतिबहुवचनसंगतमिति दूषणंपुरुषार्थचिंतामणौद्रष्टव्यम् ।**

**इष्टिकालनिर्णयाचा दुसरा साधा प्रकार**—ज्यांना विशेष कळत नाहीं अशा अज्ञानी लोकांसाठीं, आतां दुसरा प्रकार सांगतों. सूर्योदयानंतर पर्वाच्या जेवढ्या घटका असतील आणि प्रतिपदेच्या जेवढ्या असतील त्यांची एकत्र बेरीज करून, त्या जर दिनमानाहून कमी आल्या तर तो पूर्वाह्णसंधि, दिनमानाइतक्याच आल्या, तर तो मध्याह्णसंधि, आणि दिनमानापेक्षां जर जास्त आल्या, तर तो अपराह्णसंधि समजावा. याप्रमाणें, सूर्योदयानंतर असणाऱ्या या पर्व आणि प्रतिपदा यांच्या क्षयवृद्धींनीं संधिकाल ठरविण्याचा सध्यां सर्वत्र प्रघात पडला आहे. चतुर्दशीच्या दिवशीं सूर्योदयापूर्वी गेलेल्या पर्वाच्या घटका आणि सूर्योदयानंतरच्या घटका यांची बेरीज करावी; त्याचप्रमाणें प्रतिपदेच्या आदल्या दिवसाच्या व पुढच्या दिवसाच्या घटका यांची

बेरीज करावी, आणि त्यावरून पर्वापेक्षां प्रतिपदेची वृद्धि किंवा क्षय हीं समजावींत. याचें उदाहरण असें:—चतुर्दशी २२ घ., पर्व १७ घ., चतुर्दशीच्या दिवशीं पर्व ३८ घ., पुढच्या दिवशीं १७ घ., या दोन्ही मिळविल्या असतां, ५५ घ. होतात. त्याचप्रमाणें पर्वाच्या दिवशीं प्रतिपदेच्या घ. ४३ व दुसऱ्या दिवशीं ११ घ. मिळून ५४ घ. होतात. येथें १ घ. प्रतिपदेचा क्षय आहे. त्याचा अर्धा म्हणजे अर्धी घटका पर्वांतून कमी केली असतां जो संधि होतो, तो १६॥ घटकांचा अपराह्णसंधि होय. पहिल्या मताप्रमाणें हा पूर्वाह्णसंधि होतो. उदाहरण दुसरें:—चतुर्दशी २४ घ., पर्व १७ घ. आणि गत घटि ३६; पुढें येणाऱ्या घटिका मिळवून ५३ झाल्या. प्रतिपदा ११ घटि गेलेल्या आणि येणाऱ्या घटकांची जी बेरीज झाली ती ५४ घ. झाली. पूर्वीं सांगितलेल्या रीतीनें क्षयाच्या उदाहरणांत १ घ. जी वृद्धि, तिचा अर्ध मिळविला म्हणजे १७॥ घटकांचा अपराह्णसंधि होतो. याप्रमाणें पहिलें मत व हें मत यांत फार मोठा विरोध आहे, आणि वृद्धि, क्षय वगैरे सर्व कांहीं विपरीत आहे. या मताप्रमाणें वृद्धि किंवा क्षय हीं दोन घटकांहून अधिक होत नाहींत. 'दुसऱ्या दिवशीं जितक्या घटका कमी अथवा अधिक' असें जें घटकांचें बहुवचन केलें आहे, तें सुसंगत नाहीं. या प्रकारासंबंधानें हें जें दूषण पुरुषार्थचिंतामणींत सांगितलें आहे, तें पाहावें.

अथपौर्णमास्यांविशेषः सङ्गवकालादूर्ध्वंत्रयोदशादिघटीमारभ्यार्धाह्णात्पूर्वं-संधौसद्यःकालापौर्णमासीतस्यांसंधिदिनेएवान्वाधानंयागश्चसद्योनुष्ठेयः इदंपौ-र्णमास्यांसद्यःकालत्ववैकल्पिकमितिकेचित् अमावास्यायांसर्वत्रद्व्यहकालतैवन-कदाचिदपिसद्यःकालता पौर्णमास्याममायांचापराह्णसंधौप्रतिपच्चतुर्थपादे यागोनदोषाय अमावास्यायामपराह्णसंधावपिप्रतिपदित्रिमुहूर्ताधिकाद्वितीया-प्रवेशेचन्द्रदर्शनसम्भवेनचन्द्रदर्शनेयागनिषेधादमावास्यायामेवेष्टिश्चतुर्दश्या-मन्वाधानंबौधायनादीनाम् अमावास्यायांसप्तघटीमितप्रतिपदभावे चन्द्र-दर्शनेपिप्रतिपद्येवबौधायनैरिष्टिःकार्या आश्वलायनापस्तम्बादीनांतुचन्द्रदर्शन-निषेधोनास्तीतिप्रातिपद्येवेष्टिः यत्रसंधिदिनेइष्टिस्तत्रसाप्रतिपद्येवसमापनी-यानतुपर्वणि पर्वणियागसमाप्तौपुनर्यागः कर्तव्यः एवमेवस्मार्तेपार्वणस्थाली-पाकनिर्णयः केचित्तुस्मार्तेस्थालीपाकःप्रतिपद्येवसमापनीयइतिनियमोनास्ति पूर्वाह्णेएवस्थालीपाकंसमाप्यसंधेरूर्ध्वंप्रतिपदिब्राह्मणभोजनमात्रंकार्यम् जय-न्तोपिसंधिसान्निकृष्टेप्रातःकाले एवस्थालीपाकमाहेतिविशेषमाहुः श्रौतेपि-ब्राह्मणभोजनमात्रंप्रतिपदिकार्यमन्यत्तत्रपूर्वाह्णएवसमापनीयं नप्रतिपदपेक्षेति-पुरुषार्थचिन्तामणावुक्तम् कात्यायनानांपौर्णमासेष्टिनिर्णयः पूर्वोक्तःसर्वसा-धारणएवनतत्रकश्चिद्विशेषः इतिसिन्ध्वादिबहुग्रन्थसंमतं अन्येतुपूर्वाह्णसं-धौसंधिदिनेन्वाधानंपरेह्नियागइति पौर्णमासीविषयेकातीयानां विशेषमाहुः।

**पौर्णिमेचा विशेष निर्णय**—संगवकालानंतर तेराव्या घटकेपासून आरंभ करून अर्ध्या दिवसाच्या पूर्वी जर संधि असेल, तर सद्य:काला पौर्णिमा होते. त्या पौर्णिमेंत संधिदिवशींच अन्वाधान करावें, व लगेच याग करावा. कांहींचें असें म्हणणें आहे कीं, पौर्णिमेचें हें सद्यत्कालत्व वैकल्पिक आहे. अमावास्येंत नेहमीं दोन काल असतात. सद्य:कालत्व कधींच नसतें. पौर्णिमेंत आणि अमावास्येंत अपराह्णसंधि असतांना प्रतिपदेच्या चौथ्या पादांत जर याग केला, तर दोष नाहीं. अमावास्येंत अपराह्णसंधि असतांही प्रतिपदेला जर तीन मुहूर्तांपेक्षां अधिक द्वितीयाप्रवेश असला, तर चंद्रदर्शनाचा संभव असल्यानें आणि चंद्रदर्शनांत याग करूं नये असें सांगितलें असल्यानें, अमावास्येलाच इष्टि आणि चतुर्दशीला अन्वाधान, हीं कृत्यें बौधायनादिकांनीं करावींत. अमावास्येंत जर सात घटका प्रतिपदा नसेल, तर चंद्रदर्शन असतांही प्रतिपदेला बौधायनादिकांनीं इष्टि करावी. संधिदिवशीं जेव्हां इष्टि असेल, तेव्हां ती प्रतिपदेलाच करावी, पर्वाच्या दिवशीं करूं नये. यागसमाप्ति जर पर्वाच्या दिवशीं झाली, तर याग पुन्हां केला पाहिजे. स्मार्तांच्या स्थालीपाकासंबंधानें याप्रमाणेंच निर्णय जाणावा. 'स्मार्तांनीं स्थालीपाक प्रतिपदेला संपवावा असा नियम नाहीं. स्थालीपाकाची समाप्ति पूर्वाह्णीं करून, संधीनंतर प्रतिपदेला ब्राह्मणभोजन मात्र करावें. संधीच्या जवळचा जो प्रात:काळ, त्या वेळींच स्थालीपाक करावा, असा नियम जयंतानें देखील सांगितला आहे' असें कित्येक ग्रंथकार सांगतात. या बाबतींत पुरुषार्थचिंतामणीचें असें मत आहे कीं, श्रौतकर्मांतसुद्धां ब्राह्मणभोजन तेवढें प्रतिपदेला करून, बाकीचें सारें तंत्र पूर्वाह्णींच पुरें करावें, त्याला प्रतिपदेची आवश्यकता नाहीं. पौर्णिमेच्या इष्टीचा जो निर्णय पूर्वीं साधारणपणें सांगितला, तोच कात्यायनांचा समजावा. त्याबद्दल विशेष असें कांहीं नसल्याबद्दल निर्णयसिंधु वगैरे ग्रंथांची संमति आहे. या पौर्णिमेच्या बाबतींत कांहीं जण कात्यायनांचा असा निर्णय सांगतात कीं, संधीच्या दिवशीं पूर्वाह्णसंधि असतांना अन्वाधान करावें आणि दुसऱ्या दिवशीं याग करावा.

**३३ अथामावास्यायांकातीयानांविशेषःअमाविषयेत्रेधाविभक्तादिनस्यप्रथमोभोगः पूर्वाह्णः द्वितीयोभागोमध्याह्नः तृतीयोभागोऽपराह्णः तत्ररात्रिसंधौ प्रतिपद्दिनेचन्द्रदर्शनेसत्यपिपरेषामिवकातीयानामपिसंधिदिनेपिण्डापितृयज्ञोन्वाधानंचपरदिनेचेष्टिरितिनिर्विवादम् पूर्वाह्णेदिनद्वितीयभागाख्यमध्याह्नेच संधौसंधिपूर्वदिनेन्वाधानपिण्डपितृयज्ञौसंधिदिनेचेष्टिः तदाचतुर्दशीदिनेऽमावास्यादिनतृतीयभागाख्यापराह्णेयदिपूर्णव्याप्तिस्तर्हि अमायुक्तेऽपराह्णे पिण्डपितृयज्ञइतिनसंदेहः यदितृतीयभागाख्यापराह्णान्त्यभागेपराह्णैकदेशेमावास्याव्याप्तिस्तर्ह्यमावास्यायांप्राप्तायांपिण्डपितृयज्ञोनचतुर्दश्यामित्येकः पक्षः चतुर्दश्यन्त्यभागेपिण्डपितृयज्ञश्चन्द्रस्यपरमक्षीणत्वादित्यपरः पक्षः अथापराह्णसंधौचत्वारः पक्षाः संधिदिनेपूर्वदिनतृतीयभागाख्यापराह्णेऽमायाः पूर्णव्याप्तिरितिप्रथमःपक्षः यथाचतुर्दशी २९ अमा ३० प्रतिपत् २९ दिनमानं-**

चात्रिंशत् ३० अत्रसंधिदिनेन्वाधानपितृयज्ञौपरदिनेयागः संधिपूर्वदिनेएवो-क्तापराह्णेऽमायाःपूर्णव्याप्तिरितिद्वितीयःपक्षः यथाचतुर्दशी २० अमा २२ प्रतिपत् २४ दिनं ३० अत्रसंधिदिनात्परदिनेमुहूर्तत्रयात्मकप्रातःकालेप्रति-पत्पादत्रयावच्छिन्नयागकाललाभात्संधिदिनेन्वाधानपितृयागौप्रतिपदिचेष्टिरि-तिकौस्तुभमतम् । त्रिमुहूर्ताद्वितीयाचेत्प्रतिपच्चापराह्णिकी । अन्वाधानं चतुर्द-श्यांपरतःसोमदर्शनात् १ इति वचनाच्चतुर्दश्यांपिण्डपितृयज्ञोपवासौ संधिदि-नेचेष्टिरितिपरमतम् अथापरंद्वितीयपक्षोदाहरणम् चतुर्दशी १८ अमा १८ प्रतिपत् १९ दिनम् २७ अत्रप्रतिपद्दिनेप्रातः पादत्रयावच्छिन्नयागकालाभा-वात्संधिदिनेएवसर्वमतेकात्यायनानामिष्टिःपूर्वदिनेपिण्डपितृयज्ञोपवासौ अथ दिनद्वयेसाम्येनवैषम्येनवैकदेशव्याप्तिरिति तृतीयः पक्षः यथा चतुर्दशी २५ अमा २५ प्रतिपत् २४ दिनमानं ३० इयंसाम्येनापराह्णव्याप्तिः अत्रकौस्तुभ-मतपरमतोक्तरीत्याद्वैधानिर्णयः यथावा चतुर्दशी २५ अमा २० प्रतिपत् १७ दिनं २७ इयमपिसाम्येनैकदेशव्याप्तिः अत्रसर्वमतेसंधिदिनेएवकार्तीयेष्टिः पूर्वदिनेचपिण्डपितृयज्ञोपवासौ अथ वैषम्येणैकदेशव्याप्तिः चतुर्दशी २५ अमा २३ प्रतिपत् २३ दिनं ३० अत्रापिपूर्वोक्तमतद्वयेनद्वैधानिर्णयोज्ञेयः यथा वा चतुर्दशी २५ अमा २२ प्रतिपत् १८ दिनं ३० इयमपि वैषम्येणैक-देशव्याप्तिः अत्रापिसर्वमतेसंधिदिनेकार्तीयेष्टिश्चतुर्दश्यामुपवासपिण्डपितृयज्ञौ यथावा चतुर्दशी २५ अमा २७ प्रतिपत् २९ दिनं ३० अत्रसंधिदिनेन्वाधान-यागौप्रतिपदीष्टिः संधिदिनेएवैकदेशव्याप्तिरितिचतुर्थः पक्षः यथा चतुर्दशी ३१ अमा २६ प्रतिपत् २३ दिनं ३० यथावा चतुर्दशी २८ अमा २२ प्रतिपत् १७ दिनं २७ अत्रोभयत्रापि संधिदिनेएवपिण्डपितृयज्ञान्वाधानेयागस्तुपरे-ह्निप्रतिपदि एवंचकात्यायनमतेपिसर्वत्रोदाहरणेचन्द्रदर्शननिषेधप्रतिपालनंन संभवति किंतुकुत्रचिन्निषेधादरात्पूर्वत्रयागादिकंक्वचित्तुचन्द्रदर्शनवत्येवदिने एवंपिण्डपितृयज्ञोपीतिध्येयम् दर्शश्राद्धार्थममावास्यानिर्णयः सर्वसाधारणोऽ-ग्रेपृथगेववक्ष्यते ॥

**अमावास्येबद्दल कात्यायनांचा विशेष निर्णय**—अमावास्येच्या दिवसाचे सारखे तीन भाग करा-वेत. पहिला भाग पूर्वाह्ण, दुसरा मध्याह्न आणि तिसरा अपराह्ण. यांत रात्रिसंधि असतांना प्रतिपदेला चंद्रदर्शनीं इतरांप्रमाणें कात्यायनांनींसुद्धां संधिदिवशीं—पिंड, पितृयज्ञ व अन्वाधान—हीं करावींत आणि दुसऱ्या दिवशीं इष्टि करावी हें निर्विवाद आहे. पूर्वाह्णीं आणि दिवसाचा दुसरा भाग जो मध्याह्न त्या काळीं जर संधि असेल, तर संधीच्या आदल्या दिवशीं—अन्वाधान, पिंड व पितृयज्ञ हीं करावींत व संधिदिनीं इष्टि करावी. चतुर्दशीच्या दिवशीं अमावास्येच्या दिवसाचा अपराह्ण नांवाचा जो तिसरा काळ, त्याची जर पूर्ण व्याप्ति असेल, तर अमावास्यायुक्त अशा अपराह्णकाळीं पितृयज्ञ करावा यांत संशय नाहीं. अपराह्ण नांवाच्या तिसऱ्या भागाच्या शेवटच्या अपराह्णकाळाच्या एका भागांत जर अमावास्येची व्याप्ति असली

तर अमावास्येंत पिंडपितृयज्ञ करावा; कारण, त्यावेळीं चंद्र अत्यंत क्षीण असतो, असें दुसऱ्या पक्षाचें मत आहे. अपराह्णसंबंधानें जे चार पक्ष आहेत, ते येणेंप्रमाणेः— ( १ ) संधीच्या दिवशींच अपराह्ण नांवाच्या तिसऱ्या भागांत अमावास्येची पूर्ण व्याप्ति. उदाः—चतुर्दशी २९ घ. अमावास्या ३० घ., प्रतिपदा २९ घ., आणि दिनमान ३० घ. अशी संधिस्थिति असेल तेव्हां—अन्वाधान व पितृयज्ञ हीं कर्मे करावींत आणि दुसऱ्या दिवशीं याग करावा. ( २ ) संधीच्या आदल्या दिवशींच अपराह्णकाळीं अमावास्येची पूर्ण व्याप्ति हा दुसरा पक्ष. उदाः—चतुर्दशी २० घ., अमावास्या २२ घ., प्रतिपदा २४ घ., आणि दिनमान ३० घ., अशा वेळीं संधि-दिवसाच्या दुसऱ्या दिवशीं तीन मुहूर्तांचा जो प्रातःकाळ, त्या काळीं, प्रतिपदेच्या तीन चरणांपर्यंतच्या यागकालाचा लाभ होतो; यास्तव, संधीच्या दिवशीं अन्वाधान, पितृयाग आणि प्रतिपदेला इष्टि—हीं कर्मे करावींत असें कौस्तुभाचें मत आहे. प्रति-पदेला अपराह्णकाळीं तीन मुहूर्त द्वितीया असल्यास, दुसऱ्या दिवशीं पिंडपितृयज्ञ व उपास हीं करावींत. संधिदिवशीं इष्टि करावी असें इतर ग्रंथकारांचें मत आहे. दुसऱ्या पक्षाचें आणखी एक उदा०:—चतुर्दशी १८ घ., अमावास्या १८ घ., प्रतिपदा १९ घ., आणि दिनमान २७ घ.—अशा स्थितींत प्रतिपदेच्या दिवशीं पहिले तीन चरण असा जो यागकाल, त्याचा अभाव असल्यामुळें, संधीच्या दिवशींच कात्यायनांनीं इष्टि करावी, आणि आदल्या दिवशीं पिंडपितृयज्ञ व उपास—हीं कर्मे करावींत, असें सर्वांचें मत आहे. ( ३ ) सम किंवा विषम अशी एकव्याप्ति दोन दिवशीं असणें हा तिसरा पक्ष. उदाहरणः—चतुर्दशी २५ घ., अमावास्या २५ घ., प्रतिपदा २४ घ. आणि दिनमान ३० घ. ही स्थिति समान अशा अपराह्णव्यापिनीची झाली. या बाबतींत कौस्तुभ आणि इतर ग्रंथकार यांचे स्वतंत्र जे दोन निर्णय आहेत, ते वर सांगितले. दुसरें उदाहरणः—चतुर्दशी २५ घ., अमावास्या २० घ., प्रतिपदा १७ घ. आणि दिनमान २७ घ., ही सुद्धां सारखीच एकदेशव्याप्ति झाली. अशा स्थितींतसुद्धां कात्यायनांनीं अशा या संधिदिवशींच इष्टि करावी, आणि आदल्या दिवशीं पिंडपितृयज्ञ व उपासही करावा असें सर्वांचें एकमत आहे. आतां विषम असें एकदेशव्याप्तीचें उदाहरण घेऊं:—चतुर्दशी २५ घ., अमावास्या २३ घ., प्रतिपदा २३ घ. आणि दिनमान ३० घ. येथें सुद्धां वर सांगितल्याप्रमाणेंच दोन मतांचा दोन प्रकाराचा निर्णय समजावा. दुसरें उदाहरणः—चतुर्दशी २५ घ., अमावास्या २२ घ., प्रतिपदा १८ घ., आणि दिनमान ३० घ., हीदेखील विषम अशी एकदेशव्याप्तीच होय. अशा स्थितींत सुद्धां कात्यायनांनीं संधिदिवशींच इष्टि करावी आणि चतुर्दशीला उपास व पिंडपितृयज्ञ हीं करावींत असें सर्वांचें मत आहे. आणखी एक उदाहरणः—चतुर्दशी २५ घ., अमावास्या २७ घ., प्रतिपदा २९ घ. आणि दिनमान ३० घ. अशावेळीं संधिदिवशीं अन्वाधान व याग करून प्रतिपदेला इष्टि करावी (४) संधीच्या दिवशींच फक्त एकदेशव्याप्ति असणें हा चौथा पक्ष होय. याचें उदाहरणः—चतुर्दशी ३१ घ., अमावास्या २६ घ., प्रतिपदा २३ घ. आणि दिनमान ३० घ., अथवा—चतुर्दशी

२८ घ., अमावास्या २२ घ. प्रतिपदा १७ घ. आणि दिनमान २७ घ. या दोन्ही उदाहरणांत संधीच्याच दिवशीं पिंडपितृयज्ञ व अन्वाधान हीं कर्में करून, याग मात्र दुसऱ्या दिवशीं प्रतिपदेला करावा. याप्रमाणें कात्यायनमताप्रमाणेंही वरील साऱ्या उदाहरणांत चंद्रनिषेधाचें प्रतिपालन संभवत नाहीं. कांहीं दिवशीं चंद्राच्या निषेधाचा नियम पाळण्यासाठीं आदल्या दिवशीं याग वगैरे करायला सांगितलें आहे व कांहीं वेळीं चंद्रदर्शनाच्याही दिवशीं करायला सांगितलें आहे. पिंडपितृयज्ञाबद्दलही याचप्रमाणें मत समजावें. दर्शश्राद्धासाठीं अमावास्येचा सर्वसाधारण नियम पुढें निराळा सांगितला आहे.

३४ अथसामगानामिष्टेर्निर्णयः तत्रपौर्णमासीसर्वसाधारणापूर्वोक्तैव अमावास्यायांतुरात्रिसंधौप्रतिपद्येवचन्द्रदर्शनेपियागः अपराह्णसंधौतुप्रातःषड्घटिकात्मकप्रतिपदाद्यपादत्रयरूपयागकाललाभेप्रतिपदिचन्द्रदर्शनेपीष्टिः संधिदिनेचोपवासपितृयज्ञौ उक्तयागकालालाभेसंधिदिनेयागः पूर्वदिनेचतुर्दश्यांपितृयज्ञोपवासौ एवंचसामगैरपि चन्द्रदर्शनानषेधः कात्यायनवदेवयथासंभवंपालनीयः इतिसामगानिर्णयः इतियागकालनिर्णयोद्देशः २२

**सामवेदीयांचा इष्टिनिर्णय**—सामवेदीयांच्या इष्टीविषयीं सर्वसाधारण अशी पौर्णिमा तिथि पूर्वीं सांगितली. अमावास्येला रात्रिसंधि असतांना, चंद्रदर्शन असतांही प्रतिपदेलाच याग करावा. अपराह्णसंधि असतांना प्रातःकालीं सहा घटकांनीं परिमित अशा प्रतिपदेच्या पहिल्या तीन चरणांत जर योग्य असा यज्ञकाल येत असेल, तर चंद्रदर्शन असतांही प्रतिपदेलाच इष्टि करावी व संधिदिवशीं उपास आणि पितृयज्ञ हीं करावीं. योग्यकालाचा जर संभव नसेल, तर संधिदिवशीं याग करून, त्याच्या आदल्या दिवशीं चतुर्दशीला पितृयज्ञ आणि उपास हीं करावीं. याप्रमाणेंच सामवेद्यांनींही कात्यायनाप्रमाणेंच चंद्रदर्शनाचा निषेध यथासंभव पाळावा. याप्रमाणें सामवेद्यांसंबंधाच्या निर्णयाचा बाविसावा उद्देश येथें संपला.

३५ अथपिण्डपितृयज्ञकालः तत्राश्वलायनानांयस्मिन्नहोरात्रेअमावास्याप्रतिपदोःसंधिस्तद्दिनापराह्णेपञ्चधाविभक्तदिनचतुर्थभागरूपेपिण्डपितृयज्ञः सचापराह्णसंधावन्वाधानदिनेभवति मध्याह्नेपूर्वाह्णेवासंधौयागदिने यागोत्तरमपराह्णेभवति । यदाहोरात्रसंधौतिथिसंधिस्तदान्वाधानदिनेएवपिण्डपितृयज्ञः एवमापस्तम्बहिरण्यकेशिमतानुसारिणामपिसंधिदिनेएवपितृयज्ञः सचापराह्णेऽधवृक्षसूर्येवाकार्यः अपराह्णश्वपञ्चधाविभक्तदिनचतुर्थभागोनवधाविभक्तदिनसप्तमभागोवा सांख्यायनकात्यायनसामगानामन्वाधानदिनेएवपिण्डपितृयज्ञः पूर्वमेवोक्तः सचत्रेधाविभक्तदिनतृतीयभागरूपेपराह्णेकार्यः गृह्याग्निमतांबह्वृचानांदर्शश्राद्धपिण्डपितृयज्ञयोरेकस्मिन्दिनेप्राप्तौ व्यतिषङ्गेणानुष्टानम् व्यतिषङ्गोनामोभयोः सहप्रयोगः खण्डपर्वणितुपूर्वेद्युः केवलदर्शश्राद्धमुत्तरेह्निकेवलः पिण्डपितृयज्ञः श्रौताग्निमतांतुकेवलः पिण्डपितृयज्ञएवदक्षिणा-

**ग्नौकार्योनव्यतिषङ्गेण श्रौताग्निमतांसंपूर्णेदर्शे इत्थंक्रमः आदावन्वाधानंततो वैश्वदेवस्ततः पिण्डपितृयज्ञस्ततोदर्शश्राद्धमिति अस्मिन्नेवकालेजीवन्पितृकेण-साग्निकेनहोमान्तेवा पितुः पित्रादित्रयोद्देशेनपिण्डसहितोवा पिण्डपितृयज्ञः कार्यःयद्वा पिण्डपितृयज्ञोनैवारब्धव्यः इष्टिलोपेपादकृच्छ्रंप्रायश्चित्तम् इष्टिद्व-यलोपेऽर्द्धकृच्छ्रम् इष्टित्रयलोपेअग्निनाशात्पुनराधानम् पिण्डपितृयज्ञलोपे-वैश्यानरेष्टिःप्रायश्चित्तम् इष्टिस्थानेसप्तहोतारंहोष्यामीतिसंकल्प्यतन्मन्त्रेणच-तुर्गृहीताज्येनपूर्णाहुतिर्वाकार्या इति पिण्डपितृयज्ञोद्देशः । २३**

**पिंडपितृयज्ञकालनिर्णय**—अमावास्या व प्रतिपदा यांचा ज्या अहोरात्रांत संधि होत असेल, त्या दिवसाचे समान पांच भाग करून, त्यांतल्या चौथ्या अपराह्णकालाच्या भागांत पिंडपितृयज्ञ करावा. जर अपराह्ण-संधि असेल, तर तो (पिंडपितृयज्ञ) अन्वाधानाच्या दिवशीं करावा. मध्याह्नीं अथवा पूर्वाह्णीं जर संधि असेल, तर यागाच्या दिवशीं यागानंतर अपराह्णकाळीं तो (पिंड-पितृयज्ञ) होतो. दिवस आणि रात्र यांच्या संधींत जेव्हां तिथींचा संधि येतो, तेव्हां अन्वाधानाच्या दिवशीं पिंडपितृयज्ञ करावा. याप्रमाणें—आपस्तंब व हिरण्यकेशी यांच्या मताप्रमाणें वागणाऱ्यांनींही संधिदिनींच पितृयज्ञ करावा. हा यज्ञ अपराह्णांत अथवा साधारणपणें सूर्य वर असेपर्यंत करावा. दिवसाचे पांच भाग केले असतां, त्यांतला चौथा तो अपराह्णकाल होय; किंवा दिवसाचे नऊ भाग केले असतां, त्यांतला जो सातवा भाग तो अपराह्णकाल होय. सांख्यायन, कात्यायन व सामवेदीयांनीं पिंडपितृ-यज्ञ अन्वाधानाच्याच दिवशीं करावा असें जें मागें सांगितलें आहे, त्याप्रमाणें हा पिंड-पितृयज्ञ, दिवसाचे समान तीन भाग करून, त्यांतला तिसरा भाग जो अपराह्णाचा येईल त्या वेळीं करावा. दर्शश्राद्ध व पिंडपितृयज्ञ हे जर एकाच दिवशीं येतील, तर गृह्याग्निव्रताच्या ऋग्वेद्यांनीं त्या दोहोंचें एकदम एकत्रच अनुष्ठान करावें. व्यतिषंग म्हणजे दोन्ही कर्में एकदम बरोबरच करणें. खंडपर्व असल्यास आदल्या दिवशीं फक्त दर्शश्राद्ध करून, पुढच्या दिवशीं फक्त पिंडपितृयज्ञ करावा. श्रौताग्निमान् म्हणजे जे अग्निहोत्रि असतील त्यांनीं फक्त दक्षिणाग्नीच्या ठिकाणीं पिंडपितृयज्ञ करावा. तो व्यतिषंगानें त्यांनीं करूं नये. दर्श जर संपूर्ण असेल, तर अग्निहोत्र्यांचा क्रम असा आहे:— सुरवातीला अन्वाधान, नंतर वैश्वदेव, त्यानंतर पिंडपितृयज्ञ आणि शेवटीं दर्शश्राद्ध. ज्या अग्निहोत्र्यांचा बाप जिवंत असेल अशांनीं, याच वेळीं होमाच्या शेवटीं पित्रादि त्रयीच्या उद्देशानें पिंडांसह किंवा पिंडांवांचूनही पिंडपितृयज्ञ करावा, किंवा पिंडपितृ-यज्ञाला आरंभच करूं नये. एका इष्टीचा लोप झाला असतां, पादकृच्छ्राचें प्रायश्चित्त करावें, दोन इष्टींचा लोप झाल्यास अर्धकृच्छ्राचें प्रायश्चित्त करावें आणि तीन इष्टींचा जर लोप झाला असेल, तर अग्निनाश होतो म्हणून, पुन्हां अग्नीची स्थापना करावी. पिंडपितृयज्ञाचा जर लोप होईल,. तर वैश्वानरेष्टि प्रायश्चित्त करावें. इष्टीच्या जागीं **'सप्तहोतारं होष्यामि'** या मंत्रानें संकल्प करून, याच मंत्रानें चार वेळां तूप घेऊन पूर्णाहुति द्याव्या. येथें तेविसावा उद्देश संपला.

३६ अथश्राद्धेऽमावास्यानिर्णीयते पञ्चधाविभक्तदिनचतुर्थभागाख्यापराह्ण-व्यापिन्यमावास्यादर्शश्राद्धेग्राह्या पूर्वेद्युरेवपरेद्युरेववापराह्णेकार्त्स्न्येनैक-देशेनवाव्याप्तित्वे सैवग्राह्या उभयदिनेप्यपराह्णेवैषम्येणैकदेशव्यापित्वेया-धिकव्यापिनीसाग्राह्या दिनद्वयेसाम्येनैकदेशव्याप्तौतिथिक्षयेपूर्वातिथिवृद्धौ तिथिसाम्येचपरा तत्रसमव्याप्तौतिथिवृद्धिक्षयसाम्योदाहरणानि चतुर्दशी १९ अमा २३ दिनम् ३० अत्रदिनद्वयेपिसमापञ्चघटिकैकदेशव्याप्तिश्चतुर्दश्यपेक्ष-याचतुर्घटिकाभिरमायावृद्धिसत्वादुत्तराग्राह्या तथा चतुर्दशी २३ अमा १९ अत्रैकाघटिकासमाव्याप्तिर्घटिकाचतुष्टयेनतिथिक्षयात्पूर्वाग्राह्या अथचतुर्दशी २१ अमा २१ अत्रघटीत्रयेणदिनद्वयेऽशतःसमाव्याप्तिस्तिथेस्तुवृद्धिक्षयाभा-वेनसमत्वात्पराग्राह्या दिनद्वयेपूर्णापराह्णव्याप्तौतिथिवृद्धित्वापराग्राह्यायदादि-नद्वयेप्यपराह्णस्पर्शाभावस्तदागृह्याग्निमद्भिःश्रौताग्निमद्भिश्चसिनीवालीसंज्ञि-काचतुर्दशीमिश्रापूर्वाग्राह्या निरग्निकैःस्त्रीशूद्रादिभिश्चकुहूसंज्ञिकाप्रतिपन्मि-श्रापराग्राह्येतिमाधवाचार्यसंमतोदर्शनिर्णयः प्रायः सर्वत्रशिष्टैराद्रियते पुरुषार्थ-चिन्तामणौतुबह्वृचैस्तैत्तिरीयैश्चसाग्निकैरपराह्णव्याप्त्यसत्वेपिइष्टिदिनात्पूर्व-दिनेएवदर्शश्राद्धंकार्यम् तथाचदिनद्वयकोत्स्न्येनापराह्णव्याप्तौपरत्रैवदर्शः एक-देशेनापराह्णव्याप्तौप्रतिपद्वृद्ध्याप्रतिपदीष्टावुत्तरत्रैवदर्शः द्वितीयदिनेएवापरा-ह्णव्याप्तौ तुयदिप्रतिपत्क्षयवशाद्दर्शदिनएवइष्टिप्राप्तिस्तदाबह्वृचनांसिनीवाली तैत्तिरीयाणांकुहूर्ग्राह्या सामगानांविकल्पे [illegible] यम् यदापूर्वदिनेपराह्णेधिकाव्याप्तिः परदिनेऽल्पा तदा सामगानांपूर्वातैत्तिरीयाणाउत्तरा उभयत्रापराह्णस्पर्शा-भावेपिसामगानांपूर्वातैत्तिरीयाणांपरेत्याद्युक्तम् दर्शेदर्शश्राद्धवर्षश्राद्धयोर्दर्श-मासिकयोर्दर्शश्राद्धोदकुम्भश्राद्धयोश्चसंपाते देवताभेदाच्छ्राद्धद्वयंकार्यम् तत्रादौ मासिकाब्दिकादिश्राद्धंकृत्वापाकान्तरेणदर्शश्राद्धंकार्यम् वैश्वदेवआब्दिकादि-श्राद्धशेषेणपृथक्पाकेनवादर्शश्राद्धात्प्राग्भवति आहिताग्निस्तुवैश्वदेवंपिण्डपितृ-यज्ञंचकृत्वाब्दिकंकुर्यात् दर्शश्राद्धमनुपनीतविधुरप्रवासस्थैरपिकार्यम् अमा-श्राद्धातिक्रमेन्यूषुवाचमितिऋचं शतवारंजपेत् इतिदर्शनिर्णयोद्देशः २४

**श्राद्धाचा अमावास्यानिर्णय**—दिवसाचे पांच भाग केले असतां, त्यांतल्या अपराह्ण नांवाच्या भागांत जर व्याप्ति असेल, तर ती अमावास्या श्राद्धाला ग्राह्य होय. पहिल्या दिवशीं किंवा दुसऱ्या दिवशीं जर अपराह्णीं पूर्ण अथवा भागशः व्याप्ति असेल, तर तीच घ्यावी. दोन्ही दिवशीं जर अपराह्णीं कमीअधिक अशी अंशतः व्याप्ति असेल, तर ज्या दिवशीं अधिक व्याप्ति असेल तो दिवस घ्यावा. त्या काळीं जर दोन दिवस समान व्याप्ति असेल, तर तिथिक्षय असल्यास पहिली तिथि घ्यावी, तिथिवृद्धि किंवा तिथिसाम्य असल्यास दुसरी घ्यावी. समान व्याप्ति असतांना तिथीची वृद्धि, क्षय किंवा साम्य यांचीं उदा-हरणें:—चतुर्दशी १९ घ., अमावास्या २३ घ., व दिनमान ३० घ., या ठिकाणीं दोन्ही

दिवशीं सारखीच पांच घटका एकदेशव्याप्ति आहे व चतुर्दशीपेक्षां अमावास्येची चार घटकांनीं वृद्धि आहे, म्हणून दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. चतुर्दशी २३ घ., व अमावास्या १९ घ. असतां येथें एक घटका सारखी व्याप्ति आहे व चार घटकांनीं तिथीचा क्षय आहे यास्तव पूर्व दिवसाची घ्यावी. चतुर्दशी २१ घ. व अमावास्याही २१ घ. आहे, अशा वेळीं तीन घटकांनीं दोन्ही दिवशीं अंशतः सारखी व्याप्ति असून, तिथीची वृद्धि व क्षय यांतील कांहींही नाहीं, तर समत्व आहे, म्हणून दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पूर्वाह्णीं व अपराह्णीं अशी जर दोन दिवशीं व्याप्ति असेल, तर येथें तिथीची वृद्धि असल्यानें दुसऱ्या दिवसाची घ्यावी. ज्या वेळीं दोन्ही दिवशीं अपराह्णकाळीं व्याप्ति नसेल, त्यावेळीं गृह्याग्नि व श्रौताग्नि यांच्या उपासकांनीं 'सिनीवाली' या नांवाची चतुर्दशीमिश्रित अशी पहिल्या दिवसाची घ्यावी. जे अग्निहोत्री नसतील त्यांनीं, व स्त्री व शूद्रादिक यांनीं 'कुहु' नांवाची प्रतिपदेनें मिश्रित अशी दुसऱ्या दिवसाची घ्यावी. हा जो माधवाचार्यांना संमत असलेला दर्शनिर्णय, तोच प्रायः सर्व शिष्टसंमत आहे. या बाबतींत पुरुषार्थचिंतामणींत मात्र जें निराळें मत दिलें आहे, तें येणेंप्रमाणें:—अग्नि बाळगणारे ऋग्वेदी व तैत्तिरीय शाखेचे जे कोणी असतील त्यांनीं, अपराह्णकाळीं व्याप्तीचा अभाव असतांही इष्टिदिनाच्या आदल्या दिवशींच दर्शश्राद्ध केलें पाहिजे. दोन दिवस जर संपूर्णपणें अपराह्णकाळीं व्याप्ति असेल, तर दर्श दुसऱ्या दिवशीं समजावा. अपराह्णकाळीं जर एकदेशव्याप्ति असेल, तर प्रतिपदेची वृद्धि असल्यानें, प्रतिपदेला इष्टि येते म्हणून, दुसऱ्या दिवशींच दर्शश्राद्ध करावें. फक्त दुसऱ्याच दिवशीं जर अपराह्णव्याप्ति असेल आणि प्रतिपदेचा क्षय असल्यामुळें जर दर्शाच्याच दिवशीं इष्टि येईल, तर ऋग्वेद्यांनीं 'सिनीवाली' व तैत्तिरीयांनीं 'कुहु' ह्या ग्राह्य समजाव्या. सामवेद्यांना विकल्पानें दोन्ही ग्राह्य आहेत. आदल्या दिवशीं अपराह्णकाळीं जेव्हां अधिक व्याप्ति व दुसऱ्या दिवशीं थोडी व्याप्ति असेल, तेव्हां सामवेद्यांनीं पहिली व तैत्तिरीयांनीं दुसरी घ्यावी. दोन्ही दिवशीं जरी अपराह्णकाळीं व्याप्ति नसली, तरी देखील सामवेद्यांनीं पहिली व तैत्तिरीयांनीं दुसरी घ्यावी, असें आधींच सांगितलें आहे. दर्शाच्या अमावास्येला जर—दर्शश्राद्ध व वर्षश्राद्ध, दर्शश्राद्ध व मासिक श्राद्ध अथवा दर्शश्राद्ध व उदकुंभश्राद्ध—हीं एकत्रच आलीं, तर देवताभेदानें दोन दोन श्राद्धें करावींत. अशा प्रसंगीं, आधीं मासिक किंवा सांवत्सरिक श्राद्ध करून, दुसरा पाक तयार करावा आणि मग दर्शश्राद्ध करावें. सांवत्सरिकादि श्राद्ध केल्यावर शिल्लक राहिलेल्या भातानें अथवा निराळा भात करून दर्शश्राद्धाच्या आधीं वैश्वदेव करावा. अग्निहोत्र्यानें वैश्वदेवानंतर पिंडपितृयज्ञ करून, मागून सांवत्सरिक श्राद्ध करावें. मुंज न झालेला, विधुर, प्रवासी वगैरे सर्वांनीं दर्शश्राद्ध करावें. दर्शश्राद्ध करण्याचें चुकल्यास 'न्यूषुवाचम्' या ऋचेचा शंभर जप करावा. याप्रमाणें येथें दर्शनिर्णयाचा चोविसावा उद्देश संपला.

**३७ इष्ट्यादिप्रारम्भनिर्णयः । इष्टिस्थालीपाकौपौर्णमास्यामारब्धव्यौनतुदर्शे आधानगृहप्रवेशनीयहोमानन्तरमेवपौर्णमास्यांयदिदर्शपौर्णमासारम्भःक्रियते**

**तदामलमासपौषमासशुक्रास्तादिदोषोनास्ति तत्रातिक्रमेतुशुद्धमासादिप्रतीक्षे-त्येके सर्वथाशुद्धकालेएवारम्भइत्यपरे इति इष्ट्यादिप्रारम्भनिर्णयोद्देशः २५**

**इष्ट्यादिकांचा प्रारंभनिर्णय**—इष्टि व स्थालीपाक यांचा आरंभ पौर्णिमेला करावा, अमावास्येला करूं नये. अग्निस्थापना जी करणें ती, गृहप्रवेशनीय होमानंतर करावी. दर्शपौर्णमासाच्या स्थालीपाकाचा प्रारंभ जर पौर्णिमेला करावयाचा असेल, तर त्या बाबतींत मलमास, पौषमास अथवा शुक्रादिकांचा अस्त यांचा दोष नाहीं. हा आरंभ करणें जर राहिलें, तर शुद्धमासादि येईपर्यंत थांबावें, असें कोणी म्हणतात व नेहमीं शुद्धकालींच आरंभ करावा असेंही इतर कित्येकांचें म्हणणें आहे. येथें इष्ट्यादिप्रारंभनिर्णयाचा पंच-विसावा उद्देश संपला.

**४९ अथविकृतिकालः तास्त्रिविधाः नित्याआग्रयणचातुर्मास्याद्याः नैमि-त्तिक्योजातेष्ट्यादयः काम्याःसौर्यादयः एताःपुरुषार्थाः एवंक्रत्वङ्गभूता अपि द्विविधाः नित्यानैमित्तिकाश्च तत्रविकृतिषुसद्यःकालत्वद्व्यहकालत्वयोर्विकल्पः एवंपर्वणिशुक्लपक्षगतदेवनक्षत्रेषुवाकर्तव्याइतिविकल्पः तत्रपर्वणि करणपक्षे अपराह्णादिसंधौसंधिदिने सद्यःकालांद्व्यहकालांवाविकृतिंकृत्वा प्रकृतेरन्वाधा-नम् मध्याह्नेपूर्वाह्णेवासंधौसंधिदिनेप्रकृतिंसमाप्यसद्यःकालैवविकृतिःकार्या कृत्तिकादीनिविशाखान्तानिचतुर्दशनक्षत्राणिदेवनक्षत्राणीत्युच्यन्ते आग्रयणे-विशेषोद्वितीयपरिच्छेदेवक्ष्यते अन्वारम्भणीयेष्टिश्चतुर्दश्यांकार्या इतिविकृति-सामान्यनिर्णयोद्देशः २६**

**विकृतिकालनिर्णय**—विकृति तीन प्रकारच्या आहेत. (१)आग्रयण, चातुर्मास्य, वगैरे नित्यविकृति. (२) जातेष्ट्यादि नैमित्तिक विकृति, आणि (३) सौरी वगैरे काम्य विकृति. हीं कृत्यें पुरुषार्थाचीं आहेत. याचप्रमाणें यज्ञाच्या अंगभूत अशा ज्या विकृति आहेत, त्याही नित्य व नैमित्तिक अशा दोन प्रकारच्या आहेत. या विकृति तत्काल अथवा दोन दिवस कराव्या असा विकल्प आहे. त्याप्रमाणेंच शुक्लपक्षांत जीं देवनक्षत्रें असतील, त्या नक्षत्रीं ह्या कराव्यात असाही विकल्प आहे. पर्वदिवशीं जर करणें असेल, तर अपराह्णसंधि असतांना संधिदिवशीं 'तत्कालिक' अथवा 'दोन दिवसांची' विकृति करून, प्रकृतीचें अन्वाधान करावें. संधि जर मध्याह्नीं अथवा पूर्वाह्णीं असेल, तर संधीच्या दिवशीं प्रकृति समाप्त करून 'तत्कालिक' विकृतिच करावी. कृत्तिकांपासून विशाखापर्यंत जीं चौदा नक्षत्रें, त्यांना देवनक्षत्रें म्हणतात. आग्रयणाची विशेष माहिती दुसऱ्या परिच्छेदांत सांगेन. अन्वा-रम्भणीया इष्टि चतुर्दशीलाच करावी. याप्रमाणें विकृतीच्या सामान्यनिर्णयाचा सव्विसावा उद्देश येथें संपला.

**५० पशुयागस्तु वर्षर्तौ श्रावण्यादिचतुर्णां पर्वणामन्यतमे पर्वणि दक्षिणायन-दिने उत्तरायणदिने वा कार्यः तत्र खंडपर्वणि विकृतिसामान्योक्तपर्वनिर्णयः॥ इति पशुयागनिर्णयउद्देशः सप्तविंशः ॥ २७ ॥**

**पशुयागकालनिर्णय**—श्रावणी वगैरे जीं चार पर्वें वर्षाऋतूंत असतात, त्यांपैकीं कोणातरी एका पर्वदिवशीं दक्षिणायनाच्या दिवशीं किंवा उत्तरायणाच्या दिवशीं पशुयाग करावा. खंडपर्व जर नसेल, तर विकृतिबद्दल जो सामान्य पर्वनिर्णय सांगितला, तोच येथें समजावा. याप्रमाणें येथें पशुयागनिर्णयाचा सत्ताविसावा उद्देश संपला.

५१ अथ चातुर्मास्यकालः ॥ तत्प्रयोगे चत्वारः पक्षः फाल्गुन्यां चैत्र्यां वा पौर्णमास्यां वैश्वदेवपर्व कृत्वा चतुर्षु चतुर्षु मासेष्वाषाढ्यादिष्वेकैक पर्वेत्येवं यावज्जीवमनुष्ठानमिति यावज्जीवपक्षः उक्तरीत्या संवत्सरपर्यंतमनुष्ठाय सवनेष्ट्या पशुयागेन वा समापनं सांवत्सरपक्षः प्रथमेऽहनि वैश्वदेवपर्व चतुर्थे वरुणप्रघासपर्व अष्टमनवमयोः साकमेधपर्व द्वादशे शुनासीरीयपर्वेति द्वादशाहपक्षः पंचभिर्दिनैः यथाप्रयोगः पक्षः द्वादशाहयथाप्रयोगपक्षयोरुदगयने शुक्लपक्षे देवनक्षत्रेष्वारभ्य शुक्लपक्षएव समाप्तिरिति बहवः कृष्णपक्षे वा समाप्तिरिति केचित् द्वादशाहपंचाहपक्षयोरपि सवनेष्ट्यादिना समापने कृते सकृत्करणं तदभावे प्रतिवत्सरमनुष्ठानम् क्वचिदेकाहिकप्रयोगपक्षोप्युक्तः सच चैत्र्यादिषु चतसृषु पौर्णमासीष्वेकस्यांकस्यांचिद्भवति क्वचित्तु सप्ताहः पक्षः स यथा द्व्यहे वैश्वदेवपर्वतृतीयदिने वरुणप्रघासः चतुर्थे ग्रहमेधीया पंचमे महाहर्वींषि षष्ठे पितृयज्ञादिसाकमेधपर्वशेषः सप्तमे शुनासीरीयपर्वेति अत्र शुक्लपक्षादिः पंचाहपक्षोक्तः कालः ॥ इति चातुर्मास्यकालनिर्णयउद्देश अष्टविंशः ॥ २८ ॥

**चातुर्मास्यकालनिर्णय**—चातुर्मास्याच्या प्रयोगाचे चार पक्ष आहेत ते येणेंप्रमाणें:— ( १ ) फाल्गुनी किंवा चैत्री पौर्णिमा यांतल्या कोणत्याही पौर्णिमेला वैश्वदेवपर्व करून, आषाढी वगैरे पौर्णिमांवर पर्वांचा आरंभ करावा आणि चार चार महिन्यांनीं पौर्णिमेला एकेक पर्व करावें. याप्रमाणें यावज्जीव जें वागणें तो यावज्जीव पक्ष. (२) या सांगितलेल्या रीतीनें एक वर्षपर्यंत अनुष्ठान करून, नंतर सवनेष्टि व पशुयाग यांनीं अथवा सवनेष्टि व होमयाग यांनीं समाप्ति करण्याचा जो पक्ष तो सांवत्सर पक्ष. ( ३ ) पहिल्या दिवशीं वैश्वदेवपर्व, चौथ्या दिवशीं वरुण प्रघासपर्व, आठव्या व नवव्या दिवशीं साकमेधपर्व आणि बाराव्या दिवशीं शुनासीरीय पर्व–असा हा बारा दिवसांचा द्वादशाहपक्ष. ( ४ ) पांच दिवसपर्यंत करून, पांचव्या दिवशीं जो समाप्ति करण्याचा तो यथाप्रयोगपक्ष. यांचा आरंभ–उत्तरायणांतल्या शुक्लपक्षीं देवनक्षत्रावर करून, शुक्लपक्षांतच त्याची समाप्ति करावी असें जसे बरेच ग्रंथकार म्हणतात, तद्वतच कृष्णपक्षांत समाप्ति करावी असेंही कित्येकांचें म्हणणें आहे. बारा दिवसांचा व पांच दिवसांचा अशा या दोन पक्षांची समाप्ति सवनेष्टि इत्यादिकांनीं जर एकानें केली, तर ते दोन पक्ष एक वेळ करावे; तशी समाप्ति जर केली नाहीं, तर प्रत्येक वर्षीं करावे. कांहीं ग्रंथांत एका दिवसाचाही प्रयोग सांगितला आहे. तो प्रयोग, चैत्र्यादिक चार पौर्णिमां-

पैकीं कोणत्याही एका पौर्णिमेंत होतो. क्वचित् ग्रंथांत सात दिवसाचाही जो पक्ष सांगितला आहे, तो येणेंप्रमाणें:—दोन दिवस वैश्वदेवपर्व, तिसऱ्या दिवशीं वरुणप्रघासपर्व, चौथ्या दिवशीं ग्रहमेधीया, पांचव्या दिवशीं महाहविषि, सहाव्या दिवशीं पितृयज्ञादिक साकमेधपर्वाचा शेष आणि सातव्या दिवशीं शुनासीरीय पर्व या सात दिवसांच्या पक्षासंबंधानें, पांच दिवसांच्या पक्षाला जो शुक्लपक्षादिक काल सांगितला आहे, तो घ्यावा. याप्रमाणें येथें चातुर्मास्याच्या कालनिर्णयाचा अठ्ठाविसावा उद्देश संपला.

५८ काम्येष्टीनां विकृतिसामान्यनिर्णयानुसारेण पर्वण्यधिष्ठानम् । शुक्लपक्षस्थदेवनक्षत्रे वा जातेष्टिस्तु पत्न्या विंशतिरात्र्यात्मककर्मानधिकाराख्यजननाशौचनिवृत्तौ सत्यां पर्वणि कार्या गृहदाहेष्ट्यादिनैमित्तिकेष्टीनां निमित्तानंतरमनुष्ठाने पर्वाद्यपेक्षा नास्ति तदसंभवे पर्वापेक्षा क्रत्वर्थानां नित्यानां क्रतुनासहैवानुष्ठानम् न तत्र पृथक्कालापेक्षा हविर्दोषोद्देशादिनैमित्तिकक्रत्वर्थेष्टयस्तु स्विष्टकृदुत्तरं समिष्टयजुषः प्राक् निमित्तस्मरणे तदानीमेव तदीयतंत्रोपजीवनेन निर्वापप्रभृतिकार्याः तदनंतरं स्मरणे तत्प्रयोगं समाप्य पुनरन्वाधानादिविधिना कार्याः इति काम्यनैमित्तिकादीष्टीनां निर्णयउद्देश एकोनत्रिंशः २९

**काम्येष्टींचा कालनिर्णय**—विकृति करण्याचा जो सामान्य निर्णय सांगितला, त्याला अनुसरूनच पर्वदिवशीं अथवा शुक्लपक्षांतल्या देवनक्षत्रीं, काम्येष्टि कराव्या. स्त्री बाळंतीण झाली असतां जरी जातेष्टि करावी असें आहे, तरी कर्माला प्रतिबंध करणारें जें वीस दिवसपर्यंतचें सोयर ( जननाशौच ) तें संपल्यानंतर, पर्वदिवशीं, ती करावी. घर जळालें असतां गृहदाहेष्टि करावी. अशा प्रकारच्या नैमित्तिक इष्टींच्या अनुष्ठानांना पर्वादिकांची आवश्यकता नाहीं. अशा इष्टि, असंभव असल्यास पर्वदिवशीं कराव्या. यज्ञाच्या अंगभूत असणाऱ्या ज्या नित्य इष्टि, त्या यज्ञाबरोबरच कराव्या. त्यांच्याकरितां निराळ्या काळाची जरूर नाहीं. होमद्रव्यें जर दोषयुक्त झालीं, तर त्याबद्दल करायच्या ज्या यज्ञप्रायश्चित्तेष्टि, त्या स्विष्टकृत् कर्मानंतर व समष्टियजुसंज्ञक होमाच्या आधीं जर दोषाची आठवण झाली तर, त्या वेळींच तंत्रोपजीवनानें निर्वापादिक कराव्या. दोषाची आठवण जर प्रायश्चित्ताच्या आहुतीनंतर झाली, तर तो सर्व प्रयोग पुरा करून, त्या इष्टि, पुन्हां अन्वाधानिक विधीनें कराव्या. याप्रमाणें येथें काम्येष्टिकालनिर्णयाचा एकोणतिसावा उद्देश संपला.

५३ आधानं तु पर्वणि नक्षत्रे चोक्तम् तत्र संकल्पप्रभृतिपूर्णाहुतिपर्यंतप्रयोगपर्याप्तं पर्व ग्राह्यम् तदसंभवे गार्हपत्याधानाद्याहवनीयाधानपर्यंतं विद्यमानं ग्राह्यं एवं नक्षत्रस्यापि निर्णयः दिनद्वये कर्मकालव्याप्तपर्वसत्वे यत्रोक्तनक्षत्रयोगस्तद्ग्राह्यं वसंतऋतुपर्योक्तनक्षत्रेत्येतत्त्रितयसन्निपाते प्रशस्ततमं ऋत्वभावे मध्यमं केवले पर्वणि नक्षत्रे वाधमं नक्षत्राणि तु कृत्तिकारोहिणीविशाखापूर्वाफल्गुनीउत्तराफल्गुनीमृगोत्तराभाद्रपदेती समाश्वलायनसूत्रोक्तानि कृत्तिका-

रोहिणीत्र्युत्तरामृगपुनर्वसुपुष्यपूर्वाफल्गुनीपूर्वाषाढाहस्तचित्राविशाखानुराधा श्रवणज्येष्ठारेवतीति सूत्रांतरोक्तानि सोमपूर्वाधाने तु नर्तु पृच्छेन्न नक्षत्रमिति वचनात्सोमकालानुरोधेनैवाधानं न तत्र पृथक्कालविचारः ॥ इत्याधानकाल-निर्णय उद्देशः ३०

**आधानकालः**—आधान जें करणें तें, उक्त नक्षत्रीं व पर्वदिवशीं करावें. त्या कृत्यास जें पर्व घेणें तें संकल्पापासून पूर्णाहुतिपर्यंतचा सर्व प्रयोग ज्या कालांत होईल असें घ्यावें. इतका काल पुरणारें जर पर्व नसेल, तर गार्हपत्याधानापासून आहवनीयाधानापर्यंत पुरेल असें जें असेल तें घ्यावें. याच-प्रमाणें नक्षत्राचाही निर्णय जाणावा. संकल्पादिक सर्व कर्म पुरें होईल इतकें पर्व जर दोन दिवस असेल, तर ज्या दिवशीं सांगितलेल्या नक्षत्राचा योग असेल तें घ्यावें. वसंत ऋतु, पर्व आणि सांगितलेलीं नक्षत्रें या तिहींचा जर एकाच वेळीं योग येईल तर फारच उत्तम. पर्व आणि नक्षत्र असून जर ऋतु नसेल, तर मध्यम योग जाणावा. केवळ नक्षत्र अथवा फक्त पर्व असणें हा वाईट योग होय. या कृत्यासाठीं आश्वलायनसूत्रांत कृत्तिका, रोहिणी, विशाखा, पूर्वाफाल्गुनी, उत्तरा-फाल्गुनी, मृग व उत्तराभाद्रपदा अशीं सात नक्षत्रें सांगितलीं आहेत. यांशिवाय दुसऱ्या सूत्रांत कृत्तिका, रोहिणी, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, मृग, पुनर्वसु, पुष्य, पूर्वाफाल्गुनी, पूर्वाषाढा, हस्त, चित्रा, विशाखा, अनुराधा, श्रवण, ज्येष्ठा व रेवती—अशीं सतरा नक्षत्रें सांगितलीं आहेत. आधान जर सोमपूर्वक असेल, तर ऋतु, नक्षत्रें वगैरेंचा विचार करूं नये असें वचन आहे; यास्तव सोमकालाच्याच अनुरोधानें आधान करावें. तेथें निराळ्या काळाचा विचार करणें नलगे. याप्रमाणें येथें आधानकालनिर्णयाचा तिसावा उद्देश संपला.

५४ अथग्रहणनिर्णयः चन्द्रसूर्यग्रहणंयावच्चाक्षुषदर्शनयोग्यं तावान् पुण्य-कालः अतोग्रस्तास्तस्थलेऽस्तोत्तरंद्वीपान्तरेग्रहणसत्त्वेपिदर्शनयोग्यत्वाभावान्न पुण्यकालः एवं ग्रस्तोदयेउदयात्पूर्वंनपुण्यकालःमेघादिप्रतिबन्धेनचाक्षुषदर्शना-संभवेशास्त्रादिना स्पर्शमोक्षकालौज्ञात्वास्नानदानाद्याचरेत् रविवारे सूर्यग्रह-श्चन्द्रवारेचन्द्रग्रहश्चचूडामणिसंज्ञस्तत्रदानादिकमनन्तफलम् ग्रहस्पर्शकाले स्नानं मध्येहोमःसुरार्चनंश्राद्धंच मुच्यमानेदानंमुक्तेस्नानमितिक्रमः तत्रस्नानजलेषु-तारतम्यम् । शीतमुष्णोदकात्पुण्यमपारक्यंपरोदकात् । भूमिष्ठमुद्धृतात्पुण्यंततः प्रस्रवणोदकम् ॥ १ ॥ ततोपिसारसंपुण्यंततः पुण्यंनदीजलम् । ततस्तीर्थनदी-गङ्गापुण्यापुण्यस्ततोम्बुधिः॥२॥ इति ग्रहणेस्नानंचसचैलंकार्यम् सचैलत्वंमुक्ति-स्नानपरमितिकेचित् मुक्तिस्नानाभावे सूतकित्वानपगमःग्रहणेस्नानममन्त्रकं सुवासिनीभिःस्त्रीभिरशिरःस्नानं कार्यम् ।शिष्टस्त्रियस्तुग्रहणेषुशिरःस्नानंकुर्वन्ति जाताशौचेमृताशौचेच्चग्रहणनिमित्तंस्नानदानश्राद्धादिकंकार्यमेव स्नानेनैमित्ति-केप्राप्तेनारीयदिरजस्वला। पात्रान्तरिततोयेनस्नानंकृत्वाव्रतंचरेत्॥१॥नवस्त्रपी-ड्नंकुर्यान्नान्यद्वासश्चधारयेत् । त्रिरात्रमेकरात्रंवासमुपोष्यग्रहणेस्नानदानाद्य-

नुष्ठानेमहाफलम् एकरात्रपक्षेग्रहणदिनात्पूर्वदिनेउपवासइतिकेचित् ग्रहणसंबद्धाहोरात्रउपवासइत्यपरे पुत्रवद्गृहिणोग्रहणसंक्रान्त्यादौनोपवासः पुत्रवत्पदेनकन्यावानपिग्राह्य इतिकेचित् ग्रहणेदेवपितृतर्पणंकार्यमितिकेचित् सर्वेषामेव वर्णानांसूतकंराहुदर्शने । तेनग्रहणकालेस्पृष्टवस्त्रादेःक्षालनादिनाशुद्धिःकार्या अत्रगोभूहिरण्यधान्यादिदानंमहाफलम् तपोविद्योभययुक्तंमुख्य दानपात्रम् सत्पात्रेदानात्पुण्यातिशयः । सर्वंगङ्गासमंतोयंसर्वेव्याससमाद्विजाः । सर्वभूमिसमंदानंग्रहणे चन्द्रसूर्ययोः १ इत्युक्तिः पुण्यसामान्याभिप्राया अतएव सममब्राह्मणेदानं द्विगुणंब्राह्मणब्रुवे । श्रोत्रियेशतसाहस्रंपात्रेत्वानन्त्यमश्नुते ॥ १ ॥ इतितारतम्यमुक्तम् अब्राह्मणेसंस्कारादिरहितेजातिमात्रेब्राह्मणेदानं यथोक्तफलम् गर्भाधानादिसंस्कारयुतोवेदाध्ययनाध्यापनरहितोब्राह्मणब्रुवस्तत्रदानमुक्तंद्विगुणफलम् वेदाध्ययनादियुतेश्रोत्रियेसहस्रफलम् विद्यासदाचरणादियुते पात्रेऽनन्तफलमित्येतद्वाक्यार्थः ग्रहणेश्राद्धमामेनहेम्नावाकार्यम् संपन्नश्चेत्पक्वान्नेनकुर्यात् सूर्यग्रहणेतीर्थयात्राङ्गश्राद्धवत्घृतप्रधानान्नेनश्राद्धंकार्यम् ग्रहणेश्राद्धभोक्तुर्महादोषः ग्रहणेतुलादानादिकंसंपन्नेनकार्यम् । चन्द्रसूर्यग्रहे तीर्थेमहापर्वादिकेतथा । मन्त्रदीक्षांप्रकुर्वाणोमासर्क्षादीन्नशोधयेत् १ मन्त्रदीक्षाप्रकारस्तन्त्रेद्रष्टव्यः दीक्षाग्रहणमुपदेशस्याप्युपलक्षणम् । युगेयुगेतुदीक्षासीदुपदेशःकलौयुगे । चन्द्रसूर्यग्रहेतीर्थेसिद्धक्षेत्रेशिवालये १ मन्त्रमात्रप्रकथनमुपदेशः सउच्यते मन्त्रग्रहणेसूर्यग्रहणमेवमुख्यम् चन्द्रग्रहणेदारिद्र्यादिदोषोक्तेरितिकेचित् । चन्द्रसूर्योपरागेचस्नात्वापूर्वमुपोषितः । स्पर्शादिमोक्षपर्यन्तं जपेन्मन्त्रंसमाहितः १ जपाद्दशांशतोहोमस्तथाहोमाच्चतर्पणम् । होमाशक्तौजपंकुर्याद्धोमसंख्याचतुर्गुणम् । मूलमन्त्रमुच्चार्यतदन्तेद्वितीयान्तंमन्त्रदेवतानामोच्चार्यअमुकांदेवतामहंतर्पयामिनमइतियवादियुक्तजलाञ्जलिभिस्तर्पणंहोमदशांशेनकार्यम् एवंनमोन्तंमूलमन्त्रमुक्त्वाअमुकांदेवतामहमभिषिञ्चाम्यनेनेत्युच्चार्य जलेनस्वमूर्ध्निअभिषिञ्चेदितिमार्जनंतर्पणदशांशेनकार्यम् मार्जनदशांशेनब्राह्मणभोजनम् एवंजपहोमतर्पणमार्जनविप्रभोजनात्मकपञ्चप्रकारंपुरश्चरणम् तर्पणाद्यसंभवेतत्तत्संख्याचतुर्गुणोजपएवकार्यः अयंचग्रहणेपुरश्चरणप्रकारोग्रस्तोदयग्रस्तास्तेचनसंभवति पुरश्चरणाङ्गोपवासः पुत्रवद्गृहिणापि कार्यः पुरश्चरणकर्तुःस्नानदानादिनैमित्तिककर्मलोपेप्रत्यवायप्रसङ्गान्नैमित्तिकं स्नानदानादिकंभार्यापुत्रादिप्रतिनिधिद्वाराकार्यम् ।

**ग्रहणनिर्णय**—चंद्रग्रहण अथवा सूर्यग्रहण जोंपर्यंत डोळ्यांनीं दिसत असेल तोंपर्यंत पुण्यकाळ असतो. चंद्रबिंब अथवा सूर्यबिंब ग्रस्त असतांना जर एखाद्या ठिकाणीं अस्त पावेल, तर त्यानंतर दुसऱ्या ठिकाणीं तें ग्रहण दिसेल; पण पहिल्या ठिकाणीं तें ग्रहण डोळ्यांनीं दिसत नसतें म्हणून, अस्तानंतर तेथें पुण्यकाल नसतो. त्याप्रमाणें दोहोंपैकीं कोणचेंही बिंब जर ग्रहण लागलेल्याच स्थितींत

उदय पावेल, तर उदयाच्या आधीं पुण्यकाल नाहीं. ढगांमुळें जर डोळ्यांनीं ग्रहण दिसत नसलें, तर शास्त्ररीत्या स्पर्शकाल व मोक्षकाल हीं समजून घेऊन, स्नानदानादिक कर्मे करावींत. रविवारीं सूर्यग्रहण आणि सोमवारीं चंद्रग्रहण अशीं जर असतील तर त्यांना चूडामणिग्रहण असें नांव आहे. अशा ग्रहणांत दानादिक केलें असतां अनंत फळ मिळतें. ग्रहणाच्या स्पर्शकालीं स्नान, मध्यकाळीं होम, देवार्चन आणि श्राद्ध व सुटत असतांना दान आणि सुटल्यानंतर स्नान अशीं कर्में क्रमानें करावींत. आंघोळीला पाणी घेण्याविषयीं कमी-अधिकपणा—कढतपाण्यापेक्षां थंड पाणी पुण्यकारक. दुसऱ्यानें दिलेल्या पाण्यापेक्षां स्वतः घेतलेलें पुण्यकारक. पाणी वर काढून स्नान करण्यापेक्षां भूमींत असलेल्या पाण्यानें स्नान करणें पुण्यकारक. त्यापेक्षां वाहातें पाणी पुण्यकारक. वाहात्या पाण्यापेक्षां सरोवराचें पाणी पुण्यकर. सरोवराच्या पाण्यापेक्षां नदीचें पुण्यकर. याप्रमाणेंच तीर्थें, नदी, गंगा व समुद्र यांचें पाणी एकापेक्षां दुसरें अधिक पुण्यकारक. ग्रहणांत वस्त्रासह स्नान करावें. अशा स्नानाला कांहीं ग्रंथकारांनीं मुक्तिस्नान असें म्हटलें आहे. तें मुक्तिस्नान जर केलें नाहीं, तर सुतकीपणा जात नाहीं. ग्रहणाच्या स्नानाला मंत्राची जरूर नसते. सवाष्णींनीं गळ्याखालून स्नान करावें. शिष्टांच्या बायका ग्रहणांत डोक्यावरून स्नान करतात. सोयर अथवा सुतक यांमध्यें ग्रहणाबद्दल-स्नान, दान, श्राद्ध वगैरे अवश्य करावींत. नैमित्तिक स्नान करण्याचा जर प्रसंग आला, आणि बायको जर विटाळशी असली. तर भांड्यांत पाणी घेऊन, त्यानें स्नान करून व्रत करावें. वस्त्र पिळूं नये व दुसरें नेसूं नये. तीन दिवस किंवा एक दिवस उपास करून ग्रहणाचीं स्नानदानादि कर्में केलीं असतां मोठें फळ मिळतें. एकच दिवस जर उपास करणें असेल, तर तो ग्रहणाच्या आदल्या दिवशीं करावा असें कोणी ग्रंथकार म्हणतात व कोणी ग्रंथकार ग्रहणासंबंधाचा उपास अहोरात्र करावा असेंही म्हणतात. मुलगे असलेल्या व गृहस्थाश्रमी अशांनीं ग्रहण, संक्रांति वगैरे दिवशीं उपास करूं नये. पुत्रवान् या शब्दाचा अर्थ कांहीं ग्रंथकार कन्यावान् असा करून, तशांनींही उपास करूं नये असें म्हणतात. ग्रहणांत देव आणि पितर यांचें तर्पण करण्यास कांहीं ग्रंथकारांना सांगितलें आहे. 'सर्व वर्णांना राहुदर्शनाचें सुतक आहे' म्हणून, ग्रहणकालांत स्पर्श झालेलीं वस्त्रादिकें पाण्यानें धुऊन शुद्ध करावींत. गाई, भूमि, सोनें, धान्य वगैरेंचें जर ग्रहणांत दान केलें, तर त्याचें महाफल आहे. तप आणि विद्या या दोहोंनीं युक्त असणारा जो ब्राह्मण, तो दानपात्र होय. सत्पात्रीं दानाचें मोठें पुण्य आहे. 'चंद्रसूर्यांच्या ग्रहणांत सर्व पाणी गंगेप्रमाणें, सर्व ब्राह्मण व्यासांसारखे आणि सर्व दानें भूमिदानासारखीं' असें जें वचन आहे, तें सामान्य पुण्याच्या अभिप्रायानें आहे; म्हणून 'ब्राह्मण नसलेल्याला दिलेल्या दानाचें फल सम, ब्राह्मणब्रुवाला दिलेल्याचें दुप्पट फल, श्रोत्रियाला दिल्याचें लक्षपट फल आणि सत्पात्राला दिल्याचें अनंत फल' असें कमी अधिक फळ सांगितलें आहे. संस्कार वगैरे ज्याचे झालेले नाहींत असा फक्त जातीनें जो ब्राह्मण त्याला अब्राह्मण म्हणावें. अशाला दान केलें असतां, वर जें सांगितलें तेंच फळ मिळतें. गर्भाधानादि संस्कार झालेला पण वेदाध्ययन, वेदा-

ध्यापन, इत्यादिकांनीं रहित, असा जो तो नांवाचा ब्राह्मण, त्याला ब्राह्मणब्रुव म्हणतात, अशाला दान केलें असतां दुप्पट फळ मिळतें. वेदाध्ययनादिकांनीं जो युक्त त्याला श्रोत्रीय म्हणतात; अशाला दान केलें असतां हजारपट फळ मिळतें. विद्या, सदाचरण वगैरेंनीं जो युक्त तो सत्पात्र; अशाला दान केलें असतां अगणितपट फळ मिळतें. याप्रमाणें वरच्या वाक्याचा अर्थ जाणावा. ग्रहणांतलें श्राद्ध करायचें तें आमान्नाचें अथवा हिरण्यरूपी करावें. श्रीमंतानें पक्वानें करून करावें. सूर्यग्रहणांत तीर्थयात्रांग-श्राद्धाप्रमाणें ज्यांत तूप मुख्य आहे अशा अन्नानें श्राद्ध करावें. ग्रहणांत श्राद्धाला जेवणारा महादोषी होतो. श्रीमन्तानें ग्रहणांत तुलादानादिक करावें. चंद्र आणि सूर्य यांच्या ग्रहणांत तीर्थाचे ठिकाणीं महापर्वकाळीं मंत्राची जर दीक्षा घेणें असेल, तर महिना, नक्षत्र वगैरे शोधण्याची जरूरी नाहीं. मंत्रदीक्षा घेण्याचा प्रकार तंत्रग्रंथांत पाहावा. दीक्षा शब्दांत उपदेशाचा अन्तर्भाव होतो. युगायुगांत दीक्षा होते आणि कलियुगांत उपदेश होतो. मंत्र घेण्याच्या कामीं सूर्यग्रहणच मुख्य आहे. चंद्रग्रहणांत जर मंत्र घेतला, तर दारिद्र्यादिक दोष प्राप्त होतात असें कोणी सांगतात. 'आधीं उपास करून, चंद्रसूर्यांच्या ग्रहणांत स्नान करावें; आणि स्पर्शकालापासून मोक्षकाला-पर्यंत एकाग्रचित्तानें मंत्राचा जप करावा, मग जपाचा दशांश होम करावा, आणि नंतर होमाचा दशांश तर्पण करावें. होम करण्याचें सामर्थ्य नसल्यास, होमसंख्येच्या चौपट जप करावा.' मूलमंत्राचा जप करून, त्याच्या शेवटीं द्वितीया विभक्त्यंत असा मंत्रदेवतेच्या नांवाचा उच्चार करून, 'अमुकदेवतां तर्पयामि नमः' असें मोठ्यानें म्हणावें. यवादियुक्त अशा पाण्याच्या ओंजळींनीं होमाच्या दशांशानें तर्पण करावें. याप्रमाणें 'नमः' पर्यंत संपूर्ण मूलमंत्राचा उच्चार करून, अमुक देवतेला मी अभिषेक करतों असें म्हणून तर्पणाच्या पाण्यानें आपल्या स्वतःच्या मस्तकावर अभिषेक करावा. याप्रमाणें तर्पणाच्या दशांशानें मार्जन करावें व तर्पणाच्या दशांशानें ब्राह्मणभोजन घालावें. याप्रमाणें—जप, होम, तर्पण, मार्जन आणि ब्राह्मणभोजन हें पांच प्रकारांच्या रूपाचें पुरश्चरणच होय. तर्पण वगैरें करणें जर अशक्य असेल, तर त्या त्या संख्यांच्या चौपट जप करावा. हा जो पुरश्चरणाचा प्रकार सांगितला, तो ग्रासमहित उदय अथवा अस्त पावणाऱ्या ग्रहणांत होत नाहीं. पुरश्चरणासंबंधानें जो उपास करावयाचा, तो पुत्रवान् आणि गृहस्थाश्रमी यांनींही करावा. पुरश्चरण करणाऱ्याच्या नित्य नैमित्तिक स्नानदानादिकांचा जर लोप होईल, तर दोष सांगितला असल्यानें, स्नानदानादिक कर्में मुलगा, बायको वगैरे प्रतिनिधींकडून करवावीं.

५५ अत्रेत्थमितिकर्तव्यता स्पर्शकालात्पूर्वं स्नात्वा अमुकगोत्रोऽमुकशर्माहंराहु-ग्रस्तेदिवाकरेनिशाकरेवा अमुकदेवताया अमुकमन्त्रसिद्धिकामो ग्रासादिमुक्ति-पर्यन्तममुकमन्त्रस्यजपरूपंपुरश्चरणंकरिष्ये इतिसंकल्पं च कृत्वाऽऽसनबन्ध-न्यासादिकं च स्पर्शात्पूर्वमेवविधायस्पर्शादिमोक्षपर्यन्तंमूलमन्त्रजपंकुर्यात् ततःपरदिनेस्नानादिनित्यकृतंविधाय अमुकमन्त्रस्यकृतैतद्ग्रहणकालिकामुकसं-ख्याकपुरश्चरणजपसाङ्गतार्थंतद्दशांशहोमतद्दशांशतर्पणतद्दशांशमार्जनतद्दशां-

शब्राह्मणभोजनानिकरिष्येइतिसंकल्प्य होमादिकंतत्तच्चतुर्गुणद्विगुणान्यतरजपंवाकुर्यात् ग्रहणकालेचतत्प्रेरितःपुत्रादिरमुकशर्मणोऽमुकगोत्रस्यामुकग्रहणस्पर्शस्नानजनितश्रेयः प्राप्त्यर्थं स्पर्शस्नानंकरिष्येइत्यादिसंकल्पपूर्वकंतदीयस्नानदानादिककुर्यात् पुरश्चरणमकुर्वद्भिरपिगुरूपदिष्टःस्वस्वेष्टदेवतामन्त्रजपोगायत्रीजपश्चावश्यंग्रहणेकार्योऽन्यामन्त्रमालिन्यम् ग्रहणकालेशयनेकृते रोगो मूत्रेदारिद्र्यं पुरीषेकृमिर्मैथुनेग्रामसूकरोऽभ्यङ्गेकुष्ठीभोजनेनरकइति पूर्वपक्कमन्नंग्रहणोत्तरंत्याज्यम् एवंग्रहणकालस्थितजलपानेपादकृच्छ्राभिधानाज्जलमपि त्याज्यम् काञ्जिकंतक्रंघृततैलपाचितमन्नंक्षीरंचपूर्वसिद्धंग्रहणोत्तरं ग्राह्यम् घृतेसंधिते गोरसेषुग्रहणकालेकुशान्तरायंकुर्यात् ।

**ग्रहणांत मंत्रग्रहण करण्याविषयींचा विधि**—स्पर्शकालाच्या आधीं स्नान केल्यावर 'अमुक गोत्रोऽमुकशर्माहं राहुग्रस्ते दिवाकरे निशाकरे वा अमुकदेवताया अमुकमंत्रसिद्धिकामो ग्रासादिमुक्तिपर्यन्तं अमुक मंत्रस्य जपरूपं पुरश्चरणं करिष्ये' असा संकल्प करावा आणि आसनविधि, न्यास वगैरे स्पर्शाच्या पूर्वीं करावींत. मूलमंत्राचा जप, स्पर्शापासून आरंभ करून मोक्षापर्यंत जपावा. नंतर दुसऱ्या दिवशीं स्नानादिक नित्यकर्म करून, 'अमुकमंत्रस्य कृतैतद्ग्रहणकालिकामुकसंख्याकपुरश्चरणजपसांगतार्थंतद्दशांशहोम तद्दशांशतर्पण तद्दशांशमार्जन तद्दशांशब्राह्मणभोजनादिकरिष्ये' अशा संकल्पानंतर होमादिक कृत्यें करावींत. अथवा होमादिकांच्या चौपट किंवा दुप्पट जप करावा. पुरश्चरण करणाऱ्यानें आपल्या पुत्रादिकांना आपल्या स्नानादिक क्रिया करण्याची आज्ञा केल्यावर, पुत्रादिकांनीं, 'अमुकशर्मणोऽमुकगोत्रस्यामुकग्रहणस्पर्शस्नानजनिश्रेयःप्राप्त्यर्थं स्पर्शस्नानं करिष्ये' असा संकल्प करून, त्याचीं स्नानादिक कृत्यें करावींत. पुरश्चरण जे कोणी न करतील त्यांनींही गुरूनें सांगितलेल्या मंत्राचा, आपापल्या इष्टदेवतेच्या मंत्राचा आणि गायत्रीमंत्राचा जप, ग्रहणांत अवश्य करावा. नाहींतर मंत्र मलिन होतो. ग्रहणांत जर झोंप घेतली तर रोग, मूत्रोत्सर्ग केला तर दारिद्र्य, शौचाला गेल्यास कृमिजन्म, मैथुन केलें असतां गांवडुकराचा जन्म, अभ्यंग केल्यास कोड आणि जेवण केल्यास नरकप्राप्ति—अशीं फळें सांगितलीं आहेत. ग्रहणाच्या पूर्वीं शिजवलेलें अन्न ग्रहण सुटल्यावर टाकून द्यावें. ग्रहणांतलें पाणी प्यायलें तर पादकृच्छ्रप्रायश्चित्त सांगितलें आहे, म्हणून तें पाणी टाकून द्यावें. कांजी, ताक, तूप व तेल यांत तळलेले पदार्थ व दूध या वस्तु ग्रहणाच्या आधीं तयार केलेल्या असल्यास, ग्रहणानंतर घ्याव्या. तूप, लोणचीं व दूध यांत ग्रहणाच्या वेळीं दर्भ घालावेत.

५६अथवेधविचारः सूर्यग्रहेग्रहणप्रहरादर्वाक्यामचतुष्टयंवेधः चन्द्रग्रहेतुप्रहरत्रयम् तथाचदिनप्रथमप्रहरेसूर्यग्रहेपूर्वरात्रिप्रहरचतुष्टयेनभोक्तव्यम् द्वितीये यामेग्रहणेरात्रिद्वितीययामादौनभोक्तव्यम् एवंरात्रिप्रथमप्रहरेचन्द्रग्रहेदिनद्वितीय यामादौनभुञ्जीत रात्रिद्वितीययामादौग्रहणे दिनतृतीययामादौनभुञ्जीत बालवृद्धातुरविषयेतुसार्धप्रहरात्मकोमुहूर्तत्रयात्मकोवावेधः शक्तस्यवेधकाले भोजनेत्रि-

दिनमुपोषणंप्रायश्चित्तम् ग्रहणकालेभोजनेप्राजापत्यंप्रायश्चित्तम् चन्द्रस्यग्रस्तोदयेतुयामचतुष्टयवेधात्तत्पूर्वंदिवानभुञ्जीत केचित्तुचन्द्रपूर्णमण्डलग्रासेयामचतुष्टयंवेधएकदेशग्रासेयामत्रयमित्याहुः ग्रस्तास्तेतु ग्रस्तावेवास्तमानंतुरवीन्दू प्राप्नुतोयदि । परेद्युरुदयेस्नात्वाशुद्धोभ्यवहरेन्नरः॥१॥ अत्रस्नात्वा शुद्धइत्युक्त्वा शुद्धमण्डलदर्शनकालिकस्नानात्पूर्वमशुद्धिप्रतिपादनाज्जलाहरणपाकादिकंशुद्धबिम्बोदयकालिकस्नानात्पूर्वंकार्यमितिभाति सूर्यग्रस्तास्तादौ पुत्रवद्गृहिणउपवासनिषेधात्तेनषण्मुहूर्तात्मकंवेधंत्यक्त्वाग्रहणात्पूर्वंनभोक्तव्यमितिकेचित् पुत्रवद्गृहिणामपितत्रोपवासएवकार्यइतिमाधवमतमेवतुशिष्टाचारानुसृतंयुक्तम् सूर्यग्रस्तास्तेचंद्रग्रस्तोदयेचाहिताग्निनान्वाधानंविधायजलेनव्रतंकार्यं नतुभोजनम् चन्द्रग्रस्तास्तेउत्तरदिनेसंध्याहोमादौनदोषः तत्राल्पकालेनशास्त्रतोमुक्तिनिश्चयेमुक्त्यनन्तरंस्नात्वाहोमादिकंकर्तव्यम् चिरकालेनमुक्तौहोमकालातिक्रमप्रसङ्गाद्ग्रस्तोदयइवग्रहणमध्ये एवसंध्याहोमंचकृत्वाशास्त्रतोमुक्तिकालेस्नात्वाब्रह्मयज्ञादिनित्यकर्म कर्तव्यमितिभाति दर्शेग्रहणनिमित्तकश्राद्धेनैवदर्शश्राद्धसंक्रान्तिश्राद्धानां प्रसङ्गसिद्धिर्भवति ग्रहणादिनेपित्रादेर्वार्षिकश्राद्धप्राप्तौसतिसंभवेन्नेनकार्यम् ब्राह्मणाद्यलाभेनासंभवेतुआमेनहेम्नावाकार्यम् ।

**ग्रहणवेधविचारः**—ग्रहणाच्या प्रहराच्या आधीं सूर्यग्रहणाचा वेध चार प्रहर असतो. दिवसाच्या पहिल्या प्रहरांत जर सूर्यग्रहण असेल, तर आदल्या दिवसाच्या रात्रींच्या चार प्रहरांत जेवूं नये. ग्रहण जर दुसऱ्या प्रहरांत असेल, तर आदल्या रात्रीच्या दुसऱ्या प्रहरापासून जेवण वर्ज्य. त्याचप्रमाणें चंद्रग्रहण जर पहिल्या प्रहरांत असेल, तर दिवसाच्या दुसऱ्या प्रहरापासून भोजन वर्ज्य करावें. हेंच ग्रहण जर रात्रीच्या दुसऱ्या प्रहरीं असेल, तर दिवसाच्या तिसऱ्या प्रहरापासून जेवणाचा त्याग करावा. बाल, वृद्ध व रोगी यांच्यासंबंधानें दीड प्रहर किंवा तीन मुहूर्त म्हणजे सहा घटका समजावा. सशक्तानें जर वेधांत जेवण केलें तर त्यानें तीन दिवसांच्या उपासाचें प्रायश्चित करावें. ग्रहणांत जेवण केल्यास प्राजापत्य—प्रायश्चित्त करावें. ग्रहण लागलें असतांना जर चंद्रोदय होईल, तर चार प्रहर वेध असतो, म्हणून आदल्या दिवशीं जेवूं नये. खग्रास चंद्रग्रहण असल्यास चार प्रहर वेध आणि एकदेशग्रास असल्यास तीन प्रहर वेध असतो असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. चंद्रग्रहण खग्रास असतांच जर चंद्रास्त होईल, तर 'ग्रहण असून जर चंद्र व सूर्य हे अस्त पावतील, तर दुसऱ्या दिवशीं उदयाच्या वेळीं स्नान करून, शुद्ध होऊन मनुष्यानें व्यवहार करावा' असें वचन आहे. येथे स्नान करून शुद्ध व्हावें, असें म्हटलें आहे यावरून, शुद्ध मंडळाच्या दर्शनाच्या वेळीं जें स्नान करायचें, त्याच्या आधीं शुद्धि नाहीं असें सांगितलें आहे, म्हणून पाणी आणणें, सैपाक करणें वगैरे जें करणें तें, शुद्ध बिंबाचा उदय झाल्यावर जें स्नान करायचें त्याच्या आधीं करूं नये असें मला वाटतें. सूर्यग्रहण जर ग्रस्तास्त होईल किंवा ग्रस्तोदित होईल तर पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमी माणसाला उपासाचा निषेध सांगितला आहे; यास्तव त्यानें सहा मुहूर्तांचा वेध

टाकून, ग्रहणाच्या पूर्वीं जेवावें असें कोणी म्हणतात. पुत्रवान् अशा गृहस्थानेंही ग्रहणांत उपास करावा, असें जें माधवाचें मत, तें शिष्टाचाराला अनुसरून असल्यानें, योग्य दिसतें. सूर्यग्रहण जर ग्रस्तावस्थेंत अस्त पावेल आणि चंद्रग्रहण जर लागलेलेंच उदयाला येईल, तर अग्निहोत्र्यानें अन्वाधान करून, पाण्यानें व्रत करावें आणि जेवूं नये. चंद्रग्रहण जरी ग्रस्तास्त असलें तरी दुसऱ्या दिवशीं संध्या, होम वगैरे करण्यांत दोष नाहीं. ग्रहण थोड्याच वेळांत सुटेल असा जर शास्त्राधार कळला, तर तें सुटण्याच्या वेळेनंतर स्नान करून होमादिक कृत्यें करावींत. फार वेळानें सुटणारें असल्यास होमकाळाची वेळ निघून जाते म्हणून, ग्रहण लागलेलेंच बिंब उदय पावण्याच्याप्रमाणेंच, ग्रस्त स्थितींत अस्त पावलेल्या ग्रहणांतही संध्या, होम वगैरे करून, शास्त्रीय रीत्या ग्रहण सुटण्याचा जो काळ ठरेल त्या काळीं स्नान करून, ब्रह्मयज्ञादि नित्य कर्म करावें असें मला वाटतें. दर्शश्राद्ध व संक्रांतिश्राद्ध यांची प्रसंगसिद्धि अमावास्येच्या दिवशीं ग्रहणनिमित्तक श्राद्ध केल्यानें होते. ग्रहणाच्या दिवशीं जर पित्रादिक वार्षिक श्राद्ध आलें, तर शक्य असल्यास तें अन्नानेंच करावें. ब्राह्मणादिक न मिळाल्यास, तें आमान्नाचें किंवा हिरण्यद्वारा करावें.

५७स्वजन्मराशेस्तृतीयषष्ठैकादशदशमराशिस्थितंग्रहणंशुभप्रदम् द्वितीयसप्तमनवपञ्चमस्थानेषुमध्यमम् जन्मचतुर्थाष्टमद्वादशराशिस्थितमनिष्टप्रदम् यस्यजन्मराशौजन्मनक्षत्रेवाग्रहणं तस्यविशेषतोऽनिष्टप्रदं तेनगर्गाद्युक्ताशान्तिः कार्या अथवा बिम्बदानंकार्यम् तद्यथा चन्द्रग्रहेरजतमयंचन्द्रबिम्बंसुवर्णमयं नागबिम्बंचकृत्वा सूर्यग्रहेसौवर्णसूर्यबिम्बंनागबिम्बंचकृत्वाघृतपूर्णताम्रपात्रेकांस्यपात्रेवानिधायतिलवस्त्रदक्षिणासाहित्यंसंपाद्य ममजन्मराशिजन्मनक्षत्रस्थितामुकग्रहणसूचितसर्वानिष्टप्रशान्तिपूर्वकंएकादशस्थानस्थितग्रहणसूचितशुभफलावाप्तयेबिम्बदानं करिष्येइतिसंकल्प्य सूर्यचन्द्रंराहुंचध्यात्वानमस्कृत्य। तमोमयमहाभीमसोमसूर्यविमर्दन। हेमताराप्रदानेनममशान्तिप्रदोभव १ विधुंतुदनमस्तुभ्यंसिंहिकानन्दनाच्युत। दानेनानेननागस्य रक्षमांवेधजाद्भयात् २ इतिमन्त्रमुच्चार्य इदंसौवर्णराहुबिम्बंनागं सौवर्ण रविबिम्बं राजतंचन्द्रबिम्बंवा घृतपूर्णकांस्यपात्रनिहितं यथाशक्तितिलवस्त्रदक्षिणासहितं ग्रहणसूचितारिष्टविनाशार्थं शुभफलप्राप्त्यर्थंचतुभ्यमहंसंप्रददेइतिदानवाक्येनपूजितब्राह्मणाय दद्यात् एवंचतुर्थाद्यनिष्टस्थानेष्वपिदानंकार्यमितिभाति यस्यजन्मराश्यादिग्रहणंतेन राहुग्रस्तरवीन्दुबिम्बंनावलोकनीयम् इतरजनैरपिपटजलादिव्यवधाने नैवग्रस्तबिम्बंद्रष्टव्यं नसाक्षात् मङ्गलकार्येषुपूर्णग्रासे चन्द्रग्रहेद्वादश्यादितृतीयान्तंदिनसप्तकंवर्ज्यम् सूर्यपूर्णग्रासेएकादश्यादिचतुर्थ्यन्तदिनानिवर्ज्यानि खण्डग्रहणेतु चतुर्दश्यादिदिनत्रयंवर्ज्यम् ज्योतिर्निबन्धेषुग्रासपादतारतम्येन दिनाधिक्यानत्वंतारतम्येनयोजितम् ग्रस्तास्तेपूर्वंदिनत्रयंवर्ज्यम् ग्रस्तोदयेपरंदिनत्रयं वर्ज्यम् ग्रहणनक्षत्रंषण्मासंपूर्णग्रासेवर्ज्यम् पादादिग्रासेसार्धमासादितारतम्येन

**योऽयम् पूर्वसंकल्पितस्यद्रव्यस्यग्रहणोत्तरं दानेतद्द्विगुणंदेयंभवति इतिग्रहण-निर्णयोद्देशः**

**ग्रहणशुभाशुभनिर्णयः**—स्वतःच्या जन्मराशीपासून—तिसऱ्या, सहाव्या, अकराव्या आणि दहाव्या राशीवर झालेलें ग्रहण शुभकारक होय. दुसऱ्या, सातव्या, नवव्या आणि पांचव्या—यांवर झालेलें मध्यम होय. जन्म अथवा तनुस्थान, चौथें स्थान, आठवें स्थान आणि दहावें स्थान—या राशींवर झालेलें अशुभ फलाचें होय. ज्याच्या जन्मराशीवर अथवा जन्मनक्षत्रावर ग्रहण होतें, त्याला तें विशेष हानिकारक असतें, म्हणून त्यानें गर्गादिकांनीं सांगितलेली शान्ति करावी, अथवा बिंबदान करावें. बिंबदानाचा प्रकार असा:–चंद्रग्रहण असल्यास रुप्याचें चंद्रबिंब व सोन्याचेंच नागबिंब आणि सूर्यग्रहण असल्यास, सोन्याचें सूर्यबिंब व सोन्याचेंच नागबिंब करून, तें तुपानें भरलेल्या तांब्याच्या भाड्यांत किंवा काश्याच्या भांड्यांत ठेवून—तीळ, वस्त्र, दक्षिणा वगैरे साहित्य तयार करून, 'ममजन्मराशिजन्मनक्षत्रस्थितामुकग्रहणसूचित सर्वानिष्टप्रशान्तिपूर्वकं एकादशस्थानस्थितग्रहणसूचित शुभफलावाप्तये बिंबदानं करिष्ये' असा संकल्प करून, चंद्र, सूर्य व राहू यांचें ध्यान करून त्यांना नमस्कार करावा, आणि नंतर 'तमोमय महाभीम सोमसूर्यविमर्दन। हेमताराप्रदानेन ममशान्तिप्रदोभव। विधुंतुद नमस्तुभ्यं सिंहिकानंदनाच्युत। दानेनानेन नागस्य रक्ष मां वेधजाद्भयात्।' असा मंत्र उच्चारून, 'इदं सौवर्णं राहुबिंबं नागं सौवर्णं रविबिंबं राजतं चंद्रबिंबं वा घृतपूर्णकांस्यपात्रनिहितं यथाशक्ति तिलवस्त्र-दक्षिणासहितं ग्रहणसूचितारिष्टविनाशार्थं शुभफलप्राप्त्यर्थं च तुभ्यमहं संप्रददे।' या दान देण्याच्या वाक्यानें, आधीं पूजा केलेल्या ब्राह्मणाला त्याचें दान द्यावें. (बिंब म्हणजे प्रतिमा). यालाच अनुसरून चौथ्या वगैरे अनिष्ट स्थानीं जरी ग्रहण झालें तरी दान करावें असें मला वाटतें. ज्याच्या जन्मराश्यादिकांत ग्रहण होतें त्यानें सूर्यबिंब अथवा चंद्रबिंब यांचें अवलोकन करूं नये. इतरांनीं देखील वस्त्र, पाणी वगैरेंतूनच बिंब पाहावें. नुसत्या दृष्टीनें पाहूं नये. खग्रास चंद्रग्रहण असल्यास, द्वादशीपासून तृतीयेपर्यंत सात दिवस कोणचेंही मंगलकार्य करूं नये. खग्रास सूर्यग्रहण असल्यास एकादशीपासून चतुर्थीअखेरपर्यंतचे दिवस (मंगलकार्यासाठीं) वर्ज्य करावेत. खंडग्रहण असल्यास चतुर्दश्यादि तीन दिवस (मंगलकार्यार्थ) वर्ज्य करावेत. ग्रासाचे चरण जसे कमी अधिक होतील त्या मानानें दिवसांचेंही प्रमाण कमीजास्ती योजावें असें ज्योतिषग्रंथांत सांगितलें आहे. ग्रहणाच्याच स्थितींत जर अस्त होत असेल, तर आधींचे तीन दिवस टाकावेत. ग्रहण लागलेल्या अवस्थेंतच जर उदय होईल, तर पुढचे तीन दिवस सोडावेत. अगदीं खग्रास असल्यास पुढचे सहा महिनेपर्यंत, ज्या नक्षत्रावर ग्रहण झालें असेल तें नक्षत्र वर्ज्य करावें. थोडा ग्रास (पादादि) असल्यास दीड महिना वगैरे प्रमाणानें वर्ज्य करावें. पूर्वी दान करण्याचा संकल्प केलेल्या द्रव्याचें दान जर ग्रहणांत केलें तर द्विगुणित होतें. याप्रमाणें येथें ग्रहणनिर्णयाचा एकतिसावा उद्देश संपला.

५८ समुद्रस्नाननिर्णयः समुद्रेपौर्णमास्यमावास्यादिपर्वसुस्नायात् भृगुभौमदिनेस्नानंवर्जयेत् । अश्वत्थसागरौसेव्यौनस्पर्शस्तुकदाचन । अश्वत्थंमन्दवारेचसागरंपर्वणिस्पृशेत् १ नकालनियमःसेतौसमुद्रस्नानकर्मणि । समुद्रस्नानप्रयोगोन्यत्रज्ञेयः इति धर्मसिन्धुसारेसमुद्रस्नानोद्देशः ३२

**समुद्रस्नाननिर्णयः**—पौर्णिमा, अमावास्या वगैरे पर्वांच्या दिवशीं समुद्रस्नान करावें गुरुवारीं व मंगळवारीं समुद्रस्नान करूं नये. त्या वारीं पिंपळ व समुद्र यांची सेवा करावी पण त्यांना स्पर्श करूं नये. पिंपळाला शनिवारीं स्पर्श करावा आणि समुद्राला पर्वकाळीं करावा. सेतुबंधाच्या ठिकाणीं समुद्रस्नानाविषयीं कोणचाही निर्बन्ध नाहीं. समुद्रस्नानाचा निर्णय इतर ग्रंथांत सांगितला आहे. याप्रमाणें येथें समुद्रस्नाननिर्णयाचा बत्तीसावा उद्देश संपला.

५९ तिथिविशेषेनक्षत्रविशेषेवारादौचविधिनिषेधाः । सप्तम्यांनस्पृशेत्तैलंनीलवस्त्रंनधारयेत् । नचाप्यामलकैः स्नानंनकुर्यात्कलहंनरः १ सप्तम्यांनैवकुर्वीतताम्रपात्रेणभोजनम् । नन्दातिथिष्वभ्यंगोवर्ज्यः रिक्तासुक्षौरंवर्ज्यम्जयासुमांसंशूद्राद्यैर्वर्ज्यम् पूर्णासुस्त्रीवर्ज्या रविवारेऽभ्यङ्गो भौमवारेक्षौरंबुधेयोषिच्चवर्ज्या चित्राहस्तश्रवणेषुतैलंवर्ज्यम् विशाखप्रतिपत्सुक्षौरंवर्ज्यम् मघाकृत्तिकाद्युत्तरासुस्त्रीनसेव्या तिलभक्षणंतिलतर्पणंचसप्तम्यांन नारीकेलमष्टम्यामलाबुनवम्यांपटोलंदशम्यांनिष्पावमेकादश्यांमसूरंद्वादश्यांवार्ताकंत्रयोदश्यांवर्ज्यम्। पौर्णिमादर्शसंक्रान्तिचतुर्दश्यष्टमीषुच।नरश्चण्डालयोनिःस्यात्तैलस्त्रीमांससेवनात् । पूर्णिमादर्शसंक्रान्तिद्वादशीषुश्राद्धदिनेचवस्त्रंनपीडयेत् रात्रौमृदंगोमयमुदकंचनाहरेत् गोमूत्रंप्रदोषकालेनगृह्णीयात् अमादिपर्वस्ववश्यं शान्त्यर्थंतिलहोमीस्यात् आत्मरक्षणायदानादिकंचकुर्यात् पर्वसुनाधीयीत शौचाचमनब्रह्मचर्यादिसेवीस्यात् प्रतिपद्दर्शषष्ठीनवमीतिथिषुश्राद्धदिनेजन्मदिनेव्रतेचोपवासेचरविवारेमध्याह्नस्नानसमयेच काष्ठेनदन्तधावनंवर्ज्यम् । अलाभेदन्तकाष्ठानांनिषिद्धेपिदिनेतथा । अपांद्वादशगण्डूषैः पत्रैर्वाशोधयेन्मुखम् १ अत्र सर्वत्रनिषेधेषुतिथ्यादिकंतत्कालव्यापिग्राह्यम् इतिधर्मसिन्धुसारेतिथ्यादौविधिनिषेधसंग्रहोद्देशस्त्रयस्त्रिंशत्तमः ३३

**तिथि, नक्षत्रें आणि वार यांचा विधिनिषेधः**—सप्तमीला तेलाला स्पर्श करूं नये, काळें वस्त्र वापरूं नये, आंवळकाठीच्या काढ्यानें स्नान करूं नये, भांडण करूं नये व तांब्याच्या भांड्यांत जेवूं नये, प्रतिपदा, षष्ठी आणि एकादशी या दिवशीं तैलाभ्यंग करूं नये. चतुर्थी, नवमी व चतुर्दशी या तिथींवर क्षौर करूं नये. (क्षौर म्हणजे हजामत.) तृतीया, अष्टमी व त्रयोदशी या तिथींवर शूद्रादिकांनीं मांस खाऊं नये. पंचमी, दशमी व पौर्णिमा या तिथींवर स्त्रीसंग करूं नये. आदित्यवारीं तैलाभ्यंग, मंगळवारीं हजामत (स्मश्रु) आणि बुधवारीं स्त्रीसंग; हीं वर्ज्य करावींत. चित्रा, हस्त व श्रवण या नक्षत्रांवर तेल वर्ज्य करावें. विशाखा व प्रतिपदा यांवर क्षौर वर्ज्य आहे. मघा, कृत्तिका

आणि तीन उत्तरा यांवर स्त्रीसंभोग करूं नये. सप्तमीला तीळ खाणें व तिळांनीं तर्पण करणें, अष्टमीला नारळ, नवमीला भोंपळा, दशमीला पडवळ, एकादशीला निष्पाव म्हणजे पावटा, पांढरा पावटा, चवळी, काळे वाल व घेवडा, द्वादशीला मसुरा, त्रयोदशीला वांगीं हीं वर्ज्य करावींत. पौर्णिमा, अमावास्या, संक्रान्ति, चतुर्दशी आणि अष्टमी या तिथींवर तेल, स्त्रीसंग आणि मांससेवन, हीं केल्यास चांडाळाचा जन्म येतो. पौर्णिमा, अमावास्या, संक्रान्ति, द्वादशी व श्राद्धाची तिथि यांवर वस्त्र पिळूं नये. रात्रीं माती, शेण व पाणी हीं आणूं नयेत. प्रदोषकाळीं गोमूत्र घेऊं नये. अमावास्यादि पर्वांवर शान्तीसाठीं तिळाचा होम अवश्य करावा. स्वतःच्या रक्षणाकरितां दानादि कर्में करावींत. पर्वांचे दिवशीं शिक्षणाला सुटी घ्यावी व शौच, आचमन आणि ब्रह्मचर्य यांचें सेवन करावें, प्रतिपदा, अमावास्या, षष्ठी, नवमी, श्राद्धदिन, जन्मदिवस, व्रतदिन, उपासाचा दिवस, रविवार व मध्याह्नसमय या काळीं काटक्यांनीं दांत घांसूं नयेत. दांत घांसण्याच्या काड्या ज्या दिवशीं मिळणार नाहींत त्या दिवशीं आणि निषिद्ध दिवशीं पाण्याच्या बारा चुळा करून किंवा झाडाच्या पानांनीं तोंड धुवावें. या सर्व निषेधांत जीं तिथिवारनक्षत्रादि घेणें तीं सर्व तत्कालव्यापी अशीं जीं असतील तींच घ्यावींत. याप्रमाणें येथें तिथि, वार व नक्षत्रें यांच्या निर्णयाचा तेहेतिसावा उद्देश संपला.

**६० मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोऽनलसाबुधाः । कृतकार्याःप्राङ्निबन्धैस्तदर्थनायमुद्यमः १ येपुनर्मन्दमतयोऽलसा अज्ञाश्चनिर्णयम् । धर्मेवांदितुमिच्छन्तिराचितस्तदपेक्षया २ निबन्धोयंधर्मसिन्धुसारनामासुबोधनः । अमुना प्रीयतांश्रीमाद्विट्ठलोभक्तवत्सलः ३ सर्वत्रमूलवचनानिहज्ञेयानितद्विचाराश्च । कौस्तुभनिर्णयसिन्धुश्रीमाधवकृतनिबन्धेभ्यः ४ प्रेम्णासद्भिर्ग्रन्थःशब्दार्थतःसदोषोपि। संशोध्यवापिहरिणासुदामसुनिसतुषपृथुकमुष्टिरिव ५ इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारे प्रथमपरिच्छेदःसमाप्तः ।।**

**ग्रंथप्रयोजन**—मीमांसा व धर्मशास्त्र जाणणारे, बुद्धिवान् आणि ज्यांना आळस नाहींत असे जे पण्डित, ते पूर्वींचे ग्रंथ पाहून प्राप्त कार्यें करीत असतातच; म्हणून त्यांच्यासाठीं मीं हा उद्योग केलेला नाहीं. बुद्धिहीन, आळशी व अडाणी असून जे धर्माबद्दलचा निर्णय समजण्याची इच्छा करतात, त्यांच्यासाठीं मीं हा 'धर्मसिन्धुसार' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. भक्तवत्सल असा श्रीमद्विठ्ठल या ग्रंथानें संतुष्ट होवो. या ग्रंथांत दिलेलीं सारीं मूळचीं वचनें व त्यांबद्दलचा विचार जर समजून घ्यायचा असेल, तर—कौस्तुभ, निर्णयसिन्धु आणि श्रीमाधव यांचे ग्रंथ पाहावेत. हा माझा ग्रंथ—शब्द व त्यांचे अर्थ—या बाबतींत जरी सदोष असला, तरी सज्जनांनीं याचा प्रेमपूर्वक स्वीकार करून, त्याचें संशोधन करावें. कोंड्यानें भरलेले सुदाम्याचे पोहे श्रीकृष्णानें निवडून घेऊन जसे स्वीकारले, त्याचप्रमाणें सज्जनांनीं माझ्या ग्रंथाचा स्वीकार करावा. याप्रमाणें अनंतोपाध्यायांचे पुत्र काशीनाथोपाध्याय यांनीं रचिलेला जो 'धर्मसिन्धुसार' नांवाचा ग्रंथ, त्याचा पहिला परिच्छेद येथें संपला.

अत्र न्यूनत्वं सूर्योदयात्प्राक्समाप्तिमत्वम् समत्वंसूर्योदयसमकालिकसमाप्तिमत्वम् षष्टिघटिकारूपम् । आधिक्यं सूर्योदयोत्तरंसत्वम्

## २१ अथ वैष्णवानां शुद्धैकादशीभेदः (धर्माब्धिनिर्णयः)

| | दशमी | | एकादशी | | द्वादशी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| शुद्धन्यूनान्यूनद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम्. | ५५<br>५५ | ५९<br>० | ५९<br>५७ | ५९<br>० | ५९<br>५८ | ५९<br>० | **इयमनुभयाधिक्यवतीशुद्धा वैष्णवैःस्मार्तैश्चैकादश्यवोपोष्या ।**<br>ही एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्त व वैष्णव यांनीं एकादशीलाच उपोषण करावें. |
| शुद्धन्यूनासमद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५५<br>५५ | ५९<br>० | ५९<br>५७ | ५९<br>० | ६०<br>५८ | ०<br>० | **इयमनुभयाधिक्यवतीशुद्धा वैष्णवैः स्मार्तैश्चैकादश्येवोपोश्या ।**<br>ही एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. वैष्णव व स्मार्त यांनीं एकादशीलाच उपोषण करावें. |
| शुद्धन्यूनाऽधिकद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५५<br>५५ | ५९<br>० | ५९<br>५८ | ५९<br>० | ६०<br>६० | १<br>१ | **इयंशुद्धाद्वादशीमात्राधिक्यवती अत्रवैष्णवानांद्वादश्यामुपोषणंस्मार्तानांपूर्वा ।**<br>ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा. वैष्णवांनीं द्वादशीचे दिवशीं उपोषण करावें, स्मार्तांनीं पूर्वदिवशीं करावें. |
| शुद्धसमान्यूनद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५५<br>५५ | ५९<br>० | ६०<br>५७ | ०<br>० | ५९<br>५८ | ५९<br>० | **इयमनुभयाधिक्यवतीशुद्धा अत्रवैष्णवानांस्मार्तानांचैकादश्यामुपवासः ।**<br>ही एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा. वैष्णव व स्मार्त यांनीं एकादशीलाच उपोषण करावें. |
| शुद्धसमासमद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५५<br>५५ | ५०<br>० | ६०<br>५७ | ०<br>० | ६०<br>५८ | ०<br>० | **इयमनुभयाधिक्यवतीशुद्धा अत्रवैष्णवानांस्मार्तानांचैकादश्यामेपोवासः ।**<br>ही एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा. वैष्णव व स्मार्त यांनीं एकादशीलाच उपोषण करावें. |
| शुद्धसमाऽधिकद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५५<br>५५ | ५९<br>० | ६०<br>५८ | ०<br>० | ६०<br>६० | १<br>१ | **इयंशुद्धाद्वादशीमात्राधिक्यवती अत्रवैष्णवानांद्वादश्यामुपोषणंस्मर्त्तानांपूर्वा ।**<br>ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा. वैष्णवांनीं द्वादशीला उपोषण करावें. स्मार्तांनीं पूर्वदिवशीं करावें. |

| | दशमी | | एकादशी | | द्वादशी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शुद्धाधिकान्यूनद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५५<br>५५ | ५९<br>० | ६०<br>६० | १<br>१ | ५९<br>५८ | ५८<br>क्षय | इयमेकादशीमात्राधिक्यवतीशुद्धा वैष्णवैः परोपोष्यास्मार्तगृहस्थैः पूर्वा ।<br>ही एकादशी एकादशीमात्राधिक्यवती शुद्धा. वैष्णवांनीं दुसरीला उपोषण करावें. स्मार्त गृहस्थाश्रमी यांनीं पूर्व दिवशीं करावें. |
| शुद्धाधिकासमद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५५<br>५५ | ५९<br>० | ६०<br>६० | १<br>१ | ५९<br>५८ | ५९<br>क्षय | इयमप्येकादशीमात्राधिक्यवतीशुद्धा वैष्णवैःपरोपोष्यास्मार्तगृहस्थैः पूर्वा ।<br>ही एकादशी एकादशीमात्राधिक्यवती शुद्धा. वैष्णवांनीं दुसरीला उपोषण करावें. स्मार्त गृहस्थाश्रमी यांनीं पूर्व दिवशीं करावें. |
| शुद्धाधिकाधिकद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५५<br>५५ | ५९<br>० | ६०<br>६० | १<br>१ | ६०<br>५ | १<br>० | इयंशुद्धाउभयाधिक्यवती अत्रसर्वैर्वैष्णवैः स्मार्तैश्च परैवोपोष्या ।<br>ही एकादशी उभयाधिक्यवती शुद्धा. सर्व वैष्णव व स्मार्त यांनीं दुसरे दिवशींच उपोषण करावें. |

## २२ अथ वैष्णवानां विद्धैकादशीभेदाः ( धर्माब्धिस्थनिर्णयः )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| विद्धन्यूनान्यूनद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५६<br>५७ | १<br>० | ५९<br>५८ | ५९<br>० | ५९<br>५९ | ५९<br>० | इयमनुभयाधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यांवैष्णवानांतुविद्धत्वाद्द्वादश्यामुपवासः ।<br>ही अनुभयाधिक्यवती विद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा, द्वादशीला करूं नये. वैष्णवांनीं द्वादशीला करावा. |
| विद्धन्यूनासमद्वादशिका धर्माब्धिस्थमुदारहणम् | ५६<br>५७ | १<br>० | ५९<br>५८ | ५९<br>० | ६०<br>५९ | ०<br>० | इयमप्यनुभयाधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यां वैष्णवानांतुविद्धत्वाद्द्वादश्यामुपवासः ।<br>हीही अनुभयाधिक्यवती विद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा, द्वादशीला करूं नये. वैष्णवांनीं द्वादशीला करावा. |
| विद्धन्यूनाधिकद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५६<br>५८ | १<br>० | ५९<br>५९ | ५९<br>० | ६०<br>६० | १<br>१ | इयंद्वादशीमात्राधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यामितिमाधवमतं हेमाद्रिमतेतुसर्वैःपराद्वादश्येवोपोष्या केचित्तुमुमुक्षुभिःस्मार्तैः परोपोष्येत्याहुः ।<br>ही द्वादशी मात्राधिक्यवती विद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा, द्वादशीला करूं नये असें माधवाचें मत आहे. हेमाद्रीच्या मतानें सर्वांनीं दुसऱ्या दिवशीं द्वादशीलाच उपवास करावा. मुमुक्षु स्मार्तांनीं दुसऱ्या दिवशीं उपवास करावा असें कांहीं म्हणतात. |

| | दशमी | | एकादशी | | द्वादशी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| विद्धसमान्यूनद्वादशिका | ५६ | १ | ६० | ० | ५९ | ५९ | अनुभयाधिक्यवतीविद्धेयं अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यांवैष्णवानांतुविद्धत्वाद्द्वादश्यामुपवासः ।<br>ही अनुभयाधिक्यवती विद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा, द्वादशीला करूं नये. वैष्णवांनीं द्वादशीला करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |
| विद्धसमासमद्वादशिका | ५६ | १ | ६० | ० | ६० | ० | इयमनुभयाधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामुपवासःवैष्णवानांतुविद्धत्वाद्द्वादश्यामुपवासः<br>ही अनुभयाधिक्यवती विद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा. वैष्णवांनीं द्वादशीला करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |
| विद्धसमाधिकद्वादशिका | ५६ | १ | ६० | ० | ६० | १ | इयंद्वादशीमात्राधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तैरेकादश्युपोष्यानद्वादशीतिमाधवमतं हेमाद्रिमतेतुसर्वैःपराद्वादश्येवोपोष्या केचित्तुमुमुक्षुभिःस्मार्तैःपरोपोष्येत्याहुः ।<br>ही द्वादशीमात्राधिक्यवती विद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा, द्वादशीला करूं नये असें माधवाचें मत आहे. हेमाद्रीच्या मतें सर्वांनीं दुसऱ्या दिवशीं द्वादशीला उपवास करावा. मुमुक्षु स्मार्तांनीं दुसऱ्या दिवशीं उपवास करावा असें कोणी म्हणतात. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | ० | ५० | ० | ६० | १ | |
| विद्धाधिकान्यूनद्वादशिका | ५६ | १ | ६० | १ | ५९ | ५८ | एकादशीमात्राधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तगृहिणांपूर्वोपोष्यायतिभिर्निष्कामगृहिभिर्वनस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैःस्मार्तैरुपवासद्वयंकार्यमितिकेचित् ।<br>ही एकादशीमात्राधिक्यवती विद्धा. स्मार्त गृहस्थाश्रमी यांनीं पूर्वदिवशीं उपवास करावा. यति, निष्कामगृहस्थ वानप्रस्थ, विधवा, वैष्णव यांनीं दुसरे दिवशीं करावा. विष्णूची प्रीति इच्छिणाऱ्या स्मार्तांनीं दोन उपवास करावे असें कोणी म्हणतात. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | ० | ६० | १ | ५८ | क्षय | |
| विद्धाधिकासमद्वादशिका | ५६ | १ | ६० | १ | ५९ | ५९ | इयमप्येएकादशीमात्राधिक्यवतीविद्धा उपरिस्थोदाहरणवत्<br>हीही एकादशीमात्राधिक्यवती विद्धा. वरील उदाहरणाप्रमाणेंच वागावें. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | १ | ६० | १ | ५८ | क्षय | |

| | दशमी घ. | प. | एकादशी घ. | प. | द्वादशी घ. | प. | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| विद्धाधिकाधिकद्वादशिका | ५६ | १ | ६० | १ | ६० | १ | उभयाधिक्यवतीविद्धेयं अत्रसर्वैःस्मार्तैर्वैष्णवैश्चावशिष्टापरैवैकादश्युपोष्या । |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | ० | ६० | १ | ४ | ० | ही उभयाधिक्यवती विद्धा. सर्व स्मार्त व वैष्णव यांनीं अवशिष्ट राहिलेली दुसरी उपोषणाला घ्यावी. |

## २३ अथ स्मार्तानां विद्धैकादशीभेदाः ( धर्माब्धिस्थनिर्णयः )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शुद्धन्यूनान्यूनद्वादशिका | ५९ | ५९ | ५९ | ५९ | ५९ | ५९ | इयमनुभयाधिक्यवतीशुद्धा स्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यांवैष्णवानांतुविद्धत्वात्द्वादश्यामुपवासः ।<br>ही अनुभयाधिक्यवती शुद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा, द्वादशीला करूं नये. वैष्णवांनीं द्वादशीला करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |
| शुद्धन्यूनासमद्वादशिका | ५९ | ५९ | ५९ | ५९ | ६० | ० | इयमुपरिलिखितोदाहरणवज्ज्ञेया । |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | ही वरील उदाहरणाप्रमाणेंच जाणावी. |
| शुद्धन्यूनाधिकद्वादशिका | ५९ | ५९ | ५९ | ५९ | ६० | १ | इयंद्वादशीमात्राधिक्यवतीशुद्धा अत्रशुद्धत्वात्स्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यामितिमाधवमतं हेमाद्रिमतेतुसर्वैःपराद्वादश्येवोपोष्या केचित्तुमुमुक्षुभिःस्मार्तैःपरोपोष्येत्याहुः ।<br>ही द्वादशी मात्राधिक्यवती शुद्धा. स्मार्तांनीं एकादशीलाच उपवास करावा, द्वादशीला करूं नये असें माधवाचें मत आहे. हेमाद्रीच्या मतें सर्वांनीं दुसऱ्या दिवशीं द्वादशीला उपवास करावा. मुमुक्षु स्मार्तांनीं दुसऱ्या दिवशीं उपवास करावा असें कोणी म्हणतात. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | ० | ५९ | ० | ६० | १ | |
| शुद्धसमान्यूनद्वादशिका | ५९ | ५९ | ६० | ० | ५९ | ५९ | इयमनुभयाधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यांवैष्णवानांतु–विद्धत्वाद्द्वादश्यामुपवासः ।<br>ही उभयाधिक्यवती शुद्धा. स्मार्तांनीं एकादशीलाच उपवास करावा, द्वादशीला करूं नये. वैष्णवांनीं द्वादशीला उपवास करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |

| | दशमी | | एकादशी | | द्वादशी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| शुद्धसमासम द्वादशिका | ५९ | ५९ | ६० | ० | ६० | ० | उपरिलिखितोदाहरणवज्ज्ञेयम् । |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | ही वरील उदाहरणाप्रमाणेंच जाणावी. |
| शुद्धसमाधिक द्वादशिका | ५९ | ५९ | ६० | ० | ६० | १ | द्वादशीमात्राधिक्यवतीशुद्धेयं अत्रशुद्धत्वात्स्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यामितिमाधवमतं हेमाद्रिमतेतुसर्वैःपराद्वादश्येवोपोष्या केचित्तुमुमुक्षुभिःस्मार्तैःपरोपोष्येत्याहुः।<br>ही द्वादशी मात्राधिक्यवती शुद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा, द्वादशीला करूं नये असें माधवाचें मत आहे. हेमाद्रीच्या मतें सर्वांनीं दुसऱ्या दिवशीं द्वादशीला उपवास करावा. मुमुक्षु स्मार्तांनीं दुसऱ्या दिवशीं उपवास करावा असें कोणी म्हणतात. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | ० | ५९ | ० | ६० | १ | |
| शुद्धाधिकान्यूनद्वादशिका | ५९ | ५९ | ६० | १ | ५९ | ५८ | इयंशुद्धाएकादशीमात्राधिक्यवती अत्रस्मार्तानांगृहिणांपूर्वोपोष्या यतिवैष्णवादिभिःपरोपोष्या ।<br>ही एकादशी मात्राधिक्यवती शुद्धा. स्मार्त गृहस्थाश्रमी यांनीं पूर्व दिवशीं उपवास करावा. यति वैष्णव इत्यादिकांनीं दुसऱ्या दिवशीं उपवास करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | ० | ६० | १ | ५८ | क्षय | |
| शुद्धाधिकासमद्वादशिका | ५९ | ५९ | ६० | १ | ५९ | ५९ | उपरिलिखितोदाहरणवत् । |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | ० | ६० | १ | ५८ | क्षय | ही वरील उदाहरणाप्रमाणेंच जाणावी. |
| शुद्धाधिकाधिकद्वादशिका | ५९ | ५९ | ६० | १ | ६० | १ | इयमुभयाधिक्यवतीशुद्धा अत्रसर्वैःस्मार्तैर्वैष्णवैश्चावशिष्टापरैवैकादश्युपोष्या ।<br>ही उभयाधिक्यवती शुद्धा. सर्व स्मार्त व वैष्णव यांनीं अवशिष्ट दुसऱ्या दिवशींच उपवास करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ५८ | ० | ६० | १ | ४ | ० | |

## २४ अथ स्मार्तानां विद्धैकादशीभेदाः ( धर्माब्धिस्थानिर्णयः )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| विद्धन्यूनान्यूनद्वादशिका | ६० | १ | ५९ | ५८ | ५९ | ५९ | अनुभयाधिक्यवतीविद्धेयं अत्रस्मार्तानामेकादश्यामुपवासःवैष्णवानांद्वादश्यामुपवासः।<br>ही अनुभयाधिक्यवती विद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा वैष्णवांनीं द्वादशीला करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणम् | २ | ० | ५६ | क्षय | ५५ | ० | |

| | दशमी | | एकादशी | | द्वादशी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ | प. | घ. | प | घ. | प. | |
| विद्धन्यूनासमद्वादशिकाधर्माब्धिस्थमुदाहरणम् | ६० | १ | ५९ | ५८ | ६० | ० | उपरिस्थोदाहरणवत्। |
| | २ | ० | ५६ | क्षय | ५५ | ० | ही वरील उदाहरणाप्रमाणें जाणावी. |
| विद्धन्यूनाधिकद्वादशिकाधर्माब्धिस्थमुदाहरणम् | ६० | १ | ५९ | ५९ | ६० | १ | इयंद्वादशीमात्राधिकाविद्धा एकादश्याविद्धत्वाद्द्वादश्यामेवस्मार्तानामप्युपवासः। ही द्वादशी मात्राधिका विद्धा. एकादशी विद्ध असल्यामुळें स्मार्तांनीं द्वादशीला उपवास करावा. |
| | १ | ० | ५८ | क्षय | ६० | १ | |
| विद्धसमान्यूनद्वादशिकाधर्माब्धिस्थमुदाहरणम् | ६० | १ | ५९ | ५९ | ५९ | ५९ | इयमनुभयाधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामुपवासःवैष्णवानांद्वादश्यां। ही अनुभयाधिक्यवती विद्धा. स्मार्तांनीं एकादशीला उपवास करावा, वैष्णवांनीं द्वादशीला करावा. |
| | २ | ० | ५६ | क्षय | ५५ | ० | |
| विद्धसमासमद्वादशिकाधर्माब्धिस्थमुदाहरणम् | ६० | १ | ५९ | ५९ | ६० | ० | उपरिस्थोदाहरणवत्। |
| | २ | ० | ५६ | क्षय | ५५ | ० | ही वरील उदाहरणाप्रमाणें जाणावी. |
| विद्धसमाधिकद्वादशिकाधर्माब्धिस्थमुदाहरणम् | ६० | १ | ५९ | ५९ | ६० | १ | द्वादशीमात्राधिक्यवतीविद्धेयं एकादश्याविद्धत्वाद्द्वादश्यामेवस्मार्तानामप्युपवासः। ही द्वादशी मात्राधिक्यवती विद्धा एकादशी विद्धा असल्यामुळें स्मार्तांनीं द्वादशीलाच उपवास करावा. |
| | १ | ० | ५८ | क्षय | ६० | १ | |
| विद्धाधिकान्यूनद्वादशिकाधर्माब्धिस्थमुदाहरणम् | ६० | १ | ६० | ० | ५९ | ५८ | एकादशीमात्राधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानांगृहिणांपूर्वा यत्यादिभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैरुपवासद्वयंकार्यमितिकेचित्। ही एकादशी मात्राधिक्यवती विद्धा. स्मार्त गृहस्थ यांनीं पूर्वदिवशीं, व यति आणि वैष्णव यांनीं दुसऱ्या दिवशीं उपवास करावा. विष्णूची प्रीति इच्छिणाऱ्यांनीं दोन उपवास करावे असें कोणी म्हणतात. |
| | ४ | ० | २ | ० | ५८ | क्षय | |
| विद्धाधिकासमद्वादशिकाधर्माब्धिस्थमुदाहरणम् | ६० | १ | ६० | १ | ५९ | ५९ | उपरिस्थोदाहरणवत्। |
| | ४ | ० | २ | ० | ५८ | क्षय | ही वरील उदाहरणाप्रमाणेंच जाणावी. |

| | दशमी | | एकादशी | | द्वादशी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| विद्धाधिकाधिकद्वादशिका धर्माब्धिस्थमुदाहरणम् | ६० | १ | ६० | १ | ६० | १ | उभयाधिक्यवतीविद्धेयं अत्रसर्वैःस्मार्तवैष्णवैश्चावशिष्टापरैवोपोष्या। |
| | २ | ० | ३ | ० | ४ | ० | ही उभयाधिक्यवती विद्धा. सर्व स्मार्त व वैष्णव यांनीं अवशिष्ट दुसऱ्या दिवशींच उपवास करावा. |

प्रथम परिच्छेदः समाप्तः

श्रीगणेशाय नमः

## अथ द्वितीयः परिच्छेदः।

श्रीगणेशायनमः । श्रीपाण्डुरङ्गायनमः । श्रीपाण्डुरङ्गं विबुधान्तरङ्गं नौमीन्दिरां माधवमन्दिरां च । सतामनन्तं हितमामनन्तं गुरुं गरिष्ठं जननीं वरिष्ठाम् १ काशीनाथाभिधेनात्रानन्तोपाध्यायसूनुना । सामान्यं निर्णयं प्रोच्य विशेषेण विनिर्णयः २ संगृह्यते धर्मसिन्धुसाराख्ये कालगोचरे । ग्रन्थे अस्फुटबोधाय पुनरुक्तिर्न दूषणम् ३

श्रीगणपतीला नमस्कार असो. श्रीपाण्डुरंगाला नमस्कार असो. ज्ञानीजनांच्या अंतःकरणांत वास करणारा श्रीपाण्डुरंग, माधव हेंच जिचें मंदिर अशी जी इंदिरा म्हणजे लक्ष्मी, सज्जनांचें हित करणारा अनंत नांवाचा श्रेष्ठ गुरु म्हणजे पिता आणि थोर अशी माता, ह्या सर्वांना नमस्कार करितों. मी आधीं पहिल्या परिच्छेदानें सामान्य निर्णय सांगितल्यानंतर आतां पुढें अनंतोपाध्यायांचा मुलगा काशीनाथ विशेष निर्णय सांगतों. कालगोचर अशा या 'धर्मसिंधुसार' नांवाच्या ग्रंथांत जर स्पष्ट बोध होण्याकरतां कोठें द्विरुक्ति झाली; तर त्याचा कोणीं दोष मानूं नये.

अथचैत्रमासकृत्यम् प्रथमपरिच्छेदेमासविशेषानपेक्षंसामान्यतस्तिथ्यादिनिर्णयमभिधायास्मिंन्द्वितीयपरिच्छेदेचैत्रादिमासविशेषोपादानेन प्रतिपदादितिथिषुविहितसंवत्सरकृत्यनिर्णयसारंसंगृह्णीमः अत्रशुक्लप्रतिपदादिरमान्तएवमासः प्रायेणदाक्षिणात्यैराद्रियतेइतितमेवाश्रित्यनिर्णयउच्यते अत्रकिंचित्पूर्वपरिच्छेदोक्तमपिपुनर्विशेषोक्तिभिर्दृढीक्रियते इतिपुनरुक्तिर्नदोषाय तत्र मेष-

संक्रान्तौपूर्वाः पराश्चदशदशनाड्यः पुण्यकालः रात्रौत्वर्धरात्रात्प्राक्संक्रमेपूर्व दिनोत्तरार्धंपुण्यम् अर्धरात्रात्परतःसंक्रमेउत्तरदिनस्यपूर्वार्धंपुण्यम् अर्धरात्रेसंक्रमेदिनद्वयेपुण्यम् ।

पहिल्या परिच्छेदांत महिन्यांचा वगैरे विशेषसा निर्णय न सांगतां, तिथि वगैरेंचाच सामान्य निर्णय सांगितला आहे. या दुसऱ्या परिच्छेदांत–कोणच्या विशेष महिन्यांतल्या कोणच्या तिथींवर कोणचीं वार्षिक कृत्यें करावीत, त्यांचा निर्णय सांगितला आहे. दाक्षिणात्य (नर्मदेच्या खालचे) लोक, शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत महिना मानितात; यास्तव, त्याच प्रांताला योग्य असणारा निर्णय सांगतों. क्वचित् जागीं, पहिल्या परिच्छेदांत सांगितलेल्याच गोष्टींचा जो उल्लेख होईल तो विशेषाच्या बळकटी करतांच असल्यानें, पुनरुक्तीचा दोष मानूं नये. मेषसंक्रान्तीच्या आधींच्या दहा आणि मागूनच्या दहा घटका पुण्यकाळ असतो. मध्यरात्रीच्या आधींच्या रात्रीं जर संक्रान्त येईल, तर पहिल्या दिवसाचा उत्तरार्ध पुण्यकाळ असतो, आणि मध्यरात्रीनंतर जर संक्रान्त येईल, तर दुसऱ्या दिवसाचा पूर्वार्ध पुण्यकाळ असतो. मध्यरात्रीच्याच वेळीं जर संक्रान्त येईल तर आदला दिवस व पुढचा दिवस, असा दोन दिवस पुण्यकाळ असतो.

अथतिथिनिर्णयः तत्रचैत्रशुक्लप्रतिपदिवत्सरारम्भः तत्रौदयिकीप्रतिपद्ग्राह्या दिनद्वयेउदयव्याप्तौअव्याप्तौवापूर्वा चैत्रस्यमलमासत्वे वत्सरारम्भनिमित्तकं तैलाभ्यङ्गसंकल्पादौनूतनवत्सरनामकीर्तनाद्यारम्भंचमलमासप्रतिपद्येवकुर्यात् प्रतिगृहंध्वजारोपणंनिम्बपत्राशनंवत्सरादिफलश्रवणं नवरात्रारम्भोनवरात्रौत्सवादिनिमित्ताभ्यङ्गादिश्चशुद्धमासप्रतिपदिकार्यः वत्सरारम्भनिमित्तकोपितैलाभ्यङ्गः शुद्धप्रतिपद्येवेतिमयूखेउक्तम् अस्यांतैलाभ्यङ्गोनित्यः अकरणेप्रत्यवायोक्तेः अस्यामेवप्रतिपदिदेवीनवरात्रारम्भः अत्रपरयुतामुहूर्तमात्रापिप्रतिपद्ग्राह्या अत्रमुहूर्तपरिमाणम् मुहूर्तमहोरात्रस्यप्रोचुःपञ्चदशंलवमित्युक्तंसर्वत्र ज्ञेयम् पारणादिविशेषनिर्णयःशारदनवरात्रवद्बोध्यः अत्रैवप्रपादानम् तत्रमन्त्रः प्रपेयंसर्वसामान्याभूतेभ्यः प्रतिपादिता । अस्याः प्रदानात्पितरस्तृप्यन्तुहि पितामहाः १ अनिवार्यंततोदेयंजलंमासचतुष्टयम् । प्रपांदातुमशक्तेनप्रत्यहमुदकुम्भोद्विजगृहेदेयः तत्रमन्त्रः एषधर्मघटोदत्तोब्रह्मविष्णुशिवात्मकः । अस्यप्रदानात्सकलाममसन्तुमनोरथः १ इयमेवप्रतिपत्कल्पादिरपि एवंवैशाखशुक्लतृतीया फाल्गुनकृष्णतृतीयाशुक्लाचैत्रपञ्चमीमाघेत्रयोदशीकार्तिकेसप्तमीमार्गशीर्षेनवमीइत्यपिकल्पादयोबोध्याः आसुश्राद्धात्पितृतृप्तिः चैत्रशुक्लप्रतिपन्मत्स्यजपन्तीत्येके चैत्रेदधिक्षीरघृतमधुवर्जनंदंपतीपूजनात्मकंगौरीव्रतंकार्यम् चैत्रशुक्लद्वितीयायांनिशामुखेबालेन्दुपूजनात्मकं चंद्रव्रतम् अस्यामेवदमनकेन गौरीशिवपूजनम् चैत्रशुक्लतृतीयायांगौरीशिवसुतांसंपूज्यान्दोलनव्रतंमासपर्यन्तंकार्यम् अत्रतृतीयामुहूर्तमात्रापिपराग्राह्या द्वितीयायुक्तानकार्या चतुर्थीयुतायांवैधृत्यादियोगेपिसैवकार्या द्वितीयायोगनिषेधस्यबलवत्त्वात् अस्यामेव-

तृतीयायांश्रीरामचन्द्रस्यदोलोत्सवमारभ्यमासपर्यन्तंपूजापूर्वकमान्दोलनंकार्य-म् एवंदेवतान्तराणामपि इयमेवतृतीयामन्वादिरपि अत्रैवसर्वमन्वादिनिर्णय उच्यते तत्रमन्वादयश्चैत्रेशुक्लतृतीयापौर्णिमासी च ज्येष्ठेपौर्णिमा आषाढस्य शुक्लदशमीपौर्णमासीच श्रावणस्यकृष्णाष्टमी भाद्रपदस्यशुक्लतृतीया आश्विनस्यशुक्लनवमी कार्तिकस्यशुक्लद्वादशीपौर्णमासीच पौषशुक्लैकादशी माघेशुक्लसप्तमी फाल्गुनस्यपौर्णमास्यमावास्याचेतिचतुर्दशज्ञेयाः एतास्तुमन्वादयः शुक्लपक्षस्थाःदैवेपित्र्यकर्मणिपूर्वाह्णव्यापिन्योग्राह्यः पूर्वाह्णोत्रद्वेधाविभक्तदिनपूर्वोभागस्तत्रैवश्राद्धादिविधानात् दैवान्मानुषाद्वापराधात्पूर्वाह्णेश्राद्धाद्यनुष्ठानासंभवेऽपराह्णव्यापिन्योग्राह्याः दिनपूर्वार्धेऽपराह्णेवा श्राद्धाद्यनुष्ठेयम् नतु-दिनोत्तरार्धगतमध्याह्नभागेऽपीतितात्पर्यम् कृष्णपक्षस्थास्तुदैवेपित्र्येचकर्मणिप-ञ्चधाविभक्तदिनचतुर्थभागाख्यापराह्णव्यापिन्योग्राह्याः मन्वादिषुपिण्डरहितं श्राद्धंकार्यम् अत्रश्राद्धैर्द्विसहस्रवर्षपितॄणांतृप्तिः मन्वादिश्राद्धंचनित्यम् एतदकरणे त्वंभुवःप्रतिमानमिति ऋङ्मन्त्रस्यशतवारंजलेजपःप्रायश्चित्तंकार्यम् एवंषण्णवतिश्राद्धान्यपिनित्यानि तानिच । अमा १२ युग ४ मनु १४ क्रान्ति १२ धृति १२ पात १२ महालयाः १५ । अष्टका ५ अन्वष्टका ५ पूर्वेद्युः ५ श्राद्धैर्नवतिश्चषट् । इतिज्ञेयानि ।

**तिथिनिर्णय**—चैत्रशुद्ध प्रतिपदेला वर्षाचा जो आरंभ होतो; त्या बाबतींत सूर्योदयकाळीं जी प्रतिपदा असेल तीच ग्राह्य होय. उदयकालीं दोन दिवस व्याप्ति असेल अथवा दोन्ही दिवशीं नसेल, तेव्हां पहिल्या दिवसाचीच प्रतिपदा घ्यावी. चैत्रमहिना जर अधिक आला, तर नव्या वर्षाच्या आरंभानिमित्त तैलाभ्यंग व संकल्पादिकांमध्यें नव्या वर्षाच्या नांवाचा जो उच्चार करावयाचा, तें सर्व अधिक महिन्याच्या प्रतिपदेलाच करावें. प्रत्येकानें आपापल्या घरीं गुढ्या उभाराव्या, कडुलिंबाचीं पानें खावीं, वर्षफल ऐकावें, नवरात्राला आरंभ करावा आणि नवरात्राच्या उत्सवादिकांच्या संबंधानें संकल्पादिक जीं कर्में करायचीं, तीं सर्व शुद्ध महिन्याच्या प्रतिपदेला करावींत. नवीन वर्षाच्या आरंभाबद्दल जें तैलाभ्यंग करायचें,तें शुद्धमासाच्या प्रतिपदेलाच करावें असें मयूखांत सांगितलें आहे. या प्रतिपदेला तैलाभ्यंग करणें हें नित्यकर्म आहे. तें जर न केलें तर दोष सांगितला आहे. याच प्रतिपदेला देवीच्या नवरात्राचा आरंभ करावा. नवरात्राला जी प्रतिपदा घ्यायची, ती द्वितीयेनें एक मुहूर्तमात्र व्याप्त असलेली घ्यावी. या ठिकाणीं मुहूर्तमात्राचें प्रमाण येणेंप्रमाणें:—दिवसाचा अथवा रात्रीचा कोणचाही पंधरावा जो भाग तो मुहूर्त होय. मुहूर्ताबद्दलचें प्रमाण सर्व ठिकाणीं हेंच समजावें. या नवरात्रादिकांच्या पारणांचा विशेष निर्णय शरदृतूंतल्या नवरात्राप्रमाणेंच समजावा. प्रपादानाचा आरंभ याच दिवशीं करावा. प्रपादानमंत्र—'प्रपेयं सर्वसामान्या भूतेभ्यः प्रतिपादिता । अस्याः प्रदानात्पितरस्तुष्यन्तु हि पितामहाः ॥' यानंतर चार महिनेपर्यंत सर्वांना यथेच्छ जलदान करावें. प्रपा म्हणजे पाणपोई, ती घालण्याचें सामर्थ्य नसल्यास दररोज पाण्यानें भरलेला कुंभ ( मातीचें भांडें ) ब्राह्मणाच्या घरीं नेऊन द्यावें. त्या

कृत्याचा मंत्र–'एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णुशिवात्मकः। अस्य प्रदानात्सकला ममसन्तु मनोरथाः॥' याच प्रतिपदेला कल्पाचासुद्धां आरंभ होतो. याचप्रमाणें वैशाख शुद्ध तृतीया, फाल्गुन वद्य तृतीया, चैत्र शुद्ध पंचमी, माघ शुद्ध त्रयोदशी, कार्तिक शुद्ध सप्तमी आणि मार्गशीर्ष शुद्ध नवमी–या तिथिदेखील कल्पादिच होत. या तिथींवर श्राद्धें केलीं असतां पितरांची तृप्ति होते. चैत्र शुद्ध प्रतिपदा ही मत्स्यजयन्ति आहे असें कोणी म्हणतात. चैत्रांत–दहीं, दूध, तूप व मध–हीं वर्ज्य करून, दांपत्यपूजात्मक गौरीचें व्रत करावें. चैत्र शुद्ध द्वितीयेला संध्याकाळीं बालेन्दुपूजनात्मक चंद्रव्रत करावें. याच दिवशीं गौरीशिवांचें दवण्यानें पूजन करावें. चैत्र शुद्ध तृतीयेला शिवासह गौरीचें पूजन करून एक महिनाभर आन्दोलनव्रत (झोंपाळ्यावर गौर बसविण्याचें) करावें. याला जी तृतीया घ्यायची ती, दुसऱ्या दिवसाची एक मुहूर्तभर जरी असली तरी घ्यावी. द्वितीयायुक्त घेऊं नये. चतुर्थीसह तृतीया जरी वैधृति वगैरे योगाची असली तरी तीच घ्यावी, कारण द्वितीयेसह तृतीयेचा फारच मोठा निषेध सांगितला आहे. याच तृतीयेला श्रीरामचंद्राच्या दोलोत्सवाचा आरंभ करून तो उत्सव एक महिनाभर पूजा–पूर्वक करावा. इतर देवतांचेंहि याप्रमाणें करावें. हीच तृतीया मन्वादि देखील असल्यानें, येथेंच मन्वादि तिथींचा निर्णय सांगतों. चैत्रशुद्ध तृतीया व पौर्णिमा, ज्येष्ठी पौर्णिमा, आषाढ शुद्ध दशमी व पौर्णिमा, श्रावण वद्य अष्टमी, भाद्रपद शुद्ध तृतीया, आश्विन शुद्ध नवमी, कार्तिक शुद्ध द्वादशी व पौर्णिमा, पौष शुद्ध एकादशी, माघ शुद्ध सप्तमी व फाल्गुनी पौर्णिमा आणि अमावास्या या चौदा तिथि मन्वादि होत. यांतल्या शुक्लपक्षांतल्या असतील त्या, देवकर्में आणि पितृकर्में यांना घ्याव्या. येथें पूर्वाह्ण याचा अर्थ दिवसाच्या बरोबर दोन भागांपैकीं पहिला भाग असा आहे. अशा पूर्वाह्णींच श्राद्ध करण्यास सांगितलें आहे. देवाच्या बाबतींत अथवा मनुष्याच्या बाबतींत जर कांहीं अडचणीमुळें पूर्वाह्णीं श्राद्ध करणें अशक्य असेल, तर अपराह्ण काळीं तें करावें. दिवसाच्या पूर्वाह्णकाळीं, निदान अपराण्हकाळीं तरी श्राद्धादिक करावें. याचा अर्थ असा कीं, दिवसाच्या उत्तरार्धाच्या मध्यभागीं करूं नये. ज्या मन्वादि तिथि कृष्णपक्षांतल्या असतील त्यांच्या दिवसांचे समसमान असे पांच भाग करून, त्यांपैकीं चौथ्या म्हणजे अपराह्णकाळांत ज्यांची व्याप्ति असेल अशा-देव आणि पितर यांच्या कर्मासंबंधानें घ्याव्या. मन्वादि तिथींवरचें श्राद्ध पिंडांवाचून करावें. या तिथींवर श्राद्ध केल्यानें, दोन हजार वर्षेंपर्यंत पितर तृप्त राहतात. मन्वादि श्राद्ध नित्य असल्यानें, तें न केल्यास 'त्वं भुवः प्रतिमानं' या ऋचेचा शंभर वेळ जप पाण्यांत उभें राहून करावा, असें त्याबद्दलचें प्रायश्चित सांगितलें आहे. याचप्रमाणें षण्णवती श्राद्धेंहि जीं आहेत, तीं येणेंप्रमाणें:––अमावास्येचीं १२, युगादि ४, मन्वादि १४, संक्रांति १२, वैधृती १९, व्यतिपात १५, महालय १५, अष्टका ५, अन्वष्टका ५ आणि पूर्वेद्यु ५, अशीं हीं एकंदर ९६ समजावींत.

अथदशावतारजयन्त्यः चैत्रशुक्लतृतीयायामपराह्णेमत्स्योत्पत्तिः वैशाखपूर्णिमायांसायंकूर्मोत्पत्तिः भाद्रपदशुक्लतृतीयायामपराह्णेवराहोत्पत्तिः वैशाख-

शुक्लचतुर्दश्यांसायंनारसिंहावतारःभाद्रपदशुक्लद्वादश्यांमध्याह्नेवामनप्रादुर्भावः वैशाखशुक्लतृतीयायांमध्याह्नेपरशुरामोद्भवः प्रदोषेइतिबहवः चैत्रशुक्लनवम्यां-मध्याह्नेदाशरथिरामव्यक्तिः श्रावणकृष्णाष्टम्यां निशीथेश्रीकृष्णाविर्भावः आश्विनशुक्लदशम्यांसायंबुद्धोऽभूत् श्रावणशुक्लषष्ठ्यांसायंकल्किजातइतितत्त-त्कालव्यापिन्योग्राह्याः अत्रमत्स्यकूर्मवराहबुद्धकल्कीनामाषाढादिमासान्तरा-णिएकादश्यादितिथ्यन्तराणिप्रातरादिकालान्तराणिचवचनान्तरानुसारेणोक्ता-निकल्पभेदेनव्यवस्थापनीयानि स्वस्वपरिगृहीतपक्षानुसारेणतत्तदुपासकैरुपो-ष्याणि श्रीरामकृष्णनृसिंहजयन्त्यएवनित्याः सर्वैरुपोष्याः चैत्रशुक्लचतु-र्थ्यांमध्याह्नव्यापिन्यांलड्डुकादिभिः श्रीगणेशमर्चयित्वादमनकारोपणंकुर्यात् विघ्ननाशंसर्वान्कामान्प्राप्नुयात् चैत्रशुक्लपञ्चम्यामनन्तादिनागान्पूजयित्वा क्षीरसर्पिर्नैवेद्यंदद्यात् अस्यामेवपञ्चम्यांलक्ष्मीपूजनम् अत्रैवचोच्चैःश्रवादिपू-जनात्मकंहयव्रतमुक्तम् अत्रसर्वत्रपञ्चमीसामान्यनिर्णयानुसारेणग्राह्या एवम-ग्रेपि यत्रविशेषनिर्णयोनोच्यतेतत्रप्रथमपरिच्छेदोक्तएवनिर्णयोऽनुसंधेयः ष-ष्ठ्यांस्कन्दस्यदमनकारोपणम् सप्तम्यांभास्करस्यदमनकपूजा नवम्यांदेव्याः सर्वदेवानांपौर्णमास्यामित्यन्यत्रविस्तरः चैत्रशुक्लाष्टम्यांभवान्याउत्पत्तिः तत्र नवमीयुताग्राह्या अत्रपुनर्वसुयुताष्टम्यामष्टाशोककलिकाप्राशनम् तत्रमन्त्रः त्वामशोकनराभीष्टमधुमाससमुद्भव। पिबामिशोकसंतप्तोमामशोकंसदाकुरु १ इति अत्रैवयोगविशेषेकृत्यम् पुनर्वसुबुधोपेताचैत्रेमासिसिताष्टमी। प्रातस्तुविधि-वत्स्नात्वावाजपेयफलंलभेत् १ इति चैत्रशुक्लनवमीरामनवमी चैत्रशुक्लनव-म्यां पुनर्वसुयुतायांमध्याह्नेकर्कलग्नेमेषस्थेसूर्यउच्चस्थेग्रहपञ्चकेश्रीरामजन्मश्र-वणात् अस्यांमध्याह्नव्यापिन्यामुपोषणंकार्यम् पूर्वेद्युरेवमध्याह्नेसत्त्वेसैवग्राह्या दिनद्वयेमध्याह्नव्याप्तावव्याप्तौवापरा अष्टमीविद्धायानिषेधात् अतःपूर्वेद्युःसकल-मध्याह्नव्यापिनीमपित्यक्त्वामध्याह्नैकदेशव्यापिन्यपिपरैवग्राह्या केचित्त्वष्टमी-विद्धांमध्याह्नव्यापिनींपुनर्वसुयुतामपित्यक्त्वापरेद्युस्त्रिमुहूर्तापिनवमीसर्वैरप्यु-पोष्या यदितुदशम्याह्रासवशेनपारणादिनेस्मार्तानामेकादशीव्रतप्राप्तिस्तत्स्मा-र्तैरष्टमीविद्धोपोष्या वैष्णवैर्मुहूर्तत्रययुतापरैवोपोष्याशुद्धायानवम्याअलाभे-मुहूर्तत्रयन्यूनत्वेवा सर्वैरपिअष्टमीविद्धैवोपोष्येत्याहुः इदंव्रतंनित्यंकाम्यंच।

**दशावतारजयन्त्या**—चैत्र शुद्ध तृतीयेला अपराह्णकाळीं मत्स्यावतार झाला असल्यानें त्या दिवशीं मत्स्यजयन्ती, वैशाखी पुनवेला संध्याकाळीं कूर्मजयन्ती, भाद्रपद शुद्ध तृतीयेला अपराह्णकाळीं वराहजयन्ती, वैशाख शुद्ध चतुर्दशीला संध्याकाळीं नरसिंहजयन्ती, भाद्रपद शुद्ध द्वादशीला मध्याह्नकाळीं वामनजयन्ती, वैशाखशुद्ध तृतीयेला मध्याह्नकाळीं ( प्रदोषसमयीं असें बरेच म्हणतात ) परशुरामजयन्ती, चैत्र शुद्ध नवमीला मध्यान्हकाळीं दाशरथीरामजयंती, श्रावण वद्य अष्टमीला मध्यरात्रीं कृष्णजयन्ती, आश्विनशुद्ध दशमीला सायंकाळीं बुद्धजयन्ती, आणि श्रावणशुद्ध षष्ठीला सायंकाळीं कल्कीजयन्ती, या सर्व तिथी

त्या त्या काळीं ज्या व्याप्त असतील त्या त्या घ्याव्या. यांत–मत्स्य, कूर्म, वराह, बुध व कल्की–या अवतारांविषयीं, आषाढादिक दुसरे महिने, दुसऱ्या तिथी, प्रातःकाळ वगैरेंच्या बाबतींत जीं वेगळालीं वचनें आहेत, त्यांची व्यवस्था कल्पादि भेदांवरून करायची. ज्या उपासकांनीं जो पक्ष स्वीकारला असेल, त्या त्या दिवशीं उपास करावेत. मध्याह्नकालव्यापिनी अशा चैत्रशुद्धचतुर्थीस लाडू वगैरेंनीं श्रीगणेशाची पूजा करून, दवणा वाहावा. त्यानें विघ्नांचा नाश होऊन, सर्व इच्छित गोष्टी प्राप्त होतात. चैत्रशुद्ध पंचमीला अनंतादि नागांची पूजा करून, त्यांना दूध व तूप यांचा नैवेद्य अर्पण करावा. याच पंचमीला लक्ष्मीचें पूजन करावें. उच्चैःश्रवा वगैरेंचें पूजारूप हयव्रत याच पंचमीला करावें. या सर्व व्रतांना लागणारी जी पंचमी तिच्यासंबंधानें जो सामान्य निर्णय सांगितला आहे, त्याच निर्णयाची ती घ्यावी. याप्रमाणेंच पुढेंहि समजावें. ज्या ठिकाणीं विशेष निर्णय सांगितला नाहीं, अशा स्थळीं पहिल्या परिच्छेदांत सांगितलेलाच निर्णय ग्राह्य समजावा. षष्ठीला कार्तिक-स्वामीला, सप्तमीला सूर्याला, नवमीला देवीला व पौर्णिमेला सर्व देवांना दवणा वहावा अशाबद्दलची ग्रंथांतरीं विस्तृत माहिती आहे. चैत्रशुद्ध अष्टमीला भवानीचा अवतार झाला असल्यानें, त्या बाबतींत जी अष्टमी घेणें ती नवमीयुक्त असणारी घ्यावी. या अष्टमीला पुनर्वसुनक्षत्र असेल, तर अशोकाच्या झाडाच्या आठ कळ्या खाव्या व त्या खातांना पुढील मंत्र म्हणावा. 'त्वमशोक नराभिष्ट मधुमाससमुद्भव। पिबामि शोकसंतप्तो मामशोकं सदाकुरु' या चैत्रशुद्ध अष्टमीला जर पुनर्वसु नक्षत्र आणि बुधवार असतील, तर त्या दिवशीं सकाळीं विधियुक्त स्नान केलें असतां वाजपेययज्ञाचें फळ मिळतें. चैत्रशुद्ध नवमी ही रामनवमी होय. चैत्रशुद्ध नवमी पुनर्वसु नक्षत्र असतां, मध्याह्नीं कर्कलग्न मेषस्थ सूर्य वगैरे पांच ग्रह उच्च असतां श्रीरामाचा जन्म झाला, असा इतिहास आहे. ही नवमी मध्याह्नव्यापिनी असतां उपास करावा. आदल्या दिवशीं जर मध्याह्नव्याप्ति असेल तर तीच नवमी घ्यावी. दोन्ही दिवशीं मध्यान्हव्याप्ति असेल अथवा दोन्ही दिवशीं नसेल, तर दुसरीच घ्यावी; कारण, अष्टमीनें विद्ध झालेली नवमी घेऊं नये असा निषेध सांगितला आहे. अर्थात् यावरून पहिल्या दिवशीं पूर्ण मध्यान्हव्याप्ति असून, दुसऱ्या दिवशीं जरी एकदेशव्याप्ति असली, तरी दुसऱ्याच दिवसाची घ्यावी हें उघड होतें. कांहीं ग्रंथकारांचें असें म्हणणें आहे कीं, मध्यान्हव्यापिनी व पुनर्वसुनक्षत्रानें युक्त अशी जर अष्टमी विद्धा असेल, तर ती टाकून, दुसऱ्या दिवशीं जर तीन मुहूर्तपर्यंत नवमी असेल, तर तीच सर्वांनीं उपासाला घ्यावी. दशमीचा क्षय असल्यानें जर स्मार्तांची एकादशी पारण्याला येईल, तर त्यांनीं अष्टमीविद्ध नवमी उपासाला घ्यावी. वैष्णवांनीं तीन मुहूर्तांनीं युक्त अशी दुसऱ्या दिवसाची घ्यावी. शुद्ध नवमीचा जर लाभ होत नसेल, तर सर्वांनींच अष्टमीविद्ध नवमी उपासाला घ्यावी असें म्हणतात. हें नवमीचें व्रत नित्य व काम्य असें दोन प्रकारचें आहे.

**अथव्रतप्रयोगः । अष्टम्यामाचार्यंसंपूज्य श्रीरामप्रतिमादानंकरिष्येहंद्वि-जोत्तम। तत्राचार्योभवप्रीतः श्रीरामोसित्वमेवमे १ इतिप्रार्थ्य नवम्याअङ्गभूतेन**

एकभक्तेनराघव इक्ष्वाकुवंशतिलकप्रीतोभवभवप्रिय १ इत्येकभक्तं संकल्प्य-साचार्योहविष्यंभुञ्जीत पूजामण्डपंतत्रवेदिंचकृत्वा नवम्यांप्रातः उपोष्यनवमीं त्वद्ययामेष्वष्टसुराघव । तेनप्रीतोभवत्वंमेसंसारात्त्राहिमांहरे १ इत्युपोषणं-संकल्प्य इमांस्वर्णमयींरामप्रतिमांस्वांप्रयतनत: श्रीरामप्रीतये दास्येरामभक्ताय धीमते १ इतिप्रतिमादानंसंकल्पयेत् श्रीरामनवमीव्रताङ्गभूतांषोडशोपचारैः श्रीरामपूजांकरिष्येइतिसंकल्प्य वेदिकायांसर्वतोभद्रेकलशंसंस्थाप्यतत्रपूर्णपात्रे सवस्त्रेऽग्न्युत्तारणादिविधिनाप्रतिमायां श्रीरामंप्रतिष्ठाप्यपुरुषसूक्तेनषोडशोप-चारैः संपूज्यपूजान्ते रामस्यजननीचासिरामात्मकमिदंजगत्। अतस्त्वांपूजयि-ष्यामिलोकमातर्नमोस्तुते १ इतिकौसल्यांसंपूज्य ॐनमोदशरथायइतिदशरथं संपूज्यसर्वपूजांसमाप्यमध्याह्नेफलपुष्पजलादिपूर्णेनशङ्खेनार्घ्यंदद्यात् तत्रमन्त्रः दशाननवधार्थायधर्मसंस्थापनायच । दानवानांविनाशायदैत्यानांनिधनायच १ परित्राणायसाधूनांजातोरामः स्वयंहरिः। गृहाणार्घ्यंमयादत्तंभ्रातृभिः सहि-तोऽनघ २ इति। रात्रौजागरणं कृत्वाप्रातर्नित्यपूजांविधाय मूलमन्त्रेणपाय-साष्टोत्तरशताहुतीर्हुत्वा पूजांविसृज्याचार्यायप्रतिमांदद्यात्। इमांस्वर्णमयीं-रामप्रतिमांसमलंकृताम्। शुचिवस्त्रयुगच्छन्नांरामोहंराघवायते १ श्रीरामप्रीत-येदास्येतुष्टोभवतुराघवः। इतिमन्त्रः तवप्रसादंस्वीकृत्यक्रियतेपारणामया। व्रतेनानेनसंतुष्टःस्वामिन्भक्तिं प्रयच्छमे १ इतिप्रार्थ्य नवम्यन्तेपारणांकुर्यात् इदंव्रतंमलमासेनकार्यम् एवंजन्माष्टम्यादिव्रतमपिनकार्यम अस्यामेवनवम्यां देवीनवरात्रसमाप्तिःकार्या एतन्निर्णयआश्विननवरात्रनवमीवत्।

**नवमीव्रतप्रयोग**—अष्टमीला आचार्योंची पूजा करून, 'श्रीरामप्रतिमादानं करिष्येऽहं द्विजोत्तम। तत्राचार्यो भव प्रीत: श्रीरामोऽसि त्वमेव मे ॥' अशी प्रार्थना करावी. 'नवम्या अंगभूतेन एकभक्तेन राघव। इक्ष्वाकुवंशतिलक प्रीतो भव भवप्रिया ॥' या मंत्रानें एकदां जेवण्याचा संकल्प करून आचार्यासह हविष्यान्न खावें. पूजेकरतां मंडप आणि वेदी करून, नवमीला सकाळीं 'उपोष्य नवमी त्वद्य यामेष्वष्टसु राघव। तेन प्रीतो भव त्वं मे संसारात् त्राहि मां हरे ॥' या मंत्रानें उपासाचा संकल्प करावा. 'इमां स्वर्णमयीं रामप्रतिमां स्वां प्रयत्नतः। श्रीरामप्रीतये दास्ये रामभक्ताय धीमते ॥' या मंत्रानें प्रतिमादानाचा संकल्प करावा. नंतर 'श्रीरामनवमी व्रताङ्गभूतां षोडशोपचारैः श्रीरामपूजां करिष्ये।' असा संकल्प करून, वेदीवर सर्वतोभद्र नांवाचें मंडल करावें आणि त्यावर कलशाची स्थापना करावी. कलशावर पूर्णपात्र ठेवून, त्याला वस्त्राचें वेष्टन करावें. अग्न्युत्तारणाच्या विधीनें प्रतिमेंत श्रीरामाची स्थापना करून, पुरुषसूक्ताच्या ऋचांनीं (त्या प्रतिमेची) षोडशोपचारांनीं पूजा करावी. पूजा झाल्यानंतर 'रामस्य जननी चासि रामात्मकमिदं जगत्। अतस्त्वां पूजयिष्यामि लोकमातुर्नमोऽस्तुते ॥' या मंत्रानें कौसल्येची पूजा करावी. व 'ॐ नमो दशरथाय०' या मंत्रानें दशरथाची पूजा करून, सारी पूजा संपवावी. मध्यान्हकाळीं—फल, पुष्प, गंध, उदक वगैरेंनीं भरलेल्या शंखानें अर्घ्य द्यावेत त्याचा मंत्र

असाः-'दशाननवधार्थाय धर्मसंस्थापनायच। दानवानां विनाशाय दैत्यांना निधनायच ॥ परित्राणाय साधूनां जातो रामः स्वयं हरिः। गृहाणार्घ्यं मया दत्तं मातृभिः सहितो ऽनघ॥' रात्रीं जागरण करून, सकाळीं नित्यपूजा करावी आणि मूलमंत्रानें पायसाच्या (तांदुळाच्या खिरीच्या) १०८ आहुतींचें हवन करून पूजाविसर्जन करावें. आचार्याला ज्या मंत्रानें नंतर प्रतिमेचें दान करायचें, तो मंत्र असाः—'इमां स्वर्णमयीं रामप्रतिमां समलंकृताम् ॥ शुचिवस्त्रयुगच्छन्नां रामोऽहं राघवाय ते ॥ श्रीरामप्रीतये दास्ये तुष्टो भवतु राघव॥' प्रतिमेचें दान या मंत्रानें केल्यानंतर 'तव प्रसादं स्वीकृत्य क्रियते पारणा मया। व्रतेनानेन संतुष्टः स्वामिन् भक्तिं प्रयच्छ मे॥' या मंत्रानें प्रार्थना करावी. नवमीच्या शेवटीं पारणें करावें. हें व्रत अधिक महिन्यांत करूं नये. याप्रमाणेंच जन्माष्टमी वगैरे व्रतें अधिक महिन्यांत करूं नयेत. याच नवमीला देवीच्या नवरात्राची समाप्ति करावी. त्याच समाप्तीचा निर्णय, आश्विनांतल्या नवरात्रांतल्या नवमीप्रमाणेंच समजावा.

**चैत्रशुक्लैकादश्यांश्रीकृष्णस्यान्दोलनोत्सवः दोलारूढंप्रपश्यन्तिकृष्णंकलिमलापहम्। अपराधसहस्रैस्तुमुक्तास्तेधूननेकृते १ तावत्तिष्ठन्तिपापानिजन्मकोटिकृतान्यपि। क्रीडन्तेविष्णुनासार्धंवैकुण्ठेदेवपूजिताः १ इत्यादिकस्तन्महिमा।**

चैत्र शुद्ध एकादशीला श्रीकृष्णाचा आंदोलनोत्सव करावा. कलिरूप पापाचा नाश करणाऱ्या श्रीकृष्णाला जे झोंपाळ्यावर बसलेला पाहातात, ते हजारों अपराधांतून मुक्त होतात. झोंके दिले तर कोट्यवधी जन्मांतलीं पातकें नाहींशीं होतात. ते देवांना पूज्य होऊन वैकुंठांत विष्णूबरोबर क्रीडा करतात. वगैरे प्रकारचा आंदोलनाचा महिमा आहे.

**चैत्रशुक्लद्वादश्यांविष्णोर्दमनोत्सवः सचपारणाहे पारणाहेनलभ्येतद्द्वादशीघटिकापिचेत्। तदात्रयोदशीग्राह्यापवित्रदमनार्पणे १ इत्युक्तेः शिवस्यतुचतुर्दश्यांकार्यः अथप्रयोगः उपवासदिनेनित्यपूजांकृत्वादमनकस्थानंगत्वाक्रयेण तमादायचन्दनादिनासंपूज्यश्रीकृष्णपूजार्थंत्वांनेष्ये इतिप्रार्थ्यप्रणमेत् अन्यदेवतासुयथादैवतमूहःततोदमनकंगृहमानीयपञ्चगव्येनशुद्धोदकेनचप्रक्षाल्यदेवाग्रेस्थापयित्वातस्मिन्दमनकेअशोककालवसन्तकामान्काममात्रंवागन्धादिभिःपूजयेत् तत्र नमोस्तुपुष्पबाणायजगदाह्लादकारिणे । मन्मथायजगन्नेत्रेरतिप्रीतिप्रियायते १ इतिकामावाहनमन्त्रः कामभस्मसमुद्भूतरतिबाष्पपरिप्लुत। ऋषिगन्धर्वदेवादिविमोहकनमोस्तुते १ इतिदमनकमुपस्थाय ॐ कामायनमइतिमन्त्रेणसपरिवारायकामरूपिणेदमनकायगन्धाद्युपचारान्दद्यात् ततोरात्रौदेवसंपूज्याधिवासनंकुर्यात् तदित्थम् देवाग्रेसर्वतोभद्रंसंपाद्यतत्रकलशं संस्थाप्यतत्रधौतवस्त्राच्छन्नंदमनकंवैणवपटलेस्थापितंनिधायपूजार्थंदेवदेवस्यविष्णोर्लक्ष्मीपतेःप्रभो। दमनत्वमिहागच्छसान्निध्यंकुरुतेनमः १ इतिदमनकदेवतामावाह्यप्रागाद्यष्टदिक्षु। क्लींकामदेवायनमोह्रींरत्यैनमः१ क्लींभस्मशरीरायनमोह्रींरत्यैनमः २ क्लींअनङ्गायनमोह्रींरत्यै० ३ क्लींमन्मथायनमोह्रींरत्यै० ४ क्लींवसन्त-**

सखायनमोन्हींरत्यै० ५ क्लींस्मरायनमोन्हीं० रत्यै ६ क्लींइक्षुचापायनमोन्हीं रत्यै० ७ क्लींपुष्पबाणास्त्रायनमोन्हींरत्यै० ८ इतिपूजयेत्तत्पुरुषायविद्महेकामदेवायधीमहि । तन्नोनङ्गःप्रचोदयात् । इतिगायत्र्यादमनकमष्टोत्तरशतमभिमन्त्र्यगन्धादिभिःसंपूज्यन्हींनमइतिपुष्पांजलिंदत्वा नमोस्तुपुष्पबाणायइतिपूर्वोक्तावाहनमन्त्रेणनमेत् क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह । प्रातस्त्वांपूजयिष्यामिसन्निधौभवतेनमः १ इतिदेवंप्रार्थ्यपुष्पाञ्जलिंदत्वातस्यामेकादश्यांरात्रौ जागरणंकुर्यात् प्रातर्नित्यपूजांकृत्वापुनर्देवंसंपूज्यदूर्वागन्धाक्षतयुतांदमनकमञ्जरीमादायमूलमन्त्रंपठित्वा देवदेवजगन्नाथवाञ्छितार्थप्रदायक । हृत्स्थान्पूरयमेविष्णोकामान्कामेश्वरीप्रिय १ इदंदमनकंदेवगृहाणमदनुग्रहात् । इमां सांवत्सरींपूजांभगवन्परिपूरय २ पुनर्मूलंजप्त्वादेवेदमनमर्पयेत् ततोयथाशोभं दत्वाङ्गदेवताभ्योदत्वादेवंप्रार्थयेत् मणिविद्रुममालाभिर्मन्दारकुसुमादिभिः । इयंसांवत्सरीपूजातवास्तुगरुडध्वज १ वनमालांयथादेवकौस्तुभंसततंहृदि । तद्वद्दामनकींमालांपूजांचहृदयेवह २ जानताजानतावापिनकृतंयत्तवार्चनम् । तत्सर्वंपूर्णतांयातुत्वत्प्रसादाद्रमापते ३ जितंतेपुण्डरीकाक्षनमस्तेविश्वभावन । हृषीकेशनमस्तेस्तुमहापुरुषपूर्वज ४ मन्त्रहीनंक्रियाहीनमित्यादिचसंप्रार्थ्य पञ्चोपचारैर्देवंसंपूज्यनीराज्यब्राह्मणेभ्योदमनंदत्वास्वयंशेषंसंधार्यसुहृद्युतःपारणंकुर्यात् मन्त्रदीक्षारहितैर्नाम्नार्पणीयम् अस्यगौणकालः श्रावणमासावधिः नेदंमलमासेभवति शुक्रास्तादौतुकर्तव्यम् । इतिदमनारोपणविधिः अस्यामेव भारते अहोरात्रेणद्वादश्यांचैत्रेविष्णुरितिस्मरन् । पौण्डरीकमवाप्नोतिदेवलोकंचगच्छति इति ।

**दमनोत्सव**—हा विष्णूचा दमनोत्सव चैत्रशुद्ध द्वादशीला पारणेच्या दिवशीं करावा. पारणेच्या दिवशीं जर एक घटकाहि द्वादशी न मिळेल, तर या पवित्र दमनोत्सवाला त्रयोदशी घ्यावी, असें वचन आहे. शिवाचा दमनोत्सव चतुर्दशीला करावा. दमनोत्सवाचा प्रयोग येणेंप्रमाणें:—'उपासाच्या दिवशीं नेहमींची देवपूजा करून 'श्रीकृष्णाच्या पूजेकरतां तुला नेतों' अशी प्रार्थना करून नमस्कार करावा. इतर देवतांविषयीं जर उत्सव करणें असेल, तर जी देवता असेल तिच्या नांवाचा उच्चार करून, नंतर दवणा घरीं आणावा आणि मग पंचगव्य आणि शुद्ध पाणी यांनीं तो धुऊन देवापुढें ठेवावा. दमनकाच्या जागीं—अशोक, काल, वसंत आणि काम या देवतांची, अथवा फक्त कामदेवाचीच गंधादिकांनीं पूजा करावी. 'नमोस्तु पुष्पबाणाय जगदाल्हादकारिणे । मन्मथाय जगन्नेत्रे रतिप्रीतिप्रियाय ते ॥' या मंत्रानें कामाचें आवाहन करावें. 'कामभस्मसमुद्भूत रतिबाष्पपरिप्लुतः । ऋषिगंधर्वदेवादिविमोहक नमोस्तु ते ॥ या मंत्रानें दवण्याची प्रार्थना करावी. 'ॐ कामाय नमः' या मंत्रानें परिवारासहित कामरूपी दवण्याची गंधादिकांनीं पूजा करावी. नंतर रात्रीं देवाची पूजा करून, जें अधिवासन करावें तें येणेंप्रमाणें:—देवाच्या पुढें सर्वतोभद्र मंडळ करून, त्यावर कलश ठेवावा. त्यावर धुतलेल्या वस्त्रांत

गुंडाळलेल्या वेळूच्या भांड्यासह दवणा ठेवावा. आणि 'पूजार्थं देवदेवस्य विष्णो-र्लक्ष्मीपते, प्रभो । दमन त्वामिहागच्छ सान्निध्यं कुरुते नमः ॥' या मंत्रानें (दमनक देवतेचें) आव्हान करावें. पूर्वादि आठ दिशांची नंतर जी पूजा करणें ती पुढील मंत्रांनीं करावी. (१) क्लीं कामदेवाय नमो ऱ्हीं रत्यै नमः । (२) क्लीं भस्मशरीराय नमो ऱ्हीं रत्यै नमः । (३) क्लीं अनङ्गाय नमो ऱ्हीं रत्यै नमः (४) क्लीं मन्मथाय नमो ऱ्हीं रत्यै नमः । (५) क्लीं वसन्तसखाय नमो ऱ्हीं रत्यै नमः । (६) क्लीं स्मराय नमो ऱ्हीं रत्यै नमः । (७) क्लीं इक्षुचापाय नमो ऱ्हीं रत्यै नमः । (८) क्लीं पुष्पबाणास्त्राय नमो ऱ्हीं रत्यै नमः । याप्रमाणें पूजा केल्यानंतर 'तत्पुरुषाय विद्महे कामदेवाय धीमहि । तन्नोनंगः प्रचोदयात् ॥' या गायत्रीनें दवण्याचें १०८ वेळां अभिमंत्रण करून, त्याची गंधादिकांनीं पूजा करावी. ऱ्हीं नमः' या मंत्रानें पुष्पांजलि द्यावा. 'नमोस्तु पुष्पबाणाय' ह्या पूर्वीं सांगितलेल्या आवाहनमंत्रानें नमस्कार करावा. 'क्षीरो-दधिमहानाग शय्यावस्थितविग्रह । प्रातस्त्वां पूजयिष्यामि सन्निधौ भवते नमः ॥ या मंत्रानें देवाची प्रार्थना करून, पुष्पांजलि द्यावा. त्या एकादशीला रात्रीं जागरण करावें. सकाळीं नित्याची पूजा करून, पुन्हां देवाची पूजा करावी. दूर्वा, गंध व अक्षता यांसहित दवण्याची मंजिरी आणून मूलमंत्र म्हणावा. 'देव देव जगन्नाथ वाञ्छितार्थप्रदायक । हृत्स्थान्पूरय मे विष्णो कामान् कामेश्वरीप्रिय ॥ इदं दमनकंदेव गृहाण मदनुग्रहात् । इमां सांवत्सरीं पूजां भगवान्परिपूरय ॥' हे मंत्र म्हणून पुन्हां मूलमंत्राचा जप करावा व देवाला दवणा अर्पण करावा व नंतर सुशोभित दिसेल अशा तऱ्हेनें दवणा देवाला वहावा. त्यानंतर अंगदेवतांना दवणा वाहून, पुढीलप्रमाणें प्रार्थना करावीः—'मणिविद्रुममालाभिर्मन्दार कुसुमादिभिः । इयं सांवत्सरी पूजा तवास्तु गरुडध्वज ॥ वनमालां यथा देव कौस्तुभं सततंहृदि । तद्वद्दामनकीं मालां पूजांच हृदये वह ॥ जानताजानतावापि न कृतं यत्तवार्च-नम् । तत्सर्वं पूर्णतां यातु त्वप्रसादाद्रमापते ॥ जितं ते पुण्डरीकाक्ष नमस्ते विश्वभावन । हृषीकेश नमस्तेऽस्तु महापुरुष पूर्वज ॥ मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर। यत्पूजितं मया देव परिपूर्णं तदस्तु मे ॥' या मंत्रांनीं प्रार्थना करावी. त्यानंतर पंचोपचारांनीं देवाची पूजा करून, आरती करावी. ब्राह्मणांना दवणा देऊन जो शिल्लक राहील तो स्वतः घ्यावा. इष्टमित्रांसह पारणें करावें. ज्यांनीं मंत्राची दीक्षा घेतली नसेल त्यांनीं नुसत्या नाममंत्रानेंच दवणा अर्पण करावा. या दमनकोत्सवाचा श्रावण महिन्यापर्यंत गौण काल आहे. हा उत्सव अधिक महिन्यांत व शुक्रास्तादिकांतहि करूं नये. याप्रमाणें दमना-रोपणाचा विधि सांगितला. याच चैत्रशुद्ध द्वादशीसंबंधानें भारतांत जें वचन आहे तें येणेंप्रमाणें:—'चैत्री द्वादशीला अहोरात्र विष्णूचें स्मरण करणाराला पुण्डरीक यज्ञाचें फळ मिळतें व तो देवलोकाला जातो.

**चैत्रशुक्लत्रयोदश्यामनङ्गपूजनव्रतं तत्रत्रयोदशीपूर्वविद्धाग्राह्या अथचतुर्दश्यांनृसिंहस्यदोलोत्सवः अत्रैवश्रीशिवस्यैकवीरायाभैरवस्यचदमनकैःपूजनम् अत्रचचतुर्दशीपूर्वाविद्धापराह्णव्यापिनीग्राह्या अपराह्णव्याप्त्यभावेऽपराह्णस्प-र्शिन्यपिपूर्वाग्राह्या तदभावे पराग्राह्या चैत्रपौर्णमासीसामान्यनिर्णयात्पराग्राह्या**

पूर्वोक्ततत्तत्तिथौदमनकपूजनाकरणेऽस्यामेवसर्वदेवानांदमनपूजनम् चैत्र्यांचित्रायुतायांचित्रवस्त्रदानंसौभाग्यदं रविगुरुमन्दवारयुतचैत्र्यांस्नानश्राद्धादिभिरश्वमेधपुण्यम् चैत्रस्यशुक्लैकादश्यांपौर्णमास्यां वामेषसंक्रान्तिमारभ्यवावैशाखस्नानारम्भः तत्रमन्त्रः वैशाखंसकलंमासंमेषसंक्रमणेरवेः । प्रातःसनियमःस्नास्येप्रीतयांमधुसूदनः १ मधुहन्तुःप्रसादेनब्राह्मणानामनुग्रहात् । निर्विघ्नमस्तु मेपुण्यंवैशाखस्नानमन्वहम् २ माधवेमेषगेभानौमुरारेमधुसूदन । प्रातःस्नानेनमे नाथ फलदोभवपापहन् ३ इति अत्र हविष्याशनब्रह्मचर्यादयोनियमाः एवं संपूर्णस्नानाशक्तौत्रयोदश्यादिदिनत्रयमन्तेस्नायात् इयंपौर्णमासीमन्वादिःपूर्वमुक्ता चैत्रकृष्णत्रयोदशीशततारकानक्षत्रयुतावारुणीसंज्ञकास्नानादिनाग्रहणादि पूर्वतुल्यफलदा शनिवारयुक्तामहावारुणीशुभयोगशनिवारशततारकायुक्तामहामहावारुणी वारुणीयोगेकृष्णादिःपौर्णमास्यन्तो मासस्तेनामान्तमासे फाल्गुनकृष्णत्रयोदशीग्राह्येतिबोध्यम् चैत्रकृष्णचतुर्दश्यांशिवसन्निधौस्नानेनभौमवारयुतायांगङ्गायांस्नानेनपिशाचत्वाभावःफलम् इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेचैत्रमासकृत्यनिर्णयोद्देशः समाप्तः

**अनंगपूजनव्रत**— चैत्र शुद्ध त्रयोदशीला अनंगपूजन व्रत करावें. त्यासाठीं जी त्रयोदशी द्वादशीनें विद्ध असेल ती घ्यावी. चतुर्दशीला नृसिंहाचा दोलोत्सव करावा. याच दिवशीं—श्रीशिव, एकवीरा देवी आणि भैरव यांची दवण्यानें पूजा करावी. या कामीं जी चतुर्दशी त्रयोदशीनें विद्ध व अपराह्णव्यापिनी असेल तीच घ्यावी. अपराह्णव्यातीचा जर अभाव असेल, तर निदान अपराह्णाला स्पर्श करणारी अशी जी आदल्या दिवसाची असेल, ती घ्यावी. तशीही नसल्यास दुसऱ्या दिवसाची घ्यावी. चैत्री पौर्णिमा सामान्य निर्णयानें दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पूर्वीं ज्या तिथि सांगितल्या त्या तिथींवर जर दवण्याची पूजा केली नसेल,तर पुनवेलाच सर्व देवांची दवण्यानें पूजा करावी. चैत्री पुनवेला चित्रानक्षत्र असतां, रंगीबेरंगी वस्त्राचें दान केलें असतां, तें सौभाग्यप्रद आहे. चैत्री पुनवेला रविवार, गुरुवार अथवा शनिवार असतां, स्नान, श्राद्ध वगैरे जर केलीं, तर अश्वमेधाचें पुण्य लागतें. चैत्रशुद्ध एकादशी, पुनव अथवा मेषसंक्रान्ति यांवर वैशाखस्नानाला जो आरंभ करायचा, त्याचा मंत्र येणेंप्रमाणें—'वैशाखं सकलं मासं मेषसंक्रमणे रवेः । प्रातः सनियमः स्नास्ये प्रीयतां मधुसूदन ॥ मधुहन्तुः प्रसादेन ब्राह्मणानामनुग्रहात् । निर्विघ्नमस्तु मे पुण्यं वैशाखस्नानमन्वहम् ॥ माधवे मेषगे भानौ मुरारे मधुसूदन । प्रातःस्नानेन मे नाथ फलदो भव पापहन् ॥' ह्या वैशाखस्नानव्रताच्या दिवसांत हविष्यान्नाचें भक्षण, ब्रह्मचर्य वगैरे नियम पाळावेत. अशाप्रकारें सर्व महिनाभर जर स्नान करण्यास कोणी असमर्थ असेल,तर (एकादशीला आरंभ केलेला असल्यास) त्रयोदशीपर्यंत तीन दिवस स्नान करावें. ही पुनव मन्वादि आहे असें पूर्वीं सांगितलेंच आहे. चैत्र वद्य त्रयोदशी जर शततारकानक्षत्रानें युक्त असेल, तर तिला वारुणी असें नांव आहे. या वारुणीवर स्नानदानादि कृत्यें केल्यास ग्रहणादि पर्वकालाप्रमाणें फळ मिळतें. शततारका नक्षत्र असून जर शनिवार असेल, तर त्या चैत्रवद्य

त्रयोदशीला महावारुणी म्हणतात. इतकें असून शिवाय जर शुभयोग असेल, तर तिला महावारुणी म्हणतात. वारुणीयोगाविषयीं कृष्णप्रतिपदेपासून पुनवेपर्यंत एक महिना समजावा. याकरतां अमावास्येनें संपणाऱ्या महिन्यासंबंधानें हा दिवस म्हणजे फाल्गुन कृष्ण त्रयोदशीचा येतो असें समजावें. चैत्र वद्य चतुर्दशीला शिवाच्या सन्निध स्नान केल्यानें, तसेंच त्या दिवशीं जर मंगळवार असेल तर गंगेंत स्नान केल्यानें पिशाचांचा त्रास होत नाहीं. याप्रमाणें धर्मसिंधुसार ग्रंथांतल्या चैत्र महिन्यांतल्या कृत्यांच्या निर्णयाचा उद्देश येथें संपूर्ण झाला.

अथवैशाखमासः। अत्रवृषसंक्रमेपूर्वाःषोडशनाडिकाःपुण्यकालः रात्रौच प्रागुक्तम् अत्रप्रातःस्नानंतिलैःपितृतर्पणंधर्मघटदानंचकार्यम् अत्रब्राह्मणानां गन्धमाल्यपानककदलीफलादिभिर्वसन्तपूजाकार्या वैशाखेज्येष्ठेवायत्रमासे- ऊष्मबाहुल्यंतत्रप्रातर्नित्यपूजांकृत्वागन्धोदकपूर्णपात्रेविष्णुंसंस्थाप्यपञ्चोप- चारैः संपूज्यतत्रैवजलेसूर्यास्तपर्यन्तमधिवास्यरात्रौस्वस्थानेस्थापयित्वापञ्चो- पचारैः पूजयेत्तेनतीर्थोदकेनगृहदारादियुतमात्मानंपावयेत् एतच्चद्वादश्यांदिवा- नकार्यम् रात्रौकिंचित्कालंजलस्थंपूजयित्वास्वस्थानेस्थापयेत् अत्रमासेकृष्णगौ- राख्यतुलसीभिर्विष्णुं त्रिकालमर्चयेन्मुक्तिःफलम् प्रातःस्नात्वाबहुतोयेनाश्वत्थ- मूलं सिञ्चेत्प्रदक्षिणाश्चकुर्यात् अनेककुलतारणंफलम् एवंगवांकण्डूयनेऽपि अत्र- मासेएकभक्तंनक्तमयाचितंवासर्वेप्सितफलप्रदम् अत्रमासेप्रपादानंदेवेगलन्ति- काबन्धनंव्यजनच्छत्रोपानच्चन्दनादिदानंमहाफलम् यदावैशाखोमलमासोभ- वतितदाकाम्यानांतत्रसमाप्तिनिषेधान्मासद्वयंवैशाखस्नानहविष्याशनादिनि- यमाअनुष्ठेयाःचान्द्रायणादिकंतुमलेऽपिसमापनीयम् वैशाखशुक्लतृतीयायांग- ङ्गास्नानंयवहोमोयवदानंयवाशनंचसर्वपापापहम् यःकरोतितृतीयायांकृष्णंचन्द- भूषितम्। वैशाखस्यासितेपक्षेसयात्यच्युतमन्दिरम् १ इयमक्षय्यतृतीयासंज्ञिका अस्यांयत्किञ्चिज्जपहोमपितृतर्पणदानादिक्रियतेतत्सर्वमक्षयम् इयंरोहिणीबुध- योगेमहापुण्य अस्याःजपहोमादिकृत्येपिवक्ष्यमाणयुगादिवन्निर्णयः इयंकृत- युगस्यादिः अत्रयुगादिश्राद्धमपिण्डकमनुष्ठेयम् श्राद्धासंभवेतिलतर्पणमप्यत्र- कार्यम् अत्रशुक्लयुगादिकृत्यंपूर्वाह्णेकार्यम् तत्रासंभवेऽपराह्णेऽपि कृष्णयुगादि- कार्यंत्वपराह्णेइत्यादिमन्वादिप्रकरणोक्तोनिर्णयः द्वेधाविभक्तदिनपूर्वार्धैकदेश- व्यापिनी दिनद्वयेचेत्त्रिमुहूर्ताधिकव्याप्तिसत्त्वेपरा त्रिमुहूर्तन्यूनत्वेपूर्वा मन्वादौच- युगादौचग्रहणेचन्द्रसूर्ययोः। व्यतीपातेवैधृतौचतत्कालव्यापिनीक्रिया १ इति- वचनेनसाकल्यव्याप्तिवाक्यानामपवादात्श्राद्धादिकंतृतीयामध्येएवकर्तव्यम्।पु- रुषार्थचिन्तामणौतुसप्तमाष्टमनवममुहूर्तानांगान्धर्वकुतुपरौहिणसंज्ञकानांयुगा- दिश्राद्धकालत्वात् शुक्लेमध्यमदिनमानेत्रयोदश्यादिपञ्चदश्यन्तघटीत्रयव्यापि- न्यांश्राद्धं कृष्णेतुषोडशीमारभ्यघटीत्रये उभयत्रतादृशघटीत्रयव्याप्तौसत्यामस- त्यांवाशुक्लापरा यदातुपरेद्युस्त्रयोदशघटीतःपूर्वसमाप्तापूर्वेद्युस्त्रयोदश्यादिघटी- त्रयेतदेकदेशेवाविद्यतेतदाकर्मकालशास्त्रबाहुल्यात्पूर्वैवग्राह्येत्युक्तम् इदमेवयु-

कमितिभाति अत्रदेवतोद्देशेनपित्रुद्देशेनचोदकुम्भदानमुक्तम् तत्रश्रीपरमेश्वर-प्रीतिद्वाराउदकुम्भदानकल्पोक्तफलावाप्त्यर्थं ब्राह्मणायोदकुम्भदानं करिष्ये-इतिसंकल्प्यसूत्रवेष्टितंगन्धफलयवाद्युपेतंकलशपञ्चोपचारैर्ब्राह्मणंचसंपूज्य एष-धर्मघटोदत्तोब्रह्मविष्णुशिवात्मकः। अस्यप्रदानात्सकलाममसन्तुमनोरथाः १ इतिमन्त्रेणदद्यात् पित्रुद्देशेतुपितृणामक्षय्यतृप्त्यर्थंउदकुम्भदानंकरिष्येइतिसं-कल्प्यपूर्ववत्कुम्भब्राह्मणौसंपूज्योदकुम्भेगन्धतिलफलादिनिक्षिप्य एषधर्मघटो-दत्तोब्रह्मविष्णुशिवात्मकः। अस्यप्रदानात्तृप्यंतुपितरोपिपितामहाः१ गन्धोदक-तिलैर्मिश्रंसान्नंकुम्भंफलान्वितम्। पितृभ्यःसंप्रदास्यामिअक्षय्यमुपतिष्ठतु २ इतिमन्त्रेणदद्यात् युगादौसमुद्रस्नानंमहाफलम् वैशाखस्याधिमासत्वेयुगादि-श्राद्धंमासद्वयेपिकार्यम् युगादिषूपवासोमहाफलः युगादिमन्वादौरात्रिभोजने अभिस्ववृष्टिमितिमन्त्रजपः युगादिश्राद्धलोपे युगादिश्राद्धलोपजन्यप्रत्यवाय परिहारार्थमृग्विधानोक्तंप्रायश्चित्तंकरिष्ये इतिसंकल्प्य नयस्यद्यावेतिऋचंशत-वारंजपेत् अयंनिर्णयः सर्वयुगादौज्ञेयः इतिअक्षय्यतृतीयानिर्णयः।

**वैशाखमासांतील कृत्यें**—वैशाख महिन्यांत वृषभ संक्रांतीच्या पहिल्या सोळा घटका पुण्यकाळ. संक्रांति जर रात्रीं आली असेल तर पुण्यकाळ मागें सांगितल्याप्रमाणें समजावा. या महिन्यांत प्रातःस्नान, तिळांनीं पितृतर्पण व धर्मघटाचें दान—हीं कर्में करावींत. त्याचप्रमाणें—गंध, फुलांच्या माळा, पन्हें, केळीं वगैरे वस्तूंनीं ब्राह्मणांची वसंतपूजा करावी. वैशाख अथवा ज्येष्ठ यांपैकीं ज्या महिन्यांत अतिशय उकाडा होत असेल त्या महिन्यांत सकाळीं नित्यपूजा करून, गंध व पाणी यांनीं भरलेल्या भांड्यांत विष्णूची स्थापना करावी आणि त्याची पंचो-परांची पूजा करावी. त्या तीर्थानें—स्वतःला आपल्या बायकोला व घरांतल्या इतर माणसांना पावन करावें. हें कृत्य द्वादशीला दिवसां न करतां रात्रीं थोडा वेळ पाण्यांतल्या विष्णूची पूजा करून, त्याला त्याच्या योग्य ठिकाणीं ठेवावा. या वैशाख महिन्यांत कृष्णगौर नांवाच्या तुलसींनीं विष्णूची त्रिकाल पूजा करावी. याचें फल मुक्ति आहे. सकाळीं स्नान करून पिंपळाच्या मुळावर पुष्कळ पाणी घालावें व प्रदक्षिणा कराव्या. असें केल्यानें अनेक कुळें तरून जातात. गाईचें अंग खाजविलें असतांहि, हेंच फल मिळतें. या महिन्यांत—एक वेळ जेवणें, संध्याकाळीं जेवणें किंवा अवचित म्हणजे कोणी न बोलावतांच जेवायला जाणें--हीं सर्व इच्छित हेतु पार पाडतात. या महिन्यांत पाणपोई घालणें, देवावर पाण्याची गळती बांधणें, पंखा, छत्री, जोडा, चंदन वगैरे वस्तूंचें दान देणें—या गोष्टींचें मोठें फल मिळतें. वैशाख महिना आल्यास, मलमासांत काम्यव्रताची समाप्ति करूं नये—असा निषेध सांगितला असल्यानें, दोन महिनेपर्यंत—हविष्यान्नाचें भक्षण वगैरे नियमांचें अनुष्ठान करावें. चांद्रायणादिक व्रतांची समाप्ति मलमासांत देखील होते. वैशाख शुद्ध तृतीयेला गंगास्नान, जवसांचा होम, जवसांचें दान व जवस खाणें या गोष्टी केल्यास सर्व पापांचा नाश होतो. वैशाख शुद्ध तृतीयेला जो कोणी कृष्णाचें अंग चंदनानें विभूषित करतो, तो

वैकुंठाला जातो. या तृतीयेला अक्षय्यतृतीया असें नांव आहे. या दिवशीं जें जें कांहीं—जप, होम, पितृतर्पण, दान वगैरे करावें, तें सारें अक्षय्य होतें. बुधवार असून रोहिणी नक्षत्र जर या तृतीयेला असण्याचा योग असेल, तर तो महापुण्य-कारक होय. या दिवशीं जर जप, होम वगैरे कृत्यें करायचीं असलीं तर त्यांबद्दलचा निर्णय, पुढें युगादि तिथींचा जो निर्णय सांगितला आहे, त्याप्रमाणेंच येथेंही जाणावा. ही तृतीया कृतयुगाच्या आरंभाचा दिवस होय. या दिवशीं युगादिश्राद्ध पिण्डांवांचून करावें. श्राद्ध करणें अशक्य असल्यास, निदान तिलतर्पण तरी करावें; शुक्लपक्षांतल्या युगादि तिथीचें कृत्य, पूर्वाह्णकाळीं करावें; पूर्वाह्णीं करण्याचा संभव नसल्यास अपराह्णींहि करावें. कृष्णपक्षांतल्या युगादि तिथींचें कार्य अपराह्णकाळीं करावें, असा मन्वादि तिथिप्रकरणांत निर्णय सांगितला आहे. दिवसाचे दोन समान भाग करून त्यांतल्या पूर्वार्धांत जर एकदेशव्याप्ति दोन दिवस असेल व ती जर सहा घटकांहून अधिक असेल, तर अक्षय्य तृतीया दुसऱ्या दिवसाची घ्यावी. सहा घटकांहून कमी व्याप्ति असल्यास पहिल्या दिवसाची घ्यावी. मन्वादि, युगादि, चंद्रसूर्यांचीं ग्रहणें, व्यतिपात आणि वैधृति यांसंबंधीं करायचीं जीं कृत्यें, तीं तत्कालव्यापिनी अशा तिथींवर करावींत, असें वचन आहे. यांस संपूर्णव्याप्तीचा अपवाद असल्यानें, श्राद्धादिक कृत्यें तृतीयेंतच करावींत. पुरुषार्थचिंतामणींत जे गांधर्व, कुतुप आणि रौहिण या नांवांचे अनुक्रमें —सातवा, आठवा आणि नववा असे मुहूर्त दिले आहेत, ते युगादि श्राध्दांचे काल असल्यानें, शुक्लपक्षांत मध्यम दिनमानानें, तेरापासून पंधरा घटकांपर्यंतच्या ज्या तीन घटका, त्यांत व्याप्ति असलेल्या तिथींवर श्राद्ध करावें. कृष्णपक्षांत सोळाव्या घटकेपासून तीन घटकांत श्राद्ध करावें. अशी तीन घटकांची व्याप्ति दोन्ही दिवशीं असल्यास किंवा नसल्यास शुक्लपक्षांत दुसऱ्या दिवसाची तिथि घ्यावी. दुसऱ्या दिवशीं जर तेरा घटकांच्या आंतच तिथि संपेल आणि पहिल्या दिवशीं जर तेराव्या घटकेपासून तीन घटकांत संपूर्ण अथवा एकदेशव्याप्ति असेल, तर कर्मकालाविषयीं अधिक आधार आहेत, म्हणून पहिल्याच दिवसाची तिथि घ्यावी, असें जें सांगितलें आहे, तेंच मला सयुक्तिक वाटतें. या तृतीयेला देवता व पितर यांच्या नांवानें उदकुंभदान करावें. 'श्रीपरमेश्वरप्रीतिद्वारा उदकुंभदानकल्पोक्तफलावाप्त्यर्थं ब्राह्मणाय उदकुम्भदानं करिष्ये' असा संकल्प करावा आणि सूत गुंडाळलेल्या आणि गंध, फळ, यव इत्यादि-कांनीं युक्त अशा कलशाची आणि ब्राह्मणाची पंचोपचारें पूजा करून, 'एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णुशिवात्मकः। अस्य प्रदानात् तृप्यन्तु पितरोपि पितामहाः। गन्धोदक-तिलैर्मिश्रं सान्नं कुम्भं फलान्वितम्। पितृभ्यः सम्प्रदास्यामि अक्षय्यमुपतिष्ठतु॥' या मंत्रानें ब्राह्मणाला कलशाचें दान द्यावें. युगादि तिथींवर समुद्रस्नानाचें मोठें पुण्य सांगितलें आहे. वैशाखाचा महिना जर अधिक असेल, तर दोन्ही महिन्यांत युगादि श्राद्ध करावें. युगादि तिथीला उपास केल्याचें मोठें फळ आहे. युगादि आणि मन्वादि या तिथींवर रात्रीं जेवण केलें असतां, 'अभिस्त्ववृष्टिं०' या मंत्राचा जप करावा. युगादि श्राद्धाचा लोप झाल्यास 'युगादिश्राद्धलोपजन्यप्रत्यवायपरिहारार्थं-

मृग्विधानोक्तं प्रायश्चित्तं करिष्ये' असा संकल्प करून, 'नयस्यद्यावा०' या ऋचेचा शंभर वेळ जप करावा. सर्व युगादि तिथींचा हाच निर्णय समजावा. असा हा अक्षय्यतृतीयेचा निर्णय जाणावा.

**इयमेवतृतीयापरशुरामजयन्ती इयंरात्रिप्रथमयामव्यापिनीग्राह्या पूर्वेद्युरेवप्रथमयामव्याप्तौ पूर्वा दिनद्वयेरात्रिप्रथमयामेसाम्येनवैषम्येणवैकदेशव्याप्तौ परा अत्रप्रदोषेपरशुरामंसंपूज्यार्घ्यंदद्यात् तत्रमन्त्रः। जमदग्निसुतोवीरक्षत्रियान्तकरप्रभो। गृहाणार्घ्यंमयादत्तंकृपयापरमेश्वर १ इति वैशाखशुक्लसप्तम्यां गङ्गोत्पत्तिस्तस्यां मध्याह्नव्यापिन्यांगङ्गापूजनंकार्यम् दिनद्वयेतद्व्याप्तौपूर्वा। वैशाखमासेद्वादश्यांपूजयेन्मधुसूदनम्। अग्निष्टोममवाप्नोतिसोमलोकंचगच्छति १ वैशाखशुक्लचतुर्दशीनृसिंहजयन्ती सा सूर्यास्तमयकालव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तौतदव्याप्तौवापरैव स्वातीनक्षत्रशनिवारादियोगेसातिप्रशस्ता।**

**परशुरामजयन्ती**—ही अक्षय्यतृतीयाच परशुरामजयन्ती होय. रात्रींच्या पहिल्या प्रहरांत जिची व्याप्ति असेल, अशी या कामीं घ्यावी. पहिल्या दिवशीं जर पहिल्या प्रहराची व्याप्ति असेल, तर ती घ्यावी. दोन दिवस जर पहिल्या प्रहरांत समान अथवा कमी अधिक एकदेशव्याप्ति असेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. या दिवशीं प्रदोषकालीं परशुरामाची पूजा करून, 'जमदग्निसुतो वीर क्षत्रियान्तकर प्रभो। गृहाणार्घ्यं मया दत्तं कृपया परमेश्वर ॥' या मंत्रानें अर्घ्य द्यावें. वैशाख शुद्ध सप्तमीला गंगेची उत्पत्ति झाली असल्यानें, मध्यान्हकालव्यापिनी अशा सप्तमीला गंगेची पूजा करावी. दोन दिवस जर व्याप्ति असेल, तर पहिल्या दिवशीं गंगापूजन करावें. वैशाखी द्वादशीला मधुसूदनाची पूजा करावी, म्हणजे अग्निष्टोमयज्ञाचें फळ मिळतें व तें करणारा पुरुष सोमलोकाला जातो. वैशाख शुद्ध चतुर्दशी ही नृसिंहजयन्ती होय. सूर्यास्ताच्या वेळीं व्याप्ति असलेली तिथि या दिवशीं घ्यावी. दोन दिवस व्याप्ति असेल, अथवा दोन्ही दिवशीं नसेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. स्वाति नक्षत्र आणि शनिवार असा जर योग असेल तर ती चतुर्दशी अति प्रशस्त होय.

**अथव्रतप्रयोगः। त्रयोदश्यांकृतैकभुक्तश्चतुर्दश्यांमध्याह्नेतिलामलकैः स्नात्वा उपोष्येहंनारसिंहभुक्तिमुक्तिफलप्रद। शरणंत्वांप्रपन्नोऽस्मि भक्तिमेनृहरे दिश १ इति मन्त्रेणव्रतंसंकल्प्याचार्यंवृत्वासायंकालेधान्यस्थोदकुम्भेपूर्णपात्रे सौवर्णप्रतिमायांषोडशोपचारैर्देवंसंपूज्यार्घ्यंदद्यात् तत्रमन्त्रः। परित्राणायसाधूनांजातोविष्णोनृकेसरी। गृहाणार्घ्यंमयादत्तंसलक्ष्मीर्नृहरिः स्वयम् १ रात्रौ जागरणं कृत्वा प्रातर्देवंसंपूज्यविसृज्याचार्यायधेनुयुतांप्रतिमांदद्यात्तत्रमन्त्रः। नृसिंहाच्युत गोविन्द लक्ष्मीकान्तजगत्पते। अनेनार्चाप्रदानेन सफलाःस्युर्मनोरथाः१ अथप्रार्थना। मद्वंशेयेनराजातायेजनिष्यन्तिचापरे। तांस्त्वमुद्धरदेवेश दुःसहाद्भवसागरात् १ पातकार्णवमग्नस्यव्याधिदुःखाम्बुवारिधेः। नीचैश्चपरिभूतस्यमहादुःखागतस्यमे २ करावलम्बनंदेहिशेषशायिन्जगत्पते। श्रीनृसिंह रमाकान्तभक्तानांभयनाशन ३ क्षीराम्बुधिनिवासस्त्वंचक्रपाणेजनार्दन। व्रते-**

नानेनदेवेशभुक्तिमुक्तिप्रदोभव ४ इतिततोब्राह्मणैःसहतिथ्यन्तेपारणं कार्यम् यामत्रयोर्ध्वगामिन्यांचतुर्दश्यांतु पूर्वाह्णेएवपारणम् पौर्णमास्यांशृतान्नसहितोदकुम्भदानेगोदानफलम् स्वर्णतिलयुक्तद्वादशोदकुम्भदानेब्रह्महत्यापापान्मुक्तिः अत्रयथाविधिकृष्णाजिनदानेपृथ्वीदानफलम् स्वर्णमधुतिलसर्पिर्युतकृष्णाजिनदानेसर्वपापनाशः अत्रतिलस्नानंतिलहोमस्तिलपात्रदानंतिलतैलेनदीपदानंतिलैः पितृतर्पणंमधुयुक्ततिलदानंचमहाफलम्। तत्रतिलदानमन्त्रः। तिलावैसोमदैवत्याःसुरैःसृष्टास्तुगोसवे। स्वर्गप्रदाःस्वतन्त्राश्चतेमांरक्षन्तुनित्यशः १ वैशाखशुक्लद्वादश्यांपौर्णमास्यांवावैशाखस्नानोद्यापनम् एकादश्यांपौर्णमास्यां वोपोष्यकलशे सुवर्णप्रतिमायांसलक्ष्मीकंविष्णुंसंपूज्यरात्रौजागरणंकृत्वाप्रातर्ग्रहपूजनपूर्वकंपायसेन तिलाज्यैर्वायवैर्वाअष्टोत्तरशतंहोमः प्रतद्विष्णुरितिवाइदंविष्णुरितिवा मन्त्रेणकार्यः सांगतार्थंगोदानंपादुकोपानहछत्रव्यजनोदकुम्भदानं शय्यादिदानंचकार्यम् अशक्तेनकृसराद्यन्नैर्दशब्राह्मणभोजनंकार्यम् एतत्पौर्णमासीमारभ्यज्येष्ठशुक्लैकादशीपर्यन्तंजलस्थविष्णुपूजोत्सवःकार्यः वैशाखामावास्याभावुकाख्यदिनंतत्परंकरिसंज्ञकदिनंचशुभेषुवर्ज्यम्। इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेवैशाखमासकृत्योद्देशः॥

**नृसिंहजयन्तीव्रतप्रयोग**—त्रयोदशीला एक वेळ जेवावें. मध्याह्नीं तीळ व आंवळे वांटून अंगाला त्यांचें मिश्रण लावावें व स्नान करावें. 'उपोष्येहं नारसिंह भुक्तिमुक्तिफलप्रद। शरणं त्वां प्रपन्नोऽस्मि भक्तिं मे नृहरे दिश॥' या मंत्रानें व्रताचा संकल्प करून, आचार्य पसंत करून ठेवावा. संध्याकाळीं धान्याच्या (तान्दुळाच्या) राशीवर पाण्यानें भरलेला कलश ठेवून, त्यावर पूर्णपात्र ठेवावें. त्या पूर्णपात्रांत नृसिंहाची सोन्याची प्रतिमा ठेवून तिची पूजा करावी व अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र असाः—परित्राणाय साधूनां जातो विष्णो नृकेसरी। गृहाणार्घ्यं मया दत्तं सलक्ष्मीर्नृहरिःस्वयम्॥' रात्रीं जागरण करून सकाळीं देवाची पूजा करावी, आणि मग देवतेचें विसर्जन करावें. त्यानंतर आचार्याला त्या प्रतिमेचें दान गाईसकट करावें. दानमंत्र येणेंप्रमाणेंः—'नृसिंहाच्युत गोविंद लक्ष्मीकान्त जगत्पते। अनेनार्चाप्रदानेन सफलाःस्युर्मनोरथाः॥' त्यानंतर 'मद्वंशे ये नरा जाता ये जनिष्यन्ति चापरे। तांस्त्वमुद्धर देवेश दुःसहाद्भवसागरात्॥ पातकार्णवमग्नस्य व्याधिदुःखाम्बुवारिधेः। नीचैश्च परिभूतस्य महादुःखागतस्य मे॥ करावलंबनं देहि शेषशायिन् जगत्पते। श्रीनृसिंह रमाकान्त भक्तांना भयनाशन॥ क्षीराम्बुधिनिवासस्त्वं चक्रपाणे जनार्दन। व्रतेनानेन देवेश भुक्तिमुक्तिप्रदो भव॥' अशी प्रार्थना करावी. त्यानंतर तिथि संपण्याच्या वेळीं पारणें करावें. चतुर्दशी जर तीन प्रहरांहून अधिक असेल, तर पूर्वाह्णकाळीं पारणें करावें. पौर्णिमेला जर शिजविलेल्या अन्नासहित उदकुंभदान केलें, तर गोदानफळ मिळतें. सोनें व तीळ घातलेल्या बारा उदकुंभांचें जर दान केलें, तर ब्रह्महत्येचें पातक नष्ट होतें. या दिवशीं कृष्णाजिनाचें (काळ्या पाठीच्या हरणाच्या कातड्याचें) जर यथाविधि दान केलें, तर पृथ्वीदानाचें फळ मिळतें.

सोनें, मध, तीळ व तूप—यांसह जर कृष्णाजिनाचें दान केलें, तर सर्व पापांचा नाश होतो. या दिवशीं तिलस्नान, तिलहोम, तिलपात्रदान, तिळाच्या तेलाच्या दिव्याचें दान, तिळांनीं पितृतर्पण व मधासह तिलदान—हीं केलीं असतां, मोठें फळ मिळतें. तिळांच्या दानाचा मंत्र—'तिला वै सोमदैवत्याः सुरैः सृष्टास्तु गोसवे। स्वर्गप्रदाः स्वतंत्राश्च ते मां रक्षन्तु नित्यशः'। वैशाख शुद्ध द्वादशीला अथवा पुनवेला, वैशाख-स्नानाचें उद्यापन करावें. एकादशी अथवा पुनव या दिवशीं उपास करून, कलशा-वर सोन्याची प्रतिमा मांडावी व लक्ष्मीसह विष्णूची पूजा करावी. रात्रीं जागरण करून, सकाळीं ग्रहांची पूजा करावी. नंतर खीर किंवा तीळ व तूप यांचा 'प्रतद्विष्णु०' अथवा 'इदं विष्णु०' या मंत्रानें १०८ होम करावा. होमाची सांगता व्हावी म्हणून गोदान, पादुका, जोडा, छत्री, पंखा, उदकुंभ, अंथरूण वगैरे दानें द्यावींत. इतकें करण्यास जर अशक्यता असेल, तर तिलमिश्रित अन्नाचें दहा ब्राह्मणांना भोजन घालावें. वैशाखी पुनवेपासून आरंभ करून, ज्येष्ठशुद्ध एकादशीपर्यंत विष्णूला पाण्यांत ठेवून, त्याचा पूजोत्सव करावा. वैशाखी अमावास्येला भावुका असें नांव आहे व तिच्या पुढच्या दिवसाला करि म्हणतात. हे दोन्ही दिवस शुभकार्याला वर्ज्य आहेत. याप्रमाणें काशीनाथोपाध्यायांनीं रचलेल्या धर्मसिंधुसारापैकीं वैशाख महिन्यांतल्या कृत्यांचा उद्देश येथें संपला.

**अथज्येष्ठकृत्यम्। मिथुनसंक्रान्तौपराःषोडशनाड्यः पुण्यकालः रात्रौतुप्रा-गुक्तम् ज्येष्ठमासेपिष्टेनब्रह्ममूर्तिंकृत्वावस्त्राद्यैः पूजयेत्सूर्यलोकप्राप्तिः अत्रमासे जलधेनुदानमुक्तम् ज्येष्ठशुक्लप्रतिपदिकरवीरव्रतमुक्तम् ज्येष्ठशुक्लतृतीयायां रम्भाव्रतंसापूर्वविद्धाग्राह्या यत्रपूर्वविद्धाग्राह्यतयोच्यते तत्रास्तात्पूर्वंद्विमुहूर्ता-धिकायाग्राह्यत्वंज्ञेयंनन्यूनायाः तत्रापियदिपरेद्युःसूर्यास्तमयपर्यन्तंपूर्वविद्धाया-स्तिथेः सत्त्वंतदासत्यपिपूर्वविद्धाग्राह्यत्ववचनेपूर्वविद्धांत्यक्त्वाआखण्डत्वा-च्छुद्धत्वात्परैवग्राह्या यदातुग्राह्यायाःपूर्वविद्धायाः पूर्वेद्युर्मुहूर्तद्वयान्न्यूनत्वंपरे-द्युश्चास्तमयात्प्राक्समाप्तत्वंतदापिपरैवग्राह्या एवंसर्वत्रोह्यम् रम्भाव्रतेपञ्चाग्नि-तपनपरास्त्रीपुमान्वाभवानींस्वर्णप्रतिमायांसंपूज्य यथोक्तविधिहोमादिकृत्वास-पत्नीकायगृहंसोपस्करंदद्यात् दांपत्यानिभोजयेत् विशेषविधिर्व्रतग्रन्थेज्ञेयः चतुर्थ्यामुमावतारस्तत्रोमापूजनव्रतम् अष्टम्यांशुक्लादेवीपूज्या नवम्यामुपो-ष्यदेवींपूजयेत् ।**

**ज्येष्ठमासकृत्यें**—मिथुनसंक्रान्तीच्या पुढच्या सोळा घटका पुण्यकाल असतो. रात्रीबद्दलचा निर्णय पूर्वींच सांगितला आहे. ज्येष्ठ महिन्यांत ब्रह्मदेवाची पिठाची मूर्ति करून, तिची वस्त्रादिकांनीं पूजा केल्यास सूर्यलोकाची प्राप्ति होते. या महिन्यांत पाणी व गाय यांचें दान करावें. ज्येष्ठशुद्ध प्रतिपदेला करवीर व्रत करावें. ज्येष्ठ शुद्ध तृतीयेला रंभाव्रत करावें. या व्रताकरितां जी तृतीया पूर्वविद्धा असेल ती घ्यावी. ज्या कार्याकरितां पूर्वविद्धा तृतीया घ्यावी असें सांगितलें आहे, त्या ठिकाणीं, सूर्यास्ताच्या आधीं सहा घटकांपेक्षां अधिक व्याप्ति असणारी जी तिथि

ती पूर्वविद्धा आहे असें समजावें. सहा घटकांपेक्षां कमी असल्यास अग्राह्य समजावी; असें जरी आहे, तरी दुसऱ्या दिवशीं जर सूर्यास्तापर्यंत पूर्वविद्धा तिथीची व्याप्ति असेल, तर पूर्वविद्धातिथी घ्यावी असें वचन आहे. तरी पण पूर्वविद्धा सोडून अखंड व शुद्धा अशी दुसऱ्या दिवसाचीच ग्राह्य होय. ग्राह्य अशा पूर्वविद्धा तिथीच्या पहिल्या दिवशीं जेव्हां सहा घटकांपेक्षां कमी व्याप्ति असेल, तेव्हां सुद्धां दुसऱ्या दिवसाचीच तिथि ग्राह्य होय, असा सर्वत्र निर्णय जाणावा. पञ्चाग्निसाधन करणारा पुरुष अथवा स्त्री यांनीं रम्भाव्रतांत भवानीची सोन्याची मूर्ति करून, तिची पूजा करावी. तद्वतच होमादि यथाविधि करून, बायको असलेल्या ब्राह्मणाला सर्व सामुग्रीसह घराचें दान द्यावें व दंपत्यांना जेवूं घालावें. याचा विशेष विधि, व्रतांच्या माहितीच्या ग्रंथांत पाहावा. ज्येष्ठशुद्ध चतुर्थीला पार्वतीचा अवतार झाला, म्हणून त्या दिवशीं उमापूजनाचें व्रत करावें. अष्टमीला शुक्लादेवीची पूजा करावी. नवमीला उपास करून देवीची पूजा करावी.

**ज्येष्ठशुक्लदशम्यांगङ्गावतारः इयंदशहरासंज्ञिका अत्रदशयोगा उक्ताः ज्येष्ठमासि १ सितपक्षे २ दशम्यां ३ बुध ४ हस्तयोः ५। व्यतीपाते ६ गरानन्दे ७।८ कन्याचन्द्रे ९ वृषरवौ १० इति गराख्यं करणं। बुधवारहस्तयोगे आनन्दाख्योयोगः अत्रदशमीव्यतीपातयोर्मुख्यत्वम् तेनयस्मिन्दिनेकतिपययोगवतीदशमीपूर्वाह्णेऽभ्यतेतत्रदशहराव्रतंकार्यम् दिनद्वयेपूर्वाह्णेतत्सत्वेयत्रबहूनांयोगः साग्राह्या ज्येष्ठेमलमासे सति तत्रैवदशहराकार्यानतुशुद्धेदशहरासुनोत्कर्षश्चतुर्ष्वपियुगादिष्विविति हेमाद्रौऋष्यशृङ्गोक्तेः अत्रकाशीवासिभिर्दशाश्वमेधतीर्थेस्नात्वागङ्गापूजनंकार्यम् इतरदेशस्थैः स्वसंनिहितनद्यां स्नात्वा गङ्गापूजनादिकं कार्यम्।**

**गंगापूजन**—ज्येष्ठशुद्ध दशमीला गंगेचा अवतार झाला. या दशमीला दशहरा असें नांव आहे. त्या दिवशीं जे दहा योग सांगितले आहेत, ते असेः—(१) ज्येष्ठमास, (२) शुक्लपक्ष, (३) दशमी, (४) बुधवार, (५) हस्तनक्षत्र, (६) व्यतिपात, (७) गर (८) आनंदयोग, (९) कन्याराशीचा चंद्र आणि (१०) वृषभ राशीचा रवि. गर या नांवाचें करण आहे. बुधवारीं हस्तनक्षत्र असतां आनंद नांवाचा योग होतो. या ठिकाणीं दशमी आणि व्यतिपात हीं मुख्य आहेत; म्हणून ज्या वेळीं यांपैकीं ज्यास्त योगांनीं युक्त अशी दशमी पूर्वाह्णकाळीं असेल, ती दशहराव्रताला घ्यावी. दशमी जर पूर्वाह्णीं असेल, तर ज्या दिवशीं अधिक योग असतील ती घ्यावी. ज्येष्ठाचा महिना जर अधिक असेल, तर अधिक महिन्यांतहि दशहराव्रत करावें, शुद्ध महिन्यांत करूं नये. कोणच्याहि युगांत दशहराव्रत पुढें नेऊं नये असें हेमाद्रींत ऋष्यशृंगाचें वचन आहे, म्हणून, हें व्रत अधिकमासांतच करावें. काशीक्षेत्रांत राहाणाऱ्यांनीं या दिवशीं दशाश्वमेधतीर्थांत व इतरांनीं संनिध असलेल्या नदींत स्नान करून गंगापूजनादिक करावें.

**अथव्रतविधिः देशकालौसंकीर्त्यममैतज्जन्मजन्मान्तरसमुद्भूतात्रिविधकायि-**

कचतुर्विधवाचिकत्रिविधमानसेतिस्कान्दोक्तदशविधपापनिरासत्रयस्त्रिंशच्छत-
पित्रुद्धारब्रह्मलोकावाप्त्यादिफलप्राप्त्यर्थं ज्येष्ठमाससितपक्षदशमी बुधवार-
हस्ततारकागरकरणव्यतीपातानन्दयोगकन्यास्थचन्द्रवृषस्थसूर्येतिदशयोगपर्व-
ण्यस्यांमहानद्यांस्नानंतीर्थेपूजनंप्रतिमायांजाह्नवीपूजांतिलादिदानंमूलमन्त्रजप-
माज्यहोमंच यथाशक्तिकरिष्ये यथाविधिस्नानं दशवारंकृत्वाजलेस्थितोदशवा-
रंसकृद्वावक्ष्यमाणं स्तोत्रं पठित्वा वासःपरिधानादिपितृतर्पणान्तंनित्यंविधाय
तीर्थेपूजां विधायसर्पिर्मिश्रान्दशप्रसृतिकृष्णतिलान्तीर्थेऽञ्जलिनाप्रक्षिप्यगुडमि-
श्रान्सक्तुपिण्डान्दशप्रक्षिपेत् ततोगङ्गातटेताम्रेमृण्मयेवास्थापितेकलशेसौवर्णा-
दिप्रतिमायांगङ्गामावाहयेत् तत्रमन्त्रःनमोभगवत्यैदशपापहरायैगङ्गायैनाराय-
ण्यैरेवत्यैशिवायै दक्षायै अमृतायैविश्वरूपिण्यैनन्दिन्यैतेनमोनमः। अयंस्त्र्यादि
साधारणः द्विजमात्रविषयोविंशत्यक्षरोयथा। ॐनमः शिवायैनारायण्यैदशहरायै
गङ्गायैस्वाहेतिएवंगङ्गामावाह्य नारायणंरुद्रंब्रह्माणंसूर्यंभगीरथंहिमाचलंचनाम-
मन्त्रेणतत्रैवावाह्यउक्तमूलमन्त्रानुच्चार्य श्रीगङ्गायैनारायणरुद्रब्रह्मसूर्यभगी-
रथहिमवत्सहितायैआसनंसमर्पयामीत्येवमासनाद्युपचारैः पूजयेत् दशविधैः
पुष्पैः संपूज्यदशाङ्गधूपंदत्वादशविधनैवेद्यान्तेताम्बूलंदक्षिणांदत्वादशफला-
न्यर्पयेत् दशदीपान्दत्वापूजांसमापयेत् दशविप्रेभ्यः प्रत्येकं षोडशषोडशमुष्टि-
तिलान्सदक्षिणान्दद्यात् एवंयवानपि ततोदशगाएकांवागांदद्यात् मत्स्यकच्छ-
पमण्डूकान्सौवर्णान्राजतान्पिष्टमयान्वासंपूज्यतीर्थेक्षिपेत् एवंदीपान्प्रवाहयेत्
जपहोमचिकीर्षायां पूर्वोक्तमूलमन्त्रस्यपञ्चसहस्रसंख्योजपो दशांशेनहोमः
यथाशक्ति वा जपहोमौ तत्रदशहरावताङ्गत्वेनहोमंकरिष्येइतिसंकल्प्यस्थण्डि-
लेग्निंप्रतिष्ठाप्यान्वाधानेचक्षुषीआज्येनेत्यन्ते श्रीगङ्गाममुक संख्ययाज्येन
नारायणादिषड्देवताएकैकयाज्याहुत्याशेषेणस्विष्टकृतमित्यादिप्रोक्षण्यादिषट्
पात्राण्यासाद्याज्यंसंस्कृत्ययथान्वाधानंजुहुयात् दशब्राह्मणान्सुवासिनींश्च
भोजयेत् प्रतिपद्दिनमारभ्यस्नानादिपूजान्तोविधिः कार्यइतिकेचित् स्तोत्रंयथा
स्कान्देब्रह्मोवाच। नमःशिवायैगङ्गायैशिवदायैनमोनमः। नमस्तेरुद्ररूपिण्यै
शाङ्कर्यैतेनमोनमः १ नमस्तेविश्वरूपिण्यैब्रह्ममूर्त्यैनमोनमः। सर्वदेवस्वरूपिण्यै
नमोभेषजमूर्तये २ सर्वस्यसर्वव्याधीनांभिषक्श्रेष्ठ्यैनमोस्तुते। स्थाणुजङ्गमसं-
भूतविषहन्त्र्यैनमोनमः ३ भोगोपभोगदायिन्यैभोगवत्यैनमोनमः। मन्दाकि-
न्यैनमस्तेस्तुस्वर्गदायैनमःसदा ४ नमस्त्रैलोक्यभूषायैजगद्धात्र्यैनमोनमः। नम-
स्त्रिशुक्लसंस्थायैतेजोवत्यैनमोनमः ५ नन्दायैलिङ्गधारिण्यैनारायण्यैनमोनमः।
नमस्तेविश्वमुख्यायैरेवत्यैतेनमोनमः ६ बृहत्यैतेनमस्तेस्तुलोकधात्र्यैनमोनमः।
नमस्ते विश्वामित्रायै नन्दिन्यैतेनमोनमः ७ पृथ्व्यैशिवामृतायैचसुवृषायैनमो-
नमः। शान्तायैचवरिष्ठायै वरदायैनमोनमः ८ उस्रायैसुखदोग्ध्र्यैचसंजीवि-
न्यैनमोनमः। ब्रह्मिष्ठायैब्रह्मदायैदुरितघ्न्यैनमोनमः ९ प्रणतार्तिप्रभञ्जिन्यैजग
न्मात्रेनमोस्तुते। सर्वापत्प्रतिपक्षायैमङ्गलायैनमोनमः १० शरणागतदीनार्त-

परित्राणपरायणे । सर्वस्यार्तिहरेदेविनारायणिनमोस्तुते ११ निर्लेपायैदुर्गहन्त्यै दक्षायैतेनमोनमः। परात्परतरेतुभ्यंनमस्तेमोक्षदेसदा १२ गङ्गेममाऽग्रतोभूयागङ्गेमेदेविपृष्ठतः। गङ्गेमेपार्श्वयोरेहित्वयिगङ्गेस्तुमेस्थितिः १३ आदौत्वमन्तेमध्येचसर्वंत्वंगांगतेशिवे। त्वमेवमूलप्रकृतिस्त्वंहिनारायणःपरः १४ गङ्गेत्वंपरमात्माचाशिवस्तुभ्यंनमःशिवे। यइदंपठतिस्तोत्रंभक्त्यानित्यंनरोपियः१५ शृणुयाच्छ्रद्धयायुक्तःकायवाक्चित्तसंभवैः। दशधासंस्थितैर्दोषैःसर्वैरेवप्रमुच्यते १६ सर्वान्कामानवाप्नोतिप्रेत्यब्रह्मणिलीयते। ज्येष्ठेमासिसितेपक्षेदशमीहस्तसंयुता १७ तस्यांदशम्यामेतच्चस्तोत्रंगङ्गाजलेस्थितः। यःपठेद्दशकृत्वस्तुदरिद्रोवापिचाक्षमः १८ सोपितत्फलमाप्नोतिगङ्गांसंपूज्ययत्नतः। अदत्तानामुपादानंहिंसाचैवाविधानतः १९ परदारोपसेवाचकायिकंत्रिविधंस्मृतम्। पारुष्यमनृतंचैवपैशून्यंचापिसर्वशः २० असंबद्धप्रलापश्चवाङ्मयंस्याच्चतुर्विधम्। परद्रव्येष्वभिध्यानंमनसानिष्टचिन्तनम् २१ वितथाभिनिवेशश्चमानसंत्रिविधंस्मृतम्। एतानिदशपापानिहरत्वंममजाह्नवि २२ दशपापहरायस्मात्तस्माद्दशहरास्मृता। त्रयस्त्रिंशच्छतंपूर्वान्पितॄनथपितामहान् २३ उद्धरत्येवसंसारान्मन्त्रेणानेनपूजिता। नमोभगवत्यैदशपापहरायैगङ्गायैनारायण्यैरेवत्यैशिवायैदक्षायैअमृतायैविश्वरूपिण्यैनन्दिन्यैतेनमोनमः। सितमकरनिषण्णांशुभ्रवर्णांत्रिनेत्रांकरधृतकलशोद्यत्सोत्पलामत्यभीष्टाम्। विधिहरिहररूपांसेन्दुकोटीरजुष्टांकलितसितदुकूलांजान्हवींतांनमामि १ आदावादिपितामहस्य निगमव्यापारपात्रेजलंपश्चात्पन्नगशायिनोभगवतः पादोदकंपावनम्। भूयः शंभुजटाविभूषणमणिर्जह्नोर्महर्षेरियंदेवीकल्मषनाशिनीभगवतीभागीरथीदृश्यते २ गङ्गागङ्गेतियोब्रूयाद्योजनानांशतैरपि। मुच्यतेसर्वपापेभ्योविष्णुलोकंसगच्छति ३ इतिस्तोत्रेणस्तुत्वाहोमान्तेप्रतिमोत्तरपूजांकृत्वाविसृज्याचार्यायमूलमन्त्रेणदद्यात्। इतिदशहराविधिः॥

**दशहराव्रतविधि**—देशकालादिकांचा उच्चार करून, 'ममैतजन्मजन्मान्तरसमुद्भूतत्रिविधकायिक चतुर्विधवाचिक त्रिविधमानसेतिस्कान्दोक्त दशविधपापनिरासत्रयस्त्रिंशच्छतपितृउद्धारब्रह्मलोकावाप्त्यादिफलप्राप्त्यर्थं ज्येष्ठमाससितपक्षदशमीबुधवारहस्ततारकागरकरणव्यतीपातानन्दयोग कन्यास्थचंद्र वृषस्थसूर्येतिदशयोगपर्वण्यस्यां महानद्यां स्नानं तीर्थपूजनं प्रतिमायां जान्हवीपूजां तिलादिदानं मूलमंत्रजपमाज्यहोमं च यथाशक्ति करिष्ये।' असा संकल्प सोडल्यावर दहा वेळां यथाविधि स्नान करावें. पाण्यांत उभें राहून, पुढें दिलेलें (स्कंदपुराणांतलें) स्तोत्र दहावेळां म्हणावें. नंतर कोरडें वस्त्र नेसून पितृतर्पणासुद्धां सारा नित्यविधि करावा. तीर्थांची पूजा करावी. तूप लावलेले दहा पसे तीळ गंगेंत टाकावेत. नंतर गूळ मिसळलेल्या पिठाचे दहा पिण्ड गंगेंत टाकल्यावर गंगेच्या कांठीं तांब्याचा अथवा मातीचा कलश स्थापन करून, त्यावर गंगेची सोन्याची प्रतिमा ठेवावी. 'नमो भगवत्यै दशपापहरायै गंगायै नारायण्यै रेवत्यै शिवायै दक्षायै अमृतायै विश्वरूपिण्यै नन्दिन्यै ते नमोनमः।' या मंत्रानें

गंगेचें आवाहन करावें. हा मंत्र स्त्रिया वगैरे सर्वांनीं म्हणावा. फक्त ब्राह्मणानेंच या वेळीं म्हणण्याकरितां जो वीस अक्षरांचा मंत्र आहे तो असा:—'ॐ नमः शिवायै नारायण्यै दशहरायै गंगायै स्वाहा।' याप्रमाणें गंगेचें आवाहन केल्यावर, त्या ठिकाणीं नारायण, रुद्र, ब्रह्मा, सूर्य, भगीरथ व हिमालय यांचें नाममंत्रानें आवाहन करून व पूर्वोक्त मूलमंत्र उच्चारून 'श्रीगंगायै नारायणरुद्रब्रह्मसूर्यभगीरथहिमवत्सहितायै आसनं समर्पयामि' असें म्हणून, आसनादि उपचारांनीं पूजा करावी. दहा प्रकारचीं फुलें अर्पण करून, दशांगधूप द्यावा व दहा प्रकारचा नैवेद्य दाखवावा. नंतर विडा व दक्षिणा देऊन दहा फळें द्यावींत. शेवटीं दहा दिव्यांचें दान देऊन, पूजा समाप्त करावी. दहा ब्राह्मणांना, प्रत्येकीं सोळा मुठी तीळ दक्षिणेसह द्यावे. त्याचप्रमाणें यवही द्यावेत. नंतर दहा गाई अथवा निदान एक तरी गाय द्यावी. सोनें, रुपें अथवा पीठ यांचे मासे, कांसवें, बेडूक वगैरे करून, ते तीर्थांत टाकावेत. याप्रमाणेंच दिवेसुद्धां प्रवाहांत सोडावेत. जप आणि होम करण्याची इच्छा असल्यास, वर जो मूलमंत्र सांगितला आहे, त्याचा पांच हजार जप करून त्याच्या दशांशानें होम करावा किंवा जप व होम हीं यथाशक्ति करावींत. 'दशहराव्रताङ्गत्वेन होमं करिष्ये' असा संकल्प करून, स्थंडिलावर अग्नीची स्थापना करावी. 'चक्षुषी आज्येन इत्यन्ते श्रीगंगाम् अमुकसंख्या आज्येन नारायणादिषड्देवता एकैकया आज्याहुत्या शेषेण स्विष्टकृतम्।' या मंत्रानें अग्नीवर समीध ( अन्वाधान ) ठेवावी. नंतर प्रोक्षणी वगैरे सहा पात्रें मांडून त्यांवर तूप फिरवावें आणि अन्वाधानाप्रमाणें होम करावा. दहा ब्राह्मण व दहा सुवासिनी यांना जेवूं घालावें. प्रतिपदेपासून आरंभ करून दशमी-पर्यंत स्नानादिक पूजेपर्यंतचा सारा विधि करावा, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. गंगेचें स्तोत्र स्कंदपुराणांत पुढील प्रमाणें दिलें आहे:—"ब्रह्मोवाच ॥ नमः शिवायै गङ्गायै शिवदायै नमोनमः। नमस्ते रुद्ररूपिण्यै शांकर्यै ते नमोनमः॥ नमस्ते विश्वरूपिण्यै ब्रह्ममूर्त्यै नमोनमः। सर्वदेवस्वरूपिण्यै नमो भेषजमूर्तये॥ सर्वस्य सर्वव्याधीनां भिषक्श्रेष्ठ्यै नमोस्तु ते। स्थाणुजंगमसंभूतविषहन्त्र्यै नमोनमः॥ भोगोपभोगदायिन्यै भोगवत्यै नमोनमः। मंदाकिन्यै नमस्तेस्तु स्वर्गदायै नमः सदा॥ नमस्त्रैलोक्यभूषायै जगद्धात्र्यै नमोनमः। नमस्त्रिशुक्लसंस्थायै तेजोवत्यै नमोनमः॥ नन्दायै लिंगधारिण्यै नारायण्यै नमोनमः। नमस्ते विश्वमुख्यायै रेवत्यै ते नमोनमः॥ बृहत्यै ते नमस्तेस्तु लोकधात्र्यै नमोनमः। नमस्ते विश्वा-मित्रायै नन्दिन्यै ते नमोनमः॥ पृथ्व्यै शिवामृतायै च सुवृषायै नमोनमः॥ शान्तायै च वरिष्ठायै वरदायै नमोनमः। उस्रायै सुखदोग्ध्र्यै च संजीविन्यै नमोनमः। ब्रह्मिष्ठायै ब्रह्मदायै दुरितघ्न्यै नमोनमः॥ प्रणतार्तिप्रभंजिन्यै जगन्मात्रे नमोस्तुते। सर्वापत्प्रतिपक्षायै मङ्गलायै नमोनमः॥ शरणागतदीनार्तपरित्राण-परायणे। सर्वस्यार्तिहरे देवि नारायणि नमोस्तु ते॥ निर्लेपायै दुर्गहन्त्र्यै दक्षायै ते नमोनमः। परात्परतरे तुभ्यं नमस्ते मोक्षदे सदा॥ गङ्गे ममाग्रतो भूया गङ्गे मे देवि पृष्ठतः। गंगे मे पार्श्वयोरेहि त्वयि गंगेस्तु मे स्थितिः॥ आदौ त्वमन्ते

मध्ये च सर्वे त्वं गां गते शिवे। त्वमेव मूलप्रकृतिस्त्वं हि नारायणः परः ॥ गंगे त्वं परमात्मा च शिवस्तुभ्यं नमः शिवे। य इदं पठति स्तोत्रं भक्त्या नित्यं नरोपि यः शृणुयात् श्रद्धया युक्तः कायवाक्चित्तसंभवैः। दशधा संस्थितैर्दोषैः सर्वैरेव प्रमुच्यते ॥ सर्वान्कामानवाप्नोति प्रेत्य ब्रह्मणि लीयते ॥ ज्येष्ठे मासि सिते पक्षे दशमी हस्तसंयुता ॥ तस्यांदशम्यामेतच्च स्तोत्रं गंगाजले स्थितः। यः पठेद्दशकृत्वस्तु दारिद्रो वापि चाक्षमः ॥ सोपि तत्फलमाप्नोति गंगां संपूज्य यत्नतः। अदत्तानामुपादानं हिंसा चैवाविधानतः। परदारोपसेवा च कायिकं त्रिविधं स्मृतम् ॥ पारुष्यमनृतं चैव पैशून्यं चापि सर्वशः। असंबद्धप्रलापश्च वाङ्मयं स्याच्चतुर्विधम्। परद्रव्येष्वभिध्यानं मनसानिष्टचिन्तनं। वितथाभिनिवेशश्च मानसं त्रिविधं स्मृतम् ॥ एतानि दश पापानि हर त्वं मम जान्हवि। दशपापहरा यस्मात्तस्माद्दशहरा स्मृता ॥ त्रयस्त्रिंशच्छतं पूर्वान् पितॄनथ पितामहान्। उद्धरत्येव संसारान्मन्त्रेणानेन पूजिता ॥ नमो भगवत्यै दशपापहरायै गंगायै नारायण्यै रेवत्यै शिवायै दक्षायै अमृतायै विश्वरूपिण्यै नन्दिन्यै ते नमोनमः ॥ सितमकरनिषण्णां शुभ्रवर्णां त्रिनेत्रां करधृतकलशोद्यत्सोत्पलामत्यभीष्टाम्। विधिहरिहररूपां सेन्दुकोटीरजुष्टाम्। कलितासितदुकूलां जान्हवीं तां नमामि ॥ आदावादिपितामहस्य निगमव्यापारपात्रे जलम्। पश्चात्पन्नगशायिनो भगवतः पादोदकं पावनम् ॥ भूयः शम्भुजटाविभूषणमणिर्जन्होर्महर्षेरियं। देवी कल्मषनाशिनी भगवती भागीरथी दृश्यते ॥ गङ्गा गङ्गेति यो ब्रूयाद्योजनानां शतैरपि। मुच्यते सर्वपापेभ्यो विष्णुलोकं स गच्छति ॥ " या स्तोत्रानें पाण्यांत उभें राहून स्तवन करावें. होमानंतर प्रतिमेची पूजा करून, तिचें विसर्जन करावें आणि मूलमंत्र म्हणून ती आचार्याला द्यावी. याप्रमाणें येथें दशहराविधि पुरा झाला.

ज्येष्ठशुक्लैकादशीनिर्जला अस्यांनित्याचमनादिव्यतिरिक्तजलपानवर्जनेनोपवासेकृतेद्वादशैकादश्युपवासफलम् द्वादश्यांचनिर्जलोपोषितैकादशीव्रताङ्गत्वेनसहिरण्यसशर्करोदकुम्भदानं करिष्ये इति संकल्प्य देवदेवहृषीकेश संसारार्णवतारक। उदकुम्भप्रदानेनयास्यामिपरमांगतिम् १ इतिमन्त्रेण शर्करायुतंसहिरण्यमुदकुम्भंदद्यात् ज्येष्ठमाससितद्वादश्यामहोरात्रंत्रिविक्रमपूजनाद्गवामयनाख्यक्रतुफलसिद्धिः ज्येष्ठपौर्णमास्यांतिलदानादश्वमेधफलम् ज्येष्ठानक्षत्रयुतायांज्यैष्ठ्यांछत्रोपानहदानान्नराधिपत्यप्राप्तिः ज्येष्ठपौर्णिमायांबिल्वत्रिरात्रिव्रतमुक्तम् अत्रपरविद्धाग्राह्या।

ज्येष्ठशुद्ध एकादशीला निर्जला एकादशी म्हणतात. या एकादशीला नेहमींच्या आचमनाव्यतिरिक्त पाणी पिणें बंद करून उपास केला असतां, बारा एकादश्यांच्या उपासाचें फळ मिळतें. द्वादशीला 'निर्जलोपोषितैकादशीव्रताङ्गत्वेन सहिरण्यसशर्करोदकुम्भदानं करिष्ये' असा संकल्प करावा आणि 'देवदेव हृषीकेश संसारार्णवतारक। उदकुंभप्रदानेन यास्यामि परमां गतिम् ॥' हा मंत्र म्हणून, साखर व सोनें यांच्यासह पाण्यानें भरलेला कुंभ दान करावा. ज्येष्ठांतल्या शुद्ध द्वादशीला तिलदान केलें

असतां, अश्वमेधयज्ञाचें फळ मिळतें. ज्येष्ठ महिन्यांतल्या ज्येष्ठा नक्षत्रानें युक्त अशा पुनवेला—छत्री व उपानह (जोडा) यांचे दान केलें असतां राज्यप्राप्ति होते. ज्येष्ठी पुनवेला बिल्वत्रिरात्रीव्रत करण्यास सांगितलें आहे. या व्रताकरतां पुढच्या तिथीनें विद्ध असलेली पुनव घ्यावी.

अस्यामेववटसावित्रीव्रतम्॥ अत्रव्रतेत्रयोदश्यादिदिनत्रयमुपवासः अशक्तौतुत्रयोदश्यांनक्तं चतुर्दश्यामयाचितंपौर्णमास्यामुपोषणम् अत्रपौर्णमासीनिर्णयानुसारेणयथात्रिरात्रंभवेत्तथा त्रयोदश्यादिदिनत्रयंग्राह्यम् तत्रपौर्णिमासूर्यास्तमयात्पूर्वंत्रिमुहूर्ताधिकव्यापिनीचतुर्दशीविद्धाग्राह्या त्रिमुहूर्तन्यूनत्वेपरैव- भूतोऽष्टादशनाडीभिर्दूषयत्युत्तरांतिथिमितिवचनंसावित्रीव्रतातिरिक्तेज्ञेयम्सावित्रीव्रतोपवासेऽष्टादशनाडीविद्धाया अपिग्राह्यत्वात् यत्तुकेवलपूजनात्मकमुपवासरहितंसावित्रीव्रतंसर्वत्रस्त्रियोनुतिष्ठन्तितत्रभूतोष्टादशेतिवेधोव्रतदानादिपरोनतूपवासपरइतिनिर्णयसिन्धुलिखितमाधवाशयानुसारेणाष्टादशनाडीचतुर्दशीसत्त्वेपरैवपूजाव्रतेग्राह्याउपवासव्रतेतुपूर्वेतिममप्रतिभाति अत्रपारणंपूर्णिमान्तेकर्तव्यम् अत्ररजस्वलादिदोषेपूजादिब्राह्मणद्वाराकार्यम् स्वयमुपवासादिकंकार्यमित्यादयःस्त्रीव्रतेविशेषाःप्रथमपरिच्छेदेज्ञेयाःअत्रपूजोद्यापनादिविधिर्व्रतग्रन्थेप्रसिद्धः अत्रज्येष्टपौर्णिमायांज्येष्ठानक्षत्रेबृहस्पतिश्चन्द्रश्चरोहिणीनक्षत्रेतुसूर्यस्तदामहाज्यैष्ठीतियोगस्तत्रस्नानदानादिकंकार्यम् अस्याः पौर्णमास्यामन्वादित्वादत्रपिण्डरहितं श्राद्धमुक्तम् एतन्निर्णयश्चैत्रेउक्तः अत्रमासेविप्रेभ्यश्चन्दनव्यजनोदकुम्भादिकांत्रिविक्रमप्रीतयेदेयम् । इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेज्येष्टमासनिर्णयोद्देशः॥

**वटसावित्रीव्रत**—ज्येष्ठी पुनवेला वटसावित्रीव्रत असतें. या व्रतांत त्रयोदशीपासून तीन दिवस उपास करावा. तीन दिवस उपास करण्याची शक्ति नसल्यास त्रयोदशीला नक्त, चतुर्दशीला अयाचित आणि पुनवेला उपास याप्रमाणें करावींत. या व्रतांत जे तीन दिवस घ्यायचे ते पौर्णिमेच्या नियमानुसारानें त्रयोदशीपासून तीन दिवस घ्यावेत. सूर्यास्ताच्या पूर्वीं तीन मुहूर्त व्यापिनी व चतुर्दशीनें विद्ध असलेली पौर्णिमा या व्रताकरतां घ्यावी; तीन मुहूर्तांहून जर ती कमी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पुनव जरी चतुर्दशीच्या अठरा घटकांनीं विद्ध झालेली असली, तरी ती सावित्रीव्रताला घ्यावी. 'चतुर्दशी अठरा घटकांनीं पुढच्या तिथीला दूषित करते'—असें जें वचन आहे, तें सावित्रीव्रताखेरीज इतर व्रतांना लागू आहे असें समजावें. उपास न करतां फक्त पूजा करूनच सर्वत्र जें सावित्रीव्रत स्त्रिया करतात, त्याच्या व्रतदानाविषयीं चतुर्दशीचा अठरा घटका वेध आहे व उपास नाहीं, असा जो निर्णयसिंधूंत माधवाचा अभिप्राय लिहिला आहे, त्याला अनुसरून जर अठरा घटका चतुर्दशी असेल, तर पूजाव्रताला दुसऱ्या दिवसाची घ्यावी व उपासव्रताला मात्र पहिली घ्यावी असें मला वाटतें. या व्रताचें पारणें पुनवेच्या शेवटीं करावें. विटाळशीपणा वगैरे दोष असल्यास, पूजा वगैरे सर्व ब्राह्मणाकडून कर-

वावें. उपास वगैरे स्वतः करण्याचे जे स्त्रीव्रताविषयीं विशेष आहेत, ते पहिल्या परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें समजावेत. व्रताची पूजा, उद्यापन वगैरे विधि व्रतग्रंथांत प्रसिद्ध आहेतच. ज्येष्ठी पुनवेला ज्येष्ठा नक्षत्रीं गुरु व चंद्र आणि रोहिणी नक्षत्रीं जेव्हां सूर्य असेल, तेव्हां महाज्येष्ठी पुनवेचा योग होतो. त्या दिवशीं स्नानदानादि करावींत. ही पुनव मन्वादि असल्यानें, तिच्या दिवशीं पिण्डांवांचून श्राद्ध करावें असें सांगितलें आहे. याचा निर्णय चैत्रमासप्रकरणांत सांगितला आहे. या ज्येष्ठमहिन्यांत-चंदन, पंखा, उदकुंभ वगैरे वस्तूंचीं दानें केलीं असतां त्रिविक्रम संतुष्ट होतो. याप्रमाणें अनंतोपाध्यायांचे पुत्र काशीनाथोपाध्याय यांनीं रचिलेल्या धर्मसिंधुसारांतला ज्येष्ठमास-निर्णयाचा उद्देश येथें संपला.

**अथाषाढेदक्षिणायनसंज्ञाकर्कसंक्रान्तिः कर्कसंक्रान्तौ पूर्वात्रिंशन्नाड्यः पुण्य-कालः तत्रापिसंक्रान्तिसन्निहितानाड्यः पुण्यतमाः रात्रावर्धरात्रात्प्राक्परतश्च संक्रमेपिपूर्वदिनेपुण्यकालः तत्रापिमध्याह्नात्परतः पुण्यतमत्वम् सूर्योदयोत्तरं घटीद्वयात्प्राक्संक्रमेपरतएवपुण्यम् ज्योतिर्ग्रन्थेतुसूर्योदयात्प्राक्घटीत्रयात्मक संध्यासमयेपिकर्कसंक्रमेपरदिनेएवपुण्यमित्युक्तम् अत्रदानोपवासादिप्रथमप-रिच्छेदेउक्तम् कर्ककन्याधनुःकुम्भस्थेरवौ केशकर्तनादिकंनिषिद्धम् आषाढे-मासमेकभुक्तव्रतेकृतेबहुधनधान्यपुत्रप्राप्तिः अत्रमासेउपानच्छत्रलवणामलका-निवामनप्रीत्यैदेयानि आषाढशुक्लद्वितीयायांपुष्यनक्षत्रयुतायांकेवलायांवा श्री-रामस्यरथोत्सवः आषाढशुक्लपक्षेदशमीपौर्णमासीचमन्वादिः तन्निर्णयस्तूक्तः।**

**आषाढमासांतलीं कृत्यें**— आषाढ महिन्यांत जी कर्कसंक्रांति होते तिला दक्षिणायन असें म्हणतात. कर्कसंक्रांतीच्या आधीं-च्या तीस घटका जरी पुण्यकाल असतो, तरी तिच्या अगदीं सन्निध असणाऱ्या घट-काच अधिक पुण्यदायक असतात. रात्रीं मध्यरात्रीच्या आधीं अथवा नंतर जरी संक्रमण असलें, तरी पूर्व दिवशीं पुण्यकाळ समजावा, आणि त्यांतल्या त्यांत मध्याह्नां-नंतरचा काळ अधिक पुण्यकारक होय. सूर्योदयानंतर दोन घटकांच्या आंत जर संक्र-मण असलें तर दुसऱ्याच दिवशीं पुण्यकाळ. सूर्योदयाच्या आधींचा तीन घटकांचा जो संध्यासमय, त्यामध्यें जरी कर्कसंक्रमण होत असलें तरी दुसऱ्याच दिवशीं पुण्यकाळ समजावा असें ज्योतिषविषयाच्या ग्रंथांत सांगितलें आहे. या दिवशीं करायचीं दानें, उपास वगैरेची माहिती पहिल्या परिच्छेदांत सांगितली आहे. कर्क, कन्या, धनु व कुंभ या राशींवर जेव्हां सूर्य असेल, तेव्हां केशकर्तन वगैरे गोष्टी निषिद्ध मानिल्या आहेत. सबंद आषाढाच्या महिनाभर जर एकवेळ रोज जेवण केलें, तर पुष्कळ धन-धान्य व पुत्र यांचा लाभ होतो. या महिन्यांत—जोडा, छत्री, मीठ व आंवळे यांचें दान केल्यानें वामनाचा संतोष होतो. आषाढ शुद्ध द्वितीया जरी पुष्य नक्षत्रानें युक्त असली अथवा नसली, तरी त्या दिवशीं श्रीरामाचा रथोत्सव करावा. आषाढ शुद्ध दशमी आणि पौर्णिमा या तिथि मन्वादि असून, यांचा निर्णय पूर्वींच सांगितला आहे.

अथैकादश्यांविष्णुशयनोत्सवः। तत्रसोपस्करेमञ्चकेसुप्तांश्रीविष्णुप्रतिमां शङ्खादिचतुरायुधांलक्ष्मीसंवाहितचरणांनानाविधोपचारैः संपूजयेत्। सुप्तेत्वयि जगन्नाथेजगत्सुप्तंभवेदिदम्। विबुद्धेत्वयिबुध्येततत्सर्वंसचराचरम् १ इति प्रार्थ्यउपोष्यजागरंकृत्वाद्वादश्यांपुनःसंपूज्यत्रयोदश्यां गीतनृत्यवाद्यादिकं निवेदयेत् एवमिदंत्रिदिनसाध्यंव्रतम् तत्रस्मार्तैर्वैष्णवैश्चस्वस्वैकादशीव्रतदिने शयनीव्रतमारब्धव्यम् रात्रौशयनोत्सवः दिवाप्रबोधोत्सवः द्वादश्यांपारणाद्वे- शयनप्रबोधोत्सवावितिकेचित् अत्रदेशाचाराद्व्यवस्था नेदंमलमासेकार्यम् आषाढशुद्धद्वादश्यामनुराधायोगरहितायांपारणंकार्यम् तत्रापि अनुराधाप्रथम पादयोगएववर्ज्यः यदातुद्वादशीस्वल्पावर्ज्यनक्षत्रभागोद्वादशीमतिक्रम्यविद्य- तेतदानिषेधमनादृत्यद्वादश्यामेवपारणंकार्यमितिकौस्तुभेउक्तम् सङ्गवकाल- भागंत्यक्त्वाप्रातर्मध्याह्नभागेवाभोक्तव्यमितिपुरुषार्थचिन्तामणौ।

**विष्णुशयनोत्सव**—आषाढ शुद्ध एकादशीला सर्वोपचारांनीं युक्त अशा पलंगावर शंखचक्रादि आयुधांनीं युक्त व लक्ष्मी पाय चुरीत बसली आहे अशी श्रीविष्णूची प्रतिमा ठेवून, तिची अनेक प्रकारच्या उपचारांनीं पूजा करावी. 'सुप्ते त्वयि जगन्नाथे जगत्सुप्तं भवेदिदम्। विबुद्धे त्वयि बुध्येत तत्सर्वं सचराचरम्॥' अशी तिची मग प्रार्थना करावी. त्या दिवशीं उपास करून रात्रीं जागरण करावें. द्वादशीला पुन्हां पूजा करून, त्रयोदशीला—गायन, नर्तन, वाद्यवादन वगैरेनीं सेवा करावी. असें हें तीन दिवसांचें व्रत आहे. या बाबतींत स्मार्त आणि वैष्णव यांनीं आपापल्या एकादशीला शयनीव्रताचा आरंभ करावा. रात्रीं शयनोत्सव करावा व दिवसास प्रबोधोत्सव करावा. द्वादशीला पारण्याच्या दिवशीं शयनोत्सव आणि प्रबोधोत्सव हे करावेत, असें कोणी म्हणतात. या बाबतींत देशाचाराप्रमाणें वागावें. हें व्रत अधिक महिन्यांत करूं नये. आषाढ शुद्ध द्वादशीला जेव्हां अनुराधानक्षत्र नसेल तेव्हां पारणें करावें. त्यांतही अनुराधा नक्षत्राचा पहिला चरण मात्र वर्ज्य समजावा. ज्यावेळीं द्वादशी थोडी असून वर्ज्य नक्षत्राचा भाग द्वादशीचा अतिक्रम करीत असेल त्यावेळीं निषेधाचा त्याग करून, द्वादशीलाच पारणें करावें असें कौस्तुभांत सांगितलें आहे. संगवकालाचा भाग टाकून, सकाळीं अथवा मध्यान्हकाळीं जेवण करावें असें पुरुषार्थ-चिन्तामणींत सांगितलें आहे.

द्वादश्यांपारणोत्तरंसायंपूजांकृत्वाचातुर्मास्यव्रतसंकल्पं कुर्यादितिकौस्तुभे एकादश्यामेवेतिनिर्णयसिन्धुः चातुर्मास्यव्रतप्रथमारम्भोगुरुशुक्रास्तादावाशौ- चादौचनभवति द्वितीयाद्यारम्भस्तुअस्तादौआशौचादौचभवत्येव चातुर्मा- स्यव्रतंचशैवादिभिरपिकार्यम्।

**चातुर्मास्यव्रत**—द्वादशीला पारणें केल्यावर संध्याकाळीं पूजा करून चातुर्मास्य-व्रताचा संकल्प करावा; असें कौस्तुभांत सांगितलें आहे. हा संकल्प एकादशीलाच करावा असें निर्णयसिन्धु म्हणतो. चातुर्मास्यव्रताचा आरंभ अगदीं पहिल्यानेंच जर करणें असेल, तर—गुरुशुक्रांचे अस्तादिक, सुतक, सोयर वगैरे

प्रसंगीं तो करूं नये. दुसऱ्यांदा वगैरे जर आरंभ करणें असेल तर अस्तादिक व अशौचादिक यांमध्येंहि करायला हरकत नाहीं. चातुर्मास्यव्रत शैवादिकांनींहि करावें.

**व्रतग्रहणप्रकारस्तु भगवतोजातीपुष्पादिभिर्महापूजांकृत्वा सुप्तेत्वयिजगन्नाथेजगत्सुप्तंभवेदिदम्। विबुद्धेत्वयिबुध्येतप्रसन्नोमेभवाच्युत १ इतिप्रार्थ्य अग्रेकृताञ्जलिः चतुरोवार्षिकान्मासान्देवस्योत्थापनावधि श्रावणेवर्जयेशाकंदधिभाद्रपदेतथा १ दुग्धमाश्वयुजेमासिकार्तिकेद्विदलंतथा॥ इमंकरिष्येनियमंनिर्विघ्नंकुरुमेऽच्युत २ इदंव्रतंमयादेवगृहीतंपुरतस्तव। निर्विघ्नंसिद्धिमायात्प्रसादात्तेरमापते ३ गृहीतेस्मिन्व्रतेदेवपंचत्वंयदिमेभवेत्। तदाभवतु संपूर्णंप्रसादात्तेजनार्दन ४ इतिप्रार्थ्यदेवायशङ्खेनार्घ्यंनिवेदयेत् एतानिव्रतानि नित्यानि हविष्यभक्षणादिव्रतान्तरचिकीर्षायांश्रावणेवर्जयेशाकमिति श्लोकस्थानेहविष्यान्नंभक्षयिष्येदेवाहंप्रीतयेतवेत्यूहः कार्यः शाकव्रतेव्रतान्तरेचसमुच्चयेनकर्तव्ये तं श्लोकंपठित्वाव्रतान्तरमंत्रंवदेत् एवंगुडवर्जनादिधारणापारणादिव्रतेषु वर्जयिष्येगुडंदेवमधुरस्वरसिद्धये। वर्जयिष्येतैलमहंसुन्दराङ्गत्वसिद्धये १ योगाभ्यासीभविष्यामिप्राप्तंब्रह्मपदंपरम्। मौनव्रतीभविष्यामिस्वाज्ञापालनसिद्धये २ एकान्तरोपवासीचप्राप्तंब्रह्मपुरंपरम्। इत्यादिरीत्योहः कार्यः निषिद्धमात्रवर्जनेच्छायां वृन्ताकादिर्निषिद्धानिहरेसर्वाणिवर्जये इतिसंकल्पः।**

**चातुर्मास्यव्रतग्रहणप्रकार**— जाई जुई वगैरेंच्या फुलांनीं भगवन्ताची महापूजा करून, 'सुप्ते त्वयि जगन्नाथे जगत्सुप्तं भवेदिदम्। विबुद्धे त्वयि बुध्येत प्रसन्नो मे भवाच्युत॥' अशी प्रार्थना करावी आणि विष्णूच्या पुढें हात जोडून उभें राहून—'चतुरो वार्षिकान् मासान् देवस्योत्थापनाविधि। श्रावणे वर्जये शाकं दधि भाद्रपदे तथा॥ दुग्धमाश्वयुजेमासि कार्तिके द्विदलं तथा। इमं करिष्ये नियमं निर्विघ्नं कुरु मेऽच्युत॥ इदं व्रतं मया देव गृहीतं पुरतस्तव। निर्विघ्नं सिद्धिमायातु प्रसादात्ते रमापते॥ गृहीतेऽस्मिन्व्रते देव पंचत्वं यदि मे भवेत्। तदा भवतु सम्पूर्णं प्रसादात्ते जनार्दन॥' या मंत्रांनीं प्रार्थना करावी व देवाला शंखांनीं अर्घ्य द्यावें. या मंत्रांत सांगितलेलीं जीं—श्रावणांत पालेभाजी वर्ज्य, भाद्रपदांत दहीं वर्ज्य, आश्विनांत दूध वर्ज्य व कार्तिकांत द्विदलधान्य वर्ज्य--हीं व्रतें, तीं नित्य आहेत. हविष्यादि इतर व्रतें करण्याची जर इच्छा असेल, तर 'श्रावणे वर्जये शाकं' वगैरे श्लोकांच्या जागीं 'हविष्यान्नं भक्षयिष्ये देवाहं प्रीतये तव।' असा श्लोक म्हणावा. शाकव्रत आणि इतर व्रतें जर एकदमच करण्याची इच्छा असेल, तर शाकव्रताचा मंत्र म्हणून, इतर व्रतांचाहि म्हणावा. त्याचप्रमाणें जर गूळ सोडायचा असेल व धारणा पारणा करणें असेल, तर त्याबाबतींत पुढीलप्रमाणें उच्चार करावाः—'वर्जयिष्ये गुडं देव मधुरस्वरसिद्धये। वर्जयिष्ये तैलमहं सुंदरांगत्वसिद्धये॥ योगाभ्यासी भविष्यामि प्राप्तंब्रह्मपदंपरम्। मौनव्रती भविष्यामि स्वाज्ञापालनसिद्धये॥ एकान्तरोपवासीच प्राप्तुं ब्रह्मपदं परम्॥' सर्वच निषिद्ध पदार्थ जर वर्ज्य करायचे असतील, तर 'वृन्ताकादि निषिद्धानि हरे सर्वाणि वर्जये' असा संकल्प करावा.

तानिच चातुर्मास्येनिषिद्धानि प्राण्यङ्गचूर्णचर्मस्थोदकंजम्बीरंबीजपूरंयज्ञशेषभिन्नंविष्णवनिवेदितान्नंदग्धान्नंमसूरंमांसंचेत्यष्टविधमामिषंवर्जयेत् निष्पावराजमाषधान्ये लवणशाकंवृन्ताकंकलिङ्गफलंअनेकबीजफलं निर्बीजंमूलकं रक्तमूलकंकूष्माण्डं इक्षुदण्डंनूतनबदरीधात्रीफलानिचिञ्चांमञ्चकादिशयनमनृतुकाले भार्यां परान्नंमधुपटोलंमाषकुलित्थसितसर्षपांश्चवर्जयेत् वृन्ताकबिल्वोदुम्बरकलिङ्गभिः सटास्तुवैष्णवैःसर्वमासेषुवर्ज्याः अन्यत्रतुगोछागीमहिष्यन्यदुग्धं पर्युषितान्नंद्विजेभ्यः क्रीतारसाभूमिजलवणंताम्रपात्रस्थंगव्यंपल्वलजलं स्वार्थपक्वमन्नमित्यामिषगणउक्तः चतुर्ष्वपिहिमासेषुहविष्याशीनपापभाक्। हविष्याणि तुव्रीहिमुद्गयवतिलकङ्गुकलायश्यामाकगोधूमधान्यानिरक्तभिन्नमूलकंसूरणादि कन्दः सैन्धवसामुद्रलवणंगव्यानिदधिसर्पिर्दुग्धानिपनसाम्रनारीकेलफलानिहरीतकीपिप्पलीजीरकंशुण्ठीचिञ्चकदलीधात्रीफलानिगुडेतरेक्षुविकारइत्येतानिअतैलपक्वानि गव्यंतक्रंमाहिषंघृतंक्वचित् ।

**चातुर्मास्यांतले निषिद्ध पदार्थ**—प्राण्यांच्या हाडांचा चुना, कातड्याच्या पिशवींतलें पाणी, ईडनिंबू, महाळुंग, वैश्वदेव न झालेलें अन्न, विष्णूला अर्पण न केलेलें अन्न, करपलेलें अन्न, मसुरा व मांस—हीं जीं आठ आमिषें आहेत, तीं सर्व वर्ज्य करावींत. पांढरे पावटे, काळे वाल, घेवडा, चवळी, लोणचीं, वांगीं, कलिंगड, पुष्कळ बीजांचें फळ, मुळींच बिया नसलेलें फळ, तांबडा मुळा, पांढरा मुळा, कोहळा, ऊंस, नवीं बोरें, आंवळे, चिंच, पलंगादिकांवर निजणें, ऋतुकालावांचून हवा तेव्हां स्त्रीसंग करणें, परान्न, मध, पडवळ, उडीद, हुलगे ( कुळीथ ) आणि पांढऱ्या मोहऱ्या—हीं सर्व वर्ज्य करावींत. वांगीं, बेलफळें, उंबरें, कलिंगड व करपलेलें अन्न—हे पदार्थ वैष्णवांनीं अक्षयींच वर्ज्य करावेत. गाय, म्हैस व शेळी यांच्या दुधावांचून इतर प्राण्यांचें दूध, शिळें अन्न, ब्राह्मणापासून विकत घेतलेले रस, जमीनीपासून तयार झालेलें मीठ, तांब्याच्या भांड्यांतलें गाईचें दूध, सांचलेलें पाणी, स्वतःकरतांच केवळ तयार केलेलें अन्न—हे सर्व पदार्थ आमिषगणांत येतात असें इतर ग्रंथांत सांगितलें आहे. चातुर्मास्यांत हविष्यान्न खाणाऱ्याला पाप लागत नाहीं. तांदूळ, मूग, यव, तीळ, कांग, राळे, वाटाणे, सांवे, गहूं, पांढरा मुळा, सुरण, सैंधव, समुद्रापासून केलेलें मीठ, गाईचें दहीं-दूध-तूप, फणस, आंबा, नारळ, हिरडा, पिंपळी, जिरें, सुंठ, चिंच, केळें, आंवळे, रायआंवळे ( हरपररेवडी ) गुळाखेरीज उंसाचा इतर पदार्थ ( साखर ) हीं सर्व तेलांत जर तळलेलीं नसतील, तर हविष्यें जाणावींत. गाईचें ताक व म्हशीचें तूप हींही क्वचित् ठिकाणीं हविष्यें सांगितलीं आहेत.

अथकाम्यव्रतानि। गुडवर्जनान्मधुरस्वरता तैलवर्जनात्सुन्दराङ्गता योगाभ्यासीब्रह्मपदमाप्नोति ताम्बूलत्यागाद्भोगीमधुरकण्ठश्च घृतत्यागीस्निग्धतनुः शाकत्यागीपक्वान्नभुक् पादाभ्यङ्गत्यागाद्वपुःसौगन्ध्यम् दधिदुग्धतक्रत्यागाद्विष्णुलोकः स्थालीपाचितान्नत्यागाद्दीर्घसन्ततिः भूमौदर्भशायीविष्णुदासः भूमि-

भोजनान्नृपत्वम् मधुमांसत्यागान्मुनिः एकान्तरोपवासाद्ब्रह्मलोकः नखकेश-धारणाद्दिनेदिनेगङ्गास्नानम् मौनादस्खलिताज्ञा विष्णुवन्दनाद्गोदानफलम् विष्णुपादस्पर्शात्कृतकृत्यता हरेरालयेसंमार्जनादिनानृपत्वम् शतप्रदक्षिणाकर-णाद्विष्णुलोकः एकभुक्ताशनादग्निहोत्रफलम् अयाचितेनवापीकूपोत्सर्गादि-पूर्तफलम् षष्ठाहःकालभोजनाच्चिरस्वर्गः पर्णेषुभोजनात्कुरुक्षेत्रवासफलम् शि-लाभोजनात्प्रयागस्नानफलम् एवंमासचतुष्टयसाध्यानांव्रतानांसंकल्पमेकादश्यां द्वादश्यांवाकृत्वाश्रावणमासव्रतविशेषसंकल्पइहैवकार्यः अहंशाकंवर्जयिष्ये श्रावणेमासिमाधवेति अत्रशाकशब्देनलोकेप्रसिद्धाः फलमूलपुष्पपत्रांकुरका-ण्डत्वगादिरूपावर्ज्या नतुव्यञ्जनमात्रं शुण्ठीहरिद्राजीरकादिकमपिवर्ज्यम् तत्र तत्कालोद्भवानामातपादिशोषितकालान्तरोद्भवानांचसर्वशाकानांवर्जनं कार्यम् अथैषांचातुर्मास्यव्रतानांसमाप्तौकार्तिक्यांदानानितत्रैव वक्ष्यन्ते ।

**काम्यव्रतें**—गूळ खाणें सोडल्यास स्वर मधुर होतो. तेल सोडल्यास अंगकान्ति सुंदर होते. योगाभ्यासानें ब्रह्मप्राप्ति होते. विडा खाणें सोडल्यास भोगप्राप्ति होते व कंठ गोड होतो. तूप सोडल्यास शरीर मऊ होतें. पालेभाजी सोडल्यास पक्वान्न मिळतें. पायांना अभ्यंग लावणें सोडल्यास अंगाला सुगंध येतो. दहीं, दूध व ताक हीं वर्ज्य केल्यास विष्णुलोक मिळतो. थाळ्यांत शिजविलेलें अन्न सोडल्यास वंश वाढतो. जमिनीवर दर्भ अंथरून त्यांवर निजल्यास विष्णुभक्त होतो. जमीनीवर जेवल्यानें राज्य मिळतें. मधु (सुरा) व मांस यांचा त्याग केल्यानें मुनिपणा येतो. एकदिवसाड जेवण केल्यानें ब्रह्मलोक मिळतो. नखें व केस राखल्यानें रोज गंगास्नानाचें फळ मिळतें. मुकेपणा राखल्यानें आज्ञाभंग होत नाहीं. विष्णूला नमस्कार केल्यानें गोदानाचें फळ मिळतें. विष्णूच्या पायांना स्पर्श करणारा कृतकृत्य होतो. विष्णूच्या देवळांत सडासंमार्जन केल्यानें राजेपणा मिळतो. शंभर प्रदक्षिणांनीं विष्णुलोक मिळतो. एकवेळ जेवल्यानें अग्निहोत्राचें फळ मिळतें. अयाचित भोजनानें विहीर व गुहा यांची स्वच्छता केल्याचें फळ मिळतें. दिवसाच्या सहाव्या भागांत जेवण केल्यास अक्षय स्वर्ग मिळतो. पानावर जेवण केल्यानें कुरुक्षेत्रीं राहिल्याचें फळ मिळतें. दगडाच्या चिपेवर जेवण केल्यानें प्रयागस्नानाचें फळ मिळतें. याप्रमाणें चार महिनेपर्यंत करण्यास कठीण नसलेल्या ( साध्य ) व्रतांचा संकल्प, एकादशीला अथवा द्वादशीला करून, त्याच दिवशीं श्रावणांतल्याही विशेषव्रतांचा संकल्प पुढील प्रमाणें करावाः— 'अहं शाकं वर्जयिष्ये श्रावणे मासि माधव' वगैरे. या ठिकाणीं शाक या शब्दाचा अर्थ—फळ, मूळ, पुष्प, पान, अंकुर, कांड, साली वगैरे जो लोकप्रसिद्ध तोच घ्यायचा. केवळ तोंडीं लावण्याच्या ज्या भाज्या त्याच असा संकुचित अर्थ 'शाक' या शब्दाचा येथें घ्यायचा नाहीं; म्हणून वरील सर्व वस्तु वर्ज्य कराव्या. सुंठ, हळद, जिरें वगैरेहि वर्ज्यच होत. त्या काळांत उत्पन्न झालेल्या अथवा पूर्वीं उत्पन्न होऊन वाळवून ठेवलेल्या सर्व भाज्या ( शाका ) वर्ज्य कराव्या. या चातुर्मास्यव्रतांची समाप्ति झाल्यावर, कार्तिकी पुनवेला जीं दानें द्यायचीं, तीं त्या प्रकरणांत सांगण्यांत येतील.

शयनीबोधिन्योस्तप्तमुद्राधारणमुक्तंरामार्चनचन्द्रिकायाम् अत्रतप्तमुद्राधारणेविधायकानिप्रशंसावचनानिनिषेधकानिनिन्दावचनानिचबहुतराण्युपलभ्यन्ते तेषांशिष्टाचाराद्व्यवस्थायेषांकुलेपितृपितामहादिभिस्तप्तमुद्राधारणादिधर्मोऽनुष्ठितस्तैस्तथैवानुष्ठेयः येषांतुकुलेषुनकेनाप्यनुष्ठितस्तैर्नस्वमतिविलसितश्रद्धया तद्धर्मोनुष्ठेयोदोषश्रवणादितितात्पर्यम् ।

**तप्तमुद्रा**—शयनी आणि बोधिनी या एकादश्यांना तप्तमुद्रा धारण कराव्या असें रामार्चन चंद्रिका नांवाच्या ग्रंथांत सांगितलें आहे. तप्तमुद्रा धारण करण्याच्या बाबतींत प्रशंसापर अशीं विधिवाक्यें व निंदापर अशीं निषेधार्थक वाक्यें पुष्कळ आढळतात म्हणून, या बाबतींत शिष्टाचाराप्रमाणें व्यवस्था जाणावी. ज्यांच्या कुळांत—बाप, आजा वगैरेंनीं तप्तमुद्रा घेण्याचा धर्म स्वीकारला असेल, त्यांनीं तो तसाच पुढें चालवावा. ज्यांच्या कुळांत कोणीही तप्तमुद्रा घेतल्या नसतील, त्यांनीं तसें करण्यांत दोष सांगितला आहे; म्हणून केवळ स्वतःच्या बुद्धीच्या जोरावर तसें कर्म करूं नये.

आषाढशुक्लद्वादश्यांवामनपूजनेननरमेधफलम् पूर्वाषाढायुतायांपौर्णमास्यामन्नपानादिदानादक्षय्यान्नादिप्राप्तिः अस्यामेवपौर्णमास्यांप्रदोषव्यापिन्यां श्रीशिवस्यशयनोत्सवःअस्यामेवकोकिलाव्रतम् तत्र स्नानंकरिष्येनियताब्रह्मचर्येस्थितासती । भोक्ष्यामिनक्तंभूशय्यांकरिष्येप्राणिनांदयाम् १ इतिमासव्रतंसंकल्प्य कोकिलारूपिणींशिवांप्रत्यहंसंपूज्यनक्तभोजनम् यस्मिन्वर्षेऽधिकाषाढस्तस्मिन्नेववर्षेशुद्धाषाढेव्रतंकार्यमित्याचारः सनिर्मूलः आषाढस्यश्रावणस्यवा पौर्णमास्यांचतुर्दश्यामष्टम्यांवाशिवपवित्रारोपणमुक्तम् अस्यांपौर्णमास्यांसंन्यासिनांचातुर्मास्यावासंसंकल्पाङ्गत्वेनक्षौरव्यासपूजादिकंविहितम् अत्रकर्मणि औदयिकीत्रिमुहूर्तापौर्णमासीग्राह्या चातुर्मासस्यमध्येतुवपनं वर्जयेद्यतिः ॥ चातुर्मासंद्विमासंवावसदेकत्रैवसंवसेत् १

**कोकिळाव्रत**—आषाढ शुद्ध द्वादशीला वामनाची पूजा करावी, म्हणजे नरमेधाचें फळ मिळतें. पूर्वाषाढा नक्षत्रानें युक्त अशा पुनवेला अन्नपानादिकांचें दान केल्यास अक्षय्य अन्नपानादि मिळतात. पुनवेला श्रीशिवाचा शयनोत्सव करावा. या कर्माला जी पुनव घेणें ती प्रदोषकाळची घ्यावी. याच पुनवेला कोकिळाव्रत करावें. 'स्नानं करिष्ये नियता ब्रह्मचर्ये स्थिता सती । भोक्ष्यामि नक्तं भूशय्यां करिष्ये प्राणिनां दयाम् ॥' असा एक महिनापर्यंतच्या व्रताचा संकल्प करून, कोकिळारूपी शिवादेवीची पूजा करावी आणि रात्रीं जेवण करावें. ज्यावर्षी अधिक आषाढ असेल त्या वर्षी हें व्रत करावें. शुद्ध आषाढांत करण्यास कोठेंच शास्त्राधार नाहीं. आषाढ किंवा श्रावण या महिन्यांतल्या पुनव, चतुर्दशी किंवा अष्टमी या तिथींवर शिवाचें पवित्रारोपण करावें. आषाढी पुनवेला संन्याशांनीं क्षौर करून, चार महिने एकाच जागीं राहाण्याचा संकल्प करावा आणि व्यासपूजा करावी, असें सांगितलें आहे. या कामासाठीं सूर्योदयापासून तीन मुहूर्तपर्यंत असणारी पुनव घ्यावी. चातुर्मास्यांत संन्याशानें (यति) क्षौर करूं नये. चार अथवा दोन महिने एकाच जागीं रहावें.

तत्रादौक्षौरंविधायद्वादशमृत्तिकास्नानानिप्राणायामादिविधिंचकृत्वाव्यास-पूजांकुर्यात् । अथसंक्षेपेणतद्विधिः । देशकालौसंकीर्त्यचातुर्मास्यवाससंकल्पंकर्तुं श्रीकृष्णव्यासभाष्यकाराणांसपरिवाराणांपूजनंकरिष्यइतिसंकल्प्य मध्येश्री-कृष्णंतत्पूर्वतःप्रादक्षिण्येनवासुदेवसंकर्षणप्रद्युम्नानिरुद्धानावाह्य श्रीकृष्णपञ्चक दक्षिणभागेव्यासंतत्पुरतः प्रादक्षिण्येनसुमन्तुजैमिनिवैशंपायनपैलानितिव्यास-पञ्चकमावाह्यश्रीकृष्णादिवामेभाष्यकारंश्रीशंकरंतत्पूर्वतः प्रादक्षिण्येन पद्मपादविश्वरूपत्रोटकहस्तामलकाचार्यानावाह्य श्रीकृष्णपञ्चके श्रीकृष्णपा-र्श्वयोर्ब्रह्मरुद्रौपूर्वादिचतुर्दिक्षुसनकादीन् श्रीकृष्णपञ्चकात्पुरतः गुरुपरम-गुरुपरमेष्टिगुरूनृब्रह्मवसिष्ठशक्तिपराशरव्यासशुकगौडपादगोविन्दपादशंक-राचार्यानुब्रह्मनिष्ठांश्चावाह्यपञ्चकत्रयस्याग्नेये गणेशं ईशान्ये क्षेत्रपालं वाय-व्येदुर्गां नैर्ऋत्येसरस्वतीं प्रागाद्यष्टदिक्षु इन्द्रादिलोकपालांश्चावाह्यपूजयेत् तत्र-नारायणाष्टाक्षरेणश्रीकृष्णपूजा अन्येषां प्रणवादिनमोन्तैस्तन्नाममन्त्रैः पूजा कार्या पूजान्तेअसतिप्रतिबन्धेचतुरोवार्षिकान्मासानिहवसामिइतिमनसासंकल्प्य अहंतावन्निवत्स्यामिसर्वभूतहितायवै । प्रायेण प्रावृषिप्राणिसंकुलंवर्त्मदृश्यते १ अतस्तेषामहिंसार्थंपक्षान्वैश्रुतिसंश्रयान् । स्थास्यामश्चतुरोमासानत्रैवासतिबाधके २ इतिवाचिकसंकल्पंकुर्यात् ततोगृहस्थाःप्रतिब्रूयुः निवसन्तुसुखेनात्रगमि-ष्यामः कृतार्थताम् । यथाशक्तिच शुश्रूषांकरिष्यामोवयंमुदा १ इतिततोवृद्धानु-क्रमेणयतीनृगृहस्थाः यतयश्चान्योन्यंनमस्कुर्युः एतद्विधिःपौर्णमास्यामसंभवे द्वादश्यांकार्यः आषाढकृष्णद्वितीयायामशून्यशयनंव्रतम् अत्रलक्ष्मी-युतंविष्णुंपर्यङ्केसंपूज्य पत्नीभर्तुर्वियोगंचभर्ताभार्यासमुद्भवम् । नाप्नुवन्ति यथादुःखंदंपत्यानितथाकुरु १ इत्यादिभिर्दांपत्याभङ्गप्रार्थनार्थैर्मन्त्रैः प्रार्थयेत् ततश्चन्द्रायार्घ्यंदत्वानक्तभोजनं कार्यम् एवं मासचतुष्टयेकृष्णद्वितीया-सुसंपूज्यसपत्नीकायशय्यादानंकृत्वातांप्रतिमांचसोपस्करांदद्यात् अस्मिन्व्र-तेअक्षय्यंदांपत्यसुखंपुत्रधनाद्यवियोगोगार्हस्थ्याावियोगःसप्तजन्मनिभवति अत्र व्रतेचन्द्रोदयव्यापिनीतिथिर्ग्राह्या चन्द्रोदयेपूजाद्युक्तेः दिनद्वयेसत्वेऽसत्वेवा परैव । इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारे आषाढमासनिर्णयोद्देशः॥

**व्यासपूजाविधि**—आधीं क्षौर करून नंतर बारा वेळां मातीचीं स्नानें व प्राणायाम हा विधि करून व्यासपूजा करावी. या पूजेचा विधि संक्षेपानें सांगतों. देशकालादिकांचा उच्चार करून, 'चातुर्मास्यवाससंकल्पं कर्तुं श्रीकृष्णव्यासभाष्यकाराणां सपरिवाराणां पूजनं करिष्ये' असा संकल्प करावा. मध्यें श्रीकृष्ण व त्याच्या पूर्वदिशेकडून प्रदक्षिणेच्या वळणानें—वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध यांचें आवाहन करावें. या श्रीकृष्णादि पांच देवतांच्या दक्षिणभागीं व्यास व त्यांच्या पूर्वेकडून प्रदक्षिणाक्रमानें—सुमंतु, जैमिनि, वैशंपायन व पैल अशा व्यासपंचकाचें आवाहन करावें. श्रीकृष्णादि देवतांच्या डाव्या बाजूला भाष्यकार

श्रीमच्छंकराचार्य आणि त्यांच्या पूर्वदिशेकडून प्रदक्षिणाक्रमानें पद्मपाद, विश्वरूप, त्रोटक व हस्तामलक या आचार्यांचें आवाहन करावें. श्रीकृष्णादि देवतापंचकांत—श्रीकृष्णाच्या दोन बाजूंस ब्रह्मा आणि रुद्र, पूर्व वगैरे चार दिशांस—सनक, सनंदन, सनातन आणि सनत्कुमार; आणि पुढें—गुरु, परमगुरु, परमेष्टिगुरु, ब्रह्मा, वसिष्ठ, शक्ति, पराशर, व्यास, शुक, गौडपाद, गोविन्दपाद, शंकराचार्य व इतर ब्रह्मनिष्ठ यांचें आवाहन करावें. या तिन्ही पंचकांच्या आग्नेयीस—गणपति, ईशान्येस क्षेत्रपाल, वायव्येस दुर्गा, नैर्ऋत्येस सरस्वती आणि पूर्व वगैरे आठ दिशांत इंद्रादिक लोकपाल यांचें आवाहन करून, त्यांची पूजा करावी. नारायणाच्या आठ अक्षरी मंत्रानें त्यांतल्या श्रीकृष्णाची पूजा करून, इतरांची—प्रणवपूर्वक 'नमोन्त' अशी त्यांचीं नांवें घेऊन, त्यांच्या नाममंत्रांनीं ( पूजा ) करावी. कांहीं आडकाठी नसल्यास, पूजेनंतर 'चतुरो वार्षिकान्मासानिह वसामि' असा मनांत संकल्प करावा आणि 'अहं तावन्निवत्स्यामि सर्वभूतहिताय वै। प्रायेण प्रावृषि प्राणिसंकुलं वर्त्म दृश्यते अतस्तेषामहिंसार्थं पक्षान्वै श्रुतिसंश्रयान्। स्थास्यामश्चतुरो मासानत्रैवासति बाधके॥' असा तोंडानें संकल्प करावा. त्यानंतर गृहस्थांनीं 'निवसन्तु सुखेनात्र गमिष्यामः कृतार्थताम्। यथाशक्तिच शुश्रूषां करिष्यामो वयं मुदा॥' असें सांगावें. त्यानंतर गृहस्थांनीं अधिक वयोमानाप्रमाणें असणाऱ्या यतींना आणि यतींनीं परस्परांना नमस्कार करावा. हा विधि जर पुनर्वेला करणें अशक्य झालें, तर द्वादशीला करावा. आषाढकृष्ण द्वितीयेला अशून्यशयनव्रत करावें. या व्रतांत लक्ष्मीसह विष्णूची पलंगावर पूजा करून, 'पत्नीभर्तुर्वियोगं च भर्ताभार्यासमुद्भवम्। नाप्नुवन्ति यथा दुःखं दम्पत्यानि तथा कुरु॥' असा मंत्र म्हणून नवराबायकोंचा विरह न करण्यासाठीं प्रार्थना करावी. त्यानंतर चंद्राला अर्घ्य देऊन नक्तभोजन करावें. याप्रमाणें चार महिनेपर्यंत प्रत्येक वद्य द्वितीयेला पूजा करून, बायको असलेल्या ब्राह्मणाला शय्यादान द्यावें आणि सर्व सामुग्रीसह प्रतिमेचें दान करावें. हें व्रत केल्यानें सात जन्मपर्यंत अक्षय्य असें दाम्पत्यसुख, पुत्रधनादिकांचा अक्षय्य लाभ व सन्तत गृहस्थाश्रम यांची प्राप्ति होते. या व्रताला चंद्रोदयानें व्यापलेली तिथि घ्यावी; कारण, पूजा वगैरे सर्व कांहीं चंद्रोदयानंतर करावी, असें या बाबतींत सांगितलें आहे. द्वितीया जर दोन दिवस चंद्रोदयव्यापिनी असली अथवा दोन्ही दिवशीं तशी नसली, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. याप्रमाणें अनंतोपाध्यायांचे पुत्र जे काशीनाथोपाध्याय, त्यांनीं रचिलेल्या धर्मसिंधुसारांतील आषाढमासाच्या निर्णयाचा उद्देश येथें संपला.

अथश्रावणमासः सिंहेपरःषोडशनाड्यःपुण्यकालः रात्रौतूक्तमेव अत्रमासे एकभक्तव्रतंनक्तव्रतंविष्णुशिवाद्यभिषेकश्चोक्तः सिंहराशिगतेसूर्येयस्यगौः प्रसू-यते तन्नव्याहृतिभिर्घृताक्तायुतसंख्यसर्षपहोमंकृत्वासागौर्ब्राह्मणायदेयाएवमन्-शायेगोःक्रन्दनेऽमृत्युंजयमन्त्रेणहोमादिरूपाशान्ति-कार्या एव श्रावणमास दिवाश्विनोप्रसवोपिनिषिद्धः माघेबुधेचमहिषीश्रावणेवडवादिवा। सिंहेगावः

प्रसूयन्तेस्वामिनोमृत्युदायकाः १ इत्युक्तेरत्रापिशान्तिःशान्तिग्रन्थतोज्ञेया । सोमवारव्रतंकार्यंश्रावणेवैयथाविधि । शक्तेनोपोषणंकार्यमथवानिशिभोजनम् १ एवं श्रावणेभौमवारेगौरीपूजाप्युक्ता श्रावणशुक्लचतुर्थीमध्याह्नव्यापिनीपूर्वयुताग्राह्या श्रावणशुक्लपञ्चमीनागपञ्चमी इयमुदयेत्रिमुहूर्तव्यापिनीपरविद्धा ग्राह्या परेद्युस्त्रिमुहूर्तन्यूनापञ्चमीपूर्वेद्युस्त्रिमुहूर्तन्यूनचतुर्थ्याविद्धातदापूर्वैव त्रिमुहूर्ताधिकचतुर्थीवेधेद्विमुहूर्तापिपरैव मुहूर्तमात्रातुनग्राह्येतिमम प्रतिभाति अस्यांभित्त्यादिलिखितामृन्मयावायथाचारंनागाःपूज्याः । श्रावणशुक्लद्वादश्यांमासंकृतस्यशाकवर्जनव्रतस्यसाङ्गतार्थंब्राह्मणायशाकदानंकरिष्यइति संकल्प्यब्राह्मणंसंपूज्य उपायनमिदंदेवव्रतसंपूर्णहेतवे । शाकंतुद्विजवर्यायसहिरण्यंददाम्यहम् १ इत्यादिमन्त्रेणपक्कमामंवाशाकंदद्यात् ततो दधिभाद्रपदेमासेवर्जयिष्येसदाहरे । इतिदधिव्रतंसंकल्पयेत् अत्रदधिमात्रं वर्ज्यंतक्रादीनामनिषेधः अथपारणाहेद्वादश्यांविष्णोःपवित्रारोपणम् पारणाहे द्वादश्यसत्त्वेत्रयोदश्यांपारणाहेतत्रासंभवे श्रवणर्क्षेपौर्णिमायांवाकार्यम् शिवपवित्रंचतुर्दश्यामष्टम्यांवापौर्णमास्यांवाकार्यम् एवं देवीगणेशदुर्गादीनांचतुर्दशी चतुर्थीतृतीयानवम्यादयोयथाकुलाचारंतिथयः तत्तत्तिथिष्वसंभवेसर्वदेवानां श्रावणपौर्णमास्यांकार्यम् तत्राप्यसंभवेकार्तिक्यवधिर्गौणकालः इदंनित्यं अकुर्वाणोव्रजत्यधः तस्यसांवत्सरीपूजानिष्फलेत्याद्युक्तेः गौणकालेप्यकरणे तदा युतंजपेन्मन्त्रंस्तोत्रंवापिसमाहित इत्युक्तेरयुतसंख्याकतद्दैवतामूलमन्त्रजपः प्रायश्चित्तम् तत्रपूर्वेद्युरधिवासनंपरेद्युःपवित्रारोपणम् द्व्यहकालासंभवेसद्योधिवासनपूर्वकंतत्कार्यम् ।

**श्रावणमासकृत्यें**—सिंहसंक्रान्तीच्या आधींच्या सोळा घटका पुण्यकाळ. संक्रमण जर रात्रीं होत असेल तर त्याबद्दलचा निर्णय आधींच सांगितलेला आहे. या महिन्यांत एकवेळ जेवणाचें व्रत, नक्तव्रत, आणि विष्णु व शंकर यांवर अभिषेक हीं कार्यें करावींत, असें सांगितलें आहे. सिंहराशीला सूर्य गेला असतां ज्याची गाय विते, त्यानें व्याहृतिमंत्रानें, तुपांत भिजवलेल्या मोहऱ्यांचा दहाहजार होम करून ती गाय ब्राह्मणाला द्यावी. याप्रमाणेंच मध्यरात्रीं गाय ओरडली असतांही मृत्युंजयाच्या मंत्रानें होमादिरूप शान्ति करावी. श्रावणमासांत दिवसां घोडी प्रसवणें ही गोष्ट याप्रमाणेंच निषिद्ध आहे. माघांत अथवा बुधवारीं म्हैस, श्रावणांत दिवसां घोडी आणि सिंहसंक्रांतींत गाय यांची जर प्रसूति ( विणें ) होईल तर त्यांचा मालक मृत्यु पावतो, असें वचन आहे; यासाठीं असें झाल्यास शान्ति करावी. शान्तीबद्दल शान्तिग्रंथांत पाहावें. श्रावणांत यथाविधि सोमवारव्रत करावें. शक्ति असेल त्यानें (सोमवारीं) उपास करावा अथवा रात्रीं जेवावें. श्रावणांत याचप्रमाणें मंगळवारीं गौरीची पूजा करण्यास सांगितलें आहे. जी श्रावण शुद्ध चतुर्थी मध्याह्नव्यापिनी अशा तृतीयेनें युक्त असेल ती या व्रताला घ्यावी. श्रावणशुद्ध पंचमी ही नागपंचमी होय. सूर्योदयापासून तीन मुहूर्तपर्यंत व्यापिनी आणि षष्ठीनें विद्ध अशी जी असेल ती या कामाकरितां घ्यावी.

दुसऱ्या दिवशीं तीन मुहूर्तांहून कमी पंचमी आणि आदल्या दिवशीं तीन मुहूर्तांहून अधिक अशी चतुर्थीनें जर ( पंचमी ) विद्ध असेल, तर ती ग्राह्य नाहीं असें मला वाटतें. या पंचमीला भिंतीवर काढलेल्या अथवा मातीच्या केलेल्या—जसा परिपाठ असेल त्याप्रमाणें—नागांची पूजा करावी. श्रावणशुद्ध द्वादशीला 'मासं कृतस्य शाकवर्जनव्रतस्य साङ्गतार्थं ब्राह्मणाय शाकदानं करिष्ये' असा संकल्प करून ब्राह्मणाची पूजा करावी आणि नंतर 'उपायनमिदंदेव व्रतसंपूर्णहेतवे । शाकंतु द्विजवर्याय सहिरण्यं ददाम्यहम् ॥' मंत्रानें पिकलेली अथवा हिरवी शाक द्यावी. शाक दिल्यानंतर 'दधि भाद्रपदे मासे वर्जयिष्ये सदा हरे' असा भाद्रपदांत दहीं सोडण्याचा संकल्प करावा. अशा प्रसंगीं दहीं तेवढेंच वर्ज्य समजून, ताक वगैरेंचा निषेध नाहीं असें समजावें. नंतर पारण्याच्या दिवशीं द्वादशीला विष्णूला पोंवतें ( पवित्रारोपण ) घालावें. पारण्याला जर द्वादशी नसेल, तर त्रयोदशीला पारण्याच्या वेळीं, आणि तेव्हांहि अशक्य असल्यास पुनवेला अथवा श्रवण नक्षत्र असतां पोंवतें घालावें. शिवाचें पोंवतें—चतुर्दशी, अष्टमी अथवा पुनव—यांतल्या कोणच्याहि तिथीला करावें. याचप्रमाणें—देवी, गणपति, दुर्गा वगैरेंचीं पोंवतीं—चतुर्थी, तृतीया, नवमी वगैरे तिथींवर—कुलाचाराप्रमाणें करावींत. हीं पोंवतीं योग्य तिथींवर करणें अशक्य झाल्यास, सर्व देवांचीं पोंवतीं श्रावणी पुनवेला एकाच तिथिवर करावींत. तेव्हांहि करणें अशक्य झाल्यास कार्तिकी पुनवेपर्यंतचा काल गौण आहे. हीं पोंवतीं करणें तर अवश्य असल्यानें, तीं न केल्यास अधोगति प्राप्त होते आणि वर्षभर केलेली पूजा व्यर्थ जाते, अशीं वचनें आहेत. गौणकालांतहि करणें न झाल्यास एकाग्र मनानें मंत्राचा दहा हजार जप करावा असें वचन आहे; यास्तव, त्या त्या देवतेच्या मूलमंत्राचा दहा हजार जप करण्याचें प्रायश्चित्त करावें. आदल्या दिवशीं अधिवासन करून, दुसऱ्या दिवशीं पोंवतें घालावें. त्याप्रमाणें दोन दिवस करणें अशक्य झाल्यास एकाच दिवशीं—आधीं अधिवासन करून मग पोंवतें घालावें.

अथसंक्षेपतःप्रयोगः कार्पाससूत्रस्यनवसूत्रींविधायअष्टोत्तरशतनवसूत्र्यादेवजानुपर्यन्तंचतुर्विंशतिग्रन्थिकमुत्तमंपवित्रं चतुःपञ्चाशन्नवसूत्र्याऊरुलम्बिद्वादशग्रन्थिकंमध्यमं सप्तविंशतिनवसूत्र्या अष्टग्रन्थिकंनाभिपर्यन्तंकनिष्ठंपवित्रं चकृत्वा विंशत्युत्तरशतेनसप्तत्यावानवसूत्र्यापादलम्बिनींवनमालामष्टोत्तरशत चतुर्विंशत्यन्यतरग्रन्थिकांकृत्वाद्वादशनवसूत्र्याद्वादशग्रन्थिकंगन्धपवित्रं सप्तविंशतिनवसूत्र्यागुरुपवित्रंत्रिसूत्र्याङ्गदेवतापवित्राणिकुर्यात् शिवपवित्राणिलिङ्गविस्तारानुसारेणकुर्यात् सर्वाणिपवित्राणिपञ्चगव्येनप्रोक्ष्यप्रणवेनप्रक्षाल्यमूलेनाष्टोत्तरशतमभिमन्त्र्य ग्रन्थीन्कुंकुमेनरञ्जयित्वासर्वपवित्राणिवंशपात्रेसंस्थाप्यवस्त्रेणपिधायदेवपुरतोन्यस्य । क्रियालोपविधानार्थंयत्त्वयाविहितंप्रभो ॥ मयैतत्क्रियतेदेवतवतुष्ट्यैपवित्रकम् ॥ नमेविघ्नोभवेद्देवकुरुनाथदयांमयि । सर्वथासर्वदाविष्णोममत्वंपरमागतिः २ इतिप्रार्थ्याधिवासनंकुर्यात् तत्रदेशकालौसंकीर्त्यसंवत्सरकृतपूजाफलावाप्त्यर्थंअमुकदेवताप्रीत्यर्थंअधिवासनविधिपूर्व-

कंपवित्रारोपणंकरिष्यइतिसंकल्प्यदेवपुरतः सर्वतोभद्रेजलपूर्णकुम्भं संस्थाप्य कुम्भेवंशपात्रंतत्रतानिपवित्राणिनिधायतेषु संवत्सरस्ययागस्यपवित्रीकरणाय भोः । विष्णुलोकात्पवित्राद्यआगच्छेहनमोस्तुते १ इतिमन्त्रेणमूलमन्त्रेणचावाह्यत्रिसूत्र्यांब्रह्मविष्णुरुद्रान्नवसूत्र्यांॐकारसोमवह्निब्रह्मनागेशसूर्यशिवविश्वेदेवानुत्तममध्यमकनिष्ठपवित्रेषुब्रह्मविष्णुरुद्रान्सत्त्वरजस्तमांस्यावाह्यवनमालायांप्रकृतिंचावाह्यमूलमन्त्रेणश्रीपवित्राद्यावाहितदेवताभ्योनमइत्यन्तेनगन्धाद्युपचारैःपूजयेत् ततः पूर्वसंपादितंवितस्तिमात्रंद्वादशग्रंथिकंगन्धपवित्रमादाय विष्णुतेजोद्भवंरम्यंसर्वपातकनाशनम् । सर्वकामप्रदंदेवतवाङ्गेधारयाम्यहम् १ इतिमन्त्रेणमूलसंपुटितेनदेवपादयोः समर्पयेत् देवस्यकरेबध्नीयादित्यन्ते ततो देवंपञ्चोपचारैः संपूज्यप्रार्थयेत् आमन्त्रितोसिदेवेशपुराणपुरुषोत्तम। प्रातस्त्वां पूजयिष्यामिसान्निध्यंकुरुकेशव १ क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह । प्रातस्त्वांपूजयिष्यामिसन्निधौभवतेनमः २ ततः साष्टाङ्गंप्रणम्यपुष्पाञ्जलिंदद्यात् इत्यधिवासनम् । अत्रसर्वत्रमूलमन्त्रोगुरूपदिष्टस्तान्त्रिकोवैदिकोवादेवगायत्रीरूपोवाग्राह्यः ।

**कार्पाससूत्रप्रयोग**—कापसाच्या सुताची नऊ पदरी करून, तिचें १०८ फेऱ्यांचें मूर्तीच्या गुडघ्यापर्यंत पोंचेल इतकें लांब व चोवीस गांठी असलेलें पवित्र ( पोंवतें ) उत्तम; चौपन फेऱ्यांचें व मूर्तीच्या मांड्यांपर्यंत पोंचण्यासारखें लांब आणि बारा गांठी असलेलें मध्यम आणि सत्तावीस फेऱ्यांचें मूर्तीच्या बेंबीपर्यंत पोंचण्याच्या लांबीचें व आठ गांठींचें कनिष्ठ—अशीं पोंवतीं करावींत. नऊ पदरीचे एकशेंवीस अथवा सत्तर फेरे घेऊन, त्याची एकशेंआठ अथवा चोवीस गांठींची वनमाला करावी. नऊ पदरी सुताचे बारा फेरे घेऊन, बारा गांठी असलेलें गंधानें पवित्र करावें. नऊ पदरी सत्तावीस फेऱ्यांचें गुरुपवित्र करावें. अंगदेवतांचीं पवित्रें, तिसुतीनें करावींत. शिवाचीं पवित्रें, लिंगविस्ताराप्रमाणें करावींत. हीं सारीं पोंवतीं पंचगव्यानें प्रोक्षित करून, त्यांचें प्रक्षालन, प्रणवमंत्रानें ( ॐकारानें ) करावें. नंतर मूलमंत्रानें १०८ वेळां अभिमंत्रण करून, गांठींना कुंकू लावून सुशोभित करावींत, आणि सर्व पोंवतीं वेळूच्या भांड्यांत घालून, तीं वस्त्राच्छादित अशीं देवाच्या पुढें ठेवावींत. त्यानंतर 'क्रियालोपविधानार्थं यत्त्वया विहितं प्रभो । मयैतत्क्रियते देव तव तुष्ट्यै पवित्रकम् ॥ न मे विघ्नो भवेद्देव कुरु नाथ दया मयि । सर्वथा सर्वदा विष्णो मम त्वं परमा गतिः ॥' इ०प्रार्थना करून अधिवासन ठेवावें. देशकालादिकांचा उच्चार केल्यावर 'संवत्सरकृतपूजाफलावाप्त्यर्थं अमुक देवताप्रीत्यर्थं अधिवासनविधिपूर्वकं पवित्रारोपणं करिष्ये—' असा संकल्प करून, देवापुढें सर्वतोभद्रमंडल करावें व त्यावर पाण्यानें भरलेला कुंभ ठेवावा. त्या कुंभावर बांबूचें भांडें ठेवून त्यांत तीं पोंवतीं ठेवावींत. नंतर 'संवत्सरस्य यागस्य पवित्रीकरणाय भोः । विष्णुलोकात्पवित्राद्य आगच्छेह नमोस्तु ते ॥' यानें व मूलमंत्रानें त्यांना आवाहन करून तिसुतींत—ब्रह्मा, विष्णु, व रुद्र, नवसुतींत —ॐकार, सोम, अग्नि, ब्रह्म, नागेश,सूर्य, शिव आणि विश्वेदेव; उत्तम,

मध्यम, व कनिष्ठ या पोंवत्यांत–ब्रह्मा, विष्णु, रुद्र व सत्त्व, रज आणि तम; आणि वनमालेंत प्रकृति यांचें आवाहन करून मूलमंत्रानें 'श्रीपवित्राद्यावाहितदेवताभ्यो नमः' येथपर्यंत पोंवत्यांच्या ठिकाणीं आवाहित अशा सर्व देवतांची गंधादि उपचारांनीं पूजा करावी. त्यानंतर, पूर्वींच तयार करून ठेवलेलें जें वीतभर लांबीचें व बारा गांठी असलेलें गंधपवित्र, तें घेऊन, 'विष्णुतेजोद्भवं रम्यं सर्व पातकनाशनम्। सर्वकामप्रदं देव तवाङ्गे धारयाम्यहम् ॥' या मंत्रानें देवाच्या पायांवर अर्पण करावें. देवाच्या हाताला बांधावें असेंहि कोणी म्हणतात. त्यानंतर देवाची पंचोपचारें पूजा करून, 'आमंत्रितोसि देवेश पुराणपुरुषोत्तम। प्रातस्त्वां पूजयिष्यामि सान्निध्यं कुरु केशव॥ क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह। प्रातस्त्वां पूजयिष्यामि संनिधौ भवते नमः॥' अशी प्रार्थना करावी आणि साष्टांग नमस्कार घातल्यावर पुष्पांजली वहावा. अशा प्रकारें अधिवासन करावें. या ठिकाणीं मूलमंत्र म्हणजे गुरूनें उपदेशिलेला तांत्रिक वैदिक अथवा देवगायत्रीरूप असा जो असेल तो घ्यावा.

ततोरात्रिंसत्कथाजागरेणातिवाह्यप्रातःकालेसद्योधिवासनेगोदोहान्तरिते वा कालेपवित्रारोपणाङ्गभूतं देवपूजनंपवित्रपूजनंचकरिष्ये इतिसंकल्पदेवंपवित्राणिचफलाद्युपनैवेद्यान्तंगन्धाद्युपचारैःसंपूज्यगन्धदूर्वाक्षतयुतंकनिष्ठंपवित्रमादाय देवदेवनमस्तुभ्यं गृहाणेदंपवित्रकम्। पवित्रीकरणार्थायवर्षपूजाफलप्रदम् १ पवित्रकंकुरुष्वाद्ययन्मयादुष्कृतंकृतम्। शुद्धोभवाम्यहंदेवत्वत्प्रसादात्सुरेश्वर २ इतिमन्त्रेणमूलसंपुटितेनदत्त्वामध्यमोत्तमपवित्रेवनमालांचैवमेवैतन्मंत्रावृत्त्यादद्यात्अङ्गदेवताभ्योनाम्नासमर्प्य महानैवेद्यंदत्त्वानीराज्यप्रार्थयेत्। मणिविद्रुममालाभिर्मन्दारकुसुमादिभिः। इयंसांवत्सरीपूजातवास्तुगरुडध्वज १ वनमालांयथादेवकौस्तुभंसततंहृदि॥ तद्वत्पवित्रतंतूंस्त्वंपूजांचहृदयेवह २ जानताजानतावापियत्कृतंनतवार्चनम्। केनचिद्विघ्नदोषेणपरिपूर्णंतदस्तुमे ३ मन्त्रहीनंक्रियाहीनंभक्तिहीनंसुरेश्वर। यत्पूजितंमयादेवपरिपूर्णंतदस्तुमे ४ अपराधसहस्राणिक्रियन्तेहर्निशंमया। दासोहमितिमांमत्वाक्षमस्वपरमेश्वर ५ इति अत्रशिवादौगरुडध्वजेत्यादौवृषवाहनेत्यूहः वनमालामितिश्लोकस्य तु लोपः देव्यांतुदेवदेवसुरेश्वरेत्यादौदेविदेविसुरेश्वरीत्यादिस्त्रीप्रत्ययांतपदोहः कार्यः शेषंसमानम् ततोगुरुंसंपूज्यपवित्रंदत्त्वान्यब्राह्मणेभ्यः सुवासिनीभ्यश्चान्यानिदत्त्वास्वयमपिसकुटुम्बोधारयेत् ततोब्राह्मणैः सहभुक्त्वात्रिरात्रंब्रह्मचर्यादिनियमवान्देवेपवित्राणिधारयेत् देवस्यस्नानादिकोपचारान्पवित्राणिउत्तार्यकारयेत् त्रिरात्रान्तेदेवंसंपूज्यपवित्राणिविसर्जयेत् अत्रशिवादिपवित्रारोपणेचतुर्दशीपूर्वविद्धाग्राह्या एवंपौर्णिमापित्रिमुहूर्तसायाह्नव्यापिपूर्वविद्धैवग्राह्या अष्टम्यादितिथ्यन्तराण्यपिपवित्रारोपणे प्रथमपरिच्छेदोक्तसामान्यातिथिनिर्णयानुसारेणग्राह्याणि। इतिपवित्रारोपणविधिः।

पवित्रारोपणविधि—त्यानंतर सत्कथा ऐकण्यांत जागरण करण्यांत रात्र घालवावी आणि सकाळीं जर अधिवासन करायचें असेल, तर गाईची

धार काढण्याच्यावेळीं 'पवित्रारोपणाङ्गभूतं देवपूजनं पवित्रपूजनंच करिष्ये' असा संकल्प करावा, आणि देव व पोंवतीं यांची फलादि उपनैवेद्यापर्यंत गंधादि उपचारांनीं पूजा करून गंध, दूर्वा व अक्षता यांसह कनिष्ठ पोंवतें घ्यावें व तें 'देव देव नमस्तुभ्यं गृहाणेदं पवित्रकम्। पवित्रीकरणार्थाय वर्षपूजाफलप्रदम्॥ पवित्रकं कुरुष्वाद्य यन्मया दुष्कृतं कृतम्। शुद्धो भवाम्यहं देव त्वत्प्रसादात् सुरेश्वर॥' या मूलसंपुटित मंत्रानें द्यावें. त्याचप्रमाणें मध्यम आणि उत्तम पोंवतीं आणि वनमाला हींही प्रत्येकाला वरचा मंत्र प्रत्येक वेळीं म्हणून, देवाला अर्पण करावींत. अंगदेवतांना फक्त त्यांचीं नांवें घेऊनच अर्पण करावींत. त्यानंतर महानैवेद्य देऊन नीरांजन ओवाळावें व जी प्रार्थना करावी, ती अशीः—'मणिविद्रुममालाभिर्मन्दारकुसुमादिभिः। इयं सांवत्सरी पूजा तवास्तु गरुड-ध्वज॥ वनमाला यथा देव कौस्तुभं सततं हृदि। तद्वत्पवित्रतंतूंस्त्वं पूजांच हृदये वह॥ जानताजानता वापि यत्कृतं न तवार्चनम्। केनचिद्विघ्नदोषेण परिपूर्णं तदस्तु मे॥ मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर। यत्पूजितं मया देव परिपूर्णं तदस्तु मे॥ अपराधसहस्राणि क्रियन्तेहर्निशं मया। दासोहमिति मां मत्वा क्षमस्व परमेश्वर॥' जेव्हां शिवाचीं पोंवतीं असतील तेव्हां वरील प्रार्थनेंत 'गरुडध्वज' याबद्दल वृषवाहन' असें म्हणावें आणि 'वनमाला' हा श्लोक म्हणूं नये. देवीचीं पोंवतीं असतील तेव्हां 'देव देव सुरेश्वर' याच्या जागीं 'देवि देवि सुरेश्वरी' असा स्त्रीप्रत्ययान्त पदांचा उच्चार करावा. बाकी सारे श्लोक सारखेच आहेत यानंतर गुरूंची पूजा करून त्यांना पोंवतें दिल्यावर, इतर ब्राह्मण व सुवासिनींनाही इतर पोंवतीं द्यावींत व स्वतःही सर्व कुटुंबासह धारण करावींत. नंतर ब्राह्मणांसह जेवण करून तीन दिवसपर्यंत ब्रह्मचर्यादि नियम पाळावेत. देवाला पोंवतीं वाहावींत. देवाचीं पोंवतीं काढून, स्नानादि उपचारांनीं देवाची पूजा करावी. तीन दिवस झाल्यावर देवाची पूजा करून, पोंवतीं काढावींत. या ठिकाणीं शिवाला जीं पोंवतीं वाहायचीं, त्याला जी चतुर्दशी त्रयोदशीनें विद्ध असेल ती घ्यावी. याप्रमाणेंच पुनव देखील तीन मुहूर्त सायाह्नकालव्यापिनी अशी पूर्वविद्धाच घ्यावी. अष्टम्यादि निराळ्या तिथि देखील ज्या पोंवतीं वाहाण्याकरतां घेणें असतील त्या—पहिल्या परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें सामान्य तिथींच्या निर्णयाप्रमाणें घ्याव्या. याप्रमाणें पवित्रारोपणाचा विधि येथें संपला.

**अथोपाकर्मकालः। तत्रबह्वृचानांश्रावणशुक्लपक्षेश्रवणनक्षत्रंपञ्चमीहस्तइति कालत्रयम् तत्रश्रवणंमुख्यकालस्तदलाभेपञ्चम्यादिः तथाचकालतत्त्वविवेचने-संग्रहकारिकायाम् पर्वणिश्रवणेकार्यंग्रहसंक्रान्त्यदूषिते। अध्वर्युभिर्बह्वृचैश्च-कथंचित्तदसंभवे १ तत्रैवहस्तपञ्चम्यांतयोःकेवलयोरपि। तत्रादिनद्वयेश्रवण-सत्वे यदिपूर्वसूर्योदयमारभ्यप्रवृत्तंश्रवणंद्वितीयादिनेसूर्योदयोत्तरं त्रिमुहूर्तंवर्तते तदापरदिनएवोपाकर्मधनिष्ठायोगप्राशस्त्यात् यदित्रिमुहूर्तन्यूनंतदा पूर्वदिनेएव संपूर्णव्याप्तेः यदिपूर्वदिनेसूर्योदयेनास्तिपरदिनेसूर्योदयोत्तरंमुहूर्तद्वयंवर्ततेतदो-त्तरदिने एव उत्तराषाढावेधनिषेधात् यदिपरदिनेमुहूर्तद्वयन्यूनंपूर्वदिनेचोत्तरा-षाढाविद्धंतदापञ्चम्यादिकालोग्राह्यः पञ्चमीहस्तइति कालद्वयंतुऔदयिकंमुहूर्त**

त्रयव्यापिमुख्यम् तदलाभेपूर्वविद्धमपि एवंभाद्रपदशुक्लपक्षेपिश्रवणपञ्चमी-
हस्तकालत्रयनिर्णयोज्ञेयः एतद्बह्वृचैः पूर्वाह्णेकार्यम् ।

**उपाकर्मकालनिर्णय**—( म्हणजे जानवीं घालण्याच्या श्रावणीच्या दिवसाचा निर्णय ) ऋग्वेद्यांनीं श्रावणशुद्ध पक्षांत—श्रवण नक्षत्र, पंचमी आणि हस्तनक्षत्र असे जे तीन काल सांगितले आहेत, त्यांत श्रवणनक्षत्र हा जो मुख्य काल, तो जर न साधेल तर पञ्चमी ( तिथि ) किंवा तीही न साधल्यास हस्तनक्षत्र, ( अशी योजना जाणावी ). कालतत्त्वविवेचन नांवाच्या ग्रंथांतल्या संग्रह-कारिकेंत असें सांगितलें आहे कीं, ग्रहण व संक्रान्ति यांनीं दूषित नसलेली अशी पुनव आणि श्रवण नक्षत्र यांवर अनुक्रमें यजुर्वेदी व ऋग्वेदी यांनीं उपाकर्म करावें. कदाचित् त्यांचाहि संभव नसल्यास, त्याच पक्षांत हस्तनक्षत्रयुक्त पंचमीला अथवा हस्त नक्षत्र अगर पंचमी यांपैकीं कोणचाही योग असल्यास (उपाकर्म) करावें. श्रवण नक्षत्र जर दोन दिवस असेल तर, म्हणजे आदल्या दिवशीं सूर्योदयापासून आरंभ होऊन, दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर सहा घटका जर असेल, तर दुसऱ्या दिवशींच उपाकर्म करावें; कारण, धनिष्ठायोग या कर्माला प्रशस्त असल्याचें सांगितलें आहे. दुसऱ्या दिवशीं जर श्रवण नक्षत्र सहा घटकांहून कमी असेल, तर पहिलाच दिवस योग्य होय; कारण, त्या दिवशीं पूर्ण व्याप्ति आहे. पूर्व दिवशीं सूर्योदयाच्या वेळीं श्रवण नक्षत्र नसून, सूर्योदयानंतर जर तें चार घटका असेल, तर दुसऱ्या दिवशींच करावें. उत्तराषाढांच्या वेधाचा जो निषेध सांगितला आहे, त्याचें हें कारण होय. दुसऱ्या दिवशीं जर श्रवण नक्षत्र चार घटकांहून कमी नसेल, आणि आदल्या दिवशीं जर तें उत्तराषाढा नक्षत्रानें विद्ध असेल, तर पंचमी आणि हस्तनक्षत्र हे दोन काळ, उदयकाळीं जेव्हां सहा घटका व्याप्ति असेल, तेव्हां मुख्य जाणावेत. तसे जर नस-तील तर पूर्वविद्ध घ्यावेत. याप्रमाणेंच भाद्रपद शुद्ध पक्षांतही श्रवण नक्षत्र, पंचमी आणि हस्तनक्षत्र यांचे कालनिर्णय जाणावेत. हें उपाकर्म ऋग्वेद्यांनीं पूर्वाह्णकाळीं करावें.

अथयजुर्वेदिनिर्णयः तत्रबह्वृचानांश्रवणवत्सर्वयजुर्वेदिनांश्रावणपौर्णमासी मुख्यःकालः पौर्णमास्याः खंडत्वेयदापूर्णिमापूर्वदिनेमुहूर्ताद्यनन्तरंप्रवृत्ताद्विती-यदिनेषण्मुहूर्तव्यापिनीतदासर्वयाजुषाणामुत्तरैव यदाशुद्धाधिकतयादिनद्वयेपि सूर्योदयव्यापिनीतदासर्वयाजुषाणांपूर्वैव पूर्वदिनेमुहूर्ताद्यनन्तरंप्रवृत्ताद्वितीय-दिनेमुहूर्तद्वयत्रयादिव्यापिनीषण्मुहूर्तन्यूनातदातैत्तिरीयैरुत्तराग्राह्या तैत्तिरीय-भिन्नयाजुषैःपूर्वाग्राह्या यदापूर्वदिनेमुहूर्ताद्यनन्तरंप्रवृत्ताद्वितीयदिनेमुहूर्तद्वय-न्यूनाभवतिक्षयवशान्नास्त्येववातदासर्वयाजुषाणांपूर्वैवहिरण्यकेशीतैत्तिरीया-णांश्रावणीपौर्णमासीमुख्यः कालस्तदभावेश्रावणेहस्तः श्रावणशुक्लपञ्चमीतुत-त्तत्सूत्रेनुक्तेर्नग्राह्या एतदेवभाद्रपदेपिकालद्वयमितिविशेषःखण्डतिथित्वेनिर्णयः पूर्वोक्तएव हस्तनक्षत्रमपिऔदयिकं सङ्गवस्पर्शिग्राह्यमन्यथापूर्वविद्धमेव आपस्तम्बानांश्रावणीपौर्णमासीमुख्यातदभावे भाद्रपदीतिविशेषः बौधायनानां श्रावणीपौर्णमासीमुख्या दोषसंभावनयातदभावे आषाढीतिविशेषः एतेषाम-पिखण्डतिथित्वेपूर्वोक्तएवनिर्णयः ।

**यजुर्वेद्यांचा उपाकर्मनिर्णय**— ऋग्वेद्यांना जसें श्रवणनक्षत्र लागतें, त्याचप्रमाणें यजुर्वेद्यांचा श्रावणी पौर्णिमा हाच मुख्य काळ होय. पुनवेला खंड असल्यानें, पूर्व दिवशीं जेव्हां ती दोन घटकांनंतर सुरू झाली असेल व दुसऱ्या दिवशीं बारा घटका व्यापिनी असेल, तेव्हां सर्व यजुर्वेद्यांनीं दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. शुद्धाधिक्यानें जेव्हां दोन्ही दिवशीं सूर्योदयव्यापिनी असेल, तेव्हां सर्व यजुर्वेद्यांनीं पूर्व दिवसाचीच घ्यावी. आदल्या दिवशीं दोन घटकांनंतर सुरू झाली असून दुसऱ्या दिवशीं—चार—सहा—वगैरे बारा घटकांहून जेव्हां कमी असेल, तेव्हां तैत्तिरीय शाखीयांनीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी. तैत्तिरीय शाखीयांखेरीजकरून जे इतर शाखेचे यजुर्वेदि असतील, त्यांनीं पूर्व दिवसाची घ्यावी, आणि जेव्हां पूर्वदिवशीं दोन घटकांनंतर असेल व दुसऱ्या दिवशीं जेव्हां चार घटकांहून कमी असेल, अथवा क्षयामुळें मुळींच नसेल तेव्हां, सर्व यजुर्वेद्यांनीं पूर्व दिवसाचीच घ्यावी. हिरण्यकेशी तैत्तिरीयशाखीयांना श्रावणी पौर्णिमा हाच मुख्य काळ आहे. त्या काळाच्या ऐवजीं श्रावण महिन्यांतलें हस्तनक्षत्र घ्यावें. त्या सूत्रांत श्रावण शुद्ध पंचमी सांगितली नसल्यानें, ती घेऊं नये. भाद्रपदांतहि हेच दोन काल उक्त आहेत, हा यांतला विशेष जाणावा. खंडतिथि असल्यास, तिचा निर्णय पूर्वीं सांगितलाच आहे. हस्त नक्षत्राखेरीज उदयकाळापासून संगवकाळाला स्पर्श करणारें असें जें असेल तें घ्यावें. तसें नसल्यास पूर्वनक्षत्रानें जें सिद्ध असेल तें घ्यावें. आपस्तंबांचा उपाकर्मकाल श्रावणी पौर्णिमा हाच मुख्य आहे. तिच्या अभावीं भाद्रपदी पौर्णिमा हा विशेष जाणावा. बौधायनांचा काळ श्रावणी पौर्णिमा हा जरी मुख्य आहे तरी कांहीं दोष ( अडचण ) असल्यास आषाढी पुनवेचा विशेष जाणावा. या तिथी देखील जर खंड असतील, तर त्यांबद्दल पूर्वीं जो निर्णय सांगितला आहे, तो जाणावा.

**अथकाण्वमाध्यन्दिनादिकात्यायनानां श्रवणयुताश्रावणपूर्णिमाकेवलावा हस्तयुक्तापञ्चमीकेवलावा मुख्यःकालः अतःकेवलश्रवणेकेवलहस्तेचतैर्नकार्यम् श्रावणमासेविघ्नदोषेभाद्रपदगतपूर्णिमापञ्चम्योःकार्यम् तिथेःखण्डत्वेषण्मुहूर्ताधिक्येउत्तराषण्मुहूर्तन्यूनत्वेपूर्वाग्राह्येत्यादिः पूर्वोक्तएवनिर्णयः ।**

**काण्व, माध्यंदिन वगैरे कात्यायनांना**— श्रवण नक्षत्रानें युक्त असलेली श्रावणी पौर्णिमा, फक्त पौर्णिमा, हस्तनक्षत्रानें युक्त असलेली पंचमी अथवा केवळ पंचमी—यांपैकीं कोणचाही जरी काळ असला तरी तो ( उपाकर्माला ) चालतो; म्हणून केवळ श्रवण नक्षत्र अथवा केवळ हस्तनक्षत्र—यांचा काळ त्यांनीं उपाकर्माला घेऊं नये. श्रावणांत जर कांहीं अडचण ( विघ्नदोष ) असेल, तर भाद्रपदी पुनव अथवा पंचमी या काळावर तें ( उपाकर्म ) करावें. तिथीला खंड असेल, अथवा ती जर बारा घटकांहून अधिक असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी व बारा घटकांहून कमी असल्यास आदल्या दिवसाची घ्यावी, वगैरे निर्णय पूर्वीं सांगितल्याप्रमाणेंच जाणावा.

**अथसामवेदिनांभाद्रपदशुक्लेहस्तनक्षत्रंमुख्यः कालःसंक्रान्त्यादिदोषेणतत्रासंभवेश्रावणमासेहस्तोग्राह्यइतिनिर्णयसिंधुः अन्येतु भाद्रपदहस्तेदोषसंभवे**

श्रावणपौर्णिमास्यामुपाकर्म कृत्वा भाद्रपदस्य हस्तपर्यन्तंनपठनीयं ततःपरंपठनीयमित्याहुः हस्तस्यखण्डत्वेदिनद्वयेऽपराह्णपूर्णव्याप्तौअपराह्णैकदेशस्पर्शेवापरदिनेएवोपाकर्म । पूर्वदिनएवापराह्णपूर्णव्याप्तौपूर्वत्रैव ॥ सर्वत्रसामगानामपराह्णस्यैवोपाकर्मकालत्वेनोक्तेः पूर्वदिनएवापराह्णैकदेशस्पर्शेदिनद्वयेप्यपराह्णस्पर्शाभावेवापरत्रैव येषांसामवेदिनांप्रातः सङ्गवौकर्मकालत्वेनोक्तौतेषांपूर्वत्रापराह्णव्याप्तिंत्यक्त्वा परदिनेसङ्गवोर्ध्वेवर्तमानहस्तग्रहणम् सिंहस्थेसूर्येउपाकर्मविधानंतुयदिश्रावणे हस्तः पूर्णिमावासिंहस्थेसूर्येभवतितदातत्रोपाकर्मनकर्कस्थे इतिसामगानांश्रावणमासगतहस्तपर्वणोर्व्यवस्थापरम् अन्यशाखिनांसिंहस्थरवेर्विधिनिषेधोवानास्ति अथर्ववेदिनांतुश्रावण्यांभाद्रपदगतायांवापौर्णमास्यामुपाकर्म तिथिखण्डे औदयिकसङ्गवकालव्यापिनीतिथिर्ग्राह्येति सर्वशाखिनां श्रावणभाद्रपदमासगतस्वस्वगृह्योक्तकालेषु ग्रहणसंक्रान्त्याशौचादिदोषसंभावनायांसर्वथाकर्मलोपप्राप्तौशाखान्तरोक्तकालानांग्राह्यत्वमावश्यकम् तत्रापस्तम्बबौधायनसामगादीनां श्रावणभाद्रपदगतपञ्चमीपूर्णिमादेरप्यविशेषेण ग्राह्यत्वप्राप्तौनर्मदोत्तरदेशेसिंहगतेसूर्येपञ्चम्यादेर्ग्रहणम् नर्मदादक्षिणभागेकर्कस्थेसूर्येश्रावणपञ्चम्यादेर्ग्रहणमितिव्यवस्थेतिकौस्तुभेउक्तम् तेनऋग्वेदिनामपि सर्वथाकर्मलोपप्रसक्तौपूर्णिमापिसिंहस्थकर्कस्थादिव्यवस्थयाग्राह्येतिमम भाति सर्वशाखिभिः श्रावणमासेमुख्यकालेपर्जन्याभावेनव्रीह्याद्यौषधिप्रादुर्भावाभावे आशौचादौवाभाद्रपदश्रवणादौकार्यम् औषधिप्रादुर्भावाभावेपिश्रावणमासे कार्यमितिकर्कादिमतम् सर्वशाखिनांगृह्योक्तमुख्यकालत्वेननिर्णीतदिने ग्रहणस्य संक्रान्तेर्वासत्वेसंक्रान्तिरहिताःपञ्चम्यादयोग्राह्याः ग्रहणसंक्रान्तियोगश्चोपाकर्मसंबन्धिन्यहोरात्रे भविष्यन्मध्यरात्रात्पूर्वमतीतमध्यरात्रादूर्ध्वंचेतियामाष्टके विद्यमानश्रवणनक्षत्रपूर्णिमादितिथ्यस्पृष्टोप्युपाकर्मदूषकः केचित्तूक्तयामाष्टकादन्यत्रापि विद्यमानोग्राह्यश्रवणादिनक्षत्रपर्वादितिथिस्पर्शीचेत्सोपिदूषकइत्याहुः नूतनोपनीतानांप्रथमोपाकर्मगुरुशुक्रास्तादौमलमासादौ सिंहस्थेगुरौच न कार्यम् द्वितीयाद्युपाकर्मतुअस्तादावपिकार्यम् मलमासेतु द्वितीयाद्यपिनकार्यम् प्रथमोपाकर्मस्वस्तिवाचननान्दीश्राद्धादिकृत्वाकार्यम् नूतनोपनीतानांश्रावणमासगतपञ्चमीहस्तश्रवणादिकालेषुगुरुशुक्रास्तादिप्रतिबन्धेनोपाकर्मारम्भाभावेभाद्रमासगतपञ्चमीश्रवणादयोग्राह्याः मौञ्जीयज्ञोपवीतंचनवंदण्डंचधारयेत् । अजिनंकटिसूत्रंचनवंवस्त्रंतथैवच १ इतिब्रह्मचारिणो विशेषःप्रतिवर्षंज्ञेयः उपाकर्मोत्सर्जनेब्रह्मचारिसमावृतगृहस्थवानप्रस्थैः सर्वैःकर्तव्ये उत्सर्जनकालस्तुनेहप्रपञ्च्यते उपाकर्मदिनेथवेतिवचनानुसारेणसर्वशिष्टानामिदानीमुपाकर्मदिनेएवोत्सर्जनकर्मानुष्ठानाचारेणैतन्निर्णयस्यानुपयोगात् एतेउपाकर्मोत्सर्जनेयदिअन्यैःद्विजैःसहकरोतितदालौकिकाग्नौ कुर्यात् यदैकःकरोतितदास्वगृह्याग्नौकुर्यात् कात्यायनैस्तुऔपवसथ्यअग्नावेवहोतव्यंनलौकिकाग्नौ बह्वृचादिः स्वयंचतुरवत्तीबहुभिश्चतुरवत्तिभिरुपाकर्मा-

दिकंकुर्वन्नेकस्यापिजामदग्न्यादेः पश्चाद्वत्तिनःसत्वे तदनुरोधेनपश्चाद्वत्तमेव कुर्यात् चतुरवत्तिनामपिपश्चावत्तित्वस्यवैकल्पिकत्वोक्तयातेषामपिकर्मवैगुण्याभावात् अकरणेदोषश्रवणेनप्रत्यब्दमेतेकर्तव्ये क्वचित्पुस्तकेनिर्णयसिन्धावेतदकरणेप्राजापत्यकृच्छ्रमुपवासोवाप्रायश्चित्तंदृश्यतेनसर्वत्रउपाकर्मोत्सर्जनयोरुभयोरपिऋषिपूजनमुक्तम् ऋष्यादितर्पणंतूत्सर्जनएवअत्रविवाहोत्तरंतिलतर्पणेन दोषः अत्र संकल्पेअधीतानांछन्दसामाप्यायनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थमुपाकर्मदिनेअद्योत्सर्जनाख्यंकर्मकरिष्य इति उपाकर्मणितुअधीतानामध्येष्यमाणानांचछन्दसांयातयामतानिरासेनाप्यायनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंइतिविशेषः अवशिष्टःसर्वोपिप्रयोगविशेषःस्वस्वगृह्यानुसारेणज्ञेयःअत्रनदीनांरजोदोषोन ब्रह्मादिदेवऋष्यादीनांजले सान्निध्यंतेनस्नानात्सर्वदोषक्षयः ऋषिपूजनस्थानस्थितजलस्पर्शनपानाभ्यां सर्वकामावाप्तिः इतिसर्वशाखिसाधारणनिर्णयः

**सर्वशाखीय उपाकर्मनिर्णय**—भाद्रपद शुद्धांतल्या हस्तनक्षत्राचा काळ हा सामवेद्यांच्या उपाकर्माचा मुख्य काळ होय. संक्रान्ति वगैरेच्या अडथळ्यानें जर उपाकर्म करण्यास विघ्न येईल, तर श्रावणांतलें हस्तनक्षत्र घ्यावें असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. भाद्रपदांतल्या हस्तनक्षत्रांत जर कांहीं दोष असण्याचा संभव असेल, तर श्रावणी पुनवेला उपाकर्म करून, भाद्रपदांतल्या हस्तनक्षत्रापर्यंत अध्ययन न करतां, त्यानंतर अध्ययन करावें, असें इतर ग्रंथकार म्हणतात. हस्तनक्षत्र खंडित असून अपराह्णकाळीं जर दोन दिवस व्याप्ति असेल, अथवा दोन्ही दिवशीं अपराह्णकाळीं जर एकदेशस्पर्श असेल, तर दुसऱ्या दिवशींच उपाकर्म करावें. पहिल्या दिवशीं जर अपराह्णकाळीं पूर्ण व्याप्ति असेल, तर सर्वच सामवेद्यांना अपराह्णकाळ हाच उपाकर्माला योग्य काळ असल्याचें वचन आहे; यास्तव त्यांनीं पहिल्या दिवशींच उपाकर्म करावें. पाहिल्या दिवशीं जर अपराह्णकाळीं एकदेशस्पर्श असेल तर, अथवा दोन्ही दिवशीं जर अपराह्णकाळीं स्पर्श नसेल, तर दुसऱ्या दिवशींच उपाकर्म करावें. ज्या सामवेद्यांना प्रातःकाळ व संगवकाळ हे उपाकर्माचे काळ सांगितले आहेत त्यांनीं, पूर्व दिवशीं जर अपराह्णकाळीं व्याप्ति असेल, तर ती टाकून दुसऱ्या दिवशीं संगवकाळानंतर जें हस्तनक्षत्र असेल तें घ्यावें, असा सिंहस्थ सूर्य असतां ज्या उपाकर्माबद्दल निर्णय सांगितला आहे, तो निर्णय, श्रावणांत सिंहस्थ सूर्य असून, हस्त किंवा पूर्णिमा जर येतील, तर त्या दिवशीं उपाकर्म करावें व कर्केचा सूर्य असल्यास करूं नये, असा जो निर्णय सांगितला, तो निर्णय हस्तनक्षत्र व पौर्णिमा यांचा सामवेद्यांसंबंधाचा जाणावा. जे इतर शाखांचे असतील त्यांना सिंहस्थ रवीचा विधि अथवा निषेध नाहीं. अथर्ववेद्यांनीं—श्रावणी पुनव अथवा भाद्रपदी पुनव—उपाकर्माला घ्यावी. तिथि जर खंडा असेल, तर उदयापासून संगवकालापर्यंत व्याप्ति असेल ती तिथि घ्यावी. श्रावण व भाद्रपद या महिन्यांतल्या ज्यांच्या त्यांच्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या काळीं जर ग्रहण, संक्रान्ति, अशौच वगैरे दोष उत्पन्न होतील, आणि त्यामुळें कर्म करण्यास जर अडचण येईल, तर सर्व शाखीयांनीं, दुसऱ्या शाखांत सांगितलेले काळ ( सोयस्कर असे ) अवश्य घ्यावेत.

त्यांतल्या त्यांत—आपस्तंब, बौधायन व सामवेदी—यांना जर श्रावण व भाद्रपद यांतल्या पंचमी-पौर्णिमा घेणें जरूर पडतील, तर नर्मदेच्या उत्तरेकडे सिंहस्थ रवि असतां, पंचमी वगैरे काळ घ्यावेत. रवि कर्कस्थ असतां नर्मदेच्या दक्षिणेस श्रावणांतली पंचमी वगैरे काल कौस्तुभांत ज्याअर्थी सांगितले आहेत त्याअर्थी, सर्वथाच जर कर्मलोप होत असेल, तर सिंहस्थ सूर्य, कर्कस्थ सूर्य, वगैरे जी व्यवस्था पूर्वी सांगितली, तीवरून ऋग्वेद्यांनींही पौर्णिमासुद्धां घ्यावी असें मला वाटतें. (उपाकर्माचा) मुख्य काळ जो श्रावण, त्यामध्यें पाऊस न पडल्यानें व्रीहि (देवभात) वगैरे वनस्पति जर झाल्या नसतील तर, अथवा अशौच वगैरे जर (विघ्नें) आलीं असतील, तर भाद्रपदांतलें श्रवणनक्षत्र वगैरे जे काळ, ते सर्वशाखीयांनीं उपाकर्माला घ्यावेत. वनस्पति जरी उत्पन्न झाल्या नसल्या, तरी श्रावणांतच उपाकर्म करावें, असें कर्कादिकांचें मत आहे. सर्वशाखीयांच्या गृह्यसूत्रांत उपाकर्माचा जो मुख्य दिवस सांगितला, त्या दिवशीं जर ग्रहण अथवा संक्रान्ति असेल, तर संक्रान्तिरहित असे पंचमी वगैरे काळ घ्यावेत. येणाऱ्या मध्यरात्रीच्या पूर्वी दोन प्रहर, गेलेल्या मध्यरात्रीच्या नंतर दोन प्रहर आणि दिवसाचे चार प्रहर, या अहोरात्रांत जर ग्रहण व संक्रान्ति यांचा योग असेल, आणि श्रवण नक्षत्र, 'पुनव वगैरे तिथींना त्यांचा स्पर्श होत नसेल, तर तो योग उपाकर्माला अयोग्य होतो. या सांगितलेल्या आठ प्रहरांहून इतर वेळींही ग्रहण अथवा संक्रान्ति यांचा योग असून, उपाकर्माला ग्राह्य अशीं श्रवणादि नक्षत्रें व पौर्णिमादि तिथि यांना स्पर्श करणारा जरी असला तरी तो काळ उपाकर्माला बाधक होतो, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. ज्याची मुंज नवीनच झाली असेल त्याची पहिली श्रावणी, गुरुशुक्रांचे अस्तादिक, मलमासादिक आणि सिंहस्थ गुरु अशा प्रसंगीं करूं नये. दुसरी, तिसरी वगैरे श्रावण्या अस्तादिकांतहि कराव्या. मात्र मलमास असल्यास दुसरी, तिसरी वगैरे करूं नयेत. प्रथम उपाकर्म करणें तें, पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध वगैरे करून नंतर करावें. नवीनच मुंज झालेल्याची श्रावणी जर श्रावणांतल्या पंचमी, हस्त, श्रवण वगैरे काळीं गुरुशुक्रांच्या अस्तादिकांमुळें न होईल, तर ती भाद्रपदांतल्या पंचमी, श्रवण वगैरे काळीं करावी. ब्रह्मचाऱ्यानें—मौंज, यज्ञोपवीत, नवा दंड, कृष्णाजिन, कटिसूत्र व नवें वस्त्र—हीं धारण करावीं. हा ब्रह्मचाऱ्याच्या संबंधानें दरवर्षी विशेष जाणावा. उपाकर्म आणि उत्सर्जन (नवें जानवें घालणें व जुनें काढून टाकणें, हीं कर्मे—ब्रह्मचारी, सोडमुंज झालेले, गृहस्थ व वानप्रस्थ या सर्वांनीं करावींत. उत्सर्जनाचा काल येथें न सांगण्याचें कारण असें कीं, 'अथवा उपाकर्माच्या दिवशीं करावें' या वाक्यावरून, उपाकर्माच्या दिवशींच उत्सर्जन करण्याचा सर्व शिष्टांचा प्रघात असल्यामुळें, त्या निर्णयाचा कांहीं उपयोग नाहीं. उपाकर्म व उत्सर्जन हे विधि जर इतर ब्राह्मणांसह करायचे असतील, तर लौकिकाग्नीच्या ठिकाणीं ते करावेत. जेव्हां एकट्यालाच करायचे असतील तेव्हां आपल्या गृह्याग्नीवर करावेत. कात्यायनांनीं अन्वाधान केलेल्या अग्नीवर उपाकर्म करावें, लौकिकाग्नीवर करूं नये. चतुरवत्ति असा ऋक्शाखी जर अनेक चतुरवत्तींसह उपाकर्म

करणारा असेल, आणि त्यांमध्यें जर एक जामदग्नि वगैरे पंचावत्ति असेल तर चतुरवत्तीयांनींही कर्म पंचावत्त करण्यास विकल्प आहे, आणि तसें पंचावत्त कर्म केलें असतां त्यांच्या त्या कर्माला वैगुण्य येत नसल्यानें, पंचवत्तीच्या अनुरोधानें पंचावत्त कर्मच करावें. उपाकर्म आणि उत्सर्जन हीं कर्में जर केलीं नाहींत, तर दोष असल्यानें, तीं दरवर्षी करावींत. उपाकर्म आणि उत्सर्जन हीं कर्में न केल्यास, प्राजापत्य कृच्छ्र अथवा उपास करावा, असें प्रायश्चित्त निर्णयसिन्धूच्या एखाद्याच प्रतींत आढळतें, सर्व प्रतींत आढळत नाहीं. उत्सर्जन व उपाकर्म या दोहोंतही ऋषिपूजन करावें. ऋषि वगैरेंचें तर्पण उत्सर्जनांतच करावें. लग्न झाल्यावर उपाकर्मांत तिलतर्पण करण्यांत दोष नाहीं. उत्सर्जनाच्या संकल्पाविषयींचा विशेष येणेंप्रमाणें:— 'अधीतानां छन्दसामाप्यायनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं उपाकर्मदिने अद्य उत्सर्जनाख्यं कर्म करिष्ये।' उपाकर्माचा विशेषः—'अधीतानां अध्येष्यमाणानां च छन्दसां यातयामतानिरासेनाप्यायनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं उपाकर्माख्यं कर्म करिष्ये।' बाकीचा सारा प्रयोग ज्यानें त्यानें आपापल्या गृह्यसूत्राप्रमाणें समजावा. या दोन्ही कर्मांबद्दल नद्यांचा रजोदोष नाहीं. ब्रह्मादि सारे देव आणि ऋषि वगैरेंचें जलांपाशीं सान्निध्य असतें; यास्तव नदीच्या पाण्यानें स्नान केलें असतां, सर्व दोष नाहींसे होतात. ऋषिपूजन ज्या ठिकाणीं केलें असेल त्या ठिकाणच्या पाण्यानें स्नान करून तें प्यालें असतां सर्व मनोरथ सिद्ध होतात. याप्रमाणें सर्वशाखीयांचा साधारण निर्णय आहे.

**अथरक्षाबन्धनमस्यामेवपूर्णिमायांभद्रारहितायां त्रिमुहूर्ताधिकोदयव्यापिन्यापराह्णेप्रदोषेवाकार्यम् उदयेत्रिमुहूर्तन्यूनत्वेपूर्वेद्युर्भद्रारहिते प्रदोषादिकाले कार्यम् इदंग्रहणसंक्रान्तिदिनेपिकर्तव्यम् मन्त्रस्तु येनबद्धोबलीराजादानवेन्द्रो महाबलः। तेनत्वामभिबध्नामिरक्षेमाचलमाचल १ इति अत्रैव पूर्णिमायां हयग्रीवोत्पत्तिः श्रावणपूर्णिमाकुलधर्मादौत्रिमुहूर्तसायाह्नव्याप्तापूर्वविद्धैवग्राह्या त्रिमुहूर्तन्यूनत्वेपरा अस्यामेवपौर्णमास्यामाश्वलायनानांश्रवणाकर्मसर्पबलिश्चरात्रावुक्तः तैत्तिरीयाणांतुसर्पबलिरेवोक्तः कात्यायनानांसामगानांचश्रवणाकर्मसर्पबली द्वावप्युक्तौश्रवणाकर्मसर्पबल्याश्वयुजीप्रत्यवरोहणादिपाकसंस्थानांस्वस्वकालेष्वकरणेप्राजापत्यंप्रायश्चित्तं कार्यंनतुकालान्तरेतदनुष्ठानम् श्रवणाकर्मादिसंस्थाःपत्न्यामृतुमत्यामपिकार्याःप्रथमारम्भस्तुनभवतिअत्रपौर्णमासी— अस्तमयप्रभृतिप्रवृत्तकर्मपर्याप्तकालव्यापिनी पूर्वैवचेत्पूर्वैवग्राह्या दिनद्वये तत्संबन्धस्यसत्त्वेअसत्त्वेवापरैव प्रयोगस्तुस्वस्वसूत्रेषुज्ञेयः श्रावणकृष्णचतुर्थ्यां प्रारभ्यकृष्णचतुर्थीषुयावज्जीवमेकविंशतिवर्षाणिवाएकवर्षवासंकष्टचतुर्थीव्रतं कार्यम् अशक्तौप्रतिवर्षंश्रावणचतुर्थ्यामेवकार्यम् अत्रचन्द्रोदयव्याप्त्यातिथिनिर्णयःप्रथमपरिच्छेदेउक्तः सोद्यापनव्रतप्रयोगः कौस्तुभादौज्ञेयः**

**रक्षाबंधन**— सूर्योदयापासून सहा घटकांहून जास्त व्यापिनी व भद्रारहित अशा श्रावणी पुनवेला अपराह्णकाळीं अथवा प्रदोषकाळीं राखी बांधावी. दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर पुनव जर सहा घटकांपेक्षां कमी असेल तर आदल्या

दिवशीं भद्रा वर्ज्य करून प्रदोषकाळीं राखी बांधावी. राखी बांधण्याचें काम ग्रहण व संक्रांति जरी असतील तरी करावें. रक्षाबन्धनमंत्रः—'येन बद्धो बली राजा दानवेन्द्रो महाबलः। तेन त्वामभिबध्नामि रक्षे माचलमाचल॥' याच पुनवेला हयग्रीवाचा अवतार झाला. कुलधर्म वगैरे कर्मांना जी पौर्णिमा घेणें ती सहा घटका सायान्हव्यापिनी व पूर्वतिथीनें विद्ध अशी असणारी घ्यावी. आदल्या दिवशीं जर सायान्हकाळीं सहा घटकांहून कमी असेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. श्रवणाकर्म आणि सर्पबलि हीं दोन कर्मे याच पुनवेला रात्रीं आश्वलायनांनीं करावींत. तैत्तिरीयशाखीयांनीं फक्त सर्पबलि करावा. कात्यायन व सामवेदी यांनीं श्रवणाकर्म व सर्पबलि अशीं दोन्ही कर्मे करावींत. श्रवणाकर्म, सर्पबलि, आश्वयुजीकर्म व प्रत्यव रोहण वगैरे ज्या पाकसंस्था, त्या योग्य वेळीं न केल्यास प्राजाप्रत्यप्रायश्चित्त करावें, इतर वेळीं त्या करूं नयेत. बायको जरी विटाळशी असली, तरी श्रवणाकर्म वगैरे संस्था कराव्या. पहिल्यानेंच जर आरंभ करायचा असेल तर मात्र वरील दोष असतां करूं नये. श्रवणाकर्माला जी पुनव घ्यायची ती, सूर्यास्तापासून आरंभ करून सर्व कर्म पौर्णिमा असतांनाच समाप्त होईल इतकी व्याप्ति जर पूर्व दिवशीं असेल, तर पूर्व दिवसाची घ्यावी व तशी व्याप्ति जर दोन दिवस असेल अथवा दोन्ही दिवशीं नसेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. श्रवणाकर्माचा प्रयोग आपापल्या सूत्रांत पहावा. श्रावण वद्य चतुर्थीपासून आरंभ करून दर महिन्याच्या कृष्ण चतुर्थीला यावज्जन्म अथवा एकवीस वर्षें किंवा एक वर्ष संकष्टचतुर्थीचें व्रत करावें. अशक्तानें दरवर्षी श्रावणकृष्ण चतुर्थीला करावें. संकष्टचतुर्थीव्रत घेणें तें, जी चतुर्थी चंद्रोदयकालव्यापिनी असेल तिच्यावर घ्यावें, असा निर्णय पहिल्या परिच्छेदांत पूर्वी सांगितलाच आहे. याच्या उद्यापनासह व्रताचा प्रयोग कौस्तुभ वगैरे ग्रंथांत पहावा.

अथजन्माष्टमीव्रतम् तत्राष्टमीद्विविधा शुद्धाविद्धाचदिवारात्रौवासप्तमीयोगरहितायत्रदिनेयावतीतत्र तावतीशुद्धा दिवारात्रौवासप्तमीयोगवतीयस्मिन्नहोरात्रेयावतीतत्रतावतीविद्धा सापुनर्द्विविधारोहिणीयुतारोहिणीयोगरहिताचेति तत्ररोहिणीयोगरहितकेवलाष्टमीभेदाः सप्तमीनाड्यः ५९ पलानि ५९ अष्टमी ५८।५ अस्यांशुद्धायां संदेहोनास्ति द्वितीयकोट्यभावात् सप्तमी २ अष्टमी ५५ अस्यांविद्धायामप्यसंदेहः दिनान्तरेअभावेनाद्वितीयकोट्यभावात् यदा दिनद्वयेकेवलाष्टमीवर्ततेतदाचत्वारःपक्षाः पूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनी परेद्युरेवनिशीथव्यापिनीदिनद्वयेपिनिशीथव्यापिनी दिनद्वयेपिनिशीथव्याप्त्यभावइतिरात्र्यर्धनिशीथपदार्थःस्थूलदृष्ट्यात्वष्टमोमुहूर्तोनिशीथःतत्रपूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनीयथा सप्तमी ४० अष्टमी ४२ अत्र सप्तमीयुतापूर्वविद्धैवाष्टम्युपोष्या यथावाष्टमी ६०।४ इयंशुद्धाधिकापिपूर्वैव परेद्युरेवनिशीथेयथासप्तमी ४७ अष्टमी ४६ अत्रपरैवाष्टम्युपोष्या उभयत्रनिशीथेयथा सप्तमी४२अष्टमी ४६ अत्रापिपरैवाष्टमीग्राह्या दिनद्वयेनिशीथव्याप्त्यभावोयथा सप्तमी ४७ अष्टमी ४२ अत्रापिपरैवाष्टमी ग्राह्या अत्रसर्वत्रसप्तमीयुक्तायांरात्रिपूर्वार्धावासानेकलयाप्यष्टम्याः सत्वेएवनिशीथव्यापित्वं नवमीयुक्तायांरात्र्युत्तरार्धादिभागेसत्वएवोत्तरत्रनिशीथव्यापित्वंसप्तमीदिनेउत्तरभागेएवसत्वेनवमीयुतादिनेपूर्वभाग-

एवसत्वेचनिशीथव्यापित्वपक्षएवमन्तव्यः एवंवक्ष्यमाणरोहिणीयुक्तभेदेष्वपि ज्ञेयम् रोहिणीयुताष्टम्यामपिपूर्वदिनएवनिशीथेऽष्टमीरोहिण्योर्योगःपरदिनएव निशीथेयोगःदिनद्वये निशीथेयोगइतिपक्षत्रयम् पूर्वेद्युरेवनिशीथेयोगोयथा सप्तमी ४० तद्दिनेकृत्तिका ३५ अष्टमी ४६ तद्दिनेरोहिणी ३६ अत्रपूर्वविद्धै-वाष्टम्युपोष्या परदिनएवनिशीथयोगो यथा सप्तमी ४२ तद्दिनेकृत्तिका ५० अष्टमी ४७ रोहिणी ४६ अत्रपरैवाष्टमीग्राह्या दिनद्वयेनिशीथेऽष्टमीरोहिण्यो-र्योगोयथा सप्तमी ४२ कृत्तिका ४३ अष्टमी ४७ रोहिणी ४८ अत्रपरैवाष्टमी ग्राह्या अथरोहिणीयुताष्टम्यामेवदिनद्वयेपिनिशीथेरोहिणीयोगाभावोबहुधा संभवति ।

**श्रावणवद्य अष्टमी प्रकार पहिला**—अष्टमीचे प्रकार दोन आहेत. शुद्धा आणि विद्धा. सप्तमी योगरहित अशी दिवसास अथवा रात्रीं जेव्हां जितकी असेल, तितकी ती शुद्धा होय आणि दिवसा अथवा रात्रीं सप्तमीच्या योगानें युक्त अशी ज्या अहोरात्रांत जितकी असेल तितकी त्या दिवशीं विद्धा होय. ती पुन्हां दोन प्रकारची आहे. एक रोहिणी नक्षत्रानें युक्त व दुसरी रोहिणी नक्षत्ररहित. त्यांतल्या रोहिणीनक्षत्ररहित अष्टमीचे भेद उदाहरणानें सांगतों:—(१) सप्तमी ५९ घ. ५९ पळें व अष्टमी ५८ घ. ५ पळें ही शुद्धा असून येथें दुसऱ्या कोटीचा संभव नसल्यानें; हिच्यासंबंधानें संशय नाहीं. (२) सप्तमी २२ घ. व अष्टमी ५५ घ. ही विद्धा असल्यानें व दुसऱ्या दिवशीं मुळींच नसल्यानें, येथें दुसऱ्या कोटीचा संभव नाहीं; म्हणून हिच्यासंबंधानेंही संशय नाहीं. अष्टमी जेव्हां दोन दिवस केवळ असते, तेव्हां तिच्यासंबंधानें जे चार पक्ष संभवतात, ते असे:–(१) पूर्वदिवशीं निशीथव्यापिनी; (२) दुसऱ्या दिवशीं निशीथव्यापिनी; (३) दोन्ही दिवशीं निशीथव्यापिनी आणि (४) दोन्ही दिवशीं निशीथव्यापिनी नसणें. निशीथ म्हणजे रात्रीचें अर्ध होय. स्थूलमानानें आठवा जो मुहूर्त तो निशीथकाल होय. (१) पूर्व दिवशींच्या निशीथ-कालव्यापिनीचें उदाहरण:—सप्तमी ४० घ. व अष्टमी ४२ घ. या ठिकाणीं अष्ट-मीनें युक्त अशी पूर्व-विद्धा उपासाकरतां घ्यावी. किंवा दुसरें उदाहरण:—अष्टमी ६० घ. ४ पळें ही जरी शुद्धाधिका आहे, तरी पूर्वदिवसाचीच घ्यावी. (२) दुसऱ्या दिवशींच्या निशीथकालव्यापिनीचें उदाहरण:–सप्तमी ४७ घ. व अष्टमी ४६ घ. येथें दुसऱ्या दिवसाचीच उपोषणाला घ्यावी. (३) दोन्ही दिवशीं निशीथव्यापिनी असणारीचें उदाहरण:–सप्तमी ४२ घ. व अष्टमी ४६ घ. येथें दुसऱ्या दिवसाचीच उपासाला घ्यावी. (४) दोन्ही दिवशीं निशीथव्यापिनी असणारीचें उदाहरण:–सप्तमी ४७ घ. व अष्टमी ४२ घ. येथें दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. या सर्व पक्षांत सप्तमी-युक्त जर अष्टमी असेल, तर रात्रीच्या पूर्वार्धाच्या समाप्तीच्या वेळीं एक कला जरी अष्टमी असली, तरी ती निशीथव्यापिनीच मानावी. अष्टमी जर नवमीयुक्त असेल, तर रात्रीच्या उत्तरार्धाच्या पहिल्या भागांत, अष्टमी एक कला जरी असली आणि नवमीयुक्त अशा दिवशीं जर ती अष्टमी पहिल्या भागांतच असेल, तर तिची निशीथव्याप्ति नाहीं

असें समजावें. याचप्रमाणें पुढें जे रोहिणी नक्षत्रयुक्त अष्टमीचे भेद सांगायचे आहेत, त्यांच्या बाबतींतही हाच निर्णय समजावा. रोहिणीयुक्त अष्टमीच्या ठिकाणीं (१) पूर्वदिवशींच निशीथकाळीं अष्टमी व रोहिणी यांचा योग; (२) दुसऱ्या दिवशींच निशीथकालीं ( तसा ) योग व (३) दोन्ही दिवशीं निशीथकालीं ( तसा ) योग; असे याचे तीन पक्ष होतात. (१) पूर्वदिवशीं निशीथकालीं अष्टमी व रोहिणी यांचा योग असल्याचें उदाहरणः—अष्टमी ४० घ. व त्या दिवशीं कृत्तिका ३५ घ. अष्टमी ४६ घ. व त्या दिवशीं रोहिणी ३६ घ. येथें पूर्वविद्धा अष्टमी उपासाला घ्यावी. (२) दुसऱ्या दिवशींच्या निशीथकालाच्या योगाचें उदाहरणः—सप्तमी ४२ घ. आणि कृत्तिका ५० घ. अष्टमी ४७ घ. आणि रोहिणी ४६ घ. येथें दुसऱ्याच दिवसाची अष्टमी घ्यावी. (३) दोन्ही दिवशीं निशीथकालीं असणारीचें उदाहरणः—सप्तमी ४२ घ. व कृत्तिका ४३ घ., अष्टमी ४७ घ. व रोहिणी ४८ घ. येथेंही दुसऱ्याच दिवसाची अष्टमी घ्यावी. रोहिणीयुक्त अष्टमीचा योग, दोन्ही दिवशीं निशीथकालीं नसण्याचाच बहुधा संभव असतो.

परेद्युरेवनिशीथव्यापिनीअष्टमी परेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुक्ताचेत्येकःपक्षः यथासप्तमी ४७ अष्टमी ५० अष्टमीदिनेकृत्तिका ४६ अत्रपक्षेपरैवाष्टमी ग्राह्या एतत्तुल्ययुक्त्यापूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनीपूर्वेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिपक्षेपिपूर्वैवग्राह्या दिनद्वयेपिनिशीथादन्यत्ररोहिणीयुतापरेद्युरेवनिशीथव्यापिनीतिद्वितीयःपक्षः सप्तमी ४८ तद्दिने कृत्तिका ३० अष्टमी ४८ रोहिणी २५ अत्रापिपरैवग्राह्यादिनद्वयेनिशीथादन्यत्ररोहिणीयुक्तापूर्वेद्युरेव निशीथव्यापिनीतितृतीयोयथा सप्तमी २५ कृत्तिका ४८ अष्टमी २० रोहिणी ४३ अत्रापिपरैव रोहिणीयोगसाम्येपिपूर्वत्रसप्तमीविद्धत्वात् यथावाष्टमी ६०।४ कृत्तिका ५० अत्र पूर्वैवग्राह्या अहोरात्रद्वयेरोहिणीयोगसाम्येपिपूर्वस्याः शुद्धत्वात्पूर्णव्याप्तेश्चदिनद्वयेपिनिशीथव्यापिनीपरेद्युरेवनिशीथादन्यत्र रोहिणीयुतेतिचतुर्थः यथा सप्तमी ४३ अष्टमी ४९ कृत्तिका ४६ अत्रपरैवाष्टमी एवं दिनद्वयेपिनिशीथव्यापिनीपूर्वत्रैव निशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिपंचमो यथा सप्तमी ४१ तद्दिनेरोहिणी ४३ अष्टमी ४७ अत्रपूर्वैवाष्टम्युपोष्या दिनद्वयेपिनिशीथव्यापिनीदिनद्वयेनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिषष्ठो यथा सप्तमी ४२ कृत्तिका ४८ अष्टमी ४८ रोहिणी ४२ अत्रपरैव दिनद्वयेपिनिशीथाव्यापिनीपूर्वेद्युरेवनिशीथाव्यापिनीपूर्वेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिसप्तमोयथा सप्तमी ४८ तद्दिनेरोहिणी ५८ अष्टमी ४२ अत्रपरैवाष्टमी ग्राह्या अत्रैवपक्षेपरेद्युरेव उभयत्रवानिशीथादन्यत्ररोहिणीयोगेपिपरैवेतिकैमुत्येनसिद्धम् पूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनीपरेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिचरमःपक्षः यथा सप्तमी ३० अष्टमी २५ तद्दिनेकृत्तिका ५ यथावाष्टमी ६०।४ अष्टमीशेषदिनेकृत्तिका १ अत्रोदाहरणद्वयेपिपरैवाष्टमीग्राह्या स्वल्पस्यापिरोहिणीयोगस्यप्राशस्त्येन मुहूर्तमात्राया अपिपरस्याग्राह्यतयापूर्वत्रविद्यमानायानिशीथव्याप्तेरनादरात्

सर्वपक्षेषुयदिपरदिनेमुहूर्तन्यूनावर्ततेतदासानग्राह्या किंतुपूर्वैवेतितुपुरुषार्थचि-न्तामणावुक्तम् परेद्युरेवनिशीथव्यापिनीपूर्वेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुता यथा सप्तमी ४८ रोहिणी ५५ अष्टमी ४८ अत्रपरैव विद्धायांनिशीथोत्तरं रोहिणीयोगस्याप्रयोजकत्वात् अत्रविस्तरेणोक्तानांबहुपक्षाणांसंक्षेपेणनिर्णयसं-ग्रहः पुरुषार्थचिन्तामणौ शुद्धसमायांशुद्धन्यूनायांवाविद्धसमायांविद्धन्यूनाया वाकेवलाष्टम्यांसंदेहएवनास्ति शुद्धाधिकाऽपिकेवलाष्टमीपूर्वैव विद्धाधिकातु पूर्वदिनएवनिशीथव्याप्तौपूर्वा दिनद्वयेनिशीथव्याप्तावव्याप्तौवापरैवेति ।

**श्रावण वद्य अष्टमी प्रकार दुसरा**—( १ ) दुसऱ्या दिवशींच निशीथकाल-व्यापिनी अष्टमी आणि दुसऱ्या दिवशींच निशीथकालाहून इतर कालीं रोहिणीयुक्त अष्टमी असणारा जो पक्ष, त्याचें उदाहरणः—सप्तमी ४७ घ. अष्टमी ५० घ. व अष्टमीला कृत्तिका ४६ घ. येथें दुसऱ्या दिवसाची अष्टमी घ्यावी. याच्यासारख्याच युक्तीनें पूर्व दिवशींच निशीथकालव्यापिनी अष्टमी आणि पूर्व दिवशींच निशीथकालाहून इतर कालीं रोहिणीयुक्त अष्टमी असा जेव्हां पक्ष असेल, तेव्हां पूर्व दिवसाची घ्यावी. ( २ ) दोन्ही दिवशीं निशीथकालाहून इतर कालीं रोहिणीयुक्त अष्टमी आणि दुसऱ्या दिवशींच निशीथकालव्यापिनी असा जो दुसरा पक्ष त्याचें उदाहरणः—सप्तमी ४८ घ. व कृत्तिका ३० घ.; अष्टमी ४८ घ. व रोहिणी २५ घ. या ठिकाणीं दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. ( ३ ) दोन्ही दिवशीं निशीथकालव्यापिनी नसून, इतर कालीं रोहिणियुक्त अष्टमी व पूर्व दिवशींच निशीथकालव्यापिनी असा जो तिसरा पक्ष, त्याचें उदाहरणः—सप्तमी २५ घ. व कृत्तिका ४८ घ. अष्टमी २० घ. व रोहिणी ४३ घ. येथें दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन्ही दिवशीं जर रोहिणीचा योग खरोखरीच असेल तर पूर्व दिवशीं ती सप्तमीनें विद्ध असल्यानें, पूर्व दिवसाचीच घ्यावी. उदाहरणः—अष्टमी ६० घ. ४ पळें व कृत्तिका ५० घ. यावेळीं दोन अहोरात्रांत रोहिणीचा योग समान असल्यानें, पूर्व दिवसाची शुद्धा असून, तिची पूर्णव्याप्ति आहे, म्हणून पूर्व दिवसाचीच घ्यावी. (४) दोन्ही दिवशीं निशीथकालव्यापिनी अष्टमी व दुसऱ्या दिवशीं निशीथकालाहून इतर कालीं रोहिणीयुक्त अष्टमी असा जो चौथा प्रकार, त्याचें उदाहरणः—सप्तमी ४३ घ. अष्टमी ४१ घ. व कृत्तिका ४६ घ. येथें दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. (५) वरच्याप्रमाणेंच दोन्ही दिवशीं निशीथकालव्यापिनी अष्टमी आणि पूर्व दिवशींच निशीथकालाहून इतरकालीं रोहिणी युक्त अष्टमी, असा जो पांचवा पक्ष त्याचें उदाहरणः—सप्तमी ४१ घ. व रोहिणी ४३ घ. आणि अष्टमी ४७ घ. येथें उपासाला पूर्व दिवसाचीच घ्यावी. ( ६ ) दोन्ही दिवशीं निशीथकालव्यापिनी अष्टमी आणि दोन्ही दिवशीं निशीथकालाहून इतर कालीं रोहिणीयुक्त अष्टमी असा जो सहावा पक्ष, त्याचें उदाहरणः—सप्तमी ४२ घ. कृत्तिका ४८ घ. अष्टमी ४९ घ. व रोहिणी ४२ घ. येथेंही दुसऱ्याच दिवसाची घ्यावी. ( ७ ) दोन्ही दिवशीं निशीथ-कालव्यापिनी नसून, पूर्व दिवशींच निशीथकालाहून इतर कालीं रोहिणीयुक्त अष्टमी, असा जो सातवा पक्ष त्याचें उदाहरणः—सप्तमी ४८ घ. रोहिणी ५८ घ.

अष्टमी ४२ घ. व रोहिणी ५८ घ. येथेंही दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. याच पक्षीं व (अ) दुसऱ्या दिवशींच [सप्तमी ४८ घ. अष्टमी ४२ घ. व कृत्तिका १२ घ. अथवा (ब) दोन्ही दिवशीं सप्तमी ४२ घ. व कृत्तिका ४८ घ. अष्टमी ४२ घ. व रोहिणी ४२ घ.] निशीथकालाहून इतर कालीं अष्टमीचा व रोहिणीचा जरी योग होत असला तरी दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी, असें कैमुतिकन्यायानें सिद्ध होतें. (८) पूर्व दिवशींच निशीथकालव्यापिनी अष्टमी आणि दुसऱ्या दिवशींच निशीथकालाहून इतर काळीं रोहिणीयुक्त अष्टमी असा जो आठवा पक्ष, त्याचें उदाहरण:—(१) सप्तमी ३० घ. अष्टमी २५ घ. व कृत्तिका ५ घ. अथवा (२) अष्टमी ६० घ. ४ प. व अष्टमीच्या दिवशींच कृत्तिका १ घ. या दोन्ही प्रसंगीं दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. रोहिणीचा योग जरी थोडा असला, तरी तो प्रशस्त होय; यासाठीं दुसऱ्या दिवशीं दोन घटका जरी योग असला, तरी तीच ग्राह्य असल्यानें, पूर्व दिवशीं असलेल्या निशीथकालव्याप्तीचा उपयोग नाहीं; म्हणून या दोन्ही उदाहरणांत दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. वर सांगितलेल्या साऱ्या पक्षांत अष्टमी जर दुसऱ्या दिवशीं दोन घटकांहून कमी असेल, तर ती घेऊं नये; पूर्व दिवसाचीच घ्यावी, असें पुरुषार्थचिंतामणींत सांगितलें आहे. दुसऱ्या दिवशींच निशीथकालव्यापिनी अष्टमी आणि पूर्व दिवशींच निशीथकालाहून इतर कालीं जी रोहिणीयुक्त अष्टमी, तिचें उदाहरण:—सप्तमी ४८ घ. व रोहिणी ५५ घ. आणि अष्टमी ४८ घ. येथें असलेल्या विद्धा अष्टमीला निशीथकालानंतर रोहिणीयोग असल्यानें, तो निरुपयोगी आहे; सबब दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. येथें विस्तारानें जे अनेक पक्ष सांगितले, त्यांच्या निर्णयाबद्दल पुरुषार्थचिन्तामणींत संक्षेपतः विवरण केलेलें आहे. शुद्धसमा, शुद्धन्यूना, विद्धसमा, न्यूना किंवा निर्भेळ अष्टमी यांच्या बाबतींत संशयच नाहीं. निर्भेळ अशी अष्टमी जरी शुद्धाधिका असली, तरी पूर्व दिवसाचीच घ्यावी. पूर्व दिवशीं जर निशीथकालव्यापिनी असेल, तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. दोन दिवस जर निशीथकालव्यापिनी असेल अथवा नसेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी.

अथरोहिणीयोगेयदिशुद्धसमायांशुद्धन्यूनायांवाईषदपिरोहिणीयोगस्तदानसंदेहः शुद्धाधिकायांपूर्वदिनेदिनद्वयेपिवारोहिणीयोगेपूर्वैव शुद्धाधिकायामुत्तरदिनेएवरोहिणीयोगेमुहूर्तमात्रेप्युत्तरैव विद्धाधिकायांपूर्वदिनएवनिशीथात्पूर्वनिशीथेवारोहिणीयोगेपूर्वा दिनद्वयेपिपरत्रैववानिशीथेनिशीथंविहायवारोहिणीयोगेपरैवेतिसंक्षेपेणनिर्णयसंग्रहः एवंकौस्तुभादिनवीनग्रन्थानुसृतमाधवमतानुसारेणजन्माष्टमीनिर्णीता अत्रकेचित्केवलाष्टमीजन्माष्टमीसैवरोहिणीयुताजयन्तीसंज्ञकेतिजयन्त्यष्टम्योर्व्रतैक्यमाहुः अन्येतुजन्माष्टमीव्रतंजयन्तीव्रतंचभिन्नंरोहिणीयोगाभावेजयन्तीव्रतलोपाज्जन्माष्टमीव्रतमेवकार्यम् यस्मिन्वर्षेजयन्त्याख्ययोगोजन्माष्टमीतदा अन्तर्भूताजयन्त्यांस्यादिति जयन्तीदिनेनिशीथाख्यकर्मकालेऽष्टम्याद्यभावेपिसाकल्यवचनापादितकर्मकालव्याप्तिमादायव्रतद्वयमपिजयन्तीदिनएवतन्त्रेणानुष्ठेयम् व्रतद्वयस्याप्यकरणेमहादोष-

**श्रवणेनफलश्रवणेनचनित्यकाम्योभयरूपत्वात् नतुनिशीथव्याप्तायांपूर्वाष्टम्यां जन्माष्टमीव्रतंकृत्वाजयन्तीदिनेपारणमनुष्टेयम् नित्यव्रतलोपेप्रत्यवायापाता- दित्याहुःनिर्णयसिन्धौतुउक्तरीत्यामाधवमतमुपपाद्यहेमाद्रिमतेनजन्माष्टमीव्रत- मेवानित्यं जयन्तीव्रतंतु नित्यमपिकलियुगेलुप्तमिति केचिन्नानुतिष्ठन्तिइत्युक्त्वा स्वमतेनयस्मिन्वर्षेपूर्वदिनेएवनिशीथेऽष्टमीपरदिने एवनिशीथादन्यत्रजयन्त्या- ख्ययोगस्तत्रोपोषणद्वयंकार्यम् व्रतद्वयस्यापिनित्यत्वेनाकरणेदोषात् जयन्त्या- मष्टम्यन्तर्भावोक्तिस्तुमूर्खप्रतारणामात्रमितिप्रतिपादितम् ममतुकौस्तुभादिनवी- नपरिगृहीतमाधवमतरीत्याजयन्त्यन्तर्भावेनाष्टमीव्रतानुष्ठानमेवयुक्तंप्रतिभाति अत्रव्रतेबुधसोमवारयोगःप्राशस्त्यविधायकोनतुरोहिणीवन्निर्णायकः ।**

**जन्माष्टमीव्रत**—रोहिणीयोग असतां शुद्धसमा अथवा शुद्धन्यूना अष्टमी असून, रोहिणीचा थोडा जरी योग असला, तरी संशय राहात नाहीं. अष्टमी शुद्धाधिका असून, पूर्व दिवशीं अथवा दोन्ही दिवशीं जर रोहिणीयोग असेल, तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. अष्टमी शुद्धाधिका असून, रोहिणीयोग जर दुसऱ्या दिवशींच असेल, तर तो योग जरी दोन घटकाच असला, तरी दुसऱ्याच दिवसाची घ्यावी. अष्टमी विद्धाधिका असून पूर्व दिवशीं जर निशीथकालाच्या आधीं अथवा दुसऱ्या दिवशींच निशीथकालीं अथवा इतरकालीं जर रोहिणीयोग असेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असा कौस्तुभादिक नवीन ग्रंथांनीं माधवाच्या मतानुरोधें जो निर्णय सांगितला आहे, तो संक्षेपतः सांगितला. कोणी ग्रंथकार केवळ अष्टमी तीच जन्माष्टमी आणि रोहिणीयुक्त असणारी अष्टमी तीच ( कृष्ण ) जयन्ती असें मानून, या दोहोंचें एकच व्रत—या बाबतींत सांगतात. जन्माष्टमीव्रत व जयन्तीव्रत हीं निरनिराळीं, असल्यानें, रोहिणीयोग जर नसेल, तर जयन्तीव्रताचा लोप करून, जन्माष्टमीव्रत करावें. ज्या वर्षीं जयन्तीयोग असेल, त्या वर्षीं जन्माष्टमी जयन्तींतच अन्तर्भूत होते; यासाठीं जयन्तीलाच कर्मकालीं म्हणजे निशीथकालीं जरी अष्टमी नसली, तरी एकं- दर वचनांवरून योग्य अशा कर्मकालाची व्याप्ति घेऊन, दोन्ही व्रतें जयन्तीलाच तंत्रानें करावींत. दोन्ही व्रतें नित्य असून काम्य आहेत; तीं जर न केलीं तर दोष असून, केल्यास महाफलें आहेत, यास्तव दोन्ही करावींत. नित्यव्रताचा लोप झाल्यास दोष लागतो म्हणून निशीथकालव्यापिनी अशा पूर्व दिवसाच्या अष्टमीला जन्माष्टमीव्रत करून, जयन्तीला पारणा करूं नये, असें म्हणतात. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें निर्णयसिन्धूंत माधवमताचें निदर्शन करून, हेमाद्रीच्या मतें जन्माष्टमीव्रत नित्य आहे व जयन्तीव्रत जरी नित्य आहे, तरी तें कलियुगांत लुप्त झालें असल्यानें कोणी करीत नाहींत, असें सांगून, आपल्या मतें ज्या वर्षीं पूर्वदिवशीं निशीथकालीं अष्टमी असून दुसऱ्या दिवशीं निशीथकालाहून इतर वेळीं जयन्ती नांवाचा योग असतो, अशा वेळीं दोन्ही व्रतें नित्य असल्यानें तीं न केल्यास दोष आहे म्हणून, दोन उपास करावेत. 'जयन्तींतच जन्माष्टमीचा अन्तर्भाव होतो' असें जें वचन आहे, तें अज्ञा- न्यांना फसविण्यासाठीं असल्यानेंच, तसें त्याचें प्रतिपादन केलें आहे. कौस्तुभादि नवीन

ग्रंथांत ग्राह्य मानलेल्या माधवमताला अनुसरून, जयन्तीचा अन्तर्भाव करून जन्माष्टमीचें व्रत करावें हेंच योग्य आहे असें मला वाटतें. या व्रतांत जर सोमवार अथवा बुधवार यांचा योग येईल तर, तो योग्य असा असून, रोहिणीयोगाप्रमाणें निर्णयाचा खल करण्यासारखा नाहीं.

अथद्वितीयदिनेभोजनरूपंपारणं व्रताङ्गंविहितंतत्कालोनिर्णीयते केवलतिथ्युपवासेतिथ्यन्तेनक्षत्रयुक्ततिथ्युपवासेउभयान्तेपारणंकार्यम् यदितिथिनक्षत्रयोरेकतरान्तोदिनेलभ्यतेउभयान्तस्तुरात्रौतदादिवैवान्यतरान्तेपारणम् यदा दिवानैकस्याप्यन्तस्तदानिशीथादर्वागन्यतरान्तेउभयान्तेवापारणम् यदातुनिशीथाव्यवहितपूर्वक्षणेएकतरान्तउभयान्तोवातदानिशीथेपिपारणं कार्यम् भोजनासंभवेपारणासंपत्त्यर्थंफलाद्याहारोविधेयः केचित्तूक्तविषयेनिशीथे पारणं नकार्यं किंतूपवासात्तृतीयेह्निदिवाकार्यमित्याहुस्तन्नयुक्तम् अशक्तस्तुएकतरान्ताभावेपि उत्सवान्तेप्रातरेवदेवपूजाविसर्जनादिकृत्वापारणंकुर्यात्।

**पारणाकालनिर्णय**—दुसऱ्या दिवशीं व्रताचें अंग म्हणून, भोजनरूप जें पारणें सांगितलें आहे, त्याचा काल आतां सांगतों:—

उपास जर केवळ तिथीचाच असेल तर तिथि संपतांच पारणें करावें; नक्षत्रयुक्त तिथीचा जर उपास असेल, तर नक्षत्र व तिथि यांच्या अंतीं पारणें करावें. नक्षत्र व तिथि यांपैकीं एकाचा अंत जर दिवसां असेल किंवा त्या दोहोंचा अंत जर रात्रीं असेल, तर दिवसांच ( त्या दोहोंपैकीं ) एकाचा अंत झाल्यावर पारणें करावें. दिवसास जर त्या दोहोंपैकीं एकाचाही अंत होत नसेल, तर निशीथकालाच्या आधीं एकाच्या शेवटीं अथवा दोहोंच्या शेवटीं पारणें करावें. जेवण करणें शक्य नसल्यास पारणासिद्धि व्हावी म्हणून, फळें वगैरे खावींत. वर सांगितल्याप्रमाणें निशीथकालीं पारणें करूं नये; उपासापासून तिसऱ्या दिवशीं दिवसास पारणें करावें, असें कोणी ग्रंथकार सांगतात तें अयोग्य होय. अशक्तानें दोहोंपैकीं एकाचाही अंत होण्याच्या आधींच, उत्सव संपल्यानंतर सकाळीं देवपूजेचें विसर्जन करून पारणें करावें.

अथसंक्षेपेणव्रतविधिः प्रातःकृतनित्यक्रियाः प्राङ्मुखोदेशादिसंकीर्त्यतत्तत्कालेसप्तम्यादिसत्त्वेपिप्रधानभूतामष्टमीमेवसंकीर्त्य श्रीकृष्णप्रीत्यर्थंजन्माष्टमीव्रतंकरिष्ये जयन्तीयोगसत्त्वेजन्माष्टमीव्रतंजयन्तीव्रतंचतन्त्रेणकरिष्येइतिसंकल्पयेत् ताम्रपात्रेजलंगृहीत्वा वासुदेवंसमुद्दिश्यसर्वपापप्रशांतये। उपवासंकरिष्यामिकृष्णाष्टम्यांनभस्यहम् १ अशक्तौ फलानिभक्षयिष्यामीत्यादूहः आजन्ममरणंयावद्यन्मयादुष्कृतंकृतम्। तत्प्रणाशय गोविन्दप्रसीदपुरुषोत्तम १ इतिपात्रस्थंजलंक्षिपेत् ततःसुवर्णरजतादिमय्योमृन्मयोवाभित्तिलिखितावा प्रतिमायथाकुलाचारंकार्याः तायथा पर्यङ्केप्रसुप्तदेवक्याःस्तनंपिबन्तींश्रीकृष्णप्रतिमांनिधायजयन्तीसत्त्वेत्वन्यदेवक्याउत्सङ्गेद्वितीयां श्रीकृष्णमूर्तिंनिधायपर्यङ्कस्थदेवकीचरणसंवाहनपरांलक्ष्मींनिधाय मित्यादौखड्गधरं वसुदेवंनन्दगोपीगोपान्लिखित्वाप्रदेशान्तरेमञ्चकेप्रसूतकन्ययासहयशोदाप्रतिमांपीठान्तरे

वसुदेवदेवकीनन्दयशोदाश्रीकृष्णरामचण्डिकाइतिसप्तप्रतिमाःस्थापयेत् एतावत्प्रतिमाकरणाशक्तौवसुदेवादिचण्डिकान्ताःसप्तवा यथाचारंयथाशक्तिवाकृत्वाअन्याः सर्वायथायथंध्यायेदितिभाति निशीथासन्नप्राक्कालेस्नात्वाश्रीकृष्णप्रीत्यर्थंसपरिवारश्रीकृष्णपूजांकरिष्यइतिसंकल्प्यन्यासानुशङ्खादिपूजान्तंनित्यवत्कृत्वापर्यङ्कस्थांकिन्नराद्यैर्युतांध्यायेत्तुदेवकीम्। श्रीकृष्णंबालकंध्यायेत्पर्यङ्केस्तनपायिनम् १ श्रीवत्सवक्षसंशान्तंनीलोत्पलदलच्छविम्। संवाहयन्तीं देवक्याः पादौध्यायेच्चतांश्रियम् २ एवंध्यात्वादेवक्यैनमः इति देवकीमावाह्य मूलमन्त्रेणपुरुषसूक्तऋचावाश्रीकृष्णायनमः श्रीकृष्णमावाहयामीति आवाह्य लक्ष्मींचावाह्यदेवक्यैवसुदेवाययशोदायैनन्दायकृष्णायरामायचण्डिकायैइतिनाम्नावाह्यालिखितादिदेवताः सकलपरिवारदेवताभ्योनमइत्यावाह्यमूलमन्त्रेण सूक्तऋचावा अत्रावाहितदेवक्यादिपरिवारदेवतासहितश्रीकृष्णायनमइत्यासनपाद्यार्घ्याचमनीयाभ्यङ्गस्नानानिदत्त्वापञ्चामृतस्नानान्तेचन्दनेनानुलेपयेत्शुद्धोदकाभिषेकान्तेवस्त्रयज्ञोपवीतगन्धपुष्पाणिधूपदीपौच विश्वेश्वरायविश्वायतथा विश्वोद्भवायच। विश्वस्यपतयेतुभ्यंगोविन्दायनमोनमः १ यज्ञेश्वराय देवायतथायज्ञोद्भवायच॥ यज्ञानांपतयेनाथगोविन्दायनमोनमः २ इति मन्त्राभ्यांमूलमन्त्रादिसमुच्चिताभ्यांदद्यात् जगन्नाथनमस्तुभ्यंसंसारभयनाशन जगदीश्वरायदेवायभूतानांपतयेनमः १ इतिनैवेद्यं मूलमन्त्रादिकंसर्वत्रयोज्यम् ताम्बूलादिनमस्कारप्रदक्षिणापुष्पाञ्जल्यन्तंकार्यम् अथवोद्यापनप्रकरणोक्तविधिनापूजा सायथा उक्तप्रकारेणध्यानावाहनेकृत्वा देवाब्रह्मादयोयेन स्वरूपंनविदुस्तव। अतस्त्वांपूजयिष्यामिमातुरुत्सङ्गवासिनम् १ पुरुषएवेदमासनम्। अवतारसहस्राणिकरोषिमधुसूदन। नतेसंख्यावताराणांकश्चिज्जानातितत्त्वतः २ एतावानस्येतिपाद्यम्। जातःकंसवधार्थायभूभारोत्तारणायच। देवानांचहितार्थायधर्मसंस्थापनायच। कौरवाणांविनाशायपाण्डवानां हितायच। गृहाणार्घ्यंमयादत्तंदेवक्यासहितोहरे ३ त्रिपादू० अर्घ्यम्। सुरासुरनरेशायक्षीराब्धिशयनायच। कृष्णायवासुदेवायदद्म्याचमनंशुभम् ४ तस्मा० आचमनीयम्। नारायणनमस्तेस्तुनरकार्णवतारक। गङ्गोदकंसमानीतंस्नानार्थंप्रतिगृह्यताम् ५ यत्पुरुषे० स्नानम्। पयोदधिघृतक्षौद्रशर्करास्नानमुत्तमम्। तृप्त्यर्थं देवदेवेशगृह्यतांदेवकीसुत ६ इतिपञ्चामृतम्। शुद्धोदकस्नानमाचमनम्। क्षौमंच पट्टसूत्राढ्यंमयानीतांशुकंशुभम् गृह्यतां देवदेवेशमयादत्तंसुरोत्तम ७ तंयज्ञं० वस्त्रम्। नमः कृष्णायदेवायशङ्खचक्रधरायच। ब्रह्मसूत्रंजगन्नाथगृहाणपरमेश्वर ८ तस्माद्यज्ञा० यज्ञोपवीतम्। नानागन्धसमायुक्तं चन्दनंचारुचर्चितम्। कुङ्कुमाक्ताक्षतैर्युक्तंगृह्यतांपरमेश्वर ९ तस्माद्यज्ञा० गन्धम्। पुष्पाणियानिदिव्यानिपारिजातोद्भवानिच। मालतीकेसरादीनिपूजार्थंप्रतिगृह्यताम् १० तस्माद० पुष्पाणि। अथांगपूजा श्रीकृष्णायनमः पादौपूजयामि संकर्षणायनमः गुल्फौ०। कालात्मनेन० जानुनीपू० विश्वकर्मणेन० जङ्घेपू०। विश्वनेत्रायन०

कटीपू० विश्वकर्तेन० मेढ्रंपू०। पद्मनाभायनः नाभिंपू०॥ परमात्मनेन० हृदयंपू०। श्रीकंठायन० कण्ठंपू०। सर्वास्त्रधारिणेन० बाहूपू०। वाचस्पतयेन० मुखंपू०। केशवायनमः ललाटंपू०। सर्वात्मनेन० शिरःपू०। विश्वरूपिणेनारायणायनमः सर्वाङ्गंपूजयामि। वनस्पतिरसो० ११ यत्पुरुषं० धूपं०। त्वंज्योतिः सर्वदेवानांतेजस्त्वंतेजसांपरम्। आत्मज्योतिर्नमस्तुभ्यंदीपोयंप्रतिगृह्यताम् १२ ब्राह्मणो० दीपं०। नानागन्धसमायुक्तंभक्ष्यभोज्यंचतुर्विधम्। नैवेद्यार्थंमयादत्तंगृहाणपरमेश्वर १३ चंद्रमामनसो० नैवेद्यं०। आचमनंकरोद्वर्तनं०। ताम्बूलंचसकर्पूरंपूगीफलसमन्वितम्। मुखवासकरंरम्यंप्रीतिदंप्रतिगृह्यताम् १४ सौवर्णराजतंताम्रंनानारत्नसमन्वितम्। कर्मसाद्गुण्यसिद्ध्यर्थं दक्षिणांप्रतिगृह्यताम् १५ रम्भाफलंनारिकेलंतथैवाम्रफलानिच। पूजितोसिसुरश्रेष्ठगृह्यतांकंससूदन १६ नाभ्याआ० नीराजनं०। यानिका० १७ सप्तास्या० प्रदक्षिणाम् यज्ञेनेत्यादिवेदमन्त्रैः पुष्पाञ्जलिं नमस्कारान् १८ अपराधस० पूजांनिवेदयेत्। सर्वोपचारपूजनसमाप्तौद्वादशाङ्गुलविस्तारं रौप्यमयंस्थण्डिलादिलिखितंवा रोहिणीयुतंचन्द्रं सोमेश्वरायसोमायतथासोमोद्भवायच। सोमस्यपतयेनित्यं तुभ्यंसोमायवैनमः१ इतिसंपूज्यसपुष्पकुशचन्दनंतोयंशङ्खेनादायक्षीरोदार्णवसंभूतअत्रिगोत्रसमुद्भव। गृहाणार्घ्यंशशांकेशरोहिणीसहितोमम १ ज्योत्स्नापते नमस्तुभ्यंज्योतिषांपतयेनमः। नमस्तेरोहिणीकान्तअर्घ्यंनः प्रतिगृह्यताम् ५ इति मन्त्राभ्यांचन्द्रायार्घ्यंदद्यात् ततःश्रीकृष्णायार्घ्यंदद्यात् तत्रमन्त्रः जातःकंसवधार्थायभूभारोत्तारणायच। पाण्डवानांहितार्थायधर्मसंस्थापनायच १ कौरवाणांविनाशायदैत्यानांनिधनायच। गृहाणार्घ्यंमयादत्तंदेवक्यासहितोहरे २ इति ततःप्रार्थयेत् त्राहिमांसर्वलोकेशहरेसंसारसागरात्। त्राहिमांसर्वपापघ्नदुःखशोकार्णवात्प्रभो १ सर्वलोकेश्वर त्राहि पतितं मांभवार्णवे। त्राहिमां सर्वदुःखघ्नरोगशोकार्णवाद्धरे २ दुर्गतांस्त्रायसेविष्णोयेस्मरन्तिसकृत्सकृत्। त्राहिमांदेवदेवेशत्वत्तोनान्योस्तिरक्षिता ३ यद्वाक्वचनकौमारेयौवने यच्चवार्धके। तत्पुण्यं वृद्धिमायातुपापंदहहलायुध ४ इति।

**जन्माष्टमीव्रतविधि**—सकाळीं स्नानसन्ध्यादि रोजचीं कर्में केल्यावर देशकालादिकांचा उच्चार करून, त्या वेळीं सप्तमी तिथि जरी असली तरी मुख्यत्वें लागणाऱ्या अष्टमीचा उच्चार करून 'श्रीकृष्णप्रीत्यर्थं जन्माष्टमीव्रतं करिष्ये' असा संकल्प करावा. तांब्याच्या भांड्यांत पाणी घेऊन, 'वासुदेवं समुद्दिश्य सर्वपापप्रशान्तये। उपवासं करिष्यामि कृष्णाष्टम्यां नमाम्यहम् ॥ आजन्ममरणं यावद्यन्मया दुष्कृतं कृतम्। तत्प्रणाशय गोविन्द प्रसीद पुरुषोत्तम ॥' असें म्हणावें व भांड्यांतलें पाणी जमीनीवर सोडावें. उपास करण्याची जर अंगीं शक्ति नसेल, तर 'उपवासं करिष्यामि'च्या ऐवजीं 'फलानि भक्ष्यिष्यामि' असें म्हणावें. नंतर जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें सोन्याची, रुप्याची, मातीची अथवा भिंतीवर काढलेली—यांपैकीं कोणचीही प्रतिमा करावी. प्रतिमा करणें ती—पलंगावर निजलेल्या देवकीचें स्तनपान करणाऱ्या श्रीकृष्णाची करावी. जर जयन्तीयोग असेल तर

देवकीची आणखी एक स्वतंत्र प्रतिमा करून, तिच्या मांडीवर बसून स्तनपान करीत असलेल्या श्रीकृष्णाची प्रतिमा करावी. व पलंगावर निजलेल्या देवकीचे पाय दाबीत असलेल्या लक्ष्मीची प्रतिमा करावी. भिंतीवर—हातांत खड्ग घेतलेला वसुदेव, नन्द, गोपी व गोप यांचीं चित्रें काढावींत. दुसऱ्या ठिकाणीं पलंगावर बाळंत झालेल्या यशोदेची मूर्ति करावी. दुसऱ्या आसनावर वसुदेव, देवकी, नन्द, यशोदा, श्रीकृष्ण, (बळि) राम व चण्डिका अशा सात प्रतिमा स्थापन कराव्या. इतक्या प्रतिमा करण्याचें सामर्थ्य नसल्यास, वसुदेवापासून चण्डीपर्यंतच्या सात अथवा जशी वहिवाट किंवा सामर्थ्य असेल तसें करावें आणि इतर मूर्तींसंबंधानें जें सांगितलें, त्याबाबतींतही प्रचाराप्रमाणें ध्यान करावें असें मला वाटतें. मध्यरात्रीच्या आधीं स्नान करून 'श्रीकृष्णप्रीत्यर्थं सपरिवार श्रीकृष्णपूजां करिष्ये' असा संकल्प करावा. त्यानंतर न्यास व शंखादिकांची पूजा वगैरे नित्याप्रमाणें करून 'पर्यंकस्थां किन्नराद्यैर्युतां ध्यायेतु देवकीम्। श्रीकृष्णं बालकं ध्यायेत्पर्यंके स्तनपायिनम् ॥ श्रीवत्सवक्षसंशान्तं नीलोत्पलदलच्छविम्। संवाहयन्तीं देवक्याः पादौ ध्यायेच्चतां श्रियम्॥ असें ध्यान करावें. 'देवक्यैनमः' या मंत्रानें देवकीचें आवाहन करून, मूलमंत्रानें किंवा पुरुषसूक्ताच्या ऋचेनें 'आवाहित देवक्यादि परिवार देवतासहित श्रीकृष्णाय नमः' असा उच्चार करावा, आणि आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन व अभ्यंगस्नान हीं अर्पण करावींत. त्यानंतर पंचामृतस्नान घातल्यावर चंदनाचा लेप करावा. त्या मागून स्वच्छ पाण्याचा अभिषेक केल्यावर, वस्त्र, जानवें, गंध, पुष्प, धूप, दीप वगैरे उपचार— 'विश्वेश्वराय विश्वाय तथा विश्वोद्भवाय च। विश्वस्य पतये तुभ्यं गोविंदाय नमो नमः॥ यज्ञेश्वराय देवाय तथा यज्ञोद्भवाय च। यज्ञानां पतये नाथ गोविंदायनमो नमः॥' हे दोन मंत्र मूलमंत्रासह उच्चारून—अर्पण करावेत. 'जगन्नाथ नमस्तुभ्यं संसारभयनाशन। जगदीश्वराय देवाय भूतानां पतये नमः॥' या मंत्रानें नैवेद्यार्पण करावें. मूलमंत्राची योजना सर्व प्रसंगीं करावी. त्यानंतर-विडा नमस्कार, प्रदक्षिणा, पुष्पांजली-येथपर्यंतचें कर्म करावें, किंवा उद्यापनाच्या प्रकरणांत सांगितलेल्या विधीनें पूजा करावी, ती अशीः—वर सांगितल्याप्रमाणें ध्यान, आवाहन वगैरे करावींत, व नंतर 'देव ब्रह्मादयो येन स्वरूपं न विदुस्तव। अतस्त्वां पूजयिष्यामि मातुरुत्सङ्गवासिनम् ॥ पुरुष एवेदमासनम्। अवतारसहस्राणि करोषि मधुसूदन। न ते संख्यावताराणां कश्चिज्जानाति तत्त्वतः ॥ एतावानस्येति पाद्यम् ॥ जातः कंसवधार्थाय भूभारोत्तारणाय च ॥ देवानां च हितार्थाय धर्मसंस्थापनाय च ॥ कौरवाणां विनाशाय पांडवानां हिताय च ॥ गृहाणार्घ्यं मयादत्तं देवक्यासहितो हरे ॥ त्रिपादू० अर्घ्यम्। सुरासुरनरेशाय क्षीराब्धिशयनाय च। कृष्णाय वासुदेवाय ददाम्याचमनं शुभम् ॥ तस्मा० आचमनीयम् ॥ नारायण नमस्तेस्तु नरकार्णवतारक। गङ्गोदकं समानीतं स्नानार्थं प्रतिगृह्यताम्॥ यत्पुरुषे० स्नानम्। पयोदधिघृतक्षौद्र-शर्करास्नानमुत्तमम्। तृप्त्यर्थं देवदेवेश गृह्यतां देवकीसुत ॥ इति पञ्चामृतम्। शुद्धोदकस्नानमाचनम्। क्षौमं च पट्टसूत्राढ्यं मयानीतांशुकं शुभम्। गृह्यतां देवदेवेश मया दत्तं सुरोत्तम॥ तं यज्ञं वस्त्रम्। नमः कृष्णाय देवाय शंखचक्रधरायच। ब्रह्मसूत्रं जगन्नाथ

गृहाण परमेश्वर ॥ तस्माद्यज्ञा० यज्ञोपवीतम् । नानागन्धसमायुक्तं चंदनं चारुचर्चितम् । कुंकुमाक्ताक्षतैर्युक्तं गृह्यतां परमेश्वर ॥ तस्मादश्वा० गन्धम् ॥ पुष्पाणि यानि दिव्यानि पारिजातोद्भवानि च । मालतीकेसरादीनि पूजार्थं प्रतिगृह्यताम् ॥ तस्माद० पुष्पाणि ॥ अथाङ्गपूजा ॥ श्रीकृष्णायनमः पादौपूजयामि । संकर्षणायनमः गुल्फौ ( घोटा )पू० ॥ कालात्मने० जानुनी (गुडघे) पू० विश्वकर्मणे० जङ्घे पू० (गुडघ्यापासून घोट्यापर्यंतचा भाग)। विश्वनेत्राय कटी०। विश्वकर्त्रे० मेढ्रं पू० (लिङग) पद्मनाभायनमः नाभिं पू०। परमात्मने हृदयं पू० श्रीकृष्णाय नमः कंण्ठंपू० सर्वास्त्रधारिणे० बाहू पू०। वाचस्पतये०। मुखं पू० । केशवायनमः ललाटं पू० । सर्वात्मनेन० शिरःपू०। विश्वरूपिणे-नारायणायनमः सर्वाङ्गं पूजयामि । वनस्पतिरसो० ११ यत्पुरुषं धूपं० । त्वंज्योति सर्वदेवानां तेजस्त्वं तेजसां परम् । आत्मज्योतिर्नमस्तुभ्यं दीपोयं प्रतिगृह्यताम् १२ ब्राह्मणोस्य दीपं० । नानागन्धसमायुक्त भक्ष्यभोज्यचतुर्विधं नैवेद्यार्थं मया दत्तं गृहाण परमेश्वर १३ चंद्रमा मनसो० नैवेद्य । आचमनं करोद्वर्तनं० ताम्बूलंच सकर्पूरं पूगीफलसमन्वितम् । मुखवासकरं रम्यं प्रीतिदं प्रतिगृह्यताम् १४ सौवर्णराजतंताम्रनानारत्नसमन्वितम् । कर्मसाद्गुण्यसिद्ध्यर्थं दक्षिणां प्रतिगृह्यताम् । १५ रम्भाफलं नारिकेलं तथैवाम्रफलानिच । पूजितोसि सुरश्रेष्ठ गृह्यतां कंससूदन । नाभ्याआ० नीरांजनं०। यानि कानि० सप्तास्या० प्रदक्षिणाम्०। यज्ञेनेत्यादि वेदमंत्रैः पुष्पांजलिंनमस्कारान् ॥ अपराधसह०। याप्रमाणें प्रार्थना करून पूजा संपवावी. अशाप्रकारानें सर्वोपचारांची पूजा संपल्यावर, बारा बोटें रुंदीच्या रुप्याच्या अथवा मातीच्या तुकड्यावर काढलेल्या रोहिणीसह चंद्राचें ‘सोमेश्वराय सोमाय तथा सोमोद्भवायच । सोमस्य पतये नित्यं तुभ्यं सोमाय वै नमः ॥ या मंत्रानें पूजन करावें. नंतर फुलें, दर्भ व चंदन यांसह शंखांतलें पाणी घेऊन ‘क्षीरोदार्णवसम्भूत अत्रिगोत्र समुद्भव गृहाणार्घ्यं शशांकेश रोहिणीसहितो मम ॥ ज्योत्स्नापतये नमस्तुभ्यं ज्योतिषांपतये नमः । नमस्ते रोहिणीकान्त अर्घ्यं नः प्रतिगृह्यताम् ॥ ’ या दोन मंत्रांनीं चंद्राला अर्घ्य द्यावें. त्यानंतर श्रीकृष्णाला जें अर्घ्य द्यावें, त्याचा मंत्रः— ‘जातः कंसवधार्थाय भूभारोत्तारणायच । पाण्डवानां हितार्थाय धर्मसंस्थापनायच ॥ कौरवाणां विनाशाय दैत्यानां निधनायच । गृहाणार्घ्यं मया दत्तं देवक्यासहितो हरे ॥ ’ त्यानंतर ‘त्राहि मां सर्वलोकेश हरे संसारसागरात् । त्राहि मां सर्वपापघ्न दुःखशोकार्णवात्प्रभो ॥ सर्वलोकेश्वरत्राहि पतितं मां भवार्णवे । त्राहि मां सर्वदुःखघ्न रोगशोकार्णवाद्धरे ॥ दुर्गतस्त्रायसे विष्णो ये स्मरन्ति सकृत्सकृत् । त्राहि मां देवदेवेश त्वत्तोनान्योस्ति रक्षिता ॥ यद्वा क्वचन कौमारे यौवने तच्च वार्धके तत्पुण्यं वृद्धिमायातु पापं दह हलायुध ॥ या मंत्रानीं प्रार्थना करावी.

**अथपूजानन्तरंकृत्यमग्निपुराणे । इत्थेवं पूजयित्वातुपुरुषसूक्तैःसवैष्णवैः । स्तुवावादित्रनिर्घोषैर्गीतवादित्रमङ्गलैः १ सुकथाभिर्विचित्राभिस्तथाप्रेक्षणकैरपि । पूर्वेतिहासैःपौराणैःक्षिपत्तांशर्वरींनृप २ इति अत्रकथासुवैचित्र्यंदेशभाषाकाव्यकृतं सूक्तानांप्रागुक्तेः पुराणकथानामन्तेभिधानात् प्रेक्षणकानि नृत्यादीनि तथाचवैदिकसूक्तकरणकस्तुतिविशिष्टःपौराणेतिहासमिश्रितोगीतनृत्य-**

युतदेशभाषाकाव्यप्रमुखकथाकरणकोजागरोविप्रादिवर्णत्रयस्यविधीयते शूद्रादीन्प्रतिएतादृशजागरस्य विधातुमयोग्यत्वात् वचनान्तरेणतुसूक्तादिरहितगीतादिविशिष्टोवर्णचतुष्टयसाधारणोविधीयते गोकुलस्थजन्मलीलादिश्रवणोत्तरं वैष्णवैःपरस्परंदध्यादिभिःसेचनंकार्यम्। दधिक्षीरघृताम्बुभिः। आसिञ्चन्तोविलिम्पन्तइत्यादिभागवतवचनेनतथाविधिकल्पनात् अयमुत्सवोधुनामहाराष्ट्रदेशेगोपालकालेतिव्यवह्रियतइतिमेभाति एतत्सर्वं कौस्तुभे श्रीमदनन्तदेवैः स्पष्टीकृतमस्तीति नमह्यमसूयाकार्या एतादृशकथायुतोजागरोन्यत्ररामनवम्येकादश्याद्युत्सवेष्वप्यूह्यः पूजाजागरादिविशिष्टव्रतोत्सवसाम्यात् महाराष्ट्रीयेषुतथाचाराच्च भगवत्प्रेमादिभाग्यशालिनस्तु पर्वणिस्युरुतान्वहमितिन्यायेनप्रत्यहमेवोक्तविधिकथोत्सवंकुर्वन्तीतिभाति।

**पूजोत्तर कृत्य**—पूजा झाल्यानंतर जें कृत्य करायचें तें पुढीलप्रमाणें अग्निपुराणांत सांगितलें आहे:--याप्रमाणें पूजा केल्यावर, पुरुषसूक्तांनीं, विष्णुसूक्तांनीं व इतर स्तोत्रांनीं स्तवन करावें. वाद्यघोष, गाणेंबजावणें वगैरेंचे मंगल स्वर वेगळाल्या सत्कथा व जुने पुराणेतिहास यांनीं प्रेक्षकगणांसह ती रात्र घालवावी. येथें कथादिकांबद्दल जें वैचित्र्य सांगितलें आहे, तें–देश, भाषा, काव्य वगैरेंबद्दलचें समजावें. कारण, सूक्तें आधीं सांगून, नंतर पुराणें, कथा वगैरे सांगितलीं आहेत. 'प्रेक्षकगणांसह' यांत नृत्य, गायन, वादन वगैरेंचा अन्तर्भाव होतो. वैदिक सूक्तांनीं स्तुतियुक्त, पुराणेतिहासादिकांनीं मिश्रित व गायननृत्यादिकांसह देशभाषा, काव्यादिकांचें वैचित्र्य ज्यामध्यें आहे अशा प्रकारचें कथायुक्त जागरण ज्यांत आहे, तें सर्व ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीनच वर्णांनीं करायचें असून, शूद्रादिकांनीं असा जागर करूं नये. वैदिक सूक्तांवांचून गायनादिकांसह चारी वर्णांना जागर सारखाच आहे, असें दुसरें वचन आहे. गोकुळांतल्या कृष्णजन्माच्या लीला ऐकिल्यानंतर वैष्णवांनीं एकमेकांवर दहीं वगैरे शिंपडावें. कारण, 'दहीं, दूध, तूप, पाणी वगैरेंचें गोपाळांनीं परस्परांवर सिंचन केलें' असें जें भागवतांत म्हटलें आहे, त्यावरूनच हा विधि उत्पन्न होतो. हाच विधि सध्यां महाराष्ट्रांत 'गोपालकाला' या नांवानें लोक करतात, असें मला वाटतें. हें सर्व श्रीमान् अनन्तदेवांनीं कौस्तुभांत स्पष्ट सांगितलें आहे. वास्तव, मीच सांगतों आहें म्हणून माझ्यावर कोणीं रागावूं नये. अशाच प्रकारच्या कथांचा जागर–रामनवमी, एकादशी वगैरे प्रसंगींही करण्यास सांगितलें आहे; कारण, पूजाजागरादिकांसह व्रतोत्सव साधारण आहे, आणि महाराष्ट्रीय जनांत तसा आचारही आहे. 'पर्वणीला किंवा रोज उत्सव करावे' असें वचन असल्यानेंच भगवद्भक्त हे वर सांगितलेल्या उत्सवादि कथा वगैरे रोज करतात, असें मला वाटतें.

ततोनवम्यांब्राह्मणान् भोजनदक्षिणादिभिःसन्तोष्योक्तपारणानिर्णीतकालेभोजनंकुर्यात् अस्यैवजयन्तीव्रतस्यसंवत्सरसाध्यःप्रयोगः श्रावणकृष्णाष्टमीमारभ्य-

प्रतिमासंकृष्णाष्टम्यामुक्तविधिनापूजादिरूपः पुराणान्तरेउक्तः अत्रोद्यापन-विधिर्ग्रन्थान्तरेज्ञेयः इतिजन्माष्टमीनिर्णयः ।

**श्रावणवद्य नवमी**—अशा प्रकारचा उत्सव झाल्यावर नवमीला ब्राह्मणांना भोजन-दक्षिणादिकांनीं संतुष्ट करून, पारणेच्या योग्य वेळीं आपण जेवावें. जयन्तीव्रताचा प्रयोग जो वर्षभर करायचा आहे, त्याचा आरंभ श्रावण वद्य अष्टमीला करून, वर सांगितल्याप्रमाणें पूजादिक करावींत असें पुराणांत सांगितलें आहे. या व्रताच्या उद्यापनाचा विधि इतर ग्रंथांत पहावा. याप्रमाणें येथें जन्माष्टमी-व्रतनिर्णय सांगितला.

नभोमासस्यदर्शेतुशुचिर्दर्भान्समाहरेत् । अयातयामास्तेदर्भाविनियोज्याः पुनः पुनः १ केचिद्भाद्रामायांदर्भग्रहणमाहुः कुशाः काशायवादूर्वाउशीराश्च-सकुन्दकाः । गोधूमाव्रीहयोमौञ्जादशदर्भाः सबल्वजाः१ विरिञ्चिनासहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज । नुदसर्वाणिपापानिदर्भस्वस्तिकरोभव २ एवंमन्त्रंसमुच्चार्यततः पूर्वोत्तरामुखः। हुंफट्कारेणमन्त्रेण सकृच्छित्वासमुद्धरेत् ३ चतुर्भिर्दर्भैर्विप्रस्य पवित्रं क्षत्रियादेरेकैकन्यूनम् सर्वेषांवाभवेत्द्वाभ्यांपवित्रंग्रंथितंनवा ॥ इतिश्री-मदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेश्रावणमास निर्णयोद्देशः ।

**दर्भग्रहण**—शुचिर्भूत होऊन श्रावणांतल्या दर्श अमावास्येला दर्भ आणावेत. ते दर्भ ताजे राहतात, म्हणून पुनः पुनः तेच ब्रह्मकर्माला घ्यावेत. कोणी ग्रंथकार असें म्हणतात कीं, भाद्रपदी अमावास्येला दर्भ आणावेत. कुश, काश (लव्हाळा), यव (सातू) दूर्वा, वाळा, कुंदक ( कुंद ), गहूं, भात, मोळ (मोहोळाचें गवत ), मुंज ( या नांवाचें गवत ) असे दहा प्रकारचे दर्भ आहेत. ( हीं दहा प्रकारचीं गवतेंच होत ). 'विरिञ्चिना सहोत्पन्न परमेष्ठि निसर्गज। नुद सर्वाणि पापानि दर्भ स्व-स्तिकरो भव॥' असा पूर्वेकडे अथवा उत्तरेकडे तोंड करून 'हुं फट्' असा मंत्र म्हणत एकेक दर्भ तोडून, ते सर्व आणावेत. ब्राह्मणानें चार दर्भांचें, क्षत्रियानें तीन दर्भांचें व वैश्यानें दोन दर्भांचें अशीं पवित्रकें घालावींत, किंवा सर्वांनींच दोन दोन दर्भांचीं घालावींत. पवित्रकांना गांठ असली अथवा नसली तरी हरकत नाहीं. याप्रमाणें अनन्तोपाध्यायांचे पुत्र काशीनाथोपाध्याय यांनीं रचिलेल्या धर्मसिंधुसारां-तल्या श्रावण महिन्याच्या निर्णयाचा उद्देश येथें संपला.

अथभाद्रपदमासः॥ तत्रकन्यासंक्रान्तौपराः षोडशनाड्यः पुण्यकालःभाद्रप-दमासेएकान्नाहारव्रताद्धनारोग्यादिफलम् अत्रमासेहृषीकेशप्रीत्यर्थंपायसगुडौ-दनलवणादेर्दानम् भाद्रपदशुक्लतृतीयायांहरितालिकाव्रतम् तत्रमुहूर्तमात्राततो-न्यूनापिपराग्राह्या यदाक्षयवशात्परदिनेनास्ति तदाद्वितीयायुतापिग्राह्या यदा शुद्धाधिकातदापूर्वदिनेषष्टिघटीमितामपित्यक्त्वा परदिनेस्वल्पापिचतुर्थीयुतै-वग्राह्या गणयोगप्राशस्त्यात् अत्रव्रतेभवानीशिवयोः पूजनमुपवासश्चस्त्रीणां-नित्यः तत्र मंदारमालांकुलितालकायैकपालमालाङ्कितशेखराय । दिव्याम्बरा-यैचदिगम्बरायनमः शिवायैच नमः शिवाय १ इत्यादयः पूजामन्त्राज्ञेयाः ॥

**भाद्रपदांतील कृत्यें**—कन्यासंक्रांतीच्या पुढल्या सोळा घटका पुण्यकाळ. भाद्रपदांत दिवसांतून एकदांच जेवण्याचें व्रत करावें, म्हणजे धन, आरोग्य वगैरे फळ मिळतें. हृषीकेशानें संतुष्ट व्हावें म्हणून या महिन्यांत पायस (खीर), गुळभात, मीठ वगैरेंचीं दानें द्यावींत. भाद्रपद शुद्ध तृतीयेला हरितालिकाव्रत करावें. या व्रताला जी तृतीया घेणें ती दुसऱ्या दिवशीं दोन घटका अथवा त्याहूनही जरी कमी असली तरी दुसऱ्या दिवसाची घ्यावी. जेव्हां क्षयामुळें दुसऱ्या दिवशीं नसेल तेव्हां द्वितीयायुक्त अशी पहिल्या दिवसाची घ्यावी. शुद्धाधिका म्हणजे वृद्धियुक्त असेल तेव्हां पूर्वदिवसाची जरी साठ घटका असली, तरी ती टाकून, दुसऱ्या दिवसाची थोडी असली तरी ती घ्यावी; कारण, चतुर्थीचा योग उत्तम होय. या व्रतांत बायकांनीं शिव आणि भवानी यांची पूजा करून, उपास करावा. हें व्रत स्त्रियांना नित्य आहे. 'मन्दारमालांकुलितालकायै कपालमालांकितशेखराय। दिव्यांबरायैच दिगंबराय नमः शिवायैच नमः शिवाय॥' वगैरे पूजामंत्र म्हणावेत.

**शुक्लचतुर्थ्यांसिद्धिविनायकव्रतम् सामध्याह्नव्यापिनीग्राह्या दिनद्वयेसाकल्येनमध्याह्नव्याप्तावव्याप्तौवापूर्वा दिनद्वयेसाम्येनवैषम्येणवैकदेशव्याप्तावपिपूर्वैव वैषम्येणव्याप्ताधिकव्यापिनीचेत्परेतिकेचित् पूर्वदिनेसर्वथामध्याह्नस्पर्शो नास्त्येव परदिने एवमध्याह्नस्पर्शिनीतुदैवपरा पूर्वदिनेएकदेशेमध्याह्नव्यापिनीपरदिनेसंपूर्णमध्याह्नव्यापिनीतदापिपरैव एवंमासान्तरेपिनिर्णयः इयंरविभौमवारयोगेप्रशस्ता ।**

**सिद्धिविनायकव्रत**—भाद्रपद शुद्ध चतुर्थीला सिद्धिविनायकव्रत करावें. चतुर्थी जर मध्याह्नव्यापिनी असेल तर ती घ्यावी. दोन दिवस जर सारखीच मध्याह्नव्यापिनी असेल अथवा दोन्ही दिवशीं तशी नसेल, तर पूर्वदिवसाची घ्यावी. दोन दिवस जर समान अथवा विषम एकदेशव्याप्ति असेल, तर तशा वेळींही पूर्वदिवसाचीच घ्यावी. विषम म्हणजे जेव्हां कमी अधिक व्याप्ति असेल, तेव्हां जर दुसऱ्या दिवशीं अधिक व्याप्ति असेल तर ती घ्यावी असें कांहीं ग्रंथकारांचें मत आहे. पूर्वदिवशीं जर मध्याह्नस्पर्श मुळींच नसेल आणि दुसऱ्या दिवशींच मध्याह्नस्पर्श असेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. पूर्वदिवशीं एकदेशानें मध्याह्नव्याप्ति आणि दुसऱ्या दिवशीं संपूर्ण मध्याह्नव्याप्ति अशी जेव्हां स्थिति असेल, तेव्हांही दुसऱ्याच दिवसाची घ्यावी. इतर महिन्यांतही हाच निर्णय जाणावा. ही चतुर्थी जर रविवारीं व मंगळवारीं येईल, तर तो योग चांगला समजावा.

**अत्रचतुर्थ्यांचन्द्रदर्शनेमिथ्याभिदूषणदोषस्तेनचतुर्थ्यामुदितस्यपञ्चम्यांदर्शनेविनायकव्रतदिनेपिनदोषायपूर्वदिनेसायाह्नमारभ्यप्रवृत्तायांचतुर्थ्यांविनायकव्रताभावेपिपूर्वेद्युरेवचन्द्रदर्शनेदोषइतिसिध्यति चतुर्थ्यामुदितस्यनदर्शनमितिपक्षेतुअवशिष्टपञ्चषण्मुहूर्तमात्रचतुर्थीदिनेपिनिषेधापत्तिः इदानींलोकास्तु एकतरपक्षाश्रयेणविनायकव्रतदिनेएवचन्द्रंपश्यन्तिनतूदयकालेदर्शनकाले वाचतुर्थीसत्वासत्वेनियमेनाश्रयन्ति दर्शनेजातेतद्दोषशान्तये सिंहःप्रसेनमवधीत्सिं-**

होजाम्बवताहतः। सुकुमारकमारोदीस्तवह्येषस्यमन्तकः १ इतिश्लोकजपः कार्यः तत्रमृन्मयादिमूर्तौप्राणप्रतिष्ठापूर्वकंविनायकंषोडशोपचारैःसंपूज्यैकमोदकेनैवेद्यंदत्वासगन्धाएकविंशतिदूर्वागृहीत्वा गणाधिपायोमापुत्रायाघनाशनायविनायकायेशपुत्रायसर्वसिद्धिप्रदायैकदन्तायेभवक्त्रायमूषकवाहनायकुमारगुरवेइतिदशनामभिर्दूर्वयोर्द्वयंद्वयंसमर्प्यावशिष्टामेकांदूर्वां उक्तदशनामभिः समर्पयेत् दशमोदकान्विप्रायदत्वादशस्वयंभुञ्जीतेतिसंक्षेपः।

**विनायकव्रत**— या चतुर्थीला जर चंद्रदर्शन घडलें तर खोट्या आरोपाचा दोष येतो. चतुर्थीला उगवलेला चंद्र जर पंचमींत दृष्टीस पडेल व तो जर विनायकव्रताचा दिवस असेल, तर दोष नाहीं. पूर्व दिवशीं सायाह्नकाळीं आरंभ झालेल्या चतुर्थीला जर विनायकव्रताचा अभाव असेल, तर त्याच दिवशीं चंद्रदर्शनाचा दोष आहे असें ठरतें. चतुर्थींत उगवलेल्या चंद्राला पाहूं नये, असा जर पक्ष घेतला तर दहा बारा घटका चतुर्थीला चंद्र बघण्याच्या निषेधाचा प्रसंग येईल. सध्यां कोणच्या तरी एका पक्षाचा अवलंब करून विनायकव्रताच्या दिवशीं तेवढे लोक चंद्रदर्शन करीत नाहींत व उदयकालीं किंवा दर्शनकालीं चतुर्थी आहे अथवा नाहीं. याबद्दलचा नियम मनांत घेत नाहींत. निषिद्ध वेळीं जर चंद्रदर्शन घडेल, तर दोषशान्तीस्तव 'सिंहःप्रसेनमवधीत्सिंहो जाम्बवता हतः। सुकुमारकमारोदीस्तव ह्येष स्यमन्तकः।' या श्लोकाचा जप करावा. या तिथीस मातीच्या वगैरे मूर्तींत प्राणप्रतिष्ठापूर्वक विनायकाची षोडशोपचारें पूजा करून, एका मोदकाचा नैवेद्य द्यावा. गंधासह एकवीस दूर्वा घेऊन, 'गणाधिपाय, उमापुत्राय, अघनाशनाय, विनायकाय, ईशपुत्राय, सर्वसिद्धिप्रदाय, एकदन्ताय, ईभवक्त्राय, मूषकवाहनाय, कुमारगुरवे' या दहा नांवांनीं, प्रत्येक नांवाला दोन याप्रमाणें दूर्वा वाहून, शिल्लक एक वरील दहाही नांवांचा उच्चार करून वाहावी. ब्राह्मणाला दहा मोदक देऊन आपण दहा खावे. विनायकव्रताचा याप्रमाणें संक्षेप जाणावा.

भाद्रपदशुक्लपञ्चमीऋषिपञ्चमीसामध्याह्नव्यापिनीग्राह्या दिनद्वयेमध्याह्नव्याप्तौतदव्याप्तौचपूर्वैव अत्रऋषीन्पूजयित्वाकर्षणरहितभूमिजन्यशाकाहारंकुर्यात् शुक्लेभाद्रपदेषष्ठ्यांस्नानंभास्करपूजनम्। प्राशनंपञ्चगव्यस्यअश्वमेधफलाधिकम् १ इयंसूर्यषष्ठीसप्तमीयुताग्राह्या अस्यामेस्वामिकार्तिकेयदर्शनाद्ब्रह्महत्यादिपापनाशः भाद्रपदशुक्लाष्टमीदूर्वाष्टमी सापूर्वाग्राह्या इयंज्येष्ठामूलर्क्षयुतात्याज्या अलाभेतद्युक्तापिग्राह्या इदंदूर्वापूजनव्रतंकन्यार्केगस्त्योदयेवर्ज्यम् इदंस्त्रीणां नित्यम् अत्रज्येष्ठादेवीपूजनव्रतंकेवलाष्टमीप्राधान्येनकेवलज्येष्ठानक्षत्रप्राधान्येन चोक्तम्। तत्रदाक्षिणात्याः केवलज्येष्ठानक्षत्रंएवकुर्वन्ति तच्चानुराधायामावाहनं ज्येष्ठायांपूजनंमूलेविसर्जनमितित्रिदिनंज्ञेयम् आवाहनविसर्जनादिनयोः पूजनदिनानुरोधेननिर्णयः तत्रयदापूर्वमध्याह्नमारभ्यप्रवृत्ता ज्येष्ठाद्वितीयदिनेमध्याह्नेमध्याह्नात्पूर्वंवासमाप्यते तदापूर्वदिनेएवपूजनम् यदापूर्वदिनेमध्याह्नोत्तरंप्रवृत्तापरदिनेमध्याह्नेसमाप्तातदाष्टमीयोगवशेनपूर्वापरावा ग्राह्या उभयत्राष्टमी-

**योगेपूर्वैव यदापूर्वत्रमध्याह्नमारभ्यमध्याह्नोत्तरंवाप्रवृत्तापरदिने मध्याह्नोत्तरमपराह्नंस्पृशति तदाष्टमीयोगाभावेपिपरैव ।**

**ऋषिपंचमीव्रतवगैरे**—भाद्रपद शुद्ध पंचमी ही ऋषिपंचमी होय. ती दोन दिवस जर मध्यान्हव्याप्ति असेल अथवा दोन्ही दिवशीं नसेल, तर पूर्व दिवसाची घ्यावी. या तिथीला ऋषींची पूजा करून, बिननांगरलेल्या जमिनींत उगवलेल्या भाजीपाल्याचें भक्षण करावें. भाद्रपद शुद्ध षष्ठीला स्नान, सूर्यपूजन व पंचगव्यप्राशन हीं केलीं असतां, अश्वमेधाहून अधिक फळ मिळतें. ही सूर्यषष्ठी सप्तमीनें युक्त असलेली घ्यावी. याच षष्ठीला जर कार्तिक स्वामीचें दर्शन घेतलें तर ब्रह्महत्यादिपातकांचा नाश होतो. भाद्रपद शुद्धाष्टमीला दूर्वाष्टमी म्हणतात. ही पूर्व दिवसाचीच घ्यावी. हिच्यांत जर ज्येष्ठा व मूळ हीं नक्षत्रें असतील तर ती त्याज्य होय. दुसरी नसेल तर तीही घेण्यास हरकत नाहीं. हें दूर्वापूजनव्रत कन्येचा सूर्य असतां व अगस्त्योदय असतां करूं नये. स्त्रियांना हें व्रत नित्य आहे. केवळ अष्टमीच मुख्य असेल तेव्हां अथवा फक्त ज्येष्ठा नक्षत्रच प्रधान असेल अशा वेळीं हें व्रत करण्यास सांगितलें आहे. दाक्षिणात्य लोक हें फक्त ज्येष्ठा नक्षत्रींच करतात. हें व्रत—अनुराधानक्षत्रीं आवाहन, ज्येष्ठानक्षत्रीं पूजन आणि मूळनक्षत्रीं विसर्जन—असें तीन दिवसांचें आहे. आवाहन आणि विसर्जन यांच्या दिवसांचा निर्णय पूजेच्या दिवसाच्या अनुरोधानें करावा. पूर्वदिवशीं मध्याह्नकाळीं जेव्हां ज्येष्ठानक्षत्राचा आरंभ होऊन दुसऱ्या दिवशीं मध्याह्नीं अथवा मध्याह्नपूर्वीं समाप्त होत असेल तेव्हां पूर्वदिवशींच पूजन करावें. पूर्वदिवशीं मध्याह्नानंतर आरंभ होऊन जेव्हां दुसऱ्या दिवशीं मध्याह्नीं समाप्ति होत असेल, तेव्हां अष्टमीयोग जसा असेल त्याप्रमाणें पूर्वदिवसाची किंवा दुसऱ्या दिवसाची घ्यावी. अष्टमी योग जर दोन दिवस असेल, तर पूर्वदिवसाचीच घ्यावी. जेव्हां पूर्वदिवशीं मध्यान्हापासून किंवा मध्यान्हानंतर आरंभ होत असेल आणि दुसऱ्या दिवशीं मध्यान्हानंतर अपराह्णपर्यंत स्पर्श असेल तेव्हां जरी अष्टमीयोग नसला तरी दुसऱ्याच दिवसाची घ्यावी.

**भाद्रपदशुक्लैकादश्यांद्वादश्यांवापारणोत्तरंविष्णुपरिवर्तनोत्सवः तदाश्रुतेश्च मध्येपरिवर्तमेतीतिवचनात्त्रेधाविभक्तश्रवणमध्यभागयोगस्यैकादश्यांसत्त्वे तत्रैव द्वादश्यांसत्त्वेद्वादश्यामेवोभयत्रनक्षत्रयोगाभावेद्वादश्यामेवेत्यादिव्यवस्थाज्ञेया तत्रसंध्यायांविष्णुंसंपूज्य वासुदेवजगन्नाथप्राप्तेयंद्वादशीतव । पार्श्वेनपरिवर्तस्वसुखंस्वपिहिमाधव १ इतिमन्त्रेणप्रार्थयेत् ।**

**परिवर्तनोत्सव**—भाद्रपद शुद्ध एकादशीला अथवा द्वादशीला पारणें झाल्यावर विष्णूचा परिवर्तनोत्सव करावा. श्रवणाच्या मध्यभागीं विष्णूचें परिवर्तन म्हणजे एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळणें होतें, असें वचन आहे; यास्तव श्रवण नक्षत्राचे तीन भाग करून मध्यभागाचा योग जर एकादशीला येत असेल, तर एकादशीला व तसा योग जर द्वादशीस येत असेल तर द्वादशीला किंवा दोन्ही दिवशीं जर श्रवणनक्षत्राचा अभाव असेल, तर द्वादशीलाच परिवर्तनोत्सव

करावा, अशी या बाबतींतली व्यवस्था समजावी. सायंकाळीं विष्णूची पूजा करून, 'वासुदेव जगन्नाथ प्राप्तेयं द्वादशीतव। पार्श्वेन परिवर्तस्व सुखं स्वपिहि माधव ।।' या मंत्रानें प्रार्थना करावी.

अथश्रवणद्वादशीव्रतम् तत्रयत्रदिनेमुहूर्तमात्रादिःस्वल्पेपिद्वादश्याःश्रवणयोगस्तत्रोपोषणम् उत्तराषाढाविद्धश्रवणनिषेधवाक्यानितुनिर्मूलानि यदा पूर्वदिनेएकादशीविद्धाद्वादशी परदिनेऽनुवर्ततेदिनद्वयेपिचश्रवणयोगस्तदापूर्वदिनेएकादशीद्वादशीश्रवणेतित्रितययोगरूपविष्णुशृङ्खलयोगात्पूर्वैवोपोष्या तत्रोदाहरणं एकादशी १८ उत्तराषाढा ६ द्वादशी २० श्रवणं १२ यथावा एकादशी १८ उत्तराषाढा २५ द्वादशी २० श्रवणं १८ अत्रद्वितीयोदाहरणेएकादश्याःश्रवणयोगाभावेपिश्रवणयुक्तद्वादशीस्पर्शमात्रेण विष्णुशृङ्खलयोगः द्विविधोप्ययंयोगोदिवैवग्राह्योनरात्रौइतिपुरुषार्थचिन्तामणौ रात्रावपिनिशीथोत्तरमपियोगोग्राह्यइतिनिर्णयसिंधुः रात्रेःप्रथमप्रहरपर्यंततिथ्योः श्रवणयोगोग्राह्यो नद्वितीयप्रहरादावित्यपरे अत्रचरमपक्षएवयुक्तोभाति अत्रविष्णुशृङ्खलयोगे व्रतद्वयोपोषणंतन्त्रेणैकादश्यामेवकृत्वाद्वादश्यांवक्ष्यमाणपारणानिर्णयानुसारेणपारणंकार्यम् यदोक्तविष्णुशृङ्खलयोगोनास्तितदा यदिशुद्धाधिकाद्वादशी दिनद्वयेपिश्रवणयोगः पूर्वदिनेचोदयेश्रवणाभावस्तदोत्तरैवग्राह्या यदोभयदिने सूर्योदयेद्वादश्यांश्रवणयोगस्तदापूर्वैव विद्धाधिकायामपिपरत्रैवोदयेउदयोत्तरंवाश्रवणयोगेपरैवेतिनिर्विवादम् उभयत्रश्रवणयोगेउक्तविधविष्णुशृङ्खलयोगेपूर्वाअन्यथापरैवेतिविज्ञेयम् एवंयत्रैकादशीश्रवणद्वादश्योर्नैरन्तर्येणोपवासप्राप्तिस्तत्रशक्तेनोपवासद्वयंकार्यम् व्रतद्वयस्यापिनित्यत्वात् व्रतद्वयस्यैकदैवतत्वान्नपारणलोपदोषः यस्तूपवासद्वयासमर्थएकादशीव्रतसंकल्पात्पूर्वंचनिजासामर्थ्यंनिश्चिनोतितेनैकादश्यांफलाद्याहारंकृत्वाद्वादश्यांनिरशनंकार्यम् नचैकादशीव्रतलोपः उपोष्यद्वादशींपुण्यांविष्णुऋक्षेणसंयुताम् । एकादश्युद्भवंपुण्यंनरःप्राप्नोत्यसंशयम् १ इतिनारदोक्तेः श्रवणेनयुताचेत्स्याद्द्वादशीसाहिवैष्णवैः । स्मार्तैश्चोपोषणीयास्यात्त्यजेदेकादशींतदा १ इतिमाधवोक्तेश्च अत्रैकादशीत्यागपदेनफलाहारोबोध्यतेनतुभोजनम् यस्तूपवासद्वयशक्तिभ्रमेणकृतैकादशीव्रतसंकल्पः संकल्पोत्तरंचद्वितीयोपवासासामर्थ्यमनुभवतितदातेनैकादश्यामुपोष्यद्वादश्यांविष्णुपूजनंकृत्वापारणंकार्यम् अत्रव्रताङ्गपूजनंकृत्वोपवासासमर्थ उपवासप्रतिनिधिरूपंविष्णुपूजनंकरिष्यइतिसंकल्प्य पुनःपूजनंकुर्यात् अत्रद्वादश्यांश्रवणयोगाभावेएकादश्यांश्रवणयोगेतत्रैवश्रवणद्वादशीव्रतंकार्यम् विद्धैकादश्यांश्रवणयोगेतुयेषांतत्रैकादशीव्रतप्राप्तिस्तेषांतन्त्रेणोपवासद्वयसिद्धिः अन्येषांगृहीतश्रवणद्वादशीव्रतानामुपवासद्वयम् तत्राशक्तानांतुपूर्वेह्निफलाहारःपरेह्नि निरशनमितिभाति ।

**श्रवणद्वादशीव्रत**—भाद्रपद शुक्ल द्वादशी दोन घटिका किंवा त्याहूनही कमी असून, तिच्याशीं जर श्रवण नक्षत्राचा योग होत असेल,

तर ती घ्यावी. त्या दिवशीं उपोषण करावें. उत्तराषाढा नक्षत्रानें विद्ध अशा श्रवण नक्षत्राचा निषेध करणारीं जीं कांहीं वाक्यें इतरत्र सांपडतात, त्यांना मूळचा आधार कोठेंच नाहीं. ज्या वेळीं आदल्या दिवशीं एकादशीनें द्वादशी विद्ध झालेली असून, ती दुसऱ्या दिवशींहि असते आणि तशा स्थितींत त्या दोन्ही दिवशीं जर श्रवण नक्षत्राचा योग होत असेल, तर आदल्या दिवशीं—एकादशी, द्वादशी व श्रवण असा जो तिहींचा योग होतो, त्याला विष्णुशृंखलयोग म्हणतात; यास्तव, त्या पूर्वदिवशींच उपवास करावा. याचें उदाहरणः—एकादशी १८, उत्तराषाढा ६, द्वादशी २० आणि श्रवण १२. किंवा दुसरें उदाहरणः—एकादशी १८, उत्तराषाढा २५, द्वादशी २० आणि श्रवण १८. दुसऱ्या उदाहरणांत एकादशीला जरी श्रवणयोग नाहीं, तरी श्रवणयुक्त द्वादशीच्या स्पर्शानेंच विष्णुशृंखलयोग होतो. हे दोन्ही प्रकारचे योग दिवसालाच ग्राह्य असून रात्रीं अग्राह्य आहेत असें जरी पुरुषार्थचिन्तामणीमध्यें सांगितलें आहे, तरी निर्णयसिंधूमध्यें या योगासंबंधानें असें म्हटलें आहे कीं, तो योग जर मध्यरात्रींनंतर होत असेल, तर तो ग्राह्य समजावा. ह्याच योगासंबंधानें इतर कांहीं ग्रंथकारांनीं असें सांगितलें आहे कीं, रात्रीच्या पहिल्या प्रहरापर्यंत तिथींचा श्रवणयोग ग्राह्य आहे व पुढच्या दुसऱ्या वगैरे प्रहरांत अग्राह्य आहे. या बाबतींत दुसरा पक्षच ग्राह्य आहे असें माझें मत आहे. या विष्णुशृंखलयोगांत दोन व्रतांचें उपोषण तंत्रानें एकादशीच्याच दिवशीं करून, द्वादशीला पुढें दिलेल्या निर्णयाप्रमाणें पारणा करावी. वर सांगितल्याप्रमाणें जेव्हां विष्णुशृंखलयोग नसेल तेव्हां, आणि शुद्धाधिका द्वादशीच्या दोन्ही दिवशीं जर श्रवणयोग असून, पूर्व दिवशीं उदयकाळीं जर श्रवणयोग नसेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. ज्या वेळीं दोन्ही दिवशीं द्वादशीला सूर्योदयाच्या वेळीं श्रवणयोग असेल, त्या वेळीं पूर्व दिवसाचीच घ्यावी. विद्धाधिका द्वादशीच्या ठिकाणींदेखील दुसऱ्या दिवशीं उदयकाळीं अथवा उदयानंतर जर श्रवणयोग असेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी हें निर्विवाद आहे. दोन्ही दिवशीं जर श्रवणयोग असेल, तर उपरिनिर्दिष्ट विष्णुशृंखलयोग असल्यास पूर्व दिवसाची किंवा दुसऱ्या दिवसाची घ्यावी असा याचा अर्थ आहे. याप्रमाणें ज्यावेळीं एकादशी व श्रवणद्वादशी यांचा उपवास लागोपाठ येईल त्यावेळीं सशक्तानें दोन उपवास करावेत. कारण, दोन्ही व्रतें नित्य असून त्या दोहोंची देवता एकच आहे. म्हणून, येथें पारणालोपाचा दोष घडत नाहीं. आपल्याहातून लागोपाठ दोन उपवास होणें अशक्य आहे, असें जर एकादशीव्रताचा संकल्प करण्यापूर्वी कोणाला वाटेल, तर त्यानें एकादशीव्रताच्या दिवशीं फलाहार करून, द्वादशीस निरशन करावें, म्हणजे एकादशीव्रताचा लोप होत नाहीं कारण, श्रवणनक्षत्रयुक्त द्वादशीच्या दिवशीं जो मनुष्य उपवास करतो, त्याला एकादशीचें उपवासापासून मिळणारें पुण्य मिळायचें राहात नाहीं असें नारदाचें वचन आहे. द्वादशी श्रवणनक्षत्रानें युक्त असल्यास, त्या दिवशीं वैष्णव आणि स्मार्त यांनीं उपोषण करावें व एकादशीच्या उपोषणाचा त्याग करावा असें जें माधवाचें वचन आहे, त्याचा अर्थ असा कीं, एकादशीला भोजन न करितां फलाहार मात्र

करावा. दोन्ही उपवास करण्यास आपण समर्थ आहोंत अशा भ्रमानें जो एकादशी-व्रताचा संकल्प करतो त्याला जर मागाहून आपली दोन्ही उपवास करण्याची असमर्थता अनुभवाला येईल, तर त्यानें एकादशीला उपवास करून, द्वादशीला विष्णूचें पूजन करून पारणा करावी. या ठिकाणीं व्रताच्या अंगभूत जें पूजन तें केल्यावर दुसरा उपवास करण्याला जो असमर्थ असेल, त्यानें 'उपवासप्रतिनिधिरूपं विष्णुपूजनं करिष्ये' असा संकल्प करून पुन्हां पूजन करावें. या द्वादशीच्या दिवशीं श्रवणनक्षत्राचा अभाव असून एकादशीच्या दिवशीं जर श्रवणयोग असेल, तर एकादशीलाच श्रवणद्वादशीव्रत करावें. विद्धा एकादशीच्या दिवशीं जर श्रवणयोग असेल, तर एकादशीच्या दिवशीं श्रवणद्वादशीव्रत करावें. विद्धा एकादशीच्या दिवशीं जर श्रवणयोग असेल, तर ज्यांची त्या दिवशीं एकादशी असेल, त्यांना तंत्रानें दोन उपवासांची सिद्धि होते. श्रवणद्वादशीव्रत घेतलेल्या इतरांनीं दोन उपवास केले पाहिजेत. दोन उपवास न सोसण्यासारखे जे कोणी अशक्त असतील, त्यांनीं आदल्या दिवशीं फलाहार करून, दुसऱ्या दिवशीं निरशन करावें असें मला वाटतें.

अथपारणा उभयान्तेपारणंमुख्यःपक्षःअन्यतरान्तेगौणःपक्षः तत्रविष्णुशृङ्खलाभावेत्रयोदश्यामुभयान्तेपारणम् विष्णुशृङ्खलयोगेतुपूर्वदिनेतंत्रेणकृतोपवासद्वयस्य परदिनेश्रवणर्क्षात्द्वादश्याधिक्येश्रवणमतिक्रम्यद्वादश्यां पारणम् यदिचद्वादश्यपेक्षयाश्रवणाधिक्यंपारणादिनेभवतितदाएकादशीव्रतपारणायां-द्वादश्युल्लंघनेदोषोक्तेर्द्वादश्यामेवपारणं नत्वन्यतरान्तापेक्षा तत्रसतिसंभवेश्रवण-मध्यभागंविंशत्यादिघटिकात्मकंत्यक्त्वापारणम् यथैकादशी ३० उत्तराषाढा २९ द्वादशी २५ श्रवणं २९ अत्रपूर्वेद्युस्तन्त्रेणोपवासद्वयं कृत्वापरेह्निश्रवणम-ध्यभागमवशिष्टंनवघटिकात्मकंत्यक्त्वाद्वादश्यांचरमे विंशतिघटिकारूपे-श्रवणभागेपारणम् एवमुक्तोदाहरणएवएकादश्याःदशनाडिकात्वे द्वादश्याः अष्टनाडिकात्वे द्वादशीश्रवणयोःपञ्चदशचत्वारिंशन्नाडीत्वे वाश्रवणमध्यभा-गत्यागोद्वादश्युल्लंघनापत्तौसंगवकालंत्यक्त्वामुहूर्तत्रयपर्यन्तं सप्तमुहूर्तादौवा-ऋक्षमध्यभागएवभोक्तव्यम् अयंमध्यभागत्यागोभाद्रगतश्रवणद्वादशीव्रतएव नतु माघफाल्गुनमासकृष्णपक्षगतश्रवणद्वादशीव्रतपारणायाम् मासान्तरगतश्र-वणभागेविष्णुपरिवर्तनाभावात् येतुभाद्रेश्रवणमध्यवर्जनमात्रेणनिषेधचारिता-र्थ्यंमन्यमानाविष्णुशृङ्खलयोगाभावेपिश्रवणमध्यमात्रंत्यक्त्वाभुञ्जन्तेतेनित्यश्र-वणद्वादशीव्रतमाहात्म्यानभिज्ञाभ्रान्ताएव अयंसर्वोपि निर्णयोमासान्तरगत-श्रवणद्वादशीव्रतेप्यूह्यः श्रवणद्वादशीव्रतेनदीसंगमेस्नात्वाकलशेस्वर्णमयंजना-र्दननामानंविष्णुंसंपूज्य वस्त्रयज्ञोपवीतोपानच्छत्रादिसमर्प्योपोष्य पारणदिनेद-ध्योदनयुतं वस्त्रवेष्टितंजलपूर्णघटंछत्रादियुतांपूजितांसपरिवारांतांप्रतिमांचद-द्यात् तत्रमंत्रः नमोनमस्तेगोविन्दबुधश्रवणसंज्ञक । अघौघसंक्षयंकृत्वा-सर्वसौख्यप्रदोभव १ इति ।

**पारणेचा निर्णय**—द्वादशी व श्रवण या दोहोंच्या अंतीं पारणा करावी हा मुख्य पक्ष असून दोहोंतून एकाच्या अंतीं पारणा करणें हा गौण पक्ष होय. विष्णुशृंखलयोग जर नसेल तर पूर्वतंत्रानें ज्यानें दोन उपवास केले असतील, अशानें दुसऱ्या दिवशीं श्रवण नक्षत्रापेक्षां द्वादशी अधिक असेल तर श्रवणाच्या अंतीं द्वादशीमध्यें पारणा करावी. पारणेच्या दिवशीं जर द्वादशीपेक्षां श्रवण अधिक असेल, तर द्वादशीच्या अंतीं एकादशीच्या पारणेच्या बाबतींत दोष सांगितला आहे. याकरितां द्वादशीमध्येंच पारणा करावी. दोहोंतून एकाचा अंत होण्याचें कारण नाहीं. प्रसंगीं जर संभव असेल तर श्रवणाचा २० घटिकात्मक मध्यभाग टाकून पारणा करावी. उदाहरणार्थः—एकादशी ३०, उत्तराषाढा २९, द्वादशी २५ आणि श्रवण २९ अशा स्थितींत पूर्व दिवशीं तंत्रानें दोन उपवास करून, दुसऱ्या दिवशीं अवशिष्ट असा जो ९ घटिकात्मक श्रवणाचा मध्यभाग तो टाकून, द्वादशीमध्यें शेवटच्या २० घटिकात्मक श्रवणभागामध्यें पारणा करावी. या दिलेल्या उदाहरणांतच जर एकादशी १० घटिका असून, द्वादशी जर ८ घटिका असेल, अथवा द्वादशी १५ व श्रवण जर ४० घटिका असेल, तर श्रवणाच्या मध्यभागाचा त्याग केला असतां, द्वादशीचें उल्लंघन करण्याचा प्रसंग येतो; यास्तव, संभवकाल ६ घटिकांपर्यंत अथवा सातवा मुहूर्त इत्यादि कालीं श्रवणनक्षत्राच्या मध्यभागीं भोजन करावें. हा जो मध्यभागाचा त्याग करण्यास सांगितला, तो भाद्रपदांतल्या श्रवणद्वादशीव्रताबद्दलचा समजावा. हा त्याग माघ व फाल्गुन महिन्यांतल्या कृष्णपक्षांतल्या श्रवणद्वादशीव्रताच्या पारणेसंबंधानें नाहीं असें समजावें. कारण, भाद्रपदमासाहून इतर महिन्यांतील श्रवणनक्षत्राच्या भागामध्यें विष्णूचें परिवर्तन नाहीं. जे कोणी भाद्रपद महिन्यांत श्रवणाचा मध्यभाग मात्र वर्ज्य केल्यानें निषेध पाळल्यासारखें मानितात व विष्णुशृंखलयोगाचा अभाव असतांहि, श्रवणाएवढा मध्यभाग टाकून भोजन करतात, ते नित्य अशा श्रवणद्वादशीव्रताच्या माहात्म्याविषयीं अनभिज्ञ म्हणजे भ्रान्त होत. हाच निर्णय इतर सर्व महिन्यांतल्या श्रवणद्वादशीच्या व्रताविषयींहि समजावा. श्रवणद्वादशीच्या व्रतामध्यें नद्यांच्या संगमावर स्नान करून, कलशाच्या ठिकाणीं सुवर्णमय अशा जनार्दन नामक विष्णुमूर्तीची पूजा करून, तिला वस्त्र, यज्ञोपवीत, उपानह, छत्र वगैरे वस्तूंचें समर्पण करावें आणि उपवास करावा. पारणेचे दिवशीं दहींभातानें युक्त, वस्त्रानें वेष्टित व जलपूर्ण असा कलश आणि छत्रादिकांनीं पूजा केलेली विष्णूची प्रतिमा, सर्व परिवारासह दान करावी. दान करतांना पुढीलप्रमाणें मंत्र म्हणावाः—'नमो नमस्ते गोविन्द बुध श्रवणसंज्ञक । अघौघसंक्षयं कृत्वा सर्वसौख्यप्रदो भव ॥'

**अथ वामनजयन्ती भाद्रशुक्लद्वादश्यांश्रवणयुतायांमध्याह्नेवामनोत्पत्तिः अतोमध्याह्नव्यापिनीद्वादशीमध्याह्नेततोन्यत्रकालेवाश्रवणयुताग्राह्या उभयदिने श्रवणयोगेपूर्वैव सर्वथाद्वादश्याःश्रवणयोगाभावेएकादश्यामेवश्रवणसत्वेमध्याह्नव्यापिनीमपिद्वादशींविहायैकादश्यामेवव्रतंकार्यम् शुद्धैकादश्यांश्रव-**

णाभावेदशमीविद्धैकादश्यामपिश्रवणयुतायांव्रतम् पूर्वदिनएवमध्याह्नव्यापिनी द्वादशीपरदिनेमध्याह्नादन्यत्रकालेश्रवणयुतातदापूर्वैव तिथिद्वयेपिश्रवणयोगाभावेद्वादश्यामेवमध्याह्नव्यापिन्यांव्रतम् दिनद्वयेमध्याह्नव्याप्तौतदव्याप्तौचैकादशीयुक्तैवग्राह्या। पारणातुपूर्वोक्तरीत्योभयान्तेऽन्यतरान्तेवाकार्या अत्रमध्याह्नेनदीसंगमेस्नात्वासौवर्णंवामनंसंपूज्यार्घ्यंसौवर्णपात्रेणदद्यात् तत्र पूजामन्त्रः देवेश्वरायदेवायदेवसंभूतिकारिणे। प्रभवेसर्वदेवानांवामनायनमोनमः १ अथार्घ्यमन्त्रः नमस्तेपद्मनाभायनमस्तेजलशायिने। तुभ्यमर्घ्यं प्रयच्छामि बालवामनरूपिणे १ नमः शार्ङ्गधनुर्बाणपाणयेवामनायच। यज्ञभुक्फलदात्रेच वामनायनमोनमः २ ततः परदिनेसपरिवारंवामनंद्विजायदद्यात वामनः प्रतिगृह्णातिवामनोहंददामिते। वामनंसर्वतोभद्रंद्विजायप्रतिपादये। इतिदानमन्त्रः अस्यामेवद्वादश्यांरात्रौदेवपूजां कृत्वा तत्रासंभवेदिवैववाऽदधिव्रतंनिवेद्यदधिदानंकृत्वादुग्धव्रतसंकल्पंकुर्यात् अत्रपयोव्रतेपयोविकारस्यपायसादेः दुग्धपाचितान्नस्यचवर्जनम् दध्यादेः पयोविकारस्यापिवर्जनम् एवंदधिव्रते तक्रादेर्नवर्जनम् यत्रप्रसूतायागोर्दशदिनेषुसंधिन्यादेश्चक्षीरनिषेधस्तत्रक्षीरविकारस्यदधितक्रादेः सर्वस्यैववर्जनम्।

**वामनजयन्ती**—भाद्रपद शुद्ध पक्षांतल्या श्रवणयुक्त द्वादशीला मध्यान्हकाळीं वामनाला अवतार झाला. यासाठीं मध्यान्हव्यापिनी द्वादशी, मध्यान्हकाळीं अथवा इतर काळीं जर श्रवणयुक्त असेल, तर ती घ्यावी. श्रवणयोग जर दोन दिवस असेल, तर पहिल्या दिवसाची घ्यावी. द्वादशीला जर श्रवणयोग नसेल, आणि एकादशीला जर तो श्रवणयोग असेल, तर मध्यान्हव्यापिनी द्वादशी सोडून एकादशीलाच हें व्रत करावें. शुद्ध एकादशीलाहि जर श्रवणनक्षत्राभाव असेल, तर दशमीनें विद्ध असलेल्या व श्रवणयुक्त एकादशीला देखील हें व्रत करावें. आदल्या दिवशींच मध्यान्हव्यापिनी द्वादशी असून, दुसऱ्या दिवशीं मध्यान्हाहून इतर काळीं जर श्रवणयुक्त द्वादशी असेल, तर मध्यान्हव्यापिनी द्वादशीचे दिवशींच व्रत करावें. द्वादशी दोन दिवस मध्यान्हव्यापिनी असेल, अथवा दोन दिवस नसेल, तर एकादशीनें युक्त असेल ती घ्यावी. पारणा, पूर्वी सांगितल्याप्रमाणें दोहोंच्या अंतीं अथवा एकाच्या अंतीं करावी. या दिवशीं मध्यान्हकाळीं नदीसंगमावर स्नान करून, सुवर्णमय वामनाच्या प्रतिमेची पूजा करून, सुवर्णपात्रानेंच अर्घ्य द्यावेत. पूजेचा मंत्रः—'देवेश्वराय देवाय देवसंभूतिकारिणे। प्रभवे सर्वदेवानां वामनाय नमोनमः॥' अर्घ्यमंत्रः—'नमस्ते पद्मनाभाय नमस्ते जलशायिने। तुभ्यमर्घ्यं प्रयच्छामि बालवामनरूपिणे॥ नमःशार्ङ्गधनुर्बाणपाणये वामनाय च। यज्ञभुक्फलदात्रे च वामनाय नमो नमः॥' नंतर दुसऱ्या दिवशीं सपरिवार वामनाची मूर्ति ब्राह्मणाला दान द्यावी. दानमंत्रः—'वामनः प्रतिगृह्णाति वामनोहं ददामि ते। वामनं सर्वतोभद्रं द्विजाय प्रतिपादये॥' याच द्वादशीच्या रात्रीं देवपूजा करावी. तसें करणें शक्य नसल्यास दिवसा करावी, आणि दधिव्रत निवेदन करून दधिदान द्यावें,

आणि दुग्धव्रताचा संकल्प करावा. या पयोव्रतांत दुधापासून होणारे किंवा दुधांत शिजविलेले पदार्थ वर्ज्य करावेत. दह्यादि पदार्थ वर्ज्य करूं नयेत. दधिव्रतांत तक्रादिक वर्ज्य नाहींत. व्यायलेल्या गायीचें दहा दिवसांतलें दूध आणि संधिनी म्हणजे बैलानें आक्रमिलेल्या ( गाभण ) गायीचें दूध, यांचा ज्या ठिकाणीं निषेध सांगितला आहे, तेथें त्या दुधापासून होणारे दधितक्रादि पदार्थ वर्ज्य करावेत.

अथभाद्रपदशुक्लचतुर्दश्यामनन्तव्रतम् तत्रोदयेत्रिमुहूर्तव्यापिनीचतुर्दशी ग्राह्येतिमुख्यःपक्षः तदभावेद्विमुहूर्ताग्राह्येत्यनुकल्पः द्विमुहूर्तन्यूनातुपूर्वैवग्राह्या दिनद्वयेसूर्योदयव्यापित्वेसंपूर्णत्वात्पूर्वैव अत्रपूर्वाह्णोमुख्यःकर्मकालः तदभावेमध्याह्नोपि अत्रव्रतेसुवर्णप्रतिमायांचतुर्दशग्रन्थियुतदोरकेचानन्तपूजनादिविधिस्तदुद्यापनविधिश्चकौस्तुभादौज्ञेयः पूजितदोरकनाशेतुगुरुंवृत्वातदनुज्ञयायथाशक्तिकृच्छ्रादिप्रायश्चित्तंविधायाष्टोत्तरशतमाज्येनद्वादशाक्षरवासुदेवमन्त्रेणहुत्वाकेशवादिचतुर्विंशतिनामभिःसकृत्सकृद्धुत्वाहोमशेषंसमाप्यनूतनदोरके पूर्ववत्पूजनादिचरेत् ।

**अनंतव्रत**—हें व्रत भाद्रपदशुक्ल चतुर्दशीच्या दिवशीं करावें. त्या तिथीला सूर्योदयकाळीं सहा घटिका व्याप्ति असलेली चतुर्दशी घ्यावी हा मुख्य पक्ष होय. त्याच्या अभावीं चार घटिका व्याप्ति असणारी घ्यावी हा अनुकल्प होय. चार घटिकांहून जर कमी चतुर्दशी असेल, तर ती आदल्या दिवसाची घ्यावी. सूर्योदयकाळीं जर दोन दिवस व्याप्ति असेल, तर पहिल्या दिवशीं संपूर्ण व्याप्ति आहे म्हणून, तीच घ्यावी. या व्रताचा पूर्वाह्णकाळ हाच मुख्य कर्मकाल होय. त्याच्या अभावीं मध्यान्हकाळ घ्यावा. या व्रतांत सुवर्णाच्या प्रतिमेच्या ठिकाणीं, अथवा चौदा ग्रंथींच्या दोऱ्याच्या ठिकाणीं अनंताचें पूजन करावें. पूजनोद्यापनादि विधि कौस्तुभ वगैरे ग्रंथांत पाहावेत. पूजा केलेल्या दोऱ्याचा नाश होईल तर गुर्वाज्ञेनें यथाशक्ति कृच्छ्रादि प्रायश्चित्त करावें, आणि वासुदेवादि द्वादशाक्षरी ( ॐनमो भगवते वासुदेवाय ) मंत्रानें तुपाचा १०८ होम करावा. होम करतांना केशव इत्यादि चोवीस नामांनीं एकेक अशी आहुति देऊन, होमशेष समाप्त करावा. नंतर नव्या दोऱ्याच्या ठिकाणीं पूर्ववत् पूजा करावी.

सूर्यस्यवृषसंक्रमोत्तरंसप्तमदिनेऽगस्त्योऽस्तंप्रयाति सिंहसंक्रान्त्युत्तरमेकविंशतितमेदिनेउदयमेति तत्रकन्यासंक्रान्तेःपूर्वसप्तदिनमध्येऽगस्त्यपूजनंतदर्घ्यादिकंकार्यम् भाद्रपदपौर्णमास्यां प्रपितामहात् परान्पित्रादींस्त्रीन्सपत्नीकान्वसुरुद्रादिरूपान्मातामहादित्रयंचसपत्नीकमुद्दिश्यश्राद्धंकार्यम् इदंपार्वणत्वादपराह्णेपुरूरवार्द्रवदेवयुक्तंसपिण्डकंकार्यम् केचित्तुप्रपितामहस्यपित्रादित्रयमात्रमुद्दिश्यनान्दीश्राद्धधर्मेणसत्यवसुदेवयुक्तंश्राद्धंकार्यंनात्रमातामहाद्युद्देशइत्याहुः इदंप्रोष्ठपदीश्राद्धंसकृन्महालयपक्षेसकलकृष्णपक्षव्यापिमहालयपक्षेचावश्यकम् पञ्चम्यादिमहालयपक्षेषुकृताकृतम् ।

**प्रोष्ठपदीश्राद्ध**— सूर्याच्या वृषभसंक्रांतीनंतर सातव्या दिवशीं अगस्त्य अस्ताला जातो आणि सिंहसंक्रान्तीनंतर एकविसाव्या दिवशीं उदय पावतो. कन्यासंक्रांत लागण्याच्या आधींच्या सात दिवसामध्यें अगस्त्यपूजन व अर्घ्यादि गोष्टी कराव्या. भाद्रपदी पौर्णिमेला पणजापासून पुढचे जे तीन—बाप, आजा आणि पणजा—त्यांचें सपत्नीक आणि वसुरुद्रादिरूप व मातामहादि तिघां सपत्नीकांच्या उद्देशानें श्राद्ध करावें. हें श्राद्ध पार्वणरूप आहे, म्हणून अपराह्णकाळीं तें पुरूरवार्द्र व देवयुक्त असें सपिंडक करावें. प्रपितामहाची—जी बाप, आजा, पणजा—ही त्रयी तिच्याच उद्देशानें नान्दीश्राद्ध, धर्मानें सत्यवसुदेवयुक्त असें श्राद्ध करावें. त्यावेळीं मातामहादिकांच्या म्हणजे आईचा—बाप, आजा, पणजा—यांचा उच्चार करूं नये, असें कोणी म्हणतात. हें प्रोष्ठपदीश्राद्ध दर पंधरवड्यास एकदां महालय पक्षाच्या ठिकाणीं आणि सर्व कृष्णपक्षादि महालयपक्षाच्या ठिकाणीं आवश्यक आहे. पंचमी इत्यादि महालय पक्षाच्या ठिकाणीं कृताकृत आहे.

अथमहालयः ॥ तत्रशक्तेनभाद्रपदापरपक्षेप्रतिपदमारभ्यदर्शान्ततिथिवृद्धौषोडशमहालयाःकर्तव्याःवृद्धिक्षयाभावेपञ्चदशैवमहालयाः तिथिक्षयेचतुर्दशैव अशक्तेनतुपञ्चम्यादिषुषष्ठ्यादिष्वष्टम्यादिषुदशम्यादिष्वेकादश्यादिषुदर्शान्ततिथिषुकार्याः अत्राप्यशक्तेनानिषिद्धेकस्मिंश्चिदेकस्मिन्दिनेसकृन्महालयःकर्तव्यः प्रतिपदादिदर्शान्तपक्षेचतुर्दशीनवर्ज्यापञ्चम्यादिदर्शान्तादिपञ्चपक्षेषुचतुर्दशींवर्जयित्वान्यतिथिषुमहालयाः सकृन्महालयेपिचतुर्दशीवर्जनीया सकृन्महालयेप्रतिपदाषष्ठीएकादशीचतुर्दशीशुक्रवारोजन्मनक्षत्रंजन्मनक्षत्राद्दशममेकोनविंशंनक्षत्रंचरोहिणीमघारेवतीचेतिवर्ज्यानि क्वचित्त्रयोदशीसप्तमीरविवारोभौमवारोपिवर्ज्यउक्तःपितृमृततिथौसकृन्महालयकरणेनन्दादिनिषेधोनास्ति अशक्तःपितृपक्षेतुकरोत्येकदिनेयतः । निषिद्धेपिदिने कुर्यात्पिण्डदानंयथाविधि १ इत्यादिवचनात् मृततिथौश्राद्धासंभवेनिषिद्धतिथ्यादिदिनंवर्जयित्वामहालयः तत्रापिद्वादश्यमावास्याष्टमीभरणीव्यतीपातेषुमृततिथ्यभावेपिनसकृन्महालयेकोपितिथ्यादिनिषेधोनास्ति संन्यासिनांमहालयस्तु अपराह्णव्यापिन्यांद्वादश्यामेवसपिण्डकःकार्योनान्यतिथौ चतुर्दश्यांमृतस्यापिमहालयश्चतुर्दश्यांनभवति श्राद्धंशस्त्रहतस्यैवचतुर्दश्यांप्रकीर्तितमितिनियमेनसर्वतोबलिष्ठेनप्रतिवार्षिकश्राद्धातिरिक्तश्राद्धस्यचतुर्दश्यांनिषेधात् एवं पौर्णमासीमृतस्यापिमहालयःपौर्णमास्यांनकार्यः अपरपक्षत्वाभावेनतस्यांमहालयाप्राप्तेः तेन चतुर्दशीमृतस्यपौर्णमासीमृतस्यवामहालयोद्वादश्यमावास्यादितिथिषुकार्यः अत्रकन्यार्कःप्राशस्त्यसंपादकोनतुनिमित्तम् आदौमध्येवसानेवायत्रकन्यांव्रजेद्रविः । सपक्षःसकलःपूज्यःश्राद्धषोडशकंप्रति १ इत्यादिस्मृतेः अमावास्यापर्यन्ततिथ्यासंभवेआश्विनशुक्लपञ्चमीपर्यन्तंयस्मिन्कस्मिंश्चित्तिथौमहालयःतत्रासंभवेयावद्वृश्चिकदर्शनंव्यतीपातद्वादश्यादिपर्वणि कार्यः मृताहेमहालयेचश्राद्धंपक्वान्ने-

**नैवकार्यंनत्वामान्नादिना महालयेगयाश्राद्धेमातापित्रोर्मृतेऽहनि। कृतोद्वाहोपि-कुर्वीतपिण्डदानंयथाविधि १।**

**महालय**—समर्थ असेल त्यानें, भाद्रपदांतल्या कृष्णपक्षांतल्या प्रतिपदेपासून आरंभ करून, अमावास्येपर्यंत महालय करावें. पंधरवड्यांत जर तिथीचा क्षय असेल, तर चौदाच करावेत. जो कोणी सर्व करण्यास समर्थ नसेल त्यानें षष्ठी, अष्टमी, दशमी, एकादशी--यांपैकीं एका तिथीवर आरंभ करून, अमावास्येपर्यंत महालय करावेत. इतकेंही करण्यास जो कोणी असमर्थ असेल, त्यानें निषिद्ध नसलेल्या तिथीवर एकाच दिवशीं महालय करावा. प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत दररोज महालय करण्याचा जो पक्ष सांगितला त्यांतील चतुर्दशी वर्ज्य नाहीं. पंचमी-पासून अमावास्येपर्यंत महालय करण्याचे जे निरनिराळे पांच पक्ष सांगितले, त्यांमध्यें मात्र चतुर्दशी वर्ज्य करून, इतर तिथींवर महालय करावेत. एकदांच महालय करण्याचा जो पक्ष, त्यांत मात्र चतुर्दशी वर्ज्य करावी. एकदांच महालय करण्याच्या वेळीं—प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, चतुर्दशी,शुक्रवार,जन्मनक्षत्र, जन्मनक्षत्रापासून दहावें आणि एकोणिसावें नक्षत्र, रोहिणी, मघा व रेवती हीं वर्ज्य करावींत. त्रयोदशी, सप्तमी, रविवार व मंगळवार हेहि वर्ज्य करावेत, असें क्वचित् ग्रंथांत सांगितलें आहे. बापाच्या मृत्युतिथीच्या दिवशीं एकदांच महालय जर करणें असेल, तर त्याबाबतींत प्रतिपदा वगैरेंचा निषेध नाहीं. कारण, 'पंधरा दिवस महालय करण्यास असमर्थ असलेल्यानें, पितृपक्षामध्यें, एकाच दिवशीं—निषिद्ध दिवशींही यथाविधि पिंडदान करावें' असें वचन आहे. पित्याच्या मृत्युतिथीच्या दिवशीं श्राद्ध करणें जर अशक्य असेल, तर निषिद्ध तिथि वगैरे वर्ज्य करून, महालय करावा. अशा वेळीं—द्वादशी, अमावास्या, अष्टमी, भरणी, व्यतिपात इत्यादि वर्ज्य करून महालय करावा. या-शिवाय—द्वादशी, अमावास्या, अष्टमी, भरणी, व्यतीपात इत्यादि दिवशीं जर मृत-तिथी नसेल, तर सकृन्महालयाला तिथ्यादिकांचा कोणचाहि निषेध नाहीं. संन्याशाचा महालय, अपराह्णव्यापिनी अशा द्वादशीलाच सपिंडक करावा. तो इतर तिथींवर करूं नये. चतुर्दशीला जर मृततिथि असेल, तर त्या तिथीवर महालय करूं नये. शस्त्र-घातानें मेलेल्याचें श्राद्ध चतुर्दशीला करावें, असा नियम सर्वांहून बलिष्ठ आहे. यासाठीं, प्रतिवार्षिक श्राद्धावांचून इतर श्राद्ध चतुर्दशीला करण्याबद्दल निषेध आहे. पौर्णिमेला मृत झालेल्याचाही महालय पौर्णिमेला करूं नये. याचें कारण असें कीं, कृष्णपक्ष नसल्यानें पौर्णिमेला महालय प्राप्त होत नाहीं. यास्तव, चतुर्दशी किंवा पौर्णिमा या तिथींवर मृत झालेल्यांचे महालय—द्वादशी, अमावास्या इत्यादि तिथींवर करावेत. महालयाच्या बाबतींत कन्यास्थ रवि प्राशस्त्यसंपादक आहे, निमित्त नाहीं. कारण 'आरंभीं, मध्यें अथवा अंतीं जेव्हां रवि कन्याराशीला जातो, तेव्हां तो सारा पक्ष, सोळा श्राद्धांबद्दल पूज्य आहे,' असें स्मृतिवचन आहे. अमावास्येपर्यंतच्या कोणच्याही तिथीवर महालय करणें जर अशक्य असेल, तर वृश्चिक संक्रांतीपर्यंत—व्यतीपात द्वादशी इत्यादि सर्व दिवशीं तो करावा. (हें श्राद्ध मलमासांत न करण्या-

बद्दल भृगूचें वचन आहे.) मृतदिवस, महालय वगैरे दिवशीं श्राद्ध, पक्वान्नानेंच करावें, आमान्नानें करूं नये. 'महालय, गयाश्राद्ध व मातापित्यांच्या मृत्युतिथी यांवर विवाहितानें देखील यथाविधि पिंडदान करावें.'

पक्षश्राद्धे पित्रादिपार्वणत्रयपत्न्याद्येकोद्दिष्टपितृगणसहितसर्वपित्रुद्देशेनसपत्नीकपित्रादित्रयसपत्नीकमातामहादित्रयेतिषड्दैवतमात्रोद्देशेनवा षड्दैवतैकोद्दिष्टगणोद्देशेनवाप्रत्यहंमहालयइतिपक्षत्रयम् एवंपञ्चम्यादिपक्षेष्वपि सकृन्महालयेतुसर्वपित्रुद्देशेनैव तत्रदेवतासंकल्पः पितृपितामहप्रपितामहानांमातृतत्सपत्नीपितामहीतत्सपत्नीप्रपितामहीतत्सपत्नीनां यद्वाऽस्मत्सापत्नमातुरितिपृथगुद्देशः मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानांसपत्नीकानांयथानामगोत्राणांवस्वादिरूपाणांपार्वणविधिनापत्न्याः पुत्रस्यकन्यकायाः पितृव्यस्य मातुलस्यभ्रातुःपितृष्वसुमातृष्वसुरात्मभगिन्याःपितृव्यपुत्रस्यजामातुर्भागिनेयस्यश्वशुरस्यश्वश्र्वावाआचार्यस्योपाध्यायस्यगुरोःसख्युःशिष्यस्यपतेषांयथानामगोत्ररूपाणां पुरुषविषयेसपत्नीकानांस्त्रीविषयेसभर्तृकसापत्न्यानामेकोकोद्दिष्टविधिनामहालयापरपक्षश्राद्धमथवासकृन्महालयापरपक्षश्राद्धंसदैवंसद्यःकरिष्यइति एतेषांमध्येयेकेचिज्जीवन्तितान्विहायइतरेषामुद्देशः मातामहादिषुपत्न्याजीवने सपत्नीकेत्यस्यस्त्रीषुचभर्त्रादेरनुच्चारः महालयेगयाश्राद्धेवृद्धौचान्वष्टकासुच। नवदैवतमत्रेष्टंशेषंषाट्पौरुषंविदुः १ अन्वष्टकासुवृद्धौचप्रतिसंवत्सरेतथा।महालयेगयायांचसपिण्डीकरणात्पुरा २ मातुःश्राद्धंपृथक्कार्यमन्यत्रपतिनासह। इत्यादिस्मृत्यनुसारात्पार्वणत्रयमेवोक्तम् केचित्तुमातामह्यादित्रयंपृथगुच्चार्य द्वादशदेवताकंपार्वणचतुष्टयमाहुः एताएवदेवतागयायांतीर्थश्राद्धेनित्यतर्पणे च ज्ञेयाः महालयेधूरिलोचनसंज्ञकाविश्वेदेवाः अत्रसतिसंभवेदेवार्थेद्वौविप्रौपार्वणत्रयार्थे प्रतिपार्वणंत्रीनित्येवंनवपत्न्याद्येकोद्दिष्टगणेप्रतिदैवतमेकैकमेवंविप्रान्निमन्त्रयेत् अशक्तौदेवार्थमेकंप्रतिपार्वणमेकमितिपार्वणत्रयंत्रीन्सर्वैकोद्दिष्टगणार्थमेकमितिनिमन्त्रयेत् देवार्थविप्रद्वयपक्षेप्रतिपार्वणे त्रयएवकार्याः नतुदेवार्थेद्वौप्रतिपार्वणमेकइतिवाप्रतिपार्वणंत्रीन्देवार्थमेकइति वावैषम्यंकार्यम् एवंसर्वत्रअमावास्यादिश्राद्धेष्वपिज्ञेयम् अत्यशक्तोपार्वणद्वयार्थमेकोपिकार्यः महालयेअन्तेमहाविष्णवर्थेविप्रोवश्यंनिमन्त्रयितव्यइतिविशेषः कौस्तुभे जीवन्मातृकःसापत्नमातुरेकोद्दिष्टंकुर्यान्नपार्वणम् अनेकाःसापत्नमातरोयस्यतेनसर्वमात्रुद्देशेनैकएवविप्रःपिण्डश्चकार्योर्घ्यपात्रंपृथक् स्वजनन्यासहानेकमातृत्वेस्वजनन्यासहसर्वमात्रर्थमेकोविप्रः पिण्डोर्घ्यश्चेतिपार्वणमेवनपृथक् सापत्नमात्रैकोद्दिष्टमितिवासर्वसापत्नमातॄणांपृथगेवैकोद्दिष्टमितिवापक्षःमहालये पार्वणार्थेअग्नौकरणमेकोद्दिष्टगणार्थेत्वग्नौकरणंकृताकृतम्करणपक्षेएकोद्दिष्टगणार्थमग्नौकरणान्नंपृथक्पात्रेग्राह्यम् महालयेसर्वपार्वणार्थमेकोद्दिष्टार्थेचसकृदाच्छिन्नंबर्हिरेकमेव दर्शादौतुप्रतिपार्वणंबर्हिर्भिन्नमेवअवशिष्टःश्राद्धप्रयोगोनेकमातृत्वेभ्यञ्जनादिमन्त्रोहश्चश्राद्धसागरेस्वस्वशाखोक्तप्रयोगग्रन्थेषुचज्ञेयः सकृ-

न्महालयेश्राद्धाङ्गतिलतर्पणंपरेहन्येवसर्वपित्रुद्देशेनप्रातःसंध्यायाः पूर्वमेवप्रातः संध्योत्तरंवाब्रह्मयज्ञाङ्गतर्पणाद्भिन्नमेवकार्यम् प्रतिपदादिपञ्चम्यादिपक्षेषुवि-प्रविसर्जनान्तेएवश्राद्धपूजितपित्रुद्देशेनतर्पणं कार्यम् पत्न्यांरजस्वलायांसकृन्महाल-येनकार्यः कालान्तराणांसत्वात् अमायांरजोदोषेआश्विनशुक्लपञ्चमीपर्यन्तंगौ-णकालेमहालयाः प्रतिपदादिष्वन्येषुपक्षेषुप्रारंभदिनेपाकात्पूर्वंपत्नीरजस्वलाचे-दुत्तरोत्तरपक्षस्वीकारःपाकारम्भोत्तरंचैतागृहान्तरेऽपरुध्यमहालयःकर्तव्यः एवं-विधवाकर्तृकश्राद्धेपिज्ञेयम् अत्रापुत्राविधवा ममभर्तृतत्पितृपितामहानांभर्तुर्मा-तृपितामहीप्रपितामहीनांममपितृपितामहप्रपितामहानां ममातृपितामहीप्रपि-तामहीनांममातामहमातृपितामहमातृप्रपितामहानांममातामहीमातृपितामही-मातृप्रपितामहीनां तृप्त्यर्थंसकृन्महालयपरपक्षश्राद्धंकरिष्य इतिस्वयंसंकल्प्य ब्राह्मणद्वाराअग्नौकरणादिसहितं सर्वमविकृतंप्रयोगंकारयेत् ब्राह्मणस्त्वमुकना-म्न्यायजमानायाभर्तृतत्पितृपितामहेत्याद्युच्चार्यप्रयोगं कुर्यात् अशक्तौभर्त्रादित्र-यंस्वपित्रादित्रयंस्वमात्रादित्रयंस्वमातामहादित्रयंसपत्नीकमितिपार्वणचतुष्टयो-द्देशेनमहालयः अत्यशक्तौस्वभर्त्रादित्रयंस्वपित्रादित्रयंचेतिपार्वणद्वयमेवकार्यम् ।

**महालयविधि**—भाद्रपद कृष्णपक्षांतल्या प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत दररोज जो महालय करायचा त्यांत—पित्याची, त्रयी, मातेची त्रयी व मातेच्या पित्याची त्रयी (सपत्नीक), पत्नी वगैरे जे एकोद्दिष्ट पितृगण म्हणजे (बायको, मुलें, चुलता, मामा, भाऊ (सपत्नीक), आत्या, मावशी, बहीण (सभर्तृक व ससुत), सासरा व गुरु वगैरे सर्व पितर येतात; यास्तव, तो त्या सर्वांच्या उद्देशानें करावा असा एक पक्ष आहे. सपत्नीक अशी जी पितृत्रयी, व सपत्नीक अशी जी मातामहादि त्रयी त्या सहा देवतांच्याच मात्र उद्देशानें दररोजचा महालय करावा असा दुसरा पक्ष आहे. सपत्नीक पितृत्रयी, सपत्नीक मातामहत्रयी आणि पत्नी वगैरे जे एकोद्दिष्ट गण त्यांच्या उद्देशानें दररोज महालय करावा असा तिसरा पक्ष आहे. दररोज महालय करण्याच्या बाबतींत असे एकंदर तीन पक्ष आहेत. पंचमीपासून अमावास्येपर्यंत महालय करण्यासंबंधानें जे पक्ष आहेत, त्याबाबतींतही वरीलप्रमाणेंच निर्णय समजावा. एकदांच जर महालय करायचा असेल, तर तो मात्र सर्व पितरांच्या उद्देशानें केला पाहिजे. अशा महालयाच्या प्रसंगीं देवतांचा संकल्पः—'पितृपितामहप्रपितामहानां मातृतत्सपत्नीपितामही तत्सपत्नीप्रपितामहीत-त्सपत्नीनां यद्वास्मत्सापत्नमातुरिति पृथगुद्देशः मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानां सपत्नीकानां यथानामगोत्राणांवस्वादिरूपाणां पार्वणविधीना पत्न्याः पुत्रस्य कन्य-कायाः पितृव्यस्य मातुलस्य भ्रातुः पितृष्वसुर्मातृष्वसुरात्मभगिन्याः पितृव्यपुत्रस्य जामा-तुर्भागिनेयस्य श्वशुरस्य श्वश्र्वा वा आचार्यस्योपाध्यायस्य गुरोःसख्युःशिष्यस्य एतेषां यथा-नामगोत्राणां पुरुषविषये सपत्नीकानां स्त्रीविषये सभर्तृकसापत्यानामेकोद्दिष्टविधिना महा-लयापरपक्षश्राद्धमथवा सकृन्महालयापरपक्षश्राद्धं सदैवं सद्यः करिष्ये'—याप्रमाणें करावा. यामध्यें जे कोणी जिवंत असतील ते वगळून इतरांच्याच नांवांचा उच्चार

करावा. मातामह इत्यादिकांच्या पत्नी जिवंत असल्यास 'सपत्नीक' आणि स्त्रियांचा पति जिवंत असेल तर 'सभर्तृक' असे उच्चार करूं नयेत. महालय, गयाश्राद्ध, नान्दीश्राद्ध आणि अन्वष्टका हीं नऊ देवतांचे ( पितृत्रयी, मातृत्रयी व मातामहत्रयी ) उद्देशानें करावींत. इतर श्राद्धें ( पितृत्रयी व मातामहत्रयी सपत्नीक ) या सहा देवतांच्या उद्देशानें करावींत. अन्वष्टका, नान्दीश्राद्ध, प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, महालय आणि गयाश्राद्ध यांच्या ठिकाणीं सपिंडीं करण्याच्या पूर्वी मातेचें श्राद्ध निराळें करावें. इतर ठिकाणीं पतीसह करावें. स्मृतींच्या अनुरोधानें इत्यादि तीन पार्वणेंच सांगितलीं आहेत. मातामही इत्यादि त्रयीचा पृथक् उच्चार करून, बारा देवतांचीं मिळून चार पार्वणें करावींत, असेंही कांहीं ग्रंथकारांनीं सांगितलें आहे. गयाश्राद्ध, तीर्थश्राद्ध आणि नित्यतर्पण यांत याच देवता घ्याव्यात. महालयांतही 'धूरिलोचन' नांवाचे विश्वेदेव घ्यावेत. ज्याला सामर्थ्य असेल त्यानें देवांकरतां दोन, तीन पार्वणांपैकीं प्रत्येकाला तीन प्रमाणें नऊ आणि पत्न्यादि एकोद्दिष्टगणाला प्रत्येक देवतेला एकेक याप्रमाणें ब्राह्मणांना आमंत्रण द्यावें. ज्याला सामर्थ्य नसेल त्यानें देवांकरतां एक, तीन पार्वणांना प्रत्येकीं एक मिळून तीन आणि सर्व एकोद्दिष्ट गणांना मिळून एक असे ब्राह्मण सांगावे. देवाकरतां दोन ब्राह्मण सांगावेत असें सांगणारा जर पक्ष असेल, तर प्रत्येक पार्वणाला तीन तीन ब्राह्मण सांगितलेच पाहिजेत. देवांकरितां दोन आणि प्रत्येक पार्वणाला एक, किंवा देवांकरितां एक व प्रत्येक पार्वणाला तीन असें विषम प्रमाण घेऊं नये. अमावास्यादि श्राद्धांच्या ठिकाणींही याप्रमाणेंच करावें. जो कोणी अत्यंत असमर्थ असेल, अशानें दोन पार्वणांना एकच ब्राह्मण सांगितला तरी चालेल. महालयाच्या अंतीं महाविष्णूच्या उद्देशानें एक ब्राह्मण अवश्य सांगावा असा कौस्तुभांत विशेष सांगितला आहे. ज्याची आई जिवंत असेल त्यानें सापत्न मातेचें एकोद्दिष्टश्राद्ध करावें, पार्वणश्राद्ध करूं नये. ज्याच्या अनेक सापत्न माता असतील अशानें साऱ्या आयांच्या उद्देशानें एकच ब्राह्मण सांगावा आणि पिंडही एकच करावा. अर्घ्यपात्रें मात्र निरनिराळीं करावींत. आपल्या मातेबरोबरच अनेक सावत्र मातांचें जर कोणाला श्राद्ध करणें असेल, तर त्यानें आपल्या मातेसह इतर सावत्र आयांच्या उद्देशानें एकच ब्राह्मण, एकच पिंड व एकच अर्घ्य, असें पार्वणश्राद्ध करावें. सापत्न मातांचें निराळें असें एकोद्दिष्ट करूं नये असा जरी एक पक्ष आहे तरी सर्व सापत्न मातांचें पृथक् एकोद्दिष्ट करावें असेंही दुसरा पक्ष सांगतो. महालयांत पार्वणांकरतां अग्नौकरण केलें पाहिजे. एकोद्दिष्ट गणांसाठीं अग्नौकरण कृताकृत आहे. एकोद्दिष्टासाठीं अग्नौकरण केल्यास, अग्नौकरणाचें अन्न वेगळाल्या पात्रांत घ्यावें. महालयांत सर्व पार्वणांकरितां व एकोद्दिष्टासाठीं एकदां छिन्न केलेला असा एकच दर्भ घ्यावा. दर्शश्राद्धादिकांतील प्रत्येक पार्वणाला निराळा दर्भ घ्यावा. अवशिष्ट श्राद्धप्रयोग आणि अनेक माता असतां अभ्यंजनादिकाविषयीं जे मंत्रोच्चार करायचे असतात, त्यांची माहिती श्राद्धसागरांत आणि आपापल्या शाखांना उक्त अशा प्रयोगग्रंथांत पाहावी. एकदांच जर करणें असेल; तर श्राद्धाच्या

अंगभूत जें तिलतर्पण तें, दुसऱ्या दिवशींच सर्व पितरांच्या उद्देशानें प्रातःसंध्येच्या पूर्वीं अथवा प्रातःसंध्येच्या नंतर ब्रह्मयज्ञाच्या अंगभूत करावयाच्या तर्पणाहून निराळेंच करावें. प्रातिपदिक आणि पंचम्यादिक जे पक्ष करायचे त्यांच्या ठिकाणीं ब्राह्मणांचें विसर्जन झाल्यावर, श्राद्धामध्यें पूजित अशा पितरांच्या उद्देशानें तर्पण करावें. पत्नी विटाळशी असतांना एकदां करायचा महालय करूं नये; कारण त्यासाठीं दुसरा उक्तकाल ठरविला आहे. अमावास्येच्या दिवशीं जर स्त्री रजस्वला असेल, तर आश्विन शुद्ध पंचमीपर्यंतचा काळ महालयाला गौण आहे. प्रातिपदादि अन्य पक्षांचे ठिकाणीं प्रारंभाचे दिवशीं पाकाला आरंभ होण्याच्या आधीं जर पत्नी रजस्वला होईल, तर एकाच्या पुढचा दुसरा याप्रमाणें पक्षांचा स्वीकार करावा. ( अशा वेळीं जर सुतक येईल, तर त्या बाबतींतला निर्णय तिसऱ्या परिच्छेदांत सांगितला आहे. ) पाकाला प्रारंभ झाल्यानंतर जर स्त्री रजस्वला होईल, तर तिला दुसऱ्या घरीं ठेवून महालयाला प्रारंभ करावा. विधवेनें करायच्या श्राद्धासंबंधानेंही हेंच जाणावें. अपुत्र अशा विधवेनें, अशा प्रसंगीं 'मम भर्तृतत्पितृपितामहानां भर्तुर्मातृपितामहीप्रपितामहीनां मम पितृपितामहप्रपितामहानां मम मातृपितामहीप्रपितामहीनां मम मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानां मम मातामहीमातृपितामहीमातृप्रपितामहीनां तृप्त्यर्थंसकृन्महालयपरपक्षश्राद्धंकरिष्ये' असा स्वतः संकल्प करून, ब्राह्मणांकडून अग्नौकरणासह सर्व प्रयोग यथाविधि करवावा. ब्राह्मणानें 'अमुकनाम्न्या यजमानायाः भर्तृतत्पितृपितामह०' वगैरे वरीलप्रमाणें उच्चार करून, प्रयोग करावा. असमर्थ असल्यास—भर्तृत्रयी, स्वपितृत्रयी, स्वमातृत्रयी, स्वमातामहत्रयी सपत्नीक याप्रमाणें चार पार्वणांच्या उद्देशानें महालय करावा. अत्यंत असमर्थता जर असेल, तर—स्वभर्तृत्रयी आणि स्वपितृत्रयी अशीं दोनच पार्वणें करावींत.

महालयपितरिसंन्यस्तेपातित्यादियुतेवाजीवत्पितृकेणापिपुत्रेणपितुः पित्रादिसर्वपित्रुद्देशेनपिण्डदानरहितः सांकल्पविधिनाकार्यः वृद्धौतीर्थेचसंन्यस्ते तातेचपतितेसति । येभ्यएवपितादद्यात्तेभ्योदद्यात्स्वयंसुतः १ मुण्डनंपिण्डदानंचप्रेतकर्मचसर्वशः । नजीवत्पितृकःकुर्याद्गुर्विणीपतिरेवच २ इत्यादि वचनात् पिण्डदानादिविस्तरंकर्तुमशक्तेनापिसांकल्पविधिःकार्यः सांकल्पिक विधावर्घ्यदानंसमन्त्रकावाहनमग्नौकरणंपिण्डदानंविकिरदानंस्वधांवाचयिष्ये ॐस्वधोच्यतामित्यादिस्वधावाचनप्रयोगंचवर्जयेत् अनेकब्राह्मणालाभेदेवस्थाने शालग्रामादिदेवमूर्तिसंस्थाप्यश्राद्धंकार्यम् सर्वथाविप्रालाभेदर्भवटुविधिनाश्राद्धम् पित्रोर्मरणेप्रथमाब्देमहालयःकृताकृतः महालयोमलमासेनकार्यः अपरपक्षेप्रतिवार्षिकप्राप्तौमृततिथौवार्षिकंकृत्वातिथ्यन्तरेसकृन्महालयःकार्यःप्रतिपदादिदर्शान्तादिपक्षेषुमृततिथौवार्षिकंकृत्वापाकान्तरेणमहालयः अमायांप्रतिवार्षिकसकृन्महालयप्राप्तौपूर्ववार्षिकंततोमहालयःततोदर्शश्राद्धमितित्रयंपाकभेदेन महालयमात्रप्राप्तावपिपूर्वंमहालयःततोदर्शः मृततिथौसकृन्महालयपक्षे तत्तत्तिथेर्ग्राह्यत्वनिर्णयोपराह्णव्याप्त्यादर्शवदितिभाति अत्रापरपक्षेभरणीश्राद्धा-

द्गयाश्राद्धफलप्राप्तिः भरणीश्राद्धमपिण्डकंषड्दैवतं सांकल्पविधिनाकार्यम् देवा धूरिलोचनौपुरूरवार्द्रवौवा भरणीश्राद्धंकाम्यंगयाश्राद्धफलकामेनप्रतिवर्षंकार्यम् केचित्पित्रादिमरणोत्तरंप्रथमवर्षेएवकुर्वन्ति द्वितीयादिवर्षेनकुर्वन्तितत्रमूलंचिन्त्यम् । ममतु नदैवंनापिवापित्र्यंयावत्पूर्णोनवत्सरः । इत्यादिवचनेनसर्वस्यापिदर्शादिश्राद्धस्यप्रथमाब्देनिषेधाद्वर्षान्तेएव पितृत्वप्राप्तेश्चद्वितीयादिवर्षे एवकर्तुंयुक्तमितिभाति यत्तुपितृभिन्नोपियोयोम्रियतेतस्यतस्यप्रथमाब्देभरणीश्राद्धंक्रियतेतत्रापिमूलंन पश्यामः गयाश्राद्धफलार्थमाचारमनुसृत्यक्रियते चेन्मृताद्येकमेवपार्वणमुद्दिश्यसदैवंकार्यम् अत्र सपिण्डत्वाचारोपिचिन्त्यः ।

**महालयविधिनिर्णय**—पिता संन्यासी असल्यास अथवा पातित्यानें युक्त असल्यास जीवत्पितृक पुत्रानें देखील पित्याचा पिता वगैरेंच्या उद्देशानें पिंडदानरहित असा सांकल्पविधि करून महालय करावा. कारण, 'पिता जर संन्यस्त अथवा पतित असेल, तर नान्दीश्राद्ध व तीर्थश्राद्ध यांचे ठिकाणीं, पित्यानें ज्यांचें श्राद्ध केलें असतें अशांच्या उद्देशानें पुत्रानें श्राद्ध करावें,' 'मुंडन, पिंडदान, सर्व प्रकारचें प्रेतकर्म वगैरे गोष्टी जीवत्पितृकानें आणि गर्भिणीपतीनें करूं नयेत,' अशाप्रकारचीं वचनें आहेत. पिंडदानादिक्रिया संपूर्णपणें करण्याची पात्रता जर अंगीं नसेल, तर त्यानेंही संकल्पविधिच करावा. संकल्पविधींत अर्घ्यदान, समंत्रक आवाहन, अग्नौकरण, पिंडदान, विकिरदान, 'स्वधां वाचयिष्ये ॐ स्वधोच्यताम्' वगैरे जे स्वधावाचन प्रयोग ते सर्व वर्ज्य करावे. अनेक ब्राह्मण जर न मिळतील, तर देवाच्या स्थानीं शालिग्रामादिक देवतेची स्थापना करून श्राद्ध करावें. जेथें ब्राह्मण मुळींच मिळणार नाहीं तेथें, दर्भाचा वटु करून, श्राद्ध करावें. बाप मेला असतां पहिल्या वर्षीं महालय कृताकृत आहे. महालय मलमासांत करूं नये. दुसऱ्या पक्षीं प्रतिसांवत्सरिक श्राद्ध प्राप्त झालें असतां मृत्युतिथीला प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करून, दुसऱ्या तिथीवर सकृन्महालय करावा. प्रतिपदेपासून दर्शापर्यंत जर दररोज महालय करणें असेल, तर मृत्युतिथीच्या दिवशीं प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करून, निराळ्या पाकानें महालय करावा. अमावास्येच्या दिवशीं प्रतिसांवत्सरिक श्राद्ध व महालय हीं जर प्राप्त होतील, तर आधीं प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करून, नंतर महालय व त्यानंतर दर्शश्राद्ध अशीं तिन्ही एकामागोमाग एकाच दिवशीं, निरनिराळ्या तीन पाकांनीं करावीं. अमावास्येलाच जर महालय प्राप्त होईल, तर तशा प्रसंगींहि याप्रमाणेंच अगोदर महालय व नंतर दर्शश्राद्ध करावीत. मृत्युतिथीच्या दिवशीं जर सकृन्महालय करायचा असेल, तर त्या तिथीच्या ग्रहणाचा निर्णय, अपराह्णकाळाच्या व्याप्तीच्या अनुरोधानें दर्शाच्या नियमाप्रमाणेंच ध्यावा, असें मला वाटतें. या दुसऱ्या पक्षीं भरणीश्राद्ध केल्यानें गयाश्राद्धाचें फळ प्राप्त होतें. भरणीश्राद्ध अपिंडक असें षड्देवतांच्या उद्देशानें संकल्पविधीनें करावें. यांत धूरिलोचन अथवा पुरूरवार्द्रव हे देव ध्यावे. भरणीश्राद्ध काम्य आहे. ज्याला गयाश्राद्धाचें फळ पाहिजे असेल, त्यानें तें दरवर्षीं करावें. कांहीं लोक हें भरणीश्राद्ध पिता इत्यादिकांच्या मरणोत्तर पहिल्या

वर्षींच मात्र करतात. पुढें केव्हांच करीत नाहींत. याविषयीं मूळचा निर्णय शोधला पाहिजे. 'जोंपर्यंत एकवर्ष पुरें झालेलें नसतें, तोंपर्यंत 'दैव अथवा पित्र्य हीं कर्में करूं नयेत ' वगैरे वचनांवरून, दर्शादि सर्व श्राद्धांचा पहिल्या वर्षी निषेध आहे; यासाठीं एक वर्ष पुरें झाल्यावरच पितृत्व प्राप्त होतें; यास्तव, दुसऱ्या वर्षींच भरणीश्राद्ध करणें योग्य आहे असें मला वाटतें. पित्यावांचून इतर जो कोणी मरण पावतो त्याचें भरणीश्राद्ध पहिल्या वर्षीं जे कोणी करतात, त्याबद्दलचा आधार मला माहीत नाहीं. गयाश्राद्धाच्या फळाच्या इच्छेनें आचाराला अनुसरून जर करायचें असेल, तर मृत-माणसाच्या एकच त्रयीच्या उद्देशानें पार्वण करून, देवांसहवर्तमान करावें. या श्राद्धांत जी पिंडदान करण्याची वहिवाट आहे तीहि चिंत्य आहे.

अत्रापरपक्षेसप्तम्यादिदिनत्रयेमाघ्यावर्षश्राद्धंकर्तुंपूर्वेद्युःश्राद्धंकरिष्येमाघ्या वर्षश्राद्धंकरिष्येऽन्वष्टक्यश्राद्धंकरिष्येइतिक्रमेणसंकल्पंकृत्वासर्वोप्यष्टकाविधि राश्वलायनैःकार्यः इदमाश्वलायनानामष्टकाविकृतिरूपमेकाष्टकाकरणपक्षेपि कार्यम् इतरशाखिनात्वष्टकारूपमेवेतिपश्चाष्टकाकरणपक्षेऽष्टकाश्राद्धंकरिष्यइ-तिसंकल्प्यकार्यमेकाष्टकापक्षेतुनकार्यम् नवम्यामन्वष्टक्यश्राद्धंनवदैवतंसर्वशा-खिभिरष्टम्यामष्टकाश्राद्धाकरणेपिगृह्याग्नौयथोक्तविधिनाकार्यम् अस्यामन्वष्ट-क्यस्यमुख्यत्वात् गृह्याग्निरहितैस्तुयेषांपूर्वंमातामृतापश्चात्पितामृतस्तैर्मृतमाता-पितृकैःपाणिहोमादिविधिनानवदैवत्यंकार्यम् जीवत्पितृकेणमृतमातृकेणानुप-नीतेनापिमात्रादित्रितयमात्रोद्देशेनैकपार्वणकंपुरूरवार्द्रवदेवसहितंसपिण्डकंश्रा-द्धंकार्यम् स्वमातरिजीवन्त्यांमृतसापत्नमात्रादित्रयोद्देशेनकार्यम् स्वमातृसा-पत्नमात्रोर्मृतौद्विवचनप्रयोगेणसापत्नमात्रनेकत्वेचमात्रासहबहुवचनप्रयोगेण एकस्मिन्विप्रेएकएवक्षणोर्घ्यःपिण्डश्चैकएवदेयः पितामहीप्रपितामह्योर्द्वौविप्रौ पिण्डौचेत्येवंपार्वणमावश्यकम् केचिन्मातृबहुत्वेविप्रपिण्डादिभेदमाहुः स्व-मातृसापत्नमातृजीवनेतुगृह्याग्निरहितेनमृतपितृकेणापिनकार्यम् अन्वष्टक्येमा-तृयजनस्यमुख्यत्वादतएवात्रकैश्चिन्मातृपार्वणस्यैवप्राथम्यमुक्तमिति भातिपू-र्वंपितृमृतौपश्चान्मातृमृतावपिगृह्याग्निमतामस्यांनवम्यामन्वष्टक्यमावश्यकंनि-त्यत्वात् अन्येषांपश्चान्मातृमृतौनावश्यकम् केचिन्नवम्यांपूर्वमृतमातृश्राद्धंमृ-तेभर्तरिलुप्यतइतिवचनप्रामाण्यमाश्रित्यपितृमरणोत्तरंनकुर्वन्ति भर्तुरग्रेसहदाहे-नवामृतानांमातामहीभगिनीदुहितृमातृष्वसृपितृष्वस्रादीनामपुत्राणांपितृमात्रा-दिकुलोत्पन्नानांसर्वासामेवसौभाग्यवतीनामस्यांनवम्यांश्राद्धंकार्यम् भर्तुरग्रेमृता-नांतत्तद्भर्तृमरणोत्तरंचनकार्यम् अतएवास्याअविधवानवमीत्वप्रसिद्धिः अतः पत्न्या अपिनवमीश्राद्धंकार्यम् अस्याविधवानवमीश्राद्धस्यमहालयवद्यावद्वृश्चिक दर्शनं गौणकालःएवंदौहित्रप्रतिपच्छ्राद्धस्यापीतिकालतत्त्वविवेचने अत्राविधवा नवमीश्राद्धेसुवासिनीनांप्रतिसांवत्सरिकश्राद्धादौचसुवासिनीभोजनमपिकार्यम् भर्तुरग्रेमृतानारीसहदाहेनवामृता। तस्याःस्थानेनियुञ्जीतविप्रैः सहसुवासिनीम् १ इत्यादिमार्कंडेयवचनात् अस्यांनवम्यांपिण्डदानंजीवत्पितृकेणापिगर्भिणीप-तिनाचापिकार्यम् नवमीश्राद्धासंभवे ममान्वष्टक्याकरणजनितप्रत्यवायपरिहा-

रार्थं शतवारमोभिर्युभिःसुमनाइतिमन्त्रजपंकरिष्येइतिसंकल्प्यतज्जपंकुर्यात् अ-न्वष्टक्येसामवेदिभिःपितृपार्वणमेवकार्यं मातृमातामहपार्वणेन कार्ये इतिसिन्धुः

**भाद्रपद वद्य सप्तमी, अष्टमी व नवमीचीं श्राद्धें**—या अपरपक्षामध्यें—सप्तमी, अष्टमी व नवमी—या तीन दिवशीं 'माध्यावर्षश्राद्धं कर्तुं पूर्वेद्युः श्राद्धं करिष्ये माध्यावर्षश्राद्धं करिष्ये अन्वष्टक्यश्राद्धं करिष्ये' असा क्रमानें संकल्प करून, आश्वलायनांनीं सर्व अष्टकाविधि करावा. हें अष्टकाविकृतिरूप श्राद्ध आश्वलायनांनीं एकाष्टकाकरणपक्षींही करावें. इतर शाखीयांनीं अष्टकारूपच करावें. पंचाष्टकाकरणपक्षीं 'अष्टकाश्राद्धं करिष्ये' अशा संकल्पानें करावें. एकाष्टकापक्षीं करूं नये. नवमीला नऊ देवतांच्या उद्देशानें अन्वष्टक्यश्राद्ध सर्व शाखीयांनीं करावें. अष्टमीला अष्टकाश्राद्ध जरी केलें नसलें, तरी गृह्याग्नीसंबंधानें जो विधि सांगितला आहे, त्याच विधीनें करावें. कारण, त्या दिवशीं अन्वष्टक्यश्राद्धच मुख्य आहे. जे कोणी गृह्याग्निरहित असतील त्यांनीं, आणि माता आधीं मरण पावून मागाहून ज्याचा बाप मरण पावला असेल त्यानें म्हणजे मृतमातापितृकांनीं नऊ देवतांच्या उद्देशानें पाणिहोमादि विधीनें करावें. आई मेली असून, बाप जिवंत असतां जरी अनुपनीतता असली, तरी—आई, आजी व पणजी—या त्रयीच्या उद्देशानें एकपार्वणरूप पुरूरवार्द्रदेवसहित सपिंडक श्राद्ध करावें. स्वतःची आई जिवंत असून सावत्र आई मेलेली असल्यास, सापत्न मातृत्रयीच्या उद्देशानें करावें. स्वतःची आई आणि सावत्र आई अशा दोघीही मेलेल्या असल्यास द्विवचनप्रयोगानें, सापत्न माता जर अनेक असतील तर, स्वमातेसह बहुवचनप्रयोगानें एका ब्राह्मणाला एकच क्षण द्यावा आणि अर्घ्य व पिंडही एकेकच द्यावा. पितामही व प्रपितामही यांच्या श्राद्धांना दोन ब्राह्मण व दोन पिंड द्यावे—असें पार्वण आवश्यक आहे. माता जर अनेक असतील तर तितके ब्राह्मण व तितके पिंड द्यावे असेंही कोणी ग्रंथकार म्हणतात. स्वमाता व सापत्न माता जर जिवंत असतील, तर गृह्याग्नीनें रहित व ज्याचा बाप मेला आहे अशानेंही करूं नये. कारण, अन्वष्टक्य श्राद्धामध्यें मातृयजन हेंच मुख्य असल्यानें, त्या ठिकाणीं मातृपार्वणच आधीं करावें असें कांहीं ग्रंथकारांनीं सांगितलें आहे असें वाटतें. बाप मेल्यानंतर जर आई मेली असेल, तर गृह्याग्नीनें युक्त असणारांनीं या नवमीला अन्वष्टक्य श्राद्ध अवश्य करावें. कारण, तें नित्य आहे. गृह्याग्निरहित असे जे कोणी असतील, त्यांची माता पित्याच्या निधनानंतर जर मृत झाली असेल, तर त्यांना हें श्राद्ध आवश्यक नाहीं. बापाच्या आधीं मेलेल्या आईच्या श्राद्धाचा, बापाच्या मरणानंतर लोप होतो, हें वचन प्रमाण मानून कोणी नवमीचें श्राद्ध पितृमृत्यूनंतर करीत नाहींत. भर्त्याबरोबर सती गेलेल्या मातामही, भगिनी, कन्या, मातृष्वसा इत्यादि जर निपुत्रिका असतील, तर व पिता आणि माता यांच्या कुलांत उत्पन्न झालेल्या इतरही सर्व सौभाग्यवती सतींचें श्राद्ध या नवमी तिथीलाच करावें. नवऱ्याच्या आधीं मेलेल्या स्त्रियांचें श्राद्ध भर्तृनिधनानंतर करूं नये, म्हणूनच ही अविधवा नवमी या नांवानें प्रसिद्ध आहे.

याकरितांच पत्नीचें देखील नवमीश्राद्ध करावें. या अविधवानवमीचे श्राद्धाचा महालयाप्रमाणेंच वृश्चिकराशींत सूर्याचा प्रवेश होईपर्यंत गौणकाल आहे. दौहित्र प्रतिपदेच्या श्राद्धाचाही, सूर्य वृश्चिक राशींत जाईपर्यंत गौणकाल असल्याचें कालतत्त्वविवेचन ग्रंथांत सांगितलें आहे. अविधवानवमी श्राद्धाच्या ठिकाणीं आणि प्रतिसांवत्सरिक श्राद्धादिकांच्या ठिकाणीं सुवासिनीभोजनही द्यावें. नवऱ्याच्या आधीं मरण पावलेली स्त्री व नवऱ्याबरोबर सती गेलेली स्त्री यांच्या उद्देशानें त्यांच्या श्राद्धामध्यें ब्राह्मण व सुवासिनी यांना भोजन घालावें असें मार्कंडेयाचें वचन आहे. या नवमीच्या दिवशीं जीवत्पितृकांनीं अथवा गर्भिणीपतींनींही पिंडदान करावें. नवमीचें श्राद्ध करणें अशक्य असल्यास "ममान्वष्टक्याकरणजनितप्रत्यवायपरिहारार्थं शतवारं 'एभिर्द्युभिः सुमना०' इति मंत्रजपं करिष्ये" असा संकल्प करून, त्या मंत्राचा जप करावा. अन्वष्टक्यश्राद्धामध्यें सामवेदीयांनीं पितृपार्वण मात्र करावें. मातृपार्वण व मातामहपार्वण हीं करूं नयेत असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे.

**अत्रद्वादश्यांसंन्यासिनांमहालयः सचापराह्णव्यापिन्यामित्युक्तम् तत्रवैष्णवा अपराह्णव्यापिन्याद्वादश्याएकादशीव्रतदिनेसत्त्वेस्वल्पायामपिद्वादश्यांशुद्धत्रयोदश्यांवैकादशीपारणादिनेएवसंन्यासिदैवत्यंश्राद्धंकुर्वन्ति ममत्वीदृशेविषये वैष्णवैःसंन्यासिमहालयोदर्शेकार्यइतिभाति ।**

**संन्याशांचा महालय**—या द्वादशीला संन्याशांचा महालय करावा. याला अपराह्णव्यापिनी द्वादशी घ्यावी असें सांगितलें आहे. ही अपराह्णव्यापिनी द्वादशी जर एकादशीच्या व्रताच्या दिवशीं असेल, तर ती जरी अल्प द्वादशी असते, तरी त्याच दिवशीं अथवा शुद्ध त्रयोदशीला एकादशीच्या पारणादिवशीं संन्यासी देवतांच्या उद्देशानें वैष्णव श्राद्ध करतात. अशा प्रसंगीं वैष्णवांनीं संन्याशांचा महालय दर्श अमावास्येला करावा असें मला वाटतें.

**अत्रत्रयोदश्यां मघायुतायांकेवलायांवाश्राद्धंनित्यम् केवलमघायामपिश्राद्धं कार्यम् अत्र श्राद्धविधौबहुग्रन्थेषुबहवः पक्षाः अपुत्रेणपुत्रिणावागृहिणा सपत्नीकपितृपार्वणमातामहपार्वणाभ्यांपितृव्यभ्रातृमातुलपितृष्वसृमातृष्वसृभगिनीश्वशुरादिपार्वणैश्चसहितंअपिण्डकंसांकल्पविधिनाश्राद्धंकार्यम् अथवापित्रादिपार्वणद्वयंमहालयवत्पितृव्याद्येकोद्दिष्टगणांश्चोद्दिश्यसांकल्पविधिनाश्राद्धं कार्यम् यद्वादर्शवत्षड्दैवतंश्राद्धमपिंडकंकार्यम् अ वा निष्कामेणपुत्रिणा श्राद्धविधिनाश्राद्धंनानुष्ठेयंकिंतुपित्रादिपार्वणद्वयंकेवलं पितृव्यादिसहितंवोद्दिश्यैतेषांतृप्त्यर्थंब्राह्मणभोजनं करिष्यइतिसंकल्प्यपितृरूपिणेब्राह्मणायगन्धंसमर्पयामीत्येवंपञ्चोपचारान्समर्प्य ब्रह्मार्पणमित्यादिपाठित्वानेनब्राह्मणभोजनेनपित्रादिरूपीश्वरःप्रीयतामित्यन्नमुत्सृज्यपायसादिमधुरान्नेनविप्रान्भोजयित्वादक्षिणाभिःसंतोष्यस्वयंभुञ्जीतेत्येतावदेवकर्तव्यम् अपुत्रिणःसकामस्य चपिण्डदानरहितश्राद्धविधिनाश्राद्धंनदोषाय क्वचिदपुत्रिणःपिण्डदानमप्युक्तम् एवमुक्तपक्षेष्वन्यतमपक्षेणमघात्रयोदशीश्राद्धमवश्यानुष्ठेयम् अकरणेदोषोक्तेर्नित्यत्वा-**

तु हस्तनक्षत्रस्थेसूर्यमघायुतात्रयोदशीगजच्छायासंज्ञिता अस्यांश्राद्धेनफलभू-यस्त्वम् अत्रमहालयस्ययुगादेश्चप्राप्तौ मघात्रयोदशीमहालययुगादिश्राद्धानि-तन्त्रेणकरिष्यइतिसंकल्प्यतन्त्रेणकुर्यात् नतुदर्शेननित्यश्राद्धस्यैवकस्यचित्प्रसङ्गसिद्धिः अत्रैवंभाति अङ्गानामैक्यंप्रधानमात्रभेदस्तन्त्रम् तेनविश्वेदेवपाकाद्यङ्गानामै-क्यंविप्रार्घ्यपिण्डादेर्भेदएव प्रसङ्गसिद्धिस्थलेतुप्रधानमपिनभिद्यतइति त्रयो-दशीश्राद्धेऽपरपक्षत्वाद्धूरिलोचनाविश्वेदेवाःश्राद्धसागरेउक्ताःअविभक्तैरपि-भ्रातृभिर्मघात्रयोदशीश्राद्धंपृथक्कार्यमितिसिन्धुकौस्तुभादौ विभक्तैरपि सहैवे-तिश्राद्धसागरे ।

**मघात्रयोदशीश्राद्ध** — मघा नक्षत्रानें युक्त अथवा केवळ त्रयोदशीला श्राद्ध नित्य आहे. केवळ मघानक्षत्रावरहि श्राद्ध करावें. या श्राद्धविधी-संबंधानें अनेक ग्रंथांत अनेक मतें दिलेलीं आहेत. निपुत्रिक अथवा पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमीयानें, सपत्नीक पितृपार्वण व मातामहपार्वण यांसह—चुलता, भाऊ, मामा, आत, मावशी, बहीण, सासरा—इत्यादिकांच्या पार्वणासह पिंडरहित असें सांकल्प-विधीनें श्राद्ध करावें; अथवा बाप व आई यांचीं दोन पार्वणें आणि महालयाप्रमाणें पितृव्य इत्यादि एकोद्दिष्ट गणांच्या उद्देशानें सांकल्पविधीनें श्राद्ध करावें; किंवा दर्शश्राद्धाप्रमाणें सहा देवतांच्या उद्देशानें अपिंडक श्राद्ध करावें; अथवा निष्काम आणि पुत्रवान् अशानें श्राद्धविधीनें श्राद्ध जरी करूं नये, तरी पितृत्रयी व मातृत्रयी अशीं दोन पार्वणें केवळ पितृ-व्यादिकांना उद्देशून, 'एतेषां तृप्त्यर्थं ब्राह्मणभोजनं करिष्ये' असा संकल्प करावा आणि 'पितृरूपिणे ब्राह्मणाय गन्धं समर्पयामि' वगैरे पंचोपचार समर्पण करून 'ब्रह्मार्पणं' वगैरे पाठ म्हणावा, आणि 'अनेन ब्राह्मणभोजनेन पित्रादिरूपीश्वरः प्रीयताम्' असा उच्चार करून अन्नाचें उत्सर्जन करावें व खीर वगैरे मधुर अन्नानें ब्राह्मणांना भोजन घालावें. दक्षिणा वगैरे देऊन त्यांचा संतोष केल्यानंतर स्वतः भोजन करावें. हा प्रयोग इतकाच करावा. निपुत्रिक व सकाम अशा गृहस्थानें पिंडदानरहित अशा श्राद्धविधीनें जरी श्राद्ध केलें, तरी दोष नाहीं. निपुत्रिकानें पिंडदानही करावें असें क्वचित् ग्रंथांत सांगितलें आहे. या सांगितलेल्या पक्षांपैकीं एका पक्षाचा स्वीकार करून, मघात्रयोदशीश्राद्ध अवश्य करावें. कारण, तें न केल्यास दोष सांगितला आहे. म्हणूनच हें श्राद्ध नित्य आहे. सूर्य हस्तनक्षत्रीं असतां जर मघायुक्त त्रयोदशी येईल, तर तिला गजच्छाया असें नांव आहे. या दिवशीं श्राद्ध केल्यास पुष्कळ फलप्राप्ति होते. याच दिवशीं जर महालय आणि युगादि येतील, तर 'मघात्रयोदशीमहालययुगादिश्राद्धानितंत्रेण करिष्ये' असा संकल्प करून सर्व श्राद्धें तंत्रानें करावींत. दर्शश्राद्धानें नित्यश्राद्धासारखी कोणत्याही श्राद्धाची प्रसंगसिद्धि होत नाहीं. या बाबतींत मला असें वाटतें कीं, अंगभूत कर्में एकच असतां प्रधानकर्मांत भेद असणें याचें नांव तंत्र. विश्वदेव, पाक वगैरे अंगें सर्वांचीं एकच आहेत; यासाठीं—ब्राह्मण, अर्घ्य, पिंड वगैरे जीं प्रधान कर्में, तीं निराळीं करावींत. प्रसंगसिद्धिस्थळीं देखील प्रधान कर्म भिन्न करूं नये. त्रयो-दशीश्राद्ध अपरपक्षीय आहे; यास्तव, या ठिकाणीं धूरिलोचनसंज्ञक विश्वेदेव

घ्यावें असें श्राद्धसागरग्रंथांत सांगितलें आहे. एकत्र राहणाऱ्या भावांनीं मघात्रयोदशीश्राद्ध निरनिराळें करावें, असें निर्णयसिंधु, कौस्तुभ वगैरे ग्रंथांतून सांगितलें आहे. भाऊ जरी विभक्त असले, तरी त्यांनीं हें श्राद्ध सर्वांनीं मिळून एकत्र करावें, असें श्राद्धसागरांत सांगितलें आहे.

अथात्रचतुर्दश्यांपित्रादित्रयमध्येएकस्यापिशस्त्रविषाग्निजलादिशृङ्गिव्याघ्रसर्पादिनिमित्तेनदुर्मरणेनमृतस्यैकोद्दिष्टविधिनाश्राद्धंकार्यम् पित्रादिद्वयोःशस्त्रादिहतत्वेद्वेएकोद्दिष्टेकार्ये पित्रादीनांत्रयाणांशस्त्रादिहतत्वे पार्वणमेवकार्यम् केचिदेकोद्दिष्टत्रयं कार्यमित्याहुः सहगमनेप्रयागादौचविधिप्राप्तेऽग्निजलादिमरणे चतुर्दशीश्राद्धंनकार्यम् युद्धप्रायोपवेशनयोर्वैधत्वेपीदंकार्यम् अत्रशस्त्रादिहतपितृव्यभ्रात्रादेरप्यपुत्रस्यैकोद्दिष्टंकार्यम् इदंधूरिलोचनसंज्ञकदेवसहितंकार्यम् अत्रसंबंधगोत्रनामाद्युच्चार्यामुकनिमित्तेनमृतस्यचतुर्दशीनिमित्तमेकोद्दिष्टं श्राद्धं सदैवंसपिण्डंकरिष्यइतिसंकल्प्य प्रत्येकोद्दिष्टमेकार्घ्यैकपवित्रैकपिण्डयुतंश्राद्धं कार्यम् पित्रादेर्भ्रात्रादेश्चशस्त्रहतत्वेपृथक्पाकादिनामहालयवत्सहतन्त्रेणवैकोद्दिष्टद्वयादि एवंचतुर्दश्यामेकोद्दिष्टंकृत्वापित्रादिसर्वपितृगणोद्देशेनसकृन्महालयास्तिथ्यन्तरेऽवश्यंकार्यः अस्यांचतुर्दश्यांयदिशस्त्रादिमृतयोर्मातापित्रोर्मृताहस्तदाचतुर्दशीनिमित्तमेकोद्दिष्टंकृत्वापुनस्तदैवमृतादित्रयोद्देशेनसांवत्सरिकंपार्वणविधिनाकार्यमितिश्राद्धसागरे कौस्तुभादौतुसांवत्सरिकपार्वणेनैवचतुर्दशी श्राद्धसिद्धिर्नपृथक्कार्यमित्युक्तम् दिनान्तरेचसकृन्महालयःकार्यः अत्रचतुर्दशीश्राद्धस्यकथंचिद्विघ्नेतुअत्रैवपक्षेऽग्निसपक्षेवा दिनान्तरेतत्पार्वणविधिनैवकार्यनत्वेकोद्दिष्टम् अत्रैकोद्दिष्टपराह्णव्यापिन्येवचतुर्दशीग्राह्यान्यत्वितरैकोद्दिष्टतिथिवन्मध्याह्नव्यापिनीतिकौस्तुभे ।

**चतुर्दशीश्राद्ध**—बाप, आजा आणि पणजा यांपैकीं कोणी जर शस्त्र, विष, अग्नि, जल, शिंगाचे प्राणी, वाघ, सर्प, विद्युत्पात वगैरे निमित्तांच्या दुर्मरणांपैकीं कशानेंही मरण पावला असेल, तर एकोद्दिष्टविधीनें श्राद्ध करावें. बाप व आजा यांचे मृत्यु जर शस्त्रादिकांनीं झाले असतील तर दोन एकोद्दिष्टें करावीं. तिघेही शस्त्रादिकांनीं मृत्यु पावले असल्यास पार्वणच करावें. तीन एकोद्दिष्टें करावीं, असेंही कांहीं ग्रंथकारांचें मत आहे. सहगमन, प्रयाग वगैरे ठिकाणीं विधिप्राप्त असे अग्नि, जल वगैरेपासून जर मृत्यु आला असेल तर चतुर्दशीश्राद्ध करूं नये. प्रायोपवेशन म्हणजे जें उपवास करून स्वेच्छेनें मरण पावणें तें, आणि युद्ध यांनीं जर विधिप्राप्त मृत्यु आला असेल तर चतुर्दशीश्राद्ध करावें. या श्राद्धानें निपुत्रिक चुलता, भाऊ वगैरेंचें देखील एकोद्दिष्ट करावें हें श्राद्ध धूरिलोचन नांवाच्या विश्वेदेवांसह करावें. संबंध, गोत्र नांव इत्यादिकांचा उच्चार करून, 'असुकनिमित्तेन मृतस्य चतुर्दशीनिमित्तमेकोद्दिष्टंश्राद्धं सदैवं सपिंड करिष्ये' असा संकल्प करावा आणि प्रत्येक उद्दिष्टाला एक अर्घ्य, एक पवित्रक व एक पिंड यांनीं युक्त असें श्राद्ध करावें. पित्रादि अथवा भ्रात्रादि यांपैकीं जर कोणी शस्त्रापासून मृत झाला असेल, तर महालया-

प्रमाणें निराळा पाक करून, अथवा सहतंत्रानें दोन एकोद्दिष्टें, करावींत. याप्रमाणें चतुर्दशीच्या दिवशीं एकोद्दिष्ट करून बाप वगैरे सर्व पितृगणांच्या उद्देशानें इतर तिथीचे दिवशीं सकृन्महालय अवश्य करावा. या चतुर्दशीच्या दिवशीं शस्त्रादिकांपासून मृत झालेल्या मातापितरांचा जर मृत्युदिन असेल, तर चतुर्दशीश्राद्धानिमित्त एकोद्दिष्ट करून त्याच दिवशीं पुन्हां मृताच्या त्रयीच्या उद्देशानें सांवत्सरिक श्राद्ध पार्वणविधीनें करावें असें श्राद्धसागरग्रंथांत सांगितलें आहे. सांवत्सरिक श्राद्धाच्या पार्वणानेंच चतुर्दशी-श्राद्धाची सिद्धी होते, तें निराळें करायला नको, असें कौस्तुभ वगैरे ग्रंथांतून सांगितलें आहे. इतर दिवशीं सकृन्महालय करावा. या चतुर्दशीश्राद्धाला कांहीं विघ्न आल्यास, याच पक्षांत अथवा पुढील पक्षांत इतर कोणत्या तरी दिवशीं, हें श्राद्ध पार्वणविधीनेंच करावें, एकोद्दिष्ट करूं नये. या श्राद्धाच्या एकोद्दिष्टाविषयीं अपराह्ण-व्यापिनी चतुर्दशीच घ्यावी. इतर एकोद्दिष्टांप्रमाणें मध्याह्नव्यापिनी तिथि घेऊं नये, असें कौस्तुभांत सांगितलें आहे.

**हस्तनक्षत्रेसूर्येसतिचान्द्रहस्तनक्षत्रयुतामावास्यागजच्छायातस्यांश्राद्धदानादिकार्यम् इत्यमायांगजच्छाया आश्विनशुक्लप्रतिपदिदौहित्रेणानुपनीतेनापिसपत्नीकमातामहस्यपार्वणंमातुलेसत्यपिअवश्यंकार्यम् मातामहीसत्त्वेकेवलमातामहपार्वणम् इदंजीवत्पितृकेणैवकार्यम् इदंसपिण्डकमपिण्डकंवा अत्रपुरूरवार्द्रवसंज्ञकाविश्वेदेवाः धूरिलोचना इतिकेचित् इयंप्रतिपदपराह्णव्यापिनी ग्राह्येतिबहवः संगवव्यापिनीतिकेचित् अस्यश्राद्धस्ययावद्वृश्चिकदर्शनंगौणकालइतिकालतत्त्वविवेचने इतिमहालयादिनिर्णयोद्देशः ।**

**दौहित्रनिर्णय**—सूर्य हस्तनक्षत्रीं असतां, चंद्र हस्तनक्षत्रानें युक्त अशा अमावास्येला गजच्छाया असें नांव आहे. या दिवशीं श्राद्धदानादि कर्मे करावींत. याप्रमाणें, अमावास्येच्या दिवशीं गजच्छायापर्वणीचा निर्णय सांगितला. आश्विन शुद्ध प्रतिपदेला दौहित्रानें म्हणजे मुलीच्या मुलानें, त्याचें जरी उपनयन (मुंज) झालें नसलें, तरीही मातुल (मामा) जिवंत असतांनाही सपत्नीक मातामहाचें (आईच्या बापाचें) पार्वणश्राद्ध अवश्य करावें. आईची आई जर जिवंत असेल, तर फक्त मातामहपार्वण करावें. हें श्राद्ध ज्याचा बाप जिवंत आहे अशानेंच करावें. हें सपिंडक अथवा अपिंडक केलें तरी चालतें. या श्राद्धाला पुरूरवार्द्रनांवाचे विश्वेदेव घ्यावेत. कोणी ग्रंथकार धूरिलोचन घ्यावेत असेंही म्हणतात. ही प्रतिपदा अपराह्ण-व्यापिनी घ्यावी असें अनेक ग्रंथकारांचें म्हणणें आहे. संगवकालव्यापिनी घ्यावी असेंहि कांहीं ग्रंथकाराचें मत आहे. या श्राद्धाचा गौण काल, सूर्य वृश्चिकराशीला जाईपर्यंत आहे, असें कालतत्त्वविवेचन नांवाच्या ग्रंथांत सांगितलें आहे. याप्रमाणें महालयादिकांच्या निर्णयाचा उद्देश आहे.

**अथकपिलाषष्ठीनिर्णयः । भाद्रपदकृष्णपक्षेभौमवारव्यतीपातरोहिणीयुताषष्ठीकपिलाषष्ठी अत्रहस्तस्थेफलातिशयः अयंयोगोदिवैवग्राह्योनरात्रौ सूर्यपर्वत्वादितिभाति अस्यांहुतंचदत्तंचसर्वंकोटिगुणंभवेत् । अत्रश्राद्धंकार्यं**

मितिविशेषवचनंनोपलभ्यते तथापिअलभ्ययोगेश्राद्धविधानाद्दर्शवतषड्दैवतं-श्राद्धंकार्यम् ।

**कपिलाषष्ठीनिर्णय**—भाद्रपदाच्या कृष्णपक्षांत मंगळवार, व्यतिपात व रोहिणी यांनीं युक्त अशी जी षष्ठी तिला कपिलाषष्ठी असें नांव आहे. या तिथीला जर हस्तनक्षत्रयुक्त सूर्य असेल, तर त्याचें अतिशय फळ आहे. ही सूर्यपर्वणी असल्यानें हा योग दिवसासच ग्राह्य असून रात्रींचा अग्राह्य आहे असें मला वाटतें. या दिवशीं होमदानादि केल्यानें कोटिपट फळ मिळतें. या दिवशीं श्राद्ध करण्याच्या बाबतींत विशेष असें वचन जरी आढळत नाहीं, तरी अलभ्य योगावर श्राद्ध करावें या सामान्यनियमानें दर्शश्राद्धाप्रमाणें सहा देवतांच्या उद्देशानें श्राद्ध करावें.

अथात्र संक्षेपतो व्रतविधिः ॥ सूर्योद्देशेनोपवाससंकल्प्य देवदारुशंगिकुंकुमैलामनःशिलापद्मकाष्टतण्डुलान्मधुगव्याभ्यांपेषयित्वाक्षीरालोडितेनकल्केनाङ्गंविलिप्यस्नायात् तत्रमंत्रः आपस्त्वमसिदेवेशज्योतिषांपतिरेवच । पाप नाशयमेदेववाङ्मनःकायकर्मजम् १ ततःपञ्चगव्येनस्नात्वापञ्चपल्लवैर्मार्जयित्वामृत्तिकास्नानंकुर्यात् तर्पणादिनित्यविधिंकृत्वावरुणंपूजयित्वासर्वतोभद्रमध्येकलशोपरितण्डुलादौपद्मं लिखित्वातस्याष्टसुपत्रेषुपूर्वादौसूर्यंतपनंस्वर्णरेतसंरविमादित्यंदिवाकरंप्रभाकरं सूर्यमित्यावाह्यमध्येसौवर्णरथेसूर्यमरुणंचावाह्यकरवीरार्कादिपुष्पैर्धूपादिभिःसंपूजयेत् दिक्पालादिदेवताःसंपूज्यद्वादशार्घ्यान्सूर्यायदद्यात् सविस्तरःपूजाविधिर्द्वादशार्घ्यमन्त्राश्चकौस्तुभेज्ञेयाः सूर्यार्घ्ये प्रभाकरनमस्तुभ्यंसंसारान्मांसमुद्धर। भुक्तिमुक्तिप्रदोयस्मात्तस्माच्छान्तिंप्रयच्छमे १ नमोनमस्तेवरदऋक्सामयजुषांपते । नमोस्तुविश्वरूपायविश्वधात्रेनमोस्तुते २ इतिप्रार्थ्यउदुत्यमित्यादिसौरसूक्तानिजपित्वारात्रौजागरणं कृत्वाप्रातराकृष्णेनेतिमन्त्रेणार्कसमिच्चर्वाज्यतिलैःप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतंहुत्वाघण्टादिसर्वालंकारयुतांकपिलांगांमन्त्रैःसंपूज्य विप्रायदद्यात् गोपूजामन्त्राःकौस्तुभे-दानमन्त्रस्तु नमस्तेकपिलेदेविसर्वपापप्रणाशिनि । संसारार्णवमग्नंमां गोमातस्त्रातुमर्हसि १ वस्त्रयुगच्छन्नांसघण्टामित्यादिविशेषणान्युक्त्वाइमांगांतुभ्यमहंसंप्रददेइतिदत्वासुवर्णदक्षिणांदद्यात् ततस्तस्मैविप्रायरथंसूर्यप्रतिमांचदद्यात् तत्रमन्त्रः दिव्यमूर्तिर्जगच्चक्षुर्द्वादशात्मादिवाकरः । कपिलासहितोदेवोममभुक्तिंप्रयच्छतु १ यथात्वंकपिलेपुण्यासर्वलोकस्यपावनी । प्रदत्तासहसूर्येणममभुक्तिप्रदाभव २ इत्यादि ततःकपिलाप्रार्थनादिविस्तारः कौस्तुभे अथवोपोषणजागरहोमादिविधिमकृत्वाषष्ठ्यामेवस्नानरथादिपूजनकपिलादानादिकार्यम् इतिसंक्षेपतः कपिलाषष्ठीव्रतविधिः इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिन्धुसारेभाद्रपदमासकृत्यनिर्णयोद्देशः ।

**कपिलाषष्ठीव्रतविधि**—या व्रताचा उपवास सूर्याच्या उद्देशानें करून, देवदारु, वाळा, वेलची, मनशीळ, पद्मकाष्ठ व तांदूळ—हे पदार्थ

मध आणि गाईचें तूप यांत वांटून त्याचा दुधामध्यें कालवून तयार केलेला कल्क अंगाला लावून स्नान करावें. स्नानाचा मंत्र–'आपस्त्वमासि देवेश ज्योतिषां पतिरेव च। पापं नाशय मे देव वाङ्मनःकायकर्मजम् ॥' या स्नानानंतर पंचगव्यानें स्नान करावें आणि पंचपल्लवांनीं–(अश्वत्थ, वड, उंबर, आंबा व पायरी यांचीं पानें) मार्जन केल्यावर मृत्तिकास्नान करावें. तर्पण वगैरे नित्यविधि करून वरुणाची पूजा करावी. सर्वतोभद्र मंडळाच्या मध्यभागीं कलशावर तांदुळानें भरलेलें पूर्ण पात्र ठेवून तांदुळाचें कमळ करावें. त्याच्या आठ पाकळ्यांच्या ठिकाणीं, पूर्वेकडून आरंभ करून सूर्य, तपन, स्वर्णरेतस, रवि, आदित्य, दिवाकर, प्रभाकर व सूर्य यांचें आवाहन केल्यावर, मध्यभागीं सुवर्णाच्या रथावर सूर्य व त्याच्या अग्रभागीं वरुण यांचें आवाहन करावें. कण्हेर, रुई वगैरे फुलांनीं व धूपदीपांनीं पूजा करावी. दिक्पालादि देवतांची पूजा करून, सूर्याला बारा अर्घ्य द्यावे. सविस्तर पूजाविधि व बारा अर्घ्यांचे मंत्र कौस्तुभांत पहावेत. नंतर सूर्यापुढें 'प्रभाकर नमस्तुभ्यं संसारान्मां समुद्धर। भक्तिमुक्तिप्रदो यस्मात्तस्माच्छांतिं प्रयच्छ मे॥ नमो नमस्ते वरद ऋक्सामयजुषांपते। नमस्तु विश्वरूपाय विश्वधात्रे नमोस्तुते'' ॥ या मंत्रांनीं प्रार्थना करावी. नंतर 'उदुत्यं' इत्यादि सौर सूक्तांचा जप करून, रात्रीं जागरण करावें. प्रातःकाळीं 'आकृष्णेन०' या मंत्रानें, रुईच्या समिधा, चरु, आज्य व तीळ यांचा प्रत्येकीं १०८ याप्रमाणें होम करून, घंटा इत्यादि सर्व अलंकारांनीं युक्त असलेल्या कपिला गाईचें मंत्रांनीं पूजन करावें, आणि ती ब्राह्मणाला दान द्यावी. गोपूजेचे मंत्र कौस्तुभांत पहावेत. दानाचा मंत्रः—'नमस्ते कपिले देवि सर्वपापप्रणाशिनि। संसारार्णवमग्नं मां गोमातस्त्रातुमर्हसि॥' दोन वस्त्रांनीं आच्छादित व घंटादिकांनीं युक्त वगैरे विशेषणांचा उच्चार करून 'इमां मां तुभ्यमहं संप्रददे' असें म्हणून गाय दान द्यावी. दानाबरोबर सुवर्णदक्षिणा द्यावी. त्यानंतर त्या ब्राह्मणाला रथ व सूर्याची प्रतिमा द्यावी. त्याचे मंत्रः—'दिव्यमूर्तिजगच्चक्षुर्द्वादशात्मा दिवाकरः। कपिलासहितो देवो मम मुक्तिंप्रयच्छतु॥ यथा त्वं कपिले पुण्या सर्व लोकस्य पावनी। प्रदत्ता सह सूर्येण ममसुक्तिप्रदाभव॥ वगैरे. यानंतर कपिला गाईची प्रार्थना करावी. त्याबद्दलची माहिती कौस्तुभांत पहावी. अथवा उपोषण, जागरण होम वगैरे विधि न करतां, षष्ठीच्याच दिवशीं स्नान, रथादिकांचें पूजन, कपिला गाईचें दान वगैरे करावें. याप्रमाणें संक्षेपानें कपिलाषष्ठी व्रताचा विधि सांगितला. 'इति श्रीमदनन्तोपाध्यायसूनु काशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिन्धुसारे भाद्रपदमासकृत्यनिर्णयोद्देशः॥'

अथाश्विनमासः। तुलामेषसंक्रांतिर्विषुवसंज्ञा तस्याःपूर्वाःपराश्चपञ्चदशपञ्चदशनाड्यः पुण्यकालः विशेषःप्रागुक्तएव आश्विनशुक्लप्रतिपदिदेवीनवरात्रारम्भः नवरात्रशब्दःआश्विनशुक्लप्रतिपदमारभ्यमहानवमीपर्यन्तंक्रियमाणकर्मनामधेयम् तत्रकर्मणिपूजैवप्रधानं उपवासादिकंस्तोत्रजपादिकंचांगम् तथा चयथाकुलाचारमुपवासैकभक्तनक्तायाचितान्यतमव्रतयुक्तंयथाकुलाचारंसप्तशती लक्ष्मीहृदयादिस्तोत्रजपसहितंप्रतिपदादिनवम्यन्तनवतिथ्यधिकरणपूजाख्यंक-

मेनवरात्रशब्दवाच्यम् पूजाप्राधान्योक्तेरेवक्वचित्कुलेजपोपवासादिनियमस्य-व्यतिरेकउपलभ्यते पूजायास्तुनक्वापिकुलेनवरात्रकर्मण्यभावोदृश्यतेयत्कुलेनव-रात्रमेवनानुष्ठीयतेतत्रनवरात्रपूजादेरप्यभावआस्तांनामसचनवरात्रारम्भः सूर्यो-दयोत्तरंत्रिमुहूर्तव्यापिन्यांप्रतिपदिकार्यः तदभावेद्विमुहूर्तव्यापिन्यामपि क्वचि-न्मुहूर्तमात्रव्यापिन्यामप्युक्तःसर्वथादर्शयुक्तप्रतिपादनकार्य इतिबहुग्रन्थसंम-तम् मुहूर्तन्यूनव्याप्तौसूर्योदयास्पर्शेवादर्शयुतापिग्राह्या प्रथमदिनेषष्टिघटिका-प्रतिपद्द्वितीयदिनेमुहूर्तद्वयादिपरिमितावर्धते तदापूर्णत्वात्पूर्वैवग्राह्या द्वितीया वेधनिषेधोपिएतत्पक्षद्वयेएवयोज्यः पुरुषार्थचिन्तामणौतुपूर्वदिनेमुहूर्तचतुष्टयो त्तरंमुहूर्तपञ्चकोत्तरंवाप्रवृत्ताद्वितीयदिनेमुहूर्तद्वयादिपरिमिताप्रतिपत् तदापर-स्याःक्षयगामितयानिषिद्धत्वादमायुक्तापिपूर्वैवग्राह्येत्युक्तम् तत्रसूर्योदयोत्तरंद-शघटीमध्येतत्रासंभवेमध्याह्नेऽभिजिन्मुहूर्तेप्रारम्भःकार्योनत्वपराह्णे एवंच प्रति-पदआद्यषोडशनाडीनिषेधश्चित्रावैधृतियोगनिषेधश्चोक्तकालानुरोधेनसतिसंभवे पालनीयोनतुनिषेधानुरोधेनपूर्वाह्णःप्रारम्भकालः प्रतिपत्तिथिर्वातिक्रमणीयाः।

**आश्विनमासांतील कृत्यें**—तुलासंक्रांति व मेषसंक्रांति यांना विषुव अशी संज्ञा आहे. विषुवसंक्रांतीच्या पहिल्या व अखेरच्या पंधरा पंधरा घटका पुण्यकाल असतो. याचा विशेष निर्णय पूर्वी सांगितलाच आहे. आश्विन शुक्ल प्रतिपदेला देवीच्या नवरात्राचा प्रारंभ होतो. नवरात्र या शब्दानें आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून आरंभ करून महानवमीपर्यंत करायचें जें कर्म तें होय. या कर्मांत पूजा प्रधान आहे. उपवासादिक, स्तोत्रपाठ, जप वगैरे हीं त्याचीं अंगें होत. उपवास एकभुक्त, नक्त, अयाचित यांपैकीं जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें एखादें व्रत आणि सप्तशती, लक्ष्मीहृदयादि स्तोत्रें वगैरेंचे पाठ व जप यांचा जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें प्रतिपदेपासून नवमीपर्यंत नऊ तिथींचे दिवशीं करायचें जें पूजाख्य कर्म—तो नवरात्र या शब्दाचा अर्थ जाणावा. यांत पूजेचें प्राधान्य सांगितलें असल्यानें क्वचित् कुळांत जप, उपवास वगैरेंचा अभाव आढळतो. नवरात्रकर्मांत पूजेचा मात्र अभाव कोणच्याही कुळांत आढळत नाहीं. ज्या कुळांत मुळीं नवरात्रच करीत नाहींत, त्यांमध्यें पूजेचाही अभाव असल्यास नवल नाहीं. अशांची गोष्ट वेगळी. नवरात्राचा आरंभ सूर्योदयानंतर सहा घटिका व्यापणाऱ्या प्रतिपदेला करावा. त्याच्या अभावीं चार घटिकाव्यापिनी प्रतिपदाही घ्यावी. दोन घटिकाव्यापिनीही घेण्यास कांहीं ग्रंथांत सांगितलें आहे. अमावास्यायुक्त प्रतिपदेचे दिवशीं मात्र आरंभ करूं नये, असें बऱ्याच ग्रंथांना संमत आहे. दोन घटिकांहूनही जर व्याप्ति कमी असेल, अथवा सूर्योदयकालीं जर प्रतिपदा नसेल, तर अमावास्यायुक्त देखील घ्यावी. पूर्व दिवशीं साठ घटिका प्रतिपदा व दुसरे दिवशीं चार घटिका इत्यादि जर वृद्धि असेल, तर पूर्ण आहे म्हणून पूर्व दिवसाचीच घ्यावी. या दोन्ही पक्षीं द्वितीयावेधाचा निषेध योजावा. पूर्व दिवशीं आठ घटिकानंतर आरंभ झालेली व दुसऱ्या दिवशीं चार घटिका इत्यादि परिमित अशी जर प्रतिपदा असेल, तर दुसरी क्षयाला जाणारी

म्हणून तिचा निषेध आहे. यास्तव, पूर्व दिवसाचीच घ्यावी असें पुरुषार्थचिंतामणींत सांगितलें आहे. त्या ठिकाणीं सूर्योदयानंतर जर दहा घटिकांमध्यें, तसा संभव नसेल तर, मध्यान्हकाळीं अभिजित् मुहूर्तावर आरंभ करावा. अपराह्णकाळीं आरंभ करूं नये. याप्रमाणें प्रतिपदेच्या पहिल्या सोळा घटकांचा निषेध, चित्रा व वैधृति या दोहोंचा निषेध, हे उक्त काळाच्या अनुरोधानें संभव असेल तर पाळावेत. निषेधाच्या अनुरोधानें पूर्वाह्णकाळीं प्रारंभ करूं नये, अथवा प्रतिपदा तिथीचाही अतिक्रम करूं नये.

अत्रकर्मणिब्राह्मणादिचतुर्वर्णस्यम्लेच्छादेश्चाधिकारः तत्रविप्रेणजपहोमान्नबलिनैवेद्यैःसात्त्विकीपूजाकार्या नैवेद्यैश्चनिरामिषैः। मद्यंदत्त्वाब्राह्मणस्तुब्राह्मण्यादेवहीयते । मद्यमपेयमदेयमित्यादिनिषेधान्मांसमद्यादियुतराजसपूजायां ब्राह्मणस्यनाधिकारः मद्यपानेमरणान्तप्रायश्चित्तोक्तेःस्पर्शेतदङ्गच्छेदोक्तेश्चाल्पप्रायश्चित्तेनदोषानपगमेनपातित्यापातात्इत्थमेवसर्वेप्राचीनानवीनाश्चनिबन्धकारानिर्बन्धेनालिखन्ति नवीनतराभास्कररायप्रभृतयोपिसप्तशतीटीकाद्यैप्राचीनग्रंथाननुसृत्यैवमेवपरिष्कुर्वन्तिसभायां चैतन्मतमेवश्लाघन्तेच आचरणंत्वन्यथाकुर्वन्तितत्किंस्वयंदुर्दैववशेनब्राह्मण्यभ्रष्टोभूवमन्येप्येवंमाभूवन्नितिभूतदययावास्वपातित्यगोपनायवान्येषांकलियुगस्थविप्राणामधिकाराभावालोचनयावेतिनवयंतत्त्वंजानीमः क्षत्रियवैश्ययोर्मांसादियुतजपहोमसहितराजसपूजायामप्यधिकारः सचकेवलंकाम्यएवनतुनित्यः निष्कामक्षत्रियादेः सात्त्विकपूजाकरणे मोक्षादिफलातिशयः एवंशूद्रादेरपिशूद्रादेर्मन्त्रहीनाजपादिरहितामांसादिद्रव्यकातामसपूजापिविहिता शूद्रेणसप्तशत्यादिजपहोमसहिता सात्त्विकी पूजाब्राह्मणद्वाराकार्या स्त्रीशूद्रादेःस्वतःपौराणमन्त्रपाठेपिनाधिकारः अतएवशूद्रः सुखमवाप्नुयादित्यत्रभाष्येस्त्रीशूद्रयोःश्रवणादेवफलंनतुपाठादित्युक्तम् एतेन स्त्रीशूद्रयोर्गीताविष्णुसहस्रनामपाठोदोषायैवेतिज्ञेयम् अन्यत्रपौराणमन्त्रयुक्तपूजायांस्त्रीशूद्रयोःस्वतोप्यधिकारउक्तः तेनगीतादेः पठनंनदोषायेतिसिद्ध्यति जपहोमादौविप्रद्वारैव म्लेच्छादीनांतुब्राह्मण द्वारापिजपहोमसमन्त्रकपूजायांचनाधिकारः किंतुतैस्तत्तदुपचाराणांदेवीमुद्दिश्यमनसोत्सर्गमात्रंकर्तव्यम् ।

**नवरात्रकर्म**—नवरात्रकर्मांत ब्राह्मणादि चार वर्ण व म्लेंच्छादिकांना अधिकार आहे. ब्राह्मणांनीं जप, होम, अन्नबली व नैवेद्य यांनीं सात्विक पूजा करावी. 'मद्य हें अपेय व अदेय आहे' इत्यादि निषेधवाक्यांवरून, मांस, वगैरेनीं युक्त अशा राजसपूजेचा ब्राह्मणांना अधिकार नाहीं. कारण, मद्यपान केल्यास मरणान्त प्रायश्चित्त सांगितलें आहे; आणि मद्याचा स्पर्श झाल्यास तो अवयव तोडावा असेंही सांगितलें आहे. म्हणून, यापेक्षां अल्पप्रायश्चित्तानें दोष नाहींसा होत नसून, पातित्य प्राप्त होतें. सर्व प्राचीन व अर्वाचीन निबंधकार याप्रमाणेंच निश्चयेंकरून लिहितात. नवीन भास्कररायप्रभृति ग्रंथकार देखील सप्तशतीवरील टीकादिकांमध्यें प्राचीन ग्रंथांना अनुसरूनच या निर्बंधाचा पुरस्कार

करतात, व सभेमध्येंही याच मताची जरी प्रशंसा करतात, तरी आचरण मात्र विरुद्ध करतात. आपण दुर्दैवानें ब्राह्मण्यापासून भ्रष्ट झालों, इतर तरी कोणी होऊं नये अशा भूतदयेनें प्रेरित होऊन, ते ग्रंथकार असें सांगतात, अथवा आपलें पातित्य झांकण्या-साठीं सांगतात, किंवा कलियुगांतील इतर ब्राह्मणांना अधिकार नाहीं असें समजून सांगतात, याबद्दल आम्हांला कशाचीच फोड होत नाहीं. क्षत्रिय आणि वैश्य यांना मांसादिकांनीं युक्त व जप आणि होम यांच्यासहित अशा राजसपूजेचा अधिकार आहे. हा अधिकार केवळ काम्य आहे; नित्य नाहीं. निष्काम अशा क्षत्रियानें जरी सात्त्विक पूजा केली, तरी मोक्षादिफलाशय प्राप्त होतो. याप्रमाणेंच शूद्रादिकांनाही सात्त्विक पूजेनें फलातिशय प्राप्त होतो. शूद्रादिकांना मंत्ररहित व जपरहित अशी मांसादिकांनीं युक्त तामसपूजा विहित आहे. शूद्रानें सप्तशतीपाठ, जप व होम यांनीं युक्त सात्त्विक पूजा ब्राह्मणाकडून करवावी. स्त्री व शूद्र यांना स्वतः पुराणमंत्रांचा पाठ करण्याचा अधिकार नाहीं. म्हणून, 'शूद्र सुख पावेल' इत्यादि वाक्यांवरील भाष्यामध्यें, स्त्री व शूद्र यांना श्रवणानेंच फलप्राप्ति होते, पाठानें होत नाहीं असें सांगितलें आहे. यावरून, स्त्रिया व शूद्र यांनीं गीता व विष्णुसहस्र-नाम यांचे पाठ केले असतां दोष आहे असें समजावें. असें आहे तरी, स्त्रिया व शूद्र यांना पुराणमंत्रांनीं स्वतः पूजा करण्याचा अधिकार आहे, असेंही कांहीं ग्रंथ-कारांनीं लिहिलें आहे. यावरून, गीता व विष्णुसहस्रनाम यांचे पाठ करण्यास त्यांना दोष नाहीं असें सिद्ध होतें. जपहोमादि कर्म ब्राह्मणाकडून करवावें. म्लेंच्छादिकांना जप, होम व समंत्रक पूजा—हीं ब्राह्मणाकडून देखील करविण्याचा जरी अधिकार नाहीं, तरी ते सर्व उपचार त्यांनीं देवीच्या उद्देशानें मनानें करावेत.

**अथनवरात्रेऽनुकल्पाःतृतीयादिनवम्यन्तंसप्तरात्रंवाकर्तव्यम् पञ्चम्यादिपञ्च-रात्रंवासप्तम्यादित्रिरात्रंवा अष्टम्यादिद्विरात्रंवा एकाहपक्षेकेवलाष्टम्यांकेवल-नवम्यांवा एषांपक्षाणांस्वस्वकुलाचारानुसारेण प्रतिबन्धादिनापूर्वपूर्वपक्षासंभ-वानुसारेणवाव्यवस्थातत्रतृतीयापञ्चम्योर्निर्णयःप्रतिपदादिवत् सप्तम्यादेस्तुनिर्ण-योवक्ष्यते नवरात्रादिपक्षेषुक्षयवृद्धिवशेनदिनाधिक्यन्यूनत्वे पूजाद्यावृत्तिः कार्या केचित्तुदिनक्षयेष्टावेवपूजाश्चण्डीपाठांश्चकुर्वन्ति इदं देवीपूजनात्मकंनव-रात्रकर्मनित्यं अकरणेदोषश्रवणात् फलश्रवणात्काम्यंच ।**

**नवरात्राचे गौणपक्ष**—तृतीयेपासून नवमीपर्यंत सात दिवस नवरात्र करावें. पंचमीपासून नवमीपर्यंत पांच दिवस नवरात्र करावें. सप्तमीपासून नवमीपर्यंत तीन दिवस नवरात्र करावें. अष्टमीपासून नवमीपर्यंत दोन दिवस नवरात्र करावें. एकच दिवस जर नवरात्र करायाचें असेल, तर केवळ अष्टमी अथवा नवमी या दोहोंपैकीं एके दिवशीं करावें. आपापल्या कुलाचाराप्रमाणें, अथवा प्रतिबंधामुळें पहिल्या पक्षाचा जर संभव नसेल, तर त्याप्रमाणें या पक्षाची व्यवस्था समजावी. यामध्यें तृतीया व पंचमी यांचा निर्णय सप्तमीप्रमाणें समजावा. सप्तमीचा निर्णय पुढें सांगेन. वर सांगितलेल्या पक्षाचे ठिकाणीं जर तिथीचा क्षय अथवा वृद्धि

यामुळें दिवसाचें आधिक्य अथवा न्यूनत्व जर होत असेल, तर पूजा इत्यादिकांची आवृत्ति म्हणजे ( तिथीची वृद्धि असल्यास दोन्ही दिवशीं एकेकदां पूजा करावी व क्षय असल्यास एकाच दिवशीं दोनदां ) पूजा करावी. कोणी कोणी क्षयाच्या दिवशीं पूजा व चंडीपाठ हीं आठाठदां करतात. हें देवीपूजनात्मक नवरात्र नित्य व काम्यही आहे. याचें कारण असें कीं, तें न केल्यास दोष सांगितला असून, केल्यास फल-प्राप्ति सांगितली आहे.

अत्रनवरात्रेघटस्थापनं प्रातर्मध्याह्नप्रदोषकालेचेतित्रिकालं द्विकालमेककालं वास्वस्वकुलदेवतापूजनंसप्तशत्यादिजपोऽखण्डदीपः आचारप्राप्तमालाबन्धनं उपवासनक्तैकभुक्तादिनियमः सुवासिनीभोजनंकुमारीभोजनपूजनादिअन्तेसप्त-शत्यादिस्तोत्रमंत्रहोमादिइत्येतानिविहितानि एतेषांमध्येक्वचित्कुलेघटस्थापना-दीनिद्वित्रादीन्येवानुष्ठीयन्तेनसर्वाणि क्वचित्घटस्थापनादिरहितानिकानिचि-त्क्वचित्सर्वाण्येवेत्येतेषांसमुच्चयविकल्पौकुलाचारानुसारेणव्यवस्थितौज्ञेयौकुल-परंपराप्राप्तादधिकंशक्तिसत्वेपिनानुष्टेयमितिशिष्टाचारः फलकामनया प्रार्थित-मुपवासादिकंकुलाचाराभावेपिकुर्वन्ति इदंकलशस्थापनंरात्रौनकार्यम् तत्रकलश-स्थापनार्थंशुद्धमृदावेदिकांकृत्वापञ्चपल्लवदूर्वाफलताम्बूलकुङ्कुमधूपादिसंभा-रान्संपादयेत् ।

**घटस्थापनाविधि**—या नवरात्रामध्यें घटस्थापना करावी. प्रातःकाळीं, मध्याह्नीं अथवा प्रदोषकाळीं याप्रमाणें तीन वेळ, दोन वेळ अथवा एक वेळ आपल्या कुलदेवतेचें पूजन करावें. सप्तशत्यादिकांचा पाठ व जप करावा. अखंड दीप ठेवावा. आपल्या कुलाचाराप्रमाणें माळा बांधाव्या. उपवास, नक्त, एकभुक्त इत्यादि नियम पाळावेत. सुवासिनींना अथवा कुमारिकांना, कुळाचाराप्रमाणें पूजन-भोजनादि द्यावें. शेवटच्या दिवशीं सप्तशती वगैरे स्तोत्रमंत्राचा जप व होम हीं कृत्यें करावींत, असें सांगितलें आहे. कांहीं कुळांत यांपैकीं घटस्थापना वगैरे दोन तीनच कर्मे करतात. सर्व करीत नाहींत. कांहीं कुळांत घटस्थापनेवांचून इतर कांहीं करतात. कांहीं कुळांत सर्वच करतात. या कर्मांचा समुच्चय ( सर्व कर्मे करणें ) अथवा विकल्प ( कांहीं कर्मे करणें ) याची व्यवस्था ज्यानें त्यानें आपल्या कुलाचाराप्रमाणें समजावी. सामर्थ्य असलें तरी, कुलपरंपरेनें चालत आलेल्या कर्मांहून कमी अधिक कर्मे करूं नयेत असा शिष्टाचार आहे. फलाची जर कामना असेल, तर कुलाचार नसतांही उपवासादि कर्मे करावींत. हें घटस्थापन रात्रीं करूं नये. घटस्थापनेसाठीं शुद्ध मृत्तिकेची वेदी करून, पंचपल्लव, दूर्वा, फल, तांबूल, कुंकुम, धूप, दीप इत्यादि सामुग्री जमवावी.

अथसंक्षेपतोनवरात्रारम्भप्रयोगः प्रतिपदिप्रातःकृताभ्यङ्गस्नानःकुंकुमचन्द-नादिकृतपुण्ड्रोधृतपवित्रः सपत्नीकोदशघटिकामध्येऽभिजिन्मुहूर्तेवादेशका-लौसंकीर्त्य ममसकुटुम्बस्यामुकदेवताप्रीतिद्वारासर्वापच्छान्तिपूर्वकदीर्घायुर्धन पुत्रादिवृद्धिशत्रुजयकीर्तिलाभप्रमुखचतुर्विधपुरुषार्थसिद्ध्यर्थमद्यप्रभृतिमहा नवमीपर्यन्तंप्रत्यहंत्रिकालमेककालं वामुकदेवतापूजामुपवासनक्तैकभक्तान्यत-

मनियमसहितामखण्डदीपप्रज्वालनंकुमारीपूजनंचण्डीसप्तशतीपाठंसुवासिन्यादिभोजनमित्यादियावत्कुलाचारप्राप्तमनूद्यएवमादिरूपं शारदनवरात्रोत्सवाख्यं कर्म करिष्ये देवतापूजाङ्गत्वेनघटस्थापनंचकरिष्ये तदादौनिर्विघ्नतासिद्ध्यर्थं गणपतिपूजनंपुण्याहवाचनंचण्डीसप्तशतीजपाद्यर्थंब्राह्मणवरणंचकरिष्ये एतानिकृत्वा घटस्थापनसत्वेमहीद्यौरितिभूमिंस्पृष्ट्वातस्यांभुविअङ्कुरारोपणार्थं शुद्धमृदंप्रक्षिप्यओषधयः संमितितस्यांमृदियवादीन्प्रक्षिप्यआकलशेष्विति कुंम्भंनिधायइमंमेगंगेइतिजलेनापूर्यगन्धद्वारामितिगन्धंयाओषधीरितिसर्वाओषधीः काण्डात्काण्डादितिदूर्वाः अश्वत्थेवइतिपञ्चपल्लवान्स्योनापृथिवीतिमृदः याः फलिनीरितिफलंसहिरत्नानीतिहिरण्यरूपइतिरत्नंहिरण्ये प्रक्षिप्ययुवासुवासाइतिसूत्रेणावेष्टयपूर्णादर्वीतिपूर्णपात्रंनिधायतत्त्वायामीतिवरुणंसंपूज्यतत्कलशोपरिकुलदेवताप्रतिमांसंस्थाप्यपूजयेत् स्वस्थानेएववासंस्थाप्यपूजयेत् तद्यथा जयन्तीमङ्गलाकालीभद्रकालीकपालिनी। दुर्गाक्षमाशिवाधात्री स्वाहास्वधानमोस्तुते १ आगच्छवरदेदेविदैत्यदर्पनिषूदिनि। पूजांगृहाणसुमुखिनमस्तेशंकरप्रिये २ अनेनपुरुषसूक्तश्रीसूक्तप्रथमऋग्भ्यांचावाह्यजयन्तीमङ्गलाकालीतिमन्त्रेणसूक्तऋग्भिश्वासनादिषोडशोपचारैःसंपूजयेत् सर्वमङ्गलमाङ्गल्येइत्यादिभिः संप्रार्थ्यप्रत्यहंबलिदानपक्षेमाषभक्तेनकूष्माण्डेनवाबलिंदद्यात् अन्तेएववा बलिदानंनवाबलिदानम् ततःअखण्डदीपकंदेव्याःप्रीतयेनवरात्रकम्। उज्ज्वालये अहोरात्रमेकचित्तोधृतव्रतः १ इत्यखण्डदीपंप्रतिष्ठापयेत्।

**संक्षेपतः नवरात्रारंभप्रयोगः**—प्रतिपदेला प्रातःकाळीं अभ्यंगस्नान करून, केशर चंदन इत्यादिकांचा तिलक लावावा. हातांत पवित्रक घालावें. दहा घटकांच्या परिमितकाळीं अथवा अभिजिन्मुहूर्तीं पत्नीसह देशकालादिकांचा उच्चार करून, 'मम सकुटुंबस्यामुकदेवता प्रीतिद्वारा सर्वापच्छान्तिपूर्वक दीर्घायुर्धनपुत्रादिवृद्धिशत्रुजयकीर्तिलाभप्रमुखचतुर्विधपुरुषार्थसिद्ध्यर्थमद्यप्रभृति महानवमीपर्यन्तं प्रत्यहं त्रिकालमेककालं वामुकदेवता पूजामुपवासनक्तैकभक्तान्यतमनियमसहितामखंडदीपप्रज्वालनं कुमारीपूजनं चण्डीसप्तशतीपाठं सुवासिन्यादिभोजनमित्यादि यावत्कुलाचारप्राप्तमनूद्य एवमादिरूपं शारदनवरात्रोत्सवाख्यं कर्म करिष्ये। देवतापूजांगत्वेन पुण्याहवाचनं चण्डीसप्तशतीजपाद्यर्थं ब्राह्मणवरणंच करिष्ये।' असा संकल्प करावा. गणपतिपूजन, पुण्याहवाचन आणि चण्डी व सप्तशती यांच्या पाठासाठीं ब्राह्मणवरण—हीं केल्यावर, घटस्थापना जर करायची असेल, तर 'मही द्यौ०' या मंत्रानें भूमीला स्पर्श करून, तीवर अंकुर रुजण्यासाठीं शुद्ध मृत्तिका घालावी. 'ओषधयः सं०' त्या मंत्रानें त्या मृत्तिकेमध्यें यव वगैरे टाकावे. 'आकलशेषु०' या मंत्रानें कलश ठेवून, तो 'इमं मे गङ्गे०' या मंत्रानें उदकानें भरावा. 'गंधद्वारां' या मंत्रानें त्यांत गंध घालावें. 'या ओषधी०' या मंत्रानें (कुष्टमांसी, हळद, आंबेहळद, वेखंड, चंपक, चंदन, दगडफूल, नागरमोथा, मुरा) या सर्व ओषधी कलशांत ठेवाव्या. 'काण्डात्काण्डात्०' या

मंत्रानें कलशांत दूर्वा ठेवाव्या. 'अश्वत्थेव०' या मंत्रानें पंचपल्लव कलशांत ठेवावे. 'स्योना पृथिवी' या मंत्रानें ( हत्ती, अश्व, राजद्वार, वारूळ, चवाठा, सरोवर व गोठा या सात ठिकाणच्या ) सप्तमृत्तिका कलशांत घालाव्या. 'याःफलिनीः' या मंत्रानें कलशांत फल ठेवावें. 'सहिरत्नानि०' या मंत्रानें ( सोनें, हिरा, पोवळें, मोत्यें व नीळ ) आणि 'हिरण्यरूप०' या मंत्रानें सुवर्ण, हीं कलशांत ठेवावींत. नंतर 'युवासुवासा' या मंत्रानें कलशाला सूत्राचें वेष्टन करून, 'पूर्णा दर्वी०' या मंत्रानें त्यावर पूर्णपात्र ठेवावें आणि 'तत्त्वायामि.' या मंत्रानें वरुणाची पूजा करावी. नंतर त्या कलशावर आपल्या कुलदेवतेची प्रतिमा ठेवून, तिची पूजा करावी. किंवा कुलदेवतेच्या प्रतिमेची स्वस्थानींच स्थापना करून पूजा करावी ती येणेंप्रमाणें:—'जयन्ती मङ्गला काली भद्रकाली कपालिनी। दुर्गा क्षमा शिवा धात्री स्वाहा स्वधा नमोस्तुते ।। आगच्छ वरदे देवि दैत्यदर्पनिषूदिनि। पूजां गृहाण सुमुखि नमस्ते शंकरप्रिये ।। या मंत्रांनीं व पुरुषसूक्त आणि श्रीसूक्त यांच्या प्रथम ऋचांनीं आवाहन करून, 'जयन्ती मङ्गला काली०' या मंत्रानें व सूक्ताच्या ऋचांनीं षोडशोपचार पूजा करावी. 'सर्व मङ्गल माङ्गल्ये०' इत्यादि मंत्रांनीं प्रार्थना करावी. दररोज बलिदान करण्याचा जर पक्ष असेल, तर माष—( उडीद ) मिश्रित भाताचा किंवा कूष्मांडाचा ( कोहोळा ) बळी द्यावा. किंवा फक्त शेवटच्याच दिवशीं बलिदान द्यावें, किंवा मुळींच देऊं नये. त्यानंतर 'अखंडदीपकं देव्याः प्रीतये नवरात्रकम्। उज्ज्वालये अहो रात्रमेकचित्तो धृतव्रतः ।।' या मंत्रानें अखंडदीपाची स्थापना करावी.

अथचण्डीपाठप्रकारः। यजमानेनवृतोहंचण्डीसप्तशतीपाठंनारायणहृदयलक्ष्मीहृदयपाठंवाकरिष्येइत्यादिसंकल्प्यआसनादिविधाय आधारेअन्यहस्तलिखितंपुस्तकंस्थापयित्वा नारायणंनमस्कृत्येतिवचनात् ॐनारायणायनमः नारायनरोत्तमायनमः देव्यैसरस्वत्यैनमः व्यासायनमः इतिनमस्कृत्यप्रणवमुच्चार्यसर्वपाठान्तेप्रणवंपठेत् पुस्तकवाचनेनियमाः हस्तेपुस्तकं नधारयेत् स्वयंब्राह्मणभिन्नेनचलिखितंविफलम् अध्यायंप्राप्यविरमेन्नतुमध्येकदाचन। कृतेविरामेमध्येतुअध्यायादिंपठेत्पुनः १ ग्रन्थार्थंबुध्यमानः स्पष्टाक्षरं नातिशीघ्रनातिमन्दंरसभावस्वरयुतंवाचयेत् त्रिवर्गफलकामेनचण्डीपाठः सदैव कर्तव्यः तस्मान्ममैतन्माहात्म्यंपठितव्यंसमाहितैः। श्रोतव्यंचसदाभक्त्येत्यादिवचनात् नैमित्तिकपाठोप्युक्तः शान्तिकर्मणिसर्वत्रतथादुःस्वप्नदर्शने। ग्रहपीडासुचोग्रासु माहात्म्यंशृणुयान्मम १ इत्यादि तथाअरण्यप्रान्तरेवापिदावाग्निपरिवारितः। दस्युभिर्वावृतःशून्येगृहीतोवापिशत्रुभिः १ इत्यादिसंकटान्युद्दिश्य सर्वबाधासुचोग्रासुवेदनाभ्यर्दितोपिवा। स्मरन्ममैतन्माहात्म्यं नरोमुच्येतसंकटात् १ इत्युक्तम् उपसर्गोपशान्त्यर्थंत्रयःपाठाःकार्याः ग्रहपीडाशान्तयेपञ्च महाभयेसप्त शान्त्यर्थंवाजपेयफलार्थंचनव राजवश्यार्थमेकादश वैरनाशार्थंद्वादश स्त्रीपुंसवश्यतार्थंचतुर्दशसौख्यायलक्ष्म्यर्थंचपञ्चदश पुत्रपौत्रधनधान्यार्थंषोडश राजभयनाशायसप्तदश उच्चाटनायाष्टादश वनभयेविंश-

तिः दुश्चिकित्स्यरोगकुलोच्छेदायुर्नाशवैरिवृद्धिव्याधिवृद्धित्रिविधोत्पातादि-महासंकटनाशो राज्यवृद्धिश्चशतावृत्तिभिः सहस्रावर्तनैःशताश्वमेधफलंसर्व-मनोरथावाप्तिर्मोक्षश्चेतिवाराहीतन्त्रेउक्तम् सर्वत्रकाम्यपाठेआदौसंकल्पपूर्वकं पूजनमन्तेबलिदानंचकार्यम् अत्राचाराद्वेदपारायणमपिकार्यम् तद्विधिर्बौधायनोक्तः कौस्तुभेज्ञेयः।

**चंडीपाठाचा प्रकार**—ब्राह्मणानें 'यजमानेन वृतोऽहं चण्डीसप्तशतीपाठ नारायण-हृदयलक्ष्मीहृदयपाठंवा करिष्ये' असा संकल्प करून आसनादिक विधि करावा. लिहिलेलें पुस्तक पीठावर स्थापन करून, नारायणाला 'नमस्कार करून आरंभ करावा,' असें वचन असल्यानें 'ॐ नारायणाय नमः। नराय नरोत्तमाय नमः। देव्यै सरस्वत्यै नमः। व्यासाय नमः।' याप्रमाणें नमस्कार करून, ॐकाराचा उच्चार करावा, आणि सर्व पाठ झाल्यानंतरही ॐकाराचा उच्चार करावा. पुस्तक वाचण्याचे नियमः—हातांत पुस्तक धरूं नये. स्वतः लिहिलेलें अथवा ब्राह्मणेतरानें लिहिलेलें पुस्तक निष्फल होय. अध्याय समाप्त झाल्यावर थांबावें. मध्यें थांबूं नये. थांबल्यास तो अध्याय पुन्हां पहिल्यापासून वाचावा. ग्रंथाचा अर्थ जाणून अक्षरांचा स्पष्ट उच्चार करीत, फार जलद नाहीं व फार सावकाश नाहीं अशा तऱ्हेनें—रस, भाव आणि स्वर यांनीं युक्त असें वाचन करावें. धर्म, अर्थ आणि काम यांची इच्छा करणारानें चण्डीपाठ सर्वदा करावा. 'म्हणून माझें हें माहात्म्य स्थिरचित्त होऊन, पठन करावें व सदा भक्तीनें श्रवण करावें' असें या बाबतींत ( देवीचें ) वचन असल्यानें, नैमित्तिक पाठ करण्यासहि सांगितलें आहे. 'सर्व शान्तिकर्मांत, दुःस्वप्न पाहिलें असतां व उग्र ग्रहांची पीडा होत असतां, माझें माहात्म्य श्रवण करावें.' 'तसेंच अरण्यांत शून्यस्थानीं दावाग्नीनें वेष्टित दस्यूंनीं वेढा दिला असतां, किंवा, शत्रूंनीं शून्यस्थानीं धरलेला इत्यादि संकटें असतां, तसेंच सर्व प्रकारच्या उग्र बाधा अथवा वेदना यांनीं त्रस्त झाला असतां, मनुष्यानें हें माझें माहात्म्यस्मरण करावें, म्हणजे संकटमुक्ति होते' असें वचन आहे. उपद्रवाच्या नाशासाठीं तीन पाठ करावेत. ग्रहांच्या पीडा-शमनार्थ पांच, शान्ति व वाजपेय यज्ञाची फलप्राप्ति होण्यासाठीं नऊ, राजा वश होण्यासाठीं अकरा, शत्रुनाशनार्थ बारा, स्त्रीपुरुषांच्या वशीकरणार्थ चौदा, सौख्य व लक्ष्मी यांच्या प्राप्त्यर्थ पंधरा, पुत्रपौत्रधनधान्यासाठीं सोळा, राजभयनाशनार्थ सतरा, उच्चाटनार्थ अठरा, वनभयनाशनार्थ वीस, बंधमुक्ततेकरितां पंचवीस, दुर्धर रोग, कुलोच्छेद, आयुर्नाश, शत्रूची वृद्धि, रोगवृद्धि, आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक उत्पात वगैरे महासंकटनाशनार्थ व राज्यवृद्धीसाठीं शंभर याप्रमाणें अनुक्रमें पाठ करावेत. हजार पाठ केल्यास शंभर अश्वमेधांचें फल, सर्व मनोरथांची सिद्धि आणि मोक्ष हीं प्राप्त होतात, असें वाराही तंत्रांत सांगितलें आहे. सर्वत्र काम्यपाठ करतांना, प्रथम संकल्पपूर्वक पूजन करून, अंतीं बलिदान करावें. या नवरात्रांत कुलाचार असल्यास वेदपारायणहि करावें. वेदपारायणाचा विधि बौधायनानें सांगितलेला आहे, तो कौस्तुभांत पहावा.

अथकुमारीपूजा । एकवर्षातुयाकन्यापूजार्थंतांविवर्जयेत् । द्विवर्षकन्यामारभ्यदशवर्षावधिकुमारीणांक्रमेण कुमारिकात्रिमूर्तिःकल्याणीरोहिणीकालीचण्डिकाशाम्भवीदुर्गाभद्रेतिनामानि आसांकुमारीणांप्रत्येकंपूजामन्त्राःफलविशेषाःलक्षणानिचान्यत्रज्ञेयानि ब्राह्मणेनब्राह्मणीत्येवंसवर्णाप्रशस्ता विजातीयापिक्वचित्कामनाविशेषेणोक्ता एकैकवृद्ध्याप्रत्यहमेकावाकुमारीपूज्यामन्त्राक्षरमयींलक्ष्मींमातॄणांरूपधारिणीम् । नवदुर्गात्मिकांसाक्षात्कन्यामावाहयाम्यहम् १ जगत्पूज्येजगद्वन्द्येसर्वशक्तिस्वरूपिणि । पूजांगृहाणकौमारिजगन्मातर्नमोस्तुते १ इतिमन्त्रेणपादक्षालनपूर्वकंवस्त्रकुङ्कुमगन्धधूपदीपभोजनैः पूजयेदितिसंक्षेपः कुमारीपूजावद्देवीपूजाचण्डीपाठश्चैकोत्तरवृद्ध्यापिविहितः भवानीसहस्रनामपाठोपिक्वचिदुक्तः अयंशारदनवरात्रोत्सवो मलमासेनिषिद्धः शुक्रास्तादौतुभवति प्रथमारम्भस्तुनकार्यः शावाशौचजननाशौचयोस्तु सर्वोऽपिघटस्थापनादिविधिर्ब्राह्मणद्वाराकार्यः केचिदारम्भोत्तरंमध्येआशौचपातेस्वयमेवारब्धंपूजादिकंकार्यमित्याहुःशिष्टास्त्वाशौचेपूजादेवतास्पर्शादेर्लोकविद्विष्टत्वादन्येनैवकारयन्तिअपरेतृतीयादिसप्तम्याद्यनुकल्पेननवरात्रविधीनांसत्वात्प्रतिपद्याशौचेतृतीयाद्यनुकल्पाश्रयणं कुर्वन्तिसर्वथालोपप्रसक्तावेवब्राह्मणद्वाराकुर्वन्ति उपवासादिशारीरनियमःस्वयंकार्यः एवंरजस्वलापिउपवासादिकंस्वयंकृत्वापूजादिकमन्येनकारयेत् अत्रसभर्तृकस्त्रीणांउपवासेगन्धताम्बूलादिग्रहणंनदोषायेत्याहुः ।

**कुमारीपूजाविधि**—एक वर्षाची कन्या पूजेला वर्ज्य करावी. दोन वर्षांच्या कन्येपासून दहा वर्षांच्या कन्येपर्यंत कुमारीपूजन करावें. दोन वर्षांची कुमारी ती कुमारिका, तीन वर्षांची त्रिमूर्ति, चार वर्षांची कल्याणी, पांच वर्षांची रोहिणी, सहा वर्षांची काली, सात वर्षांची चंडिका, आठ वर्षांची शांभवी, नऊ वर्षांची दुर्गा व दहा वर्षांची भद्रा—याप्रमाणें कुमारींचीं नांवें जाणावीं. या कुमारीच्या प्रत्येकीच्या पूजेचे मंत्र, फलविशेष, लक्षणें वगैरे अन्य ग्रंथीं पाहावींत. ब्राह्मणानें ब्राह्मणी कुमारीची पूजा करावी. याप्रमाणें सवर्णा कुमारीच प्रशस्त होय. कामनाविशेषाप्रमाणें विजातीय कुमारीचीहि पूजा करावी असें क्वचित् सांगितलें आहे. दररोज एकेक अधिक अथवा रोज एक याप्रमाणें कुमारीची पूजा करावी. 'मन्त्राक्षरमयीं लक्ष्मीं मातॄणां रूपधारिणीम् । नवदुर्गात्मिकां साक्षात्कन्यायावाहयाम्यहम्।। जगत्पूज्ये जगद्वंद्ये सर्वशक्तिस्वरूपिणि । पूजां गृहाण कौमारी जगन्मातर्नमोस्तुते ते ।।' या मंत्रानें पादप्रक्षालनपूर्वक वस्त्र, कुंकुम, गंध, धूप, दीप, भोजन, यांनीं पूजा करावी, असा संक्षेप जाणावा. कुमारीपूजेप्रमाणें देवीपूजा व चंडीपाठ हींहि दररोज एक अधिक याप्रमाणें करावीं. भवानीसहस्रनामाचाही पाठ करावा असें क्वचित् ग्रंथीं सांगितलें आहे. हा शरदृतूंतील नवरात्रोत्सव मलमासांत निषिद्ध आहे. हा शुक्रास्त असतां होतो. प्रथमारंभ मात्र शुक्रास्तादिकांत करूं नये. मृताशौच व जननाशौच असतां, घटस्थापनेपासूनचा सर्व विधि ब्राह्मणाकडून करवावा. आरंभ केल्यानंतर मध्यंतरीं

जरी अशौच आलें तरी स्वतःच अखेरपर्यंतचा सर्व विधि करावा असें कोणी ग्रंथकार म्हणतात; परंतु अशौचांत–पूजा, देवतास्पर्श वगैरे केलीं असतां, लोकनिंदेला पात्र व्हावें लागतें, यासाठीं दुसऱ्याकडून करवितात. तृतीया, पंचमी, सप्तमी वगैरे तिथींवर नवरात्राचा आरंभ करावा असे जे गौणपक्ष सांगितले आहेत, त्यांचा आश्रय करून प्रतिपदेला अशौच असेल तर, तृतीयेपासून आरंभ करावा. तृतीयेला अशौच असल्यास पंचमीपासून आरंभ करावा. याप्रमाणें संभव असेल तसा गौणपक्ष स्वीकारून, दुसरे कोणी नवरात्र करतात व सर्वथा लोप होत असल्यास ब्राह्मणाकडून करवितात. उपवासादि शारीरिक नियम स्वतः पाळावे. रजस्वलेनें देखील याप्रमाणेंच उपवासादिक स्वतः करून, पूजादिक दुसऱ्यांकडून करवावें. नवरात्रांत सौभाग्यवती स्त्रियांना उपवासाच्या दिवशीं, गंधतांबूलादिकांबद्दल दोष नाहीं असें सांगतात.

अथपञ्चम्यामुपाङ्गललिताव्रतम्। अत्रपञ्चमीअपराह्णव्यापिनी ग्राह्या अपराह्णस्यैवतत्पूजाकालत्वोपपत्तेः दिनद्वयेकात्स्न्येनापराह्णव्याप्तौसाम्येनवैषम्येणवापराह्णैकदेशव्याप्तौचपूर्वैव युग्मवाक्यात् परत्रैवापराह्णव्याप्तौपरैव केचित्तुरात्रिव्यापिनीं गृह्णन्ति पूजादिकंचरात्रावेवकुर्वन्तितत्रमूलंचिन्त्यम् अत्रपूजादिविधिर्ग्रन्थान्तरेप्रसिद्धइतिनालिख्यते।

**उपांगललिताव्रत**—आश्विन शुक्ल पंचमीला उपांगललितादेवीचें व्रत करावें. या व्रताकरितां अपराह्णव्यापिनी पंचमी घ्यावी. कारण, उपांगललितेच्या पूजेला अपराह्णकाळच सांगितला आहे. दोन दिवस संपूर्णत्वानें अपराह्णव्याप्ति असेल अथवा सारखी किंवा कमीजास्ती अपराह्णकालीं एकदेशव्याप्ति असेल, तर युग्मवाक्याला अनुसरून पूर्वदिवसाची घ्यावी. दुसऱ्या दिवशींच जर अपराह्णव्याप्ति असेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. कोणी रात्रिव्यापिनी घेतात व पूजादिक रात्रींच करतात. त्याबद्दल मूलनिर्णय पाहिला पाहिजे. या पूजेचा विधि वगैरे सर्व इतर ग्रंथांत प्रसिद्ध असल्यानें येथें सांगितला नाहीं.

आश्विनशुक्लपक्षेमूलनक्षत्रेपुस्तकेषुसरस्वतीमावाह्यपूजयेत् मूलेषुस्थापनंदेव्याःपूर्वाषाढासुपूजनम्। उत्तरासुबलिंदद्याच्छ्रवणेनविसर्जयेत् १ इतिवचनात् अत्रपूजयेत्प्रत्यहमितिरुद्रयामलवचनात् मूलेआवाहनंतदङ्गभूतंपूजनंचकरिष्ये इत्यादिसंकल्प्यावाहनपूजनेकार्ये पूर्वाषाढासुपूजनंकरिष्यइतिसंकल्प्यावाहनरहितपूजैवकेवलम् उत्तराषाढासुबलिदानंतदङ्गभूतांपूजांचकरिष्येइत्येवंतेकार्ये श्रवणेविसर्जनंकर्तुंतदङ्गभूतांपूजांकरिष्यइति संकल्प्यसंपूज्यविसर्जयेदितिक्रमः तत्रमूलस्यप्रथमेपादेसूर्यास्तात्प्राक्त्रिमुहूर्तव्यापिनि सरस्वत्यावाहनम् त्रिमुहूर्तन्यूनत्वेरात्रौवाप्रथमपादसत्त्वेतस्यविशेषवचनंविनाग्राह्यत्वाभावाद्द्वितीयादिपादेपरदिनएवावाहनम् एवंपूर्वाषाढादिनक्षत्रेपूजादौदिनव्याप्त्यैवग्राह्यम् विसर्जनं तुश्रवणप्रथमपादेरात्रिभागगतेऽपिकार्यम् विशेषवचनात् तच्चरात्रेःप्रथमप्रहरपर्यन्तमेवेतिभाति।

**सरस्वतीपूजन**—आश्विन शुक्लपक्षांत मूळनक्षत्रीं सरस्वतीदेवीचें आवाहन करून पूजा करावी. 'मूळनक्षत्रीं देवीची स्थापना, पूर्वाषाढानक्षत्रीं पूजन, उत्तराषाढानक्षत्रीं बलिदान व श्रवणनक्षत्रीं विसर्जन करावें,' असें वचन आहे. त्याचप्रमाणें 'दररोज पूजा करावी' असें रुद्रयामलाचें वचन आहे. यास्तव, मूळनक्षत्रीं 'आवाहनं तदङ्गभूतं पूजनंच करिष्ये' असा संकल्प केल्यावर आवाहन व पूजन हीं करावींत. पूर्वाषाढानक्षत्रीं 'पूजनं करिष्ये' असा संकल्प करून आवाहनावांचूनच पूजा करावी. उत्तराषाढानक्षत्रीं 'बलिदानं तदङ्गभूतां पूजांच करिष्ये' असा संकल्प करून, बलिदान व पूजा करावींत. श्रवणनक्षत्रीं 'विसर्जनं कर्तुं तदङ्गभूतां पूजां करिष्ये' असा संकल्प करून, पूजा केल्यावर विसर्जन करावें. याप्रमाणें क्रम समजावा. या समयीं मूळनक्षत्राचा पहिला चरण सूर्यास्तापूर्वीं सहा घटका व्याप्त असतां, सरस्वतीचें आवाहन करावें. सहा घटिकांहून कमी व्याप्ति असल्यास, अथवा रात्रीं प्रथम चरण जर असेल तर, विशेष वचन असल्यावांचून तीं ग्राह्य नाहींत. यास्तव, दुसऱ्या इत्यादि चरणीं दुसऱ्या दिवशींच आवाहन करावें. याप्रमाणें पूजा इत्यादिकांकरितां पूर्वाषाढानक्षत्र इत्यादि दिवसास व्याप्त असेल तेंच घ्यावें. विसर्जन मात्र श्रवणनक्षत्राच्या प्रथम चरणीं मग तो प्रथम चरण जरी रात्रीं असला तरी–त्याबाबतींत विशेष वचन आहे म्हणून–करावें. हें विसर्जन रात्रींच्या पहिल्या प्रहरापर्यंतच करावें असें मला वाटतें.

**अथसप्तम्यादिदिनत्रयेपत्रिकापूजनं विहितंतत्रसप्तम्यादितिथित्रयं सूर्योदये मुहूर्तमात्रमपिग्राह्यम् तत्राधिवासनादिप्रयोगविस्तारःकौस्तुभादौज्ञेयः यत्तु सप्तमीप्रभृतित्रिरात्रनवरात्रकर्मकुर्वन्तितत्रसप्तमीसूर्योदयोत्तरं मुहूर्ताधिकव्यापिनीग्राह्या मुहूर्तन्यूनत्वेपूर्वा ।**

**पत्रिकापूजन**—आश्विन शुद्ध सप्तमी, अष्टमी व नवमी या तिन्ही दिवशीं पत्रिकापूजन करावें. या समयीं सप्तमी इत्यादि तिन्ही तिथी सूर्योदयीं जरी दोन घटका असल्या तरी घ्याव्या. त्याचें अधिवासन वगैरे प्रयोगाचा विस्तार कौस्तुभादि ग्रंथांत पहावा. सप्तमीपासून तीन दिवसपर्यंत जें नवरात्रव्रत करतात त्याविषयीं, सप्तमी सूर्योदयानंतर दोन घटकांहून अधिक व्यापिनी असेल ती घ्यावी. दोन घटकांहून जर कमी असेल तर आदल्या दिवसाची घ्यावी.

**अथमहाष्टमीघटिकामात्राप्यौदयिकीनवमीयुताग्राह्या सप्तमीस्वल्पयुतासर्वथात्याज्यायदातुपूर्वत्रसप्तमीयुतापरत्रोदयेनास्तिघटिकान्यूनावावर्तते तदापूर्वासप्तमीविद्धापिग्राह्या इयंभौमवारेऽतिप्रशस्ता यदाचपूर्वदिनेषष्टिघटिकाष्टमी परदिनेमुहूर्तादिव्यापिनीतदानवमीयुतामप्युत्तरांत्यक्त्वा संपूर्णत्वात्पूर्वैवग्राह्या एवंनवम्याःक्षयवशेनदशमीदिने सूर्योदयोत्तरमनुवृत्त्यभावेऽष्टमींनवमीयुतामौदयिकीमपित्यक्त्वासप्तमीयुतैवाष्टमीग्राह्या अष्टम्यांपुत्रवतोपवासोनकार्यःकुलाचारप्राप्तौकिंचिद्भक्ष्यंप्रकल्प्यकार्यः महानवमीतुबलिदानव्यतिरिक्तविषयेपूजोपोषणादावष्टमीविद्धाग्राह्या साचयदिअष्टमीदिनेसायंत्रिमुहूर्तास्यात्तदैवग्राह्या**

त्रिमुहूर्तन्यूनत्वेपरैवग्राह्या नवमीप्रयुक्तमहाबलिदानेतुदशमीविद्धायदाशुद्धा-
धिकानवमीतदाबलिदानमपिपूर्णत्वात्पूर्वत्रैवकार्यम् अष्टमीनवम्योःसंधौपूजो-
क्तासाष्टमीनवम्योःपृथक्त्वेदिवा रात्रौवाष्टम्यन्तनाडीनवम्याद्यनाड्योःकार्या
यदितुअष्टमीनवम्योर्मध्याह्नेऽपराह्णेवायोगस्तदाष्टमीनवमीपूजयोरप्येकदिनेप्र-
वृत्तेरष्टमीनवमीपूजांतत्संधिपूजांचतन्त्रेणकरिष्ये इतिसंकल्प्यतन्त्रेण पूजाका-
र्या यदिशुद्धधिकाष्टमीतदापूर्वेद्युरष्टमीपूजापरेद्युः संधिपूजानवमी पूजयो-
स्तन्त्रम् अत्रनवरात्रेस्वयंपूजादिकंकर्तुमशक्तावन्येनकारयेत् षोडशोपचार-
पूजाविस्तारंकर्तुमशक्तोगन्धादिपञ्चोपचारपूजांकुर्यात् नवम्यां पूजांविधायहो-
मः कार्यः केचिदष्टम्यामेवहोमइत्याहुः अन्येतुअष्टम्यामुपक्रम्यनवम्यांहोमः
समापनीयः सचारुणोदयमारभ्यसायंकालपर्यन्तमष्टमीनवम्योःसंधौसंभवति
निशायांतत्संधौतुरात्रौहोमादेरयोग्यत्वान्नवम्यामेवहोमोपक्रमसमाप्तिकार्येइ-
त्याहुःअत्रयथाकुलाचारंव्यवस्था सचहोमोनवार्णमन्त्रेणकार्यःअथवाजयन्ती
मङ्गलाकालीतिश्लोकेन अथवानमोदेव्यैमहादेव्यैइति श्लोकेन अथवासप्तशती-
श्लोकैः अथवासप्तशतीस्तोत्रस्यसप्तशतमन्त्रैः कवचार्गलाकीलकरहस्यत्रयश्लो-
कसहितैर्होमःसप्तशतमन्त्रविभागोऽन्यत्रज्ञेयःअत्रापिविकल्पेषुयथाकुलाचारंव्य-
वस्था होमद्रव्यंच सर्पिर्मिश्रितंशुक्लतिलमिश्रंचपायसम् केवलतिलैर्वाहोमः क्व-
चित्किंशुकपुष्पदूर्वासर्षपलाजपूगयवश्रीफलरक्तचन्दनखण्डनानाविधफलाना-
मपिपायसेमिश्रणंकार्यमित्युक्तम् होमश्चजपदशांशेनकार्यः कुलाचारप्राप्तश्चे-
न्नृसिंहभैरवादिदैवत्यमन्त्रहोमोऽपिकार्यःअत्रसविस्तरः सग्रहमखोहोमप्रयोगः
कौस्तुभेज्ञेयः।

**महाष्टमीनिर्णय**—आश्विन शुद्ध अष्टमी ही महाष्टमीच होय. ही सूर्योदयीं एक घटका जरी असली, तरी नवमीयुक्त घ्यावी. ही सप्तमीनें अल्प जरी विद्ध असली, तरी टाकावी. ज्या वेळीं ही आदल्या दिवशीं सप्तमीनें युक्त असेल व दुसऱ्या दिवशीं सूर्योदयीं नसेल, अगर एका घटकेहून कमी असेल, त्या वेळीं आदल्या दिवसाची सप्तमीनें विद्ध असलेली घ्यावी. ही अष्टमी मंगळवारीं अति-प्रशस्त होय. पूर्व दिवशीं जेव्हां अष्टमी साठ घटका असेल, आणि दुसऱ्या दिवशीं दोन घटका इत्यादि व्यापिनी असेल, तेव्हां दुसऱ्या दिवसाची नवमीयुक्त देखील टाकून आदल्या दिवसाची संपूर्ण आहे, याकरितां आदल्या दिवसाचीच घ्यावी. या प्रमाणें नवमीचा क्षय असल्यामुळें, दशमीच्या दिवशीं सूर्योदयानंतर जर मुळींच नवमी नसेल, तर सूर्योदयकालीं व्याप्ति असलेली नवमीनें युक्त अशी देखील अष्टमी वर्ज्य करून, सप्तमीयुक्तच अष्टमी घ्यावी. अष्टमीच्या दिवशीं पुत्रवन्तानें उपास करूं नये. कुलाचारानेंच जर प्राप्त असेल, तर किंचित् कांहीं खाऊन करावा. बलिदानाव्यति-रिक्त इतर पूजा, उपोषण वगैरेसाठीं अष्टमीविद्ध महानवमी घ्यावी. ती जर अष्टमीच्या दिवशीं सायंकाळीं सहा घटका असेल तरच घ्यावी. सहा घटकांहून जर कमी असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. नवमीयुक्त जें महाबलिदान, त्याविषयीं दशमीनें

विद्ध असेल ती घ्यावी. नवमी जेव्हां शुद्धाधिक असेल, तेव्हां ती पूर्ण आहे म्हणून, बलिदानदेखील पूर्व दिवशींच करावें. अष्टमी व नवमी यांच्या संधीच्या ठिकाणीं पूजा करावी. अष्टमी व नवमी यांचा जेव्हां मध्यान्हीं अथवा अपराह्णीं योग असेल, तेव्हां अष्टमी व नवमी यांची पूजा एकाच दिवशीं प्राप्त होते. यास्तव, 'अष्टमी-नवमीपूजां तत्सन्धिपूजांच तन्त्रेण करिष्ये' असा संकल्प करून, तंत्रानें पूजा करावी. अष्टमी जेव्हां शुद्धाधिका असेल, तेव्हां पूर्वदिवशीं अष्टमीपूजा व दुसऱ्या दिवशीं संधिपूजा व नवमीपूजा यांचें तंत्र याप्रमाणें करावें. या नवरात्रांत स्वतः पूजादिक करण्यास जर सामर्थ्य नसेल, तर दुसऱ्याकडून करवावें. षोडशोपचारपूजेचा विस्तार करण्याला जो असमर्थ असेल त्यानें गंधादि पंचोपचार पूजा करावी. नवमीला पूजा करून होम करावा. कोणी ग्रंथकार अष्टमीलाच होम करावा असें म्हणतात. अष्टमीला प्रारंभ करून, नवमीला होमाची समाप्ति करावी. या होमाची अरुणोदयीं सुरुवात करून, सायंकाळपर्यंत अष्टमी व नवमी यांच्या संधिकालाच्या ठिकाणीं संभव होतो. हा संधि रात्रीं येईल तर होम करणें अयोग्य असल्यानें, नवमीलाच होमारंभ व समाप्ति करावी, असें दुसरे ग्रंथकार म्हणतात. या बाबतींत कुलाचाराप्रमाणें वर्तन करावें. हा होम नवार्णव-मंत्रानें करावा. किंवा, 'जयन्ती मङ्गला काली.' या श्लोकानें अथवा, 'नमो देव्यै महादेव्यै०' या श्लोकानें, अगर सप्तशतीच्या श्लोकांनीं, किंवा कवच, अर्गला, कीलक या तीन रहस्यांच्या श्लोकांसह सप्तशती स्तोत्राच्या सातशें मंत्रांनीं करावा. या सातशें मंत्रांचा विभाग इतर ग्रंथांत पहावा. या विकल्पासंबंधानेंही जसा कुलाचार असेल, त्याप्रमाणें व्यवस्था करावी. होमाचें द्रव्य घृतयुक्त व पांढऱ्या तिळांनीं मिश्रित असें पायस घ्यावें. अथवा केवळ तिळांनींच होम करावा. क्वचित् ग्रंथीं पळसाचीं फुलें, दूर्वा, शिरस, भाताच्या लाह्या, सुपारी, यव, नारळ, रक्तचंदनाचे तुकडे आणि नाना-विध फळें यांचें देखील पायसांत मिश्रण करावें असें सांगितलें आहे. जपाच्या दशांशानें होम करावा. नृसिंह, भैरव इत्यादि देवतांच्याही मंत्रांचा होम जर कुलाचारानें प्राप्त असेल तर करावा. या बाबतींत ग्रहमखासह होमाचा सविस्तर प्रयोग कौस्तुभांत पाहावा.

अथबलिदानं ब्राह्मणेनमाषादिमिश्रान्नेनकूष्माण्डेनवाकार्यम् यदाघृतमयंयव-पिष्टादिमयंवासिंहव्याघ्रनरमेषादिकंकृत्वाखड्गेनघातयेत् ब्राह्मणेनपशुमांस-मद्यादिबलिदानेब्राह्मण्यभ्रष्टता सकामेनक्षत्रियादिनासिंहव्याघ्रनरमहिषछाग-सूकरमृगपक्षिमत्स्यनकुलगोधादिप्राणिस्वगात्ररुधिरादिमयोबालिर्देयःकृष्णसार-मृगःक्षत्रियादिभिरपिनदेयः अत्रबलिदानमन्त्रादिप्रकारःसिन्धौज्ञेयः अत्रशत-चण्डीसहस्रचण्डीप्रयोगःकौस्तुभादौज्ञेयःद्विविधाशौचेऽपिनवम्यांहोमंघटादि-देवतोत्थापनंचब्राह्मणद्वाराकारयित्वास्वयंपारणं कृत्वाऽऽशौचान्तेब्राह्मणभो-जनंदक्षिणादिदानंचकार्यम् एवंरजस्वलापिपारणाकालेपारणंकृत्वाशुद्धौदाना-दिकं कुर्यात् विधवायास्तुरजोदोषे भोजननिषेधात्पारणापिशुद्ध्युत्तरमेव एवं-व्रतान्तरप्यूह्यम् प्रतिपदादियावदष्टमीलोहाभिसारिकंकर्मराज्ञांविहितम् तत्रछत्र-

चामरादिराजचिह्नानांगजाश्वादीनांचापादिशस्त्राणांदुन्दुभ्यादीनांचपूजाहोमादिकंकार्यम् येहयान्पालयन्तितेराजभिन्नाअपिस्वातीयुतामाश्विनप्रातिपदं द्वितीयांवारभ्यनवमीपर्यन्तं वाजिनीराजनाख्यंकर्मकुर्युः तत्रोच्चैश्रवःपूजारैवतपूजाचप्रतिमायांकार्या प्रत्यक्षमश्वपूजानीराजनंचकार्यम् कर्मद्वयेऽपितत्पूजामन्त्राहोमादिमन्त्राः सविस्तरप्रयोगश्चकौस्तुभे इदानीमश्ववन्तःप्राकृतजनास्तुविजयादशम्यामश्वांस्तोयेऽवगाह्यपुष्पमालाभिर्विभूष्याश्वशालायांप्रवेशयन्ति तत्र गंधर्वकुलजातस्त्वंमाभूयाःकुलदूषकः। ब्राह्मणः सत्यवाक्येनसोमस्यवरुणस्यच १ प्रभावाच्चहुताशस्यवर्धयत्वंतुरंगमान्। रिपून्विजित्यसमरेसहभर्त्रासुखीभव २ इतिमन्त्रेणकेवलाश्वपूजापिकर्तुमुचिता।

**बलिदान**—ब्राह्मणानें उडीद मिसळलेलें अन्न अथवा कोहळा याचें बलिदान करावें. किंवा तुपाचें अथवा यवाच्या पिठाचें करावें. किंवा सिंह, व्याघ्र, मनुष्य, मेंढा वगैरेंचा खड्गानें वध करावा. ब्राह्मणानें पशुमांस अथवा मद्यादिक यांचें बलिदान केल्यास, तो ब्राह्मण्यापासून भ्रष्ट होतो. सकाम अशा क्षत्रियांनींहि सिंह, वाघ, मनुष्य, मेंढा, डुक्कर, हरिण, पक्षी, मत्स्य, मुंगुस, घोरपड वगैरे प्राण्यांचा व आपल्या शरीरांतील रक्त इत्यादिकांचा बलि द्यावा. कृष्णसार मृगाचा बलि क्षत्रियादिकांनीं सुद्धां देऊं नये. या बलिदानाविषयींच्या मंत्रादिकांचा प्रकार निर्णयसिंधूंत सांगितला आहे, तो पाहावा. शतचंडी व सहस्रचंडी यांचे या नवरात्रांतले प्रयोग कौस्तुभग्रंथांत पाहावे. जननाशौच अथवा मृताशौच असतांहि नवमीला—होम, घट, देवता इत्यादिकांचें उत्थापन ब्राह्मणाकडून करवून, आपण पारणा करावी, आणि अशौच गेल्यानंतर, ब्राह्मणभोजन, दक्षिणा इत्यादि करावें. याचप्रमाणें रजस्वलेनेंहि पारणाकालीं पारणा करून दानादिक शुद्धीनंतर करावींत. विधवेला रजोदर्शनांत भोजनाचा निषेध सांगितला आहे. यास्तव तिनें पारणादेखील शुद्धीनंतरच करावी. याचप्रमाणें इतर व्रताबद्दलहि समजावें. राजांनीं प्रतिपदेपासून अष्टमीपर्यंत, सर्व लोहादिक शस्त्रांची स्थापना करावी, आणि छत्रचामरादि राजचिन्हें, हत्ती, घोडे वगैरे पशु, धनुष्यादि शस्त्रें, नगारे, दुंदुभी वगैरे वाद्यें या सर्वांची पूजा, होम वगैरे करावींत. घोडे बाळगणारे लोक जरी राजे नसले, तरी त्यांनीं स्वातीनक्षत्रयुक्त अशा प्रतिपदेला अथवा द्वितीयेला आरंभ करून नवमीपर्यंत वाजिनीराजनकर्म (घोडयाची पूजा, आरती वगैरे) करावें. त्यामध्यें उच्चैःश्रव्याची पूजा व रैवतपूजा प्रतिमांच्या ठिकाणीं कराव्या. प्रत्यक्ष घोडयाची पूजा व आरती करावी. या दोन्ही कर्मांच्या पूजांचे मंत्र व होमादिकांचे मंत्र, यांचा खुलासेवार प्रयोग कौस्तुभांत सांगितला आहे. सध्यां घोडे बाळगणारे लोक विजयादशमीला आपल्या घोडयांना स्नानें घालून व पुष्पांच्या माळांनीं शृंगारून, त्यांना अश्वशाळेंत नेऊन (तबेल्यांत) बांधतात. या ठिकाणीं 'गंधर्वकुलजातस्त्वंमाभूयाः कुलदूषकः। ब्राह्मणः सत्यवाक्येन सोमस्य वरुणस्य च ॥ प्रभावाच्च हुताशस्य वर्धय त्वं तुरंगमान्। रिपून्विजित्य समरे सह भर्ता सुखी भव ॥ या मंत्रांनीं फक्त अश्वपूजाच करावी.

अथपारणाविसर्जनयोःकालः तत्रविसर्जनंदशम्यांकार्यम् दिनद्वयेदशमीसत्त्वेपूर्वदशम्यांश्रवणान्त्यपादयोगेतत्रैव विसर्जनम् तत्रतद्योगाभावेतुपरदशम्यामेव परत्रदशम्यभावेपूर्वदशम्यांनक्षत्रयोगेसत्यसतिवाकार्यम् नक्षत्रयोगानुरोधेन क्रियमाणंविसर्जनमपराह्णेऽभवति अन्यथाप्रातरेव तत्रमृदादिप्रतिमायो विसर्जनपूर्वकंजलादौत्यागः परंपरयापूजितायां धातुप्रतिमायास्तु घटादिस्थानादुत्तिष्ठेत्यादिमन्त्रैरुत्थापनमात्रंकार्यम् नतुविसर्जनम् यद्दिनेविसर्जनंतत्रैवनियमत्यागस्यौचित्यात् विसर्जनोत्तरंतद्दिनेएवपारणंकार्यम् अन्येतुसत्यपिदशम्यांविसर्जनविधौनवम्यामेवपारणंकार्यम् नवम्यांपारणंकुर्यात् दशम्यामभिषेकंच कृत्वामूर्तिंविसर्जयेदित्यादिवचनादित्याहुः अत्रैवंव्यवस्था प्रथमदिनेष्वल्पाष्टम्यायुक्तानवमी द्वितीयदिनेपारणपर्याप्तनवम्यायुक्तादशमी तत्परदिनेश्रवणयुक्ताविसर्जनार्हादशमी तत्राष्टमीनवम्युपवासयोःप्रथमदिनेसिद्धत्वादवशिष्टनवम्यांपारणमवशिष्टदशम्यांविसर्जनम् यदातुअवशिष्टनवमीदिनेएवदशमी श्रवणयुक्ताविसर्जनार्हातदा विसर्जनोत्तरंपारणम् यदापूर्वदिनेषष्टिदण्डाष्टमीतत्परदिनेऽष्टमीशेषयुतानवमी तत्परदिने नवमीशेषयुतादशमी तदानवम्यायुक्तदशम्यामेवविसर्जनोत्तरंपारणाअथनवमीषष्टिदण्डा द्वितीयदिने नवमीशेषयुक्तादशमीतत्रापिनवम्यायुक्तदशम्यामेवविसर्जनपारणे यदातुअष्टमीनवमीदशम्यस्तिस्रोऽपितिथयःसूर्योदयमारभ्यास्तमयपर्यन्तमखण्डास्तत्तत्कृत्यपर्याप्तास्तदा दाक्षिणात्यानांनवम्यामेवपारणाचारान्नवम्यामेवपारणविसर्जने येषांदशम्यामेवाचारस्तेषांतदुभयंदशम्यामेव ।

**पारणा व विसर्जन यांचा काळ**—दशमीला देवताविसर्जन करावें. दशमी जर दोन दिवस असेल, आणि पूर्वदिवशीं जर श्रवणनक्षत्राच्या शेवटच्या चरणाचा योग असेल, तर दुसऱ्या दिवशीं दशमीमध्यें करावें. दशमी जर दोन दिवस नसली आणि पूर्व दिवशीं दशमीला श्रवणयोग जरी नसला, तरी करावें. नक्षत्राच्या योगाच्या अनुरोधानें जर विसर्जन करायचें असेल, तर तें अपराह्णकाळीं करावें. नक्षत्राच्या अनुरोधानें जर जर प्रतिमा असेल, तर तिचें विसर्जन करावें, मृत्तिकादिकांची जर प्रतिमा असेल, तर तिचें विसर्जन करून, ती उदकादिकांत टाकावी. परंपरागत पूजा करण्याची जर धातूची मूर्ति असेल, तर तिचें घटादिस्थापनेपासून 'उत्तिष्ठ०' इत्यादि मंत्रांनीं उत्थापन मात्र करावें. विसर्जन करूं नये. देवताविसर्जनाच्या दिवशीं, पूर्वी धरलेले नियम सोडावे हें जरी योग्य आहे, तरी नवमीलाच पारणा करावी; कारण, 'नवमीला पारणा करून दशमीला अभिषेक करावा आणि मूर्तीचें विसर्जन करावें' असें वचन असल्याचें दुसरे ग्रंथकार सांगतात. या बाबतींत अशी व्यवस्था करावी:—पूर्व दिवशीं स्वल्प अष्टमीयुक्त नवमी, दुसऱ्या दिवशीं पारणेला योग्य अशी नवमीयुक्त दशमी आणि तिसऱ्या दिवशीं श्रवणनक्षत्रयुक्त अशी विसर्जनाला योग्य दशमी, याप्रमाणें असतां, अष्टमीचें व नवमीचें अशीं दोन उपोषणें पहिल्या दिवशीं येतात; यास्तव, अवशिष्ट राहिलेल्या नवमींत पारणा

करून शेष दशमींत विसर्जन करावें. शेष नवमीच्या दिवशींच विसर्जनाला योग्य अशी दशमी जेव्हां असेल, तेव्हां विसर्जन करून, नंतर पारणा करावी. पहिल्या दिवशीं साठ घटका अष्टमी, दुसऱ्या दिवशीं शेषाष्टमीयुक्त नवमी आणि तिसऱ्या दिवशीं नवमीशेषयुक्त दशमी असा योग ज्यावेळीं असेल तेव्हांहि नवमीनें युक्त अशा दशमीलाच विसर्जन आणि पारणा हीं करावींत. अष्टमी, नवमी व दशमी या तिन्ही तिथी जेव्हां सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत अखंड आणि, ज्या ज्या कृत्यांना योग्य असतील, तेव्हां दाक्षिणात्य ( नर्मदेच्या खालच्या ) लोकांचा नवमीलाच पारणा करण्याचा परिपाठ आहे. याकरितां नवमीलाच पारणा आणि विसर्जन हीं करावींत. दशमीला करण्याची ज्यांची परंपरा असेल त्यांनीं दशमीलाच या दोन्ही गोष्टी कराव्या.

अथविजयादशमीसापरदिनेएवापराह्णव्याप्तौपरा दिनद्वयेपराह्णव्याप्तौदिनद्वयेपिश्रवणयोगेसत्यसतिवापूर्वा एवंदिनद्वयेपराह्णव्याप्त्यभावेपि श्रवणयोगसत्त्वासत्त्वयोः पूर्वैव दिनद्वयेपराह्णव्याप्त्यव्याप्त्योरेकतरदिनेश्रवणयोगेयद्दिनेश्रवणयोगः सैवग्राह्या एवमपराह्णैकदेशव्याप्तावूह्यम् यदापूर्वदिनेएवापराह्णव्याप्तापरदिनेचश्रवणयोगाभावःतदापिपूर्वैव यदातुपूर्वदिनेएवापराह्णव्यापिनीपरदिनेचमुहूर्तत्रयादिव्यापिनी अपराह्णात्पूर्वमेवसमाप्तापरत्रैवश्रवणयोगवतीतदापरैव अपराह्णदशम्यभावेऽपि यांतिथिंसमनुप्राप्यउदयंयातिभास्करइत्यादिसाकल्यवचनैः श्रवणयुक्तायाग्राह्यायाऔदयिकस्वल्पदशम्याःकर्मकालेसत्त्वापादनात् सिन्धौतुइदंपरदिनेपराह्णकालेश्रवणसत्त्वेएव श्रवणस्याप्यपराह्णात्पूर्वमेवसमाप्तौतुपूर्वैवेत्युक्तम् युक्तंचैतत् यदापरदिनेएवापराह्णव्याप्तिःपूर्वदिनेएवापराह्णात्परत्रसायाह्नादौश्रवणयोगस्तदातुपरैवग्राह्येतिममप्रतिभाति अत्रापराजितापूजनंसीमोल्लङ्घनंशमीपूजनं देशान्तरयात्रार्थिनांप्रस्थानंचविहितम् तत्पूजाप्रकारस्तु अपराह्णेग्रामादीशान्यांदिशिगत्वा शुचिदेशेभुवमुपलिप्यचन्दनादिनाष्टदलमालिख्यममसकुटुम्बस्यक्षेमसिद्ध्यर्थं अपराजितापूजनंकरिष्ये इतिसंकल्प्य मध्ये अपराजितायैनमइत्यपराजितामावाह्यतद्दक्षिणेक्रियाशक्त्यैनमइतिजयां वामतःउमायैनमइतिविजयांचावाह्य अपराजितायैनमः जयायै नमः विजयायैनमः इतिनाममन्त्रैः षोडशोपचारांपूजांकृत्वाप्रार्थयेत् इमां पूजांमयादेवियथाशक्तिनिवेदिताम् । रक्षार्थंतुसमादायव्रजस्वस्थानमुत्तमम् १ इति अथराज्ञःसंकल्पेयात्रायांविजयसिद्ध्यर्थमितिविशेषः पूजानमस्कारान्ते हारेणतुविचित्रेणभास्वत्कनकमेखला । अपराजिताभद्ररताकरोतुविजयंमम १ इत्यादिमन्त्रैर्विजयंप्रार्थ्यपूर्ववद्विसृजेदितिसंक्षेपः ततःसर्वेजनाः ग्रामाद्बहिरीशानदिगवस्थितांशमींगत्वापूजयेयुः सीमोल्लङ्घनंतुशमीपूजनात्पूर्वंपश्चाद्वाकार्यम् राजातुअश्वमारुह्यसपुरोहितःसामात्यःशमीमूलंगत्वावाहनादवरुह्यस्वस्तिवाचनपूर्वकंशमींसंपूज्यकार्योद्देशानमात्यैःसहसंवदन्प्रदक्षिणांकुर्यात् पूजाप्रकारस्तु ममदुष्कृतामङ्गलादिनिरासार्थंक्षेमार्थंयात्रायांविजयार्थंच शमीपूजांकरिष्ये शम्यलाभेअश्मन्तकवृक्षपूजांकरिष्येइतिसंकल्पः राजातुशमी

मूलेदिक्पालपूजांवास्तुदेवतापूजांचकुर्यात् अमङ्गलानांशमनींशमनींदुष्कृतस्यच। दुःखप्रणाशिनींधन्यांप्रपद्येऽहंशमींशुभाम् १ इतिपूजामन्त्रःपूजान्ते शमीशमयतेपापंशमीलोहितकण्टका। धरित्र्यर्जुनबाणानांरामस्यप्रियवादिनी १ करिष्यमाणयात्रायांयथाकालंसुखंमया। तत्रनिर्विघ्नकर्त्रीत्वंभवश्रीरामपूजिते २ इतिप्रार्थयेत् अश्मन्तकपूजने अश्मन्तकमहावृक्षमहादोषनिवारण। इष्टानां दर्शनंदेहिशत्रूणांचविनाशनम् १ इतिप्रार्थयेत् राजशत्रोर्मूर्तिंकृत्वाशस्त्रेणविध्येत् प्राकृताःशमीशाखाश्छित्त्वाआनयन्तितन्निर्मूलम् गृहीत्वासाक्षतामार्द्रांशमीमूलगतांमृदम्। गीतवादित्रनिर्घोषैरानयेत्स्वगृहंप्रति १ ततोभूषणवस्त्रादिधारयेत्स्वजनैःसहः। नीराज्यमानःपुण्याभिर्युवतीभिःसुमङ्गलम् २ इति अत्रदेशान्तरं जिगमिषुभिर्विजयमुहूर्ते चन्द्राद्यानुकूल्याभावेऽपिप्रयाणंकार्यम् तत्रविजयमुहूर्तोद्विविधः ईषत्संध्यामतिक्रम्यकिंचिदुद्भिन्नतारकः। विजयोनामकालोयंसर्वकार्यार्थसाधकः १ इत्येकः एकादशोमुहूर्तोपिविजयःपरिकीर्तितः। तस्मिन्सर्वैर्विधातव्यायात्राविजयकांक्षिभिः १ इत्यपरः उक्तद्वयान्यतरमुहूर्तेदशमीयुक्तेप्रस्थानंकार्यंनत्वेकादशीयुक्त आश्वयुक्शुक्लदशमीविजयाख्याखिलशुभा। प्रयाणेतुविशेषेणकिंपुनःश्रवणान्विता १ इतिज्योतिर्ग्रन्थोक्तेरन्यान्यपिकर्माणिमासविशेषनिरपेक्षाण्यत्रचन्द्राद्यानुकूल्याभावेप्यनुष्ठेयानि मासविशेषेविहितानितुचूडाकर्मविष्णवादिदेवताप्रतिष्ठादीनिनकुर्यात् राज्ञांपट्टाभिषेकेनवमीविद्धादशमीश्रवणयुतापिनग्राह्याकिंत्वौदयिक्येवग्राह्या।

**विजयादशमीनिर्णय**—विजयादशमी जर दुसऱ्या दिवशीं अपराह्णव्यापिनी असेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवस जर अपराह्णव्यापिनी असेल आणि दोन्ही दिवशीं जर श्रवणयोग असेल अथवा दोन्ही दिवशीं तो नसेल, तर पहिल्या दिवसाचीच घ्यावी. दोन्ही दिवशीं अपराह्णव्यापिनी नसून श्रवणयोग जरी असला अथवा नसला तरी, पूर्व दिवसाचीच घ्यावी. दोन दिवस अपराह्णव्यापिनी असेल अथवा दोन्ही दिवशीं नसेल आणि त्यांपैकीं एक दिवस जर श्रवणयोग असेल, तर त्याच योगाची (श्रवणाची) घ्यावी. याप्रमाणेंच अपराह्णकाळीं एकदेशव्याप्ति असतांही निर्णय जाणावा. पूर्व दिवशींच जर अपराह्णव्याप्ति असेल आणि दुसऱ्या दिवशीं सहा घटिका इत्यादि व्याप्ति असून ती अपराह्णपूर्वींच संपत असेल, आणि त्या दिवशीं जर श्रवणयोग असेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. कारण, अपराह्णीं जरी व्याप्ति नाहीं, तरी, 'ज्या तिथीसह सूर्य उदय पावतो ती तिथि संपूर्ण होय' वगैरे सर्व वचनांनीं ग्राह्य अशी जी सूर्योदयकाळीं असलेली स्वल्प दशमी, ती जर श्रवणयुक्त असेल तर कर्मकालीं आहे असें ठरतें, आणि म्हणूनच ती ग्राह्य होय. निर्णयसिंधूंत, दुसऱ्या दिवशीं अपराह्णकाळीं जर श्रवणनक्षत्र असेल तरच दुसऱ्या दिवसाची घ्यावी व श्रवणही जरी अपराह्णापूर्वींच समाप्त झालें असलें तरी पूर्व दिवसाचीच घ्यावी, असें जें सांगितलें आहे तें योग्यच आहे. केवळ दुसऱ्या दिवशींच जव्हां अपराह्णव्याप्ति असेल आणि पूर्व दिवशींच जव्हां केवळ अपराह्णानंतर

सायान्ह वगैरे काळीं श्रवणयोग असेल तेव्हां दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी असें मला वाटतें. या विजयादशमीच्या दिवशीं अपराजिता देवीचें पूजन, सीमोल्लंघन, शमी-पूजन व देशान्तरीं यात्रा करण्यास निघण्याचें प्रस्थान हीं करावीत असें सांगितलें आहे. या पूजेचा प्रकारः—अपराह्णकाळीं गांवाच्या ईशान्येला जाऊन, शुद्ध स्थानीं जमीन सारवून, गंधेत्यादिकांनीं त्यावर अष्टदळ कमळ काढावें. मग 'मम सकुटुंबस्य क्षेमसिद्ध्यर्थं अपराजितापूजनं करिष्ये' असा संकल्प करावा. नंतर अष्टदळ कमळाच्या मध्यभागीं अपराजिता देवीचें 'अपराजितायै नमः' या मंत्रानें आवाहन करावें. तिच्या दक्षिणभागीं जया देवीचें 'क्रियाशक्त्यै नमः' या मंत्रानें आवाहन करावें. वामभागीं विजयादेवीचें 'उमायै नमः' या मंत्रानें आवाहन करावें. नंतर 'अपराजितायै नमः। जयायै नमः। विजयायै नमः। या नाममंत्रांनीं षोडशोपरांची पूजा करून, प्रार्थना करावी. ती येणेंप्रमाणें:—'इमां पूजां मया देवि यथाशक्तिनिवेदिताम्। रक्षार्थं तु समादाय व्रजस्व स्थानमुत्तमम्॥' राजानें संकल्पांत—'यात्रायां विजयसिद्ध्यर्थं' असा विशेष म्हणावा. पूजा करून नमस्कार केल्यानंतर 'हारेण तु विचित्रेण भास्वत्कनकमेखला। अपराजिता भद्ररता करोतु विजयं मम' इत्यादि मंत्रांनीं विजयाची प्रार्थना करून, पूर्ववत् विसर्जन करावें. याप्रमाणें संक्षेप जाणावा. नंतर सर्वजनांनीं गांवाच्या बाहेर ईशान्य दिशेला असलेल्या शमीच्या वृक्षाजवळ जाऊन, त्याची पूजा करावी. सीमोल्लंघन करणें तें शमीपूजनाच्या आधीं किंवा नंतर करावें. राजानें घोड्यावर बसून, पुरोहित, आमात्य यांसह शमीवृक्षाच्या तळवटीं जाऊन वाहनावरून खालीं उतरावें. पुण्याहवाचन करून शमीची पूजा करावी. पूजेचा प्रकार—'मम दुष्कृतामङ्गलादिनिरासार्थं क्षेमार्थं यात्रायां विजयार्थंच शमीपूजां करिष्ये'. शमी न मिळेल तर, 'अश्मंतकवृक्षपूजां करिष्ये' असा संकल्प करावा. राजानें शमीच्या वृक्षाच्या मूळीं दिक्पालांची व वास्तुदेवाची 'अमङ्गलानां शमनीं शमनीं दुष्कृतस्य च। दुःखप्रणाशिनीं धन्यां प्रपद्येऽहं शमीं शुभाम्॥' या मंत्रानें पूजा करावी. नंतर 'शमी शमयते पापं शमी लोहितकंटका। धरित्र्यर्जुनबाणानां रामस्य प्रियवादिनी॥ करिष्यमाणयात्रायां यथाकालं सुखं मया। तत्र निर्विघ्नकर्त्री त्वं भव श्रीरामपूजिते॥' अशी प्रार्थना करावी. अश्मंतकाचें जर पूजन असेल तर, 'अश्मंतक महावृक्ष महादोषनिवारण। इष्टानां दर्शनं देहि शत्रूणां च विनाशनम्॥' अशी प्रार्थना करावी. राजानें शत्रूची प्रतिमा करून, तिला शस्त्रानें छेदावी. प्राकृत लोक जे शमीच्या फांद्या तोडून आणतात, त्याला कोठें आधार नाहीं. 'शमीच्या मुळाजवळची ओली माती अक्षतायुक्त घेऊन, ती गीतवाद्यांच्या निर्घोषांत आपल्या घरीं आणावी. नंतर अलंकारवस्त्रादिक स्वजनांसह धारण करावींत. सौभाग्यवती स्त्रियांनां नीरांजन ओवाळल्यावर घरांत यावें. देशांतराला जाणारांनीं विजयमुहूर्तावर चंद्रादिकांची जरी अनुकूलता नसली, तरी बेलाशक गमन करावें. हा विजयमुहूर्त दोन प्रकारचा आहे. १ किंचित् संध्याकाळ उलटल्यावर, नक्षत्रें थोडीं जरी दिसूं लागलीं तरी जो काल येतो, तो विजयकाल होय. हा सर्व कार्यांची सिद्धि देणारा आहे. (२) अकरावा मुहूर्त हा देखील विजय-

काल होय. सर्व विजयेच्छूंनीं या मुहूर्तावरच प्रयाण करावें. या दोहोंपैकीं दशमीनें युक्त अशा एका मुहूर्तावर प्रस्थान करावें; एकादशीयुक्त मुहूर्तावर करूं नये आश्विन शुद्ध दशमीला विजयादशमी म्हणतात. ही सर्व कर्मांना शुद्ध आहे. या प्रयाणासाठीं तर ही विशेषच शुभ आहे. श्रवणनक्षत्रयुक्त असेल तर महान् योग होय, असें ज्योतिषग्रंथांत वचन असल्यामुळें जीं कर्में अमुकच महिन्यांत करण्याबद्दल करण्याचा निर्बंध नाहीं अशीं इतर कर्में देखील चंद्रादिकांची अनुकूलता नसतांही या तिथीवर करावींत. चूडाकर्म, विष्णु वगैरे देवतांचें प्रतिष्ठापन वगैरे जीं कर्में कांहीं विशिष्ट मासांत करावयाला सांगितलें आहे, तीं मात्र या दिवशीं करूं नयेत. राजाच्या पट्टाभिषेकाविषयीं, नवमीविद्ध अशी जरी दशमी असली, तरी ती न घेतां सूर्योदयीं व्याप्ति असणारीच घ्यावी.

आश्विनस्यशुक्लांदशमीमेकादशींपूर्णमासींवारभ्यमुहूर्तावशिष्टायांरात्रौतीर्थादौगत्वाप्रत्यहंमासपर्यन्तंकार्तिकस्नानंकार्यम् तत्प्रकारः विष्णुंस्मृत्वादेशकालौसंकीर्त्य नमःकमलनाभायनमस्तेजलशायिने । नमस्तेस्तुहृषीकेशगृहाणार्घ्यंनमोऽस्तुते १ इत्यर्घ्यंदत्वा कार्तिकेऽहंकरिष्यामिप्रातःस्नानंजनार्दन। प्रीत्यर्थंतवदेवेशदामोदरमयासह १ ध्यात्वाहंत्वांचदेवेशजलेस्मिन्स्नातुमुद्यतः । तवप्रसादात्पापंमेदामोदरविनश्यतु २ इतिमन्त्राभ्यांस्नात्वापुनरर्घ्यद्विर्दद्यात् तत्रमन्त्रौ नित्येनैमित्तिकेकृष्णकार्तिकेपापनाशिने । गृहाणार्घ्यंमयादत्तंराधयासहितोहरे १ व्रतिनःकार्तिकेमासिस्नातस्यविधिवन्मम । गृहाणार्घ्यंमयादत्तंराधयासहितोहरे २ कुरुक्षेत्रगङ्गापुष्करादितीर्थेविशेषेणफलविशेषः अथान्योऽपिविशेषःकार्तिकंसकलंमासंनित्यस्नायीजितेन्द्रियः। जपन्हविष्यभुग्दान्तःसर्वपापैःप्रमुच्यते १ स्मृत्वाभागीरथींविष्णुंशिवंसूर्यंजलेविशेत्। नाभिमात्रेजलेतिष्ठन्व्रतीस्नायाद्यथाविधि २ इदंकार्तिकस्नानंप्रातःस्नानंप्रातः संध्यांचकृत्वाकार्यम् ताभ्यांविनेतरकर्मानधिकारात् यद्यपिप्रातःसंध्यायाः सूर्योदये समाप्तिस्तथाप्यत्रवचनबलादुदयात्पूर्वंसंध्यांसमाप्यकार्तिकस्नानं कार्यमिति निर्णयसिन्धौउक्तम् नैवंग्रन्थान्तरेदृश्यते एवंमासस्नानाशक्तौत्र्यहंस्नायात्। अन्येषामपिकार्तिकमासव्रतानामत्रैवारम्भः तानियथा तुलसीदललक्षेणकार्तिकेयोऽर्चयेद्धरिम्। पत्रेपत्रेमुनिश्रेष्ठमौक्तिकंलभतेफलम् १ तुलसीमञ्जरीभिर्हरिहरार्चनेमुक्तिःफलम् रोपणपालनस्पर्शैःपापक्षयः तुलसीछायायांश्राद्धात्पितृतृप्तिः तुलसीशोभितगृहेतीर्थरूपेयमकिंकरानायान्तिइत्यादितुलसीमाहात्म्यम् एवंधात्रीमाहात्म्यमपि कार्तिकेधात्रिवृक्षाधश्चित्रान्नैस्तोषयेद्धरिम्। ब्राह्मणान्भोजयेद्भक्त्यास्वयंभुञ्जीतबन्धुभिः २ धात्रीछायासुश्राद्धंधात्रीपत्रैः फलैश्चहरिपूजनंचमहाफलम् देवर्षिसर्वयज्ञतीर्थानांधात्रीवृक्षेनिवासोक्तेःअत्रैवहरिजागरविधिः जागरंकार्तिकेमासियःकुर्यादरुणोदये। दामोदराग्रेसेनानीर्गोसहस्रंफलंलभेत्। १ शिवविष्णुगृहाभावेसर्वदेवालयेष्वपि । कुर्यादश्वत्थमूलेषुतुलसीनांवनेष्वपि । २ विष्णुनामप्रबन्धानियोगायाद्विष्णुसन्निधा। गोसहस्रप्रदानस्यफलमाप्नोतिमानवः

स्वाद्यकृत्पुरुषश्चापिवाजपेयफलंलभेत् । सर्वतीर्थावगाहोत्थंनतकः फलमाप्नुयात् ४ सर्वमेतल्लभेत्पुण्यंतेषांतुद्रव्यदःपुमान् । अर्चनाद्दर्शनाद्वापितत्षडंशमवाप्नुयात् ५ इतिकौस्तुभे सर्वाभावेब्राह्मणानांविष्णुभक्तानांवाश्वत्थवटयोर्वा सेवनंकुर्यादितितत्रैव सरोरुहाणितुलसीमालतीमुनिपुष्पकम् कार्तिकेविहितान्येवंदीपदानंचपञ्चमम् १ कार्तिकेमासोपवासोवानप्रस्थयतिविधवाभिःकार्यः गृहस्थैर्नकार्यः कृच्छ्रंवाप्यतिकृच्छ्रंवाप्राजापत्यमथापिवा एकरात्रंव्रतंकुर्यात्रिरात्रव्रतमेववा २ शाकाहारंपयोहारं फलाहारमथापिवा । चरेद्यवान्नाहारंवासंप्राप्तेकार्तिकेव्रती २ ।

**कार्तिकस्नान**—आश्विनशुद्धांतल्या दशमी, एकादशी अथवा पौर्णिमा यांपैकीं कोणत्या तरी एका तिथीवर आरंभ करून, दोन घटका रात्र शिल्लक राहिली असतां, कोणच्या तरी तीर्थावर जाऊन, एक महिनाभर दररोज कार्तिकस्नान करावें. स्नानाचा प्रकार असाः—प्रथम विष्णूचें स्मरण करून, देशकालादिकांचा उच्चार केल्यावर, नमो कमलनाथाय नमस्ते जलशायिने। नमस्तेस्तु हृषीकेश गृहाणार्घ्यं नमोस्तुते ॥' या मंत्रानें अर्घ्य देऊन, 'कार्तिकेऽहं करिष्यामि प्रातःस्नानं जनार्दन। प्रीत्यर्थं तव देवेश दामोदर मयासह ॥ ध्यात्वाहं त्वांच देवेश जलेऽस्मिन्स्नातुमुद्यतः। तव प्रसादात्पापंमे दामोदर विनश्यतु ॥' या मंत्रांनीं स्नान करावें आणि 'नित्ये नैमित्तिके कृष्ण कार्तिके पापनाशने। गृहाणार्घ्यं मया दत्तं राधयासहितो हरे ॥ व्रतिनः कार्तिके मासि स्नातस्य विधिवन्मम । गृहाणार्घ्यं मया दत्तं राधयासहितो हरे ॥' या मंत्रांनीं पुन्हा दोन वेळां अर्घ्य द्यावें. कुरुक्षेत्र, गंगा, पुष्कर वगैरे विशेष तीर्थांच्या ठिकाणीं या (स्नाना)चें विशेष फळ जाणावें. ह्या कार्तिकस्नानाच्या बाबतींत आणखी जो एक विशेष आहे, तो असाः—जो कोणी सर्व कार्तिक महिनाभर जितेंद्रिय राहून, रोज स्नान, जप, हविष्यान्न भक्षण करून राहतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो. भागीरथी, शिव आणि सूर्य यांचें स्मरण करून, पाण्यांत शिरावें. बेंबीपर्यंत पाण्यांत उभें राहून व व्रती होऊन यथाविधि स्नान करावें. हें कार्तिकस्नान, प्रातःस्नान व प्रातःसंध्या केल्यावर करावें; कारण, तीं कर्में केल्यावांचून इतर कर्में करण्यास अधिकार नाहीं. प्रातःसंध्या जरी सूर्योदयीं संपवावी असें आहे तरी या संबंधानें विशेष वचन असल्यानें, सूर्योदयापूर्वींच संध्या आटपून कार्तिकस्नान करावें, असें निर्णयसिन्धूंत सांगितलें आहे. ही गोष्ट इतर ग्रंथांत सांगितलेली नाहीं. अशा प्रकारचें स्नान अशक्तानें तीन दिवस करावें. कार्तिकांतल्या इतर व्रतांनाही याच वेळीं आरंभ करावा. तीं व्रतें येणेंप्रमाणेंः—कार्तिकांत एकलक्ष तुळशी पानांनीं जो हरीचें अर्चन करतो, त्याला प्रत्येक पानाबद्दल मुक्तीसारखें फळ मिळतें. तुळशीच्या मंजिऱ्यांनीं जर हरि व हर यांचें अर्चन केलें तर मुक्ति मिळते. तुळस लावणें तिचें पालन करणें व तिला स्पर्श करणें या गोष्टी केल्यास पापाचा नाश होतो. तुळशीच्या सावलींत श्राद्ध केल्यानें पितरांची तृप्ति होते. ज्या घरांत तुळस असते तें घर तीर्थप्रमाणेंच होय; त्या घरांत यमदूत येत नाहींत. असें तुळशीचें माहात्म्य आहे.

आंवळीचेंही जें असेंच माहात्म्य आहे, तें असें:—कार्तिकांत आंवळीखालीं निरनिराळ्या अन्नांनीं हरीचा संतोष करावा, भक्तीनें ब्राह्मणाला जेवूं घालावें व आपण बांधवांसह भोजन करावें. आंवळीच्या छायेंत श्राद्ध आणि आंवळीच्या पानाफलांनीं हरिपूजन या गोष्टी केल्यानें मोठें फळ मिळतें; कारण देव, ऋषी व यज्ञांना योग्य अशीं तीर्थें यांची वस्ती आंवळींत असते, असें वचन आहे. या महिन्यांत हरिजागरविधि करावा. 'कार्तिकांत दामोदराच्या सन्निध जो अरुणोदयापर्यंत जागरण करतो, त्याला हे षडानना, हजार गाईंच्या दानाचें फळ मिळतें. शिव अथवा विष्णु यांचीं देवळें नसल्यास इतर कोणत्याही देवळांत अथवा पिंपळाच्या मुळापाशीं, अगर तुळशीच्या वनांत जो विष्णूच्या नामप्रबंधाचें गायन विष्णूच्या समीप करतो, त्यास सहस्र गोदानाचें फळ मिळतें. (विष्णूजवळ) वाद्य वाजविणारालाही वाजपेय यज्ञाचें फळ मिळतें. नाचणारालाही सर्व तीर्थांत स्नान केल्याचें फळ मिळतें. या गोष्टी करणाराला जो द्रव्य देतो त्यालाही हीं सर्व फळें मिळतात. अर्चन किंवा दर्शन हीं केल्यानें षष्ठांश फळ मिळतें;' असें कौस्तुभांत सांगितलें आहे. वरच्या साऱ्यांचा जर अभाव असेल तर विष्णुभक्त ब्राह्मण, पिंपळ किंवा वड यांची सेवा करावी असेंही कौस्तुभांत म्हटलें आहे. कार्तिकांत कमळें, तुळशी, जाई, अगस्त्याचीं फुलें ह्यांनीं पूजा करून दीपदान देणें योग्य आहे. कार्तिक महिन्याचा उपास–वानप्रस्थ, संन्यासी, विधवा व गृहस्थ यांनीं करूं नये. जे व्रती असतील त्यांनीं कार्तिकांत कृच्छ्र, अतिकृच्छ्र अथवा एकरात्र किंवा त्रिरात्र प्राजापत्य करावें. शाकाहार, दुग्धाहार, फलाहार किंवा यवान्नाहार करावा.

अथकार्तिकेवर्ज्यानि पलाण्डुलशुनहिङ्गुछत्राकगृञ्जनमूलकालाबुशिग्रुवृन्ताककूष्माण्डबृहतीफलकलिङ्गकपित्थतैललवणशाकद्विपाचितान्नपर्युषितान्नदग्धान्नानिमाषमुद्गमसूरचणककुलित्थनिष्पावाढक्यादि द्विदलानिचवर्जयेत् सप्तम्यांधात्रीफलं तिलांश्चाष्टम्यां नारिकेरंरविवारे धात्रीफलंसर्वदावर्ज्यम्।

**कार्तिकांतले वर्ज्य पदार्थ**—कार्तिकांत कांदा, लसूण, हिंग, भुइमूग, गाजर, मुळा, पांढरा (दुध्या) भोपळा, शेवगा, (पाला, फुलें व शेंगा), कोहळा, कलिंगड, कवठ, तेल, लोणचें, शिजवलेलें अन्न, करपलेलें अन्न, उडीद, मूग, मसुरा, हरबरा, हुलगे (कुळीथ), पावटा, पांढरा पावटा, चवळी, काळे वाल, घेवडा, तूर इत्यादि द्विदलधान्यें वर्ज्य करावींत. सप्तमीला आंवळे व तीळ, अष्टमीला नारळ व रविवारीं आंवळे हीं वर्ज्य करावींत.

कांस्यपात्रभोजनवर्जनव्रते कांस्यपात्रं घृतपूर्णंदद्यात् मधुत्यागे घृतपायसशर्करादानंसमामौ कार्यम् तैलत्यागेतिलदानम् कार्तिकेमौनभोजीसतिलां घण्टांदद्यात्स्वर्णयुतानिमाषयुतानित्रिंशत्कूष्माण्डानि त्र्यमासेदद्यात् कार्तिकेकांस्यभोजी कृमिभुक् फलवर्जनेफलंरसत्यागेरसंधान्यत्यागेधान्यानिदेयानिसर्वत्रगोदानंवा एकतःसर्वदानानिदीपदानंतथैकतः। कार्तिकेदीपदानस्यकलांनार्हन्ति षोडशीम् १ एतावद्व्रतासंभवेचातुर्मास्यव्रतासंभवेवाकार्तिकेकिंचिद्व्रतमवश्यं कार्यम् अव्रतःकार्तिकोयेषांगतोमूढधियामिह। तेषांपुण्यस्यलेशोऽपिनभवेत्सूक-

रात्मनाम् १ इत्युक्तेः शालग्रामादिदेवताग्रेस्वस्तिकमण्डलादिकंरङ्गवल्ल्यादि-नाकरोतिसास्वर्गादिफलंभुक्त्वासप्तजन्मसुवैधव्यंनाप्नोति कार्तिकेपुराणेतिहास-श्रवणारम्भसमाप्तीविहिते ।

**व्रतसमाप्तिदानें**—काशाच्या थाळ्यांत जेवणें सोडलें असल्यास काशाचा थाळा तुपानें भरून दान करावा. मध सोडला असल्यास सप्तमीला तूप, खीर व साखर यांचें दान करावें. तेल सोडलें असल्यास तीळ द्यावेत. मुक्यानें जेवणाचें व्रत जर कार्तिकांत धरलें असेल तर तिळानें भरलेली घंटा द्यावी. इतर महिन्यांत जर हें व्रत धरलें असेल तर सोनें, उडीद व तीस कोहळे द्यावेत. कार्तिकांत जर काशाच्या भांड्यांत जेवण केलें तर किडे खाल्ल्याचा दोष लागतो. जें फळ सोडलें असेल तें द्यावें. जो रस सोडला असेल तो द्यावा. जें धान्य सोडलें असेल त्याचें दान द्यावें अथवा सर्व बाबतींत गोदान द्यावें. दीपदानाचें फळ सर्व दानांच्या बरोबरीचें आहे; म्हणून कार्तिकांत केलेल्या दीपदानाच्या फळाचा सोळावाहि भाग इतर दानांत नाहीं. इतकीं व्रतें करणें अशक्य असल्यास अथवा चातुर्मास्यांत व्रतांचा जर असंभव असेल, तर कार्तिकांत कोणचें तरी व्रत अवश्य करावें. कारण, 'ज्या मूढ बुद्धीच्या लोकांचा कार्तिकमास व्रतावांचून जातो त्यांना पुण्याचा लेशही मिळत नाहीं. त्यांना डुकराप्रमाणें समजावें,' असें वचन आहे. जी स्त्री या महिन्यांत शालग्रामापुढें रांगोळीनें स्वस्तिक, मंडलादि रंगवल्ल्या काढते, ती स्वर्गादि फळ भोगते व तिला सात जन्मपर्यंत वैधव्य येत नाहीं. कार्तिकांत पुराण, इतिहास वगैरेची समाप्ति करणें योग्य आहे.

तत्प्रकारः ब्राह्मणंवाचकंकुर्यान्नान्यवर्णजमादरात् । श्रावयेच्चतुरोवर्णान्कृत्वाब्राह्मणमग्रतः १ विस्पष्टमद्रुतंशान्तंस्पष्टाक्षरपदंतथा । कलास्वरसमायुक्तंरसभावसमन्वितम् २ ब्राह्मणादिषुसर्वेषुग्रन्थार्थंचार्पयेन्नृप । यएवंवाचयेद्राजन्सविप्रोव्यासउच्यते ३ समाप्तेषुपुराणेषुशक्त्यातंतर्पयेन्नृपः । वाचकःपूजितोयेनप्रसन्नास्तस्यदेवताः ४ श्राद्धेयस्यद्विजोभुङ्क्तेवाचकःश्रद्धयान्विताः । भवन्तिपितरस्तस्य तृप्तावर्षशतंनृप५इति कार्तिकस्नानकालेऽभिलाषाष्टकंकाशीखण्डोक्तं पुत्रकामेनपठितव्यम् अत्रैवदुग्धव्रतंसमर्प्यदुग्धदानंकृत्वाद्विदलव्रतंसंकल्पयेत् अत्रोत्पत्तौयेषांदलद्वयंदृश्यतेतेवर्जनीयाइत्येके अन्येत्वेवंलक्षणायांवचनाभावात्स्वरूपतायेषांद्विदलं दृश्यतेतेवर्ज्यानतुअन्ये नापिपत्रपुष्पादिकमित्याहुः एवमन्यान्यपिताम्बूलकेशकर्तनादिवर्जनरूपाणिव्रतानिज्ञेयानि अत्राकाशदीपउक्तः सूर्यास्तेगृहाददूरेपुरुषप्रमाणयज्ञियकाष्ठंभूमौनिखन्यतस्यमूर्ध्निअष्टदलाद्याकृतिनिर्मितेदीपयन्त्रमध्येमुख्यदीपंसमंततोष्टावितिसंस्थाप्यनिवेदयेत् दामोदरायनभसितुलायांदोलयासह । प्रदीपंतंप्रयच्छामिनमोऽनन्तायवेधसे १ इतिमन्त्रः एवंमासमाकाशदीपदानान्महाश्रीप्राप्तिः ।

**पुराणश्रवणप्रकारः**— पुराण सांगायला आदरानें ब्राह्मणाला बोलवावा. इतर वर्णीयाला बोलावूं नये. ऐकणाऱ्यांत ब्राह्मणाला पुढें करून

चारी वर्णांनीं तें ऐकावें. पुराण वाचणाऱ्यानें स्पष्ट, सावकाश उच्चार करीत, शांत चित्तानें, अक्षरें, पदें, कला, स्वर, रस व भाव यांनीं युक्त असें वाचावें. हे राजा, ब्राह्मणादि सर्व वर्णांना त्याचा अर्थ सांगावा. अशा प्रकारें जो ब्राह्मण पुराण वाचतो त्याला व्यास असें म्हणतात. पुराणें वाचणें संपल्यावर वाचकाची यथाशक्ति संभावना करावी. जो वाचकाची पूजा करतो, त्याला देवता प्रसन्न होतात. वाचक ज्याच्या घरीं श्राद्धांत जेवतो, त्याचे पितर शंभर वर्षेपर्यंत तृप्त होतात, असें वचन आहे. पुत्रेच्छूनें कार्तिकस्नानकाळीं काशीखंडांत सांगितलेलें अभिलाषाष्टक म्हणावें. याच दिवशीं दुग्धव्रताची समाप्ति करून दुग्धदान द्यावें. व द्विदलव्रताचा संकल्प करावा. या ( द्विदलाच्या ) बाबतींत उत्पत्तिकाळीं ज्यांचीं दोन दळें दिसतात तीं वर्ज्य करावींत असें जरी कांहींचें मत आहे, तरी असें लक्षण मानण्यास कोठेंच वचन नसल्यानें, स्वरूपतः जीं द्विदल दिसतात तेवढींच वर्ज्य करावींत आणि बाकीचीं करूं नयेत. कित्येक म्हणतात कीं, पानें, फुलें वगैरेही वर्ज्य करूं नयेत. याचप्रमाणें आणखी कांहीं असें सांगतात कीं, विडा, हजामत वगैरे वर्ज्य करणें हीं व्रतेंच समजावींत. या महिन्यांत आकाशदिवा ( आकाशदीप ) लावण्यास सांगितला आहे. घरापासून जवळच एक पुरुष उंचीचें ( साडेतीन हात ) यज्ञीय लांकूड घेऊन, तें जमिनींत पुरून उभें करावें. त्याच्या शेंड्यावर अष्टदलादि आकृतीचें तयार केलेलें चक्र टांगून, त्याच्या मध्यभागीं मुख्य दिवा आणि त्याच्या भोंवतीं आठ दिवे 'दामोदराय नभसि तुलायां दोलया सह । प्रदीपं ते प्रयच्छामि नमोऽनन्ताय वेधसे' या मंत्रानें लावून, तो आकाशदिवा देवाला अर्पण करावा. याप्रमाणें सबंध कार्तिकाचा महिना रोज आकाशदिवा लावल्यानें पुष्कळ संपत्ति मिळते.

आश्विनपौर्णमास्यांकोजागरव्रतम् सापूर्वैवनिशीथव्याप्तौपूर्वाउत्तरदिने एवदिनद्वयेऽपिवानिशीथव्याप्तौदिनद्वयेनिशीथास्पर्शेवाउत्तरैव केचित्पूर्वदिने निशीथव्याप्तिरेवपरदिनेप्रदोषव्याप्तिरेवतदापरेत्याहुः अत्र लक्ष्मीन्द्रयोःपूजनं-जागरणमक्षक्रीडाचविहिता तत्रपद्मासनस्थांलक्ष्मींध्यात्वाऽक्षतपुञ्जेॐलक्ष्म्यै नमइत्यावाहनादिषोडशोपचारैःसंपूज्य नमस्तेसर्वदेवानांवरदासिहरिप्रिये । यागतिस्त्वत्प्रपन्नानांसामेभूयात्त्वदर्चनात् १ इतिपुष्पांजलिंदत्वानमेत् चतुर्दन्तसमारूढोवज्रपाणिः पुरन्दरः । शचीपतिश्चध्यातव्योनानाभरणभूषितः १ इतिध्यात्वाअक्षतपुञ्जादाविन्द्रायनमइतिसंपूज्य विचित्रैरावतस्थायभास्वत्कुलिशपाणये । पौलोम्यालिङ्गिताङ्गायसहस्राक्षायतेनमः १ इतिपुष्पाञ्जलिंदत्त्वानमेत् नारिकेलोदकंपीत्वाअक्षक्रीडांसमारभेत् । निशीथेवरदालक्ष्मीःकोजागर्तीतिभाषिणी १ तस्मैवित्तंप्रयच्छामिअक्षैःक्रीडां करोतियः । नारिकेलान्पृथुकांश्चदेवेभ्यःपितृभ्यःसमर्प्यबन्धुभिःसहस्वयंभक्षयेत् अस्यामेवाश्वयुजीकर्माश्वलायनैःकार्यम् तच्चपर्वद्वैधेपूर्वाह्णसंधौशेषपर्वणिप्रकृतीष्टिंकृत्वाकार्यम् अपराह्णसंधौविकृतिमिमांकृत्वाप्रकृतेरन्वाधानम् तत्प्रयोगोऽन्यत्रज्ञेयः

**कोजागरव्रतः**—आश्विनी पुनवेला कोजागरव्रत करावें. पुनव जर पूर्व दिवशींच निशीथव्यापिनी असेल तर तीच घ्यावी. व दुसऱ्या दिवशींच अथवा दोन्ही दिवशीं जर निशीथव्यापिनी नसेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. पूर्वदिवशीं निशीथ व्यापिनी व पुढच्या दिवशीं प्रदोषव्यापिनी असा प्रसंग असतां, दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी असें कांहीं ग्रंथकारांचें सांगणें आहे. या दिवशीं लक्ष्मी व इंद्र यांचें पूजन, जागरण व द्यूतक्रीडा हीं करण्यास सांगितलीं आहेत. पद्मासनावर बसलेल्या लक्ष्मीचें ध्यान करून अक्षतांच्या राशीवर 'ॐ लक्ष्मैनमः' या वाक्याच्या आवाहनानें पूजा केल्यावर 'नमस्ते सर्व देवानां वरदासि हरिप्रिये। या गतिस्त्वत्प्रपन्नानां सा मे भूयात्त्वदर्चनात् ॥' या मंत्रानें पुष्पांजली द्यावी व नमस्कार करावा. 'चतुर्दन्त समारूढो वज्रपाणिः पुरन्दरः। शचीपतिश्च ध्यातव्यो नानाभरणभूषितः ॥' या मंत्रानें इंद्राचें ध्यान करून अक्षतांच्या राशीवर 'इंद्रायनमः' म्हणून पूजा करावी, आणि मग विचित्रैरावतस्थाय भास्वत्कुलिशपाणये। पौलोम्यालिङ्गिताङ्गाय सहस्राक्षाय ते नमः॥' या मंत्रानें पुष्पांजली देऊन नमस्कार करावा. नंतर नारळांतलें पाणी पिऊन अक्ष (फांसे) खेळावयास सुरुवात करावी. मध्यरात्रीं, वर देणारी लक्ष्मी 'कोजागर्ति' (कोण जागतें आहे) अशाप्रकारें प्रश्न विचारून 'तस्मैवित्तं प्रयच्छामि अक्षैः क्रीडां करोति यः' (जो अक्षक्रीडा करतो आहे त्याला संपत्ति देईन) असें भाषण करते. देव आणि पितर यांना नारळ व पोहे अर्पण करून, आपण इष्टमित्रांसह खावेत. याच पुनवेला आश्वलायनांनीं आश्वयुजी कर्म करावें. पर्व जर दोन प्रकारचें असेल तर—पूर्वाह्णसंधींत शेष पर्व असल्यास हें कर्म प्रकृति इष्टि करून करावें आणि अपराह्णसंधींत असल्यास विकृति इष्टि करून प्रकृति इष्टीचें अन्वाधान करावें. या बाबतीचा प्रयोग इतर ग्रंथांत पहावा.

अथाग्रयणकालः आश्विनकार्तिकयोः पौर्णमास्याममावास्यायांवाशुक्लपक्षगतकृत्तिकादिविशाखान्तनक्षत्रेषुशुक्लपक्षस्थरेवत्यांवाव्रीह्याग्रयणम् एवंश्रावणभाद्रपदयोरुक्तेषुपर्वसुनक्षत्रेषु श्यामाकाग्रयणम् चैत्रवैशाखयोः पर्वादिषुयवाग्रयणम् तत्र पौर्णमासीपर्वणिसंगवात्पूर्वसंधौपूर्वदिनेआग्रयणंकृत्वाप्रकृत्यन्वाधानम् मध्याह्नात्परत्रसंधौसंधिदिनेआग्रयणंकृत्वाप्रकृत्यन्वाधानम् मध्याह्नेसंगवादूर्ध्वमध्याह्नात्पूर्वत्रवासंधौसंधिदिनेआग्रयणेष्टिंकृत्वा प्रकृतीष्टिःसद्यःपरदिनेवाकार्या दर्शेतुपूर्वाह्णेऽपराह्णेवा संधौयथासंधौयथाकालं दर्शेष्टिंकृत्वाप्रतिपन्मध्येआग्रयणेष्टिःकार्या एवंनक्षत्राग्रयणपक्षेपिपौर्णमासेष्टेःप्राक्दर्शेष्टेःपरंयथाभवेत्तथाआग्रयणंकार्यम् तथाचदीपिका दर्शेष्ट्याःपरमुक्तमाग्रयणकंप्राक्पौर्णमासाच्चतदिति यद्यपिअथोपूर्वाह्णपर्वक्षयइत्युपक्रमात्पूर्वाह्णसंधावेवायंक्रमइतिहेमाद्रिसिद्धान्तानुसारिदीपिकामतंतथापिसर्वावस्थेसंधाविस्थ एवक्रमइतिकौस्तुभसिद्धान्तानुसार्यत्रत्यसिद्धान्तोज्ञेयः अत्रपक्षेअथोपदेशार्थोयो ज्यम् पूर्वाह्णे पर्वक्षयेचेत्यर्थः इत्थंचकृष्णपक्षेनभवतीतिसिद्धम् एतद्दीपिकाकारमतममावास्यापर्वण्याग्रयणविधानस्याखण्डदर्शवैयर्थ्यापत्त्यानियुक्तामतिगृह्याग्निसागरोक्तिनस-

मीचीनाप्रतिभाति विकृत्यन्तराणांखण्डपर्वणिप्रकृत्युत्तरंप्रतिपद्यनुष्ठानेपिपर्वा-नुग्रहसंमतिवदखण्डदर्शेपि प्रतिपदि क्रियमाणाग्रयणस्य दर्शपर्वानुग्रहसंमति-संभवात् खण्डदर्शेदर्शपर्वविधानसार्थक्यसंभवाच्चेतिदिक् श्रावणादौश्यामा-काग्रयणंनकृतंचेच्छरदि व्रीह्याग्रयणेनसमानतन्त्रंकार्यम् तत्रस्मार्तेव्रीह्याग्रयणं श्यामकाग्रयणंचतन्त्रेण करिष्यइतिसंकल्प्येन्द्राग्निविश्वेदेवार्थमष्टौव्रीहिमुष्टीन्नि रूप्य शूर्पान्तरेश्यामाकान्सोमायनाम्नानिरूप्यपुनः प्रथमशूर्पेद्यावापृथिव्यर्थंव्री-हिनिर्वापः एवंहोमेपिविश्वेदेवहोमात्परंसौम्यश्यामाकचरुंहुत्वाद्यावापृथिवी-होमः आश्विनपौर्णमास्यामपराह्णादिसंधावाग्रयणेक्रियमाणेआश्वयुजीकर्मणा-पिसमानतन्त्रताकार्या तथाचजीर्णव्रीहिचरुर्नवव्रीहिचरुर्नवश्यामाकचरुश्चेतिस्था-लीत्रयेचरुत्रयंपूर्वाह्णादिसंधौतुसंधिदिनेप्रकृतियागोत्तरमाश्वयुजीपूर्वदिने संधि-दिनेवा प्रकृतियागात्पूर्वमाग्रयणइतिकालैक्याभावान्नैकतन्त्रता श्यामाकचर्वसं-भवेश्यामाकतृणैःप्रस्तरंकृत्वास्रुवादुत्तरतआस्तीर्य तत्रस्रुचोनिधानंतावतैवश्यामा-काग्रयणसिद्धिरितिवृत्तिकृन्नारायणः यवाग्रयणंतुकृताकृतं व्रीह्याग्रयणस्य वसन्त-पर्यन्तं गौणकालः यवाग्रयणस्यवर्षर्तुपर्यन्तम् अनापदिगौणकालेकुर्वन्कालाति पत्तिप्रायश्चित्तपूर्वमाग्रयणंकुर्यात् अनापदिगौणकालेकुर्वन्प्रायश्चित्तंनकुर्यात् गौणकालेऽप्यतिक्रान्तेवैश्वानरेष्टिंप्रायश्चित्तंकृत्वातिक्रान्ताग्रयणं कुर्यात् स्मार्ते वैश्वानरदेवताकःस्थालीपाकोग्राह्यःयएवाहिताग्नेःपुरोडाशास्तएवौपासनाग्नि-मतश्चरवइत्युक्तेः प्रथमाग्रयणस्यशरदत्ययेविभ्रष्टेष्टिंतद्देवताकस्थालीपाकंवाकृ-त्वाऽऽगामिमुख्यकालेप्रथमाग्रयणंकार्यम् गौणकालेप्रथमाग्रयणंनभवति अना-रब्धानांदर्शपूर्णमासाग्रयणादीनांप्रायश्चित्तविकल्पाद्विभ्रष्टेष्टिरपि विकल्पिताज्ञे-या आग्रयणमकृत्वाकिमपिनवोत्पन्नंसस्यंनभक्षणीयम् अकृताग्रयणोऽश्नीयान्न-वान्नंयदिवैनरः । वैश्वानरायकर्तव्यश्चरुःपूर्णाहुतिस्तुवा १ यद्वासमिन्द्र-रायेतिशतवारंजपेन्मनुम् ।

**आग्रयणकाल**—आश्विन आणि कार्तिक या महिन्यांत किंवा अमावास्येला आग्रयण करावें. अथवा महिन्यांतल्या शुक्ल पक्षांतल्या कृत्तिका-पासून विशाखापर्यंत जीं चौदा नक्षत्रें त्यांवर किंवा शुक्लपक्षांतल्या रेवती नक्षत्रावर व्रीह्याग्रयण करावें. याचप्रमाणें, श्रावण व भाद्रपद या महिन्यांत, मागें सांगितल्या-प्रमाणें पर्वदिवशीं किंवा नक्षत्रीं श्यामाकांचें (सावे) आग्रयण करावें. चैत्र आणि वैशाख या महिन्यांतल्या पर्वादिकांवर यवांचें आग्रयण करावें. आग्रयण करण्याच्या पुर्वेला संगवकालाच्या आधीं पर्वप्रतिपदांचा जर संधि असेल, तर पूर्वदिवशीं आग्रयण करून प्रकृतीष्टीचें अन्वाधान करावें. संधि जर मध्यान्हकालानंतर असेल, तर संधिदिवशीं आग्रयण करून, प्रकृतीष्टीचें अन्वाधान करावें. संगवकालानंतर मध्यान्हकाळीं किंवा मध्यान्हकाळाच्या आधीं जर संधि असेल, तर संधिदिवशीं आग्रयणेष्टि करून, प्रकृतीष्टि तत्कालीं करावी. अमावास्यापर्व असल्यास पूर्वाह्णकाळीं किंवा अपराह्णकाळीं जर संधि असेल तर योग्य वेळीं दर्शेष्टि करून, प्रतिपदेंत आग्रयणेष्टि करावी. याचप्रमाणें

नक्षत्राग्रयणासंबंधानेंही पुनवेच्या आधीं आणि अमावास्येष्टीनंतर, जसें जमेल तसें आग्रयण करावें. याबद्दल दीपिकेंत 'दर्शेष्टीनंतर व पौर्णिमेच्या आधीं आग्रयण करावें' असें सांगितलें आहे. 'अथो पूर्वाह्णपक्षक्षये' असा याचा आरंभ असल्यानें पूर्वाह्णसंधींत पर्वक्षयाच्या वेळीं हा क्रम समजावा, असें हेमाद्रीच्या सिद्धांताला जुळणारें जरी दीपिकेचें मत आहे, तरी संधि कसाही असला तरी तो क्रम असाच होतो, असा कौस्तुभाच्या सिद्धांताशीं जमणाराच येथला सिद्धांत जाणावा. या बाबतींत 'अथो' हें पद चकारार्थी योजावें आणि पूर्वाह्णसंधीचे आणि पर्वक्षयाचे जागीं' असा त्याचा अर्थ करावा. अशी गोष्ट कृष्णपक्षांत होत नाहीं असें यावरून सिद्ध झालें. अमावास्येला आग्रयण करावें असें सांगितलें खरें, परंतु अखंड अमावास्येला व्यर्थपणाचें संकट येणार म्हणून, दीपिकाकारांचें मत अयोग्य असल्याबद्दल जें गृह्याग्निसागराचें मत आहे, तें योग्य नाहीं असें मला वाटतें. कारण खंडपर्व असतां प्रकृतीच्या नंतर इतर विकृति प्रतिपदेंत जरी केल्या तरी पर्वांत केल्यासारखेंच जसें फळ येतें, तसेंच अमावास्या जरी अखंड असली तरी प्रतिपदेंत करावयाचें जें आग्रयण, त्याला अमावास्यापर्वाचें फळ मिळण्याच्या संमतीचा संभव होतो. खंड अमावास्या असतां, अमावास्या पर्वाच्या विधानानें सार्थक होण्याचा संभव आहे, असा सिद्धांत जाणावा. श्रावण वगैरे महिन्यांत जर श्यामाकाचें आग्रयण केलें नसेल, तर शरदृतूंत व्रीहींच्या आग्रयणासह समानतंत्र करावें. त्याबद्दल स्मार्ताग्नीकरितां 'व्रीह्याग्रयणं श्यामाकाग्रयणंच तन्त्रेण करिष्ये' असा संकल्प करावा, आणि इंद्राग्नि व विश्वेदेव या देवतांसाठीं सुपांत आठ मुठी तांदूळ घेऊन, दुसऱ्या सुपांत आठ मुठी 'सोमाय' या मंत्रानें सावे घ्यावे, व पुन्हां पहिल्या 'द्यावा पृथिवी' देवतांसाठीं तांदूळ घ्यावे. याप्रमाणें होमाच्या ठिकाणींही विश्वेदेवांचा होम झाल्यावर सोमदेवताक अशा श्यामाकचरूचा होम करून, नंतर द्यावापृथिवी देवतांचा होम करावा. आश्विनी पुनवेला अपराह्ण वगैरे संधींत जें आग्रयण करायचें तें आश्वयुजी कर्मासह समानतंत्रानें करावें. त्याचप्रमाणें जुन्या व नव्या तांदुळाचे भात आणि साव्यांचा भात असे तीन चरु स्वतंत्र तीन भांड्यांत करावे. पुनवेला जर पूर्वाह्णादि संधि असेल तर संधिदिवशीं प्रकृतियाग केल्यावर आश्वयुजी कर्म करून पूर्वदिवशीं किंवा संधिदिवशीं प्रकृतियागाच्या आधीं आग्रयण करावें. याप्रमाणें दोन कर्मांचे निरनिराळे दोन काळ असल्यानें दोन्ही कर्में एकाच तंत्रानें करूं नयेत. साव्यांचा भात जर मिळणार नाहीं, तर साव्यांचें एक मूठ गवत स्रुक्पात्राच्या उत्तरेकडे अंथरून त्यावर स्रुचि पात्र ठेवावें, म्हणजे श्यामाकाग्रयणाची सिद्धि होते, असें वृत्तिकार नारायण म्हणतो. यवांचें आग्रयण करावें. अथवा करूं नये. व्रीह्याग्रयणांचा गौणकाळ वसंतऋतूपर्यंत आहे. यवाग्रयणाचा गौणकाल वर्षाऋतूपर्यंत आहे. कोणतीही अडचण नसतां गौणकालीं जर आग्रयण केलें, तर मुख्य काळाचें उल्लंघन झाल्याचें प्रायश्चित्त करून मग आग्रयण करावें. आपत्तिकाळ असतां गौणकालीं आग्रयण करायला प्रायश्चित्त नको. गौणकालाचेंही जर उल्लंघन झालें तर वैश्वानरेष्टिरूप प्रायश्चित करून, राहिलेलें आग्रयण

करावें. स्मार्ताग्नीसाठीं वैश्वानरदेवताक स्थालीपाक ( भात ) घ्यावा. याचें कारण असें कीं, 'अग्निहोत्र्याचे जें पुरोडाश तेच स्मार्ताग्निवंताचे चरु होत' असें वचन आहे. पहिल्यांदांच जें आग्रयण करायाचें, तें शरदृतूंत करावें. त्या ऋतूंत जर न होईल, तर विभ्रष्ट इष्टि अथवा तद्देवताक स्थालीपाक करून, पुढें येणाऱ्या मुख्य वेळीं पहिलें आग्रयण करावें. पहिलें आग्रयण गौणकालीं करूं नये. दर्शपौर्णमास, आग्रयण वगैरेंचें प्रायश्चित्त, त्यांचा आरंभ जर पूर्वीं केला नसेल तर विकल्पेंकरून करावें असें असल्यानें विभ्रष्ट इष्टि देखील वैकल्पिकच समजावी. आग्रयण केल्यावांचून कोणचेंहि नवें धान्य खाऊं नये. 'आग्रयणावांचून जर कोणीं नवें धान्य भक्षण केलें, तर त्यानें वैश्वानर देवतेसाठीं चरु करावा अथवा पूर्णाहुति करावी. किंवा 'समिंद्राया०' या मंत्राचा शंभर वेळा जप करावा.

**अथाग्रयणानुकल्पाः पृथगाग्रयण प्रयोगाशक्तौप्रकृतीष्टिसमानतन्त्राग्रयणप्रयोगः तत्रपौर्णमासेष्ट्यासमानतन्त्रत्वे आदावाग्रयणप्रधानंपश्चात्प्राकृतप्रधानम् दर्शेष्ट्यैकतन्त्रत्वेपूर्वंदर्शेष्टिप्रधानयागः पश्चादाग्रयणप्रधानयागः अन्यत्पूर्वोत्तराङ्गजातमाग्रयणंविकृतिसंबन्ध्येवकार्यम् विरोधेवैकृततन्त्रमितिसिद्धान्तात् एतदसंभवेनवश्यामाकव्रीहियवैःपुरोडाशंकृत्वादर्शपूर्णमासौकुर्यात् यद्वानवव्रीह्यादिभिरग्निहोत्रहोमंकुर्यात् अथवानवान्नान्यग्निहोत्र्यागवाखादयित्वातस्याः पयसाग्निहोत्रंजुहुयात् यद्वानवान्नेनब्राह्मणान्भोजयेदितिसंक्षेपः इदं मलमासेनकार्यम् गुर्वाद्यस्तेपिनकार्यमितिकेचित् जीर्णधान्यालाभेतुमलमासादौकार्यम् ।**

**आग्रयणगौणप्रकारः**—ज्याला आग्रयण करण्याचें सामर्थ्य नसेल त्यानें प्रकृतीष्टीशीं समान अशा आग्रयणाचा प्रयोग करावा. पौर्णिमेष्टीबरोबर समानतंत्रानें आग्रयण करतांना, आग्रयणाचें मुख्य कर्म आधीं करून मग प्रकृतीष्टीचें मुख्य कर्म करावें. दर्शेष्टीबरोबर समान तंत्रानें (आग्रयणकर्म) करतांना, आधीं दर्शेष्टीचें मुख्य कर्म करून, मागून आग्रयणाचें प्रधानकर्म करावें. आधींचीं व नंतरचीं इतर सारीं कर्में आग्रयणविकृतीसंबंधाचींच करावींत. कारण 'कर्मविरोध असतां विकृतितंत्र करावें' असा सिद्धांत आहे. हें करणें शक्य नसल्यास राळे, तांदूळ व यव यांचा पुरोडाश (पिठाचा लाडू) करून, दर्शपौर्णमास स्थालीपाक करावे, किंवा नवे तांदूळ घेऊन त्यांचा अग्निहोत्रहोम करावा, अथवा अग्निहोत्राच्या गाईकडून नवीं अन्नें खाववून, तिच्या दुधानें अग्निहोत्रहोम करावा. हें आग्रयण अधिक महिन्यांत करूं नये. गुर्वादिकांच्या अस्तांतही हें आग्रयण करूं नये, असेंही कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें आहे. जुनें धान्य मिळेनासें झाल्यास अधिक महिन्यांतही करावें.

**अस्यामेवपौर्णमास्यां ज्येष्ठापत्यनीराजनादिकं परविद्धायां कार्यम् ।**

**ज्येष्ठापत्यनीराजनविधि**—याच पौर्णिमेला वडील अपत्याला नीराजनविधि करावा. या कामासाठीं प्रतिपदेनें विद्ध झालेली पौर्णिमा घ्यावी.

आश्विनकृष्णचतुर्थी करकचतुर्थी साचंद्रोदयव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्त्यादौसंकष्टचतुर्थीवन्निर्णयः ॥

**करकचतुर्थी**—आश्विन वद्य चतुर्थीला करकचतुर्थी म्हणतात. ही चंद्रोदयव्यापिनी घ्यावी. ही जर दोन दिवस चंद्रोदयव्यापिनी असेल किंवा नसेल तर तिचा निर्णय संकष्टचतुर्थीप्रमाणेंच जाणावा.

कृष्णाष्टम्यांराधाकुण्डेस्नानंमथुरामण्डलवासिभिःकार्यम्साऽरुणोदयव्यापिनी तदभावेसूर्योदयव्यापिनीग्राह्या ।

**आश्विनकृष्णअष्टमी**—मथुराप्रांतीं राहाणाऱ्यांनीं आश्विन कृष्ण अष्टमीला राधाकुंडांत स्नान करावें. या कार्याकरितां अरुणोदयव्यापिनी असणारी अष्टमी घ्यावी. अरुणोदयव्यापिनी नसल्यास सूर्योदयव्यापिनी घ्यावी.

आश्विनकृष्णद्वादशीगोवत्सद्वादशीसाप्रदोषव्यापिनी ग्राह्या दिनद्वयेतदव्याप्तौपरा सायंकालाख्यगौणकालेसत्वात् उभयत्रतद्व्याप्तौपूर्वेतिबहवः परेतिकेचित् अत्रवत्सतुल्यवर्णांसवत्सांपयस्विनींगांसंपूज्यगोःपादेताम्रपात्रेणार्घ्यंदद्यात् तत्रमन्त्रः क्षीरोदार्णवसंभूतेसुरासुरनमस्कृते । सर्वदेवमयेमातर्गृहाणार्घ्यंनमोस्तुते १ ततोमाषादिवटकान्गोग्रासार्थंदत्वाप्रार्थयेत् सर्वदेवमयेदेविसर्वदेवैरलंकृते । मातर्ममाभिलषितंसफलं कुरुनन्दिनि १ तद्दिनेतैलपक्वं स्थालीपक्वंगोक्षीरंगोघृतंगोदधितक्रंचवर्जयेत् नक्तंमाषान्नभोजनंभूशय्याब्रह्मचर्यंचकार्यम् इमामेवद्वादशीमारभ्यपञ्चसुदिनेषुपूर्वरात्रेनीराजनविधिर्नारदेनोक्तः नीराजयेयुर्देवांश्वविप्रान्गाश्चतुरंगमान् । ज्येष्ठान्श्रेष्ठान् जघन्यांश्चमातृमुख्याश्चयोषितः १ इति त्रयोदश्यामपमृत्युनाशार्थंयमायनिशामुखेबहिर्दीपोदेयः इमामेवत्रयोदशीमारभ्यगोत्रिरात्रव्रतमुक्तम् तत्प्रयोगः कौस्तुभे ।

**वसुबारस**—आश्विन कृष्ण द्वादशीला गोवत्सद्वादशी (वसुबारस) म्हणतात. ही प्रदोषव्यापिनी घ्यावी. दोन्ही दिवस जर ही प्रदोषव्यापिनी नसेल, तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी, कारण, संध्याकाळ हा हिचा गौणकाळ असून त्या काळीं तिची व्याप्ति आहे. ही जर दोन दिवस प्रदोषव्यापिनी असेल तर पहिल्या दिवसाचीच घ्यावी असें अनेक ग्रंथकारांचें जसें सांगणें आहे, तसेंच दुसऱ्या दिवसाची घ्यावी असेंही कांहीं ग्रंथकार सांगतात. या तिथीला गोऱ्ह्यासारखाच जिचा रंग आहे अशा सवत्स (गोऱ्ह्यासह) गाईची पूजा करून, तिच्या पायावर तांब्याच्या अर्घ्यानें जें अर्घ्य द्यावें, त्याचा मंत्रः—'क्षीरोदार्णवसम्भूते सुरासुरनमस्कृते । सर्वदेवमये प्रातर्गृहाणार्घ्यं नमोस्तुते ॥' त्यानंतर उडदादिकांचे वडे त्या गाईला चारून, 'सर्वदेवमये देवि सर्वदेवैरलंकृते । मातर्ममाभिलषितं सकलं कुरु नंदिनि ॥' या मंत्रानें तिची प्रार्थना करावी. त्या दिवशीं तेलांत तळलेले व थाळ्यांत (पातेल्यांत) शिजवलेले पदार्थ व गाईचें दूध, तूप, दहीं व ताक हे पदार्थ खाऊं नयेत. त्या दिवशीं उडीद मिसळलेलें अन्न खाऊन जमिनीवर निजावें आणि ब्रह्मचर्यानें राहावें. याच द्वादशीला आरंभ करून पांच दिवस पर्यंतच्या पूर्वरात्रीं नीराजनविधि करावा असें नारदांनीं सांगितलें आहे.

देव, ब्राह्मण, गाई, घोडे, वडील, थोर, लहान या सर्वांना, आई व इतर बायका यांनीं ओवाळावें. अपमृत्यु टळण्यासाठीं त्रयोदशीच्या रात्रीच्या सुरवातीला घराबाहेर यमासाठीं दिवा लावावा. याच त्रयोदशीला आरंभ करून तीन रात्रींचें गोत्रिरात्रव्रत करावें असें सांगितलें आहे. त्याचा प्रयोग कौस्तुभांत दिलेला आहे. (याच त्रयोदशीला धनत्रयोदशी किंवा धनतेरस असें म्हणतात.)

आश्विनकृष्णचतुर्दश्यांचन्द्रोदयव्यापिन्यांनरकभीरुभिस्तिलतैलेनाभ्यङ्गस्नानंकार्यम् अत्रात्र्यन्त्ययाममारभ्यारुणोदयावधिस्ततश्चन्द्रोदयावधिस्ततः सूर्योदयावधिरितिकालत्रयेपूर्वपूर्वोजघन्यउत्तरोत्तरःश्रेष्ठः अतश्चन्द्रोदयोत्तरो मुख्यःकालः प्रातःकालोगौणः तत्रपूर्वदिनेएवचन्द्रोदयव्याप्तौपूर्वापरत्रैवतद्व्याप्तौपरा अस्मिन्पक्षेतद्दिनेऽस्तमयादिकालेविहितमुल्कादानदीपदानादिकंतत्काले चतुर्दश्यभावेपिकार्यम् दिनद्वयेचन्द्रोदयव्याप्तौपूर्वा दिनद्वयेचन्द्रोदयाव्याप्तौपक्षत्रयंसंभवति पूर्वत्रचन्द्रोदयोत्तरमुषःकालंसूर्योदयंचव्याप्यप्रवृत्ताचतुर्दशी परत्रचन्द्रोदयात्पूर्वंसमाप्ता यथात्रयोदशीघट्यः ५८ पलानि ५० चतुर्दशी ५७ अस्मिन्प्रथमपक्षे उषःकालैकदेशेचतुर्दशीयुक्तेऽभ्यङ्गस्नानंकार्यम् अथपूर्वत्रसूर्योदयमात्रंव्याप्यप्रवृत्तापरत्रचन्द्रोदयात्पूर्वंसमाप्ता अथवासूर्योदयास्पर्शेनक्षयएवचतुर्दश्याः यथात्रयोदशी ५९ पलानि ५९ चतुर्दशी ५७ यथावा त्रयोदशी २ तद्दिने चतुर्दशी ५४ अत्रपक्षद्वयेपरत्रचन्द्रोदयेभ्यङ्गस्नानम् चतुर्थयामादिजघन्यकाले चतुर्दशीव्याप्तिसत्वात् एतत्पक्षद्वयेकेचिदरुणोदयात्पूर्वमपिचतुर्दशीमध्ये एवस्नानंकार्यमितिवदन्ति अपरेस्त्वरुणोदयोत्तरंचन्द्रोदयादिकालेऽमावास्यादियुक्तेपिस्नानमितिवदन्ति यत्तुचतुर्दशीक्षयेपूर्वत्रत्रयोदश्यांचन्द्रोदयेस्नानमित्याहुस्तदयुक्तम् अत्राभ्यङ्गस्नानेविशेषः सीतालोष्टसमायुक्तसकण्टकदलान्वित । हरपापमपामार्गभ्राम्यमाणः पुनःपुनः १ इतिमन्त्रेणलाङ्गलोद्धृतलोष्टयुतापामार्गतुम्बीचक्रमर्दनशाखानांस्नानमध्ये त्रिवारंभ्रामणंकार्यम् अभ्यङ्गस्नानोत्तरंतिलकादिकृत्वाकार्तिकस्नानंकार्यम् उक्तकालेषुस्नानासंभवेसूर्योदयोत्तरं गौणकालेपियत्यादिभिरप्यवश्यमभ्यङ्गस्नानंकार्यम् कार्तिकस्नानोत्तरंयमतर्पणंकार्यम् तद्यथा यमायनमः यमंतर्पयामीत्युक्त्वातिलमिश्रान् त्रीनञ्जलीन्सव्येनापसव्येनवादेवतीर्थेनपितृतीर्थेनवा दक्षिणामुखोदद्यात् एवमग्रेपि धर्मराजाय० मृत्यवे० अन्तकाय० वैवस्वताय० कालाय० सर्वभूतक्षयाय०औदुम्बराय० दध्नाय० नीलाय० परमेष्ठिने० वृकोदराय० चित्राय० चित्रगुप्ताय० जीवत्पितृकस्तुयवैर्देवतीर्थेनसव्येनकुर्यात् ततःप्रदोषसमयेदीपान्दद्यान्मनोहरान् । देवालयेमठेवापिप्राकारोद्यानवीथिषु १ गोवाजिहस्तिशालायामेवं घस्रत्रयेपिच । तुलासंस्थेसहस्रांशौप्रदोषेभूतदर्शयोः २ उल्काहस्तानराःकुर्युः पितॄणां मार्गदर्शनम् । तत्रदानमन्त्रः अग्निदग्धाश्चयेजीवायेप्यदग्धाः कुलेमम । उज्ज्वलज्ज्योतिषादग्धास्तेयान्तुपरमांगतिम् १ यमलोकंपरित्यज्यआगतायेमहालये । उज्ज्वलज्ज्योतिषावर्त्मप्रपश्यन्तुव्रजन्तुते २ अस्यांनक्तभोजनं महाफलम् ।

**नरकचतुर्दशी**—नरकाला भिणाऱ्यांनीं, आश्विन वद्य चतुर्दशीला तीळ व तेल यांचें अभ्यंगस्नान करावें. हें कृत्य करण्याचे जे तीन काळ सांगितले आहेत ते असेः–( १ ) रात्रीच्या शेवटच्या प्रहरापासून आरंभ करून, अरुणोदयापर्यंत ( २ ) तेथून चंद्रोदयापर्यंत व ( ३ ) तेथूनच सूर्योदयापर्यंत. यांचें वर्गीकरण पहिल्याहून दुसरा श्रेष्ठ व दुसऱ्याहून तिसरा श्रेष्ठ असें आहे; म्हणून, चंद्रोदयापासून सूर्योदयापर्यंतचाच मुख्य काळ होय. सकाळचा वेळ गौण समजावा. आदल्या दिवशींच जर चंद्रोदयव्याप्ति असेल तर तीच चतुर्दशी घ्यावी व दुसऱ्या दिवशीं जर चंद्रोदयव्यापिनी असेल, तर ती घ्यावी. चंद्रोदयव्याप्तीकरितां या दिवशीं सूर्यास्तकाळीं उल्कादान ( कोलित दाखविणें, ) दीपदान वगैरे कृत्यें त्या त्या कालीं जरी चतुर्दशी नसलीं, तरी करावींत. चंद्रोदयव्याप्ति जर दोन दिवस असेल तर पहिल्या दिवसाची घ्यावी. दोन्ही दिवस जर चंद्रोदयव्याप्ति नसेल, तर जे तीन प्रकार संभवतात, ते असेः–( १ ) आदल्या दिवशीं चंद्रोदयानंतर उषःकाल व सूर्योदय यांना व्यापून आरंभ झालेली व दुसऱ्या दिवशीं चंद्रोदयापूर्वींच संपलेली. उदाहरणः—त्रयोदशी घटका ५८ प० ५० व चतुर्दशी घ० ५७. या प्रकारांत चतुर्दशीनें युक्त अशा एका भागांत स्नान करावें. ( २ ) आदल्या दिवशीं फक्त सूर्योदयाला व्यापून आरंभ झालेली व दुसऱ्या दिवशीं चंद्रोदयापूर्वींच संपलेली चतुर्दशी, आणि ( ३ ) दोन्ही दिवशीं सूर्योदयाला स्पर्श न केल्यामुळें क्षय झालेली चतुर्दशी. उदाहरणः–त्रयोदशी ५९ घ. ५९ प. व चतुर्दशी ५७ घ. किंवा त्रयोदशी २ घ. व चतुर्दशी ५४. घ. या दोन्ही प्रकारांत दुसऱ्याच दिवशीं चंद्रोदयकालीं अभ्यंगस्नान करावें; कारण, यांत चौथा प्रहर वगैरे जे गौणकाल त्यांत चतुर्दशीची व्याप्ति आहे. या दोन्ही प्रकारांत अरुणोदयाच्या आधींही चतुर्दशींत स्नान करावें, असें कांहीं ग्रंथकारांचें सांगणें आहे. अरुणोदयानंतरच्या चंद्रोदय वगैरे काळीं चतुर्दशी अमावास्येनें युक्त असतांही स्नान करावें असेंही इतर कांहीं ग्रंथकार म्हणतात. चतुर्दशीचा क्षय असतां, आदल्या दिवशीं त्रयोदशीलाच स्नान करावें, असें जें कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें आहे तें मात्र अयोग्य आहे. 'सीतालोष्ठसमायुक्त सकण्टकदलान्वित। हर पापमपामार्ग भ्राम्यमाणः पुनः पुनः॥' या मंत्रानें नांगरानें उकरून काढलेल्या मातीचें ढेंकूळ व आघाड्याच्या फांद्या हीं स्नानांत आपल्या अंगावर तीन वेळां फिरवावींत. अभ्यंगस्नानानंतर गंध लावल्यावर कार्तिकस्नान करावें. योग्य वेळीं स्नान करणें शक्य नसल्यास सूर्योदयानंतर, गौणकालांतही स्नान करण्यास हरकत नाहीं. संन्याशादिकांनीं सुद्धां अभ्यंगस्नान अवश्य करावें. कार्तिकस्नानानंतर पुढीलप्रमाणें यमतर्पण करावेः–'यमायनमः यमं तर्पयामि' असा उच्चार करून, सव्यानें अथवा अपसव्यानें ( जसा अधिकार असेल त्याप्रमाणें )तिलमिश्रित पाण्याच्या तीन ओंजळी देवतीर्थानें ( अंगुलीच्या अग्रांनीं ) अथवा पितृतीर्थानें ( आंगठा व तर्जनी यांच्या मधल्या भागानें ) दक्षिणेकडे तोंड करून द्याव्या. पुढच्या तर्पणाविषयींही हेंच समजावें. नंतरचें तर्पणः—'धर्मराजायनमः धर्मराजं-

तर्पयामि । मृत्यवेनमः मृत्युं तर्पयामि । अंतकायनमः अंतकं तर्पयामि । वैवस्वतायनमः वैवस्वतं तर्पयामि । कालायनमः कालंतर्पयामि । सर्वभूतक्षयायनमः सर्वं भूतक्षयं तर्पयामि । औदुंबरायनमः औदुंबर तर्पयामि । दध्नायनमः दध्नं तर्पयामि । नीलायनमः नीलं तर्पयामि । परमेष्ठिनेनमः परमेष्ठिनं तर्पयामि । वृकोदरायनमः वृकोदरं तर्पयामि । चित्रायनमः चित्रंतर्पयामि । चित्रगुप्तायनमः चित्रगुप्तंतर्पयामि ।' ज्याचा बाप जिवंत असेल त्यानें हें तर्पण सातूमिश्रित पाण्यानें करावें. नंतर प्रदोषकालीं मनोहर असे दिवे, देऊळ, मठ, घराभोंवतालची जागा व भिंती, बाग, रस्ते, गोठा, घोड्यांचीं ठाणें, हत्ती बांधण्याच्या जागा वगैरे ठिकाणीं तीन दिवस लावावेत. सूर्य तुलाराशींत असतांना चतुर्दशी व अमावास्या या तिथींवर प्रदोषकाळीं पुरुषांनीं हातांत जळतें कोलीत अथवा पेटलली चूड घेऊन, आपल्या पितरांना रस्ता दाखवावा. तो मार्ग दाखवितांना जो मंत्र म्हणावा लागतो तो असाः—'अग्निदग्धाश्च ये जीवा येप्यदग्धाः कुले मम । उज्वलज्ज्योतिषा दग्धास्तेयान्तु परमां गतिम् ॥ यमलोकं परित्यज्यआगता ये महालये उज्ज्वलज्ज्योतिषावर्त्म प्रपश्यंतु व्रजंतुते ॥' या दिवशीं नक्तभोजनाचें मोठें फल आहे.

अथाश्विनामावास्यायांप्रातरभ्यङ्गःप्रदोषेदीपदानलक्ष्मीपूजनादिविहितम् तत्रसूर्योदयंव्याप्यास्तोत्तरंघटिकाधिकरात्रिव्यापिनिदर्शेसतिनसंदेहः अत्रप्रातरभ्यङ्गदेवपूजादिकंकृत्वापराह्णेपार्वणश्राद्धंकृत्वाप्रदोषसमयेदीपदानोल्काप्रदर्शनलक्ष्मीपूजनानिकृत्वाभोजनंकार्यम् अत्रदर्शेबालवृद्धादिभिन्नैर्दिवानभोक्तव्यं रात्रौभोक्तव्यमितिविशेषोवाचनिकः तथाचपरदिनेएवदिनद्वये वाप्रदोषव्याप्तौपरा पूर्वत्रैवप्रदोषव्याप्तौलक्ष्मीपूजादौपूर्वा अभ्यङ्गस्नानादौ परा एवमुभयत्रप्रदोषव्याप्त्यभावेपिपुरुषार्थचिन्तामणौतुपूर्वत्रैवव्याप्तिरितिपक्षेपरत्रयामत्रयाधिकव्यापिदर्शेदर्शापेक्षयाप्रतिपद्वृद्धिसत्वेलक्ष्मीपूजादिकमपिपरत्रैवेत्युक्तम् एतन्मतेउभयत्रप्रदोषाव्याप्तिपक्षेपिपरत्रदर्शस्यसार्धयामत्रयाधिकव्यापित्वात्परैवयुक्तेतिभातिचतुर्दश्यादिदिनत्रयेपिदीपावलिसंज्ञके यत्रयत्राह्निस्वातीनक्षत्रयोगस्तस्यप्राशस्त्यातिशयःअस्यामेवनिशीथोत्तरं नगरस्त्रीभिःस्वगृहाङ्गणादलक्ष्मीनिःसारणंकार्यम् इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेद्वितीयपरिच्छेदे आश्विनमासकृत्यनिर्णयोद्देशःसमाप्तः ॥

**लक्ष्मीपूजनोत्सवः**—आश्विनी अमावास्येला सकाळीं अभ्यंगस्नान, प्रदोषकाळीं दीपदान व लक्ष्मीपूजन वगैरे कर्में सांगितलीं आहेत. अमावास्या जर सूर्योदयव्यापिनी असून सूर्यास्तानंतर एक घटका असेल तर संशयाला जागाच नाहीं. या दिवशीं सकाळीं अभ्यंगस्नानानंतर देवपूजादिक करून, अपराह्णकाळीं पार्वणश्राद्ध करावें. प्रदोषकाळीं दीपदान, उल्कादर्शन व लक्ष्मीपूजन हीं करून मग जेवण करावें. या अमावास्येला लहान मुलांवांचून इतरांनीं दिवसा जेवूं नये, रात्रीं जेवावें असें विशेष वचन आहे. फक्त दुसऱ्याच दिवशीं किंवा दोन दिवस जर प्रदोषव्यापिनी अमावास्या असेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. आदल्या

दिवशीं जर प्रदोषव्यापिनी असेल, तर लक्ष्मीपूजनादिकांना तीच घेऊन, अभ्यंगस्नानादिकांना दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन्ही दिवशीं जरी प्रदोषव्याप्ति नसली तरी हाच निर्णय समजावा. या बाबतींत पुरुषार्थचिंतामणींत असें सांगितलें आहे कीं, आदल्या दिवशींच जर प्रदोषव्याप्ति असेल व दुसऱ्या दिवशीं जर तीन प्रहरांहून अधिक अशी अमावास्येची व्याप्ति असेल, तर प्रतिपदा अमावास्येहून अधिक असल्यास लक्ष्मीपूजनादिक दुसऱ्या दिवशींच करावींत. यावरून दोन्ही दिवशीं जरी प्रदोषव्यापिनी अमावास्या नसली तरी दुसऱ्या दिवशीं साडेतीन प्रहरांहून अधिक अशी तिची व्याप्ति असते म्हणून दुसऱ्या दिवसाचीच घेणें योग्य ठरतें असें वाटतें. चतुर्दशीपासून तीन दिवसांना दीपावली ( दिवाळी ) असें नांव आहे. या तिहींत जो दिवस स्वातीनक्षत्राच्या योगाचा असेल तोच उत्तम होय. याच अमावास्येला मध्यरात्रीनंतर गांवांतल्या बायकांनीं अलक्ष्मीला ( अकाबाईला ) आपल्या अंगणांतून बाहेर हांकून द्यावी. याप्रमाणें अनंतोपाध्यांचे पुत्र जे काशीनाथोपाध्याय त्यांनीं रचिलेल्या धर्मसिंधुसार नांवाच्या ग्रंथांतल्या दुसऱ्या परिच्छेदांतील आश्विनाच्या महिन्यांतल्या कृत्यांच्या निर्णयाचा उद्देश येथें संपला.

**अथकार्तिकमासः वृश्चिकसंक्रान्तौपूर्वाःषोडशनाड्यःपुण्याः शेषंप्राग्वत् अथकार्तिकशुक्लप्रतिपत्कृत्यम् अत्राभ्यङ्गआवश्यकः एवंचचतुर्दश्यादिदिनत्रयेभ्यङ्गाद्युत्सवस्याकरणेनरकादिदोषश्रवणात्करणेलक्ष्मीप्राप्त्यलक्ष्मीपरिहारादिफलश्रवणाच्चनित्यकाम्योभयरूपत्वम् अस्यांप्रतिपदिबलिपूजादीपोत्सवोगोक्रीडनंगोवर्धनपूजामार्गपालीबन्धनंवष्टिकाकर्षणंनववस्त्रादिधारणाद्युत्सवोद्यूतंनारीकर्तृकनीराजनं मङ्गलमालिकाचेत्येवमादीनिकृत्यानि तत्रयदिउदयंव्याप्यदशमुहूर्ताप्रतिपत्तदाचन्द्रदर्शनाभावाच्चन्द्रदर्शनप्रयुक्ताद्वितीया वेधनिषेधाप्रवृत्तेःसर्वकार्याणिपरप्रतिपद्येवभवन्ति इष्टिनिर्णयप्रकरणेत्रिमुहूर्ताद्वितीयाप्रवेशमात्रेणचंद्रदर्शनमुक्तम् तत्सूक्ष्मदर्शनाभिप्रायम् अत्रतुस्थूलदर्शनमेव निषेधप्रयोजकम् तच्चषण्मुहूर्तद्वितीयाप्रवेशएवेतिनविरोधइतिभाति यदिनवमुहूर्तानास्तितदाबलिपूजागोक्रीडागोवर्धनपूजामार्गपालीबन्धनवष्टिकाकर्षणानिपूर्वविद्धप्रतिपदिकार्याणि अभ्यङ्गनववस्त्रादिधारणद्यूतनारीकर्तृकनीराजनमङ्गलमालिकादीनि औदयिकमुहूर्तव्यापिन्यामपिकार्याणि बलिपूजादेःकेनचिन्निमित्तेन पूर्वविद्धायामनुष्ठानासंभवेपरविद्धायामनुष्ठानंकार्यंनतुकर्मत्यागस्तिथ्यन्तरपरिग्रहोवा यथाबौधायनीयैःस्वस्वसूत्रोक्तानुष्ठानासंभवे आपस्तम्बीयादिसूत्रोक्तानुष्ठानंकार्यम् नतुकर्मलोपःशाखान्तरपरिग्रहोवातद्वदितिमाधवीयेस्पष्टम् तत्रराजापञ्चवर्णरंगैर्बलिं द्विभुजमालिख्यअन्यजनाःशुक्लतण्डुलैर्विरच्यपूजयेयुः तत्रमन्त्रः बलिराजनमस्तुभ्यंविरोचनसुतप्रभो। भविष्येन्द्रसुराराते पूजेयंप्रतिगृह्यताम् १ बलिमुद्दिश्ययत्किंचिद्दानकरणेऽक्षय्यं विष्णुप्रीतिकरं तत् योयादृशेनभावेनतिष्ठत्यस्यां मुनीश्वर । हर्षदैन्यादिरूपेणतस्यवर्षंप्रयातिहि १ अस्यांद्यूतंप्रकर्तव्यंप्रभातेसर्वमानवैः । तस्मिन्द्यूतेजयोयस्यतस्यसंवत्सरं-**

जयः २ विशेषवच्चभोक्तव्यंप्रशस्तैर्ब्राह्मणैःसह । बलिराज्येदीपदानात्सदालक्ष्मीः स्थिराभवेत् ३ दीपैर्नीराजनादत्रसैषादीपावली स्मृता । बलिराज्यंसमासाद्ययैर्नदीपावलीकृता ४ तेषांगृहेकथंदीपाः प्रज्वलिष्यन्तिकेशव । इत्यादि ।

**कार्तिकांतलीं कृत्यें**—वृश्चिक संक्रांतीच्या पहिल्या सोळा घटकांपर्यंतचा पुण्य काळ जाणावा. बाकीचा निर्णय मागें सांगितल्याप्रमाणेंच समजावा. आतां कार्तिकशुद्ध प्रतिपदेला करावयाचीं कृत्यें सांगतों. या तिथीला अभ्यंगस्नान जरूर करावें. त्याचप्रमाणें आश्विन वद्य चतुर्दशीपासून तीन दिवसपर्यंत रोज जर अभ्यंगस्नान केलें नाहीं तर नरकादिकांच्या प्राप्तीचे दोष सांगितले असून, अभ्यंग केल्यानें दारिद्र्यादिकांचा नाश होतो असेंही सांगितलें आहे. यावरूनच हा उत्सव नित्य व काम्य असा दोन प्रकारचा ठरतो. या प्रतिपदेला बलिपूजा, दीपोत्सव, गोक्रीडन, गोवर्धनपूजा, मार्गपालीबंधन, गवताचा दोर ओढणें, नवीन वस्त्रादि धारण करणें, द्यूत, बायकांनीं दिवे ओवाळणें, मंगलमालिका वगैरे कृत्यें करावींत. प्रतिपदा जर सूर्योदयाला व्यापून वीस घटका असेल, तर चंद्रदर्शन होत नाहीं, म्हणून चंद्रदर्शनप्रयुक्त अशा वेधाचा निषेध या दिवशीं नसतो; यास्तव सारीं कृत्यें या दुसऱ्या दिवसाच्या प्रतिपदेंतच होतात. इष्टिनिर्णयप्रकरणांत सहा घटका द्वितीयेचा प्रवेश प्रतिपदेलाच जर असेल तर चंद्रदर्शन होतें, असें जें सांगितलें आहे, तें स्थूलदर्शन होय. हें स्थूलदर्शन, द्वितीयेचा प्रवेश जर बारा घटकांचा असेल तरच होतें; यास्तव येथें विरोध येत नाहीं, असें वाटतें. प्रतिपदा सूर्योदयापासून फक्त आठ मुहूर्तच असून, पुढें नवव्या मुहूर्तांत जर नसेल, तर बलिपूजा, गोक्रीडन, गोवर्धनपूजा, मार्गपालीबंधन व यष्टिकाकर्षण हीं कृत्यें पूर्वविद्ध अशा प्रतिपदेलाच करावींत. अभ्यंग, नूतनवस्त्रादिधारण, द्यूत, स्त्रियांनीं ओंवाळणें व मंगलमालिका या गोष्टी सूर्योदयीं मुहूर्तभर असणाऱ्या प्रतिपदेलाच कराव्यात. बलिपूजन वगैरे गोष्टी जर कांहीं कारणानें पूर्वविद्धा प्रतिपदेला करणें अशक्य असेल तर तें सर्व परविद्धा प्रतिपदेलाच करावें; पण कर्मत्याग न करितां, इतर तिथींवरही तीं कृत्यें करूं नयेत; जे बौधायनीय असतील अशांना जर त्यांच्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें कर्म करणें अशक्य असेल, तर त्यांनीं अपस्तंबादि सूत्रांत सांगितल्याप्रमाणें कर्म करावें, पण कर्मलोप न करितां, इतर शाखेप्रमाणेंही वर्तन करूं नये असा जो नियम आहे, त्याप्रमाणेंच प्रतिपदेच्या बाबतींतही त्यांनीं आचरण करावें, असा माधवाच्या ग्रंथांत स्पष्ट उल्लेख आहे. या दिवशीं राजानें बळीचें दोन हातांचें पांच रंगांत चित्र काढून, त्याची पूजा करावी, व इतरांनीं पांढऱ्या तांदुळाची ( बळीची ) मूर्ति करून, तिची पूजा करावी. त्या पूजेचा मंत्र येणेंप्रमाणें:—"बलिराज नमस्तुभ्यं विरोचनसुतप्रभो । भविष्येंद्रसुराराते पूजेयं प्रतिगृह्यताम् ।" बलिदानाच्या उद्देशानें थोडेंसें जरी कांहींही दान केलें, तरी त्यामुळें विष्णूला अक्षय संतोष होतो. 'या प्रतिपदेला आनंद अथवा दुःख यांपैकीं जो कोणी ज्या भावानें राहातो, त्याचें हे मुनीश्वरा, त्याच भावानें वर्ष जातें. या दिवशीं

प्रभातकाळीं सर्व माणसांनीं द्यूतकर्म करावें. त्यांत ज्याचा जय होईल त्याला सर्व वर्षभर जय मिळतो. या दिवशीं अनेक पक्वान्नें करून पुष्कळ ब्राह्मणांसह भोजन करावें. बलिराजाच्या या दिवसांत ( नरक चतुर्दशीपासून चार दिवसपर्यंत ) जो दिवे लावतो त्याच्या घरीं लक्ष्मी नेहमीं स्थिर राहते. दिव्यांनीं ओवाळणें म्हणूनच याला दीपावली असें म्हणतात. बलिराजाच्या दिवसांत जे दीपावली करीत नाहींत, त्यांच्या घरीं हे केशवा, दिवे कसे लागले जातील? वगैरे वचनें या बाबतींत आहेत.

**अत्रलक्ष्मीपूजाकुबेरपूजाचोक्तालक्ष्मीर्यालोकपालानांधेनुरूपेणसंस्थिता।घृतं वहतियज्ञार्थेममपापंव्यपोहतु । अग्रतःसन्तुमेगावोगावोमेसन्तुपृष्टतः । गावो मेहृदयेसन्तुगवांमध्येवसाम्यहम् २ इतिमन्त्राभ्यांगवांसवत्सानांबलिवर्दानांच पूजनंविभूषणंचकृत्वादोहनभारवहनादिकंवर्जयेत् ।**

**गाय व बैल यांचें पूजन**— या तिथीला लक्ष्मी व कुबेर यांचें पूजन करण्यास सांगितलें आहे. 'लक्ष्मीर्या लोकपालानां। धेनुरूपेण संस्थिता। घृतं वहति यज्ञार्थे मम पापं व्यपोहतु ॥ अग्रतः सन्तु मे गावो गावो मे सन्तु पृष्ठतः ॥ गावो मे हृदये सन्तु गवांमध्ये वसाम्यहम् ॥' या मंत्रानें सवत्स गाईचें व बैलाचें पूजन, करून त्यांना ( मालादिकांनीं ) विभूषित करावें. या दिवशीं गाईचें दूध काढूं नये व बैलांकडून ओझ्यांचीं वगैरे कामें करून घेऊं नयेत.

**अथ गोवर्धनपूजामुख्यगोवर्धनसान्निध्येतस्यैवपूजा तदसान्निध्येगोमयेनान्न-कूटेनवागोवर्धनंकृत्वातत्सहितगोपालपूजाकार्या तत्रश्रीकृष्णप्रीत्यर्थंगोवर्धनपूजन-गोपालपूजनात्मकंमहोत्सवंकरिष्यइतिसंकल्प्य बलिराज्ञोद्वारपालोभवानद्यभव-प्रभो । निजवाक्यार्थनार्थायसगोवर्धनगोपते १ इतिमन्त्रेणसगोवर्धनंगोपालमा-वाह्यस्थापयेत् ततो गोपालमूर्तेविश्वेश शक्रोत्सवविभेदक । गोवर्धनकृतच्छत्रपू-जांमेगृगोपते १ गोवर्धनधराधारगोकुलत्राणकारक । विष्णुबाहुकृतच्छायगवांको-टिप्रदोभव २ इतिमन्त्राभ्यांश्रीगोपालगोवर्धनौ षोडशोपचारैःपूजयेत् तत्रयथा-वैभवंमहानैवेद्योदेयः ततःतदङ्गत्वेनप्रत्यक्षधेनौ मृध्धेनौ वागोपूजांपूर्वोक्तमन्त्राभ्यां-कृत्वा आगावो अग्मन्नुतेतवदन्त्वितिऋग्भ्यांगृहसिद्धचरुहोमःकार्यः ब्राह्मणेभ्यो-ऽन्नवादिदानंगोभ्यस्तृणदानंगिरयेबालदानंच ततोगोविप्रहोमाग्निगिरिप्रदक्षि-णासहचरीभिर्गोभिर्युतैःकार्या ।**

**गोवर्धनपूजा**—मुख्य गोवर्धनपर्वत ज्यांना जवळ असेल त्यांनीं त्याची पूजा करावी. ज्यांना त्या खऱ्या गोवर्धनाची पूजा करणें अशक्य असेल अशांनीं गाईच्या शेणाचा अथवा भाताचा गोवर्धन करून, त्याच्यासह श्रीकृष्णाचें पूजन करावें. पूजा करतांना, 'श्रीकृष्णप्रीत्यर्थं गोवर्धनपूजनं गोपालपूजनात्मकं महोत्सवं करिष्ये।' असा संकल्प करून, 'बलिराज्ञे द्वारपालो भवानद्य भवप्रभो। निज-वाक्यार्थनार्थाय सगोवर्धन गोपते ॥' या मंत्रानें गोवर्धनासह गोपालाचें आवाहन करून त्याची स्थापना करावी. नंतर 'गोपालमूर्ते विश्वेश शक्रोत्सव विभेदक। गोव-

र्धन कृतच्छत्र पूजां मे हर गोपते ॥ गोवर्धनधराधार गोकुलत्राणकारक । विष्णुबाहुकृतच्छाय गवां कोटिप्रदोभव ॥' या मंत्रांनीं गोपालासह गोवर्धनाची षोडशोपचारें पूजा करावी. आणि वैभवानुरूप महानैवेद्य द्यावा. त्यानंतर पूजेच्या अंगभूत अशा जिवंत अथवा मातीच्या गाईची वरील मंत्रांनीं पूजा करून, 'आगावो अग्मन्नैते वदन्तु०' या दोन ऋचांनीं घरांत तयार केलेल्या भातानें होम करावा. नंतर ब्राह्मणांना अन्न व गाय वगैरेचें दान केल्यावर, गाईला गवत व गोवर्धनाला बलि (न) हीं अर्पण करावींत; व (शेवटीं) गाईसहवर्तमान आपण—गाई, ब्राह्मण व गोवर्धनगिरि यांना प्रदक्षिणा घालावी.

अथापराह्णेमार्गपालीबन्धनम् तत्रपूर्वस्यांदिशिकुशकाशमयरज्जुविशेषं यथाचारंकृत्वोच्चस्तम्भेवृक्षेचबध्वामार्गपालिनमस्तेस्तुसर्वलोकसुखप्रदे । विधेयैः पुत्रदाराद्यैः पुनरेहिव्रतस्यमे १ इतिनमस्कृत्यप्रार्थ्यतदधोमार्गेणगोगजादिसहिताः विप्रराजादयःसर्वेगच्छेयुः एवंकाशादिमयींवष्टिकांदृढांकृत्वाएकतो राजपुत्राअन्यत्रहीनजातयोजयज्ञानार्थंकर्षयेयुः अत्रहीनजातिजयेराजजयः प्रातर्द्यूतंकार्यमित्युक्तम् एवंनारीभिर्नीराजनमपिप्रातरेवकार्यम् रात्रौगीतवाद्याद्युत्सवःकार्यः नवैर्वस्त्रैश्चसंपूज्यद्विजसंबन्धिबान्धवाइति ।

**मार्गपालीबंधन**—नंतर अपराह्णकाळीं मार्गपालीबंधन करावें. कुश किंवा मोळ यांचा परिपाठाप्रमाणें मोठा दोर वळून पूर्वदिशेकडे खांबाला व झाडाला बांधावा आणि 'मार्गपालि नमस्तेस्तु सर्वलोकसुखप्रदे । विधेयैः पुत्रदाराद्यैः पुनरेहि व्रतस्यमे ॥' याप्रमाणें त्याची प्रार्थना करून त्याला नमस्कार करावा. नंतर त्या दोराच्या खालून गाई व हत्ती यांसह ब्राह्मण, राजा वगैरे सर्वांनीं जावें. त्यानंतर मोळ वगैरे गवतांचा एक भक्कम दोर तयार करून, त्याचें एक टोंक राजपुत्रांनीं व दुसरें हीन जातीच्या लोकांनीं धरून, तें दोहींकडून दोघांनीं कोणास जय मिळेल तें समजण्यासाठीं ओढावें. त्यांत जर हीन जातीयांचा जय झाला तर राजाचा जय होणार असें समजावें. या दिवशीं सकाळीं द्यूत खेळावें हें मागें सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें स्त्रियांनीं नीरांजन ओंवाळणें तेंही सकाळींच ओंवाळावें. रात्रीं गाण्याबजावण्याचा उत्सव करावा व ब्राह्मण, आप्त, वगैरेंचा नव्या वस्त्रांनीं सत्कार करावा.

अथद्वितीया यमोयमुनयापूर्वंभोजितःस्वगृहेस्वयम् । अतोयमद्वितीयासाप्रोक्तालोकेयुधिष्ठिर १ अस्यांनिजगृहेनभोक्तव्यंयत्नेनभगिनीहस्ताद्भोक्तव्यम् तेनधनधान्यसुखलाभः वस्त्रालंकरणैःसर्वाभगिन्यःपूज्याः स्वभगिन्यभावे मित्रादिभगिन्यःपूज्याः भगिन्याअपिभ्रातृपूजनेअवैधव्यंभ्रातुश्चिरजीवनं तदकरणेसप्तजन्मसुभ्रातृनाशः इयंपूर्वेद्युरेवापराह्णव्याप्तौपूर्वा उभयत्रव्याप्त्यव्याप्त्यादिपक्षान्तरेषुपरैव अस्यांयमुनास्नानमपराह्णेचित्रगुप्तयमदूतसहितयमपूजनंयमायार्घ्यदानंचविहितम् ।

**यमद्वितीया**—कार्तिक शुद्ध द्वितीयेला यमद्वितीया म्हणतात. युधिष्ठिरा, पूर्वीं यमुनेनें या तिथीला यमाला आपल्या घरीं जेवूं घातलें, म्हणून हिला लोकांत

यमद्वितीया म्हणतात. या तिथीला आपल्या घरीं जेवूं नये. त्रास झाला तरी बहिणीच्या हातचें जेवावें, म्हणजे धन, धान्य व सुख यांचा लाभ होतो. वस्त्रें व अलंकार यांनीं सर्व बहिणींचा सत्कार करावा. स्वतःला बहीण नसल्यास, मित्रादिकांच्या बहिणींचें पूजन करावें. बहिणीनें सुद्धां भावाची पूजा करावी. त्यानें तिला अवैधव्य आणि भावाला दीर्घायुष्य हीं मिळतात. तसें न केल्यास सात जन्मपर्यंत भ्रातृनाश होतो. ही द्वितीया जर पूर्व दिवशींच अपराह्णव्यापिनी असेल तर तीच घ्यावी. दोन्ही दिवस जर व्याप्ति असेल अथवा नसेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. या दिवशीं यमुनास्नान, अपराह्णकाळीं चित्रगुप्त व दूतांसह यम यांचें पूजन आणि यमाला अर्घ्यदान करणें या गोष्टी आवश्यक आहेत.

**कार्तिकशुक्लषष्ठ्यां भौमयुतायां वह्निं समभ्यर्च्य तत्प्रीत्यर्थं विप्रभोजनंकार्यम्।**

मंगळवारयुक्त कार्तिकी षष्ठीला अग्निपूजा करून त्याच्याचसाठीं ब्राह्मणभोजन घालावें.

**कार्तिकशुक्लाष्टमीगोपाष्टमी अत्रगोपूजनगोप्रदक्षिणगवानुगमनैरिष्टकामावाप्तिः।**

**गोपाष्टमी**—कार्तिकशुद्ध अष्टमी ही गोपाष्टमी होय. या तिथीला जर गाईला प्रदक्षिणा घालून तिच्या मागें रानांत जाण्याचीं वगैरे कृत्यें केलीं तर इच्छित गोष्टी प्राप्त होतात.

**कार्तिकशुक्लनवम्यांमथुराप्रदक्षिणोक्ता इयं युगादिरपि अस्यांपूर्वाह्णव्यापिन्यामपिण्डकं श्राद्धमुक्तम् अत्र विशेषो वैशाखप्रकरणे उक्तः।**

**मथुराप्रदक्षिणा**—कार्तिकशुद्ध नवमीला मथुरेला प्रदक्षिणा करावी. ही तिथि युगादि आहे. ही तिथि पूर्वाह्णव्यापिनी असतां अपिंडक श्राद्ध करावें. यासंबंधानें विशेष माहिती मागें वैशाखप्रकरणांत दिली आहे.

**एकादश्यादिदिनपञ्चकंभीष्मपञ्चकव्रतमुक्तम् तच्चशुद्धैकादश्यामारभ्यचतुर्दश्यविद्धौदयिकपौर्णमास्यां समापनीयम् यदिशुद्धैकादश्यामारम्भेक्षयवशेनपौर्णमास्यांपञ्चदिनात्मकव्रतसमाप्तिर्नघटतेतदाविद्धैकादश्यामप्यारम्भः शुद्धैकादश्यामारम्भेपिदिनवृद्धिवशेनपरविद्धपौर्णमास्यांसमापनेयदिषड्दिनापत्तिस्तदाचतुर्दशीविद्धपूर्णिमायामपिसमाप्तिःकार्या व्रतप्रयोगः कौस्तुभादौज्ञेयः कार्तिकमासेएकादश्यादिपर्वणिचन्द्रताराद्विबलान्वितेशिवविष्णुमन्त्रग्रहणादिरूपादीक्षाकर्तव्या कार्तिकेतुकृतादीक्षानृणांजन्मविमोचनीतिनारदोक्तेःतथात्रतुलसीकाष्ठमालाधारणमुक्तम् स्कान्दद्वारकामाहात्म्येविष्णुधर्मेच निवेद्यकेशवेमालांतुलसीकाष्ठसंभवाम्। वहतेयोनरोभक्त्यातस्यनैवास्तिपातकम् १ तुलसीकाष्ठसंभूतेमालेकृष्णजनप्रिये। बिभर्मित्वामहंकण्ठे कुरुमांकृष्णवल्लभम् २ एवंसंप्रार्थ्यविधिवन्मालांकृष्णगलेऽर्पिताम्। धारयेत्कार्तिकेयोवैसगच्छेद्वैष्णवंपदम् ३ इति—**

निर्णयसिन्धौस्पष्टम् यत्तुतत्रैवमालाधारणप्रकरणान्ते सर्वपुस्तकेष्वदृश्यमानमपि अत्रमूलंचिन्त्यमितिवाक्यं क्वचिन्निर्णयसिन्धुपुस्तकेदृश्यते तस्यमालाधारणविधिवाक्यानांनाप्रामाणिकत्वेतात्पर्यम् स्वयमेवस्कन्दपुराणस्थविष्णुधर्मस्थत्वेनोक्तानांस्वयमेवाप्रामाणिकत्वोक्तौव्याघातप्रसंगात् तुलसीकाष्ठघटितैरुद्राक्षाकारकारितैः। निर्मितांमालिकांकण्ठेनिधायार्चनमारभेत् १ तुलसीकाष्ठमालायाभूषितः कर्मआचरन्। पितॄणांदेवतानांचकृतंकोटिगुणंभवेत् २ इतिपद्मपुराणेपातालखण्डेनवसप्ततितमाध्यायेप्रत्यक्षोपलभ्यमानवचनाविरोधाच्च—किंत्वाषाढमासप्रकरणे आषाढशुद्धद्वादश्यामनुराधायोगरहितायांपारणंकार्यमित्युक्त्वातत्रप्रमाणत्वे नाभाकासितपक्षेषु मैत्राद्यपादेस्वपितीहविष्णुरित्यादीनिभविष्यस्थविष्णुधर्मस्थानिवाक्यानिलिखित्वायथान्तेइदंनिर्मूलमित्युक्तंएवंप्रकरणान्तरेपि तस्यचमाधवादि मूलग्रन्थेषुनोपलभ्यते इत्येवंतत्परिभाषातात्पर्यम् नत्वप्रामाणिकत्वे तथात्वे भाद्रकार्तिकयोस्तद्वाक्यानुसारेणपारणानिर्णयलेखनासाङ्गत्यप्रसंगात् कौस्तुभादिसर्वनवीनग्रन्थेषुतद्वाक्यानुसारेणैवनिर्णयस्यासंगत्यापाताच्च सर्वशिष्टानांतदनुसारेणैवपारणाचरणस्याप्यप्रमाणत्वापत्तेश्च तद्वदत्रापिज्ञेयम् एतेनमाधवादिष्वनुपलम्भादेवाप्रामाण्यापत्तिरितिनिरस्तम् बहूनांमाधवाद्यलिखितानांवाक्यानामाचाराणांचाप्रामाण्यापत्तेः यत्रतुयानियत्तुइत्येवमादिरूपेण यत्पदोपक्रममनूद्यतानिनिर्मूलानीत्येदमादिरीत्यादूष्यन्तेयथाश्रवणद्वादशीप्रकरणे श्रवणस्योत्तराषाढावेधनिषेधकवाक्यानि तत्रतेषामप्रमाणत्वेएवसर्वथातात्पर्यमितिसूक्ष्मबुद्धयोविदांकुर्वन्तु ननुमाधवादिग्रन्थेष्वनुपलम्भान्ननिर्मूलत्वमुच्यतेकिंतुकाष्ठमालाधारणनिषेधवाक्यानांबाधकानामुपलम्भादितिचेत् किंतानिवाक्यानिसामान्यतःकाष्ठमालाधारणनिषेधकानिदृश्यन्ते विशेषतस्तुलसीकाष्ठमालानिषेधकानिवाआद्येसामान्यतःकाष्ठमालानिषेधकवाक्यानां विशेषरूपैस्तुलसीधात्रीकाष्ठमालाधारणविधिवाक्यैर्बाधःस्पष्टः द्वितीयेषोडशिग्रहणाग्रहणवद्विहितप्रतिषिद्धत्वेनविकल्पमवगच्छ सचविकल्पोवैष्णवावैष्णवविषयतयाव्यवस्थितोभविष्यति मूलवाक्येषुविष्ण्वादिपदश्रवणादितिनानिर्मूलत्वसंभवः अतएवैतद्वाक्यानांमाधवाद्यनुल्लेखस्याशयोहरिवासरलक्षणवाक्येपुरुषार्थचिन्तामणौवैष्णवानामेवावश्यकत्वादितदनुपन्यासेपिमाधवादीनांनन्यूनतेत्युक्तयारीत्योहितुंशक्यः एवंधात्रीकाष्ठमालाधारणविधिर्ज्ञेयः रामार्चनचन्द्रिकादौतुलसीकाष्ठमालयाजपविधिवाक्यानि तुलसीकाष्ठघटितैर्मणिभिर्जपमालिकेत्यादीनिस्पष्टानि एवंग्रन्थान्तरेषुबहूनिवाक्यान्युपलभ्यन्ते तथाचप्रयोगपारिजाताह्निकेपूजाप्रकरणेउक्तम् आदौदेवपूजासाधनमग्रोदकगन्धपुष्पाक्षतादिकंसंभृत्यपादौपाणीप्रक्षाल्ययथाशक्तिघृतदुकूलादिशुद्धवस्त्रोभूषणभूषितोमुक्ताफलप्रवालपद्माक्षतुलसीमणिनिर्मितमालाःकण्ठेधृत्वाइतिसर्वदेशीयवैष्णवेषुतुलसीकाष्ठमालाधारणजपाचारश्चोपलभ्यतेभस्मादिधारणद्वेषिवैष्णवस्पर्धयाशैवागमग्राहिभिः केवलंद्विष्यतइत्यलंबहूनेतिदिक्।

**भीष्मपंचकव्रत**—कार्तिक शुद्ध एकादशीपासून पांच दिवसपर्यंत भीष्मपंचकव्रत करावें. या व्रताला शुद्ध एकादशीला आरंभ करून, चतुर्दशीनें विद्ध असलेल्या सूर्योदयव्यापिनी पौर्णिमेला याची समाप्ति करावी. शुद्ध एकादशीला आरंभ केल्यावर पौर्णिमेपर्यंतच्या पांच दिवसांत जर क्षयतिथीनें पांच दिवस भरत नसतील, तर विद्ध एकादशीलाही आरंभ करावा. शुद्ध एकादशीला प्रारंभ केल्यावर दिनवृद्धी मुळें प्रतिपदाविद्ध पौर्णिमेला जर समाप्तिदिन येईल, तर सहा दिवस भरतात व व्रत तर पांच दिवसांचें आहे, यास्तव चतुर्दशीनें विद्ध असलेल्या पौर्णिमेलाच समाप्ति करावी. या व्रताचा प्रयोग कौस्तुभ वगैरे ग्रंथांत पहावा. कार्तिकांतल्या एकादशी वगैरे पर्वणीला चंद्रबल व ताराबल पाहून, शिव आणि विष्णु यांच्या मंत्रांची दीक्षा घ्यावी. कारण, 'कार्तिकांत जर मंत्रदीक्षा घेतली, तर ती मोक्षदायक होते' असें नारदाचें वचन आहे. या महिन्यांत तुळशीची माळ ( गळ्यांत ) घालावी असें द्वारकामाहात्म्यांत आणि विष्णुधर्मांत सांगितलें आहे. 'तुलसीकाष्ठमाला केशवाला अर्पण करून जो मनुष्य नंतर ती भक्तिपूर्वक धारण करतो त्याचें पाप खात्रीनें राहात नाहीं.' माळेच्या प्रार्थनेचा मंत्र 'तुलसीकाष्ठसंभूते माले कृष्णजनप्रिये । बिभर्मि त्वामहं कण्ठे कुरु मां कृष्णवल्लभम् ॥' या मंत्रानें प्रार्थना केल्यावर कृष्णाच्या गळ्यांत घातलेली माळ जो यथाविधि कार्तिकांत गळ्यांत घालतो तो विष्णुपदाला जातो असें निर्णयसिंधूंत स्पष्ट सांगितलें आहे. सर्व पुस्तकांत जरी नसलें, तरी निर्णयसिंधूच्या एखाद्यातरी प्रतींत 'याविषयीं मूळ विचार करावा' असें वाक्य आढळतें. याचा अर्थ असा कीं, मालाधारणेच्या बाबतींत जीं विधिवाक्यें आहेत तीं प्रमाणभूत नाहींत असें नाहीं. कारण, स्कंदपुराणांतल्या विष्णुधर्मांत लिहिलेलीं वाक्यें आपणच सांगून पुन्हा आपणच तीं निर्णयसिंधुकार अप्रमाण म्हणतील तर तो प्रसंग हानिकारक होईल; आणि 'रुद्राक्षाच्या आकाराच्या मण्यांची केलेली तुलसीकाष्ठमाला गळ्यांत घातल्यावर पूजेला आरंभ करावा; तुलसीकाष्ठाच्या मालेनें विभूषित असा पितर अथवा देव यांची जो पूजा करतो त्याचें तें कर्म द्विगुणित होतें,' अशीं जीं पद्मपुराणांतल्या पातालखंडाच्या एकुणऐंशीव्या अध्यायांत प्रत्यक्ष वचनें आहेत, त्यांच्याशीं विरोध येईल. या बाबतींत आषाढमासप्रकरणांतल्या आषाढ शुद्ध द्वादशीविषयीं, अनुराधायोगरहित अशा द्वादशीला पारणें करण्यास सांगून, त्याला प्रमाणभूत अशीं 'आभाकसितपक्षेषु मैत्राद्यपाते स्वपितीह विष्णुः' वगैरे जीं भविष्यपुराणांतलीं विष्णुधर्मग्रंथाचीं वाक्यें, तीं लिहून हें वाक्य निर्मूल असल्याचें जसें शेवटीं सांगितलें, तद्वतच या दुसऱ्या जागींही समजावें. यावरून माधवादिकमूलग्रंथांत तें वचन मिळत नाहीं एवढेंच निर्णयसिन्धूच्या परिभाषेचें तात्पर्य जाणावें. तें तात्पर्य अप्रमाणाबद्दल समजूं नये. अप्रमाण जर मानलें तर भाद्रपद आणि कार्तिक या महिन्यांत त्याच वाक्याला अनुसरून जो पारणानिर्णय सांगितला त्याची तशी संगति लागणार नाहीं. तद्वतच कौस्तुभादि सर्व नवीन ग्रंथांत त्याच वाक्याला अनुसरून सांगितलेल्या निर्णयाचीही सिद्धि होणार नाहीं, आणि त्या

वाक्याला अनुसरूनच जी सर्व शिष्टजन पारणा करतात तीही अप्रमाणाचीच ठरेल. याप्रमाणें माधवादि ग्रंथांत आधार मिळत नसल्यानेंच तें वाक्य अप्रमाण आहे असें जे म्हणतील त्यांचें खंडन झालें व त्यामुळेंच माधवादिकांनीं लिहिलेलीं जीं अनेक वाक्यें व आचार तींही प्रमाणभूत नसल्याचें अरिष्ट ओढवेल. 'यानि' 'यत्तु' या स्वरूपानें ज्या पदाचा आरंभ दाखवून, पुढें तीं निर्मूल असल्याचें जेथें दाखविलें—उदाहरणार्थ, श्रवणद्वादशीच्या प्रकरणांत श्रवणाला उत्तराषाढा-वेधाचा निषेध आहे असें सांगणारीं वाक्यें—तेथें अप्रमाणाचेंच तात्पर्य असल्या-चें सूक्ष्मबुद्धीच्या लोकांनीं समजावें. या बाबतींत अशी एक शंका उत्पन्न होते कीं, माधवादि ग्रंथांत आधार मिळत नाहीं म्हणून निर्मूल नव्हे असें म्हटल्यास, अशीं तीं वाक्यें कोणचीं? सामान्यतः काष्ठमालाधारणाचा जीं निषेध करतात तीं किंवा विशेषतः तुलसीकाष्ठमालाधारणाचा निषेध करतात तीं? या शंकेचें समाधान असें आहे कीं, सामान्यतः काष्ठमालाधारणाच्या बाबतींत बाध आणणारी जी तुळस व आंवळी यांच्या लाकडांची माळ, ती धारण करण्याच्या बाबतींत तर प्रथमपक्षीं विधिवाक्यां-नींच त्याचें स्पष्टीकरण केलेलें आहे. दुसऱ्या पक्षीं—ज्याप्रमाणें अतिरात्रयज्ञांत षोडशी पात्राचें ग्रहण विधिनिषेधरूपानें वैकल्पिक आहे, त्याचप्रमाणें या ठिकाणींही तुलसी-काष्ठमालाधारणाचा विकल्प आहे, असें समजावें. या विकल्पाचें स्पष्टीकरण, वैष्णव आणि अवैष्णव या भेदांनीं होतें. कारण, मूळच्या वचनांत विष्णु इत्यादि पदें आहेत, म्हणून निर्मूल असें म्हणतां येत नसल्यानेंच तीं वाक्यें माधवादिकांनीं लिहिलीं नाहींत. हरिवासराच्या लक्षणांत वैष्णवांनींच हरिवासर अवश्य पाळावा असें पुरुषार्थ-चिंतामणींत सांगितलें असल्यानें तीं वाक्यें जरी घेतलीं नाहींत, तरी तेवढ्यानेंच माधवादिकांना कमीपणा येत नाहीं, असा त्यांचा अभिप्राय समजणें शक्य आहे. आंवळीच्या काष्ठाची माळ घालण्याचा विधि याचप्रमाणें समजावा. रामार्चनचंद्रि-कादि ग्रंथांत तुलसीकाष्ठाचे मणी करून त्यांच्या माळेनें जप करावा वगैरे विधिवाक्यें जशीं स्पष्ट आहेत, तशींच इतर ग्रंथांतहि आहेत. याचप्रमाणें प्रयोगपारिजातांतल्या आह्निकप्रकरणांत पूजेसंबंधानें जें सांगितलें आहे, तें येणेंप्रमाणें:—अर्घोदक, गंध, पुष्प, अक्षता वगैरे पूजासामुग्री मिळवून, हातपाय धुतल्यावर, सामर्थ्याप्रमाणें पीतां-बरादि शुद्ध वस्त्र धारण करावें. नंतर मोत्यें, पोंवळीं, कमलाक्ष व तुलसीकाष्ठांचे मणि यांच्या माळा गळ्यांत घालाव्या आणि मग पूजेला आरंभ करावा. याप्रमाणेंच सर्व प्रांतांतील वैष्णवांत, तुलसीकाष्ठांची माळ धारण करून जप करण्याचा परिपाठ असल्याचें दिसतें. यावरूनच भस्मादिक धारण करणाऱ्यांचा द्वेष करणाऱ्या वैष्णवांचा, त्यांच्या द्वेषानेंच शैवपंथाचा आग्रह धरणारे शैव तेवढे तुलसीकाष्ठमालेचा द्वेष करतात असा याचा निर्णय झाला. झाला इतका या बाबतींतला विस्तार आतां पुरे.

**अथधात्रीमूलेदेवपूजाविधिः सर्वपापक्षयद्वाराश्रीदामोदरप्रीत्यर्थंधात्रीमूले-श्रीदामोदरपूजांकरिष्ये पुरुषसूक्तेनषोडशोपचारैःसंपुज्यगन्धपुष्पफलयुतमर्घ्यं दद्यात् अर्घ्यंगृहाणभगवन्सर्वकामप्रदोभव। अक्षयासंततिर्मेस्तुदामोदरनमो-**

स्तुते १ ततोपराधसहस्राणीतिप्रार्थ्यधात्रींकुंकुमगन्धादिनाभ्यर्च्यपुष्पैः पूजयेत् धात्र्यैनमः शान्त्यैन० मेधायै० प्रकृत्यै० विष्णुपत्न्यै० महालक्ष्म्यै० रमायै० कमलायै० इन्दिरायै० लोकमात्रे० कल्याण्यै० कमनीयायै० सावित्र्यै० जगद्धात्र्यै० गायत्र्यै० सुधृत्यै० अव्यक्तायै० विश्वरूपायै० सुरूपायै० अब्धिभवायै० ततोधात्रीमूलेसव्येनतर्पणंकार्यम् पितापितामहश्चान्येअपुत्रायेचगोत्रिणः । तेपिबन्तुमयादत्तंधात्रीमूलेऽक्षयंपयः १ आब्रह्मस्तम्बपर्यन्तं० । दामोदरनिवासायैधात्र्यैदेव्यैनमोस्तुते । सूत्रेणानेनबध्नामिसर्वदेवनिवासिनीम् १ इतिसूत्रेण वेष्टयेत् धात्र्यैनमइतिचतुर्दिक्षुबलीन्दत्त्वाऽष्टदीपान्दद्यात् अष्टकृत्वः प्रदक्षिणीकृत्यनमेत् धात्रीदेविनमस्तुभ्यंसर्वपापक्षयंकरि । पुत्रान्देहिमहाप्राज्ञे यशोदेहिबलंचमे १ प्रज्ञांमेधांचसौभाग्यंविष्णुभक्तिंचशाश्वतीम् । नीरोगंकुरुमांनित्यंनिष्पापंकुरुसर्वदा २ ततोघृतपूर्णंसहेमकांस्यपात्रंदद्यादितिसंक्षेपः ।

**आंवळीखालचा पूजाविधि**---आंवळीच्या ( धात्री ) झाडाच्या मुळापाशीं 'सर्वपापक्षयद्वारा श्रीदामोदरप्रीत्यर्थं धात्रीमूले श्रीदामोदरपूजां करिष्ये' असा संकल्प करून, गंध, पुष्प व फल यांचें अर्घ्य द्यावें. अर्घ्य देण्याचा मंत्र 'अर्घ्यं गृहाण भगवन्सर्वकामप्रदोभव । अक्षया सन्ततिर्मेस्तु दामोदर नमोस्तुते ॥' अर्घ्यानंतर 'अपराधसहस्राणि' अशी प्रार्थना करून आंवळीला कुंक्वादिक अर्पण करावींत. फुलें वाहून तिची पूजा करावी. पूजामंत्रः---धात्र्यैनमः शान्त्यै० मेधायै० प्रकृत्यै० विष्णुपत्न्यै० महालक्ष्म्यै० कमलायै० इंदिरायै० लोकमात्रे० कल्याण्यै० कमनीयायै० सावित्र्यै० जगद्धात्र्यै० गायत्र्यै० सुधृत्यै० अव्यक्तायै० विश्वरूपायै० सुरूपायै० अब्धिभवायैनमः । यानंतर आंवळीच्या मुळांवर जें सव्यानें तर्पण करावें, त्याचा मंत्रः---'पितापितामहश्चान्ये अपुत्रायेच गोत्रिणः । ते पिबंतु मयादत्तं धात्रीमूलेऽक्षयंपयः ॥ आब्रह्मस्तम्बपर्यंत०' याप्रमाणें तर्पण झाल्यानंतर ज्या मंत्रानें आंवळीला सूत गुंडाळायचें त्याचा मंत्रः---'दामोदरनिवासायै धात्र्यै देव्यै नमोऽस्तुते । सूत्रेणानेन बध्नाम्मि सर्वदेवनिवासिनाम् ॥ त्यानंतर 'धात्र्यैनमः' या मंत्रानें चार दिशांना चार बली देऊन, आठ दिवे लावावेत. नंतर आंवळीला आठ प्रदक्षिणा घालून, नमस्कार करावा आणि 'धात्रीदेवि नमस्तुभ्यं सर्वपापक्षयंकरि । पुत्रान्देहि महाप्राज्ञे यशोदेहि बलंचमे । प्रज्ञां मेधांच सौभाग्यं विष्णुभक्तिंच शाश्वतीम् । नीरोगं कुरु मां नित्यं निष्पापं कुरु सर्वदा ॥' अशी प्रार्थना केल्यावर तुपानें भरलेलें काशाचें भांडें सोन्यासह दान करावें. असा हा या व्रताचा संक्षेप आहे.

**कार्तिकशुक्लद्वादश्यांरेवतीयोगरहितायांपारणं अपरिहार्ययोगे चतुर्थपादोवर्ज्य इत्यादिविशेषः श्रवणनिर्णयप्रकरणोक्तोद्रष्टव्यः ।**

रेवती नक्षत्र नसलेल्या कार्तिक शुद्ध द्वादशीला पारणें करावें. रेवती नक्षत्र सर्वस्वीं वर्ज्य करणें अशक्य असल्यास, त्याचा चौथा पाद वर्ज्य करावा वगैरे ज्या गोष्टी श्रवणनिर्णय प्रकरणांत मागें सांगितल्या आहेत, त्या पाहाव्या.

अथप्रबोधोत्सवतुलसीविवाहौ तत्रप्रबोधोत्सवःकार्तिकशुक्लैकादश्यांक्-
चिदुक्तः रामार्चनचन्द्रिकादौद्वादश्यामुक्तः उत्थापनमन्त्रेद्वादशीग्रहणात् द्वा-
दश्यामेवयुक्तः तत्रापिद्वादश्यांरेवत्यन्त्यपादयोगोरात्रिप्रथमभागेप्रशस्तः तद-
भावेतत्रैवरात्रौरेवतीनक्षत्रमात्रयोगोपि तदभावेरात्रिप्रथमभागेकेवलद्वादश्य-
पि एवंकेवलरेवत्यापि द्वादशीरेवत्योरुभयोरपिरात्रावभावेदिवैवद्वादशीमध्ये-
कार्यइतिकौस्तुभे स्थितम् तथापिपारणाहेपूर्वरात्रौइतिवचनात्पारणाहेरात्रि-
पूर्वभागेद्वादश्यभावेपित्रयोदश्यामेव पारणाहेप्रबोधोत्सवइतिदेशाचारः एवं
तुलसीविवाहस्यनवम्यादिदिनत्रये एकादश्यादिपूर्णिमान्तेयत्रक्वापिदिने का-
र्तिकशुक्लान्तर्गतविवाहनक्षत्रेषुवाविधानादनेककालत्वेंतथापिपारणाहेप्रबोधो-
त्सवकर्मणासहतन्त्रतयैवसर्वत्रानुष्ठीयतेइतिसोपिपारणाहेपूर्वरात्रेकार्यः प्रबो-
धोत्सवात्पृथक्चिकीर्षायांकालान्तरेवाकार्यः तत्रपुण्याहवाचननान्दीश्राद्ध-
विवाहहोमाद्यङ्गसहितस्तुलसीविवाहप्रयोगःकौस्तुभादौज्ञेयः संक्षेपतस्तुप्रबो-
धोत्सवेनैकतन्त्रतयाशिष्टाचारमनुसृत्यलिख्यते देशकालौसंकीर्त्यश्रीदामोदर-
प्रीत्यर्थंप्रबोधोत्सवंसंक्षेपतस्तुलसीविवाहविधिंचतन्त्रेणकरिष्ये तदङ्गतयापु-
रुषसूक्तेनविधिनाषोडशोपचारैस्तंत्रेण श्रीमहाविष्णुपूजांतुलसीपूजांचकरिष्ये
न्यासादिविधाय श्रीविष्णुंतुलसींचध्यात्वासहस्रशीर्षेतिश्रीमहाविष्णुं-
तुलसींचावाह्य पुरुषएवेत्यादिभिः श्रीमहाविष्णवे दामोदरायश्रीदेव्यैतुलस्यै
चनमआसनमित्यादि स्नानान्ते मङ्गलवाद्यैः सुगन्धितैलहरिद्राभ्यांनागवल्ली-
दलगृहीताभ्यांउष्णोदकेनचमङ्गलस्नानंविष्णवेतुलस्यैचसुवासिनीभिःकारयित्वा-
स्वयंवादत्त्वापञ्चामृतस्नानंसमर्प्यशुद्धोदकेनाभिषिच्यवस्त्रयज्ञोपवीतचन्दनं-
दत्त्वातुलस्यैहरिद्राकुंकुमकण्ठसूत्रमङ्गलालंकारानुदत्त्वामन्त्रपुष्पान्तपूजां स-
माप्यघण्टादिवाद्यघोषेणदेवंप्रबोधयेत् तत्रमन्त्राः इदंविष्णु० योजागारेतितु-
आचारप्राप्तः ब्रह्मेन्द्ररुद्राग्निकुबेरसूर्यसोमादिभिर्वन्दितवन्दनीय बुद्ध्यस्वदेवेश-
जगन्निवासमन्त्रप्रभावेनसुखेनदेव १ इयंचद्वादशीदेवप्रबोधार्थंतुनिर्मिता ।
त्वयैवसर्वलोकानांहितार्थंशेषशायिना २ उत्तिष्ठोत्तिष्ठगोविन्दत्यजनिद्रांजग-
त्पते । त्वयिसुप्तेजगत्सुप्तमुत्थितेचोत्थितंजगत् ३ एवमुत्थाप्य चरणं पवित्रं०
१ गतामेघावियच्चैवनिर्मलंनिर्मलादिशः । शारदानिचपुष्पाणिगृहाणममकेशव
इत्यादिमन्त्राभ्यांपुष्पाञ्जलिंदद्यात् अथाचारात्तुलसीसंमुखांश्रीकृष्णप्रतिमांकृत्वा
मध्येन्तःपटंधृत्वामंगलाष्टकपद्यानिपठित्वाअन्तःपटंविसृज्याक्षताप्रक्षेपंकृत्वादामोदर
हस्तेतुलसीदानंकुर्यात् देवींकनकसंपन्नांकनकाभरणैर्युताम् । दास्यामिविष्णवेतु
भ्यंब्रह्मलोकजिगीषया १ मयासंवर्धितांयथाशक्त्यलंकृतामिमांतुलसींदेवींदामोद-
दरायश्रीधरायवरायतुभ्यमहंसंप्रददे देवपुरतः साक्षतजलंक्षिपेत् श्रीमहाविष्णुः
प्रीयतामित्युक्त्वाइमांदेवींप्रतिगृह्णातुभवानितिवदेत् ततोदेवहस्तस्पर्शंतुलस्याः
कृत्वाकइदंकस्माअदात्कामःकामायादात्कामोदाताकामःप्रतिग्रहीताकामंसमुद्र-
माविशकामेनत्वाप्रतिगृह्णामिकामैतत्तेवृष्टिरसिद्यौस्त्वाददातुपृथिवीप्रतिगृह्णा-

तु इतिमंत्रमन्येनवाचयेत् यजमानः त्वंदेविमेग्रतोभूयास्तुलसीदेविपार्श्वतः । देवित्वंपृष्ठतोभूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयाम् १ दानस्यप्रतिष्ठासिद्ध्यर्थमिमांदक्षिणांसंप्रददे देवपुरतोदक्षिणामर्पयेत् ततः स्वस्तिनोमिमीतां शंनइत्यादिस्वस्वशाखोक्तानिशान्तिसूक्तानिविष्णुसूक्तानिच पठेयुः तुलसीयुतायविष्णवेमहानीराजनंकृत्वामन्त्रपुष्पंदत्त्वा सपत्नीकःसगोत्रजःसामात्योयजमानश्चतस्रःप्रदक्षिणाः कुर्वीत ब्राह्मणेभ्योदक्षिणांदत्त्वायथाशक्तिब्राह्मणभोजनंसंकल्प्यकर्मेश्वरार्पणंकुर्यात् एवंदेवंप्रबोध्यकार्तिकेयद्यद्द्रव्यस्यवर्जनंकृतं तत्तद्द्रव्यमुक्तरीत्याद्रव्यान्तरंचब्राह्मणेभ्योदत्त्वाव्रतसंपूर्णतांप्रार्थयेत् इदंव्रतंमयादेवकृतंप्रीत्यैतवप्रभो । न्यूनंसंपूर्णतांयातुत्वत्प्रसादाज्जनार्दन १ इतिततोव्रतंभगवदर्पणंकुर्यात् चातुर्मास्यव्रतसमाप्तिरप्यत्रैवेतिकेचित् कार्तिकमासव्रतोद्यापनंचातुर्मास्यव्रतोद्यापनंचचतुर्दश्यांपूर्णिमायांवेत्यपरे ।

**प्रबोधोत्सव आणि तुलसीविवाह**—प्रबोधोत्सव हा क्वचित् ग्रंथांत कार्तिक शुद्ध एकादशीला करावा असें म्हटलें आहे. रामार्चनचन्द्रिकादि ग्रंथांत द्वादशीलाच करावा असें म्हटलें आहे. उत्थापनाच्या ( उठण्याच्या ) मंत्रांतही द्वादशीचाच निर्देश असल्यानें, तो द्वादशीलाच करणें योग्य आहे. त्याकरितां द्वादशीच्या रात्रीच्या पहिल्या भागांत जर रेवतीच्या शेवटच्या चरणाचा योग असेल, तर तो उत्तम होय. तसा जर योग नसेल तर रात्रीच्या पहिल्या भागांतच फक्त रेवतीयोग असला तरी तो योग्य होय. त्याच्याही अभावीं रात्रीच्या पहिल्या भागांत फक्त द्वादशी किंवा तिच्याही अभावीं रात्रीच्या पहिल्या भागीं निवळ रेवती अथवा त्या दोहोंचाही रात्रीं अभाव असल्यास, दिवसासच द्वादशींत हा प्रबोधोत्सव करावा, असें कौस्तुभांत जरी सांगितलें आहे, तरी 'पारणेच्या पूर्वरात्रीं' असें वचन असल्यानें, पारणेच्या रात्रीच्या पहिल्या भागांत द्वादशीचा अभाव असतांही त्रयोदशीलाच पारणेच्या दिवशीं प्रबोधोत्सव करण्याचा संप्रदाय आहे. याप्रमाणेंच नवमीपासून तीन दिवसपर्यंत किंवा एकादशीपासून पुनवेपर्यंत कोणत्या तरी एका दिवशीं, अथवा कार्तिकशुद्धांत विवाहनक्षत्रीं तुलसीविवाह करावा. असे तुळशीच्या लग्नाचे जरी अनेक काळ आहेत, तरी पारण्याच्या दिवशींच प्रबोधोत्सवाच्या कर्मासह तंत्रानेंच सर्वत्र तुळशीचें लग्न करतात; यास्तव तुळशीचें लग्नसुद्धां प्रबोधोत्सवासारखेंच पारण्याच्या रात्रीच्या पहिल्या भागांत करावें. प्रबोधोत्सव आणि तुलसीविवाह जर निरनिराळे करायचे असतील, तर तुळशीचें लग्न निराळ्या वेळीं करावें. पुण्याहवाचन, नान्दीश्राद्ध, विवाहहोम वगैरे अंगांसह तुलसीविवाहाचा प्रयोग कौस्तुभादि ग्रंथांत पाहावा. प्रबोधोत्सवाबरोबरच तुलसीविवाह करण्याचा शिष्टाचार असल्यानें, त्या बाबतींत येथें संक्षेपानेंच तें कर्म लिहितों. देशकालादिकांचा उच्चार करून, 'श्रीदामोदरप्रीत्यर्थं प्रबोधोत्सवं संक्षेपतस्तुलसीविवाहविधिंच तंत्रेण करिष्ये तदंगतया पुरुषसूक्तेन विधिना षोडशोपचारैस्तंत्रेण श्रीमहाविष्णुपूजां तुलसीपूजांच करिष्ये' असा संकल्प करून, न्यासादिक केल्यावर श्रीविष्णु व तुलसी यांचें ध्यान करावें.

सहस्रशीर्षा०' या मंत्रानें श्रीमहाविष्णु व तुलसी यांचें आवाहन करून, 'पुरुष एव०' वगैरे मंत्रांनीं 'श्रीमहाविष्णवे दामोदराय श्रीदेव्यै तुलस्यैच नमः आसनम्' वगैरे स्नानापर्यंत पूजा करून मंगलवाद्यें वाजवावींत, आणि सुवासिनीकडून किंवा स्वतः आपण नागवेलीच्या पानांनीं सुगन्धी तेल व हळद लावून ऊन पाण्यानें विष्णु व तुळस यांना मंगलस्नान घालावें. त्यानंतर पंचामृतस्नान घालून स्वच्छ पाण्यानें अभिषेक करावा. वस्त्र, जानवें व चंदन हीं नंतर विष्णूला अर्पण करून, तुळशीला—हळद, कुंकू, गळेसर व इतर मंगलालंकार देऊन, मंत्रपुष्पासहित सर्व पूजा संपवावी. त्यानंतर घंटा वगैरेंच्या वाजवण्यानें देवाला जागें करावें. [प्रबोधोत्सव=देवाला जागें करण्याचा उत्सव] जागें करण्याचा मंत्रः—'इदंविष्णु० योजागार०' हा आचार करणें तर प्राप्तच आहे. 'ब्रह्मेंद्ररुद्राग्निकुबेरसूर्यसोमादिभिर्वन्दितवन्दनीय बुध्यस्व देवेश जगन्निवास मन्त्रप्रभावेन सुखेन देव ॥ इयंच द्वादशी देव प्रबोधार्थंतु निर्मिता। त्वयैव सर्वलोकानां हितार्थं शेषशायिना ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठगोविंद त्यज निद्रां जगत्पते ॥ त्वयिसुप्ते जगत्सुप्तमुत्थिते चोत्थितं जगत् ॥' देवाला उठविल्यावर 'चरणं पवित्रं' 'गता मेघा वियच्चैव निर्मलं निर्मला दिशः। शारदानिच पुष्पाणि गृहाण मम केशव ॥' वगैरे मंत्रांनीं पुष्पांजली द्यावी. त्यानंतर परिपाठाप्रमाणें श्रीकृष्णमूर्ति तुळशीच्या पुढें ठेवून, त्या दोहोंमध्यें अंतःपट धरावा आणि मंगलाष्टकें म्हणावींत. त्यानंतर अंतःपट काढून घेऊन अक्षता टाकल्यावर, दामोदराच्या हातावर तुळशीचें दान करावें. 'देवीं कनकसंपन्नां कनकाभरणैर्युताम्। दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया। मया संवर्धितां यथाशक्त्यलंकृतां इमां तुलसीदेवीं दामोदराय श्रीधराय वराय तुभ्यमहं संप्रददे' असें म्हणून देवापुढें अक्षतायुक्त पाणी सोडावें, व 'श्रीमहाविष्णुः प्रीयताम्' असें म्हटल्यावर, 'इमां देवीं प्रतिगृह्णातु भवान्' असें देवाला सांगावें. त्यानंतर तुळशीचा देवाच्या हाताला स्पर्श करून, 'क इदं कस्माअदात्कामः कामायादात्कामो दाता कामः प्रतिगृहीताकामं समुद्रमाविश कामेनत्वाप्रतिगृह्णामि कामैतत्ते वृष्टिरसिद्यौस्त्वाददातु पृथिवी प्रतिगृह्णातु' हा मंत्र दुसऱ्याकडून म्हणवावा. यजमानानें 'त्वं देविमेऽग्रतो भूयास्तुलसीदेवि पार्श्वतः देवित्वं पृष्ठतो भूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयाम् ॥ दानस्य प्रतिष्ठासिद्ध्यर्थं इमां दक्षिणां संप्रददे ॥' असा उच्चार करून देवापुढें दक्षिणा ठेवल्यावर, 'स्वस्ति नो मिमीतां० शं० नः' इत्यादि ज्याच्या त्याच्या शाखेंत सांगितलेलीं शांतिसूक्तें व विष्णुसूक्तें म्हणावींत. त्यानंतर तुलसीसह विष्णूची आरती करून त्यांना मंत्रपुष्प द्यावें. त्यानंतर पत्नीसह गोत्रज व अमात्य यांना बरोबर घेऊन यजमानानें त्या देवतांना चार प्रदक्षिणा घालाव्या. ब्राह्मणांना नंतर दक्षिणा दिल्यावर, यथाशक्ति ब्राह्मणभोजनाचा संकल्प करून सर्व कर्म ईश्वराला अर्पण करावें. याप्रमाणें देवाला जागें केल्यावर कार्तिकांत जे जे पदार्थ सोडलेले असतील, ते ते पदार्थ आणि वर सांगितल्याप्रमाणें इतर पदार्थ ब्राह्मणांना देऊन, व्रताची पूर्णता होण्यासाठीं प्रार्थना करावी. ती अशीः— 'इदं व्रतं मया देव कृतं प्रीत्यै तवप्रभो। न्यूनं संपूर्णतां यातु त्वत्प्रसादाज्जनार्दन'

या प्रार्थनेनंतर भगवंताला व्रतार्पण करावें, याच दिवशीं चातुर्मास्यव्रताचीही समाप्ति करण्यास कांहीं ग्रंथकारांनीं सांगितलें आहे. कार्तिकमासव्रत चातुर्मास्यव्रत यांचीं उद्यापनें चतुर्दशी किंवा पौर्णिमा या तिथींवर करावींत. असेंही इतर ग्रंथकार म्हणतात.

**अथवैकुण्ठचतुर्दशी पूर्वेद्युरुपवासंकृत्वारुणोदयव्यापिन्यांचतुर्दश्यांशिवंसंपूज्यप्रातःपारणंकार्यम् तथाचचतुर्दशीयुक्तारुणोदयवतिअहोरात्रेउपवासःफलितः उभयत्रारुणोदयव्याप्तौपरत्रारुणोदयेपूजापूर्वत्रोपवासःउभयत्राव्याप्तौचतुर्दशीयुक्ताहोरात्रेएवारुणोदयेपूजापूर्वत्रोपवासश्च केचित्तुविष्णुपूजायामियंनिशीथव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तौनिशीथप्रदोषोभयव्यापिनीग्राह्येत्याहुः अस्यामेवचतुर्दश्यांपरविद्धायांकार्तिकमासव्रतोद्यापनाङ्गत्वेनोपवासं कृत्वाधिवासनंविधाय रात्रौजागरणंकुर्याद्गीतवाद्यादिमंगलैः । नराणांजागरेविष्णोर्गीतंनृत्यंचकुर्वताम् १ गोसहस्रंचददतांफलंसमुदाहृतम् इत्यादिवाक्यैर्विहितंगीतनृत्यवाद्यविष्णुचरितपठनस्वेच्छालापलीलानुकारैर्हरिजागरंकृत्वापरविद्धपौर्णमास्यांसपत्नीकाचार्यंवृत्वाअतोदेवेतिद्वाभ्यांतिलपायसंहुत्वागोदानंकार्यमितिमासव्रतोद्यापनम् कार्तिकशुक्लद्वादशीपौर्णमासीचमन्वादिः सापौर्वाह्णिकीग्राह्या अन्यत्पूर्वमुक्तम् ।**

**वैकुंठचतुर्दशी**—कार्तिकशुद्ध चतुर्दशी ही वैकुंठचतुर्दशी होय. आदल्या दिवशीं उपास करून, अरुणोदयव्यापिनी चतुर्दशीला सकाळीं शिवाची पूजा केल्यावर पारणें करावें. असें केल्यानें चतुर्दशीयुक्त अशा अरुणोदय-अहोरात्रांत उपास केल्याचें फळ मिळतें. अरुणोदयव्याप्ति जर दोन दिवस असेल, तर आदल्या दिवशीं उपास करून दुसऱ्या दिवशीं अरुणोदयकाळीं शिवपूजा करावी. अरुणोदयव्याप्ति जर दोन्ही दिवशीं नसेल, तर चतुर्दशीयुक्त अशा अहोरात्रांतच अरुणोदयीं पूजा करावी आणि आदल्या दिवशीं उपास करावा. विष्णुपूजेला ही चतुर्दशी निशीथव्यापिनी घ्यावी. निशीथव्याप्ति जर दोन दिवस असेल, तर निशीथ व प्रदोष हे दोन काल व्यापणारी घ्यावी असें कांहीं ग्रंथकार सांगतात. हीच चतुर्दशी जेव्हां परविद्धा असेल तेव्हां कार्तिकमासव्रताच्या उद्यापनाच्या अंगभूत असणारा उपास करून अधिवासन करावें. रात्रीं गाणें-बजावणें, वगैरे मंगलवस्तुयुक्त जागरण करावें. विष्णूच्या जागरांत गीत व नृत्य करणाराला हजार गोदानाचें फळ मिळतें, अशा वाक्यांनीं योग्य असें जें—गीत, नृत्य, वादन, विष्णुचरित्रपठन, स्वेच्छालाभ, क्रीडा वगैरे-तें सर्व करून हरिजागर करावा. परविद्धा पौर्णिमेला सपत्नीक आचार्याला पसंत करून 'अतोदेवा० या दोन ऋचांनीं तीळ व खीर यांचा होम करून गोदान द्यावें. असें जें कार्तिकमासव्रताचें उद्यापन तें येथें सांगितलें. कार्तिकशुद्ध द्वादशी व पौर्णिमा या मन्वादि तिथि असल्यानें, त्या पूर्वाह्णव्यापी घ्यावा. इतर प्रयोग पूर्वींच सांगितला आहे.

**अस्यांचातुर्मास्यव्रतसमाप्तिः तत्रचातुर्मास्यव्रतानांसमाप्तौदानानि नक्तव्रतेवस्त्रयुग्मम् एकान्तरोपवासेगौःभूशयनेशय्या षष्ठकालभोजनेगौःव्रीहिगोधूमादिधान्यत्यागेसौवर्णव्रीहिगोधूमादिदानम् कृच्छ्रव्रतेगोयुग्मम् शाकाहारेगौःपयो-**

मात्रभक्षणेपयोवर्जनेचगौः मधुदधिघृतवर्जनेवस्त्रंगौश्च ब्रह्मचर्येस्वर्णम् ताम्बूलवर्जनेवस्त्रयुग्मम् मौनेघण्टाघृतकुम्भावस्त्रद्वयंच रङ्गवल्लीकरणेगौःसुवर्णपद्मंच दीपदानव्रतेदीपिकावस्त्रद्वयंच भूमिभोजनेकांस्यपात्रंगौश्च गोग्रासेगोवृषौ प्रदक्षिणाशतेवस्त्रम् अभ्यङ्गवर्जनेतैलपूर्णघटः नखकेशधारणेमधुसर्पिर्हेमदानम् यत्रविशेषतोदानंनोक्तंतत्रस्वर्णंगौश्च गुडवर्जनेगुडपूर्णंससुवर्णताम्रपात्रम् एवं लवणवर्जनेलवणपूर्णताम्रपात्रमितिक्वचित् अस्यामेवलक्षप्रदक्षिणालक्षनमस्काराणामाषाढ्यादावारब्धानामुद्यापनंकार्यम् एवंतुलसीलक्षपूजां कार्तिकेमाघेवारभ्यप्रत्यहंसहस्रतुलसीसमर्पणेनलक्षंसमाप्यमाघ्यांवैशाख्यांवोद्यापनंकार्यम् एवंपुष्पादिलक्षपूजाअपितत्रबिल्वपत्रलक्षेणलक्ष्मीप्राप्तिःफलम् दूर्वालक्षेणारिष्टशान्तिः चम्पकलक्षेणायुष्यम् अतसीलक्षेणविद्या तुलसीलक्षेणविष्णुप्रसादः गोधूमतण्डुलादिप्रशस्तधान्यलक्षेणदुःस्वप्ननाशः एवंसर्वपुष्पैः सर्वकामावाप्तिः एवंलक्षवर्तिव्रतमपिमासत्रयंकृत्वाकार्तिकेमाघेवैशाखेवाउत्तरोत्तरप्रशस्तेसमापनीयम् एवंधारणपारणव्रतोद्यापनमपिपौर्णमास्यामेव कार्तिकमासव्रतानांमासोपवासादीनांद्वादश्यामेवसमापनम् तत्रासंभवेपौर्णमास्याम् एवं गोपद्मव्रतमाषाढशुक्लैकादश्यादावारभ्यप्रत्यहं त्रयस्त्रिंशद्गोपद्मानिविलिख्य गन्धपुष्पैःप्रपूज्यतावत्संख्याकार्घ्यनमस्कारप्रदक्षिणाः कृत्वाकार्तिकद्वादश्यांत्रयस्त्रिंशदपूपवायनंदद्यादेवंवत्सरपञ्चकमनुष्ठायोद्यापनंकुर्यात् लक्षप्रदक्षिणादिगोपद्मपर्यन्तोद्यापनानामितिकर्तव्यताःकौस्तुभेद्रष्टव्याः कार्तिकपौर्णमास्याः कृत्तिकानक्षत्रयोगेमहापुण्यत्वम् रोहिणीयोगेमहाकार्तिकीत्वम् कार्तिक्यांकृत्तिकायोगेयः कार्तिकेयदर्शनं करोतिससप्तसुजन्मसुधनाढ्योवेदपारगोविप्रोभवेत् विशाखास्थे सूर्येसतियद्दिनेचन्द्रनक्षत्रंकृत्तिकातत्रपद्मकयोगः अयंपुष्करतीर्थेऽतिप्रशस्तः ।

**चातुर्मास्यव्रतसमाप्ति**—कार्तिकी पुनवेला चातुर्मास्यव्रताची समाप्ति करावी.

चातुर्मास्यव्रतसमाप्तीच्या वेळीं जीं दानें करावीं तीं अशीं:-

नक्त केलें असल्यास दोन वस्त्रें द्यावींत; एकान्तर उपास केला असल्यास गाय द्यावी; जमिनीवर निजणें केलें असल्यास अंथरूण द्यावें; सहाव्या वेळीं जेवण केलें असल्यास गाय द्यावी; तांदूळ, गहूं वगैरे धान्यें सोडलीं असल्यास जें जें सोडलें असेल तें तें सोन्याचें करून द्यावें; कृच्छ्रव्रत केलें असल्यास दोन गाई द्याव्या. शाकाव्रताला गाय द्यावी; दूधभात खाणें किंवा दूध हीं सोडलीं असल्यास गाय द्यावी; मध, दहीं, व तूप हीं सोडलीं असल्यास वस्त्र व गाय हीं द्यावींत; ब्रह्मचर्यपालनास सोनें द्यावें. तांदूळ सोडल्यास दोन वस्त्रें द्यावींत. मौनव्रतास घंटा; रांगोळी काढण्यास गाय व सोन्याचें कमळ; दिवा लावण्यास दिवा व दोन वस्त्रें; जमिनीवर जेवण केल्यास काशाचें भांडें व गाय; गोग्रासास गाय व बैल. शंभर प्रदक्षिणांस वस्त्र; अभ्यंग सोडल्यास तेलानें भरलेला घट; नखें व केंस वाढविल्यास मध, तूप आणि सोनें हीं द्यावींत. ज्या बाबतींत विशेष दान सांगितलें नाहीं अशांसाठीं सोनें व गाय यांचें दान करावें. गूळ सोडला असल्यास, गुळानें भरलेलें तांब्याचें भांडें व सोनें; मीठ सोडलें असल्यास

मिठानें भरलेलें तांब्याचें भांडें द्यावें असें क्वचित् सांगितलें आहे. आषाढी पौर्णिमा वगैरे तिथींवर लक्ष प्रदक्षिणा, लक्ष नमस्कार वगैरे व्रतांची सुरवात केली असल्यास त्यांचें उद्यापनही याच (कार्तिकी पौर्णिमा) तिथीला करावें. याचप्रमाणें तुळशींच्या लाखोलीचाही कार्तिक किंवा माघ या महिन्यांत आरंभ करून, रोज हजार तुळशीपत्रें वाहावींत, व लक्ष झाल्यावर माघी अथवा वैशाखी पौर्णिमेला त्याचें उद्यापन करावें. फुलें वगैरेंच्या लाखोल्यांसंबंधानेंही हेंच निर्णित समजावें. बेलाची लाखोली वाहिल्यानें संपत्ति; दूर्वांच्या लाखोलीनें अरिष्टनाश; चांफ्याच्या फुलांच्या लाखोलीनें आयुष्यवृद्धि; अतसीच्या ( जवस ) फुलांच्या लाखोलीनें विद्या; तुळशीच्या पानांच्या लाखोलीनें विष्णूचा आशीर्वाद; गहूं, तांदूळ वगैरे चांगल्या धान्यांच्या लक्षानें दुःस्वप्ननाश; अशीं फळें मिळतात. सर्व फुलांनीं सर्व मनोरथ सिद्धीस जातात. हें लाखोलीचें व्रत देखील तीन महिनेपर्यंत करून माघांत किंवा वैशाखांत संपूर्ण करावें. पहिल्यापेक्षां दुसरें असे हे महिने उत्तरोत्तर प्रशस्त होत. धारणा व पारणा यांचेंही व्रत याप्रमाणेंच पौर्णिमेला उजवावें. कार्तिकमासव्रतें व एक महिना उपास करण्याचें व्रत हीं द्वादशी-लाच पुरीं करावींत. त्या तिथीला समाप्ति करणें अशक्य असल्यास ती पौर्णिमेला करावी. याचप्रमाणें गोपद्मव्रताची आषाढ शुद्ध एकादशीला सुरवात करून दररोज तेहतीस गोपद्में काढावींत व त्यांची गंधपुष्पादिकांनीं पूजा करून, तितकेच अर्घ्य, प्रदक्षिणा व नमस्कार हीं करावींत आणि कार्तिक शुद्ध द्वादशीला तेहेतीस अपूपांचें ( मोदक, घारगे, कडबू वगैरे ) वाण द्यावें. असें पांच वर्षें केल्यावर त्याचें उद्यापन करावें. लक्ष प्रदक्षिणा वगैरे गोपद्मापर्यंतच्या सर्व व्रतांच्या उद्यापनांचे विधि कौस्तुभांत पहावेत. कार्तिकी पुनवेला जर कृत्तिकायोग येईल, तर तो महापुण्यकारक आहे, आणि रोहिणीयोग असल्यास तिला महाकार्तिकी म्हणतात. कार्तिकी पुनवेला कृत्तिका-योग असतां, जो कोणी कार्तिकस्वामीचें दर्शन घेतो, तो सात जन्मपर्यंत धनाढ्य, वेदपारग आणि ब्राह्मण बनतो. विशाखा नक्षत्रीं सूर्य असतांना ज्या तिथीला कृत्तिका हें चंद्रनक्षत्र येतें ती तिथि पद्मयोगाची असते. हा योग पुष्करतीर्थासंबधानें फार चांगला आहे.

**अस्यामेवत्रिपुराख्यदीपदानमुक्तम् कार्तिकेपौर्णमास्यांकाम्यवृषोत्सर्गोऽतिप्रशस्तः एवंगजाश्वरथघृतधन्वादिमहादानमपिप्रशस्तम् वृषोत्सर्गस्याश्विनीपौर्णमासीग्रहणद्वयमयनद्वयंविषुवद्वयंचेतिकालान्तराणि अन्यत्रमाघीचैत्रीवैशाखीफाल्गुन्याषाढीचेतिपौर्णमास्योरेवतीनक्षत्रंवैधृतिव्यतीपातौयुगादिमन्वादिसूर्यसंक्रान्तिपितृक्षयाहाष्टकाअपिकालाउक्ताः अत्रवृषोत्सर्गप्रयोगोऽतिविस्तृतोनानाशाखाभेदाभिन्नःकौस्तुभेद्रष्टव्यः ।**

**त्रिपुरदीप**—याच पुनवेला त्रिपुरदीप लावावेत. या तिथीवर काम्यवृषोत्सर्ग करणें फार उत्तम होय. त्याचप्रमाणें हत्ती, घोडा, रथ, तूप, गाय वगैरे महादानें करणेंही चांगलें. आश्विनी पुनव, सूर्यग्रहण, कर्कसंक्रांत व मकरसंक्रांत हेही काळ वृषोत्सर्गासाठीं आहेत. माघ, चैत्र, वैशाख, फाल्गुन व आषाढ यांतील पौर्णिमा,

रेवती नक्षत्र, वैधृति, व्यतीपात, युगादि, मन्वादि, सूर्यसंक्रांत, बापाची मृत्युतिथि व अष्टकाश्राद्धांचे दिवस (पुढें मार्गशीर्षांत सांगितलेले) हे कालसुद्धां वृषोत्सर्गाला दुसऱ्या ग्रंथांत सांगितले आहेत. या वृषोत्सर्गासंबंधानें निरनिराळ्या शाखांना भिन्नपणें उपयोगीं पडणारे प्रयोग कौस्तुभांत जे सांगितले आहेत, ते पाहावे.

कार्तिककृष्णाष्टमीकालाष्टमी इयंपूर्णिमान्तमासपक्षेमार्गशीर्षेकृष्णाष्टमीत्युच्यते सेयंमध्याह्नव्यापिनीग्राह्या दिनद्वयेमध्याह्नव्याप्तौपूर्वैवेतिसिन्धौस्थितम् प्रदोषव्यापिनीतिकौस्तुभे उभयदिनेप्रदोषव्याप्तौतदेकदेशस्पर्शेवापरैव यदा पूर्वत्रप्रदोषव्याप्तिरेवपरत्रमध्याह्नव्याप्तिरेवतदाबहुशिष्टाचारानुरोधात्प्रदोषव्याप्त्यैवनिर्णयोनमध्याह्नव्याप्तेतिभाति अत्रकालभैरवपूजांकृत्वात्रयोऽर्घ्यादेयाः उपवासोजागरश्चकार्यः इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारकार्तिकमासकृत्यनिर्णयोद्देशःसमाप्तः ॥

**कालाष्टमी**—कार्तिक वद्य अष्टमीला कालाष्टमी असें म्हणतात. (ज्या ठिकाणीं वद्य प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत महिना मोजण्याची पद्धति आहे तेथें आधीं कृष्णपक्ष येतो म्हणून) पौर्णिमांतमासाच्या दृष्टीनें ही कार्तिक वद्य अष्टमी होते. ही माध्याह्नव्यापिनी घ्यावी. दोन दिवस जर माध्याह्नव्याप्ति असेल, तर पहिल्याच दिवसाची घ्यावी असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे व प्रदोषव्यापिनी घ्यावी असें कौस्तुभांत म्हटलें आहे. दोन दिवस जर प्रदोषव्यापिनी असेल अथवा प्रदोषकालाचा कांहीं भाग जर व्याप्ति असेल, तर दुसऱ्याच दिवसाची घ्यावी. ज्यावेळीं पहिल्या दिवशीं फक्त प्रदोषव्याप्ति असून दुसऱ्या दिवशीं मध्याह्नव्याप्ति असेल, त्यावेळीं बऱ्याच शिष्टाचाराच्या अनुरोधानें प्रदोषव्याप्तीचीच वेळ घ्यावी आणि मध्यान्हव्याप्तीची घेऊं नये असें मला वाटतें. या तिथीला काळभैरवाची पूजा करून त्याला तीन अर्घ्य द्यावे, आणि उपास व जागरण हीं करावींत. याप्रमाणें अनन्तोपाध्यायांचे पुत्र काशीनाथोपाध्याय ह्यांनीं रचिलेल्या धर्मसिंधुसारांतल्या कार्तिक महिन्याच्या कृत्यांचा उद्देश येथें संपला.

अथमार्गशीर्षमासः धनुःसंक्रान्तौपराःषोडशनाड्यःपुण्याः अन्यत्प्रागुक्तम् मार्गशीर्षशुक्लपञ्चम्यांनागपूजादाक्षिणात्यानांप्रसिद्धा इयंषष्ठीयुताग्राह्येत्यादि विशेषःप्रथमपरिच्छेदेउक्तः।

**मार्गशीर्षांतील कृत्यें**—धनुसंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटका पुण्यकाळ. इतर निर्णय पूर्वीं सांगितलाच आहे. मार्गशीर्ष शुद्ध पंचमीला नागपूजा करावी. ही पूजा नर्मदेच्या खालच्या प्रदेशांतल्या लोकांत प्रसिद्ध आहे. ही पंचमी षष्ठीयुक्त घ्यावी वगैरे जो निर्णय तो पहिल्या परिच्छेदांत सांगितला आहे.

मार्गशीर्षशुक्लषष्ठीचंपाषष्ठीमहाराष्ट्रेषुप्रसिद्धा अत्रतिथिद्वैधेयस्मिन्दिनेरविवारभौमवारशततारकावैधृतीनांमध्येऽधिकैर्योगः सापूर्वापरावामुहूर्तत्रयव्यापिनीग्राह्या दिनद्वयेपियोगाभावेपरैवत्रिमुहूर्ताग्राह्या इयमेवस्कन्दषष्ठीसापूर्वा

ग्राह्या अथ सप्तम्यांसूर्यव्रतंतद्विधिः कौस्तुभे मृगयुतायांपौर्णमास्यांलवणदाने सुन्दररूपता ।

**चंपाषष्ठी**---मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी ही तिथि महाराष्ट्रांत चंपाषष्ठी या नांवानें प्रसिद्ध आहे. ही तिथि जर दोन दिवस असेल तर, रविवार, मंगळवार, शततारका आणि वैधृति यांतून जितके अधिक योग असतील ती पहिल्या दिवसाची अथवा दुसऱ्या दिवसाची, सहा घटका असणारी घ्यावी. दोन्ही दिवशीं योग नसल्यास दुसऱ्या दिवसाची सहा घटका व्यापिनी असणारी घ्यावी. हिलाच स्कंदषष्ठी असें म्हणतात. ती पूर्वविद्धा घ्यावी. मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीला सूर्यव्रत करावें. त्याचा विधि कौस्तुभांत पाहावा. मृगनक्षत्र असणाऱ्या मार्गशीर्ष पुनवेला मीठ दान दिलें असतां सुंदर रूप मिळतें.

मार्गशीर्षपौर्णिमास्यांदत्तात्रेयोत्पत्तिःइयंप्रदोषव्यापिनीग्राह्या मार्गशीर्षशुक्लचतुर्दश्यांपौर्णमास्यांवाप्रदोषे आश्वलायनैःप्रत्यवरोहणंकार्यम् तत्रकर्मकालव्यापिनीतिथिःतत्प्रयोगःप्रयोगरत्नकौस्तुभादौज्ञेयः मार्गशीर्षादिमासचतुष्टयस्यकृष्णाष्टमीष्वष्टकाश्राद्धानि तत्पूर्वसप्तमीषुपूर्वेद्युःश्राद्धानि तदुत्तरनवमीषु चान्वष्टक्यश्राद्धानि कर्तव्यानि एवंभाद्रकृष्णपक्षेपिअष्टकादिश्राद्धानिकार्याणीतिपञ्चाष्टकापक्षआश्वलायनभिन्नशाखिनाम् आश्वलायनानांतुमार्गादि चतुरष्टकापक्षएव भाद्रपदकृष्णाष्टम्यांतु माध्यावर्षश्राद्धंकरिष्ये इतिसंकल्प्य सर्वमष्टकाश्राद्धवत्कार्यम् सप्तम्यांतुमाध्यावर्षश्राद्धंकर्तुंपूर्वेद्युःश्राद्धंकरिष्यइति संकल्पः नवम्यामन्वष्टकाश्राद्धंकरिष्यइतिसंकल्पइतिविशेषः एवंभाद्रकृष्णाष्टमीश्राद्धस्य माध्यावर्षसंज्ञकत्वादाश्वलायनानांचतुरष्टकापक्षः अन्यशाखिनांपौषादित्र्यष्टकापक्षोऽपि एवंसर्वाअष्टकाःकर्तुमशक्तेनएकैवाष्टकाकार्यासाचमाघपौर्णमास्यनन्तरकृष्णपक्षस्यसप्तम्यामष्टम्यांनवम्यामितिदिनत्रयेकार्या दिनत्रयेश्राद्धत्रयंकर्तुमशक्तेनमाघकृष्णेऽष्टमीश्राद्धमेवकार्यम् तत्राष्टकाश्राद्धेऽपराह्णव्यापिन्यष्टमीग्राह्या दिनद्वयेव्याप्त्यव्याप्त्यादौदर्शवन्निर्णयः अष्टम्यनुरोधेनपूर्वपरादिनयोःपूर्वेद्युःश्राद्धान्वष्टक्यश्राद्धेकार्येनतुसप्तम्यादेरपराह्णव्याप्तिरपेक्षणीया एकदिनेप्यशक्तस्यप्रत्याम्नायाः अनडुहोयवसमाहरेत्अग्निनावाकक्षंदहेदपिवानूचानेभ्यउदकुम्भमाहरेदपिवाश्राद्धमंत्रानधीयीतेतिक्वचिदुपवासोऽप्युक्तः एवंश्रवणाकर्मादिपाकसंस्थालोपेप्रतिपाकयज्ञंप्राजापत्यकृच्छ्रंप्रायश्चित्तमुक्तम् मलमासेऽष्टकाश्राद्धानिनकार्याणीतिनारायणवृत्तिः अष्टकादिश्राद्धत्रयप्रयोगः कौस्तुभप्रयोगरत्नादौ अत्राष्टमीश्राद्धेकामकालसंज्ञकौविश्वेदेवौ सप्तमीनवम्योस्तुपुरूरवार्द्रवाविति आहिताग्नेः पूर्वेद्युः श्राद्धाङ्गहोमोऽष्टकाङ्गहोमोन्वष्टकाग्नौकरणहोमोदिनत्रयेहविः श्रपणंचदाक्षिणाग्नौभवतीतिविशेषः शेषमनाहिताग्निवत् अष्टकालोपेप्राजापत्यमुपवासोवाप्रायश्चित्तम् अन्वष्टक्यलोपेतद्दिनेशतवारमेभिर्द्युभिःसुमनाइतिमन्त्रजपः ।

**दत्तजयंति**—मार्गशीर्षातल्या पौर्णिमेला दत्ताचा जन्म झाला. ही पौर्णिमा प्रदोषव्यापिनी घ्यावी. मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशी किंवा पौर्णिमा या तिथींवर आश्वलायनांनीं प्रदोषकाळीं जें प्रत्यवरोहण करावें, त्याला कर्मकालव्यापिनी ( म्हणजे प्रदोषव्यापिनी ) तिथि घ्यावी. या कर्माचा प्रयोग, प्रयोग-रत्न, कौस्तुभ वगैरे ग्रंथांत पहावा. मार्गशीर्षादि चार महिन्यांतल्या कृष्णाष्टम्यांना अष्टकाश्राद्धें, त्यांच्या आधींच्या सप्तम्यांना पूर्वेद्युः श्राद्धें व पुढच्या नवम्यांना अन्वष्टक्य श्राद्धें करावींत. याप्रमाणें भाद्रपदाच्या कृष्णपक्षांतही अष्टकाश्राद्धें करावींत. आश्वलायनांहून जे इतर शाखांचे असतील त्यांनीं, याप्रमाणें पांच अष्टकाश्राद्धांचा विधि करावा. आश्वलायनांनीं मार्गशीर्षादि चारच अष्टका कराव्या. भाद्रपदांतल्या कृष्णाष्टमीला 'माध्यावर्षश्राद्धं कर्तुं पूर्वेद्युः श्राद्धं करिष्ये' असा संकल्प करावा व नवमीला 'अन्वष्टकश्राद्धं करिष्ये' असा संकल्प करावा, हा यांतला विशेष आहे. याप्रमाणेंच भाद्रपदांतल्या कृष्णाष्टमीच्या श्राद्धाला 'माध्या वर्ष' असें म्हणतात म्हणून आश्वलायनांचा चारच अष्टकांचा पक्ष समजावा आणि इतर शाखीयांनीं पौषादि तीनच अष्टकांचा सुद्धां पक्ष समजावा. याप्रमाणें साऱ्या अष्टका करण्यास असमर्थ असणाऱ्यानें एकच अष्टकाश्राद्ध करावें. हें जें एकच श्राद्ध माघी पुनवेनंतरच्या सप्तमी, अष्टमी व नवमी या तीन तिथींवर करण्याचें ज्याचें सामर्थ्य नसेल त्यानें, तें श्राद्ध माघांतल्या कृष्णाष्टमीला करावें. ह्या अष्टकाश्राद्धाकरितां अपराह्णव्यापिनी अष्टमी घ्यावी. अपराह्णव्याप्ति जर दोन दिवस असली तर किंवा दोन्ही दिवशीं नसली तर, त्याचा निर्णय वर्षश्राद्धाप्रमाणेंच समजावा. अष्टमीच्या अनुरोधानें पहिल्या व पुढच्या दिवशीं पूर्वेद्युःश्राद्ध व अन्वष्टक श्राद्ध हीं अनुक्रमें करावींत. या बाबतींत सप्तमी वगैरे तिथींनाही अपराह्णव्याप्ति पाहाण्याचें कारण नाहीं. ज्याला एक दिवसही श्राद्ध करण्याची ऐपत नसेल अशाच्याकरतां जे गौणपक्ष सांगितले आहेत, ते येणेंप्रमाणें:—बैलाला गवत घालावें, अग्नींत पांढरीं गवतें जाळावींत, गुरूपाशीं सांग वेदाध्ययन केलेल्यांना उदकुंभ द्यावा, अथवा श्राद्धाचे मंत्र म्हणावेत. उपास करावा असेंही कांहीं ग्रंथांत सांगितलें आहे. श्रवणाकर्म वगैरे पाकसंस्थांचा जर लोप झाला असेल तर प्रत्येक पाकयज्ञाबद्दल प्राजापत्य कृच्छ्र प्रायश्चित्त करावें असें सांगितलें आहे. अष्टक श्राद्धें अधिक मासांत करूं नयेत, असें नारायणवृत्तींत म्हटलें आहे. अष्टकादि तीन श्राद्धांचा प्रयोग, कौस्तुभांत आणि प्रयोगरत्न या ग्रंथांत असा सांगितला आहे कीं, या अष्टमीच्या श्राद्धांत कामकाल नांवाचे विश्वेदेव आणि सप्तमी व नवमी यांवर करण्याच्या श्राद्धांत पुरूरवार्द्रसंज्ञक हे घ्यावेत. आहिताग्नि पूर्वेद्युःश्राद्धाचा अंगभूत आहे. अन्वष्टकाश्राद्धाचा अग्नौकरणहोम आणि तीन दिवसपर्यंत हवींचें श्रपण (शिजविणें) हीं दक्षिणाग्नींत करावींत. असा याचा विशेष आहे. बाकीचें कर्म गृह्याग्नीप्रमाणें करावें. अष्टकाश्राद्धाचा जर लोप होईल तर प्राजापत्य अथवा उपास हीं प्रायश्चित्तें करावींत. अन्वष्टक्य श्राद्धाचा लोप झाल्यास, त्या दिवशीं 'एतद्भिः सुमना०' या मंत्राचा शंभर वेळ जप करावा.

मार्गशीर्षादिरविवारेषुकाम्यंसौरव्रतमुक्तम् तत्रभक्ष्याणि मार्गेतुलसीपत्रत्रयम् पौषेत्रिपलंघृतम् माघेतिलानांमुष्टित्रयम् फाल्गुनेत्रिपलंदधि चैत्रेत्रिपलंदुग्धम् वैशाखेगोमयम् ज्येष्ठेतोयाञ्जलित्रयम् आषाढेमरीचकत्रयम् श्रावणेत्रिपलाः सक्तवः भाद्रेगोमूत्रम् आश्विनेशर्करा कार्तिकेसद्धविरिति इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेमार्गशीर्षमासकृत्यनिर्णयोद्देशःसमाप्तः ॥

**सौरव्रत**—मार्गशीर्षापासून आरंभ करून दर रविवारीं सौरव्रत ( सूर्याचें ) करावें. हें व्रत काम्य आहे. या व्रतांत जे पदार्थ खायचे ते येणेंप्रमाणें:—मार्गशीर्षांतल्या दर रविवारीं तुळशीचीं तीन पानें, पौषांत तीन पलें ( १ पल=४० मासे ) तूप, माघांत तीन मुठी तीळ, फाल्गुनांत तीन पलें दहीं, चैत्रांत तीन पलें दूध, वैशाखांत शेण, ज्येष्ठांत तीन ओंजळी पाणी, आषाढांत तीन मिरीं, श्रावणांत तीन पलें सातूचें पीठ, भाद्रपदांत गोमूत्र, आश्विनांत साखर आणि कार्तिकांत शुद्ध हवि ( भात ). याप्रमाणें अनन्तोपाध्यायांचे पुत्र जे काशीनाथोपाध्याय त्यांनीं रचिलेल्या धर्मसिन्धुसारांतल्या मार्गशीर्ष महिन्यांतल्या कृत्यांचा निर्णय येथें संपला.

अथपौषः दिवामकरसंक्रमेसंक्रान्त्यनन्तरंचत्वारिंशन्नाड्यःपुण्याः घटिकाद्यल्पदिनशेषेमकरसंक्रांतौसंक्रान्त्यासन्नपूर्वकालेदिवैवस्नानश्राद्धदानभोजनानिकार्याणि रात्रौश्राद्धदानादेर्निषेधात्स्वल्पदिनभागेस्नानश्राद्धस्वभोजनादेःकर्तुमशक्यत्वाद्रात्रौभोजननिषेधात्पुत्रवद्गृहिणउपवासनिषेधाच्च तस्मादीदृशेविषयेपरपुण्यकालत्वंबाधित्वामकरसंक्रान्तेःपूर्वभागएवपुण्यत्वंज्ञेयम् रात्रौपूर्वभागेपरभागेनिशीथेवामकरसंक्रमेउत्तरदिनंपुण्यम् तत्राप्युत्तरदिनपूर्वार्धंपुण्यतरम् तत्रापिसूर्योदयोत्तरंपञ्चनाड्यःपुण्यतमाः एवंरात्रिसंक्रान्तिविषयेऽन्यत्रापियत्रपूर्वदिनोत्तरार्धस्यपुण्यत्वंतत्रदिनान्तेपञ्चनाडीनांपुण्यतमत्वम् यत्रोत्तरदिनपूर्वार्धस्यपुण्यत्वंतत्रोदयोत्तरंपञ्चनाडीनांपुण्यतमत्वम् एवंदिवासंक्रमेपिसंक्रान्तिसन्निहितनाडीनांमकरादिषूत्तरासांकर्कादिषुपूर्वासांपुण्यतमत्वंज्ञेयम् यायाः सन्निहितनाड्यस्तास्ताःपुण्यतमाःस्मृताइत्युक्तेः मुहूर्तचिन्तामण्यादौतुसूर्यास्तादूर्ध्वंघटीत्रयं संध्याकालस्तत्रमकरसंक्रमेपरदिनेपुण्यत्वंबाधित्वापूर्वदिनेपुण्यत्वमुक्तंनेदंसर्वत्रधर्मशास्त्रग्रन्थेषुदृश्यते शुक्लपक्षेतुसप्तम्यांसंक्रान्तिर्ग्रहणाधिका अत्रकृत्यम् रविसंक्रमणेप्राप्तेनस्नायाद्यस्तुमानवः। सप्तजन्मनिरोगीस्यान्निर्धनश्चैवजायते १ इतिवचनान्मनुष्यमात्रास्यस्नानंनित्यम् एवंश्राद्धमप्यधिकारिणोनित्यम् तच्चापिण्डकम् संक्रान्तौयानिदत्तानिहव्यकव्यानिदातृभिः। तानिनित्यंददात्यर्कःपुनर्जन्मनिजन्मनि १ अयनसंक्रान्तौत्रिदिनमुपवासः यद्वासंक्रान्तिमत्यहोरात्रेपुण्यकालवत्यहोरात्रेवोपवासंकृत्वोक्तपुण्यकालेस्नानदानादिकार्यम् अयमुपवासःसापत्यगृहस्थेननकार्यः धेनुंतिलमयींराजन्दद्याच्चैवोत्तरायणे। तिलतैलेनदीपाश्चदेयाःशिवगृहेशुभाः १ सतिलैस्तण्डुलैश्चैवपूजयेद्विधिवाच्छिवम्। तस्यांकृष्णातिलैःस्नानंकार्यंचोद्वर्तनंतिलैः २ तिलादेयाश्चहोत-

ण्याभक्ष्याश्चैवोत्तरायणे । शुक्लतिलैर्देवादितर्पणंकृष्णतिलैः पितृतर्पणंचकार्यम्
अत्रशम्भौघृताभिषेकोमहाफलःअत्रसुवर्णयुततिलताम्रपात्रंदेयं तत्प्रयोगोवक्ष्य-
ते अत्रैवंशिवपूजाव्रतम् पूर्वदिनेउपोष्यसंक्रान्तिदिनेतिलोद्वर्तनतिलस्नानतिल-
तर्पणानिकृत्वाशिवंगव्येनाज्येनमर्दयित्वाशुद्धोदकेनप्रक्षाल्यवस्त्राद्युपचारैःपूज-
यित्वा सुवर्णहीरकनीलपद्मरागमौक्तिकमितिपञ्चरत्नानिकर्षार्धसुवर्णवासमर्प्य-
तिलदीपैःससुवर्णैःसाक्षतैस्तिलैःसंपूज्यघृतकम्बलंदत्त्वावितानचामरैसमर्प्यविप्रे-
भ्यः ससुवर्णतिलान्दत्त्वातिलान्हुत्वाविप्रान्यतींश्चसंभोज्यदक्षिणांदत्त्वासतिलं-
पञ्चगव्यंपीत्वापारणंकुर्यादिति अत्र वस्त्रदानंमहाफलम् तिलपूर्वमनड्वाहं-
दत्त्वारोगैः प्रमुच्यते । अत्रक्षीरेणभास्करंस्नापयेत्सूर्यलोकप्राप्तिः दिवाविषुवाय-
नसंक्रान्तौतास्मिन्दिनेपूर्वरात्रौआगामिरात्रौचानध्यायः रात्रौतत्संक्रमेतस्यांरात्रौ
पूर्वदिवसेआगामिदिवसेचेतिपक्षिणीअनध्यायः अत्ररात्रौसंक्रमेग्रहणवद्रात्रा-
वेवस्नानदानादीतिपक्षःकैश्चिल्लिखितोनसर्वशिष्टसंमतः अयनदिनंतत्परं करि-
संज्ञकंचदिनंशुभेषुवर्ज्यमित्युक्तम् तत्रार्धरात्रादर्वागयनसंक्रान्तौतद्दिनं तत्पर-
दिनंचवर्ज्यम् निशीथात्परत्रनिशीथेवासंक्रान्तौपरंतत्परंचवर्ज्यमितिभातिएवं-
ग्रहणेप्यूह्यम् ।

**पौषमासांतलीं कृत्यें**— मकर संक्रांत जर दिवसास असेल, तर संक्रांतीनंतरच्या चाळीस घटका तिचा पुण्यकाळ असतो. एक घटका वगैरे अल्पकाळ होय. दिवस संपण्याच्या वेळीं जर संक्रमण होईल, तर संक्रांतीच्या जवळच्या अशा आधींच्या वेळीं दिवसासच–स्नान, श्राद्ध, जेवण–हीं करावींत, कारण रात्रीं श्राद्ध व दान यांचा निषेध सांगितला आहे. अल्पदिवसांत श्राद्ध, दान व जेवण हीं करणें अशक्य असतें. रात्रीं भोजनाचा निषेध आहे, आणि या संक्रांतीला पुत्रवान् अशा गृहस्थाश्रम्याला उपासाचा निषेध सांगितला आहे, यास्तव अशा प्रसंगीं पुढचा पुण्यकाळ बाधित करून, मकरसंक्रांतीच्या अगोदरच पुण्यकाळ धरावा. रात्रींच्या पूर्वभागीं, उत्तरभागीं अथवा (मध्यरात्रीं) जर मकरसंक्रमण होत असेल, तर दुसऱ्या दिवशीं जरी पुण्यकाळ असतो, तरी त्या दुसऱ्या दिवसाचा पूर्वार्ध जास्त पुण्यकारक असतो. व त्यापेक्षांही अधिक पुण्यकारक असा सूर्योदयानंतरच्या पांच घटकांचा काळ असतो. याप्रमाणेंच रात्रीं संक्रमण होत असल्यास इतर संक्रमणांचेंही जाणावें. जेथें पूर्व दिवशींच्या उत्तरार्धांत पुण्यकाळ असेल, तेथें दिवसाच्या शेवटच्या भागाच्या पांच घटका अति पुण्यकारक असतात, आणि ज्यावेळीं दुसऱ्या दिवशीं पूर्वार्धीं पुण्यकाळ असेल, त्यावेळीं सूर्योदयानंतरचा पांच घटकांचा काळ फारच पुण्यकारक असतो— असें समजावें. याप्रमाणें दिवसास संक्रमण असतांहि मकरापासून मिथुनापर्यंतच्या संक्रमणांत, संक्रमणाच्या पुढच्या घटका पुण्यकाळ व कर्कापासून धनुपर्यंतच्या संक्र-मणांत आधींच्या घटका पुण्यकाळ असतो, असें समजावें. संक्रमणाच्या जितक्या जितक्या जवळच्या घटका, तितक्या तितक्या अधिक पुण्यकारक असतात, असें वचन आहे. सूर्यास्तानंतरचा तीन घटकांचा जो संध्याकाळ, त्याकाळीं जर मकर संक्रमण

झालें, तर दुसऱ्या दिवसाचें पुण्यत्व बाधित असल्यामुळें, पूर्वदिवशींच पुण्यत्व समजावें, असें जरी पुरुषार्थचिन्तामणींत सांगितलें आहे, तरी ही गोष्ट धर्मशास्त्राच्या सर्व ग्रंथांत सांगितलेली नाहीं. 'शुद्धपक्षांतल्या सप्तमीला कोणतीही जरी सूर्यक्रान्ति होत असली, तरी ती ग्रहणापेक्षां अधिक होय.' या संक्रांतीला जें कर्म करायचें तें येणेंप्रमाणें:—रविसंक्रमणाचें जो कोणी स्नान करीत नाहीं, तो सात जन्मपर्यंत रोगी व दरिद्री होतो असें वचन आहे म्हणून या दिवशींचें स्नान अवश्य आहे. तसेंच अधिकारपरत्वें श्राद्ध करणेंही अवश्य असल्याचें सांगितलें आहे. हें श्राद्ध अपिण्डक करावें. हव्यकव्यदानादि जर संक्रांतीला केलीं, तर सूर्य तीं करणाराला जन्मोजन्मीं तीं देतो. या संक्रांतीला उत्तरायण सुरू होत असल्यानें ही एक अयनक्रांतीच आहे; यास्तव, तीन दिवस उपवास करावा, किंवा ज्या अहोरात्रांत संक्रान्ति असेल, किंवा ज्या अहोरात्रांत पुण्यकाळ असेल त्या अहोरात्रांत उपास करून, पुण्यकाळीं—स्नान, दान वगैरे करावींत. हा उपास अपत्यवान् पुरुषानें करूं नये. हे राजन्, उत्तरायणांत तिळांची गाय करून तिचें दान करावें. व शिवालयांत तिळेलाचे दिवे लावावेत. तिळ व तांदूळ यांनीं शिवाची विधिपूर्वक पूजा करावी. या दिवशीं काळे तीळ अंगाला लावून, आंत तीळ टाकलेल्या पाण्यानें स्नान करावें. तिळाचें दान, हवन व भोजन हीं करावींत. पांढऱ्या तिळांनीं देवादिकांचें तर्पण करून काळ्यांनीं पितृतर्पण करावें. या दिवशीं शिवाला जर तुपाचा अभिषेक केला, तर त्याचें मोठें फळ मिळतें. या दिवशीं तिळानें भरलेलें तांब्याचें भांडें सुवर्णासह जें दान करावें, त्याचा प्रयोग पुढें सांगेन. या दिवशीं शिवपूजाव्रत करावें, आदल्या दिवशीं उपास करून संक्रमणाच्या दिवशीं तिलोद्वर्तन, तिलस्नान व तिलतर्पण हीं करावींत, व गाईच्या तुपानें शिवाचें मर्दन करावें, आणि शुद्धोदकानें धुऊन वस्त्रादि उपचारांनीं पूजा केल्यावर सोनें, हिरा नीळ, पद्मराग व मोतीं, अशीं पांच रत्नें किंवा आठ मासे सोनें (शिवाला) अर्पण केल्यावर तिळाचे दिवे, सोनें, अक्षता व तीळ यांनीं पूजा करावी. तूप, कांबळा, चांदवा व चवरी हीं नंतर (शिवाला) अर्पण केल्यावर, ब्राह्मणाला सुवर्णासह तीळ द्यावेत. तिळांचा होम केल्यावर ब्राह्मण व संन्यासी यांना जेवूं घालून दक्षिणा द्यावी. व नंतर आपण तिलमिश्रित पंचगव्य घेऊन पारणें करावें. या दिवशीं वस्त्रदान केल्यास मोठें फळ मिळतें. तिळांसह बैल दान दिल्यास सर्व रोगांपासून मुक्तता होते. या दिवशीं सूर्याला जर दुधाचा अभिषेक केला, तर सूर्यलोक मिळतो. विषुव (मेष व तुला) आणि अयन (कर्क व मकर) या संक्रांति जर दिवसास येतील, तर त्यांच्या आदल्या व पुढच्या दिवशीं जसा अनध्याय असतो, तद्वतच या संक्रांति जर रात्रीं येतील, तर त्या संक्रमणाच्या रात्रीं, त्या रात्रीच्या आदल्या दिवशीं व पुढच्या दिवशीं अनध्याय असतो. संक्रमण जर रात्रीं होत असेल, तर ग्रहणांत रात्रीं स्नान, दान वगैरे करावींत असें जरी कित्येकांनीं लिहिलें आहे, तरी तें सर्वशिष्टसंमत नाहीं. अयनादिवस व त्याच्या पुढचे करीचे दिवस

हे शुभ कार्यांना वर्ज्य करण्यास सांगितलें आहे. अर्धरात्रीच्या आधीं जर अयन-संक्रमण होत असेल, तर तो व त्याच्या पुढचा दिवस वर्ज्य करावेत. मध्यरात्रीं अथवा मध्यरात्रीनंतर जर अयनसंक्रांत असेल तर तिच्या पुढचे दोन दिवस वर्ज्य करावेत असें मला वाटतें. ग्रहणाचाही निर्णय असाच समजावा.

पौषशुक्लैकादशी मन्वादिः तन्निर्णयः प्रागुक्तः ।

**पौषशुद्ध एकादशी**—ही मन्वादि तिथि आहे व तिचा निर्णय पूर्वी सांगितलाच आहे.

अथमाघस्नानम् तत्रपौषस्यशुक्लैकादश्यांपौर्णमास्याममावास्यायांवामाघ-स्नानारम्भः माघेद्वादशीपूर्णिमादौसमापनम् यद्वामकरसंक्रमणप्रभृतिकुम्भसंक्र-मणपर्यन्तंस्नानंकार्यम् । अथस्नानकालः अरुणोदयमारभ्यप्रातःकालावधिः उत्त-मंतुसनक्षत्रंलुप्ततारंचमध्यमम् । सवितर्युदितेभूपततोहीनंप्रकीर्तितम् १ माघमासे-रटन्त्यापःकिंचिदभ्युदितेरवौ । ब्रह्मघ्नंवासुरापंवाकंपतन्तंपुनीमहे २ अत्राधि-कारिणः ब्रह्मचारीगृहस्थोवावानप्रस्थोऽथभिक्षुकः । बालवृद्धयुवानश्चनरनारी नपुंसकाः १ इति अथजलतारतम्येनफलम् तप्तेनवारिणास्नानंयद्गृहेक्रियते-नरैः । षडब्दफलदंतद्धिमकरस्थेदिवाकरे १ वाप्यादौद्वादशाब्दफलम् तडागे-तद्द्विगुणम् नद्यांतच्चतुर्गुणम् महानद्यांशतगुणम् महानदीसंगमे तच्चतुर्गुणम् गङ्गायांसहस्रगुणम् गङ्गायमुनासंगमेएतच्छतगुणमिति यत्रकुत्रापिस्नाने-प्रयागस्मरणंकार्यम् इदंसमुद्रेप्यतिप्रशस्तम् ।

**माघस्नान**—याचा आरंभ पौषशुद्ध एकादशी, पौर्णिमा किंवा अमावास्या या तिथींपैकीं कोणच्यातरी एकीस करावा. माघ महिन्यांतल्या द्वादशी, पौर्णिमा वगैरे तिथींवर आरंभाच्या अनुक्रमानें समाप्ति करावी; किंवा मकरसंक्रमणा-पासून कुंभसंक्रमणापर्यंत स्नान करावें. स्नानकाल—अरुणोदयाला आरंभ करून, प्रातः-काळीं नक्षत्रें दिसत असत तोंपर्यंतचा काळ उत्तम होय. नक्षत्रें दिसेनाशीं झालीं असतां मध्यमकाळ व सूर्योदयानंतरचा हीन काळ होय. सूर्याचा किंचित् उदय होतो आहे अशा वेळीं माघांत उदकें असें सांगतात कीं, ब्रह्महत्या अथवा सुरापान करणाराला आम्ही पावन करतों. ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, भिक्षुक, बाल, वृद्ध, युवा, नर-नारी व नपुंसक–हीं सर्वजणें माघस्नानाचीं अधिकारी आहेत. या स्नानाचें उद-काच्या मानानें अधिकाधिक फळ आहे. घरांतल्या कढत पाण्यानें स्नान केल्याचें सहा वर्षें फळ मिळतें. विहीर वगैरेंचें स्नान केल्यानें बारा वर्षें फळ मिळतें. तलावादिकांचें स्नान केल्यानें त्याच्या दुप्पट, नदीच्यानें चौपट, गंगेंत केल्यानें बारा वर्षांच्या सहस्र-पट, गंगायमुनांच्या संगमांत केल्यानें गंगेच्या शतपट फळ मिळतें. कोठेंही जरी स्नान केलें, तरी प्रयागाचें स्मरण करावें. माघस्नानाला समुद्रस्नानही सर्वोत्तम होय.

माघमासमिमंपूर्णंस्नास्येहंदेवमाधव । तीर्थस्यास्यजलेनित्यमितिसंकल्प्य चेतसि १ इत्येकतीर्थंपरिगृह्य दुःखदारिद्र्यनाशायश्रीविष्णोस्तोषणायच । प्रातः-

स्नानंकरोम्यद्यमाघेपापविनाशनम् १ मकरस्थेरवौमाघेगोविन्दाच्युत माधव ।
स्नानेनानेनमेदेवयथोक्तफलदोभव २ इमौमन्त्रौसमुच्चार्यस्नायान्मौनसमन्वितः।
प्रत्यहंसूर्यार्घ्यमन्त्रः सवित्रेप्रसवित्रेचपरंधामजलेमम । त्वत्तेजसापरिभ्रष्टंपापं-
यातुसहस्रधा १ इति पितृतर्पणादिनित्यंविधाय माधवंपूजयेत् भूमौशयीतहो-
तव्यमाज्यंतिलसमन्वितम् । हविष्यंब्रह्मचर्यंचमाघमासेमहाफलम् १ अत्रेन्ध-
नकम्बलवस्त्रोपानत्तैलघृततूलपूर्णपटीसुवर्णान्नदानानिमहाफलानि नवह्निंसेवयेत्स्ना-
तोह्यस्नातोपिवरानने । होमार्थंसेवयेद्वह्निंशीतार्थेनकदाचन १ अहन्यहनिदात-
व्यास्तिलाःशर्करयान्विताः। त्रयोभागास्तिलानांचचतुर्थःशर्करायाः अत्राभ्यङ्गो-
वर्ज्यः माघमास्युषसिस्नानंकृत्वादांपत्यमर्चयेत् । माघेयत्नेनसंत्याज्यंमूलकंम-
दिरोपमम् १ पितॄणांदेवतानांचमूलकंनैवदापयेत्। यदामाघोमलमासोभवतितदा
काम्यानांतत्रसमाप्तिनिषेधान्मासद्वयंस्नानं तन्नियमाश्चकर्तव्याःमासोपवासचा-
न्द्रायणादिकंतुमलमासएवसमापयेदित्युक्तम् इदंमाघस्नानंनित्यकाम्योभयरूपम्
मासपर्यन्तस्नानेप्यशक्तस्त्र्यहमेकाहंवास्नायात् तत्राद्यंदिनत्रयमितिकेचित् त्रयो-
दश्यादिदिनत्रयमितिबहुसंमतम् पौषपूर्णिमानन्तरासुअष्टमीसप्तमीनवमीष्वष्ट-
कादिश्राद्धानिप्रागुक्तानिपौषामावास्यायामर्धोदययोगः अमार्कपातश्रवणैर्युक्ता
चेत्पौषमाघयोः । अर्धोदयःसविज्ञेयःकोटिसूर्यग्रहैःसमः १ किंचिन्न्यूनंमहोदय
इतिचतुर्थपादंकेचित्पठन्ति पौषमाघयोर्मध्यवर्तिनीत्यर्थइत्येके अमान्तमासेपौ-
षस्यपूर्णिमान्तमासेमाघस्यचेत्यर्थइत्यपरे सर्वथापौषापौर्णमास्युत्तरामावास्ये-
त्यर्थः दिवैवयोगःशस्तोयंनतुरात्रौकदाचन । अर्धोदयेतुसंप्राप्तेसर्वंगङ्गासमंज-
लम् १ शुद्धात्मानोद्विजाःसर्वेभवेयुर्ब्रह्मसन्निभाः यत्किंचिद्दीयतेदानंतद्दानं मेरु-
सन्निभम् २ ।

**माघस्नानविधि**—देवा, माधवा मी या तीर्थाच्या पाण्यानें सर्व माघ महिना-भर स्नान करीन, असा संकल्प करून कोणचें तरी एखादें तीर्थाचें ठिकाण मनांत ठरवावें आणि 'दुःखदारिद्र्यनाशाय श्रीविष्णोस्तोषणायच । प्रातःस्नानं करोम्यद्य माघे पापविनाशनम् ॥ मकरस्थे रवौ माघे गोविन्दाच्युत-माधव । स्नानेनानेन मे देव यथोक्त फलदो भव ॥' हे श्लोक म्हणून कोणाशीं न बोलतां स्नान करावें. रोज स्नान केल्यावर सूर्याला जें अर्घ्य द्यावें त्याचा मंत्रः—'सवित्रे प्रसवित्रेच परंधाम जले मम। त्वत्तेजसा परिभ्रष्टं पापं यातु सहस्रधा ॥' यानंतर संध्या-पितृतर्पणादि करून, माधवाची पूजा करावी. जमिनीवर निजणें, तिलमिश्रित तुपाचें हवन, हविष्यभक्षण आणि ब्रह्मचर्य या गोष्टी माघ महिन्यांत मोठ्या फलदायक आहेत. तद्वतच इन्धन (सर्पण), लोंकरीचें वस्त्र, उपानह (जोडा वगैरे), तेल तूप, गादी, लेप, सोनें व अन्न यांचीं दानें मोठीं फल देणारीं आहेत. स्नानाच्या आधीं किंवा नंतर विस्तवाजवळ बसूं नये. फक्त होमापुरतेंच अग्नीपाशीं बसावें; मनःशांती-करितां बिलकूल बसूं नये. रोज तीन हिस्से तीळ व एक हिस्सा साखर असें तिलाचें दान द्यावें. माघांत अभ्यंग वर्ज्य करावा. उषःकालीं स्नान करून,

दंपत्याची पूजा करावी. माघांत मुळा खाणें हें दारू पिण्याप्रमाणें असल्यामुळें तो खाऊं नये. पितर अथवा देव यांनाही मुळा अर्पण करूं नये. माघमहिना जेव्हां अधिकाचा येतो तेव्हां, काम्य कर्माची समाप्ति करण्याचा निषेध असल्यानें, दोन महिने स्नान करून त्या संबंधाचे नियम पाळावेत. एक महिनापर्यंत करावयाचीं जीं चांद्रायणादि कर्में, तीं मलमासांतच संपविण्याबद्दल सांगितलेलें आहे. माघस्नान हें नित्य व काम्य असें दोन प्रकारचें आहे. सबंध महिनाभर स्नान करण्याची ज्याला शक्ति नसेल त्यानें तीन दिवस किंवा निदान एक दिवस तरी तें करावें. हें स्नान पहिले तीन दिवसच करावें असें जरी कांहीं ग्रंथकार सांगतात, तरी पण त्रयोदशीपासून तीन दिवस करावें असें अनेक ग्रंथकारांनीं सांगितलें आहे. पौषी पुनवेनंतरच्या सप्तमी, अष्टमी व नवमी या तिथींवर जीं अष्टकाश्राद्धें करावयाचीं त्यांबद्दल मागें सांगितलेंच आहे. पौषी अमावास्येला अर्धोदययोग असतो. पौष व माघ या महिन्यांतल्या अमावास्या जर रविवार, व्यतिपात व श्रवण नक्षत्र यांनीं युक्त असल्या, तर तोच अर्धोदययोग जाणावा. हा योग कोटिसूर्यग्रहणांसमान आहे. यांपैकीं कांहीं योग जर कमी असला, तर महोदययोग होतो, असाही या श्लोकाचा चौथा पाद आहे असें कोणी सांगतात. पौष व माघ यांच्या मधली पुनव, अमान्तमासांतली पौषी अमावास्या व पुनवेनंतरची अमावास्या वगैरे तऱ्हेचा वरच्या श्लोकांतल्या अमावास्येचा जरी अर्थ करतात, तरी पौषी पुनवेनंतरची अमावास्या असाच त्याचा अर्थ सर्वस्वीं समजावा. हा योग दिवसासच प्रशस्त असून, रात्रीं अप्रशस्त होय. अर्धोदययोगांत सर्व जलें गंगेप्रमाणें असून सर्व ब्राह्मण पवित्र व ब्रह्मदेवाप्रमाणें असतात, आणि कोणचेंही केलेलें दान मेरुपर्वताप्रमाणें मोठें होतें.

अथामत्रदानप्रयोगः देशकालौसंकीर्त्यसमुद्रमेखलायाःपृथ्व्याःसम्यग्दानफलकामोहमर्धोदयविहितामत्रदानंकरिष्ये इतिसंकल्प्योपलिप्तेदेशेधौततण्डुलैरष्टदलंकृत्वातत्रचतुःषष्टिपलंचत्वारिंशत्पलंवापञ्चविंशतिपलंवाकांस्यपात्रंकृताग्न्युत्तारणंस्थापयेत् तत्राष्टगुञ्जात्मकोमाषः चत्वारिंशन्माषाःकर्षः पलं कर्षचतुष्टयम् अमरसिंहमतेतु अशीतिगुञ्जात्मकःकर्षःपलंकर्षचतुष्टयम् कांस्यपात्रेपायसंनिक्षिप्यपायसेष्टदलं कृत्वातत्कर्णिकायांकर्षतदर्धतदर्धान्यतमपरिमाणंहेमलिङ्गंनिधायकांस्यपात्रंब्रह्माणंपायसंविष्णुंलिङ्गंशिवंयथाधिकारंवैदिकैर्मंत्रैर्नाममिर्वावाहनाद्युपचारैः संपूजयेत् ततोविप्रंवस्त्रादिभिःपूजयेत् सुवर्णपायसामत्रंयस्मादेतत्त्रयीमयम् । आवयोस्तारकंयस्मात्तद्गृहाणद्विजोत्तम १ अमुकगोत्रायामुकशर्मणेतुभ्यंइदंसुवर्णलिंगपायसयुक्तममत्रंसमुद्रमेखलापृथ्वीदानफलकामोहंसंप्रददेनममेतिविप्रहस्तेजलंदद्यात् विप्रःदेवस्यत्वेतिप्रतिगृह्णीयात् दातादानस्यसंपूर्णतार्थमिमांदक्षिणांसंप्रददइतियथाशक्तिहिरण्यंदद्यात् हेमाद्र्याद्युक्तः प्रकारान्तरेणार्धोदयव्रतप्रयोगोब्रह्मादियुततिलपर्वतत्रयशय्यात्रयगोत्रयदानहोमादिसहितः कौस्तुभेद्रष्टव्यः इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेपौषमासकृत्यनिर्णयोद्देशः समाप्तः ।

**पात्रदान प्रयोग**—देशकालादिकांचा उच्चार केल्यावर, 'समुद्रमेखलायाः पृथ्व्याः सम्यक् दानफलकामोहमर्धोदयविहितामत्रदानं करिष्ये' असा संकल्प करावा. आणि सारवलेल्या जमिनीवर धुतलेल्या तांदुळांचें अष्टदळ कमळ काढून, त्यावर चौसष्ट अथवा चाळीस किंवा पंचवीस पलें वजनाचें काशाचें भांडें अग्न्युत्तारण करून ( विस्तवावर शेंकून ) ठेवावें. आठ गुंजाचा एक मासा, चाळीस मासे म्हणजे एक कर्ष, व चार कर्षांचें एक पल (असें कोष्टक असून) अमरसिंहाच्या मतानें ऐशीं गुंजांचा एक कर्ष व चार कर्ष म्हणजे एक पल ( असें आहे ). कांशाच्या भांड्यांत खीर, ( पायस ) ठेवून, त्यांत अष्टदल काढावें, आणि त्याच्या कर्णिकेंत एक कर्ष अथवा अर्धा कर्ष किंवा पाव कर्ष यापैकीं कोणच्या तरी एका प्रमाणाचें सुवर्णलिंग करून ठेवावें. कांशाच्या भांड्यांत ब्रह्मदेव, खिरींत विष्णु व लिंगांत शिव यांची—अधिकाराप्रमाणें वैदिक मंत्रांनीं किंवा नाममंत्रांनीं आवाहनादि उपचारांसह पूजा करावी, आणि नंतर ब्राह्मणाची वस्त्रादिकांनीं पूजा केल्यावर 'सुवर्णपायसामत्रं यस्मादेतत्त्रयीमयम् । आवयोस्तारकं यस्मात्तत्गृहाण द्विजोत्तम ॥ अमुकगोत्रायामुकशर्मणे तुभ्यं इदं सुवर्णलिंगपायसयुक्तममत्रं समुद्रमेखळापृथ्वीदानफलकामोहं संप्रददे नम' असें म्हणावें व ब्राह्मणाच्या हातावर पाणी सोडून दान करावें. ब्राह्मणानें 'देवस्य त्वा०' हा मंत्र म्हणून तें दान घ्यावें. दान देणारानें दानाच्या पूर्णत्वासाठीं 'इमां दक्षिणां संप्रददे' असें म्हणून यथाशक्ति सुवर्ण द्यावें. हेमाद्रि वगैरे ग्रंथांत अर्धोदयव्रताचा जो प्रयोग सांगितला आहे, त्यांत ब्रह्मादिकांच्या नांवानें तिळाच्या तीन राशी, तीन शय्या व तीन गाई—यांचें दान व होमादि करण्यास सांगितलें असल्यानें तो प्रयोग कौस्तुभांत पाहावा. याप्रमाणें श्रीमदनन्तोपाध्यायांचे पुत्र जे काशीनाथोपाध्याय त्यांनीं रचलेल्या धर्मसिंधुसारांतल्या पौषाच्या महिन्यांतल्या कृत्यांच्या निर्णयाचा उद्देश येथें संपला.

**अथमाघमासःकुम्भसंक्रान्तौपूर्वेषोडशनाड्यःपुण्याःमाघेवेणीस्नानमहिमा-सितासितेतुयत्स्नानंमाघमासेयुधिष्ठिर । नतेषांपुनरावृत्तिःकल्पकोटिशतैरपि १ कुरुक्षेत्रसमागङ्गायत्रकुत्रावगाहिता । तस्माद्दशगुणाविन्ध्येकाश्यांशतगुणा ततः २ काश्याःशतगुणाप्रोक्तागंगायमुनयान्विता । सहस्रगुणिता सापिमाघे पश्चिमवाहिनी ३ ।**

**माघमासांतलीं कृत्यें**—कुंभसंक्रांतीच्या आधींच्या सोळा घटका पुण्यकाळ. माघांत त्रिवेणीस्नानाचा जो महिमा धर्मराजाला सांगितला आहे तो येणेंप्रमाणें:—हे युधिष्ठिरा, माघांत गंगायमुनांच्या संगमांत जे स्नान करितात त्यांना शंभर कोटि कल्पांनंतरही पुन्हां जन्म येत नाहीं. गंगा सर्वत्र कुरुक्षेत्रासमान असते. विन्ध्य पर्वतांत त्याच्या दहापट, काशींत विन्ध्याच्या शतपट, गंगायमुनांच्या संगमावर काशीच्या शतपट आणि संगमाच्या सहस्रपट माघ महिन्यांतली पश्चिमवाहिनी गंगा—असें याचें फल समजावें.

अथमाघेतिलपात्रदानंप्रशस्तम् तत्प्रयोगः ताम्रपात्रेतिलान्कृत्वापलषोडश-निर्मिते । सहिरण्यंस्वशक्त्यावाविप्रायप्रतिपादयेत् १ वाङ्मनःकायजत्रिविध-पापनाशपूर्वकंब्रह्मलोकप्राप्तिकामस्तिलपात्रदानंकरिष्ये उक्तपरिमाणेताम्रपात्रे प्रस्थतिलान्कर्षसुवर्णयुतान्यथाशक्तिसुवर्णयुतान्वाकृत्वाविप्रंसंपूज्य देवदेव जगन्नाथवांच्छितार्थफलप्रद । तिलपात्रंप्रदास्यामितवाङ्गेसंस्थितोह्यहम् १ इतिमन्त्रेणदद्यात् धान्यमानेतुकुडवोमुष्टीनांस्याच्चतुष्टये । चत्वारःकुडवाःप्रस्थ-श्चतुःप्रस्थमथाढकम् १ अष्टाढकोभवेद्द्रोणोद्विद्रोणःशूर्पउच्यते । सार्धशूर्पोभवे त्खारीत्युक्तरीत्यापलंसुवर्णाश्चत्वारःकुडवंप्रस्थमाढकम् । द्रोणंचखारिकाचेति पूर्वपूर्वाच्चतुर्गुणम् १ इत्युक्तरीत्यावाप्रस्थमानस्वरूपंज्ञेयम् यद्वाहिरण्यरहि-तान्तिलांस्ताम्रपात्रे निधाय तिलाःपुण्याःपवित्राश्चसर्वपापहराःस्मृताः । शुक्ला-श्चैवतथाकृष्णाविष्णुगात्रसमुद्भवाः १ यानिकानिचपापानिब्रह्महत्यासमा-निच । तिलपात्रप्रदानेनतानिनश्यन्तुमेसदा १ इदंतिलपात्रं यथाशक्तिदक्षिणा-सहितं यमदैवतंब्रह्मलोकप्राप्तिकामस्तुभ्यमहंसंप्रददइतिदद्यात् अथहिरण्यतुलसी-पत्रदानमन्त्राः सुवर्णतुलसीदानाद्ब्रह्मणःकार्यसंभवात् । पापं प्रशममायातुसर्वे सन्तुमनोरथाः १ अथशालग्रामदानमन्त्रः शालग्रामशिलापुण्या भुक्तिमुक्ति-प्रदायिनी । शालग्रामप्रदानेनममसन्तुमनोरथाः १ चक्राङ्कितसमायुक्ताशाल-ग्रामशिलाशुभा । दानेनैवभवेत्तस्याउभयोर्वाञ्छितं फलम् १ ।

**माघांतलीं दानें**—या महिन्यांत तिलपात्रदान अत्युत्तम होय. सोळा पलें (चौऱ्यायशीं तोळे) वजनाच्या तांब्याच्या भांड्यांत प्रस्थ-परिमित (सुमारें १७१ तोळे, सपाट) तीळ घालून त्यांत एक कर्ष (१६ मासे) अथवा यथाशक्ति सोनें घालून दान करण्यासाठीं ठेवावें. नंतर 'वाङ्मनःकायज त्रिविधपापनाशपूर्वकं ब्रह्मलोकप्राप्तिकामस्तिलपात्रदानं करिष्ये' असा संकल्प करावा. आणि ब्राह्मणाची पूजा केल्यावर 'देव देवजगन्नाथ वांच्छितार्थफलप्रद । तिलपात्रं प्रदास्यामि तवाङ्गे संस्थितोह्यहम् ॥' या मंत्रानें (तिलपात्र) दान करावें. धान्याचें माप:—चार मुठींचा एक कुडव, चार कुडवांचा एक प्रस्थ. चार प्रस्थांचा एक आढक. आठ आढकांचा एक द्रोण. दोन द्रोणांचा एक शूर्प. दीड शूर्प म्हणजे एक खारी. किंवा चार सुवर्णांचें एक पल. चार पलांचा एक कुडव. चार कुडवांचा एक प्रस्थ. चार प्रस्थांचा एक आढक. चार आढकांचा एक द्रोण. चार द्रोणांची एक खारी. असें हें प्रस्थाचें प्रमाण आहे. [ हीं सर्व मापें सध्यां व्यवहारांतून नाहींशीं झालीं असल्यानेंच वर मासे वगैरे चालू मापें आम्हीं वर कंसांत दिलीं आहेत ]. वर सांगितलेला प्रयोग करण्याचे ऐवजीं सोनें न घातलेलें तिलपात्र, 'तिलाःपुण्याः पवित्राश्च सर्वे पापहराः स्मृताः । शुक्लाश्चैव तथा कृष्णा विष्णुगात्रसमुद्भवाः ॥ यानि कानिच पापानि ब्रह्महत्यासमानिच । तिलपात्रप्रदानेन तानिनश्यन्तु मे सदा ॥ इदंतिलपात्रं यथाशक्ति दक्षिणासहित यमदैवतं ब्रह्मलोकप्राप्तिकामस्तुभ्यमहं संप्रददे' असा उच्चार करून, दान करावें. सोन्याच्या तुलसीपत्रदानाचा मंत्रः—सुवर्णतुलसीदानाद्ब्रह्मणः

कार्यसम्भवात् । पापं प्रशममायातु सर्वेसन्तु मनोरथाः ॥' शालग्रामदानमंत्रः—शालग्रामशिला पुण्या भुक्तिमुक्तिप्रदायिनी । शालग्रामप्रदानेन ममसन्तु मनोरथाः ॥ चक्राङ्कितसमायुक्ता शालग्रामशिलाशुभा । दानेनैव भवेत्तस्या उभयोर्वाञ्छितं फलम् ॥'

**अथप्रयागेवेणीदानम् तत्रसर्वेषांवपनविधिः ऊर्ध्वमब्दाद्दिमासोनाद्यदातीर्थंव्रजेन्नरः ॥ तदातद्वपनंशस्तंप्रायश्चित्तमृतेद्विज १ प्रयागेतुयोजनत्रयादागतस्यदशमासादर्वागपि प्रथमयात्रायांतुजीवत्पितृकगुर्विणीपतिकृतचूडबालानामपिसभर्तृकस्त्रीणामपिवपनमितिविशेषःकेचित्तुसभर्तृकस्त्रीणां सर्वान्केशान्समुद्धृत्यछेदयेदङ्गुलद्वयमित्याहुः तत्प्रयोगः वेणीभूतकेशाकृतमाङ्गलिकवेषास्त्रीभर्तारंनत्वातदाज्ञयासर्ववपनंद्व्यंगुलकेशच्छेदंवाकृत्वास्नात्वात्रिवेणीपूजांकुर्यात् भर्त्रावाकारयेत् पूजान्तेपत्नी छिन्नवेणीयुक्तंवैणवपात्रमञ्जलौधृत्वातस्यां हैमवेणींमौक्तिकादिकंचनिधाय वेण्यांवेणीप्रदानेनममपापंव्यपोहतु । जन्मान्तरेष्वपिसदासौभाग्यंममवर्धताम् १ इतित्रिवेण्यांक्षिपेत् विप्राःसुमङ्गलीरियंवधूरितिपठेयुः ततोविप्रान्सुवासिनीश्चवस्त्रादिनातोषयेत् ।**

**प्रयागाचा वेणीदानविधि**—प्रयागाला सर्वांनीं (स्त्रीपुरुषांनीं) वपन (मुंडन) करावें. पुरुषानें दहा महिन्यांनंतर जर तीर्थाला जाणें केलें तर, प्रायश्चित्तासाठीं म्हणून पुन्हां क्षौर करावें. प्रयागाला बारा कोसांवरून येणारा जर दहा महिन्यांच्या आंत पुन्हां आला, तर त्यानें क्षौर करावें. यात्रा जर पहिलीच असेल तर ज्याचा बाप जिवंत आहे अशानें, गर्भार बाईनें, चौलकर्म झालेल्या बालकानें व नवरा असलेल्या स्त्रीनेंही (प्रयागास) वपन करावें, हा (प्रयागतीर्थाचा) विशेष आहे. नवरा असलेल्या बायकांनीं केंसांचीं शेवटचीं दोन बोटें अग्रें कापावींत असें जें म्हणतात, त्याचा प्रयोग येणेंप्रमाणें:—वेणी घालून मंगलवेष धारण केलेल्या स्त्रियेनें, नवऱ्याला नमस्कार करून, त्यानें जर आज्ञा दिली तर सर्व केशांचें वपन किंवा केशाग्रांचें दोन बोटें छेदन करावें (नवऱ्याची आज्ञा नसल्यास कांहींच करूं नये. सध्यां केशच्छेदन नवऱ्याकडूनच करण्याचा संप्रदाय आहे.) नंतर स्नान करून, त्रिवेणीपूजा स्वतः करावी, किंवा नवऱ्याकडून करवावी. पूजा झाल्यावर (केशच्छेदन करवून घेतलेल्या स्त्रीनें) आपली छिन्न झालेली वेणी बांबूच्या भांड्यांत घालून, तें भांडें आपल्या ओंजळींत धरावें, व त्यांत सोन्याची वेणी, मोतीं वगैरे ठेवून, 'वेण्यां वेणिप्रदानेन मम पापं व्यपोहतु । जन्मान्तरेष्वपि सदा सौभाग्यं मम वर्धताम् ॥' असा मंत्र म्हणून, तें भांडें त्रिवेणींत (गंगा-यमुना व सरस्वति यांच्या संगमांत) टाकावें. नंतर ब्राह्मणांनीं 'सुमङ्गलीरियं वधूः' हा मंत्र म्हटल्यावर सुवासिनी व ब्राह्मण यांना वस्त्रें वगैरे देऊन त्यांचा संतोष करावा.

**अथत्रिवेण्यांदेहत्यागविधिः येवैतन्वंविसृजन्तिधीरास्तेजनासोअमृतत्वंभजन्तेइतिश्रुतिर्माघमासविषया तनुंत्यजतिवैमाघेतस्यमुक्तिर्नसंशयइतिब्रह्मोक्तेः अन्यमासेतनुत्यागात्स्वर्गप्राप्तिः तत्रयथाशक्तिसर्वप्रायश्चित्तंकृत्वाश्राद्धाधि-**

कार्यभावेस्वीयजीवच्छ्राद्धंसपिण्डान्तंकृत्वागोदानादिकृत्वाकृतोपवासः पारणाहेफलोल्लेखपूर्वकंसंकल्प्यविष्णुंध्यात्वावेणींप्रविशेदिति जीवच्छ्राद्धप्रयोगः कौस्तुभेद्रष्टव्यः माघंप्रकृत्य तिलस्नायीतिलोद्वर्तीतिलहोमीतिलोदकी । तिलभुक्तिलदाताच षट्तिलाःपापनाशनाः २ इत्युक्तेवाक्येतिलस्नायीपदेन तिलयुक्तोदकेनस्नानं तिलहोमपदेनायुतलक्षतिलहोमाद्यात्मकस्यग्रहमखस्यापिसंग्रहः तिलोदकीतितिलयुक्तोदकेनदेवपूजातर्पणसंध्यादिकंपानंचकार्यमित्यर्थः सच होमस्त्रिधा प्रथमोयुतहोमःस्याल्लक्षहोमस्ततःपरः । कोटिहोमस्तृतीयस्तु सर्वकामफलप्रदः १ इति लक्षहोमादिप्रयोगः कुण्डमण्डपनिर्माणादिसहितः कौस्तुभमयूरवादौज्ञेयः ।

**त्रिवेणींतला देहत्यागविधि**—'जे थोर लोक देहत्याग करतात, ते मोक्षाला जातात. (ये वै तन्वं विसृजन्ति धीरास्ते जना सो अमृतत्वं भजन्ते) असें वेदवाक्य आहे, तें—गंगा व यमुना यांचा संगम आणि माघ महिना यांबद्दलचें आहे. याचें कारण असें कीं, माघ महिन्यांत (प्रयागीं) देहत्याग करणाराला निःसंशय मोक्ष मिळतो असें (श्रुतीच्या वरील वचनाच्या आधारेंच) ब्रह्मपुराणांत सांगितलेलें आहे. इतर महिन्यांत, तेथें देहत्याग केल्यास जी स्वर्गप्राप्ति होते, तिचा प्रयोग येणेंप्रमाणें:—यथाशक्ति सर्व प्रायश्चित्त करून, आपलें श्राद्ध करणारा जर कोणी नसेल तर स्वतः आपलें जिवंतश्राद्ध सपिंडीकरणासह करून, गोदान केल्यावर उपास करावा. पारणें केल्यानंतर, आपल्याला जो कोणचा लोक हवा असेल त्याचा उल्लेख करून संकल्प करावा. या जिवंतश्राद्धाचा प्रयोग कौस्तुभांत पहावा. माघ महिन्याबद्दल 'तिलस्नायी, तिलोद्वर्ती, तिलहोमी, तिलोदकी, तिलभुक् व तिलदाता' अशा सहांचा पापनाश होतो असें वाक्य आहे. यांत 'तिलस्नायी' असें पद असल्यानें, तिलयुक्त पाण्यानें स्नान करावें. तिलहोम सांगितला असल्यानें अयुतलक्ष तिळांचा होम वगैरे सर्व ग्रहमखासह करावें. तिलोदक सांगितलें आहे म्हणून, तिलमिश्रित पाण्यानें देवपूजा, तर्पण, संध्या, पाणी पिणें वगैरे करावींत. हा तिलहोम जो तीन प्रकारचा आहे तो असाः—(१) दहा हजार होम (२) लक्ष होम व (३) कोटि होम. हे होम सर्व मनोरथ पूर्ण करणारे आहेत. या होमाचा कुंडमंडपनिर्णयासह जो सर्व प्रयोग कौस्तुभांत व मयूरादिकांत दिला आहे तो पहावा.

माघशुक्लचतुर्थ्यांढुण्ढिराजोद्देशेननक्तव्रततत्पूजातिललड्डुकादिनैवेद्यंतिलभक्षणंचोक्तम् अत्रप्रदोषव्यापिनीग्राह्या अस्यामेवप्रदोषव्यापिन्यांकुन्दपुष्पैः शिवंसंपूज्योपवासंनक्तभोजनंवाकुर्यात् श्रियंप्राप्नुयात् अत्रविनायकव्रतस्यतु भाद्रशुक्लचतुर्थीवन्निर्णयः ।

**ढुंढिराजव्रत**—माघ शुद्ध चतुर्थीला ढुंढिराज गणपतीच्या नांवानें नक्तव्रत, ढुंढिराजाची पूजा, तिळांच्या लाडवांचा नैवेद्य व तिलभक्षण हा

सांगितलीं आहेत. ही चतुर्थी प्रदोषव्यापिनी घ्यावी. याच प्रदोषव्यापिनी ( चतुर्थी ) तिथीला उपवास करून, अथवा नक्तानें कुन्दाच्या फुलांनीं शिवार्चन केल्यास, संपत्ति मिळते. वर सांगितलेल्या ( ढुंढिराज ) विनायकव्रताचा निर्णय भाद्रपद शुद्ध चतुर्थी प्रमाणेंच समजावा.

माघशुक्लपञ्चमीवसन्तपञ्चमीतस्यांवसन्तोत्सवारम्भः अस्यांरतिकामयोः पूजोक्ता इयंपरत्रैवपूर्वाह्णव्याप्तौपरा अन्यथापूर्वैव ।

**वसन्तपंचमी**—माघ शुद्ध पंचमी ही वसंतपंचमी होय. या तिथीवर वसन्तोत्सवाला आरंभ करावा. रति व काम यांची या तिथीला पूजा करावी. ही जर दुसऱ्या दिवशींच पूर्वाह्णव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी, नाहीं तर पहिल्या दिवसाची घ्यावी.

माघशुक्लसप्तमीरथसप्तमी सारुणोदयव्यापिनीग्राह्यादिनद्वयेऽरुणोदयव्याप्तौपूर्वा यदाघटिकादिमात्राषष्ठीसप्तमीचक्षयवशादरुणोदयात्पूर्वंसमाप्यतेतदा षष्ठीयुक्ताग्राह्या तत्रषष्ठ्यांसप्तमीक्षयघटीप्रवेश्यारुणोदयेस्नानंकार्यम् अत्रव्रते षष्ठ्यामेकभक्तंकृत्वासप्तम्यामरुणोदयेस्नानंकार्यम् तत्रमन्त्रः यदाजन्मकृतंपापं मयाजन्मसुजन्मसु । तन्मेरोगंचशोकंचमाकरीहंतुसप्तमी १ एतज्जन्मकृतंपापं यच्चजन्मान्तरार्जितम् । मनोवाक्कायजंयच्चज्ञाताज्ञातेचयेपुनः २ इतिसप्तविधं पापंस्नानान्मेसप्तसप्तिके । सप्तव्याधिसमायुक्तंहरमाकरिसप्तमि ३ अथार्घ्यमन्त्रः सप्तसप्तिवहप्रीतसप्तलोकप्रदीपन । सप्तमीसहितोदेवगृहाणार्घ्यंदिवाकर १ इति इयंचमन्वादिरपि शुक्लपक्षमन्वादित्वात्पौर्वाह्णिकीग्राह्येत्युक्तम् ।

**रथसप्तमी**—माघशुद्ध सप्तमी ही रथसप्तमी होय. ही अरुणोदयव्यापिनी घ्यावी. हिची अरुणोदयव्याप्ति जर दोन दिवस असेल, तर पहिल्या दिवसाचीच घ्यावी. ज्यावेळीं एक घटका वगैरे थोडी षष्ठी असून, सप्तमीचा क्षय असल्यानें, ती दुसऱ्या दिवशीं अरुणोदयाच्या आधीं संपत असेल, त्यावेळीं षष्ठीयुक्त असलेली सप्तमी घ्यावी. त्या षष्ठींत सप्तमीच्या क्षयघटका मिळवून, अरुणोदयाच्या वेळीं स्नान करावें. या व्रतांत षष्ठीला एकभुक्त राहून, सप्तमीला अरुणोदयीं जें स्नान करावें त्याचा मंत्रः—'यदाजन्मकृतं पापं मया जन्मसु जन्मसु । तन्मे रोगंच शोकंच माकरी हन्तु सप्तमी ॥ एतज्जन्मकृतं पापं यच्च जन्मान्तरार्जितम् । मनोवाक्कायजं यच्चज्ञाता ज्ञातेच ये पुनः ॥ इति सप्तविधं पापं स्नानान्मे सप्तसप्तिके । सप्तव्याधिसमायुक्त हर माकरि सप्तमी ॥' अर्घ्यमंत्र 'सप्तसप्तिवह प्रीत सप्तलोकप्रदीपन । सप्तमीसहितोदेव गृहाणार्घ्यं दिवाकर ॥' ही सप्तमी मन्वादिसुद्धां आहे. ही शुद्ध पक्षांतली मन्वादि असल्यानें पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी असें सांगितलें आहे.

माघशुक्लाष्टमीभीष्माष्टमी अस्यांभीष्मोद्देशेनयेश्राद्धंकुर्वन्तितेसन्ततिमन्तोभवन्ति तत्रश्राद्धंकाम्यंतर्पणंतुनित्यम् तर्पणेकृतेसंवत्सरोपात्तदुरितनाशः अकृतेपुण्यनाशइत्युक्तेः तत्रतर्पणमन्त्रः वैयाघ्रपद्यगोत्रायसांकृत्यप्रवरायच । गङ्गा-

पुत्रायभीष्मायआजन्मब्रह्मचारिणे १ अपुत्रायजलंदद्मिनमोभीष्मायवर्मणे। भीष्मः शान्तनवोवीरः सत्यवादीजितेंद्रियः २ आभिरद्भिरवाप्नोतुपुत्रपौत्रोचितांक्रियाम्। इति एवमपसव्येनतर्पणंकृत्वाचम्यसव्येनार्घ्यंदद्यात् वसूनामवतारायशन्तनोरात्मजायच। अर्घ्यंददामिभीष्मायआबाल्यब्रह्मचारिणे १ इति अत्रजीवत्पितृकस्यानाधिकारइतिकौस्तुभः जीवत्पितृकस्याप्यधिकारइति बहवः अत्रमध्याह्नव्यापिनीअष्टमीग्राह्या श्राद्धादेरेकोद्दिष्टत्वादिति।

**भीष्माष्टमी**—माघ शुद्ध अष्टमी ही भीष्माष्टमी होय. या तिथीवर जे कोणी श्राद्ध करतात, त्यांना संतति होते. या तिथीवरचें श्राद्ध काम्य असून, तर्पण अवश्य आहे. तर्पण केल्यानें एक वर्षाच्या पापाचा नाश होतो व न केल्यानें पुण्यनाश होतो असें सांगितलें आहे. या तिथीवर करण्याच्या तर्पणाचा मंत्रः—'वैयाघ्रपद्यगोत्राय सांकृत्य प्रवरायच गंगापुत्राय भीष्माय आजन्मब्रह्मचारिणे॥ अपुत्राय जलं दद्मि नमो भीष्माय वर्मणे। भीष्मः शान्तनवो वीरः सत्यवादी जितेंद्रियः॥ आभिरद्भिरवाप्नोतु पुत्रपौत्रोचितां क्रियाम्॥' असें अपसव्यानें तर्पण केल्यावर आचमन करून, सव्यानें जें अर्घ्य द्यावें त्याचा मंत्रः—'वसूनामवताराय शान्तनोरात्मजाय च। अर्घ्यं ददामि भीष्माय आबाल्यब्रह्मचारिणे॥" ज्याचा बाप जिवंत असेल त्याला तर्पणाचा अधिकार नाहीं असें कौस्तुभांत जरी सांगितलें आहे, तरी तसा अधिकार असल्याचें बरेच ग्रंथकार सांगतात. या कामाकरितां मध्यान्हव्यापिनी अष्टमी घ्यावी; कारण, श्राद्ध वगैरे एकोद्दिष्ट करावींत असें शास्त्र आहे.

माघशुक्लद्वादश्यांतिलोत्पत्तिरतोऽस्यामुपोष्यांतिलस्नानंतिलैर्विष्णुपूजनंतिलनैवेद्यंतिलतैलेनदीपदानंतिलहोमस्तिलदानंचतिलभक्षणंचकार्यम्।

**तिलोत्पत्तिव्रत**—माघ शुद्ध द्वादशीला तिळांची (मूळ) उत्पत्ति झाली असल्यानें त्या तिथीला उपास करून, तिलस्नान, तिळांनीं विष्णुपूजा, तिळांचा नैवेद्य, तिळांच्या तेलाचा दिवा, तिळांचा होम, तिळांचें दान व तिलभक्षण हीं करावींत.

माघीपूर्णिमापरा अत्रकृत्यम् एवंमाघावसानेतुदेयंभोज्यमवारितम्। भोजयेद्विजदांपत्यंभूषयेद्वस्त्रभूषणैः १ कम्बलाजिनरक्तवस्त्राणितूलगर्भचोलकानि उपानहौप्रच्छादनपटाश्चैतानिमाधवःप्रीयतामित्युक्त्वादेयानि अथकृतस्यमाघस्नानस्यसाङ्गतार्थमुद्यापनंकरिष्यइतिसंकल्प्य सवित्रे प्रसवित्रेचपरंधामजलेमम। त्वत्तेजसापरिभ्रष्टंपापंयातुसहस्रधा १ दिवाकर जगन्नाथप्रभाकरनमोस्तुते। परिपूर्णंकरिष्येहंमाघस्नानंतवाज्ञया २ इति मन्त्राभ्यामपिसंकल्पः कार्यः एवंचतुर्दश्यांसंकल्पोपवासाधिवासनमाधवपूजनानिकृत्वापूर्णिमायांतिलचर्वाज्यैरष्टोत्तरशतहोमंकृत्वातिलशर्करागर्भांत्रिंशन्मोदकात्मकंवायनंदेयम् तन्त्रमन्त्रौ सवितःप्रसवस्त्वंहिपरंधामजलेमम। त्वत्तेजसापरिभ्रष्टंपापंयातुसहस्रधा १ दिवाकरजगन्नाथप्रभाकरनमोस्तुते। परिपूर्णंकुरुष्वेहमाघस्नानमुषःपते २

इति ततोदम्पत्योःसूक्ष्मवाससीसप्तधान्यानिचदत्त्वाब्राह्मणेभ्योदाम्पत्यायचषड्रसभोजनंदेयम् तत्रमन्त्रःसूर्योमेप्रियतांदेवोविष्णुमूर्तिर्निरञ्जनः इति एवंमाघप्लवीयातिभित्त्वादेवंदिवाकरम् । परिव्राडयोगयुक्तश्चरणेचाभिमुखेहतः १ इति ।

**माघीपुनव**—ही दुसऱ्या दिवसाची घ्यावी. या पुनवेला जें कर्म करावयाचें तें येणेंप्रमाणें:– सर्वांना धान्याचें दान द्यावें. ब्राह्मणदंपत्याला जेवण घालून, वस्त्रें, भूषणें वगैरेंनीं सुशोभित करावें. कृष्णाजिन, तांबड्यारंगाचीं वस्त्रें, रुदार अंगरखे, जोडा व पांघरूण या वस्तु 'माधवाचा सन्तोष होवो' असें म्हणून द्याव्या. 'कृतस्य माघस्नानस्य साङ्गतार्थमुद्यापनं करिष्ये' असा संकल्प करावा, किंवा 'सवित्रे प्रसवित्रेच परंधाम जलेमम । त्वत्तेजसा परिभ्रष्टं पापं यातु सहस्रधा ।। दिवाकर जगन्नाथ प्रभाकर नमोस्तुते । परिपूर्णं करिष्येऽहं माघस्नानं तवाज्ञया ।।' असाही संकल्प चतुर्दशीला करून उपास, अधिवासन व माधवपूजन केल्यावर पौर्णिमेला, तिल, चरु व घृत यांचा १०८ होम करावा आणि तिलशर्करायुक्त तीस मोदकांचें जेवण द्यावें, त्याचा मंत्रः— 'सवितः प्रसवस्त्वं हि परंधाम जले मम । त्वत्तेजसा परिभ्रष्टं पापं यातु सहस्रधा ।। दिवाकर जगन्नाथ प्रभाकर नमोस्तुते । परिपूर्णं कुरुष्वेऽहं माघस्नानमुषःपते ।।' त्यानंतर दंपत्याला पातळ वस्त्रें आणि सात प्रकारचीं धान्यें देऊन, ब्राह्मण व दंपत्य यांना षड्रसभोजन घालावें. त्याचा मंत्रः–'सूर्यो मे प्रीयतां देवो विष्णुमूर्तिर्निरंजनः' याप्रमाणें माघस्नान करणारा, संन्यासी, योगी आणि लढाईत शत्रूशीं लढत असतां मेलेला हे सूर्यमंडळाचा भेद करून जातात.

माघकृष्णाष्टम्यांचतुरष्टकाकरणाशक्तएकाष्टकांपूर्वेद्युःश्राद्धान्वष्टक्यश्राद्धसहितां कुर्यात् । दिनत्रये कर्तुमशक्तोऽष्टम्यामेवैकामष्टकां कुर्यात् ।

**अष्टकाश्राद्धें**—चार श्राद्धें करण्यास जो असमर्थ असेल त्यानें माघ कृष्ण अष्टमीला पूर्वेद्युःश्राद्ध सप्तमीचे दिवशीं व अन्वष्टक्यश्राद्ध नवमीचे दिवशीं यांसह एकच अष्टकाश्राद्ध करावें. तीन दिवस श्राद्धें करण्यास असमर्थ असलेल्यानें फक्त अष्टमीलाच अष्टकाश्राद्ध करावें.

अथशिवरात्रिः सानिशीथव्यापिनीग्राह्यानिशीथस्तुरात्रेरष्टमोमुहूर्तइत्युक्तम् तत्रपरदिनएवार्धरात्रौपरापूर्वत्रैवतद्व्याप्तौपूर्वा दिनद्वयेप्यर्धरात्रव्याप्त्यभावेपिपरैव दिनद्वयेकात्स्न्येंनैकदेशेनवार्धरात्रव्याप्तौपूर्वेतिहेमाद्र्याशयानुसारीकौस्तुभः परैवेतिमाधवनिर्णयसिन्धुपुरुषार्थचिन्तामण्यादयोबहवः परेद्युर्निशीथैकदेशव्याप्तौपूर्वेद्युः संपूर्णतद्व्याप्तौपूर्वैव पूर्वदिनेनिशीथैकदेशव्याप्तौपरादिनेसंपूर्णतद्व्याप्तौपरैव इदंव्रतंरविवारभौमवारयोगे शिवयोगयोगेचातिप्रशस्तम् ।

**महाशिवरात्रिव्रत**—माघ वद्य चतुर्दशी ही महाशिवरात्रि होय. ही निशीथव्यापिनी घ्यावी. रात्रींचा जो आठवा मुहूर्त तो निशीथकाल हें मागें सांगितलेंच आहे. दुसऱ्या दिवशीं जर अर्धरात्रीं व्याप्ति असेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. पूर्व दिवशींच जर अर्धरात्रीं व्याप्ति असेल, तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. अर्धरात्रव्याप्तीचा दोन्ही दिवशीं जर अभाव असेल तर दुसऱ्या

दिवसाची घ्यावी. दोन दिवस संपूर्ण किंवा एकदेशी जर अर्धरात्रव्याप्ति असेल, तर पूर्व दिवसाची घ्यावी, असें हेमाद्रीच्या मतानुसार कौस्तुभांत सांगितलें आहे, व दुसऱ्या दिवसाची घेण्यास माधव, निर्णयसिंधु, पुरुषार्थचिंतामणि वगैरे बऱ्याच ग्रंथांत लिहिलें आहे. दुसऱ्या दिवशीं निशीथकाळीं जर एकदेशव्याप्ति असेल व पूर्व दिवशीं निशीथकाळीं जर पूर्णव्याप्ति असेल, तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. पूर्व दिवशीं निशीथकाळीं जर एकदेशव्याप्ति असेल व दुसऱ्या दिवशीं निशीथकाळीं जर पूर्णव्याप्ति असेल, तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. रविवार किंवा मंगळवार व शिवयोग यांचा जर योग असेल, तर हें व्रत फार प्रशस्त होय.

**अथपारणानिर्णयः यामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तौचतुर्दशान्तेपारणम् यामत्रयोर्ध्वगामिन्यांचतुर्दश्यांप्रातश्चतुर्दशीमध्येएवपारणमितिमाधवादयः निर्णयसिन्धौतुयामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तावपिचतुर्दशीमध्येएवपारणंनतुकदाचिदपिचतुर्दश्यन्ते उपोषणंचतुर्दश्यांचतुर्दश्यांचपारणम् कृतैःसुकृतलक्षैस्तुलभ्यतेयदिवानवा १ सिक्थेसिक्थेफलंतस्यशक्तोवक्तुंनपार्वति । इत्यादिनाचतुर्दशीमध्येपारणेपुण्यातिशयोक्तेरित्युक्तम् अत्रैवंव्यवस्थाबोध्या यदानित्यकृत्यपूर्वकपारणपर्याप्ताचतुर्दशीनास्तितदावायेषांचतुर्दशीशेषदिनेदर्शादिश्राद्धप्रसक्तिस्तैर्वातिथ्यन्तेपारणम् द्वादश्यामिवात्रनित्यकृत्यापकर्षकवाक्याभावात् तिथ्यन्तपारणविधायकवाक्यसत्वेनसंकटविषयकजलपारणविधिवाक्यानामत्राप्रवृत्तेश्च कर्मपर्याप्तचतुर्दशीसत्वेश्राद्धप्रसक्त्यभावेचातिथिमध्यएवपारणमिति ।**

**पारणानिर्णय**—चतुर्दशी जर तीन प्रहरांच्या आधींच संपेल तर तिच्या अंतीं पारणें करावें. चतुर्दशी जर तीन प्रहरांहून अधिक असेल, तर चतुर्दशींतच पारणें करावें असें माधवादिकांचें सांगणें आहे. चतुर्दशी जर तीन प्रहरांच्या आंतच संपत असेल, तर चतुर्दशींतच पारणें करावें. पारणें चतुर्दशीच्या अंतीं मुळींच करूं नये; कारण चतुर्दशींत उपास व चतुर्दशींतच पारणें असा योग लक्षावधि पुण्यकर्मांनीं येईल किंवा नाहीं हें सांगवत नाहीं. 'पार्वति, त्याचें फळ प्रत्येक शिताला किती आहे हें मी सांगण्यास असमर्थ आहें.' वगैरे वचनांवरून चतुर्दशींत जर पारणें केलें तर त्याचें मोठें पुण्य आहे, असें निर्णयसिन्धूंत जें सांगितलें आहे, त्याची व्यवस्था पुढीलप्रमाणें जी समजावी ती अशीः—नित्य कृत्य केल्यावर पारणा करतां येईल इतकी जेव्हां चतुर्दशी नसेल तेव्हां, अथवा चतुर्दशीच्या शेष दिवशीं ज्यांना दर्शादिश्राद्ध करणें योग्य होईल त्यांनीं तिथीच्या अंतीं पारणें करावें. कारण, या ठिकाणीं द्वादशीप्रमाणें नित्यकृत्याचा अपकर्ष (आधीं करणें) करावा असें वाक्य नाहीं व तिथीच्या अंतीं पारणें करावें अशा प्रकारची विधायक वाक्यें असल्यानें संकटकाळीं जळपारणा करावी अशा विधिवाक्याची या ठिकाणीं प्रवृत्ति नाहीं. नित्य कृत्य होण्यापुरती जर चतुर्दशी असेल व दर्शश्राद्ध करणें नसेल तर चतुर्दशींतच पारणें करावें.

अथव्रतप्रयोगः त्रयोदश्यांकृतैकभक्तश्चतुर्दश्यांकृतनित्यक्रियःप्रातर्मन्त्रेण संकल्पंकुर्यात् शिवरात्रिव्रतंह्येतत्करिष्येहंमहाफलम् । निर्विघ्नमस्तुमेवात्रत्वत्प्रसादाज्जगत्पते १ चतुर्दश्यांनिराहारोभूत्वाशंभोपरेऽहनि । भोक्ष्येहंभुक्तिमुक्त्यर्थंशरणंमेभवेश्वर २ इति द्विजस्तु रात्रींप्रपद्येजननीमित्यृचावपिपठित्वा जलमुत्सृजेत् ततःसायाह्नेकृष्णतिलैः स्नानंकृत्वाधृतभस्मत्रिपुंड्ररुद्राक्षोनिशामुखेशिवायतनंगत्वाक्षालितपादः स्वाचान्तउदङ्मुखोदेशकालौसंकीर्त्यशिवरात्रौप्रथमयामपूजांकरिष्येइतियामचतुष्टयेपूजाचतुष्टयचिकीर्षायांसंकल्पःसकृत्पूजाचिकीर्षायांश्रीशिवप्रीत्यर्थंशिवरात्रौश्रीशिवपूजांकरिष्यइतिसंकल्पःतत्रादौसामान्यतःपूजाविधिरुच्यते यामभेदेनविशेषस्तुवक्ष्यतेअस्यश्रीशिवपञ्चाक्षरमन्त्रस्यवामदेवऋषिः अनुष्टुप्छंदः श्रीसदाशिवोदेवतान्यासेपूजनेजपेचाविनियोगः वामदेवऋषयेनमःशिरसि अनुष्टुप्छन्दसेनमोमुखे श्रीसदाशिवदेवतायैनमोहृदि ॐनंतत्पुरुषायनमःहृदये ॐमंअघोरायनमःपादयोः ॐशिंसद्योजातायनमःगुह्ये ॐवांवामदेवाय०मूर्ध्नि ॐयंईशानाय० मुखे ॐहृदयायनमः ॐनंशिरसेस्वाहा ॐमंशिखायैवषट् ॐशिंकवचायहुं ॐवांनेत्रत्रयायवौषट् ॐयंअस्त्रायफट् कुंभपूजांविधाय ध्यायेन्नित्यंमहेशंरजतगिरिनिभंचारुचन्द्रावतंसंरत्नाकल्पोज्वलाङ्गंपरशुमृगवराभीतिहस्तंप्रसन्नम् । पद्मासीनंसमंतात्स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिंवसानंविश्वाद्यंविश्ववद्यंनिखिलभयहरंपञ्चवक्त्रंत्रिनेत्रम् १ इतिध्यात्वाप्राणप्रतिष्ठांकृत्वा स्थाप्यलिङ्गंस्पृशन् ॐभूःपुरुषंसांबसदाशिवमावाहयामि ॐभुवःपुरुषंसांब० ॐस्वः पुरुषंसांब० ॐभूर्भुवः स्वः पुरुषंसां० इत्यावाहयेत् स्वामिन्सर्वजगन्नाथयावत्पूजावसानकम् । तावत्त्वंप्रीतिभावेनलिङ्गेस्मिन्संनिधौभव १ इतिपुष्पांजलिंदद्यात् स्थावरलिङ्गेपूर्वसंस्कृतचरलिङ्गेचप्राणप्रतिष्ठाद्यावाहनान्तनकार्यम् ॐसद्योजातंप्रपद्यामिसद्योजातायवैनमोनमः ॐनमःशिवायश्रीसाम्बसदाशिवायनमः आसनंसमर्पयामि । स्त्रीशूद्रश्चेत् ॐनमःशिवायेतिपञ्चाक्षरीस्थानेश्रीशिवायनमइतिनमोन्तमन्त्रेणपूजयेत् ॐभवेभवेनातिभवेभवस्वमां ॐनमः शिवायश्रीसाम्बसदाशिवाय नमः पाद्यंसमर्पयामि । ॐभवोद्भवायनमः ॐनमः शिवायश्रीसाम्बस० अर्घ्यं० । ॐवामदेवायनः ॐनमःशिवायश्रीसाम्ब० आचमनं० । ॐज्येष्ठायनमः ॐनमःशिवाय०स्नानं०। ततोमूलमन्त्रेणआप्यायस्वेत्यादिभिश्चपञ्चामृतैः संस्नाप्यआपोहिष्ठेतितिसृभिः शुद्धोदकेनप्रक्षाल्यएकादशावृत्त्यैकावृत्त्यावारुद्रेण पुरुषसूक्तेनचचन्दनकुङ्कुमकर्पूरवासितजलेनाभिषेकंकृत्वा ॐनमःशिवायेतिस्नानान्तेआचमनंदत्वासाक्षतजलेनतर्पणंकार्यम् ॐ भवंदेवंतर्पयामि १ शर्वं देवंतर्पयामि २ ईशानं देवं तर्पयामि ३ पशुपतिंदेवंतर्पयामि ४ उग्रंदेवंत० ५ रुद्रंदेवंत० ६ भीमं देवंत० ७ महान्तंदेवंत० भवस्यदेवस्यपत्नींतर्पयामि शर्वस्यदेवस्यपत्नींतर्पयामि ईशानस्यदेवस्यपत्नींत० पशुपतेर्देवस्यप० उग्रस्य देवस्यप० रुद्रस्यदेवस्यप० भीमस्यदेवस्यप० महतोदेवस्यप० ८ ॐज्येष्ठायनमः

ॐनमः शिवायश्रीसाम्ब० वस्त्रं०मूलेनाचमनम् । ॐरुद्रायनमः ॐनमःशिवाय यज्ञोपवीतं० मूलेनाचमनम् । ॐकालायनमः ॐनमःशिवायश्रीसाम्बसदाशिवायनमः चन्दनं० । ॐकलविकरणायनमः ॐनमःशिवायश्रीसाम्बसदाशिवायनमः अक्षतान्० ॐबलविकरणायनमः ॐनमः शिवाय श्रीसाम्बसदाशिवायनमः पुष्पाणि । सहस्रमष्टोत्तरशतंवासहस्रादिनामभिर्मूलमन्त्रेणवाबिल्वपत्राणिदद्यात् ॐबलायनमः ॐनमःशिवायश्रीसाम्बसदाशिवायनमः धूपं० । ॐ बलप्रमथनायनमः ॐनमःशिवायसा० दीपं० ॐसर्वभूतदमनायनमः ॐनमः शिवाय० नैवेद्यं । मूलेनाचमनंफलंच । ॐमनोन्मनायनमः ॐनमःशिवाय० ताम्बूलं० । मूलेनवैदिकैर्मन्त्रैश्चनीराजनं० । ईशानःसर्वविद्यानामीश्वरःसर्वभूतानांब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्माशिवोमेअस्तुसदाशिवोम् ॐनमःशिवाय० मन्त्रपुष्पं० । भवायदेवायनमः शर्वायदेवायेत्याद्यष्टौभवस्यदेवस्यपत्न्यै इत्याद्यष्टौचनमस्कारान्कृत्वा शिवाय० रुद्राय० पशुपतये० नीलकण्ठाय० महेश्वराय० हरिकेशाय० विरूपाक्षाय० पिनाकिने०त्रिपुरान्तकाय० शम्भवे० शूलिने०महादेवायनमइतिद्वादशनामभिर्द्वादशपुष्पाञ्जलीन्दत्वामूलेनप्रदक्षिणानमस्कारान्कृत्वामूलमन्त्रमष्टोत्तरशतंजप्त्वाक्षमापयित्वाऽनेनपूजेनेनश्रीसाम्बसदाशिवःप्रीयतामितिनिवेदयेत् ।

**शिवरात्रिव्रतप्रयोग**—त्रयोदशीला एकभुक्त राहून चतुर्दशीला नित्य कर्म केल्यावर सकाळीं मंत्रानें जो संकल्प करावा तो असा—

शिवरात्रिव्रतं ह्येतत्करिष्येहं महाफलम् । निर्विघ्नमस्तुमेचात्र त्वत्प्रसादाज्जगत्पते ॥ चतुर्दश्यां निराहारो भूत्वा शंभो परेऽहनि । भोक्ष्येहं भुक्तिमुक्त्यर्थं शरणं मे भवेश्वर ॥' जो ब्राह्मण असेल त्यानें 'रात्रीं प्रपद्ये जननीं०' या दोन ऋचा म्हणूनसुद्धां उदक सोडावें. नंतर सायाह्नकाळीं काळ्या तिळांनीं स्नान करून, भस्माचा त्रिपुण्ड्र लावावा आणि रुद्राक्ष धारण करावे. रात्रीच्या सुरवातीला शिवालयांत जाऊन पाय धुतल्यावर आचमन करावें. नंतर उत्तराभिमुख होऊन देशकालादिकांचा उच्चार केल्यावर, पूजा जर दर प्रहराला करायची असेल, तर 'शिवरात्रौ प्रथमयामपूजां करिष्ये' असा किंवा एकदांच पूजा करणें असेल तर 'श्रीशिवप्रीत्यर्थं शिवरात्रौ शिवपूजां करिष्ये' असा संकल्प करावा. आतां आधीं सामान्य पूजेचा विधि सांगून, नंतर निरनिराळ्या प्रहरांच्या पूजांचा विशेष सांगेन. सामान्यपूजा विधिः—'अस्य श्रीशिवपंचाक्षरमन्त्रस्य. ॐमं अस्त्राय फट्...' इ० न्यास करून कलशाची पूजा करावी व नंतर 'ध्यायेन्नित्यं महेशं रजतगिरिनिभं चारुचंद्रावतंसं रत्नाकल्पोज्वलांगं परशुमृगवरा भीतिहस्तंप्रसन्नम् ॥ पद्मासिनं समन्तात् स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिंवसानं विश्वाद्यं विश्ववन्द्यं निखिल भयहरं पंचवक्त्रं त्रिनेत्रं ॥' असें ध्यान केल्यावर प्राण प्रतिष्ठा करावी. त्यानंतर (शिव) लिंगाला स्पर्श करून, 'ॐ भूःपुरुषं सांबसदाशिवमावाहयामि ॐ भुवः पुरुषं साम्ब० ॐ स्वः पुरुषं साम्ब० ॐ भूर्भुवः स्वः पुरुषं साम्ब०' या मंत्रांनीं आवाहन करावें. 'स्वामिन्सर्वजगन्नाथ यावत्पूजावसानकम् ।

तावत्त्वं प्रतिभावेन लिङ्गेस्मिन्सन्निधौभव' या मंत्रानें पुष्पांजलि द्यावा. स्थावर व चर लिंगांचा प्राणप्रतिष्ठेपासून आवाहनापर्यंतचा विधि करूं नये. 'ॐ सद्योजातं प्रपद्यामि सद्योजातायवै नमोनमः । ॐ नमः शिवाय श्रीसाम्बसदाशिवायनमः आसनं समर्पयामि।' या मन्त्रांनीं पूजा करावी. स्त्रिया व शूद्र यांनीं 'ॐ नमः शिवाय' या पञ्चाक्षरी मन्त्राऐवजीं 'श्रीशिवायनमः या मन्त्रानें पूजा करावी. ॐ भवेभवे नातिभवे भवस्व मां ॐ नमः शिवाय श्रीसाम्बसदाशिवायनमः पाद्यं समर्पयामि । ॐ भवोद्भवायनमः ॐ नमः शिवाय श्रीसाम्बसदाशिवायनमः अर्घ्यं । ॐ वामदेवायनमः ॐ नमः शिवाय श्रीसाम्बसदा० आचमनं० ॐ ज्येष्ठायनमः ॐ नमः शिवाय श्रीसाम्बसदा० स्नानं० ।' यानंतर मूलमंत्रानें व 'आप्यायस्व०' वगैरे मंत्रांनीं पंचामृतस्नान घातल्यावर 'आपोहिष्ठा०' वगैरे तीन ऋचांनीं शुद्धोदकानें प्रक्षालन करून अकरा आवृत्त्या किंवा एक आवृत्ति रुद्र म्हटल्यावर पुरुषसूक्त म्हणून गंध, कुंकू व कापूर यांनीं सुवासिक केलेल्या पाण्यानें अभिषेक करावा. अभिषेकानंतर 'ॐनमः शिवाय' या मंत्रानें आचमन देऊन अक्षतायुक्त जें तर्पण करावें, तें असें:—'ॐ भवं देवं तर्पयामि...' यानंतर मूलमंत्रानें आचमन करावें. 'ॐरुद्रायनमः ॐनमः शिवाय० यज्ञोपवीतं' । इ० मूलमंत्रानें आचमन करावें. 'ॐकालायनमः । नमःशिवाय श्रीसाम्बसदाशिवायनमः चंदनं० । ॐकलविकरणायनमः ॐ नमः शिवाय श्रीसाम्बसदाशिवायनमः पुष्पाणि० ।' यानंतर हजार किंवा एकशें आठ बिल्वपत्रें, सहस्रनामानें किंवा मूलमंत्रानें वाहावीं. 'ॐबलायनमः ॐनमःशिवाय श्रीसाम्बसदाशिवायनमः धूपं ॐबलप्रमथनायनमः । ॐनमः शिवाय श्रीसाम्ब० दीपं० ।ॐ सर्वभूतदमनायनमः ॐ नमः शिवाय नैवेद्यं० ।' मूलमंत्रानें व वैदिक मंत्रानें नीरांजन लावावें. 'ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानां ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोधिपतिर्ब्रह्माशिवोमेअस्तु सदाशिवोम् ॐनमः शिवाय मंत्रपुष्पम्० । 'भवाय देवायनमः शर्वाय देवायनमः' वगैरे आठ व 'भवस्यदेवस्य पत्न्यै' इत्यादि आठ नमस्कार केल्यावर 'शिवायनमः रुद्राय० पशुपतये० नीलकण्ठाय०महेश्वराय० हरिकेशाय० विरूपाक्षाय० पिनाकिने० त्रिपुरांतकाय० शंभवे० शूलिने० महादेवाय०' या बारा नाममंत्रांनीं बारा पुष्पांजलि देऊन, मूलमंत्र म्हणत प्रदक्षिणा व नमस्कार हीं करावींत. त्यानंतर मूलमंत्राचा १०८ जप करून, 'अपराधसहस्राणि० क्षमस्व०' अशी प्रार्थना व 'अनेन पूजनेन श्रीसाम्बसदाशिवप्रीयताम्' असें म्हणून पूजा संपवावी.

**अथचतुर्षुयामेषुपूजाचतुष्टयेविशेषःतत्रप्रथमयामेमूलमन्त्रान्तेश्रीशिवायासनंसमर्पयामीतिशिवनाम्नासर्वोपचारसमर्पणम् द्वितीययामेशिवरात्रौद्वितीययामपूजांकरिष्यइतिसंकल्प्यश्रीशङ्करायासनमितिशङ्करनाम्ना । ततोमहानिशिपूजांकरिष्यइतिसंकल्प्यपूर्ववत्पूजा ततस्तृतीययामपूजांकरिष्यइत्युक्त्वा श्रीमहेश्वरायासनमित्यादि । एवमेवचतुर्थयामेश्रीरुद्रायेतिरुद्रनाम्नाप्रतियामं तैलाभ्यङ्गपञ्चामृतोष्णोदकशुद्धोदकगन्धोदकाभिषेकाःकार्याः यज्ञोपवीतान्ते गोरोचनकस्तूरीकुङ्कुमकर्पूरागरुचन्दनमिश्रितानुलेपेनलिङ्गंलेपयेत् पञ्चविंशति-**

पलमितःसर्वोनुलेपइतिअनुलेपपरिमाणम् यथाशक्तिवा धत्तूरकरवीरकुसुमैर्बिल्वपत्रैश्चपूजनमतिप्रशस्तम् पुष्पाभावेशालितण्डुलगोधूमयवैःपूजा नैवेद्योत्तरंताम्बूलमुखवासौउक्तौ नागवल्लीपत्रक्रमुकफलशुक्त्यादिचूर्णेतित्रयंताम्बूलसंज्ञं एतदेवनारिकेलकर्पूरैलाकक्कोलैःसहितंमुखवाससंज्ञंएतेषामन्यतमद्रव्यालाभेतत्तद्रव्यंस्मरेद्बुधसर्वपूजान्तेप्रार्थना नित्यंनैमित्तिकंकाम्यंयत्कृतंतुमयाशिव । तत्सर्वंपरमेशानमयातुभ्यंसमर्पितम् १ इति शिवरात्रिव्रतंदेवपूजाजपपरायणः । करोमिविधिवद्दत्तंगृहाणार्घ्यंनमोस्तुते १ इत्यर्घ्यः एवंयामचतुष्टयेऽर्घ्यभेदःकौस्तुभे ततःप्रभातेस्नात्वापुनःशिवंसंपूज्यपूर्वोक्तद्वादशनामभिर्द्वादश ब्राह्मणानशक्तावेकंवासंपूज्यतिलपक्कान्नपूर्णान्द्वादशकुम्भानेकंवादत्त्वाव्रतमर्पयेत् यन्मयाद्यकृतंपुण्यंतद्रुद्रस्यनिवेदितम् । त्वत्प्रसादान्महादेवव्रतमद्यसमर्पितम् १ प्रसन्नोभवमेश्रीमन्सद्गतिःप्रतिपाद्यताम् । त्वदालोकनमात्रेणपवित्रोस्मिनसंशयः १ इति ततोब्राह्मणान्भोजयित्वापूर्वनिर्णीतकालेस्वजनैःसहपारणं कुर्यात् तत्रमन्त्रः संसारक्लेशदग्धस्यव्रतेनानेनशङ्कर । प्रसीदसुमुखोनाथ ज्ञानदृष्टिप्रदोभव १ इति शिवरात्रिव्रतविधिः ।

**चौप्रहरांचे पूजाप्रकार**—पहिल्या प्रहरीं मूलमंत्र म्हणून 'श्रीशिवाय आसनं समर्पयामि' असें म्हणून शिवनामानें सर्वोपचार करावेत. दुसऱ्या प्रहरीं 'शिवरात्रौद्वितीययामपूजां करिष्ये' असा संकल्प करून, 'श्रीशंकराय आसनं समर्पयामि' असें म्हणून शंकरनामानें सारे उपचार अर्पण करावेत. तिसऱ्या प्रहरीं 'तृतीययाम पूजां करिष्ये' अशा संकल्पानंतर 'श्रीमहेश्वराय आसनं समर्पयामि' असा उच्चार केल्यावर, पूजा करावी. चौथ्या प्रहरीं तैलाभ्यंग, पंचामृत, उष्णोदक व गंधोदक यांचा अभिषेक करावा. यज्ञोपवीत अर्पण केल्यावर गोरोचन, कस्तुरी, कुंकू, कापूर, अगरु व चन्दन यांनीं मिश्रित अशा गंधानें (शिव) लिंगावर लेपन करावें. हें अनुलेपनाचें सर्व सामान मिळून २५ तोळे वजन असावें; हें अनुलेपनाचें प्रमाण होय. इतक्या प्रमाणाचें अनुलेपन करणें अशक्य असल्यास, तें यथाशक्ति करावें. धोत्रा व कण्हेर यांचीं फुलें व बिल्वदळें यांनीं पूजा करणें सर्वोत्तम होय. फुलें मिळत नसल्यास साळी, तांदूळ, गहूं व सातू यांनीं पूजा करावी. नैवेद्यानंतर मुखवासासाठीं विडा द्यावा. विड्याचें पान सुपारी व शिंपांचा चुना या तिहींचा विडा होतो. त्यांतच खोबरें, कापूर, वेलदोडा व कंकोळ यांचें मिश्रण असलें म्हणजे त्याला मुखवास असें म्हणावें. वरील वस्तूंपैकीं एखादी वस्तु जर नसेल तर त्याचें शहाण्यानें स्मरण करावें. सर्वपूजा झाल्यावर जी प्रार्थना करावी, ती अशीः—नित्यं नैमित्तिकं काम्यं यत्कृतंतु मया शिव । तत्सर्वं परमेशान मया तुभ्यं समर्पितम् ॥ नंतर, 'शिवरात्रीव्रतं देव पूजाजपपरायणः । करोमि विधिवद्दत्तं गृहाणार्घ्यं नमोस्तुते ॥' या मंत्रानें अर्घ्य द्यावें. याप्रमाणें चारी अर्घ्यांची माहिती कौस्तुभांत पहावी. दुसऱ्या दिवशीं सूर्योदयीं स्नान करून, पुन्हा शिवपूजा केल्यावर, पूर्वीं सांगितलेल्या बारा नांवांनीं बारा ब्राह्मणांची किंवा सामर्थ्य नसल्यास, एका ब्राह्मणाची पूजा करून, तिल व शिजलेलें अन्न यांनीं भरलेले बारा कुंभ अथवा एकच

कुंभ द्यावा. व 'यन्मयाद्यकृतंपुण्यं तद्रुद्रस्य निवेदितम् ॥ त्वत्प्रसादान्महादेव व्रतमद्य समर्पितम्। प्रसन्नो भव मे श्रीमन्सद्गतिः प्रतिपाद्यताम्। त्वदालोकनमात्रेण पवित्रोऽस्मि न संशयः' या मंत्रानें शिवाला व्रतार्पण करावें. नंतर ब्राह्मणभोजन करून पूर्वीं निर्णय सांगितलेल्या वेळीं इष्टमित्रासह जें पारणें करावें, त्याचा मंत्रः—'संसारक्लेशदग्धस्य व्रतेनानेन शंकर। प्रसीद सुमुखोनाथ ज्ञानदृष्टिप्रदोभव ॥' असा शिवरात्रिव्रताचा विधि आहे.

**अथमृन्मयलिङ्गेशिवपूजाचिकीर्षायांतद्विधिः ॐ हरायनमइतिमृदमाहृत्यशोधितायांतस्यांजलप्रक्षेपेणसंपीडयतेनपिण्डेन ॐ महेश्वरायनमइतिलिङ्गंकुर्यात् तच्चलिङ्गमशीतिगुञ्जात्मककर्षादधिकपरिमाणमङ्गुष्ठमात्रंततोधिकंवाकार्यंनन्यूनम्। मृन्मयलिङ्गेपञ्चसूत्रसंपादनाभावेपिनदोषः अतएव सप्तकृत्वस्तुलारूढंवृद्धिमेतिनहीयते। बाणलिङ्गमितिप्रोक्तंशेषंनार्मदमुच्यते १ इत्युक्तलक्षणाद्बाणलिङ्गादतिदुर्लभाद्दुःसंपाद्य पञ्चसूत्रसंपादनात्सुवर्णादि लिङ्गांच्चमृन्मयलिङ्गंश्रेष्ठम्द्वापरेपारदंश्रेष्ठंपार्थिवंतुकलौयुगे। इतिवचनाच्च ततः ॐशूलपाणयेनमः शिवइहप्रतिष्ठितोभवेतिसबिल्वपत्रेपूजापीठेप्रतिष्ठाप्य ध्यायेन्नित्यंमहेशमितिध्यात्वा ॐपिनाकधृषेनमः श्रीसाम्बसदाशिवइहागच्छइह प्रतिष्ठेहसन्निहितोभवेत्यावाहयेत् इहद्विजानांसर्वत्रमूलमन्त्रोपिज्ञेयः ततःॐनमःशिवायेतिमूलमन्त्रेणपाद्यमर्घ्यमाचमनंदत्त्वापशुपतयेनमइतिमूलेनचस्नानं वस्त्रनुपवीतंगन्धंपुष्पंधूपदीपनैवेद्यफलताम्बूलनीराजनमन्त्रपुष्पाञ्जलीन्दत्त्वाशर्वायक्षितिमूर्तयेनमइतिप्राच्यांपूजयेत् भवायजलमूर्तयेनमः ईशान्यां रुद्रायाग्निमूर्तये० उदीच्यांउग्रायवायुमूर्तयेनमः वायव्यां भीमायाकाशमू० प्रतीच्यां पशुपतयेयजमानमूर्तयेनमइतिनैर्ऋत्यामहादेवायसोममूर्तयेनमइतिदक्षिणस्यां ईशानायसूर्यमूर्तयेनमइत्याग्नेय्यां ततःस्तुत्वानमस्कृत्यमहादेवायनमइतिविसर्जयेदितिसंक्षेपः विस्तरस्तुपुरुषार्थचिन्तामणौज्ञेयः शिवरात्रिश्चेत्पूर्वोक्तपूजाविधिःपार्थिवलिङ्गेपिकार्यः पार्थिवलिङ्गोद्यापनविधि कौस्तुभादौज्ञेयः।**

**मातीच्या शिवलिंगाचा पूजाविधि**—'ॐ हरायनमः' या मंत्रानें माती आणून, ती निवडावी आणि तिच्यांत पाणी घालून, ती मळावी. तिचा गोळा केल्यावर, 'ॐ महेश्वरायनमः' या मंत्रानें त्याचें लिंग करावें. तें लिंग—ऐंशी गुंजांच्या एका कर्षाहून अधिक परिमाणाचें असें अंगठ्याएवढें किंवा त्याहून मोठें—करावें, पण लहान करूं नये. या मातीच्या लिंगांत पंचसूत्री जरी केली नाहीं तरी दोष नाहीं. म्हणूनच 'सातवेळां जरी कांट्यांवर वजन केलें तरी प्रत्येकवेळीं ज्याचें वजन कमी न भरतां अधिकच भरतें, तें बाणलिंग होय. व इतर लिंगें नर्मदेंतलीं समजावींत,' असें सांगितलें आहे. असलें बाणलिंग मिळणें फारच कठीण आहे. व सोन्याच्या वगैरे लिंगांत पंचसूत्र करणें अवघड आहे. यास्तव, मातीचेंच लिंग श्रेष्ठ समजावें. 'द्वापर युगांत पाऱ्याचें लिंग व कलियुगांत मातीचें लिंग, हीं श्रेष्ठ होत' असें या बाबतींत वचनही आहे. त्यानंतर 'ॐ शूलपाणयेनमः शिवं इह प्रतिष्ठितो

भव' असें म्हणून बेलाचें पान ठेवल्या जागीं तें मातीचें लिंग ठेवावें. 'ध्यायेन्नित्यं महेशं०' या मंत्रानें नंतर ध्यान करून, 'ॐ पिनाकधृषे नमः श्रीसाम्बसदाशिव इहागच्छ इह प्रतिष्ठ इह सन्निहितो भव' असें आवाहन करावें. या प्रसंगीं ब्राह्मणांनीं मूलमंत्र म्हणावा. त्यानंतर 'ॐनमः शिवाय' या मूलमंत्रानें—पाद्य, अर्घ्य व आचमन देऊन, 'पशुपतयेनमः' या व मूलमंत्रानें स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूपदीप, नैवेद्य, फल, विडा निरांजन व मंत्रपुष्पांजलि—हीं अर्पण करून, 'शर्वाय क्षितिमूर्तयेनमः' या मंत्रानें पूर्वदिशेकडची पूजा करावी. 'भवाय जलमूर्तयेनमः' या मंत्रानें ईशान्य, 'रुद्रायाग्निमूर्तयेनमः' या मंत्रानें उत्तर, 'उग्रायवायुमूर्तयेनमः' यानें वायव्य, 'भीमायाकाशमूर्तयेनमः' यानें पश्चिम, 'पशुपतये यजमानमूर्तयेनमः' यानें नैर्ऋत्य, 'महादेवायसोममूर्तयेनमः' यानें दक्षिण, व 'ईशानाय सूर्यमूर्तयेनमः' यानें आग्नेयी-अशी आठ दिशांत पूजा केल्यावर, प्रार्थना करून नमस्कार करावा. आणि 'महादेवायनमः' असें म्हणून (लिंग) विसर्जन करावें असा हा लिंगपूजेचा संक्षेप आहे. याचा सबंध प्रयोग प्रयोगचिंतामणींत पाहावा. पूर्वीं जी शिवरात्रिव्रताची पूजा सांगितली, ती मातीच्याही लिंगाची करावी. या पार्थिव लिंगाच्या व्रतोद्यापनाचा विधि कौस्तुभेत्यादि ग्रंथांत पाहावा.

**लिङ्गविशेषेणफलविशेषः आयुष्यहीरजेलिङ्गे मौक्तिकेरोगनाशः वैडूर्ये शत्रुनाशः पद्मरागेलक्ष्मीः पुष्परागजेसुखम् ऐन्द्रनीलेयशः मारकतेपुष्टिः स्फटिकेसर्वकामाः राजतेराज्यंपितृमुक्तिः हैमेसत्यलोकः ताम्रेपुष्टिरायुश्च पैत्तले तुष्टिः कांस्येकीर्तिः लोहेशत्रुनाशः सीसजेआयुष्यम् मतान्तरे सौवर्णेब्रह्मस्वपरिहारः स्थिरलक्ष्मीश्च एवंगन्धमयेसौभाग्यम् हस्तिदन्तजेसेनापत्यम् व्रीह्यादि धान्यपिष्टजेपुष्टिसुखरोगनाशादि माषजेस्त्रीः नवनीतेसुखम् गोमयजेरोगनाशः गौडेन्नादि वंशाङ्कुरजेवंशवृद्धिरित्यन्यत्रविस्तरः एवंलिङ्गसंख्याविशेषात्फलविशेषः कौस्तुभे ।**

**लिंगपूजाफल**—हिऱ्याच्या लिंगानें पूजन केल्यानें आयुष्य वाढतें. मौक्तिक लिंग पूजनानें रोगनाश होतो. वैडूर्यमण्याच्या लिंगपूजनानें शत्रुनाश होतो. पद्मरागलिंगपूजनानें संपत्ति मिळते. पुष्परागलिंगपूजनानें सुखप्राप्ति होते. इन्द्रनीललिंगपूजनानें सत्यलोक मिळतो. तांब्याच्या लिंगाच्या पूजनानें आयुष्य व पुष्टि मिळतात. पितळेच्या लिंगपूजनानें सन्तोष होतो. काशाच्यानें कीर्ति मिळते. लोखंडाच्यानें शत्रुनाश होतो. शिशाच्यानें आयुष्य वाढतें. गंधाच्यानें सौभाग्य मिळतें. हस्तिदंताच्यानें सेनापतित्व येतें. तांदूळ वगैरे धान्यांच्या पिठाच्या लिंगपूजनेनें पुष्टि, सुख, रोगनाश, वगैरे होतात. उडदाच्या पिठाच्या लिंगपूजनेनें स्त्री मिळते. लोण्याच्यानें सुख होतें. गाईच्या शेणाच्यानें रोगनाश होतो. गुळाच्यानें अन्न मिळतें. वेळूच्या अंकुराच्यानें वंशवृद्धि होते. वगैरे दुसरीकडे विस्तारानें सांगितलें आहे. या प्रमाणेंच लिंगांच्या संख्येप्रमाणें जी फलसंख्या मिळते. तिची सविस्तर माहिती कौस्तुभांत पाहावी.

शिवनिर्माल्यग्रहणाग्रहणविचारस्तृतीयपरिच्छेदेज्ञेयः मासशिवरात्रिनिर्णयः प्रथमपरिच्छेदेउक्तः शिवरात्रिव्रतोद्यापनंकौस्तुभादौज्ञेयम् मासशिवरात्रिव्रतोद्यापनमपिकौस्तुभेस्पष्टम् माघामावास्यायामपराह्णव्यापिन्यांयुगादित्वादपिण्डकंश्राद्धंकार्यम् तच्चदर्शश्राद्धेनसहतन्त्रेकार्यम् माघामावास्यायांशततारकायोगेपरमःपुण्यकालस्तत्रश्राद्धात्परमापितृतृप्तिः इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेमाघमासकृत्यनिर्णयोद्देशः ॥

**शिवनिर्माल्यविचार**—तिसऱ्या परिच्छेदांत जो सांगितला आहे तो पाहावा. दरमहाच्या शिवरात्रीचा निर्णय पहिल्या परिच्छेदांत सांगितलाच आहे. शिवरात्रिव्रताच्या उद्यापनाची माहिती, कौस्तुभ वगैरे ग्रंथांत पहावी. मासशिवरात्रीव्रताच्या उद्यापनाची माहिती कौस्तुभांत सविस्तर दिलेली आहे. माघी अमावास्या युगादि असल्यानें, त्या तिथीला अपिण्डकश्राद्ध करावें. त्यासाठीं अमावास्या अपराह्णव्यापिनी घ्यावी. हें श्राद्ध दर्शश्राद्धाबरोबरच तंत्रानें करावें. याच अमावास्येला जर शततारका नक्षत्राचा योग असेल, तर तो मोठा पुण्यकाळ असतो. या प्रयोगावर श्राद्ध केल्यानें, पितरांची अत्यंत तृप्ति होते. याप्रमाणें श्रीमदनंतोपाध्यायांचे पुत्र जे काशीनाथोपाध्याय, त्यांनीं रचिलेल्या धर्मसिन्धुसारांतल्या माघ महिन्यांतल्या कृत्यांचा निर्णय येथें पुरा झाला.

अथफाल्गुनमासः मीनसंक्रान्तौपराःषोडशनाड्यःपुण्याः रात्रौतुप्रागुक्तम् फाल्गुनेगोव्रीहिवस्त्रदानंगोविन्दप्रीतयेकार्यम् अथफाल्गुनशुक्लप्रतिपदमारभ्य द्वादशदिनपर्यन्तंपयोव्रतश्रीभागवतेउक्तम् तत्प्रयोगोमूलानुसारेणोह्यः।

**फाल्गुन महिन्यांतील कृत्यें**—मीनसंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटका पुण्यकाळ. रात्रींच्या संक्रमणाचा निर्णय पूर्वी सांगितलाच आहे. फाल्गुनांत गाय, तांदूळ व वस्त्र यांचीं दानें करावीत, म्हणजे गोविंदाला संतोष होतो. फाल्गुन शुद्ध प्रतिपदेला आरंभ करून बारा दिवसपर्यंत पयोव्रत करण्यास श्रीमद्भागवतांत सांगितलें आहे त्याचा प्रयोग (तेथें पाहून) मूलानुसार करावा.

फाल्गुनीपौर्णमासी मन्वादिः सापौर्वाह्णिकी इयमेवहोलिका साप्रदोषव्यापिनीभद्रारहिताग्राह्या दिनद्वये प्रदोषव्याप्तौपरदिनेप्रदोषैकदेशव्याप्तौवापरैव पूर्वदिनेभद्रादोषात् परदिनेप्रदोषस्पर्शाभावेपूर्वदिनेप्रदोषभद्रासत्वेयदि पूर्णिमा परदिनेसार्धत्रियामाततोधिकावातत्परदिनेचप्रतिपद्वृद्धिगामिनीतदापरदिनेप्रतिपदिप्रदोषव्यापिन्यांहोलिका उक्तविषयेयदिप्रतिपद्ह्रासस्तदापूर्वदिनेभद्रापुच्छेवाभद्रामुखमात्रंत्यक्त्वाभद्रायामेववाहोलिकादीपनम् परदिनेप्रदोषस्पर्शाभावेपूर्वदिनेयदिनिशीथात्प्राक्भद्रासमाप्तिस्तदाभद्रावसानोत्तरमेवहोलिकादीपनम् निशीथोत्तरंभद्रासमाप्तौभद्रामुखंत्यक्त्वाभद्रायामेव प्रदोषेभद्रामुखव्याप्तेभद्रोत्तरंप्रदोषोत्तरंवा दिनद्वयेपिपूर्णिमायाः प्रदोषस्पर्शाभावेपूर्वदिनएवभद्रापुच्छेतदलाभेभद्रायामेवप्रदोषोत्तरमेवहोलिका रात्रौपूर्वार्धभद्रायाग्राह्यत्वोक्तेः

नतुपूर्वप्रदोषादौचतुर्दश्यांनवापरत्रसायाह्नादौ दिवाहोलिकादीपनंतुसर्वग्रन्थ-विरुद्धम् इदंहोलिकापूजनं श्रवणाकर्मादिवद्भुक्त्वापिकुर्वन्ति युक्तं चैतत् केचिद्धोलिकापूजनंकृत्वाभुञ्जतेतेषांभोजनस्यपूजनस्यवाननियमेनशास्त्रविहित-काललाभः इदंचन्द्रग्रहणसत्त्वेवेधमध्येकार्यम् ग्रस्तोदयेपरदिनेप्रदोषेपूर्णिमा-सत्त्वेग्रहणमध्यएवकार्यम् अन्यथापूर्वदिने ।

**होळी पौर्णिमा**—फाल्गुनी पुनव ही मन्वादि तिथि आहे. ही पूर्वाह्णव्यापिनी घ्यावी. हिला होलिका म्हणतात. प्रदोषव्यापिनी व कल्याणी-रहित अशी ही घ्यावी. ही जर दोन दिवस प्रदोषव्यापिनी असेल, अथवा दुसऱ्या दिवशीं जर हिची प्रदोषकाळीं एकदेशव्याप्ति असेल, तर दुसऱ्याच दिवसाची घ्यावी; कारण पहिल्या दिवशीं कल्याणीदोष येतो. दुसऱ्या दिवशीं प्रदोषकाळीं जर स्पर्श होत नसेल व पहिल्या दिवशीं प्रदोषकाळीं कल्याणी असेल अशावेळीं दुसऱ्या दिवशीं जर पौर्णिमा साडेतीन प्रहर किंवा त्यांहून अधिक असेल तर, व त्याच्या पुढच्या दिवशीं जर प्रतिपदेची वृद्धि असेल तर, दुसऱ्या दिवशींच्या प्रदोषव्यापिनी प्रतिपदेंत होळी करावी. अशावेळीं प्रतिपदेचा जर क्षय असेल, तर कल्याणीच्या शेवटच्या भागांत अथवा कल्याणीची सुरवात तेवढी सोडून, कल्याणींतच होळी करावी. दुसऱ्या दिवशीं प्रदोषकाळीं जर स्पर्शाचा अभाव असेल आणि पहिल्या दिवशीं निशीथ-काळीं जर कल्याणी संपत असेल तर कल्याणी संपल्यानंतर होळी पेटवावी. कल्याणी जर निशीथकालानंतर संपत असेल,तर कल्याणीचें तोंड सोडून कल्याणींतच होळी करावी. कल्याणीचा आरंभ जर प्रदोषकालीं होत असेल, तर कल्याणीनंतर किंवा प्रदोषा-नंतर होळी पेटवावी. दोन्ही दिवशीं प्रदोषकाळीं जर पुनवेचा स्पर्श नसेल व पहिल्या दिवशींच कल्याणीचें शेंपूट असेल, तर त्यांतच होळी करावी. तसा भाग नसल्यास कल्याणींतच प्रदोषकालानंतर होळी करावी. कारण, कल्याणीचें पूर्वार्ध रात्रीं ग्राह्य होय असें जरी वचन आहे, तरी पहिल्या दिवसाच्या प्रदोषकाळीं चतुर्दशींत किंवा दुसऱ्या दिवशीं सायान्हादिकाळीं होलिका करूं नये. होळी दिवसां करणें हें सर्व ग्रंथाच्या विरुद्ध आहे. हें होलिकापूजन, श्रवणाकर्माप्रमाणें जेवण झाल्यावरही करतात, व तें योग्यहि आहे. कोणी होळीची पूजा करून मग जेवतात. त्यांना जेवणाला किंवा होळीच्या पूजेला नियमानें शास्त्रांत सांगितलेला काळ मिळत नाहीं. पुनवेला जर चंद्र-ग्रहण असेल, तर वेधांत होळीचें पूजन करावें. जर ग्रहण लागलेल्या स्थितींतच उदय पावत असेल, तर ग्रहणांतच होळीचें पूजन करावें व प्रदोषकाळीं पुनव नसल्यास पूर्वदिवशीं करावें.

अथ भद्रामुखपुच्छलक्षणम् । पूर्णिमायां भद्रायास्तृतीयेपादान्तेघटीत्रयं पुच्छम् चतुर्थपादाद्यघटीपञ्चकंमुखम् तथाचमध्यममानेनषष्टिघटीमितायां पूर्णिमायांपौर्णिमाप्रवृत्त्युत्तरंसार्धैकोनविंशतिघटिकोत्तरंघटीत्रयंपुच्छम् सार्ध-द्वाविंशतिघटिकोत्तरंघटीपञ्चकंमुखम् तिथेश्चतुःषष्टिघटीमितत्वे पूर्णिमायाएक-विंशतिघटिकोत्तरंपुच्छम् चतुर्विंशतिघटिकोत्तरंमुखम् एवंतिथेर्मानान्तरेप्यूह्यम् ।

**कल्याणीचें मुखपुच्छलक्षण**—पुनवेंत असणाऱ्या कल्याणीच्या तिसऱ्या पादाच्या ज्या शेवटच्या घटका तें तिचें पुच्छ होय. आणि चौथ्या पादाच्या पहिल्या पांच घटका तें तिचें मुख होय. याचा अर्थ असा कीं, मध्यममानानें पौर्णिमा साठघटका असतांना, पुनवेच्या आरंभानंतर १९॥ घटकांनंतरच्या ज्या तीन घटका तेंच पुच्छ, आणि २२॥ घटकांनंतरच्या ज्या पांच घटका तें मुख. पुनव जर चौसष्ट घटका असेल. तर तिच्या २१ घटकांनंतर पुच्छ व २४ घटकांनंतर मुख असतें. याप्रमाणें तिथीचें प्रमाण इतर असतांहि समजावें.

पूजाविधिः देशकालौसंकीर्त्यसकुटुम्बस्यममढुण्ढाराक्षसीप्रीत्यर्थंतत्पीडापरिहारार्थंहोलिकापूजनमहंकरिष्येइतिसंकल्प्य शुष्काणांकाष्ठानांगोमयपिण्डानांचराशिंकृत्वावह्निनाप्रदीप्यतत्र अस्माभिर्भयसंत्रस्तैःकृतात्वंहोलिकेयतः। अतस्त्वांपूजयिष्यामिभूतेभूतिप्रदाभव १ इतिपूजामन्त्रेणश्रीहोलिकायैनमोहोलिकामावाहयामीत्यावाह्य होलिकायैनमइतिमन्त्रेणासनपाद्यादिषोडशोपचारान्दत्त्वा तमग्निंत्रिःपरिक्रम्यगायन्तुचहसन्तुच। जल्पन्तुस्वेच्छयालोकानिःशङ्कायस्ययन्मतम् १ ज्योतिर्निबन्धे पञ्चमीप्रमुखास्तासुतिथयोनन्तपुण्यदाः। दशस्युःशोभनास्तासुकाष्ठस्तेयंविधीयते १ चाण्डालसूतिकागेहाच्छिशुहारितवह्निना। प्राप्तायांपूर्णिमायांतुकुर्यात्तत्काष्ठदीपनम् २ ग्रामाद्बहिश्चमध्येवातूर्यनादसमन्वितः। स्नात्वाराजाशुचिर्भूत्वास्वस्तिवाचनतत्परः ३ दत्त्वादानानिभूरीणिदीपयेद्धोलिकाचितिम्। ततोभ्युक्ष्यचितिंसर्वांसाज्येनपयसासुधीः ४ नारिकेलानिदेयानिबीजपूरफलानिच। गीतवाद्यैस्तथानृत्यै रात्रिःसानीयतेजनैः ५ तमग्निंत्रिःपरिक्रम्यशब्दैर्लिङ्गभगाङ्कितैः। तेनशब्देनसापापाराक्षसीतृप्तिमाप्नुयात् ६ एवंरात्रौहोलिकोत्सवंकृत्वा प्रातःप्रतिपदियःश्वपचंदृष्ट्वास्नानंकुर्यात् नतस्यदुष्कृतंकिंचिन्नाधयोव्याधयोपिच। कृत्वाचावश्यकार्याणिसंतर्प्यपितृदेवताः १ वन्दयेद्धोलिकाभूतिंसर्वदुष्टोपशान्तये । वन्दनेमन्त्रः वन्दितासिसुरेन्द्रेणब्रह्मणाशंकरेणच। अतस्त्वंपाहिनोदेविभूतेभूतिप्रदाभव १ इति होलिकादिनंकरिसंज्ञकतदुत्तरदिनंचशुभेवर्ज्यम् होलिकाग्रहणभावुकाय नंप्रेतदाहदिवसोत्रपञ्चमः । तत्परंचकरिसंज्ञकं दिनंवर्जितंसकलकर्मसूभयम् इत्युक्तेः ग्रहणायनप्रेतदाहेषुनिशीथविभागेनपूर्वदिनकरिदिनयोर्निर्णयोज्ञेयः नरोदोलागतंदृष्ट्वागोविन्दंपुरुषोत्तमम्। फाल्गुन्यांसंयतोभूत्वागोविन्दस्यपुरंव्रजेत् १ ।

**होळीचा पूजाविधि**—देशकालादिकांचा उच्चार केल्यावर 'सकुटुम्बस्य मम ढुण्ढाराक्षसीप्रीत्यर्थं तत्पीडापरिहारार्थं होलिकापूजनमहं करिष्ये' असा संकल्प करून, वाळलेलीं लाकडें व गोवऱ्या यांची रास करावी आणि ती विस्तवानें पेटल्यावर, 'अस्माभिर्भयसंत्रस्तैः कृता त्वं होलिके यतः। अतस्त्वां पूजयिष्यामि भूते भूतिप्रदाभव॥' या पूजामंत्रानें 'श्रीहोलिकायैनमः श्रीहोलिकां आवाहयामि' असें आवाहन केल्यानंतर 'होलिकायैनमः' या वाक्यानें

आसन, पाद्य वगैरे षोडशोपचार देऊन, पेटलेल्या अग्नीला तीन प्रदक्षिणा घालाव्या. गायन, वादन, हास्य व मनःपूत बडबड हीं सर्वांनीं निःशंकपणें करावींत. या बाबतींत ज्योतिर्निबन्धग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, शुद्ध पंचमीपासून वद्य पंचमीपर्यंतच्या ज्या तिथि पुण्यदायक आहेत, त्यांतल्या दहा तिथि उत्तम असून, अनंत पुण्यकारक आहेत. या दिवसांत लांकडांची चोरी करून, तीं लांकडें पुनवेला चाण्डाळ अथवा बाळंतीण यांच्या घरांतून बालकाकडून आणविलेल्या विस्तवानें पेटवावींत. होळी गांवाबाहेर अथवा गांवांत करावी. राजानें वाद्यें वाजविल्यावर स्नान करून शुचिर्भूत व्हावें आणि पुण्याहवाचन केल्यावर पुष्कळ दानें देऊन होळी पेटवावी. नंतर दुधातुपांनीं ती विझवून, नारळ व महाळुंगें वांटावींत. ती रात्र—गायन, वादन नृत्य वगैरेंत लोक घालवितात. पेटलेल्या होळीला तीन प्रदक्षिणा घालून, लोक शंखनाद (बोंम्ब) करतात. बोंब मारणारानें ती दुष्टा राक्षसी तृप्त व्हावी असा लोकांचा त्यांत उद्देश असतो. रात्रीं याप्रमाणें होळीचा उत्सव केल्यानंतर, प्रतिपदेच्या सकाळीं चांडाळाला पाहून जो स्नान करतो, त्याचा पापनाश होऊन आधिव्याधींच्या पीडेपासून तो मुक्त होतो. रोजचीं अवश्यक कर्में करून पितृतर्पण केल्यावर, होळीच्या राखेला सर्व दुष्फलांचा निरास होण्यासाठीं जें वंदन करावें, त्याचा मंत्र असाः—'वन्दितासि सुरेंद्रेण ब्रह्मणा शंकरेणच। अतस्त्वं पाहिनो देवि भूते भूतिप्रदा भव॥' होळीचा दिवस आणि तिच्या पुढचा करि नांवाचा दिवस हे शुभकार्याला वर्ज्य करावेत. कारण—होळी, ग्रहण, भावुका (वैशाखी अमावास्या) अयनसंक्रांतीचे दिवस व प्रेतदहन केल्याचा दिवस हे सारे व त्याच्या पुढचे करिनांवाचे दिवस, हे सर्व शुभकार्यांत वर्ज्य करावेत असें वचन आहे. ग्रहण, अयन, संक्रांति व प्रेतदहनाचा दिवस यांत मध्यरात्रीच्या विभागानें पूर्वदिवस व करिदिवस यांचा निर्णय समजावा. फाल्गुनी पुनवेला मनुष्यानें व्रतस्थ राहून, पुरुषोत्तम गोविन्दाला झोंपाळयावर झोंके द्यावेत व त्याचें दर्शन घ्यावें, म्हणजे त्याला वैकुंठप्राप्ति होते.

**फाल्गुनकृष्णप्रतिपदि वसन्तारम्भोत्सवः साचौदयिकीग्राह्या दिनद्वयेसत्त्वे-पूर्वा अत्रतैलाभ्यङ्गउक्तः अत्रप्रतिपदिचूतपुष्पप्राशनमुक्तम् तत्प्रकारः गोमयोपलिप्तगृहाङ्गणेशुक्लवस्त्रासनउपविष्टःप्राङ्मुखःसुवासिन्याकृतचन्दनतिलक नीराजनःसचन्दनमाम्रकुसुमंप्राश्नीयात् तत्रमन्त्रः चूतमग्र्यंवसन्तस्य माकन्द-कुसुमं तव। सचन्दनंपिबाम्यद्यसर्वकामार्थसिद्धये १ इति।**

**आम्रकुसुमप्राशन**—फाल्गुन वद्य प्रतिपदेला वसन्ताच्या प्रारंभाचा उत्सव करावा. ही प्रतिपदा सूर्योदयव्यापिनी असेल, तर पहिल्या दिवसाची घ्यावी. या दिवशीं तैलाभ्यंग करण्यास सांगितलें आहे. या प्रति-पदेला आंब्याचा मोहोर खावा, त्याचा प्रकार असाः—गाईच्या शेणानें सारव-लेल्या घराच्या अंगणांत पांढऱ्या वस्त्राच्या आसनावर पूर्वाभिमुख करून बसावें. नंतर सुवासिनीकडून चंदनाचा टिळा लावून घेऊन, नीरांजन ओवाळून घेतल्यावर

चंदनयुक्त आंब्याचा मोहोर— 'च्यूतेमग्र्यं वसन्तस्य माकन्दकुसुमंतव। सचन्दनं पिबामद्य सर्वकामार्थसिद्धये ॥ ' हा मंत्र म्हणून खावा.

कृष्णद्वितीयायांदेशग्रामाधिपतिर्विततवितानादिशोभितेदेशेरम्यासनेउपविश्यपौरजानपदान्लोकान्सिन्दूरादिक्षोदैः चन्दनादिभिः पट्टवासैश्चविकीर्यतेभ्यस्ताम्बूलादिदत्वानृत्यगीतविनोदैर्महोत्सवंकुर्यात् इदानींप्राकृतजनास्तुकृष्णपञ्चमीपर्यन्तमेतमुत्सवंकुर्वन्ति इतिहोलिकोत्सवः।

**फाल्गुनवद्यद्वितीयामहोत्सव**—फाल्गुन वद्य द्वितीयेला—देश, गांवें वगैरेंच्या अधिपतींनीं छत लावून सुशोभित केलेल्या आणि विस्तृत अशा जागेमधल्या रम्य आसनावर बसून—देशांतल्या व गांवांतल्या लोकांवर—शेंदूर, गुलाल, चंदन, बुक्का वगैरे उधळून त्यांना विडे द्यावेत, आणि नृत्यगीतविनोदादिकांनीं महोत्सव करावा. हा उत्सव सध्यां वद्य ( रंग ) पंचमीपर्यंत लोक करतात.

फाल्गुनामावास्यामन्वादिःसापराह्णव्यापिनीग्राह्या इति श्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेफाल्गुनमासकृत्यनिर्णयोद्देशः समाप्तः

**फाल्गुनी अमावास्या**—ही मन्वादि आहे. ही अपराह्णव्यापिनी घ्यावी. याप्रमाणें श्रीमदनन्तोपाध्यायांचे पुत्र जे काशीनाथोपाध्याय त्यांनीं धर्मसिंधुसारांत सांगितलेल्या फाल्गुनमासांतल्या कृत्यांचा निर्णयोद्देश येथें संपला.

अथपरिच्छेदद्वयशेषत्वेनप्रकीर्णप्रकरणमुच्यते द्वादशस्वपिमासेषुश्राद्धेव्यतीपातादियोगस्यभरण्यादिनक्षत्रस्यचापराह्णव्याप्त्यादर्शवन्निर्णयोज्ञेयः उपवासादौप्रचुराचाराभावान्नोक्तः अथचान्द्रसांवत्सरभेदाः प्रभवोविभवःशुक्लः प्रमोदोथप्रजापतिः । अङ्गिराःश्रीमुखोभावोयुवाधातातथैवच १ ईश्वरोबहुधान्यश्चप्रमाथीविक्रमोवृषः। चित्रभानुःसुभानुश्चतारणःपार्थिवोव्ययः २ सर्वजित्सर्वधारीचविरोधीविकृतिःखरः । नन्दनोविजयश्चैवजयोमन्मथदुर्मुखौ ३ हेमलम्बोविलम्बोथविकारीशार्वरीप्लवः । शुभकृच्छोभकृत्क्रोधीविश्वावसुपराभवौ ४ प्लवङ्गःकीलकःसौम्यः साधारणविरोधकृत्। परिधावीप्रमादीच आनन्दोराक्षसोनलः ५ पिङ्गलःकालयुक्तश्चसिद्धार्थीरौद्रदुर्मती। दुन्दुभीरुधिरोद्गारीरक्ताक्षीक्रोधनःक्षयः ६ इति रवेःराशिसंक्रमवन्नक्षत्रसंक्रमेपिषोडशनाड्यः पूर्वत्रपरत्रचपुण्यकालः।

**पहिल्या दोन परिच्छेदांत रचिलेल्या प्रकरणांचा निर्णय**— बारा महिन्यांत येणारे जे व्यतिपातादि योग व भरण्यादि नक्षत्रें-यांवर करण्याच्या श्राद्धांचा निर्णय, दर्शाप्रमाणेंच अपराह्णव्याप्तीचा समजावा. या योगांवर उपास वगैरे करण्याचा विशेषसा परिपाठ नसल्यानें त्याबद्दल येथें कांहींच सांगितला नाहीं. चंद्रसंवत्सरांचीं नांवें येणेंप्रमाणें:—प्रभव, विभव, शुक्ल, प्रमोद, प्रजापति, अंगिरा, श्रीमुख, भाव, युवा,

धाता, ईश्वर, बहुधान्य, प्रमाथी, विक्रम, वृष, चित्रभानु, सुभानु, तारण, पार्थिव, व्यय, सर्वजित्, सर्वधारी, विरोधी, विकृति, खर, नंदन, विजय, जय, मन्मथ, दुर्मुख, हेमलम्बी, विलम्बी, विकारी, शार्वरी, प्लव, शुभकृत्, शोभकृत्, क्रोधी, विश्वावसु, पराभव, प्लवङ्ग, कीलक, सौम्य, साधारण, विरोधकृत्, परिधावी, प्रमादि, आनंद, राक्षस, अनल, पिंगल, कालयुक्त, सिद्धार्थी, रौद्र, दुर्मति, दुंदुभि, रुधिरोद्गारी, रक्ताक्षी, क्रोधन आणि क्षय. सूर्याच्या राशिसंक्रमणाप्रमाणें नक्षत्रसंक्रमणाच्या आधींच्या व पुढच्या सोळा घटका पुण्यकाळ असतो असें जाणावें.

**अथचन्द्रादीनांसंक्रान्तौपुण्यकालः चन्द्रस्यसंक्रान्तौप्राक्परत्रचत्रयोदश पलाधिकाएकाघटीपुण्यकालः भौमस्यैकपलाधिकाश्चतस्रोनाडयः बुधस्यचतुर्दशपलाधिकास्तिस्रः गुरोःसप्तत्रिंशत्पलाधिकाश्चतस्रः शुक्रस्यैकपलाधिकाश्चतस्रः शनेःसप्तपलाधिकाःषोडश एताःसर्वाःप्राक्परत्रचबोद्धव्याः रात्रौग्रहान्तराणांसंक्रमेरात्रावेवपुण्यकालः सूर्यसंक्रान्तिवद्दिवापुण्यत्वविधायकाभावात् चन्द्रादिसंक्रान्तिषुस्नानंकाम्यं नतु नित्यम् ।**

**चंद्रादिग्रहांच्या संक्रांतीचा पुण्यकाल**—चंद्रसंक्रांतीच्या आधींची व नंतरची एक घटका तेरा पळें पुण्यकाळ. मंगळसंक्रांतीच्या चार घटका एक पळ. बुधसंक्रांतीच्या तीन घटका चौदा पळें. गुरुसंक्रांतीच्या चार घटका सदतीस पळें. शुक्रसंक्रांतीच्या चार घटका एक पळ. शनिसंक्रांतीच्या सोळा घटका सात पळें. हीं सर्व घटका व पळें, संक्रमणाच्या पूर्वींचीं व नंतरचीं समजावींत. सूर्यावांचून इतर ग्रहांचें संक्रमण जर रात्रीं होईल, तर त्याचा पुण्यकाळ रात्रींच समजावा; कारण सूर्यसंक्रांतीप्रमाणें त्याचा पुण्यकाळ दिवसासच असल्याचें वचन कोठेंच नाहीं. चंद्रादि ग्रहांच्या संक्रमणकाळीं स्नान करणें हें काम्य आहे, आवश्यक नाहीं.

**आदित्यादिसूचितपीडानिरासार्थस्नानानि मञ्जिष्ठागजमदकुंकुमरक्तचन्दनानिजलपूर्णताम्रपात्रेप्रक्षिप्यस्नानंसूर्यपीडाहरम् उशीरशिरीषकुंकुमरक्तचन्दन युतशंखतोयेनस्नानंचन्द्रदोषहरम् खदिरदेवदारुतिलामलकयुतरौप्यपात्रजलेन स्नानंभौमे गजमदयुतसङ्गमजलेनमृत्पात्रस्थेनस्नानं बुधे औदुम्बरबिल्ववटामलकानांफलैर्युतसौवर्णपात्रजलेनस्नानंगुरौ गोरोचनगजमदशतपुष्पाशतावरीयुतराजतपात्रजलेनस्नानंशुक्रे तिलमाषप्रियङ्गुगन्धपुष्पयुतलोहपात्रस्थजलेनं स्नानंशनौ गुग्गुलुहिङ्गुहरितालमनःशिलायुतमहिषशृंगपात्रजलेनस्नानं राहौ वराहोत्खातपर्वताग्रमृच्छागक्षीरयुतखड्गपात्रजलेनस्नानंकेतौ ।**

**सूर्यादि ग्रहपीडानिवारणार्थ स्नानें**—मंजिष्ठ, गजमद, केशर व रक्तचंदन हीं पाण्यानें भरलेल्या तांब्याच्या भांड्यांत घालून जर स्नान केलें, तर रविपीडा दूर होते. वाळा, शिरीष (तीळ), केशर व रक्तचंदन यांच्या शंखोदकानें स्नान केल्यास चन्द्रपीडा दूर होते. खैर, देव-

दार, तीळ व आंवळे हीं रुप्याच्या भांड्यांत घालून, त्या पाण्यानें स्नान केल्यास मंगळ-पीडा जाते. गजमद घातलेलें संगमाचें पाणी मातीच्या भांड्यांत घालून, त्याचें स्नान केल्यास बुधाची पीडा जाते. उम्बर, बेल, वड व आंवळी यांचीं फळें सोन्याच्या भांड्यांतल्या पाण्यांत घालून, त्यानें स्नान केल्यानें, गुरुपीडेचें शमन होतें. गोरोचन, गजमद, बडीशेप व शतावरी हीं रुप्याच्या पात्रांतील पाण्यांत टाकून, त्यानें स्नान केल्यानें शुक्रपीडा नाहींशी होते. तीळ, उडीद, प्रियंगु ( लांबट मिऱ्यें, केशर किंवा बायकांचा स्पर्श झाल्यानें फुलें येणारी वेल, असें या शब्दाचें वर्णन आहे), गंध व पुष्प हीं लोखंडाच्या भांड्यांतल्या पाण्यांत घालून, त्यानें स्नान केल्यानें शनिपीडा जाते. गुग्गुळ, हिंग, हरताळ व मनशीळ या वस्तु घातलेल्या रेड्याच्या शिंगांतल्या पाण्यानें स्नान केल्यास, राहुपीडा जाते. डुकरानें उकरलेली पर्वतशिखराची माती आणि मेंढीचें दूध यांनीं मिश्रित केलेलें पाणी तरवारीच्या म्यानांत घालून, [खड्गपात्र] त्यानें स्नान केल्यास केतुपीडा दूर होते.

**अथग्रहप्रीत्यर्थदानानि माणिक्यगोधूमधेनुरक्तवस्त्रगुडहेमताम्ररक्तचन्दन-कमलानिरवेःप्रीत्यर्थदानानि वंशपात्रस्थतण्डुलकर्पूरमौक्तिकश्वेतवस्त्रघृतपूर्ण-कुम्भवृषभाश्चन्द्रस्य प्रवालगोधूममसूरिकारक्तवृषगुडसुवर्णरक्तवस्त्रताम्राणि-भौमस्य नीलवस्त्रसुवर्णकांस्यमुद्गगारुत्मतदासीहस्तिदन्तपुष्पाणिबुधस्य पुष्प-रागमणिहरिद्राशर्कराश्वपीतधान्यपीतवस्त्रलवणसुवर्णानिसुरगुरोः चित्रवस्त्रश्वे-ताश्वधेनुवज्रमणिसुवर्णरजतगन्धतण्डुलाःशुक्रस्य इन्द्रनीलमाषतैलतिलकुलित्थ-महिषीलोहकृष्णधेनवःशनेः गोमेदाश्वनीलवस्त्रकम्बलतैलतिललोहानिराहोः वैडूर्यतैलतिलकम्बलकस्तूरीच्छागवस्त्राणिकेतोर्दानानि शनिपीडापरिहारार्थ-शनिवारेतैलाभ्यङ्गस्तैलदानंच ।**

**ग्रहदानें**----रवीच्या शान्तीकरितां---माणिक, गहूं, गाय, तांबडें वस्त्र, गूळ, सोनें, तांबें, रक्तचंदन व कमळ–हीं दानें द्यावींत. चंद्राच्या शान्त्यर्थ–वेळूच्या भांड्यांत तांदूळ, कापूर, मोतीं, पांढरें वस्त्र, तूप भरलेला कुंभ व बैल--हीं त्यानें द्यावींत. मंगळाच्या तृप्तीसाठीं–प्रवाळ, गहूं, मसुरा, तांबडा बैल, गूळ, सोनें, तांबडें वस्त्र व तांबें यांचीं दानें करावींत. बुधतापशमनार्थ निळें वस्त्र, सोनें, कांसें, मूग, पाच, दासी, हस्तीदंत व पुष्पें–हीं दानें द्यावींत. गुरूची तृप्ति व्हावी म्हणून--पुष्पराग मणि, हळद, साखर, घोडा, पिवळें धान्य, पिवळें वस्त्र, मीठ व सोनें–हीं दानें द्यावींत शुक्राच्या प्रियतेसाठीं–रंगारंगाचें वस्त्र, पांढरा घोडा, गाय, हिरा, सोनें, रुपें, गन्ध व तांदूळ हीं दानें द्यावींत. शनीच्या पीडेच्या शमनार्थ---इंद्रनीलमणि, उडीद, तेल, तीळ, हुलगे, ( कुलित्थ ) म्हैस, लोखंड व काळी गाय--यांचीं दानें द्यावींत. राहु-पीडाशमनार्थ–गोमेदमणि, घोडा, निळें वस्त्र, कांबळा, तेल, तिल व लोखंड हीं दानें द्यावींत. केतुपीडानिवारणार्थ वैडूर्यमणि, तेल, तीळ, कांबळा, कस्तुरी, मेंढा व वस्त्र–हीं दानें करावींत. शनीची पीडा जाण्यासाठीं शनिवारीं तैलाभ्यंग करून तेलाचें दान करावें.

अथशनिव्रतम् लोहमयंशनिंतैलकुम्भेलोहेमृन्मयेवानिक्षिप्यकृष्णवस्त्राभ्यां-कम्बलेनवायुतंकृष्णैः सुगन्धपुष्पैश्चकृसरान्नैस्तिलोदनैः पूजयित्वा कृष्णाय-द्विजाय तदभावेऽन्यस्मैसशनिर्देयः तत्रशन्नोदेवीरितिमन्त्रः शूद्रादेस्तु यःपुन-र्नष्टराज्यायनलायपरितोषितः। स्वप्नेददौनिजंराज्यंसमेसौरिःप्रसीदतु १ नमोर्क-पुत्रायशनैश्चरायनीहारवर्णाञ्जनमेचकाय। श्रुत्वारहस्यंभवकामदस्त्वंफलप्रदो-मेभवसूर्यपुत्र २ इत्यादयः एवंव्रतंप्रतिशनिवारंसंवत्सरंकार्यम् कोणस्थः पिङ्गलोबभ्रुःकृष्णोरौद्रोन्तकोयमः। सौरिःशनैश्चरोमन्दःपिप्पलादेनसंस्तुतः। इतिदशनामानिवानित्यंपठनीयानि अथशनिस्तोत्रम् पिप्पलादउवाच नमस्ते कोणसंस्थायपिङ्गलायनमोस्तुते। नमस्तेबभ्रुरूपायकृष्णायचनमोस्तुते १ नमस्ते रौद्रदेहायनमस्तेचान्तकायच। नमस्तेयमसंज्ञायनमस्तेसौरयेविभो २ नमस्ते-मन्दसंज्ञायशनैश्चरनमोस्तुते। प्रसादंकुरुदेवेशदीनस्यप्रणतस्यच ३ अनेनस्तो-त्रेणप्रत्यहं प्रातःशनिस्तवनेनसार्धसप्तवार्षिकशनिपीडानाशः।

**शनिव्रत**—शनीची लोखंडाची मूर्ति करून, ती तेलानें भरलेल्या लोखंडाच्या किंवा मातीच्या घड्यांत ठेवावी. तिच्या भोंवतीं दोन काळीं वस्त्रें किंवा कांबळा यांचें वेष्टन करावें. काळीं सुगन्धी फुलें, तिलमिश्रित अन्न, तिळांची खिचडी वगैरेंनीं त्या मूर्तीची पूजा करावी व नंतर ती मूर्ति काळ्या रंगाच्या ब्राह्मणाला किंवा तसा न मिळाल्यास इतर ब्राह्मणाला 'शंनोदेवी०' या मंत्रानें दान करावी. दान करणारा जर शूद्र असेल, तर 'यः पुनर्नष्टराज्यायनलायपरितोषितः। स्वप्नेददौनिजं राज्यं स मे सौरिःप्रसीदतु ॥ नमोर्कपुत्राय शनैश्चराय नीहारवर्णाञ्जनमेचकाय। श्रुत्वा रहस्यं भव कामद त्वं फलप्रदो मे भव सूर्यपुत्र ॥' वगैरे मंत्रांनीं दान करावें. या प्रमाणें दर शनिवारीं एकवर्षपर्यंत करावें. किंवा 'कोणस्थः पिङ्गलो बभ्रुः कृष्णो रौद्रोन्तको यमः। सौरिः शनैश्चरो मन्दः पिप्पलादेन संस्तुतः ॥' हीं दहा नांवें रोज म्हणावींत. शनिस्तोत्र—पिप्पलाद उवाच। नमस्ते कोणसंस्थाय पिंगलाय नमोस्तुते। नमस्ते बभ्रुरूपाय कृष्णायच नमोस्तुते। प्रसादं कुरु देवेश दीनस्य प्रणतस्यच ॥' या स्तोत्रानें रोज सकाळीं शनीची प्रार्थना केल्यानें, साडेसात वर्षांच्या शनीच्या पीडेचा (साडेसातीचा) निरास होतो.

रविवारेसूर्यपूजोपवाससूर्यमन्त्रजपैःसर्वरोगनाशः ह्रींह्रींसःसूर्यायेतिषड-क्षरःसूर्यमन्त्रः इतिश्रीमत्काश्युपाध्यायसूरिसूनुयज्ञेश्वरोपाध्यायानुजानन्तोपा-ध्यायसूरिसुतकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिन्धुसारे प्रकीर्णनिर्णयः।

**सर्वरोगनाशक सूर्यमंत्र**—रविवारीं—सूर्याची पूजा, उपास व सूर्यमन्त्राचा जप—हीं केलीं असतां सर्व रोगांचा नाश होतो. 'ह्रीं-ह्रींसः सूर्याय' हा जो सूर्याचा सहा अक्षरी मंत्र तो जपावा. याप्रमाणें, श्रीकाश्युपाध्यायसूरींचा पुत्र जो यज्ञेश्वरोपाध्याय त्याच्या अनन्तोपाध्याय नांवाच्या अनुयायाच्या काशीनाथोपाध्याय नांवाच्या पुत्रानें रचिलेल्या धर्मसिंधुसार नांवाच्या ग्रंथांतल्या प्रकीर्णनिर्णयाची येथें समाप्ति झाली.

ग्रन्थप्रयोजनसमूलत्वादिकं । उक्तआद्यपरिच्छेदेसामान्येनाविनिर्णयः । द्वितीयेस्मिन्परिच्छेदेविशेषेणानिर्णयः १ मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोनलसानराः । कृतकार्याःप्राङ्नबन्धैस्तदर्थंनायमुद्यमः २ येपुनर्मन्दमतयोलसा अज्ञाश्चनिर्णयम् । धर्मेवेदितुमिच्छन्तिरचितस्तदपेक्षया ३ निबन्धोयंधर्मसिन्धुसारनामासुबोधनः अमुनाप्रीयतांश्रीमद्विठ्ठलोभक्तवत्सलः ४ सर्वत्रमूलवचनानीहज्ञेयानितद्विचारश्च । कौस्तुभनिर्णयसिन्धुश्रीमाधवकृतनिबन्धेभ्यः ५ प्रेम्णासाद्भिर्ग्रन्थःसेव्यःशब्दार्थतःसदोषोपि । संशोध्यवापिहरिणासुदाममुनिसतुषपृथुकमुष्टिरिव ६ इति श्रीमत्काश्युपाध्यायसूरिसूनुयज्ञेश्वरोपाध्यायानुजानन्तोपाध्यायसूरिसुतकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिन्धुसारेप्रकीर्णनिर्णयोद्देशःसमाप्तः ॥

**ग्रंथप्रयोजन**—पहिल्या परिच्छेदांत सामान्य निर्णय सांगून, दुसऱ्यांत विशेष निर्णय सांगितला. मीमांसा व धर्मशास्त्र जाणणारे जे बुद्धिमान् आणि आलस्यरहित पुरुष जे तर प्राचीन ग्रंथ पाहूनच, वेळेचीं कर्मे वेळींच करीत असतात, म्हणून त्यांच्यासाठीं कांहीं हा माझा ग्रंथोद्योग नाहीं. जे मंदमति, आळशी व नेणते असून, धर्मातल्या बाबतींतला निर्णय समजावा असें इच्छितात त्यांच्याकरितां हा धर्मसिंधुसार नांवाचा सुबोध ग्रंथ मीं रचिला आहे. या ग्रंथानें भक्तवत्सल असा जो श्रीमान् विठ्ठल, तो संतुष्ट होवो. या ग्रंथांतल्या सर्व मूलवचनांचा विचार कौस्तुभ, निर्णयसिंधु, माधव वगैरे ग्रंथांत पाहावा. हा ग्रंथ शब्द व अर्थ यांनीं जरी सदोष असला, तरी कोंड्याचे सुदाम्याचे पोहे जसे श्रीकृष्णानें सेवन केले, तद्वत् सज्जनांनीं शोध करून, याचें ग्रहण करावें. याप्रमाणें श्रीमत्काश्युपाध्यायसूरीचा मुलगा जो यज्ञेश्वरोपाध्याय, त्याच्या अनन्तोपाध्याय नांवाच्या अनुयायाच्या काशीनाथ नांवाच्या पुत्रानें लिहिलेल्या धर्मसिंधुसार नांवाच्या ग्रंथांतला प्रकीर्णनिर्णयोद्देश येथें संपला.

## द्वितीय परिच्छेदः समाप्तः

---

श्रीगणेशाय नमः

# अथ तृतीयपरिच्छेदः ।

**श्रीपाण्डुरङ्गमकलङ्ककलानिधानकान्ताननं यदबुधानमनं मुधा न । श्रीवत्सकौस्तुभरमोल्लसितोरसं तं वन्दे पदाब्जभृतनन्ददुदारसन्तम् १**

ज्याचें मुख निष्कलंक चंद्राप्रमाणें आहे. अज्ञानी जनांनीं ज्याला नमन केलें असतां तें निष्फल होत नाहीं, श्रीवत्स, कौस्तुभ आणि लक्ष्मी हीं ज्याच्या वक्षस्थळा-

वर शोभत आहेत आणि ज्याच्या चरणकमलांच्या आश्रयानें थोर साधु आनंद पावतात, त्या पांडुरंगाला मी वंदन करतों.

भीमाप्रियं सुकरुणार्णवमाशुतोषं दीनेष्टपोषमघसंहतिसिन्धुशोषम् ।
श्रीरुक्मिणीमतिमुषं पुरुषं परं तं वन्दे दुरन्तचरितं हृदि संचरन्तम् २

ज्याला भीमा नदी प्रिय आहे, जो करुणेचा सागर, तत्काल प्रसन्न होणारा दीनेच्छा पुरविणारा, पातकसमूहसागराचें शोषण करणारा, रुक्मिणीचें मन आकर्षण करणारा व हृदयांत राहाणारा-परम पुरुष पांडुरंगाला मी नमन करतों.

वन्दे प्रतिघ्नन्तमघानि शङ्करं धत्तां स मे मूर्ध्नि दिवानिशं करम् ।
शिवां च विघ्नेशमथो पितामहं सरस्वतीमाशु भजेऽपि तामहम् ३

पातकांचा नाश करून कल्याण करणारा असा जो शंकर, त्याला मी नमस्कार करतों. तो आपला वरदहस्त माझ्या मस्तकावर रात्रंदिवस ठेवो. पार्वती, विघ्नेश गणराज, ब्रह्मदेव आणि सरस्वती या सर्वांना मी प्रणिपात करतों.

श्रीलक्ष्मीं गरुडं सहस्रशिरसं प्रद्युम्नमीशं कपिं
श्रीसूर्यं विधुभौमविद्गुरुकविच्छायासुतान्षण्मुखम् ।
इन्द्राद्यान्विबुधान् गुरूंश्च जननीं तातं त्वनन्ताभिधं
नत्वार्यान्वितनोमि माधवमुखान् धर्माब्धिसारं मितम् ४

श्रीलक्ष्मी, गरुड, शेष, प्रद्युम्न, ईश, हनुमान्, श्रीसूर्य, चंद्र, मंगळ, बुध, शुक्र, शनि, कार्तिकस्वामी, इंद्रादिदेव, गुरु, माता, अनन्त नांवाचा बाप व माधवादिक जे श्रेष्ठ, त्या सर्वांना नमस्कार करून, मी हा धर्माब्धिसार नांवाचा ग्रंथ रचितों.

दृष्ट्वा पूर्वनिबन्धान् प्राच्यांश्च नवांश्च तेषु सिद्धार्थान् ।
प्रायेण मूलवचनान्युज्झित्य लिखामि बालबोधाय ५

जुने व नवे असे पूर्वींचे ग्रंथ पाहून, विशेषतः त्यांतलीं मूलवचनें सोडून, त्यांचे अर्थ मात्र मी अज्ञानी (जिज्ञासू) जनाकरितां लिहितों.

उक्त्वा धर्माब्धिसारेस्मिन्निर्णयं कालगोचरम् । परिच्छेदे प्रथमजे द्वितीये च यथाक्रमम् ६ अथ गर्भादिसंस्कारान्धर्मान्गृह्यादिसंमतान् वक्ष्ये संक्षेपतः संतोऽनुगृह्णन्तु दयालवः ७ काशीनाथाभिधेनात्रानन्तोपाध्यायसूनुना। निर्णीयते यदेतत्तु शोधनीयं मनीषिभिः ८

पहिल्या व दुसऱ्या परिच्छेदांत क्रमानें कालनिर्णय सांगून, गृह्यसूत्रांना मान्य असणारे जे गर्भाधानादि संस्कार व धर्म, ते आतां सांगतों. दयाळु सत्पुरुषांचा माझ्यावर अनुग्रह असो. अनन्तोपाध्यायांचा पुत्र मी काशीनाथ, यांत जो निर्णय सांगतों आहें, त्याचा विद्वानांनीं ( विचारपूर्वक ) शोध करावा.

१ तत्रादौगर्भाधानसंस्कारउच्यते तदुपयोगितयाप्रथमरजोदर्शनेदुष्टमासादि निर्णीयते तत्रचैत्रज्येष्ठाषाढभाद्रपदकार्तिकपौषमासा दुष्टाःप्रतिपद्रिक्ताष्टमीष-

ष्टीद्वादशीपञ्चदश्योऽनिष्टफलास्तिथयःतथा रविभौममन्दवारेषुभरणीकृत्ति-काऽऽर्द्राश्लेषामघापूर्वात्रयविशाखाज्येष्ठानक्षत्रेषुविष्कम्भगण्डातिगण्डशूलव्या-घातवज्रपरिघपूर्वार्धव्यतीपातवैधृतियोगेषुविष्टयांग्रहणेरात्रिसंध्यापराह्णकालेषु निद्रायांजीर्णरक्तनीलचित्रवस्त्रेषुनग्नत्वेपरगृहपरग्रामेषुअल्पाधिकनीलादिरक्त-त्वेचानिष्टफलम् संमार्जनीकाष्ठतृणाग्निशूर्पान्हस्तेदधानाकुलटास्यात् वस्त्रेविष-मारक्तबिन्दवःपुत्रफलाः समाःकन्याफलाः अथ प्रथमर्तौ अक्षतैरासनंकृत्वा तत्रतामुपवेश्य पतिपुत्रवत्यःस्त्रियोहरिद्राकुङ्कुमगन्धपुष्पस्रक्ताम्बूलादितस्यै-दत्वादीपैर्नीराज्यसदीपालंकृतेगृहेतांवासयेयुः सुवासिनीभ्योगंधादिकंलवणमु-द्रादिचदद्यात् ।

**गर्भाधानविधि**—आतां पहिल्यांदां गर्भाधानविधि सांगतों. त्या विधींत उपयोगी असणाऱ्या रजोदर्शनाच्या बाबतींतले जे वाईट महिने वगैरे त्यांचा निर्णय आतां आधीं सांगतों. चैत्र, ज्येष्ठ, आषाढ, भाद्रपद, कार्तिक व पौष हे महिने वाईट होत. प्रतिपदा, चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, अष्टमी, षष्ठी, द्वादशी व पौर्णिमा या तिथी अनिष्ट फल देणाऱ्या आहेत. त्याचप्रमाणें-रविवार, मंगळवार व शनिवार हे वार; भरणी, कृत्तिका, आर्द्रा, आश्लेषा, मघा, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वा-भाद्रपदा, विशाखा व ज्येष्ठा हीं नक्षत्रें; विष्कम्भ, गण्ड, अतिगण्ड, शूल, व्याघात, वज्र, परिघाचें पूर्वार्ध, व्यतिपात व वैधृति हे योग; भद्रा, ग्रहण, रात्र, सन्धिकाल, अपराह्णकाल, निद्रावस्था, जुनें लुगडें, तांबडें, निळें, अथवा बेरंगी वस्त्र, नग्नपणा, दुसऱ्याचें घर व परगांव हीं सर्व वाईट होत. त्याचप्रमाणें रजोदर्शन जर थोडें, पुष्कळ किंवा निळ्या रंगाचें असेल तर त्याचें फळ अनिष्ट समजावें. केरसुणी, लाकडें, गवत, विस्तव, अथवा सूप यांपैकीं कोणतेंही हातीं असतांना जर रजोदर्शन होईल, तर ती कुलटा निघते. वस्त्रावर जर विषम ( १-३-५-७-९ वगैरे ) रक्तबिंदु असले तर ते पुत्रफल देणारे होत व सम असतील तर कन्याफल देणारे होत असें समजावें. पहिल्यां-दाच विटाळशी [ रजोदर्शन ] झाल्यावर अक्षतांचें आसन करून, त्यावर त्या [ विटाळशी ] स्त्रीला बसवावें व नवरा व मुलें असलेल्या, स्त्रियांनीं, तिला—हळद, कुंकू, गंध, पुष्पमाला, विडा वगैरे देऊन दिवे ओंवाळावेत आणि उत्तम तऱ्हेच्या दिव्यांनीं सुशोभित केलेल्या घरांत तिला बसवावें. सुवासिनींना गन्धादि मीठ वगैरे द्यावींत.

अथ सर्वर्तुसाधारणनियमाः। त्रिरात्रमस्पृश्याभूत्वाअभ्यङ्गाञ्जनस्नानदिवा-स्वापाग्निस्पर्शदन्तधावनमांसाशनसूर्याद्यवलोकान्भूमौरेखाकरणंच वर्जयेदधः शयीत अञ्जलिनाताम्रलोहपात्रेणवाजलंनापिबेत् यात्खर्वपात्रेणपिबतितस्याःखर्वः पुत्रःनखनिकृन्तनेकुनखीपुत्रः पर्णेनपानेउन्मत्तइति द्वितीयादिषुऋतुषुप्रवास-गन्धमाल्यादिधारणताम्बूलगोरसभक्षणपीठाद्यारोहणंवर्जयेत् मृन्मयेआयसेभू-मौवाभुञ्जीत ग्रहणादिनिमित्तस्नानप्राप्तौनोदकमज्जनरूपंस्नानंकिन्तुपात्रान्त-रितजलेनस्नात्वा नद्यम्पीडनंकुर्यान्नान्यद्वासश्चधारयेत् । एवंमृताशौचादिनि-

मित्तकस्नानप्राप्तावपि सगोत्रयोर्योनिसम्बन्धिन्योर्वाब्राह्मण्योरजस्वलयोः परस्परं स्पर्शेउक्तरीत्यातदैवस्नानमात्रेण शुद्धिःबुद्ध्यास्पर्शेएकरात्रमुपवासः गोत्रादिसम्बन्धाभावेअबुद्ध्यास्पर्शे तस्मिन्दिनेत्वानभुञ्जीत मत्यास्पर्शेतुआशुद्धेर्न भुञ्जीत भोजनेतुशुद्ध्यनन्तरंतावद्दिनसंख्ययोपवसेत् उपवासाशक्तौतुतत्प्रत्याम्नायब्राह्मणभोजनादि कुर्यात् सर्वत्रशुद्ध्युत्तरपञ्चगव्याशनंज्ञेयम् शूद्रीब्राह्मण्योरजस्वलयोःस्पर्शे आशुद्धेरभोजनंशुद्धौकृच्छ्रप्रायश्चित्तंब्राह्मण्याः शूद्यास्तुपादकृच्छ्रमात्रम् रजस्वलायाः सूतिकायावाचाण्डालादिस्पर्शेआशुद्धेर्नभोजनमतिकृच्छ्रंच अमत्यास्पर्शेप्राजापत्यम् दण्डादिपरंपरयाचाण्डालादिस्पर्शेस्नानमात्रम्भुञ्जानायाःस्पर्शेप्राजापत्यंद्वादशब्राह्मणभोजनंच मिताक्षरायांतु पतितान्त्यजचाण्डालैःकामतः स्पर्शेआशुद्धेरभुक्त्वाशुद्ध्युत्तरंप्रथमेह्निस्पर्शेत्र्यहमुपवासः द्वितीयेद्व्यहं तृतीयेएकाहः अकामतस्तुआशुद्धेरभोजनमात्रम् एवंग्रामकुक्कुटसूकरश्ववायसरजकादिस्पर्शेपि अशक्तौतुस्नात्वा यावन्नक्षत्रदर्शनमभोजनम् भुञ्जानायाःश्वचाण्डालादिस्पर्शेआशुद्धेरभोजनं षड्रात्रं गोमूत्रयावकाहारः अशक्तौसुवर्णदानंविप्रभोजनंवा उच्छिष्टयोरजस्वलयोःस्पर्शे उच्छिष्टचाण्डालेनस्पर्शेवाकृच्छ्रेणशुद्धिः उच्छिष्टद्विजस्पर्शेरजस्वलायास्त्र्यहमूर्ध्वोच्छिष्टे अधरोच्छिष्टेत्वेकाहमुपवासःइत्युक्तम् उच्छिष्टशूद्रस्पर्शेअधिकंकल्प्यम्पुष्पिण्याःसूतक्याद्यशुद्धनरस्पर्शेआशुद्धेरभोजनंभोजनेतुकृच्छ्रम्पञ्चनखद्विशफैकशफपशुस्पर्शेअण्डजस्पर्शेचाशुद्धेरभोजनं रजस्वलायाः श्वजम्बुकगर्दभदंशेआशुद्धेरभोजनम् शुद्धौपञ्चरात्रमुपवासः नाभेरूर्ध्वंदंशेदशरात्रंमूर्ध्निदंशेविंशतिरात्रम् भुञ्जानारजस्वलारजस्वलांपश्यतिचेदाशुद्धेरभोजनं चाण्डालंपश्यतिचेदुपवासत्रयमपि कामतश्चाण्डालंपश्यतिचेत्प्राजापत्यम् रजस्वलायाःशवसूतिकाभ्यांस्पर्शेशुद्ध्यन्तेत्रिरात्रमुपवासः आशुद्धेरभोजनंच भोजनेतुकृच्छ्रम् सर्वत्रब्रह्मकूर्चविधिनापञ्चगव्याशमुक्तमेव आशौचिभिःस्पर्शेस्नानात्प्राग्रजोदर्शनेचतुर्थदिनपर्यन्तमभोजनम् अशक्तौतुसद्यःस्नात्वाभुञ्जीत एवंबन्धुमरणश्रवणेस्नानात्प्राग्रजोदर्शनेपि तथारजोदर्शनोत्तरंबन्धुमरणश्रवणेपिशक्तायाःआशुद्धेरभोजनमशक्तायाःसद्यःस्नानेनभोजनम् सर्वत्रास्पृश्यस्पर्शेअशक्तायाःस्नानेकृतेभोजनम् शुद्ध्यन्तेऽनशनप्रत्याम्नायइतिकेचित् ।

**सर्वसाधारण रजोदर्शननियम**—(विटाळशीनें) तीन दिवस कोणालाही शिवूं नये. तैलाभ्यंग, डोळ्यांत काजळ घालणें, दिवसा झोंप घेणें, विस्तवाला शिवणें, दांत घांसणें, मांस खाणें, सूर्य पाहाणें व जमिनीवर रेघा ओढणें, ह्या गोष्टी वर्ज्य कराव्यात. पलंगादिकांवर न निजतां, खालीं निजावें. ओंजळीनें व तांब्याच्या किंवा लोखंडाच्या भांड्यानें पाणी पिऊं नये. लहान भांड्यानें पाणी पिणाऱ्या स्त्रीला खुजा मुलगा होतो. नखें कुरतडण्यानें वाईट नखांचा मुलगा होतो. व पानांच्या द्रोणादिकांनीं पाणी प्यायल्यास उन्मत्त मुलगा होतो. दुसऱ्या तिसऱ्या वगैरे विटाळशीपणांत प्रवास, गन्धपुष्पादिक, विडा व दूध

यांचा त्याग करावा. पाट, चौरंग वगैरेवर बसूं नये. मातीच्या किंवा लोखंडाच्या भांड्यांत अथवा जमिनीवर जेवण करावें. ग्रहणादिकांच्या निमित्तानें जर आंघोळ करावी लागली, तर पाण्यांत बुडी मारून स्नान करूं नये. दुसऱ्या भांड्यांत पाणी घेऊन, त्यानें आंघोळ करावी. व वस्त्र पिळूं नये. किंवा दुसरेंहि नेसूं नये, सुतकादिकामुळें स्नान करणें भाग झाल्यास, त्या बाबतींतहि असेंच करावें. एका गोत्रांतल्या किंवा सख्ख्या बहिणी अशा दोघी ब्राह्मणी जर विटाळशीपणा न जाणतां एकमेकींना स्पर्श करतील, तर वरीलप्रमाणें स्नान केल्यानें शुद्ध होतात. जाणूनबुजून शिवाशिव केल्यास एक रात्र उपास करावा. गोत्रादिकांचा संबंध नसतां अजाणपणानें जर शिवतील, तर स्नान करावें आणि त्या दिवशीं जेवूं नये. जाणूनबुजून शिवाशिव केल्यास शुद्धि होईपर्यंत जेवण करूं नये, व जेवल्यास जितके दिवस जेवण केलें असेल तितके दिवस शुद्धीनंतर उपास करावा. उपास करण्याची शक्ति नसल्यास, त्याबद्दल ब्राह्मणभोजन घालावें. सर्व शुद्धि झाल्यानंतर पंचगव्य प्यावें. शूद्री व ब्राह्मणी अशांचा जर परस्पर स्पर्श झाला, तर शुद्धि होईपर्यंत ब्राह्मणीनें जेवूं नये; आणि शुद्धीनंतर कृच्छ्र प्रायश्चित घ्यावें. शूद्र स्त्रीनें पादकृच्छ्र प्रायश्चित्त घ्यावें. विटाळशीला किंवा बाळंतिणीला जर चाण्डाळाचा स्पर्श झाला तर शुद्धि होईपर्यंत जेवूं नये. व शुद्धीनंतर अतिकृच्छ्र प्रायश्चित करावें. न समजतां स्पर्श झाला तर प्राजापत्य प्रायश्चित्त करावें. काठी वगैरेच्या परंपरेनें जर चांडाळादिकांचा स्पर्श होईल, तर प्राजापत्य प्रायश्चित्त करून, बारा ब्राह्मणांना जेवूं घालावें. मिताक्षरा ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, पतित, अन्त्यज व चाण्डाळ यांचा जर समजून उमजून स्पर्श होईल तर शुद्धि होईपर्यंत जेवण करूं नये, आणि पहिल्याच दिवशीं जर स्पर्श झाला असेल, तर शुद्धीनंतर तीन दिवस उपास करावा. दुसऱ्या दिवशीं स्पर्श झाल्यास दोन दिवस आणि तिसऱ्या दिवशीं झाल्यास एकच दिवस उपास करावा. अजाणतां स्पर्श झाला असल्यास शुद्धि होईपर्यंत उपास करावा. याप्रमाणेंच—कोंबडा, डुक्कर, कुत्रा, कावळा, धोबी वगैरेंचा स्पर्श झाल्यासहि हाच निर्णय समजावा. उपास करण्याची शक्ति नसल्यास आंघोळ करून नक्षत्र उगवल्यावर जेवावें. जेवत असतांना जर कुत्रा, चाण्डाळ, वगैरेचा स्पर्श झाला तर शुद्धीनंतर सहा रात्रीं गोमूत्रांत शिजवलेले यव खावेत. अशक्त असल्यास सुवर्णदान करावें. किंवा ब्राह्मणभोजन घालावें. उष्ट्यानें जर दोघी विटाळशी एकमेकींना शिवतील, किंवा उष्टेपणांतल्या चाण्डाळाचा जर विटाळ होईल, तर कृच्छ्रप्रायश्चित्तानें शुद्धि होते. उष्ट्या ब्राह्मणाचा विटाळ झाल्यास तीन दिवस उपास करावा. ऊर्ध्वोच्छिष्ट ( जेवणानंतर आचमन न केलेला ) व अधरोच्छिष्ट ( लघुशंकेनंतर आचमन न केलेला ) अशा ब्राह्मणाचा जर स्पर्श होईल, तर एक दिवस उपास करण्यास सांगितलें आहे. उच्छिष्ट शूद्राचा स्पर्श झाल्यास, पूर्वीं सांगितलेल्याहून अधिक प्रायश्चित्त करावें. सुतक्यादिकांचा अशुद्ध स्पर्श जर विटाळशीला झाला, तर शुद्धि होईपर्यंत जेवूं नये. जेवल्यास कृच्छ्रप्रायश्चित्त करावें. द्विशफ ( दोन खुरांचे ) किंवा एकशफ ( एक खुराचे ) असा पशु किंवा पक्षी

यांचा जर स्पर्श होईल, तर शुद्धीनंतर जेवण करावें. रजस्वलेला ( विटाळशीला ) जर कुत्रा, कोल्हा, गाढव वगैरेचा दंश झाला तर शुद्धि होईपर्यंत जेवूं नये व शुद्धीनंतर पांच रात्रीं उपास करावा. दंश जर बेंबीच्या वरच्या शरिराला झाला असेल, तर शुद्धीनंतर दहा रात्रीं उपास करावा. मस्तकाला दंश झाला असल्यास ( शुद्धीनंतर ) वीस रात्रीं उपास करावा. एक विटाळशी जेवीत असतां दुसऱ्या विटाळशीला जर पाहील, तर शुद्धि होईपर्यंत तिनें जेवण करूं नये. चाण्डाळ दृष्टीस पडल्यास शुद्धि होईपर्यंत उपास करावा. आणि शुद्धीनंतर तीन दिवस उपास करावा. मुद्दाम जर चाण्डाळाला पाहील, तर प्राजापत्य प्रायश्चित करावें. विटाळशीला जर प्रेताचा किंवा बाळंतिणीचा स्पर्श होईल, तर शुद्धीपर्यंत उपास करून शुद्धीनंतर तीन रात्रीं उपास करावा. जेवल्यास कृच्छ्रप्रायश्चित्त घ्यावें. वरील सर्व गोष्टींत ब्रह्मकूर्चविधि करून पंचगव्य पिण्यास सांगितलेलें आहेच. सुतक्यादिकांचा स्पर्श झाल्यानें जें स्नान करावयाचें त्याच्या आधीं जर रजोदर्शन होईल, तर चार दिवसपर्यंत जेवूं नये. अशक्त असल्यास स्नानानंतर जेवावें. याप्रमाणेंच बांधव मेल्याचें समजल्यावर स्नानाच्या आधीं जर रजोदर्शन होईल, किंवा रजोदर्शनानंतर जर मृत बांधवाची वार्ता समजेल, तर शुद्धि होईपर्यंत जेवण करूं नये. अशक्त असल्यास स्नान करून जेवावें. अस्पृश्याचा जर स्पर्श झाला, तर स्नानानंतर अशक्तानें जेवावें, असा सर्वत्र नियम समजावा. शुद्धीनंतर आपल्याबद्दल दुसऱ्याकडून उपवास करवावा असेंहि कांहीं ठिकाणीं म्हटलें आहे.

**रजस्वलायाःप्रथमदिननिर्णयस्तुरात्रेःपूर्वभागद्वयेपूर्वदिनंप्रथमम् तृतीयभोगे-रजोदर्शनेउत्तरंदिनंप्रथमंयद्वाऽर्धरात्रात्पूर्वंपूर्वदिनंप्रथमंअर्धरात्रादूर्ध्वं उत्तर-दिनंप्रथमं एवंजननमरणाशौचेपि ज्ञेयम् यस्याःप्रायेणमासेरजोदर्शनंतस्याः सप्तदशदिनपर्यन्तंपुनारजोदर्शनेस्नानाच्छुद्धिः अष्टादशाहेएकरात्रमशुचित्वं-एकोनविंशेद्विरात्रंविंशतिप्रभृतित्रिरात्रम्यस्याः प्रायः पक्षेपक्षेरजोदर्शनंतस्याः दशदिनपर्यन्तंस्नानाच्छुद्धिः एकादशाहेरजोदृष्टौएकाहः द्वादशेद्विरात्रंऊर्ध्वंत्रि-रात्रम्रोगेणयद्रजःस्त्रीणामन्वहंप्रतिवर्ततेतत्रनास्पृश्यत्वं ।किंतुरजोनिवृत्तिपर्यन्तं पाकदैवपित्र्यकर्मानधिकारमात्रम् रोगजेवर्तमानेपिमासजंरजोनियात्येवतत्रसा-वधानासतीत्रिरात्रमशुचिर्भवेत् यत्तुगर्भिण्याः प्राक्प्रसवात्रोगजंरजोदर्शनंतत्र-त्रिदिनमेवाऽऽशौचम् प्रसूतिकायाःकिंचिदूनमासात्पूर्वंरजोनिवृत्तौस्नानमात्रम् पूर्णमासेत्रिरात्रम् उच्छिष्टास्त्रीयदिरजस्वलाभवतितदाशुद्ध्यन्तेऽयहमधरोच्छि-ष्टत्वेकाहमुपवासःअविज्ञातरजोदोषायदिगृहेव्यवहरतितदातयास्पृष्टंगोरसमृद्भा-ण्डादिकंजलादिकंचनत्याज्यम् सूतकवज्ज्ञानकालमारभ्यैवदोषात् अशुचित्वं-तुज्ञानदिनमारभ्यत्रिदिनमितिकेचित् अन्येतुद्वितीयादिदिनेरजसिज्ञातेसूतक-वच्छेषदिनैरेवशुद्धिरित्याहुः ।**

**रजस्वलेच्या पहिल्या दिवसाचा निर्णय**—रात्रीचे तीन भाग करून, त्यांतल्या पहिल्या दोन भागांत जर विटाळशी होईल, तर पूर्वीचा जो दिवस तो पहिला दिवस समजावा

च तिसऱ्या भागांत झाल्यास, पुढच्या दिवसाला पहिला दिवस समजावा. किंवा याचा दुसरा प्रकार असा कीं, अर्धरात्रीच्या आधीं झाल्यास पूर्वींचा पहिला दिवस व अर्धरात्रींनंतर झाल्यास पुढचा तो पहिला दिवस असें समजावें. जनन व मरण यांच्या अशौचासंबंधानेंहि हाच निर्णय जाणावा. जी स्त्री बहुधा एक महिन्यानें विटाळशी होते, ती जर पुनः सतरा दिवसांच्या आंत ऋतुमती होईल, तर स्नान केल्यानें शुद्ध होते. अठराव्या दिवशीं झाल्यावर एक रात्र विटाळ धरावा, एकोणिसाव्या दिवशीं झाल्यास दोन रात्री धरावा आणि विसाव्या दिवसापासून पुढें तीन रात्री विटाळ धरीत जावा. जी स्त्री दर पंधरवड्याला विटाळशी होते, ती जर दहा दिवसांच्या आंत पुन्हा होईल, तर स्नानानें शुद्ध होते. अकराव्या दिवशीं झाल्यास एक रात्र विटाळ धरावा, बाराव्या दिवशीं झाल्यास दोन रात्री व त्यापुढें केव्हांहि झाल्यास तीन रात्री विटाळ धरावा. रोगानें जर रोज विटाळ जात असेल, तर त्याचा जरी विटाळ नाहीं, तरी तशा अवस्थेंत स्वयंपाक, देवकर्म, पितृकार्य वगैरे बाबतींत मात्र ती अनधिकारी असते. रोगानें होणाऱ्या रजोदर्शनावांचून मनोविकारानेंहि रजोदर्शन होतें, त्याबद्दल स्त्रीनें सावध राहून तीन रात्री विटाळ धरावा. प्रसूत होण्यापूर्वीं रोगामुळें जी स्त्री विटाळशी होईल तिनें तीन दिवस विटाळ धरावा. प्रसूतीनंतर एक महिन्यांतच जर रजोदर्शन होईल, तर स्नानानें शुद्धि होते. एक महिन्यानंतर झाल्यास तीन रात्री विटाळ धरावा. उष्टेपणीं जर रजोदर्शन होईल, तर शुद्धीनंतर तीन दिवस तिनें उपास करावा. अधरोच्छिष्टावस्थेंतच जर रजोदर्शन होईल, तर एक दिवस उपास करावा. रजोदर्शन झालें असून, तें समजण्यांत न आल्यानें तिच्या घरांत वावरण्यानें स्पर्शित झालेल्या–दूध, मातीचीं भांडीं, पाणी वगैरे--वस्तूंचा त्याग करूं नये. कारण सुतकाप्रमाणेंच अज्ञानांत दोष नसल्याचें सांगितलें आहे. समजल्यापासून तीन दिवस पर्यंत अशुचित्व असतें असें कांहीं ग्रंथकार सांगतात. दुसऱ्या वगैरे दिवशीं विटाळशीपणा समजल्यास, सुतकाप्रमाणेंच बाकी राहिलेल्या दिवसांचेंच अशुचित्व असतें. असें इतर ग्रंथकार सांगतात.

एवं त्रिदिनंस्थित्वाचतुर्थेहनिषष्टिवारंमृत्तिकाशौचेनमलंप्रक्षाल्यदन्तधावनपूर्वकंसंगवकालेस्नायात् सूर्योदयात्प्राक्स्नानंत्वनाचारः चतुर्थेऽहनि रजोनिवृत्तौभर्तृशुश्रूषणादौशुद्धिः पञ्चमेहनिदैवपित्र्यकर्मणिशुद्धिः कानिचिद्दिनानिरजोयद्यनुवर्तेततदातन्निवृत्तिपर्यन्तंदैवपित्र्ययोर्नशुद्धिः रोगेणत्वनुवृत्तौप्रागुक्तम् केचित्तुचतुर्थदिवसेदर्शेष्ट्यादिश्रौतकर्माणिकर्तव्यानीत्याहुः अपरेतुइतरदिनापेक्षयाचतुर्थदिनस्यैवानुकूलत्वेतत्रैवगर्भाधानंदुष्टरजोदर्शनशान्तिश्चकर्तव्या महासंकटे श्रीसूक्तहोमपूर्वकाभिषेकेणोपनयनादिकमपिचतुर्थेहनिकर्तव्यमित्याहुः अयंचतुर्थेहन्यधिकारनिर्णयःसर्वथारजोनिवृत्तावेवज्ञातव्यः ।

**रजोदर्शनशुद्धीकरणविधि**—विटाळशीपणाचे तीन दिवस झाल्यावर चौथ्या दिवशीं सहा वेळां माती लावून मळ धुवून टाकल्यावर आणि दांत घांसल्यावर संगवकालीं म्हणजे सूर्योदयानंतर सहा घटकांनीं

स्नान करावें. सूर्योदयापूर्वी स्नान करणें हा अनाचार आहे. विटाळ जाणें थांबलें असल्यास चौथ्या दिवशीं नवऱ्याची सेवा करण्यास हरकत नाहीं. देव व पितर यांचीं कर्मे करण्यास पांचव्या दिवशीं शुद्धि होते. रजोदर्शन जर कांहीं दिवस सुरूच राहील, तर रजोनिवृत्ति होईपर्यंत देव व पितर यांच्या कर्मासाठीं शुद्धि नाहीं. रोगामुळें जर सुरू असेल, तर त्याचा निर्णय पूर्वींच सांगितला आहे. दर्शेष्टयादि श्रौतकर्मे चौथ्या दिवशीं करण्यास कित्येक ग्रंथकार सांगतात. इतर दिवसांपेक्षां चौथा दिवस जर प्रतिकूल नसेल तर त्याच दिवशीं गर्भाधान व दुष्टरजोदर्शननिमित्त शांति, हीं कर्मे करावींत. मोठेंच जर संकट असेल, तर श्रीसूक्ताचा होम व अभिषेक हीं आधीं करून, नंतर उपनयनादि कर्मेंहि करण्यास चौथ्या दिवसाची हरकत नसल्याचें कोणी ग्रंथकार सांगतात. हा जो चौथ्या दिवशीं कर्म करण्याचा अधिकार सांगितला, तो विटाळ जाणें जर थांबलें असेल, तरच आहे असें समजावें.

यदिज्वरादिभिरातुराचतुर्थेहनिस्नातुंनशक्तातदातामन्यानारीनरोवादशवारंस्पृष्ट्वास्पृष्ट्वास्नायादाचामेच्चप्रतिस्नानमातुरस्यवस्त्रमन्यदन्यत्परिधापनीयम् अन्तेस्पृष्टानांसर्ववस्त्राणांत्यागःआर्द्रवस्त्रादिव्यवधानेनशुद्धवस्त्रग्रहणान्तेब्राह्मणभोजनात्पुण्याहवाचनाच्चशुद्धिः सर्वेषामप्यातुराणामेवंशुद्धिर्विधीयते । एवं शुद्धयन्तेशुभेदिनेदुष्टरजोदर्शनप्रयुक्तांशौनकोक्तांभुवनेश्वरीशान्तिंग्रन्थान्तरोक्तांवाशान्तिंविधायगर्भाधानंकार्यम् सूर्यग्रहेरजोदर्शनेहैमंसूर्यबिम्बंतन्नक्षत्ररूपंचसीसेनराहुंचकृत्वासंपूज्यार्कसमिद्भिःसूर्यं नक्षत्रेशंप्लक्षैराहुंदूर्वाभिर्हुत्वाज्यचरुतिलैश्वजुहुयात् चन्द्रग्रहेराजतंचन्द्रबिम्बंपालाशयश्वसमिधइतिविशेषः ग्रहणव्यतीपातादिबहुतरदोषेरजोदर्शनेतुद्वितीयादिरजोदर्शनेशान्तिपूर्वकंगर्भाधानंकार्यम् गर्भाधानेगुरुशुक्रास्ताधिकमासादिदोषोनास्ति यदितुप्रथमरजोदर्शनेशान्तिर्नकृता द्वितीयादिरजोदर्शनेशुक्रास्तादिदोषप्रसक्तिस्तदा निमित्तानन्तरमेवयत्रनैमित्तिकानुष्ठानंतत्रास्तादिदोषाभावोमुख्यकालातिक्रमेतुअस्तादिदोषोस्त्येवेतिसामान्यनिर्णयानुसारेणऋतुशान्तिरस्तादौनकार्या तदनुरोधेनगर्भाधानंचनकार्यमितिभाति शान्तिश्वसग्रहमखैवकार्या शान्तौभुवनेश्वरीप्रधानदेवता इन्द्रेन्द्राण्यौपार्श्वदेवते एवंकलशत्रयेपिप्रतिमात्रयस्थापनम् ग्रहाणामर्कादिसमिधश्वरुराज्यं चद्रव्यम् प्रधानदेवतायादूर्वास्तिलमिश्रागोधूमाः पायसमाज्यंचेतिहविश्वतुष्टयम् एवंपार्श्वदेवतयोरपि पायसस्यस्थण्डिलाग्नौश्रपणमेवकार्यम् नतुगृहसिद्धस्यग्रहणम् ग्रहहोमार्थगृहसिद्धचरुःपात्रासादनकालेपायसश्रपणार्थमेकास्थालीगृहसिद्धान्नसंस्कारार्थमपरेतिस्थालीद्वयम् अनेककर्तृकाज्यहोमप्रसक्तावनेकस्रुवासादनम् आज्येनसहहविस्त्रयस्यगृहसिद्धान्नस्यचपर्यग्निकरणम् स्रुवादिसंमार्गन्तेगृहसिद्धान्नमासादितचरुस्थाल्यामादायाग्नावधिश्रित्याभिघारणादिबर्हिरासादनान्तंकुर्यात् ततः पायसाभिघारणाद्यासादनान्तम् अन्वाधानेहविस्त्यागेचप्रधानादेवपायाभुवनेश्वरीपदेनसवितृपदेनवोच्चारः गायत्र्याहोमोक्तेःआज्यभागान्तेयजमानोन्वाधानानुसारेण प्रतिदैवतमष्टाविंशत्याहुतिप-

र्यांप्तमर्कादिजातीयसमिच्चर्वाज्यात्मकंहविस्त्रयंसूर्यायसोमायभौमायबुधायबृह-
स्पतयेशुक्रायशयनयेराहवेकेतवेनमम अष्टाष्टसंख्यापर्याप्तंहविस्त्रयंतत्तदधिदेवता-
प्रत्यधिदेवताभ्योनमम चतुश्चतुःसंख्यापर्याप्तंतद्धविस्त्रयं विनायकादिभ्यःक्रतु-
संरक्षणक्रतुसादृगुण्यदेवताभ्योनमम अष्टोत्तरशतसंख्याकाहुतिपर्याप्तंदूर्वातिल-
गोधूमपायसाज्येतिइविश्वतुष्टयंभुवनेश्वर्यैनमम यद्वा सवित्रेनमम एवमष्टाविंश-
तिसंख्यापर्याप्तंतच्चतुष्टयमिन्द्रेन्द्राणीभ्यांनममेतित्यागंकुर्यात् बहुतरदोषेऽष्टोत्त-
रसहस्रसंख्याकोहोमोभुवनेश्वर्याइन्द्रेन्द्राण्योरष्टोत्तरशतसंख्याकः इन्द्रेन्द्राण्यो-
र्होमः कृताकृतः होमान्तेग्रहादिबलयःभुवनेश्वर्यादिबलयोऽभिषेकश्चेतिसंक्षेपः
समन्त्रकः सविस्तरः प्रयोगः स्वस्वशाखीयानु सारेणज्ञेयः संकल्पः स्वस्तिवा-
ग्विप्रवरणंभूतनिःसृतिः। पञ्चगव्यैर्भूमिशुद्धिर्मुख्यदैवतपूजनम्।१ अग्निप्रति-
ष्ठासूर्यादिग्रहस्थापनपूजनम्। देवतान्वाहितिःपात्रासादनंहविषांकृतिः २
यथाक्रमंत्यागहोमाविंतिपौर्वाङ्कःक्रमः। पूजास्विष्टंनवाहुत्याबलिः पूर्णाहुति-
स्तथा ३ पूर्णपात्रविमोकाद्यग्न्यर्चनान्तेभिषेचनम्। मानस्तोकेतिभूतिश्चदेव-
पूजाविसर्जने ४ श्रेयोग्रहोदक्षिणादिदानंकर्मेश्वरार्पणम्। क्रमोयमुत्तराङ्गानां
प्रायः स्मार्तोष्वितिस्थितिः ५ एवंमदनरत्नोक्ताबौधायनोक्ताचशान्तिःकौस्तुभे
द्रष्टव्या प्राग्रजोदर्शनात्पत्नीगमनेब्रह्महत्यादोषोक्तेःकिंचित्प्रायश्चित्तंविधेयमिति-
भातिऋतौतुगमनमावश्यकंअन्यथाभ्रूणहत्यादोषःअयंचमनासिकामेसति द्वेषादि-
नास्त्रियमनुपगच्छतोज्ञेयः विरक्तस्यनकोपिदोषइतिश्रीभागवतेलोकेव्यवायेति
पद्येटीकायांचस्पष्टम् ऋतुकालस्तुरजोदर्शनमारभ्यषोडशदिनपर्यन्तंज्ञेयः तत्र
प्रथमदिनचतुष्टयैकादशत्रयोदशदिनेषुगमनं वर्ज्यम् अवशिष्टदशदिनेषु
पुत्रार्थिनासमदिनेकन्यार्थिनाविषमदिनेगमनंकार्यम् तत्राप्युत्तरोत्तररात्रीणांप्रा-
शस्त्यम् एकस्यांरात्रौसकृदेवगमनंकार्यम् सकृद्गमनंचयुग्मासुसर्वासुआवश्यक-
मितिकेचित् अन्यकालेप्रतिबन्धादिनागमनासंभवेश्राद्धैकादश्यादिदिनेपिऋतु-
गमनंकार्यमितिकेचित् स्त्रीणांवरमनुस्मरन्पत्नीच्छयानृतावपिगच्छन्नदोषभा-
क्किंतुब्रह्मचर्यहानिमात्रम् ऋतौगच्छतियोभार्यामनृतौनैवगच्छति। यावज्जी-
वंब्रह्मचारीमुनिभिःपरिकीर्तितः१ अष्टमीचतुर्दशीपौर्णिमाऽमावास्यासूर्यसंक्रा-
न्तिवैधृतिव्यतीपातपरिघपूर्वदलविष्टिसंध्यासुमातापित्रोर्मृतादिनेश्राद्धतत्प्राग्-
दिनेजन्मनक्षत्रेपिवाचस्त्रीगमनंवर्ज्यम्

**गर्भाधानविधिसंक्षेप**—ज्वरादिक रोगांनीं विटाळशी हैराण असल्यामुळें स्नान करण्यास जर असमर्थ असेल, तर दुसऱ्या स्त्रीनें अथवा पुरुषानें दहा वेळां स्पर्श करून, तिच्यासाठीं आपण सर्वांगाणिक स्नान व आचमन हीं करावीं. हैराण स्त्रीला प्रत्येक स्पर्शाला निराळें वस्त्र नेसावयाला द्यावें व शेवटीं तीं सारीं वस्त्रें टाकून द्यावीं. नंतर ओलें वस्त्र मध्यें घेऊन वाळलेलें शुद्धवस्त्र नेसावें आणि ब्राह्मणभोजन व पुण्याहवाचन हीं करावीं, म्हणजे शुद्धि होते. सर्व प्रकारच्या आतुरांची (रोगानें हैराण) शुद्धि याचप्रमाणें करावी.

शुद्धीनंतर शुभ दिवस पाहून दुष्टरजोदर्शनानिमित्त शौनकानें सांगितलेली भुवनेश्वरी शांति किंवा ग्रंथांतरीं सांगितलेली इतर शान्ति करून गर्भाधान करावें. सूर्यग्रहणांत जर रजोदर्शन झालें, तर सूर्य व तो ज्या नक्षत्रीं असेल तें नक्षत्र यांच्या सोन्याच्या प्रतिमा करून, राहूची शिशाची करावी व त्यांची पूजा करावी. सूर्यासाठीं रुईच्या समिधांनीं, नक्षत्रांकरितां पळसाच्या समिधांनीं व राहूप्रीत्यर्थ दूर्वांनीं होम करावे. तूप, भात व तीळ यांचाहि होम करावा. रजोदर्शन जर चंद्रग्रहणांत होईल, तर रुप्याची चंद्रप्रतिमा व पळसाच्या समिधा एवढा त्याचा विशेष समजावा. ग्रहण, व्यतीपात वगैरे अनेक दोष असतां जर रजोदर्शन झालें, तर दुसऱ्या रजोदर्शनाच्यावेळीं शान्ति करून गर्भाधान करावें. गर्भाधानाच्या बाबतींत गुरु-शुक्रादिकांचे अस्त, अधिक महिना वगैरे जरी दोष नाहींत, तरी पहिल्या विटाळशी-पणाच्यावेळीं जर शान्ति केली नसेल आणि दुसऱ्या विटाळशीपणाच्यावेळीं जर गुरुशुक्रादिकांच्या अस्तादिकांचा दोष असेल, तर अस्तादिकांत ऋतुशान्ति करूं नये. कारण, निमित्त घडतांच जर नैमित्तिक कर्माचें अनुष्ठान केलें असेल, तर अस्तादि दोष नसतो; पण मुख्यकाळ उलटून गेला असतां अस्तादि दोष आहेत, असा जो सामान्य निर्णय, त्या निर्णयाला अनुसरून शान्ति करूं नये व यामुळेंच गर्भाधानहि करूं नये असें मला वाटतें. शान्ति ग्रहमखासह करावी. शान्तींत मुख्य देवता भुवनेश्वरी असून, इंद्र व इंद्राणि या पार्श्वदेवता (पाठीराख्या) देवता आहेत. या तीन देवतांच्या तीन प्रतिमा तीन कलशांवर स्थापन कराव्या. रुई वगैरेंच्या समिधा, भात व तूप हीं ग्रहांचीं द्रव्यें, पार्श्वदेवतांचींही जाणावींत. पायस स्थंडिलावरच शिजवावें. घरांत शिजविलेलें घेऊं नये. ग्रहांच्या होमासाठीं जो भात लागतो, तो घरांत शिजविलेला घ्यावा. पात्रांची स्थापना करतांना पायस शिजविण्यासाठीं एक व घरांत शिजविलेल्या भाताचा संस्कार करण्याकरितां दुसरी, अशा दोन स्थाली (थाळ्या) घ्याव्या. तुपाचा होम करणारे जर अनेक जण असले, तर अनेक स्रुवा-पात्रें (अग्नींत तुपाची आहुति देण्याची लाकडी पळी) मांडावींत. तुपाबरोबरच तीन होमद्रव्यें आणि घरांत तयार केलेला भात—या चार द्रव्यांना अग्निसंस्कार करावा. स्रुवादिक पात्रांचा संस्कार झाल्यानंतर, घरांत करून आणिलेला भात, त्याच्या (मागें सांगितलेल्या) थाळींत घालून, ती थाळी अग्नीवर ठेवावी व तो शिजल्या-प्रमाणें करून, त्यावर आज्यसंस्कारापासून दर्भांच्या आसादनापर्यंतचें कर्म करावें, आणि नंतर त्याला पायसाचा आज्यसंस्कार करून, तो उतरून खालीं ठेवावा. अन्वाधान व हविर्द्रव्यांचा त्याग—हीं कर्में करतांना प्रधानदेवता जी भुवनेश्वरी तिच्या अथवा सवितृ यांच्या पदाचा उच्चार करावा; कारण, गायत्रीमंत्रानें होम करण्यास सांगितलें आहे. आज्यभाग झाल्यानंतर, यजमानानें जसें अन्वाधान केलें असेल तसा जो त्यागाचा उच्चार करावा तो येणेंप्रमाणें:—'प्रतिदैवतं अष्टाविंशत्याहुति पर्याप्तमर्कादिजातीयसमिच्चर्वाज्यात्मकं हविस्त्रयं सूर्याय सोमाय भौमाय बुधाय बृहस्पतये शुक्राय शनये राहवे केतवे न मम। अष्टाष्टसंख्यापर्याप्तं हविस्त्रयं तत्तदधिदेवताप्रत्यधि-

देवताभ्यो न मम। चतुश्चतुःसंख्यापर्याप्तं तद्धविस्त्रयं विनायकादिभ्यः ऋतुसंरक्षणक्रतु-साद्गुण्यदेवताभ्यो न मम। अष्टोत्तरशतसंख्याकाहुतिपर्याप्तं दूर्वातिलगोधूमपायसा-ज्येति हविश्चतुष्टयं भुवनेश्वर्यै न मम। यद्वा सवित्रे न मम। एवमष्टाविंशति संख्या-पर्याप्तं तच्चतुष्टयमिन्द्रेन्द्राणीभ्यां न मम।' रजोदर्शनकालीं जर अनेक दोष असतील, तर भुवनेश्वरीचा होम १००८करावा व इंद्रइंद्राणीचा १०८करावा. इंद्रइंद्राणींचा होम केला किंवा न केला तरी चालेल. होमानंतर नवग्रह, भुवनेश्वरी वगैरेंना बलि देऊन अभिषेक करावा. असा हा संक्षेप समजावा. याशिवाय मंत्रसहित व विचारपूर्वक प्रयोग ज्यानें त्यानें आपआपल्या शाखेप्रमाणें समजावा. संकल्प, स्वतिवाचन, ब्राह्मणवरण, भूतनिः-सारण, पंचगव्यानें भूमीचें शुद्धीकरण, मुख्यदेवतापूजन, अग्निप्रतिष्ठा, सूर्यादि नव-ग्रहांची स्थापना करून त्यांची पूजा करणें, देवतांचें अन्वाधान, पात्रस्थापन, हवि-र्द्रव्यें सिद्ध करणें आणि जसा परिपाठ असेल त्याप्रमाणें होम व त्याग करणें—हा पूर्वीच्या अंगभूत कर्मांचा अनुक्रम समजावा. पूजा, स्विष्टकृत, होमशेष, बलि, पूर्णाहुति, पूर्णपात्रविमोचन, अग्निपूजन, अभिषेक, मानस्तोके० या मंत्रानें विभूति-धारण, देवतापूजन व विसर्जन श्रेयोग्रहण, दक्षिणादि दान आणि सर्व कर्म ईश्वरार्पण करणें हा उत्तरांगभूत कर्मांचा क्रम समजावा. ही अशी कर्मांची स्थिति आहे. मदनरत्न व बौधायन यांनीं जी शांति सांगितली आहे, ती कौस्तुभांत पाहावी. रजोदर्शनापूर्वी जर पत्नीगमन केलें, तर ब्रह्महत्येचा दोष लागतो, असें सांगितलें असल्यानें किंचित् प्रायश्चित करावें असें मला वाटतें. ऋतुकालीं (पत्नी) गमन करणें अवश्य आहे; न केल्यास भ्रूणहत्येचा (गर्भ मारल्याचा) दोष लागतो; पण तोही मनांत इच्छा असतांहि क्रोधादिकामुळें स्त्रीसंभोग न करणारासच मात्र हा दोष लागतो असें समजावें. विरक्त पुरुषाला कशाचाच दोष नाहीं असें श्रीमद्भागवतांतल्या 'लोकेव्यवाया०' या श्लोकांत व त्या-वरील टीकेंत स्पष्ट सांगितलें आहे. रजोदर्शनाच्या दिवसापासून सोळा दिवसपर्यंत ऋतुकाळ जाणावा. त्यांतले पहिले चार दिवस, अकरावा आणि तेरावा हे (सहा) दिवस समागमाला वर्ज्य आहेत. बाकीच्या दिवशीं पुत्राची इच्छा करणारानें सम दिवशीं व मुलीची इच्छा करणारानें विषम दिवशीं स्त्रीशीं संग करावा. त्यांतल्या-त्यांत पुढच्या पुढच्या रात्री प्रशस्त होत. एका रात्रींत एकदांच संग करावा. व तोहि सम रात्रींतच करावा असें कांहीं ग्रंथकार जसें म्हणतात, तद्वतच इतर कांहीं असें सांगतात कीं, कांहीं अडचणीमुळें जर स्त्रीगमन करणें अशक्य झालें, तर श्राद्ध, एकादशी वगैरे दिवशींहि गमन करण्यास हरकत नाहीं. स्त्रीच्या कामाचा नाश करणारा पापी होतो, असा जो स्त्रियांचा वर, त्याचें स्मरण करून ऋतुकाळ नसतांहि स्त्रीच्या संगोत्सुकतेनें, जो स्त्रीसंबंध करील त्याला जरी दोष लागत नाहीं, तरी त्याच्या ब्रह्मचर्याची हानि होते. जो पुरुष ऋतुकालींच फक्त भार्यागमन करतो. व ऋतुकालावांचून कधींहि करीत नाहीं तो यावज्जीव ब्रह्मचारी आहे, असें मुनींचें वचन आहे. अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावास्या, सूर्यसंक्रांति, वैधृति, व्यतीपात,

परिघाचा पूर्वार्ध, कल्याणी, संधिकाल, मातापितरांचा मृत दिवस, श्राद्धतिथि, श्राद्धाच्या आधींचा दिवस व जन्मनक्षत्र यांवर स्त्रीगमन वर्ज्य करावें.

अथगर्भाधानकालः। चतुर्थीषष्टीचतुर्दश्यष्टमीपञ्चदर्शीरहिताःतिथयःप्रशस्ताः चन्द्रबुधगुरुशुक्रवाराःशुभाः मूलमघारेवतीज्येष्टानक्षत्राणिवर्ज्यानि भरणीकृत्तिकार्द्राश्लेषापूर्वात्रयविशाखामध्यमानि शेषाणिशुभानि सर्वकार्येषुगोचरेचन्द्रबलमावश्यकम् तद्यथा चन्द्रोन्नमधनं सौख्यरोगंकार्यक्षतिंश्रियम्। स्त्रियंमृत्युनृपभयसुखमायव्ययक्रमात् १ स्थानेषुद्वादशस्वेतज्जन्मराशेःप्रयच्छति। शुक्लपक्षेशशीश्रेष्टोद्विपञ्चनवमेष्वपि २ अनेकभार्यस्यऋतुयौगपद्येविवाहक्रमेणऋतुप्राप्तिक्रमेणवागर्भाधानम् ऋतावप्यगमनदोषापवादः व्याधितोबन्धनस्थोवाप्रवासेष्वथपर्वसु। वृद्धांवंध्यामसद्वृत्तांमृतापत्यामपुष्पिणीम् १ कन्यासूबहुपुत्रांचअगच्छन्नैवदोषभाक्।

**गर्भाधानकाल**—चतुर्थी, षष्ठी, चतुर्दशी, अष्टमी, पौर्णिमा व अमावास्या या तिथींशिवाय बाकीच्या तिथि योग्य होत. सोमवार, बुधवार, गुरुवार व शुक्रवार, हे (चार) वार शुभ होत. मूळ, मघा, रेवती व ज्येष्ठा हीं नक्षत्रें त्याज्य समजावींत. भरणी, कृत्तिका, आर्द्रा, आश्लेषा, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा व विशाखा हीं नक्षत्रें मध्यम होत. बाकीचीं शुभ समजावींत. सर्वकार्यांना जें गोचरी चंद्रबळ अवश्य लागतें, तें पुढीलप्रमाणें पाहावें:—अन्नलाभ, धननाश, सौख्य, रोग, कार्यनाश, संपत्ति, स्त्री, मृत्यु, राजभय, सुख, धनलाभ, आणि धननाश—याप्रमाणें आपल्या जन्मराशीपासून बारा राशींवर असतां क्रमानें (चंद्र) फल देतो. शुक्लपक्षांतला चंद्र जसा श्रेष्ठ, तद्वतच—दुसरा, पांचवा व नववा—हेही चंद्र शुभच होत. ज्याला अनेक बायका असतात. अशाचा स्त्रियांना जर एकाच काळीं ऋतुप्राप्ति होईल, तर विवाहक्रमानें किंवा ऋतुप्राप्तिक्रमानें गर्भाधानें करावींत. ऋतुकाळीं गमन न केल्यानें घडणाऱ्या दोषाला अपवादः—व्याधि, बन्धन, प्रवास व पर्वदिवस यांमुळें गमन न केल्यास दोष नाहीं. तद्वतच—थेरडी बायको, वन्ध्या, दुर्वृत्ता, मृतवन्ध्या, विटाळ गेलेली, मुली होणारी किंवा अनेक मुलगे असलेली—यांपैकीं कोणच्याही प्रकारची असल्यास, तिच्याशीं गमन न केल्यास दोष नाहीं.

तत्रप्रथमर्तुगमनं गर्भाधानहोमंगृह्याग्नौकृत्वाकार्यम् द्वितीयादिकऋतुगमनेचनहोमादिम् येषांसूत्रेहोमोनोक्तस्तैर्होमवर्ज्यमंत्रपाठादिरूपोगर्भाधानसंस्कारः प्रथमगमनेकार्यः आहिताग्नेरर्धाधानिनोऽनाहिताग्नेश्चौपासनाग्निसिद्धिस्त्वेतन्नैवहोमः औपासनाग्निविच्छेदेद्वादशदिनपर्यन्तमयाश्चेत्याज्याहुत्याततऊर्ध्वंप्रायश्चित्तपूर्वकंपुनःसंधानविधिनाग्निमुत्पाद्यतत्रकार्यः तत्रप्रत्यब्दंप्राजापत्यकृच्छ्रप्रायश्चित्तम् तत्रेत्थंसंकल्पः ममगृह्याग्निविच्छेददिनादारभ्यैतावन्तंकालं गृह्याग्निविच्छेदजनितदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गृह्याग्निविच्छेददिनादारभ्यैतावदब्दपर्यन्तंप्रत्यब्दमेकैककृच्छ्रान्यथाशक्तितत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतरजतनिष्कनिष्कार्धनिष्कपादनिष्कपादार्धान्यतमद्रव्यदानेनाहमाचरिष्ये

तथाएतावद्दिनेषुगृह्याग्निविच्छेदेनलुप्तसायंप्रातरौपासनहोमद्रव्यं लुप्तदर्शपौर्णमास-स्थालीपाकादिकर्मपर्याप्तव्रीह्याद्याज्यद्रव्यंचतान्निष्क्रयंवादातुमहमुत्सृजे कृच्छ्रप्रत्याम्नायान्तरचिकीर्षायांतथोहःकार्यः अशीतिगुञ्जात्मकोनिष्कपादः अयंचतुर्गुणितोनिष्कः एवंसंकल्प्याविच्छिन्नस्यगृह्याग्नेःपुनःसंधानं करिष्यइतिसंकल्पपूर्वकंस्वस्वसूत्रानुसारेणगृह्याग्निंसंसाधयेत् सर्वाधानिनापिएवमेव पुनःसंधानेनगृह्याग्निमुत्पाद्यगर्भाधानपुंसवनादिहोमःकार्यः तत्रकृच्छ्रसंकल्पोहोमादिद्रव्यदानसंकल्पश्चनकार्यः गर्भाधानहोमंकर्तुंगृह्यपुनःसंधानंकरिष्येइत्येवसंकल्पः गर्भाधानान्तेऽग्नित्यागः अर्धाधानिनामपिपक्षद्वयम् गृह्याग्नौसायंप्रातर्होमस्थालीपाकाःकार्याइत्येकः गृह्याग्निःकेवलं संरक्ष्योनतुतत्रहोमादिकार्यमित्यपरः आद्यपक्षेपूर्वोक्तहोमादिद्रव्यदानंकार्यम् होमाद्यकरणपक्षेप्रायश्चित्तमात्रं कार्यंनतुद्रव्यदानम्

द्विभार्यस्याग्निद्वयसंसर्गात्पूर्वमुभयाग्न्यनुगतौउभयविच्छेददिनादब्दगणनया पृथक्पृथक्कृच्छ्प्रायश्चित्तंपृथक्पृथक्होमद्रव्यदानं स्थालीपाकद्रव्यदानंचकृत्वापुनः संधानद्वयेनाग्निद्वयमुत्पाद्याग्निद्वयसंसर्गंविधायतत्रगर्भाधानहोमः अग्निद्वयसंसर्गात्पूर्वंएकाग्न्यनुगतौ तन्मात्रप्रायश्चित्तंतद्धोमद्रव्यमात्रदानंचकार्यंनतुस्थालीपाकद्रव्यदानम् भार्यान्तरस्यासन्निधानेयस्यांगर्भाधानंतदग्निविच्छेदप्रायश्चित्तादिनागृह्यमुत्पाद्यतत्रहोमः सर्वत्रपुनःसंधानेस्थालीपाकानारम्भेस्थालीपाकादिद्रव्यदानंकृताकृतम् एवंयथायथंगृह्यसिद्धिंकृत्वा ममास्यांभार्यायांसंस्कारातिशयद्वाराऽस्यां जनिष्यमाणसर्वगर्भाणांबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंगर्भाधानाख्यंकर्मकरिष्ये तदङ्गत्वेनस्वस्तिवाचनेत्यादिसंकल्प्य पुण्याहवाचनमातृकापूजननान्दीश्राद्धादिकृत्वायथागृह्यंगर्भाधानसंस्कारःकार्यः अत्रगर्भाधानकर्मणोब्रह्मदेवताकत्वात्पुण्याहवाचनान्तेकर्माङ्गदेवताब्रह्माप्रीयतामितिवदेत् औपासनाङ्गेस्वस्तिवाचने अग्निसूर्यप्रजापतयःप्रीयन्तां स्थालीपाकारम्भेअग्निःप्रीयतामिति एवमन्यत्रग्रन्थान्तरादूह्यम् ।

**गर्भाधानहोम**—पहिल्या ऋतूच्या शांत्यर्थ जें स्त्रीगमन करणें तें गर्भाधानासंबंधाचा होम केल्यावर करावें. दुसऱ्या खेपेपासून पुढें केव्हांहि होमाची जरूरी नाहीं. ज्यांच्या सूत्रांत होम सांगितलेला नाहीं, अशांनीं होम न करितां मंत्रपाठादि रूपानेंच पहिला गर्भाधानसंस्कार करावा. अग्निहोत्री, अर्धाधानी (गृह्याग्नि ठेवणारा अग्निहोत्री) आणि अनाहिताग्नि (फक्त स्मार्ताग्नि ठेवणारा) यांचा अग्नि जर सिद्ध असेल, तर त्यावरच होम करावा. अग्नि नाश होऊन बाराहून जर कमी दिवस झाले असतील, तर 'अयाश्चा॰' या मंत्रानें तुपाच्या आहुतीनें होम करावा आणि बारापेक्षां जर अधिक दिवस झाले असतील, तर प्रायश्चितपूर्वक पुन्हां सन्धानविधीनें अग्नि उत्पन्न करून, त्यावर होम करावा. दर वर्षास प्राजापत्याचें जें कृच्छ्रप्रायश्चित करावें, त्याचा संकल्प असा:—'ममगृह्याग्निविच्छेददिनादारभ्यैतावन्त कालं गृह्याग्निविच्छेदजनितदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गृह्याग्निविच्छेददिनादारभ्यैतावदब्दापर्यन्तं प्रत्यब्दं एकैककृच्छ्रान्यथाशक्तितत्प्रत्याम्नायगोनिष्क-

यीभूतरजतनिष्कनिष्कार्धनिष्कपादनिष्कपादार्धान्यतमद्रव्यदानेन अहं आचरिष्ये तथा एतावद्दिनेषु गृह्याग्निविच्छेदेन लुप्तसायंप्रातरौपासन होमद्रव्यं लुप्तदर्शपौर्णमासस्थालीपाकादिकर्मपर्याप्तव्रीह्याद्याज्यद्रव्यंच तन्निष्क्रयं वा दातुमहमुत्सृजे'। कृच्छ्राच्या ऐवजीं जर दुसरा प्रत्याम्नाय करणें असेल, तर तसा उच्चार करावा. ऐशीं गुंजा म्हणजे जो एका निष्काचा चतुर्थांश होतो, त्याची चौपट (तीन तोळे व चार मासे) केली म्हणजे एक निष्क असा संकल्प करून, 'विच्छिन्नस्य गृह्याग्नेः पुनः सन्धानं करिष्ये' या संकल्पानें आपापल्या सूत्राप्रमाणें गृह्याग्नि तयार करावा. सर्वाधानी (गृह्याग्नि न ठेवणारा अग्निहोत्री) जो असेल त्यानेंही अशाच तऱ्हेनें पुन्हां सन्धानानें गृह्याग्नि उत्पन्न करून, त्यावर–गर्भाधान, पुंसवन इत्यादिकांचा होम करावा. त्याबाबतींत कृच्छ्राचा किंवा होमादि द्रव्यदानाचा संकल्प करूं नये. फक्त 'गर्भाधानहोमकर्तुं गृह्यपुनःसन्धानं करिष्ये' इतकाच संकल्प करावा. गर्भाधान झाल्यानंतर अग्नीचा त्याग करावा. जे अर्धाधानी असतात, त्यांच्या बाबतींतही दोन पक्ष आहेत. (१) गृह्याग्नीवर संध्याकाळीं व सकाळीं होम आणि स्थालीपाक करावेत हा पहिला पक्ष व (२) गृह्याग्नि फक्त रक्षण करून, त्यावर होम वगैरे कांहीं करायाचें नाहीं हा दुसरा पक्ष. पहिल्या पक्षाच्या बाबतींत मागें सांगितल्याप्रमाणें होमादिद्रव्यदान करावें आणि दुसऱ्या म्हणजे होमादि न करण्याच्या पक्षीं फक्त प्रायश्चित करावें, द्रव्यदान करूं नये. दोन अग्नींना संसर्ग होण्याच्या आधीं जर दोन्ही अग्नि नष्ट होतील, तर दोन्ही अग्नींचा विच्छेद झाल्या दिवसापासून वर्षें मोजून त्याप्रमाणें दोन बायका असलेल्या नवऱ्यानें–निरनिराळीं कृच्छ्र प्रायश्चितें, निराळें होमद्रव्यदान आणि स्थालीपाकाच्या द्रव्याचें दान–हीं करून, पुन्हां सन्धानपूर्वक दोन अग्नि उत्पन्न करावे. व त्यांचा संसर्ग करून त्यावर गर्भाधानाचा होम करावा. दोन अग्नींचा संसर्ग होण्यापूर्वीं जर एक अग्नि नष्ट झाला, तर त्यापुरतें प्रायश्चित्त करून, त्याच्या होमद्रव्याचें दान मात्र करावें, स्थालीपाकद्रव्याचें दान करूं नये. दुसरी बायको जर जवळ नसेल तर ज्या भार्येचें गर्भाधान करावयाचें असेल, तिच्या अग्नीच्या विच्छेदाचें प्रायश्चित्त वगैरे करून, गृह्याग्नि उत्पन्न करावा. आणि त्यावर होम करावा. स्थालीपाकाला जर सर्वत्र आरंभ झाला नसेल, तर पुनः-सन्धानाच्यावेळीं स्थालीपाकद्रव्याचें दान करावें अथवा करूंहि नये. याप्रमाणें यथा-योग्य असा गृह्याग्नि तयार करून, 'मम अस्यां भार्यायां संस्कारातिशयद्वाराऽस्यां जनयिष्यमाण सर्वगर्भाणां बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गर्भाधानाख्यं कर्म करिष्ये तदङ्गत्वेन स्वस्तिवाचनम्' असा संकल्प केल्यावर पुण्याहवाचन, मातृकापूजन, नान्दीश्राद्ध वगैरे करावींत व आपल्या गृह्यसूत्राप्रमाणें गर्भाधानसंस्कार करावा. या ठिकाणीं गर्भाधानकर्माची देवता ब्रह्मा असल्यानें पुण्याहवाचनांत 'कर्माङ्गदेवता ब्रह्माप्रीयताम्' आणि स्थालीपाकाच्या आरंभीं 'अग्निः प्रीयताम्' असे उच्चार करावेत. बाकीच्या कर्मासंबंधानें इतर ग्रंथांत माहिती पाहावी.

**अथनान्दीश्राद्धविचारः। गौर्यादिमातृकापूजनंनान्दीश्राद्धाङ्गम् यत्रनान्दी-**

श्राद्धं नक्रियतेतत्रमातृकापूजनमपिनकार्यम् तत्र पूर्वंमातृपार्वणम् ततःपितृपा-र्वणंततः सपत्नीकमातामहपार्वणमितिपार्वणत्रयात्मकंनान्दीश्राद्धं मातृजीवने-सपत्नमातृमरणेपिनमातृपार्वणम् एवंमातामह्याजीवनेमातामहीसपत्न्याभरणे-पिनमातामहादेःसपत्नीकत्वम् एवंदर्शादावपिमातृजीवनेसपत्नमातृमरणेपिन-सपत्नीकत्वंपित्रादेः अत्र स्वधाशब्दस्थानेस्वाहाशब्दः सव्येनैवसर्वाःक्रियाः प्रतिपार्वणंदैवेचयुग्माब्राह्मणाः कुशस्थानेदूर्वाःविवाहादिमंगलकर्मांगेवृद्धि-श्राद्धे यज्ञादिकर्मांगेतुअमूलादर्भाग्राह्याः दूर्वादर्भाश्चयुग्माएव उदङ्मुखःकर्ता-प्राङ्मुखाविप्राः प्राङ्मुखोवाकर्ताउदङ्मुखाविप्राः पूर्वाह्णकालः प्रदक्षिणंकर्म आधानांगत्वपराह्णेकार्यम् पुत्रजन्मनिमित्तकंरात्रावपि एवंचविश्वेदेवार्थविप्र-सहिताअष्टौविप्राअत्यशक्तौचत्वारोवा वृद्धिश्राद्धेविश्वेदेवाःसत्यवसुसंज्ञकाः सोमयागगर्भाधानपुंसवनसीमन्तोन्नयनाधानादिकर्मांगभूतवृद्धिश्राद्धेक्रतुदक्षसं-ज्ञकाः गर्भाधानादिसंस्कारेषुवापीदेवप्रतिष्ठादिपूर्तकर्मसु अपूर्वाधानादिषुसंन्या-सस्वीकारेकाम्यवृषोत्सर्गेगृहप्रवेशेतीर्थयात्रायांश्रवणाकर्मसर्पबल्याश्वयुज्याग्रय-णादिपाकसंस्थानांप्रथमारंभेनान्दीश्राद्धमावश्यकम् पुनराधानेसोमयागादि-भिन्ने असकृत्क्रियमाणेकर्मणि अष्टकादिश्राद्धकर्मसुचनान्दीश्राद्धंनकार्यम् गर्भाधानपुंसवनसीमंतचौलमौंजीविवाहातिरिक्तसंस्कारेषुश्रवणाकर्मादिषु च नान्दीश्राद्धम् वैकल्पिकम् जातकर्मांगंपुत्रजन्मनिमित्तकंचनांदीश्राद्धंपृथगेव जन्मकाले एवजातकर्मणिक्रियमाणेपुत्रजन्मनिमित्तकंजातकर्मांगंचवृद्धिश्राद्धं तन्त्रेणकरिष्येइतिसंकल्प्यसकृदेवकार्यम् नामकर्मणासहजातकर्मचिकीर्षायांपुत्र-जन्मनिमित्तंजन्मकालेएवहेम्नाकृत्वाकर्मांगनामकर्मकालेकार्यम् तदातदकरणे-नामकर्मकालेएव पुत्रजन्मनिमित्तकंजातकर्मनामकर्मांगंचनान्दीश्राद्धंतंत्रेणकरि-ष्यइतिसंकल्प्यैकमेवकार्यम् एवंचौलादिकर्मणासहजातकर्मादिषुक्रियमाणेषु पुत्रजन्मनिमित्तकं चौलान्तसंस्कारांगंचनान्दीश्राद्धंतंत्रेणकरिष्यइति संकल्पः तथाचसहैवक्रियमाणेषुचौलादिष्वन्येषुचकर्मसुनान्दीश्राद्धस्यसकृदेवानुष्ठानं-नतुप्रतिकर्मपृथगनुष्ठानम् एवंयमलयोर्युगपदेकसंस्कारकरणेपिज्ञेयम् ऋक्शा-खाभिः कात्यायनैश्चपितृपितामहप्रपितामहाइतिपितृपूर्वकउच्चारः कार्यः अ-न्यशाखिभिस्तुप्रपितामहपितामहपितरोनान्दीमुखाइतिप्रपितामहपूर्वकउच्चारः मातृपार्वणेनान्दीमुखशब्देङीप्विकल्पान्नान्दीमुख्यइतिनान्दीमुखाइतिपक्षद्वय-मुच्चारे अनादिसंज्ञात्वेननखमुखात्संज्ञायामितिनिषेधानवतारादितिपुरुषार्थ-चिन्तामणिकारः ।

**नान्दीश्राद्धनिर्णय**—गौरी वगैरे मातृकादेवतांचें पूजन करणें हें नांदीश्राद्धाचें अंग आहे. ज्या कर्मांत नान्दीश्राद्ध करीत नाहींत, त्यांत मातृकापूजन करण्याचेंही कारण नाहीं. प्रथम मातृपार्वण, नंतर पितृपार्वण आणि नंतर सपत्नीक मातामहपार्वण अशा तीन पार्वणांचें मिळून नान्दीश्राद्ध होतें. आई जिवंत असून सावत्र आई जरी मेलेली असली, तरी मातृपार्वण नाहीं. तद्वतच आईची

आई (आजी) जिवंत असून सावत्र माता जरी मेलेली असली तरी मातामह (आईचा बाप) वगैरेंना सपत्नीकत्व नाहीं. याचप्रमाणें आई जिवंत असून सावत्र आई जरी मेलेली असली, तरी बापवगैरेंना दर्शांत सपत्नीकत्व नाहीं. या नान्दीश्राद्धांत 'स्वधा' शब्दाच्या जागीं 'स्वाहा' या शब्दाचा उपयोग करून, सर्व क्रिया सव्यानेंच कराव्या. प्रत्येक पार्वणाला व देवपार्वणाला दोन दोन ब्राह्मण सांगावेत. विवाहादि मंगलकार्यांच्या अङ्गभूत असणाऱ्या नान्दीश्राद्धांत दर्भांच्या ऐवजीं दूर्वा वापराव्यात व यज्ञादि कर्मांतल्या (नान्दीश्राद्धा) करितां मुळें तोडून टाकलेले दर्भ घ्यावेत. दूर्वा व दर्भ हीं नेहमीं दोन दोन घ्यावींत. श्राद्धांत त्याचा कर्ता पूर्वाभिमुख व ब्राह्मण उत्तराभिमुख, किंवा कर्ता उत्तराभिमुख व ब्राह्मण पूर्वाभिमुख असावेत. काल पूर्वाह्णच घ्यावा. सर्वकर्म प्रदक्षिण (डावे हाताकडून उजवेहाताकडे) करावें. आधानाच्या अंगभूत जें नान्दीश्राद्ध तें मात्र अपराह्णकाळीं करावें. पुत्रजन्मानिमित्त जें नान्दीश्राद्ध करावयाचें तें रात्रींसुद्धां करावें. विश्वेदेवांच्या नांवानें आठ ब्राह्मण सांगावेत व सामर्थ्य नसल्यास चारच सांगावेत. नान्दीश्राद्धांत 'सत्यवसु' नांवाचे विश्वेदेव घ्यावेत. सोमयाग, गर्भाधान, पुंसवन, सीमन्तोन्नयन, आधान वगैरे कर्मांतल्या नान्दीश्राद्धांत 'क्रतुदक्ष' नांवाचे विश्वेदेव घ्यावेत. गर्भाधानादिसंस्कार, विहीर, देवप्रतिष्ठा इत्यादि पूर्तकर्मे, पूर्वी न केलेलें आधान (अग्निस्थापन) वगैरे कर्मे, संन्यास घेणें, काम्यवृषोत्सर्ग, गृहप्रवेश, तीर्थयात्रा, श्रवणाकर्म, सर्पबलि, आश्वयुजीकर्म, आग्रयण इत्यादि पाकसंस्थांचा प्रथमारंभ या कर्मांत नान्दीश्राद्ध अवश्य करावेंच लागतें. सोमयोगावांचून करावयाचें जें पुनराधान, वारंवार करावयाचें जें कर्म आणि अष्टकादि जीं श्राद्धें त्यांत नान्दीश्राद्ध करूं नये. गर्भाधान, पुंसवन, सीमन्तोन्नयन, चौल, मुंज, व विवाह यांच्या वांचूनच्या इतर कर्मांत नान्दीश्राद्ध हें वैकल्पिक आहे. जातकर्म व पुत्रजन्म यांच्या निमित्तानें निरनिराळीं अशीं दोन नान्दीश्राद्धें करावींत. जातकर्म जर जन्मकाळींच करावयाचें असेल तर 'पुत्रजन्मनिमित्तकं जातकर्माङ्गंच वृद्धिश्राद्धं तंत्रेण करिष्ये' असा संकल्प करून (दोहोंच्या ऐवजीं) एकदांच (नान्दीश्राद्ध) करावें. जातकर्म जर नामकरणाबरोबर करावयाचें असेल, तर पुत्रजन्मनिमित्तक नान्दीश्राद्ध जन्मकालींच हिरण्यानें (दक्षिणा देऊन) करून, जातकर्मांतलें नान्दीश्राद्ध नांव ठेवायच्या (नामकरणाच्या) वेळीं करावें. जन्मकाळीं केलें नसल्यास, नामकरणाच्या वेळीं 'पुत्रजन्मनिमित्तकं जातकर्म नामकर्माङ्गंच नान्दीश्राद्धं तंत्रेण करिष्ये' अशा संकल्पानें एकच करावें. याप्रमाणेंच चौलादि कर्मांच्या वेळीं जर जातकर्म करावयाचें असेल तर 'पुत्रजन्मनिमित्तकं चौलान्तसंस्काराङ्गंच नान्दीश्राद्धं तंत्रेण करिष्ये' असा संकल्प करावा. चौल व इतर कर्मे एकदम करावयाचीं असलीं तर प्रत्येक कर्माबद्दल निरनिराळें नान्दीश्राद्ध न करितां, सर्वांबद्दल एकच करावें. जुळ्या मुलांचा संस्कार बरोबरच करायचा असल्यासहि एकच नान्दीश्राद्ध करावें. ऋक्शाखीय आणि कात्यायन यांनीं 'पितृपितामहप्रपितामहाः' असा बापांच्या नांवापासून त्रयीचा उच्चार करावा. जे इतर शाखांचे असतील त्यांनीं, 'प्रपितामहपितामहपितरो नान्दीमुखाः' असा आजाच्या नांवापासून

' याच्या जागीं 'ङीप' प्रत्यय वैकल्पिक
असे जे दोन पक्ष त्याच्या उच्चाराच्या
'नख व मुख अशी एकदन्त
भाषांतरासह
ोप होत नाहीं' असा जो निषेध
ार्थचिन्तामणीकार सांगतात.

ाच्या संस्कारांत मातृपार्वण व मातामहस्तंवर्गंतुपरित्यजेदितिन्या-
ावंत असल्यास मातृपार्वणयुक्तच णयुतंनान्दीश्राद्धंकुर्यात्मात
सेल, तर नान्दीश्राद्धांत विश्वेदेजीवंतिमातृपार्वणकमेव केवल-
आईचाबाप—हीं जर जिवंत असतमातृपितृमातामहेषुजीवत्सुनान्दी-
आहे. दुसरें लग्न, अग्न्याधान, ाहाधानपुत्रेष्टिसोमयागादिषुस्वसं-
बाप ज्या पितरांना पार्वण देतथामृतमातृमातामहकोपिजीवत्पि-
ई व आईचा बाप हीं मेलेलीं पितुःपितृपितामहप्रपितामहाःपितु-
च्चार करतो त्यांचाच उच्चार पार्वणत्रयमुद्दिश्यश्राद्धंकुर्यात् नतुस्व-
ा:—'पितुर्मातृपितामहीप्रपि च जीवतिस्वसंस्कारे पितामहस्य
मातृपितामहमातृप्रपितामह प्रपितामहेपियोज्यम् पितुर्मात्रादि-
करावें. आपल्या मातृपार्वपितादद्यादितिपक्षस्य वर्गाद्यजीवनेत-
ा हे जर जिवंत असतील तस्कारस्वापत्यसंस्कारभेदेनव्यवस्थासिद्धा-
करावा तो असाः—'विकल्पोनतुव्यवस्थितइत्याहुः एवंमृत-
ांही असेंच करावें. पार्वणेनैवनान्दीश्राद्धसिद्धिर्ज्ञेया समाव-
ा द्यावें. 'बाप ज्या पितन्दीश्राद्धे पितुस्तदभावेज्येष्ठभ्रात्रादेरधिका-
क पक्ष सांगितला त्यापितृभ्योनान्दीश्राद्धंकुर्यात् पिताजीवत्पि-
कारत्वात्तद्द जीयुक्तइतिभाति माणवकपितुःप्रवासादिना
त्रादिर्माणवकर पितुर्मातृपितामहीप्रपितामह्य इत्याद्युच्चार्य श्राद्धं
तृकमाणवकस वर्तनेपितृव्यभ्रात्रादिरस्यमाणवकस्य मातृपिता-
येत् भ्रात्रादेरभ वेस्वयमेवस्वपितृभ्योदद्यात् एवंजीवत्पितृकोपि
भ्रात्रादेरभावे तुःपितृभ्यःस्वयमेवनान्दीमुखंकुर्यात् उपनयनेन
जातत्वात् एवं वेवाहेपिद्रष्टव्यम् मृतपितृकस्यचौलोपनयनादिकं-
ादिः कुर्वन् अस्यसंस्कार्यस्यपितृपितामहेत्याद्यु र्यश्राद्धंकुर्यात्
विधानेनकुर्व मातुलादिरस्यसंस्कार्यस्यपितुर्जनकादीनुद्दिश्यकुर्या-
मृतानपिमात्रादीनितिसंक्षेपः।

ा नान्द ाद्धपार्वणनिर्णय—आई, बापाची आई व बापाची
आजी या तिघींचा एक वर्ग;
पणजा घांचा एक वर्ग; आईचा बाप, आईचा आजा व
ा तिघां सपत्नीकांचा एक वर्ग; असे जे वर्ग आहेत, त्यांतील
जिवंत असल्यास तो सर्व वर्ग सोडावा.' असा न्याय असल्यानें,

ज्याचा बाप जिवंत असेल त्यानें आपल्या अपत्याच्या संस्कारांत मातृपार्वण व मातामहपार्वण युक्तच नांदीश्राद्ध करावें. आईचा बाप जिवंत असल्यास मातृपार्वणयुक्तच नांदीश्राद्ध करावें. केवळ एकच जर मातृपार्वण असेल, तर नान्दीश्राद्धांत विश्वेदे[illegible] नयेत. तिन्ही वर्गांतील पहिलीं–आई, बाप व आईचाबाप–हीं जर जिवंत असत[illegible] मुलाच्यां संस्कारांत नान्दीश्राद्ध न करणेंच योग्य आहे. दुसरें लग्न, अग्न्याधान, सोमयाग–यांत आपल्या संस्कारकर्मांत 'आपला बाप ज्या पितरांना पार्वण देत[illegible] पितरांना पुत्रानें द्यावींत.' तद्वतच–ज्याची आई व आईचा बाप हीं मेलेलीं बाप ज़िवंत असेल अशानें–त्याचा बाप ज्यांचा उच्चार करतो त्यांचाच उच्चार [illegible] संस्काराच्या नान्दीश्राद्धांत पुढीलप्रमाणें करा[illegible]:—'पितुर्मातृपितामहीप्रपि[illegible] पितुःपितृपितामहप्र पितामहाः, पितुर्मातामहमातृपितामहमातृप्रपितामहा[illegible] उच्चार करून, पार्वणत्रयाच्या नांवानें नान्दीश्राद्ध करावें. आपल्या मातृपा[illegible] मातामहपार्वणाच्या नांवानें करूं नये. बाप व आ[illegible] हे जर जिवंत असतील त[illegible] संस्कारांत आजाच्या मातृपार्वणाचा जो उच्चार करावा तो असाः—'[illegible] मातृपितामहीप्रपितामह्यः वगैरे' पणजा जिवंत अस[illegible]ांहीं असेंच करावें. बा[illegible] वगैरे जर जिवंत असलीं तर त्या पार्वणाला सोडू[illegible] द्यावें. 'बाप ज्या पित[illegible] देतो त्यांनाच पुत्रानेंही द्यावींत' असा जो वर [illegible]क पक्ष सांगितला त्या[illegible] व वर्गाचा पहिला जिवंत असेल तर त्या पार्वणाचा लोप करावा, [illegible] पक्षाची व्यवस्था, ती आपले संस्कार व आपल्या पुत्राचे संस्कार, [illegible] स्थितपणें करावी. याचा अर्थ असा कीं, आपल्या संस्कारांत पित्य[illegible] व पुत्राच्या संस्कारांत आपलीं द्यावींत. वर सांगितलेल्या दोन [illegible] ऐच्छिक असून, तो व्यवस्थित नाहीं, असें जसे कांहीं ग्रंथ[illegible]कार ज्याचा बाप मेलेला असून, आई व आईचा बाप [illegible] जिवंत असती[illegible] श्राद्धाची एका पितृतर्पणानेंच सिद्धि होते, असें स[illegible] वें. समावर्तन करणारा जरी बटु असला तरी त्याच्या सोडमुंज[illegible]लें नान्दीश्रा[illegible] बाप नसल्यास थोरल्या भावानें वगैरेंनीं करावें, असें कांहीं आहे. बापानें मुलाच्या सोडमुंजीच्या वेळीं जें नान्दीश्राद्ध करायचें पितरांच्या नांवानें करावें. बापाचा बाप जिवंत असल्यास, तो संस्कार द्वारलोपपक्षच योग्य आहे असें वाटतें. बहुधा बाप प्रवासादिकांमुळे थोरला भाऊ वगैरेंनीं बटूच्या बापाच्या पार्वणांनीं 'माणवकस्य पितुर्मा[illegible] मह्यः' वगैरे उच्चार करून नान्दीश्राद्ध करावें. बाप मेलेल्याच्या सं[illegible] भाऊ, वगैरेंनीं बटूच्या पार्वणांनीं 'अस्य माणवकस्य पितुर्मातृपि[illegible] वगैरे उच्चार करून नान्दीश्राद्ध करावें. याप्रमाणेंच ब[illegible] जिवंत अ[illegible] बाप अथवा भाऊ संनिध नसल्यास, बापाच्या पितरांच्या न[illegible]ानें स्वतः [illegible] कारण मुंज झालेल्या बटूला कर्माचा अधिकार आहे. विवाहां[illegible] समजावा. मेलेल्या बापाच्या मुलाचे–चौल, मुंज वगैरे संस्कार–चु[illegible]

देवास, ज्याचा संस्कार करावयाचा त्याच्या पार्वणांनीं 'अस्य संस्कारस्य मितामहाः' असा उच्चार करून नान्दीश्राद्ध करावें. बाप जिवंत असून हानें मामा वगैरे संस्कार करणारा जो असेल त्यानें, ज्याचे संस्कार हाचा बापाच्या–आई, बाप वगैरेंच्या नांवानें नान्दीश्राद्ध करावें. बटूचीं मेलेलीं असतील, तर त्यांच्या नांवानें (नान्दीश्राद्ध) करूं नये. नान्दीश्राद्ध पार्वणाचा थोडक्यांत निर्णय येथें संपला.

न्दीश्राद्धे पिण्डदानंकुलधर्मानुसारेणवैकल्पिकम् पिण्डेषुदधिमधुबदरद्रा-लकमिश्रणम् दक्षिणायांद्राक्षामलकानि प्रथमान्तेनसंकल्पः सर्वत्रोच्चारेसं-मगोत्रंवर्जयेत् मालतीमल्लिकाकेतकीकमलानांमालादेयानतुरक्तपुष्पाणाम् चन्दनाद्यलंकृताःसर्वे नान्दीश्राद्धारम्भेपाकान्तरेणवैश्वदेवःसाग्निकान-ःसर्वशाखिभिःकार्यः द्वयोर्द्वयोर्विप्रयोर्युगपन्निमन्त्रणम् भवद्भ्यांक्षणःक्रि-तथाप्राप्नुतांभवन्तौप्राप्नुवावेत्युक्तिःशन्नोदेवीष्यनुमन्त्र्य यवानेवक्षि-वोसिसोमदेवत्योगोसवेदेवानिर्मितः। प्रत्नवद्भिःप्रत्तःपुष्ट्यानान्दीमुखा-मांल्लोकान्प्रीणयाहिनःस्वाहानमइतिपिण्डेमन्त्रः द्विर्द्विर्गन्धादिदानम् मोग्नयेकव्यवाहनायस्वाहासोमायपितृमतेस्वाहेति अत्रश्राद्धे नापसव्यं नचापितृतीर्थेनदानम् पवमानीःशंवतीः शकुनिसूक्तंस्वास्तिसूक्तंचश्राव-वाताइतितृचस्थानेउपास्मैगायेति पञ्चर्चः अक्षंनमीमदंतेतिच तृप्ति सम्पन्नमिति दैवेरुचितमितिप्रश्नः पूर्वाग्रेषुकुशेषुदूर्वासुवाएकस्यद्वौद्वौ अक्षय्यस्थानेनान्दीमुखाः पितरः प्रीयन्तां स्वधावाचनस्थानेनान्दीमुखा-वाचयिष्येइत्यादि नस्वधांप्रयुञ्जीत त्वमूषुवाजिनेतिविप्रविसर्जनम् न्दीश्राद्धान्तेवैश्वदेवोबहवृचानामित्याहुः नात्रश्राद्धांगतर्पणम् अत्रा-पिण्डदानमकार्यम् पितुर्मात्रादिवर्गत्रयोद्देशेनश्राद्धेपितुर्मातापिता-तथैवप्रपितामहीत्यादिश्लोकपाठः द्वारलोपपक्षेयत्पार्वणलोपस्तत्पा-कश्लोकैकदेशलोपःकेवलमातृपार्वणेदेवानकार्याः एताभवन्तुसुप्रीता-र्यः संकल्पविधिनासंक्षिप्तनान्दीश्राद्धप्रयोगः प्रयोगरत्नादौद्रष्टव्यः श्राद्धविचारः।

**द्धांतील पिण्डदान**—नान्दीश्राद्धांत जें पिण्डदान करावयाचें असतें तें, कुलधर्माला अनुसरून वैकल्पिक आहे. दहीं, द्राक्षें व आंवळे—हे पदार्थ पिण्डांत घालावेत. द्राक्षें व आंवळे यांची प्रथमान्त विभक्तीनें संकल्प करावा. जेथें जेथें म्हणून उच्चार करा-येईल तेथें तेथें—नातें (संबंध) नांव आणि गोत्र—हीं वर्ज्य करावींत. मोगरी, केतकी व कमळें—यांच्या माला ब्राह्मणांना द्याव्या. तांबडीं फुलें [illegible] केशर, चंदन, वगैरे लावावींत. नान्दीश्राद्धाला सर्व शाखेच्या लोकांनीं साग्निक व निरग्निक [illegible] जें एकदम आमं[illegible] प्रकार

असा:–'भवद्भयां क्षणःक्रियतां। ॐ तथा प्राप्नुतां भवन्तौ। प्राप्नुवावं। मि
या मंत्रानें अभिमंत्रण करून यव टाकावेत. 'यवोसि सोमदेवत्यो गोसवे दे
प्रत्नवद्भिः प्रत्तःपुष्टया नान्दीमुखान् पितॄनिमांल्लोकान्प्रीणयाहिनः स्वाहा न
पितृकर्मांत योजावा. गन्धेत्यादि उपचार दोन दोनदां करावेत. ब्राह्मणां
करण्याचा जो होम तो:–अग्नये कव्यवाहनाय स्वाहा। सोमाय पितृमते
या मंत्रानें करावा. नान्दीश्राद्धांत अपसव्य करूं नये, तीळ वापरूं नयेत व पि
(हाताचा आंगठा व त्याच्या शेजारचें बोट यांच्या मधल्या भागानें) दान
'पावमानी' व 'शंवन्ती' या ऋचा, शकुनिसूक्त आणि स्वस्तिसूक्त,–हीं
ऐकवावीत. 'मधुवाता०' या तीन ऋचांच्या ऐवजीं 'उपास्मै गायता०'
ऋचा व 'अक्षं नमीमदन्त०' ही (सहावी) अशा ऋचा म्हणाव्या. तृ
जागीं 'संपन्नम्' असा उच्चार करावा. देवकर्मांत 'रुचिरम्' असा प्रश्न कराव
शेंडे करून मांडलेल्या दूर्वा अथवा दर्भ यांवर एकेकाला दोन दोन पि
'अक्षय्यम्' या बद्दल 'नान्दीमुखाः पितरः प्रीयताम्' असें म्हणावें. स्
'नान्दीमुखान्पितॄन्वाचयिष्ये' असें म्हणावें; 'स्वधा' म्हणूं नये. 'त्यमूषु
मंत्रानें ब्राह्मणांचें विसर्जन करावें. कोणी ग्रंथकार सांगतात कीं, नान्दीश्रा
वैश्वदेव करावा. नान्दीश्राद्धांत, श्राद्धांत जें तर्पण असतें तें करूं नये.
पिण्डदान करावें. बापाचे–आई वगैरे जे तीन वर्ग (मागें) सांगितले,
जर नान्दीश्राद्ध असेल, तर 'पितुर्मातामहीचैव तथैव प्रपितामही' वगैरे श्
द्वारलोपपक्ष असल्यास, ज्या पार्वणाचा लोप असेल त्या पार्वण संबंधा
एकदेशलोप करावा. केवळ मातृपार्वणयुक्त नान्दीश्राद्ध असल्यास दे
'एता भवन्तु सुप्रीताः' असा उच्चार करावा. सांकल्प विधीनें संक्षि
करण्याचा प्रयोग, प्रयोगरत्नादि ग्रंथांत पाहावा. याप्रमाणें येथें नान्दीश्
विचार संपला.

एवंस्वस्तिवाचनं क्रतुदक्षसंज्ञकविश्वेदेवयुतंचनान्दीश्राद्धंग र्भाधाना
यथाशाखंगर्भाधानसंस्कारःकार्यः आश्वलायनैः गृह्याग्नौप्राजापत्य
विष्णुंषड्ढारंसकृत्प्रजापतिंचाज्येनहुत्वा जपोपस्थाननस्तः करणा
विष्णुर्योनिंजपेत्सूक्तंयोनिंस्पृष्ट्वात्रिभिर्व्रती। गर्भाधानंततःकु र्यात्सुपु
ध्रुवम् १ एवंनेजमेषेत्यादिजपोपि सर्वथा होमासंभवेअश्वग न्धारसं
इतिमन्त्रेणदक्षिणनासायामासिच्योपगमनं कार्यम् एवंगर्भाधा नसंस्क
स्त्रीगमनेगर्भोत्पत्तौ तत्प्रायश्चित्तंगोदानंकृत्वापुंसवनंकार्यम् अ यमैथुन
तुगर्भशङ्कित्वात्स्नानंमैथुनिनः स्मृतम् अनृतौतुयदागच्छेच्छौच मूत्र
इत्युक्तरीत्याशौचंकृत्वाचामेत् आचमनंविनामूत्रपुरीषोत्सर्गेतु तैला
नाचान्तःश्मश्रुकर्मणिमैथुने। मूत्रोच्चारंयदा [illegible] आहे. विवाहां
पवासुःस्त्रीणांतुनस्नानम [illegible]
[illegible] ज वगैरे संस्कार–चु
[illegible] मेलेल्या [illegible]

**गर्भाधान**—याप्रमाणें पुण्याहवाचन आणि क्रतुदक्ष नांवाच्या विश्वेदेवांसहित असें जें नान्दीश्राद्ध तें करून आपापल्या शाखेप्रमाणें गर्भाधानसंस्कार करावा. जे आश्वलायनशाखी असतील त्यांनीं गृह्याग्नींत प्रजापतिदेवतात्मक भाताचा होम करून, विष्णूला सहा व प्रजापतीला एक अशा आहुतींनीं हवन करावें; व जप, अग्नीचें उपस्थान, दूर्वांचा रस नाकांत पिळणें वगैरे करावें. व्रती होऊन तीन बोटांनीं योनीला स्पर्श करावा आणि 'विष्णुर्योनिं०' या सूक्ताचा जप करावा, व मग गर्भाधान करावें, म्हणजे खात्रीनें सुपुत्र जन्माला येतो. तद्वतच 'नेजमेष०' इत्यादि मंत्रांचाहि जप करावा. होम करण्याचा मुळींच संभव नसल्यास अश्वगन्धेचा रस 'उदीर्ष्वान्त०' या मंत्रानें उजव्या नाकपुडींत घालून स्त्रीसमागम करावा. अशा तऱ्हेनें गर्भाधानसंस्कार केल्यावांचून जर गर्भोत्पत्ति होईल, तर त्याला गोप्रदानाचें प्रायश्चित्त देऊन, पुंसवन करावें. 'तैलाभ्यंग, हजामत, मैथुन व लघवी यांच्या शुद्धीनंतर जो कोणी आचमन करीत नाहीं, तो अहोरात्रानें शुद्ध होतो,' असें वचन असल्यानें, आचमन केलें नसल्यास, एक दिवस उपास करावा. मैथुन संपल्यावर बायकांनीं स्नान करूं नये; कारण, 'अंथरुणावरून उठलेली स्त्री शुद्धा असते व पुरुष अशुद्ध असतो' असें वचन आहे. याप्रमाणें गर्भाधानाला उपयोगी असा जो निर्णय (येथवर संक्षेपांत) सांगितला, तो येथें संपला.

अथनारायणबलिः । एवंकृतगर्भाधानेयदिगर्भोत्पत्त्यभावोमृतापत्यता वा तदाप्रतिबन्धकप्रेतोपद्रवनिवृत्त्यर्थंनारायणबलिर्नागबलिश्चकार्यः तत्रनारायणबलिःशुक्लैकादश्यांपञ्चम्यांश्रवणेवा कालान्तरानुपलब्धेः तत्प्रयोगः परिशिष्टस्मृत्यर्थसारानुसारीकौस्तुभे शुक्लैकादश्यांनदीतीरेदेवालयादौतिथ्यादिकीर्तनान्तेमदीयकुलाभिवृद्धिप्रतिबन्धकप्रेतस्यप्रेतत्वनिवृत्त्यर्थंनारायणबलिंकरिष्ये विधिनास्थापितकुम्भद्वयेहेमादिप्रतिमयोर्विष्णुंवैवस्वतयमंचावाह्यपुरुषसूक्तेन यमायसोममितिचषोडशोपचारैः संपूजयेत् अत्रकेचित्कुम्भपञ्चकेब्रह्मविष्णुशिवयमप्रेतान्पूजयन्ति तत्पूर्वभागेरेखायांदक्षिणाग्रकुशेषुशुन्धन्तांविष्णुरूपीप्रेतइतिदशस्थानेषुदक्षिणसंस्थमपोनिनीयमधुघृततिलयुतान्दशपिण्डान्कश्यपगोत्रदेवदत्तप्रेतविष्णुदैवतअयंतेपिण्डइतिदक्षिणमुखः प्राचीनावीतीवामंजान्वाच्यपितृतीर्थेनदद्यात् गन्धादिभिरभ्यर्च्यप्रवाहणान्तंकृत्वाविसृजेत् तस्यामेवरात्रौश्वःकरिष्यमाणश्राद्धेक्षणःक्रियतामितिएकंत्रीन्पञ्चवाविप्रान्निमन्त्र्योपोषितोजागरंकुर्यात् श्वोभूतेमध्याह्नेविष्णुंसंपूज्यविष्णुरूपंप्रेतंविष्णुब्रह्मशिवयमप्रेतान्वोद्दिश्यैकोद्दिष्टविधिनापादक्षालनादितृप्तिप्रश्नान्तंकृत्वारेखाकरणाद्यवनेजनान्तंतूष्णींकृत्वाविष्णवेब्रह्मणेशिवायसपरिवारयमायेतिचतुरःपिण्डान्नामन्त्रैर्दत्त्वाविष्णुरूपंप्रेतंध्यायन्काश्यपगोत्रदेवदत्तविष्णुरूपप्रेतअयंतेपिण्डइतिपञ्चमंपिण्डंदत्त्वाअर्चनादिप्रवाहणान्तेआचान्तान्दक्षिणादिभिःसंतोष्यतेष्वेकस्मैगुणवतेप्रेतबुद्ध्यावस्त्राभरणादिदत्त्वाविप्रान्वदेत् भवन्तःप्रेतायतिलोदकांजलिदानंकुर्वन्त्विति तेचपवित्रपाणयः कुशतिलतुलसीयुततिलांजलिंप्रेतायकाश्यपगो-

त्रायविष्णुरूपिणेअयंतिलांजलिरितिदद्युः विप्रान्वाचयेत् अनेननारायणबलि-कर्मणाभगवान्विष्णुरिमंदेवदत्तंप्रेतंशुद्धमपापमर्हंकरोत्वितिविसृज्यस्नात्वाभुंजीतेति सिन्धौतुकुम्भपञ्चकेविष्णुब्रह्मशिवयमप्रेतेतिपञ्चकंपूजयेत् स्वर्णरूप्यताम्रलोहमयाश्चत्वारःप्रेतोदर्भमयःअग्निप्रतिष्ठाप्यश्रपितचरुंनारायणायपुरुषसूक्तेन षोडशाहुतिभिर्हुत्वादशपिण्डान्ते पुरुषसूक्ताभिमन्त्रितशंखोदकेनप्रेतंप्रत्यृचंतर्पयेत् विष्ण्वादिचतुर्भ्योबलिंदद्यात्श्वोभूतेकोद्दिष्टविधिनाश्राद्धपञ्चकंकरिष्यइतिसंकल्प्यविप्रपञ्चकेपाद्यादिपिण्डदानान्तेतर्पणादीतिविशेषउक्तः शेषंपूर्ववत् ।

**नारायणबलि**—मागें सांगितल्याप्रमाणें गर्भाधानसंस्कारादि करूनही जर गर्भोत्पत्ति होण्याचा अभाव दिसला, किंवा मुलें होऊन मरत असलीं तर संततीला प्रतिबन्धक अशीं जीं पिशाचें, त्यांचा उपद्रव नाहींसा करण्यासाठीं—नारायणबलि व नागबलि—हे करावेत. नारायणबलि शुद्ध एकादशी, पंचमी अथवा श्रवण नक्षत्र यांवर करावा; कारण, हें कर्म करण्यास दुसरा काल सांगितलेला नाहीं. त्याचा प्रयोग परिशिष्ट व स्मृत्यर्थसार यांच्या अनुरोधानें कौस्तुभांत जो सांगितलेला आहे, तो असाः—शुद्धपक्षांत एकादशीच्या दिवशीं नदीतीरीं किंवा देवळांत–तिथि, वार, वगैरेंचा उच्चार करून 'मदीयकुलाभिवृद्धिप्रतिबन्धकप्रेतस्यप्रेतत्वनिवृत्त्यर्थं नारायणबलिं करिष्ये' असा संकल्प करावा, आणि दोन कुंभांची ( मडकीं ) यथाविधि स्थापना करून, त्यांवर ज्या सुवर्णादिकांच्या दोन प्रतिमा ठेवाव्या, त्यांत विष्णु व वैवस्वत यम यांना बोलावणें करून, विष्णूची पुरुषसूक्तानें व यमाची 'यमाय सोमं०' या मंत्रांनीं अनुक्रमें षोडशोपचारें पूजा करावी. कोणी कोणी दोहोंच्या ठिकाणीं पांच कुंभ मांडून, त्यावर–ब्रह्मा, विष्णु, शिव, यम आणि प्रेत यांची पूजा करतात. कलशाच्यापुढें एक रेघ ओढून, दक्षिणेकडे टोंकें केलेल्या दर्भांवर 'शुन्धन्तां विष्णुरूपी प्रेतः' अशा उच्चारानें दहा ठिकाणीं उत्तरेकडून दक्षिणेकडे पाणी द्यावें व–मध, तूप आणि तिल यांच्या मिश्रणाचे दहा पिण्ड 'काश्यपगोत्र देवदत्तप्रेत विष्णुदैवत अयं ते पिण्डः' असा उच्चार केल्यावर दाक्षिणाभिमुख होऊन, अपसव्यानें डावा गुडघा खालीं वांकवून पितृतीर्थानें (अंगठा व तर्जनींतला भाग) पिण्ड द्यावा. नंतर गंधादिकांनीं पूजा करून, पिण्डाचे प्रवाहणापर्यंतचें कर्म झाल्यावर त्याचें विसर्जन करावें. त्याच रात्रीं 'श्वः करिष्यमाणश्राद्धे क्षणः क्रियताम्' असा उच्चार करून एक, तीन किंवा पांच ब्राह्मणांना आमंत्रण द्यावें; नंतर उपोषित राहून जागरण करावें. दुसऱ्या दिवशीं मध्याह्नकाळीं विष्णूचें पूजन करून, विष्णुरूपी प्रेत अथवा–विष्णु, ब्रह्मा, शिव, यम व प्रेत यांच्या नांवानें एकोद्दिष्टविधीनें पाय धुण्यापासून तृप्तिप्रश्नापर्यंत कर्म करून रेखाकरणादि कर्म मनांत उच्चारून एकान्तांत करावें. 'विष्णवे ब्रह्मणे शिवाय सपरिवारं यमाय' असा उच्चार केल्यावर चार पिण्ड नाममंत्रानें द्यावे. विष्णुरूपप्रेताचें ध्यान करून, 'काश्यपगोत्र देवदत्त विष्णुरूप अयं ते पिण्डः' असें म्हणून पांचवा पिण्ड द्यावा. त्यानंतर पूजा, प्रवाहण वगैरे आटपल्यावर, ब्राह्मणांनीं आचमन केलें म्हणजे त्यांना दक्षिणादिक देऊन संतुष्ट करावें. त्या ब्राह्मणांतलाच एक गुणवान्

ब्राह्मण पाहून त्याला प्रेताच्या नांवानें वस्त्रें, अलंकार वगैरे दिल्यावर 'प्रेताला तिलोदकाचा अंजली द्या' असें ब्राह्मणांना सांगावें. ब्राह्मणांनीं हातांत पवित्रकें घालून—दर्भ, तीळ व तुळशी यांनीं युक्त असा तिलाञ्जलि 'प्रेताय काश्यपगोत्राय विष्णुरूपिणे अयं तिलाञ्जलिः' असें म्हणून द्यावा. 'अनेन नारायणबलिकर्मणा भगवान् विष्णुः इमं देवदत्तं प्रेतं शुद्धं अपापमहं करोतु' असें ब्राह्मणांकडून बोलवावें. त्यानंतर ब्राह्मणांचें विसर्जन करून, स्नान व भोजन हीं करावींत. निर्णयसिंधूंत यावांचून आणखी जो विशेष विधि सांगितला आहे तो असाः—पांच कुंभ करून त्यांत विष्णु, ब्रह्म, शिव, यम व प्रेत या पांच देवतांची पूजा करावी. पहिल्या चार देवतांच्या प्रतिमा अनुक्रमें सोनें, रुपें, तांबें व लोखंड यांच्या करून पांचवी दर्भांची करावी. अग्नीची स्थापना करून त्यावर शिजवलेल्या भातानें नारायणाला पुरुषसूक्तानें सोळा आहुति द्याव्या. हें हवन झाल्यावर दहा पिण्ड द्यावे व पुरुषसूक्तानें अभिमंत्रित केलेल्या शंखांतल्या पाण्यानें एकेक ऋचा म्हणून—प्रेताचें तर्पण करावें. विष्णु वगैरे चार चार देवतांना बलि द्यावे. 'एकोद्दिष्टविधिना श्राद्धपञ्चकं करिष्ये' असा संकल्प करून दुसऱ्या दिवशीं पांच ब्राह्मणांची पाद्यादिक पूजा केल्यावर पिण्डदानापर्यंत सर्व कर्म करावें व नंतर तर्पण करावें. निर्णयसिंधूंत एवढाच विधि विशेष आहे व बाकीचा सारा वरच्याप्रमाणेंच समजावा.

**अथनागबलिः। सचदर्शेपौर्णमास्यांपञ्चम्यामाश्लेषायुतनवम्यांवाकार्यः तत्र पर्षदंप्रदक्षिणीकृत्यनत्वातदग्रेगोवृषनिष्क्रयंनिधायसभार्यस्यममेहजन्मनि जन्मान्तरेवाजातसर्पवधदोषपरिहारार्थंप्रायश्चित्तमुपदिशन्तुभवन्तः। सर्वेधर्मविवेक्तारइत्यादि० विप्रैश्चतुर्दशकृच्छ्रप्रायश्चित्तेनअमुकप्रत्याम्नायद्वारा पूर्वोत्तराङ्गसहितेनाचरितेनतवशुद्धिर्भविष्यतीत्युपदिष्टोदेशकालौसंकीर्त्यपर्षदुपदिष्टचतुर्दशकृच्छ्रप्रायश्चित्तममुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्येइतिसंकल्प्यवपनादिविधिनातदाचरेत् वपनासंभवेद्विगुणः कृच्छ्रप्रत्याम्नायःसर्पवधदोषपरिहारार्थमिमंलोहदण्डंसदक्षिणंतुभ्यमहंसंप्रददइतिदत्त्वागुर्वनुज्ञांलब्ध्वागोधूमव्रीहितिलान्यतमपिष्टेनसर्पाकृतिंकृत्वाशूर्पेनिधायसर्पंप्रार्थयेत् एहिपूर्वंमृतः सर्पअस्मिन्पिष्टेसमाविश। संस्कारार्थमहंभक्त्याप्रार्थयामिसमाहितः१ आवाहनादिषोडशोपचारैःसंपूज्यनत्वाभोसर्पइमंबलिंगृहाणममाभ्युदयंकुरुइतिबलिंदत्त्वापादौप्रक्षाल्याचामेत् देशकालौसंकीर्त्यसभार्यस्यममेहजन्मनि जन्मान्तरेवाज्ञानादज्ञानाद्वाजातसर्पवधोत्थदोषपरिहारार्थंसर्पसंस्कारकर्मकरिष्यइतिसंकल्प्यस्थण्डिलेऽग्निंप्रतिष्ठाप्यध्यात्वाअस्मिन्सर्पसंस्कारहोमकर्मणिदेवतापरिग्रहार्थमन्वाधानंकरिष्येचक्षुषीआज्येनेत्यन्तेअग्नौअग्निंवायुंसूर्यंआज्येनसर्पमुखेप्रजापतिमाज्येनआज्यशेषेणसर्पसद्योयक्ष्येइतिसमिधावाधायअग्नेराग्नेयदिशिप्रोक्षितभूमौ चितिंकृत्वाअग्निंचितिंचपरिसमुह्याग्नेयाग्रदर्भैःपरिस्तीर्यपरिषिच्यषट्पात्रासादनादि चक्षुषीहुत्वासर्पंचित्यामारोप्यजलं श्रोत्रे चरपृष्ठ्वाअग्नौ भूःस्वाहा—अग्नयइदमित्यादिव्याहृतित्रयेणाज्याहुतिर्हुत्वासमस्तव्याहृतिभिश्चतुर्थींसर्प-**

मुखेजुहुयात् आज्यशेषंस्रुवेणैवसर्पदेहेनिषिञ्चेत् नात्रस्विष्टकृतादिशेषम् चमस-जलैःसमस्तव्याहृत्यासर्पपाणिनाप्रोक्ष्य अग्नेरक्षाणोवसिष्ठोग्निर्गायत्री सर्पायाग्निदानेवि० अग्नेरक्षाणोअंहसस्त्रक् अथोपस्थानम् नमोअस्तुसर्पेभ्योयेकेचपृथिवीमनु। येअंतरिक्षेयेदिवितेभ्यः सर्पेभ्योनमः। येदोरोचनेदिवोयेवासूर्यस्य रश्मिभिः। येषामप्सुसदस्कृतंतेभ्यः०। याइषवोयातुधानानांयेवावनस्पतीँरनु। येवावटेषुशेरतेतेभ्यः० । त्राहित्राहिमहाभोगिन् सर्पोपद्रवदुःखतः। संततिंदेहिमेपुण्यांनिर्दुष्टांदीर्घजीविनीम् १ प्रपन्नंपाहिमांभक्त्याकृपालोदीनवत्सल। ज्ञानतोज्ञानतोवापिकृतः सर्पवधोमया २ जन्मांतरेतथैतस्मिन्मत्पूर्वैरथवाविभो। तत्पापं नाशयाक्षिप्रमपराधंक्षमस्वमे ३ इतिसंप्रार्थ्यनागेन्द्रंस्नात्वागत्यततःपुनः। व्याहृतिभिःक्षीराज्येनाग्निंसंप्रोक्ष्यहुतेसर्पजलेनाग्निंसिञ्चेत् यज्ञोपवीतिनासर्वसर्पसंस्कारकर्मतु। नास्थिसंचयनं कुर्यात्स्नात्वाचम्यगृहंव्रजेत् १ सभार्यस्यकर्तुस्त्रिरात्रमाशौचंब्रह्मचर्यंचकार्यम् चतुर्थेऽहनिसचैलंस्नात्वाघृतपायसभक्ष्यैरष्टौविप्रान्भोजयेत् तद्यथा सर्पस्वरूपिणेब्राह्मणायइदंतेपाद्यम् अनन्तस्वरूपिणे० शेषस्वरूपि० कपिलस्व० नागस्व० कालिकस्व० शंखपालस्व० भूधरस्व० इत्यष्टसुदत्त्वास्वपादौप्रक्षाल्याचम्य सर्पस्वरूपिणेब्रा० इदमासनं आस्यताम् एवमनन्तादिषु ततः सर्पस्थानेक्षणःक्रियतामित्यादि ओंतथा प्राप्नोतुभवान्प्राप्नवानि भोसर्परूपइदंतेगन्धं एवमनन्तादिषु एवं पुष्पधूपदीपवस्त्रादिदत्त्वाअन्नंपरिविष्यप्रोक्ष्य सर्पायइदमन्नंपरिविष्टंपरिवेक्ष्यमाणंचदत्तंदास्यमानंचातृप्तेरमृतरूपेणस्वाहासंपद्यन्तांनमम एवमनन्तादिभ्योपि आचान्तेषुभोसर्पअयं तेबलिरित्यादिनाममन्त्रैर्बलिदानम् तेषुपिण्डेषुवस्त्रादि पूजाचकार्या इदमपिसर्वंसव्येनैव विप्रेभ्यस्ताम्बूलदक्षिणादिदत्त्वा आचार्यंसंपूज्य कलशेसुवर्णनागमावाहनादिषोडशोपचारैः संपूज्यप्रार्थयेत् ब्रह्मलोकेचये–सर्पाःशेषनागपुरोगमाः। नमोस्तुतेभ्यःसुप्रीताः प्रसन्नाः सन्तुमे सदा १ विष्णुलोकेचयेसर्पावासुकिप्रमुखाश्चये। नमोस्तु० २ रुद्रलोकेचयेसर्पास्तक्षकप्रमुखास्तथा। नमोस्तु० ३ खाण्डवस्यतथादाहेस्वर्गंयेचसमाश्रिताः। नमोस्तु ०४ सर्पसत्रेचयेसर्पाआस्तिकेनचरक्षिताः। नमोस्तु० ५ मलयेचैवयेसर्पाःकर्कोटप्रमुखाश्चये। नमोस्तु० ६ धर्मलोकेचयेसर्पावैतरण्यांसमाश्रिताः। नमो० ७ येसर्पाःपार्वतीयेषुदरीसंधिषुसंस्थिताः। नमोस्तु० ८ ग्रामेवायदिवारण्येयेसर्पाःप्रचरन्तिहि। नमो० ९ पृथिव्यांचैवयेसर्पायेसर्पाबिलसंस्थिताः। नमो० १० रसातलेचयेसर्पाअनन्ताद्यामहाबलाः। नमो० ११ एवंस्तुत्वादेशकालौसंकीर्त्यकृतसर्पसंस्कारकर्मणःसांगतार्थमिमंहैमनागंसकलशंसवस्त्रंसदाक्षिणंतुभ्यमहंसंप्रददेनमम अनेनस्वर्णनागदानेनानन्ताद्योनागदेवताः प्रीयन्ताम् आचार्यायगोदानम् यस्यस्मृत्याच० मयाकृतंसर्पसंस्काराख्यकर्मतद्भवतांविप्राणांवचनात्परमेश्वरप्रसादात्सर्वं परिपूर्णमस्तु तथास्त्वितितेब्रूयुः ब्राह्मणांस्तोषयेत् सांगतार्थंब्राह्मणान्भोजयेत् कृत्वासर्पस्य संस्कारमनेनाविधिनानरः। विरोगोजायतेक्षिप्रंसंतर्तिलभतेशुभाम् १

**नागबलि**—अमावास्या, पौर्णिमा, पंचमी अथवा आश्लेषासह नवमी यांपैकीं कोणत्याही दिवशीं नागबलि करावा. ब्राह्मणमंडळाला प्रदक्षिणा करून नमस्कार करावा. त्यांच्यापुढें एक गाय व बैल यांची किंमत ठेवून—'भार्येसह माझ्या हातून या जन्मीं अथवा मागच्या जन्मीं घडलेल्या सर्पवधाच्या पातकाच्या निरसनासाठीं मला तुम्हीं प्रायश्चित्त सांगावें. आपण सर्व धर्माचा विचार करणारे आहां—' अशी त्यांची प्रार्थना करावी. त्यानंतर ब्राह्मणांनीं 'पूर्वांग आणि उत्तरांग यांनीं युक्त व अमुक प्रत्याम्नायाच्या द्वारें चौदा कृच्छ्रांचें प्रायश्चित्त केल्यानें तुझी शुद्धि होईल'—असें सांगावें. ब्राह्मणांनीं असें सांगितल्यावर--देश, काल, वगैरेंचा उच्चार करून, 'पर्षदुपदिष्टं चतुर्दशकृच्छ्रप्रायश्चित्तं ( अमुक ) प्रत्याम्नायेन अहं आचरिष्ये' असा संकल्प करावा. आणि क्षौरादि विधि केल्यावर तें प्रायश्चित्त करावें. क्षौर न केल्यास दुप्पट कृच्छ्रप्रायश्चित्तांचा प्रत्याम्नाय सांगितला आहे. 'सर्पवधदोषपरिहारार्थं इमं लोहदण्डं सदक्षिणं तुभ्यमहं संप्रददे' असें म्हणून लोहदण्डाचें दान करावें. नंतर गुरूची आज्ञा घेऊन—गहूं, तांदूळ अथवा तीळ—यापैकीं कोणच्या तरी पिठाचा साप बनवून सुपांत ठेवावा आणि 'एहि पूर्वमृतः सर्प अस्मिन्पिष्टे समाविश। संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः ॥' अशी प्रार्थना करावी, आणि नंतर आवाहनादि केल्यावर षोडशोपचारें त्याची पूजा करून त्याला नमस्कार करावा. 'भो सर्प इमं बलिं गृहाण मम अभ्युदयं कुरु' असें म्हणून त्याला बलि द्यावा आणि पाय धुऊन आचमन करावें. त्यानंतर देशकालादिकांचा उच्चार करून 'सभार्यस्य मम इह-जन्मनि जन्मांतरे वा ज्ञानादज्ञानाद्वा जातसर्पवधोत्थदोषपरिहारार्थं सर्पसंस्कारकर्म करिष्ये' असा संकल्प करावा. स्थंडिलावर अग्नीची स्थापना करून ध्यान करावें. अस्मिन्सर्पसंस्कारहोमकर्मणि देवतापरिग्रहार्थं अन्वाधानं करिष्ये। चक्षुषी आज्येन इत्यन्ते अग्नौ अग्निं वायुं सूर्यं आज्येन सर्पमुखे प्रजापतिं आज्येन आज्यशेषेण सर्पं सद्यो यक्षे' असा संकल्प केल्यावर अग्नीला दोन समिधा द्याव्या. अग्नीच्या अग्नेयीला प्रोक्षण करून ( पाणी शिंपडून ) त्यावर चिता करावी. अग्नीला व चितेला परि-समूहन (रचना) करून अग्नेयीकडे टोकें केलेल्या दर्भाचीं परिस्तरणें (सभोंवार पसरणें) घालावींत. नंतर ( त्यांवर ) पर्युक्षण (पाणी शिंपडणें) करून सहा पात्रें मांडावींत व चक्षुषी होमापर्यंत कर्म केल्यावर सर्पाला चितेवर ठेवावा. पाणी व कान यांना स्पर्श करून, 'भूः स्वाहा अग्नये इदंनमम' इत्यादि तीन व्याहृतिमंत्रांनीं तुपाच्या आहुतींचें अग्नींत हवन करावें. समस्त व्याहृतिमंत्रांनीं चौथी आहुति सापाच्या तोंडांत द्यावी. शिल्लक राहिलेलें तूप स्रुवापात्रांत ( लांकडी पळींत ) घेऊन सर्पावर ओतावें. येथें स्विष्टकृतादि होमशेष नाहीं. चमस ( चमचा ) पात्रांत पाणी घेऊन, तें हातानें समस्त व्याहृतिमंत्रांनीं सर्पावर ( प्रोक्षण ) शिंपडावें. नंतर 'अग्ने रक्षाणो वसिष्ठोग्निर्गायत्री। सर्पायाग्निदाने विनियोगः'। असा मंत्र म्हणावा आणि 'नमो अस्तु सर्पेभ्यो ये केच पृथिवी मनु। ये अन्तरिक्षे ये दिवि तेभ्यः सर्पेभ्यो नमः ॥ ये दोरोचने दिवो ये वा सूर्यस्य रश्मिभिः येषामप्सु सदस्कृतं तेभ्यः ० ॥ या इषवो यातुधानानां ये

वा वनस्पती ८ रनु। ये वा वटेषु शेरते तेभ्यः ०॥ त्राहि त्राहि महाभोगिन् सर्पोपद्रवदुःखतः । संततिंदेहिमेपुण्यांनिर्दुष्टां दीर्घजीविनीम् ॥ प्रपन्नं पाहि मां भक्त्या कृपालो दीनवत्सल । ज्ञानतोऽज्ञानतो वापि कृतःसर्पवधोमया ॥ जन्मान्तरे तथैतस्मिन्मत्पूर्वैरथवा विभो । तत्पापं नाशयक्षिप्रमपराधं क्षमस्व मे' ॥ याप्रमाणें उपस्थानपूर्वक नागेन्द्राची प्रार्थना करून स्नान करावें व नंतर दूध व तूप यांनीं अग्नीचें प्रोक्षण करावें. साप जळून गेल्यानंतर पाण्यानें अग्नि विझवावा. सापाचें सारें संस्कारकर्म सव्यानेंच करावें. अस्थि गोळा करण्याचें कारण नाहीं. स्नान व आचमन केल्यावर घरीं जावें. कर्त्यानें आपल्या बायकोसह तीन रात्रीं सुतक व ब्रह्मचर्य हीं पाळावींत. चौथ्या दिवशीं सचैल स्नान करून-तूप, खीर व इतर पदार्थ यांचें आठ ब्राह्मणांना जें जेवण घालावें तें असें:—'सर्पस्वरूपिणे ब्राह्मणाय इदंते पाद्यम्। अनन्तस्वरूपिणे०। शेषस्वरूपिणे०। कपिलस्वरूपिणे०। नागस्व०। कालिकस्व०। शंखपालस्व०। भूधरस्व०।' आठ ब्राह्मणांना याप्रमाणें पाद्य दिल्यावर स्वतःचे पाय धुऊन आचमन करावें. त्यानंतर 'सर्पस्वरूपिणे ब्राह्मणाय इदं आसनं आस्यताम्।' असें म्हणून, पहिल्या ब्राह्मणाला आसन द्यावें. तद्वतच अनन्तादिकांच्या नांवांनीं इतर सातांना आसनें देऊन, क्षण द्यावेत, ते पुढीलप्रमाणें:—'सर्पस्थाने क्षणः क्रीयताम् इत्यादि ॐ तथा प्राप्नोतु भवान् प्राप्नवामि' त्यानंतर 'भोसर्परूप इदंते गन्धं' असें म्हणून गन्ध द्यावें. याप्रमाणेंच अनन्तादिकांच्या नांवांनीं क्षण व गन्ध द्यावींत. त्यानंतर पुष्प, धूप, दीप, वस्त्र वगैरे देऊन पानें मांडावींत आणि त्यांवर सर्व पदार्थ वाढल्यावर प्रोक्षण करून 'सर्पाय इदं अन्नं परिविष्टं परिवेक्ष्यमाणंच दत्तं दास्यमानंच आतृप्तेः अमृतरूपेण स्वाहा सम्पद्यन्तां न मम' असें म्हणावें व अन्न अर्पण करावें. अनन्तादिकांबद्दलही असेंच करावें. ब्राह्मणभोजनानंतर 'भो सर्प अयं ते बलिः' वगैरे नाममंत्रांनीं बलिदान करावें व पिण्डांची वस्त्रादिकांनीं पूजा करावी. हें सारें सव्यानेंच करावें. तांदूळ, दक्षिणा वगैरे ब्राह्मणांना देऊन आचार्यांची पूजा करावी आणि कलशांत सोन्याच्या नागाची आवाहनादिक षोडशोपचारें पूजा केल्यावर-'ब्रह्मलोकेच ये सर्पाः शेषनागपुरोगमाः । नमोस्तु तेभ्यः सुप्रीताः प्रसन्नाः सन्तु ते सदा ॥ विष्णुलोकेच ये सर्पा वासुकिप्रमुखाश्चये । नमोस्तु०॥ रुद्रलोकेच ये सर्पास्तक्षकप्रमुखास्तथा। नमोस्तु०॥ खाण्डवस्य तथा दाहे स्वर्गं येच समाश्रिताः । नमोस्तुते०॥ सर्पसत्रेच ये सर्पा अस्तिकेन च रक्षिताः । नमोस्तु० ॥ मलये चैव ये सर्पाः कर्कोटप्रमुखाश्चये। नमोस्तु० ॥ धर्मलोके च ये सर्पा वैतरण्यां समाश्रिताः । नमोस्तु ० ॥ ये सर्पाः पार्वती येषु दरीसन्धिषु संस्थिताः । नमोस्तु० ॥ ग्रामेवायदिवारण्ये ये सर्पाः प्रचरन्ति हि। नमोस्तु०॥ पृथिव्यां चैव ये सर्पा ये सर्पा बिलसंस्थिताः । नमोस्तु०॥ रसातलेच ये सर्पा अनन्ताद्यामहाबलः । नमोस्तु० ॥' अशी प्रार्थना करावी व देशकालादिकांचा नंतर उच्चार करून-'कृतसर्पसंस्कारकर्मणः सांगतार्थे इमं हैमं नागं सकलशं सवस्त्रं सदक्षिणं तुभ्यं अहं संप्रददे नमम अनेन स्वर्णनागदानेन अनन्तादयो नागदेवताः प्रीयन्ताम् ॥' असा संकल्प सोडावा आणि कलशांत स्थापन केलेला नाग

दान करावा, आचार्याला गोदान द्यावें व--'यस्य स्मृत्याच० मयाकृतं सर्पसंस्काराख्यं कर्मतद्भवतां विप्राणां वचनात्परमेश्वरप्रसादात्सर्वं परिपूर्णमस्तु।' असें म्हणून कर्माची समाप्ति करावी. ब्राह्मणांनीं 'तथास्तु' असें म्हणावें. ब्राह्मणांचा सन्तोष करावा. कर्माची सांगता होण्यासाठीं ब्राह्मणांना भोजन द्यावें. या विधीनें जर सर्पसंस्कार केला, तर मनुष्य त्वरित निरोगी होऊन, त्याला चांगली संतति प्राप्त होते.

अथहरिवंशश्रवणविधिः एवमपिपुत्रोत्पत्त्यसिद्धौकर्मविपाकग्रन्थोक्तहरिवंशश्रवणादिविधानंकुर्यात् तच्चषडब्दंचतुरब्दंत्र्यब्दंसार्धाब्दमब्दंवाप्रायश्चित्तं कृत्वाकार्यम्।

**हरिवंशश्रवण**—इतकें करूनहि जर पुत्रोत्पत्ति होणार नाहीं, तर 'कर्मविपाक' नांवाच्या ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें 'हरिवंश' ग्रंथाचा श्रवणादि विधि करावा. हा विधि सहा वर्षें, चार वर्षें, तीन वर्षें, दीड वर्ष किंवा एक वर्ष प्रायश्चित केल्यावर करावा.

तत्रत्रिंशत्कृच्छ्रात्मकोऽब्दःकृच्छ्रस्तुद्वादशदिनसाध्यः तथाहि प्रथमदिनेमध्याह्नेहविष्यस्यैकभक्तस्यषड्विंशतिर्ग्रासाभोक्तव्याःद्वितीयेऽहनिनक्तंद्वाविंशतिर्ग्रासाः तृतीयेअयाचितस्यचतुर्विंशतिर्ग्रासाः चतुर्थेनिरशनम् अयंपादकृच्छ्रः कथंचित् त्रिगुणाकृतोयंप्राजापत्यः कृच्छ्रः एकभक्तनक्तायाचितद्वयोपवासद्वयैरर्धकृच्छ्रः यद्वा त्र्यहमयाचितंत्र्यहमुपवासइत्यर्धकृच्छ्रः एकभक्तायाचितोपवासैःकथंचित्त्रिगुणैःपादोनकृच्छ्रः येषुनवदिनेषुभोजनप्राप्तिस्तत्रग्रासानियमंत्यक्त्वा पाणिपूरान्नभोजनेअतिकृच्छ्रः एकग्रासपर्याप्तस्यप्राणधारणपर्याप्तस्यवादुग्धस्य एकविंशतिदिनेषुभक्षणेकृच्छ्रातिकृच्छ्रः एकदिनेसकुशोदकमिश्रपञ्चगव्याशनंएकउपवास इति द्वैरात्रिकःसांतपनकृच्छ्रः पञ्चगव्यकुशोदकानाममिश्राणामेकैकस्यैकैकदिनेऽशनमेकउपवासइतिसप्ताहसाध्योमहासान्तपनः त्र्यहं मिश्रितपञ्चगव्याशनेयतिसान्तपनम्तप्तानांदुग्धघृतजलानामेकैकस्यत्रिदिने पानमुपवासत्रयंचेतितप्तकृच्छ्रः शीतानांपानेशीतकृच्छ्रः यद्वा तप्तानांघृतादीनामेकैकदिनेऽशनंचतुर्थदिनेउपवासइतिदिनचतुष्टयसाध्यस्तप्तकृच्छ्रः द्वादशाहोपवासेनपराककृच्छ्रः शुक्लपक्षेप्रतिपदादितिथिषुमयूराण्डसमानैकैकग्रासान्वर्धयन्पूर्णिमायां पञ्चदशग्रासाः क्षयेचतुर्दशवृद्धौषोडशसंपद्यन्ते कृष्णपक्षे एकैकग्रासह्रासेनामायामुपवासइति माससाध्यंयवमध्यसंज्ञंचान्द्रायणम् कृष्णपक्षेप्रतिपदिचतुर्दशग्रासान्भुक्त्वाएकैकग्रासह्रासेनदर्शेअनशनंशुक्लेएकैकग्रासवृद्धिरितिकृष्णादिशुक्लान्तंपिपीलिकामध्यचान्द्रायणम् कृच्छ्रचान्द्रायणादेःत्रिकालस्नानग्रासाभिमन्त्रणादिविधियुतःप्रयोगःप्रायश्चित्तप्रकरणेज्ञेयः अतिकृच्छ्रादिलक्षणंप्रसंगादत्रोक्तम् अब्दगणनातुप्राजापत्यकृच्छ्रैरेव।

**कृच्छ्रस्वरूप**—तीस कृच्छ्रांचा एक अब्द, एक कृच्छ्र जो बारा दिवसांनीं साध्य होतो तो येणेंप्रमाणें:—पहिल्या दिवशीं एकभुक्त राहून, मध्यान्हकाळीं हविष्यान्नाचे सव्वीस घांस खावेत. दुसऱ्या दिवशीं नक्त करून बावीस

घांस खावेत. तिसऱ्या दिवशीं कोणापाशीं न मागतां मिळाल्यास चोवीस घांस खावेत. चौथ्या दिवशीं उपास करावा. याला 'पाद-कृच्छ्र' असें म्हणतात. याच्या तिप्पटीचा 'प्राजापत्यकृच्छ्र' होतो. पहिल्या दिवशीं एकभुक्त, दुसऱ्या दिवशीं नक्त, तिसरा व चौथा या दोन्ही दिवशीं अयाचित भोजन आणि पांचवा व सहावा या दोन दिवशीं उपवास, याला 'अर्धकृच्छ्र' म्हणतात, (तद्वतच) तीन दिवस अयाचित भोजन आणि तीन दिवस उपास यालाही 'अर्धकृच्छ्र'च म्हणतात. पहिल्या दिवशीं एकभुक्त, दुसऱ्या दिवशीं अयाचित व तिसऱ्या दिवशीं उपास-असें लागोपाठ तीनदां केलें म्हणजे 'पादोनकृच्छ्र' होतो. नऊ दिवस जेवणाचे झाल्यावर घांसांचा नियम सोडून, हातांत राहील इतक्या अन्नाचें जें जेवण करणें त्याला 'अतिकृच्छ्र' हें नांव आहे. एक घांस अन्न किंवा फक्त प्राण राहाण्यापुरतें दूध एकवीस दिवस जें पिणें त्याला 'कृच्छ्रातिकृच्छ्र' म्हणतात. एक दिवस कुशोदक मिसळलेल्या पंचगव्याचें प्राशन आणि एक दिवस उपास याला 'द्वैरात्रिक सांतपनकृच्छ्र' म्हणतात. एक दिवस पंचगव्य आणि एक दिवस कुशोदक असें लागोपाठ सात दिवस करण्यास 'महासान्तपन' म्हणतात. तीन दिवसपर्यंत पंचगव्यमिश्रित भोजन (अशन) करण्याला 'यतिसान्तपन' म्हणतात. पहिल्या दिवशीं तापवलेलें दूध, दुसऱ्या दिवशीं तापवलेलें तूप, तिसऱ्या दिवशीं तापवलेलें पाणी व पुढें तीन दिवस उपास याला 'तप्तकृच्छ्र' म्हणतात. दूध, तूप व पाणी हीं थंड पिऊन पुढें तीन दिवस उपास करण्यास 'शीतकृच्छ्र' म्हणतात. अथवा-तापलेलें दूध वगैरे तीन दिवस पिऊन, चौथ्या दिवशीं उपास करण्याला 'तप्तकृच्छ्र' म्हणतात. बारा दिवसांच्या उपासाला 'पराककृच्छ्र' म्हणतात. शुद्ध प्रतिपदेपासून पुढें रोज मोराच्या अंड्याएवढा घांस वाढवीत नेऊन पौर्णिमेला पंधरा घांस-मध्यें एखाद्या तिथीचा क्षय असल्यास पौर्णिमेला चौदा (घांस) होतात व तिथीची वृद्धि असल्यास सोळा (घांस) होतात. कृष्णपक्षांत रोज एकेक घांस कमी करून, अमावास्येला उपास करणें, हें जें एक महिन्यानें साध्य होणारें (व्रत) तें 'यवमध्यचान्द्रायण' होय. कृष्णपक्षांतल्या प्रतिपदेला चौदा घांस खाऊन, एकेक घांस कमी करीत अमावास्येला उपास करणें, आणि पुढें शुक्लपक्षांत एकेक घांस रोज वाढविणें-असें जें कृष्णपक्षांत आरंभ करून शुद्धांत पूर्ण करणें, तें 'पिपीलिकामध्यचान्द्रायण' होय. कृच्छ्रचान्द्रायणांत त्रिकालस्नान करणें, घांसांचें अभिमंत्रण करणें वगैरेबद्दलचा विधियुक्त प्रयोग प्रायश्चित्तप्रकरणांत पाहावा. अतिकृच्छ्रादिकांचें लक्षण प्रसंगवशात् येथें सांगितलें. अब्दाची गणना प्राजापत्यकृच्छ्रांनींच करावी.

**अथप्रत्याम्नायाः । तत्रप्राजापत्यप्रत्याम्नायाः दशसहस्रगायत्रीजपः गायत्र्यासहस्रंतिलहोमः क्वचित्सहस्रंव्याहृत्यातिलहोमउक्तः शतद्वयंप्राणायामाः द्वादशब्राह्मणभोजनम् यावत्केशशोषणंविरम्यतीर्थेद्वादशस्नानानि वेदसंहितापारायणम् योजनंयात्रा द्वादशसहस्रनमस्काराः द्वात्रिंशदुत्तरशतंप्राणायामान्कृत्वाअहोरात्रमुपोषितःप्राङ्मुखस्तिष्ठेत् गोमूत्रेणयावकभक्षणेऐकाहिककृच्छ्रम्**

कश्चित्तु रुद्रैकादशिनीजपात्कृच्छ्रमाह पावकेष्टिः पावमानेष्टिः षडुपवासाः प्राजापत्यप्रत्याम्नायाः एकविप्रभोजनमुपवासस्य अत्यशक्तौ सहस्रगायत्रीजपो द्वादशप्राणायामा वेति स्मृत्यर्थसारे प्राजापत्येष्वशक्तस्तु धेनुं दद्यात्पयस्विनीम्‌ धेनोरभावे निष्कं स्यात्तदर्धं पादमेव वा १ अशीतिगुञ्जात्मकः कर्षः चत्वारः कर्षा निष्कम् निष्कनिष्कार्धनिष्कपादान्यतमप्रमाणं हेमरूप्यं वा धेनुमूल्यं देयम्‌ अत्यशक्तेन निष्कपादार्धरजतं तत्समं धान्यादि वा देयम्‌ अतिकृच्छ्रे गोद्वयम्‌ सांतपने गोद्वयम्‌ पराके तप्तकृच्छ्रे च गोत्रयम्‌ कृच्छ्रातिकृच्छ्रे गोचतुष्टयं गोत्रयं वा चान्द्रायणे अष्टौ पञ्च चतस्रस्तिस्रो वा गावः मासं पयोव्रते मासोपवासे च पञ्च गावः मासं गोमूत्रयावकव्रते षट् गावः ।

**कृच्छ्रप्रतिनिधि**—प्राजापत्याचे प्रतिनिधि (प्रत्याम्नाय) गायत्रीमंत्राचा दहा हजार जप करावा. गायत्रीमंत्रानें एक हजार तिलहोम करावा. व्याहृतिमंत्रानें तिलहोम करावा असेंही कांहीं ग्रंथांत म्हटलें आहे. दोनशें प्राणायाम करावेत. बारा ब्राह्मणांना भोजन घालावें. एकदां स्नान केल्यावर केंस वाळेपर्यंत थांबून पुन्हा स्नान अशीं बारा स्नानें तीर्थावर करावींत. वेदांच्या संहितेचें पारायण करावें. चार कोस (एक योजन) यात्रा करावी. बारा हजार नमस्कार घालावे. अहोरात्र उपास करून, एकशेंबत्तीस प्राणायाम केल्यावर पूर्वेकडे तोंड करून उभें राहावें. गोमूत्रमिश्रित यव खाल्ले असतां एका दिवसांत कृच्छ्र होतो. रुद्राच्या एकादशिनीचा जप केल्यानेंही कृच्छ्र होतो असें कोणी एक ग्रंथकार म्हणतो. पावकेष्टि करावी. पावमानेष्टि करावी. सहा उपास करावे. हे सारे प्राजापत्याचे प्रत्याम्नाय होत. एका ब्राह्मणाला जेवूं घालणें हा उपासाचा प्रतिनिधि होय. अगदींच असमर्थता असल्यास हजार गायत्री जप किंवा बारा प्राणायाम-हा उपासाचा प्रतिनिधि असल्याचें स्मृत्यर्थसार नांवाच्या ग्रंथांत सांगितलें आहे. प्राजापत्यकृच्छ्र करण्यासाठीं जर असमर्थता असली, तर दूध देणारी गाय दान करावी. गाय देण्याची शक्ति नसल्यास निष्क, अर्धनिष्क अथवा पाव निष्क द्यावें. ऐशीं गुंजांचा एक कर्ष होतो व चार कर्षांचा एक निष्क होतो. निष्क, अर्धा निष्क किंवा पाव निष्क यांपैकीं कोणच्याही प्रमाणांतलें सोनें अथवा रुपें, गाईची किंमत म्हणून द्यावें. दोन गाई दिल्या असतां अतिकृच्छ्र होतो. याप्रमाणेंच दोन गाई दिल्यानें सान्तपनही होतो. तीन गाई दिल्यावर पराक व तप्तकृच्छ्र होतात. कृच्छ्रातिकृच्छ्रासाठीं तीन किंवा चार गाई द्याव्या. आठ, पांच, चार किंवा तीन गाई दिल्यानें चान्द्रायण होतें. एक महिना पाणी व पिणें, जव खाणें, उपास करणें वगैरे व्रतांसाठीं पांच गाई द्याव्या. महिनाभर गोमूत्र पिणें व यव खाणें या व्रतासाठीं सहा गाई द्याव्या.

अथ प्रायश्चित्तप्रयोगः । सचैलं स्नात्वा शक्तौ क्लिन्नवासाः पर्षदग्रे गोवृषप्रत्याम्नायं निष्कादिप्रमाणं ब्रह्मदण्डं निधाय साष्टाङ्गं प्रणम्य पर्षदं प्रदक्षिणीकुर्यात्‌ सर्वधर्मविवेक्तारो गोप्तारः सकला द्विजाः । मम देहस्य संशुद्धिं कुर्वन्तु द्विजसत्तमाः १ मया कृतं महाघोरं ज्ञातमज्ञातकिल्बिषम्‌ । प्रसादः क्रियतां मह्यं शुभानुज्ञां प्रयच्छथ

२ पूज्यैःकृतपवित्रोहंभवेयंद्विजसत्तमाः । मामनुगृह्णन्तुभवन्तइतिवदेत् विप्रैःकिंतेकार्यंमिथ्यामावादीःसत्यमेववदेतिपृष्टः स्वपापंख्यापयेत् मयामम-पत्न्यावाइहजन्मनिजन्मान्तरेवाअनपत्यत्वमृतापत्यत्वादिनिदानभूतबालघा-तविप्ररत्नापहारादिदुरितंकृतंतस्यनाशायकरिष्यमाणे हरिवंशश्रवणादौकर्म-विपाकोक्तेविधानेऽधिकारार्थंदीर्घायुष्मत्पुत्रादिसंततिप्राप्तयेप्रायश्चित्तमुपदिश-न्तुभवन्तइतिप्रार्थयेत् तेचपापिनापूजितानुवादकाग्रेषडब्दत्र्यब्दसार्धाब्दान्यत-मप्रायश्चित्तेनपूर्वोत्तराङ्गसहितेनाचरितेनतवशुद्धिर्भविष्यतितेनत्वंकृतार्थोभवि-ष्यसीतिवदेयुःअनुवादकःपापिनंवदेत् ततःकर्ता ओमित्यङ्गीकृत्यपर्षदंविसृज्य-देशकालौसंकीर्त्य सभार्यस्यममैतज्जन्मजन्मान्तरार्जितानपत्यत्वमृतापत्यत्वा-दिनिदानभूतबालघातविप्ररत्नापहारादिजन्यदुरितसमूलनाशकर्मविपाकोक्तवि-धानाधिकारसिद्धिद्वारादीर्घायुष्मद्बहुपुत्रादिसंततिप्राप्तयेषडब्दंत्र्यब्दंसार्धाब्दं-वाप्रायश्चित्तंपूर्वोत्तराङ्गसहितममुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्यइतिसंकल्प्य दि-नान्तेकेशरोमनखादिवापयित्वास्नात्वा आयुर्बलंयशोवर्चःप्रजाः पशुवसूनि-च ब्रह्मप्रज्ञांचमेधांचत्वंनोदेहिवनस्पते १ इतिविहितकाष्ठेनदन्तधावनंकुर्यात् ततोदशस्नानानि तत्रभस्मस्नानम् ईशायनमःशिरसि तत्पुरुषायनमो मुखे अघो-रायनमो हृदये वामदेवायनमो गुह्ये सद्योजातायनमःपादयोः प्रणवेनसर्वाङ्गे-षुभस्मविलिम्पेत् ईशानादिपदोपेतैर्मन्त्रैर्वाभस्मलेपः ।

**प्रायश्चित्तप्रयोग**—वस्त्रासह स्नान केल्यावर, जो सशक्त असेल त्यानें ओलेत्या-नेंच ब्राह्मणसमुदायापुढें एक गाय व एक बैल यांचा प्रतिनिधि म्हणून निष्काच्या किंमतीइतका ब्रह्मदण्ड ठेवून साष्टांग नमस्कार घालावा व नंतर ब्राह्मणांना प्रदक्षिणा घालून 'सर्वे धर्मविवक्तारो गोप्तारः सकला द्विजाः। मम देहस्य संशुद्धिं कुर्वंतु द्विजसत्तमाः ॥ मया कृतं महाघोरं ज्ञातमज्ञातकिल्बिषम्। प्रसादः क्रियतां मह्यं शुभानुज्ञां प्रयच्छथ॥ पूज्यैः कृतपवि-त्रोहं भवेयं द्विजसत्तमाः।' अशी प्रार्थना करावी आणि 'मामनुगृह्णन्तु भवन्तः' (माझ्यावर तुम्ही अनुग्रह करा) असें म्हणावें. ब्राह्मणांनीं 'किं ते कार्यं। मिथ्या मावादीः। सत्यमेव वद' (तुझें काय काम आहे? खोटें बोलूं नकोस. खरें सांग.) असें विचारल्यावर आपलें काम सांगावें तें असें:—'मया मम पत्न्या वा इहजन्मनि जन्मान्तरे वा अनपत्यत्वमृतापत्यत्वादिनिदानभूतबालघातविप्ररत्नापहारादि दुरितं कृतं तस्य नाशाय करिष्यमाणे हरिवंशश्रवणादौ कर्मविपाकोक्ते विधानेऽधिकारार्थे दीर्घायुष्यपुत्रादि सन्ततिप्राप्तये प्रायश्चित्तमुपदिशंतु भवन्तः' अशी प्रार्थना केल्यावर, ब्राह्मणांनीं—पूजा केलेल्या अनुवादकाजवळ (दुभाष्या) 'षडब्दत्र्यब्दसार्धाब्दान्यतम प्रायश्चित्तेन पूर्वोत्तरांगसहितेनाचरितेन तव शुद्धिर्भविष्यति तेन त्वं कृतार्थो भविष्यसि' असें सांगावें व तें त्यानें पाप्याला (प्रायश्चित्तेच्छूला) सांगावें. त्यानंतर प्रायश्चित्त करणारानें 'ॐ' असें म्हणून ब्राह्मणसभेचें विसर्जन करावें. तसें केल्यावर देशकाला-दिकांचा उच्चार करून, 'सभार्यस्य मम एतजन्मजन्मान्तरार्जितानपत्यत्वमृतापत्यत्वादि

निदानभूतबालघातविप्ररत्नापहारादिजन्यदुरितसमूलनाशकर्मविपाकोक्तविधानाधिकार—सिद्धिद्वारा दीर्घायुष्मद्बहुपुत्रादिसन्ततिप्राप्तये षडब्दं त्र्यब्दं सार्धाब्दं वा प्रायश्चित्तं पूर्वोत्तराङ्गसहितं ( अमुक ) प्रत्याम्नायेन अहं आचरिष्ये'—असा संकल्प करावा व दोन प्रहरीं क्षौर करून स्नान करावें. आयुर्बलं यशोवर्चः प्रजाः पशुवसूनिच। ब्रह्म-प्रज्ञांच मेधांच त्वं नोदेहि वनस्पते ॥' अशी वनस्पतीची प्रार्थना करावी आणि योग्य काष्ठानें दन्तधावन केल्यावर दहा स्नानें करावींत. भस्मस्नान करावें. 'ईशानाय नमः' या मंत्रानें मस्तकाला, 'तत्पुरुषायनमः' या मंत्रानें तोंडाला, 'अघोरायनमः' या मंत्रानें हृदयाला, 'वामदेवायनमः' या मंत्रानें गुह्यस्थानाला, 'सद्योजातायनमः' या मंत्रानें पायांना आणि प्रणव ( ॐ ) या मंत्रानें सर्वांगाला भस्म लावावें. अथवा 'ईशानादि' पदांनीं युक्त असे सर्व मंत्र म्हणून ( सर्वांगाला ) भस्म लावावें.

**अथगोमयस्नानम्। गोमयमादाय प्रणवेनादिक्षुदक्षिणभागं तीर्थेचोत्तरभागं-प्रक्षिप्यशेषंमानस्तोकेत्यभिमन्त्र्यगंधद्वारामितिसर्वाङ्गमालिप्य हिरण्यशृङ्ग-मितिद्वाभ्यांप्रार्थ्य याःप्रवतइतितीर्थमभिमृश्य स्नात्वाद्विराचामेत्।**

**गोमयस्नान**—गाईचें शेण घेऊन प्रवण ( ॐ ) मंत्रानें शेणाचा दक्षिणेकडचा भाग चारी दिशांना टाकावा आणि उत्तरेचा भाग तीर्थांत टाकावा. बाकीचें शेण 'मानस्तोके०' या मंत्रानें अभिमंत्रित करून, 'गन्धद्वारां' या मंत्रानें सर्वांगाला लावावें. 'हिरण्यशृङ्ग' या दोन मंत्रांनीं प्रार्थना करून, 'याःप्रवत०' या मंत्रानें स्पर्श करून स्नान केल्यावर दोनवेळां आचमन करावें.

**अथमृत्तिकास्नानम् अश्वक्रान्तेरथक्रान्तेविष्णुक्रान्तेवसुन्धरे। शिरसाधार-यिष्यामिरक्षस्वमांपदेपदे १ इतिमृत्तिकामभिमन्त्र्य उध्दृतासिवराहेणकृष्णेनश-तबाहुना। मृत्तिकेहरमेपापंयन्मयादुष्कृतंकृतम् १ इतितामादाय नमोमित्रस्ये-तिसूर्यायप्रदर्श्यगन्धद्वारामितिमन्त्रेणस्योनापृथिवीतिमन्त्रेणवाइदंविष्णुरितिवा-शिरःप्रभृत्यङ्गानिविलिम्पेत् द्विराचामेत्।**

**मृत्तिकास्नान**—'अश्वक्रान्ते रथक्रान्ते विष्णुक्रान्ते वसुन्धरे शिरसाधारयिष्यामि रक्षस्व मां पदे पदे॥' या मंत्रानें मातीचें अभिमंत्रण करून, 'उध्दृतासि वराहेण कृष्णेन शतबाहुना। मृत्तिके हर मे पापं यन्मया दुष्कृतं कृतम्॥' या मंत्रानें माती हातांत घेऊन, ती 'नमो मित्रस्य०' या मंत्रानें सूर्याला दाखवावी व नंतर—'गन्धद्वारां०' 'स्योना पृथिवी०' किंवा 'इदं विष्णु' या तिहींपैकीं हव्या त्या एका मंत्रानें मस्तकापासून खालीं सर्वांगाला ती लावावी आणि मग दोन वेळां आचमन करावें.

**अथवारिस्नानम्। आपोअस्मानित्युक्त्वाभास्कराभिमुखःस्थितः। इदंविष्णु-र्जपित्वाच प्रतिस्रोतोनिमज्जति१ततःपञ्चगव्यकुशोदकैःसमन्त्रकैःपृथक्पृथक्स्नात्वा स्नानाङ्गतर्पणादिकुर्यात् विष्णुश्राद्धंपूर्वाङ्गगोप्रदानंचकृत्वाअग्निंप्रतिष्ठाप्य पञ्च-गव्यहोमंव्याहृतिभिरष्टोत्तरशतमष्टाविंशतिंवाऽऽज्यहोमंचकृत्वाव्रतंग्रहीष्य-इतिविप्रान्प्रार्थ्यहुतशेषंपञ्चगव्यंप्रणवेनपिबेत्।**

**जलस्नान**—'आपो अस्मानं०' हा मंत्र म्हणत सूर्याकडे तोंड करून 'इदं विष्णु' या मंत्राचा जप करावा आणि प्रवाहाकडे तोंड करून बुडी मारावी. नंतर पंचगव्य आणि कुशोदक यांनीं निरनिराळीं स्नानें करून, स्नानसंबंधाचें तर्पण करावें. त्यानंतर विष्णुश्राद्ध आणि पूर्वाङ्गासंबंधाचें गोप्रदान केल्यावर अग्नीची स्थापना करावी. पंचगव्याचा होम करावा. व्याहृतिमंत्रांनीं १०८ अथवा २८ असा तुपाचा होम करून, 'व्रतंग्रहीष्ये' अशी ब्राह्मणांची प्रार्थना करावी. होमाचें अवशेष राहिलेलें पंचगव्य 'ॐ' असें म्हणून पिऊन टाकावें.

मुख्यप्रायश्चित्तकृच्छ्रान् संकल्पानुसारेणानुष्ठायव्याहृत्याज्यहोमाविष्णुश्राद्धगोदानानिपूर्ववत्कुर्यात् आज्यहोमेपञ्चगव्यहोमेचइध्माधानादिस्थालीपाकेतिकर्तव्यतांकेचिन्नेच्छन्ति व्याहृत्याज्यहोमे पापापहमहाविष्णुर्देवतेतिकेचित् ।

**मुख्य प्रायश्चित्ताचें कृच्छ्र**—संकल्पाप्रमाणें करून, व्याहृतिमंत्रानें तुपाचा होम, विष्णुश्राद्ध आणि गाय दान देणें हीं कर्में पूर्वीप्रमाणेंच करावींत. तूप व पंचगव्य यांच्या होमांत इध्माधान ( अग्नीला समिध देणें ), स्थालीपाक वगैरे कृत्यें करणें नको, असें कांहीं ग्रंथकार सांगतात. व्याहृतिमंत्रानें जो तुपाचा होम करायचा, त्याची देवता पापनाशक विष्णु ही होय, असें कांहीं ग्रंथकार सांगतात.

पञ्चगव्यविधिस्तुताम्रे पालाशेवापात्रेताम्रायागोर्मूत्रमष्टमाषप्रमाणंगायत्र्यादाय गन्धद्वारामितिश्वेतगोशकृत्षोडशमाषमादाय आप्यायस्वेतिपीतगोक्षीरंद्वादशमाषंदधिक्राव्णइतिनीलगोदधिदशमाषंतेजोसिशुक्रमसीतिकृष्णगोघृतमष्टमाषमादायतत्रदेवस्यत्वेतिकुशोदकंचतुर्माषप्रक्षिप्यप्रणवेनालोडयेत् अत्र माषःपञ्चगुञ्जात्मकः तत्सप्तपत्रैःसाग्रैःकुशैर्जुहुयात् इरावतीतिपृथ्वीं इदंविष्णुरितिविष्णुं मानस्तोकेतिरुद्रं शन्नोदेवीत्यपःब्रह्मजज्ञानमितिब्रह्माणंवाअग्निंसोमंचनाम्ना गायत्र्यासूर्यं प्रजापतेनत्वेतिसमस्तव्याहृतिभिर्वाप्रजापतिं प्रणवेनप्रजापतिंअग्निंस्विष्टकृतंचनाम्नेत्येताः पञ्चगव्येनाग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचेतिवामहाविष्णुंवाज्येनाष्टाविंशतिसंख्याहुतिभिरित्यन्वाधानम् स्त्रीशूद्राणांहोमोनकार्यः केचिद्ब्राह्मणद्वाराहोमःकार्यइत्याहुः स्त्रीशूद्राणांपञ्चगव्यपानेविकल्पइति महार्णवः

**पंचगव्यविधि**—तांब्याचें भांडें किंवा पळसाचा द्रोण यांत तांबड्या गाईचें मूत्र आठ मासे गायत्रीमंत्रानें घालावें. पांढऱ्या गाईचें शेण सोळा मासे 'गन्धद्वारां०' या मंत्रानें त्यांत घालावें. पिवळ्या रंगाच्या गाईचें दूध बारा मासे 'आप्यायस्व०' या मंत्रानें त्यांत मिसळावें. निळ्या गाईचें दहीं दहामासे 'दधिक्राव्ण०' या मंत्रानें त्यांत टाकावें. काळ्या गाईचें तूप आठ मासे 'तेजोसि शुक्रमसि' या मंत्रानें त्यांत ओतावें. आणि ( शेवटीं ) 'देवस्यत्वा०' या मंत्रानें चार मासे त्या मिश्रणांत कुशोदक ( दर्भ टाकलेलें पाणी ) घालून, तें सर्व मिश्रण

प्रणवमंत्रानें ( ॐकाराच्या उच्चारानें ) ढवळावें. येथें माशाचें प्रमाण पांच गुंजांचें समजावें. असें पंचगव्य तयार झाल्यावर, अग्रासहित सात दर्भ त्यांत बुडवून, त्यांचा जो होम करावा त्यावेळीं—'इरावतीति पृथ्वीं इदं विष्णुरिति विष्णुं मानस्तोके रुद्रं शन्नोदेवीत्यपः ब्रह्मजज्ञानमिति ब्रह्माणंवा अग्निं सोमंच नाम्ना गायत्र्या सूर्यं प्रजापते नत्वेति समस्तव्याहृतिभिर्वा प्रजापतिं अग्निं स्विष्टकृतंच नाम्ना इत्येताः पंचगव्येन अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं चेति वा महाविष्णुं वाज्येनाष्टाविंशतिसंख्याहुतिभिः' असें अन्वाधान करावें. स्त्री व शूद्र यांनीं होम करूं नये, असें कांहीं ग्रंथकारांचें सांगणें आहे. स्त्रिया व शूद्र यांनीं पंचगव्य घ्यावें अथवा पिऊं नये, असा विकल्प 'महार्णव' ग्रंथांत सांगितला आहे.

स्त्रीशूद्रैर्विप्रैःपञ्चगव्यंकारयित्वातूष्णींपिबतइतिस्मृत्यर्थसारः अयंप्रायश्चित्तविधिःकृच्छ्रन्यूनप्रायश्चित्तेषुनकार्यःकृच्छ्रप्रभृतिषुसर्वत्रप्रायश्चित्तेष्वनुष्ठेयः एवंकृच्छ्राद्यनुष्ठायसूर्यारुणसंवादमहार्णवादिकर्मविपाकग्रन्थोक्तंहरिवंशादिश्रवणादिकर्मकुर्यात् तत्रशुभेदिनेदेशकालौसंकीर्त्यअनेकजन्मार्जितानपत्यत्वमृतापत्यत्वादिनिदानभूतबालघातनिक्षेपाहरणविप्ररत्नापहरणादिजन्यदुरितसमूलनाशद्वारादीर्घायुष्मद्बहुपुत्रादिसंततिप्राप्तिकामोहरिवंशं श्रोष्यामीत्येकस्यकर्तृत्वे दंपत्योःकर्तृत्वेश्रोष्यावइति संकल्प्यगणेशपूजनस्वस्तिवाचननान्दीश्राद्धानिविनायकशान्तिचकृत्वाहरिवंशश्रवणार्थंश्रावयितारंत्वांवृणेइति विप्रंवृत्वावस्त्रालंकारैः पूजयेत् वाचकंप्रत्यहंपायसादिनाभोजयेत् दंपतीप्रतिदिनंत्रायन्तामित्यादिवैदिकैःसुरास्त्वामितिपौराणैश्चमन्त्रैःसुस्नातावलंकृतौतदेकचित्तौशृण्वन्तौतैलताम्बूलक्षौरमैथुनखट्वाशयनानियावत्समाप्तिवर्जयन्तौहविष्यंभुञ्जीयाताम् अन्तेवाचकायगांसुवर्णत्रयमेकंवासुवर्णंदक्षिणांदत्त्वाप्रत्यवरोहमन्त्रेणसहस्रंतिलाज्यंहुत्वाशतं विप्रान्चतुर्विंशतिमिथुनानिवापायसेनभोजयेदितिहरिवंशश्रवणप्रयोगः ।

**हरिवंशश्रवणप्रयोग**—स्त्रिया व शूद्र यांनीं ब्राह्मणाकडून पंचगव्य तयार करवून मंत्रावांचून घ्यावें, असें 'स्मृत्यर्थसार' ग्रंथांत सांगितलें आहे. कृच्छ्रापेक्षां जेव्हां कमी प्रायश्चित्तें असतील, तेव्हां हा प्रायश्चित्त विधि करूं नये, कृच्छ्रादिक सर्व प्रायश्चित्तें जेव्हा असतील, तेव्हां करावा. कृच्छ्रादिक प्रायश्चित्त करून सूर्य व अरुण यांचा ( सूर्यारुण ) संवाद ऐकावा. आणि महार्णवादि कर्मविपाक ग्रंथांत सांगितलेल्या हरिवंशादि ग्रंथांचें श्रवण करावें. शुभ दिवशीं देशकालादिकांचा उच्चार करून,—'अनेक जन्मार्जितानपत्यत्वमृतापन्यत्वादिनिदानभूतबालघातनिक्षेपाहरणविप्ररत्नापहरणादिजन्यदुरितसमूलनाशनद्वारा दीर्घायुष्मद्बहुपुत्रादिसंततिप्राप्तिकामो हरिवंशं श्रोष्यामि'—असा संकल्प करावा. स्त्रीसह जर ऐकायचा असेल, तर द्विवचनी प्रयोग करावा. संकल्पानंतर—गणपतिपूजन. पुण्याहवाचन, नान्दीश्राद्ध, व विनायकशान्ति हीं केल्यावर—'हरिवंशश्रवणार्थं श्रावयितारं त्वां वृणे' असा ऐकण्यासाठीं ब्राह्मण पसंत करावा. त्याची वस्त्रालंकारांनीं पूजा केल्यावर त्या ग्रंथ वाचणाऱ्याला

रोज पायसादिकांचें भोजन द्यावें. नवराबायकोनीं दररोज 'आयताम्०' वगैरे वैदिक मंत्रांनीं व 'सुरास्त्वाम्०' वगैरे पौराणिक मंत्रांनीं स्नान करून अलंकार धारण करावेत, आणि एक चित्तानें ग्रंथ ऐकावा. तेल, विडा, क्षौर, मैथुन आणि पलंगावर निजणें—या गोष्टी सर्व ग्रंथ ऐकण्याचें संपेपर्यंत (च्या मुदतींत) वर्ज्य कराव्या व हविष्यान्नावर राहावें. शेवटीं ग्रंथ वाचणाराला एक गाय व तीन तोळे अथवा एक तोळा सोनें देऊन, 'प्रत्यंवरोह०' या मंत्रानें तिल व तूप यांचा प्रत्येकी हजार होम करावा. शंभर ब्राह्मण किंवा चोवीस मेहुणें (दंपत्यें) यांना खिरीचें जेवण द्यावें. असा हा हरिवंश ऐकण्याचा प्रयोग आहे.

**अथविधानान्तराणि सौवर्णबालकंकृत्वादद्याद्दोलासमन्वितम् । अथवा वृषभंदद्याद्विप्रोद्वाहनमेववा १ महारुद्रजपोवापिलक्षपद्मैः शिवार्चनम् । स्वर्णधेनुःप्रदातव्यासवत्सावायथाविधि २ घृतकुम्भप्रदानंवासंक्षेपादिदमीरितम् । अथवाप्रत्यहं पार्थिवलिङ्गपूजांकृत्वाअभिलाषाष्टकजपंसंवत्सरंकुर्यात् अभिलाषाष्टकस्तोत्रंकौस्तुभे ज्ञेयम् एवमपिफलाप्राप्तौदपुत्रोग्राह्यः ।**

**सन्तति होण्यास दुसरे उपाय**—सोन्याचें बाळ करून, त्याचें पाळण्यासह दान द्यावें, किंवा बैलाचें दान करावें. ब्राह्मणाचें लग्न करून द्यावें, अथवा महारुद्राचा जप करावा. लक्ष कमळें शंकराला वाहावींत किंवा सोन्याची सवत्स गाय धर्म करावी. तुपानें भरलेली मातीची घागर दान द्यावी. अशीं हीं (पुत्रप्राप्तीस्तव) दानें थोडक्यांत सांगितलीं. दररोज पार्थिवलिंगाची पूजा करून, अभिलाषाष्टकस्तोत्राचा जप एक वर्षपर्यंत करावा (म्हणजे हि संततिलाभ होतो). अभिलाषाष्टकस्तोत्र कौस्तुभांत सांगितलें आहे. इतकेंही करून जर सन्ततिलाभ न होईल, तर दत्तकपुत्र घ्यावा.

**अथदत्तकेग्राह्याग्राह्यविचारः ब्राह्मणानांसोदरभ्रातृपुत्रोमुख्यत्वात्प्रथमंग्राह्यः तदभावेसगोत्रसपिण्डोयःकश्चित्सापत्नभ्रातृपुत्रोवा तदभावेत्वसगोत्रसपिण्डोमातुलकुलजपितृष्वस्रादिकुलजः तदभावेत्वसपिण्डः समानगोत्रः तदभावेत्वसपिण्डः पृथक्गोत्रोपि असगोत्रसपिण्डेषुभागिनेयदौहित्रौवर्ज्यौ एवं विरुद्धसंबन्धापत्त्यापुत्रबुद्ध्यनर्होमातुलोपिनग्राह्यः अतएवसगोत्रसपिण्डेषुभ्रातापितृव्योवानग्राह्यः विप्रादीनांवर्णानांसमानवर्णएव तत्रापिदेशभेदप्रयुक्तगुर्जरत्वान्ध्रत्वादिनासमानजातीयएव सर्वोपिसभ्रातृकएवग्राह्यः तत्रापिज्येष्ठपुत्रोनग्राह्योनदेयः शूद्रस्यदौहित्रभागिनेयावपिग्राह्यौ अत्रमूलं भ्रातॄणामेकजातानामेकश्चेत्पुत्रवान्भवेत् सर्वेतेतेनपुत्रेणपुत्रिणोमनुरब्रवीत् १ अनेनवचनेन नापुत्रस्यलोकोस्ति जायमानोवैब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवानूजायतइत्यादिशास्त्रबोधितस्याप्रजत्वप्रयुक्तदोषस्यनिवृत्तिर्विधिनाअस्वीकृतेनापिभ्रातृपुत्रेण पितृव्यस्यभवतीतिबोध्यते अतःपुत्रसदृश्यत्वात्ग्राह्येषुमुख्यइतिज्ञाप्यते मुख्याभावेतत्सदृशःप्रतिनिधिरितिन्यायात् नचास्मादेववाक्याद्विधिवत्प्रतिग्रहंविनैवतस्यपुत्रत्वमितिशङ्क्यम् तथासतिऔरसदत्तकादिद्वादशविधपुत्रवदेतस्यपत्नीत पूर्वमेव**

धनहारित्वपिण्डदत्वौचित्यैन पत्नीदुहितरश्चैवपितरौभ्रातरस्तथा तत्सुतागोत्रजाबन्धुरितितत्क्रमवाक्येभ्रात्रनन्तरंभ्रातृसुतानिर्देशानुपपत्तेः तस्मात्पत्नीति पूर्वं मदीयपिण्डदानधनग्रहणेधिकारीकश्चिद्भवत्वितिकामनायां विधिवत्स्वीकृतएव तथाधिकारीभवति नान्यथा तादृशकामनायाअभावेतुपितृऋणापाकरणादपार लौकिकमात्रार्थंदत्तपुत्रोनग्राह्यः भ्रातृपुत्रेणैवतात्सिद्धेरित्येवंवचनतात्पर्यम् क्वचिद्देशेवैदिकविधिंविनापिदातृगृहात्संमतिराजपुरुषाद्यनुमत्यादिलौकिकव्यापारमात्रेणोपनयनादिसंस्कारकरणमात्रेणचसगोत्रसापिण्डपुत्रत्वसिद्धिव्यवहारोदृश्यतेतत्रमूलंनापलभ्यते सर्वासामेकपत्नीनामेकाचेत्पुत्रिणीभवेत् । सर्वास्तास्तेन पुत्रेण पुत्रिण्योमनुरब्रवीत् १ इतिवचनंतु सापत्नपुत्रस्याग्रहीतस्यापिपुत्रत्वपिण्डदानाद्यधिकारित्वविधायकम् तेनैकससपत्न्याः सपुत्रत्वेन्यसपत्न्यापुत्रोनग्राह्यः दौहित्रोभागिनेयश्चशूद्राणांविहितः सुतः । ब्राह्मणादित्रये नास्तिभागिनेयःसुतः क्वचित् १ नत्वेवैकंपुत्रंदद्यात्प्रतिगृह्णीयाद्वेति नज्येष्ठंपुत्रंदद्यादितीच अत्रौरसानेकपुत्रेणपुत्रदानंकार्यमितिविधीयते तेन पूर्वदत्तकोगृहीतस्ततऔरसोजातस्तादृशानेकपुत्रेणदत्तकएकल औरसोवानदेयः सधवयास्त्रियामत्यनुज्ञयापुत्रोगृहीतव्योदातव्यश्च भर्त्रनुज्ञाभावेतुनग्राह्योनदेयः एवं विधवयापिस्त्रिया त्वयापुत्रः स्वीकार्यइतिउक्त्वाभर्तरिमृतेग्राह्यः स्पष्टमीदृशानुज्ञाभावेभर्तृजीवनदशायांतन्मरणोत्तरमातमुखाद्वापुत्रस्वीकारविषयकभर्तृभिप्रायंज्ञात्वात्यापिग्राह्यइतिसर्वसंमतम् एतदुभयविधभर्त्रनुज्ञाभावेपितत्तच्छास्त्रान्नित्यकाम्यव्रतादिधर्माचरणइवपुत्रप्रतिग्रहेपिनापुत्रस्यलोकोस्तीत्यादिसामान्यशास्त्राद्विधवायाअधिकारः नस्त्रीपुत्रंदद्यात्प्रतिगृह्णीयाद्वान्यत्रभर्त्रनुज्ञानादितिवसिष्ठवाक्यंतुभर्त्रनुज्ञारहितांप्रतिपुत्राप्रतिग्रहाभ्यनुज्ञापरं नतुपुत्रप्रतिग्रहनिषेधपरम् शास्त्रप्राप्तनिषेधायोगात् अतस्तादृशस्त्रियाःपुत्रप्रतिग्रहप्रतिबन्धेनवृत्तिलोपापिण्डविच्छेदादिकुर्वन्नरकभाग्भवति योब्राह्मणस्यवृत्तौतुप्रातकूलं समाचरेत् । विड्भुजांतुकृमीणांस्यादितिशास्त्रादितिकौस्तुभेविस्तरः स्त्रीभिः पुत्रस्वीकारेव्रतादिवद्विप्रद्वाराहोमादिकंकार्यं एवंशूद्रेणापि विप्रःशूद्रदक्षिणामादायवैदिकमन्त्रैस्तदीयहोमादि करोतितत्रशूद्रःपुण्यफलभाग्भवति किंतुविप्रस्यैवप्रत्यवायः पुत्रंप्रतिगृह्यग्रहीत्राजातकर्माद्याश्चूडाद्यावासंस्काराःकार्याइतिमुख्यःपक्षः असंभवेसगोत्रसपिण्डेषुकृतोपनयनोपिविवाहितोपिवादत्तकोभवति असजातपुत्रएव विवाहितोग्राह्यइतिमेभाति असपिण्डसगोत्रेषुकृतोपनयनएवेत्यपिभाति भिन्नगोत्रस्तु अकृतोपनयनएवग्राह्यः केचित्तुकृतोपनयनोपिभिन्नगोत्रोग्राह्यइत्याहुः इतिग्राह्याग्राह्यविवेकः ।

**दत्तकाचा ग्राह्याग्राह्यविचार**—आपल्या सख्ख्या (सोदर) भावाचा मुलगाच अधिकारी असल्यानें, ब्राह्मणांनीं तोच (दत्तक) घ्यावा. सख्ख्या भावाचा मुलगा नसल्यास दुसरा कोणी आपल्या गोत्रांतला सपिण्ड

अथवा सावत्र भावाचा मुलगा ( दत्तक ) घ्यावा, तसाही नाहीं मिळाला तर, निराळ्या गोत्रांतला पण सपिण्ड असा मामाच्या किंवा बापाच्या बहिणीच्या कुळांतला घ्यावा. तसाही मिळणें अशक्य झाल्यास असपिण्डाचा पण समानगोत्री घ्यावा. त्याच्याही अभावीं असपिण्ड आणि निराळ्या गोत्राचा घ्यावा. आपल्या गोत्रांतले असूनही सपिण्ड अशांपैकीं बहिणीचा किंवा कन्येचा ( मुलीचा ) मुलगा हे दत्तक घेऊं नयेत. त्याचप्रमाणें विरुद्ध संबंध होतो म्हणून, आपला मुलगा असें मानण्याला अयोग्य असा ( मामाही ) दत्तक घेऊं नये. आणि तद्वतच सगोत्र असून सपिण्ड असणाऱ्यांपैकीं जे आपला भाऊ किंवा चुलता तेही घेऊं नयेत. ब्राह्मण वगैरे वर्गांनीं आपापल्या वर्णांतलाच दत्तक घ्यावा. त्यांत सुद्धां देशभेदानुसारें गुजराथी, आन्ध्र ( तेलंगी ) वगैरे भेदाप्रमाणें समान नसेल तोच घ्यावा. जो कोणचाही दत्तक घेणें तो (त्याला) भाऊ असलेला घ्यावा. वडील मुलगा दत्तक घेऊं नये व देऊंही नये. शूद्रानें आपल्या बहिणीचा किंवा मुलाचा मुलगा (दत्तक) घेण्यास हरकत नाहीं. 'सख्ख्या भावांत एखादा जरी मुलगा असला, तरी त्यायोगें सर्व भाऊ पुत्रवान् होतात' असें मनूचें वचन आहे. 'अपुत्रकाला स्वर्गलोक नाहीं. जन्माला आलेला ब्राह्मण ( देव, ऋषि व पितर यांच्या ) तीन ऋणांत असतो,' वगैरे शास्त्रवचनांनीं सांगितलेला जो निपुत्रिकपणाचा दोष, त्याची निवृत्ति, विधिपूर्वक दत्तक न घेतलेल्या सख्ख्या भावाच्या मुलानेंही होते, म्हणून, सर्वांत भावाचाच मुलगा दत्तक घेणं अधिक योग्य आहे असें समजावें. कारण, मुख्य नसल्यास त्याच्या जागीं त्याच्यासारखा दुसरा योजावा असा न्याय आहे. 'विधिपूर्वक न घेतलेल्या' या शब्दांवरून भावाचा मुलगा तो आपला मुलगा होतो असें समजूं नये. तो 'मुलगा होतो' असें समजल्यास—औरस, दत्तक वगैरे जे बारा प्रकारचे पुत्र त्यांच्याप्रमाणेंच—या सख्ख्या भावाच्या मुलाला द्रव्य, पिण्ड वगैरे बाबतींत, स्वतःचें लग्न होण्याच्या आधींच अधिकार प्राप्त होतील; व बायको, मुलगी, आई, बाप, भाऊ, पुतण्या, गोत्रांतला व भाऊबंद—असा पूर्वींच्या अभावीं जो पुढचा अधिकाराच्या बाबतींतला क्रम सांगितला आहे, तो निरर्थक होईल. म्हणून, स्वतःचा विवाह होण्याच्या आधीं जर आपला पिण्ड, (आपलें) द्रव्य वगैरे बाबतींत अधिकारी असावा, अशा इच्छेनें भावाचा मुलगा विधिपूर्वक दत्तक घेतला, तरच तो अधिकारी होतो, विधिपूर्वक दत्तक घेतल्यावांचून होत नाहीं. पितरांचें ऋण फेडण्याची इच्छा नसल्यास परलोकसंबंधाच्या कृत्याकरितां म्हणून दत्तकपुत्र घेऊं नये, कारण, भावाच्या मुलाकडून पितृऋण दूर होतें. असें याचें तात्पर्य समजावें. कित्येक प्रान्तांत-वैदिक विधीवांचून दत्तकपुत्र घेणारा व देणारा यांची संमति, राजपुरुषादिकांची संमति वगैरे लौकिक व्यवहारानें किंवा मुंज वगैरे संस्कार केल्यानें सगोत्र व सपिण्ड असा मुलगा आपला पुत्र असें मानून जरी सर्व व्यवहार चालतो, तरी तसें करण्यास प्रमाणवचन सांपडत नाहीं. 'एका पुरुषाच्या लग्नाच्या अनेक बायका असून त्यांपैकीं एकीला जर मुलगा असेल तर त्यायोगें बाकीच्या सर्व सवती पुत्रवती होतात, असें मनूचें वचन आहे. या वचनाप्रमाणें,

सवतीचा मुलगा जरी विधिपूर्वक दत्तक घेतला नसला, तरी त्यालाही पुत्रत्व आणि पिण्ड देणें हे अधिकार असतात, म्हणून एका सवतीला पुत्र असल्यास दुसरीनें दत्तक घेऊं नये. मुलीचा व बहिणीचा मुलगा हे शूद्रांनीं दत्तक घ्यावेत. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य-यांनीं कधींहि घेऊं नयेत. एकच पुत्र असेल तो कधीं दत्तक देऊं नये, व घेऊंही नये. तद्वतच वडील मुलगा दत्तक देऊं नये व घेऊं नये. यावरून ज्याला अनेक औरस मुलगे असतील त्यानेंच मुलगा दत्तक द्यावा असें जरी ठरतें, तरी पूर्वीं दत्तक पुत्र घेतला असूनही पुढें जर औरस मुलगा झाला, तर त्यामुळें प्राप्त होणाऱ्या अनेकपुत्रत्वाला हा विधि नाहीं. नवरा जिवंत असतां, त्याच्या आज्ञेनें स्त्रीनें मुलगा दत्तक द्यावा अथवा घ्यावा. पतीची आज्ञा नसल्यास या दोन्ही गोष्टी करूं नयेत. 'तूं दत्तक घे' असें सांगून जर नवरा मेला असेल तर विधवा स्त्रीनें दत्तक घ्यावा. 'तूं दत्तक पुत्र घे' असें बायकोला सांगितलें नसतां, जर नवरा मेला, तर आप्तांच्या तोंडून, दत्तकपुत्र घेण्याबद्दलचा नवऱ्याचा अभिप्राय समजल्यास, पत्नीनें दत्तकपुत्र घ्यावा असें सर्वसंमत आहे. या दोन्ही प्रकारांपैकीं कोणचीही जरी आज्ञा नसली, तरी नित्यव्रतें व काम्यव्रतें आचरण्यास जसा अधिकार असतो, तद्वतच 'अपुत्राला स्वर्लोक नाहीं या सामान्य शास्त्रानेंच, दत्तकपुत्र घेण्याचा विधवा स्त्रीला अधिकार आहे. 'पतीच्या आज्ञेवांचून पत्नीनें दत्तकपुत्र घेऊं व देऊं नये' असें जें वसिष्ठवचन आहे, तें ज्या स्त्रीला पतीची आज्ञा नसेल तिला दत्तक घेणें नसल्यास लागू होतें. शास्त्रानें योग्य ठरलेल्या गोष्टीचा निषेध संभवत नसल्यानें स्त्रीनें मुळींच दत्तक घेऊं नये असा (शास्त्र) निषेध दाखवीत नाहीं. दत्तकपुत्र घेण्यास योग्य असणाऱ्या स्त्रीस जो कोणी दत्तक घेऊं देत नाहीं, तो वृत्तीचा लोप व पिण्डच्छेद करणारा होऊन, नरकाला जातो. कारण, 'ब्राह्मणाच्या वृत्तींत विघ्न उत्पन्न करणारा विष्ठा खाणाऱ्या किड्यांत उत्पन्न होतो' असें जें वचन आहे, त्याचा विस्तार कौस्तुभांत केलेला आहे. स्त्रियांनीं दत्तकपुत्र घेतल्यावर होमहवनादि सर्व व्रतादिकांप्रमाणें ब्राह्मणांकडून करवावें. शूद्रांनींही दत्तक घेतल्यास तसेंच करावें. शूद्रापासून दक्षिणा घेऊन जो ब्राह्मण त्याच्याकरतां म्हणून होमहवनादि करतो, तो दोषी ठरून, पुण्यफल तेवढें शूद्राला मिळतें. दत्तकपुत्र घेणारानें, त्या पुत्राचें—जातकर्म चौल वगैरे—संस्कार करावेत, असा जरी मुख्य पक्ष आहे तरी तसें करणें अशक्य असल्यास—सगोत्र व सपिण्ड—यांपैकीं मुंज झालेला किंवा लग्न झालेलाही मुलगा दत्तक घ्यावा. विवाह झालेला जो मुलगा दत्तक घेणें असेल, तो पुत्र झालेला घेऊं नये असें मला वाटतें. असपिण्ड व सगोत्र यांतला जो दत्तक घेणें, तो मुंज न झालेलाच घ्यावा असेंही मला वाटतें. भिन्न गोत्रांतला जर घ्यायचा असेल, तर तो मुंज न झालेलाच घ्यावा. भिन्न गोत्रांतला मुंज झालेलाही दत्तक घेण्याबद्दल कांहीं ग्रंथकार सुचवितात. याप्रमाणें दत्तकपुत्र घेण्याच्या बाबतींत जो ग्राह्याग्राह्य--विचार सांगितला, तो येथें संपला.

अथऋग्वेदिनांपुत्रप्रतिग्रहप्रयोगः पूर्वेद्युः कृतोपवासः पवित्रपाणिः प्राणानाय-म्यदेशकालौसंकीर्त्यममाप्रजस्त्वप्रयुक्तपैतृकऋणापाकरणपुन्नामनरकत्राणद्वारा

श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं शौनकोक्तविधिनापुत्रप्रतिग्रहंकरिष्ये तदङ्गत्वेनस्वस्तिवाचनमाचार्यवरणंविष्णुपूजनमन्त्रदानंचकरिष्ये आचार्यंमधुपर्कान्तेविष्णुंसंपूज्य ब्राह्मणादिभोजनंसंकल्पयेत् आचार्यःयजमानानुज्ञयापुत्रप्रतिग्रहाङ्गत्वेनविहितंहोमंकरिष्ये इतिसंकल्प्यअग्निंप्रतिष्ठाप्य चक्षुषीआज्येनेत्यन्तेसकृदग्निंसूर्यासावित्रींषड्वारंचरुणाअग्निंवायुसूर्यंप्रजापतिंचाज्येनशेषेण स्विष्टकृतमित्यादिअन्वाधायअष्टाविंशतिमुष्टीस्तूष्णींनिरुप्यतथैवप्रोक्ष्याज्योत्पवनान्तंकुर्यात् दातारंगत्वाएतस्मैपुत्रंदेहीतियाचयेत् दातादेशकालौसंकीर्त्य श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंपुत्रदानंकरिष्येइतिसंकल्प्यगणपतिपूजनान्तंप्रतिग्रहीतारं यथाशक्तिसंपूज्य येयज्ञेनेतिपञ्चानांनाभानेदिष्ठोमानवोविश्वेदेवास्त्रिष्टुप् पञ्चम्यनुष्टुप् पुत्रदानेविनियोगः येयज्ञेनेतिऋक्पञ्चकान्तेइमंपुत्रंतवपैतृकऋणापाकरणपुन्नामनरकत्राणासिद्ध्यर्थं आत्मनःश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंतुभ्यमहं संप्रददेनमम प्रतिगृह्णातुपुत्रंभवान् इतिप्रतिग्रहीतृहस्तेजलंक्षिपेत् ग्रहीता देवस्यत्वेतिहस्तद्वयेनप्रतिगृह्यस्वाङ्केउपवेश्यअङ्गादङ्गात्संभवसीतिमन्त्रेणमूर्धनिजिघ्रेत् वस्त्रकुण्डलाद्यलंकृतंगीतवाद्यैः स्वस्तिमन्त्रैश्चस्वगृहमानीयपादौप्रक्षाल्याचम्याचार्यदक्षिणतःस्वयंस्वदक्षिणेभार्योत्संगेपुत्रइत्युपविशेत् आचार्योबर्हिरासादनाद्याज्यभागान्तंचरुमवदाय यस्त्वाहृदेतिद्वयोराग्नेयोवसुश्रुतोग्निस्त्रिष्टुप् पुत्रप्रतिग्रहांगहोमेविनियोगः यस्त्वाहृदेतिऋक्द्वयेनैकमवावदानंजुहुयात् यजमानोग्नयइदंनमम तुभ्यमग्रेपर्यवहन्सूर्यासावित्रीसूर्यासावत्र्यनुष्टुप् । सूर्यासावित्र्याइदं० सोमोददितिपञ्चानांसूर्यासावित्रीसूर्यासावित्री अनुष्टुभौजगतीत्रिष्टुबनुष्टुप् । पंचस्वपिसूर्यासावित्र्याइदं० एवंसप्तचर्वाहुतीर्हुत्वाज्यंव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्हुत्वास्विष्टकृदादिसमाप्याचार्याय धेनुंदत्त्वाविप्रान्भोजयेत् ।

**ऋग्वेद्यांचा पुत्रप्रतिग्रह–प्रयोग**—आदल्या दिवशीं उपास करून हातांत पवित्रकें घालून प्राणायाम करावा. नंतर देशकालादिकांचा उच्चार करून, 'ममाप्रजत्वप्रयुक्तपैतृकऋणापाकरणपुन्नामनरकत्राणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं शौनकोक्तविधिना पुत्रप्रतिग्रहं करिष्ये तदङ्गत्वेन स्वस्तिवाचनमाचार्यवर्णं विष्णुपूजनमन्त्रदानं च करिष्ये।' असा संकल्प करावा व मग आचार्याची मधुपर्कानें पूजा केल्यावर विष्णूची पूजा करावी. ब्राह्मणादिकांचा भोजनसंकल्प करावा. त्यानंतर आचार्यानें, 'यजमानानुज्ञयापुत्रप्रतिग्रहाङ्गत्वेन विहित होमं करिष्ये' असा संकल्प करून अग्नि मांडावा. नंतर 'चाक्षुषी आज्येनेत्यन्ते सकृदग्निं । सूर्यासावित्रीम् षड्वारं चरुणा अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिंचाज्येन शेषेणस्विष्टकृतामित्यादि' असें अन्वाधान करून, अठ्ठावीस मुठी तांदूळ मंत्ररहितच भांड्यांत ठेवावेत, आणि तसेंच 'आज्योत्पवनांतं' कर्म करावें. नंतर दात्याकडे जाऊन त्याला 'पुत्र दे' अशी याचना करावी. दात्यानें देशकालादिकांचा उच्चार करून, 'श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुत्रदानं करिष्ये' असा संकल्प केल्यावर गणपतिपूजन करावें. त्यानंतर पुत्र घेणाराची यथाशक्ति पूजा करून 'येयज्ञेनेतिपञ्चानांनाभानेदिष्ठो मानवोविश्वेदेवास्त्रिष्टुप् पञ्चम्यनुष्टुप्पुत्रदाने विनियोगः।

'येयज्ञेनेतिये०' या पांच ऋचा म्हटल्यावर 'इमं पुत्रं तव पैत्रिकऋणापाकरणपुन्नामनरकत्राणसिद्ध्यर्थं आत्मनः श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं तुभ्यमहं सम्प्रददे न मम प्रतिगृह्णातु पुत्रं भवान्'– असें म्हणून, मुलाला दत्तक घेणाऱ्याच्या हातावर पाणी सोडावें. दत्तक घेणाऱ्यानें 'देवस्यत्वेति०' या मंत्रांनीं दोन हातांनीं पुत्राला घेऊन आपल्या मांडीवर बसवावें, आणि 'अङ्गादङ्गात्संभवसीति०' या मंत्रानें त्याची टाळू हुंगावी. नंतर त्याला वस्त्रालंकार कुंडलादिकांनीं अलंकृत करून गीतवाद्यांच्या घोषांत स्वस्तिमंत्र म्हणत, पुत्राला आपल्या घरीं आणावें. हातपाय धुऊन आचमन करावें. आचार्याच्या उजवीकडे आपण बसावें व आपल्या उजव्या बाजूस बसलेल्या आपल्या भार्येच्या मांडीवर पुत्राला बसवावें. त्यानंतर आचार्यानें बर्हीच्या आसादनापासून ( बर्हि–अग्नि, दर्भ ) तुपाच्या भागाच्या–आज्यभागाच्या शेवटापर्यंतचें कर्म करावें. नंतर भात घेऊन 'यस्त्वाहृदेतिद्वयोरात्रयोवसुश्रुतोग्निस्त्रिष्टुप् पुत्रप्रतिग्रहाङ्गहोमे विनियोगः । यस्त्वाहृदेति०' या दोन ऋचांनीं, त्या सर्व भाताचें एकच अवदान ( सबंद एक गोळा ) करून, होम संपवावा. यजमानानें 'अग्नय इदं न मम' असें म्हणावें. व नंतर 'तुभ्यमग्रेपर्यवहन्सूर्यासावित्रीसूर्यासावित्र्यनुष्टुप् । सूर्यासावित्र्या इदं० । सोमोददतिपंचानासूर्यासावित्री सूर्यासावित्री अनुष्टुभौ जगत्रिष्टुबनुष्टुप् ।' अशा पांच ऋचांनीं होम करावा. पांचही ऋचांनंतर 'सूर्यासावित्र्या इदं० ।' असें म्हणावें. याप्रमाणें भाताच्या सात आहुती देऊन व्यस्त ( व ) समस्त व्याहृतिमंत्रांनीं हवन करावें. स्विष्टकृत होम पुरा करून, आचार्याला गाय दान द्यावी आणि ब्राह्मणांना भोजन द्यावें.

अथयजुर्वेदिनांबौधायनोक्तरीत्याप्रयोगः तत्रराज्ञः शिष्टानांबन्धूनांचानुमतिंलब्ध्वासंकल्पादिआचार्यपूजान्तंप्राग्वत्कुर्यात् ब्राह्मणभोजनसंकल्पान्तेआचार्योदेवयजनाल्लेखनादिआप्रणीताभ्यः कुर्यात् ग्रहीतादातुः समक्षंगत्वापुत्रंमेदेहीतिस्वियमेवाभिक्षेत दाताददामीत्याह ततोदातुःसंकल्पादिपुत्रदानान्तंपूर्ववत् ग्रहीताधर्मायत्वागृह्णामिसंततयेत्वागृह्णामीतिपरिगृह्यतंपुत्रंवस्त्रकुण्डलाङ्गुलीयैरलंकुर्यात् आचार्यःकुशमयंबर्हिःपालाशमयमिध्मंचसंपाद्यपरिधानप्रभृतिअग्निमुखंकृत्वाचरुश्रपणासादनान्ते पूर्वांगहोमंकृत्वा यस्त्वाहृदाकीरिणेतिपुरोनुवाक्यामुक्त्वा यस्मैत्वसुकृतेइतियाज्ययाहुत्वाव्यस्तसमस्तव्याहृतीर्हुत्वास्विष्टकृदादिकुर्यात् आचार्यायदक्षिणावस्त्रकुण्डलांगुलीयकं दद्यादिति ।

**यजुर्वेद्याचा बौधायनोक्त पुत्रप्रतिग्रह प्रयोग**—राजा, शिष्ट व बन्धुवर्ग या सर्वांची संमति मिळवून, संकल्पापासून आचार्याच्या पूजेपर्यंत–मागें सांगितल्याप्रमाणें कर्म करावें. ब्राह्मणभोजनाचा संकल्प झाल्यानंतर आचार्यानें देवयजनादिप्रणीतयांपर्यंत ( सर्व ) कर्म करावें. नंतर मुलगा दत्तक घेणाऱ्यानें (तो) देणाऱ्यापाशीं जाऊन, 'मला पुत्र दे' अशी स्वतः मागणी करावी. देणाऱ्यानें 'मी देतों' असें म्हणावें. त्यानंतर (पुत्र) देणाऱ्यानें संकल्प वगैरे सर्व पुत्रदानापर्यंतचें वर सांगितल्याप्रमाणें कर्म करावें. पुत्र घेणाऱ्यानें

'धर्मायत्वागृह्णामिसन्तत्यैत्वागृह्णामि' या मंत्रानें पुत्राला घेऊन, त्याला वस्त्रालंकारांनीं विभूषित करावें. आचार्यानें दर्भांच्या बर्हि (समिधा) व पळसाच्या इध्मा (समिधा) मिळवून परिधानादिक अग्निमुख करून, चरुश्रपण (भात शिजवणें) करावें. त्यानंतर आसादनापर्यंतचें कर्म झाल्यावर पूर्वाङ्गहोम करावा. 'यस्त्वाहृदाकीरिणा०' हा पुरोनुवाक्या मंत्र म्हणून 'यस्मैत्वं सुकृते०' या आहुती देण्याच्या (याज्य) मंत्रानें होम करावा. व्यस्त (व) समस्त व्याहृतिमंत्रांनीं आहुति देऊन स्विष्टकृत् होम करावा. आचार्याला–दक्षिणा, वस्त्रें, कुंडलें व अंगठी–हीं द्यावींत.

दत्तकस्यगोत्रसापिण्ड्यादिनिर्णयः परगोत्रोत्पन्नदत्तकस्योपनयनमात्रेपालकगोत्रेणकृतेउपनयनोत्तरंप्रतिग्रहेवादत्तकेनाभिवादनश्राद्धादिकर्मसु गोत्रद्वयोच्चारःकार्यः चूडादिसंस्कारेपालकेनकृतेपालकैकगोत्रएव विवाहेतुसर्वदत्तकेनजनकपालकयोरुभयोरपिपित्रोर्गोत्रप्रवरसंबन्धिनीकन्यावर्जनीया नात्रसाप्तपुरुषंपाञ्चपुरुषामत्येवंपुरुषनियमउपलभ्यते सापिण्ड्यंतुजनकगोत्रेणोपनयनेजनकपितृमात्रोःकुलेसाप्तपुरुषंपाञ्चपुरुषं ग्रहीतृमातृपितृकुले त्रिपुरुषं ग्रहीतृगोत्रेणोपनयनमात्रेकृते उभयत्रपाञ्चपुरुषंपितृकुले मातृकुलेतु त्रिपुरुष जातकर्माद्युपनयनान्तसंस्कारग्रहीत्राकृतेग्रहीतृकुलेसाप्तपुरुषं मातृतः पाञ्चपुरुषम् अतोन्यूनंजनककुलेकल्प्यम् केचित्तुदत्तकप्रवेशेकुलद्वयेपिसर्वथान्यूनमेवसापिंड्यमित्याहुः एवंदत्तकसंततेरपिसापिंड्यंज्ञेयम् दत्तकस्यमरणेपूर्वापरपित्रोस्त्रिरात्रंसपिण्डानामेकाहमाशौचम् उपनीतदत्तकमरणादौ पालकसपिण्डानांदशाहादीतिनीलकण्ठीयेदत्तकनिर्णये एवंदत्तकेनापिपूर्वापरपित्रोर्मृतौत्रिरात्रं पूर्वापरसपिण्डानांमरणेएकाहम् पित्रोर्ध्वदैहिककरणे तु कर्माङ्गंदशाहमेव दत्तकस्य पुत्रपौत्रादेर्जन्ममरणयोःसपिण्डानामेकाह सगोत्रसपिण्डेदत्तीकृतेतुसर्वेषांदशरात्रमेव पत्नीदुहित्रादिसत्त्वेपिदत्तकएव पितृधनभागीभवति दत्तकग्रहणोत्तरमौरसेजातेदत्तकश्चतुर्थांशभागी नसमभागी केचित्तुप्रतिग्रहीत्राजाताद्युपनयनान्तसंस्कारविधानेष्वकृते औरससमानांशभागित्वम् संस्कारमात्रकरणेविधानाभावेविवाहमात्रलाभोनान्यधनलाभः कतिपयसंस्कारकरणेचतुर्थांशलाभइत्याहुः दत्तकसत्त्वेप्यौरसस्यैव पित्रोः पिण्डदानेधिकारः जनकस्यापिण्डदाभावेदत्तकएवजनकपालकयोरुभयोरपिश्राद्धंकुर्यात्धनंचोभयोर्गृह्णीयादिति नीलकण्ठीये एवंदत्तकन्यायाअपिस्वीकारउक्तविधिनाकार्यः तत्रपरगोत्रोत्पन्नायाग्रहणेविवाहे गोत्रद्वयवर्जनंप्राग्वत् पुत्रपत्न्योरभावेदत्तकन्यैव पितृधनभागिनी इतिदत्तोपयोगिसर्वनिर्णयः ।

**दत्तकाचें गोत्र व सापिण्ड यांचा निर्णय**—दुसऱ्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या दत्तकाची मुंज (उपनयन) जर पालकाच्या गोत्रानें केली असेल, किंवा मुंजीनंतर जर दत्तक घेतला असेल, तर दत्तकानें अभिवादन, श्राद्ध वगैरे कर्मांत दोन्ही गोत्रांचा उच्चार करावा. चूडाकर्मा-

पासूनच ( शेंडी राखणें ) सारे संस्कार जर पालक-बापानें केले असतील, तर फक्त पालकाच्याच गोत्राचा उच्चार करावा. लग्नासंबंधानें सर्व दत्तकांनीं बाप व पालक अशा दोघांही पित्यांच्या गोत्रांतील व प्रवरांतली मुलगी करूं नये. या बाबतींत सात किंवा पांच पुरुष वर्ज्य करावेत असा नियम कोठें आढळत नाहीं. जनक-पित्याच्या गोत्रानें जर दत्तकाची मुंज झाली असेल, तर जनक माता व पिता यांच्या कुलांत सात पुरुष व पांच पुरुष इतकें सापिण्डय करावें. पालक-पित्याच्या गोत्रानें तीन पुरुषांपर्यंत सापिण्ड्य करावें. पालक-पित्याच्या गोत्रानें जर मुंज झाली असली तर, दोन्ही पितृकुलांत पांच पुरुषांपर्यंत व दोन्ही मातृकुलांत तीन पुरुषांपर्यंत सापिण्डय करावें. जातकर्मापासून उपनयनापर्यंतचे सर्व संस्कार जर पालकपित्यानें केले असतील, तर पालकपित्याच्या कुलांत सात पुरुषांपर्यंत, आणि मातेच्या कुलांत पांच पुरुषांपर्यंत सापिण्डय करावें. जन्म देणाऱ्या पित्याच्या कुळांत याहून कमी सापिण्डय करावें. कांहीं ग्रंथकाराचें असें म्हणणें आहे कीं, दत्तकाचा प्रवेश झाल्यावर दोन्ही कुलांत कमी सापिण्ड्य होतें. दत्तकाच्या सन्ततीच्या सापिण्ड्याविषयींही हाच निर्णय समजावा. दत्तक मुलगा जर मरेल तर पहिला व दुसरा अशा दोन्ही बापांनीं तीन दिवसपर्यंत सुतक धरावें व सपिण्डांनीं एक दिवस धरावें. मुंज झालेला दत्तक मुलगा जर मेला तर पालकपिता व सपिण्ड यांनीं दहा दिवस सुतक धरावें, असें नीलकण्ठांनीं दत्तकनिर्णयांत म्हटलें आहे. याप्रमाणेंच पहिला अथवा दुसरा पिता जर मेला तर दत्तक मुलानें तीन दिवस सुतक धरावें. पहिले अथवा दुसरे सपिण्ड यांपैकीं जर कोणी मरेल, तर एक दिवस सुतक धरावें. पहिला अथवा दुसरा पिता यांच्या मरणानंतरच्या ( और्ध्वदेहिक ) क्रियाकर्मा-संबंधानें मात्र दहा दिवस सुतक धरावें. दत्तक मुलाचे मुलगे, नातु ( पुत्र, पौत्र ) वगैरेंच्या जन्ममरणासंबंधानें सपिण्डांनीं एक दिवस सुतक धरावें. सगोत्र व सपिण्ड यांपैकीं जर मुलगा दत्तक दिला असेल तर मात्र दहा दिवस सुतक धरावें. पालक-पित्याची ( दत्तक घेणाऱ्याची ) बायको, मुलगी वगैरे असतांही दत्तक मुलगा पालकपित्याच्या धनाचा वारस होतो. मुलगा दत्तक घेतल्यावर जर औरस मुलगा झाला तर दत्तक मुलाला फक्त चतुर्थांश हिस्सा मिळतो, सर्व मिळत नाहीं. दत्तक घेणाऱ्या बापानें जन्मकर्मापासून मुंजीपर्यंतचे सर्व संस्कार व दत्तविधान हीं जर केलीं असतील, तर औरस पुत्राच्या बरोबरीनें दत्तक मुलाला हिस्सा मिळतो. नुसते संस्कार मात्र केलेले असून, दत्तविधान जर केलें नसेल, तर त्याचा विवाह मात्र करावा. त्याला इतर धन मिळत नाहीं. कांहीं संस्कार केले असल्यास चतुर्थांश द्रव्य मिळतें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. दत्तक मुलगा असून औरसही जर असेल, तर औरसालाच माता-पित्यांच्या पिण्डदानाचा अधिकार आहे. जनकपित्याचें पिण्डदान करणारास दुसरा पुत्र जर नसेल, तर दत्तक दिलेल्या मुलानेंच जन्म देणारा व दत्तक घेणारा—अशा दोन्ही बापांचें श्राद्ध करावें व दोघाचेंही धन घ्यावें, असा नीलकण्ठानें निर्णय

दिलेला आहे. याप्रमाणेंच दत्तक दिलेल्या कन्येचाही स्वीकार—वर सांगितलेल्या विधीनें करावा. परगोत्रांत जन्म झालेली मुलगी जर दत्तक घेतली, तर तिच्या लग्नासंबंधानें दोन्ही गोत्रें—वरच्याप्रमाणेंच वर्ज्य करावीत. मुलगा अथवा बायको यांच्या अभावीं, दत्तक मुलगी बापाच्या धनाची भागीदारीण होते. याप्रमाणें दत्तकासंबंधाचा सर्व निर्णय येथें समाप्त झाला.

अथकन्यानामेवोत्पत्तौपुत्रार्थं पुत्रकामेष्टिः ऋतुकालात्षष्ठेदिनेसभार्यः कृताभ्यङ्गः प्राणानायम्यदेशकालौसंकीर्त्य पुत्रकामःपुत्रकामेष्टिंकरिष्येइति सकल्प्यस्वस्तिवाचनादिनान्दीश्राद्धान्तेऽग्निंप्रतिष्ठाप्य चक्षुषीआज्येनात्रप्रधानं अग्निंपञ्चवारंवरुणंपञ्चवारंविष्णुंपृथ्वीं विष्णुंसामंसूर्यासावित्रींपायसेन शेषेणस्विष्टकृतमित्यादि निर्वापकालेतूष्णींर्पाष्टमुष्टीनिरूप्यतथैवप्रोक्ष्य श्वेतवत्सश्वेतगोःक्षीरेणचरुंपक्त्वाज्यभागान्ते आतेगर्भइतिअग्निरैतुइतिसूक्तद्वयस्य हिरण्यगर्भऋषिः क्रमेणाग्नीवरुणौदेवते अनुष्टुप्जगत्यौछन्दसी पायसचरुहोमेविनि० ॥ ॐ आतेगर्भोयोनिमैतुपुमान्बाणइवेषुधिम् । आवीरोजायतांपुत्रस्तेदशमास्यः स्वाहा । अग्नयइदं० १ करोमितेप्राजापत्यमागर्भोयोनिमैतुते । अनूनःपुत्रोजायतामश्लोणोपिशाचधीतःस्वाहा । अग्नय० २ पुमांस्तेपुत्रोनारितंपुमाननुजायताम् । तानिभद्राणिबीजान्यृषभाजनयन्तुनौस्वाहा । अग्न० ३ यानिभद्राणिबीजान्यृषभाजनयन्तिनः । तैस्त्वंपुत्रान्विन्दस्वसाप्रसूर्धेनुकाभव स्वाहा। अग्न० ४ कामः समृद्ध्यतांमह्यमपराजितमेवमे । यंकामंकामयेदेवतंमे वायो समर्धयस्वाहा । अग्न० ५ अग्निरैतुप्रथमोदेवतानांसोस्यैप्रजांमुञ्चतुमृत्युपाशात् तदयंराजावरुणोनुमन्यतांयथेयंस्त्रीपौत्रमघन्नरोदात्स्वाहा । वरुणायेदं० १ इमामग्निस्त्रायतांगार्हपत्यःप्रजामस्यैनयतुदीर्घमायुः । अशून्योपस्थाजीवतामस्तुमातापौत्रमानन्दमभिप्रबुध्यतामियंस्वाहा । वरु० २ मातेगृहेनिशिघोषउत्थादन्यत्रत्वद्रुदन्त्यःसंविशन्तु मात्वंविकेश्युरआवधिष्टाजीवपत्नीपतिलोकेविराजपश्यन्तीप्रजांसुमनस्यमाना स्वाहा० । वरु० ३ अप्रजस्तांपौत्रमृत्युंपाप्मानमुतवाघम् । शीर्ष्णःस्रजमिवोन्मुच्यद्विषद्भ्यःप्रतिमुञ्चामिपाशंस्वाहा । वरुणा० ४ देवकृतंब्राह्मणकल्पमानंतेनहन्मियोनिषदः पिशाचान् । क्रव्यादोमृत्युनधरान्पातयामिदीर्घमायुस्तवजीवन्तुपुत्राः स्वाहा । वरु० ५ नेजमेषातसृणांविष्णुस्त्वष्टागर्भकर्ताविष्णुपृथ्वीविष्णवोनुष्टुप् । नेजमेष० विष्णव० १ यथेयंपृथ्वी० पृथिव्याइ० २ विष्णोःश्रेष्ठेन० विष्णव० ३ सोमोधेनुं राहूगणोगौतमःसोमस्त्रिष्टुप् । सोमोधेनुं० सोमायेदं० १ तांपूषन्सूर्यासावित्रीसूर्यासावित्रीत्रिष्टुप् । पायसचरुहोमेवि० तांपूषञ्छिव० सूर्यासावित्र्याइदं० १ इतिपञ्चदशाहुतीर्हुत्वास्विष्टकृद्धोमंकृत्वा दंपती अपश्यंत्वेतिद्वयोः प्रजावान्प्राजापत्यःप्रजापतिस्त्रिष्टुप् हुतशेषचरुप्राशनेविनियोगः अपश्यंत्वेतिद्वाभ्यांप्राश्य पिशंगभृष्टिमम्भृणंइत्यस्यदैवोदासिःपारुच्छेपइंद्रोगायत्रीनाभ्यालंभनेवि० पिशंगभृष्टि० इतिदंपतीनाभ्यालंभनंकुर्यातां यजमानः प्राय-

श्चित्तादिहोमशेषंसमाप्यविप्रेभ्योगांसुवर्णादिदक्षिणांचदत्त्वारात्रौदंपतीदर्भा-
स्तरणेशयीयातां इतिपुत्रकामेष्टिप्रयोगः ।

**सर्व कन्याच होत असल्यास पुत्रकामेष्टि**— ऋतुकालापासून सहाव्या दिवशीं बायकोसह अभ्यंग-स्नान करून प्राणायाम करावा व देशकालादिकांचा उच्चार करून,- 'पुत्रकामः पुत्रकामेष्टिं करिष्ये—' असा संकल्प करावा. स्वस्तिवाचनापासून नान्दीश्राद्धापर्यंतचें सर्व कर्म केल्यावर अग्नि मांडावा व—'चक्षुषी आज्येन अत्र प्रधानं अग्निं पञ्चवारं चरुणं पञ्चवारं विष्णुं पृथ्वीं विष्णुं सोमं सूर्यासावित्रीं पायसेन शेषेणस्विष्टकृतमित्यादि'— असें अन्वाधान करावें. निर्वापकालीं ( अग्नि विझवितांना ) मंत्रावांचून साठ मुठी सुकाट्यानें भांड्यांत ठेवून, त्यांवर मंत्रावांचूनच पाणी शिंपडावें. पांढरा गोन्हा असलेल्या पांढऱ्या गाईच्या दुधांत भात शिजवून, आज्यभाग झाल्यावर त्या भागाचा जो होम करावा, तो असाः—'आते गर्भ इतिअग्निरैतु इतिसूक्तद्वयस्य हिरण्यगर्भऋषिः । ............तां पूर्षाञ्छव० सूर्यासावित्र्याइदं०॥' इत्यादि याप्रमाणें पंधरा आहुतींनीं हवन करून स्विष्टकृत् होम करावा. नंतर नवराबायकोंनीं (दम्पतींनीं) 'अपश्यंत्वेति द्वयोः प्रजावान् प्राजापत्यः प्रजापतिस्त्रिष्टुप् हुतशेषचरुप्राशने विनियोगः । अपश्यं० ॥' या दोन मंत्रांनीं होमांतला शिल्लक राहिलेला पायसचरु ( तांदुळांची दुधांतली खीर ) खाऊन 'पिशङ्गभृष्टिमित्यस्य दैवोदासिः पारुच्छेप इन्द्रोगायत्री नाभ्या लम्भने विनियोगः पिषङ्गभृष्टि० ॥' या मंत्रानें भूमीला स्पर्श करावा. यजमानानें प्रायश्चित्तादि करून होमशेषाची समाप्ति करावी, आणि ब्राह्मणांना गाई, सोनें वगैरेची दक्षिणा द्यावी. रात्रीं नवराबायकोंनीं दर्भ पसरून त्यांवर निजावें. याप्रमाणें येथें पुत्रकामेष्टिप्रयोग संपला.

अथपुंसवनादिसंस्काराः तत्रपुंसवनंव्यक्तेगर्भेद्वितीयेचतुर्थेषष्ठेऽष्टमे वामासे सीमन्तेनसह वाकार्यम् शुक्लपञ्चमीमारभ्यकृष्णपञ्चमीपर्यन्तेचतुर्थीनवमी-चतुर्दशीपञ्चदशीवर्जितेतिथौसूर्यभौमगुरुवारेषुप्रशस्तम् क्वचिच्चन्द्रबुधशुक्र-वाराउक्ताः नक्षत्राणितुपुन्नामकानिप्रशस्तानि तानिचपुष्यश्रवणहस्तपुन-र्वसुमृगाभिजित्मूलानुराधाऽश्वनीत्येतानि अत्रपुष्योमुख्यः तदभावेश्रवणस्त-दभावेहस्तादीनि अयमेवानवलोभनस्यापिकालः पुंसवनेन सहकरणीयत्व-विधानात् पुंसवनानवलोभनेप्रतिगर्भंकार्ये गर्भसंस्कारत्वात् गर्भाधानसीमन्तो-न्नयनेतुस्त्रीसंस्कारत्वात्प्रतिगर्भंनावर्तेते किंतुप्रथमगर्भएवकार्ये प्रथमगर्भेलोपेतु-प्रतिगर्भंतयोर्लोपप्रायश्चित्तमावश्यकम् नचप्रथमापत्येतयो प्रायश्चित्तर्नाद्विती-यादिगर्भाणांसंस्कारसिद्धिर्भवति प्रायश्चित्तंनहिप्रत्यवायपरिहारमात्रं नत्वपूर्वा-ख्यातिशयोत्पादनम् तत्तुसंस्कारविधिनैवेतियुक्तंप्रतिगर्भंप्रायश्चित्तम् पुंसव-नानवलोभनयोस्तुप्रथमगर्भेऽनुष्ठानेपिप्रतिगर्भंतयोर्लोपेप्रायश्चितम् तच्चपा-दकृच्छ्रंप्रतिसंस्कारंकार्यम् बुद्धिकृतलोपेद्विगुणम् पुंसवने पतिःकर्तातदभावे-देवरादिः ।

**पुंसवन-संस्कार**—गर्भाचें स्पष्ट ज्ञान झाल्यावर दुसऱ्या, चौथ्या, सहाव्या अथवा आठव्या महिन्यांत करावा, किंवा सीमन्तोन्नयनाबरोबरही करावा. शुद्धपक्षांतल्या पंचमीपासून वद्यपक्षांतल्या पंचमीपर्यंतच्या—चतुर्थी, नवमी, चतुर्दशी आणि पौर्णिमा या तिथींखेरीजकरून बाकीच्या तिथि व रविवार, मंगळवार आणि गुरुवार हे दिवस—शुभ होत. क्वचित् ग्रंथांत—सोमवार, बुधवार व शुक्रवार हेही सांगितले आहेत. नक्षत्रांपैकीं जीं पुरुष नक्षत्रें प्रशस्त म्हणून सांगितलीं आहेत तीं हीं:—पुष्य, श्रवण, हस्त, पुनर्वसु, मृग, अभिजित्, मूळ, अनुराधा आणि अश्विनी. यांतलें पुष्यनक्षत्र मुख्य आहे. त्याच्या अभावीं श्रवण, त्याच्या अभावीं हस्त असा क्रम घ्यावा. अनवलोभन ( गर्भाच्या तिसऱ्या महिन्यांत करण्याचा शुद्धीकरण संस्कार ) संस्काराचाही हाच काळ जाणावा; कारण पुंसवनाबरोबरच अनवलोभन करावें असें सांगितलें आहे. पुंसवन व अनवलोभन हे गर्भसंस्कार असल्यानें प्रत्येक गर्भारपणांत करावेत. गर्भाधान व सीमंतोन्नयन हे संस्कार असल्यानें प्रत्येक गर्भारपणीं करूं नयेत, फक्त पहिल्याच गर्भारपणांत करावेत. पहिल्या गर्भारपणीं ( हे संस्कार ) न केले तर लोप होतो म्हणून, प्रत्येक गर्भकाळीं प्रायश्चित्त करणें अवश्य आहे, कारण पहिल्या गर्भाच्या वेळीं या ( गर्भाधान व सीमन्तोन्नयन ) संस्काराचें प्रायश्चित्त केल्यानें दुसऱ्या, तिसऱ्या वगैरे गर्भाच्या संस्कारांची सिद्धि होत नाहीं. प्रायश्चित्त केल्यानें दोषाचा मात्र परिहार होतो. पुण्याची प्राप्ति संस्कारविधि केल्यानेंच होते; यास्तव, प्रत्येक गर्भकाळीं प्रायश्चित्त करणेंच योग्य आहे. पुंसवन व अनवलोभन हे संस्कार तेवढे गर्भसंस्कार असल्यानें, ते जरी पहिल्या गर्भाच्या वेळीं केले असले, तरीं पुढेंही प्रत्येक गर्भाच्या वेळीं करावेत. जाणूनबुजून केले नसल्यास दुप्पट प्रायश्चित्त करावें. पुंसवनसंस्कार नवऱ्यानें करावा. त्याला करणें अशक्य असल्यास दीर वगैरेंना करावा.

अथ सीमन्तकालः तच्चतुर्थेऽष्टमेषष्ठेपञ्चमेमासि वाहितम् । नवमेमासिवाकुर्याद्यावद्गर्भविमोचनम् १ स्त्रीयद्यकृतसीमन्ताप्रसूयेतकदाचन । गृहीतपुत्राविधिवत्तसंस्कारमर्हति २ पक्षतिथिवारनक्षत्राणिपुंसवनोक्तान्येवप्रशस्तानि क्वचिद्दशमीपर्यन्तंकृष्णोपि ग्राह्यः षष्ठ्यष्टमीद्वादश्योरिक्ताः पञ्चदशीचवर्ज्याः तासुसंकटेचतुर्थीचतुर्दशीपौर्णिमास्योग्राह्याः क्रमेणाष्टचतुर्दशदशनाडिका आद्यास्त्यक्त्वाषष्ठ्यष्टमीद्वादश्योपिग्राह्याः पुन्नक्षत्राणामलाभेरोहिणीरेवत्युत्तरात्रयाणि ग्राह्याणि उक्तनक्षत्राणांप्रथमान्त्यपादौत्यक्त्वामध्यमपादद्वयंग्राह्यमित्युक्तम् इदंकर्मसकृदेवकार्यमित्युक्तम् कात्यायनानांतुगर्भसंस्कारत्वात्प्रतिगर्भमावर्तनीयम् सीमन्तोन्नयनेपतिरेवकर्ता गर्भाधानलोपेतत्प्रायश्चित्तार्थंविप्रायगांदत्त्वापुंसवनादिकार्यम् तत्राश्वलायनानांदेशकालसंकीर्तनान्ते ममास्यांभार्यायामुत्पत्स्यमानगर्भस्यगार्भिकबैजिकदोषपरिहारपुंरूपनासिद्धिज्ञानोदयप्रतिरोधपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंपुंसवनमनवलोभनं ममास्यांभार्यायांगर्भाभिवृद्धिपरिपन्थिपिशितरुधिरप्रियालक्ष्मीभूतराक्षसीगण—

दूरनिरसनक्षेमसकलसौभाग्यनिदानमहालक्ष्मीसमावेशनद्वाराप्रतिगर्भंबीजगर्भ-समुद्भवैनोनिबर्हणद्वाराचश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंस्त्रीसंस्काररूपंसीमन्तोन्नयनाख्यं-कर्मचतन्त्रेणकरिष्यइतिसंकल्पःसीमन्तेनसहत्रयाणांकरणेज्ञेयः नान्दीश्राद्धे-क्रतुदक्षसंज्ञकाविश्वेदेवाः पुंसवनस्यपृथक्त्वेपवमानसंज्ञकमौपासनाग्निंप्रतिष्ठा-पयेत् त्रयाणांसहत्वेमङ्गलनामानंप्रतिष्ठापयेत् गृह्याग्निविच्छेदेसर्वाधानिनश्चा-ग्न्युत्पत्तिःपूर्ववत् पुंसवनेप्रजापतिंचरुणा सीमन्तेधातारंद्विःराकांद्विःविष्णुंत्रिः प्रजापतिंसकृदाज्येनजुहुयात् अवशिष्टःप्रयोगोन्यत्रज्ञेयः शाखान्तरेषुचतत्तद्-ग्रन्थेभ्योज्ञेयःअत्रप्रतिसंस्कारंदशदशत्रीन्वीनुवाब्राह्मणान्भोजयेत् शक्तेनशतं-शतम् सीमन्ताङ्गभोजनेप्रायश्चित्तं पारिजाते ब्रह्मौदनेचसोमेचसीमन्तोन्नयने-तथा। जातश्राद्धेतथाभुक्त्वा भोक्ता चांद्रायणंचरेत् १ यद्वाअराइवेतिमन्त्र-स्यशतवारंजपः एतच्चआधानाङ्गब्रह्मौदनांगभोजनइवसीमन्तांगभोजनेज्ञेयम् नतुतद्दिनेतद्गृहेभोक्तृमात्रस्येतिपारिजातोक्तंयुक्तम्।

**सीमन्तकाल**—हा सीमन्तोन्नयनसंस्कार गर्भिणीच्या चौथ्या, आठव्या, सहाव्या, पांचव्या अथवा नवव्या महिन्यांत करावा. याचा मर्यादा काल पोटांतून गर्भ बाहेर येईपर्यंतचा ( गर्भविमोचन ) आहे. हा सीमन्तोन्नयनसंस्कार केल्यावांचून जर स्त्री बाळंत होईल तर तिला हातांत पुत्र घेऊन यथाविधि संस्कार करण्याची योग्यता येते. या संस्कारासाठीं पक्ष तिथि, वार व नक्षत्रें—जीं पुंसवना-साठीं ( मागं ) सांगितलीं तींच प्रशस्त होत. क्वचित् जागीं कृष्णपक्षांतल्या दशमी-पर्यंतही घेण्यास सांगितलें आहे. षष्ठी, अष्टमी, द्वादशी, चतुर्दशी व पौर्णिमा या तिथि अडचणीच्या वेळीं घ्याव्या. षष्ठी, अष्टमी आणि द्वादशी या तिथि अनुक्रमें ८, १४ व १० घटका वर्ज्य करून घ्याव्या. पुरुषनक्षत्रें जर न मिळतील, तर रोहिणी, रेवती व तीन उत्तरा—हीं नक्षत्रें घ्यावींत. उक्त नक्षत्रांचा पहिला व चौथा असे दोन पाद सोडून मधले दोन पाद घेण्यास सांगितलें आहे. हा संस्कार एकदांच करावयाला सांगितलें आहे. हा गर्भसंस्कार असल्यानें कात्यायनांनीं प्रत्येक गर्भार-पणांत केला पाहिजे. सीमन्तोन्नयन संस्कार नवव्यानेंच करावा. गर्भाधानसंस्कार जर झाला नसेल, तर प्रायश्चित्तासाठीं ब्राह्मणाला गाय देऊन पुंसवन वगैरे संस्कार करावेत. त्यांत आश्वलायन शाखेच्यांनीं देशकालादिकांचा उच्चार करून ‘ ममास्याभा-र्यायामुत्पत्स्यमानगर्भस्य गार्भिकबैजिकदोषपरिहारपुरूपतासिद्धिज्ञानोदयप्रतिरोधपरिहार-द्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुंसवनमनवलोभनं ममास्या भार्यायां गर्भाभिवृद्धिपरिपंथि-पिशितरुधिरप्रियालक्ष्मीभूतराक्षसीगणदूरनिरसनक्षेमसकलसौभाग्यनिदानमहालक्ष्मीसमा-वेशनद्वारा प्रतिगर्भं बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा च श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं स्त्रीसंस्काररूपं सीमन्तोन्नयनाख्यं कर्मच तन्त्रेण करिष्ये ’ असा संकल्प सीमन्तोन्नयन संस्काराबरोबरच तीन संस्कार करणें असल्यास करावा. या संस्कारांतल्या नान्दी-श्राद्धांत ‘ क्रतुदक्ष ’ नांवाचे ‘ विश्वेदेव ’ घ्यावे. पुंसवनसंस्कार जर निराळा करा-यचा असेल, तर ‘ पवमान ’ नांवाचा ‘ औपासनाग्नि ’ स्थापावा. तिन्ही संस्कार

एकदमच करणें झाल्यास ‘ मङ्गल ’ नांवाचा अग्नि मांडावा. गृह्याग्नि जर विझला असला, तर जे सर्वाधानी असतील त्यांनीं, मागें सांगितल्याप्रमाणें, अग्नि उत्पन्न करावा. पुंसवनसंस्कारांत प्रजापतीचा होम भातानें करावा. सीमन्तोन्नयनसंस्कारांत धातृदेवतेला दोन, राकादेवतेला दोन, विष्णुदेवतेला तीन व प्रजापतिदेवतेला एक अशा आहुति द्याव्या. बाकीचा प्रयोग इतर ग्रंथांत पहावा. या प्रत्येक संस्कारांत दहा दहा किंवा तीन तीन ब्राह्मणांना भोजन द्यावें. सामर्थ्य असल्यास शंभरांनाही घालावें. सीमन्तोन्नयनांत जेवण केल्यास, त्याचें प्रायश्चित्त पारिजातग्रंथांत सांगितलें आहे. ब्रह्मौदन, सोमयाग, सीन्मतोन्नयन व जातकर्मसंबंधाचें श्राद्ध यांत जेवणारानें चान्द्रायण प्रायश्चित्त करावें; किंवा ‘ अराइव० ’ या मंत्राचा शंभर जप करावा. हें प्रायश्चित्त —आधान व ब्रह्मौदनासंबंधाच्या भोजनाप्रमाणेंच सीमन्तभोजनाबद्दलही जाणावें. ‘ त्या दिवशीं कर्त्याच्या घरीं नुसतें जेवण तेवढें करण्याला प्रायश्चित्त नाहीं, ’ असें जें पारिजातांत सांगितलें आहे तें योग्य आहे.

अथगर्भिणीधर्माः गर्भिणीकुञ्जराश्वादिशैलहर्म्यादिरोहणंम् । व्यायामंशीघ्रगमनंशकटारोहणंत्यजेत् १ नभस्मादावुपविशेन्मुसलोलूखलादिषु। त्यजेज्जलावगाहंचशून्यंसद्मतरोस्तलम् २ कलहंगात्रभंगंचतीक्ष्णात्युष्णादिभक्षणम्। संध्यायामतिशीताम्लंगुर्वाहारंपरित्यजेत् ३ व्यवायशोकासृङ्मोक्षंदिवास्वापंनिशास्थितिम्। भस्माङ्गारनखैर्भूमिलेखनंशयनंसदा ४ त्यजेदमङ्गलंवाक्यंनचहास्यादिकाभवेत् । नमुक्तकेशानोद्विग्नाकुक्कुटासनगानच ५ गर्भरक्षासदाकार्यानित्यंशौचानिषेवणात्। प्रशस्तमन्त्रलिखनाच्छस्तमाल्यानुलेपनात् ६ विशुद्धगेहवसनाद्दानैःश्वश्र्वादिपूजनैः । हरिद्राकुंकुमंचैवसिन्दूरं कज्जलंतथा ७ केशसंस्कारताम्बूलंमाङ्गल्याभरणंशुभम् । चतुर्थेमासिषष्ठे वाप्यष्टमेगर्भिणीवधूः ८ यात्रांविवर्जयेन्नित्यमाषाढेतुविशेषतः ।

**गर्भिणीधर्म**—गर्भारशीनें हत्ती, घोडा इत्यादिकांवर बसूं नये. पर्वत, हवेली वगैरेवर चढूं नये. व्यायाम, भरभर चालणें व गाडींत बसणें वर्ज्य करावींत. राखाडींत, मुसळावर किंवा उखळावर बसूं नये. पाण्यांत बुडी मारून स्नान करूं नये. माणूस नसलेल्या घरांत जाऊं नये. झाडाच्या मुळाशीं बसूं नये. भांडण करणें, अंग मोडणें, तिखट खाणं व अति उष्ण पदार्थ सेवन करणं—हें सोडावींत. संध्याकाळीं अतिथंड व आंबट जडान्न खाऊं नये. मैथुन, शोक, रक्त काढणं, दिवसा झोंप घेणें, रात्रीं जागरण करणें, राखाडी—कोळसे—नखें यांनीं जमिनीवर रेघा ओढणें, नेहमीं झोप घेणें, वाईट शब्द बोलणें, फार हंसणें, केंस मोकळे सोडणें, उद्विग्न राहणें व कोंबड्यासारखें बसणें—हें साडून द्यावें. नेहमीं शुद्ध राहणें चांगले मंत्र लिहिणें, सुगन्ध घेणें, फुलांच्या माळा घालणें, गन्धादिकांची उटी लावणें निर्मळ घरांत राहणें, स्वच्छ वस्त्र नेसणें, दान करणें, सासूसासऱ्यांची सेवा करणें वगैरे गोष्टींनीं गर्भाचें नित्य संरक्षण करावें. हळदकुंकू, शेंदूर, काजळ, न्हाणें, विडा खाणें, व सौभाग्यालंकार धारण करणें—या गोष्टी शुभ आहेत. चौथा, सहावा आणि

आठवा—या महिन्यांत गर्भिणीनें कधींहि कोठें प्रयाण करूं नये. सहाव्या महिन्यानंतर केव्हांही प्रयाण करणें वर्ज्य करावें.

अथपतिधर्माः गर्भिणीवाञ्छितंद्रव्यंतस्यैदद्याद्यथोचितम् । सूतेचिरायुषंपुत्रमन्यथादोषमर्हति १ सिन्धुस्नानंद्रुमच्छेदंवपनंप्रेतवाहनम् । विदेशगमनंचैवनकुर्याद्गर्भिणीपतिः २ वपनंमैथुनंतीर्थंश्राद्धभोजनमेवच । वर्जयेत्सप्तमान्मासान्नावआरोहणंतथा ३ युद्धादिवास्तुकरणंनखकेशविकर्तनम् । चौलंशवानुगमनंविवाहंचविवर्जयेत् ४ मुण्डनंपिण्डदानंचप्रेतकर्मचसर्वशः । नजीवत्पितृकःकुर्याद्गर्भिणीपतिरेवच ५ अत्रकर्तनमपिनिषिध्यते वपनस्यनिषेधेपि कर्तनंतुविधीयतइतिवाक्यंतुजीवत्पितृकादीनांयोवपननिषेधस्तत्रकर्तनविधिपरम् एतदपवादः क्षौरंनैमित्तिकंकुर्यान्निषेधेसत्यपि ध्रुवम् । पित्रोःप्रेतविधानंचगर्भिणीपतिराचरेत् १ अन्वष्टक्याष्टकयोर्गर्भिणीपतिः पिण्डदानंकुर्यात् केचित्पित्रोःप्रतिसांवत्सरिकेपिण्डदानंकुर्वन्ति दर्शमहालयादिषु नैवकार्यम् ।

**गर्भिणीपतिधर्म**—गर्भार स्त्रीच्या नवऱ्यानें तिच्या इच्छेप्रमाणें सर्व पदार्थ तिला द्यावेत, म्हणजे ती चिरायु पुत्र प्रसवते. वांच्छा तृप्त न केल्यास नवऱ्याला दोष लागतो. समुद्रस्नान, झाड तोडणें, क्षौर, प्रेताला खांदा देणें, परदेशीं जाणें, नखें व केश कापणें, चौल, प्रेताच्या मागें जाणें व विवाह—या गोष्टी सातव्या महिन्यापासून वर्ज्य कराव्या. क्षौर, पिण्डदान व प्रेतक्रिया—या गोष्टी ज्याचा बाप जिवंत आहे त्यानें—गर्भारशीच्या नवऱ्यानें नेहमींच वर्ज्य कराव्या. येथें नखें व केश कापण्याबद्दलचाही निषेध सांगितला. 'क्षौराचा जरी निषेध सांगितला, तरी नखें व केश कापावींत' असें जें वाक्य आहे, तें बाप जिवंत असलेल्याच्या संबंधाचें आहे. याविषयीं जो अपवाद आहे तो असाः—निषेध असला तरी नेहमींप्रमाणें हजामत करवावी. गर्भिणीपति असला तरी आईबापांची प्रेतक्रिया करावी. अन्वष्टक्य व अष्टका या श्राद्धांत गर्भिणीपतीनें पिण्डदान करावें. कोणी कोणी आईबापांच्या दरवर्षीच्या श्राद्धांत पिण्डदान करतात. दर्शश्राद्ध व महालय—यांत पिण्डदान करूं नये.

अथगर्भस्रावहरं काञ्चनयज्ञोपवीतदानंमहार्णवे इदंस्त्रीकर्तृकम् शुभदिने स्त्रीआचम्य देशकालौसंकीर्त्यममगर्भस्रावनिदानसकलदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंवायुपुराणोक्तं सुवर्णयज्ञोपवीतदानविधिंकरिष्येइतिसंकल्प्य पलेनतदर्धेनतदर्धेनयथाशक्तिवाहैमं यज्ञोपवीतंग्रन्थिप्रदेशेमौक्तिकयुतंकृत्वा तथैववज्रमणियुतंराजतमुत्तरीयंच कृत्वोभयंपञ्चगव्येनगायत्र्याप्रक्षाल्य ताम्रपात्रेद्रोणमितंदधिनिक्षिप्यतन्मध्येद्रोणमितमाज्यंनिक्षिप्याज्योपरितदुभयंसंस्थाप्यभर्ताब्राह्मणोवागायत्रीमन्त्रेणगन्धादिभिःपूजयेत् । अष्टगुञ्जात्मकोमाषः दशमाषाःसुवर्णम् पलकुडवप्रस्थाढकद्रोणाःसुवर्णादिपूर्वपूर्वचतुर्गुणाः दध्याज्ययोर्द्रोणपरिमाणाभावेशक्त्यनुसारिप्रमाणं ब्राह्मणद्वारा आज्यमधुमिश्रैस्तिलैरष्टोत्तरश-

तंगायत्र्याव्याहृतिभिर्वाहोमंकारयेत् त्यागंभर्तावास्त्रीवाकुर्यात् होमकर्तारंविप्रंव-स्त्राद्यैःसंपूज्यप्राङ्मुखायतस्मैउदङ्मुखास्त्री दानंकुर्यात् तद्यथा उपवीतंपरिमितं-ब्रह्मणाविधृतंपुरा। भवनौकास्यदानेनगर्भंसंधारयेह्यहम् १ इतिमन्त्रेणविप्रस्यनाम-गोत्रेउच्चार्यताम्रपात्रस्थदध्याज्यसंस्थंसुपूजितंसोत्तरीयकमिदंयज्ञोपवीतं गर्भ-स्रावनिदानदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंतुभ्यमहंसंप्रददेनमम प्रतिगृह्य-ताम् विप्रःप्रतिगृह्णामीत्यादि यथाशक्तिदक्षिणांदत्त्वान्येभ्योपियथाशक्तिदक्षि-णांदत्त्वाप्रतिग्रहीतुरनुव्रज्यनमस्कारक्षमापनादि कृत्वाविप्रभोजनंसंकल्प्यकर्मे-श्वरायार्पयेत् एतच्च स्रवद्गर्भाभवेत्सातुचालकं हन्तियाविषैरित्युक्तेर्बालहत्याप्रा-यश्चित्तंकृत्वाकार्यम् अन्यत्रतु स्वर्णधेनुदानहरिवंशश्रवणादीन्युक्त्वाघृतपूर्ण-ताम्रकलशदानादिविधानान्युक्तानि ।

**गर्भस्रावहरण**—गर्भस्राव होत असतांना तो बंद करण्यास, सोन्याचें जानवें दान करण्यास जें महार्णवांत सांगितलें आहे, तें (गर्भारशी) स्त्रीनें दान करावें. शुभ दिवशीं स्त्रीनें आचमन करून देशकालादिकांचा उच्चार करावा आणि—' मम गर्भस्रावनिदानसकलदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं वायुपुराणोक्तं सुवर्णयज्ञोपवीतदानविधिं करिष्ये ' असा संकल्प करून, एका पलाचें, अर्धा पलाचें, पाव पलाचें किंवा यथाशक्ति सोन्याचें जानवें करून त्याच्या गांठीच्या जागीं मोतीं लावावें आणि वज्रमणि लावलेली रुप्याची उत्तरी करून त्या दोहोंना पंचगव्यांत बुडवून त्यांचें प्रक्षालन करावें. तांब्याच्या भांड्यांत द्रोणभर दहीं घालून त्यांत द्रोणभर तूप घालावें आणि त्यावर तीं दोन्ही (जानवें व उत्तरीय) ठेवावींत. नवऱ्यानें किंवा ब्राह्मणानें गायत्रीमंत्र म्हणून गन्धादिकांनीं त्याची पूजा करावी. आठ गुंजा म्हणजे एक मासा, दहा मासे म्हणजे एक सुवर्ण, चार सुवर्ण म्हणजे एक पल, त्याच्या चौपट म्हणजे एक कुडव, त्याच्या चौपट म्हणजे एक प्रस्थाढक व त्याच्या चौपट म्हणजे एक द्रोण. दहीं व तूप हीं एकेक द्रोण घेण्यास जर ऐपत नसेल, तर तीं यथाशक्ति घ्यावींत. तूप व मध यांत मिसळलेल्या तिळांचा गायत्रीमंत्रानें किंवा व्याहृतिमंत्रानें ब्राह्मणानें १०८ होम करावा. होमांत नवऱ्यानें अथवा स्त्रीनें त्याग करावा (आहुती द्याव्या). होम करणाऱ्या ब्राह्मणाची वस्त्रादिकांनीं पूजा करावी व त्या पूर्वाभिमुख ब्राह्मणाला उत्तराभिमुख स्त्रीनें जें दान करावें तें येणेंप्रमाणें:—' उपवीतं परिमितं ब्रह्मणा विधृतं पुरा। भवनौकास्य दानेन गर्भं संधारये ह्यहम् ॥ ' हा मंत्र म्हणून ब्राह्मणाचें नांव आणि गोत्र यांचा उच्चार करावा आणि, ' ताम्रपात्रस्थदध्याज्यसंस्थं सुपूजितं सोत्तरीयकमिदं यज्ञोपवीतं गर्भस्राव-निदानदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं तुभ्यमहं संप्रददे न मम। प्रतिगृह्यताम्। ' असें म्हणून दान करावें. ब्राह्मणानें ' प्रतिगृह्णामि ' असें म्हणून (यज्ञोपवीताचें) दान घ्यावें. नंतर ब्राह्मणाला यथाशक्ति दक्षिणा देऊन, इतरांनाही यथाशक्ति दक्षिणा द्यावी आणि दान घेणाऱ्याला पोंचवितांना नमस्कार व प्रार्थना हीं करावींत. त्यानंतर ब्राह्मणभोजनाचा संकल्प करून, सर्व कर्म देवाला अर्पण करावें. हें जें

दान करावयाचें तें बालहत्येबद्दल प्रायश्चित्त करून नंतर करावें; कारण, ' जी स्त्री विष घालून बालकाला मारत्ये तिच्या गर्भाचा स्राव होतो ' असें वचन आहे. दुसऱ्या ग्रंथांत तर सोन्याच्या गाईचें दान व हरिवंशाचें श्रवण—हीं केल्यानंतर तुपानें भरलेला तांब्याचा कलश दान करावा वगैरे दानें सांगितलीं आहेत.

अथसूतिकागृहप्रवेशः गृहनैर्ऋत्यांसूतिकागृहंकृत्वा तत्राश्विनीरोहिणी-मृगपुनर्वसुपुष्यत्र्युत्तराहस्तचित्रास्वात्यनुराधाधनिष्ठाशततारकानक्षत्रेषु रिक्तादिवर्ज्यतिथौ चन्द्रानुकूल्ये शुभलग्नेसूतिकाप्रवेशो गोविप्रदेवपूजनंकृत्वा मन्त्र-वाद्यघोषेणसापत्यस्त्रीभिःसहकार्यः असंभवेसद्योवा ।

**सूतिकागृहप्रवेश**—घराच्या नैर्ऋत्य दिशेला सूतिकागृह ( बाळंत होण्याची जागा ) करून—अश्विनी, रोहिणी, मृग, पुनर्वसु, पुष्य, तीन उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, धनिष्ठा व शततारका—या नक्षत्रांवर—रिक्ता तिथि वर्ज्य करून, इतर तिथींवर—चंद्र अनुकूल असतां—शुभलग्न पाहून—गाई, ब्राह्मण व देव यांची पूजा करून मंत्र व वाद्यें यांच्या गजरांत मुलें असलेल्या सुवासिनींसह ( बाळंतीण होणारणीनें ) त्या सूतिकागृहांत जावें. इतकें करण्यास वेळ नसल्यास शुभमुहूर्त पाहून तावडतोब ( सूतिकागृहांत ) जावें.

अथसुखप्रसवकरम् प्रसवप्रतिबन्धेऋग्विधाने प्रमंदिनेइत्यृचंविजिहीर्ष्वेति-सूक्तंवाजपेत् एताभ्यामभिमन्त्रितजलंवापाययेत् तेनसुखप्रसवः शीघ्रप्रसवम-न्त्रस्तु हिमवत्युत्तरेपार्श्वे सुरथानाम यक्षिणी । तस्याःस्मरणमात्रेणविशल्या-गर्भिणीभवेत् १ ॐ क्षीं ॐस्वाहेतिमन्त्रेणदूर्वांकुरेणतिलतैलंशतंसहस्रं वाऽभि-मंत्र्यकिंचित्पाययेत् किंचिन्मात्रस्यगर्भेलेपश्च सम्यग्लेपेशीघ्रसुखप्रसवः अस्थि-मात्रावशिष्टगोमस्तकस्यसूतिकागृहोपरिनिधानेसुखप्रसवः वंशनिम्बयोस्त्वक्-तुलसीमूलंकपित्थमत्रंकरवीरबीजंचसमभागंमाहिषीदुग्धेनपेषयित्वातेनसतैलेन-योनिलेपेसद्यःप्रसवः ।

**सुलभप्रसूति**—स्त्रीला बाळंत होण्यास जर त्रास होऊं लागला, तर ऋग्विधान ग्रन्थांत सांगितलेल्या 'प्रमन्दिने०' या ऋचेचा अथवा 'विजिहीर्ष्व०' या सूक्ताचा जप करावा किंवा या मंत्रांनीं मंतरलेलें ( अभिमंत्रित ) पाणी प्यावें ( बाळंत होणारणीला पिण्यास द्यावें ) म्हणजे सुलभप्रसूति होते. सुलभप्रसूतीचा मंत्रः—' हिमवत्युत्तरे पार्श्वे सुरभानाम यक्षिणी । तस्याःस्मरणमात्रेण विशल्या गर्भिणी भवेत् ॥ ॐ क्षीं ॐ स्वाहा ' या मंत्रानें तिळाचें तेल शंभर किंवा हजार वेळां दूर्वांकुरांनीं मंत्रून थोडें प्यावें ( पिण्यास द्यावें ) व थोडें गर्भस्थानाला ( योनींत ) लावावें. चांगल्याप्रकारें ( चोपडून ) लावल्यानें लवकर आणि सुखानें प्रसूति होते. गाईच्या तोंडाचा अस्थीचा सांगाडा सूतिकागृहावर ( बाळंत होण्याच्या जागेवर ) ठेवल्यानेंही सुलभप्रसूति होते. वेळू व निंबवृक्ष (कडुनिंब) यांची साल, तुळशीची मुळी, कवठीचें पान आणि कण्हेरीचें बीं—या पांची वस्तु समभाग घेऊन म्हशीच्या

दुधांत वांटाव्या आणि त्यांत थोडें तिळाचें तेल घालून त्याचा योनीला लेप करावा. म्हणजे त्वरित प्रसूति होते.

अथजातकर्म मूलज्येष्ठाव्यतीपातादावनुत्पन्नस्यजातमात्रस्यपुत्रस्य पिता-मुखंकुलदेवतावृद्धप्रणामपूर्वकमवलोक्यनद्यादावुदङ्मुखः स्नायात् तदसंभवेगृहआनीताभिःशीताभिःस्वर्णयुताभिरद्भिःस्नायात् एतच्चरात्रावपिनद्यादाकार्यम् अशक्तोरात्रावग्निसन्निधौस्वर्णयुतशीतोदकैः ॥

**जातकर्मस्नानाविधि**—मूळ, ज्येष्ठा, व्यतीपात वगैरेंवर जन्म न पावलेल्या पुत्राच्या पित्यानें, पुत्राचा जन्म झाल्याबरोबर—कुलदेवता आणि वडील माणसें—यांना नमस्कार करून पुत्रमुख पाहावें व नंतर नदीवर जाऊन उत्तराभिमुखानें स्नान करावें. जवळपास नदी नसल्यास, घरीं आणिलेल्या थंड पाण्यात सोनें टाकून, त्याचें स्नान करावें. रात्र असली तरी * नदींतच स्नान करावें. अशक्तानें रात्रीं अग्नीजवळ शीतोदकानें स्नान करावें.

मूलादिषु जननेतुमुखमदृष्ट्वैवस्नानम् देशान्तरगतेजनकेपुत्रजन्मश्रवणोत्तरंस्नानम् सर्वत्रस्नानात्प्रागस्पृश्यत्वम् एवंकन्योत्पत्तावपिस्नानतत्प्रागस्पृश्यत्वंचज्ञेयम् अन्यसपिण्डाशौचमध्येजननेपिपितुस्तात्कालिकीस्नानदानादौजातकर्मणिचशुद्धिः केचिन्मृताशौचेपुत्रजनने जातकर्माशौचान्तेकार्यमित्याहुः नालच्छेदनात्पूर्वंसंपूर्णसंध्यावन्दनादिकर्मणिनाशौचम् प्रथमदिनेपञ्चमषष्ठदशमदिनेचदानप्रतिग्रहयोर्नदोषः शृतमन्नंनग्राह्यम् ज्योतिष्टोमादिदीक्षावतास्वयमन्येनवाजातकर्मनकार्यम् किंतुअवभृथस्नानान्तेदीक्षांविसृज्यस्वयंकार्यम् श्रेष्ठः कनिष्ठेनपुंसवनादिकंनकारयेत् जातकर्मतुकारयेत् अनिकान्तंतुस्वयमेवकुर्यात् महारोगार्तो जातकर्मस्वयंनकुर्यात् अच्छिन्ननाभिकर्तव्यंश्राद्धंवैपुत्रजन्मनि । पुत्रपदेनकन्यापिगृह्यते तथाचसंस्काराङ्गभिन्नंकन्यापुत्रयोर्जन्मनिमित्तकंनान्दीश्राद्धंविधीयते एतच्चरात्रावपिकार्यम् तच्चहेम्नैवकार्यंनत्वन्नादिना तथाच स्नातोलंकृतःपिताअकृतनालच्छेदमपीतस्तन्यमन्यैरस्पृष्टंप्रक्षालितंकुमारंमातुरुत्सङ्गेकारायत्वाचमनादिदेशकालादिकीर्तनान्ते अस्यकुमारस्यगर्भाम्बुपानजनितदोषनिबर्हणायुर्मेधाभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंजातकर्म करिष्ये तदादौ स्वस्तिपुण्याहवाचनं मातृकापूजनं च करिष्ये हिरण्येनपुत्रजन्मनिमित्तकंजातकर्माङ्गंचनान्दीश्राद्धंतन्त्रेणकरिष्ये इतिसंकल्प्य यथागृह्यंकुर्यात् ततोदद्यात्सुवर्णंचभूमिंगातुरगंरथम् । छत्रंछागंचमाल्यंचशयनंचासनंगृहम् १ तिलपूर्णानिपात्राणिसहिरण्यानिचैवहि । भक्षयित्वातुपक्वान्नंद्विजश्चान्द्रायणंचरेत् १ सूतकेतुसकुल्यानांनदोषोमनुरब्रवीत् ।

**जातकर्मसंस्कारविधि**—मूळ वगैरेवर पुत्रजन्म झाला असल्यास पित्यानें त्याचें मुख पाहातांच स्नान करावें. बाप जर देशांतरीं असेल तर पुत्रजन्म झाल्याचें समजतांच स्नान करावें. स्नान करण्याच्या आधीं कोठेंहि

कोणास बापानें स्पर्श करूं नये. याप्रमाणेंच जन्मानंतर स्नान व स्नानाच्या आधीं अशौच, हीं कृत्यें कन्या झाली असतांही करावींत. सपिंडाचें सोयर असतांनाच जर जनन होईल, तर पित्याला–स्नान, दान व जातकर्म करण्यास तत्काळ शुद्धि आहे. मृताशौच ( सुतक ) असतांना जर जनन होईल, तर सुतक फिटल्यावर जातकर्म करावें असें कांहीं ग्रंथकार सांगतात. नालच्छेदनाच्या आधीं संपूर्ण सन्ध्यावन्दनादि कर्मे करण्यास अशौच नाहीं. पहिल्या, पांचव्या, सहाव्या व दहाव्या दिवशीं दानाच्या देण्याघेण्यांत दोष नाहीं. शिजलेलें अन्न घेऊं नये. ज्योतिष्टोम यज्ञाची जर दीक्षा घेतलेली असेल, तर ती घेणारानें स्वतः अथवा दुसऱ्याकडून जातकर्म करूं किंवा करवूं नये. यज्ञाच्या शेवटीं अवभृथस्नान होऊन दीक्षा संपल्यावर स्वतःच तें ( जातकर्म ) करावें. ज्येष्ठानें कनिष्ठाकडून पुंसवनादि संस्कार करवूं नयेत; पण जातकर्म करविण्यास हरकत नाहीं. आधीं करायचें राहिल्यास मागाहून जें करणें तें स्वतः ( बापानें ) करावें. महारोग्यानें जातकर्म करूं नये. नाभिच्छेदनापूर्वीं संस्काराङ्गभूत नान्दीश्राद्ध करावें. पुत्र या शब्दांत कन्या शब्दाचाही अंतर्भाव होतो. त्याचप्रमाणें संस्काराशिवाय पुत्रजन्मानिमित्त वेगळें नान्दीश्राद्धही करावें. हें रात्रीं सुद्धां करावें, पण द्रव्यानें करावें; अन्नादिकांनीं करूं नये. पित्यानें स्नान करून अलंकार धारण करावेत आणि नालच्छेदन न केलेल्या, स्तनपान न केलेल्या व दुसऱ्यांनीं स्पर्श न केलेल्या अशा पुत्राला घेऊन पाण्यानें धुतल्यावर त्याच्या मातेच्या मांडीवर ठेवावें. नंतर आचमन करून देशकालादिकांचा उच्चार केल्यावर 'अस्य कुमारस्य गर्भाम्बुपानजनितदोषनिबर्हणायुर्मेधाभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं जातकर्म करिष्ये । तदादौ स्वस्तिपुण्याहवाचनं मातृकापूजनंच करिष्ये । हिरण्येन पुत्रजन्मनिमित्तकं जातकर्मांगंच नान्दीश्राद्धं तंत्रेण करिष्ये' असा संकल्प करावा व आपल्या गृह्यसूत्रांप्रमाणें प्रयोग करावा. नंतर सोनें, गाय, भूमि, घोडा, रथ, छत्र, मेंढा, पुष्पमाला, अंथरूण, आसन, घर व तिलपूर्ण अशीं दोन सुवर्णपात्रें–यांचीं दानें करावींत. सोयर असलेल्याच्या घरीं जर अन्नभक्षण करण्यांत आलें, तर ब्राह्मणानें चान्द्रायण प्रायश्चित्त करावें. सुतकांत स-कुल्यांना म्हणजे सगोत्र व सपिण्ड यांना दोष नसल्याबद्दलचें मनूचें वचन आहे.

अथारिक्तपाणिर्ज्योतिर्विदं संपूज्य तस्माज्जन्मलग्नगतशुभाशुभग्रहान्निर्णयं ज्ञात्वा प्रतिकूलग्रहानुकूल्यार्थं तत्तद्ग्रहप्रीत्यर्थं दानानि कुर्यात् ग्रहमन्त्रजपादि शान्तिसूक्तजपादि कर्मणि विप्रान्वा नियोजयेत् ततो नालच्छेदं कारयित्वा हिरण्योदकेन मातुर्दक्षिणस्तनं प्रक्षाल्य मात्रा कुमारं पाययेत् तत्र इमां कुमार इत्यादि मन्त्रं विप्रादिः पठेत् जातकर्माद्यन्नप्राशनान्तसंस्कारेषु आश्वलायनानां होमः कृताकृतः होमपक्षे नान्दीश्राद्धान्ते जातकर्मांग होमं करिष्ये इति संकल्प्य लौकिकाग्निं प्रतिष्ठाप्यान्वाधानाद्याज्यभागान्ते अग्निमिन्द्रं प्रजापतिं विश्वान्देवान्ब्रह्माणमाज्येन जुहुयात् मधुसर्पिः प्राशनादि मूर्धावघ्राणान्ते स्विष्टकृदादि कुर्यादिति क्रमः अन्येषां यथागृह्यं होमादि ज्ञेयम् ।

**नालच्छेदन**—वरील दानकर्मानंतर हातांत नारळ घेऊन ज्योतिष्याची पूजा करावी. त्याच्याकडून जन्मलग्नींच्या शुभाशुभ ग्रहांचा निर्णय समजावून घेऊन, प्रतिकूल ग्रह असतील ते अनुकूल होण्यासाठीं त्यांचीं दानें करावीत, किंवा ग्रहांच्या मंत्रांचा जप व शांतिसूक्तादिकांचा पाठ करण्यासाठीं ब्राह्मणांची योजना करावी. नंतर नालच्छेदन करवून सुवर्णयुक्त पाण्यानें बालकाच्या मातेचा उजवा स्तन धुऊन, तिला मुलाला पाजायला सांगावें, व त्यावेळीं 'इमां कुमारं' वगैरे मंत्र ब्राह्मणांनीं म्हणावेत. जातकर्मापासून अन्नसंस्काराच्या कर्मापर्यंतचा होम आश्वलायनशाखीयांनीं करावा अथवा करूं नये. होम करणें असल्यास जातकर्मांगभूत नान्दीश्राद्धाच्या शेवटीं 'जातकर्मांगहोमं करिष्ये' असा संकल्प करून लौकिकाग्नि मांडावा. अन्वाधानापासून आज्यभागापर्यंतचें कर्म संपल्यावर—अग्नि, इन्द्र, प्रजापति, विश्वेदेव व ब्रह्मा—या देवतांसाठीं तुपानें होम करावा. त्यानंतर मध, तूप वगैरेंच्या प्राशनापासून टाळू हुंगण्याच्या कर्मापर्यंतचें कर्म झाल्यावर, स्विष्टकृत् वगैरे कर्म करावें असा याचा क्रम आहे. भिन्नशाखीयांनीं आपापल्या गृह्यसूत्रांप्रमाणें होमादि करावींत.

कुमार्याअपिजातकर्मादिसंस्काराश्चौलान्ताःसर्वेअमन्त्रकंकार्याः विवाहस्तु समन्त्रकः अतःकन्यायाजातकर्मादिसंस्कारलोपेतत्तत्कालेविवाहकालेवाप्रायश्चित्तंकृत्वाविवाहःकार्यः अत्रसर्वत्रजातकर्मनामकर्मादौमुख्यकालातिक्रमेगुर्वाद्यस्तरहितेशुभनक्षत्रादौ जातकर्मादिकंकार्यम् तत्रजातकर्मणिनक्षत्राणि रोहिणीत्र्युत्तराश्विनीहस्तपुष्यानुराधारेवतीमृगचित्राश्रवणादित्रयस्वातीपुनर्वसवः रिक्तापर्वरहितास्तिथयः भौमशनिभिन्नवाराः भद्रावैधृत्यादिशून्येसुकेन्द्रलग्ने शुभम् ।

**जातकर्मातिक्रमप्रायश्चित्त**—कन्येचेसुद्धां जातकर्मापासून चौलकर्मापर्यंतचे सर्व संस्कार करावेत, पण ते अमंत्रक करावेत; तिचा विवाह मात्र समंत्रक करावा. कन्येच्या जातकर्मादि संस्कारांचा जर लोप होईल, तर त्या त्या वेळीं अथवा विवाहाच्या वेळीं त्याबद्दलचें प्रायश्चित्त करून मग तिचा विवाह करावा. जातकर्म, नामकरण वगैरे सर्व संस्कारांच्या खऱ्या वेळीं जर ते ते संस्कार झाले नसले, तर गुरूचा अस्त वगैरे वेळा वर्ज्य करून शुभ नक्षत्रावर जातकर्मादि संस्कार करावेत. या जातकर्माला—रोहिणी, तीन उत्तरा, अश्विनी, हस्त, पुष्य, अनुराधा, रेवती, मृग, चित्रा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, स्वाती व पुनर्वसु हीं नक्षत्रें घ्यावींत. रिक्ता म्हणजे चतुर्थी, नवमी व चतुर्दशी या तिथी आणि पौर्णिमा व अमावास्या हीं पर्वें घेऊं नयेत. मंगळवार व शनिवार हे सोडावेत. वैधृति वगैरे योगरहित व ज्या लग्नीं केन्द्र चांगले असेल ती वेळ योग्य होय.

अथपञ्चमषष्ठदिनयोर्जन्मदानांपूजनम् । रात्रेःप्रथमयामेपित्रादिःस्नात्वाचम्यदेशकालौसंकीर्त्य अस्याशिशोःसमातृकस्यायुरारोग्यप्राप्तिसकलारिष्टशान्तिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विघ्नेशस्य जन्मदानां जीवन्त्यपरनाम्न्याः षष्ठी-

देव्याः शस्त्रगर्भाभगवत्याश्च पूजनंकरिष्येइतिसंकल्प्यतण्डुलपुञ्जेषुविघ्नेशंजन्मदाश्चनाममन्त्रेणावाह्य आयाहिवरदेदेविमहाषष्ठीतिविश्रुते। शक्तिभिःसहबालंमेरक्षजागरवासरे १ इतिषष्ठीदेवीमावाह्य नाम्नाभगवतीमावाह्य नामभिः शक्तिस्त्वंसर्वदेवानांलोकानां हितकारिणी। मातर्बालमिमंरक्षमहाषष्ठिनमोस्तुते १ इति मन्त्रेणच षोडशोपचारैःसंपूज्यप्रार्थयेत् लम्बोदरमहाभागसर्वोपद्रवनाशन त्वत्प्रसादादविघ्नेशचिरंजीवतुबालकः १ जननीसर्वभूतानांबालानांच विशेषतः। नारायणीस्वरूपेण बालंमेरक्षसर्वदा २ प्रेतभूतपिशाचेभ्योशाकिनीडाकिनीषुच मातेवरक्षबालंमेश्वापदे पन्नगेषुच ३ गौरीपुत्रोयथास्कन्दः शिशुत्वेरक्षितःपुरा। तथाममाप्ययंबालःषष्ठिकेरक्ष्यतां नमः ४ इति विप्रेभ्यस्तांबूलदक्षिणादिदद्यात् रात्रौजागरणंकुर्यात् पञ्चमषष्ठदिनयोर्दानप्रतिग्रहयोर्नदोषः दशमदिनेबलिदानंस्वीयेभ्योन्नदानंचकार्यम् ॥

**पांचवी व सहावी यांचें पूजन**—पांचव्या व सहाव्या दिवशीं 'जन्मदा' नांवाच्या देवतांचें पूजन करावें तें पुढील प्रमाणें:—रात्रीच्या पहिल्या प्रहरीं पित्यादिकांनीं स्नान करून आचमन केल्यावर देशकालादिकांचा उच्चार करावा आणि 'अस्य शिशोः समातृकस्यायुरारोग्यप्राप्तिसकलारिष्टशान्तिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विघ्नेशस्य जन्मदानां जीवन्त्यपरनाम्न्याः षष्ठीदेव्याः शस्त्रगर्भाभगवत्याश्च पूजनं करिष्ये' असा संकल्प करून तांदुळाच्या राशीवर गणपति व जन्मदादेवी यांचें नाममंत्रानें आवाहन करावें तें असें:—'आयाहि वरदा देवि महाषष्ठीति विश्रुते। शक्तिभिः सह बालं मे रक्ष जागरवासरे ॥' भगवतीचें आवाहन नाममंत्रानें करावें आणि 'शक्तिस्त्वं सर्व देवानां लोकानां हितकारिणी। मातर्बालमिमं रक्ष महाषष्ठि नमोस्तु ते ॥' या मंत्रानें षोडशोपचारें पूजा करावी, आणि नंतर 'लम्बोदर महाभाग सर्वोपद्रवनाशन। त्वत्प्रसादाद्विघ्नेश चिरंजीवतु बालकः ॥ जननीसर्वभूतानां बालानां च विशेषतः। नारायणीस्वरूपेण बालं मे रक्ष सर्वदा ॥ प्रेतभूतपिशाचेभ्यो शाकिनीडाकिनीषु च। मातेव रक्ष बालं मे श्वापदे पन्नगेषु च ॥ गौरीपुत्रो यथा स्कन्दः शिशुत्वे रक्षितःपुरा। तथा ममाप्ययं बालः षष्ठिके रक्ष्यतां नमः ॥' अशी प्रार्थना करून ब्राह्मणांना दक्षिणादि द्यावींत. रात्रीं जागरण करावें. पांचवीच्या व सहावीच्या संबंधानें दान देण्याघेण्यांत दोष नाहीं. दहाव्या दिवशीं बलिदान करून, आप्तेष्टांना अन्नदान करावें.

अथाशौचेकर्तव्यनिर्णयः। सूतकेमृतकेकुर्यात्प्राणायाममन्त्रकम्। तथामार्जनमन्त्रांश्चमनसोच्चार्यमार्जयेत् १ गायत्रींसम्यगुच्चार्यसूर्यायार्ध्यंनिवेदयेत्। उपस्थानंनैवकार्यंमार्जनंतुकृताकृतम् २ सूर्यंध्यायन्नमस्कुर्यात् गायत्रीजपोनकार्यः अर्घ्यान्तामानसीसंध्येत्युक्तेः केचिन्मनसादशगायत्रीजपःकार्यइत्याहुः वैश्वदेवब्रह्मयज्ञादयःपञ्चमहायज्ञानकार्याः वेदाभ्यासोनकार्यः औपासनहोमपिण्डपितृयज्ञावसगोत्रेणकारयेत् केचिच्छ्रौतकर्मणि सद्यःशुद्ध्युक्तेरग्निहोत्रहोमःस्नात्वाचम्यस्वयंकार्यइत्याहुः अपरेतु सर्वस्याप्याशौचापवादस्यानन्य-

गतिकत्वात्सतिब्राह्मणेब्राह्मणद्वारैवकार्यः ब्राह्मणाभावे स्वयंकार्यइत्याहुः स्थालीपाकोनकार्यः आशौचान्तेकार्यः सर्वथालोपप्रसक्तौ स्थालीपाकापि ब्राह्मणद्वाराकार्यः अन्वाधानोत्तरंसूतकप्राप्तौब्राह्मणद्वाराश्रौतेष्टिस्थालीपाकौ होमादौत्यागः स्नात्वास्वयंकार्यः दर्शादिश्राद्धस्यलोपएव प्रतिसांवत्सरिकंश्राद्धमाशौचान्तेएकादशाहेकार्यम् तत्रासंभवेदर्शव्यतीपातादपर्वणि एवंपत्न्यामृतुमत्यामपिपिण्डयज्ञदर्शश्राद्धेकार्ये अन्वाधानोत्तरंरजोदोषेइष्टिस्थालीपाकौकार्यौ अन्यथाकालान्तरे दानप्रतिग्रहाध्ययनानिवर्ज्यानि आशौचेन्यस्यान्नंनाश्नीयात् पितृयज्ञस्थालीपाकश्रवणाकर्मादिसंस्थानांप्रथमारम्भोब्राह्मणद्वाराप्याशौचयोर्नभवति प्रथमारम्भोत्तरंश्रवणाकर्मादिकंविप्रद्वाराऽऽशौचेविपत्न्यार्तवेपिकार्यम् आग्रयणंतुन भवति अग्निसमारोपप्रत्यवरोहौआशौचेनभवतः तेनसमारोपोत्तरमाशौचेतैत्तिरीयाणांत्रिदिनंहोमलोपेबह्वृचादीनांद्वादशदिनंहोमलोपेग्निनाशादाशौचान्तेश्रौतस्मार्तयोः पुनराधानमेव समारोपप्रत्यवरोहयोरन्यकर्तृकत्वाभावात् अग्न्यनुगमेप्रायश्चित्तपूर्वकपुनरुत्पत्तिरन्यद्वाराभवति भोजनकालेआशौचप्राप्तौमुखस्थंग्रासंत्यक्त्वास्नायात् तद्ग्रासभक्षणेएकोपवासः सर्वान्नभक्षणे त्रिरात्रोपवासः सूतकेमृतकेचैवनदोषोराहुदर्शनइत्युक्तेग्रहणेस्नात्वाश्राद्धदानजपादिकमाशौचेपि कार्यम् एवंसंक्रान्तिस्नानदानादिकमपि संकटेनान्दीश्राद्धोत्तरंमौञ्जीविवाहयोर्नाशौचम् संकटेमधुपर्कोत्तरमृत्विजांनाशौचम् यजमानस्यदीक्षणीयोत्तरं प्रागवभृथान्नाशौचम् अवभृथमाशौचोत्तरंकार्यम् व्रतेषुनाशौचमित्युक्तेरनन्तव्रतादिकमन्यैःकारयेत् प्रारब्धान्नसत्रस्यान्नदानादिषुनाशौचम् पूर्वसंकल्पितान्नेषुनदोषःपरिकीर्तितः । उदकदुग्धदधिघृतफलमूलभर्जिताद्यन्नानांसूतकिगृहस्थितानांस्वयंग्रहणेदोषाभावःसूतकिहस्तात्तुनग्राह्यम् केचित्तण्डुलादिकमपक्वमन्नंग्राह्यमाहुःइतिसंक्षेपेणनिर्णयोविशेषस्तुवक्ष्यते ॥

**अशौचांतील कर्तव्यनिर्णय**—सुतकांत अमन्त्रक प्राणायाम करावा व मार्जनाचे मंत्र मनांत म्हणून मार्जन करावें आणि गायत्रीचा सम्यक् ( यथातथ ) उच्चार करून सूर्याला अर्घ्य द्यावें. उपस्थान करूं नये. मार्जनसुद्धां कृताकृत ( करणें किंवा न करणें ) आहे. सूर्याचें ध्यान करून, त्याला नमस्कार करावा. गायत्रीजप करूं नये. 'अर्घ्यापर्यंतच मनांत सन्ध्या करावी' असें वचन आहे, म्हणून मनांतल्या मनांतच दहा गायत्रीजप करावा असें कोणी म्हणतात. वैश्वदेव, ब्रह्मयज्ञ वगैरे पंचमहायज्ञ करूं नयेत व वेदाभ्यासहि करूं नये. औपासन ( गृह्याग्नि किंवा वैश्वदेव वगैरे ), होम व पिण्डपितृयज्ञ—हीं सगोत्राखेरीज इतरांकडून करवावींत. 'श्रौतकर्मासंबंधानें तेवढ्यापुरती शुद्धि असते' असें वचन असल्यानें अग्निहोत्र, होम, स्नान व आचमन करून तें कर्म स्वतःच करावें असेंही कोणी सांगतात. 'सर्व कर्मांना अशौच हा नियमानेंच अपवाद असल्यानें ब्राह्मणानें आपलीं कर्में दुसऱ्या ब्राह्मणाकडून करवावींत. ब्राह्मण न मिळाल्यास स्वतःच करावींत' असेंही दुसरे सांगतात. स्थालीपाक अशौच संपल्यावर करावा, अशौचांत करूं नये.

त्याचा जर सर्वस्वीं लोप होत असेल, तर तो ब्राह्मणांकडून करवावा. प्रतिवार्षिक श्राद्ध अशौच ( दहाव्या दिवशीं ) संपल्यावर अकराव्या दिवशीं करावें, व तसें करणें अशक्य असल्यास व्यतिपातादि पर्वदिवशीं तें करावें. पत्नीच्या विटाळशीपणांतही याप्रमाणेंच पिण्डयज्ञ व दर्शश्राद्ध हीं करावींत. रजोदर्शन जर अन्वाधानानंतर होईल, तर इष्टि व स्थालीपाक हीं करावींत व ( रजोदर्शन जर ) पूर्वी होईल तर कालान्तरानें करावींत. दान देणें घेणें व अध्ययन हीं करूं नयेत. अशौचांत दुसऱ्याचें अन्न भक्षण करूं नये. पितृयज्ञ, स्थालीपाक, श्रवणाकर्म वगैरे संस्थांचा प्रथमारंभ—दोन्ही प्रकारच्या ( सोयर व सुतक ) अशौचांत ब्राह्मणाकडूनसुद्धां होणें अशास्त्र आहे. प्रथमारंभानंतरचें श्रवणाकर्म अशौचांत किंवा बायको विटाळशी असतां ब्राह्मणाकडून करवावें. आग्रयण करवूं नये. अग्नीचा समारोप म्हणजे समिध शेंकून वर अग्नि घेण्याचें कर्म आणि प्रत्यवरोहण म्हणजे शेंकून ठेविलेली समिधा अग्नींत टाकण्याचें कर्म—हीं अशौचांत होत नाहींत. यावरूनच—समारोपानंतर जर अशौच आलें तर तैत्तिरियांचा तीन दिवस होमलोप झाल्यास अग्निनाश होतो; यास्तव अशौच गेल्यानंतर दोघांनींही श्रौताग्नि व स्मार्ताग्नि यांचें पुन्हा आधान (स्थापन) करावें. कारण, अग्नीचा समारोप व प्रत्यवरोहण—हीं कृत्यें दुसऱ्याकडून करवितां येत नाहींत. अग्नि विच्छिन्न झाल्यास प्रायश्चित्त घेऊन, तो दुसऱ्याकडून पुन्हां उत्पन्न करवावा. जेवीत असतां जर अशौच समजलें, तर तोंडातला घांस टाकून स्नान करावें. तो घांस खाण्यांत आल्यास एक दिवस उपास करावा. पात्रांतलें सर्व अन्न भक्षण केल्यास तीन दिवस उपास करावा. सुतक व सोयर यांचा राहुदर्शनांत दोष नसल्याचें वचन आहे; म्हणून ग्रहणांत स्नान करून, श्राद्ध, दान, जप वगैरे कर्मे अशौचांतही करावींत. याप्रमाणेंच संक्रान्तिकालाचाही स्नानदानादिकांबद्दलचा निर्णय समजावा. संकट असतां, नान्दी श्राद्ध केल्यानंतर मुंज व लग्न यांच्यासंबंधानें सोयराचा विटाळ नाहीं. संकटकाळीं मधुपर्क पूजेनन्तर ऋत्विजांना अशौच नाहीं. दीक्षा घेतल्यानंतर अवभृथस्नान होईपर्यंत यजमानाला अशौच नाहीं. अशौच संपल्यानंतर अवभृथस्नान करावें. व्रतादिकांच्या बाबतींत अशौच नाहीं, म्हणून अनन्तादिक व्रतें दुसऱ्याकडून करवावींत. आरंभ केलेल्या अन्नसत्रादिकांत अन्नदान करण्यास अशौचाचा दोष नाहीं व पूर्वी संकल्प केलेल्या अन्नाबद्दलही दोष नाहीं. पाणी, दूध, दहीं, तूप, फळें, मीठ, मुळें, भाजलेलें अन्न वगैरे जे पदार्थ घरांत असतील ते घेण्यांत दोष नाहीं. मात्र ते पदार्थ सुतक्याच्या हातून घेऊं नयेत. तांदुळादि अपक्व अन्न सुतक्याच्या हातून घ्यावें, असें कोणी म्हणतात. याप्रमाणें येथें थोडक्यांत निर्णय सांगितला. पुढें विस्तारानें सांगण्यांत येईल.

अथसूतिकाशुद्धिः। दशाहान्तेसूतिकायाअस्पृश्यत्वनिवृत्तिर्नामकमजातकर्मादिप्राप्तकर्माधिकारश्च जातेष्टिविवाहोपनयनादिकर्मसुतपुत्रप्रसूनां विंशतिरात्रान्तेऽधिकारः कन्याप्रसूनांमासान्तेऽधिकारः॥

**सूतिकाशुद्धि**—दहा दिवसांनीं बाळंतिणीचा विटाळ जाऊन ती शुद्ध होते. नामकरण, जातकर्म वगैरे कर्मांबद्दल तिला मग अधिकार येतो. जातेष्टि, लग्न, मुंज वगैरे संबंधाचा अधिकार पुत्रवानांना वीस दिवसांनीं व कन्या असणाऱ्यांना एक महिन्यानें प्राप्त होतो.

अथजन्मनिदुष्टकालास्तच्छान्तयश्चनिर्णीयन्ते तत्रादौगोप्रसवः यत्रजन्मकालेपितुर्मातुःसुतस्यचारिष्टमुक्तं तत्रगोप्रसवशान्तिस्तत्तन्नक्षत्रादिशान्तिश्चकार्या धनाद्यरिष्टेषुनकार्या मूलाश्लेषाज्येष्ठामघानक्षत्रेषुजननेचतुर्थपादादिषु पित्राद्यरिष्टाभावेपिगोप्रसवः अश्विनीरेवतीपुष्याचित्रासुनक्षत्रशान्त्यभावेपिगोप्रसवशान्तिरेवकार्या तत्र अस्यशिशोरमुकदुष्टकालोत्पत्तिसूचितारिष्टनिवृत्त्यर्थंगोमुखप्रसवशांतिंकरिष्येइतिसंकल्प्य गणेशपूजनमात्रंकृत्वाअङ्गादङ्गादितिमन्त्रेणशिशुमूर्धावघ्राणान्तेप्रयोगमध्यएवपुण्याहवाचनमिति कौस्तुभमयूखौ पुण्याहवाचनंशाखोक्तंकृत्वामूर्धावघ्राणान्तेअस्यगोमुखप्रसवस्यपुण्याहंभवन्तोब्रुवन्त्वित्येकवाक्यमेवत्रिर्वदेत् ऋत्विजश्चप्रतिब्रूयुर्नतुशाखोक्तमितिकमलाकरः नान्दीश्राद्धंनकार्यम् अग्निप्रतिष्ठान्तेर्कास्मिश्चित्पीठेनवग्रहानूअधिदेवतादिरहितानूप्रतिष्ठाप्यान्वाधानंकुर्यात् आज्यभागान्ते अपःआपोहिष्ठेतितृचेनअप्सुमेसोमइतिगायत्र्याऋचाचमिलितदधिमध्वाज्येनप्रत्यृचमष्टाष्टसंख्याहुतिभिर्विष्णुंतद्विष्णोरित्यृचामिलितदधिमध्वाज्येनाष्टाहुतिभिः यक्ष्महणंअक्षीभ्यामितिसूक्तेनप्रत्यृचमष्टाष्टमिलितदधिमध्वाज्याहुतिभिर्नवग्रहान्दधिमध्वाज्येनाष्टाष्टसंख्याहुतिभिःशेषेणेत्यादिमयूखादयः कमलाकरस्तुदधिमध्वाज्येनापश्चतुर्वारंविष्णुसकृत्यक्ष्महणमक्षीभ्यामितिसूक्तेनप्रत्यृचमष्टाष्टसंख्याहुतिभिर्नवग्रहानेकैकयाहुत्याशेषेणस्विष्टकृतमित्याह आज्यभागहोमान्तएकस्मिन्कुम्भेविष्णुवरुणौप्रतिमयोः संपूज्यौ प्रतिमासुविष्णुवरुणयक्ष्महणः पूज्या इतिमयूखे ततोयथान्वाधानहोमइतिसंक्षेपः अवशिष्टःप्रयोगःशान्तिग्रन्थेषु एवमग्रेपिदेवताद्रव्याहुतिसंख्यानिमित्तफलमात्रंलिख्यते विस्तरोन्यत्रज्ञेयः ॥

**जन्मसमयींच्या दुष्टकालशान्तीचा निर्णय**——येथें आतां प्रथम गोप्रसवशान्ति सांगतो. बाळबाळंतिणींना (ज्योतिष्यानें) जें अरिष्ट सांगितलें असेल त्याबद्दल गोप्रसवशान्ति आणि (अनिष्ट) नक्षत्राची शान्ति ( अशा दोन ) शान्त्या कराव्या. धननाशादि अरिष्ट असल्यास शान्ति करण्याचें कारण नाहीं. मूळ, आश्लेषा, ज्येष्ठा व मघा—या नक्षत्रांवर जन्म झाला असल्यास चौथ्या पादीं जरी पित्याला अनिष्ट नसतें तरी गोप्रसवशान्ति करावी. अश्विनी, रेवती, पुष्य व चित्रा या नक्षत्रांवर जन्म झाला असतां जरी नक्षत्रशान्ति करण्याचें कारण नाहीं, तरी गोप्रसवशान्ति करावी. त्यासंबंधानें, 'अस्य शिशोः अमुकदुष्टकालोत्पत्तिसूचितारिष्टनिवृत्त्यर्थं गोमुखप्रसवशान्तिं करिष्ये' असा संकल्प करून गणेशपूजन केल्यावर, 'अङ्गादङ्गाद्०' या मंत्रानें बालकाची टाळु हुंगावी. प्रयोगांतच पुण्याहवाचन करण्यास कौस्तुभ आणि मयूख या ग्रंथांत सांगितलें आहे.

त्यांच्या त्यांच्या शाखांत सांगितल्याप्रमाणें पुण्याहवाचन करून बालकाच्या टाळूवें अवघ्राण ( हुंगणें ) केल्यानंतर, 'अस्य गोमुखप्रसवस्य पुण्याहं भवन्तो ब्रुवन्तु' हें एकच वाक्य तीन वेळां उच्चारावें. ऋत्विजांनीं (होमहवनादि कर्मे करणारे ब्राह्मण) प्रतिवचन द्यावें. शाखेला सांगितलेलें पुण्याहवाचन न करण्याबद्दल कमलाकरांत सांगितलें आहे. नान्दीश्राद्ध करूं नये. अग्नीची स्थापना केल्यावर, एका पीठावर (जागेवर) अधिदेवतांवाचून फक्त नवग्रहांची मांडणी करून अन्वाधान करावें. आज्य-भागापर्यंतचें कर्म संपल्यावर, 'आपोहिष्ठा०' या तीन ऋचांनीं आप ( पाणी ) देवतांचा 'अप्सु मे सोमो०' या गायत्रीनें व ऋचेनें–दहीं, मध व तूप–यांचें मिश्रण करून, प्रत्येक ऋचेच्या आठ आहुती याप्रमाणें होम करावा. 'तद्विष्णो०' या ऋचेनें दहीं,मध व तूप यांचें मिश्रण करून,त्याच्या आठ आहुतींनीं विष्णुदेवतेचा होम करावा 'अक्षिभ्यां०' या सूक्तानें दहीं, मध व तूप यांचें मिश्रण करून, प्रत्येक ऋचेच्या आठ आहुतींनीं यक्ष्महादेवतेचा होम करावा. दहीं, मध व तूप यांच्या आठ आठ आहुतींनीं नवग्रहांचें हवन करावें, व बाकी राहिलेल्या मिश्रणाचा स्विष्टकृत् होम करावा, असें मयूखांत सांगितलें आहे. कमलाकरांत–दहीं, मध व तूप यांच्या मिश्र-णानें चार वेळा आपदेवतांचा, एकदां विष्णूचा, 'अक्षीभ्याम्०' या सूक्तानें प्रत्येक ऋचेच्या आठ आठ आहुतींनीं यक्ष्महादेवतेचा, एकेक आहुतीनें नवग्रहांचा व शेषमिश्रणानें स्विष्टकृत–असे होम करण्यास सांगितलें आहे. तुपाचा होम झाल्या-नंतर एका कुंभांत विष्णु आणि वरुण यांच्या प्रतिमांची पूजा करावी. विष्णु, वरुण व यक्ष्महा या तीन देवतांची पूजा करावी, असें मयूखांत म्हटलें आहे. त्यानंतर अन्वाधानाला अनुसरून होम करावा. असा हा याचा थोडक्यांत विस्तार समजावा. बाकीचा प्रयोग शान्तिसंबंधाच्या ग्रंथांत पहावा. याप्रमाणेंच पुढें सुद्धां–दवता, द्रव्य, आहुतिसंख्या, निमित्त व फल–हीं मात्र लिहिलीं आहेत. त्याचा विस्तार इतर ग्रंथांत पाहावा.

अथकृष्णचतुर्दशीजननशान्तिः कृष्णपक्षेचतुर्दश्यांप्रसूतेः षड्विधंफलम् । चतुर्दशींच षड्भागांकुर्यादादौशुभंस्मृतम् १ द्वितीयेपितरंहन्तितृतीये मात-रंतथा चतुर्थेमातुलंहान्तपञ्चमे वंशनाशनम् २ षष्ठेतुधनहानिः स्यादात्मनो-वंशनाशनम् । तत्रचतुर्दश्याःषडंशानांमध्येद्वितीयतृतीयषष्ठांशेषुजननेगोमुख-प्रसवपूर्वकंचतुर्दशीशान्तिः अन्यभागेकेवलचतुर्दशीशान्तिः अस्य शिशोः कृष्णचतुर्दश्यामुकांशजननसूचितसर्वारिष्टनिरासद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थ-मित्यादिसंकल्पः आग्नेयादिचतुर्दिक्षुचत्वारः कुम्भामध्येशताच्छिद्रकुम्भेप्र-तिमायांरुद्रावाहनम् मयूखेतुपीठाद्रौरुद्रप्रतिमांसंपूज्यतत्प्राच्यामुदीच्यां वाश-ताच्छिद्रादिपञ्चमकलशस्थापनपूजनम् अन्वाधानेग्रहानष्टाष्टसंख्यसमिदाज्यच-रुभिरधिदेवतादीनूएकैकसंख्यसमिच्चर्वाज्याहुतिभिः रुद्रं अश्वत्थप्लक्षपलाश-खदिरसमिद्भिश्चर्वाहुतिभिराज्याहुतिभिर्माषैस्तिलैः सर्षपैश्चप्रतिद्रव्यमष्टोत्तरश-ताष्टाविंशत्यन्यतरसंख्यया त्र्यम्बकमितिमन्त्रेण अग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचति-

लाहुतिभिरमुकसंख्याभिःसकृद्वाव्यस्तसमस्तव्याहृतिभिः यद्वाप्रजापतिमेव-समस्तव्याहृतिभिस्तिलैः शेषेणेत्यादि ॥

**कृष्णचतुर्दशीजननशान्ति**—कृष्णपक्षांतल्या चतुर्दशीला जन्म झाला असल्यास त्याचें सहा प्रकारचें जें फळ आहे तें असें:—

चतुर्दशीचे सहा भाग करावेत. पहिल्या भागांत जन्म झाला असल्यास शुभ; दुसऱ्यांत पितृनाश; तिसऱ्यांत मातृनाश, चौथ्यांत मातुलनाश; पांचव्यांत वंशनाश; आणि सहाव्यांत धनहानि व वंशनाश. या चतुर्दशींच्या दुसऱ्या, तिसऱ्या व सहाव्या भागांत जन्म झाल्यास गोमुखप्रसवशान्ति करून चतुर्दशीशान्ति करावी. इतर भागांतल्या जन्माबद्दल फक्त चतुर्दशीशान्ति करावी. या शान्तीबद्दल, 'अस्य शिशोः कृष्णचतुदर्श्याः अमुकांशजननसूचित सर्वारिष्टनिरासद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं' असा संकल्प करावा. अग्नेयादि चार ( कोन ) दिशांना चार कुंभांची स्थापना करून, मध्यें शंभर भोंकाच्या कुंभावर रुद्रदेवतेची प्रतिमा ठेवावी व आवाहन करावें आणि पीठादिकांच्या ठिकाणीं रुद्रदेवतेची पूजा करावी, व त्याच्या पूर्व अगर उत्तर दिशेला शंभर भोंकांचे पांच कलश मांडून पूजा करावी असें मयूखांत म्हटलें आहे. 'ग्रहानष्टाष्टसंख्यसमिदाज्यचरुभिराधिदेवतादीन् एकैकसंख्यसमिच्चर्वाज्याहुतिभिः रुद्रं अश्वत्थप्लक्षपलाशखादिरसमिद्भिश्चर्वाहुतिभिराज्याहुतिभिर्माषैस्तिलैः सर्षपैश्च प्रतिद्रव्यमष्टोत्तरशताष्टाविंशत्यन्यतरसंख्यया त्र्यम्बकमिति मंत्रेण अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं च तिलाहुतिभिरमुकसंख्याभिः सकृद्वाव्यस्तसमस्तव्याहृतिभिः यद्वा प्रजापतिमेव समस्तव्याहृतिभिस्तिलैः शेषेण स्विष्टकृतम्' वगैरे अन्वाधान करावें.

अथसिनीवालीकुहूजननशान्तिः तत्रामावास्यायाःप्रथमोयामःसिनीवाली अन्त्योपान्त्ययामौकुहूः मध्यवर्तिपश्चयामादर्शइतिकेचित् अपरेतुचतुर्दशीमात्रयुतेऽहोरात्रेवर्तमाना अमावास्यासिनीवाली प्रतिपन्मात्रयुतेऽहोरात्रेवर्तमानाकुहूः तेनामाया वासरत्रयस्पर्शित्वलक्षणदिनवृद्ध्यभावेसूर्योदयस्पर्शत्वाभावलक्षणक्षयाभावेचदर्शोनास्त्येव उदयात्पूर्वाहोरात्रेवर्तमानायाः सिनीवालीत्वात् उदयोत्तरंवर्तमानायाःकुहूत्वात् दिनक्षयेसर्वाप्यमादर्शसंज्ञा नतत्रसिनीवालीकुहूभागौ केवलचतुर्दशीकेवलप्रतिपद्युक्तत्वाभावात् एवंदिनवृद्धौत्रिदिनस्पर्शमध्यदिनस्थाषष्टिनाडीमितामावास्यादर्शसंज्ञा चतुर्दश्यादियोगाभावात् पूर्वोत्तरदिनस्थौभागौसिनीवालीकुहूसंज्ञावित्याहुःइदंमयूखेस्पष्टम् सिनीवाल्यांप्रसूतास्याद्यस्यभार्यापशुस्तथा ।गजाश्वामहिषंचैवशक्रस्यापिश्रियंहरेत् १ गोपक्षिमृगदासीनांप्रसूतिरपिवित्तहृत् । कुहूप्रसूतिरत्यर्थं सर्वदोषकरीस्मृता २ यस्यप्रसूतिरेतेषांतस्यायुर्धननाशनम् । शान्त्यभावेहतित्यागमत्रजातोनसंशयः ३ अत्यागेनाशयेत्किंचित्स्वयंवानाशमाप्नुयात् । सिनीवालीजननसूचितेत्यादिःकुहूजननसूचितारिष्टनाशेत्यादिश्चसंकल्पःकुहूजननेगोप्रसवोपीतिकेचित् अत्रोभयत्रापिचतुर्दशीशान्तिवच्छतच्छिद्रकलशसहिताः पञ्चकलशाः मध्येरुद्रःप्रधानदेवता इन्द्रः पितरश्चपार्श्वदेवते इति प्रतिमात्रयम्

इन्द्रस्यपितॄणांचप्रधानरुद्रन्यूनसंख्ययाप्रधानोक्तसर्वद्रव्यैर्होमः अवशिष्टान्वाधानदेवतोहश्चतुर्दशीशान्तिवत् प्रधानदेवतापूजोत्तरंगोवस्त्रस्वर्णदानानिकृत्वा गोभूतिलहिरण्याज्यवासोधान्यंगुडानिच । रौप्यंलवणमित्येतद्दशदानानिदापयेत् १ क्षीराज्यगुडदानंचकृत्वाहोमंसमारभेत् । एतानिदानानिऋत्विग्भ्योदेयानि तेनान्तेपृथक्दक्षिणादानंनकार्यम् अतएवात्रगवादेर्दक्षिणारूपत्वात्सदक्षिणंदानं नभवति अन्यत्रदशदानादीनांसदक्षिणं दानंकार्यम् अथैतेषांमानम् भुवोमानं गोचर्म सप्तहस्तोदण्डः त्रिंशद्दण्डावर्त्तनम् दशवर्त्तनानिगोचर्म तिलानांद्रोणः सुवर्णरजतयोर्दशमाषतदर्धंतदर्धान्यतमम् आज्यस्य चत्वारिंशत्पलानि वाससस्त्रिहस्तत्वम् धान्यस्यपञ्च द्रोणाः एवंगुडलवणयोः एतावत्प्रमाणाशक्तौ नित्यनैमित्तिके यथाशक्ति देयानि यथाशक्ति हिरण्यंवा तत्तत्प्रतिनिधित्वेन हिरण्यगर्भेनिमन्त्रेणदेयम् नैमित्तिकादेरकरणेप्रत्यवायात् अभ्युदयादिफलार्थेतु दशदानानिशक्तिविनानकार्याणीतिभाति होमांते बलिदानाभिषेकादि । इतिसिनीवालीकुहूशान्तिः

**सिनीवाली व कुहू यांवरील जननशान्ति**—अमावास्या तिथीचा पहिला प्रहर तो सिनीवाली व शेवटचे दोन प्रहर ते कुहू. त्यांच्या मधल्या पांच प्रहरांचा तो दर्श अशीं नांवें समजावींत असें कांहीं ग्रंथकारांचें मत आहे. दुसऱ्या ग्रंथकारांच्या मतें—चतुर्दशीनें युक्त अशा अहोरात्रांत आलेली जी अमावास्या ती सिनीवाली आणि प्रतिपदा तिथीनें युक्त अशा अहोरात्रांत आलेली ती कुहू—असें आहे. या मतानें तीन दिवसांना स्पर्श करणाऱ्या अमावास्येची जर दिनवृद्धि नसेल तर आणि सूर्योदयाला स्पर्श करणारा जर दिनक्षय नसेल तर दर्श नाहीं; कारण, सूर्योदयापूर्वीच्या अहोरात्रांत येणारी जी अमावास्या ती सिनीवाली व सूर्योदयानंतर जी येणारी ती कुहू. दिनक्षय असल्यास सर्व अमावास्या दर्श असल्यानें तेथें सिनीवाली व कुहू हे भाग ( पडत ) नाहींत; कारण, त्या दिवशीं केवळ चतुर्दशी व निवळ प्रतिपदा यांचा योग नाहीं. याप्रमाणेंच जर दिनवृद्धि असेल तर तीन दिवसांच्या स्पर्शांपैकीं मधल्या दिवशीं आठ घटकांनीं परिमित अशी जी अमावास्या असते ती दर्श होय, कारण त्या दिवशीं चतुर्दशी व प्रतिपदा यांचा योग नाहीं. दिनवृद्धीच्या आधींच्या दिवसांतला भाग व पुढच्या दिवसांतला भाग हे अनुक्रमें सिनीवाली व कुहू होत. याची सर्व माहिती मयूखांत स्पष्टपणें सांगितलेली आहे. ज्याची बायको, पशु, हत्तीण, घोडी व म्हैस—हीं सिनीवालींत प्रसूत होतील, तो जरी इन्द्र असला तरी त्याच्या संपत्तीचा नाश होतो. गाय, पक्षी, मृग व दासी यांच्या प्रसूतीनेंही वित्तनाश होतो. कुहूतिथींत जर प्रसूति होईल तर, त्याचा फार मोठा दोष आहे. ज्याच्या घरीं घरच्यापैकीं कोणाचीही प्रसूति होते, त्याचें आयुष्य व धन यांचा नाश होतो. शान्ति न केल्यास जन्म झालेल्याचा त्याग करावा यांत संशय नाहीं. त्याग न केल्यानें कांहींना कांहीं तरी नाश होणार अथवा स्वतःचा ( मालकाचा ) तरी नाश होणार.

'सिनीवालीजननसूचितारिष्टनाशे०' अथवा 'कुहूजननसूचितारिष्टनाशे०' असा शान्तीचा संकल्प करावा. कुहू तिथींत जन्म झाल्यास कुहूशान्ति करून, आणखी गोप्रसवशान्ति करावी असेंहि कांहीं ग्रंथकार म्हणतात. या दोन्ही शान्त्यांत चतुर्दशीच्या शान्तीप्रमाणें शंभर भोंकांचा एक व इतर पांच असे ( सहा ) कलश घ्यावे. मध्यें रुद्र ही मुख्य देवता स्थापावी. इन्द्र व पितर या पार्श्वदेवता होत. यांच्या तीन प्रतिमा कराव्या. त्या तिन्ही देवतांचा सर्व द्रव्यांनीं होम करावा. मुख्य देवतेच्या होमसंख्येहून पार्श्वदेवतांची होमसंख्या कमी असावी. बाकीच्या अन्वाधानांत देवतांचा ऊह ( प्रयोग ) चतुर्दशीशान्तीप्रमाणेंच करावा. प्रधानदेवतेची पूजा झाल्यानंतर—गाय, वस्त्र व सुवर्ण यांचीं दानें करून—गाय, भूमि, तिळ, सुवर्ण, घृत, वस्त्र, धान्य, गूळ, रुपें व मीठ अशीं दहा दानें द्यावींत. दूध, घृत व गूळ यांचीं दानें देऊन होमाला प्रारंभ करावा. हीं दानें ऋत्विजांना द्यावींत. शेवटीं निराळी दक्षिणा देऊं नये. या प्रयोगांत गाय वगैरे सर्व दानें दक्षिणारूपच असल्यानें, निराळी दक्षिणा देण्याचें कारण नाहीं. इतर ठिकाणचीं जीं दहा दानें तीं दक्षिणारूप नसल्यानें दक्षिणायुक्त करावींत. या दानांचें प्रमाणः—भूमीचें प्रमाण गोचर्म. सात हात म्हणजे एक दण्ड; तीन दण्ड म्हणजे एक वर्तन व दहा वर्तनें म्हणजे एक गोचर्म. तिळांचें प्रमाण द्रोण. सोनें व रुपें यांचें प्रमाण—दहा मासे, पांच मासे अथवा अडीच मासे. घृताचें प्रमाण ४० पलें. वस्त्र तीन हात. धान्य पांच द्रोण. गूळ व मीठ यांचें हेंच ( धान्याचें ) प्रमाण. इतक्या प्रमाणांचीं दानें देण्याचें सामर्थ्य नसल्यास नित्य व नैमित्तिक कर्मांच्या वेळीं यथाशक्ति दानें द्यावींत, किंवा त्या त्या दानांबद्दल सुवर्णाचें दान 'हिरण्यगर्भ०' या मंत्रानें द्यावें. नैमित्तिकादि न केल्यास दोष आहे. अभ्युदयरूपी फळ मिळण्यासाठीं जीं दहा दानें करायचीं तीं, सामर्थ्य नसल्यास करूं नयेत असें मला वाटतें. होमाच्या शेवटीं बलिदान, अभिषेक वगैरे करावींत. याप्रमाणें सिनीवाली व कुहू यांच्या शान्तीसंबंधाचा निर्णय येथें संपला.

अथदर्शशान्तिः । अथातोदर्शजातानांमातापित्रोर्दरिद्रता । तद्दोषपरिहारार्थंशांतिं वक्ष्यामितेसदा १ अस्य० दर्शजननसूचितारिष्टनिरासार्थं शान्तिंकरिष्येइतिसंकल्पः स्थण्डिलात्पूर्वदेशेकलशं प्रतिष्ठाप्यकलशाग्न्योर्मध्ये सर्वतोभद्रपीठेब्रह्मादिमण्डलदेवताआवाह्यतन्मध्येस्वर्णप्रतिमायांयेचेहेतिन्मत्रेणपितृनावाहयेत् तद्दक्षिणेरजतप्रतिमायामाप्यायस्वेतिसोममुत्तरतस्ताम्रप्रतिमायांसवितापश्चातादितिसूर्यं चावाह्यसंपूज्याग्निंप्रतिष्ठाप्यसर्वतोभद्रैशान्यां गृहस्थापनादि अन्वाधानेआदित्यादिग्रहान् अमुकसंख्याभिःसामिच्चर्वाज्याहुतिभिः पितृनूअष्टाविंशातसंख्याकाभिःसमिच्चरुभ्यां सोमंसूर्यंच प्रत्येकमष्टोत्तरशतसंख्यसमिच्चर्वाहुतिभिः शेषेणास्विष्टकृतमित्यादि अत्रस्विष्टकृतःपूर्वं मातापितृशिशूनां कलशोदकेनाभिषेकस्ततःस्विष्टकृद्बलिदानादीतिविशेषः इतिदर्शशान्तिः ॥

**दर्शशान्ति**—दर्शात ज्याचा जन्म होतो त्याच्या आईबापांना दारिद्य येतें; यास्तव त्या दोषाच्या परिहारासाठी शान्ति सांगतों. 'अस्य० दर्शजननसूचितारिष्टनिरासार्थं शान्तिं करिष्ये' असा संकल्प केल्यावर, स्थंडिलाच्या पूर्वेकडे कलश मांडावा व कलश आणि अग्नि यांच्यामध्यें सर्वतोभद्रपीठावर ब्रह्मादि मंडलदेवतांचें आवाहन करावें. त्याच्या मध्यभागीं 'येचेह०' या मंत्रानें सोन्याच्या प्रतिमेंत पितरांचें आवाहन करावें. त्यांच्या दक्षिणेस रुप्याच्या प्रतिमेंत 'आप्यायस्व०' या मंत्रानें सोमाचें आवाहन करावें. उत्तरेस तांब्याच्या प्रतिमेंत 'सविता पश्चात्तात्०' या मंत्रानें सूर्याचें आवाहन करावें. नंतर त्यांची पूजा करून अग्नीची स्थापना करावी. आणि सर्वतोभद्रमंडलाच्या ईशान्येस ग्रहांची स्थापना करावी. 'आदित्यादिग्रहान् अमुकसंख्याभिः समित्यवाज्याहुतिभिः पितॄनष्टाविंशतिसंख्याभिः समिच्चरुभ्यां सोमं सूर्यं च प्रत्येकमष्टयोरशतसंख्यसमिच्चर्वाहुतिभिः शेषेण स्विष्टकृतमित्यादि' असें अन्वाधान करावें. येथें स्विष्टकृताच्या आधीं माता, पिता व बालक—यांवर कलशांतल्या पाण्यानें अभिषेक करावा व नंतर स्विष्टकृत् होम, बलिदान वगैरे करावींत, असा याचा विशेष समजावा. याप्रमाणें दर्शशान्तीचा निर्णय आहे.

अथनक्षत्रशान्तिः तत्रमूलनक्षत्रफलम् पिताम्रियेतमूलाद्येपादेपुत्रजानिर्यदि। द्वितीयेजननीनाशोधननाशस्तृतीयके २ चतुर्थेकुलनाशोतःशान्तिःकार्याप्रयत्नतः॥ क्वचिच्चतुर्थचरण शुभउक्तोमनीषिभिः ३ एवंचदुहितुर्ज्ञेयंमूलजातफलंबुधैः॥ केचित्तुनकन्याहन्तिमूलर्क्षेपितरंमातरंतथा मूलजाश्वशुरंहन्तिश्वश्रूमाश्लेषजासुता १ ज्येष्ठायांतुपतिज्येष्ठंविशाखोत्थातुदेवरम्। शान्तर्वापुष्कलास्याच्चेत्तर्हिदोषोनाविद्यते २ इत्याहुः अभुक्तमूलसंभवंपरित्यजेत्तुबालकं समाष्टकंपिताथवानतन्मुखंविलोकयेत्; ज्येष्ठान्तेघटिकाचैकामूलादौघटिकाद्वयम् । अभुक्तमूलमथवासंधिनाडीचतुष्टयम् १ वृषालिसिंहेषुघटेचमूलंदिविस्थितंयुग्मतुलाङ्गनान्त्ये। पातालगंमेषधनुःकुलीरनक्रेषुमर्त्येष्वितिसंस्मरन्ति २ एतल्लग्नफलम्। स्वर्गेमूलेभवेद्राज्यं पातालेचधनागमः मृत्युलोकेयदामूलंतदाशून्यंसमादिशेत् १ नवमासंसार्पदोषोमूलदोषोऽष्टवर्षकम्। ज्येष्ठोमासान्पञ्चदशतावद्दर्शनवर्जनम् २ व्यतीपातेङ्गहानिःस्यात्परिघेमृत्युमादिशेत्। वैधृतौपतृहानिः स्यान्नष्टेन्दावन्धतां व्रजेत् ३ मूलेसमूलनाशःस्यात्कुलनाशोधृतौभवेत्। विकृताङ्गश्चहीनश्चसंध्ययोरुभयोरपि ४ तद्वत्सदन्तजातस्तुपादजातस्तथैवच। तस्माच्छांतिंप्रकुर्वीतग्रहाणांक्रूरचेतसाम् ५ व्यतीपातादौग्रहमखसंहितात्तच्छान्तिरवश्यं कार्या इतरशांतिषुग्रहमखोनावश्यकइत्यर्थः मुख्यकालंप्रवक्ष्यामिशान्तिहोमस्ययत्नतः। जातस्यद्वादशाहेतुजन्मर्क्षेवाशुभेदिने १ जननाद्वादशाहेशान्तिकरणेशान्त्युक्तनक्षत्राहुतिबाह्निचक्रावलोकनादिकंनावश्यकम् कालान्तरे आवश्यकम् एवमन्यशान्तिष्वपिज्ञेयम्।

**नक्षत्रशान्ति**—येथें प्रथम मूळ नक्षत्राचें फळ सांगतों. मूळनक्षत्राच्या पहिल्या चरणीं पुत्र झाला तर बाप मरतो; दुसऱ्या चरणीं झाल्यास आई

मरते; तिसऱ्या चरणीं धननाश होतो; आणि चौथ्या चरणी कुलनाश होतो; म्हणून शान्ति अवश्य करावी. चौथा चरण शुभ असल्याचें क्वचित् ग्रंथांत सांगितलें आहे. मूळ नक्षत्रावर मुलगी झाल्यास त्याचेंहि फळ असेंच असतें, असें ज्ञाते म्हणतात. मूळ नक्षत्रीं झालेली मुलगी आईबापांना मारक न होतां सासऱ्याला मारते. आश्लेषा नक्षत्रावर झालेली कन्या सासूला मारते. ज्येष्ठावरची ज्येष्ठ दिराला मारते. विशाखांतील धाकट्या दिराला मारते. पुष्कळ शान्ती केल्यानें दोष जातो, असें कांहीं ग्रंथकार सांगतात. अभुक्त मूळ नक्षत्रावर जन्मलेलें मूल आठ वर्षेंपर्यंत टाकावें, किंवा आठ वर्षें पित्यानें त्याचें तोंड पाहूं नये. ज्येष्ठा नक्षत्राची अखेरची एक घटका व मूळ नक्षत्राच्या सुरुवातीच्या दोन घटका यांचें नांव अभुक्त मूळ किंवा ज्येष्ठानक्षत्राच्या शेवटच्या दोन घटका व मूळ नक्षत्राच्या सुरुवातीच्या पहिल्या दोन घटका अशा ज्या चार घटका तें अभुक्त मूळ जाणावें. वृषभ, वृश्चिक, सिंह व कुंभ या लग्नीं मूळनक्षत्र स्वर्गलोकीं असतें. मिथुन, तूळ, कन्या व मीन या लग्नीं तें पाताळांत असतें. मेष, धनु, कर्क व मकर या लग्नीं मनुष्यलोकांत असतें. या लग्नांचें फळ येणेंप्रमाणेंः—स्वर्गस्थ लग्न असतां जर मूळ नक्षत्र असेल जर राज्यप्राप्ति, पातालस्थ असतां धनप्राप्ति आणि मनुष्यलोकीं असतां शून्य फळ. आश्लेषा नक्षत्राचा दोष नऊ महिने असतो, मूळनक्षत्राचा आठ वर्षें असतो व ज्येष्ठा नक्षत्राचा पंधरा महिने असतो; यास्तव तितका कालपर्यंत मुलाचें दर्शन वर्ज्य करावें. व्यतिपातांत जन्म झाल्यास अंगहानि, परिघावर स्वतःच्या मृत्यु व वैधृतीवर पितृहानि होतात. अमावास्येला जन्म झाल्यास अंधळेपणा, मूळावर समूळ नाश, धृतियोगावर कुलनाश, दोन संधिकालांत विकृताङ्ग व हीनांग असें होतें. याचप्रमाणें दांत असलेल्या अवस्थेंत मूल जन्मणें व पायाळू जन्माला येणें या गोष्टी अरिष्टकारक असल्यानें क्रूर ग्रहांची शान्ति करावी. व्यतिपात वगैरेवर जन्मलेल्यांकरितां त्या त्या अरिष्टांप्रीत्यर्थ ग्रहमखांसहित अवश्य शान्ति करावी. इतर शान्तींत ग्रहमख आवश्यक नाहीं. शान्तीच्या होमाचा काल येणेंप्रमाणेंः—जन्माच्या बाराव्या दिवशीं जन्मनक्षत्रीं, किंवा शुभ दिवशीं शान्ति करावी. जन्माच्या बाराव्या दिवशीं जर शान्ति करावयाची असेल, तर त्यासाठीं सांगितलेलीं नक्षत्रें, अग्निचक्र वगैरे पाहण्याची जरूरी नाहीं. इतर वेळीं शान्ति करणें असल्यास अवश्य पाहावींत. इतर शान्तीविषयींही हेंच जाणावें.

तद्यथा शुक्लादितस्तिथिः सैकावारयुक्ताब्धिशेषिता । खगुणेभुविवासोऽग्ने-र्द्व्येकयोः स्याद्धोदिवि ॥ १ ॥ भूमावग्निः शुभःहोमाहुतिः सूर्यभतस्त्रिभंत्रि-भंगण्यंमुहुस्तत्रचचन्द्रभावधि । सूर्यज्ञशुक्रार्कजचन्द्रभूमिजाजीवस्तमः केतुर-स्त्यसन्मुखे ॥ १ ॥ संस्कारनित्यकर्मसुनिमित्ताव्यवहितनैमित्तिकेषुरोगातुरेच-वह्निचक्रादिकंनापेक्षितम् ।

**अग्निचक्रपरीक्षण**—शुद्ध प्रतिपदेपासून चालू दिवसाच्या तिथीपर्यंत तिथि मोजून येणाऱ्या संख्येंत एक मिळवावा आणि रविवारपासून आरंभ करून चालू वारापर्यंतच्या संख्येंत वरील संख्या मिळवावी. त्या बेरजेला

चारांनीं भागून जी बाकी उरेल तीवरून अग्नि पहावा. शून्य किंवा तीन उरल्यास भूमीवर, दोन उरल्यास पाताळीं व एक आल्यास स्वर्गलोकीं असें समजावें. भूमीवरील अग्नि शुभ होय. संस्कार, नित्यकर्म, निमित्तप्राप्त अशीं नैमित्तिक कर्में व रोगानें पीडित अशांसाठीं अग्निचक्र पहाणें नको.

अग्नेःस्थापनवेलायांपूर्णाहुत्यामथापिवा । आहुतिर्वह्निवासश्चविलोक्यौशान्तिकर्मणि ॥ १ ॥ त्र्युत्तरारोहिणीश्रवणधनिष्ठाशततारकापुनर्वसुस्वातीमघाश्विनीहस्तपुष्यानुराधारेवतीनक्षत्रेषुगुरुशुक्रास्तमलमासरहितेशुभवारातिथ्यादौ शान्तिःकार्या निमित्ताव्यवहितनैमित्तिकेरोगशान्तौचअस्तादिविचारणानास्ति इतिप्रसंगात्सर्वशान्त्युपयोगिशुभदिननिर्णयः ।

**होमाहुति परीक्षण**—सूर्यनक्षत्रापासून आरंभ करून चंद्रनक्षत्रापर्यंतचीं नक्षत्रें मोजावीं.त. तीन तीन नक्षत्रें मिळून एकेका ग्रहाच्या तोंडांत आहुति पडते. पहिल्या तीन नक्षत्रीं सूर्यमुखांत, दुसऱ्या तीन नक्षत्रीं बुधाच्या मुखांत, तिसऱ्या तीन नक्षत्रीं शुक्रमुखांत, चौथ्या तीन नक्षत्रीं शनिमुखांत, पांचव्या तीन नक्षत्रीं चंद्रमुखांत, सहाव्या तीन नक्षत्रीं मंगळमुखांत, सातव्या तीन नक्षत्रीं गुरुमुखांत, आठव्या तीन नक्षत्रीं राहुमुखांत व नवव्या तीन नक्षत्रीं केतूच्या मुखांत. ज्या दिवशीं पापग्रहाच्या तोंडांत आहुति पडतो तो दिवस अशुभ व ज्या दिवशीं शुभग्रहाच्या मुखीं आहुति पडतो तो दिवस शुभ. शान्तिकर्मांत अग्नि मांडण्याच्या वेळीं अथवा पूर्णाहुतीच्या समयीं आहुती व अग्नि हीं पाहावींत. तीन उत्तरा, रोहिणी, श्रवण. धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, स्वाती, मघा, अश्विनी, हस्त, पुष्य, अनुराधा व रेवती—हीं नक्षत्रें असतांना आणि गुरुशुक्रांचें अस्त व मलमास यांनीं रहित असा शुभवार व तिथि—हीं पाहून शान्ति करावी. निमित्तानें प्राप्त होणारें जें नैमित्तिक कर्म व रोगाची शान्ति यांच्या बाबतींत अस्तादिकांचा विचार करूं नये. याप्रमाणें या शान्तीच्या निर्णयप्रसंगानें इतर सर्व शान्तींना उपयोगी पडेल असा हा शुभदिननिर्णय होय.

अभुक्तमूलोत्पत्तौवर्षाष्टकंशिशुत्यागः ततःशान्तिः तदन्यमूलोत्पत्तौद्वादशाहेअव्यवहितागामिमूलयुतेशुभदिनेवागोप्रसवशान्तिंकृत्वास्यशिशोर्मूलप्रथमचरणोत्पत्तिसूचितारिष्टनिरासार्थंसग्रहमखांशान्तिंकरिष्यइतिसंकल्पयेत् द्वितीयादिपादोत्पत्तौसंकल्पेतथोहः ब्रह्मसदस्यौकृताकृतौ ऋत्विजोष्टौचत्वारोवा मध्यकलशेस्वर्णप्रतिमायांरुद्रावाहनादि तस्यचतुर्दिक्षुकुम्भचतुष्टयेऽक्षतपुञ्जेषुवरुणपूजा यद्वा मध्येकुम्भेप्रतिमायांरुद्रस्तदुत्तरकुम्भेवरुणःपूज्य इतिकुम्भद्वयम् रुद्रकुम्भोत्तरतः कुम्भेप्रतिमासु निर्ऋतिमिन्द्रमपश्चावाह्यपद्मस्यचतुर्विंशतिदलेषुउत्तराषाढाद्यनुराधान्तचतुर्विंशतिनक्षत्राणि विश्वेदेवादिचतुर्विंशतिदेवास्तण्डुलपुञ्जादिष्वावाह्यदिक्षुलोकपालांश्चावाह्यपूजयेत् अग्निग्रहस्थापनाद्यन्तेऽन्वाधानेऽर्कादिग्रहान्समिच्चर्वाज्याहुतिभिः निर्ऋतिंप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिर्घृ-

तमिश्रपायससमिदाज्यचर्वाहुतिभिः यद्वापायसेनाष्टोत्तरशतसंख्ययासमिदाज्यंचरुभिरष्टाविंशतिसंख्ययाइन्द्रमपश्च प्रतिद्रव्यमष्टाविंशतिसंख्यपायससमिदाज्यचर्वाहुतिभिर्विश्वेदेवादिचतुर्विंशतिदेवताअष्टाष्टपायसाहुतिभिः रक्षोहणमग्निंकृणुष्वपाजेतिपश्चदशऋग्भिःप्रत्यृचमष्टाष्टसंख्यकृसराहुतिभिः १२॰ सवितारंदुर्गात्र्यंबकंकवीन्दुर्गां वास्तोष्पतिंअग्निंक्षेत्रपालंमित्रावरुणावग्निंचाष्टाष्टकृसराहुतिभिः श्रियं हिरण्यवर्णामितिपश्चदशऋग्भिःप्रत्यृचमष्टाष्टसमिदाज्यचर्वाहुतिभिः सोमं त्रयोदशपायसाहुतिभिः रुद्रंस्वराजंचतुर्गृहीताज्येनाग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचाज्यशेषेणस्विष्टकृतमित्यादि कवीनित्यत्रऋत्विक्स्तुतामित्युद्देशोमयूखादौ शूर्पत्रये निर्वापः तत्रप्रथमेशूर्पेपायसार्थं तूष्णींद्वादशमुष्टीन्निर्ऋतिमिन्द्रमपश्चोद्दिश्यानिरूप्य द्वितीयेचवर्थं तदेवत्रयमुद्दिश्यद्वादशमुष्टीन् पुनःप्रथमेषण्णवतिमुष्टीन् पायसार्थंतृतीयेशूर्पेकृसरार्थंचतुश्चत्वारिंशन्मुष्टीन् द्वितीयेपुनश्चतुरोमुष्टीन्प्रथमेपुनःसोमार्थंचतुर्मुष्टीन्नीरूप्यततःशूर्पत्रयेआहुतिपर्याप्ततण्डुलान्गृहीत्वानिर्वापसंख्ययाप्रोक्ष्यपात्रत्रयेहविस्त्रयंश्रपयेत् तिलमिश्रतण्डुलपाकेनकृसरोभवति ग्रहार्थंगृहसिद्धान्नंग्राह्यम् सर्वग्रन्थेषुनिर्ऋत्याद्यर्थेनिर्वापादिक्रमेणश्रपणमेवोक्तम् अतोगृहसिद्धान्नएवतिलदुग्धमिश्रणेनकृसरादिसंपादनं प्रमादालस्यादिकृतकर्मभ्रंशएव ततोहोमकालेयजमानस्त्यागंकुर्यात् तत्रएतावत्संख्याहुतिपर्याप्तंसमिदाज्यचरुद्रव्यमादित्यादिनवग्रहेभ्योनमम एवमधिदेवतादिभ्यः ततोष्टोत्तरशतसंख्याहुतिपर्याप्तंघृतमिश्रपायसंअष्टोत्तरशताहुतीनामष्टाविंशत्याहुतीनां वापर्याप्तंसमिदाज्यचर्वात्मकद्रव्यत्रयमिदंनिर्ऋतयेनमम अष्टाविंशत्याहुतिपर्याप्तंपायससमिच्चर्वाज्यमिन्द्रायनमम एवमद्भ्यः अष्टाष्टाहुतिपर्याप्तंपायसंविश्वेभ्योदेवेभ्यो० १ विष्णवे २ वसुभ्यो ३ वरुणाय ४ अजैकपदे ५ अहयेबुध्न्याय ६ पूष्णे ७ अश्विभ्यां ८ यमाय ९ अग्नये १० प्रजापतये ११ सोमाय १२ रुद्राय १३ अदित्यै १४ बृहस्पतये १५ सर्पेभ्यः १६ पितृभ्यः १७ भगाय १८ अर्यम्णे १९ सवित्रे २० त्वष्ट्रे २१ वायवे २२ इन्द्राग्निभ्यां २३ मित्राय २४ नमम विंशत्यधिकशताहुतिपर्याप्तंकृसरंरक्षोघ्नेऽग्नयेनमम अष्टाष्टाहुतिपर्याप्तंकृसरंसवित्रेदुर्गायैत्र्यम्बकायकविभ्योदुर्गायैवास्तोष्पतयेऽग्नयेक्षेत्रपालायमित्रावरुणाभ्यामग्नयेचनमम प्रतिद्रव्यंविंशत्यधिकशताहुतिपर्याप्तानिसमिच्चर्वाज्यानिश्रियैनमम त्रयोदशाहुतिपर्याप्तंपायसंसोमायचतुर्गृहीताज्यंरुद्रायस्वराजे एकैकाहुतिपर्याप्तमाज्यंअग्नयेवायवेसूर्यायप्रजापतयेचनमम एवंसविस्तरंतत्तद्द्रव्यसंख्यादेवतोच्चारेण त्यागःसर्वत्रज्ञेयः केचित्तु इदमुपकल्पितमन्वाधानोक्तद्रव्यजातमन्वाधानोक्ताहुतिसंख्यापर्याप्तमन्वाधानोक्ताभ्योयक्ष्यमाणाभ्योदेवताभ्योनममेतिसंक्षेपेणगंकुर्वन्ति तत्यागोग्रहमन्त्रैर्निर्ऋत्यादिमन्त्रैश्चयथायथंहोमान्ते ग्रहपूजास्विष्टकृवाहुतिबलिदानपूर्णाहुतिपूर्णपात्रविमोकादिवह्निपूजान्तेयजमानाद्यभिषेके कृते

घृतशुक्लवस्त्रगन्धोयजमानोमानस्तोकेतिविभूतिंधृत्वा मुख्यदेवतापूजनविसर्जन-श्रेयोग्रहण दक्षिणादानानिकुर्यात् शतंतदर्धदशवाब्राह्मणान्भोजयेदितिसंक्षेपः ॥

**मूळनक्षत्रशान्ति**—अमुक्त मूळनक्षत्र ( म्हणजे काय त्याचें स्पष्टीकरण मागें सांगितलेंच आहे ) असतां जर जन्म झाला, तर त्या बालकाचा आठ वर्षें त्याग करून मग शान्ति करावी. अभुक्त मूळनक्षत्र नसून अन्य मूळनक्षत्र असतां ( जन्म झाल्यास ) बाराव्या दिवशीं किंवा जवळ येणाऱ्या मूळ नक्षत्रानें युक्त अशा शुभदिनीं अथवा दुसऱ्या शुभ दिवशीं गोप्रसवशान्ति करून 'अस्य शिशोर्मूलप्रथमचरणोत्पत्तिसूचितारिष्टनिरासार्थं सग्रहमखां शान्तिं करिष्ये' असा संकल्प करावा. दुसऱ्या तिसऱ्या वगैरे पादांवर जन्म झाल्यास संकल्पांत तसा उच्चार करावा. ब्रह्मा व सदस्य हे विकल्पानें घ्यावेत. ऋत्विज आठ किंवा चार घ्यावेत. मधल्या कलशावर सोन्याच्या प्रतिमेंत रुद्रदेवतेचें आवाहन करावें. त्याच्या चार दिशांना चार कलश मांडून त्यांवर तांदुळाच्या राशि कराव्या व वरुणदेवतेची त्यांवर पूजा करावी; किंवा मधल्या कलशावर रुद्राची स्थापना करून, त्याच्या उत्तरेकडच्या कलशावर वरुणाची पूजा करावी. याप्रमाणें दोन कलश घ्यावेत. रुद्रदेवतेच्या उत्तरेकडच्या कलशावरच्या प्रतिमेंत—निर्ऋति, इन्द्र व आप या देवतांचें आवाहन करून, उत्तराषाढापासून अनुराधापर्यंतचीं जीं चोवीस नक्षत्रें व त्यांच्या विश्वेदेवादि ज्या चोवीस देवता, त्यांचें तांदुळांच्या राशींवर कमळाच्या चोवीस पाकळ्या ठेवून त्यांवर आवाहन करावें. तद्वतच आठ दिशांत आठ लोकपालांचें आवाहन करावें. नंतर सर्वांची पूजा करावी. अग्निस्थापना आणि ग्रहस्थापना झाल्यावर जें अन्वाधान करावें तें असें:— 'अर्कादिग्रहान्'...इ० अन्वाधान करावें. यांत जेथें 'कर्वान्' असें म्हटलें आहे, तेथें 'ऋत्विकस्तुतिं' असें म्हणण्याबद्दल मयूखादि ग्रंथांत सांगितलें आहे. तीन सुपांत ( निर्वाप ) तांदूळ घ्यावेत. पहिल्या सुपांत पायसासाठीं मंत्ररहित अशा बारा मुठी तांदूळ—निर्ऋति, इन्द्र आणि अप्—यांच्या करतां घ्यावेत. दुसऱ्या सुपांत भातासाठीं त्याच तीन देवतांच्या नांवानें बारामुठी तांदूळ घ्यावेत. पुन्हां पहिल्या सुपांत शहाण्णव मुठी पायसाकरितां घालावेत. तिसऱ्या सुपांत कृसराकरितां चवेचाळीस मुठी घ्यावेत. दुसऱ्या सुपांत पुन्हां चार मुठी घ्यावे. पहिल्या सुपांत पुन्हां सोमदेवतेसाठीं चार मुठी घ्यावे. त्यानंतर तीन सुपांत सर्व आहुतींना पुरतील इतके तांदूळ घेऊन, पूर्वी जितक्या जितक्या म्हणून मुठींनीं तांदूळ घेतले तितक्या तितक्या संख्येनें ते धुवून त्याचे तीन वेगळाल्या भांड्यांत तीन हवि शिजवावे. तिलमिश्रित तांदूळ शिजविल्यानें कृसर होतो. ग्रहांच्या होमाकरतां घरांत शिजविलेला भात घ्यावा. निर्ऋत्यादि देवतांसाठीं ज्या क्रमानें तांदूळ घेतले त्याच क्रमानें ते शिजवावेत, असें सर्व ग्रंथांत सांगितलें आहे; यास्तव, घरांत शिजविलेल्या भातांतच तीळ, दूध वगैरे टाकून तयार झालेला तो कृसर किंवा पायस नव्हे. प्रमाद ( चूक ), आळस वगैरेंनीं केलेला तो कर्मभ्रंशच होय. त्यानंतर यजमानानें होमकालीं जो द्रव्यत्याग करावा तो असाः— 'एतावत्संख्याहुतिपर्याप्तं प्रजापतये च न मम ॥'

इ० विस्तरानें त्या द्रव्यांच्या संख्यांचा व देवतांचा उच्चार करून सर्वत्र त्याग करावा. कोणी ग्रंथकार- 'इदमुपकल्पितमन्वाधानोक्तद्रव्यजातं अन्वाधानोक्ताहुतिसंख्या॰ पर्याप्तमन्वाधानोक्ताभ्यो यक्ष्यमाणाभ्यो देवताभ्यो न मम।' अशा संक्षेपानें त्याग करतात. त्यागानंतर ग्रहांच्या मंत्रांनीं व निर्ऋत्यादिक देवतामंत्रांनीं यथासांग होम केल्यावर ग्रहपूजा, नलाहुति, बलिदान, पूर्णाहुति पूर्णपात्रविमोक, अग्निपूजा वगैरे कार्य करावें. व नंतर यजमानादिकांना अभिषेक करावा. त्यानंतर यजमानानें शुभवस्त्र व गंध हीं धारण करून 'मानस्तोके०' या मंत्रानें विभूतिधारण करावें. व मग मुख्य देवतांचें पूजन, विसर्जन, श्रेयोग्रहण आणि दक्षिणादान हीं कृत्यें केल्यावर-शंभर, पन्नास किंवा दहा ब्राह्मणांना भोजन द्यावें. अशी ही याची थोडक्यांत माहिती समजावी.

अथाश्लेषाशान्तिः तत्राश्लेषाफलम् आश्लेषायाः क्रमेणपञ्चसप्तद्वित्रिचतुरष्टैकादशषण्नवपञ्चेतिदशधाविभक्तनाडीषु क्रमेण राज्यंपितृनाशो मातृनाशः कामभोगः पितृभक्तिर्बलंहिंसकत्वंत्यागोभोगोधनमितिफलानि अथ पादविभागेनफलम् तत्राद्यपादः शुभः द्वितीये पादेधनस्यनाशः तृतीयेमातुः चतुर्थेपितुः आश्लेषान्त्यपादत्रयजाताकन्याश्वश्रूंहन्ति एवंवरोपिअन्त्यपादत्रयजःस्वश्वश्रूं हन्ति आश्लेषासर्वपादेषु शान्तिं कार्याप्रयत्नतः । जातस्यद्वादशाहेतुशान्तिकर्मसमाचरेत् १ असंभवेतुजन्मर्क्षेअन्यास्मिन्वाशुभेदिने । अथोक्तकालेगोमुखप्रसवंकृत्वाअस्यशिशोराश्लेषाजननसूचितसर्वारिष्टपरिहारेत्यादिसंकल्पंकृत्वामूलशान्तिवत्कुम्भद्वयेरुद्रवरुणौद्वौसंपूज्यचतुर्विंशतिदलपद्मस्थकुम्भेप्रतिमायामाश्लेषाधिपतीन्सर्पानावाह्यतद्दक्षिणेपुष्यदेवतां बृहस्पतिमुत्तरतोमघादेवतांपितृंश्चावाह्यदलेषुपूर्वदलमारभ्यप्रादक्षिण्येन पूर्वाधिपतिभगादिपुनर्वसुदेवतादितिपर्यन्तचतुर्विंशतिदेवतावाहनादिकुर्यात् कौस्तुभेतु तैत्तिरीयकमंत्रैः पुष्यमघापूर्वादिनक्षत्राणामेवावाहनमुक्तंनतुनक्षत्रदेवतानाम् ततोलोकपालानावाह्यावाहितसर्वदेवताःसंपूज्याग्निंग्रहांश्चप्रतिष्ठाप्यान्वादध्यात् आदित्यादिग्रहाद्युद्देशान्ते प्रधानदेवताःसर्पाप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यमष्टाविंशतिसंख्यंवाघृतमिश्रपायससमिदाज्यचर्वाहुतिभिः बृहस्पतिंपितृंश्चाष्टाविंशतिसंख्यमष्टसंख्यंवातैरेव द्रव्यैर्भगादिचतुर्विंशतिदेवताः अष्टाष्टपायसाहुतिभिः रक्षोहणमित्यादिशेषदेवतानिर्देशोमूलशान्तिवत् तद्वदेवपायसकृसरचरूणांश्रपणंहविस्त्यागश्चकार्यः कौस्तुभोक्तप्रधानदेवतामन्त्रैस्तत्तद्धोमः शेषंमूलशान्तिवत्॥

**आश्लेषाशान्ति**—आश्लेषा नक्षत्राच्या साठ घटकांचे जे दहा भाग करतात ते असेः-पहिला भाग पांच घटकांचा, दुसरा सात घटकांचा, तिसरा दोन घटकांचा, चौथा तीन घटकांचा, पांचवा चार घटकांचा, सहावा आठ घटकांचा, सातवा अकरा घटकांचा, आठवा सहा घटकांचा, नववा नऊ घटकांचा व दहावा पांच घटकांचा. यांपैकीं ज्या भागांत जन्म होईल त्यांचीं फळें पुढीलप्रमाणें अनुक्रमानें जीं समजावींत तीं अशीं: राज्य, पितृनाश, मातृनाश, कामभोग,

पितृभक्ति, बळ, हिंसकत्व, त्याग, भोग आणि धन. आतां नक्षत्राचे चार चरण करून त्यांचीं फळें सांगतों तीं अशीं:—पहिला चरण शुभ, दुसरा धननाशक, तिसरा मातृनाशक आणि चौथा पितृनाशक. आश्लेषा नक्षत्राच्या शेवटच्या तीन चरणांत जन्मलेली कन्या सासूचा नाश करते. याप्रमाणेंच शेवटच्या तीन चरणांत जन्मलेला पुत्रही आपल्या सासूला मारतो. आश्लेषा नक्षत्राच्या कोणच्याही चरणांत जरी जन्म झाला असला, तरी प्रयत्नानें शान्ति करावीच. शान्ति करायची ती जन्म झाल्यापासून बाराव्या दिवशीं करावी. बाराव्या दिवशीं न झाल्यास जन्मनक्षत्रीं किंवा इतर शुभ दिवशीं करावी. उक्तकाळीं गोप्रसवशान्ति करून, 'अस्य शिशोः आश्लेषाजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं' असा संकल्प करावा. मूळनक्षत्रासंबंधींच्या शान्तीप्रमाणें दोन कलशांवर रुद्र आणि वरुण या दोन देवतांची पूजा करून, चोवीस पाकळ्यांच्या कमळावर कलश ठेवून, त्यांतल्या प्रतिमेंत आश्लेषा नक्षत्राच्या सर्व देवतांचें आवाहन करावें. त्यांच्या पश्चिमेस पुष्यनक्षत्राची देवता बृहस्पति आणि उत्तरेस मघानक्षत्राची देवता पितर यांचें आवाहन करावें. चोवीस पाकळ्यांपैकीं पूर्वेकडच्या पाकळीपासून आरंभ करून प्रदक्षिणाक्रमानें पूर्वानक्षत्राची देवता जी भग तिच्यापासून पुनर्वसु नक्षत्रदेवता जी अदिति तिच्यापर्यंत चोवीस देवतांचें आवाहनादिक करावें. तैत्तिरीय शाखेच्या मंत्रांनीं पुष्य, मघा, पूर्वा वगैरे नक्षत्रांचेंच फक्त आवाहन करावें व नक्षत्रदेवतांचें करूं नये, असें कौस्तुभांत सांगितलें आहे. त्यानंतर लोकपालांचें आवाहन करून, सर्व आवाहित देवतांची पूजा करावी. नंतर अग्नि व ग्रह यांची प्रतिष्ठापना करून अन्वाधान करावें. आदित्यादि ग्रहांच्या नांवानें अन्वाधान केल्यावर—'प्रधानदेवताः सर्पान् प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यमष्टाविंशतिसंख्यं वा घृतमिश्रपायससमिदाज्यचर्वाहुतिभिः बृहस्पतिं पितॄंश्चाष्टाविंशतिसंख्यामष्टसंख्यं वा तैरेव द्रव्यैर्भगादिचतुर्विंशति देवताः अष्टाष्टपायसाहुतिभिः रक्षोहणमित्यादि' मुख्य देवतांचें अन्वाधान करावें. विशेष देवतांचा निर्देश मूळनक्षत्र शान्तीप्रमाणेंच करावा. त्याप्रमाणेंच—पायस, कृसर व चरु—हीं शिजवावींत व त्या हवीचा त्याग करावा. कौस्तुभांत सांगितलेल्या प्रधानदेवतांच्या मंत्रांनीं त्या त्या देवतांचा होम करावा. बाकीचें सारें कर्म मूळनक्षत्राच्या कर्माप्रमाणेंच करावें.

अथज्येष्ठानक्षत्रफलम् ज्येष्ठायादशभागेषुआद्येमातामहीमृतिः । मातामहंद्वितीयेचतृतीयेहन्तिमातुलम् १ तुर्येजातोमातरंचहन्त्यात्मानंतुपञ्चमे । गोत्रजान्षष्ठभागेचसप्तमेतूभयंकुलम् २ अष्टमेस्वाग्रजंहन्तिनवमेश्वशुरंतथा । दशमांशकजातस्तुसर्वहन्तिशिशुर्ध्रुवम् ३ ज्येष्ठर्क्षेतुपुमाञ्जातोज्येष्ठभ्रातुर्विनाशकः । ज्येष्ठर्क्षेकन्यकाजाताहन्तिशीघ्रंधवाग्रजम् ४ पादत्रयेजातनरोज्येष्ठोप्यत्रप्रजायते । ज्येष्ठान्त्यपादजातस्तुपितुःस्वस्यचनाशकः ५

**ज्येष्ठानक्षत्रफल**—ज्येष्ठा नक्षत्राच्या साठ घटकांचे समान दहा भाग करावे व ज्या भागांत जन्म होईल त्यांचीं जीं फळें जाणावींत तीं अशीं:—

पहिल्या भागांत जन्म झाल्यास मातेची आई मरते, दुसऱ्यांत झाल्यास मातेचा पिता

मरतो, तिसऱ्यांत झाल्यास मामा मरतो, चौथ्यांत माता मरते, पांचव्यांत स्वतःलाच मरण येतें, सहाव्यांत गोत्रज मरतात, सातव्यांत पिता व माता यांचा कुलनाश होतो, आठव्यांत थोरला भाऊ मरतो, नवव्यांत सासरा मरतो, व दहाव्यांत जन्म झाल्यास खात्रीनेंच सर्वांस मारतो. ज्येष्ठा नक्षत्रावर जन्मलेला मुलगा आपल्या वडील भावाला मारतो. कन्या वडील दिराचा तावडतोब प्राणनाश करते. या नक्षत्राच्या पहिल्या तीन चरणांत जन्मणारा श्रेष्ठही होतो. शेवटच्या चरणांत जन्मणारा स्वतःचा व बापाचा प्राणनाश करतो.

द्वादशाहे शान्त्युक्तशुभदिने वा गोप्रसवशान्तिं कृत्वा ऽस्य शिशोर्ज्येष्ठर्क्षजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारेत्यादि संकल्प्य मध्यकलशे सुवर्णप्रतिमायां शचीसहितमैरावतारूढमिन्द्रं लोकपालांश्चावाह्य रक्तवस्त्रद्वयशष्कुलीनैवेद्यसहितषोडशोपचारैः पूजयेत् तस्य चतुर्दिक्षु कुम्भचतुष्टयं तत्पूर्वमध्यभागे शतच्छिद्रं च निधाय पूर्णपात्रयुतेषु फलादौ वरुणावाहनपूजनादि अन्वाधाने ग्रहान्वाधानान्ते इन्द्रं पलाशसमिदाज्यचरुद्रव्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यया इन्द्रायेन्दो मरुत्व इति मन्त्रेण प्रजापतिमष्टोत्तरशततिलाहुतिभिः समस्तव्याहृतिमंत्रेण शेषेण स्विष्टकृतमित्यादि अष्टोत्तरशतं ब्राह्मणान् भोजयेत् इति ज्येष्ठाशान्तिसंक्षेपः ॥

**ज्येष्ठानक्षत्रशान्ति**—बाराव्या दिवशीं अथवा शान्तीला योग्य अशा शुभदिवशीं गोप्रसवशान्ति करून, 'अस्य शिशोर्ज्येष्ठार्कजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं' असा संकल्प केल्यावर, मधल्या कलशावरच्या सोन्याच्या प्रतिमेंत—ऐरावतावर इन्द्राणीसह असलेल्या इन्द्राचें व लोकपालांचें आवाहन करावें, आणि त्यांना तांबडीं वस्त्रें अर्पण करून त्यांची षोडशोपचारें पूजा केल्यावर त्यांना करंजांचा नैवेद्य अर्पण करावा. त्यांच्या चार बाजूंना चार कलश व पूर्वेस मध्यभागीं शंभर भोंकांचा एक कलश अशा पांच कलशांची स्थापना करावी. नंतर त्यांवर पूर्णपात्रें ठेवून फलादिकांवर वरुणाचें आवाहन व पूजन करावें. ग्रहांचें अन्वाधान झाल्यानंतर 'इन्द्रं पलाशसमिदाज्यचरुद्रव्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यया इन्द्रायेन्दो मरुत्वते इति मंत्रेण प्रजापतिमष्टोत्तरशततिलाहुतिभिः समस्तव्याहृतिमंत्रेण शेषेण स्विष्टकृतमित्यादि' असें अन्वाधान करावें, आणि १०८ ब्राह्मणांना भोजन द्यावें. असा हा ज्येष्ठाशान्ति संक्षेप समजावा.

चित्राद्येऽर्धे पुष्यमध्ये द्विपादे पूर्वाषाढाधिष्ण्यपादे तृतीये । जातः पुत्रश्चोत्तराद्ये विश्वतो पितुर्भ्रातुः स्वस्य चापि प्रणाशम् १ उत्तराफल्गुन्याद्यपाद इत्यर्थः अत्रेत्थं भाति चित्रापूर्वार्धे जातस्य गोप्रसवं कृत्वा नक्षत्राधिप्रतिमां संपूज्य अजादानं कार्यम् एवं पुष्यद्वितीयतृतीयपादयोर्जनने गोप्रसवनक्षत्राधिपपूजागोदानानि कार्याणि उत्तराफल्गुनीप्रथमपादे जनने नक्षत्राधिपपूजां तिलपात्रदानं च कुर्यात् एवं पूर्वाषाढातृतीयपादे जनने नक्षत्रेशपूजा काञ्चनदानम् मघाप्रथमपादजनने मूलवत्फलम् तत्र गोप्रसवनक्षत्रेशपूजनग्रहमखाः कार्याः मघाया आद्यघटीद्वयजनने नक्षत्रगण्डान्तरशान्तिरपि रेवत्यन्त्यघटिद्वयेऽश्विन्याद्यद्वये जनने नक्षत्रगण्डान्त-

शान्तिगोप्रसवग्रहमखाःकार्याःरेवत्यश्विन्योरितरभागेषुमघान्तिमपादत्रयेचदोषविशेषानुक्तेर्नशान्त्यादिकम् एवंविशाखाचतुर्थपादजननेशालकदेवरनाशादिदुष्टफलोक्तेर्ग्रहमखः कार्यः यत्रकाले दुष्टफलमात्रमुक्तंशान्तिर्नोक्तातत्रग्रहमखइति कमलाकरोक्तेः एवमितरत्राप्यूह्यम् इतिनक्षत्रशान्तयः

**दुष्टनक्षत्रशान्ति**—चित्रा नक्षत्राचें पूर्वार्ध, पुष्यनक्षत्राचे मधले दोन चरण, पूर्वाषाढानक्षत्राचा तिसरा पाद आणि उत्तरा फाल्गुनी नक्षत्राचा पहिला पाद—यांवर जन्मणारा मुलगा—बाप, भाऊ यांचा नाश करून स्वतः नाश पावतो. चित्रानक्षत्राच्या पूर्वार्धांत जन्म झाल्यास गोप्रसवशान्ति करून नक्षत्रदेवतेच्या प्रतिमेचें पूजन करावें आणि अजादान ( शेळी ) द्यावें. याप्रमाणेंच पुष्यनक्षत्राच्या दुसऱ्या व तिसऱ्या चरणीं जर जन्म होईल, तर गोप्रसवशान्ति, नक्षत्रदेवतेची पूजा आणि गाईचें दान हीं करावींत. उत्तरा फाल्गुनी नक्षत्राच्या पहिल्या चरणावर जन्म झाल्यास नक्षत्रदेवतेची पूजा करून तिलपात्रदान करावें. तसेंच पूर्वाषाढा नक्षत्राच्या तिसऱ्या चरणीं जन्म झाल्यास नक्षत्रदेवतेची पूजा करून सुवर्णदान द्यावें. मघानक्षत्राच्या पहिल्या चरणीं जर जन्म होईल, तर त्याचें फळ मूळनक्षत्राप्रमाणेंच जाणावें. तशा वेळीं गोप्रसवशान्ति, नक्षत्रदेवतापूजन व ग्रहमख—हीं करावींत. मघानक्षत्राच्या पहिल्या दोन घटकांत जन्म झाल्यास नक्षत्रगण्डान्तशान्ति सुद्धां करावी. रेवतीच्या पहिल्या दोन घटकांत किंवा अश्विनीच्या पहिल्या दोन घटकांत जन्म झाल्यास नक्षत्रगण्डान्तशान्ति, गोप्रसवशान्ति व ग्रहमख हीं करावींत. रेवती व अश्विनी यांच्या इतर भागीं आणि मघानक्षत्राच्या अखेरच्या तीन चरणांत जर जन्म झाला, तर विशेषसा दोष सांगितला नसल्यानें शान्त्यादिक कांहीं करण्याचें कारण नाहीं. विशाखाच्या चौथ्या चरणांत जन्म झालेला असल्यास बायकोचा भाऊ ( शालक ), दीर वगैरेचा नाश होतो, असें त्याचें दुष्ट फल सांगितलें असल्यानें, तत्प्रीत्यर्थ ग्रहमख करावा, असें कमलाकराचें सांगणें आहे. इतर ठिकाणींही हाच निर्णय समजावा. अशा या नक्षत्रांच्या शान्ति होत.

अथव्यतीपातवैधृतिसंक्रान्तिशान्तिः कुमारजन्मकालेतुव्यतीपातश्च वैधृति। संक्रमश्चरवेस्तत्रजातोदारिद्र्यकारकः १ अश्रियंमृत्युमाप्नोतिनात्र कार्याविचारणा। स्त्रीणांचशोकदुःखंचसर्वनाशकरोभवेत् २ गोमुखप्रसवं कुर्याच्छान्तिंचसनवग्रहाम् । उक्तकालेसंकल्पादिकंकृत्वापञ्चद्रोणपरिमितव्रीहिराशिंकृत्वातदुपरिसार्धद्रोणद्वयमिततण्डुलराशिंतदुपरिसपादद्रोणपरिमिततिलराशिंचकृत्वातिलराशौविधिनास्थापितकुम्भेसौवर्णप्रतिमायांसूर्यमावाह्यतद्दक्षिणोत्तरयोरग्निरुद्रावावाह्यतिस्रोदेवताः व्यतीपातशान्तौसंक्रांतिशान्तौचपूजयेत् व्यतीपातसंक्रान्त्योर्जननेव्यतीपातसंक्रांतिशान्तिंतन्त्रेण संकल्प्यैकैवशान्तिः कार्या अत्रपूजाहोमादेःप्रसङ्गसिद्धिःद्विगुणोवाप्रधानहोमइतिभाति गृहपीठदेवतान्वाधानान्तसूर्यउत्सूर्योबृहदितिमन्त्रेणसमिदाज्यचर्वाहुतिभिः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिः अग्निंरुद्रंचतैरेवद्रव्यैः प्रत्येकमष्टाविंशतिसंख्याहुतिभिरग्निंदूतमिति त्र्यम्बकमि-

तिमन्त्राभ्यांमृत्युंजयमष्टोत्तरशततिलाहुतिभिः शेषेणेत्यादि अभिषेकान्तेगोव-स्वर्णादिदत्त्वाशतंब्राह्मणान्भोजयेत् इतिव्यतीपातसंक्रान्तिशान्तिः ॥

**व्यतीपातवैधृतिसंक्रान्तिशान्ति**—व्यतिपात, वैधृति अथवा सूर्यसंक्रान्ति यांवर जर पुत्रजन्म होईल, तर दारिद्र्य, धननाश व मृत्यु हीं प्राप्त होतात यांत संशय नाहीं. स्त्रियांस शोकदुःखादि होऊन सर्वनाश होतो; यास्तव, नवग्रहांसहित गोप्रसवशान्ति करावी, योग्य काळीं संकल्पादिक करून पांचच द्रोण भाताची रास करावी यावर अडीचच द्रोण तांदुळाची रास करावी आणि त्यावर सव्वाच द्रोण तिलराशि करावा. त्यावर विधिपूर्वक कलशस्थापना करून, त्यावरच्या सुवर्णाच्या प्रतिमेंत सूर्याचें आवाहन करावें. त्याच्या दक्षिणेस अग्नि व उत्तरेस रुद्र यांचीं आवाहनें केल्यावर, त्या तीन देवतांची व्यतीपातशान्तींत व संक्रान्तिशान्तींत पूजा करावी. व्यतिपात व संक्रान्ति हे दोन्ही योग जर जन्मकालीं असले तर दोन्ही शान्तींचा एकतंत्रानेंच संकल्प करून, एकच शान्ति करावी. अशा वेळीं पूजा व होम यांची प्रसंगसिद्धि म्हणजे तीं दोन्ही एकदांच करणें होतें, किंवा प्रधानदेवतेचा होम दुप्पट करावा असें वाटतें. ग्रहपीठस्थ देवतांचें अन्वाधान झाल्यावर—'सूर्यं उत्सूर्यो बृहदिति मंत्रेण समिदाज्यचर्वाहुतिभिः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिः अग्निं रुद्रंच तैरेव द्रव्यैः प्रत्येकमष्टाविंशति संख्याहुतिभिः अग्निंदूतमिति त्र्यम्बकमिति मंत्राभ्यांमृत्युंजयमष्टोत्तरशततिलाहुतिभिः शेषेणेत्यादि' असें अन्वाधान करावें. अभिषेकानन्तर गाय, वस्त्र, सुवर्ण वगैरे दानें द्यावींत, व शंभर ब्राह्मणांना भोजन द्यावें. याप्रमाणें व्यतीपातसंक्रान्ति यांची शान्ति समजावी.

अथवैधृतिशान्तौविशेषः पूर्ववत्व्रीहितण्डुलतिलराशौस्थापितकुम्भे मध्ये-त्र्यम्बकमितिमंत्रेणरुद्रंदक्षिणतः उत्सूर्यइतिसूर्यंउत्तरश्चाप्यायस्वेतिसोममावाह्य-पूजयेत् अन्वाधानेरुद्रंसमिच्चर्वाज्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याहुतिभिः सूर्य-सोमौप्रत्येकमष्टाविंशतिसंख्यैस्तैरेवद्रव्यैर्मृत्युंजयमष्टोत्तरसहस्रशतान्यतरसं-ख्यतिलाहुतिभिःशेषेणेत्यादिअन्यत्पूर्ववत् संक्रान्तिदिनेवैधृतिसत्त्वे देवता-भेदाच्छान्तिद्वयंपृथक्कार्यम् इतिवैधृतिशान्तिः ॥

**वैधृतिशान्तिविशेष**—मागें सांगितल्याप्रमाणेंच भात, तांदूळ व तीळ यांच्या राशीवर कलशस्थापना करून, मध्यें 'त्र्यम्बकं०' या मंत्रानें रुद्राचें, त्याच्या दक्षिणेस 'उत्सूर्यं०' या मंत्रानें सूर्याचें व उत्तरेकडे 'आप्या-यस्व०' या मंत्रानें सोमाचें आवाहन करून पूजा करावी. नंतर 'रुद्रसमिच्चर्वाज्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याहुतिभिः सूर्यसोमौ प्रत्येकमष्टाविंशति संख्यैस्तैरेव द्रव्यै-मृत्युंजयमष्टोत्तरसहस्रशतान्यसंख्यातिलाहुतिभिःशेषेणेत्यादि' असें अन्वाधान करावें, व बाकीचें कर्म पूर्ववत् करावें. संक्रान्तीच्या दिवशीं जर वैधृतियोग असेल, तर त्या दोहोंच्या देवता स्वतंत्र आहेत म्हणून दोन शान्त्या कराव्या. असा हा वैधृति-शान्तनिर्णय आहे.

अथैकनक्षत्रजननशान्तिः एकस्मिन्नैवनक्षत्रेभ्रात्रोर्वापितृपुत्रयोः । प्रसूतिश्चेत्तयोर्मृत्युर्भवेदेकस्यनिश्चितः १ पितृनक्षत्रेमातृनक्षत्रेवा कन्याया पुत्रस्यवोत्पत्तौ गोमुखप्रसवंकृत्वा शान्तिःकार्या सोदरभ्रातृभगिन्योर्नक्षत्रे भ्रातुर्भगिन्यावोत्पत्तौगोप्रसवमकृत्वैवशान्तिमात्रंकार्यम् संकल्पे पित्रेकनक्षत्रोत्पत्तिसूचितसर्वारिष्टेत्याद्यूहः कलशेरक्तवस्त्रेयस्मिन्नक्षत्रेजन्म तन्नक्षत्रप्रतिमांतन्नक्षत्रदेवताप्रतिमांवा अग्निर्नःपातुकृत्तिकाइत्यादितैत्तिरीयमन्त्रैःपूजयेत् अन्वाधानेइदंनक्षत्रं अमुकांनक्षत्रदेवतांवासमिच्चर्वाज्यैःप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यंशेषेणेत्यादि अन्तेययोरेकनक्षत्रेजन्मतयोरभिषेकः अत्रग्रहमखोनावावश्यकः क्वचित्संपूजितहरिहरप्रतिमादानमप्युक्तम् ।

**एकनक्षत्रजननशान्ति**—भावंडे अथवा पितापुत्र इत्यादिकांचा जन्म जर एकाच नक्षत्रावर झाला, तर त्यांपैकीं एक खात्रीनें मरतो. बापाच्या अथवा आईच्या जन्मनक्षत्रावर मुलगा अथवा मुलगी झाल्यास गोमुखप्रसवशान्ति करावी. सख्खा भाऊ अथवा बहीण यांच्या जन्मनक्षत्रावर भाऊ अथवा बहीण झाल्यास गोप्रसवशान्ति न करतां, नुसतीच शान्ति करावी. 'पित्रेकनक्षत्रोत्पत्तिसूचितसर्वारिष्ट' किंवा 'मात्रेकनक्षत्र०' यांपैकीं योग्य असेल तो संकल्प करावा. ज्या नक्षत्रीं जन्म असेल त्याची किंवा त्या नक्षत्रदेवतेची प्रतिमा तांबड्या वस्त्रांत कलशावर मांडून, 'अग्निर्नःपातुकृत्तिका' इत्यादि तैत्तिरीय मंत्रांनीं तिची पूजा करावी. 'इदं नक्षत्रं अमुकां नक्षत्रदेवतां वा समिच्चर्वाज्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यं शेषेणेत्यादि' असें अन्वाधान करून शेवटीं, ज्यांचे जन्म एकनक्षत्रावर झाले असतील त्यांना अभिषेक करावा. या प्रसंगीं ग्रहमख आवश्यक नाहीं. हरिहरांच्या प्रतिमेची पूजा करून तिचें दान करावें, असेंही क्वचित् ग्रंथांत सांगितलें आहे.

अथग्रहणशान्तिः ग्रहणेचन्द्रसूर्यस्यप्रसूतिर्यदिजायते । इत्थंसंजायते यस्तु तस्यमृत्युर्नसंशयः १ व्याधिःपीडाचदारिद्र्यंशोकश्चकलहोभवेत् । अत्रगोमुखप्रसवःकार्य इतिभाति ग्रहमखःकृताकृतः संकल्पेसूर्यग्रहणकालिकप्रसूतिसूचितेत्याद्यूहः ग्रहणकालिकनक्षत्रस्यनक्षत्रदेवतायावा हेमप्रतिमां सूर्यग्रहे सूर्यस्य हेमप्रतिमां चन्द्रग्रहेराजतंचन्द्राबिम्बंकृत्वोभयत्र सीसेनराहोर्नागाकृतिं कृत्वा गोमयेोपलिप्तेशुचिदेशेश्वेतवस्त्रोपरिदेवतात्रयपूजनम् नात्रकलशस्थापनादितत्रमध्येआकृष्णेनेतिसूर्यं दक्षिणतःस्वर्भानोरधइतिराहुं उत्तरतोनक्षत्रदेवतां पूजयेत् चन्द्रग्रहेतुआप्यायस्वेतिमध्येचन्द्रःपूज्यः पार्श्वयोराहुनक्षत्रदेवतेपूर्ववत् अन्वाधाने सूर्यग्रहेसूर्यंअर्कसमिदाज्यचरुतिलैःप्रत्येकमष्टोत्तरशतसंख्यया राहुं दूर्वाज्यचरुतिलैस्तावत्संख्यैर्नक्षत्रदेवताञ्जलवृक्षसमिदाज्यचरुतिलैस्तावत्संख्यया शेषेणेत्यादि चन्द्रग्रहेच चन्द्रं पालाशसमिदाज्यचरुतिलैः शेषंपूर्ववत् अन्तेग्रहकलशोदकेनपञ्चगव्यपञ्चत्वक्पञ्चपल्लवादियुतलौकिकोदकेनचलौकिके-

नैवाभिषेकः वेधकालेजन्मनिनैवशान्तिः किंतुदुष्टकालत्वाद्रुद्राभिषेकःकार्यइति भाति ॥

**ग्रहणशान्ति**—चन्द्रग्रहणांत किंवा सूर्यग्रहणांत जर जन्म झाला तर, निःसंशय मृत्यु येतो व रोग, पीडा, दारिद्र्य, शोक, कलह वगैरे अरिष्टें उत्पन्न होतात. अशा प्रसंगीं गोमुखशान्ति करावी असें वाटतें. ग्रहमख करावा किंवा करूं नये. 'सूर्यग्रहणकालिकप्रसूतिसूचितनिरसनद्वारा०' वगैरे संकल्प करावा. ग्रहणकाळाचें नक्षत्र अथवा नक्षत्रदेवता यांची प्रतिमा करावी. सूर्यग्रहण असल्यास सूर्याची सोन्याची प्रतिमा करावी व चन्द्रग्रहण असल्यास चन्द्राचें रौप्यबिम्ब करावें. तद्वतच कोणचेंही जरी ग्रहण असलें तरी राहूची शिशाची नागाकार प्रतिमा करावी. गाईच्या शेणानें सारवून शुद्ध केलेल्या जागेवर पाढरें वस्त्र ठेवून त्यावर ( वरील ) तीन देवतांची ( प्रतिमांची ) पूजा करावी. याप्रसंगीं कलशस्थापना करूं नये. 'आकृष्णेनेति०' या मंत्रानें मध्यभागीं सूर्याचें, 'स्वर्भानोरथ०' या मंत्रानें दक्षिणेस राहूचें व उत्तरेस नक्षत्रदेवता यांचीं आवाहनें करून पूजा करावी. चन्द्रग्रहण असल्यास 'आप्यायस्व०' या मंत्रानें मध्यभागीं चंद्राचें आवाहन व पूजा करून दक्षिणोत्तर दोन बाजूंस अनुक्रमें राहु व नक्षत्रदेवता यांचें आवाहन व पूजा वरीलप्रमाणेंच करावींत. जेव्हां सूर्यग्रहण असेल तेव्हां 'सूर्यअर्कसमिदाज्यचरुतिलैः प्रत्येकमष्टोत्तरशतसंख्यया राहुं दूर्वाज्यचरुतिलैस्तावत्संख्यैर्नक्षत्रदेवतां जलवृक्षसमिदाज्यचरुतिलैस्तावत्संख्यया शेषेणेत्यादि०' असें अन्वाधान करावें. चन्द्रग्रहण असल्यास, 'चन्द्रं पालाशसमिदाज्यचरुतिलैःप्रत्येकमष्टोत्तरशतसंख्यया०' वगैरे वरीलप्रमाणेंच अन्वाधान करावें. शेवटीं कलशांतल्या पाण्यानें किंवा पंचगव्य, पंचत्वचा ( साली ) पंचपल्लव वगैरेनीं युक्त अशा प्रसिद्ध (लौकिक ) जलानें अभिषेक करावा. वेधकालांत जन्म झाल्यास शान्ति करूं नये असें जरी आहे तरी, तो दुष्ट काल असल्यानें रुद्राभिषेक करावा असें वाटतें.

अथनक्षत्रगण्डान्तशान्तिः रेवत्याश्लेषाज्येष्ठानक्षत्राणामन्त्यघटीद्वयमश्विनीमघामूलानामाद्यघटीद्वयमितिघटिकाचतुष्टयमितंत्रिविधंनक्षत्रगण्डान्तम् अश्विनीमघामूलानांपूर्वार्धेबाध्यतेपिता। पूषाहिशक्रपश्चार्धेजननीबाध्यतेशिशोः१ सर्वेषांगण्डजातानांपरित्यागोविधीयते। वर्जयेद्दर्शनंयावत्तस्यषाण्मासिकंभवेत् २ शान्तिर्वापुष्कलाकार्यासोममन्त्रेणभक्तिमान्। अस्यशिशोरेवत्याश्विनीसंध्यात्मकगण्डान्तजननसूचितारिष्टनिरासार्थं नक्षत्रगण्डान्तशान्तिंकरिष्यइत्यादिसंकल्पः गोमुखप्रसवंकृत्वाषोडशपलमष्टपलंवाचतुःपलं वा कांस्यपात्रं विधायतस्मिन्पायसंपयोवानिक्षिप्यतत्रनवनीतपूर्णशङ्खंनिधायतस्मिन्राजतंचन्द्रबिम्बंसंस्थाप्यसोमोहमितिध्यानपूर्वकंचंद्रमाप्यायस्वेतिपूजयेत् पूजान्ते आप्यायस्वेतिमन्त्रस्यसहस्रंजपः ग्रहमखहोमःकार्यः नात्रप्रधानदेवताहोमः ग्रन्थांतरेतुताम्रकलशेराजतप्रतिमायांबृहस्पतिमन्त्रेणवागीश्वरं संपूज्यतदुत्तरेकुम्भचतुष्टयेपञ्चपल्लवादिकंकुङ्कुमचन्दनकुष्ठगोरोचनानि क्षिप्त्वावरुणंपूजयेदित्युक्तम्

**आचार्यायसशङ्खसमौक्तिकचन्द्रदानम् ग्रंथान्तरपक्षेताम्रपात्रसहितवागीश्वरदानं आयुर्वृद्ध्यर्थंसहस्राक्षेणेतिमन्त्रजपः दशावरब्राह्मणभोजनंचेति ।**

**नक्षत्रगण्डान्तशान्ति**—रेवती, आश्लेषा व ज्येष्ठा नक्षत्रांच्या शेवटच्या दोन दोन घटका आणि अश्विनी, मघा व मूळनक्षत्रांच्या आरंभींच्या दोन दोन घटका मिळून प्रत्येक चार चार घटकांचें एकेक अशीं तीन नक्षत्रगण्डान्तें आहेत. अश्विनी, मघा व मूळ यांच्या पूर्वार्धांत जर जन्म झाला, तर पित्याला पीडा होते. रेवती, आश्लेषा व ज्येष्ठा यांच्या उत्तरार्धांत जन्म झाल्यास बालकाच्या मातेला पीडा होते. गण्डान्तावर जन्मलेल्या सर्व बालकांचा त्याग करावा किंवा त्यांचें सहा महिने मुखावलोकन करूं नये, अथवा भक्तियुक्त मनानें सोममंत्रानें वरीच शान्ति करावी. 'अस्यशिशोरेवत्यश्विनीसन्ध्यात्मकगण्डान्तजननसूचितारिष्टनिरासार्थं नक्षत्रगण्डान्तशान्तिं करिष्ये' असा संकल्प करावा आणि गोमुखप्रसव शान्ति करून, १६।१८ किंवा ४ पलें ( एक पल=४० मासे ) वजनाचें कांश्याचें भांडें खिरीनें अथवा दुधानें भरून, त्यांत लोण्यानें भरलेला शंख ठेवावा व त्यावर चन्द्रबिम्बाची स्थापना करून 'सोमोऽहम्' असें ध्यान करावें. 'आप्यायस्व०' या मंत्रानें नंतर चंद्राची पूजा केल्यावर 'आप्यायस्व०' याच मंत्राचा एक हजार जप करावा. ग्रहमख होम करावा. या प्रसंगीं प्रधानदेवतेचा होम करूं नये. इतर कांहीं ग्रंथांत—तांब्याच्या कलशावरच्या प्रतिमेंत बृहस्पतीच्या मंत्रानें वागीश्वराची पूजा करून त्याच्या उत्तरेस चार कुंभांत पंचपल्लवादिक, कुंकू, चंदन, कुष्ट ( कोष्टवनस्पति ) व गोरोचन हीं अर्पण करून वरुणाची पूजा करावी, असें सांगितलें आहे. आचार्याला शंख व मोतीं यांचें चन्द्रासह दान करावें इतर कांहीं ग्रंथांत—तांब्याच्या पात्रासह वागीश्वराच्या प्रतिमेचें दान करून आयुष्यवृद्धीसाठीं 'सहस्राक्षेण०' या मंत्राचा जप करावा आणि दहांपेक्षां अधिक ब्राह्मणांना जेवूं घालावें असें सांगितलें आहे.

**अथतिथिगण्डान्तलग्नगण्डान्तशान्तिः पञ्चमीषष्ठयोर्दशम्येकादश्योः पञ्चदशीप्रतिपदोःसंधिभूतंघटीद्वयंतिथिगण्डान्तम् कर्कसिंहयोर्वृश्चिकधनुषोर्मनिमेषयोश्चलग्नयोःसंधिभूतैकाघटिकालग्नगण्डान्तम् तत्रतिथिगण्डान्तेपूर्वार्धेजन्मनितत्कालंस्नात्वावृषभदानंतन्मूल्यदानं वाकृत्वासूतकान्तेशान्तिः कार्या उत्तरार्धेजन्मनिशांतिमात्रम् लग्नगण्डान्तपूर्वार्धजन्मनिकाञ्चनदानम् उत्तरार्धेशांतिमात्रम् कुम्भेहेमप्रतिमायांवरुणंसंपूज्यवरुणोद्देशेनप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्ययासमिच्चर्वाज्यतिलयवानांहोमःकार्यः यवव्रीहिमाषतिलमुद्गानांदक्षिणात्वेनदानमिति॥**

**तिथिगण्डान्त व लग्नगण्डान्त यांची शान्ति**—पंचमी व षष्ठी, दशमी व एकादशी, पौर्णिमा व अमावास्या आणि प्रतिपदा—या तिथींच्या सन्धिकालाच्या ज्या दोन घटका ( म्हणजे वरील प्रत्येक जोड तिथीच्या शेवटची एक व आरंभाची एक घटका मिळून दोन घटका ) त्यांना तिथिगण्डान्त असें म्हणतात. कर्क व सिंह, वृश्चिक व धनु आणि

मीन व मेष—या लग्नांच्या संधिकालांतली जी एक घटका ( म्हणजे वरील तिन्ही लग्नांच्या मध्यांतली पहिल्या राशीची शेवटची अर्धी व दुसऱ्या राशीच्या आरंभाची अर्धी मिळून एक घटका ) त्यांना तिथिगण्डान्त असें म्हणतात. तिथिगण्डान्तांतल्या पूर्वार्धीं जर बालकाचा जन्म झाला, तर तत्काळ स्नान करून एक बैल दान द्यावा किंवा त्याच्या किंमतीचें द्रव्यदान करावें आणि सोयर संपल्यावर शान्ति करावी. उत्तरार्धांत जन्म झाला असल्यास फक्त शान्ति तेवढी करावी. लग्नगण्डान्ताच्या पूर्वार्धांत जन्म झाल्यास सोनें दान देऊन शान्ति करावी. उत्तरार्धांत जन्म झाल्यास फक्त शान्तिच करावी. कलशावर सोन्याच्या वरुणाच्या प्रतिमेची पूजा करून त्याच्या नांवानें समिधा, चरु, तूप, तिळ व यव यांच्या प्रत्येकीं १०८ आहुतींनीं होम करावा व दक्षिणा म्हणून—यव, तांदूळ, उडीद, तिळ व मूग—हीं द्यावीत.

**अथदिनक्षयादिशान्तिः ।दिनक्षयेचभद्रायांप्रसूतिर्यदिजायते । यमघण्टे दग्धयोगेमृत्युयोगेचदारुणे १ दुष्टयोगतिथीनांचनिषिद्धांशेषुचेत्तदा । अतिदोषकरीप्रोक्तातस्मिन्पापयुतेसति २ यमघण्टादयोज्योतिर्ग्रन्थेप्रसिद्धाः दुर्योगतिथीनांनिषिद्धभागास्तु विष्कंभवज्रयोस्तिस्रःषट्चगण्डातिगण्डयोः । परिघार्धपञ्चशूलेव्याघातेऽङ्कघटीस्त्यजेत् १ चतुःषडष्टनिध्यर्कभूततिथ्याद्यनाडिकाः । अष्टा ८ ङ्क ९ मनु १४ तत्त्वा २५ शा १० बाण ५ संख्या विवर्जयेत् १ इत्युक्ताज्ञेयाः दिनक्षयादिदोषेष्वेकैकदोषदूषितकालेजननेशिवेरुद्रैकादशिन्यभिषेकःकार्यः द्वित्रादिदोषसमुच्चयेग्रहयज्ञाश्वत्थप्रदक्षिणादिसमुच्चयः दीपंशिवालयेभक्त्याघृतेनपरिदापयेत् । गाणपत्यंपुरुषसूक्तंसौरंमृत्युंजयंशुभम् १ शान्तिजाप्यंरुद्रजाप्यंकृत्वा मृत्युंजयीभवेत् । इतिवाक्याद्बहुदोषे उक्तजपादिसमुच्चयोऽपि ॥**

**दिनक्षयादिशांति**—दिनक्षय, कल्याणी, यमघण्ट, दग्धयोग, मृत्युयोग, दारुणयोग, दुष्टयोग, तिथींच्या निषिद्ध घटका व पापयोग यांवर जर जन्म होईल, तर मोठा दोष सांगितला आहे. यमघण्टादि योग ज्योतिषग्रंथांत प्रसिद्ध आहेत' दुष्ट योग व तिथि यांचे जे निषिद्ध भाग ते येणेंप्रमाणें:—विष्कम्भयोग व वज्रयोग यांच्या पहिल्या तीन घटका, गण्ड व अतिगण्ड यांच्या पहिल्या सहा घटका परिघाचा अर्धा भाग, शूलाच्या पहिल्या पांच घटका व व्याघाताच्या पहिल्या नऊ घटका; चतुर्थीच्या ८, षष्ठीच्या ९, अष्टमीच्या १४, नवमीच्या २५, द्वादशीच्या १० व चतुर्दशीच्या ५ ( या सर्व प्रत्येकींच्या प्रारंभीच्याच घटका धरायच्या ) या निषिद्ध मानिल्या आहेत. दिनक्षयादि जे दोष सांगितले आहेत, त्यांपैकीं एकेका दोषानें दूषित अशा वेळीं जर जन्म होईल, तर शिवावर रुद्राच्या एकादशिनीचा अभिषेक करावा. दोन, तीन इत्यादि अनेक दोषांचा जर ( जन्मकालीं ) समुदाय असेल तर ग्रहयज्ञ, पिंपळाला प्रदक्षिणा वगैरे अधिक प्रायश्चित्तें करावीत शिवाच्या मन्दिरांत भक्तीनें तुपाचा दिवा लावावा.

"गणपतिसूक्त, पुरुषसूक्त, सौर, मृत्युंजय, शान्तिपाठ व रुद्रजप—हे शुभ पाठ केल्यानें मृत्यूवर जय मिळतो' असें वचन आहे; यास्तव, (जन्मसमयीं) जर अनेक दोष असतील, तर वर सांगितलेले जप करावेत.

**अथविषघटीशांतिः तत्रकौस्तुभेतिथिवारनक्षत्राणांविषनाडयउक्तास्तथापिज्योतिर्ग्रन्थेषुनक्षत्रविषघटिनामेवमहादोषत्वेनोक्तेर्नक्षत्रविषघटीष्वेव जनने-उक्तशान्तिः कार्या तिथ्यादिविषघटीनामुपदोषत्वाद्रुद्राभिषेकादिकंकार्यम् विषघटीलक्षणं कौस्तुभादौज्ञेयम् विषनाडीषुसंजातः पितृमातृधनात्मनाम् । नाशकृद्विषशस्त्राग्नैः क्रूरलग्नेऽशकेपिच १ एतद्विषनाडीषुशिशुजननसूचितारिष्टेत्यादिसंकल्पः एककुम्भेप्रतिमाचतुष्टयेरुद्रयमाग्निमृत्युदेवताः कद्रुद्रायय-मायसोममग्निर्मूर्धापरंमृत्योरितिमन्त्रैःसंपूजयेत् ग्रहान्वाधानान्ते रुद्रयमाग्निमृत्यून्समिच्चरुघृततिलाहुतिभिःप्रतिदैवतंप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिःशेषेणेत्यादि गृहसिद्धान्नस्यहोमः ॥**

**विषघटिकाशान्ति**—तिथि, वार व नक्षत्रें यांच्या विषघटिका जरी कौस्तुभांत सांगितल्या आहेत, तरी ज्योतिषग्रंथांत नक्षत्रांच्याच विषघटिकांचा विशेष दोष सांगितलेला आहे; म्हणून नक्षत्रांच्या विषघटिकांत जर जन्म झाला, तरच सांगितलेली शान्ति करावी. तिथ्यादिकांच्या ज्या विषघटिका सांगितल्या आहेत, त्यांचा दोष फार थोडा आहे; यास्तव त्यांवर जन्म झाल्यास रुद्राभिषेकादि करावींत. विषघटिकांचें लक्षण कौस्तुभ वगैरे ग्रंथांत पाहावें. 'विषघटिकांत जन्म पावलेलें बालक--पित्याच्या धनाचा व स्वतःचा—विष, शस्त्र, अस्त्र इत्यादिकांनीं नाश करणारें होतें. तद्वतच क्रूर ग्रहानें युक्त असणाऱ्या लग्नावर व लग्नांशांत जन्मलेलें मूलहि हेंच फळ देतें असें जाणावें' असें वचन आहे. या बाबतींत 'एतद्विषनाडीषु शिशुजननसूचितारिष्ट०' वगैरे संकल्प करून, एका कलशावर चार प्रतिमांत—रुद्र, यम अग्नि व मृत्यु—या देवतांचें 'कद्रुद्राय० यमायसोम० अग्निर्मूर्धा० व परंमृत्यो०' या मंत्रांनीं पूजन करावें. ग्रहांचें अन्वाधान केल्यानन्तर 'रुद्रयमाग्निमृत्यून्समिच्चरुघृततिलाहुतिभिः प्रतिदैवतं प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिः शेषेणत्यादि' असें अन्वाधान करावें आणि घरांत शिजविलेल्या भाताचा होम करावा.

**अथयमलजननशान्तिः तत्रश्रौताग्निमतःसोग्नयेमरुत्वतेत्रयोदशकपालंपुरोडाशंनिर्वपेदितिऋग्वेदब्राह्मणोक्तेष्टिःयद्वा आश्वलायनसूत्रोक्तःकेवलमारुत-याग गृह्याग्निमतआश्वलायनस्यगृह्याग्नौमारुतश्चरुः अथयस्यवधूर्गौर्वाजनये-द्यमौततः । समरुद्भ्यश्चरुंकुर्यात्पूर्णाहुतिमथापिवा १ इतिकारिकोक्तेः गृह्याग्निशून्यबह्वृचः कात्यायनोक्तशान्तिंलौकिकाग्नौकुर्यात् ममभार्यायमलजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंमारुतेष्ट्यायक्ष्यइतिसंकल्पः श्रौताग्निमतः स्मार्ताग्निमतस्तुमारुतस्थालीपाकेनयक्ष्ये इतिसंकल्पः निरग्निस्तु सग्रहमखांकात्यायनोक्तांशांतिंकरिष्येइतिसंकल्प्य स्वस्तिवाचनादिआचार्यवरणान्तंकुर्यात् अष्टदिक्षुअष्टकलशानुविधिनासंस्थाप्यउदकपूरणादिसर्वौषधिप्र-**

क्षेपान्तेवरुणंपूजयेत् अष्टकलशोदकैर्दम्पत्योरभिषेकः आपोहिष्ठेति तिसृभिः कयानइतिद्वेआनःस्तुतइतिपञ्चेतिसप्तभिरैन्द्रीभिर्मोषुवरुणइतिपञ्चभिरिदमापइत्येकयाअपनइत्यष्टाभिराग्नेयीभिर्ऋग्भिःकार्यः अभिषिक्तौदम्पतीधृतश्वेतवस्त्रचन्दनौउदङ्मुखौतिष्ठेताम् प्राङ्मुखआचार्योग्निग्रहस्थापनान्तेअपस्तिसृभिराज्याहुतिभिरिन्द्रंसप्तभिर्वरुणंपञ्चभिरपएकयाग्निमष्टाभिराज्याहुतिभिःपूर्वत्राभिषेकार्थमुक्तैश्चतुर्विंशतिमन्त्रैरग्निंसोमंपवमानंपावकंमारुतं यमंअन्तकंमृत्युंचैकैकयाचर्वाहुत्यानाममन्त्रै शेषेणेत्यादिअन्वादध्यात् षट्त्रिंशद्वारंतूष्णींनिर्वापप्रोक्षणे अन्तेग्रहकलशोदकादिनाभिषेकः दासीमहिषीवडवागोहस्तिनीनां यमलजननेप्ययंशान्तिःकार्या इयं शान्तिर्ग्रहोत्पातेषु उलूककपोतगृध्रश्येनानांगृहप्रवेशेस्तम्भप्ररोहेवल्मीकप्ररोहेमधुजननेआसनशयनयानभङ्गेपल्लीपतनेसरठारोहणे छत्रध्वजविनाशेषुअन्येषूत्पातेषुचकार्येतिचकात्यायनमतम् साचसाग्निकैःकात्यायनैःस्वगृह्याग्नौकार्या निरग्निकैस्तैरन्यैश्चलौकिकाग्नौ इति यमलजननादिशान्तिः ॥

**यमलजननशान्ति**——अग्निहोत्री ब्राह्मणाच्या स्त्रीला जर यमल ( जुळें ) झालें, तर त्यानें 'मरुत्वत्' अग्नीला तेरा कपालांचा पुरोडाश अर्पण करावा, अशी जी ऋग्वेदब्राह्मणांत इष्टि सांगितली आहे (ती करावी). अथवा आश्वलायन सूत्रांत सांगितलेला मरुत्याग तेवढाच करावा. आश्वलायनशाखी जर गृह्याग्निधारक असेल, तर त्यानें गृह्याग्नीवर मरुत्चरु करावा. ज्याची बायको अथवा गाय जुळें प्रसवेल त्यानें मरुत् देवताप्रीत्यर्थ चरु अथवा पूर्णाहुति हीं करावींत असें कारिकाग्रंथांत सांगितलें आहे. जो आश्वलायनशाखी गृह्याग्निरहित असेल त्यानें ( अशा वेळीं ) कात्यायनानें सांगितलेली शान्ति लौकिकाग्नीवर करावी. अग्निहोत्र्यानें 'मम भार्यायमलजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं मरुतेष्ट्या यक्ष्ये' असा संकल्प करावा आणि अग्निरहितानें 'सग्रहमखां कात्यायनोक्तां शान्तिं करिष्ये' असा संकल्प करून, पुण्याहवाचनापासून आचार्यवरणापर्यंतचें कर्म करावें. आठ दिशांना आठ कलशांची विधियुक्त स्थापना करून, त्यांत उदक घालण्यापासून सर्वौषधी घालण्यापर्यंतचें कर्म झाल्यावर वरुणाची पूजा करावी. आठी कलशांतल्या पाण्यानें नवराबायकोंना अभिषेक करावा. 'आपोहिष्ठा०' या ३ ऋचा, 'कयान०' या ५ ऋचा, 'आनःस्तुत०' या ५ ऋचा, इन्द्रदेवतेच्या ५ ऋचा, 'मोषु० वरुण०' या ५, 'इदमाप०' ही एक व 'अपन०' या अग्निदेवतेच्या ८ इतक्या ऋचांनीं वर सांगितलेला दम्पत्याभिषेक करावा. नंतर दंपत्यानें श्वेत वस्त्र धारण करून चंदन लावल्यावर उत्तराभिमुख होऊन बसावें. पूर्वाभिमुख असलेल्या आचार्यानें अग्नि व ग्रह यांची स्थापना केल्यावर—'अपस्तिसृभिराज्यहुतिभिरिन्द्रं सप्तभिर्वरुणं पञ्चभिरप एकयाग्निमष्टाभिराज्यहुतिभिः पूर्वत्राभिषेकार्थमुक्तैश्चतुर्विंशतिमन्त्रैरग्निं सोमं पवमानं पावकं मारुतं मरुतः यमं अन्तकं मृत्युं चैकैकया चर्वाहुत्या नाममन्त्रैः शेषेणेत्यादि' असें अन्वाधान करावें. मंत्ररहित असे ३६ वेळां निर्वाप ( तांदूळ घेणें )

करून, ते तितके वेळां ( ३६ ) धुवावेत, व शेवटीं कलशांतल्या पाण्यानें अभिषेक करावा. दासी, म्हैस, घोडी, गाय, हत्तिण यांना जरी ( यमल ) जुळीं झालीं तरीही शान्ति करावी. ग्रहांचे उत्पात, घुबड, कपोत, गिधाड, ससाणा हीं घरांत आलीं असतां आणि खांबाला अंकुर फुटणें, वारुळ उत्पन्न होणें, आसन, पलंग, यान वगैरे भंग होणें, पल्लिपतन, सरठारोहण, छत्रध्वजांचा नाश वगैरे उत्पात झाले असतांहि शान्ति करावी, असें कात्यायनाचें मत आहे. साग्निक कात्यायनशाखीयांनीं, ही शान्ति, आपल्या गृह्याग्नीवर करावी. जे कोणी अग्निरहित कात्यायनशाखेचे असतील त्यांनीं लौकिकाग्नीवर ( ही शान्ति ) करावी. अशी ही यमलजननादि शान्ति आहे.

अथत्रिकप्रसवशान्तिः सुतत्रयेसुताचेत्स्यात्तत्त्रयेवासुतोयदि । मातापित्रोः कुलस्यापितदानिष्टंमहद्भवेत् १ ज्येष्ठनाशोवित्तहानिर्दुःखंवासुमहद्भवेत् । गोप्रसवंकृत्वा ममसुतत्रयजन्मानंतरंकन्याजननसूचितसर्वारिष्टेतिवा कन्यात्रयजन्मानन्तरंपुत्रजननसूचितेतिवानिमित्तानुसारेणसंकल्पः स्थण्डिलपूर्वभागेग्रहस्थापनान्तेतदुत्तरतः कलशपंचकेस्वर्णप्रतिमासुब्रह्मविष्णुमहेशेन्द्ररुद्रानावाह्यपूजयेत् तत्रमन्त्राः ब्रह्मज्ञान० इदंविष्णु० त्र्यंबकं० यत इंद्र० कद्रुद्रायेति ग्रहपीठदेवतान्वाधानान्ते ब्रह्माणंविष्णुं महेशंइन्द्रंरुद्रंचप्रत्येकंसमिदाज्यचरुतिलैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरसहस्राष्टोत्तरत्रिशताष्टोत्तरशतान्यतमसंख्याहुतिभिः शेषेणेत्यादि ॥

**त्रिप्रसवशान्ति**—एकामागून एक असे तीन मुलगे झाल्यावर चौथी जर मुलगी किंवा मुलगा होईल तर ते मातापितरांच्या (दोहोंच्या) कुलास अनिष्ट जाणावें. त्यांनें ज्येष्ठ पुत्राचा नाश, वित्तहानि, दुःख वगैरे अनिष्टें उद्भवतात. यासाठीं गोप्रसवशान्ति करून 'मम सुतत्रयजन्मानन्तरं कन्याजननसूचितसर्वारिष्ट०' किंवा 'मम कन्यात्रयजन्मानन्तरं पुत्रजननसूचितसर्वारिष्ट०' इत्यादि संकल्प करावा आणि स्थंडिलावर पुढच्या भागीं ग्रहांची स्थापना केल्यावर त्यांच्या उत्तरेस पांच कलशांवर ब्रह्मा, विष्णु, महेश, इन्द्र व रुद्र यांचें सोन्याच्या प्रतिमांत आवाहन करून त्यांचें पूजन करावें. त्या देवतांचें आवाहन— 'ब्रह्मजज्ञानं० इदं विष्णु० त्र्यंबकं० यत इन्द्र० व कद्रुद्राय०' या मंत्रांनीं करावें. त्यानंतर ग्रहपीठस्थ देवतांचें अन्वाधान करून, 'ब्रह्माणं विष्णुं महेशं इन्द्रं रुद्रं च प्रत्येकं समिदाज्यचरुतिलैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरसहस्राष्टोत्तरत्रिशताष्टोत्तरशतान्यतमसंख्याहुतिभिः शेषेणेत्यादि' असें अन्वाधान करावें.

अथदन्तजननशान्तिः उपरिप्रथमंयस्यजायन्तेथशिशोर्द्विजाः । दन्तैर्वासहयस्यस्याज्जन्मभार्गवसत्तम १ द्वितीयेचतृतीयेचतुर्थेपञ्चमेतथा । यदादन्ताश्चजायन्तेमासेचैवमहद्भयम् २ मातरंपितरंवाथखादेदात्मानमेवच बालानामष्टमेमासिषष्ठेमासिततःपुनः ३ दन्तायस्यचजायन्तेमातावाम्रियतेपिता । बालकःपीड्यतेवात्रस्वयमेवनसंशयः ४ केचित्तुअष्टमेमासिदन्तजन्मशुभमाहुः

तत्रास्याशिशोः प्रथममूर्ध्वदन्तजननसूचितसर्वारिष्टेत्यादिसदन्तजननसूचितेत्यादिवा द्वितीयमासेदन्तजननसूचितेत्यादिवासंकल्पंयथानिमित्तंयोजयेत् स्थण्डिलोत्तरभागेनौकायांस्वर्णपीठेवास्वस्तिकयुतेबालमुपवेश्य सर्वौषध्यादियुक्तजलैःस्नापयित्वास्थण्डिलपूर्वतः कलशेप्रतिमासु धातारंवह्निं सोमंवायुंपर्वतान्केशवंचेतिषट्देवताःसंपूज्य ग्रहान्वाधानान्ते धातारंसकृच्चरुणावन्ह्यादिपञ्चदेवता एकैकयाज्याहुत्या शेषेणेत्यादिअन्वादध्यात् धात्रेत्वा जुष्टंनिर्वपामीत्यादिनिर्वापप्रोक्षणे नाम्नाचरुहोमः स्रुवेणवन्ह्यादिभ्यःपञ्चाज्याहुतयोपिनाम्नैव होमान्तेदक्षिणांदत्त्वासप्ताहंयथाशक्तिब्राह्मणान्भोजयेत् अष्टमदिनेकाञ्चनादिदत्त्वा कर्मेश्वरार्पणंकुर्यात् षष्ठाष्टममासयोर्दन्तजननेतु एकस्याबृहस्पतिदेवतायाः पूजनम् दधिमधुघृताक्तानामश्वत्थसमिधामष्टोत्तरशतं बृहस्पतिमन्त्रेणहोमः आज्येनस्विष्टकृदादि इतिदन्तजननशान्तिः ॥

**दन्तजननशान्ति**—ज्या बालकाला वरचे दांत आधीं येतात किंवा जें बालक दांतांसह जन्माला येतें, अथवा दुसरा, तिसरा, चौथा आणि पांचवा या महिन्यांत ज्या बालकांना दांत येतात, तेव्हां मोठें भय प्राप्त होतें. माता, पिता यांना अथवा स्वतःलाच तो मारतो. सहाव्या अथवा आठव्या महिन्यांत दांत आल्यास त्याची आई अथवा बाप मरण पावतात, किंवा बालकालाच निःसंशय पीडा होते. आठव्या महिन्यांत दांत आल्यास तें शुभ लक्षण होय, असें कांहीं ग्रंथकारांचें मत आहे. पहिल्यानें जर वरचे दांत येतील तर 'अस्य शिशोः प्रथममूर्धदन्तजननसूचितसर्वारिष्ट०' किंवा दांतांसह जन्म झाला असल्यास 'अस्य शिशोःसदन्तजननसूचित०' अशा प्रकारें योग्य तो संकल्प करावा. स्थंडिलाच्या उत्तरेस नौका अथवा स्वस्तिकयुक्त सुवर्णपीठ यांपैकीं एका कशावर तरी बालकाला ठेवून, सर्वौषधियुक्त अशा पाण्यानें त्याला स्नान घालावें व नंतर स्थण्डिलाच्या पूर्वभागीं ठेवलेल्या कलशावरील प्रतिमांत—धाता, वह्नि, चन्द्र, वायु, पर्वत आणि केशव या सहा देवतांची पूजा करावी. ग्रहांचें अन्वाधान केल्यावर 'धातारं सकृच्चरुणा वन्ह्यादिपञ्चदेवता एकैकयाज्याहुत्याशेषेणेत्यादि' असें अन्वाधान करावें. 'धात्रे त्वा जुष्टं निर्वपामि' असें म्हणून निर्वाप व प्रोक्षण हीं करावींत. चरूचा होम नाममंत्रानें करावा. स्रुवापात्रानें (यज्ञांतील लांकडी पळी) वन्हि वगैरे देवतांना नाममंत्रानेंच पांच आहुति द्याव्या. होमानन्तर दक्षिणा द्यावी. सात दिवसपर्यंत रोज ब्राह्मणांना यथाशक्ति भोजन द्यावें. आठव्या दिवशीं सुवर्णाचें वगैरे दान करून सर्व कर्म ईश्वराला अर्पण करावें. सहावा आठवा या महिन्यांत जर दांत येतील तर, फक्त एका बृहस्पतिदेवतेचीच पूजा करावी, व दहीं मध आणि तूप यांत भिजविलेल्या पिंपळाच्या समिधांनीं बृहस्पतिमंत्रानें १०८ होम करावा. घृतानें स्विष्टकृत् होम करावा. अशी ही दन्तजननशान्ति आहे.

अथप्रसववैकृतशान्तिः यत्रगर्भेविपर्यासोमानुषाणांगवामपि। अद्भुतानिप्रसूयन्तेतत्र देशस्यविद्रवः १ मानुषामानुषाणांचगोजाश्वमृगपक्षिणाम् ।

जायन्तेजातिभेदाश्चसदन्ताविकृतास्तथा २ बहुशीर्षाअशीर्षावाबहुकर्णा अकर्णकः। एकशृङ्गाद्वित्रिशृङ्गास्तथैवत्रिचतुर्भुजाः ३ दीर्घकर्णामहाकर्णा गजकर्णाश्चमानवाः। राजश्रेष्ठकुले नाशोधनस्यचकुलस्यच ४ अष्टोत्तरसहस्राणि-चरुंवैजुहुयाद्धृतम् । समिधांतुपलाशानांतर्पयेत्पूर्ववद्विजान् ५ अशिराजायतेजन्तुस्तथाद्वित्रिशिरास्तथा । अत्रसूर्याद्भुतेसूर्यंपूजयेज्जुहुयादपि ६ दध्याज्यमधुसंयुक्ताःसमिधस्त्वर्कसंभवाः। मृगीजनयतेसर्पान्मण्डूकांश्चैवमानुषान् ७ अत्राद्भुतेगीष्पतयेपूजाहोमंचकारयेत् ।औदुम्बरस्यसमिधो दधिसर्पिःसमन्विताः ८ स्त्रीगर्भपातोयमलंप्रसूयन्तेऽथवास्त्रियः। सदन्ताश्चैवजायन्तेजातमात्राहसन्तिच ९ बुधाद्भुतेबुधायात्रपूजाहोमौसमाचरेत्।संक्षेपेणयथाप्रज्ञमित्थंजननशान्तयः १० उक्ताजपाभिषेकार्थसूक्तादिबहुविस्तृतः।प्रयोगाःकौस्तुभादौचप्रसिद्धबहुशःपराः ११ अनेनप्रीयतांदेवोभगवान्विठ्ठलः प्रभुः ॥

**प्रसववैकृतशान्ति**—स्त्री अथवा गाय वगैरेंच्या पोटीं जेव्हां विपरीत प्रकारच्या जीवाचा जन्म होतो, तेव्हां देशावर आपत्ति येते. मनुष्य, पशु, गाई, अश्व, मृग, पक्षी इत्यादिकांच्या पोटीं—विजातीय, सदन्त, अकाळविकाळ, अनेक डोक्याचे, मस्तकरहित, अनेक कानांचे, कर्णरहित, एक दोन तीन शिंगांचे, तीन चार हातांचे लांब किंवा मोठ्या कानांचे, हत्तीसारख्या कानांचे वगैरे ( विपरीत प्रकारचे ) मानवी प्राणी जन्मतात, तेव्हां श्रेष्ठ अशा राजकुलांचा, धनाचा व कुलाचा नाश होतो. या बाबतींत चरु, घृत व पलाशसमिधा यांचा १००८ होम करावा. पूर्वींच्या शान्तींत सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणांना तृप्त करावें. मस्तकरहित किंवा दोन मस्तकांचा प्राणी जन्मेल, तर तें सूर्यासंबंधाचें अद्भुत होय. यास्तव, सूर्यपूजन करून, दहीं, घृत व रुईच्या समिधा यांनीं होम करावा. हरिणीला जेव्हां सर्प, बेडूक, मनुष्य वगैरेपैकीं कांहीं होईल तेव्हां तें अद्भुत बृहस्पतीसंबंधानें असल्यानें बृहस्पतीची पूजा करून, दहीं व तूप यांत भिजविलेल्या उंबराच्या समिधांनीं होम करावा. स्त्रीचा गर्भपात होईल, तिला जुळें होईल, दांतांसह मूल निपजेल किंवा जन्म झाल्याबरोबर मूल हंसेल, तर तें बुधाचें अद्भुत असल्यानें बुधासंबंधाची पूजा व होम हीं करावींत. याप्रमाणें विपरीतजननासंबंधाच्या शान्ति यथामति थोडक्यांत सांगितल्या. या माझ्या कृतीनें भगवान् विठ्ठल संतुष्ट होवो.

अथनामकरणम् तत्रजन्मदिनेजातकर्मानन्तरंतत्कालः क्वचित्एकादशाहेद्वादशाहेवा विप्रस्यनामकर्म दशमदिनेआशौचसत्त्वेपिवचनान्नामकर्मकार्यमितिकेचित् क्षत्रियाणांत्रयोदशेषोडशेवादिने वैश्यानां षोडशेविंशतितमेवा दिने द्वाविंशेमासान्तेवाशूद्राणाम् मासान्तेशततमेदिनेवत्सरान्तेवेतिविप्रादीनांगौणकालः मुख्यकालेकुर्वन्नविप्रादिःपुण्यतिथिनक्षत्रचन्द्रानुकूल्यादिगुणादरंनकुर्यात् उक्तमुख्यकालातिक्रमेशुभनक्षत्रादिकमावश्यकम् वैधृतिव्यतिपातसंक्रान्तिग्रहणदिनामावास्याभद्रासुप्राप्तकालेपिनामकर्मादिशुभकर्मनकार्यम् अत्रमलमासगुरुशुक्रास्तादिदोषोनास्तीत्युक्तम् अपराह्णेरात्रौचनामकर्मवर्ज्यम् अथोक्त-

**कालातिक्रमेऽपेक्षितशुभंतिथ्यादि चतुर्थीषष्ठयष्टमीनवमीद्वादशीचतुर्दशीपञ्चदशीरहितास्तिथयः प्रशस्ताः चन्द्रबुधगुरुशुक्रा वासराः अश्विनीत्र्युत्तरारोहिणीमृगपुनर्वसुपुष्यहस्तस्वात्यनुराधाश्रवणधनिष्ठाशततारकारेवतीनक्षत्राणि वृषभसिंहवृश्चिकलग्नानिप्रशस्तानि ।**

**नामकरणसंस्कार**—जन्मदिवशीं जातकर्म केल्यानंतर नामकरणाचा काळ सांगितला आहे. ब्राह्मणाचें नामकरण बाराव्या किंवा क्वचित् अकराव्या दिवशीं करावें. अशौच असतांही दहाव्या दिवशीं नामकरण करण्याचें वचन असल्यानें, तें तसें करावें असें कोणी ग्रंथकार सांगतात. क्षत्रियाचें नामकरण तेराव्या किंवा सोळाव्या दिवशीं करावें. वैश्याचें तेराव्या किंवा सोळाव्या दिवशीं करावें. शूद्राचें बाविसाव्या दिवशीं किंवा एक महिन्यानें करावें. एक महिना, शंभर दिवस, एक वर्ष वगैरे—ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांना—अनुक्रमें नामकरणाला गौण काल आहेत. नामकरण मुख्य काळीं करण्यास ब्राह्मणानें—शुभतिथि, शुभ नक्षत्र, चन्द्रबल वगैरे पाहाण्याचें कारण नाहीं. मुख्य काळ जर टळेल, तर शुभनक्षत्रादिक अवश्य पाहावींत. वैधृति, व्यतीपात, संक्रान्ति, ग्रहणदिवस, अमावास्या, भद्रा वगैरे जर योग्य काळीं असलीं तर नामकरण वगैरे कर्म करूं नये. या बाबतींत मलमास, गुरुशुक्रांचे अस्त वगैरेंचे दोष नाहींत, असें सांगितलें आहे. अपराह्णकाळीं व रात्रीं नामकरण करणें वर्ज्य आहे. उक्त कालाचा अतिक्रम झाल्यास इष्ट अशी शुभ तिथि वगैरे—चतुर्थी, षष्ठी, नवमी, द्वादशी, चतुर्दशी, चतुर्दशी, पौर्णिमा आणि अमावास्या यांशिवाय बाकींच्या तिथि प्रशस्त होत. सोमवार, बुधवार, गुरुवार व शुक्रवार हे शुभ होत. अश्विनी, तीन उत्तरा, रोहिणी, मृग, पुनर्वसु, पुष्य, हस्त, स्वाती, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका व रेवती—हीं नक्षत्रें आणि वृषभ, सिंह व वृश्चिक हीं लग्नें प्रशस्त होत.

**तानिनामानि चतुर्विधानि देवतानाममासनामनक्षत्रनामव्यावहारिकनामेति तत्रामुकदेवताभक्तइत्याकारकंदेवतानामप्रथमम् चैत्रादिमासनामानिवैकुण्ठोथजनार्दनः । उपेन्द्रोयज्ञपुरुषोवासुदेवस्तथाहरिः १ योगीशःपुण्डरीकाक्षः कृष्णोनन्तोऽच्युतस्तथा । चक्रीति द्वादशैतानिक्रमादाहुर्मनीषिणः २ इत्यनुसारेणमासनामद्वितीयकम् मासाश्चात्रचान्द्राः तेच शुक्लादिकृष्णान्तापव यस्मिन्नक्षत्रेजन्मतन्नक्षत्रवाचकशब्दात्तत्रजातइत्यधिकारविहिततद्धितप्रत्यये-कृतेनिष्पन्नंनाक्षत्रंनामतृतीय तद्यथा अश्वयुक् आपभरणः कार्तिकः रौहिणः मार्गशीर्षः आर्द्रकः पुनर्वसुः पुष्यः आश्लेषः माघः पूर्वाफल्गुनः उत्तराफल्गुनः हस्तः चैत्रः स्वातिः विशाखः अनुराधः ज्यैष्ठः मूलकः पूर्वाषाढः उत्तराषाढः आभिजितः श्रावणः श्रविष्ठाः शतभिषक् पूर्वाप्रोष्ठपादः उत्तराप्रोष्ठपादः रैवतः इतिकेचित्तु चूचेचोलाश्विनीप्रोक्तेत्यादिज्योतिर्ग्रन्थोक्तावकहडाचक्रानुसारेणाश्विन्यादेश्चतुर्षुचरणेषु चूडामणीश्चेदीशश्चोलेशोलक्ष्मणइत्यादिकानि नाक्षत्रनामानिकुर्वन्ति तन्नश्रौतग्रन्थादिबहुसंमतम् सांख्यायनास्तुकृत्तिको-**

त्पन्नस्याग्निशर्मेतिनक्षत्रदेवतासंबद्धंनाक्षत्रंनामकुर्वन्ति एवंकातीयाअपि नाक्षत्रनामैवाभिवादनीयंगुप्तंचामौञ्जीबन्धनात् मातापितरावेवंजानीयाताम् व्यावहारिकंनामचतुर्थम् तच्चकवर्गादिषुतृतीयचतुर्थपञ्चमवर्णहकारान्यतमवर्णाद्यावयवकंयरलवान्यतममध्यवर्णयुतंऋलवर्णरहितंविसर्गान्तंपित्रादिपुरुषत्रयान्यतमवाचकंशत्रुवाचकभिन्नंतद्धितप्रत्ययरहितंकृत्प्रत्ययान्तंयुग्माक्षरंपुंसामयुग्माक्षरंस्त्रीणांकार्यम् यथादेवइतिहरिरिति उक्तसर्वलक्षणाभावेसमाक्षरंपुंसामयुग्माक्षरंस्त्रीणामित्येकलक्षणयुतमेव यथारुद्रइतिराजेत्यादि अक्षरमत्रस्वरः व्यञ्जनेषुनसंख्यानियमः अत्रविशेषःद्व्यक्षरंप्रतिष्ठाकामश्चतुरक्षरंब्रह्मवर्चसकामः अन्त्यलकाररेफंवर्जयेदिति आपस्तंबहिरण्यकेशिसूत्रेतु प्रातिपदिकादि धात्वन्तंयथाहिरण्यदाइतिउपसर्गयुतंवा सुश्रीरित्यादीतिविशेषउक्तः तच्चव्यावहारिकं नामशर्मपदान्तंदेवपदान्तंवाब्राह्मणस्य वर्मेतिराजेतिवापदयुतंक्षत्रियस्य गुप्तदत्तान्यतरान्तंवैश्यस्य दासान्तं शूद्रस्य कार्यम् व्यावहारिकंनामप्रासादादीनामपिकार्यम् देवालयगजाश्वानां वृक्षाणांवापिकूपयोः सर्वापणानांपण्यानांचिह्नानांयोषितांनृणाम् १ काव्यादीनांकवीनांचपश्वादीनांविशेषतः। राजप्रासादयज्ञानांनामकर्मयथोदितम् २ इत्युक्तेः ।

**नामप्रकार**—नांवाचे जे चार प्रकार आहेत, ते येणेंप्रमाणें:—देवतासंबंधीं, महिन्यासंबंधीं, नक्षत्रासंबंधीं आणि व्यवहारासंबंधीं. अमुक देवतेचा भक्त अशा अर्थीं जें नांव तें देवतेसंबंधाचें पहिल्या प्रकारचें. दुसरा प्रकार महिन्यासंबंधीं नांवाचा. वैकुण्ठ, जनार्दन, उपेन्द्र, यज्ञपुरुष, वासुदेव, हरि, योगीश, पुण्डरीकाक्ष, कृष्ण, अनंत, अच्युत व चक्री हीं बारा नांवें चैत्रादि (बारा) महिन्यांसंबंधानें जाणावींत. या ठिकाणीं जे बारा महिने घ्यायचे ते शुद्धपक्षाच्या आरंभापासून वद्यपक्षाच्या अखेरीपर्यंतच्या चान्द्रमासाचे घ्यावेत. ज्या नक्षत्रावर जन्म झाला असेल त्या नक्षत्राच्या वाचक शब्दाचा 'जातः' या अर्थीं तद्धित प्रत्यय करून सिद्ध झालेलें जें नांव तें तिसऱ्या प्रकारचें नक्षत्रनाम. जसें:—अश्वयुक्त (अश्विनी नक्षत्रावर जन्मलेला), आपभरण, कार्तिक, रौहिण, मार्गशीर्ष, आर्द्रक, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, माघ, पूर्वाफाल्गुन, उत्तराफाल्गुन, हस्त, चैत्र, स्वाति, विशाख, अनुराध, ज्येष्ठ, मूलक, पूर्वाषाढ, उत्तराषाढ, अभिजित, श्रवण, धनिष्ठ, शतभिषक्, पूर्वाप्रोष्ठपाद, उत्तराप्रोष्ठपाद आणि रैवत. चू, चे, चो, ला अश्विनी वगैरे जें ज्योतिषग्रंथांत अवकहडाचक्र सांगितलें आहे, त्याला अनुसरून अश्विनी नक्षत्रांतल्या चार चरणांत जन्मलेल्या मुलाचें नांव—चूडामणि, चेदीश, चोलेश, लक्ष्मण वगैरे नक्षत्रासंबंधीं नांव ठेवण्यास कांहीं ग्रंथकार सांगतात; परंतु असें नांव ठेवण्याचें श्रौतग्रंथादिकांना संमत नाहीं. जे सांख्यायन आहेत, ते तर कृत्तिकानक्षत्रावर जन्मलेल्याचें 'अग्निशर्मा' असें नक्षत्रदेवतेसंबंधाचें नांव ठेवतात. याप्रमाणेंच कात्यायनशाखीसुद्धां नक्षत्रदेवतेसंबंधाचें नांव ठेवतात. नक्षत्रसंबंधाचें नांव—माता, पिता गुरु वगैरेंना नमस्कार करण्याच्या कामीं येत असून तें मौंजीबन्धनापर्यंत जरी गुप्त असावें, तरी तें फक्त माता व पिता

यांसच माहीत असावें. चौथ्या प्रकारचें जें व्यावहारिक नांव तें कवर्गादि पांच वर्गातल्या मृदुव्यंजनांपैकीं ज्याचा वर्ण आरंभीं आहे असे किंवा हकार ज्याच्या आरंभीं आहे असें असावें. त्याच्यामध्यें य र ल अथवा व पैकीं एक वर्ण असावा. अंतीं ऋ अथवा ऌ नसून विसर्ग असावा. बाप, आजा किंवा पणजा यांच्या नांवांपैकीं कोणाचें तरी तें नांव वाचक असावें व शत्रूच्या नांवाचें वाचक नसावें. तें नांव तद्धितप्रत्ययान्त नसून कृत्प्रत्ययान्त असावें. पुत्राचें सम अक्षरांचें व मुलीचें विषम अक्षरांचें असावें. उदाहरण—देव, हरि वगैरे. वर सांगितलेलीं लक्षणें नसल्यास पुत्राचें सम अक्षरांचें व कन्येचें विषम अक्षरांचें हें एकच लक्षण असावें. उदाहरणार्थ—रुद्र, राजा इत्यादि. येथें अक्षर म्हणजे स्वर समजावा. व्यंजनांच्या संख्येचा नियम नाहीं. या बाबतींतला विशेष म्हणजे मुलाच्या प्रतिष्ठेची इच्छा करणारानें दोन अक्षरीं नांव ठेवावें व ब्रह्मतेजाची इच्छा करणाऱ्यानें चार अक्षरीं ठेवावें; पण शेवटीं लकार व वकार नसावेत. आपस्तंब व हिरण्यकेशी सूत्रांत प्रातिपदिकानें आरंभ होणारें व धातूनें शेवट होणारें किंवा उपसर्गयुक्त नांव ठेवावें असा विशेष सांगितला आहे. उदाहरणार्थ, हिरण्यदा, सुश्री वगैरे. ब्राह्मणाचें व्यावहारिक नांव 'शर्मा' किंवा 'देव' या पदांनीं अंत होणारें असावें, क्षत्रियाचें 'वर्मा' अथवा 'राज' या पदानें अंत होणारें असावें, वैश्याचें 'गुप्त' अथवा 'दत्त' या पदांनीं अंत होणारें असावें आणि शूद्राचें 'दास' पदानें अंत होणारें असावें. व्यावहारिक नांव राजवाडा वगैरेंनाही ठेवावें. देऊळ, हत्ती, घोडा, झाड, विहीर, डबकें, बाजारांत विकण्याचे सर्व पदार्थ, चिन्हें, स्त्री, पुरुष; काव्य, कवि, पशु, राजवाडा, यज्ञ इत्यादिकांचेंहि नांवें वर सांगितल्याप्रमाणें ठेवण्यास वचन आहे.

**अथप्रयोगेविशेषः गर्भाधानादिसंस्कारलोपेप्रत्येकंपादकृच्छ्रं बुद्धिपूर्वमकरणेप्रत्येकमर्धकृच्छ्रंप्रायश्चित्तंजातकर्मणःकालातिपत्तिनिमित्तकाज्यहोमपूर्वकं कार्यम् तद्यथा जातकर्मणः कालातिपत्तिनिमित्तकदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंप्रायश्चित्तहोमंकरिष्यइतिसंकल्प्याग्निस्थापनेध्माधानादिपाकयज्ञतन्त्रसहितंवह्निस्थापनाज्यसंस्कारपात्रसंस्कारमात्रसहितंवाभूर्भुवःस्वः स्वाहेतिसमस्तव्याहृत्याज्यहोमंकुर्यात् होमंसमाप्यगर्भाधानपुंसवनानवलोभनसीमन्तोन्नयनलोपजनितदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंएतावतः पादकृच्छ्रान्बुद्धिपूर्वकलोपेर्धकृच्छ्रान्तप्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्यइतिसंकल्प्य द्रव्यंदद्यात् जातकर्मनाम्नोःसहचिकीर्षायांपूर्वोक्तजातकर्मसंकल्पवाक्यमुच्चार्य अस्यकुमारस्यायुरभिवृद्धिव्यवहारसिद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं नामकर्मच तन्त्रेणकरिष्यइतिसंकल्प्यस्वस्तिवाचनादिकुर्यात् तत्र जातकर्मनामकर्मणोः पुण्याहंभवन्तोब्रुवन्त्वित्युक्त्वा अस्यकुमारस्यजातकर्मणएतन्नाम्नेअस्मैचस्वस्तिभवन्तोब्रुवन्त्वितिस्वस्तिपर्यायेवदेत् तदनुसारेणैवविप्रप्रतिवचनम् केवलनामचिकीर्षायां नामकर्मणःपुण्याहमित्युक्त्वा स्वस्तिपर्यायेअमुकनाम्नेअस्मैस्वस्तिभवन्तोब्रुवन्त्विति-**

वदेत् विप्राश्चामुकनाम्नेअस्मैस्वस्तीतिप्रतिब्रूयुः लेखनादौनामत्रयंशर्मादिपदर-हितंकृत्वाव्यावहारिकंनामशर्माद्यन्तंकुर्यात् अभिवादनेनाक्षत्रनामापिशर्माद्य-न्तंसर्वत्रोच्चारणीयम् अवशिष्टःप्रयोगःप्रयोगग्रन्थेषु ।

**प्रयोगविशेष**—गर्भाधानादि संस्कारांचा ( न कळत ) लोप झालेला असल्यास प्रत्येक संस्काराबद्दल पादकृच्छ्रप्रायश्चित्त करावें. व जाणून-बुजून लोप झाला असल्यास अर्धकृच्छ्रप्रायश्चित्त करावें. जातकर्मसंस्काराचा जर काल टळून गेला तर, तन्निमित्त कराव्या लागणाऱ्या घृतहोमाच्या आधीं ( जें प्रायश्चित्त ) करावें तें असें:—'जातकर्मणः कालातिपत्तिनिमित्तकदोषपरिहारद्वारा श्रीपर-मेश्वरप्रीत्यर्थं प्रायश्चित्तहोमं करिष्ये' असा संकल्प करून, अग्निस्थापन व इध्मा-स्थापनादिक पाकयज्ञाच्या तंत्रासहित किंवा अग्निस्थापन आज्यसंस्कार पाकसंस्कार यांसह 'भूर्भुवः स्वः स्वाहा' या समस्तव्याहृतिमंत्रानें घृतहोम करावा. होमसमाप्तीनंतर—'गर्भाधानपुंसवनानवलोभनसीमन्तोन्नयनलोपजनितदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं एतावतः पादकृच्छ्रांबुद्धिपूर्वकलोपे अर्धकृच्छ्रान्तत्प्रत्याम्नायतोनिष्क्रयीभूत यथाशक्ति रजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये' अशा प्रायश्चित्त संकल्पानंतर द्रव्य द्यावें. जातकर्म :व नामकर्म हीं जर एकदमच करणें असतील तर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें जातकर्म-संकल्पवाक्य उच्चारून, 'अस्य कुमारस्याभिवृद्धिव्यवहारसिद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनि-बर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं नामकर्म च तन्त्रेण करिष्ये' असा संकल्प करून पुण्याहवाचनादिक करावींत. त्यांत 'जातकर्मनामकर्मणोः पुण्याहंभवन्तो ब्रुवन्तु' असें म्हणून 'अस्य कुमारस्य जातकर्मणे एतन्नाम्ने अस्मै च स्वस्ति भवन्तो ब्रुवन्तु' असें 'स्वस्ति' शब्दाच्या ऐवजीं म्हणावें व याच्याच अनुरोधानें ब्राह्मणांनीं प्रति-वचन म्हणावें. फक्त नामकर्मसंस्कारच करावयाचा असल्यास 'नामकर्मणः पुण्याहं भवन्तो ब्रुवन्तु' असें म्हणून 'स्वस्ति' शब्दाच्या ऐवजीं 'अमुकनाम्ने अस्मै स्वस्ति' असें प्रतिवचन म्हणावें. पहिलीं तीन नांवें 'शर्मा' पदरहित लिहून व्यावहारिक नांवाना 'शर्मा' हें पद लावावें. अभिवन्दन करण्यासंबंधानें जेथें जेथें म्हणून नाक्षत्रनामाचा उच्चार करावयाचा असेल, तेथें तेथें 'शर्मा' हें पद जोडावें. बाकीचा प्रयोग प्रयोगग्रंथांत पहावा.

अथस्त्रीणांनामकर्म संकल्पे अस्याःकुमार्याइतिविशेषः स्वस्तिवाचनेएतन्ना-म्न्यैअस्यैस्वस्तीत्यादि भक्तेत्याबन्तंदेवतानाम मासनामसुचक्रिणीवैकुण्ठीवासु-देवीतित्रीणिङीबन्तानिहरिरित्यविकृतं अवशिष्टानिअष्टावाबन्तानि रोहिणी-कृत्तिकेत्येवंयथायथंनाक्षत्रनामेतिमातृदत्तमते आश्वलायनैर्नाक्षत्रनामस्त्रीणां-नकार्यम् व्यावहारिकंयज्ञदाशर्मेतिपुंवत् पूजादिकं वैदिकमन्त्ररहितंपुंवत्कार्यम् पितुःसन्निधौस्त्रीपुंसयोर्नामपितामहादिःकुर्यात् इतिनामकरणम् ॥

**स्त्रीनामकर्म**—कन्येचें नामकरण करतांना संकल्पांत 'अस्याः कुमार्या॰' हा विशेष जाणावा. स्वास्तिवाचनांत 'एतन्म्न्यै अस्यै स्वस्ति' हा विशेष होय. देवतेचें नांव ठेवावयाचें तें 'भक्ता' असें आकारान्त असावें. मास-

नामांत सुचक्रिणी, वैकुण्ठी, वासुदेवी हीं तीन ईकारान्त समजावींत. हरि हें नांव मुलगा व मुलगी यांस सारखेंच आहे. बाकीचीं आठ नांवें आकारान्त आहेत. रोहिणी, कृत्तिका इत्यादि नाक्षत्र नांवें यथायोग्य ठेवावींत असें मातृदत्ताचें मत आहे. आश्वलायनशाखी यांनीं कन्येचें नाक्षत्रनांव ठेवूं नये. यज्ञदाशमीसारखीं पुत्राप्रमाणें व्यावहारिक नांवें ठेवावींत. पूजादिक पुत्राप्रमाणेंच पण अवैदिक मंत्रांनीं करावींत. पुत्राच्या किंवा कन्येच्या नामकरणसमयीं पिता जर जवळ नसेल, तर आजादिकांनीं नमस्कार करावा. असा हा नामकरणसंस्कार आहे.

अथान्दोलारोहणदुग्धपानजलपूजनानि आन्दोलाशयने पुंसोद्वादशो दिवसः शुभः। त्रयोदशस्तुकन्यायाननक्षत्राविचारणा १ अन्यस्मिन्दिवसे चेत्स्याच्छुभकालंविचारयेत्। उत्तरात्रयरोहिणीहस्ताश्विनीपुष्यरेवत्यनुराधा मृगचित्रापुनर्वसुश्रवणस्वातिनक्षत्रेषुशुभवारेरिक्तातिरिक्ततिथौचन्द्रताराबले कुलयोषिद्भिरान्दोलाशयनंकार्यम् एकत्रिंशदिनेद्वितीयजन्मर्क्षेवादोलारोहोक्तनक्षत्रैर्वापूर्वाह्णमध्याह्नयोःकुलदेवताविप्रयोःपूजांविधायशङ्खेनगोदुग्धंपाययेत् इतिदुग्धपानम् सूत्यामासोत्तरंबुधसोमगुरुवारेषुरिक्तान्यतिथौश्रवणपुष्यपुनर्वसुमृगहस्तमूलानुराधानक्षत्रेषुजलस्थानंगत्वाजलपूजाकार्या अत्रगुरुशुक्रास्तचैत्रपौषमासाधिमासावर्ज्याः इतिजलपूजनम् ॥

**आन्दोलारोहण, दुग्धपान व जलपूजन**—पुत्राला पाळण्यांत घालण्याला बारावा दिवस व कन्येला तेरावा दिवस हे शुभ होत. या दिवसांबद्दल नाक्षत्रविचार करण्याचें कारण नाहीं. या दिवसांवांचून इतर दिवशीं जर मूल पाळण्यांत घालायचें असलें तर शुभकालाचा विचार करणें हें योग्य आहे. तीन उत्तरा, रोहिणी, हस्त, अश्विनी, पुष्य, रेवती, अनुराधा, मृग, चित्रा, पुनर्वसु, श्रवण आणि स्वाति हीं नक्षत्रें असतां शुभवारीं व रिक्तातिथि सोडून इतर तिथींवर चंद्रतारकांचें बल पाहून कुलस्त्रियांनीं बालकाला पाळण्यांत ठेवावें. जन्मल्यापासून एकतिसाव्या दिवशीं किंवा दुसऱ्या जन्मनक्षत्रीं, अथवा आन्दोलनास ( पाळण्यांत घालण्यास ) जीं नक्षत्रें सांगितलीं त्या नक्षत्रीं पूर्वाह्णीं किंवा मध्यान्हीं कुलदेवता व ब्राह्मण यांची पूजा करून मुलाला शंखानें गाईचें दूध पाजावें, असें दुग्धपान सांगितलें आहे. बाळंतिणीनें एक महिना झाल्यावर बुधवार, गुरुवार किंवा सोमवार यांपैकीं कोण्यातरी एक्या वारीं रिक्तातिथिवांचून इतर तिथि असतांना श्रवण, पुष्य, पुनर्वसु, मृग, हस्त, मूळ अथवा अनुराधा यांपैकीं एका नक्षत्रीं पाणवठ्यावर ( जलस्थानीं ) जाऊन जलपूजन करावें. या बाबतींत गुरुशुक्रांचे अस्त आणि चैत्र, पौष व अधिक मास हे त्याज्य समजावे. असें हें जलपूजन आहे.

सूर्यावलोकननिष्क्रमणभूम्युपवेशनान्नप्राशनानि । तृतीयेमासिसूर्यावलोकनं चतुर्थेमासिअन्नप्राशनकालेवानिष्क्रमणम् तत्रकालः शुक्लपक्षःशुभः प्रोक्तः

कृष्णश्चान्त्यत्रिकंविना । रिक्ताषष्ठ्यष्टमीदर्शद्वादशीचविवर्जिता १ गुरुशुक्र-बुधवाराः अश्विनीरोहिणीमृगपुष्योत्तरात्रयहस्तधनिष्ठाश्रवणरेवतीपुनर्वस्वनु-राधानक्षत्राणिचशस्यानि इदंनिष्क्रमणंनित्यंकाम्यम् सूर्यावलोकननिष्क्रमण-योर्नान्दीश्राद्धंकृताकृतम् अथ भूम्युपवेशनकालः पञ्चममासेनिष्क्रमोक्तति-थ्यादौभौमबलेसतिभूम्युपवेशनंकार्यम् अथान्नप्राशनकालः षष्ठेऽष्टमेदशमे-द्वादशेवामासेपूर्णेवत्सरेवापुंसोन्नप्राशनम् पञ्चमसप्तमनवममासेषुस्त्रीणाम् द्वितीयाचतृतीयाचपञ्चमीसप्तमीतथा । त्रयोदशीचदशमीप्राशनेतिथयःशुभाः१ बुधशुक्रगुरुवाराःशुभाः रविचंद्रवारौक्वचित् अश्विनीरोहिणीमृगपुनर्वसुपुष्यो-त्तरात्रयहस्तचित्रास्वात्यनुराधाश्रवणधनिष्ठाशततारकारेवत्यःशुभाःजन्मनक्षत्र-मशुभमितिकेचित् भद्रावैधृतिव्यतीपातगंडातिगण्डवज्रशूलपरिघावर्ज्याः विष्णु-शिवचन्द्रार्कदिक्पालभूमिदिशाब्राह्मणान्संपूज्य मातुरुत्सङ्गगतस्य शिशोःकां-चनेकांस्येवापात्रेस्थितंदधिमधुघृतमिश्रंपायसंसुवर्णयुतहस्तेनसमन्त्रंप्राशयेत् सू-र्यावलोकनादीन्यन्नप्राशनान्तानिअन्नप्राशनकाले शिष्टाःसहैवानुतिष्ठन्ति एतेषांसहप्रयोगसंकल्पादिकंकौस्तुभादौज्ञातव्यम् अथान्नप्राशनान्तेकर्तव्यम् अग्रतोऽथपरिन्यस्यशिल्पवस्तूनिसर्वशः । शस्त्राणिचैव वस्त्राणिततःपश्येत्तु-लक्षणम् १ प्रथमंयत्स्पृशेद्बालःपुस्तकादिस्वयंतदा । जीविकातस्यबालस्यतेनै-वतुभविष्यति २ अन्नप्राशनान्तसंस्कारेषुमलमासगुरुशुक्रास्तादिदोषोनास्ति-इत्युक्तंतच्छुद्धकालेष्वसंभवेज्ञेयम् तेनषष्ठादिमासे अस्तादिदोषसत्वेऽष्टमादि-मासेकार्यम् इतिसूर्यावलोकननिष्क्रमणभूम्युपवेशनान्नप्राशनानि ॥

**सूर्यावलोकन, निष्क्रमण, भूम्युपवेशन आणि अन्नप्राशन**—तिसऱ्या महिन्यांत बालकाला सूर्य दाखवावा. चौथ्या महिन्यांत किंवा अन्नप्राशनसमयीं त्याचें निष्क्रमण ( घराबाहेर नेणें ) करावें त्याविषयीं शुभकालः—शुक्लपक्ष व कृष्णपक्षाचे शेवटचे तीन दिवस खेरीजकरून बाकीचा काळ हे शुभ होत. चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, षष्ठी, अष्टमी, अमावास्या व द्वादशी या तिथि वर्ज्य कराव्या. गुरु, शुक्र व बुध हे वार आणि अश्विनी, रोहिणी, मृग, पुष्य, तीन उत्तरा, हस्त, धनिष्ठा, श्रवण, रेवती, पुनर्वसु व अनुराधा हीं नक्षत्रें प्रशस्त होत. हें निष्क्रमण नित्य व काम्य आहे. सूर्यदर्शन व निष्क्रमण यांत नान्दीश्राद्ध कृताकृत ( करावें अथवा न करावें ) आहे. भूम्युपवेशन म्हणजे बालकाला जमिनीवर ठेवण्याचा जो काल तो पांचव्या महिन्यांत निष्क्रमणाच्या उक्त दिवशीं मंगळाचें बळ पाहून योजावा. सहाव्या, आठव्या, दहाव्या किंवा बाराव्या महिन्यांत अथवा बालक पूर्ण वर्षाचें झाल्यावर त्याचें अन्नप्राशन करवावें. पांचव्या, सातव्या किंवा नवव्या महिन्यांत कन्येचें अन्नप्राशन करावें. अन्नप्राशनाला—द्वितीया, तृतीया, पञ्चमी, सप्तमी, दशमी, व त्रयोदशी या तिथि शुभ होत. बुध, गुरु व शुक्र हे वार शुभ होत. रवि व सोम हेही वार क्वचित् शुभ सांगितले आहेत. अश्विनी, रोहिणी, मृग, पुनर्वसु, पुष्य, तीन उत्तरा, हस्त, चित्रा,

स्वाती, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका व रेवती हीं नक्षत्रें शुभ होत. कोणी ग्रंथकार जन्मनक्षत्र शुभ असल्याचें सांगतात. भद्रा, वैधृति, व्यतिपात, गण्ड, अतिगण्ड, वज्र, शूल व परिघ हे योग वर्ज्य करावेत. विष्णु, शिव, चन्द्र, रवि, अष्ट-दिक्पाल, भूमि, दिशा व ब्राह्मण यांची पूजा करून, मातेच्या मांडीवर असलेल्या बालकाला सोन्याच्या किंवा काश्याच्या भाड्यांत दहीं, मध व तूप यांच्या मिश्रणाची खीर सोन्याच्या अलंकारानें युक्त अशा हातानें, मंत्र म्हणून प्राशन करवावी. सूर्यदर्शनापासून अन्नप्राशनापर्यंतचीं जीं कर्में करायचीं, तीं सर्व कर्में शिष्ट जन अन्नप्राशनसमयींच करतात. अन्नप्राशनाबरोबर या कर्मांचे जे प्रयोग ते कौस्तुभांत पहावेत. अन्नप्राशनानन्तरचा विधि—बालकाच्या पुढें सर्व कलाकौशल्याचे पदार्थ, शस्त्रें, वस्त्रें, पुस्तकें वगैरे ठेवून ( त्याला सोडून द्यावें व ) त्यांवरून लक्षण पाहावें, बालक पहिल्या प्रथम ज्या वस्तूला स्पर्श करील, त्याच्यावरच पुढें त्याची उपजीविका चालेल. सूर्यदर्शनापासून अन्नप्राशनापर्यंतच्या या संस्कारांविषयीं मलमास व गुरुशुक्रांचे अस्त यांचा दोष नसल्याबद्दलचें जें वचन आहे तें हे संस्कार उक्तकालीं जर केले नाहींत तर आहे असें समजावें; म्हणून सहाव्या महिन्यांत जर अस्तादि दोष असतील, तर हे संस्कार आठव्या महिन्यांत करावेत. याप्रमाणें सूर्यावलोकन, निष्क्रमण, भूम्युपवेशन व अन्नप्राशन या संस्कारांचा निर्णय समजावा.

अथकर्णवेधः दशमेद्वादशेवाह्निषोडशेकर्णवेधनम् । मासेषष्ठेसप्तमेवा अष्टमेदशमेपिवा १ द्वादशेवाततोऽब्देचप्रथमेवातृतीयके । नकर्तव्यंसमेवर्षे-स्त्रीपुंसःश्रुतिवेधनम् २ तृतीयादिवत्सरेमासाःकार्तिकेपौषमासेवाचैत्रेवाफाल्गुनेपिवा । शुक्लपक्षःशुभःप्रोक्तोजन्ममासो निषेधितः १ भद्रायांविष्णुशयने-कर्णवेधंविवर्जयेत् । तेनकार्तिकमासविधिःशुक्लद्वादश्युत्तरं ज्ञेयः केचिन्मीनस्थ-सूर्येचैत्रंधनुस्थेपौषंमासंवर्जयन्ति द्वितीयादशमीषष्ठीसप्तमीचत्रयोदशी । द्वादशीपञ्चमीशस्तातृतीयाकर्णवेधने १ चन्द्रबुधगुरुशुक्रवाराः पुष्यपुनर्वसुमृगोत्तरात्रयहस्तचित्राश्विनीश्रवणरेवतीधनिष्ठाःशुभाः विष्णुरुद्रब्रह्मसूर्यचन्द्र-दिक्पालनासत्यसरस्वतीगोब्राह्मणगुरुपूजांकृत्वालक्तकरसाङ्कितंकर्णंपुंसः पूर्वं-दक्षिणंविध्येत्पश्चाद्वामम् स्त्रीणांपूर्ववामं सौवर्णीराजपुत्रस्यराजतीविप्रवैश्ययोः । शूद्रस्यचायसीसूचीबालकाष्टांगुलामता १ कर्णरन्ध्रेरवेश्छायाप्रविशेद्दर्शये-त्तथा । अन्यथादर्शनेतस्यपूर्वपुण्यविनाशनम् इतिकर्णवेधः ॥

**कर्णवेध**—कान टोंचणें—जन्माच्या दहाव्या, बाराव्या किंवा सोळाव्या दिवशीं, सहाव्या सातव्या, आठव्या, दहाव्या, बाराव्या, महिन्यांत किंवा पहिल्या, तिसऱ्या वगैरे वर्षीं करावें. कन्या अथवा पुत्र यांचा कर्णवेध समवर्षीं करूं नये. तिसऱ्या वगैरे ( विषम ) वर्षीं करणें झाल्यास त्याबाबतींत चैत्र, कार्तिक, पौष व फाल्गुन हे महिने शुभ होत. जन्माचा महिना निषिद्ध समजावा. भद्रा व विष्णुशयन (चतुर्मास) यांमध्यें कर्णवेध करूं नये. अर्थात् कार्तिकांत जर करणें असेल, तर द्वादशीनंतर करावा. मीनेचा सूर्य असतां चैत्राचा महिना व धनेचा असतां पौष महिना हे वर्ज्य

करावेत, असें कांहीं ग्रंथकारांचें मत आहे. द्वितीया, तृतीया, पञ्चमी, षष्ठी, सप्तमी, दशमी, द्वादशी, व त्रयोदशी या तिथि; चन्द्र, बुध, गुरु व शुक्र हे वार; पुष्य, पुनर्वसु, मृग, चित्रा तीन उत्तरा, हस्त, चित्रा, अश्विनी, श्रवण, रेवती व घनिष्ठा, हीं नक्षत्रें–इतकें सर्व कर्णवेधास शुभ होय. विष्णु, रुद्र, ब्रह्मदेव, सूर्य, चन्द्र, अष्टदिक्पाल, अश्विनीकुमार, सरस्वती, गाई, ब्राह्मण व गुरु यांची पूजा करून, अळिल्याच्या रसाची खूण केलेला पुत्राचा उजवा कान आधीं टोंचून मग डावा कान टोंचावा. कन्येचा डावा आधीं टोंचून (मागून उंजवा टोंचावा). टोंचण्यास आठ आंगुळें लांबीची सुई घ्यावी. राजपुत्रासाठीं सोन्याची, ब्राह्मण आणि वैश्य यांना रुप्याची व शूद्रांना लोखंडाची अशा सुया घ्याव्या. सूर्यकिरण आरपार जाईल इतका कान टोंचावा. कान न टोंचलेलें (अविन्ध) बालक दृष्टीला पडल्यास पुण्यनाश होतो. येथें कर्णवेधनिर्णय संपला.

अथबालस्यदृष्टिदोषादौरक्षाविधिः । वासुदेवोजगन्नाथःपूतनातर्जनोहरिः। रक्षतुत्वरितोबालंमुंचमुंचकुमारकम् १ कृष्णरक्षशिशुंशङ्खमधुकैटभमर्दन प्रातःसङ्गवमध्याह्नसायाह्नेषुचसंध्ययोः २ महानिशिसदारक्षकंसारिष्टनिषूदन । यद्गोरजःपिशाचांश्चग्रहान्मातृग्रहानपि ३ बालग्रहान्विशेषेणछिन्धिछिन्धिमहाभयात् । त्राहित्राहिहरेनित्यंत्वद्रक्षाभूषितंशिशुम् ४ इतिभस्माभिमन्त्र्यैवभूषयेत्तेनभस्मना । शिरोललाटाद्यङ्गेषुरक्षांकुर्याद्यथाविधि ५ इति । प्रयोगसागरे रक्षरक्षमहादेवनीलग्रीवजटाधर । ग्रहैस्तुसहितोरक्षमुञ्चमुञ्चकुमारकम् १ अमुंमन्त्रंभूर्जपत्रेविलिख्यतत्पत्रंभुजेबन्धीयात् बालरोदनपरिहारार्थंयन्त्रमुक्तंमयूखे षडस्रमध्येऱ्हींकारस्तन्मध्येशिशोर्नामविलिख्यषट्कोणेषु ॐलुलुवस्वाहेतिमन्त्रषडक्षराणिविलिख्यतद्बहिर्नेमिवद्वृत्तद्वयंविलिख्यतद्बाहिरधोमुखैरर्धचन्द्रैरावेष्ट्यपञ्चोपचारैः संपूज्यबालहस्ते बध्नीयादिति बालग्रहशान्त्यादिकंबालग्रहस्तवश्चशान्तिकमलाकरशान्तिमयूखयोर्द्रष्टव्यम् ॥

**दृष्टिदोषरक्षाविधि**—बालकाला जर कोणाची दृष्ट लागली आहे, असें अनुभवाला आलें तर, 'वासुदेवो जगन्नाथः......तद्रक्षाभूषितं शिशुम् ॥' इत्यादि मंत्रानें भस्म मंत्रून तें बालकाच्या मस्तकाला, कपाळाला वगैरे यथाविधि लावून त्याला विभूषित करावें. याच बाबतींत प्रयोगसागरांत जो दुसरा एक प्रकार सांगितला आहे, तो असाः–'रक्ष रक्ष महादेव नीलग्रीव जटाधर । ग्रहैस्तु सहितो रक्ष मुञ्च मुञ्च कुमारकम् ॥' हा मंत्र भूर्जपत्रावर (पञ्चगन्धानें) लिहून बालकाच्या दंडांत बांधावा. बालक जर फार रडत असेल, तर त्याच्या परिहारार्थ मयूखांत जो मंत्र सांगितला आहे, तो येणेंप्रमाणें:–'सहा कोनांचें यंत्र काढून त्याच्या प्रत्येक कोनांत 'ऱ्हीं' हें अक्षर लिहावें. यंत्राच्या मध्यावर मुलाचें नांव लिहावें व 'ॐ लुलुवस्वाहा' या मंत्राचीं सहा अक्षरें प्रत्येक कोनांत एकेक याप्रमाणें लिहावींत. त्या सहा अक्षरांच्या बाहेरून येतील अशीं रथचक्रासारखीं दोन वर्तुळें काढावींत व वर्तुळांच्या बाहेर तोंडें केलेले असे (सहा) अर्धचन्द्र (प्रत्येक कोनावर) काढावेत. नंतर त्या

यंत्राची पञ्चोपचारें पूजा करून, तें बालकाच्या हाताला बांधावें. बालग्रहशान्ति, बालग्रहांचीं स्तोत्रें वगैरे शान्तिकमलाकर व शान्तिमयूख या ग्रंथांत पहावींत.

अथवर्धापनविधिः सच्चवर्षपर्यन्तंप्रतिमासंजन्मतिथौकार्यः वर्षोत्तरे प्रत्यब्दंजन्मतिथौकार्यः तिथिद्वैधेयत्रजन्मर्क्षयोगःसाग्राह्या दिनद्वयेजन्मनक्षत्रयोगसत्त्वासत्त्वयोरौदयिकीद्विमुहूर्ताधिकाग्राह्या द्विमुहूर्तन्यूनत्वेपूर्वा जन्ममासस्यअधिमासत्वेशुद्धमासेप्रत्याब्दिकवर्धापनविधिर्नत्वधिके । अथसंक्षेपतःप्रयोगः आयुरभिवृद्ध्यर्थं वर्षवृद्धिकर्मकरिष्यइतिसंकल्प्यतिलोद्वर्तनपूर्वकंतिलोदकेनस्नात्वाकृततिलकादिर्विधिर्गुरुंसंपूज्याक्षतपुञ्जेषुदेवताःपूजयेत् तत्रादौकुलदेवतायैनमइतिकुलदेवतामावाह्यजन्मनक्षत्रंपितरौप्रजापतिंभानुंविघ्नेशंमार्कण्डेयंव्यासंजामदग्न्यंरामंअश्वत्थामानंकृपंबलिंप्रल्हादंहनुमन्तंबिभीषणंषष्ठींचनाम्नैवावाह्यपूजयेत् षष्ठ्यैदधिभक्तनैवेद्यः पूजान्ते प्रार्थना चिरंजीवीयथात्वंभोभविष्यामितथामुने । रूपवान्वित्तवांश्चैवश्रियायुक्तश्चसर्वदा १ मार्कण्डेयनमस्तेस्तुसप्तकल्पान्तजीवन । आयुरारोग्यसिद्ध्यर्थंप्रसीदभगवन्मुने २ चिरंजीवीयथात्वंतुमुनीनांप्रवरोद्विज । कुरुष्वमुनिशार्दूलतथामांचिरजीविनम् ३ मार्कण्डेयमहाभागसप्तकल्पान्तजीवन । आयुरारोग्यसिद्ध्यर्थमस्माकंवरदोभव ४ अथषष्ठीप्रार्थना जयदेविजगन्मातर्जगदानन्दकारिणि । प्रसीदममकल्याणिनमस्तेषष्ठिदेवते १ त्रैलोक्येयानिभूतानिस्थावराणिचराणिच । ब्रह्मविष्णुशिवैः सार्धंरक्षांकुर्वन्तुतानिमे २ ततस्तिलगुडमिश्रंपयः पिबेत् तत्रमन्त्रः सतिलगुडसंमिश्रमञ्जल्यर्धमितंपयः मार्कण्डेयाद्वरंलब्ध्वापिबाम्यायुर्विवृद्धये १ क्वचित्पूजितषोडशदेवताभ्योनाम्नाप्रत्येकमष्टाविंशतिसंख्यातिलहोमउक्तः ततोविप्रभोजनं तद्दिनेनियमाः खण्डनंनखकेशानांमैथुनाध्वागमौतथा आमिषंकलहंहिंसांवर्षवृद्धौविवर्जयेत् १ मृतेजन्मनिसंक्रान्तौश्राद्धेजन्मदिनेतथा । अस्पृश्यस्पर्शने चैवनस्नायादुष्णवारिणा २ ॥

**वर्धापनविधि**——हा वाढदिवसाचा विधि ( बालक ) एक वर्षाचें होईपर्यंत दर महिन्याला त्याच्या जन्मतिथीला करावा व एकवर्षानंतर दरवर्षी त्याच्या जन्मतिथीलाच करावा. तिथि जर दोन दिवशीं असेल, तर ज्या दिवशीं जन्मनक्षत्रयोग असेल तो दिवस घ्यावा. दोन्ही दिवशीं जर जन्मनक्षत्रयोग असला किंवा नसला तर सूर्योदयीं दोन मुहूर्तांहून अधिक तिथि असणारा दिवस घ्यावा. दोन मुहूर्तांहून कमी तिथि असल्यास आदला दिवस घ्यावा. जन्माचा महिना अधिकाचा जरी असला तरी वार्षिक वर्धापनविधि ( वार्षिक वाढदिवसाचा विधि ) शुद्ध मासांतच करावा. अधिकमासीं करूं नये. या वर्धापनविधीचा प्रयोग थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहेः—'आयुरभिवृद्ध्यर्थं वर्षवृद्धिकर्मकरिष्ये' असा संकल्प केल्यावर अंगाला ( वाटलेले ) तीळ लावून ( थंड ) पाण्यानें स्नान करावें. कपाळाला गन्ध लावल्यावर गुरूची पूजा करून, तांदुळाच्या राशीवर देवतांचें पूजन करावें. या पूजेच्या सुरवातीला 'कुलदैवतायै नमः' या मंत्रानें कुलदेवतेला आवाहन करून—जन्मनक्षत्र,

मातापिता, प्रजापति, सूर्य, गणपति, मार्कण्डेय, व्यास, परशुराम, राम, अश्वत्थामा, कृपाचार्य, बालि, प्रल्हाद, हनुमान, बिभीषण आणि षष्ठीदेवता यांचीं नांवें उच्चारून त्यांचें आवाहन केल्यावर त्यांची पूजा करावी. षष्ठीदेवतेला दहींभाताचा नैवेद्य द्यावा. पूजेनन्तर जी प्रार्थना करावी ती अशीः—'चिरञ्जीवी यथा त्वं भो भविष्यामि तथा मुने- रूपवान्वित्तवांश्चैव श्रियायुक्तश्च सर्वदा ॥ मार्कण्डेय नमस्तेस्तु सदाकल्पान्तजीवन । आयुरारोग्यसिद्ध्यर्थं अस्माकं वरदो भव ॥' अशा प्रार्थनेनंतर 'जय देवि जगन्मातर्जग- दानन्दकारिणि । प्रसीद मम कल्याणि नमस्ते षष्ठिदेवते ॥ त्रैलोक्ये यानि भूतानि स्थावराणि चराणि च । ब्रह्मविष्णुशिवैः सार्धं रक्षां कुर्वन्तु तानि मे ॥' अशी षष्ठिदेवतेची प्रार्थना करावी, व मग तिळ व गूळ यांच्या मिश्रणाचें दूध प्यावें. दूध पिण्याचा मंत्रः—'सतिलं गुडसम्मिश्रमञ्जल्यर्धमितं पयः । मार्कण्डेयाद्वरं लब्ध्वा पिबा- म्यायुर्विवृद्धये ॥' क्वचित् ग्रंथांत—पूजा केलेल्या सोळा देवतांच्या नाममंत्रानें प्रत्येकीं अठ्ठावीस असा तिळांचा होम करण्यास सांगितलें आहे. नन्तर ब्राह्मणभोजन करावें. वाढदिवशीं जे नियम पाळावेत ते येणेंप्रमाणेः—नखकेशांचें छेदन (कांपणें) करूं नये, मैथुन करूं नये, रस्त्यावर जाऊं नये, मांस खाऊं नये, कलह करूं नये व हिंसा करूं नये. मृत दिवस (म्हणजे ज्या दिवशीं घरांत कोणी मरतो तो दिवस), जन्मदिवस (घरांत कोणी जन्मतो तो दिवस), संक्रान्ति, श्राद्ध व जन्मदिवस (वाढदिवस) या दिवशीं व अस्पृश्याचा स्पर्श झाल्यास कढत पाण्यानें स्नान करूं नये.

अथचौलम् जन्मतोगर्भतोवाब्देप्रथमेऽथद्वितीयके । तृतीयेपञ्चमेवापि- चौलकर्मप्रशस्यते १ यद्वासहोपनीत्यात्रकुलाचाराद्व्यवस्थितिः । माघफाल्गुन- वैशाखज्येष्ठेमासिशुभंस्मृतम् २ जन्ममासेऽधिमासेनज्येष्ठेज्येष्ठस्यनोभवेत् । शुक्लपक्षःशुभःप्रोक्तःकृष्णश्चान्त्यत्रिकंविना ३ द्वितीयाथतृतीयाचपञ्चमीसप्त- मीशुभा । दशम्येकादशीवापित्रयोदश्यपिशस्यते ४ रविभौमार्किशनयोवारा- विप्रादिवर्णतः । गुरुशुक्रबुधाःशुक्लेसोमःसर्वशुभावहाः ५ अश्विनीमृगपुनर्वसु- पुष्यहस्ताचित्रास्वातीज्येष्ठाश्रवणधनिष्ठाशततारकारेवत्यःशुभाः क्षौरप्रयाणभै- षज्येजन्मर्क्षंवर्जयेत्सदा । आयुःक्षयोनुराधाग्नित्र्युत्तरारोहिणीमघे १ सिंहस्थे- गुरौचौलादिशुभकर्मनकार्यम् सूनोर्मातरिगर्भिण्यांचूडाकर्मनकारयेत् । पञ्चमा- ब्दात्प्रागूर्ध्वंतुगर्भिण्यामपिकारयेत् १ सहोपनीत्याकुर्याच्चेत्तदादोषोनविद्यते । पृथक्चूडाकर्मपृथगुपनयनंचमातरिगर्भिण्यांनकार्यम् उभयोःसहानुष्ठानेतुन- दोषः गर्भिण्यामपिपञ्चममासपर्यन्तंनदोषः पञ्चममासादधःकुर्यादतऊर्ध्वं- नकारयेदित्युक्तेः ज्वरितस्यचौलादिमङ्गलंनकार्यम् विवाहव्रतचूडासुमातायदि- रजस्वला । तस्याःशुद्धेःपरंकार्यंमङ्गलंमनुरब्रवीत् । नान्दीश्राद्धोत्तरंरजस्वलायां- शान्तिंकृत्वाकार्यम् केचित्तुमुहूर्तान्तराभावेप्रारम्भात्प्रागपिरजोदोषेश्रीपूजना- दिविधिनाशान्तिंकृत्वाकार्यमित्याहुः मातुलपितृव्यादीकर्तरितत्पत्न्यांरजस्वला- यामपिमङ्गलंनेतिसिन्धुः त्रिपुरुषात्मककुलेषण्मासमध्येमौञ्जीविवाहरूपमङ्गलो- त्तरंमुण्डनाख्यंचूडाकर्मादिनकार्यम् संकटे तुअब्दभेदे कार्यम् चतुःपुरुषपर्यन्तं-

कुलेसपिण्डीकरणमासिकश्राद्धान्तप्रेतकर्मसमाप्तेः प्राक्चूडाकर्मादिकमाभ्युदयिकंकर्मनकार्यम् एकमातृजयोरेकवत्सरेऽपत्ययोर्द्वयोः । नसंस्कारः समानःस्यान्मातृभेदेविधीयते १ प्रारम्भोत्तरंसूतकप्राप्तौकूष्माण्डीभिर्ऋग्भिर्घृतंहुत्वागांदत्वाचूडोपनयनोद्वाहादिकमाचरेत् अत्रविशेषोविवाहप्रकरणेवक्ष्यते मध्येमुख्याएकाशिखाअन्याश्चपार्श्वादिभागेष्विति यथाकुलाचारंप्रवरसंख्ययाशिखाश्चूडासमयेकार्याःउपनयनकालेमध्यशिखेतरशिखानांवपनंकृत्वामध्यभागएवोपनयनोत्तरंशिखाधार्या चौलकर्मणिजातकर्मणिचभोजने सांतपनकृच्छ्ं प्रायश्चित्तम् अन्येषुसंस्कारेषुउपवासेनशुद्धिः चूडान्ताःसर्वेसंस्काराः स्त्रीणाममन्त्रकाः कार्याः होमस्तुसमन्त्रकः होमोप्यमन्त्रकःकार्योनवाकार्यइतिवृत्तिकृदादिमतम् एवंशूद्रस्याप्यमन्त्रकंचौलम् इदानींशिष्टेषुस्त्रीणांचूडादिसंस्कारकरणंनदृश्यते विवाहकाले चूडादिलोपप्रायश्चित्तमात्रंकुर्वन्ति चौलोत्तरंमासत्रयपर्यन्तंसपिण्डैःपिण्डदानंतिलतर्पणंचनकार्यम् महालयेगयायांपित्रोः प्रत्यब्दश्राद्धेचपिण्डदानादिकार्यम् ॥

**चौलसंस्कार**—जन्मल्यापासून किंवा गर्भ राहिलेल्या दिवसापासून पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या किंवा पांचव्या वर्षी चौलकर्म करणें प्रशस्त होय. उपनयनाबरोबरहि (मुंजीच्या वेळीं) हें कर्म केलें तरी चालतें. या बाबतींत कुलाचाराप्रमाणें वागावें. माघ, फाल्गुन, वैशाख व ज्येष्ठ हे महिने या कर्माला शुभ होत. जन्ममास व अधिक मास यांत हें कर्म करूं नये. ज्येष्ठाचें ज्येष्ठ महिन्यांत चौल करूं नये. या कर्माला शुक्ल पक्ष योग्य होय. कृष्णपक्षांतल्याहि अखेरच्या पांच तिथि वर्जून हें कर्म बाकीच्या तिथींवर करण्यास हरकत नाहीं. द्वितीया, तृतीया, पञ्चमी, सप्तमी, दशमी, एकादशी आणि त्रयोदशी या तिथि या कर्माला शुभ होत. रविवारीं ब्राह्मणाचें, मंगळवारीं क्षत्रियाचें, शनिवारीं वैश्याचें व शूद्राचें चौल करावें. गुरु, शुक्र व बुध हे वार आणि शुक्लपक्षांतला सोमवार हे सर्वांनाच या कार्यासाठीं शुभ समजावे. अश्विनी, मृग, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, ज्येष्ठा, श्रवण, धनिष्ठा, शततारका व रेवती हीं नक्षत्रें चौलाला शुभ होत. क्षौर, प्रयाण व औषध या बाबतींत जन्मनक्षत्र नेहमींच वर्ज्य करावें, असें वचन आहे. अनुराधा, कृत्तिका, तीन उत्तरा, रोहिणी व मघा या नक्षत्रांवर चौल केल्यास आयुष्याचा क्षय होतो. सिंहस्थ गुरु असतां, चौलाचें शुभ कर्म करूं नये. मुलगा पांच वर्षांहून कमी वयाचा असतां, त्याची आई जर गर्भार असली, तर हें चौलकर्म (चूडाकर्म=शेंडी ठेवणें) करूं नये. पांच वर्षांचा मुलगा असल्यास गार्भिणीदोष नाहीं. गर्भिणीसंबंधानेंही तिच्या गर्भाच्या पांचव्या महिन्यापर्यंत दोष नाहीं. कारण पांचव्या महिन्याच्या पूर्वी (चूडाकर्म) करावें, पांचव्या महिन्यानंतर करूं नये, असें वचन आहे. बालक ज्वरादिकांनीं आजारी असतां चौलाचें मंगलकार्य करूं नये. विवाह, व्रत व चूडाकर्म, हीं मंगल कर्में माता विटाळशी असतां करूं नयेत. तिची शुद्ध झाल्यानन्तर करावीत. असें मनूनें सांगितलें आहे. नान्दीश्राद्धानंतर जर रजस्वला (विटाळशी) होईल तर

शान्ति करून (हीं कर्मे) करावींत. दुसरा मुहूर्त नसेल व माता या कार्यांना आरंभ करण्याच्या आधीं जर विटाळशी असेल, तर श्रीफलाची (नारळाची) पूजा वगैरे करण्याच्या विधीनें शान्ति करून (हीं कर्में) करावींत, असें कांहीं ग्रंथकार सांगतात. (बापाच्या अभावीं) मामा, चुलता वगैरे जे हीं कर्मे करण्यास योग्य आहेत, त्यांच्या पत्न्या जर विटाळशा असतील तर हीं कर्मे करूं नयेत, असें निर्णयसिन्धूंत सांगितलें आहे. तीन पुरुषरूप कुलांत विवाहरूप मंगलकार्य झाल्यानंतर सहा महिन्यांत मुण्डन, चूडाकर्म वगैरे कर्मे करूं नयेत. संकटप्रसंगीं निराळें वर्ष सुरू झाल्यावर करावींत. याचा अर्थ असा कीं, फाल्गुनांत जर मङ्गल कार्य झालें असले तर नव्या वर्षांत चैत्रादि महिन्यांत करावें. चार पुरुषांपर्यंत कुलांत सपिण्डीकरण, मासिकश्राद्धें वगैरेंनीं शेवट होणारें जें प्रेतकर्म, त्याच्यासमाप्तीच्या आधीं चूडाकर्मादि मङ्गलकार्यें करूं नयेत. एकाच मातेपासून झालेले दोन बन्धु अगर बहिणी अथवा भाऊबहीण यांचा समान संस्कार त्याच (एकाच) वर्षीं करूं नये. माता भिन्न असल्यास करावा. मङ्गलकार्यांना प्रारम्भ केल्यानंतर जर सुतक येईल, तर कूष्माण्डी ऋचांनीं तुपाचा होम करून गाय दान द्यावी व नन्तर चौल, मुंज, लग्न वगैरे कार्यें करावींत. या संबंधाची विशेष माहिती विवाहप्रकरणांत सांगेन. मध्यभागीं एक मुख्य शिखा (डोक्यांवरील केंसांची बट) व बाकीच्या तिच्या सर्व भोंवतालच्या वाटोळ्या भागीं जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें प्रवरांच्या संख्येला अनुसरून चूडाकर्मसमयीं (बटा) ठेवाव्या. मुंजीच्या वेळीं शेंडीच्या मधल्या बटेवांचून भोंवतालच्या इतर सर्व बटा काढून टाकून मधली तेवढीच ठेवावी. चौलकर्म व जातकर्म यांत जेवलें असतां, सान्तपनकृच्छ्रप्रायश्चित्त सांगितलें आहे. इतर संस्कारांत (भोजन केल्यास) उपास करण्यानें शुद्धि होते. जन्मापासून चूडाकर्मांचे स्त्रियांचे संस्कार विनमंत्रांनीं (अमन्त्रक) करावेत व होम तेवढा समन्त्रक करावा. होमही अमन्त्रक करावा अथवा मुळींच करूं नये, असें वृत्तिकर्त्यादिकांचें मत आहे. शूद्राचें चौलकर्म याप्रमाणेंच अमन्त्रक करावें. सध्यां शिष्ट लोक स्त्रियांचे चूडाकर्मादि संस्कार करीत नाहींत व विवाहाच्या वेळीं चूडादिकर्मांच्या लोपाचें प्रायश्चित्त मात्र करतात. चूडाकर्मानंतर तीन महिनेपर्यंत पिण्डदान व तिलतर्पण हीं करूं नयेत. महालय, गयाश्राद्ध व मातापित्यांचीं वार्षिक श्राद्धें यांत तेवढें पिण्डदान करावें.

अथविद्यारम्भः पञ्चमेवर्षेअक्षरलेखनारम्भउत्तरायणेकार्यः अत्र कुम्भस्थःसूर्यो वर्ज्यः शुक्लपक्षःशुभःप्रोक्तः कृष्णश्चान्त्यत्रिकंविना । द्वितीयातृतीयापञ्चमीदशम्येकादशीद्वादशीत्रयोदश्यःश्रेष्ठाः अश्विनीमृगार्द्रापुनर्वसुपुष्यहस्तचित्रास्वात्यनुराधाश्रवणधनिष्ठाशततारकारेवत्यो भौमशनिभिन्नवाराश्चशुभाः विघ्नेशंलक्ष्मीनारायणौसरस्वतींस्ववेदंसूत्रकारंच पूजयित्वागुरुंब्राह्मणान्धात्रींचसंपूज्यनत्वासर्वांस्त्रिःप्रदक्षिणीकृत्यप्रणवपूर्वकमक्षरमारभेत् ततोगुरुंनत्वादेवताविसर्जयेत् ततोत्रभुवनमातःसर्ववाङ्मयरूपेणागच्छागच्छेतिसरस्वत्यावाहनमन्त्रः प्रणवेनषोडशोपचारार्पणम् ॥

**विद्यारम्भ**—पांचव्या वर्षी उत्तरायणांत अक्षरलेखनाला आरम्भ करावा, मात्र कुंभेचा सूर्य असतांना करूं नये. शुक्लपक्ष व अखेरच्या पांच तिथि सोडून कृष्णपक्ष या कर्माला योग्य होय. द्वितीया, तृतीया, पंचमी, दशमी, द्वादशी, व त्रयोदशी या तिथि या कर्माला श्रेष्ठ होत. अश्विनी, मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका व रेवती, हीं नक्षत्रें व मंगळ व शनि यांखेरीज बाकीचे वार, हीं या (कर्माला शुभ) होत. गणपति, लक्ष्मी, नारायण, सरस्वती, आपली कुलदेवता आणि सूत्रकार यांची पूजा करून गुरु, ब्राह्मण व धात्री (दाई) यांची पूजा करावी. नमस्कार करून सर्वांना तीन प्रदक्षिणा घालाव्या व नन्तर प्रथम ॐकार लिहून, मागून दुसरीं (श्रीगणेशाय नमः) वगैरे अक्षरें लिहिण्यास आरंभ करावा. गुरूला मग नमस्कार करून देवताविसर्जन करावें. 'अत्र भुवनमातः सर्ववाङ्मयरूपेणागच्छागच्छ' या मंत्रानें सरस्वतीचें आवाहन करून, तिला प्रणवमंत्रानें (ॐ) सर्व उपचार अर्पण करावेत.

अथानुपनीतधर्माः प्रागुपनयनात्कामचारकामवादकामभक्षाः तेन मूत्रपूरीषोत्सर्गादावाचमनाद्याचारोनास्ति लघुपातकहेतुलशुनपर्युषितोच्छिष्टादिभक्षणेदोषाभावः एवमपेयपानेअनृतावाच्यभाषणेपि महादोषहेतुमांसान्त्यजरजस्वलादिस्पृष्टान्नभक्षणे मद्यादिपाने चदोषोस्त्येव रजस्वलादिसंस्पर्शे स्नानमेवकुमारके। शिशोरभ्युक्षणंप्रोक्तंबालस्याचमनंस्मृतम्। तत्रप्रागन्नप्राशनाच्छिशुसंज्ञा ततऊर्ध्वं प्राक् चौलात् त्रिवर्षाद्वाबालसंज्ञा तत आमौञ्जीबन्धनात्कुमारसंज्ञा अत्राचमनमितित्रिरुदकपानमेव नतुओष्ठमार्जनादिकल्पइतिज्ञेयम् नचानुपनीतोवेदमुच्चारयेत् पित्रोरन्त्यक्रियायांत्वनुपनीतेनापिमन्त्रोच्चारःकार्यःसचद्वित्रिवर्षयोः कृतचूडस्यैव त्रिवर्षोर्ध्वंत्वकृतचूडस्यापि एतच्चौरसपुत्रविषयम् पित्रोरनुपनीतोपिविदध्यादौरसः सुतः। और्ध्वदेहिकमन्येतुसंस्कृताःश्राद्धकारकाः१ इतिस्कान्दात् बालानामपथ्यंपित्रादिभिर्निवारणीयम् तस्मात्सर्वप्रयत्नेनबालानग्रेतुभोजयेत्। बालानांक्रीडनदानेस्वर्गसुखम् तेषां भोज्यप्रदानेगोदानफलम्॥

**अनुपनीतधर्म**—म्हणजे मुंजीच्या आधीं बालकाचे जे धर्म त्याबद्दल असें सांगितलें आहे कीं, मुंजीच्या पूर्वी बालकानें वाटेल तिकडे जाणें, वाटेल तें बोलणें व हवें तें खाणें याबद्दल त्याला दोष नाहीं. यावरून लघवी व शौच (परसाकडणें) झाल्यावर त्याला आचमन न केल्याचा दोष नाहीं, असें ठरतें. अल्पपापकारक अशीं जीं—लसूण, शिळें अन्न, उष्टें अन्न, वगैरेंचें भक्षण, तें त्याला दोषास्पद होत नाहीं. याप्रमाणेंच अपेयपान (पिण्यास अयोग्य अशा वस्तु पिणें) आणि खोटें व अभद्र भाषण हीं केलीं असतांहि त्याला दोष नाहीं. मांस खाणें, अन्त्यज किंवा विटाळशी यांचा स्पर्श झालेलें अन्न खाणें, मद्य पिणें, वगैरे गोष्टी (अशाला,) फारच दोषकारक मानिल्या आहेत. रजस्वलेचा विटाळ झाला तर कुमारानें स्नानच करावें, शिशूवर अभ्युक्षण (पाणी शिंपडणें) करावें, आणि बालानें आचमन करावें. अन्नप्राशनसंस्कार न झालेला तो शिशु, अन्नप्राशन संस्कार होऊन

चौलसंस्कार न झालेला किंवा तीन वर्षांच्या आंतला तो बाल आणि त्यानंतर मुंज होईपर्यंत (च्या वयाचा) तो कुमार, अशा या (तीन) संज्ञांचा अर्थ समजावा. या ठिकाणीं आचमन याचा अर्थ ओष्ठमार्जनादिक असा नसून तीन वेळां पाणी पिणें असा घ्यावयाचा. मुंज न झालेल्यानें वेदोच्चार करूं नये. पितरांचें प्रेतकर्म करण्याचा प्रसंग आला असतां जर मुंज झालेली नसेल, तर मंत्रोचार करण्यास जरी हरकत नाहीं, तरी तो दोन किंवा तीन वर्षांचें वय असतां चौलसंस्कार झाला असेल तरच करावा. तीन वर्षांहून अधिक वय असतांही जरी चौलसंस्कार झाला नसला तरी (मंत्रोच्चार) करावा, हा नियम फक्त औरस पुत्रालाच लागू आहे; कारण, 'उपनयन जरी झालें नसलें, तरी औरस पुत्रानें मातापित्यांचें और्ध्वदेहिक करावें व इतर (पुत्र) असतील त्यांनां, त्यांचे संस्कार झाले असतील तरच श्राद्धादिक करण्याचा अधिकार येतो' असें स्कंदपुराणांत वचन आहे. पित्यानें बालकाला अपथ्य (अहितकारक गोष्टी) करूं देऊं नयेत. अनेक प्रयत्नांनीं बालकाला प्रथम भोजन घालावें. बालकांना खेळण्याची वस्तु दिल्यानें स्वर्गसुख मिळतें व खाण्याचा पदार्थ दिल्यानें गोदानफल मिळतें.

**अथोपनयनम् उपनयनंनामआचार्यसमीपनयनाङ्कोगायत्र्युपदेशप्रधानकः कर्मविशेषः उपनयनपदस्ययोगरूढत्वात् तत्राधिकारिणः पितैवोपनयेत्पुत्रंतदभावेपितुःपिता । तदभावेपितुर्भ्रातातदभावेतुसोदरः १ तदभावेसगोत्रसपिण्डाः तदभावेमातुलादयोऽसगोत्रसपिण्डाः तदभावेअसपिण्डसगोत्रजाः एते च कुमारापेक्षयावयोज्येष्ठाविवक्षिताः कनिष्ठकर्तृकोपनयनस्यनिषिद्धत्वात् सर्वाभावेश्रोत्रियःजन्मनाब्राह्मणोज्ञेयःसंस्कारैर्द्विजउच्यते । विद्यत्वाच्चापिविप्रत्वंत्रिभिःश्रोत्रियउच्यते १ कृच्छ्रत्रयंचोपनेतात्रीनूकृच्छ्रांश्चबटुश्चरेत् । गायत्र्याद्वादशाधिकसहस्रजपश्चोपनयनेऽत्राधिकारसिद्ध्यर्थंकार्यः केचिद्द्वादशसाहस्रांजपन्ति ॥**

**उपनयनसंस्कार**—उपनयन म्हणजे—आचार्याच्या जवळ नेणें व (त्याच्याकडून) गायत्रीचा उपदेश करविणें हें ज्यांत मुख्य अंग आहे तें कर्म. हा (उपनयन) शब्द योगरूढ (व्यवहारी भाषेंत निराळ्या अर्थानें आलेला) आहे. उपनयनाचें कर्म खरें पाहिलें तर अधिकारयुक्ततेनें पित्यानेंच करावें. त्याच्या अभावीं चुलत्यानें किंवा (चुलत्याच्या) अभावीं (वडील) भावानें, तें कर्म करावें. वडील भाऊहि नसेल तर (तें कर्म) मामा वगैरे असगोत्र व सपिण्ड यांनीं करावें. तेही न सांपडल्यास हें कर्म असपिण्ड व सगोत्र यांनीं हें कर्म करावें. (यांत खरें मर्म गोत्राचें आहे.) कर्म करणारे सर्व हे कुमारापेक्षां वयानें अधिक असावेत; कारण, कमी वयाच्यानें केलेल्या उपनयनाचा निषेध सांगितला आहे. वर सांगितलेल्यांपैकीं जर कोणीही नसेल, तर हें कर्म श्रोत्रियानें करावें. ज्याचे संस्कार झाले तो द्विज. वेदाध्ययन झालेल्या ब्राह्मणाला विप्र म्हणावें. ज्या ब्राह्मणाचे संस्कार होऊन वेदाध्ययनहि झालें असेल तो श्रोत्रिय होय. उपनयन कर-

णारानें तीन कृच्छ्र प्रायश्चित करावें. उपनयनाचा अधिकार देण्यासाठीं गायत्रीचा १०१२ जप करावा. कित्येक १२००० जप करतात.

अथोपनयनकालः गर्भतोजन्मतोवापञ्चमेऽष्टमेवावर्षेब्राह्मणस्योपनयनम् एकादशेद्वादशेवाक्षत्रियस्य द्वादशेषोडशेवावैश्यस्य षष्ठेतुधनकामस्यविद्याकामस्यसप्तमे अष्टमेसर्वकामस्यनवमेकान्तिमिच्छतः १ केचित्तुविप्रस्यषष्ठंनमन्यन्ते आषोडशादाद्वाविंशादाच्चतुर्विंशाच्च वर्षात्ब्राह्मणादेर्गौणकालः अत्रगर्भादिःसंख्या तथाचजन्मतःपंचदशवर्षपर्यंतंविप्रस्यनविशेषतःप्रायश्चित्तम् षोडशेवर्षेसशिखवपनमेकविंशतिरात्रंयावकाशनमन्तेसप्तब्राह्मणभोजनमितिप्रायश्चित्तम् सप्तदशादिवर्षेषुकृच्छ्रत्रयादिप्रायश्चित्तपूर्वकमुपनयनंबोध्यम् विप्रक्षत्रिययोरुत्तरायणेमौञ्जीबन्धः वैश्यस्यदक्षिणायनेपि वसन्तेब्राह्मणमुपनयीतग्रीष्मेराजन्यंशरदिवैश्यम् माघादिशुक्रान्तकपञ्चमासाःसाधारणावासकलद्विजानामितिगर्गोक्तेर्वसन्तालाभेशिशिरग्रीष्मावपिग्राह्यौ वसन्तविधिनोत्तरायणादिविधेःसंकोचायोगात् एवंमाघादिमासपञ्चकनियमात्पौषाषाढयोःसत्यप्युत्तरायणेउपनयनंनकार्यम् तत्रापिमीनार्कमारभ्ययावन्मिथुनप्रवेशं प्रशस्तःकालः मीनमेषयोस्तुप्रशस्ततरः मकरकुंभस्थेर्केमध्यमंमीनमेषस्थेउत्तमंवृषभमिथुनस्थेऽधमसुपनयनमित्यभिधानात् मीनार्कविशिष्टश्चैत्रोऽनिष्टबृहस्पत्यादिबहुविधदोषापवादकतयाप्रशस्ततमः जीवभार्गवयोरस्तेसिंहस्थेदेवतागुरौ । चन्द्रसूर्येदुर्बलेपिगोचरेनिष्टदेगुरौ १ मेखलाबन्धनंकार्यंचैत्रेमीनगतेरवावित्यर्थकस्मृतेः अत्रगुरुशुक्रास्तदोषापवादोतिमहासंकटविषयत्वान्नकथनीयः मीनार्के चैत्रेजन्ममासनक्षत्रदोषोनास्ति जन्ममासजन्मनक्षत्रजन्मतिथिजन्मलग्नजन्मराशिलग्नेषुविप्राणामुपनयनंनदोषाय क्षत्रियवैश्ययोरप्रथमगर्भेदोषोन ज्येष्ठापत्यस्यज्येष्ठमासेमङ्गलंन शुक्लपक्षःशुभःप्रोक्तःकृष्णश्चान्त्यत्रिकंविनेतिगुरूक्तेः कृष्णपक्षेदशमीपर्यन्तंसंकटेकार्यम् शिष्टास्तुसंकटेपिकृष्णपक्षेपञ्चमीपर्यन्तमेव कुर्वन्ति ॥

**उपनयनकाल**—गर्भधारणेच्या दिवसापासून किंवा जन्मतिथीपासून पांचव्या अथवा आठव्या वर्षी ब्राह्मणाच्या ( मुलाचें ) उपनयन करावें. उपनयन म्हणजे (मुंज) याच न्यायानें क्षत्रियाचें उपनयन अकराव्या किंवा बाराव्या वर्षी आणि वैश्याचें बाराव्या अथवा सोळाव्या वर्षी करावें. धनप्राप्तीची इच्छा करणारानें सहाव्या वर्षी मुंज लावावी. विद्यावान् होण्यासाठीं सातव्या वर्षी मुंज करावी. सर्व प्राप्तीची इच्छा करणाऱ्यानें आठव्या वर्षी व कांतिमान् होण्याची इच्छा करणारानें नवव्या वर्षी ( उपनयन ) करावें. विप्राचें उपनयन सहाव्या वर्षी करूं नये, असें कांहींचें मत आहे. सोळाव्या वर्षापर्यंत ब्राह्मणाचा बाविसाव्या वर्षापर्यंत क्षत्रियाचा आणि चोविसाव्या वर्षापर्यंत वैश्याचा हे काल गौण आहेत. ही संख्या गर्भकालापासून मोजावी. जन्मापासून पंधरा वर्षेपर्यंत मुंज न केल्यास ब्राह्मणाला विशेष प्रायश्चित नाहीं. सोळाव्या वर्षी ( ब्राह्मणाला ) उपनयन करणें असल्यास, शेंडीसुद्धां हजामत ( वपन ) करून

एकवीस रात्रींपर्यंत यव खाऊन रहावें, आणि शेवटीं सात ब्राह्मणांना भोजन द्यावें, असें हें त्याचें प्रायश्चित्त आहे. सतराव्या वगैरे वर्षीं जर उपनयन करणें असेल, तर तीन कृच्छ्रांचें प्रायश्चित्त करून मग मुंज करावी. ब्राह्मण व क्षत्रिय यांचें मौंजीबंधन उत्तरायणांत करावें व वैश्यांचें दक्षिणायनांत करावें. ब्राह्मणाची मुंज वसंतऋतूंत करावी, क्षत्रियाची ग्रीष्मऋतूंत करावी आणि वैश्याची शरदृऋतूंत करावी, अथवा 'माघापासून ज्येष्ठापर्यंतचे पांच महिने सर्व द्विजांना साधारण होत.' असें गर्गाचें वचन असल्यानें, वसन्त न साधेल तर तर शिशिर किंवा ग्रीष्मऋतूसुद्धां चालतील; कारण, वसन्तकाल ( मुख्य ) सांगितल्यामुळें उत्तरायणादि कालांचा संकोच होत नाहीं. याप्रमाणेंच माघादि पांच महिन्यांचा जो नियम सांगितला, त्यावरून उत्तरायणांत पौष व आषाढ या महिन्यांत मुंज करूं नये. त्यांतल्या त्यांतही मीनेचा सूर्य होऊन तो मिथुनेला जाईपर्यंतचा काल प्रशस्त होय. मीन व मेष यांत सूर्य असतांना ( हाच काल ) विशेष प्रशस्त होय. 'मकर आणि कुंभ या राशींचा सूर्य असतांना मध्यम, मीन व मेष यांचा तो असतांना उत्तम, व वृषभ आणि मिथुन यांचा असतांना वाईट, असा हा उपनयनाचा काल होय,' असें वचन आहे. मीनेचा सूर्य असतांना जर चैत्र महिना असेल, तर अनिष्ट गुरु असतांहि तो अपवाद आहे, असें वचन असल्यानें, तो काल ( या कर्माला ) फारच चांगला. 'गुरुशुक्रांचा अस्त, सिंहस्थ गुरु, चंद्र आणि सूर्य हे निर्बळ व गोचरीचा गुरु असें अनिष्ट ग्रह असतांहि जर मीनेचा रवि असेल, तर मौंजीबंधन करावें,' अशा अर्थाचें स्मृतिवचन आहे. या ठिकाणीं गुरुशुक्रांचा जो अस्त अपवादात्मक सांगितला आहे, तो महान् संकट असलेल्या प्रसंगींच लागू पडतो, म्हणून तो न सांगणेंच बरें. क्षत्रिय आणि वैश्य यांना पहिल्या खेरीजकरून (इतर) पुत्रांच्या बाबतींत या कार्याला दोष नाहीं. ज्येष्ठ अपत्याचें ज्येष्ठमासीं मङ्गलकर्म करूं नये. शुक्लपक्ष सबंद व कृष्णपक्षाचे अखेरचे पांच दिवस वजा करून तोहि पक्ष शुभ होय,' असें बृहस्पतीचें वचन असल्यानें संकटकालीं कृष्णपक्षांतल्या दशमीपर्यंत उपनयन करण्यास बाध नाहीं. शिष्ट लोक संकटकालींहि कृष्णपक्षांतल्या पंचमीपर्यंतच उपनयनसंस्कार करतात.

अथतिथिविचारः द्वितीयातृतीयापञ्चमीषष्ठीदशम्येकादशीद्वादश्यःप्रशस्ताःक्वचित्सप्तमीत्रयोदशीकृष्णप्रतिपाद्विधिःपुनरुपनयनमूकाद्युपनयनविषयः तिथौसोपपदाख्यायामनध्यायेगलग्रहे । अपराह्णेचोपनीतः पुनःसंस्कारमर्हति १ सिताज्येष्ठेद्वितीयाचआश्विनेदशमीऽसिता । चतुर्थीद्वादशीमाघेएताःसोपपदाःस्मृताः २ अनध्यायाःपौर्णमासीचतुर्दश्यष्टमीअमा । प्रतिपत्सूर्यसंक्रान्तिमन्वाद्याश्चयुगादयः ३ कृष्णपक्षेद्वितीयाश्वकार्तिकाषाढफाल्गुने । विषुवायनसंक्रान्त्योःपक्षिणीअनध्यायइतिपूर्वपरिच्छेदेउक्तम् सोपपदानामनध्यायतिथीनांचदिनद्वये सूर्योदयोत्तरंसूर्यास्तात्पूर्वंचात्रिमुहूर्तसत्त्वेदिनद्वयमनध्यायः शिष्टास्तुप्रतिपच्छेषघटिकादिमात्रेऽपित्रितबन्धेऽनध्यायंवदन्ति विषुवायनेतरसंक्रान्ति-

मन्वादियुगादिषुतुप्रथमद्वितीयपरिच्छेदोक्तरीत्या यत्रदिनेसंक्रान्तिपुण्यकालोयुगमन्वादिश्राद्धकालश्चतद्दिने ऽनध्यायः नतुनेषामस्तादौमुहूर्तत्रयेसत्त्वमनध्यायहेतुः त्रयोदश्यादिचत्वारिसप्तम्यादिदिनत्रयम्। चतुर्थीचैकतः प्रोक्ताअष्टावेतेगलग्रहाः १ अत्रचतुर्थीनवमीचव्रतकालेत्याज्येतिभाति केचित्चतुर्थीशेषयुतपंचम्यांव्रतबन्धनंकुर्वन्तितत्रमूलंमृग्यम् नवमीशेषयुतदशम्यांमौञ्जीनकार्येतिमयूखे अपराह्णस्त्रेधाविभक्तदिनतृतीयांशोव्रतबन्धे वर्ज्यः दिनमध्यमभागोमध्यमः प्रथमभागोमुख्यः मन्वादियुगादयोद्वितीयपरिच्छेदेदर्शिताः तत्रोपनयनेचैत्रशुक्लतृतीयायाःमन्वादेर्वैशाखशुक्लतृतीयायायुगादेश्चप्रसक्तिः अन्येषांयुगादिमन्वादितिथीनांप्रसक्तिर्नास्ति अनयोरपवादः सिन्धुकौस्तुभादौस्मर्यते याचैत्रवैशाखसितातृतीयामाघस्यसप्तम्यथफाल्गुनस्य। कृष्णोद्वितीयोपनयेप्रशस्ताप्रोक्ताभरद्वाजमुनीन्द्रमुख्यैः १ इति अत्रमाघसप्तम्यामन्वादेरपवादःपुनरुपनयनादिविषयः फाल्गुनकृष्णद्वितीयायाश्चातुर्मास्यद्वितीयात्वेनानध्यायत्वंप्राप्तंतस्यापवादोऽयंयत्तु अनध्यायस्यपूर्वेद्युरनध्यायात्परेऽहनि। व्रतारम्भंविसर्गंचविद्यारम्भंचवर्जयेत् १ इतिस्मृत्यन्तरम् तद्द्वितीयाविध्यनुपपत्त्यागलग्रहत्वेनप्राप्तसप्तमीत्रयोदशीनिषेधानुवादकमितिभाति अप्राप्तनिषेधकत्वे मन्वादियुगादिसंक्रान्त्यादिप्रयुक्तानध्यायेभ्योपिपूर्वपरदिनयोर्निषेधापत्त्याचैत्रशुक्लद्वितीयादेरपिनिषिद्धत्वापातात् नचेष्टापत्तिः शिष्टाचारग्रन्थेषुचानुपलम्भात् मुहूर्तमार्तण्डोक्त्यामाघेशुक्लद्वितीयाकृष्णद्वितीयावैशाखकृष्णद्वितीयाचेत्यनध्यायत्रयमुपनयनेऽधिकंप्राप्नोति एतदपरेनाद्रियन्ते बहुग्रन्थेषुमूलानुपलम्भात् मौञ्जीप्रकरणेमुहूर्तचिन्तामण्यादिग्रन्थेषुक्वाप्यनुक्तेश्च अतोमार्तण्डोक्तानामतिरिक्तानध्यायानामुपनिषत्पाठादिविषयत्वंनतुमौञ्जीविषयत्वमितियुक्तंभाति तत्रतृतीयाषष्ठीद्वादशीषुप्रदोषसत्त्वेमौञ्जीनकार्या रात्रेःप्रथमयामेचतुर्थीसार्धयामेसप्तमीयामद्वयेत्रयोदशीचेत्तदाप्रदोषः दिनद्वयेप्रथमयामादिषुचतुर्थ्यादिव्याप्तौपूर्वदिनेप्रदोषोनोत्तरदिनेइतिकौस्तुभे प्रदोषदिनेमन्दवारेकृष्णपक्षान्त्यत्रिकेचोपनयनेपुनरुपनयनमितिमयूखे एतेनित्यानध्यायाः।

**तिथिविचार**—या कार्याला द्वितीया, तृतीया, पंचमी, षष्ठी, एकादशी व द्वादशी या तिथि योग्य होत. सप्तमी, त्रयोदशी व कृष्णप्रतिपदा या तिथीसुद्धां क्वचित् ग्रंथांत जरी सांगितल्या आहेत, तरी त्या पुनरुपनयनाला व मुका ( कुमार अथवा कुमारी ) यांच्या संबंधानें घ्याव्या. सोमपदा तिथि अनध्याय, गलग्रह व अपराह्ण—यांवर जर उपनयन झालें, तर तो संस्कार पुन्हा करावा. पौर्णिमा, चतुर्दशी, अष्टमी, अमावास्या, प्रतिपदा, सूर्यसंक्रान्ति मन्वादि, युगादि, कार्तिक, आषाढ व फाल्गुन या महिन्यांतल्या कृष्णपक्षींच्या ( तीन ) द्वितीया, तुला व मेष या संक्रान्तीच्या पक्षिणी ( बारा प्रहर ) हीं सर्व अनध्याय असल्याचें पहिल्या परिच्छेदांत सांगितलेंच आहे. सोमपदा व अनध्याय या तिथि जर दोन

दिवस सूर्यास्तानंतर व सूर्यास्ताच्या पूर्वीं तीन मुहूर्त असतील, तर दोन्ही दिवस अनध्याय होय. एक दोन घटका जरी प्रतिपदा शिल्लक असली तरी शिष्टलोक तो अनध्यायच मानतात. तुला व मेष या संक्रान्तींशिवाय इतर संक्रान्ति आणि युगादि, मन्वादि यांच्यासंबंधानें पहिल्या व दुसऱ्या परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें, ज्या दिवशीं संक्रान्तीचा पुण्यकाल किंवा युगादि मन्वादि यांचा श्राद्धकाल असेल, त्याच दिवशीं अनध्याय समजावा. सूर्यास्ताच्या आधीं तीन घटका संक्रान्ति अथवा युगादि जरी असतील, तरी तेवढ्यानें कांहीं अनध्याय होत नाहीं. त्रयोदश्यादि चार तिथि, आणि सप्तमी, अष्टमी, नवमी आणि चतुर्थी—या गलग्रहतिथि होत. येथें चतुर्थी व नवमी या ( दोन ) तिथि उपनयनाला त्याज्य होत असें वाटतें. चतुर्थीसह पंचमीला कित्येक ( लोक ) जे व्रतबंध ( मुंज ) करीत नाहींत, त्याबद्दल मूळवचन पाहिलें पाहिजे. नवमीशेष अशा दशमीला मुंज न करण्याबद्दल मयूखांत (सांगितलें) आहे. दिवसाचे तीन भाग करून, त्यांतला तिसरा जो अपराह्णकाल ते व्रतबन्धाला वर्ज्य समजावा, दुसरा मध्यम होय आणि पहिला मुख्य ( योग्य ) होय. मन्वादि व युगादि तिथि ( कोणत्या तें ) दुसऱ्या परिच्छेदांत सांगितलें आहे, त्यावरून चैत्र शुद्ध तृतीया ही जी मन्वादि तिथि व वैशाख शुद्ध तृतीया ही जी युगादितिथि त्या दोहींवरच्च काय तो उपनयनाचा संभव येतो. या दोन्ही तिथि मौंजीबन्धनाला अपवादक असल्याचें, निर्णयसिन्धु, कौस्तुभ वगैरे ग्रन्थांत म्हटलें आहे. चैत्र शुद्ध तृतीया, वैशाख शुद्ध तृतीया, माघसप्तमी आणि फाल्गुन वद्य द्वितीया या तिथि मुनिवर्य भरद्वाजांनीं उपनयनाला योग्य असल्याचें सांगितलें आहे. या ठिकाणीं माघी सप्तमी व मन्वादि यांचा जो अपवाद सांगितला आहे, तो पुनरुपनयनाबद्दलचा आहे. फाल्गुन कृष्ण द्वितीयेला चातुर्मासासंबंधींच्या द्वितीयेनें जें अनध्यायत्व प्राप्त होतें, त्याबद्दलचा हा अपवाद समजावा. अनध्यायाच्या आदल्या दिवशीं आणि पुढच्या दिवशीं व्रतारंभ ( येथें उपनयन ), व्रतविसर्जन आणि विद्यारंभ हीं करूं नयेत, असें जें दुसरें स्मृतिवचन आहे, तें द्वितीयेच्या असंभवामुळें आणि गलग्रहतिथींच्या योगानें प्राप्त झालेला जो सप्तमी, नवमी व त्रयोदशी यांचा निषेध, त्याचें अनुवादन करणारें आहे असें वाटतें; कारण, हा जर अप्राप्ताचा निषेध मानावा तर मन्वादि, युगादि, संक्रान्ति वगैरे तिथींच्या आधींचा व पुढचा दिवस हेही निषेधांतच येतील ही इष्टापत्तिही नव्हे; कारण शिष्टाचारग्रन्थांत याची उपलब्धि नाहीं. मुहूर्तमार्तण्ड ग्रंथांतल्या वचनावरून माघ शुद्ध व वद्य द्वितीया आणि वैशाख वद्य द्वितीया या तीन तिथि उपनयनाविषयींच्या अनध्यायाच्या जरी सांगितल्या आहेत, तरी इतर ग्रन्थकार हे अनध्याय मानीत नाहींत. याचें कारण असें कीं, त्याला पुष्कळ ग्रंथांत आधार नाहीं. मुहूर्तचिन्तामणि वगैरे ग्रंथांतल्या मौंजीप्रकरणांत, हे अनध्याय असल्याचें कोठेंही सांगितलेलें नाहीं; म्हणून, मुहूर्तमार्तण्ड ग्रंथांत जे अतिरिक्त अनध्याय सांगितले आहेत, ते मौंजीविषयीं नसून, उपनयनादिकांच्या अभ्यासाविषयींचे आहेत असें ( मानणें ) मला

योग्य दिसतें. त्यांत जर तृतीया, षष्ठी व द्वादशी या तिथींना प्रदोष असेल, तर मुंज करूं नये. रात्रीच्या पहिल्या प्रहरीं चतुर्थी; दीडप्रहरांत सप्तमी आणि दोन प्रहरांत त्रयोदशी यांप्रमाणें अनुक्रमें असल्यास प्रदोष होतो. पहिल्या प्रहरांत दोन दिवस जर चतुर्थीची व्याप्ति असेल, तर पहिल्या दिवशीं प्रदोष समजावा, दुसऱ्या दिवशीं मानूं नये, असें कौस्तुभांत सांगितलें आहे. प्रदोषाच्या दिवशीं, शनिवारीं व कृष्णपक्षांतल्या अखेरच्या पांच दिवसांत जर उपनयन केलें (असेल) तर तें पुन्हां करावें, असें मयूखांत सांगितलें आहे. (उपनयन म्हणजे गुरूजवळ विद्या शिकायला जाणें). याप्रमाणें नित्याचे अनध्याय होत.

अथनैमित्तिकाः विवाहप्रतिष्ठोद्यापनादिष्वासमाप्तेःसगोत्राणामनध्याय-इतिस्मृत्यर्थसारोक्तेस्त्रिपुरुषसपिण्डेषुब्रह्मयज्ञादिवर्जनात्मौंजीविवाहादिनिमित्तकमण्डपप्रतिष्ठाद्युत्सवसमाप्तिपर्यन्तमुपनयनंनकार्यमितिभाति विवाहादमंगलकरणेदोषोन शोभनदिनेचानध्यायइत्युक्तेर्गर्भाधानादिशुभकार्येदिनेएककुलेएकगृहेवाव्रतबन्धोनकार्यइतिभाति भूकम्पेभूविदारणेवज्रपातेउल्कापातेधूमकेतूत्पत्तौग्रहणेचदशाहंसप्ताहंवाव्रतबन्धादिमंगलंनकार्यम् केचित्संकटेत्रिदिनमनध्यायमाहुः अकालवृष्टौत्रिरात्रंपाक्षिणीवाऽनध्यायः पौषादिचैत्रान्तमकालवृष्टिः केचिदार्द्रादिज्येष्ठान्तसूर्यनक्षत्रादन्यत्राकालवृष्टिरितिसिद्धान्तः अतिवृष्टौकरकावृष्टौरुधिरवृष्टौचत्र्यहम् प्रातःसंध्यागर्जनेत्वहोरात्रम् गुरुशिष्यऋत्विङ्मरणेत्र्यहम् पशुमण्डूकनकुलश्वाहिमार्जारमूषकैरन्तरागमनेहोरात्रम् सृगालवानरैद्वादशरात्रम् श्रवणद्वादशीयमद्वितीयामहाभरण्यादयोऽन्येप्यनध्यायानित्यानैमित्तिकाश्चबहवोग्रन्थेषूक्तास्तेषामुपनयनेप्रसक्त्यभावादत्रनोक्ताः व्रतबन्धेनान्दीश्राद्धोत्तरं पूर्वोक्तप्रातर्गर्जितादिनैमित्तिकाध्यायप्राप्तौज्योतिर्निबन्धे नान्दीश्राद्धंकृतंचेत्स्यादनध्यायस्त्वकालिकः । तदोपनयनकार्यंवेदारम्भंनकारयेत् १ इति वेदारम्भंनकारयेदितिनिषेधोयाजुषादिविषयः बह्वृचानमुपाकर्मण्येववेदारंभोक्त्यामौञ्जीदिनेवेदारम्भाप्रसक्तेः तदोपनयनंकार्यमितिबह्वृचादिसर्वसाधारणाःयाजुषादिभिर्मौञ्ज्युत्तरमपिअनध्यायप्राप्तौवेदारम्भोवर्ज्यः नान्दीश्राद्धात्प्राक्नैमित्तिकाध्यायेमुहूर्तान्तरेकार्यम् मौञ्ज्युत्तरमनुप्रवचनीयाप्राग्गर्जनेवक्ष्यते इतिअनध्यायादिनिर्णयः

**नैमित्तिक अनध्याय**—लग्न, प्रतिष्ठा, (मण्डपप्रतिष्ठा वगैरे) व उपनयन— यांची समाप्ति होईपर्यंत सगोत्रांना अनध्याय असल्याचें स्मृत्यर्थसारांत सांगितलें आहे. वास्तव, तीनपुरुषपर्यंत जे सपिण्ड असतील त्यांनीं ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव वगैरे वर्ज्य करावींत व मुंज, लग्न वगैरेसाठीं केलेल्या मण्डपप्रतिष्ठापनादि उत्सवाची समाप्ति होईपर्यंत उपनयन करूं नये असें वाटतें. विवाहादि मंगलकार्यें करण्यांत दोष नाहीं. मंगलकार्याचा जो दिवस तो अनध्याय होय, असें वचन असल्यानें, गर्भाधानादि शुभ कार्याच्या दिवशीं एकाच कुलांत

किंवा एकाच घरांत व्रतबन्ध ( मुंज ) करूं नये असें वाटतें. भूकम्प, भूविदारण, वज्रपात ( वीज पडणें ), उल्कापात, धूमकेतूची उत्पत्ति, ग्रहण वगैरे जर असतील तर दहा दिवस किंवा सात दिवस व्रतबन्धादि मंगलकार्यें करूं नयेत. संकटकालीं तीन दिवस अनध्याय मानावा, असें कोणी सांगतात. अकालीं वृष्टि झाल्यास तीन रात्रीं किंवा पक्षिणी ( बारा प्रहर ) अनध्याय होय असें म्हणतात. पौषाच्या आरंभापासून चैत्राच्या शेवटापर्यंत जर पाऊस पडला, तर ती अकाली वृष्टि होय. आर्द्रारम्भापासून ज्येष्ठाच्या अखेरीपर्यंतचीं सूर्यनक्षत्रें सोडून बाकीच्या नक्षत्रीं जर पाऊस पडला, तर तीही अकालवृष्टि असल्याचें कोणी सांगतात. ज्या देशांत पावसाचा जो काल असेल त्याहून इतर काळीं जर वृष्टि होईल तर तो अकाल पर्जन्य होय, असा ( सामान्य ) नियम समजावा. अतिवृष्टि, गारांचा पाऊस अथवा रक्तवृष्टि झाल्यास तीन दिवस; प्रातःसन्ध्येच्या वेळीं गर्जना ( मेघांची ) झाल्यास एक अहोरात्र; गुरु, शिष्य किंवा ऋत्विज मेल्यास तीन दिवस; पशु, बेडूक, मुंगूस, कुत्रा, सर्प, मांजर व उंदीर यांपैकीं कोणी मधून गेल्यास एक अहोरात्र, रानमांजरादि मधून गेल्यास तीन रात्रींपर्यंत; कोल्हा, वानर, वगैरे मधून गेल्यास बारा रात्रींपर्यंत—असा अनध्याय समजावा. श्रवणनक्षत्रयुक्त द्वादशी, यमद्वितीया, महाभरणी, वगैरे इतरही अनेक नित्य व नैमित्तिक अनध्याय इतर ग्रंथांत जरी सांगितले आहेत, तरी त्यांचा उपनयनाशीं संबंध नसल्यानें, ते येथें सांगितले नाहींत. व्रतबन्धसंस्कारांत नान्दीश्राद्धानन्तर वर सांगितलेले ( मेघ ) गर्जनादि नैमित्तिक अनध्याय जर प्राप्त होतील, तर ज्योतिर्निबन्धग्रन्थांत त्याबद्दल असें सांगितलें आहे कीं, नान्दीश्राद्धानंतर जर अकालिक अनध्याय येईल, तर फक्त उपनयन ( गुरूजवळ नेणें ) करावें, वेदशिक्षणारम्भ करूं नये. वेदशिक्षणारम्भाचा जो निषेध येथें सांगितला आहे, तो यजुःशाखीयांनाच फक्त लागू आहे; कारण, ऋक्शाखीयांनीं उपाकर्माच्या ( गुरूजवळ जाण्याच्या ) वेळींच वेदाध्ययनाला आरम्भ करावा असें वचन असल्यानें, त्यांच्या मुंजीच्या दिवशीं वेदाध्ययनारम्भ होणें संभवतच नाहीं. म्हणून उपनयन करण्यास ऋक्शाखी वगैरेंना सर्वसाधारण सांगितलें. यजुःशाखीयांना मुंजीनन्तरसुद्धां अनध्याय प्राप्त होत असल्यामुळें वेदाध्ययनारम्भ वर्ज्य असल्याचें सांगितलें. नान्दीश्राद्धाच्या आधीं जर नैमित्तिक अनध्याय आला, तर उपनयन निराळ्या मुहूर्तावर करावें. मुंजीनन्तरच्या अनुप्रवचनीय होमाच्या आधीं जर ( मेघ ) गर्जना झाली, तर काय करावें त्याचा निर्णय पुढें सांगेन. असा हा अनध्यायादि निर्णय होय.

इत्थंतिथिंतत्प्रसंगप्राप्तमनध्यायादिकंचविचार्यवारादिचिन्त्यते गुरुशुक्रबुधवाराःश्रेष्ठाः सूर्यवारोमध्यमः चन्द्रवारोऽधमः भौममन्दवारौनिषिद्धौ सामवेदिनांक्षत्रियाणां चभौमवारःप्रशस्तः शाखाधिपतिवारश्चशाखाधिपबलंतथा ॥ शाखाधिपतिलग्नंचदुर्लभंत्रितयं व्रते १ गुरुशुक्रौभौमबुधाऋग्वेदाद्यधिपाःस्मृताः । पतीसितेज्यौविप्राणांनृपाणांकुजभास्करौ २ वैश्यानां शशभृ-

त्सौम्यान्निनिर्णीधिपा स्मृताः । पितुःसूर्यबलंश्रेष्ठं शाखावर्णेशयोर्बटोः पितुर्ब-टोश्च सर्वेषांबलंवाक्पतिचन्द्रयोः । बटतात्पत्रोरुभयोर्गुरुचन्द्रबलाभावेबटो-रुभयबलमावश्यकम् तत्र चन्द्रबलंगर्भाधानप्रसंगउक्तम् द्विपञ्चसप्तनवैकाद-शस्थोगुरुःशुभफलप्रदः जन्मतृतीयषष्ठदशमस्थानेषुपूजाहोमात्मकशान्त्या-शुभः चतुर्थाष्टमद्वादशस्थानेषुदुष्टफलः कर्कधनुर्मीनराशिषुचतुर्थादिस्थानेऽ-पिनदोषः अतिसंकटेचतुर्थद्वादशस्थोद्विगुणपूजाहोमादिनाशुभः अष्टमस्तु त्रिगुणपूजादिनाशुभः केचिदनिष्टोवामवेधेन शुभइत्याहुरतन्नेतिराजमार्तण्डः अष्टमवर्षादिमुख्यकाले गुरुबलाभावेऽपिमीनगतरवियुक्तचैत्रेवाशान्त्यावाव्रत-बन्धःकार्योनतुल्यमुख्यकालातिक्रमःमुख्यकालस्यबलीयस्त्वात् ॥

**व्रतबन्धास गुरुबल**—मागें सांगितल्याप्रमाणें तिथि व त्यांच्यामुळें अन-ध्यायादिकांचा विचार करून, आतां वारादिक सांगतों.

गुरु, शुक्र व बुध हे वार श्रेष्ठ होत. रविवार मध्यम होय. सोमवार कनिष्ठ जाणावा. मंगळ व शनि हे वार निषिद्ध होत. सामवेदी व क्षत्रिय यांना मंगळवार प्रशस्त होय. शाखाधिपतीचा वार, शाखाधिपतींचें बल आणि शाखाधिपतीचें लग्न असा हा त्रिकूटयोग उपनयनाला मिळणें दुर्लभ होय. गुरु, शुक्र, मंगळ व बुध हे अनुक्रमें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद यांचे अधिपति होत. गुरु व शुक्र हे ब्राह्मणांचे अधिपति, मंगळ व रवि, हे क्षत्रियांचे अधिपति आणि चन्द्र व बुध हे वैश्यांचे अधिपति. हे वर्णाधिपति होत. पित्याला रविबल श्रेष्ठ, बटूला शाखा-धिपति व वर्णाधिपति हे श्रेष्ठ होत, व गुरु आणि चन्द्र यांचें बल पिता, बटु वगैरे सर्वांनाच श्रेष्ठ होय. बटु व त्याचा बाप या दोघांना अनुक्रमें जर गुरु व चन्द्र यांचीं बलें नसतील तर बटूचा त्या दोघांचेंहि बल असणें आवश्यक आहे. यांपैकीं चन्द्रबल म्हणजे काय त गर्भाधानप्रकरणांत सांगितल आहे. २–५–७–९ व ११ या स्थानचा ( जन्मलग्न कुंडलीतला ) गुरु शुभ फल देणारा असतो. १–३–६ १० या स्थानचा गुरु पूजाहोमात्मक शान्ति केल्यानें शुभ होतो. ४–८ व १२ या स्थानचा गुरु दुष्ट फल देणारा असतो कर्क, धनु व मीन या राशींचा जर ( गुरु ) असून, तो जर ४–८ किंवा १२ या स्थानीं असेल तर त्याचा दोष नाहीं. अति संकट असल्यास ४ व १२ या स्थानचा गुरु दुप्पट पूजाहोमादि केल्यानें शुभ होतो. आठव्या स्थानचा तिप्पट पूजाहोमादिकांनीं शुभ होतो. अनिष्ट गुरु वामवेधानें शुभ होतो. असे जरी कांहीं ग्रन्थकार म्हणतात, तरी तें त्यांचें म्हणणें राजमार्तंड ग्रन्थकाराला सम्मत नाहीं. आठव्या वर्षाच्या मुख्य कालीं जरी गुरुबल नसल, तरी मीनस्थ रवीनें युक्त अशा चैत्रांत किंवा शान्ति करून मुंज करावी पण मुख्य कालाचा अतिक्रम करूं नये; कारण तोच सर्वांत अधिक असा बलवान् काल आहे.

अथनक्षत्राणि पूर्वात्रयहस्तचित्रास्वातीमूलाश्लेषार्द्राश्रवणेषुऋग्वेदिनांमौंजी-शस्ता रोहिणीमृगपुष्यपुनर्वसुत्र्युत्तराहस्तानुराधाचित्रारेवतीषुयाजुषाणाम्

अश्विनीपुष्योत्तरात्रयार्द्राहस्तधनिष्ठाश्रवणेषु मान्यानाम् अश्विनीमृगानुराधा-हस्तधनिष्ठापुनर्वसुरेवतीषु अथर्ववेदिनां एषां नक्षत्राणामसंभवे भरणीकृत्तिका-मघाविशाखाज्येष्ठाशततारकावर्जयित्वा सर्वाणि सर्वेषां ग्राह्याणि राजमार्तण्डे-पुनर्वसुनिषेधो निर्मूल इति बहवः केचिदृक्सामवेदाविषयः पुनर्वसुनिषेधमाहुः व्यतीपातवैधृतिपरिघार्धेषु विष्कम्भादीनां निषिद्धनाडीषु भद्रायां ग्रहणे च मौञ्जी वर्ज्या

**व्रतबन्धास नक्षत्रबल**—तीन पूर्वा, हस्त, चित्रा, स्वाती, मूळ, आश्लेषा, आर्द्रा, व श्रवण या नक्षत्रांवर ऋग्वेद्याची मुंज करणें प्रशस्त होय; रोहिणी, मृग, पुष्य, पुनर्वसु, तीन उत्तरा, हस्त, अनुराधा, चित्रा व रेवती या नक्षत्रीं यजुर्वेद्यांची मुंज करणें प्रशस्त होय; अश्विनी, पुष्य, तीन उत्तरा, आर्द्रा, हस्त, धनिष्ठा व श्रवण या नक्षत्रीं सामवेद्याची मुंज करणें प्रशस्त होय. आणि अश्विनी, मृग, अनुराधा, हस्त, धनिष्ठा, पुनर्वसु व रेवती या नक्षत्रांवर अथर्ववेद्याची मुंज करणें प्रशस्त होय. हीं नक्षत्रें साधणें शक्य नसल्यास–भरणी, कृत्तिका, मघा, विशाखा, ज्येष्ठा व शततारका हीं नक्षत्रें तेवढीं सोडून बाकीचीं सर्व नक्षत्रें घ्यावींत. राजमार्तण्डांत पुनर्वसु नक्षत्राचा जो निषेध सांगितला आहे, त्याला मूळांत आधार नसल्याचें अनेक ग्रन्थकारांनीं प्रतिपादिलें आहे, ऋग्वेदी व सामवेदी यांना पुनर्वसु नक्षत्र निषिद्ध असल्याचें कांहीं ग्रन्थकार सांगतात. व्यतीपात, वैधृति, परिघाचें अर्ध, विष्कम्भ वगैरेंच्या निषिद्ध घटका ( विष्कम्भाच्या ३, व्याघाताच्या ९१, शूलाच्या ५, वज्राच्या ९, गण्डाच्या ६ व अतिगण्डाच्या ६ अशा पहिल्या घटका ), भद्रा व ग्रहण यांवर मुंज करूं नये.

अथ लग्ने ग्रहबलम् व्रते ग्राह्याद्द्वादशाष्टषट्वर्ज्याः शुभखेचराः । खलास्त्र्या-यारिगाश्चन्द्रः शुक्रोगोकर्कगस्तनौ १ क्वचित्सूर्यस्तनौ श्रेष्ठोऽष्टमे वर्ज्योऽखिलो-ग्रहः । लग्नेशः शुक्रचन्द्रौ च षष्ठे वर्ज्याः सितोन्त्यगः २ लग्नचन्द्रबलाश्चैवेन्दु-र्वर्ज्यो द्वादशाष्टमे । पञ्चेष्टग्रहहीनं च लग्नं सर्वत्र वर्जयेत् ३ तुलामिथुनकन्याख्या धनुर्वृषझषाव्हयाः । नवमांशाः शुभाः प्रोक्ताः कर्कांशं वर्जयेद्व्रत ४ षड्वर्ग-शुद्ध्यादिकमिष्टकालसाधनादिविचारश्च ज्योतिर्ग्रन्थेभ्यो ज्ञातव्यः मातरि रज-स्वलायां मातुलज्येष्ठभ्रात्रादीनां पित्रसांनिध्यात् कर्तॄणां पत्न्यां रजस्वलायां च-मौञ्जीविवाहादि न कार्यम् नान्दीश्राद्धोत्तरं मातुर्ज्येष्ठभ्रात्रादिकर्त्रन्तरस्य वा सं-न्निहितमुहूर्तान्तरालाभे शान्तिं कृत्वा कार्यम् अन्यथा मुहूर्तान्तर एव नान्दी-श्राद्धोत्तरं मातुलादिकर्तॄणां पत्नीरजोदोषे आरब्धत्वाच्छान्तिं विनैव कार्यम् मौञ्जी विवाहोत्तरं मण्डपोद्वासनात्प्राक् मातृरजोदोषेपि शान्तिः कार्या मंगलस्यासमाप्त-त्वादिति मुहूर्तचिन्तामणिटीकायाम् प्रारम्भात्प्रागपि रजोदोषे मुहूर्तान्तरालाभे-शान्तिं कृत्वाऽतिसंकटे व्रतबन्धादिकं कार्यमिति कौस्तुभे शान्तिप्रकारश्च नमाणक-मङ्गले संस्कार्यजननीरजोदोषजनिताशुभफलनिरासार्थं शुभफलावाप्त्यर्थं श्री पूजनादिशान्तिं करिष्ये इति संकल्प्य माषसुवर्णनिर्मितां लक्ष्मीं षोडशेन षोड-शोपचारैः संपूज्य स्वगृह्योक्तां वाधनाश्रीसूक्तेन मध्ये चपाय संहुत्वाकळशोदकेन-

भिषिच्यविष्णुंस्मृत्वाकर्मेश्वरार्पणंकुर्यादिति प्रारम्भोत्तरं सूतकप्राप्तौ एको-दरयोःसमानसंस्कारेप्रेतकर्मासमाप्तौचचौलप्रकरणउक्तम्विशेषस्तुवक्ष्यते ॥

**मुंजीस ग्रहबल**—१२, ८ व ६ या स्थानचे वर्ज्य करून, शुभ ग्रह मुंजीला घ्यावेत. ३, ६ व ११ या स्थानचे पापग्रह घ्यावेत. शुक्ल-पक्षांतला वृषभ व कर्क या राशींचा चन्द्र शुभ होय. तनुस्थानचा रवि श्रेष्ठ असल्याचें क्वचित् ग्रन्थांत सांगितलें आहे. आठव्या स्थानचे सर्व ग्रह वर्ज्य करावेत. लग्नेश, शुक्र व चन्द्र हे सहाव्या स्थानचे वर्ज्य होत. बारावा शुक्र वर्ज्य होय. लग्नीं चन्द्र व पापग्रह आणि आठव्या व बाराव्या स्थानचा चन्द्र हे वर्ज्य करावेत. ज्या लग्नीं पांच इष्टग्रह येत नाहींत तें (लग्न) सर्वथा वर्ज्य करावें. तुला, मिथुन, कन्या, धनु, वृषभ व मीन हे नवमांश शुभ होत. कर्कांश वर्ज्य करावा. षड्वर्गशुद्धि आणि इष्ट-कालसाधनादिक यांचा विचार ज्योतिषग्रन्थांत पाहावा. आई विटाळशी असेल आणि बाप जवळ नसल्यानें थोरला भाऊ, मामा वगैरे जे कोणी मुंज करणारे असतील, त्याचीही स्त्री जर विटाळशी असेल, तर मुंज, लग्न वगैरे करूं नयेत. नान्दी-श्राद्धानन्तर जर आई विटाळशी होईल, तर (वडील) भाऊ वगैरे कोणीही इतर मुंज करणारा असला, तरी जवळचा दुसरा मुहूर्त नसल्यास शान्ति करून किंवा दुसरा मुहूर्त असल्यास त्या मुहूर्तावर मुंज करावी. मामा वगैरे जो कोणी कर्ता असेल, त्याची बायको जर नान्दीश्राद्धानन्तर विटाळशी होईल, तर (संस्काराला) आरम्भ झालेला असल्याकारणानें शान्तिवांचूनच कार्य करावें. मुंज किंवा लग्न झाल्यानंतर मण्डपोद्वासनाच्या आधीं जरी माता विटाळशी झाली, तरी मङ्गल-कार्यसमाप्ति झालेली नसल्याकारणानें शान्ति करावी, असें मुहूर्तचिन्तामणीच्या टीकेंत लिहिलें आहे. मङ्गलकार्यारम्भाच्या आधीं जर रजोदर्शन होईल, तर दुसऱ्या कोणा कर्त्याच्या अभावीं-अति संकट असल्यास शान्ति करून, व्रतबन्धादिक करावींत, असें कौस्तुभांत सांगितलें आहे. शान्ति करणें ती पुढीलप्रमाणें करावीः— 'ममामुकमङ्गले संस्कार्यजननीरजोदोषजनिताशुभफलनिरासार्थं शुभफलावाप्त्यर्थं श्री-पूजनादिशान्तिं करिष्ये' असा संकल्प करावा आणि एक मासा सोन्याच्या केलेल्या लक्ष्मीच्या मूर्तीची श्रीसूक्तानें षोडशोपचारें पूजा करावी. ज्याच्या त्याच्या गृह्यसूक्तांत सांगितल्याप्रमाणें ज्यानें त्यानें विधिवत् श्रीसूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें खिरीची आहुती देऊन, कलशांतल्या पाण्यानें अभिषेक करावा. विष्णूचें स्मरण करून (तें सर्व) कर्म ईश्वराला अर्पण करावें. व्रतबन्धसंस्कारास आरम्भ केल्यानंतर जर सुतक आलें, तर सोदर (सख्ख्या) भावांचा समान संस्कार असल्यास, आणि प्रेतकर्म संपलें नसल्यास काय करावें, त्याचा निर्णय चौलप्रकरणांत मागें सांगितला आहे. याचा विशेष निर्णय पुढें सांगूं.

अथपदार्थसंपादनम् कौपीनंप्रावारार्थंकार्पासजमहतंसंपाद्यं ईषद्धौतंनवंश्वे-तंसदशंवमहतसंज्ञं प्रावारार्थमजिनंवा तच्चत्र्यंगुलंवाबाहिर्लोमाखण्डंत्रिखण्डंवा-

ष्टचत्वारिंशदंगुलंधार्यम् त्रिखण्डपक्षेचतुर्विंशत्यंगुलषोडशांगुलः क्रमेणत्रयः खण्डः कार्पासंयज्ञोपवीतम् ॥

**वटूचें पदार्थसम्पादन**—कौपीन ( लंगोटी ) व पांघरण्याचें वस्त्र हीं कापसाचीं मिळवावींत. थोडें धुतलेलें पण नवीन, पांढरें व दशा असलेलें जें अहत ( वस्त्र ) तें पांघरण्यास असावें, किंवा कृष्णाजिन ( काळ्या पाठीच्या हरिणाचें कातडें ) असावें. पांघरण्यास घेण्याचें कृष्णाजिन तें तीन किंवा चार बोटें बहिर्लोम ( केसांचें ) असलेलें अखण्ड, अथवा त्रिखण्ड (तीन तुकडयांचें) असें अठेचाळीस बोटें असावें. त्रिखण्ड चर्म पांघरायचें असल्यास अनुक्रमें २४–८ व १६ अंगळांच्या एकेका पट्टयांचें तें असावें. यज्ञोपवीत ( जानवें ) कापसाचें करावें.

तन्निर्माणप्रकारः ब्राह्मणेनब्राह्मणस्त्रीभिर्विधवादिभिश्चनिर्मितंसूत्रंग्राह्यम् संहतचतुरंगुलिमूलेषुषण्णवत्यासूत्रमावेष्टयतत्त्रिगुणीकृत्योर्ध्ववृत्तंवलितंकृत्वा पुनरधोवृत्तरीत्यात्रिगुणीकृतंतत्सूत्रंनवतन्तुकंसंपद्यते तत्त्रिरावेष्टयदृढग्रंथिं कुर्यात्स्तनादूर्ध्वमधोनाभेर्नधार्यंतत्कथंचन । विच्छिन्नंवाप्यधोयातंभुक्त्वानिर्मितमुत्सृजेत् १ सिद्धेमन्त्राःप्रयोक्तव्याइतिन्यायेन सिद्धं यज्ञोपवीतं त्रिगुणीकरणादिमन्त्रैरभिमन्त्र्य यज्ञोपवीतंपरमिमितिमन्त्रेण धारयेत् तद्यथागायत्र्यात्रिगुणीकृत्यापोहिष्ठेतितिसृभिः प्रक्षाल्यपुनर्गायत्र्यादित्रिगुणीकृत्यग्रन्थौविष्णुब्रह्मरुद्रान्नमेत् केचिन्नवतन्तुषुनवदेवतान्यासमाहुः ततोगायत्र्यादशवारमभिमन्त्रिताभिरद्भिर्यज्ञोपवीतं प्रक्षाल्योदुत्यमितितृचेनसूर्यायप्रदर्श्ययज्ञोपवीतमितिमन्त्रेणप्रथमंदक्षिणंबाहुमुद्धृत्यपश्चात्कण्ठेधारयेदिति उपवीतंब्रह्मसूत्रंप्रोद्धृतेदक्षिणेकरे । प्राचीनावीतमन्यस्मिन्निवीतंकण्ठलम्बितम् १ चितिकाष्टचितिधूमचण्डालरजस्वलाशवसूतिकास्पर्शेस्नात्वायज्ञोपवीतत्यागः कण्ठलम्बितत्वाद्यकृत्वामलमूत्रोत्सर्गेचतत्त्यागः मासचतुष्टयोत्तरंचयज्ञोपवीतत्यागः केचिज्जननशावाशौचयोरन्तेपितत्त्यागमाहुः समुद्रंगच्छस्वाहेतिमन्त्रेणसप्रणवव्याहृतिभिर्वाजीर्णयज्ञोपवीतत्यागः यज्ञोपवीतंप्रमादाद्भूतंचेत्तूष्णीं लौकिकंधृत्वा मनोज्योतिरिति अग्नेव्रतपतेव्रतंचरिष्यामितच्छकेयंतन्मराध्यतां वायो व्रतपते० आदित्यव्रतपतेइत्यादिमन्त्रचतुष्टयेनचतस्रआज्याहुतीर्हुत्वाविधिवन्नूतनंधारयेत् अथवायज्ञोपवीतनाशजन्यदोषनिरासार्थंप्रायश्चित्तंकरिष्ये इतिसंकल्प्यआचार्यवरणाग्निप्रतिष्ठादिआज्यभागान्तेसवितारंगायत्र्यातिलैराज्येनवाष्टोत्तरंशतंसहस्रंवाजुहुयात् नूतनंधृत्वा।तिक्रान्तसंध्याद्यंचरेत्इति यज्ञोपवीतहीनःक्षणंतिष्ठेच्चेच्छतगायत्रीजपः यज्ञोपवीतंविनाभोजनेविण्मूत्रकरणेवा गायत्र्यष्टसहस्रंजपः वामस्कन्धात्कूर्परेमणिबन्धातेवापतितेयथास्थानंधृत्वा त्रीनूषद्वायथाक्रमंप्राणायामान्कृत्वानवंधारयेत्कोपाद्दिनास्वयंयज्ञोपवीतत्यागेपूर्ववल्लौकिकंधृत्वाप्रायश्चित्तान्तेनवंधारयेत् ब्रह्मचारिणएकंयज्ञोपवीतम् स्नातकस्यद्वे उत्तरीयाभावेतृतीयकम् जीवत्पितृकेणजीवज्ज्येष्ठभ्रातृकेण चोत्तरीयं-

तत्स्थानेतृतीयंयज्ञोपवीतंस्नानधार्यम् आयुष्कामस्यत्र्यधिकानिबहूनियज्ञोपवीतानि अभ्यङ्गश्चोदावस्नानमातापित्रोर्मृतेहान । तैत्तिरीयाःकठाः कण्वाश्चरकावाजसनेयिनः १ कण्ठादुत्तायेसूत्रंतुकुर्युर्वैक्षालनंद्विजाः अन्ययाजुषैर्बह्वृचैःसामगैश्चकण्ठादुत्तारणेतस्यकर्त्वानवंधार्यम् ॥

**यज्ञोपवीत करण्याचा प्रकार**—यासाठीं ब्राह्मण, ब्राह्मणस्त्रिया व ( ब्राह्मण विधवा ) यांनीं काढिलेलें ( कापसाचें ) सूत घ्यावें. चार अंगुळें एकत्र करून त्याच्याभोंवतीं तें सूत शहाण्णव वेळां ( त्या बोटांच्या ) मुळाशीं गुंडाळावें व तें त्रिगुणित ( तिहेरी ) करून त्याला वरचा ( उर्ध्ववृत्त ) पीळ भरावा व तें पुन्हां खालच्या (अधोवृत्त) पिळानें त्रिगुणित करावें. म्हणजे तें ( सूत ) नवसुती बनतें. ही नवसुती तीन वेळ वेष्टण करून, तिला भक्कम गांठ मारावी. स्तनांच्या वर आणि बेंबीच्या खालीं ( अशा लांबीचें ) जानवें कधींही धारण करूं नये. ( जानवें ) तुटल्यास, खालीं गेल्यास किंवा जेवण केल्यावर तयार केलेलें टाकून द्यावें, 'सिद्धपदार्थांना मंत्र योजावे' या न्यायानें तयार झालेलें जानवें ( यज्ञोपवीत ) त्रिगुणीकरणादिकांच्या मंत्रांनीं अभिमंत्रून 'यज्ञोपवीतं परमं०' या मंत्रानें जें गळ्यांत घालावें, तें असें:– गायत्रीमंत्रानें ( तें ) त्रिगुणित करून 'आपोहिष्ठा०' वगैरे तीन ऋचांनीं ( तें ) प्रक्षालन करून पुन्हां गायत्रीमंत्रानें त्रिगुणित करावें. गाठींत ब्रह्मा, विष्णु व महेश यांचा न्यास (स्थापना) करावा. नऊ तन्तूंच्या ठिकाणीं नऊ देवतांचा न्यास करण्यासही कोणी सांगतात. नन्तर गायत्रीमंत्रानें दहावेळ अभिमन्त्रित केलेल्या पाण्यानें यज्ञोपवीत प्रक्षालन (धुणें) करून 'उदुत्यं' या तीन ऋचांनीं तें सूर्याला दाखवावें आणि 'यज्ञोपवीतं' या मंत्रानें प्रथम उजवा हात वर करून त्यांतून गळ्यांत घालावें. उजवा हात वर करून गळ्यात घातलेलें जें ब्रह्मसूत्र ( जानवें ) तें उपवीत आणि डावा हात वर असतां घातलेलें जें ब्रह्मसूत्र तें प्राचीनावीत ( असें समजावें. ) गळ्यांत ( माळेसारखें ) जें घातलेलें ( जानवें ) तें निवीत होय. चिताकाष्ठ, चिताधूम, चाण्डाल, रजस्वला, प्रेत व बाळंतीण यांचा स्पर्श झाला असतां, स्नान करून ( जुन्या ) जानव्याचा त्याग करावा व दुसरें घालावें. गळ्यांत माळेसारखें ( निवीत ) जानवें न घालतां परसाकडे किंवा लघवी हीं केलीं असतांही (जुन्या) जानव्याचा त्याग करावा. (दर) चार महिन्यांनीं ( जुन्या ) जानव्याचा त्याग करावा. सोयर व सुतक हीं फिटल्यावर (जुनें) जानवें टाकून नवें घालावें, असें कांहीं ग्रंथकार सांगतात. 'समुद्रं गच्छ स्वाहा०' या मंत्रानें किंवा प्रणव( ॐकार )पूर्वक व्याहृतिमंत्रांनीं जुन्या यज्ञोपवीताला टाकून द्यावें. चुकीनें जानवें हरवल्यास अमंत्रक असें दुसरें जानवें घालावें, आणि 'मनो ज्योति० अग्ने व्रतपते चरिष्यामि तच्छकेयं तन्मे राध्यतां वायो व्रतपते० आदित्य व्रतपते०' या चार मंत्रांनीं तुपाच्या चार आहुतींचें ( अर्थात ) हवन करून, नंतर विधियुक्त नवें जानवें घालावें; किंवा 'यज्ञोपवीतनाशजन्यदोषनिरासार्थं प्रायश्चित्तं करिष्ये' असा संकल्प करून, आचार्यवरण, अग्निप्रतिष्ठापन वगैरे

आज्यभागापर्यंतचें कर्म करून, सूर्यासाठीं १०८ किंवा १००८ तिलघृतांचा गायत्रीमंत्रानें होम करावा, आणि नंतर नवें जानवें घालून राहिलेलें सन्ध्यादि कर्म करावें. यज्ञोपवीतावांचून क्षणभरही राहिल्यास, शंभर गायत्रीजप करावा भोजन किंवा मलमूत्रोत्सर्ग हीं जर यज्ञोपवीतावांचून केलीं तर आठ हजार गायत्रीजप करावा. डाव्या खांद्यावरून कोंपऱ्यावर किंवा मनगटावर जर जानवें पडलें, तर तें त्याच ठिकाणीं ठेवून, तीन अथवा सहा प्राणायाम अनुक्रमें करावेत व मग नवें जानवें घालावें. क्रोधादिक कारणांनीं स्वतःच जर जानवें फेकून दिलें असलें, तर पुन्हां साधेंच जानवें आधीं घालून प्रायश्चित्त करावें व नंतर (यथाविधि) नवें घालावें. ब्रह्मचाऱ्यानें एक जानवें घालावें. स्नातकानें (गृहस्थाश्रम्यानें) दोन किंवा उत्तरीय (उपरणें) वस्त्राच्या अभावीं तीन घालावींत. बाप अथवा वडील भाऊ जिवंत असलेल्यानें उत्तरीय वस्त्र किंवा त्याच्या ऐवजी तिसरें (जानवें) घालूं नये. आयुष्याची (वाढीची) इच्छा करणारानें तिहींहूनहि अधिक जानवीं घालावीत. अभ्यंगस्नान, समुद्रस्नान, आणि मातापितराचे मृत दिवस या प्रसंगीं तैत्तिरीय, कठ, कण्व, चरक व वाजसनेयी या ब्राह्मणांनीं गळ्यातून जानवें काढून तें प्रक्षालन करावें. इतर जे यजुःशाखी, ऋग्वेदी व सामवेदी ब्राह्मण त्यांनी गळ्यांतून जानवें काढलें असतां, तें टाकून देऊन नवें घालावें.

अथमेखला मौञ्जीत्रिवृत्समाश्लक्ष्णाकार्याविप्रस्यमेखला । त्रिवृत्ताग्रन्थिकेनत्रिभिः पञ्चभिरेवच १ मुञ्जाभावेतुकर्तव्याकुशाश्मन्तकबल्वजैः । ब्राह्मणस्यभवेद्दण्डःपालाशःकेशसंमितः २ सर्वेषायाज्ञियावास्यान्नुध्र्वेनासाग्रसंमितः । बद्धहस्तेनचतुर्हस्ताहस्तोच्छ्रिताचतुरस्रासोपानाङ्किताप्राग्उदक्प्रवणाकदलीस्तम्भाद्यलंकृतावेदिःसंपाद्या ।

**मुंजतृणमेखला, दण्ड आणि वेदी**—मुंजगवताची (मेखला) ब्राह्मणासाठीं तीन वेष्टनाची व बारीक करावी. तिचे तीन वेढे घालून पहिली गांठ एका फेऱ्याची, दुसरी तीन फेऱ्यांची व तिसरी पांच फेऱ्यांची करावी. मुंजगवत न मिळाल्यास कुश (दर्भ), अश्मन्तक (आपटा) बल्वज (लव्हाळा) वगैरेंची करावी. ब्राह्मणाचा दण्ड पळसाचा व केशांपर्यंत उंचीचा असावा, अथवा सर्वांच्यासाठीं यज्ञीय वृक्षाचा वरच्या नासिकाग्राइतक्या उंचीचा करावा. बटूच्या हातानें चार हात लांबीरुंदीची व एक हात उंचीची चतुष्कोणी व पायऱ्यांची पूर्व व उत्तर या दिशांकडे उतरती आणि कदलीच्या खांबांनीं शोभविलेली वेदी (बहुलें) करावी.

अथोपनयनान्तर्गतपदार्थेषुविशेषउच्यते वासःपरिधानोत्तरंलौकिकमाचमनम् यज्ञोपवीतधारणोत्तरंतुयथाविधि आचमनविधिर्वक्ष्यते एवमाज्यपात्रादुत्तरभागेबटुमाचमय्यप्रणीतापश्चिमदेशरूपतीर्थेनप्रवेश्याचार्याग्न्योर्मध्येननीत्वाचार्यदक्षिणतउपवेशयेत् ततोबर्हिरास्तरणादिसुवसमार्गान्तेयज्ञोपवीतदानाद्याचमनान्तं ततःशिष्याञ्जलौजलावक्षारणादिसमिदाधानान्तंमायद्युपदे-

शाङ्गंवटोःशुचित्वसिद्धये अग्नयेसमिधमितिमन्त्रएकश्रुत्याप्रयोक्तव्यः ततः परिदानाभिवादनान्तेआचारप्राप्तंगायत्रीपूजनंकृत्वाऽग्नेरुत्तरदेशेगायत्र्युपदेशः कार्यःअवक्षारणमप्युत्तरदेशउक्तम् प्राङ्मुखआचार्यःप्रत्यङ्मुखायोपविष्टाय-बटवेगायत्रीमुपदिशेत् ॥

**उपनयनान्तर्गत पदार्थविशेष**—वस्त्र परिधान करून साधें आचमन करावें. यज्ञोपवीत घातल्यावर यथाविधि आचमन करण्याचा विधि पुढें सांगेन. आज्यपात्राच्या उत्तरभागीं बटूकडून आचमन करवून, प्रणीतपात्रांच्या पश्चिमदेशरूप तीर्थानें ( त्याचा ) प्रवेश करवून, आचार्य व अग्नि यांच्या मधून नेऊन ( त्याला ) आचार्यांच्या उजव्या बाजूला बसवावें. त्यानंतर बर्हींच्या आस्तरणापासून स्रुवसम्मार्गान्ताचें कर्म झाल्यावर यज्ञोपवीतदानापासून आचमनापर्यंतचें कर्म करावें. आणि मग बटूच्या ओंजळींत पाण्याचें अवक्षारण वगैरे समिदाधानापर्यंत गायत्रीच्या उपदेशाचे अंगभूत जें कर्म तें करावें. बटूच्या शुचिर्भूतपणाची सिद्धि होण्यासाठीं 'अग्नये समिध०' हा मंत्र त्याच्याकडून एकवार म्हणवावा. त्यानंतर ( सूर्य व प्रजापति यांच्या स्वाधीन बटूला करणें ) परिदान व अग्नीला अभिवादन हीं करविल्यावर आचारप्राप्त असें गायत्रीपूजन करावें. आणि अग्नीच्या उत्तरभागीं बटूला गायत्रीचा उपदेश करावा. अवक्षारणसुद्धां अग्नीच्या उत्तरभागींच करवावें. पूर्वाभिमुख असलेल्या आचार्यांनें पश्चिमाभिमुख (बसविलेल्या) बटूला गायत्र्युपदेश करावा.

अथोपसंग्रहणप्रकारः उपसंग्रहणंनामामुकप्रवरान्वितामुकगोत्रोमुकशर्माहं-भोअभिवादयइत्युक्त्वा दक्षिणोत्तरकर्णौवामदक्षिणपाणिभ्यांस्पृष्ट्वा दक्षिण-हस्तेनगुरोर्दक्षिणपादंवामेन वामंस्पृष्ट्वाशिरोवनमनमिति एवंगुरुषुमातापित्रा-दिषुचअभिवादनपूर्वकपादस्पर्शात्मकमुपसंग्रहणम् वृद्धतरेषुत्वभिवादनमात्रम् वृद्धेषुनमस्कारः अशुचिंवमन्तमभ्यङ्गस्नानंकुर्वन्तंजपादिरतंपुष्पजलभैक्षादिभा-रवाहंननमेत् तन्नमनेउपवासः शूद्रनतौत्रिरात्रम् अन्त्यजेकृच्छ्रम् देवतागुरुय-तिनमनाकरणेउपवासः ॥

**उपसंग्रहण**—म्हणजे गुरूचे पाय धरणें त्याचा प्रकार असाः—अमुक प्रवरांचा असून अमुक गोत्राचा अमुक शर्मा असा मी नमस्कार करतों, असें म्हणून, डाव्या कानाला डाव्या हाताचा व उजव्या कानाला उजव्या हाताचा स्पर्श केल्यावर उजव्या हातानें गुरूचा उजवा पाय व डाव्या हातानें गुरूचा डावा पाय धरून ( त्या दोहोंवर आपलें ) मस्तक ( बटूनें ) टेंकून नमस्कार करावा. याप्रमाणेंच गुरुजन, माता व पिता यांचे अभिवादनपूर्वक पाय धरण्याला उपसंग्रहण असें म्हणतात. वृद्धतरांना अभिवादन ( पायांवर डोकें ठेवणें ) करून, वृद्धांना नमस्कार करावा. अशुचि, वमन करणारा, अभ्यङ्ग केलेला, स्नान करीत असलेला, जपादिकांत निमग्न असलेला व फुलें, पाणी, भिक्षा वगैरे घेऊन जात असलेला, यांना

नमस्कार करूं नये, केल्यास उपास करावा. अन्त्यजाला (नमस्कार) केल्यास कृच्छ्र-प्रायश्चित्त करावें आणि देवता, गुरु व संन्यासी यांना नमन न केल्यास उपास करावा.

**अथप्रत्यभिवादनम् तत्रान्त्यस्वरः प्लुतःकार्यः तद्यथा आयुष्यमान्भव-सौम्यदेवदत्ता ३ एकारौकारान्तेनाम्नि हरा ३ इ शम्भा ३ उ इतिसंध्यक्षरवि-श्लेषेण पूर्वभागाकारःप्लुत इति अनुप्रवचनीयार्थभिक्षायांभिक्षांभवान्ददातु भिक्षांभवतीददात्वितिवाभवच्छब्दमध्यकभिक्षावाक्यप्रयोगः अन्यभिक्षाया-मादावन्तेवाभवच्छब्दइति ॥**

**प्रत्यभिवादन**—( म्हणजे गुरूचा आशीर्वाद ) प्रत्यभिवादनांत शेवटचा स्वर प्लुत ( दीर्घ ) असावा तो असा:—आयुष्मान् भव, सौम्य देव-दत्ता ३ ( हे देवदत्ता, आयुष्यवान् हो. ) नांवाच्या शेवटीं जर एकार व ओकार हे असतील तर हरा ३ इ, शम्भा ३ उ ( हे हर, हे शम्भो, ). सन्धीच्या अक्षराच्या वियोगानें होणारा जो पूर्वभागाचा आकार तो प्लुत होय. अनुप्रवचनीय होण्यासाठीं भिक्षा मागतांना 'भिक्षां भवान्ददातु' किंवा 'भिक्षां भवती ददातु' असा भिक्षा-वाक्याचा प्रयोग 'भवत्' शब्द ज्यांत असेल तो करावा. इतर भिक्षा मागण्यांत 'भवत्' शब्द आरंभीं किंवा शेवटीं योजावा.

**अथोपनयनविवाहादौनिर्विघ्नफलप्राप्त्यर्थमुपसर्गनिरासायवासपिण्डमरणा-दिनिमित्तकप्रतिकूलानिवृत्त्यर्थंवाविनायकशान्तिःकार्या तत्रकालः शुक्लपक्षच-तुर्थीगुरुवारःपुष्यश्रवणोत्तरारोहिणीहस्ताश्विनीमृगनक्षत्राणिशस्तानि उपन-यनादौतुप्रधानकालानुरोधेनयथासंभवकालोग्राह्यः तत्रामुककर्मणोनिर्विघ्नफल-सिद्ध्यर्थमितिवाउपसर्गनिवृत्त्यर्थमितिवाऽमुकसपिण्डमरणनिमित्ताशुचित्व-प्रातिकूल्यनिरासार्थमितिवासंकल्पऊह्यः अवशिष्टप्रयोगोऽन्यत्र ज्ञेयः ।**

**विनायकशान्ति**—मुंज, लग्न वगैरे कार्यांत निर्विघ्नता येण्यासाठीं आणि संक-टाचा प्रसंग टळण्यासाठीं किंवा सपिण्डाच्या मरणादिकांची निवृत्ति व्हावी म्हणून विनायकशान्ति करावी. या शान्तीला शुक्लपक्ष, चतुर्थी, गुरुवार हा काल, आणि पुष्य, श्रवण, उत्तरा, रोहिणी हस्त अश्विनी व मृग हीं नक्षत्रें शुभ होत. मुंज वगैरे कर्मांच्या मुख्य ( मागें सांगितलेल्या ) कालाच्या अनुरोधानें जसा मिळेल तसा शान्तीला काळ घ्यावा. 'अमुककर्मणो निर्विघ्नफलसिद्ध्यर्थं' किंवा 'उपसर्गनि-वृत्त्यर्थं' अथवा 'अमुकसपिण्डमरणनिमित्ताशुचित्वप्रातिकूल्यनिरासार्थं' याप्रमाणें जसा प्रसंग असेल त्याप्रमाणें संकल्प करावा. बाकीचा प्रयोग इतर ग्रंथांत पहावा.

**विवाहोपनयनादिष्वाभ्युदयकर्मस्वादौग्रहयज्ञंकुर्यात् श्राद्धातिरिक्तेष्वनाभ्यु-दयिकेष्वपिशान्त्यादिकर्मसुग्रहानुकूल्यकामोग्रहयज्ञंकुर्यात् अरिष्टनिरासार्थमु-त्पातेषुशान्तिस्थानेष्वप्रधानोपिग्रहमखउक्तः प्रधानकर्मणःपूर्वमव्यवहितेवाका-लेकुर्यात् व्यवहितपक्षे सप्तदिनाधिकव्यवधानंनकार्यम् प्रतिग्रहंदशावरप्रधानाहु-तिसंख्यायामेकएवऋत्विक् दशाधिकपञ्चाशत्पर्यन्तसंख्यायांचत्वारऋत्विजः**

ततःऊर्ध्वंशतावरहोमेऽष्टौऋत्विजोनवमआचार्यः तत्राचार्यआचार्यकर्मकृत्वा-आदित्यायजुहुयात् अष्टभ्यःसोमादिभ्योष्टौऋत्विजोजुहुयुः ऋत्विक्चतुष्टय-पक्षे द्वाभ्यांग्रहाभ्यांएकैकोजुहुयात् आचार्योर्काय ताम्रादिमयीषुप्रतिमासुस-र्वासुसौवर्णीषुवाफलेष्वक्षतपुंजेषुवाआदित्यादिपूजनम् होमसंख्यानुसारेण-कुण्डस्यस्थण्डिलस्यवाग्रहवेदेश्चहस्तादिमानम् तत्र प्रधानाहुतीनांपञ्चाशद-वरसंख्यत्वेरत्निमितंकुण्डम् शतावरत्वेअरत्निमितम्सहस्रावरत्वेहस्तमितम् अयुतादिहोमेहस्तद्वयम् लक्षहोमेचतुर्हस्तम् तत्र कृतमुष्टिः करोरत्निः मुक्त-कनिष्ठिकः करःअरत्निः चतुर्विंशत्यंगुलोहस्तः यवोनचतुस्त्रिंशदंगुलानिहस्त-द्वयम् अष्टचत्वारिंशदंगुलानिहस्तचतुष्टयम् कुण्डेमेखलायोनिनाभिखातादि-मानंग्रन्थान्तरेभ्योज्ञेयम् इदंकुण्डादिमानंसर्वत्रज्ञेयम् समिच्चर्वाज्यंद्रव्यम् अर्कः पलाशःखदिरश्चापामार्गोथपिप्पलः। औदुम्बरःशमीदूर्वाकुशोऽर्कादेःक्रमात्स-मित् १ केचित्तिलानपिआहुः अर्कादिप्रधानहोमसंख्यादशांशेनाधिदेवताप्रत्यधि-देवतानांहोमःअधिदेवताद्यर्धसंख्ययाक्रतुसंरक्षकक्रतुसाद्गुण्यदेवतानां शान्त्यं-गभूतेग्रहयज्ञेबलिदानंकुर्वन्ति अन्यत्र ग्रहमखे बलिदानं न कुर्वन्ति प्रधानभूता-याएकाहुतेरेकविप्रभोजनंश्रेष्ठम् शताहुतेरेकविप्रभोजनंमध्यमम् सहस्राहुतेरेक-विप्रभोजनंजघन्यम् सुविस्तरप्रयोगादिकमन्यत्र इतिग्रहयज्ञः ॥

**ग्रहयज्ञ**—उपनयनादि मंगलकार्यांत प्रथम ग्रहयज्ञ (ग्रहमख) करावा. श्राद्धादिकां-खेरीज करून शान्ति वगैरे जीं मंगलकार्यें त्यांतसुद्धां ग्रहांची अनुकूलता इच्छिणाऱ्यांनीं ग्रहयज्ञ करावा. शान्ति करण्यास योग्य असे उत्पात झाल्यास त्यांतील ग्रहयज्ञ हें जरी मुख्य कर्म नाहीं, तरी अरिष्टाचा नाश व्हावा म्हणून ग्रहयज्ञ करावा. हा ग्रहयज्ञ मुख्य कर्माच्या आधीं थोडा वेळ किंवा पुष्कळ काळापूर्वीं करावा. हा बराच काळ जर पूर्वीं करणें असेल, तर याचें ( मुख्य कर्मांत ) सात दिवसांपेक्षां अधिक अंतर असूं नये. प्रत्येक ग्रहांच्या आहुतींची संख्या जर दहाच देणें असेल, तर एकच ऋत्विज असावा. दहापेक्षां जास्त आणि पन्नासांहून कमी आहुति देणें असल्यास चार ऋत्विज असावेत. पन्नासांच्या पुढें पण शंभराच्या आंत आहुति देणें असल्यास आठ ऋत्विज व एक आचार्य असे असावेत. अशा वेळीं आचार्यानें आपलें आचार्यकर्म करून सूर्याचा होम करावा. चन्द्रादि ( सोम ) आठ ग्रहांचे होम आठ ऋत्विजांनीं करावे. चारच ऋत्विज असल्यास दोन ग्रहांचा होम एके-कानें करावा व आचार्यानें सूर्याचा करावा. सूर्याची तांब्याची, चन्द्राची स्फटिकाची, मंगळाची रक्तचन्दनाची, बुधाची सोन्याची, गुरूची सोन्याची, शुक्राची रुप्याची, शनीची लोखण्डाची, राहूची शिशाची आणि केतूची कांश्याची. अशा प्रतिमा कराव्या किंवा सर्वच ग्रहांच्या सोन्याच्याच प्रतिमा कराव्या; किंवा सर्व ग्रहांच्या नांवांनीं फळें अथवा तांदुळांचे पुंजके मांडून त्यांची आदित्यादि ग्रह म्हणून पूजा करावी. होमाहुतींच्या संख्येप्रमाणें कुण्ड किंवा स्थण्डिल ( मातीचा चौकोनी सपाट ओटा ) व ग्रहांची वेदी ( यज्ञकुण्ड ) यांची रचना हस्तादि प्रमाणांवरून करावी.

मुख्य आणि अङ्गदेवतांच्या मिळून पन्नासांच्या आंत जर आहुति असतील, तर एक रत्निपरिमित कुंड करावें. ( आहुति जर पन्नासांच्या पुढें व ) शंभरांच्या आंत असतील तर ( कुंड ) अरत्निपरिमित करावें. ( आहुति ) हजारांच्या आंत असल्यास हस्तपरिमित (कुण्ड) करावें. दहा हजारांपर्यंत ( आहुति ) असल्यास दोन हातांचें परिमित (कुण्ड) करावें. एक लक्षपर्यंत ( आहुति ) असल्यास चार हातांचें परिमित (कुण्ड) करावें. मूठ वळलेला ( मोंढा ) हात म्हणजे रत्नि व मूठ मिटून फक्त करंगळी तेवढी उघडलेली ठेवून तिच्या लांबीपर्यंतचा जो हात तो अरत्नि. चोवीस अंगुळांचा एक हात, एक यव कमी अशीं चौतीस अंगुळें म्हणजे दोन हात, व अठ्ठेचाळीस अंगुलांचे चार हात. कुंडांतली मेखला, योनी, नाभी व खोली वगैरेंचें प्रमाण कसें असावें तें इतर ग्रंथांत पहावें. सर्व ठिकाणीं कुण्डाचें प्रमाण असेंच समजावें. समिधा, चरु व घृत यांना द्रव्यें म्हणतात. रुई, पळस, खैर, अपामार्ग (आघाडा), पिंपळ, उंबर, शमी, दूर्वा आणि दर्भ या अनुक्रमें सूर्यादि ग्रहांच्या समिधा होत. यांत तिळही घेण्यास कोणी ग्रन्थकार सांगतात. सूर्यादि मुख्य देवतांच्या होमाहुतींच्या संख्येच्या दशांशानें अधिदेवता व प्रत्यधिदेवता यांचा होम करावा. शान्तींत करण्याचा जो ग्रहयज्ञ, त्यांत बलिदान करतात. इतर ग्रहयज्ञांत (मखांत) बलिदान करीत नाहींत. मुख्य अशी एकच आहुति असतांना एकाच ब्राह्मणाला भोजन देणें श्रेष्ठ होय. शंभर ( मुख्य ) आहुतींच्या प्रसंगीं एकाच ब्राह्मणाला भोजन देणें मध्यम होय. हजार ( मुख्य ) आहुतींच्या प्रसंगीं एकाच ब्राह्मणाला भोजन देणें अधम होय. याबद्दलचें सविस्तर प्रयोगादि इतर ग्रन्थांत पहावें. असा हा ग्रहयज्ञ मख होय.

कुमारस्योपनयनकाले कन्याया विवाहेवाबृहस्पत्यानुकूल्याभावेशौनकाद्युक्ताशान्तिः कार्या अस्यकुमारस्योपनयने अस्याः कन्यकाया विवाहेवा बृहस्पत्यानुकूल्यासिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं बृहस्पतिशान्तिं करिष्यइतिसंकल्प्याचार्यंवृणुयात् स्थण्डिले ईशान्यांयथाविधिस्थापिते श्वेतकलशे पञ्चगव्यकुशोदकविष्णुक्रान्ताशतावरीप्रमुखौषधिप्रक्षेपपूर्णपात्रनिधानान्तेहरिताक्षतनिर्मितदीर्घचतुरस्रपीठेहैमींगुरुप्रतिमां प्रतिष्ठाप्यस्थण्डिलेग्निस्थापनादि अन्वाधानेबृहस्पतिमश्वत्थसमिदाज्यसर्पिर्मिश्रपायसैः साज्येनमिश्रितयवव्रीहितिलेनच प्रतिद्रव्यमष्टोत्तरशताहुतिभिः शेषेणस्विष्टकृतमित्यादि आज्यभागान्ते प्रतिमायां षोडशोपचारैर्गुरुपूजा तत्र पीतवस्त्रयुग्मपीतयज्ञोपवीतचन्दनपीताक्षतपीतपुष्पघृतदीपदध्योदननैवेद्यार्पणान्तेमाणिक्यंसुवर्णंवादक्षिणांदत्त्वाग्रहमखोक्तरीत्याकुम्भानुमन्त्रणान्तेबृहस्पतिमन्त्रेणदधिमध्वक्तसमिदाज्यगृहसिद्धपायसमिश्रितयवाद्यैर्यथान्वाधानंहोमः होमशेषंसमाप्यगन्धादिभिर्बृहस्पतिंसंपूज्य पीतगन्धाक्षतपुष्पयुतताम्रपात्रस्थजलेनार्घ्यंदद्यात् तत्रमंत्रः गम्भीरदृढरूपांगदेवेज्यसुमतेप्रभो । नमस्तेवाक्पतेशान्तगृहाणार्घ्यंनमोस्तुते १ प्रार्थयेत् भक्त्यायत्तेसुराचार्यहोमपूजादिसत्कृतम् । तत्त्वंगृहाणशान्त्यर्थंबृहस्पतेनमोनमः १ जीवोबृहस्पतिःसूरिराचार्योगुरुराङ्गिराः । वाचस्पतिर्देवमन्त्रीशुभं

कुर्यात्सदामम २ इति विसर्जनप्रतिमादानान्तेकुमारादियुतयजमानाभिषेकः तत्रमन्त्राः आपोहिष्ठेतितिस्रः ३ । तत्त्वायामि० ३ । स्वादिष्टया० ३ । समुद्रज्येष्ठाः ४ । इदमापःप्रवह० १ तामग्निवर्णा० १ या औषधीः० १ । अश्वावतीर्गोमतीर्न० १ यद्देवादेवहेडनमित्याद्याःकुष्माण्डमन्त्राःपुनर्मनः पुनरायुरित्यन्तास्तैत्तिरीयशाखायांप्रसिद्धाः कौस्तुभादौलिखिताएतैरभिषिच्यविप्रान्भोजयेदिति इतिबृहस्पतिशान्तिः ॥

**गुरूची शान्ति**—कुमाराच्या उपनयनकालीं ( सध्यां मुंजीच्या वेळीं ) किंवा कन्येच्या लग्नप्रसंगीं बृहस्पति ( गुरुग्रह ) जर अनुकूल नसेल तर शौनकादिकांनीं सांगितलेली शान्ति करावी. ( कुमाराच्या मुंजप्रसंगीं ) 'अस्य कुमारस्योपनयने' ( किंवा कन्येच्या लग्नांत ) 'अस्याः कन्यकाया विवाहे'—बृहस्पत्यानुकूल्यसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं बृहस्पतिशान्तिं करिष्ये' असा संकल्प करून आचार्य शोधून पसंत करावा. स्थंडिलावर ईशान्य दिशेला मांडलेल्या श्वेत (पांढऱ्या) कलशांत पञ्चगव्य, कुशोदक ( दर्भाचें पाणी ) विष्णुक्रांता ( वनस्पति ), शतावरी ( वनस्पति ) वगैरे औषधि टाकून पूर्णपात्राची स्थापना केल्यावर, पिंवळ्या अक्षतांच्या केलेल्या चौकोनी पीठावर गुरूची सुवर्णप्रतिमा मांडावी. स्थंडिलावर अग्निस्थापना वगैरे झाल्यावर 'बृहस्पतिमश्वत्थसमिज्यसर्पिर्भिश्रपायसैः साज्येनमिश्रितयवव्रीहितिलेन च प्रतिद्रव्यमष्टोत्तरशताहुतिभिः शेषेण स्विष्टकृत्' असें अन्वाधान करावें. आज्यभागापर्यंतचें सारें कर्म संपल्यावर, गुरूच्या प्रतिमेची षोडशोपचारें पूजा करावी. पूजेंत—दोन पिंवळीं वस्त्रें, पिंवळें यज्ञोपवीत, पिंवळें चन्दन, पिंवळ्या अक्षता, पिंवळीं फुलें, तुपाचा दिवा आणि दहींभाताचा नैवेद्य हीं ( गुरूला ) अर्पण केल्यानंतर, माणिक अथवा सोनें यांचें ( ब्राह्मणाला ) दान देऊन, ग्रहमखांत सांगितल्याप्रमाणें कुम्भाचें अभिमंत्रण करावें व मग बृहस्पतिमन्त्रानें दहीं व मध यांत भिजविलेल्या समिधा, तूप, घरांत शिजविलेला भात—यवादिकांनीं मिश्रित-यांनीं अन्वाधान जसें केलें असेल तसा होम करावा. नन्तर होमशेष संपवून गन्धादिकांनीं बृहस्पतीचें पूजन करावें. पिंवळ्या अक्षता, पिंवळें गन्ध व पिंवळीं फुलें हीं तांब्याच्या भाड्यांतल्या पाण्यांत टाकून, त्याचें (गुरूला) अर्घ्य द्यावें. अर्घ्य देतांना 'गम्भीरदृढरूपांग देवेज्य सुमते प्रभो । नमस्ते वाक्पते शान्त गृहाणार्घ्यं नमोऽस्तु ते ॥' असा मंत्र म्हणावा व मग 'भक्त्या यत्ते सुराचार्य होमपूजादि सत्कृतम् । तत्त्वं गृहाण शान्त्यर्थं बृहस्पते नमोनमः ॥ जीवो बृहस्पतिः सूरिराचार्यो गुरुराङ्गिराः । वाचस्पतिर्देवमन्त्री शुभं कुर्यात् सदा मम ॥' या मंत्रांनीं प्रार्थना करावी. देवताविसर्जन व प्रतिमादान हीं केल्यावर कुमारादिकांनीं युक्त अशा यजमानाला जो अभिषेक करावा, त्याचे मंत्रः— 'आपो हि ष्ठा० ऋचा ३ । तत्त्वायामि ० ऋचा ३ । स्वादिष्टया० ऋचा ३ । समुद्रज्येष्ठा० ऋचा ४ । इदमापःप्रवह० ऋचा १ । तामग्निवर्णा० ऋचा १ । या ओषधीः० ऋचा १ । अश्वावतीर्गोमतीर्ना ऋचा १ । यद्देवा देवहेडनं०' वगैरे कूष्माण्ड मंत्र 'पुनर्मनः पुनरायु०' येथपर्यंत तैत्तिरीय शाखेंत प्रसिद्ध असलेले ( जे मंत्र ) कौस्तु-

भादि ग्रंथांत दिले आहेत ( ते पहावे ). अभिषेकानंतर ब्राह्मणभोजन करावें अशी ही बृहस्पतीची शान्ति आहे.

अथोपनयनादौसंकल्पाः तत्रोपयनात्पूर्वेद्युराचार्योममोपने तृत्वयोग्यतासिद्ध्यर्थं कृच्छ्रत्रयंतत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये तथाद्वादशाधिकसहस्रगायत्रीजपमुपनेतृत्वयोग्यतासिद्ध्यर्थंकरिष्ये इतिसंकल्पयेत् यदिपूर्वसंस्काराअतीतास्तदास्यकुमारस्यपुंसवनादीनामथवा जातकर्मादीनांचौलान्तानांसंस्काराणांकालातिपत्तिजनितप्रत्यवायपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रतिसंस्कारमेकैकां भूर्भुवःस्वःस्वाहेतिसमस्तव्याहृत्याज्याहुतिंहोष्यामि इतिसंकल्प्याग्निस्थापनेध्माधानादिपाकयज्ञतन्त्रसहिताबर्हिस्थापनाज्यसंस्कारपात्रसंमार्गमात्रसहिता वातीतसंस्कारसमसंख्यसमस्तव्याहृत्याज्याहुतीर्जुहुयात् ततोस्यकुमारस्यपुंसवनानवलोभनसीमन्तोन्नयनजातकर्मनामकर्मसूर्यावलोकननिष्क्रमणोपवेशनान्नप्राशनचौलसंस्काराणां लोपनिमित्तप्रत्यवायपरिहारार्थंप्रतिसंस्कारं पादकृच्छ्रं प्रायश्चित्तंचौलस्यार्धकृच्छ्रंबुद्धिपूर्वकलोपेप्रतिसंस्कारमर्द्धकृच्छ्रंचूडायाःकृच्छ्रंतत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये चौलस्योपनीत्यासहकरणस्यकुलधर्मप्राप्तत्वे कालातिपत्तिहोमंचौललोपप्रायश्चित्तंचनकार्यम् केचित्संस्कारलोपप्रायश्चित्तंबटुनाकारयन्ति ततोबटुर्ममकामचारकामवादकामभक्षादिदोषपरिहारद्वारोपनेयत्वयोग्यतासिद्ध्यर्थंकृच्छ्रत्रयप्रायश्चित्तंतत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतदानद्वाराआचरिष्येइतिसंकल्पयेत् निष्कंनिष्कार्धंनिष्कपादंनिष्कपादार्धंवा रजतंगोमूल्यंदेयंनतुन्यूनम् अष्टगुञ्जमाषरीत्याचत्वारिंशन्माषोनिष्कइत्युक्तम् ततःप्रायश्चित्तेकृतेपश्चादतीतमपिकर्मवै । कार्यमित्येकआचार्यानेत्यन्यंतुविपश्चितः १ इतिवचनाज्जातकर्मादिसंस्काराःकार्यानकार्या इतिपक्षद्वयम् तत्रप्रायश्चित्तेनप्रत्यवायपरिहारेपिसंस्कारजन्यापूर्वोत्पत्त्यर्थंसंस्कारानुष्ठानपक्षेसंकल्पः पत्न्याकुमारेणचसहोपविश्यदेशकालौसंकीर्त्यास्यकुमारस्यगर्भाम्बुपानजनितदोषनिबर्हणायुर्मेधाभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंअतिक्रान्तंजातकर्म तथाबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणायुरभिवृद्धिव्यवहारसिद्धिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंनामकर्मआयुरभिवृद्धिद्वाराश्रीपर० सूर्यावलोकनं आयुःश्रीवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराश्रीपर० निष्क्रमणं आयुरभिवृद्धिद्वारा० उपवेशनं मातृगर्भमलप्राशनशुद्ध्यन्नाद्यब्रह्मवर्चसतेजइन्द्रियायुरभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराश्रीपरमे० अन्नप्राशनंचाद्यकरिष्ये बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणबलायुर्वर्चोभिवृद्धिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंचूडाकर्म द्विजत्वसिद्ध्यावेदाध्ययनाधिकारार्थंउपनयनंचश्वःकरिष्ये जातादिसर्वसंस्कारांगत्वेनपुण्याहवाचनंमातृकापूजनंनान्दीश्राद्धंकरिष्ये उपनयनांगत्वेनमण्डपदेवतास्थापनंकुलदेवतास्थापनंचकरिष्ये इति स्वस्वगृह्यग्रन्थानुसारेणसंकल्प्य नान्दीश्राद्धान्तंतंत्रेणकृत्वामण्डपदेवतास्थापनादिकंबटुपितृभ्यांसुहृत्कृत वस्त्रदानान्तं-

कृत्वान्नप्राशनान्ताःसंस्कारायथागृह्यंपूर्वादिनेकार्याः चौलोपनयनेपरादिनेकार्येस- र्वेषांसद्यःकरणपूर्वोक्तसर्वसंकल्पवाक्यान्तेउपनयनंचाद्यकरिष्ये इतिसंकल्पः सं- स्काराणामकरणपक्षेचुडाकर्मोपनयनसंकल्पयोभयांगत्वेनपुण्याहवाचनंनान्दी- श्राद्धंउपनयनांगत्वेनमण्डपदेवतास्थापनंकुलदेवतास्थापनचकरिष्यइतिसंकल्पः नान्दीश्राद्धान्तेपूर्वपूजितमातृकासहितमण्डपदेवतास्थापनम् ततःपूर्वोक्तरीत्या- वेदिनिर्माणम् इतिपूर्वदिनकृत्यम् ।

**मुञ्जीच्या आदल्या दिवसाचें कृत्य**—मुंजीच्या आदल्या दिवशीं आचार्यानें 'ममोपनेतृत्वयोग्यतासिद्ध्यर्थं कृच्छ्र- त्रयं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये । तथा द्वादशा- धिकसहस्रगायत्रीजपमुपनेतृत्वयोग्यतासिद्ध्यर्थं करिष्ये' असा संकल्प करावा. ( मुंजीच्या ) आधींचे संस्कार करणें राहिले असल्यास—'अस्य कुमारस्य पुंसवना- दीनामथवा जातकर्मादीनां चौलान्तानां संस्काराणां कालातिपत्तिजनितप्रत्यवायपरिहा- रद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रतिसंस्कारमेकैकां भूर्भुवःस्वः स्वाहेतिसमस्तव्याहृत्याज्याहुतिं होष्यामि ।' असा संकल्प करून,-अग्निस्थापन, इध्मास्थापन वगैरे पाकयज्ञाच्या तंत्रासह, किंवा—अग्निस्थापन, आज्यसंस्कार व पात्रसम्मार्ग—यांनीं युक्त अशा राहि- लेल्या प्रत्येक संस्काराची आज्याहुति, व्याहृतिमंत्रानें द्यावी. नंतर—'अस्य कुमारस्य पुंसवनानवलोभनसीमन्तोन्नयनजातकर्मनामकर्मसूर्यावलोकननिष्क्रमणोपवेशनान्नप्राशन- चौलसंस्काराणां लोपनिमित्तप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारं पादकृच्छ्रं प्रायश्चित्तं चौलस्यार्धकृच्छ्रं बुद्धिपूर्वकलोपे प्रतिसंस्कारमर्धकृच्छ्रं चूडायाः कृच्छ्रं तत्प्रत्याम्नायगो- निष्क्रयीभूत यथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये' असा संकल्प करावा. मुंजीबरोबरच जर चौलसंस्कार करण्याचा कुलधर्म असेल, तर कालातिक्रम (खऱ्या कालाचा लोप) झाल्याबद्दल होम व चौललोपाबद्दल प्रायश्चित हीं करूं नयेत. या बाबतींत कोणी ग्रंथकार संस्कारलोपाचें प्रायश्चित्त बटूकडून करवावें असें सांगतात. नंतर बटूनें 'मम कामचारकामवादकामभक्षादिदोषपरिहारद्वारा उपनेयत्वयोग्यतासिद्ध्यर्थं कृच्छ्रत्रय- प्रायश्चित्तं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूत यथाशक्ति रजतदानद्वारा आचरिष्ये ।' असा संकल्प करावा व निष्क, निष्कार्ध, निष्काचा चतुर्थांश किंवा निष्काचा अष्टमांश इतके रुपें गाईचें मूल्य म्हणून द्यावें, कमी देऊं नये. आठ गुंजांचा एक मासा या प्रमाणानें चाळीस मासे म्हणजे एक निष्क होतो, असें सांगितलें आहे. प्रायश्चित्ता- नंतर अतिक्रान्त ( मनसोक्त ) कर्में करावींत असें कांहीं आचार्य जसें सांगतात, तद्वतच तीं न करण्याबद्दलही दुसरे आचार्य सांगतात. यावरून जातकर्मादि संस्कार पुन्हां करावे किंवा करूं नयेत असे दोन पक्ष होतात; यास्तव, संस्कार न केल्याचा दोष जरी प्रायश्चित्तानें गेला, तरी संस्कार करण्याच्या योगानें होणारें पुण्य मिळविण्यासाठीं पुन्हां संस्कार करावेत. संस्कार ( पुनः ) करण्याची इच्छा असल्यास जो संकल्प करावा तो येणेंप्रमाणें:—पत्नी व कुमार यांसह बसून यजमानानें देशकालादिकांचा उच्चार केल्यावर 'अस्य कुमारस्य......कुलदेवतास्थापनं च करिष्ये'

असा आपापल्या गृह्यसूत्राप्रमाणें संकल्प करून नान्दीश्राद्धापर्यंतचें सर्व कर्म तंत्रानें करावें. (अंगभूत कर्मांचें अनेकांसाठीं जें एकदांच अनुष्ठान करणें त्याला तंत्र म्हणतात). मण्डपदेवतांच्या स्थापनपासून-बटु, माता व पिता यांना आप्तेष्टांनीं वस्त्रदान (आहेर) देण्यापर्यंतचें कर्म करून, अन्नप्राशनापर्यंतचे संस्कार -आपापल्या गृह्यसूत्राप्रमाणें (मुंजीच्या) आदल्या दिवशीं करावेत व चौल आणि उपनयन (मुंज) हे संस्कार (त्याच्या) दुसऱ्या दिवशीं (म्हणजे मुंजीच्या दिवशीं) करावेत. सर्व संस्कार जर एकेच दिवशीं करायचे असतील, तर वर सांगितलेल्या सर्व संकल्पवाक्यांच्या शेवटीं 'उपनयनं चाद्य करिष्ये' असें म्हणावें. संस्कार करणें नसल्यास चूडाकर्म व उपनयन यांचे संकल्प करून-'उभयाङ्गत्वेन पुण्याहवाचनं नान्दीश्राद्धं उपनयनाङ्गत्वेन मण्डपदेवतास्थापनं कुलदेवता स्थापनं च करिष्ये' असा संकल्प करावा. नान्दीश्राद्धानन्तर, आधीं पूजा केलेल्या मातृकासहित मण्डपदेवतांचें संस्थापन करावें व मग, मागें सांगितल्याप्रमाणें वेदी (बहुलें) तयार करावी. मुंजीच्या आदल्या दिवसाचें कृत्य येथें संपलें.

ततःपरदिनेतिक्रान्तंचौलंकृत्वापूर्वं जातचौलंत्वभ्यङ्गस्नानेनस्नापयित्वामात्रासहभोजयेत् तदाब्रह्मचारिभ्योभोजनंदेयमित्याचारः ततोदेशकालौ संकीर्त्यास्यकुमारस्यद्विजत्वसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंगायत्र्युपदेशंकर्तुं तत्प्राच्यांगभूतंवापनादिकरिष्यइति संकल्प्य वापनादिकुर्यात् मुख्यशिखान्यशिखानांचौलेधृतानामत्रवापनम् ततः स्नातमहतवस्त्रंबद्धाशिखं कृतमङ्गलतिलकंबटुंकुर्युः मौहूर्तिकंसंपूज्यतदुक्तेसुमुहूर्तेआचार्योवेद्यांप्राङ्मुखउपविष्टोन्तःपटमपसार्यबटुमुखमीक्षेत कृतनमस्कारान्तेस्वाङ्कंकुर्वीत ततोविप्रा यथाचारंमन्त्रैरुभयोःशिरस्यक्षतान्निक्षिपेयुः एवं यथागृह्यमुपनयनप्रयोगंज्ञात्वानुष्ठेयम् सर्वत्रबटुनागायत्र्यादिमन्त्रान्वाचयन् संधिकृतंवर्णविकारंनान्यथाकुर्यात् प्रयोगशेषंसमाप्यद्वेशतेशतंयथाशक्तिवा ब्राह्मणभोजनंसंकल्प्यविप्रेभ्योभूयसींदक्षिणांदद्यात् ततो ब्रह्मचारीनूतनभिक्षाभाजनेमातरंमातृष्वस्रादिकांवाभिक्षांभवतीददात्वितिअनुप्रवचनीयार्थंतण्डुलान्याचेत पितरंभिक्षांभवान्ददात्वितियाचेत भैक्ष्यमाचार्यायनिवेद्यमध्याह्नसंध्यामुपास्यगुरुसन्निधावहःशेषंनयेत् तद्दिनेमध्याह्नसंध्याविकल्पितेत्यन्ये ब्रह्मयज्ञस्तुद्वितीयदिनमारभ्यगायत्र्याकार्यः अनुप्रवचनीयहोमारम्भात्पूर्वंगर्जितवृष्ट्यादिसंभावनायांदिवैवचरुश्रपणान्तंकृत्वाऽस्तमितेजुहुयात् पाकाभावेगर्जितादिनिमित्तेतुशान्तिंकृत्वापाकःकार्यः ॥

**मुंजीच्या दिवशींचें चौलकर्म**—पूर्वीं अंतरलेलें चौल करावें. पूर्वीं चौलसंस्कार झालेला असल्यास (कुमाराला) अभ्यङ्गस्नान घालून त्याच्या मातेसह त्यानें भोजन करावें. त्या प्रसंगीं इतर ब्रह्मचाऱ्यांनाही जेवूं घालण्याचा प्रचार आहे. (यालाच मातृभोजन व अष्टवर्ग्यांचें भोजन म्हणतात.) हें झाल्यावर देशकालादिकांचा उच्चार करून,-'अस्यकुमारस्य द्विजत्वसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गायत्र्युपदेशं कर्तुं तत्प्राच्याङ्गभूतं वपनादि करिष्ये'

या संकल्पानें (कुमाराचें) वपन ( हजामत ) करवावें. हें वपन मुख्य शेंडी कायम ठेवून चौलाच्या वेळीं ज्या इतर शिखा ठेवल्या असतील, त्यांचें करावें. यानंतर बटूला स्नान घालून नवें वस्त्र द्यावें व त्याच्या शेंडीला गांठ मारून त्याच्या कपाळीं तिलक लावावा. नंतर मुहूर्त सांगणाऱ्या ज्योतिष्याची पूजा करून, त्यानें सांगितलेल्या मुहूर्तावर, वेदीवर ( बहुल्यावर ) पूर्वाभिमुख बसलेल्या आचार्यानें–अन्तःपट बाजूला सारून–बटूचें मुख पहावें. बटूनें ( आचार्याला मग ) नमस्कार केल्यावर ( आचार्यानें ) त्याला आपल्या मांडीवर बसवावें. त्यानंतर परिपाठाप्रमाणें ब्राह्मणांनीं त्या दोघांच्या मस्तकावर अक्षता टाकाव्या. हें सर्व ज्याच्या त्याच्या गृह्यसूत्राप्रमाणें करावें. (बटूला) सन्धींच्या वगैरे वर्णांचा उच्चार (आचार्यानें) अशुद्ध करूं देऊं नये. बाकीचा प्रयोग संपल्यावर–दोनशें, शंभर किंवा यथाशक्ति ब्राह्मणभोजनाचा संकल्प करून ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. त्यानंतर ब्रह्मचारी बटूनें नव्या भिक्षापात्रांत आपल्या आई-जवळ, मावशीजवळ वगैरे 'भिक्षां भवती ददातु' असें म्हणून, अनुप्रवचनीय होमासाठीं तान्दूळ मागावेत. बापापाशीं ( बटूनें ) 'भिक्षां भवान्ददातु' असें म्हणून ( तांन्दूळ ) मागावेत. मिळालेली भिक्षा आचार्याजवळ देऊन ( बटूनें ) मध्याह्नसन्ध्या करावी व बाकीचा दिवस आचार्याच्या संगतींत घालवावा. त्या दिवशीं मध्याह्नसन्ध्या विकल्पें करून करावी असें कांहीं ग्रन्थकारांचें मत आहे. दुसऱ्या दिवसापासून ब्रह्मयज्ञाचा गायत्रीमंत्रानें आरंभ करावा. अनुप्रवचनीय होमाचा आरंभ होण्याच्या आधीं ( मेघ ) गर्जना व पर्जन्यवृष्टि होण्याचा जर संभव असेल, तर दिवसासच चरुश्रपणा-पर्यंतचें ( भात शिजविणें ) सर्व कर्म करून, संध्याकाळीं होम करावा. पाक (भात) होण्याच्या आधीं गर्जनादि निमित्त झाल्यास शान्ति करून पाक करावा.

**अथशान्तिप्रयोगः** ब्रह्मौदनपाकात्पूर्वंगर्जितेनसूचितस्यब्रह्मचारिकर्तृकाध्ययनविघ्नस्यनिरासद्वाराश्रीपर॰शान्तिंकरिष्यइतिसंकल्प्य स्वस्तिवाचनाचार्यवरणेकृतेआचार्योऽग्निं प्रतिष्ठाप्यचक्षुषीआज्येनेत्यन्ते सवितारमष्टोत्तरशतसंख्यसाज्यपायसाहुतिभिर्गायत्रीमंत्रेणशेषेणस्विष्टकृतमित्यादिप्रायश्चित्तहोमान्तेगायत्र्यासवितारमाज्येनेत्यन्वाधाय गृहसिद्धपायसहोमान्तेबृहस्पतिसूक्तजपः अन्तेआचार्यायधेनुंदत्त्वाशतंयथाशक्तिवाविप्रान्भोजयिष्ये इति संकल्पयेत् ।

**शान्तिप्रयोग**—'ब्रह्मौदनपाकात्पूर्वं गर्जितेन सूचितस्य ब्रह्मचारिकर्तृकाध्ययनविघ्नस्य निरासद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं शान्तिं करिष्ये' असा संकल्प केल्यावर स्वस्तिवाचन व आचार्यवरण झाल्यावर आचार्यानें अग्नीची प्रतिष्ठापना करावी. 'चक्षुषी आज्येनेत्यन्ते सवितारमष्टोत्तरशतसंख्यसाज्यपायसाहुतिभिर्गायत्रीमन्त्रेण शेषेण स्विष्टकृतमित्यादि' व 'प्रायश्चित्तहोमान्ते गायत्र्यासवितारमाज्येन' असें अन्वाधान करावें. घरांत तयार केलेल्या खिरीचा होम केल्यानंतर बृहस्पति-सूक्ताचा जप करावा. शेवटीं आचार्याला गाय दान देऊन, शंभर ब्राह्मणभोजनाचा किंवा 'शतं यथाशक्ति वा विप्रान्भोजयिष्ये' असा संकल्प करावा.

**मेधाजननात्पूर्वकालिकाग्निकार्ययावत्उपनयनाग्निनाशे उपनयनाहुतिभिः कटिसूत्रधारणादिमाणवकसंस्कारावक्षारणाग्निकार्यगायत्र्युपदेशरहिताभिःपूर्वोत्तरतन्त्रसहिताभिरग्निमुत्पाद्यत्तत्रानुप्रवचनीयपूर्वभाव्यग्निकार्यंकृत्वाऽनुप्रवचनीयहोमं कृत्वामेधाजननात्प्राक्तनान्यग्निकार्याणिकृत्वा मेधाजननंकार्यमिति-कौस्तुभउपपादितनष्टस्योपनयनाग्नेः पुनरुत्पत्तिहोमेविनियोगइतिविशेषइतिचोक्तम् ममतुउपनयनाहुतिभिरग्निमुत्पाद्यतत्रमेधाजननपूर्वभाव्यग्निकार्याणिकृत्वामेधाजननंकार्यम् अनुप्रवचनपूर्वभाव्यग्निकार्यमनुप्रवचनीयहोमश्चनकार्य इतिभाति गायत्र्युपदेशानुप्रवचनीयमेधाजननानांत्रयाणांसमप्रधानभावेनाध्ययनांगत्वादग्नेस्त्रितयांगत्वात्कौस्तुभोक्तरीत्यागायत्र्युपदेशतत्पूर्वाग्निकार्यावृत्त्यभाववदनुप्रवचनीयतत्पूर्वाग्निकार्ययोरावृत्त्यभावौचित्यात् नह्यग्निष्टोमाङ्गपशुत्रयस्याङ्गेयूपेपशुद्वयानुष्ठानानन्तरंनष्टेतृतीयपश्वर्थयूपोत्पादनोद्वतीयपश्वनुष्ठानमप्यावर्तते अत्रसदसत्सद्भिर्विचार्यानुष्ठेयम् सायंसंध्याग्निकार्येकृतेनुप्रवचनीयहोमंब्रह्मचारीकुर्यात् बटोरशक्तौचरुश्रपणान्तमन्यःकुर्यात् होममात्रंबटुःकुर्यात् हुतचरुशेषेणत्र्यवरब्राह्मणभोजनम् ।**

**नष्टोपनयनाग्न्युत्पत्ति**—मेधाजननाच्या आधीं होणारें जें अग्निकार्य तें झाल्याशिवाय उपनयनाग्निचा नाश झाला, तर कटिसूत्रधारणादि बटूचे संस्कार, अवक्षारण, अग्निकार्य व गायत्र्युपदेश यांवांचून पूर्वोत्तरतंत्रसहित अशा उपनयनाच्या आहुतींनीं अग्नि उत्पन्न करून त्यावर अनुप्रवचनीय होमाच्या आधींचें अग्निकार्य केल्यावर अनुप्रवचनीय होम करावा. त्यानंतर मेधाजननाच्या आधीं जें अग्निकार्य करायचें तें करून मग मेधाजनन करावें असें कौस्तुभांत प्रतिपादिलें आहे व 'नष्टस्योपनयनाग्नेः पुनरुत्पत्तिहोमे विनियोगः' असा याचा विशेष सांगितला आहे. माझ्या मतानें मला असें वाटतें कीं, उपनयनाच्या आहुतींनीं अग्नि उत्पन्न करून त्यावर मेधाजननाच्या आधीं अग्निकार्य केल्यावर मग मेधाजनन करावें आणि अनुप्रवचनीय होमाच्या आधींचें जें अग्निकार्य तें व अनुप्रवचनीय होम—हीं करूं नयेत. गायत्र्युपदेश, अनुप्रवचनीय होम व मेधाजनन हीं तीन समप्रधान भावानें अध्ययनाचीं अंगें असल्यानें, अग्नि हा त्या तीन प्रधानकर्मांचे अंग आहे, यास्तव कौस्तुभांत सांगितलेल्या रीतीप्रमाणें गायत्रीचा उपदेश आणि त्याच्या आधीं होणारें अग्निकार्य यांच्या आवृत्तीचा ( पुन्हां करणें ) अभाव करणेंच इष्ट दिसतें. अग्निष्टोमाचीं जीं तीन पशुयाग हीं अंगें व त्यांच्या अंगभूत जो यूप, तो दोन पशुयागानंतर जर नष्ट झाला तर तिसऱ्या पशुयागासाठीं ( नवा ) यूप तयार करण्यासाठीं दुसरा पशुयाग पुन्हां करावा लागत नाहीं. याबाबतींत सज्जनांनीं सदसद्विचार करून योग्य दिसेल तें करावें. संध्याकाळीं सायंसंध्या व अग्निकार्य हीं केल्यावर बटूनें अनुप्रवचनीय होम करावा. बटु अशक्त असल्यास चरुश्रपणापर्यंतचें कर्म दुसऱ्यानें करावें. होम मात्र बटूनेंच करावा. होम करून बाकी राहिलेल्या भातानें तीनपर्यंत ब्राह्मणांना भोजन द्यावें.

अथबटुव्रतम् क्षारादिवर्जमश्नीयाद्ब्रह्मचारीदिनत्रयम् । शयीताधश्चतुर्थेऽह्निमेधाजननमाचरेत् १ यद्वाद्वादशरात्रं स्यादब्दव्रतमथापिवा । मेधाजननविधिरन्यत्र ।

**बटुव्रत**—बटूनें (मुंज झालेल्यानें) तीन दिवस अळणी (क्षाररहित) जेवण जेवावें, उच्चासनावर निजूं नये व चौथ्या दिवशीं मेधाजनन करावें, अथवा बारा रात्रीपर्यंत किंवा एक वर्षपर्यंत (बटूनें) हें व्रत चालवावें. मेधाजननाचा विधि दुसऱ्या ग्रंथांत पहावा.

अथमण्डपदेवतोत्थापनम् तच्च स्थापनदिनात्समदिवसेपञ्चमसप्तमदिनयोश्चशुभम् षष्ठदिनेविषमदिने चाशुभम् ॥

**मण्डपदेवतोत्थापन**—(म्हणजेच देवदेवक उठवणें होय). मण्डपदेवतांची स्थापना (देवदेवक बसल्यापासून), केल्यापासून त्यांचें उत्थापन (उठवणें) सम दिवशीं, पांचव्या दिवशीं किंवा सातव्या दिवशीं करणें शुभदायक होय. इतर विषम दिवशीं व सहाव्या (सम) दिवशीं (उठवणें) अशुभ होय.

अथमण्डपोद्वासनपर्यन्तंनिषेधाः नान्दीश्राद्धेकृतेपश्चाद्यावन्मातृविसर्जनम् । दर्शश्राद्धंक्षयश्राद्धंस्नानंशीतोदकेनच १ अपसव्यंस्वधाकारंनित्यश्राद्धंतथैवच । ब्रह्मयज्ञंचाध्ययनंनदीसीमातिलंघनम् २ उपवासव्रतंचैवश्राद्धभोजनमेव च । नैवकुर्युः सपिण्डाश्चामण्डपोद्वासनावधि ३ अत्रस्वधाकारग्रहणं तत्सहचरितवैश्वदेवनिषेधार्थम् अत्रसपिण्डास्त्रिपुरुषपर्यन्ताइतिपुरुषार्थचिन्तामणौ अभ्यङ्गेसूतकेचैवविवाहेपुत्रजन्मनि । माङ्गल्येषुचसर्वेषुनधार्यं गोपिचन्दनम् १ एतेषुभस्मधारणमपिनकुर्वन्ति जननाशौचेभस्मगोपीचन्दनेनिषिद्धे मृतके भस्मधार्यम् ॥

**देवदेवक असेपर्यंतचीं वर्ज्य कर्में**—म्हणजे नान्दीश्राद्ध केल्यानंतर मातृकापूजनाचें विसर्जन करीपर्यंत—दर्शश्राद्ध, सांवत्सरिकश्राद्ध, थंड पाण्याचें स्नान, अपसव्य, स्वधाकार, नित्यश्राद्ध, ब्रह्मयज्ञ, अध्ययन, नदीचें उल्लंघन, सीमोल्लंघन, उपवासव्रत व श्राद्धभोजन हीं कर्में जे सपिण्ड असतील त्यांनीं मुळींच करूं नयेत. येथें स्वधाकाराचा जो निषेध सांगितला आहे, त्यावरून, स्वधाकारविशिष्ट जो वैश्वदेव तोही न करणेंच सांगितलें. अशा प्रसंगीं तीन पिढ्यांपर्यंतचे सपिण्ड समजावे असें पुरुषार्थचिन्तामणींत सांगितलें आहे. अभ्यंग, अशौच, विवाह, पुत्रजन्म आणि सर्व मांगलिक कार्यें--यांत गोपीचन्दन लावूं नये व अशा कार्यांत भस्महो लावीत नाहींत. सोयरांत भस्म व गोपीचन्दन हीं वर्ज्य आहेत, सुतकांत भस्म लावावें,

षंढान्धबधिरमूकपंगुकुब्जवामनादयःसंस्कार्याः मत्तोन्मत्तौनसंस्कार्यावित्येके पातित्यंतुनास्तिकर्मानधिकारात् तदपत्यंसंस्कार्यम् ब्राह्मण्यांब्राह्मणादुत्पन्नोब्राह्मणएवेतिश्रुतेः अन्येतुमत्तोन्मत्तावपिसंस्कार्यावित्याहुः अत्रहोममाचार्यः-

करोति उपनयनंचाचार्यसमीपनयनमग्निसमीपनयनंवागायत्रीवाचनंवाविकलांगविषयेप्रधानम् एतत्त्रयान्यतममात्रंविकलांगे संपाद्यम् अन्यदंगंयथासंभवंकार्यम् मूकबधिरादेःसावित्रीवाचनासंभवेस्पृष्ट्वासावित्रीजपः कार्यः संस्कारमन्त्रावासः परिधानमंत्राश्चाचार्येणवाच्याः केचित्तूष्णींवासःपरिधानादिकमित्याहुः एवंविवाहेपि कन्यास्वीकरणादन्यत्सर्वंविप्रेणकारयेदित्यादिवचनात् इतिविकलांगोपनयनादिविचारः ॥

**विकृतांगविचार**—षंढ, अंध, बहिरा, मुका, पांगळा, कुबडा, खुजा वगैरेंचे संस्कार करावेत. मत्त व उन्मत्त याचे करूं नयेत असें कांहीं म्हणतात. त्यांना कर्में करण्याचा अधिकार नसल्यानें पातित्यहि नाहीं. त्यांच्या अपत्यांचे संस्कार करावेत; कारण, ब्राह्मणीच्या पोटीं ब्राह्मणापासून झालेलें जें अपत्य तें ब्राह्मणच होय असें श्रुतिवचन आहे. मत्त व उन्मत्त यांचेसुद्धा संस्कार करण्याबद्दल इतर कांहीं ग्रंथकार सांगतात. अशा प्रसंगीं आचार्यानें होम करावा. जो विकृतांग असेल अशाच्या उपनयनांत, त्याला आचार्यापाशीं नेणें, अग्नीजवळ त्याला नेणें आणि त्याच्याकडून गायत्रीमंत्र म्हणविणें हीं जीं तीन मुख्य कर्में, त्यांतलें एखादें कोणचें तरी कर्म त्याच्याकडून केलें असतां चालतें. इतरहीं शक्य असल्यास करावीत. मुका व बहिरा यांच्याकडून गायत्रीमंत्रोच्चार करवणें अशक्य असल्यानें व त्यांना स्पर्श करून ( गुरूनें ) गायत्रीजप करावा. संस्काराचे मंत्र आणि वस्त्रधारणाचे मंत्र आचार्यानें म्हणावेत. वस्त्रधारण वगैरे मंत्रावांचूनच ( अशा प्रसंगीं ) करण्यास कांहीं ग्रंथकार सम्मति देतात. लग्नाचेंही असेंच समजावें; कारण, कन्येचें पाणिग्रहणावांचूनचें सर्व कर्म ब्राह्मणाकडून करवावें असें वचन आहे. असा हा विकृतांगाच्या उपनयनादिकांचा विचार होय.

अमृतेजारजःकुण्डोमृतेभर्तरिगोलकः । एतयोःकुंडगोलकयोःसंस्कार्यत्ववचनेयुगान्तरविषयम् तस्यक्षेत्रजपुत्रविषयत्वात्कलियुगेदत्तौरसातिरिक्तपुत्रनिषेधात् ज्येष्ठत्वकृतसंस्कारेगर्भाधानादिकर्मभिः कनिष्ठोनैवसंस्कार्यइतिशातातपोब्रवीत् १ इदंचौलोपनयनान्तसंस्कारविषयं विवाहविषयेतुविकलांगेष्वनायंनियमः कन्यास्वपिज्येष्ठाविवाहानन्तरमेवकनिष्ठायाविवाहः ज्येष्ठपुत्रविवाहाभावेऽपिकनिष्ठाकन्यासंस्कार्या ज्येष्ठस्योपनयनाभावे कनिष्ठानविवाह्या ॥

**कुण्ड व गोलक**—नवरा जिवंत असतां जारापासून उत्पन्न झालेला तो कुण्ड आणि नवरा मेल्यावर जारापासून जो झालेला तो गोलक ( गोळक ) होय. कुण्ड व गोलक यांचे संस्कार करण्याबद्दलचें जें वचन आहे, तें इतर युगांबद्दलचें आहे ( कलियुगाला तें लागू नाहीं ); कारण, क्षेत्रज पुत्रांसंबंधीं जीं वचनें आहेत, त्यांपैकीं तें वचन आहे. कलियुगांत औरस व दत्तक यांवांचून इतर पुत्रांचा निषेध सांगितला आहे. गर्भाधानापासून आरंभ करून जे संस्कार सांगितले आहेत ते, ज्येष्ठ पुत्राचे होण्याच्या आधीं कनिष्ठ पुत्राचे ( समान संस्कार )

करूं नयेत, असें शातातपाचें वचन आहे. हें वचन चौलापासून उपनयना-पर्यंच्या संस्कारांबद्दलचें आहे. विकृतांगांच्या विवाहादिकांविषयीं हा नियम नाहीं. कन्येसंबंधानेंही थोरल्या मुलीचें लग्न झाल्यानंतरच धाकटीचें करावें. थोरल्या मुलाचें जरी लग्न झालें नसलें तरी कनिष्ठ कन्येचें ( त्याच्या धाकट्या बहिणीचें ) करावें; मात्र थोरल्या मुलाचें उपनयन झाल्यावर धाकट्या मुलीचें लग्न करावें.

अथपुनरुपनयनम् तच्चत्रिविधम् प्रत्यवायनिमित्तकंप्रायश्चित्तभूतंपुनरुपनयनमाद्यम् तच्चजातकर्मादिसहितंतद्रहितंप्रायश्चित्तान्तरसहितंकेवलं चेत्यनेकविधम् कृतस्योपनयनस्योक्तकालाद्यङ्गवैगुण्येनवैकल्यापत्तावपरम् वेदान्तराध्ययनार्थंतृतीयम् तत्रप्रथमंयथा अमत्याऔषधान्तरानाश्यरोगनाशार्थंपैष्ट्याःसूरायाः पाने त्रिमासंकृच्छ्राचरणंपुनरुपनयनंच मत्यापैष्टयन्यसुरायाऔषधार्थपाने-कृच्छ्रातिकृच्छ्रौपुनरुपनयनंच पैष्टीपाने द्वादशाब्दम् अज्ञानाद्वारुणींगौडीमाध्वीसूरापीताचेत्पुनरुपनयनंतप्तकृच्छ्रंच अज्ञानाद्रेतोविण्मूत्राणामशनेसुरासंसृष्टान्नजलादिभक्षणेच पुनःसंस्कारस्तप्तकृच्छ्रंच ज्ञात्वाविण्मूत्राद्यशनेचान्द्रायणपुनःसंस्कारौ लशुनपलाण्डुगृञ्जनविड्वराहग्रामकुक्कुटनरगोमांसभक्षणेद्विजातीनांतत्तत्प्रायश्चित्तान्ते पुनरुपनयनम् अविखरोष्ट्रमानुषीक्षीरपानेहस्तिनीवडवाक्षीरपानेचतप्तकृच्छ्रंपुनः संस्कारश्च रासभोष्ट्राद्यारोहणेकृच्छ्रः-पुनः संस्कारश्च इदं हेमाद्रिमतमितिसिन्धौक्वचित् मिताक्षरास्मृत्यर्थसारादिमते रासभोष्ट्रारोहेउपवासत्रयादिमात्रंनतुपुनःसंस्कारः कौस्तुभाशयोप्येवम् वृषभारोहणे अमत्यांकृच्छ्रंमत्याकृच्छ्रत्रयादि केचिद्वृषारोहेपुनःसंस्कारंकुर्वन्ति-तत्रमूलंमृग्यम् एवमजबस्तमहिषारोहेपि मांसभक्षकपशोर्विट्भक्षणेपुनरुपनयनमात्रम् केचिन्मानुषमलभक्षणेपिपुनःसंस्कारमात्रमाहुः प्रेतशय्याप्रतिग्राहीपुनःसंस्कारमर्हति । जीवतोमृतवार्ताश्रुत्वान्त्यकर्मकरणे तंघृतकुम्भे निमज्योद्धृत्यस्तापयित्वाजातकर्माद्युपनयनान्तसंस्कारान्कृत्वात्रिरात्रव्रतान्तेपूर्वभार्ययातस्यांमृतायामन्यभार्ययावाविवाहःकार्यः आहिताग्निश्चेत्पुनराधानायुष्मादिष्ट्यादि तीर्थयात्रांविनाकलिङ्गाङ्गवङ्गान्ध्रसिन्धुसौवीरप्रत्यन्तवासिदेशगमनेपुनः संस्कारः चाण्डालान्नभक्षणेचान्द्रायणम् बुद्धिपूर्वभक्षणेकृच्छ्राब्दम् उभयत्रपुनःसंस्कारःअजिनंमेखलादण्डोभैक्ष्यचर्याव्रतानिच। निवर्तन्तेद्विजातीनांपुनःसंस्कारकर्मणि १ वपनंमेखलेतिस्मृत्यन्तरेपाठः ब्रह्मचारिणोमधुमांसाशनेपुनरुपनयनंप्राजापत्यंत्रिरात्रोपवासोवा मत्याभक्षणेपराकः अभ्यासेद्विगुणंपुनःसंस्कारश्च पितृमातृगुरुभ्योभिन्नस्यप्रेतस्यान्त्यकर्मकरणेब्रह्मचारिणःपुनरुपनयनम् हस्तमथितदधिभक्षणेब्रहिर्वेदिपुरोडाशाशनेअभ्यासेकृच्छ्रः पुनः-संस्कारश्च यःसंन्यासंगृहीत्वाततोनिवृत्त्यगार्हस्थ्यं चिकीर्षतिसषण्मासंकृच्छ्रान्कृत्वाजातकर्मादिसंस्कारैःसंस्कृतः शुद्धोगार्हस्थ्यं कुर्यात् एवमनशनंमरणार्थंसंकल्प्यनिवृत्तोपिकुर्यात् कर्मनाशाजलस्पर्शात्करतोयाविलंघनात् । गण्डकीबाहुतरणात्पुनःसंस्कारमर्हति ॥

**पुनरुपनयन**—हें पुनरुपनयन तीन प्रकारचें आहे. ( १ ) दोष घडल्यावर जें प्रायश्चित्तरूप उपनयन तें पहिल्याप्रकारचें. जातकर्मादि-संस्कारसहित, त्या संस्कारावांचून, प्रायश्चित्तपूर्वक त्या संस्कारांसहित—असें त्याचे अनेक भेद आहेत. ( २ ) एकदां केलेल्या उपनयनांत उक्तकालादिकांचा कमीपणा असल्यानें तें व्यर्थ झाल्यानें पुन्हा उपनयन करावें लागणें हा दुसरा प्रकार. दुसऱ्या वगैरे वेदाध्ययनासाठीं जें पुन्हा उपनयन करणें तो तिसरा प्रकार. पहिल्या प्रकारचें उपनयन येणेंप्रमाणें:—इतर औषधांनीं रोगनाश होत नसल्यानें स्वतःच्या बुद्धीनें नव्हे, तर इतरांच्या सांगण्यावरून पैष्टीपान ( पिठाच्या मद्याचें सेवन ) केल्यास तीन महिनेपर्यंत कृच्छ्राचें आचरण करून पुन्हां उपनयन करावें. पैष्टीवांचून इतर सुरेचें पान केलें असतां कृच्छ्र व अतिकृच्छ्र हीं प्रायश्चित्तें करून, पुन्हा उपनयन करावें. पैष्टीचें पान केल्यास द्वादशाब्द प्रायश्चित्त करून, पुन्हा उपनयन करावें. अजाणपणें वारुणी ( कोणचेंही मद्य ), गौडी ( गुळाची सुरा ) व माध्वी ( मधाची सुरा ) यांचें प्राशन केल्यास तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करून उपनयन करावें. नेणतेपणानें—रेत, विष्ठा व मूत्र यांचें व सुरेपासून तयार केलेलें अन्न किंवा जल यांचें सेवन केल्यास तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करून उपनयन करावें. जाणूनबुजून मूत्र व विष्ठा यांचें सेवन केल्यास चान्द्रायण प्रायश्चित्त व उपनयन हीं करावींत. लसूण, कांदा, गाजर, विष्ठा, डुकर, गांवकोंबडा, मनुष्य व गाय यांचें भक्षण केल्यास द्विजातीयांनीं ( ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ) त्या त्या दोषाबद्दल सांगितलेलें प्रायश्चित्त करून पुन्हा उपनयन करावें. मेंढी, गाढवी, उंटीण, मनुष्यस्त्री, हत्तीण, व घोडी यांचें दूध प्यायल्यास तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करून पुनरुपनयन करावें. गाढव, उंट वगैरेवर बसल्यास कृच्छ्र प्रायश्चित्त करून पुन्हा उपनयन करावें, असें जें हेमाद्रीचें मत तें निर्णयसिंधूच्या एखाद्या प्रतींत आढळतें. गाढव, उंट वगैरेंवर बसल्यास फक्त तीन दिवस उपास करावा, एवढेंच स्मृत्यर्थसारांत व मिताक्षरींत सांगितलेलें असून, पुनरुपनयनाची जरूर नसल्याचेंही त्यांत त्याबद्दल सांगितलें आहे. कौस्तुभाचा आशय देखील असाच आहे. अजाणतां बैलावर बसल्यास कृच्छ्रप्रायश्चित्त करावें व जाणूनबुजून बसल्यास तीन कृच्छ्रप्रायश्चित्तें करावीं. बैलावर बसल्यास पुनरुपनयन करावें, असें कोणी सांगतात, पण त्याबद्दल मूलवचन पहावें. मेंढा, बोकड हाल्या वगैरेंच्या आरोहणाबद्दलही हाच निर्णय समजावा. मांसभक्षक पशूची विष्ठा खाण्यांत आल्यास पुन्हा फक्त उपनयन तेवढेंच करावें. मनुष्याची विष्ठा भक्षण केल्यासही फक्त पुनरुपनयन मात्र करावें असें कोणी सांगतात. प्रेतशय्येचें दान घेणारानें पुनरुपनयन करावें. एखादा मनुष्य मेल्याची बातमी ऐकून त्याची अन्त्यक्रिया केल्यावर, तो जर जिवन्त असल्याचें समजलें तर त्याला (अन्त्यविधि करणाऱ्याला) दुधाच्या कुंभांत बुडवून काढून स्नान घालावें व त्याचे पुन्हा जातकर्मापासूनचे सर्व संस्कार करून, तीन रात्रीं व्रत आटोपल्यावर, त्याच्या पहिल्यानें विवाह झालेल्या भार्येशीं त्याचा पुन्हा विवाह लावावा; पहिली बायको मेलेली असल्यास त्याचें दुसरें लग्न

करावें; तो जर अग्निहोत्री असेल, तर पुन्हा अग्निस्थापन, आयुष्मत् इष्टि वगैरे करावींत. तीर्थयात्रेकरतां नसून, इतर कांहीं कारणानें—अंग, वंग, कलिंग, सिन्धु, सौवीर आणि म्लेंच्छ—यां देशांत कोणी प्रवास केल्यास, पुन्हा त्याचा उपनयनसंस्कार करावा. अजाणपणानें चाण्डाळाचें अन्न खाल्लें असल्यास चान्द्रायण प्रायश्चित्त, जाणूनबुजून भक्षण केलें असल्यास कृच्छ्राब्द प्रायश्चित्त करून त्या दोन्ही प्रसंगीं पुनरुपनयन करावें. द्विजातीयांचा पुन्हा संस्कार करण्यांच्या वेळीं—अजिन, मेखला, दण्ड व भिक्षा मागणें—यांची जरूरी नाहीं. अजिन, मेखला वगैरेंच्या ऐवजीं ( द्विजातीयांसाठीं ) वपन, मेखला वगैरे तऱ्हेचा पाठ इतर स्मृतिग्रंन्थांत आहे. ब्रह्मचाऱ्यानें जर मद्यमांसाचें सेवन केलें, तर त्यानें प्राजापत्य प्रायश्चित्त करून, तीन अहोरात्र उपास केल्यावर पुनरुपनयन करावें, समजून उमजून केल्यास पराकप्रायश्चित्त करून पुनरुपनयन करावें आणि अनेकदां सेवन केलें असल्यास दुप्पट प्रायश्चित्त करून, पुनरुपनयन करावें. पिता, माता व गुरु यांहून अन्याचें अन्त्यकर्म जर ब्रह्मचारी करील, तर त्यानें पुनरुपनयन करावें. हातानें घुसळलेलें दहीं व पुरोडाश यांचें अभ्यासानें ( संवयीनें ) भक्षण केल्यास कृच्छ्र प्रायश्चित्त करून, पुनरुपनयन करावें. संन्यास घेतल्यावर पुन्हां गृहस्थाश्रमांत येण्याची इच्छा करणाऱ्यानें, सहा महिन्यांचें कृच्छ्र प्रायश्चित्त करून, पुन्हा जातकर्मादि संस्कार करावेत व तशा शुद्धीनंतर त्यानें गृहस्थाश्रमी बनावें. मरणासाठीं उपास करण्याचा संकल्प करून पुन्हा तो संकल्प बदलल्यासही, हेंच ( संन्याशाचें प्रायश्चित्त ) करावें. कर्मनाशा नदीच्या पाण्याला स्पर्श केल्यास, करतोया नदी वलांडून गेल्यास व गण्डकींत पोहल्यास, पुनरुपनयन करावें.

अथद्वितीयं पुनरुपनयनम् प्रदोषेनिश्यनध्यायेमन्देकृष्णेगलग्रहे। अपराह्णेचोपनीतः पुनःसंस्कारमर्हति १ अत्रप्रदोषः प्रदोषदिनं कृष्णःकृष्णपक्षएकादश्यादिरन्त्यत्रिकरूपः अपराह्णश्चदिनतृतीयभागरूपइत्युक्तम् अनध्याया-अपिनित्याएवपौर्णिमाप्रतिपदादयःपुनरुपनयननिमित्तम् नतुनैमित्तिका-अकालवृष्ट्यादिनिमित्तकत्रिरात्रादयः नैमित्तिकेषुप्रातर्गर्जितनिमित्तानध्यायएव-पुनःसंस्कारनिमित्तम् अत्रविस्तरःकौस्तुभे अंसाभिमर्शनपूर्वकंबटोःसमीपमानयनंप्रधानकर्म तस्यविस्मरणेपुनरुपनयनम् एवंगायत्र्युपदेशविस्मरणेपि ॥

**पुनरुपनयनाचा दुसरा प्रकार**—प्रदोष, रात्री, अनध्याय, शनिवार, कृष्ण, गलग्रह, तिथि व अपराह्ण—यांवर जर उपनयन झालें असलें तर पुन्हा उपनयन करावें, या प्रसंगीं प्रदोष म्हणजे प्रदोषाचा दिवस, कृष्ण म्हणजे कृष्ण एकादशीपासून अमावास्येपर्यंतचे दिवस व अपराह्ण म्हणजे दिवसाचा तिसरा भाग असें समजण्यास सांगितलें आहे. अनध्याय म्हणजे पौर्णिमा, प्रतिपदा वगैरे नित्याचे जे अनध्याय तेच होत. पुनरुपनयनाला हेच कारण होतात. अकालवृष्टीमुळें, त्रिरात्रानध्याय वगैरे जे नैमित्तिक अनध्याय ते पुनरुपनयनास कारणीभूत होत नाहींत. नैमित्तिक अनध्यायांत प्रातर्गर्जनेमुळें होणार

जो अनध्याय, तोच पुनरुपनयनाला कारण होतो. यासंबंधाची सविस्तर माहिती कौस्तुभांत पहावी. बटूच्या खांद्याला स्पर्श करीत त्याला गुरूजवळ नेणें, हें उपनयनाचें जें मुख्य कर्म होय, तें विस्मरणानें राहिल्यास (त्याचें) पुनरुपनयन करावें. याप्रमाणेंच गायत्र्युपदेशाचें विस्मरण झाल्यासही पुनरुपनयन करावें.

तृतीयःपुनरुपनयननिमित्तप्रकारः एकंवेदमधीत्यवेदान्तराध्ययनचिकीर्षायां-प्रतिवेदंपुनरुपनयनमित्येके अन्यवेदिनामृग्वेदाध्ययनार्थमुपनयनमित्यपरे ·अन्येतुएकेनैवोपनयनेनवेदत्रयाध्ययनाधिकारः अथर्ववेदाध्ययनार्थंद्वितीयमुप-नयनमित्याहुः तेनऋगादिवेदत्रयाध्यायिनोमुण्डमाण्डुक्याद्याथर्वणोपनिषदो-विनापुनःसंस्कारंपठन्तितेचिन्त्याः युगपदनेकवेदारम्भे नोपनयनावृत्त्यपेक्षेति-सकृदुपनीत्यायुगपत्सकलवेदारम्भःसिद्ध्यतीतिपरे तत्रएकवेदाध्ययनानन्तरं-यद्वेदाध्ययनचिकीर्षातद्वेदेतिकर्तव्यताकंपुनरुपनयनम् तत्रवपनंब्रह्मौदनंमेधा-जननंदीक्षाचकृताकृता परिदानान्ताक्रियाभवति अनध्यायादिकेद्वितीयेपुनरुप-नयननिमित्तेसवर्मविकृतंयथोक्तकालेउपनयनम् ॥

**पुनरुपनयाचा तिसरा प्रकार**—एका वेदाचें अध्ययन केल्यावर दुसरा वेद शिकण्याची जर इच्छा झाली, तर प्रत्येक वेद शिकण्याच्या वेळीं पुन्हा उपनयन करावें, असें कांहीं ग्रन्थकार सांगतात. अन्य वेदी असतील त्यांना ऋग्वेद शिकणें झाल्यास त्यांनीं पुनरुपनयन करावें असें दुसरे ग्रन्थकार म्हणतात. एकाच उपनयनानें तीन वेद शिकण्याचा अधिकार येतो व अथर्ववेदाच्या अध्ययनाला मात्र पुनरुपनयन लागतें, असें कोणी ग्रन्थकार म्हण-तात. यावरूनच ऋग्वेदादि तीन वेदांचें अध्ययन करणार (जे कोणी) मुण्ड व माण्डुक्यादि उपनिषदें पठन करतात, त्याबद्दल विचार करणें जरूर आहे. एकदमच अनेक वेदांचें अध्ययन करण्यास जर सुरवात केली, तर पुनरुपनयनाची जरुरी नसल्यानें, एकदां उपनयन झाल्यावर सर्व वेदाध्ययनाचा आरंभ सिद्ध होतो, असें जे कोणी ग्रंथकार म्हणतात, त्यावरूनच एका वेदाचें अध्ययन झाल्यावर, ज्या दुसऱ्या वेदांचें अध्ययन करण्याची इच्छा होईल त्यांत सांगितलेल्या विधीप्रमाणें उपनयन करावें. त्यांत—वपन, ब्रह्मौदन, मेधाजनन व दीक्षा—हीं कर्में कृताकृत आहेत. क्रिया परिदा-नानें पुरी होते. एका उपनयनांतल्या अनध्यायादिकांमुळें कराव्या लागणाऱ्या दुसऱ्या प्रकारच्या उपनयनांत कांहींही न गाळतां सर्व विधि उक्त (योग्य) काळीं करावेत.

अथप्रायश्चित्तार्थेव्रतबन्धेविशेषः तत्रनिमित्तानन्तरमेवकरणेउदगयनपुण्य-नक्षत्राद्युक्त कालोनापेक्ष्यते अन्यथातुयथोक्तकालापेक्षा तत्रकर्तापितातदभावे-पितृव्यादिः सपिण्डः तदभावेन्यः कश्चित् यत्रपुनरुपनयनंप्रायश्चित्तत्वे-नोक्तंतत्रपर्षदुपदिष्टविधीनातदेवकार्यम् यत्रतु प्रायश्चित्तान्तरसहिततत्रोक्त-विधिनाप्रायश्चित्तं संस्कार्येण कारयित्वाचार्येण तस्योपनयनंकार्यम् यत्रजातकर्मादिसंस्कारसहितमुपनयनंविहितंतत्रजातादिचौलान्तसंस्कारान्कृत्वा-कार्यम् पुनरुपनयनेगायत्रीस्थानेतत्सवितुर्वृणीमहइत्यस्याउपदेशादाचार्ये-

णास्याएवऋचोद्वादशोत्तरसहस्रजपः कृच्छ्रत्रयंचोपनेतृत्वाधिकारार्थंकार्यम्-तत्रास्यकृतौर्ध्वदैहिकस्यपुनःसंस्कारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंजातकर्माद्युप-नयनान्तसंस्कारान्करिष्ये एवंनिमित्तान्तरेपिसंकल्पऊह्यः सर्वसंस्कारो-द्देशेनतन्त्रेणनान्दीश्राद्धादिश्मश्रुवपनानन्तरंचौलकेशवपनम् मनुष्यादिक्षीर-पानादिनिमित्तान्तरेतुसंस्कार्योमुकदोषपरिहारार्थंपर्षदुपदिष्टममुकप्रायश्चित्तं-करिष्यइतिसंकल्प्य तत्कुर्यात् आचार्यस्तुअस्यामुकदोषपरिहारार्थंपुनःसंस्कार-सिद्धिद्वाराश्री० पुनरुपनयनंकरिष्यइतिसंकल्प्योपनयनमात्रंकुर्यात् यत्रोपनयन-मात्रोक्तस्तत्रसंस्कार्यस्यनसंकल्पः किंत्वाचार्यस्यैवपुनरुपनयनंग्रामाद्बहिःप्रा-च्यामुदीच्यांवागत्वाकार्यम् नान्दीश्राद्धान्तेमण्डपदेवतास्थापनम् कृतमङ्गल-स्नानंसंस्कार्यंभोजयित्वावपनपक्षेवपनस्नानेकारयित्वाअस्यप्रायश्चित्तार्थपुनरु-पनयनहोमेदेवतापरिग्रहार्थमन्वाधानंकरिष्येअस्मिन्नन्वाहितेग्नावित्यादिनित्य-वत् ब्रह्मचारिणः पुनरुपनयनेसमन्त्रकंवासोधारणंनित्यम् अन्यस्यवैकल्पि-कम् ब्रह्मसूत्रधारणादिसूर्येक्षणान्तंनित्यवत् ततोयुवासुवासाइत्येतन्मन्त्रकंप्रद-क्षिणमावर्तनादिवासोबद्धाञ्जलिग्रहणान्ते प्रणवव्याहृतीनांऋष्यादिस्मृत्वा तत्स-वितुर्वृणीमहइत्यस्यश्यावाश्वः सवितानुष्टुप्पुनरुपनयनेउपदेशेविनियोगः पादः शोर्धर्चशः सर्वामितित्रिर्वाचयेत् ब्रह्मचारिणा मेखलादानादिनित्यवत्ब्रह्मचर्यो-पदेशान्तम् अन्यस्यमेखलाजिनदण्डधारणंपाक्षिकम् ब्रह्मचर्योपदेशोदिवामा-स्वाप्सीरित्यन्तःवेदमधीष्वेत्यादिकंन ततःस्विष्टकृतादि मेधाजननपक्षे तत्पर्यन्ता-ग्निधारणम् भिक्षापूर्वकानुप्रवचनीयःगायत्र्याःस्थानेतत्सवितुर्वृणीमहइतिहोमः त्रिरात्रव्रतान्तेयस्मिन्नाश्रमेपुनरुपनयनंतदाश्रमधर्मान्कुर्यात् यत्रपुनरुपनयनान्ते-पुनर्विवाहः कृतौर्ध्वदैहिकादेःश्रूयते तत्रमेखलादिधारणपूर्वकंकतिचिद्दिनानि-ब्रह्मचर्यंकृत्वोचितकालेसमाप्य पूर्वभार्ययान्ययावाविवाहंकुर्यात् इतिऋग्वे-दिनांपुनःसंस्कारः ॥

**ऋग्वेद्यांचा पुनरुपनयनसंस्कार**—प्रायश्चित्तासाठीं निमित्त घडल्याबरोबर जर उपनयन करणें असल, तर उत्तरायण, पुष्यनक्षत्र वगैरे उक्तकाल पाहण्याचें कारण नाहीं. निमित्त घडल्यावर कांहीं काल गेल्यावर जर करणें असेल, तर उपनयनाचा उक्त काल बघितला पाहिजे. तें उपनयन बाप किंवा त्याच्या ऐवजीं चुलता वगैरे जे कोणी सपिण्ड असतील त्यांनीं करावें. सपिण्ड नसलच तर दुसरा कोणी असावा. जेथें पुनरुपनयन हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे, तेथें (ब्राह्मण) सभेनें सांगितलेल्या विधीनेंच उपनयन करावें. जेथें दुसरें प्रायश्चित्त सांगून शिवाय उपनयन सांगितलें असेल तेथें, ज्याचें उपनयन करायचें असेल, त्याच्याकडून उक्त विधीनें प्रायश्चित्त करवून, आचार्यानें त्याचें उपनयन करावें. जेथें जातकर्मादि सर्व संस्कारयुक्त प्रायश्चित्त सांगितलें आहे तेथें, जातकर्मापासून चौलापर्यंतचे संस्कार करून उपनयन करावें. पुनरुपनयनांत गायत्रीच्या जागीं 'तत्सवितुर्वृणीमहे०' या ऋचेचा उपदेश करावा, असें सांगितलें आहे;

म्हणून आचार्यानें याच ऋचेचा एक हजार बारा जप आणि तीन कृच्छ्र प्रायश्चित्त असें, उपनयनाचा अधिकार येण्यासाठीं करावें, आणि नंतर 'अस्य कृतौर्ध्वदेहिकस्य पुनःसंस्कारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं जातकर्माद्युपनयनान्तसंस्कारान् करिष्ये' असा किंवा निराळें निमित्त असल्यास त्या निमित्ताचा उच्चार करून संकल्प करावा. सर्व कर्मांसाठीं म्हणून तंत्रानें नान्दीश्राद्ध करून श्मश्रुवपन ( मिशा ) काढविल्यावर चौलसबंधाचें ( मुख्य शेंडी ठेवून बाकीचें ) केशवपन करावें. मनुष्यस्त्रीचें दूध प्याल्याचें वगैरे निमित्त असल्यास, ज्याचे संस्कार करायचे त्यानें- 'अमुकदोषपरिहारार्थं पर्षदुपदिष्ट अमुक प्रायश्चित्तं करिष्ये' वगैरे संकल्प करून ते ते संस्कार करावे. आचार्यानें—'अस्य अमुकदोषपरिहारार्थं पुनःसंस्कारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुनरुपनयनं करिष्ये'—असा संकल्प केल्यावर, उपनयन मात्र करावें. जेथें फक्त उपनयनाचेंच तेवढें प्रायश्चित्त सांगितलें असेल तेथें, ज्याचें उपनयन करायचें त्याला संकल्प करणें नको; आचार्यानें संकल्प केला म्हणजे झालें. पुनरुपनयन गांवाच्या बाहेर पूर्व अथवा उत्तर या दिशांकडे जाऊन करावें. नान्दीश्राद्धानंतर मण्डपदेवतांची स्थापना करावी. मंगलस्नानानन्तर संस्कार्याचें ( ज्याचा संस्कार करायचा त्याचें ) जर वपन करण्याचा पक्ष असेल, तर वपनानन्तर पुन्हा स्नान घालून. 'अस्य प्रायश्चित्तार्थपुनरुपनयनहोमे देवताप्रतिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये । अस्मिन्नन्वाहितेऽग्नौ०' वगैरे नित्याप्रमाणें अन्वाधान करावें. पुनरुपनयन जर ब्रह्मचाऱ्याचें असेल तर, समन्त्रक वस्त्रधारण नित्य आहे व ब्रह्मचारी नसल्यास विकल्पानें आहे. यज्ञोपवीतधारणापासून सूर्यदर्शनापर्यंतचें कर्म नित्याप्रमाणेंच करावें. त्यानन्तर—'युवासुवासा०'—या मन्त्रानें प्रदक्षिणा करण्यापासून वस्त्रानें ओंजळ बांधून ग्रहण करण्यापर्यंतचें कर्म झाल्यानंतर, प्रणव आणि व्याहृति यांचे ऋषि व देवता यांचें स्मरण करून, 'तत्सवितुर्वृणीमहे इत्यस्यश्यावाश्वः सवितानुष्टुप् पुनरुपनयने उपदेशे विनियोगः—'(अशी) प्रथम चरणरूपानें, नंतर अर्धी व मग सर्व ऋचा तीन वेळां उच्चारावी. ब्रह्मचाऱ्यानें मेखलादानापासून ब्रह्मचर्योपदेशापर्यन्तचें सर्व कर्म नेहेमींप्रमाणेंच करावें. मेखला, अजिन व दण्ड हीं धारण करणें हें इतरांना विकल्पानें आहे. ब्रह्मचाऱ्याला 'दिवा मास्वाप्सीः' ( दिवसा झोंप घेऊं नकोस ) एथपर्यंतच उपदेश करावा. 'वेदमधीष्व' (वेद शिक ) वगैरे उपदेश करूं नये. त्यानंतर स्विष्टकृत् होम करावा. मेधाजनन करणें असल्यास, तें होईपर्यंत अग्निरक्षण करावें. भिक्षा मागितल्यावर अनुप्रवचनीय होम करावा. गायत्रीच्या ऐवजीं—'तत्सवितुर्वृणीमहे०' या मन्त्रानें होम करावा. तीन रात्रीपर्यंत व्रत झाल्यावर, ज्या आश्रमांत पुनरुपनयन केलें असेल, त्याचे धर्म पाळावेत. और्ध्वदैहिक संस्कार वगैरे केल्याकारणानें जेथें पुनरुपनयन सांगितलें आहे, तेथें मेखलादि धारण करून कांहीं दिवस ब्रह्मचर्य पाळावें व तें योग्य काळीं संपवून पूर्वीच्या बायकोशीं किंवा नव्या भार्येशीं विवाह करावा. असा हा ऋग्वेद्यांचा पुनरुपनयनसंस्कार आहे.

**अथयजुर्वेदिनाम् तत्रबौधायनोब्रह्मचारिणः पितृज्येष्ठाभ्यामन्योच्छिष्टभक्षणेस्त्रियासहभोजनेमधुमांसश्राद्धसूतकान्नगणान्नगणिकान्नाशनेपुनरुपनयन-**

मित्यादिउक्त्वा अग्निमुखं कृत्वाज्याक्तपालाशसमिधमादायवाचयति पुनस्त्वादित्याः कामाःस्वाहेति यन्मआत्मनो मिंदाभूदग्निः० पुनरग्निश्चक्षुरदा-दितिद्वाभ्यांहुत्वाचरुंपक्त्वाजुहोति सप्तते अग्ने० घृतेनस्वाहेति ततोयेनदेवाः पवित्रेणेतितिसृभिरुपहोमस्ततः स्विष्टकृत्प्रभृतिसिद्धमाधेनुवरप्रदानात् अथा-परमापरिदानात्कृत्वापालाशीसमिधमादायव्रात्यप्रायश्चित्तंजुहोति व्याहृति-जुहोतिअथापरोब्राह्मणवचनात्सावित्र्याशतकृत्वोभिमन्त्रितंघृतंप्राश्यकृतप्राय-श्चित्तोभवतीत्यादिकमवदत् अत्रोक्तपक्षाणांशक्ताशक्तभेदेनव्यवस्था इदंकौस्तु-भेद्रष्टव्यम् एवंशाखान्तरेष्वपिवपनमेखलाजिनदण्डभैक्ष्यचर्याव्रतादिकंवैक-ल्पिकंव्यवस्थयानुष्ठायस्वस्वशाखोक्तोपनयनंकार्यम् ॥

**यजुर्वेद्यांचा पुनरुपनयनसंस्कार**—बाप व थोरला भाऊ यांच्यावांचून इत-रांचें उष्टें ब्रह्मचाऱ्यानें खाल्ल्यास, बायको-बरोबर जेवल्यास व मद्यमांस, श्राद्धान्न, सूतकान्न व वेश्यान्न यांचें सेवन केल्यास पुनरुपनयन करण्यास सांगितलें आहे. अशा वेळीं अग्निमुख म्हणजे स्थंडिलकरणादि कर्म करून, तुपांत भिजविलेल्या पळसाच्या समिधेचें 'पुनस्त्वादित्या० कामाःस्वाहा' आणि 'यन्म आत्मनोमिन्दाभूदग्निपुनरग्निश्चक्षुरदात्' या दोन मंत्रांनीं हवन करावें. भात (चरु) शिजवून त्याचा होम करावा. या होमांत 'सप्त ते अग्ने० घृतेन स्वाहा' हा मंत्र म्हणावा. त्यानंतर 'येन देवाः पवित्रेण०' वगैरे तीन ऋचांनीं उपहोम करावा. त्यानंतर स्विष्टकृत् होम करून, गुरूला गोदान करण्यापर्यंतचें कर्म करावें. असा हा बौधायनाचा पक्ष आहे. दुसरा प्रकार, वस्त्रधारणापर्यंतचें कर्म करून पळसाच्या समिधेनें प्रायश्चित्ताचा होम केल्यावर व्याहृतिमंत्रांनीं होम करावा. तिसरा प्रकार, गायत्रीमंत्रानें शंभर वेळां मंत्रण केलेलें तूप प्यायलें असतां प्रायश्चित्त होतें, वगैरे ब्राह्मणवचन ऐकून (कृत्य) करावें. या तीन प्रकारांपैकीं जो प्रकार सामर्थ्याला अनु-कूल असेल तो करावा, अशी याची व्यवस्था समजावी. हें सर्व कौस्तुभांत पहावें. याप्रमाणेंच इतर शाखांतही—वपन, मेखला, अजिन, दण्ड, भिक्षा, व्रत वगैरे संबं-धानें जो जो विकल्प सांगितला असेल त्यांचें आचरण करून ज्याच्या शाखेंत जसें सांगितलें असेल तसें पुनरुपनयन करावें.

अथब्रह्मचारिधर्माः तत्रसंध्यात्रयमग्निपरिचरणंभैक्षंचनित्यम् तत्राग्निकार्यं प्रातः सायंच सायमेवसकृद्वा तत्रपलाशखदिराश्वत्थशमीसमिधःश्रेष्ठास्तद-लाभेऽर्कवेतसाम् भवच्छब्दपूर्विकाभिक्षाविप्राणाम् सार्वविप्रगृहेष्वेव आप-दिशूद्रगृहेष्वआमान्नंगृह्णीयात् हव्ये श्राद्धभिन्नकव्येचाभ्यर्थितोभुञ्जीत अस्य-ब्रह्मयज्ञोपिनित्यः सचोपाकरणात्पूर्वंगायत्र्या कार्यः गुरूच्छिष्टमध्वादिकंनि-षिद्धमपितदन्यापरिहार्यरोगनिवृत्त्यर्थंभक्षणीयम् निषिद्धान्यत्गुरूच्छिष्टंत्व-नौषधमपिभक्ष्यम् एवंज्येष्ठभ्रातुःपितुश्चोच्छिष्टेषुज्ञेयम् दिवास्वापोनेत्रेवञ्जल-मुपानच्छत्रंमञ्चादौशयनंचवर्ज्यम् ताम्बूलाभ्यञ्जनंचैवकांस्यपात्रेचभोजनम् यतिश्चब्रह्मचारीच विधवाचविवर्जयेत् १ मधुसूतकान्नश्राद्धान्नादेर्निषेधाः पुनः-

संस्कारप्रकरणोक्ताअनुसंधेयाः मेखलामजिनंदण्डमुपवीतंचनित्यशः । कौपीनं-कटिसूत्रंचब्रह्मचारीविधारयेत् १ मेखलोपवीतादौत्रुटितेजलेप्रास्यान्यद्धारयेत् यज्ञोपवीतनाशेमनोज्योतिरित्यनेनव्रातपतिभिश्चेतिचतस्र आज्याहुतीर्जुहुयादित्युक्तम् अस्यगुरुपरिचर्याप्रकारोऽन्यत्रज्ञेयः ॥

**ब्रह्मचाऱ्याचे धर्म**—त्रिकाल सन्ध्या, अग्निसेवा आणि भिक्षा हीं (कर्में ब्रह्मचाऱ्याचीं) रोजचीं (नित्य) आहेत. यांतली अग्निसेवा सकाळीं व सायंकाळीं किंवा फक्त सन्ध्याकाळींच करावी. पळस, खैर, पिंपळ, आणि शमी यांच्या समिधा श्रेष्ठ होत. त्या न मिळाल्यास रुई व वेत यांच्या घ्यावा. ब्राह्मणानें ब्राह्मणाच्याच घरीं 'भवत्' शब्दानें भिक्षा मागावी व आपत्कालीं शूद्राच्या घरची कोरडी भिक्षा घ्यावी. हव्य (देवतान्न) श्राद्धावांचून इतर वेळचें कव्य (पितरान्न) यांचें जर आमंत्रण आलें असेल, तर भोजन करावें. ब्रह्मचाऱ्यानें रोज ब्रह्मयज्ञ करावा, तो उपाकर्माच्या आधीं गायत्रीमंत्रानें करावा. इतर उपायांनीं जर रोगपरिहार होत नसेल, तर रोगनाशनासाठीं—गुरूचें अन्न, मद्य वगैरे निषिद्ध पदार्थ सेवन करावेत. निषिद्ध नसलेले गुरुचें उष्टें औषधावांचूनहि खावें. माता व पिता यांचेंहि उष्टें (गुरूप्रमाणेंच) खावें. दिवसां झोंप घेणें, काजळ घालणें, जोडा, छत्री वगैरे वापरणें व पलंगावर निजणें या गोष्टी करूं नयेत. विडा खाणें, काजळ घालणें व कांश्याच्या भांड्यांत भोजन करणें या गोष्टी—संन्याशी, ब्रह्मचारी व विधवा यांनीं वर्ज्य करण्याबद्दलचें वचन आहे. मद्य, सूतकान्न, श्राद्धान्न, वगैरेबद्दलचे जे नियम पुनरुपनयनसंस्कारांत सांगितले आहेत ते पाळावेत. मेखला, अजिन, दण्ड, यज्ञोपवीत, कौपीन व कटिसूत्र—हीं ब्रह्मचाऱ्यानें नेहमीं धारण करावींत. मेखला, यज्ञोपवीत वगैरे तुटल्यास तीं पाण्यांत टाकून देऊन दुसरीं धारण करावींत. यज्ञोपवीताचा नाश झाल्यास—'मनोज्योति०' हा एक मंत्र व 'व्रातपतिभि०' हे तीन मंत्र अशा चार मंत्रांनीं तुपाच्या आहुतींचें हवन करण्यास सांगितलें आहे. ब्रह्मचाऱ्यानें गुरुसेवा करण्याचा प्रकार इतर ग्रन्थांत पाहावा.

अथब्रह्मचारिव्रतलोपे संध्याग्निकार्यलोपेऽष्टसहस्रगायत्रीजपःक्वचित्सकृल्लोपेमानस्तोकेतिमन्त्रस्यशतंजपउक्तः भिक्षालोपेऽष्टशतम् अभ्यासेद्विगुणंपुनःसंस्कारश्च मधुमांसाद्यशनेउक्तम् स्त्रीसंगे गर्दभपशुः एकानेकव्रतलोपसाधारणमृग्विधाने तवोधियाजपेन्मन्त्रं लक्षंचैवशिवालये । ब्रह्मचारिस्वधर्मेषुन्यूनंचेत्पूर्णमेतितत् १

**ब्रह्मचारिव्रतलोपप्रायश्चित्त**—सन्ध्या व अग्निकर्म यांचा लोप झाल्यास आठ हजार गायत्रीजप करावा. एकदां लोप झाल्यास 'मानस्तोके०' या मंत्राचा शंभर वेळां जप करण्यास क्वचित् ग्रन्थांत सांगितलें आहे. भिक्षालोप झाल्यास आठशें गायत्रीजप करावा. अनेकदां भिक्षालोप झाला असल्यास दुप्पट गायत्रीजप करून पुनरुपनयन करावें. मद्यमांससेवनाबद्दलचें प्रायश्चित्त पूर्वीं सांगितलेंच आहे. स्त्रीसंग घडल्यास गर्दभपशुयाग करावा. एक अथवा अनेक

व्रतांचा लोप झाल्यास त्यासाठीं जें साधारण प्रायश्चित्त ऋग्विधान ग्रंथांत सांगितलें आहे तें असें:—स्वधर्मांत कांहीं कमी झाल्यास ब्रह्मचाऱ्यानें शिवालयांत बसून 'तं वोधिया स०' या मंत्राचा एक लक्ष जप करावा, म्हणजे न्यूनता जाऊन पूर्णता येते.

उपाकर्मकृत्वाप्रागुक्तविद्यारम्भकालेऽक्षराम्भोक्तविष्णवादिपूजाप्रकारेणवेदारम्भःकार्यः द्विजस्त्रीणांयुगान्तरेमौञ्जीबन्धोवेदाध्ययनंचासीत्कलियुगेतुनैतद्द्वयम् अतःस्त्रीणांवेदोच्चारादौदोषः ॥

**कलियुगस्थस्त्रीवेदोच्चार दोष**—उपाकर्म केल्यावर, मागें विद्यारंभाच्या वेळीं अक्षरविद्येला आरंभ करतांना जसें विष्णु वगैरे देवतांचें पूजन सांगितलें आहे त्या प्रकारचें पूजन करून, वेदाध्ययनाला आरंभ करावा. कलियुगावांचून इतर युगांत ब्राह्मणस्त्रियांना मौञ्जीबन्धन व वेदाध्ययन हे जे संस्कार सांगितले आहेत, ते कलियुगांत वर्ज्य केले असल्यानें, स्त्रियांनीं वेदोच्चार केल्यास दोष आहे.

अथानध्यायाः तेचानित्यानैमित्तिकाश्चप्रायेणमौञ्जीप्रकरणेउक्ताः ततोन्येपि उभयविधानध्यायाबहवोनिबन्धेषूक्तास्तेऽत्रनप्रपच्यन्ते कलिकालेऽस्मिंस्तावदनध्यायपालनस्य दुर्मेधसामशक्यत्वात् तथाचहेमाद्रौस्मृतिः चतुर्दश्यष्टमीपर्व प्रतिपत्स्वेवसर्वदा । दुर्मेधसामनध्यायास्त्वंतरागमनेषुच १ इति अतः कलौप्रतिपद्द्वयमष्टमीद्वयंचतुर्दशीद्वयंपूर्णिमादर्शोऽयनसंक्रान्तिरित्येतावतएवानध्यायांस्त्यक्त्वावेदशास्त्रादिकमध्येतव्यम् पुंसांप्रायोल्पप्रज्ञत्वात् शिष्टाचारोप्येवमेव पूर्वदिनेसायंपरत्रप्रातश्चात्रमुहूर्तानध्यायतिथिसत्त्वेउदयेस्तमयेवापीत्यनेनदिनद्वयेऽनध्यायप्राप्तौवचनान्तरम् केचिदाहुःक्वचिद्देशेयावत्तद्दिननाडिकाः। तावदेवत्वनध्यायोनतन्मिश्रेदिनान्तरे १ इति इदमप्यल्पप्रज्ञविषयम् चतुर्थीसप्तम्यादौप्रदोषनिर्णयउक्तः प्रदोषेषुन स्मरेन्नचकीर्तयेदित्युक्तेरितरानध्यायतोदोषाधिक्यम् अनध्यायस्तुनाङ्गेषुनेतिहासपुराणयोः । नधर्मशास्त्रेष्वन्येषुपर्वण्येतानिवर्जयेत् १ नित्येजपेचकाम्येचक्रतौपारायणेपिच । नानध्यायोस्ति वेदानांग्रहणेग्राहणेस्मृतः २ ॥

**अनध्याय**—मौञ्जीप्रकरणांत नित्य व नैमित्तिक असे दोन प्रकारचे अनध्याय प्रायश्चित्तरूपानें सांगितले. त्यांशिवाय इतरही अनध्याय आहेत. ग्रन्थांतरीं नित्य व नैमित्तिक असे दोन्ही प्रकारचे जे अनेक अनध्याय सांगितलेले आहेत, त्यांचें प्रतिपादन येथें केलें नाहीं; कारण, ते सर्व पाळणें कलियुगातल्या मतिमन्द लोकांना अशक्य आहे. हेमाद्रिग्रन्थांत जें स्मृतिवचन आहे तें असें:—चतुर्दशी, अष्टमी, पर्वणी, प्रतिपदा व मधून जाणें—हे अनध्याय मतिमन्दांनीं नेहमीं पाळावेत. यावरून कलियुगांत—( प्रत्येक महिन्यांतल्या ) दोन प्रतिपदा, दोन अष्टम्या, दोन चतुर्दशा, ( एक ) पौर्णिमा, दर्श व कर्क आणि मकर या दोन संक्रान्ति एवढेच अनध्याय ठरतात. हे ( अनध्याय ) सोडून बाकीच्या दिवशीं वेदशास्त्रादिकांचें अध्ययन करावें; कारण, कलियुगांत प्रायः पुरुष मतिमन्द असतात. शिष्टा-

वारसुद्धां असाच आहे. पूर्व ( आदल्या ) दिवशीं सायंकाळीं व दुसऱ्या दिवशीं सकाळीं अनध्याय तिथि जर सहा घटका असेल तर उदयकालीं किंवा अस्तकालीं तिथि आल्यास अनध्याय समजावा–या वचनाप्रमाणें दोन दिवस अनध्याय होतो; म्हणून, या बाबतींत कोणा ग्रंथकारानें जें दुसरें वचन सांगितलें तें असें:–ज्या दिवशीं अनध्याय तिथीच्या जितक्या घटका असतील तितकाच अनध्याय मानावा. दुसऱ्या दिवशीं जरी अनध्याय तिथीच्या घटका असल्या तरी तो अनध्याय मानूं नये. हें वचन सुद्धां अल्पमति जनांकरितांच आहे. चतुर्थी, सप्तमी वगैरे तिथींच्या दिवशीं जो प्रदोष असतो, त्याचा निर्णय मागें सांगितलाच आहे. प्रदोषकाल ( वेद ) स्मरण व ( वेदाचा ) उच्चार करूं नये–असें वचन असल्यानें इतर अनध्यायापेक्षां प्रदोष-कालीं ( तसें करण्यांत ) अधिक दोष आहे. वेदांगें, इतिहास, पुराणें व धर्मशास्त्र यांना अनध्याय नाहीं. हीं फक्त पर्वदिवशींच वर्ज्य करावींत. नित्यकर्म, जप, काम्य-कर्म, यज्ञ व पारायण यांना अनध्याय नाहीं. वेदाध्ययन व वेदाध्यापन यांना मात्र अनध्याय आहे. ( अनध्याय म्हणजे सुटी असा अर्थ समजावा. )

**अथाध्ययनधर्माः वेदारम्भवसानेगुरोःपादोपसंग्रणहम् आदौप्रवणमुच्चार्य-वेदमधीत्यान्तेप्रणवमुच्चार्यभूमिंस्पृष्ट्वाविरमेत् रात्रेःप्रथमयामेचरमयामेचवेदा-ध्ययनम् यामद्वयंशयानस्तुब्रह्मभूयायकल्पते गुरुंपितरंमातरंच्चमन्येतकदापन-द्रुह्यते अध्यापितायेगुरुंनाद्रियन्तेशिष्यावाचामनसाकर्मणावा । यथैवतेनगुरो-र्भोजनीयास्तथैवतान्नभुनाक्तश्रुतंतत् १ इत्यध्ययनधर्माः ॥**

**अध्ययनधर्म**—वेदाध्ययनाला प्रारंभ करतांना व तें संपवितांना गुरूचे पाय धरावे. प्रारम्भीं प्रणवोच्चार (ॐ) करावा. वेदाध्ययन संपल्यावर ॐकाराचा उच्चार करून भूमीला स्पर्श केल्यावर समाप्ति करावी. रात्रीच्या पहिल्या व शेवटच्या प्रहरीं वेदाध्ययन करावें. ( रात्रीच्या ) दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरीं झोंप घेणारा ( विद्यार्थी ) ब्रह्मत्वाला जातो. गुरु, बाप व आई–यांचा मान राखावाच. त्यांचा कधीं द्रोह करूं नये. गुरूजवळ शिकलेले जे विद्यार्थी गुरूला वाचा, मन व कर्म–यांनीं मान देत नाहींत, ते गुरूनें पालन करण्यास जसे अयोग्य, तद्वतच वेदही त्यांचें पालन करीत नाहींत. असे हे अनध्याय–धर्म होत.

**अथव्रतानि तानिमहानाम्नीव्रतमहाव्रतोपनिषद्व्रतगोदानव्रताख्यानि चत्वारिक्रमेण जन्मतस्त्रयोदशादिषुवर्षेषूत्तरायणेचौलोक्ततिथिनक्षत्रवारादिषु कार्याणि अत्रविस्तृतप्रयोगाः कौस्तुभादौस्वस्वगृह्येषुचद्रष्टव्याः एतेषांलोपे-प्रत्येकमेकैककृच्छ्रंचरित्वागायत्र्यष्टशताहुतीर्जुहुयात् त्रीन्षड्द्वादशवाकृच्छ्रान्कु-र्यादित्यन्यत्र ॥**

**व्रतें**—व्रतें जीं चार नांवांचीं आहेत तीं येणेंप्रमाणें:–( १ ) महानाम्नी व्रत, ( २ ) महाव्रत, ( ३ ) उपनिषद्व्रत आणि ( ४ ) गोदानव्रत–हीं व्रतें जन्मापासून ( दर ) तेराव्या वर्षीं क्रमानें व उत्तरायणांत चौलसंस्काराला योग्य अशा तिथिवार नक्षत्रांवर करावींत. यांबद्दलचे विस्तृत प्रयोग, कौस्तुभादिक ग्रन्थांत व आपापल्या

गृह्यसूत्रांत पहावेत. या व्रतांचा जर लोप होईल, तर प्रत्येकाबद्दल एकेक कृच्छ्रप्रायश्चित्त करून, गायत्रीमंत्रानें शंभर आहुतींनीं हवन करावें. तीन, सहा अथवा बारा कृच्छ्र करण्यास दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे.

अथसमावर्तनम् गुरवेक्षेत्राद्यन्यतमंदत्वातदनुज्ञयास्नायात् स्नानंनामसमावर्तनम् तानिचक्षेत्रंहेमगौरश्वश्वछत्रोपानहौधान्यंवस्त्रत्रयंशाकमित्यतानिएषुयद्गुरोःप्रियंतद्देयम् दानं विनैव गुरुप्रीतातदनुज्ञयैवस्नायात् क्षेत्रादिनापनावद्यानिष्क्रयः एकैकमक्षरयस्तुगुरुः शिष्ये निवेदयेत् । पृथिव्यांनास्तितद् द्रव्यंयद्दत्त्वाह्यनृणीभवेत् १ इत्युक्तेः सचस्नातकस्त्रिविधः विद्यास्नातकव्रतस्नातकउभयस्नातकइतितत्रैकंद्वौत्रीन्चतुरोवावेदान्वेदैककदेशंवाधीत्यतदर्थंचज्ञात्वाद्वादशवर्षादिब्रह्मचर्यकालावधेःप्रागेवस्नातिविद्यास्नातकः उपनयनव्रतसावित्रीव्रतवेदव्रततान्यनुष्ठायवेदसमाप्तेःपूर्वमेवस्नातोव्रतस्नातकः द्वादशवर्षादिब्रह्मचर्यसमाप्त्यावेदंसमाप्यस्नातोविद्याव्रतोभयस्नातकः तत्रोपनयनोत्तरंमेधाजननपर्यन्तंत्रिरात्रद्वादशरात्रादिव्रतमुपनयनव्रतम् मेधाजननोत्तरमुपाकर्मान्तंब्रह्मचारिधर्मानुष्ठानंसावित्रीव्रतम् तदुत्तरंवेदाध्ययनार्थंद्वादशवर्षादिकालावच्छिन्नंव्रतंवेदव्रतम् स्वाध्यायोऽध्येतव्यइतिविधेरर्थज्ञानपर्यन्तत्वाद्वेदार्थज्ञानंविनावेदाध्ययनमात्रेणसमावर्तनेऽधिकारोनेतिपूर्वमीमांसकाः वेदग्रहणमण्डववित्रिविधिफलंपूर्वकाण्डार्थज्ञानंकर्मानुष्ठानाक्षिप्तम् उत्तरकाण्डार्थज्ञानंकस्यश्रोतव्यविधिप्राप्तमित्युत्तरमीमांसकाः तत्रसंहिताब्राह्मणंचमिलित्वैकोवेदः आरण्यकाण्डंब्राह्मणान्तर्गतमेवसंपूर्णैकवेदाध्ययनेऽवशक्तोवेदैकदेशंपठेत् अत्यशक्तेनसंहितायाः प्रथमचरमसूक्तेकतिपयसूक्तानां प्रथमाऋचःसर्वसूक्तानांप्रथमाऋचोवाऽध्येतव्याः एवंवेदैकदेशाध्ययनोत्तरंसमावृत्तोविवाहितोवाब्रह्मचर्योक्तनियमेनवेदाध्ययनंकुर्यात् तत्रऋतौभार्यागमनंकार्यम् ब्रह्मचारिव्रतलोपप्रायश्चित्तं कृच्छ्रत्रयंकृत्वामहाव्याहृतिहोमंचकृत्वासमावर्तनंकार्यम्एतच्चसंध्याग्निकार्यभिक्षालोपशूद्रादिस्पर्शकटिसूत्रमेखलाजिनत्यागदिवास्वापाञ्जनपर्युषितभोजनादिव्रतभङ्गेषुअल्पकालमल्पव्रतभङ्गेज्ञेयम् बहुधर्मलोपेतु तवोधियानव्यस्याशविष्टमितिमन्त्रस्यलक्षजपः शिवालयेइत्युक्तम् एवंचमहानाम्न्यादिव्रतलोपस्यब्रह्मचर्यव्रतलोपस्यच प्रायश्चित्तोत्तरंसमावर्तनाधिकारः

**समावर्तनसंस्कार**—गुरूला क्षेत्रादिकांचें (जमीन वगैरेंचें) दान देऊन, त्याच्या अनुज्ञेनें स्नान करावें. हें स्नान करणें म्हणजेच समावर्तन (सोडमुंज) होय. गुरूला क्षेत्रादिक दानें द्यायचीं तीं अशीं:-क्षेत्र, सोनें, गाय, घोडा, छत्री, जोडा, धान्य, तीन वस्त्रें व भाजी. यांपैकीं गुरूला जें प्रिय असेल तें द्यावें. दानावांचूनच जर गुरु संतोषित होईल, तर त्याच्या परवानगीनें स्नान करावें. क्षेत्रादिकदानें केल्यानें विद्येचें (शिक्षणाचें) मूल्य होतें असें नाहीं. जगांत असें कोणचेंही द्रव्य नाहीं कीं जें दिल्यानें, शिष्याला गुरु जें एकेक अक्षर शिकवितो, त्यापासून तो ऋणमुक्त होईल, असें वचन आहे. या स्नातकाचे जे तीन प्रकार

आहेत, ते येणेंप्रमाणें:-विद्यास्नातक, व्रतस्नातक आणि उभयस्नातक. एक, दोन, तीन अथवा चार वेद किंवा वेदांचे एकदेश यांचें अध्ययन करून व त्यांचा अर्थ जाणून ब्रह्मचर्याचा जो बारा वर्षांचा काळ सांगितला त्याच्या आधीं जो स्नान करतो, तो विद्यास्नातक होय. उपनयनव्रत, सावित्रीव्रत आणि वेदव्रत यांचें अनुष्ठान करून, वेदाची समाप्ति होण्याच्या पूर्वींच जो स्नान करतो, तो व्रतस्नातक, आणि बारा वर्षे ब्रह्मचर्य पाळून वेदाध्ययनाची समाप्ति केल्यावर जो स्नान करतो तो विद्याव्रतोभयस्नातक. उपनयनानंतर मेधाजननापर्यंत तीन रात्री, बारा रात्री वगैरे तें उपनयनव्रत होय. मेधाजननानंतर उपाकर्मापर्यंत ब्रह्मचारीधर्मांचें अनुष्ठान करणें (पाळणें) तें सावित्रीव्रत होय. त्यानंतर वेदाध्ययनासाठीं जें बारा वर्षें व्रत करणें तें वेदव्रत होय. स्वाध्यायाचें अध्ययन करावें, असें अर्थज्ञान होईपर्यंत विधिवचन आहे, यास्तव वेदार्थाचें ज्ञान झाल्यावांचून केवळ वेदाध्ययनानें समावर्तनसंस्काराला अधिकार येत नाहीं. असें पूर्वमीमांसक म्हणतात. वेदग्रहण हेंच विधिफल आहे. पूर्वकाण्डाच्या अर्थाचें ज्ञान करून घेणें तें कर्माच्या अनुष्ठानासाठीं आणि उत्तरकाण्डाच्या अर्थाचें ज्ञान करून घेणें तें काम्यकर्माच्या श्रवणविधीनें प्राप्त आहे ( होतें ) असें उत्तरमीमांसक म्हणतात. त्यांत संहिता व ब्राह्मण मिळून वेद होतो. आरण्यकाण्डाचा अंतर्भाव ब्राह्मणांत होतो. संपूर्ण एका वेदाचें अध्ययन करण्यास जो असमर्थ असल त्यानें वेदभागाचें पठण करावें. अति असमर्थानें पहिलें व शेवटचें सूक्त, कांहीं सूक्तांच्या पहिल्या ऋचा किंवा सर्व सूक्तांच्या पहिल्या ऋचा यांचें अध्ययन करावें. याप्रमाणें वेदभागाचें अध्ययन होऊन समावर्तन झाल्यावर लग्न केलेल्यानें ब्रह्मचर्याचे नियम पाळून वेदाध्ययन करावें व ऋतुकाळीं भार्यागमन करावें. ब्रह्मचारिव्रताचा लोप झाल्याबद्दलचें तीन कृच्छ्रांचें प्रायश्चित्त करून, महाव्याहृतिमंत्रानें होम करावा आणि मग समावर्तन करावें. हें प्रायश्चित्त संध्या, अग्निकार्य व भिक्षा यांचा लोप; शूद्रादिकांचा स्पर्श ( विटाळ ), कटिसूत्र, मेखळा व अजिन यांचा त्याग, दिवसा झोंप, काजळ घालणें, शिळें अन्न खाणें वगैरे अल्पव्रतांचा थोडा कालपर्यंत भंग झाला असेल, तरच आहे असें समजावें. पुष्कळ धर्मलोप झाला असल्यास—'तं वोधियान-व्यस्याशविष्ट०' या मंत्राचा शिवालयांत एक लक्ष जप करावा, असें सांगितलें आहे. याप्रमाणें महानाम्नीव्रत व ब्रह्मचर्यव्रत यांच्याबद्दल प्रायश्चित्त केल्यानंतर समावर्तन-संस्काराचा अधिकार प्राप्त होतो.

अथसमावर्तनकाल: तत्रोपनयनोक्तकालेसमावर्तनमितिबहवोज्योतिर्ग्रन्था: तेनानध्यायेप्रदोषदिनेभौमशनिवारयो: पौषाषाढयोर्दक्षिणायने चनभवति मार्गशीर्षेविवाहप्रसक्तौदक्षिणायनेऽपिभवति अन्यथा अनाश्रमीनतिष्ठेतदिन-मेकमपिद्विज: इतिनिषेधातिक्रमापत्ते: अन्येतु मौञ्ज्युक्तकालोपादाने मूलाभा-वात् रिक्तात्रयपूर्णिमामावास्याष्टमीप्रतिपद्भिन्नतिथिषुशुक्लेन्त्यत्रिकभिन्नकृष्णे चगुरुशुक्रास्तादिदिनक्षयभद्राव्यतीपातादिदोषशून्येशुभवारेसमावर्तनंकार्यम् नात्रप्रदोषसोपपदादितिथिवर्जनमावश्यकमित्याहु: पुष्यपुनर्वसुमृगरेवती-

हस्तानुराधोत्तरात्रयरोहिणीश्रवणविशाखाचित्राःश्रेष्ठाःएतदलाभेमौञ्ज्युक्तभानि क्वचिद्भौमशनिवारौसिन्धावुक्तौ ॥

**समावर्तनकाल**—उपनयनाला जो काल सांगितला त्याच कालीं समावर्तन (सोडमुंज) करावें असें जें पुष्कळ ज्योतिषग्रन्थांत सांगितलें आहे, त्यावरून—अनध्याय, प्रदोषदिवस, मंगळवार, शनिवार, पौष, आषाढ व दक्षिणायन—हीं समावर्तनाला वर्ज्य समजावींत (असें ठरतें). मार्गशीर्षांत लग्न करणें असल्यास दक्षिणायनांतही सोडमुंज करावी; नाहीं तर एकही दिवस द्विजानें अनाश्रमी राहूं नये, या निषेधा(वाक्या)चा अतिक्रम होतो. इतर ग्रन्थकार म्हणतात कीं, मुंजीचा उक्त काल हा सोडमुंजीचाही काल होय, असें मूळचें वचन कोठेंही सांपडत नसल्यानें—तीन रिक्ता तिथि (४–९–१४), पौर्णिमा, अमावास्या, अष्टमी व प्रतिपदा—एवढ्या वर्ज्य करून, कृष्णपक्षांत, गुरु-शुक्राचा अस्त असतां, दिनक्षय, भद्रा, व्यतीपात वगैरे दोष नसतां शुभ वारीं सोडमुंज करावी. अशा प्रसंगीं प्रदोष व सोमपदा तिथि वर्ज्य करण्याचें कारण नाहीं, असें सांगतात. पुष्य, पुनर्वसु, मृग, रेवती, हस्त, अनुराधा, तीन उत्तरा, रोहिणी, श्रवण, विशाखा आणि चित्रा हीं नक्षत्रें (सोडमुंजीला) श्रेष्ठ होत. यांच्या अभावीं मुंजीला सांगितलेलीं नक्षत्रें योजावींत. क्वचित् मंगळवार व शनिवार हेही घेण्यास धर्मसिन्धूंत सांगितलें आहे.

अथमणिकुण्डलवस्त्रयुगच्छत्रोपानद्युगदण्डस्रगुन्मर्दनानुलेपाञ्जनोष्णीषाणि आत्मनेआचार्यायचसंपाद्यालाभेआचार्यायैववासंपादयेत् देशकालौसंकीर्त्य ममब्रह्मचर्यनियमलोपजनितसंभावितदोषपरिहारेण समावर्तनाधिकारसंपादनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थमाज्यहोमपूर्वकंकृच्छ्रत्रयं महानाम्न्यादिव्रतचतुष्टयलोपजनितप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारमेकैकंकृच्छ्रंच गायत्र्याज्यहोमपूर्वकंतन्त्रेणाहमाचरिष्यइतिसंकल्प्याग्निप्रतिष्ठादिचक्षुर्षीआज्येनात्रप्रधानं अग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचचतसृभिराज्याहुतिभिः अग्निंपृथिवींमहान्तमेकयाज्याहुत्या वायुमन्तरिक्षंमहान्तमेकया० आदित्यंदिवंमहान्तमेकया० चन्द्रमसंनक्षत्राणि दिशोमहान्तमेकया० अग्निंद्विः विभावसुंशतक्रतुंअग्निं अग्निं वायुंसूर्यंप्रजापतिंचेत्यष्टावेकैकयाज्याहुत्या शेषेणेत्यादि आज्यभागान्तेव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्हुत्वा भूरग्नयेचपृथिव्यैमहतेचस्वाहा। अग्नयेपृथिव्यैमहतेइदमित्यादियथान्वाधानंत्यागः भुवोवायवेचान्तरिक्षायचमहतेचस्वाहा । सुवरादित्यायचादिवेचमहतेचस्वाहा । भूर्भुवःसुवश्चन्द्रमसेचनक्षत्रेभ्यश्चदिग्भ्यश्चमहते० । चन्द्रमसेनक्षत्रेभ्योदिग्भ्योमहतइ० । पाहिनोअग्नएनसे स्वाहा । पाहिनो विश्ववेदसेस्वाहा । यज्ञंपाहिविभावासोस्वाहा । सर्वंपाहिशतक्रतोस्वाहा पुनरूर्जानिवर्तस्वपुनरग्नइहायुषा । पुनर्नः पाह्यंहसः स्वाहा । सहरय्यानिवर्तस्वाग्नेपिन्वस्वधारया । विश्वाप्स्न्यावि‍श्वतस्परिस्वाहा । पुनर्व्यस्तसमस्तव्याहृतिचतुष्टयम् ततःव्रतचतुष्टयार्थंगायत्र्याज्यहोमः कृच्छ्रत्रयगोनिष्क्रयंदत्त्वाहोम-

मशेषंसमापयेत् महानाम्न्यादिलोपेप्रत्येकमष्टोत्तरशतमष्टाविंशतिमष्टौवागायत्र्याज्याहुतीर्हुत्वाएकैकंकृच्छ्रंचरेत् इतिप्रायश्चित्तप्रयोगः।

**समावर्तनसामुग्री व प्रायश्चित्तहोम**--मणि, कुंडलें, दोन वस्त्रें, छत्री, जोडा, दण्ड, माळ, अभ्यंग, उटी, काजळ व पागोटें, हे जिन्नस स्वतःसाठीं एकेक व आचार्यासाठीं एकेक मिळवावेत. दोघांसाठीं न मिळाल्यास आचार्यासाठींच एकेक मिळवावेत, व देशकालादिकांचा उच्चार करून--'मम ब्रह्मचर्यनियमलोपजनित सम्भावितदोषपरिहारेण समावर्तनाधिकारसम्पादनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थमाज्यहोमपूर्वकं कृच्छ्रत्रयं महानाम्न्यादि व्रतचतुष्टयलोपजनितप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारमेकैकं कृच्छ्रं च गायत्र्याज्यहोमपूर्वकं तन्त्रेणाहमाचरिष्ये' असा संकल्प केल्यावर अग्निस्थापनादि कर्म करावें आणि मग--'चक्षुषी आज्येनात्र प्रधानं अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं च चतुसृभिराज्याहुतिभिः अग्निं, पृथिवीं महान्तमेकयाज्याहुत्या वायुमन्तरिक्षं महान्तमेकया० आदित्यं दिवं महान्तमेकया० चन्द्रमसं नक्षत्राणि दिशो महान्तमेकया अग्निं द्विः विभावसुं शतक्रतुं अग्निं अग्निं अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं चेत्यष्टावेकेकयाज्याहुत्या शेषेणेत्यादि' असें अन्वाधान केल्यावर आज्यभागापर्यंतचें कर्म करून, समस्तव्याहृतिमंत्रांनीं होम करावा व पुन्हा जो होम करावा त्याचे मन्त्र येणेंप्रमाणें:--'भूरग्नये च पृथिव्यै च महते च स्वाहा। (अग्नये पृथिव्यै महते इदं न मम इत्यादि अन्वाधानाप्रमाणें त्याग करावा) --भुवो वायवेचान्तरिक्षाय च महते च स्वाहा। सुवरादित्यायच दिवे च महते च स्वाहा। भूर्भुवः सुवश्चन्द्रमसे च नक्षत्रेभ्यश्चदिग्भ्यश्च महते०। चन्द्रमसे नक्षत्रेभ्यो दिग्भ्यो महत इ०। पाहि नो अग्न एनसे स्वाहा। पाहि नो विश्वदेवसे स्वाहा। यज्ञं पाहि विभावसो स्वाहा। सर्वं पाहि शतक्रतो स्वाहा। पुनरूर्जानिवर्तस्व पुनरग्नइहायुषा। पुनर्नः पाह्यंहसः स्वाहा। सहरय्यानिवर्तस्वाग्नेपिन्वस्वधारया। विश्वप्स्निया विश्वतस्परिस्वाहा।' यानन्तर पुन्हा व्यस्त समस्तव्याहृतिमंत्रांनीं दिल्यावर चार व्रतांकरितां गायत्रीमंत्रानें आज्यहोम करावा. गाईच्या किंमतीसाठीं तीन कृच्छ्रांचें दान करून होम शेष पुरा करावा. महानाम्न्यादि व्रतांचा लोप झाला असल्यास, प्रत्येक व्रताबद्दल एकशें आठ, अठ्ठावीस किंवा आठ तुपाच्या आहुतींचें गायत्रीमंत्रानें हवन करून, एकेक कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. येथें प्रायश्चित्तहोमप्रयोग याप्रमाणें संपला.

अथसमावर्तनसंकल्पादिममगृहस्थाश्रमाहतासिद्धिद्वाराश्रीपर० समावर्तनंकरिष्यइति संकल्प्य नान्दीश्राद्धान्तंबटुरेवकुर्यात् ब्रह्मचारीजीवत्पितृकश्चेत्पितुर्मात्राद्युद्देशः ब्रह्मचार्यशक्तश्चेत्पित्रादिस्तत्प्रतिनिधित्वेननान्दीश्राद्धकुर्यात्समावर्तनउपनयनादाविवपित्रादेरेवनान्दीश्राद्धकर्तेतिमतान्तरेणप्रागुक्तम् अवशिष्टप्रयोगः स्वस्वगृह्यानुसारेण दशत्रीन्वाविप्रान् भोजयेत् दास्यन्तिमधुपर्कंयेनतत्रांरजनींवसेत्। ततोव्रतानिसंकल्पयेत् तानिचस्वसूत्रोक्तानिस्मृत्युक्तानिचेतिद्विविधानि। सर्वाण्यपिपुरुषार्थान्येवनतुसमावर्तनाङ्गानि तत्राशक्तः सूत्रोक्तान्यवव्रतानिकुर्यात् शक्तस्तुस्मृत्युक्तान्यपि तानि यथा निमित्तंविनान-

नक्तंस्नास्यामि न नग्नःस्नास्यामि न नग्नःशयिष्ये ननग्नांस्त्रियमीक्षिष्ये-न्यत्रमैथुनात् वर्षतिनधाविष्ये नवृक्षमारोहिष्ये नकूपमवरोहिष्ये न बाहुभ्यां नदींतरिष्यामि न प्राणसंशयमभ्यापत्स्ये इति सूत्रोक्तानि ।

**समावर्तनसंकल्प**—'मम गृहस्थाश्रमार्हतासिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं समावर्तनं करिष्ये' असा संकल्प करून नान्दीश्राद्धापर्यंतचें कर्म बटूनेंच करावें. ब्रह्मचारी दर जीवन्पितृक असेल, तर बापाची आई वगैरेंचा उद्देश करावा. ब्रह्मचारी अशक्त असल्यास त्याच्या बापानें प्रतिनिधिरूपानें नान्दीश्राद्ध करावें. मुंजीप्रमाणें सोडमुंजींतही पित्यानेंच नान्दीश्राद्ध करण्याचें मतान्तर पूर्वी सांगितलेंच आहे. बाकीचा प्रयोग ज्याच्या त्याच्या गृह्यसूत्राप्रमाणें ज्यानें त्यानें करावा. दहा किंवा तीन ब्राह्मणांना जेवण द्यावें. मधुपर्कपूजा करणाऱ्यांच्या घरीं रात्रीं राहावें. त्यानंतर व्रतसंकल्प करावा. आपल्या गृह्यसूत्रांत सांगितलेलीं व स्मृतींत कथन केलेलीं अशीं हीं व्रतें दोन प्रकारचीं आहेत. हीं सर्व व्रतें पुरुषार्थरूप असून, समावर्तनाचीं अङ्गें नाहींत. अशक्तानें त्याच्या गृह्यसूत्रांत सांगितलेलीं तेवढींच व्रतें करावींत व सशक्तानें स्मृतींत सांगितलेलींही जीं करावींत, तीं अशीं:—कारणावांचून मी रात्रीं स्नान करणार नाहीं. मी नागव्यानें अंग धुणार नाहीं. नागव्यानें मी निजणार नाहीं. (स्वस्त्रीच्या) मैथुनावांचून मी अन्य स्त्रीला नागव्यानें पाहणार नाहीं. पाऊस पडत असतां मी पळणार नाहीं, झाडावर चढणार नाहीं, विहिरींत उतरणार नाहीं. हातांनीं नदींत पोहणार नाहीं व प्राणसंशयाचें कृत्य करणार नाहीं. अशीं हीं सूत्रोक्त व्रतें आहेत.

अथ स्मृत्युक्तानि नित्यंयज्ञोपवीतद्वयंधारयिष्ये । सोदककमण्डलुंछत्र-मुष्णीषंपादुके उपानहौसुवर्णकुण्डलेदर्भमुष्टिंचधारयिष्ये कर्तनेनह्रस्वीकृतकेश-श्मश्रुनखःस्याम् निमित्तंविनामुण्डनं न करिष्यइत्यर्थः नसमावृत्तामुण्डे-रन्निति निषेधात् नित्यमध्ययनरतःस्याम् स्वशरीरादुद्धृतंस्वनिर्माल्यंपुष्पचन्द-नादिपुनर्नधारयिष्ये शुक्लाम्बरधरःस्याम् सुगन्धीप्रियदर्शनः स्याम् विभवेस-तिजीर्णवासामलवद्वासाश्चनस्याम् रक्तंवासःशरीरपीडावहंवावस्त्रंनधारयिष्ये गुरुंविनान्यैर्धृतंवस्त्रमलंकारंस्रजंचनधारयिष्ये अशक्तस्तुअन्यधृतमपिवस्त्रादि प्रक्षाल्यधारयेत् अन्यधृतोपवीतमुपानहौचनधारये कन्थांनधारयिष्ये नस्वरूप-मुदकेनिरीक्षिष्ये नभार्ययासाकमेकपात्रेएककालेवाश्नीयाम् एतद्विवाहाभिन्न-विषयम् शूद्रायधर्मज्ञानंनीतिज्ञानंव्रतकल्पंचनोपदिशामि एतत्साक्षादुपदेश-परम् कृत्वाब्राह्मणमग्रतइतिब्राह्मणद्वारकोपदेशेदोषाभावात् गृहमेधिशूद्रा-यस्वोच्छिष्टंनदास्ये उद्धृतोदकेनतिष्ठन्नाचमनंनकरिष्ये जानुमात्रेतदधिकेवाजले-तिष्ठदाचमनेदोषाभावात् अशुचिनाएकहस्तेनवाआनीतजलैर्नाचमिष्ये पादेन-पादधावनंनकरिष्ये अकल्पांस्त्रियंनगमिष्यामि नप्रावृतमस्तकोहनिपर्यटिष्या-मि रात्रौमलमूत्रोत्सर्गेचप्रावृतशिराःस्याम् सोपानत्कोशनाभिवादननमस्का-रान्नकरिष्ये पादेनासनंनापकर्षिष्यामि एवमन्यान्यपिस्मृत्युक्तानिज्ञेयानि एतेषु-

व्रतेषुयानिकर्तुंशक्नुयात्तावन्त्येवसंकल्पयेत् अत्रसंकल्पितव्रतोल्लंघनेमत्याकृतेत्र्यहमभोजनम् अमत्याकृतेएकरात्रमभोजनंप्रायश्चित्तम् अशक्त्यैनेकंवाविप्रंभोजयेत् इतिस्नातकव्रतानि ॥

**स्मृत्युक्त व्रतें**—(मी) नेहमीं दोन जानवीं ठेवीन. पाण्यानें भरलेला कमण्डलु, छत्री, पागोटें, पादुका, जोडा, सुवर्णकुण्डलें व दर्भमुष्टि—हीं धारण करीन. केस, दाढी व नखें कधीं कापणार नाहीं. याचा अर्थ कारणावांचून मुण्डन करणार नाहीं. समावर्तनसंस्कार झालेल्यानें मुण्डन करूं नये असा जो निषेध सांगितला आहे, तें याचें कारण होय. विद्याभ्यासांत नेहमीं मग्न राहीन. स्वतःच्या देहावरून काढलेलीं फुलें, चन्दन वगैरे जीं निर्माल्यवत् (होतात) तीं पुन्हा धारण करणार नाहीं. पांढरें वस्त्र धारण करीन. सुगन्धयुक्त व प्रियदर्शन असा राहीन. ऐपत असतां (मुद्दाम) जीर्ण व मळकीं वस्त्रें धारण करणार नाहीं. तांबडें अथवा शरीराला पीडा करणारें वस्त्र वापरणार नाहीं. गुरूवांचून इतरांनीं वापरलेलीं वस्त्रें, अलंकार, माळा वगैरे वापरणार नाहीं. असमर्थानें दुसऱ्यांनीं धारण केलेलीं वस्त्रादिकें धुवून धारण करावीं. दुसऱ्यानें वापरलेलीं यज्ञोपवीत व जोडा मी वापरणार नाहीं. कन्थेचा (गोधडी) उपयोग करणार नाहीं. पाण्यांत आपलें रूप पाहणार नाहीं. भार्येबरोबर एका पात्रांत किंवा एका वेळीं जेवणार नाहीं. ही गोष्ट विवाहावांचून इतर प्रसंगींची जाणावी. धर्मज्ञान, नीतिज्ञान व व्रतें यांचा उपदेश, शूद्रांना करणार नाहीं. हें वचन समक्ष (साक्षात्) उपदेश करण्याबद्दल आहे. ब्राह्मणाला पुढें करून उपदेश (शूद्राला) करावा, असें वचन असल्यानें ब्राह्मणाला पुढें करून तसें केल्यास दोष नाहीं. गृहस्थाश्रमी शूद्राला आपलें उष्टें देणार नाहीं. शूद्राला होमशेष देणार नाहीं. शेंदून काढलेल्या पाण्यानें उभा राहून आचमन करणार नाहीं. याचें कारण असें कीं गुडघाभर किंवा त्याहून अधिक पाण्यांत उभें राहून आचमन केल्यास दोष नाहीं. अशुद्ध माणसानें आणलेल्या किंवा हातानें आणलेल्या पाण्यानें आचमन करणार नाहीं. पायानें पाय धुणार नाहीं. रोगी स्त्रीशी संबंध करणार नाहीं. दिवसा डोक्याला वस्त्र गुंडाळून भटकणार नाहीं. रात्रीं व मलमूत्रोत्सर्गांच्या वेळीं डोक्याला वस्त्र गुंडाळीन. पायांत जोडा असतांना कांहीं खाणार नाहीं व नामगोत्रोच्चारपूर्वक कोणाला नमस्कार करणार नाहीं. पायानें आसन पुढें ओढणार नाहीं. अशा प्रकारचीं इतरही आणखी वचनें स्मृतींत सांगितलेलीं आहेत. या व्रतांपैकीं जितकीं करणें शक्य असेल तितक्यांचा संकल्प करावा. संकल्पित व्रतांचें बुद्धिपूर्वक उल्लंघन झाल्यास तीन दिवस उपास करावा. आणि अजाणतां झाल्यास एक रात्र उपास करावा, हें याचें प्रायश्चित्त होय. उपास करण्यासारखी प्रकृति नसल्यास एक किंवा तीन ब्राह्मणांना भोजन द्यावें. अशीं हीं स्नातकाचीं व्रतें आहेत.

आतुरदशायांयथोक्तसमावर्तनासंभवेसंक्षेपतस्तत्कार्यम् तत्प्रयोगः संकल्प्यब्रह्मचारिलिङ्गानि मेखलादीनित्यक्त्वावपनंकृत्वातीर्थेस्नात्वावासःपरिधानाच-

मनतिलकधारणानिकृत्वाऽग्निंप्रतिष्ठाप्यतत्रप्रजापतिंमनसाध्यायंस्तूष्णींसमिधमा-दध्यात् अन्यदपिअविरोधितूष्णीमेवकर्तव्यमिति इतिसमावर्तनानुकल्पः ॥

**समावर्तनसंक्षेप**—( ब्रह्मचारी ) आजारामुळें जर सोडमुंज करण्यास असमर्थ असला, तर त्याचें समावर्तन संक्षेपतः करण्याचा प्रयोग येणेंप्रमाणें:—संकल्प केल्यावर मेखलादि जीं ब्रह्मचाऱ्याचीं चिन्हें तीं टाकून वपनानंतर तीर्थस्नान करावें. त्यानंतर वस्त्रधारण, आचमन व तिलकधारण हीं कर्में करून अग्निस्थापना करावी. त्या अग्नीला, मनांत प्रजापतीचें ध्यान करीत मंत्ररहित समिधा द्यावी. इतर जें कर्म विरुद्ध नसेल तेंही मंत्ररहितच करावें. असा हा सोडमुंजीचा अनुकल्प( गौणपक्ष) आहे.

ब्रह्मचर्यदशायांदशाहाशौचहेतुसपिण्डमरणेसमावर्तनोत्तरमुदकदानपूर्वकं त्रिरात्रमतिक्रान्ताशौचंकार्यम् अनुपनीतसपिण्डेमातुलादौचमृतेऽतिक्रान्ता-शौचंन एवंजननाशौचेप्यतिक्रान्ताशौचंन ततश्चदशाहाशौचापादकसपिण्ड-मृतौसमावर्तनोत्तरंत्रिरात्रमध्येविवाहोनकार्यः कस्यचिन्मरणाभावेतुनविवाहे-दोषः ॥

**समावर्तनोत्तर सपिण्डाशौच**—दहा दिवस सुतक धरण्यास योग्य असा सपिण्ड ब्रह्मचर्यावस्थेंत मेल्यास सोडमुंजीनंतर त्याला उदक देऊन त्याचें तीन दिवस अतिक्रान्त अशौच (सुतक) धरावें. सोडमुंज न झालेला सपिण्ड किंवा मामा वगैरे मेलेला असल्यास अतिक्रान्त सुतक धरण्याचें कारण नाहीं. यालाच अनुसरून सोयराचेंही अतिक्रान्त अशौच नाहीं. दहा दिवस सुतक धरण्यास योग्य असणारा सपिण्ड जर मेला असेल, तर समावर्तनानंतर तीन दिवस विवाह करूं नये व कोणीही मेलेला नसल्यास लग्न करण्यास हरकत नाहीं.

इत्थंव्रतान्तकर्माण्यनन्तोपाध्यायसूनुना। निर्णीयश्रीविट्ठलांघ्र्योर्वाग्विलासः समर्पितः

याप्रमाणें म्यां अनन्तोपाध्यायांच्या पुत्रानें व्रतापर्यंतच्या सर्व कर्मांचा निर्णय येथवर सांगण्याचा केलेला जो वाग्विलास, तो श्रीविठ्ठलचरणीं अर्पण केला आहे.

अथ विवाहः । अथश्रीभगवत्पादौपुण्डरीकवरप्रदौ। श्रीगुरूंन्पितरौनत्वा-विवाहंवक्तुमुद्यतः ॥ १ ॥

वरप्रदान देणाऱ्या श्रीभगवन्ताचे चरण, श्रीगुरु व मातापिता यांना वंदन करून आतां मी विवाहनिर्णय सांगण्यास तयार झालों ( आहें ).

उद्वहेत्तद्द्विजोभार्यांसवर्णांलक्षणैर्युताम् । अव्यङ्गाङ्गींसौम्यनाम्नींमृद्वङ्गींच-मनोहराम् २ भाविशुभाशुभज्ञानहेतुलक्षणविचारोऽष्टौमृत्पिंडान्कृत्वेत्यादि-रूपआश्वलायनसूत्रेउक्तः ज्योतिःशास्त्रोक्तराशिनक्षत्रादिघटितविचारोपि-शुभादिज्ञानहेतुः सचसंक्षेपेणोच्यते तत्रमेषादिराशिस्वामिनः भौमःशुक्रोबुध-श्चन्द्रः सूर्यः सौम्योभृगुः कुजः। गुरुःशनैश्वरो मन्दःसुरेज्योराशिपाःस्मृताः १

**विवाहसंस्कार**—द्विजानें आपल्या जातीची, सुलक्षणी, अव्यङ्गाङ्गी, सौम्य नांवाची व सुनूर स्त्री करावी. पुढें होणाऱ्या शुभाशुभ लक्षणांचें जें ज्ञान करून घ्यावें त्याची माहिती आश्वलायनसूत्रांत 'मातीचे आठ पिण्ड करावे' वगैरे सांगितलेली आहे. ज्योतिःशास्त्रांत सांगितलेला राशी, नक्षत्रें वगैरेंचाही विचार शुभाशुभ समजण्यास जो उपयुक्त ( कारण ) आहे, तो येथें संक्षेपानें सांगतों. त्यांतील मेषादि बारा राशींचे स्वामी अनुक्रमें—मङ्गळ, शुक्र, बुध, चन्द्र, सूर्य, बुध, शुक्र, मङ्गळ, गुरु, शनि, शनि आणि गुरु हे होत.

अथग्रहाणांशत्रुमित्रादि रवेर्गुरुभौमचन्द्रामित्राणि शनिशुक्रौशत्रू बुधः समः इन्दोः सूर्यबुधौमित्रेभौमगुरुशुक्रशनयः समाः अस्यशत्रुर्न कुजस्य-बुधोरिपुः सूर्यगुरुचन्द्रामित्राणि शनिशुक्रौसमौ बुधस्यार्कशुक्रौमित्रे चन्द्रो-ऽरिः शनिभौमगुरवःसमाः गुरोःसूर्यभौमचन्द्रामित्राणि शुक्रबुधौशत्रू शनिः-समः शुक्रस्यशनिबुधौमित्रे सूर्यचन्द्रावरी भौमगुरूसमौ शनेःशुक्रबुधौमित्रे कुजसूर्यचन्द्राअरयः गुरुःसमः अत्रगुणविचारः राश्योरेकाधिपत्वेराशिपत्यो-र्मित्रत्वेचपञ्चगुणाः राशिपयोःसमत्वशत्रुत्वेऽर्धोगुणः समत्वमित्रत्वे चत्वारः शत्रुत्वमित्रत्वे एकः द्वयोःसमत्वेत्रयः द्वयोःशत्रुत्वेगुणाभावः ॥

**ग्रहांचे शत्रुमित्र**—सूर्याचे—गुरु मंगळ व चन्द्र हे मित्र होत. शनि व शुक्र हे शत्रु होत. बुध सम. चन्द्राचे—सूर्य व बुध हे मित्र. मंगळ, गुरु, शुक्र व शनि सम. याला शत्रु कोणीही नाहीं. मंगळाचे—बुध शत्रु. सूर्य, गुरु व चन्द्र हे मित्र. शुक्र व शनि सम. बुधाचे— सूर्य व शुक्र हे मित्र. चन्द्र शत्रु. शनि, मंगळ व गुरु हे सम. गुरूचे—सूर्य, मंगळ व चन्द्र हे मित्र. शुक्र व बुध हे शत्रु. शनि सम. शुक्राचे—शनि व बुध हे मित्र. सूर्य व चन्द्र हे शत्रु. मंगळ व गुरु हे सम. शनीचे—शुक्र व बुध हे मित्र. मंगळ रवि आणि चन्द्र हे शत्रु. गुरु सम. आतां यांचा गुणविचार असा आहे कीं—वरवधूंचे राशिस्वामी एक किंवा राशि-स्वामींचें परस्पर मित्रत्व असल्यास पांच गुण. राशिस्वामींचें समत्व व मित्रत्व असतां चार गुण. शत्रुत्व आणि मित्रत्व असतां एक गुण. त्यांचें परस्पर समत्व असतां तीन गुण आणि त्यांचें परस्पर शत्रुत्व असतां शून्य गुण समजावे.

अथगणः पूर्वात्रयोत्तरात्रयभरणीरोहिण्यार्द्रामनुष्यगणः हस्तरेवतीपुनर्वसु-पुष्यस्वाती मृगश्रवणाश्विन्यनुराधादेवगणः कृत्तिकाश्लेषामघाचित्राविशाखा-ज्येष्ठामूलधनिष्ठाशततारका राक्षसगणः गणैक्यंशुभम् देवमनुष्ययोर्मध्यमम् देवरक्षसोर्वैरम् राक्षसमनुष्ययोर्मरणम् अतोमनुष्यराक्षसयोर्विवाहोनकार्यः अत्रगुणाः गणैक्येषड्गुणाः वरोदेवोनृगणाकन्यात्रापिषट् वैपरीत्येपञ्च वरो-राक्षसः कन्यादेवगणाअत्रैकः वैपरीत्येगुणाभावः मनुष्यराक्षसत्वेपिगुणा-भावः ॥

**गणविचार**—पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, भरणी, रोहिणी, व आर्द्रा, हीं ज्यांचीं जन्मनक्षत्रें त्यांचा मनुष्यगण; हस्त, रेवती, पुनर्वसु, पुष्य, स्वाती, मृग, श्रवण, अश्विनी व अनुराधा हीं ज्यांचीं जन्मनक्षत्रें त्यांचा देवगण आणि कृत्तिका, आश्लेषा, मघा, चित्रा, विशाखा, ज्येष्ठा, मूळ, धनिष्ठा व शततारका हीं ज्यांचीं जन्मनक्षत्रें त्यांचा राक्षसगण. वधूवरांचा एकच गण असल्यास शुभ, देवगण व मनुष्यगण असल्यास मध्यम, देवगण व राक्षसगण असल्यास वैर आणि राक्षस व मनुष्यगण असल्यास मरण. एवढ्याच करितां राक्षसगण व मनुष्यगण यांचा विवाह करूं नये. या गणांचे गुण—दोघांचा एकच गण असल्यास सहा गुण, वराचा देव आणि वधूचा मनुष्य असल्यासही सहाच गुण, वराचा मनुष्य व वधूचा देव असल्यास पांच गुण, वराचा राक्षस व वधूचा देव असल्यास एक गुण, वराचा देव आणि वधूचा राक्षस असल्यास शून्य गुण आणि एकाचा मनुष्य व दुसऱ्याचा राक्षस असतांही शून्यच गुण समजावा.

अथराशिकूटम् द्विर्द्वादशकेनिर्धनत्वम् नवपञ्चमत्वेनिःपुत्रता षट्काष्टके-मरणंविपत्तिर्वा उभयसप्तमेतृतीयैकादशेचतुर्थदशमेच शुभम् नक्षत्रैक्येचरणभेदे शुभम् अत्रराश्यैक्येतिशुभम् राशिभेदेपिकूटदोषोन नक्षत्रभेदेराश्यैक्येच शुभम् अत्रनाडीगणादिदोषोन चरणैक्यंषट्काष्टकंचवर्ज्यम् द्विर्द्वादशकेनवपञ्चमेचमध्यमम् शेषेशुभम् अत्रगुणाः सत्कूटेसप्त दुःकूटेग्रहमैत्रीसत्त्वे चत्वारः अन्यथाएकः चरणैक्येगुणाभावः ॥

**राशिकूट**—वराच्या राशीपासून वधूचा राशि अथवा वधूच्या राशीपासून वराचा राशि जर दुसरा किंवा बारावा असेल, तर निर्धनत्व येतें. नववा किंवा पांचवा असतां निपुत्रत्व येतें. सहावा किंवा आठवा असतां मरण अथवा विपत्ति येतात. सातवा, तिसरा, अकरावा किंवा चवथा असतां शुभ. वधूवरांचें एकच नक्षत्र असून भिन्न चरण असल्यास तें शुभ असून, राशिकूट दोष त्यांत नाहीं. नक्षत्र भिन्न असून राशि एकच असल्यास शुभ आणि नाडी व गण यांचा त्यांत दोष नाहीं. नक्षत्रचरण एकच व परस्परांच्या राशीपासून परस्परांचा राशि सहावा किंवा आठवा असतां तें वर्ज्य होय. द्विर्द्वादशक व नवपञ्चक हीं मध्यम होत. बाकी शुभ होय. याचे गुण—सत्कूट असतां सात गुण, दुष्टकूट असून ग्रहमैत्री असल्यास चार गुण, दोहोंतून एक असतां एक गुण आणि नक्षत्रचरण एकच असल्यास शून्य गुण.

अथनाडी अश्विन्यार्द्रापुनर्वसूत्तराफल्गुनीहस्तज्येष्ठामूलशततारापूर्वाभाद्रपदेतिप्रथमनाडी भरणीमृगपुष्यपूर्वाफल्गुनीचित्रानुराधापूर्वाषाढाधनिष्ठोत्तराभाद्रपदेतिमध्यमनाडी कृत्तिकारोहिण्याश्लेषामघास्वातीविशाखोत्तराषाढाश्रवणरेवतीतिचरमनाडी अत्रनाड्यैक्ये मृत्युः नाडीभेदेष्टौगुणाः नाड्यैक्यंसर्वथावर्ज्यम् शूद्रादौपार्श्वैकनाडिद्वयंसंकटे शुभम् अत्रवर्णवश्यभकूटयोनि-

कूटानामल्पगुणत्वात् विवाहविघटकत्वाभावाच्चस्वरूपंनोक्तम् अत्रसर्वगुणमेलनेनविंशतिगुणसंभवेमध्यमम् विंशत्यधिकगुणत्वेऽतिशुभम् विंशत्यूनत्वेत्वशुभम् इतिनक्षत्रादिघटितविचारः ॥

**नाडी**—अश्विनी, आर्द्रा, पुनर्वसु, उत्तराफाल्गुनी, हस्त, ज्येष्ठा, मूळ, शततारका व पूर्वाभाद्रपदा या नक्षत्रांवर जन्म झाल्यास आद्य ( पहिली ) नाडी. भरणी, मृग, पुष्य, पूर्वाफाल्गुनी, चित्रा, अनुराधा, पूर्वाषाढा, धनिष्ठा व उत्तराभाद्रपदा यांवर जन्मणाराची मध्य ( दुसरी ) नाडी. कृत्तिका, रोहिणी, आश्लेषा, मघा, स्वाती, विशाखा, उत्तराषाढा, श्रवण, रेवती यांवर जन्मलेल्याची अन्त्य ( तिसरी ) नाडी. वधूवरांची एक नाडी असतां मृत्यु. भिन्ननाडी असल्यास आठ गुण. एक नाडी सर्वथा वर्ज्य. शूद्रादिकांना पार्श्वनाडी व एकनाडी संकट असल्यास शुभ. वर्णकूट, व वश्यकूट, नक्षत्रकूट व योनिकूट यांचे गुण थोडे आहेत. म्हणून त्यांच्यामुळें विवाहाला बाध येत नाहीं, म्हणून ते येथें सांगितले नाहींत. सर्व मिळून वीस गुण आल्यास मध्यम, विसांपेक्षां अधिक असल्यास अतिशुभ आणि विसांहून कमी असल्यास अशुभ. याप्रमाणें नक्षत्रादिघटित विचार आहे.

अनन्यपूर्विकांकान्तामसपिण्डांयवीयसीम् । अरोगिणींभ्रातृमतीमसमानार्षगोत्रजाम् १ इतियाज्ञवल्क्याद्युक्तकन्याविशेषणेषुकान्तत्वनीरोगत्वभ्रातृमत्वभिन्नविशेषणानामभावेइहपरत्रपातित्यात्तानि प्रपञ्चयन्ते तत्रान्यपूर्विकाः पुरुषान्तरपूर्विकाः मनोदत्तावाचादत्ताग्निंपरिगतासप्तमं पदंनीताभुक्तागृहीतगर्भाप्रसूतेतिसप्तविधपुनर्भ्वस्तद्भिन्नामनन्यपूर्विकाम् सप्तपदीविधेःपूर्वमाद्यानांतिसृणांसंकटेन्येनविवाहोभवति सप्तपदीविधौजातेबलाद्विवाहितापिनान्यत्रदेया असपिण्डां समानःएकःपिण्डःपिण्डदानक्रियामूलपुरुषशरीरंवायस्याः सासपिण्डातद्भिन्नाम् तत्रलेपभाजश्चतुर्थाद्याःपित्राद्याःपिण्डभागिनः । पिण्डदःसप्तमस्तेषां सापिंड्यंसाप्तपौरुषम् १ इतिमात्स्योक्तेरेकस्यांपिण्डदानक्रियायांदातृत्वपिण्डभाक्त्वलेपभाक्त्वान्यतमसंबन्धेनप्रवेशोनिर्वाप्यसापिण्ड्यमितिकेषांचिन्मतम् अत्रस्त्रीणामपिपतिभिः सहकर्तृत्वात्सापिण्ड्यसिद्धिः मूलपुरुषैकशरीरावयवान्वयेनावयवसापिण्ड्यमित्यपरंमतम् यद्यपिभ्रातृपत्नीनांपरस्परंनैतत्संभवतितथाप्याधारत्वनैकशरीरान्वयः एकमूलपुरुषावयवानांपुत्रद्वारातास्वाधानादितिज्ञेयम् उभयत्रापिशयादौमित्रादेरपिपिण्डभाक्त्वादेकशरीरान्वयस्यसप्तमात्परेषुपरश्शतेष्वपिसत्वाच्चातिप्रसंगप्राप्तेःवध्वावरस्यवातातःकूटस्थाद्यदिसप्तमः । पञ्चमी चेत्तयोर्माताततत्सापिंड्यंनिवर्ततेइत्यादिवचनैर्निरासः मातृत्वपितृत्वादिसंबन्धेसत्येवपञ्चमसप्तमपर्यन्तमेवेत्युभयनियमस्वीकारात् तथाचपितृद्वारकसापिंड्यविचारेसप्तमादूर्ध्वंसापिंड्यनिवृत्तिः मातृद्वारकसापिंड्यविचारेतुपञ्चमादूर्ध्वंतन्निवृत्तिरितिनिर्णयः ।

**सापिण्ड्यनिर्णय**––जी दुसऱ्याला आधीं न दिलेली ( अनन्यपूर्विका ) रमणीय, सापिण्ड्य नसलेली, वरापेक्षां वयानें कमी, निरोगी, भाऊ असलेली, निराळ्या गोत्राची व भिन्न प्रवरांची अशी वधू (वरानें) वरावी. याज्ञवल्क्यादिकांनीं लग्न व्हावयाच्या कन्येचीं विशेषणें ( परीक्षा ) सांगितलीं आहेत. यांपैकीं रमणीयत्व, निरोगत्व व भ्रातृयुक्तत्व–या तिहींहून भिन्न जीं विशेषणें सांगितलीं त्यांचा जर अभाव असेल, तर इहपरलोकीं पातित्य प्राप्त होतें. म्हणून या बाबतींत विशेष विस्तारानें माहिती सांगतों ती पुढीलप्रमाणें:—अनन्यपूर्विका म्हणजे आधीं दुसऱ्या कोणाशीं लग्न न लाविलेल्या कुमारिका. मनानें दिलेली, वाचेनें दिलेली, विवाहहोमापर्यंतचे संस्कार झालेली, सप्तपदी झालेली, उपभोग घेतलेली, गर्भधारण झालेली व मूल झालेली–अशा सात प्रकारच्या ज्या वधू त्य पुनर्भू समजाव्या. यांहून जी विरहित ती अनन्यपूर्विका होय. यांतील ज्या पहिल्या तीन सप्तपदीच्या पूर्वीच्या, त्यांचा विवाह संकटकालीं दुसऱ्या पुरुषाशीं होतो. सप्तपदीविधि झाल्यावर–तो विवाह जरी बलात्कारानें झालेला असला तरी–ती वधू दुसऱ्या पुरुषाला देऊं नये. ( २ ) असपिण्डा म्हणजे पिण्डदानक्रिया अथवा मूळपुरुषसंबंध जिचा नाहीं ती. बाप, आजा व पणजा हे पुरुष पिण्डभागी आणि प्रपितामहाच्या मागचे तीन पुरुष लेपभागी होत. या सर्वांना पिण्ड देणारा पुरुष सातवा आहे; यास्तव सात पुरुषांपर्यंत सापिण्ड्य होतें–असें मत्स्यपुराणांत वचन आहे; म्हणून एका पिण्डदानाच्या क्रियेंत–दातृत्व, पिण्डभाक्त्व, आणि लेपभाक्त्व यांपैकीं कोणच्याही प्रकारच्या संबंधानें होणारा जो प्रवेश त्याचें नांव निर्वाण्यसापिण्ड्य असें कांहीं ग्रंथकारांचें मत आहे. अशा बाबतींत नवऱ्यांसह त्यांच्या बायकांकडेही कर्तृत्व येत असल्यानें त्यांचीही सापिण्ड्यसिद्धि होते. मूळपुरुषाच्या एकशरीरसंबंधांत अवयवसंबंध असल्यानें त्यांचें सापिण्ड्य सिद्ध होतें, असें दुसरें मत आहे. भावांच्या बायकांचें हें सापिण्ड्य जरी संभवत नाहीं, तरी आधारत्वानें एकशरीरसंबंध होत असल्यानें एका मूळपुरुषाच्या अवयवांचें पुत्राच्या द्वारानें त्यांच्यांत आधान ( एकजीवत्व ) होतें. या दोन्ही सापिण्ड्यलक्षणांत गयादि श्राद्धांत मित्रादिकांनासुद्धां पिण्ड मिळत असल्यानें आणि एकशरीराचा संबंध सातांपेक्षां जास्त अशा शेंकडों पुरुषांपर्यंत ( टिकत ) असतो म्हणून, त्यांनाही सापिण्ड्य प्राप्त होण्याची दुरवस्था उत्पन्न होते; यास्तव–वधू किंवा वर यांचा पिता जर कूटस्थ पुरुषापासून सातवा असेल आणि त्यांची माता जर पांचवी असेल, तर सापिण्ड्यनिवृत्ति होते–अशीं जीं वचनें आहेत त्यांनीं त्यांचा निरास होतो. याचें कारण असें कीं, आईपणा, बापपणा वगैरे संबंध असतां पांचवी माता व सातवा पिता यांच्यापर्यंत सापिण्ड्याविषयीं जो दोन नियमांचा अंगिकार केला आहे, त्यावरून पित्याकडून जर सापिण्ड्याचा विचार केला, तर सात पुरुषांनंतर सापिण्ड्याची निवृत्ति ( नाहींसेंपणा ) होते आणि मातेच्या बाजूनें जर सापिण्ड्याचा विचार केला, तर पांचव्यानंतर सापिण्ड्याचा नाहींसेंपणा होतो असा निर्णय समजावा.

## अत्रोदाहरणानि

| विष्णुर्मूलभूतः | विष्णुर्मूलभूतः | विष्णुर्मूलभूतः | विष्णुर्मूलभूतः |
|---|---|---|---|
| कान्तिः२ गौरी २ | दत्तः २ चैत्रः २ | दत्तः २ चैत्रः २ | दत्तः २ चैत्रः २ |
| सुधीः ३ हरः ३ | सोमः ३ मैत्रः ३ | सोमः ३ मैत्रः ३ | सोमः ३ मैत्रः ३ |
| बुधः ४ मैत्रः ४ | सुधीः ४ बुधः ४ | सुधीः ४ बुधः ४ | सुधीः ४ बुधः ४ |
| चैत्रः ५ शिवः ५ | श्यामा ५ नर्मदा ५ | श्यामा ५ रतिः ५ | श्यामा ५ शिवः ५ |
| गणः ६ भूपः ६ | शिवः ६ कामः ६ | शिवः ६ गौरी ६ | कान्तिः ६ हरः ६ |
| मृडः ७ अच्युतः७ | रमा ७ कविः ७ | अत्रगौरीशिवयोः षष्ठयोर्विवाहःमातृद्वारकत्वात् | अत्रकान्तिहरयोर्नविवाहः एकतोनिवृत्तावपिअन्यतोऽनुवृत्तेः |
| रतिः ८ कामः ८ | अत्ररमाकव्योर्नविवाहः मण्डूकप्लुत्या सापिण्ड्यानुवृत्तेः | | |
| अत्ररतिकामयोरष्टमयोर्विवाहः—पितृद्वारकत्वात् | | | |

## याविषयीं उदाहरणें.

| विष्णु मूळ पुरुष. | विष्णु मूळ पुरुष. | विष्णु मूळ पुरुष. | विष्णु मूळ पुरुष. |
|---|---|---|---|
| कान्ति २ गौरी २ | दत्त २ चैत्र २ | दत्त २ चैत्र २ | दत्त २ चैत्र २ |
| सुधी ३ हर ३ | सोम ३ मैत्र ३ | सोम ३ मैत्र ३ | सोम ३ मैत्र ३ |
| बुध ४ मैत्र ४ | सुधी ४ बुध ४ | सुधी ४ बुध ४ | सुधी ४ बुध ४ |
| चैत्र ५ शिव ५ | श्यामा ५ रति ५ | श्यामा ५ नर्मदा ५ | श्यामा ५ शिव ५ |
| गण ६ भूप ६ | शिव ६ गौरी ६ | शिव ६ काम ६ | कांति ६ हर ६ |
| मृड ७ अच्युत ७ | या ठिकाणीं शिव व गौरी यांचा विवाह होतो; कारण मातेकडून दोघें सहावीं होतात. | रमा ७ कवि ७ | या ठिकाणीं कांति व हर यांचा विवाह होत नाहीं, कारण एकीकडून सापिंड्यनिवृत्ति झाली तरी दुसरीकडे सापिंड्य रहातें. |
| रति ८ काम ८ | | या ठिकाणीं रमा व कवि यांचा विवाह होत नाहीं; कारण मंडूकप्लुतीनें सापिंड्य येतें. | |
| या ठिकाणीं रति व काम यांचा विवाह होतो; कारण पित्याकडून दोघें आठवीं होतात. | | | |

विष्णोर्मूलात्कान्तिगौर्यौजातौताभ्यांसुधीहरौ । बुधमैत्रौचैत्रशिवौगणभूपौ-मृडाच्युतौ १ तज्जातयोरष्टमयोर्विवाहोरतिकामयोः । विष्णोर्मूलाद्दत्तचैत्रौ-सोममैत्रौसुधीबुधौ २ ताभ्यांश्यामारतीतज्जाशिवगौर्योःकरग्रहः । विष्णोर्मूला-द्दत्तचैत्रौसोममैत्रौसुधीबुधौ ३ ताभ्यांश्यामानर्मदाचशिवकामौरमाकवी । मण्डूकप्लुतिसापिड्यंरमाकव्योर्विवाहहृत् ३ विष्णोर्मूलाद्दत्तचैत्रौसोममैत्रौ-सुधीबुधौ । श्यामाशिवौकान्तिहरौहरकान्तीनदंपती ५ निवृत्तमप्येकतस्तद-न्यतस्त्वनुवर्तते । दिङ्मात्रेणोदाहृतात्रसेयंसापिंड्यपद्धतिः ६

(१) मूळ पुरुष विष्णु, त्याच्या कन्या दोन-कांति आणि गौरी. कांतीचा पुत्र सुधा, सुधीचा पुत्र बुध, बुधाचा पुत्र चैत्र, चैत्राचा पुत्र गण, गणाचा पुत्र मृड आणि मृडाची कन्या जी रति, ती मूळ पुरुषापासून आठवी होते. दुसरी कन्या गौरी तिचा पुत्र हर, हराचा पुत्र मैत्र, मैत्राचा पुत्र शिव, शिवाचा पूत्र भूप, भूपाचा पुत्र अच्युत व अच्युताचा पुत्र जो काम, तो मूळ पुरुषापासून आठवा होतो, म्हणूनच रति व काम यांचा विवाह होतो.

(२) मूळ पुरुष विष्णु, त्याचे पुत्र दोन-दत्त आणि चैत्र. दत्ताचा पुत्र सोम, सोमाचा पुत्र सुधी, सुधीची कन्या श्यामा आणि श्यामेचा पुत्र जो शिव, तो मूळ पुरुषापासून सहावा होतो. दुसरा पुत्र चैत्र, त्याचा पुत्र मैत्र, मैत्राचा पुत्र बुध, बुधाची कन्या रति व रतीची कन्या जी गौरी ती मूळपुरुषापासून सहावी होते म्हणून त्यांचा विवाह होतो.

(३) मूळ पुरुष विष्णु, त्याचे पुत्र दोन-दत्त आणि चैत्र. दत्ताचा पुत्र सोम, सोमाचा पुत्र सुधी, सुधीची कन्या श्यामा, श्यामेचा पुत्र शिव आणि शिवाची कन्या जी रमा ती मूळ पुरुषापासून सातवी होते. दुसरा पुत्र चैत्र, त्याचा पुत्र मैत्र, मैत्राचा पुत्र बुध, बुधाची कन्या नर्मदा, नर्मदेचा पुत्र काम आणि कामाचा पुत्र जो कवि, तो मूळ पुरुषापासून सातवा होतो. यांत रमा व कवि यांच्यामध्यें मंडूकप्लुतीनें सापिंड्य येतें म्हणून, रमा व कवि यांचा विवाह होत नाहीं.

(४) मूळ पुरुष विष्णु. त्याचे पुत्र दोन-दत्त आणि चैत्र. दत्ताचा पुत्र सोम, सोमाचा पुत्र सुधी, सुधीची कन्या श्यामा आणि श्यामेची कन्या जी कान्ति, ती मूळ पुरुषापासून सहावी होते. दुसरा पुत्र चैत्र. त्याचा पुत्र मैत्र, मैत्राचा पुत्र बुध, बुधाचा पुत्र शिव आणि शिवाचा पुत्र जो हर तो मूळपुरुषापासून सहावा होतो. या ठिकाणीं कांतीच्या सापिंड्याची जरी निवृत्ति झालेली आहे, तरी हराचें सापिण्डय कायम आहे, म्हणून कांति व हर यांमध्यें विवाह होत नाहीं. याप्रमाणें येथें सापिंडयपद्धतीचें दिग्दर्शन मात्र केलें आहे.

कूटस्थात्पंचम्योःकन्ययोःसंततौमातृद्वारकत्वात्सापिंडयनिवृत्तिः पंचम्योःकन्ययोर्यौपुत्रौतयोःसंततौपितृद्वारकत्वात्सापिंडयमनुवर्ततइतीदंमण्डूकप्लुतिसापिण्डयम् ।

**मण्डूकप्लुतिसापिण्डय**—मूळ पुरुषापासूनच्या ज्या पांचव्या दोघी कन्या, त्यांचें सापिण्डय मातेकडून असतें, म्हणून त्यांच्या संततीसंबंधानें सापिण्डयनिवृत्ति आहे. पांचव्या कन्यांच्या संततीसंबंधानें सापिण्डय पित्याकडून प्राप्त असल्यानें, त्या सापिण्डयाची निवृत्ति होत नाहीं. याला मण्डूकप्लुतिसापिण्डय असें म्हणतात.

पंचम्याःकन्यायाःपुत्रस्यषष्ठस्यकूटस्थात्पञ्चमादिःसपिण्डोनभवतितथापि द्वितीयसंततिपंक्तौपञ्चमषष्ठादेःपितृद्वारकत्वादिनासापिण्डयसत्वादेकतोनिवृ-

त्तावप्यन्यतोनुवृत्त्यापञ्चमषष्टादिनापञ्चम्याःकन्यायाःसंततिर्नविवाह्याएवंकूट-स्थमारभ्याष्टमादेःकूटस्थमारभ्यद्वितीयादेश्चैकतोनिवृत्तिपरतोनुवृत्त्योःसत्त्वमु-ह्यम् एवमाशौचविषयकसापिण्ड्येपिएकतोनुवृत्त्यादिकंयथासंभवंसर्वमूह्यम् ।

**सापिंड्य व सापिंड्यनिवृत्ति**—मूळ पुरुषापासूनच्या पांचव्या कन्येचा पुत्र सहावा पुरुष होतो, म्हणून त्याचा मूळ पुरुषापासून पांचवा पुरुष जरी सपिण्ड होत नाहीं, तरी दुसऱ्या संततीच्या रांगेंत, पांचव्या, सहाव्या वगैरे पुरुषांचें पित्याच्या बाजूनें सापिण्ड्य आहे. याचा अर्थ असा कीं, एका ओळींत जरी सापिण्ड्य नसलें, तरी दुसऱ्या ओळींत असल्यानें, पांचव्या, सहाव्या वगैरे पुरुषानें पांचव्या कन्येच्या संततीशीं विवाहसंबंध करूं नये. याप्रमाणें मूळपुरुषापासून आठवा पुरुष आणि मूळपुरुषापासून दुसरा व तिसरा यांना एकीकडून सापिण्ड्यनिवृत्ति असते व दुसरीकडून सापिण्ड्य असतें असें समजावें. अशौचविषयक सापिण्ड्यासंबंधानेंही याचप्रमाणें एकीकडून सापिण्ड्य व दुसरीकडून सापिण्ड्यनिवृत्ति वगैरे जसें असेल तसें समजावें.

एवंपितृद्वारकसापिंड्यंसप्तमादूर्ध्वंनिवर्ततेमातृद्वारकंतुपञ्चमादूर्ध्वमितिमुख्य-कल्पेनवर्जनीयानांकन्यानांसंख्याचेत्थंसंपद्यते पितृकुलेषोडशाधिकद्विसाहस्री २०१६ मातृकुलेपञ्चोत्तरशतम् १०५ कुलद्वयेमेलनेनैकविंशत्युत्तरशताधिक-सहस्रद्वयसंख्या २१२१ कन्यावर्ज्याःसंपद्यन्ते अत्रगणनाप्रकारस्तत्रमूलश्लोका-स्तद्व्याख्याचकौस्तुभेस्पष्टाः बालानांदुर्बोधतयानेहोच्यते तथाचमुख्यकल्पेन-कुलद्वयेएतावत्याःवर्जनीयाएव नन्वनुकल्पानुसरणेनसप्तमात्पञ्चमादर्वाग्वि-वाहः कार्यः पञ्चमेसप्तमेचैवयेषांवैवाहिकीक्रिया । क्रियापराअपिहितेपतिताः शूद्रतांगताः १ सप्तमात्पञ्चमाद्वीमान्यःकन्यामुद्वहेद्द्विजः । गुरुतल्पीसविज्ञेयः सगोत्रांचैवमुद्वहन् २ इत्यादिस्मृतिभ्याः यानितु चतुर्थीमुद्वहेत्कन्यांचतुर्थः-पञ्चमोवरः तृतीयांवाचतुर्थींवापक्षयोरुभयोरपि १ इत्यादिवचनानितेषुकानि-चिन्निर्मूलानिकानिचिद्दत्तकसापत्न्यादिसंबन्धविषयतया विप्राणांक्षत्रियादि-षुसापिण्ड्यविषयतयावानेयानिइतिनिर्णयसिन्धुमतम् कौस्तुभेतु उद्वहेत्सप्तमा-दूर्ध्वंतदभावेतुसप्तमीम् । पञ्चमींतदभावेतुपितृपक्षेप्ययंविधिः १ ।

**विवाहवर्ज्यकन्या**—पित्याकडून मूळपुरुषापासून सातव्या पुरुषानन्तर सापिण्ड्य नाहींसें होतें व मातेकडून मूळपुरुषापासून पांचव्या पुरुषा-नन्तर सापिंड्य संपतें; यास्तव विवाहाला अयोग्य अशा कन्यांची मुख्यपक्षानें जी संख्या होते, ती अशीः-बापाच्या कुळांत २०१६ आणि आईच्या कुळांत १०५, मिळून दोन्ही कुळांतल्या २१२१ कन्या विवाहाला वर्ज्य कराव्या. हा संख्या गण-ण्याचा प्रकार, त्याचे मूळचे श्लोक व त्यांच्या व्याख्या–हें सर्व कौस्तुभांत जें स्पष्ट करून सांगितलेलें आहे, तें सर्व संस्कृत न समजणाऱ्यांना ( अज्ञजनांना ) सम-जण्यास अवघड असल्यानें येथें सांगितलें नाहीं. तरी पण त्यावरूनच दोन्ही कुळें मिळून २१२१ कन्या विवाहाला वर्ज्य कराव्या हा पक्ष मुख्य ठरला. असें जरी आहे,

तरी अनुकल्पाचें (गौण) निमित्त करून सातव्या व पांचव्या पुरुषाचे आंत विवाह-संबंध करूं नये. पांचव्या व सातव्या सापिण्ड्याशीं ज्यांचा विवाहसंबंध घडतो ते जरी क्रियातत्पर ( शहाणे ) असले, तरी पतित होऊन शूद्रासमान होतात. सातवा व पांचवा यांच्या आंतल्या आणि सगोत्र अशा मुलीशीं जो द्विज लग्न लावतो, तो गुरुपत्नीशीं गमन करणारा जाणावा, अशा प्रकारचीं स्मृतिवाक्यें आहेत. चौथ्या वरानें चौथी कन्या करावी आणि पांचव्या वरानें चौथी किंवा तिसरी कन्या करावी; याप्रमाणें ( पितृ व मातृ ) या दोन्ही पक्षांत समजावें, वगैरे जीं वचनें आहेत, त्यांपैकीं कांहींना मुळांत आधार नाहीं व कांहीं दत्तक व सावत्र यांच्यासंबंधानें ब्राह्मणांनीं योजावींत, किंवा क्षत्रियांनीं सापिंड्याविषयीं योजावींत, असें निर्णयसिन्धूचें मत आहे. याबद्दल कौस्तुभांत असें एक वचन आहे कीं, सातव्या पुरुषानन्तरची कन्या करावी, तिच्या अभावीं सातवी करावी आणि तिच्याही अभावीं पांचवी करावी व हा विधि मातृपक्ष आणि पितृपक्ष या दोहोंसंबंधानें जाणावा.

सप्तमींचतथाषष्ठींपञ्चमींचतथैवच। एवमुद्वाहयेत्कन्यांनदोषः शाकटायनः २ तृतीयांवाचतुर्थींवापक्षयोरुभयोरपि। विवाहयेन्मनुः प्राहपाराशर्योयमोऽङ्गिराः ३ यस्तुदेशानुरूप्येणकुलमार्गेणचोद्वहेत्। नित्यंसव्यवहार्यःस्याद्वेदाच्चैतत्प्रतीयते ४ इत्यादिवचनानांचतुर्विंशतिमतषट्त्रिंशन्मतादिषूपलभ्यमानत्वात्सापिंड्यसंकोचेनविवाहस्यबहुदेशेषुदर्शनाच्चयेषांकुलेदेशेचानुकल्पत्वेनसापिण्ड्यसंकोचः परंपरयासमागतस्तषां सापिण्ड्यसंकोचेन विवाहोनदोषाय स्वकुलदेशविरुद्धेनसापिण्ड्यसंकोचेनविवाहेदोषोभवत्येव जनपदधर्मा ग्रामधर्माश्चतान्विवाहेप्रतीयात् येनास्यपितरोयातायेनयाताः पितामहाः। तेनयायात्सतां मार्गंतेनगच्छन्नदुष्यति १ इत्यादिवाक्यैः स्वकुलदेशाचाराविरुद्धस्यैवशास्त्रस्यविवाहेनुसर्तव्यत्वात् एवंमातुलकन्यापरिणयनेपि तृप्तांजह्रुर्मातुलस्येवयोषाभागस्तेपैतृष्वसेयीवपामिवेतिमन्त्रलिङ्गैर्मातुलस्यसुतामूढामातृगोत्रांतथैव च। समानप्रवरांचैवत्यक्त्वाचान्द्रायणंचरेत् १ इत्यादिस्मृतीनांबाधात्येषांकुलेमातुलकन्यापरिणयःपरंपराप्राप्तस्तैःसकार्यः गोत्रान्मातुःसपिण्डाच्चविवाहोगोवधस्तथाइतिमातुलकन्याविवाहस्यकलिवर्ज्येत्ववचनमपियेषांकुलेदेशमातुलकन्याविवाहोनास्तितत्परम् मातुलकन्यापरिणयनस्यानेकश्रुतिस्मृतिसिद्धत्वात् अतएवमातुलकन्योद्वाहिनांश्राद्धेनिमंत्रणनिषेधोपिस्वकुलाचारादिविरोधेनतदुद्वाहिपरः उक्तविधसापिण्ड्यसंकोचेनविवाहंकुर्वताशिष्टैः श्राद्धादौभोजनाद्याचारादित्यादिबहूपपादितम् परंतुसापिंड्यसंकोचस्वीकारेपिकतिथीकन्याकथितेनपुरुषेणविवाह्याकतिथेननविवाह्येतिव्यवस्थानोपपादिता॥

**सापिण्ड्यसंकोचविचार**—शाकटायनाचें असें म्हणणें आहे कीं, सहावी, सातवी आणि पांचवी कन्या वरण्यांत दोष नाहीं. मनु, पाराशर, यम व अंगिरा हे असें सांगतात कीं, दोन्ही पक्षांत तिसरी किंवा

चौथी कन्या वरावी. या बाबतींत वेदांत असें सांगितलें आहे कीं, जो पुरुष देशाचार व कुलाचार यांना अनुसरून विवाह करतो, तो नित्यव्यवहाराला योग्य होतो. असल्या प्रकारचीं वचनें चतुर्विंशतिमत, षट्त्रिंशम्मत वगैरे ग्रंथांत जशीं सांपडतात, तद्वतच सापिंडयाचा संकोच करून विवाह केलेलेही अनेक प्रांतांत आढळतात; म्हणून, ज्यांच्या कुळांत गौणपक्षाच्या ( अनुकल्प ) आधारावर सापिण्डयाचा संकोच करण्याची चाल परम्परेनें आलेली असेल, त्यांचा झालेला सापिंडय-संकोच विवाह दोषास्पद होत नाहीं. आपलें कुल व आपला देश यांच्या ( वहिवाटी ) विरुद्ध, सापिण्डयाचा संकोच करून केलेला विवाह दोषास्पद होतो. देशाचार व ग्रामाचार विवाहांत पाळावेत--ज्या मार्गानें बाप, आजा वगैरे गेले त्याच मार्गानें जाणें हें सज्जनांना योग्य असल्यानें त्यांत त्यांना दोष नाहीं--वगैरे वचनांवरून आपलें कुल व आपला देश यांच्या आचाराला शोभेल ( अविरुद्ध ) असेंच शास्त्र विवाहसंबंधानें आचरावें. मामाच्या मुलीशीं लग्न करण्यासंबंधानेंही हेंच ध्यानांत ठेवावें. वपा ही इन्द्राचा भाग असल्यानें यज्ञांत ऋत्विज जसे तिचें हवन करतात, तद्वत् मातुलकन्या व आतेबहीण या भागरूप असल्यानें त्यांचेंही ग्रहण करतात--यामंत्राप्रमाणें मामेबहीण, मातेच्या गोत्रांतली कन्या अथवा समान प्रवराची कन्या--यांपैकीं कोणचीशींही जरी विवाह झाला, तरी तिचा त्याग करून, चान्द्रायण प्रायश्चित्त करावें--अशा प्रकारचीं स्मृतिवचनें तसा विवाहसंबंध करण्याच्या कामीं बाधक आहेत, म्हणून, ज्यांच्या कुळांत मातुलकन्येशीं विवाह करण्याची वहिवाट असेल त्यांनीं तो करावा. मातृगोत्र व सपिंड यांच्याशीं विवाह आणि गोवध--हीं कलियुगांत वर्ज्य करण्याबद्दलचें जें वचन आहे, तें सुद्धां--ज्यांचा कुलाचार व देशाचार मातुलकन्येशीं विवाह करण्याचा असेल, त्यांच्यासंबंधानें नाहीं असें समजावें; कारण अनेक श्रुतिस्मृतिवचनांवरून मातुलकन्येशीं विवाह करावा असें सिद्ध होत असल्यानें, मामेबहिणीशीं लग्न करणारांना श्राद्धांत बोलावूं नये असा जो निषेध सांगितला आहे, तो सुद्धां तसा कुलाचार नसता तरच विवाह करणारांविषयीं आहे असें समजावें. वर सांगितल्याप्रमाणें सापिण्डयाचा संकोच करून विवाह करणारांना शिष्टजन श्राद्धादिकांत जेवायला बोलावतात. वगैरे जरी बरेंच सांगितलें आहे, तरी त्या ठिकाणीं सापिंडयाचा संकोच केला असतांही कितवी कन्या कितव्या पुरुषानें वरावी वगैरेबद्दलची कांहींच व्यवस्था सांगितलेली नाहीं.

सापिण्ड्यदीपिकाकारादयोर्वाचीनास्तु चतुर्थीमुद्वहेत्कन्यांचतुर्थः पञ्चमोवरः । पाराशरमतेषष्ठींपञ्चमोनतुपञ्चमीम् १ इत्यादिवचनानांसमूलत्वंनिश्चित्यअशक्तैःसंकटेसमाश्रयणीयस्यसापिण्डयसंकोचस्यव्यवस्थामूचुः तथाहि चतुर्थीकन्यापितृपक्षेमातृपक्षेचचतुर्थेनपञ्चमेनवापुंसाविवाह्या द्वितीयतृतीयषष्ठाद्यैश्चतुर्थीनोद्वाह्या पराशरमतेपञ्चमः षष्ठीमुद्वहेत् द्वितीयतृतीयचतुर्थादिः षष्ठींनोद्वहेत् पञ्चमःपञ्चमींनोद्वहेत् मातृतःपितृतश्चापिषष्ठः षष्ठींसमुद्वहेत इतिवचनान्तरात्षष्ठेनापिषष्ठीविवाह्या पञ्चमषष्ठाभ्यांषष्ठीनविवाह्येतिपर्यव-

सन्नम् तथापितृपक्षेसप्तमीमातृपक्षेपञ्चमींचतृतीयाद्यैःसर्वैःपरिणेया पितृपक्षा-च्चसप्तमीमातृपक्षात्तुपञ्चमीमिति व्यासवचनात् । उद्वहेत्सप्तमादूर्ध्वंतदभावेतु-सप्तमीम् । पञ्चमींतदभावेतुपितृपक्षप्येयंविधिः इतिचतुर्विंशतिमतोक्तेश्चपितृ-पक्षेपिपञ्चमीतृतीयाद्यैःपरिणेया तत्रापि मातृपक्षेपितृपक्षेपिपञ्चमेनपञ्चमीनो-द्वाह्या पञ्चमोनतुपञ्चमींमितिसर्वत्रनिषेधात् तृतीयांवाचतुर्थींवापक्षयोरुभयो-रपीतिवचनात्तुतृतीयाविवाह्याप्राप्नोतितत्रव्यवस्थोच्यते मातृपक्षेतावत्तृतीयामा-तुलकन्यामातृष्वसृकन्यावासंभवति पितृपक्षेतुतृतीयापितृव्यकन्यापितृष्वसृ-कन्यावा तत्रपितृव्यकन्यासगोत्रत्वात्त्याज्या पैतृष्वसेयींभगिनींस्वस्रीयांमातुरे-वच एतास्तिस्रस्तुभार्यार्थेनोपयच्छेत्तुबुद्धिमान् १ इतिमनूक्तेः पितृष्वसृमातृ-ष्वसृकन्येअपित्याज्ये पितृष्वसृकन्यांमातुर्भगिनींमातृष्वसारं मातुःस्वस्रीयां-मातृष्वसृकन्यामेतास्तिस्रोनोद्वहेदितितदर्थात् मातुलकन्यैवतृतीयापूर्वोक्तरीत्या कुलपरंपरागतत्वेपरिणेया एवंचतृतीयापितृतीयेनैवमातुलकन्यैवपरिणेयानच-तुर्थादिनाकेचापि केचित्संकटेपितृष्वसृकन्यापरिणयनमाहुः तत्रदेशकुलाचारा-द्व्यवस्थाज्ञातव्या अत्रायं सापिण्ड्यदीपिकादिसिद्धार्थसंग्रहः तृतीयामातुल-कन्यैवोद्वाह्या चतुर्थींचतुर्थपञ्चमाभ्यामेवपञ्चमीपञ्चमभिन्नैस्तृतीयाद्यैःसप्तमा-न्तैः षष्ठीपञ्चमषष्ठाभ्यामेव सप्तमीतृतीयाद्यैः सप्तमान्तैरिति अयंसापिण्ड्य-संकोचेनविवाहःसंकटेष्वशक्तेनकार्यः कन्यान्तरलाभेशक्तैर्नकार्यः गुरुतल्पा-दिदोषस्मृतेः सापिंड्यसंकोचवाक्यानामशक्तविषयत्वस्यस्पष्टत्वात् प्रभुःप्रथ-मकल्पस्ययोनुकल्पेनवर्तते । सनाप्नोतिफलंचेहेतिशक्तैरनुकल्पस्वीकारेदोषोक्तेः दत्तकसापिंड्यंदत्तकनिर्णयेप्रागेवोक्तम् ।

**सापिण्ड्यकन्याविवाहविचार**—सापिंड्यदीपिकाकारादि अर्वाचीन ग्रन्थकारांच्या मतें चौथ्या किंवा पांचव्या पुरुषानें चौथी कन्या करावी व पराशरांच्या मतें सहावी करावी, पांचव्या पुरुषानें पांचवी कन्या करूं नये, इत्यादि जीं वचनें तीं आधारभूत असल्याचा निश्चय करून, अशक्तांनीं संकटकालीं अंगिकार करण्यास योग्य असलेली जी सापिण्ड्यसंकोच व्यवस्था (अमलांत आणण्यास) सांगतात, ती येणेंप्रमाणेः—पितृपक्ष व मातृपक्ष या दोन्ही पक्षीं चौथ्या किंवा पांचव्या पुरुषानें चौथी कन्या करावी. दुसरा, तिसरा, सहावा वगैरेंनीं चौथी कन्या वरूं नये. पराशरांच्या मतें पांचव्या पुरुषानें सहावी कन्या करावी. दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या वगैरे पुरुषानें सहावी कन्या वरूं नये. पांचव्यानें पांचवी वरूं नये. मातृपक्षीं किंवा पितृपक्षीं सहाव्या पुरुषानें सहावी कन्या वरावी, असें दुसरें वचन आहे, यास्तव सहाव्यानें सहावी वरावी, म्हणजे पांचव्या व सहाव्या-वांचून इतर पुरुषानें सहावी कन्या वरूं नये असा याचा अर्थ आहे. याचप्रमाणें पितृपक्षांतली सातवी व मातृपक्षांतली पांचवी किंवा तिसरी ह्या सर्वांनीं वराव्या; कारण, पितृपक्षाकडून सातवी आणि मातृपक्षाकडून पांचवी कन्या वरावी, असें व्यासांचें वचन आहे. सातवीच्या नंतरची कन्या करावी, तिच्या अभावीं सातवी

किंवा तिच्याही अभावीं पांचवी कन्या वरावी आणि पितृपक्षासंबंधानेंही हाच विधि समजावा—असें चतुर्विंशतिकाराचें वचन आहे; यास्तव, पितृपक्षामधल्या तिसऱ्या पुरुषानें पांचवी कन्या वरावी असें जरी होतें, तरी येथेंही या दोन्ही पक्षांतल्या पांचव्या पुरुषानें पांचवी कन्या वरूं नये; कारण, पांचव्या पुरुषानें पांचवी कन्या वरूं नये, असा निषेध सर्वत्र सांगितलेला आहे. दोन्ही पक्षांत तिसरी किंवा चौथी कन्या वरावी—असें जें वचन आहे, त्यावरून तिसरीशीं विवाह करावा असें जें ठरतें त्या बाबतींतली व्यवस्था आतां सांगतों ती अशी:— मातृपक्षांतली तिसरी म्हणजे जी मामाची मुलगी अथवा मावशीची मुलगी याच संभवतात. त्यांत चुलत्याची कन्या सगोत्र म्हणून त्याज्य होय. पित्याच्या बहिणीची कन्या व मातेच्या बहिणीची कन्या याही त्याज्यच होत; कारण पित्याच्या बहिणीची कन्या, मातेची बहीण व तिची कन्या या तिघींशीं बुद्धिवानानें विवाह करूं नये असें मनूचें वचन आहे. बापाच्या बहिणीची मुलगी आईची बहीण ( मातृष्वसा ) आणि आईच्या बहिणीची मुलगी ( मातृष्वस्रीया ) या तिहींशीं लग्न करूं नये, असा या वाक्याचा अर्थ होतो. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें कुलपरम्परेचा जसा आचार असेल त्याप्रमाणें मामाची मुलगी हीच जी तिसरी तीच वरावी. याप्रमाणें तिसरी कन्या जी मामेबहीण ती तिसऱ्याच पुरुषानें वरावी, चौथ्या वगैरे कोणीं करूं नये. संकटच असेल तर बापाच्या बहिणीच्या मुलीशीं लग्न करावें, असें कोणी ग्रंथकार सांगतात. या बाबतींत देशाचार व कुलाचार यांच्या परंपरेप्रमाणें व्यवस्था करावी. येथें हा सापिंडयदीपिका वगैरे ग्रन्थकर्त्यांनीं सिद्ध केलेला आधार सांगितला. तिसरी मामाची मुलगी वरावी. चौथी चौथ्या अथवा पांचव्या पुरुषानें वरावी. चौथ्या, सहाव्या व सातव्या पुरुषानें पांचवी वरावी. पांचव्या व सहाव्या पुरुषांनींच सहावी वरावी. तिसऱ्या, चौथ्या, पांचव्या, सहाव्या अथवा सातव्या पुरुषानें सातवी वरावी. असा हा सापिण्ड्याचा संकोच करून जो विवाह करायचा, तो संकटकाळीं किंवा अशक्तानें करावा. इतर कन्या ( विवाहार्थ ) मिळत असल्यास, आणि पुरुष सशक्त असल्यास ( त्यानें असा विवाह ) करूं नये; कारण—सापिण्ड्याचा संकोच करून केलेल्या विवाहाला गुरुपत्निगमनाचा दोष स्मृतींत सांगितला आहे. सापिण्ड्यसंकोचाचीं जीं वाक्यें आहेत तीं अशक्त पुरुषासाठींच केवळ असल्याचें स्पष्ट सांगितलेंच आहे. खरें शास्त्र ( मुख्य कल्प ) पाळण्यास समर्थ असतां जो अनुकल्प ( गौण पक्ष ) अवलंबितो, त्याला फलप्राप्ति होत नाहीं—असा शक्तिमान् पुरुषांनीं गौणपक्षाचा स्वीकार केल्यास दोष सांगितला आहे. दत्तकाचें सापिण्ड्य पूर्वीं दत्तकनिर्णयप्रसंगीं सांगितलेंच आहे.

अथसापत्नमातृकुलेसापिण्डयप्रकारंसुमंतुराह पितृपत्न्यःसर्वामातरः तद्भ्रातरोमातुलाः तद्भगिन्योमातृष्वसारः तद्दुहितरश्चभगिन्यः तदपत्यानि भागिनेयानि अन्यथासंकरकारिणःस्युरिति अत्रलक्षणयासापत्नमातृकुले चतुःपुरुषसापिण्ड्यंविवाहनिषेधायविधीयतइतिकेचित् अपरेतुविवाहमात्रविषयत्वेमानाभावादाशौचादिविषयकत्वस्यापिसंभवात् यावद्वाचनिकंप्रमाणमि-

तिन्यायेनपरिगणितेष्वेवसापिण्ड्यमितिवदन्ति तथाचसुमन्तुवाक्ये वाक्यभेदाश्रयणेनैवंवाक्यार्थाः पर्यवस्यन्ति पितृपत्न्यः सर्वामातरइतिप्रथमवाक्ये-सापत्नमातरिमुख्यमातृवत् संमाननंतद्वधेमातृवधप्रायश्चित्तंतद्गमनेमातृगमन-प्रायश्चित्तादिकंचातिदिश्यते नात्रातिक्रान्तविषयेदशाहाशौचातिदेशः त्रिरात्रविधिनाबाधात् तद्भ्रातरोमातुलाइत्यत्रमातुलत्वप्रयुक्तमाशौचादिकंमातुलस्य-स्वभगिनीसपत्न्याःकन्योद्वाहनिषेधश्च अत्रमातुलत्वातिदेशेपिनतत्पुत्रादिषु-मातुलपुत्रत्वाद्यतिदेशः तेनबन्धुत्रयत्वप्रयुक्तमाशौचंन मातुलकन्यादौविवाह-विधिनिषेधावपिन एवंमातुलकन्यादौ पितुर्भगिनीत्वातिदेशाभावेनतत्पुत्रंप्रत्यपिपितृष्वसृत्वाद्यतिदेशोनभवति तद्भगिन्योमातृष्वसारइत्यत्राशौचंविवाहनिषेधश्च मातृष्वसृपुत्रेबन्धुत्रयत्वंचन सापत्नमातृष्वसृकन्याविवाहनिषेधस्तुविरुद्धसंबन्धत्वादेववक्ष्यते तदपत्यानिभगिन्यइत्यत्र शौचंसंमाननादिकंच नात्र विवाहप्रसक्तिःसगोत्रत्वात् अत्रसापत्नमातुलसापत्नभ्रातृसापत्नमातृ-ष्वसृसापत्नभगिनीनांस्वमातुलसोदरभ्रात्राद्यनन्तरंतर्पणंमहालयादावुद्देशोप्य-तएववचनादावश्यकइतिभाति तदपत्यानिभागिनेयानिइत्यत्राशौचं विवाह-निषेधश्च भागिनेयीत्वातिदेशेपितत्कन्यासुभागिनेयीकन्यात्वातिदेशोन याव-दुक्तं प्रमाणमितिन्यायादितिदिक् ॥

**सापत्नमातृकुलसापिण्ड्यविचार**—सुमन्तुऋषि म्हणतात—"पित्याच्या पत्नी या सर्व आयाच होत. सावत्र आईच्या बहिणी मावशा होत. सावत्र आईच्या कन्या बहिणी होत. त्या बहिणींचीं मुलें भागिनेय ( भाचे, भाच्या ) असें न मानिल्यास, हीं सर्व संकर ( अधर्म ) करणारीं होतील." अशा वेळीं सावत्र आईच्या कुळांत चार पुरुषांपर्यंत सापिण्ड्यविवाहाचा निषेध सांगितला असल्याचें जें कांहीं ग्रन्थकार सांगतात, तें विवाहापुरतेंच लागू असल्याबद्दलचें मानण्याला कांहीं प्रमाण नसल्यानें, हें अशौचादिकासंबंधानें असल्यानें 'जितक्यांचा उच्चार करून सांगितलें तितकेंच प्रमाण' या न्यायानें जितक्यांचीं नांवें वर सांगितलीं तितक्यांनाच सापिण्ड्य असल्याचें दुसरे ग्रन्थकार सांगतात. वरचा न्याय घेऊन सुमन्तूच्या म्हणण्यांतलीं जर निरनिराळीं वाक्यें तोडून अर्थ केला तर त्यांचे जे अर्थ संभवतात, ते असेः—'पित्याच्या जेवढ्या बायका तेवढ्या खऱ्या आया होत' या वाक्यानें, सावत्र आईला खऱ्या आईसारखा मान देणें, तिचा वध केला असतां मातृवधासतव प्रायश्चित्त करणें, तिच्याशीं गमन केल्यास मातृगमनप्रायश्चित्त करणें वगैरे गोष्टींचा अतिरेक होतो. या वाक्यानें अतिक्रान्त (फार जुन्या) अशौचाविषयीं दहा दिवसांच्या सुतकाचा अतिरेक होत नाहीं; कारण, सावत्र आईचें अतिक्रान्त ( जुनें ) अशौच तीन दिवस धरावें, असें जें विशेष वचन, त्याचा बाध आहे. 'सावत्र आईचे जे भाऊ ते मामा होत.' या वाक्यानें, मामाबद्दलचें अशौच आणि मामाला आपल्या बहिणीच्या सवतीच्या मुलीशीं विवाह हे निषेध उत्पन्न होतात. या ठिकाणीं सावत्र आईच्या भावाच्या ठिकाणीं मामेपणाचा अतिदेश

(दूरत्व) येतो, तरी त्यांच्या मुलांत मामेभावादिकांचा अतिदेश येत नाहीं; म्हणून त्या संबंधानें बन्धुत्रयविषयक अशौच नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करण्याविषयीं विधि व निषेध हीं दोन्हीहीं नाहींत. याप्रमाणें मामेबहिणी वगैरेसंबधानें बापाची मामेबहीण असा अतिदेश नसल्यानें, त्या पुत्रासंबंधानेंही पितृष्वसृत्वादिकाचा अतिदेश होत नाहीं. 'सावत्र आईच्या बहिणी त्या मावशा होत'—या नात्यानें अशौच आणि विवाहनिषेध हीं दोन्ही सूचित होतात. आईच्या बहिणीच्या पुत्रासंबंधानें बन्धुत्रयत्वही नाहीं. सावत्र आईच्या बहिणीच्या मुलीशीं विवाह करण्याचा जो निषेध, तो विरुद्धसंबंधामुळें उत्पन्न होतो. हा विरुद्धसंबंध पुढें सांगेन. 'सावत्र आईच्या कन्या त्या बहिणी होत'—या वाक्यानें अशौच व सन्मान हीं दिग्दर्शित होतात. या बाबतींत विवाहाचा प्रश्नच मुळीं निघत नाहीं; कारण गोत्र समान आहे. या ठिकाणीं सावत्र मामा, सावत्र भाऊ, सावत्र मावशी, सावत्र बहीण वगैरेंचे आपल्या स्वतःचे मामा, सख्खे भाऊ व बहिणी यांचा उच्चार केल्यावर तर्पण करणें व महालयादि श्राद्धांत उच्चार करणें—हें ह्या वचनावरूनच आवश्यक आहे असें वाटतें. 'सावत्र बहिणीच्या कन्या त्या भागिनेयी ( भाच्या ) होत'—या वाक्यानें अशौच व विवाहनिषेध हीं उद्भवतात. भागिनेयित्वाचा जरी अतिदेश येथें आहे, तरी त्यांच्या कन्यांच्या बाबतींत भागिनेयिकन्यत्वाचा अतिदेश होत नाहीं. कारण, 'जितकें स्पष्ट सांगितलें असेल तितकें प्रमाण होय'—असा न्याय आहे असें दाखविलें.

क्वचित्सापिण्ड्याभावेपिवचनादविवाहः अविरुद्धसंबन्धामुपयच्छते दंपत्योर्मिथः पितृमातृसाम्येविरुद्धसंबन्धः यथाभार्यास्वसुर्दुहितापितृव्यपत्नीस्वसाचेतिपरिशिष्टोक्तेः बौधायनः मातुःसापत्न्याभगिनींतत्सुतांचविवर्जयेत् । पितृव्यपत्नीभगिनीं तत्सुतांचविवर्जयेत् । १ केचिज्ज्येष्ठभ्रातापितुःसम इत्युक्तेज्येष्ठभ्रातृपत्न्याभगिनीमातृष्वसृतुल्यत्वान्नविवाह्येत्याहुः यवीयसीं स्वापेक्षयावयसावपुषाचन्यूनामुद्वहेत् असमानार्षगोत्रजां आर्षं प्रवरःस्वसमाने आर्षगोत्रेयस्यतज्जानभवतियातां असमानगोत्रामसमानप्रवरांचोद्वहेदित्यर्थः ।

**विरुद्धसम्बन्ध**—कांहीं ठिकाणीं सापिण्ड्य नसतांही विवाह होत नाहीं, याचें कारण तसें जें विशेष वचन आहे तें असें:—'जिच्याशीं विरुद्ध संबंध नाहीं ती वरावी.' ज्या वधूवरांचा विवाह व्हायचा असेल, त्यांच्या परस्परांत मातृत्वाचा अथवा पितृत्वाचा संबंध असणें, याला विरुद्धसंबंध म्हणतात. याचें उदाहरणः—आपल्या बायकोच्या बहिणीची मुलगी आणि चुलत्याच्या बायकोची बहीण. हें परिशिष्टांत सांगितलें आहे. या बाबतींत बोधायन म्हणतो, "सावत्र आईची बहीण व सावत्र आईच्या बहिणीच्या मुली या (विवाहार्थ) वर्ज्य कराव्या." वडील भाऊ बापासमान असल्याचें वचन असल्यामुळें, त्याच्या बायकोची बहीण मावशीसारखी होते. म्हणून तिच्याशीं लग्न करूं नये असें कांहीं ग्रन्थकारांचें मत आहे. यवीयसी म्हणजे आपल्यापेक्षां वयानें व शरीरानें जी कमी असेल, तिच्याशीं विवाह करावा. तद्वतच असमानार्षगोत्रजा म्हणजे आपल्याशीं समान असें गोत्र

आणि प्रवर ज्याचे नाहींत अशा कुलांतली मुलगी वरावी. याचा अर्थ असा कीं, असमानगोत्रा व असमानप्रवरा अशा मुलीशीं लग्न करावें.

अथसंक्षेपतोगोत्रप्रवरनिर्णयः तत्रगोत्रलक्षणम् विश्वामित्रोजमदग्निर्भरद्वाजोऽथगौतमः । अत्रिर्वसिष्ठःकश्यपइत्येतेसप्तऋषयः १ सप्तानामृषीणामागस्त्याष्टमानांयदपत्यंतद्गोत्रमित्याचक्षते यद्यपिकेवलभार्गवेष्वार्ष्टिषेणादिषुकेवलाङ्गिरसेषुहारितादिषुचनैतल्लक्षणंभृग्वङ्गिरसोरष्टऋषिष्वनन्तर्गतत्वात् तथाप्यत्रप्रवरैक्यादेवाविवाहः यद्यपिगोत्राणिअनन्तानि गोत्राणांतुसहस्राणि प्रयुतान्यर्बुदानिच । इत्युक्तेस्तथापिऊनपञ्चाशदेवगोत्रभेदाः व्यावर्तकप्रवरभेदानांतावतामेवदर्शनात् प्रवरलक्षणंतुगोत्रवंशप्रवर्तकऋषीणांव्यावर्तकाऋषिविशेषाःप्रवराइत्येवसंक्षेपतोज्ञेयम् समानगोत्रत्वंसमानप्रवरत्वंचपृथकपृथक् विवाहप्रतिबन्धकम् तत्रप्रवरसाम्यंद्विविधम्एकप्रवरसाम्यंद्वित्रिप्रवरसाम्यंच तत्रभृग्वङ्गिरोगणेतरेषुएकप्रवरसाम्यमपिविवाहप्रतिबन्धकं केवलभृगुगणेषुकेवलाङ्गिरोगणेषुचैकप्रवरसाम्यंनविवाहबाधकम् किंतुत्रिप्रवरेषुद्विप्रवरसाम्यमेव पञ्चप्रवरेषुत्रिप्रवरसाम्यमेवचविवाहबाधकम् पञ्चानांत्रिषुसामान्यादविवाहस्त्रिषुद्वयोः । भृग्वङ्गिरोगणेष्वेवंशेषेष्वेकोपिवारयेत् १ इत्यादिवचनात् जामदग्न्यभृगुगणेषुगौतमांगिरसेषुभारद्वाजांगिरसेषुचैकप्रवरसाम्येपिक्वचित्प्रवरसाम्याभावेपिचसगोत्रत्वादेवाविवाहः ।

**गोत्रप्रवरनिर्णय**—गोत्रलक्षणः—विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ आणि कश्यप हे सात ऋषि व आठवा, अगस्त्य यांच्या अपत्याला म्हणजे वंशांना गोत्रें म्हणावीत. आर्ष्टिषेणादिक असे जे केवळ भार्गव आणि हारितादिक असे जे केवळ आङ्गिरस, त्यांच्या बाबतींत हें लक्षण लागू पडत नाहीं. कारण, भृगु आङ्गिरस हे (दोघे ऋषि) वर सांगितलेल्या आठ ऋषींच्या वंशांतले जरी नाहींत, तरी एकाच प्रवराचे असल्यानें विवाह होत नाहीं. सहस्र, प्रयुत, अर्बुद अशी गोत्रसंख्या असल्याचें जें वचन आहे, त्यावरून गोत्रें जरी अनन्त आहेत. तरी त्यांचे भेद (फक्त) एकुणपन्नासच आहेत; कारण, प्रवरांचे निरनिराळे असे तितकेच भेद असल्याचें दिसतें. प्रवरलक्षणः—गोत्रांचे आणि वंशांचे प्रवर्तक जे ऋषि, त्यांचे भेद दाखविणारे जे तद्वंशीय विशेष ऋषि तेच प्रवर असें थोडक्यांत याचें लक्षण आहे. समानगोत्रत्व आणि समानप्रवरत्व हीं दोन्हीं स्वतंत्रपणें विवाहाला प्रतिबंधक आहेत. म्हणजे समानगोत्र व समानप्रवर असल्यास विवाहसंबंध करूं नये, असा याचा अर्थ आहे. प्रवराचें जें समानत्व दोन प्रकारचें आहे तें येणेंप्रमाणें:—(१) एका प्रवराचें साम्य आणि (२) दोन किंवा तीन प्रवरांचें साम्य. भृगुगण व आङ्गिरोगण (या दोहोंवांचून इतर गणांत जरी एका प्रवराचें साम्य असलें तरी तें विवाहाला प्रतिबंधक होतें. केवळ भृगुगण व केवळ आङ्गिरोगण) यांच्यांत एक प्रवराचें साम्य विवाहप्रतिबंधक होत नाहीं; परंतु तीन प्रवरांत दोन प्रवरांचें साम्य आणि पांच प्रवरांत

तीन प्रवरांचें साम्य हीं मात्र विवाहप्रतिबन्धक होतात. कारण 'भृगुगण व अङ्गिरोगण यांत पांच प्रवरांपैकीं जर तीन प्रवर समान असतील किंवा तीन प्रवरांपैकीं दोन प्रवर समान असतील तर विवाह होत नाहीं आणि इतर गणांत एक प्रवर जरी समान असला तरीही विवाह होत नाहीं'--असें वचन आहे. जामदग्न्य भृगुगण, गौतमाङ्गिरस आणि भारद्वाजाङ्गिरस यांत जरी एक प्रवर समान असलें किंवा क्वचित् एकही प्रवर समान नसलें, तरी एक गोत्र असल्यानें विवाह होत नाहीं.

गोत्राणांप्रवराणांचगणनाप्रोच्यतेधुना । संक्षेपात्सुखबोधायभगवत्प्रीतयेपिच १ सप्तभृगवः । सप्तदशाङ्गिरसः । चत्वारोऽत्रयः । दशविश्वामित्राः । त्रयःकश्यपाः । चत्वारोवसिष्ठाः । चत्वारोगस्तयः । इत्येकोनपञ्चाशद्गणास्तथापिसर्वग्रन्थमतसंग्रहेणाधिकास्तत्रतत्रवक्ष्यन्ते तत्रसप्तभृगुगणाः । वत्साः बिदाः एतौ जामदग्न्यौ आर्ष्टिषेणाः यस्काः मित्रयुवः वैन्याः शुनकाएतेचपञ्चकेवलभृगवःएवंसप्त । तत्र वत्साः मार्कण्डेयाः माण्डूकेयाःइत्यादयः शतद्वयाधिकावत्सगोत्रभेदाः एतेषांपञ्चप्रवराः भार्गवच्यावनाप्नवानौर्वजामदग्न्येतिभार्गवौर्वजामदग्न्येति त्रयोवाभार्गवच्यावनाप्नवानेतित्रयोवाबिदाः शैलाःअवटाः इत्यादयोविंशत्यधिकाबिदाः तेषांपञ्चप्रवराः भार्गवच्यावनाप्नवानौर्वबैदेति । भार्गवौर्वजामदग्न्येतिवा । आर्ष्टिषेणाः नैर्ऋतयः याम्यायणाः इत्यादयोविंशत्यधिकाआर्ष्टिषेणाः एषांभार्गवच्यावनाप्नवानार्ष्टिषेणानूपेतिपञ्च भार्गवार्ष्टिषेणानूपेतित्रयोवा एतेषांत्रयाणांवत्सबिदार्ष्टिषेणानांपरस्परमविवाहः द्वित्रिप्रवरसाम्यात् आद्ययोर्जामदग्न्यत्वेनसगोत्रत्वाच्च यद्यपित्रिप्रवरार्ष्टिषेणानांवत्सबिदैःसहनद्विप्रवरसाम्यंनापिसगोत्रत्वं जामदग्न्यत्वाभावात् तथापिपञ्चप्रवरपक्षगतमपित्रिप्रवरसाम्यंविवाहबाधकम् एवमग्रेपिज्ञेयम् वात्स्यानांभार्गवच्यावनाप्नवानेतित्रयः । वत्सपुरोधसोर्भार्गवच्यावनाप्नवानवत्सपौरोधसेतिपञ्च । बैजमथितयोर्भार्गवच्यावनाप्नवानबैजमथितेति पञ्च ।। एते त्रयः क्वचित् एतेषां परस्परं पूर्वोक्तैश्चत्रिभिर्नविवाहः त्रिप्रवरसाम्यात् यस्काः मौनाः मूकाः इत्यादयस्त्रिपञ्चाशदधिकायस्का एषां भार्गववैतहव्यसावेतसेतित्रयः । मित्रयुवः रौक्षायनाः सापिण्डिनाः इत्यादयस्त्रिंशदधिकामित्रयुवः तेषांभार्गववाध्र्यश्वदैवोदासेतित्रयः भार्गवच्यावनदैवोदासेतिवा वाध्र्यश्वेत्येकोवा । वैन्याः पार्थाः बाष्कलाः श्येताइत्येतेवैन्या एषांभार्गववैन्यपार्थेति त्रयः । शुनका गार्त्समदाः यज्ञपतयः इत्यादयः सप्तदशाधिकाः शुनकाः एषांशौनकेत्येकः । गार्त्समदेतिवा । भार्गवगार्त्समदेति द्वौवा । भार्गवशौनहोत्रगार्त्समदेतित्रयोवा । यस्कादीनांचतुर्णांस्वस्वगणंहित्वापरस्परंपूर्वैर्जामदग्न्यवत्सादिभिश्चसहविवाहोभवति एकप्रवरसाम्येपिद्वित्रिप्रवरसाम्याभावात् भृगुगणेषुएकप्रवरसाम्यस्यदूषकत्वाभावात् अजामदग्न्यत्वेनासगोत्रत्वात् मित्रयुवांपाक्षिकद्विप्रवरसाम्यात्त्रिप्रवरैर्वत्सादिभिः सहनविवाहइतिकेचित् तत्प्रवरपक्षग्राहिणामविवाहः पक्षान्तरग्राहिणांमित्रयूनांविवाहएवेत्यन्ये क्वचिदधिकंगणद्वयमुक्तम् वेदविश्व-

ज्योतिषांभार्गववेदवैश्वज्योतिषेतित्रयः शाठरमाठराणांभार्गवशाठरमाठरेति-त्रयः अनयोः परस्परं पूर्वैश्चसर्वैर्विवाहः इतिभृगुगणाः ॥

**भृगुगण**—गोत्रें व प्रवर यांची थोडक्यांत सुलभतेनें व स्पष्टपणें माहिती व्हावी आणि भगवान् सन्तोषित व्हावे म्हणून त्यांची संख्या थोडक्यांत सांगतों ती अशीः—भृगुगण सात, अङ्गिरसगण सतरा, अत्रिगण चार, विश्वामित्रगण दहा, कश्यप-गण तीन, वसिष्ठगण चार आणि अगस्त्यगण चार—असे हे एकंदर एकुणपन्नास गण आहेत. सर्व ग्रंथांच्या मताचा एकत्र संग्रह केल्यास आणखीही जे गण सांप-डतात, ते त्या (योग्य) ठिकाणीं सांगेन. त्यांपैकीं भृगुगण सात आहेत, वत्स आणि बिद हे दोन, जामदग्न्य, भृगु आणि आर्ष्टिषेण, यस्क, मित्रयु, वैन्य व शुनक हे निवळ पांच भृगु मिळून एकंदर सात झाले. यांपैकीं वत्स, मार्कण्डेय, माण्डूकेय वगैरे वत्सगोत्राचे दोनशांहून अधिक भेद आहेत व त्यांचेही भार्गव, च्यावन, आप्न-वान्, और्व, आणि जामदग्न्य असे पांच किंवा भार्गव, और्व, व जामदग्न्य असे तीन प्रकार आहेत. आर्ष्टिषेण, नैर्ऋति, याम्यायण वगैरे विसांहून अधिक जे आर्ष्टि-षेण आहेत, त्यांचे भार्गव, च्यावन आप्नवान्, और्व आणि जामदग्न्य असे पांच किंवा भार्गव, और्व आणि जामदग्न्य असे तीन प्रवर आहेत. वत्स, बिद आणि आर्ष्टिषेण या सांगितलेल्या तिन्ही गणांत परस्पर विवाहसंबंध होत नाहीं; कारण, त्यांचे दोन अथवा तीन प्रवर समान आहेत. शिवाय वत्स व बिद हे दोघे जामदग्न्य असल्या-मुळें ते सगोत्र आहेत. तीन प्रवरी जे आर्ष्टिषेण ते जामदग्न्य नसल्यानें, त्यांचें वत्स व बिद यांच्याशीं जरी दोन प्रवरांचें साम्य नाहीं, किंवा सगोत्रत्वही नाहीं, तरी पांच प्रवरांपैकीं तीन प्रवर समान असणें हेंही विवाहाला बाधकच आहे. हाच न्याय पुढेंही घ्यावा. वात्स्यांचे—भार्गव, च्यावन व आप्नवान् असे तीन प्रवर आहेत. वत्सपुरोधसांचे—भार्गव, च्यावन आप्नवान्, वत्स व पौरोधस असे पांच प्रवर आहेत. वैज व मथित यांचे—भार्गव, च्यावन, आप्नवान्, वैज व मथित असे पांच प्रवर आहेत. क्वचित् ग्रंथांत वैज व मथित यांचे तीन प्रवर सांगितले आहेत. यांचा परस्परांत (वात्स्य, वत्स, पुरोधस्, वैज व मथित) किंवा (वत्स, बिद व आर्ष्टिषेण) या पूर्वी सांगितलेल्या तिघांशीं विवाहसंबंध होत नाहीं. कारण तीन प्रवर समान येतात. यस्क, मौन, मूक वगैरे त्रेपन्नांहूनही असे जे यस्क आहेत. त्यांचे—भार्गव, वैतहव्य व स्ववेतस असे तीन प्रवर आहेत. मित्रयु, रौक्षायन, सापिण्डिन वगैरे तीसांपेक्षां ज्यास्त असे जे मित्रयु आहेत त्यांचे—भार्गव, वाध्र्यश्व व दैवोदास असे तीन किंवा भार्गव, च्यावन आणि दैवोदास किंवा वाध्र्यश्व हा ऐक असे प्रवर आहेत. वैन्य, पार्थ, बाष्कल आणि श्येत असे जे वैन्याचे प्रकार आहेत त्यांचे—भार्गव, वैन्य व पार्थ असे तीन प्रवर आहेत. शुनक, गार्त्समद, यज्ञपति इत्यादि सतरांहून अधिक असे जे शुनक आहेत, त्यांचा शुनक असा एक किंवा गार्त्समद हा एक अथवा भार्गव आणि गार्त्समद असे दोन किंवा भार्गव, शौनहोत्र आणि गार्त्समद असे तीन —याप्रमाणें प्रवर आहेत. यस्क, मित्रयु, वैन्य आणि शुनक यांचा स्वतःचा गण

वर्ज्य करून परस्परांत विवाह होतो व पूर्वींच्या जामदग्न्य, वत्स वगैरेंबरोबरही होतो. कारण त्यांच्यांत एका प्रवराचें जरी साम्य असलें, तरी दोन किंवा तीन प्रवरांचें साम्य नाहीं, आणि भृगुगुणांत एका प्रवराचें साम्य असतां विवाहाला दोष येत नाहीं, व शिवाय ते जामदग्न्य नसल्यानें एकगोत्री नाहींत. मित्रयु यांचे एका पक्षानें दोन प्रवर येतात, म्हणून त्यांचा त्रिप्रवरी वत्सगोत्रादिकांशीं विवाह होत नाहीं असें कांहीं ग्रन्थकार सांगतात, आणि दुसरे कांहीं ग्रन्थकार असें म्हणतात कीं, वत्स गोत्रादिकांचा प्रवरपक्ष धरणाऱ्या मित्रयूंचा वत्सादिकांशीं विवाहसंबंध होत नाहीं व इतर पक्ष धरणाऱ्या मित्रयूंचा होतो. क्वचित् ग्रन्थांत जे दोन गण अधिक सांगितले आहेत, त्यांतला एक वेद व विश्वज्योतिष, त्यांचे-भार्गव, वेद व वैश्वज्योतिष असे तीन प्रवर असून, दुसरा जो शाठर आणि माठर-त्यांचे भार्गव,शाठर व माठर असे तीन प्रवर आहेत. यांचा जसा परस्परांशीं विवाह होतो, तद्वतच पूर्वीं सांगितलेल्या सर्वांशीं होतो. असे हे भृगुगण आहेत.

अथाङ्गिरसः तेत्रिविधाः गौतमाः भरद्वाजाः केवलाश्चेतितत्रगौतमाङ्गिरसोदश आयास्याः १ शारद्वताः २ कौमण्डाः ३ दीर्घतमसः ४ करेणुपालयः ५ वामदेवाः ६ औशनसाः ७ राहूगणाः ८ सोमराजकाः ९ बृहदुक्थाश्चेति १० तत्र आयास्याः श्रोणिवेधाः मूढरथाइत्यादयोष्टादशाधिकाआयास्याः तेषामाङ्गिरसायास्यगौतमेतित्रयः शारद्वताः अभिजिताः रौहिण्याइत्यादयः सप्तत्यधिकाः शारद्वतास्तेषामाङ्गिरसगौतमशारद्वतेतित्रयःकौमण्डाःमामन्थरेषणाः मासुराक्षाइत्यादयोदशाधिकाः कौमाण्डास्तेषामाङ्गिरसौतथ्यकाक्षीवतगौतमकौमण्डेतिपञ्च आङ्गिरसौतथ्यगौतमौशिजकाक्षीवतेतित्रयोवा आङ्गिरसायास्यौशिजगौतमकाक्षीवतेतिवा आङ्गिरसौशिजकाक्षीवतेतित्रयोवा आङ्गिरसौतथ्यकाक्षीवतेतिवा औतथ्यगौतमकौमण्डेतिवा अथदीर्घतमसोगौतमास्तेषामाङ्गिरसौतथ्यकाक्षीवतगौतमदैर्घतमसेतिपञ्च आङ्गिरसौतथ्यदैर्घतमसेतित्रयोवा करेणुपालयः वास्तव्याः श्वेतीयाइत्यादयः सप्ताधिकाः करेणुपालयस्तेषामांगिरसगौतमकारेणुपालेतित्रयः वामदेवानामांगिरसवामदेव्यगौतमेतित्रयः आंगिरसवामदेव्यबार्हदुक्थेतिवा औशनसाः दिश्याः प्रशस्ताः इत्यादिकानवाधिकाऔशनसास्तेषामांगिरसगौतमौशनसेतित्रयः रहूगणानामांगिरसराहूगणगौतमेतित्रयः सोमराजकानामांगिरससौमराज्यगौतमेतित्रयः बृहदुक्थानामांगिरसबार्हदुक्थगौतमेतित्रयः १० क्वचिद्गणद्वयमधिकम् उतथ्यानामांगिरसौतथ्यगौतमेति राघुवानामांगिरसराघुवगौतमेति गौतमानांसर्वेषामविवाहः सगोत्रत्वात्प्रायेणद्वित्रिप्रवरसाम्याच्च ॥

**अङ्गिरसगण**—गौतमाङ्गिरस, भारद्वाजाङ्गिरस आणि केवलाङ्गिरस असे अङ्गिरसाचे तीन भेद आहेत. यांपैकीं गौतमाङ्गिरसाचे जे दहा भेद आहेत ते असेः—आयास्य, शारद्वत, कौमण्ड, दीर्घतमस, करेणुपालि, वामदेव, औशनस, राहूगण, सोमराजक आणि बृहदुक्थ. यांत आयास्य, श्रोणिवेध, मूढरथ

वगैरे अठरांहून अधिक असे जे आयास्य आहेत, त्यांचे-आङ्गिरस, आयास्य व गौतम असे तीन प्रवर आहेत. शारद्वत, अभिजित, रौहिण्य वगैरे सत्तरांहून अधिक जे शारद्वत आहेत, त्यांचे-आङ्गिरस, गौतम आणि शारद्वत असे तीन प्रवर आहेत. कौमण्ड, मामन्थरेषण, मासुरास वगैरे जे दहांहून अधिक कौमण्ड आहेत, त्यांचे-आङ्गिरस, औतथ्य, काक्षीवत, गौतम आणि कौमण्ड असे पांच किंवा आङ्गिरस, औतथ्य, गौतम, औशिज व काक्षीवत असे पांच, अथवा आङ्गिरस, औयस्य, औसिज गौतम व काक्षीवन असे पांच, किंवा आङ्गिरस, औशिज व काक्षीवत असे तीन किंवा आङ्गिरस, औतथ्य, गौतम व कौमंड असे तीन प्रवर आहेत. दीर्घतमसाचे-आङ्गिरस, औतथ्य, काक्षीवत, गौतम आणि दीर्घतमस असे पांच किंवा आङ्गिरस, औतथ्य व दैर्घतमस असे तीन प्रवर आहेत. करेणुपालि, वास्तव्य, श्वेतीय वगैरे जे करेणुपालि सातांहून अधिक आहेत, त्यांचे-आङ्गिरस, गौतम व करेणुपाल असे तीन प्रवर आहेत. वामदेवाचे--आङ्गिरस, वामदेव्य आणि गौतम असे तीन किंवा आङ्गिरस, वामदेव्य व बार्हदुक्थ असे तीन प्रवर आहेत. औशनस, दिश्य, प्रशस्त वगैरे जे नवांहून अधिक औशनस आहेत, त्यांचे-आङ्गिरस, गौतम आणि औशनस असे तीन प्रवर आहेत. रहूगणाचे-आङ्गिरस, राहूगण व गौतम हे तीन प्रवर आहेत. सोमराजकाचे-आङ्गिरस, सौमराज्य व गौतम हे तीन प्रवर आहेत. बृहदुक्थाचे-आङ्गिरस, बार्हदुक्थ व गौतम हे तीन प्रवर आहेत. क्वचित् ग्रन्थांत जे दोन गण अधिक सांगितले त्यांतला पहिला जो उतथ्य, त्याचे-आङ्गिरस, औतथ्य व गौतम असे तीन प्रवर आहेत. आणि दुसरा जो राघुव, त्याचे-आङ्गिरस, राघुव आणि गौतम असे तीन प्रवर आहेत. सर्व गौतमांचा परस्परांत विवाह होत नाहीं. कारण, त्यांचें गोत्र एकच असून, त्यांच्यांत दोन किंवा तीन प्रवरांचें साम्य आहे.

अथभरद्वाजाः तेचत्वारः भरद्वाजाः गर्गाः ऋक्षाः कपयश्चेति भरद्वाजाः क्षाम्यायणः देवाश्वइत्यादयःषष्ट्युत्तरशताधिकाभरद्वाजास्तेषामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजेतित्रयः गर्गाः सांभरायणाः सखीनयः इत्यादयः पञ्चाशदधिकागर्गास्तेषामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजशैन्यगार्ग्येतिपञ्च आंगिरसशैन्यगार्ग्येतित्रयोवा अन्त्ययोर्व्यत्ययोवा भारद्वाजगार्ग्यशैन्येतिवा गर्गभेदानामांगिरसतैत्तिरिकापिभुवेति ऋक्षाः रौक्षायणाः कपिलः इत्यादयोनवाधिकाऋक्षास्तेषामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजवान्दनमातवचसेतिपञ्च आंगिरसवान्दनमातवचसेतित्रेयावा कपयः स्वस्तितरयः दण्डिनः इत्यादयः पञ्चविंशत्यधिकाः कपयस्तेषामांगिरसामहय्यौरुक्षय्येतित्रयः आंगिरसामहीयवौरुक्षयसेत्याश्वलायनपाठः आत्मभुवामांगिरसभारद्वाजबार्हस्पत्यवरात्मभुवेतिपञ्च अयंगणः क्वचित् भरद्वाजानांसर्वेषांपरस्परमविवाहः सगोत्रत्वात् प्रायेणद्वित्रिप्रवरसाम्याच्च ऋक्षान्तर्गतानांकपिलानांविश्वामित्रैरप्यविवाहः इति भारद्वाजांगिरसाः॥

**भारद्वाजगण**—हे जे चार प्रकारचे आहेत ते येणेंप्रमाणें—भरद्वाज, गर्ग, ऋक्ष आणि कपि. क्षाम्यायण, देवाश्व वगैरे जे एकशेंसाठांहून अधिक भरद्वाज आहेत, त्यांचे आङ्गिरस, बार्हस्पत्य व भारद्वाज असे तीन प्रवर आहेत. गर्ग, साम्भरायण, सखिनि वगैरे जे पन्नासांहून अधिक असे गर्ग आहेत, त्यांचे—आंगिरस, भारद्वाज व बार्हस्पत्य, शैन्य व गार्ग्य असे पांच अथवा आंगिरस, शैन्य व गार्ग्य असे तीन प्रवर आहेत. त्यांतल्या अन्त्यांचा व्यत्यय करावा किंवा भारद्वाज, गार्ग्य व शैन्य असे तीन प्रवर असल्याचें समजावें. गर्गाच्या भेदांचे आङ्गिरस, तैत्तिरि व कापिभुव असे तीन प्रवर आहेत. ऋक्ष, रौक्षायण, कपिल वगैरे जे ऋक्षाचे नवांहून अधिक आहेत, त्यांचे—आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, वान्दन व मातवचस असे पांच किंवा आङ्गिरस, वान्दन आणि मातवचस असे तीन प्रवर आहेत. कपि, स्वस्तितरि, दण्डी वगैरे जे कपि विसांहून अधिक आहेत, त्यांचे—आङ्गिरस, आहमय्य आणि औरुक्षय्य असे तीन प्रवर आहेत. याचा—आंगिरस, आमहीयव, औरुक्षयस—असा आश्वलायनसूत्रांत पाठ आहे. आत्मभूचे—आंगिरस, भारद्वाज, बार्हस्पत्य, वर आणि आत्मभू—असे पांच प्रवर आहेत. हा गण क्वचित् ग्रंथांत सांगितला आहे. सर्व भरद्वाजांचा परस्परांत विवाह होत नाहीं; कारण समान गोत्र असून, बहुतेकांत दोन किंवा तीन प्रवरांचें साम्य आहे. ऋक्षांतले जे कपिल, त्यांचा विश्वामित्रांशींही विवाह होत नाहीं. असे हे भारद्वाजाङ्गिरस आहेत.

अथकेवलाङ्गिरसः तेचषट् हरिताः कुत्साः कण्वाः रथीतराः विष्णुवृद्धाः मुद्गलाश्चेति हरिताः सौभगाः नैव्यगवाइत्यादयोद्वात्रिंशदधिकाहारितास्तेषामांगिरसांबरीषयौवनाश्वेति आद्योमान्धाता वा कुत्सानामांगिरसमांधात्रकौत्सेतित्रयः कण्वाः औपमर्कटाः बाष्कलायनः इत्यादयएकाविंशत्यधिकाः कण्वास्तेषामाङ्गिरसाजमीढकण्वेतित्रयः आङ्गिरसघौरकाण्वेतिवा रथीतराः हस्तिदाः नैतिरक्षयः इत्यादयश्चतुर्दशाधिकारथीतरास्तेषामाङ्गिरसवैरूपरथीतरेतित्रयः आंगिरसवैरूपपार्षदश्वेतिवा अष्टादंष्ट्रवैरूपपार्षदश्वेतिवा अन्त्ययोर्व्यत्ययोवा विष्णुवृद्धाः शठाः भरणाइत्यादयः पञ्चविंशत्यधिकाविष्णुवृद्धास्तेषामांगिरसपौरुकुत्स्यत्रासदस्यवेतित्रयः मुद्गलाः सात्यमुग्रियहिरण्यस्तम्बयः इत्यादिकाअष्टादशाधिकास्तेषामांगिरसभार्म्याश्वमौद्गल्योः-त्रयः आद्यस्तार्क्ष्योवा आंगिरसतार्क्ष्यमौद्गल्येतिवा एषांषण्णांकेवलांगिरसानांस्वस्वगणंहित्वापरस्परंपूर्वैश्चसर्वैर्विवाहोभवति आंगिरसोगस्त्याष्टमसप्तर्षिभिन्नत्वेनतदपत्यानांसगोत्रत्वाभावात् द्वित्रिप्रवरसाम्याभावाच्च हरितकुत्सयोस्तुनविवाहः पाक्षिकद्विप्रवरसाम्यात् ॥

**केवलांगिरस**—याचे जे सहा प्रकार आहेत, ते असेः—हरित, कुत्स, कण्व, रथीतर, विष्णुवृद्ध आणि मुद्गल. हरित, सौभग, नैव्यगव, वगैरे जे हरिताचे बत्तिसांपेक्षां अधिक हरित आहेत, त्यांचे—आंगिरस, आम्बरीष

व यौवनाश्व असे तीन किंवा मान्धाता, आम्बरीष व यौवनाश्व असे तीन प्रवर आहेत. कुत्साचे—आंगिरस, मान्धाता व कौत्स असे तीन प्रवर आहेत. कण्व, औपमर्कट, बाष्कलायन वगैरे जे एकवीसांपेक्षां जास्त कण्व आहेत, त्यांचे—आंगिरस, आजमीढ व कण्व असे तीन किंवा आंगिरस, घौर व काण्व असे तीन प्रवर आहेत. रथीतर, हस्तिद, नैतिरक्षि वगैरे चौदांहून अधिक जे रथीतर आहेत, त्यांचे आंगिरस, वैरूप व रथीतर असे तीन, किंवा आंगिरस, वैरूप व पार्षदश्व असे तीन, अथवा अष्टादंष्ट्र, वैरूप, व पार्षदश्व असे तीन प्रवर आहेत, किंवा यांतल्या शेवटच्या दोहोंचा व्यत्यय (बदल) करावा. विष्णुवृद्ध, शठ, भरण वगैरे जे पंचविसांपेक्षां जास्त विष्णुवृद्ध आहेत, त्यांचे—आंगिरस, पौरकुत्स्य व त्रासदस्यु असे तीन प्रवर आहेत. मुद्गल, सात्यमुग्रि, हिरण्यस्तवि, वगैरे जे अठरांहून अधिक मुद्गल आहेत, त्यांचे आंगिरस, भार्म्यांश्व व मौद्गल्य, असें तीन किंवा तार्क्ष्य, भार्म्यांश्व व मौद्गल्य असे तीन प्रवर आहेत. या सहा केवलांगिरसांचा आपला स्वतःचा गण खेरीजकरून परस्परांत आणि पूर्वी सांगितलेल्या सर्वांबरोबर विवाह होतो. कारण सप्तर्षि व आठवा अगस्त्य यांच्याहून आंगिरस हा भिन्न असल्यानें त्याच्या अपत्यांचें समानगोत्र होत नाहीं. कारण दोन्ही पक्षीं दोन प्रवर सारखे येतात.

अथअत्रयः तेचत्वारः अत्रयः गविष्ठिराः वाद्भुतकाः मुद्गलाश्चेति अत्रयो भूरयः छान्दयइत्यादयश्चतुर्नवत्यधिकाअत्रयस्तेषामात्रेयार्चनानसश्यावाश्वेतित्रयः १ गविष्ठिराः दक्षयः भलन्दनाइत्यादयश्चतुर्विंशत्यधिकागविष्ठिरास्तेषामात्रेयार्चनानसगाविष्ठिरेतित्रयः आत्रेयगाविष्ठिरपौर्वातिथेतिवा २ वाद्भुतकानामात्रेयार्चनानसवाद्भुतकेतित्रयः ३ मुद्गलाः शालिसंधयः अर्णवाः इत्यादयोदशावरामुद्गलास्तेषामात्रेयार्चनानसपौर्वातिथेतित्रयः ४ क्वचित् अतिथयोवामरथ्याः सुमंगलाबीजवापधनञ्जयाश्चेतिपञ्चगणाअधिकाः तत्राद्यचतुर्णामात्रेयार्चनानसातिथेतित्रयः आत्रेयार्चनानसगाविष्ठिरेतिवा सुमंगलानामत्रिसुमंगलश्यावाश्वेतिवा धनञ्जयानामात्रेयार्चनानसधानञ्जयेतिवालेयाः कौन्द्रेयाः शौभ्रेयाः वामरथ्याः इत्यादयः अत्रेः पुत्रिकापुत्रास्तेषामात्रेयवामरथ्यपौत्रिकेतित्रयः अत्रीणांसर्वेषामविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च अत्रेःपुत्रिकापुत्राणां वामरथ्यादीनांचवसिष्ठविश्वामित्राभ्यामप्यविवाहः इत्यत्रयः ॥

**अत्रिगण**—हे जे चार आहेत, ते असेः—अत्रि, गविष्ठिर, वाद्भुतक आणि मुद्गल. अत्रि, भुरि, छांदि वगैरे चौऱ्याण्णवांहून जे अधिक अत्रि आहेत, त्यांचे—आत्रेय, आर्चनानस व श्यावाश्व असे तीन प्रवर आहेत. गविष्ठिर, दक्षि, भलन्दन वगैरे चौविसांपेक्षां जे अधिक गविष्ठिर आहेत, त्यांचे—आत्रेय, आर्चनानस व गविष्ठिर असे तीन अथवा आत्रेय, गविष्ठिर व पौर्वातिथ असे तीन प्रवर आहेत. वाद्भुतकाचे—आत्रेय, आर्चनानस व वाद्भुतक असे तीन प्रवर आहेत. मुद्गल, शालिसंधि, अर्णव वगैरे जे दहांहून कमी असे मुद्गल आहेत, त्यांचे—आत्रेय, आर्चनानस व

पौर्वातिथ असे तीन प्रवर किंवा क्वचित् ग्रंथांत अतिथि, वासरथ्य, सुमंगल, बीज-वाय व धनंजय असे जे पांच गण अधिक सांगितले आहेत, त्यांतल्या पहिल्या चारांचे —आत्रेय, आर्चनानस व अतिथ असे तीन प्रवर किंवा आत्रेय, आर्चनानस व गविष्ठिर असे तीन प्रवर आहेत. सुमंगलांचे—अत्रि, सुमंगल व श्यावाश्व असे तीन प्रवर आहेत. धनंजयांचे—आत्रेय, आर्चनानस व धानंजय असे तीन प्रवर आहेत. वालेय, कौन्देय, शौभ्रेय, वामरथ्य हे जे अत्रीच्या मुलीचे मुलगे, त्यांचे प्रवर—आत्रेय, वामरथ्य व पौत्रिक असे तीन आहेत. अत्रींचा परस्परांत विवाह होत नाहीं. कारण, सर्वांचें गोत्र व प्रवर हीं सारखींच आहेत. अत्रीचे कन्यापुत्र जे वामरथ्या-दिक, त्यांचा—वसिष्ठ व विश्वामित्र यांच्याशीं विवाह होत नाहीं. येथें अत्रिगण संपला.

अथविश्वामित्राः ॥ तेदश कुशिकाः लोहिताः रौक्षकाः कामकायनाः अजाः कताः धनंजयाः अघमर्षणाः पूरणाः इंद्रकौशिकाश्चेति कुशिकाः पर्णजंघाः वारक्याइत्यादयः सप्तत्यधिकाः कुशिकास्तेषांविश्वामित्रदेवरातौदलेतित्रयः १ लोहिताः कुडक्याश्वाक्रवर्णायनाइत्यादयः पंचाधिका लोहिताः रोहिताइति-केचित् तेषांवैश्वामित्राष्टकलौहितेतित्रयः अंत्ययोर्व्यत्ययोवा वैश्वामित्रमाधु-च्छंदसाष्टकेतिवा विश्वामित्राष्टकेतिद्वौवा २ रौक्षकाणांविश्वामित्रगाथिनरेव-णेतित्रयः विश्वामित्ररौक्षकरैवणेतिवा एतेरेवणावा ३ कामकायनाः देवश्रवसाः देवतरसाइत्यादयः पंचावराः कामकायनाः श्रौमतावा तेषांवैश्वामित्रदेवश्रवस-दैवतरसेतित्रयः ४ अजानांवैश्वामित्रमाधुच्छंदसाजेतित्रयः ५ कताः औदुंबरयः शैशिरयः इत्यादयोविंशत्यधिकाःकतास्तेषांवैश्वामित्रकात्याक्षीलेतित्रयः ६ धनंजयाः पार्थिवाः बंधुलाः इत्यादयः सप्तावराधनंजयास्तेषांवैश्वामित्रमाधु-च्छंदसधानंजयेतित्रयः वैश्वामित्रमाधुच्छंदसाघमर्षणेतिवा ७ अघमर्षणानां-वैश्वामित्राघमर्षणकौशिकेतित्रयः ८ पूरणानांवैश्वामित्रपूरणेतिद्वौ वैश्वामित्र-देवरातपौरणेतिवा ९ इंद्रकौशिकानांवैश्वामित्रेंद्र कौशिकेतिद्वौ १० क्वचिद-न्येप्येकादशोक्ताः आश्मरथ्याः १ साहुलाः २ गाथिनाः ३ वैणयाः ४ हिरण्यरेतसः ५ सुवर्णरेतसः ६ कपोतरेतसः ७ शालंकायनाः ८ घृतकौशिकाः ९ कथकाः १०रौहिणाइति ११ आश्मरथ्यानांवैश्वामित्राश्मरथ्यवाधुलेतित्रयः १ साहुलानांवैश्वामित्रसाहुलमाहुलेतित्रयः२गाथिनानांवैश्वामित्रगाथिनरैणवे-तित्रयः ३ वेणुवेतिक्वचित्पाठःएतेएवरेणवइति उदवेणवइतिचोच्यंते ३ वैणवानांवैश्वामित्रगाथिनवैणवेति ४ हिरण्यरेतसां वैश्वामित्रहैरण्यरेतसेतिद्वौ ५ सुवर्णरेतसांवैश्वामित्रसौवर्णरेतसेतिद्वौ ६ कपोतरेतसांवैश्वामित्रकापोतरेत-सेतिद्वौ ७ शालंकायनानांवैश्वामित्रशालंकायनकौशिकेतित्रयः एतेएवकौशि-काइतिजन्हवइतिचोच्यंते ८ घृतकौशिकानांवैश्वामित्रघृतकौशिकेतिद्वौ ९ कथकानांवैश्वामित्रकथकेति १० रौहिणानांवैश्वामित्रमाधुच्छंदसरौहिणेतित्रयः ११ वैश्वामित्रगणानांसर्वेषांपरस्परमविवाहःसगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च कुशि-

कानां देवरातप्रवरसाम्येनदेवराताद्वेदानिर्णयाद्वक्ष्यमाण देवरातवदेवजामदग्न्यैरप्यविवाहइति भाति धनंजयानांविश्वामित्रैरत्रिभिश्चाविवाहः कतानांभरद्वाजैर्विश्वामित्रैश्चाविवाहः द्विगोत्रत्वात् इतिविश्वामित्राः ॥

**विश्वामित्रगण**—हे जे दहा विश्वामित्र आहेत तें येणेंप्रमाणें:—कुशिक, लोहित, रौक्षक. कामकायन, अज, कत, धनंजय, अघमर्षण, पुत्रण व इंद्रकौशिक. कुशिक, पर्णजंघ, वारक्य वगैरे जे सतरांपेक्षां अधिक कुशिक आहेत, त्यांचे प्रवर विश्वामित्र, देवराज व औदंड असे तीन आहेत. लोहित, कुडक्य, चार्क्रवर्णायन वगैरे जे पांचांहून जास्त लोहित आहेत, त्यांचे प्रवर—वैश्वामित्र, आष्टक व लोहित असे तीन किंवा शेवटच्याचा व्यत्यय करावा अथवा वैश्वामित्र, माधुच्छंदस आणि आष्टक असे तीन किंवा विश्वामित्र आणि आष्टक असे दोन आहेत. रौक्षकांचे प्रवर—विश्वामित्र, गाथिन व रेवण असे तीन आहेत किंवा विश्वामित्र, रौक्षक व रेवण असे तीन आहेत, अथवा हे रेवण समजावेत. 'लोहित' याच्या ऐवजीं कोणी 'रोहित' असें म्हणतात. कामकायन, देवश्रवस, देवतरस इत्यादि पांचांपर्यंत जे कामकायन किंवा श्रौमत आहेत, त्यांचे प्रवरः— वैश्वामित्र, देवश्रवस व देवतरस असे तीन आहेत. अजांचे प्रवर—वैश्वामित्र, माधुच्छन्दस व आज असे तीन आहेत. कत, औदुम्बरि, शैशिरी वगैरे जे कत विसांपेक्षां ज्यास्त आहेत त्यांचे प्रवर—वैश्वामित्र, कात्य व अक्षीन असे तीन आहेत. धनंजय, पार्थिव, बन्धुक वगैरे जे सातांपर्यंत धनंजय आहेत, त्यांचे प्रवर—वैश्वामित्र, माधुच्छन्दस व धनंजय असे तीन आहेत, किंवा वैश्वामित्र, माधुच्छन्दस आणि अघमर्षण असे तीन आहेत. अघमर्षणांचे प्रवर—वैश्वामित्र, अघमर्षण व कौशिक असे तीन आहेत. पूरणाचे प्रवर—वैश्वामित्र व पूरण असे दोन किंवा वैश्वामित्र, देवराज व पौरण असे तीन आहेत. इन्द्रकौशिकाचे प्रवर—वैश्वामित्र व इन्द्रकौशिक असे दोन आहेत. क्वचित् ग्रंथांत दुसरेही जे अकरा गण सांगितले आहेत, ते येणेंप्रमाणें:—आश्मरथ्य, साहुल, गाथिन, वैणव, हिरण्यरेतस, सुवर्णरेतस, कपोतरेतस, शालंकायन, घृतकौशिक, कथक आणि रौहिण. आश्मरथ्यांचे प्रवर—वैश्वामित्र, आश्मरथ्य आणि बाधुल हे तीन. साहुलाचे प्रवर—वैश्वामित्र, साहुल व माहुल हे तीन. गाथिनाचे प्रवर—वैश्वामित्र, गाथिन व रैवण हे तीन. हे 'रैवण' याच्या ठिकाणीं क्वचित् ग्रंथांत 'रेणुव' असा पाठ आहे. यास्त 'रेणव उदवेणव' असें म्हणतात. वैणवांचे प्रवर—वैश्वामित्र, गाथिन व वैणव हे तीन. हिरण्यरेतसांचे प्रवर—वैश्वामित्र व हैरण्यरेतस हे दोनच. सुवर्णरेतसांचे प्रवर- वैश्वामित्र, सौवर्णरेतस हे दोनच. कपोतरेतसांचे प्रवर—वैश्वामित्र व कपोतरेतस हे दोनच. शालंकायनाचे प्रवर—वैश्वामित्र, शालंकायन आणि कौशिक हे तीन. यांनाच 'कौशिक' आणि 'जन्हव' असेंही म्हणतात. घृतकौशिकांचे प्रवर—वैश्वामित्र व घृतकौशिक असे दोनच. कथकांचे प्रवर—वैश्वामित्र व कथक असे दोनच. रौहिणांचे प्रवर—वैश्वामित्र; माधुच्छंदस आणि रौहिण असे तीन आहेत—वैश्वामित्र असे जेवढे गण त्यांच्यांत परस्पर विवाहसंबंध होत नाहीं. कारण, त्या सर्वांचें गोत्र

एकच असून, प्रवरही सारखेच आहेत. कुशिकांचे व देवरातांचे प्रवर सारखेच असल्यानें, कुशिक हे देवरातांहून वेगळे किंवा त्यांच्यांतलेच आहेत याचा निर्णय होत नसल्यानें, पुढें जे देवरात सांगायचे आहेत, त्यांचा जसा जामदग्न्यांशीं विवाह होत नाहीं, त्याप्रमाणेंच कुशिकांचाही जामदग्न्यांशीं होत नाहीं असें वाटतें. धनंजयांचा अत्रि व विश्वामित्र यांच्याशीं विवाह होत नाहीं. कतांचा विवाह भरद्वाज व विश्वामित्र यांच्याशीं होत नाहीं. कारण, कातांचीं गोत्रें दोन आहेत. येथें विश्वामित्रगण संपला.

**अथ कश्यपाः ॥ तेत्रयः निध्रुवाः रेभाः शंडिलाश्चेति तत्र निध्रुवाः कश्यपाः अष्टांगिरसः इत्यादयश्चत्वारिंशदधिकशतावरानिध्रुवास्तेषांकाश्यपावत्सारनैध्रुवेतित्रयः निर्णयसिंधौतुनिध्रुवगणोत्तरंकश्यपगणमुक्त्वाकश्यपानांकाश्यपावत्सारासितेतिहिप्रवरत्रयमुक्तं अत्र शिष्टाचारोपिदृश्यते १ रेभाणांकाश्यपावत्साररैभ्येतित्रयः २ शंडिलाः कोहलाः उदमेधाइत्यादयः षष्ट्यवराः शांडिलास्तेषांकाश्यपावत्सारशांडिल्येतित्रयः अंत्यस्थानेदेवलोवाअसितोवा काश्यपासितदेवलेतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा देवलासितेतिद्वौवा एषांकश्यपानांपरस्परमविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च ॥**

**कश्यपगण**—हे कश्यप जे तीन प्रकारचे आहेत, ते येणेंप्रमाणें:—निध्रुव, रेभ व शाण्डिल. निध्रुव, कश्यप, अष्टांगिरस वगैरे जे निध्रुव चाळिसांहून अधिक शंभरांपर्यंत आहेत, त्यांचे प्रवर—काश्यप, अवत्सार व नैध्रुव हे तीन आहेत. निर्णयसिंधूंत निध्रुवगणानंतर कश्यपगण सांगून कश्यपांचे 'काश्यप, अवत्सार व असित' असे जे तीन प्रवर सांगितले आहेत, त्यांविषयीं शिष्टाचारही आढळतो. रेभांचे प्रवर—काश्यप, अवत्सार व रैभ्य हे तीन होत. शाण्डिल, कोहल, उदमेध वगैरे जे साठांपर्यंत शाण्डिल आहेत, त्यांचे प्रवर—काश्यप, अवत्सार आणि शाण्डिल्य हे तीन होत. 'शाण्डिल्य' या जागीं 'देवल' किंवा 'असित' असा प्रवर आहे. किंवा काश्यप, असित व देवल असे तीन प्रवर आहेत. यांतल्या शेवटच्याचा व्यत्यय करावा किंवा देवल व असित असे दोनच समजावे. कश्यपांचा परस्परांत विवाह होत नाहीं. कारण हे सर्व कश्यप एकगोत्री व सारख्या प्रवरांचे आहेत.

**अथ वसिष्ठाः ॥ तेचत्वारः वसिष्ठाः १ कुंडिनाः २ उपमन्यवाः ३ पराशराश्च ४ वसिष्ठावैतालकवयः एकयइत्यादयः षष्ट्यधिकाः वसिष्ठास्तेषांवासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वस्वेतित्रयः वासिष्ठेत्येकोवा १ कुंडिनाः लोहितायनाः गुग्गुलयः इत्यादयः पंचविंशत्यवराः कुंडिनास्तेषांवासिष्ठमैत्रावरुणकौंडिण्येतित्रयः २ उपमन्यवः औदलयः मांडलेखयइत्यादयः सप्तत्यवराःउपमन्यवस्तेषांवासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वस्वेतित्रयः आभरद्वसव्येतिपाठांतरं वासिष्ठाभरद्वस्विंद्रप्रमदेतिवा आद्ययोर्व्यत्ययोवा ३पराशराः कांडुशयाः वाजयइत्यादयः सप्तचत्वारिंशदवराः पराशरास्तेषांवासिष्ठशाक्त्यपराशर्येतित्रयः ४ एषांवासिष्ठानांपरस्परमविवाहः इतिवासिष्ठाः ॥**

**वसिष्ठगण**—हे जे वसिष्ठ चार आहेत, ते येणेंप्रमाणें:—वसिष्ठ, कुण्डिन, उपमन्यु व पराशर. वसिष्ठ, वैतालकवि, रंकि इत्यादिक जे साठांहून अधिक वसिष्ठ आहेत. त्यांचे प्रवर—वासिष्ठ, इन्द्रप्रमद व आभरद्वसु हे तीन आहेत. अथवा वासिष्ठ असा एकच आहे. कुण्डिन, लोहितायन, गुग्गुलि वगैरे जे पंचविसांपर्यंत कुण्डिन आहेत, त्यांचे प्रवर—वासिष्ठ, मैत्रावरण व कौण्डिण्य असे तीन आहेत. उपमन्यु, औदलि, मांडलेखि वगैरे सत्तरांपर्यंत असलेल्या उपमन्यूंचे प्रवर—वसिष्ठ, इंद्रप्रमद व आभरद्वसु असे तीन आहेत. यांतील 'आभरद्वसु' या शब्दाच्या ठिकाणीं 'आभरद्वसव्य' असा दुसरा पाठ आहे. यांचे आणखी वासिष्ठ, आभरद्वसु व इंद्रप्रमद असेही तीन प्रवर आहेत, किंवा यांच्यांतल्या आरंभींच्यांचा व्यत्यय करावा. पराशर, काण्डुशय, वाजि वगैरे जे पराशर सत्तेचाळिसांपर्यंत आहेत, त्यांचे प्रवर--वासिष्ठ, शाक्त्य व पराशर्य असे तीन आहेत. या चार वसिष्ठांचा आपसांत विवाहसंबंध होत नाहीं. येथें वसिष्ठगण संपला.

**अथागस्त्याः ॥ तेदश इध्मवाहाः १ सांभवाहाः २ सोमवाहाः ३ यज्ञवाहाः ४ दर्भवाहाः ५ सारवाहाः ६ अगस्तयः ७ पूर्णमासाः ८ हिमोदकाः ९ पाणिकाश्चेति १० इध्मवाहाः विशालाद्याः स्फालायनाः इत्यादयः पंचाशदधिकाइध्मवाहास्तेषामागस्त्यदाढर्यच्युतेध्मवाहेतित्रयः आगस्त्येत्येकोवा १ सांभवाहानामागस्त्यदाढर्यच्युतसांभवाहेतित्रयः २ सोमवाहानां सोमवाहोंत्यः आद्यौपूर्वोक्तावेव ३ एवंयज्ञवाहानांयज्ञवाहोंत्यः ४ दर्भवाहानांदर्भवाहोंत्यः ५ सारवाहानांसारवाहोंत्यः ६ अगस्तीनामागस्त्यमाहेंद्रमायोभवेति ७ पूर्णमासानामागस्त्यपौर्णमासपारणेतित्रयः ८ हिमोदकानामागस्त्यहैमवर्चिहैमोदकेतित्रयः ९ पाणिकानामागस्त्यपैनायकपाणिकेतित्रयः १० अगस्तीनां सर्वेषामविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च इत्यगस्तयः ॥**

**आगस्त्यगण**—हे जे दहा आगस्त्य आहेत, ते येणेंप्रमाणें:—इध्मवाह, साम्भवाह, सोमवाह, यज्ञवाह, दर्भवाह, सारवाह, अगस्ति, पूर्णमास, हिमोदक आणि माणिक. इध्मवाह, विशालाद्य, रसालायन वगैरे जे पन्नासांहून अधिक असे इध्मवाह आहेत, त्यांचे प्रवर—आगस्त्य, दाढर्यच्युत व इध्मवाह असे तीन आहेत, अथवा आगस्त्य एवढा एकच आहे. साम्भवाहाचे प्रवर—आगस्त्य, दाढर्यच्युत व साम्भवाह असे तीन आहेत. सोमवाहांचे प्रवर—आगस्त्य, दाढर्यच्युत व सोमवाह असे तीन आहेत. यक्षवाहांचे प्रवर—आगस्त्य, दाढर्यच्युत व यक्षवाह असे तीन आहेत. दर्भवाहांचे प्रवर—आगस्त्य, दाढर्यच्युत व दर्भवाह असे तीन आहेत. सारवाहांचे प्रवर—आगस्त्य, दाढर्यच्युत व सारवाह असे तीन आहेत. आगस्तींचे प्रवर—आगस्त्य, माहेन्द्र व मायोभवं असे तीन आहेत. पूर्णमासांचे प्रवर—आगस्त्य, पौर्णमास व पारण असे तिन आहेत. हिमोदकांचे प्रवर—आगस्त्य, हैमवर्चि व हैमोदक असे तीन आहेत. पाणिकांचे प्रवर—आगस्त्य, पैनायक व

पाणिक असे तीन आहेत. या सर्वांचा आपसांत विवाहसंबंध घडत नाहीं. कारण, ते सर्व एक गोत्री व समप्रवरी आहेत. येथें अगस्तिगण संपला.

अथ द्विगोत्राः ॥ तत्रभारद्वाजाच्छुंगात् वैश्वामित्रस्यशैशिरेः क्षेत्रेजातः शौंगशैशिरिनामऋषिः तस्यगोत्रलक्षणाक्रांतत्वाद्गोत्रत्वं तद्गोत्राणामांगिरस-बार्हस्पत्यभारद्वाजशौंगशैशिरेतिपंच आंगिरसबार्हस्पत्यभारद्वाजकात्याक्षीले-तिवा आंगिरसकात्याक्षीलेतित्रयोवा आद्योभरद्वाजोवा एषांसर्वभरद्वाजैः सर्वैर्विश्वामित्रैश्चाविवाहः संस्कृतयः पूतिमाषाः तंडयइत्याद्योष्टाविंशत्य-वराः संकृतयस्तेषामांगिरस गौरिवीतिसांकृत्येतित्रयः शाक्त्यगौरिवीतिसांकृ-त्येतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा एषांस्वगणस्थैःपूतिमाषादिभिः सर्ववसिष्ठगणै-श्चाहर्वसिष्ठसंज्ञकवक्ष्यमाणलौगाक्षिभिश्चाविवाहः केवलांगिरोगणैस्तुविवाहो-भवत्येव आंगिरसत्वेपिसगोत्रत्वाभावात् द्वित्रिप्रवरसाम्याभावाच्च केचिद्भार-द्वाजांगिरसत्वमाश्रित्यभारद्वाजशौंगशैशिरैः सहाविवाहमाहुः तन्न भारद्वाजत्वे-दृढप्रमाणाभावात् प्रयोगपारिजातेकाश्यपैःसहचौमविवाहइत्युक्तंतत्रहेतुश्चिं-त्यइतिकौस्तुभे लौगाक्षयः दार्भायणाः इत्याद्योष्टात्रिंशदधिकालौगाक्षयस्तेषां-काश्यपावत्सारवासिष्ठेतित्रयः काश्यपावत्सारासितेतिवा एतेअहर्वसिष्ठाः नक्तंकाश्यपाः दिनकर्मणिवासिष्ठत्वप्रयुक्तकार्यभाजः रात्रिकर्मणिकाश्यपत्व-प्रयुक्तकार्यभाजइत्यर्थः एतेषांसर्वैः काश्यपैः सर्वैश्चवसिष्ठैः संकृतिभिश्चा-विवाहः ॥ २ ॥

**द्विगोत्रनिर्णय**—भारद्वाज कुळांत झालेल्या शुंगापासून वैश्वामित्र (गोत्री) शैशिरीच्या क्षेत्रांत (स्त्रीच्या पोटीं) उत्पन्न झालेला जो शौंगशैशिरी नांवाचा ऋषि, तो गोत्रलक्षणयुक्त असल्यानें, त्याला गोत्रत्व आहे. त्याच्या गोत्राचे प्रवर—आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, शौंग व शैशिर असे पांच किंवा आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, कात्य व अक्षील हे पांच, अथवा आंगिरस, कात्य, आक्षील हे तीन किंवा भारद्वाज, कात्य व आक्षील हे तीन होत. यांचा विवाहसंबंध सर्व भारद्वाज व सर्व विश्वामित्र यांच्याशीं होत नाहीं. संकृति, पूतिमाष, तण्डि वगैरे जे अठ्ठाविसांपर्यंत संकृति आहेत, त्यांचे प्रवर—आंगिरस, गौरिवीति व सांकृत्य हे तीन, किंवा शाक्त्य, गौरिवीति व सांकृत्य हे तीन, अथवा यांतल्या शेवटल्यांचा व्यत्यय करूनही आहेत. यांचा विवाहसंबंध—पूतिमाषादिक, वासिष्ठगणांतले आणि अहर्वसिष्ठ नांवाचे पुढें जे लौगाक्षि सांगायचे आहेत, त्यांच्याशीं होत नाहीं, फक्त आंगिरोगणांशीं होतो. याचें कारण, ते जरी आंगिरस आहेत, तरी एकगोत्री नसून, त्यांचे दोन तीन प्रवरही समान नाहींत. भारद्वाजांस आंगिरसत्व देऊन, भारद्वाजगोत्री शौंग शैशिरीशीं त्यांचा विवाहसंबंध होत नसल्याचें जरी कांहीं ग्रंथकार सांगतात, तरी तें (त्यांचें मत) योग्य नाहीं. कारण त्यांना भारद्वाजत्व असल्याचें चोख प्रमाण नाहीं; प्रयोगपारिजातांत काश्यपांशीं यांचा विवाह होत नसल्याचें जरी सांगितलें आहे, तरी त्याचें कारण अयोग्य असल्याचें कौस्तुभांत सांगितलें

आहे. लौगाक्षि, दार्भायण वगैरे जे लौगाक्षि अडतिसांहून अधिक आहेत, त्यांचे प्रवर–काश्यप, अवत्सार व वसिष्ठ हे तीन, किंवा काश्यप, अवत्सार व असित हे तीन होत. त्यांना अहर्वसिष्ठ नक्तंकाश्यप असें म्हणतात. म्हणजे दिवसाचीं कर्में वासिष्ठप्रयुक्त करणारे व रात्रींचीं कर्में काश्यपत्वप्रयुक्ततेनें करणारे असा याचा अर्थ होतो. यांचा विवाह सर्व काश्यप, सर्व वसिष्ठ व संकृति यांच्याशीं होत नाहीं.

अथ स्मृत्यर्थसाराद्युक्ताद्विगोत्राः ॥ देवरातानांवैश्वामित्रदेवरातौदलेतित्रयः एतेषांसर्वैर्जामदग्न्यैर्विश्वामित्रैश्चाविवाहः १ धनंजयानांविश्वामित्रमाधुच्छंदसधानंजयेतित्रयःएषांसर्वैर्विश्वामित्रैरत्रिभिश्चाविवाहः अयंविश्वामित्रगणेप्रागुक्तः २ जातूकर्ण्यानांवासिष्ठात्रेयजातूकर्ण्येति एषांवसिष्ठैरत्रिभिश्चाविवाहः अयंवसिष्ठगणेसिंधावुक्तः ३ पूर्वमत्रिगणेषूक्तानांवामरथ्यादीनामत्रिपुत्रिकापुत्राणांचवसिष्ठात्रिभ्यामविवाहः अत्रिविश्वामित्राभ्यामितिकेचित् ४ पूर्वंभरद्वाजगणस्थऋक्षांतरगणत्वेनोक्तानांकपिलानामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजवांदनमातवचसेतिपंचप्रवराणांविश्वामित्रभरद्वाजाभ्यामविवाहः ५ पूर्वंविश्वामित्रेषूक्तानांकतानांवैश्वामित्रकात्याक्षीलेतित्रिप्रवराणांविश्वामित्रभरद्वाजाभ्यामविवाहः ६ अनेनैवन्यायेनपरगोत्रोत्पन्नदत्तकादीनामिदानींतनानामपिद्विगोत्रत्वात् जनकप्रतिग्रहीतृपित्रोर्द्वयोरपिसगोत्रैः सहअविवाहोज्ञेय.नात्रपुरुषसंख्या सेनशतपुरुषोत्तरमपिद्विगोत्रत्वंनापैतिक्षत्रियवैश्योतुपुरोहितगोत्रप्रवराविति सर्वसिद्धांतः ॥

**स्मृत्यर्थसारांतील द्विगोत्रनिर्णय**—देवरातांचे प्रवर–वैश्वामित्र, देवरात व व औदल असे तीन आहेत. यांचा विवाह सर्व जामदग्न्य व विश्वामित्र यांशीं होत नाहीं. धनंजयांचे प्रवर--विश्वामित्र, माधुच्छन्दस व धानंजय असे तीन आहेत. यांचा विवाह सर्व विश्वामित्र व अत्रि यांशीं होत नाहीं. हा गण पूर्वीं विश्वामित्रगणांत सांगितलेला आहे. जातुकर्ण्यांचे प्रवर–वासिष्ठ, आत्रेय व जातुकर्ण्य असे तीन आहेत. यांचा विवाह वसिष्ठ व अत्रि यांशीं होत नाहीं. हा गण निर्णयसिंधूतल्या वसिष्ठगणांत सांगितलेला आहे. पूर्वीं अत्रिगणांत सांगितलेले अत्रिकन्यापुत्र जे वामरथ्यादिक, त्यांचा विवाह वसिष्ठ व अत्रि यांशीं होत नाहीं. कोणी ग्रंथकार–अत्रि व विश्वामित्र यांशीं होत नसल्याचें सांगतात. पूर्वीं भारद्वाजगणातला ऋक्ष नांवाचा जो अन्तर्गण सांगितला आहे, त्यांतल्या आंगिरस, बार्हसात्य, भारद्वाज, वान्दन व मातवचस या प्रवरांच्या कपिलांचा विवाह विश्वामित्र व भारद्वाज यांशीं होत नाहीं. वैश्वामित्र, कात्य व अक्षील या तीन प्रवरांचे जे कात पूर्वीं विश्वामित्रगणांत सांगितले आहेत त्यांचा विवाह, विश्वामित्र व भारद्वाज यांशीं होत नाहीं. याच न्यायानें परगोत्रोत्पन्न जे दत्तकादिक त्यांना दोन गोत्रें आहेत, म्हणून जन्म देणारा बाप व दत्तक घेणारा पिता यांचे जे एकगोत्री त्यांच्याशीं त्या दत्तकाचा विवाहसंबंध होत नाहीं. यावरूनच शंभर पुरुषां-

नंतरही दत्तकाचें द्विगोत्रत्व दूर होत नाहीं. क्षत्रिय व वैश्य हे पुरोहिताच्या गोत्र-प्रवरांचे आहेत असा सिद्धान्त समजावा.

अथ स्वगोत्राज्ञाने ॥ उपनयनेयआचार्यस्तद्गोत्रप्रवरैरेवकर्माणिविवाहा-विवाहौचेतिआचार्य गोत्राज्ञानेतु दत्वात्मानंतुकस्मैचित्तद्गोत्रप्रवरोभवेत् ॥

**स्वगोत्रज्ञाननिर्णय**—आपलें स्वतःचें गोत्र माहीत नसल्यास, मुंज लावणाऱ्या आचार्याचें गोत्र व प्रवर हीं आपलींच मानून कर्मे करावींत व विवाहसंबंधाच्या जुळवाजुळवींतही आचार्याच्याच गोत्रप्रवरांवरून पाहावें. आचार्याचेंही गोत्र माहीत नसल्यास, कोणालातरी आपलें स्वतःचें (शरीर) दान करून, तें दान घेणाराचीं गोत्रप्रवरादिक आपलीं समजावींत.

अथमातृगोत्रवर्जनिर्णयः तत्रमातृगोत्रपदेनमातामहगोत्रमेववर्ज्यम् तच्च-गान्धर्वादिविवाहोढापुत्राणांसर्वेषांवर्ज्यम् ब्राह्मविवाहोढापुत्राणांतुसर्वेषां मातामहगोत्रं न वर्ज्यम् । किंतुमाध्यन्दिनानामेव मातृगोत्रंमाध्यन्दिनीयानामि-तिसत्याषाढवचनात् तथैवसर्वत्रशिष्टाचाराश्च ॥

**मातृगोत्रवर्ज्यनिर्णय**—मातृगोत्र विवाहाला वर्ज्य करावें म्हणजे मामाचें गोत्र वर्ज्य करावें. गान्धर्वादि विवाहांनीं लग्न झालेल्या बायकांच्या सर्व मुलांना मातृगोत्र वर्ज्य आहे. ब्राह्मविवाहानें लग्नें केलेल्या सर्व स्त्रियांच्या पुत्रांना, त्यांच्या मामाचें गोत्र वर्ज्य नाहीं; फक्त माध्यन्दिनशाखीयांनाच वर्ज्य आहे. कारण, माध्यन्दिनशाखीयांनीं मातृगोत्र वर्ज्य करावें, असें सत्या-षाढाचें वचनच आहे, आणि शिष्टाचारही तसाच आहे.

अथसगोत्रादिविवाहादौप्रायश्चित्तम् तत्राज्ञानतःसगोत्रसप्रवराविवाहेकन्यां-त्यक्त्वा चांद्रायणंप्रायश्चित्तंकार्यम् ज्ञानतोद्विगुणम् एवंकन्यायाएतदर्धम् एवंसापिण्डायाविवाहेपि त्यागश्चब्राह्मण्याः संभोगधर्मकार्ययोरेव मातृवत्परि-पालयेदित्यन्नादिनापालनोक्तेः यस्तुसगोत्रादिकांविवाह्योपगच्छतितस्याज्ञाने-विवाहप्रयुक्तचान्द्रायणं सगोत्रागमनप्रयुक्तंचान्द्रायणद्वयाधिकं ज्ञानतस्तु-अधिकंकल्प्यमितिकेचित् अन्येतुगुरुतल्पव्रताच्छुद्ध्येदितिगुरुतल्पसाम्योक्तेः षडब्दंप्रायश्चित्तम् अज्ञानतस्त्र्यब्दंचान्द्रायणत्रयंवेत्याहुः अज्ञानतःसगोत्रादि-षूत्पन्नानांजनकप्रायश्चित्तोत्तरंकाश्यपगोत्रेणव्यवहारःकार्योनतुत्यागः ज्ञानस्तु-सगोत्राद्युत्पन्नानांचाण्डालत्वमेव आरूढपतितापत्यंब्राह्मण्यांयश्चशूद्रजः । सगोत्रोढासुतश्चैवचाण्डालास्त्रयईरिताः १ इतियमस्मृतेः ॥

**सगोत्रविवाहप्रायश्चित्त**—नकळत जर सगोत्रा व सप्रवरा कन्येशीं विवाह झाला तर तिचा त्याग करून चान्द्रायणप्रायश्चित्त करावें व समजून झाला असल्यास दुप्पट प्रायश्चित्त करावें. कन्येनें याच अनुरोधानें अर्धें प्रायश्चित्त करावें. सापिण्डा कन्येच्या विवाहाचेंसुद्धां हेंच प्रायश्चित्त होय. (अशा) ब्राह्मणीचा त्याग फक्त संभोग व धर्मकृत्य यापुरताच करावा आणि तिचें अन्नवस्त्रा.

दिकांनीं मतिप्रमाणें पालन करावें असें वचन आहे. सगोत्रादि कन्येशीं विवाह करून जो तिच्याशीं संभोग करतो, त्यानें जर अजाणपणें तो विवाह केला असेल तर त्यानें चान्द्रायणप्रायश्चित्त करावें आणि समजून उमजून जर विवाहसंभोगादि केलीं असतील तर याहून अधिक प्रायश्चित्त करावें असें कांहीं ग्रन्थकार सांगतात. सगोत्रा कन्येशीं गमन करणारा, गुरुपत्नीशीं गमन करणाऱ्यास ( मागें ) सांगितलेल्या प्रायश्चित्तानें शुद्ध होतो, असें वचन असल्यानें, षडब्दप्रायश्चित्त करावें. अज्ञानानें (तसा प्रकार) झाला असल्यास तीन अब्द ( वर्ष ) किंवा तीन चान्द्रायणप्रायश्चित्त करण्यास दुसरे ग्रन्थकार सांगतात. अज्ञानानें सगोत्रा कन्येशीं झालेल्या विवाहापासून उत्पन्न झालेल्या पुत्रांचा सर्व व्यवहार, मातापित्यांनीं प्रायश्चित्त केल्यानंतर काश्यपगोत्रानें करावा, ( पण ) त्यांचा त्याग करूं नये. समजून सगोत्राकन्येपासून झालेली संतति चाण्डाल होय. कारण–आरूढपतिताचें अपत्य, ब्राह्मणीच्या पोटीं शूद्रापासून झालेली सन्तति आणि सगोत्रा कन्येच्या विवाहापासून झालेली प्रजा–हे सर्व चाण्डाल समजावे, असें वामनस्मृतींत वचन आहे.

अथान्येपिविवाहेनिषेधाः प्रत्युद्वाहोनैवकार्योनैकस्मैदुहितृद्वयम् । नचैकजन्योः पुंसोरेकजन्येतुकन्यके १ अत्रापवादः सोदरयोः सोदरकन्यकेवत्सरादिकालव्यवधानेमहानद्यादिव्यवधानेवाद्ये पूर्वकन्यायादत्तायाः मृतौतस्यैववरस्यद्वितीयाकन्यादेया प्रत्युद्वाहोदारिद्र्यादिसंकटेकार्यः सोदराणांतुल्यसंस्कारोवर्षमध्येनिषिद्धः गृहनिर्माणविवाहौवर्षान्तनेकार्यौ गृहप्रवेशस्यनिषेधाभावाद्गृहप्रवेशोत्तरंविवाहःकार्यः सोदरयोःपुत्रयोःकन्यापुत्रयोर्वाकन्ययोर्वाविवाहौषण्मासाभ्यन्तरेविशेषतोनिषिद्धौ पुरुषत्रयात्मककुले विवाहान्मौञ्जीबन्धः षण्मासेनिषिद्धःषण्मासशुभकार्यत्रयंनकार्यम् अत्रशुभकार्यपदेनमौञ्जीविवाहावेव तेनगर्भाधाननामकर्मादिसंस्काराणांनात्रित्वनिषेधःनवागर्भाधानादिनाचतुष्ट्वादिसंपादनम् नाग्निकार्यत्रयंभवेदित्यनेनैकवाक्यतालाघवादितिभाति भिन्नोदराणामग्निकार्यत्रयंनदोषायेतिकश्चित् केचिन्नकुर्यान्मंगलत्रमित्यस्यभिन्नार्थत्वंस्वीकृत्ययत्किंचिच्छुभकार्याणामपित्रित्वंनशुभमित्याहुः पुरुषोद्वाहात् स्त्र्युद्वाहः पुरुषोद्वाहःषण्मासाभ्यन्तरेनिषिद्धः ज्येष्ठमङ्गलाल्लघुमङ्गलंनकार्यम् बहिर्मण्डपेविहितं ज्येष्ठमङ्गलम् तद्भिन्नंलघु गर्भाधानादिकस्यप्राप्तकालस्यनानिषेधः एवंशान्त्यादेरपिनैमित्तिकस्यप्राप्तकालस्य ननिषेधः अतिपन्नस्यत्वयंनिषेधः एवंव्रतोद्यापनादीनांवास्तुप्रवेशादीनांचलघुत्वादेवविवाहाद्युत्तरंनिषेधः इदंनिषेधचतुष्टयंत्रिपुरुषात्मककुलेषण्मासाभ्यन्तरएव एवंमुण्डनद्वयनिषेधं व्रतबन्धाच्चौलनिषेधंचकेचिदाहुः ॥

**इतर कांहीं विवाहनिषेध**—आपली कन्या ज्याच्या पुत्राला दिली त्याची कन्या आपल्या पुत्राला करूं नये. याला प्रत्युद्वाह करूं नये असें म्हणतात. एकालाच दोघी सख्ख्या बहिणी (विवाहार्थ) देऊं नयेत. दोघा सख्ख्या भावांशीं दोघी सख्ख्या बहिणींचीं लग्नें लावूं नयेत. याचा अपवाद–दोघां सख्ख्या

भावांना दोघी सख्ख्या बहिणी एकवर्षाचें मध्यें अंतर टाकून किंवा महानदी वगैरेंचें मध्यें अंतर असल्यास द्याव्या. पूर्वी दिलेली कन्या मेली असल्यास दुसरी त्याला द्यावी. दारिद्र्यादि संकटकालीं प्रत्युद्वाह करावा. सख्खे भाऊ अथवा बहिणी किंवा भाऊ व बहीण यांचा एकच ( समान ) संस्कार एकाच वर्षी करणें निषिद्ध आहे. घर बांधणें व विवाह करणें हीं एकाच वर्षी करूं नयेत. गृहप्रवेशाचा निषेध सांगितला नसल्यानें, गृहप्रवेशानंतर विवाह करावा. दोन सख्खे भाऊ, दोन सख्ख्या बहिणी किंवा सोदर कन्या व पुत्र यांचे विवाह सहा महिन्यांच्या आंत करणें बरेंच निषिद्ध आहे. तीन पुरुषकुलांत विवाहानंतर सहा महिन्यांच्या आंत मुंज करणें निषिद्ध आहे. सहा महिन्यांत तीन शुभ कार्यें करूं नयेत. येथें शुभकार्यें म्हणजे मुंज व लग्न हींच होत. यावरून गर्भाधान, नामकरण वगैरे संस्कारांना त्रिपुरुषकुलाचा निषेध नाहीं. गर्भाधानादिकानें चौथ्या कार्याची पूर्ति करूं नये. तीन अग्निकार्यें करूं नयेत—या वचनानें एकवाक्यतालाघव होतें म्हणून तसें वाटतें. भिन्नोदरांचीं तीन अग्निकार्यें करण्यास हरकत नाहीं, असें कांहीं ग्रन्थकारांचें मत आहे. तीन मंगलकार्यें करूं नयेत—या वाक्याचा निराळा अर्थ करून, त्रिपुरुषकुलांत कोणतींही तीन शुभकार्यें करूं नयेत असें दुसऱ्या ग्रन्थकाराचें म्हणणें आहे. पुत्राच्या विवाहानंतर सहा महिन्यांच्या आंत कन्येचा विवाह करूं नये. ज्येष्ठमंगल केल्यानंतर लघुमंगल करूं नये. बाहेर मण्डपांत करण्याचें कार्य तें ज्येष्ठमंगल व त्याहून जें निराळें तें लघुमंगल. योग्यकालप्राप्त अशीं जीं गर्भाधानादि कृत्यें त्यांचा निषेध नाहीं. त्याचप्रमाणें कालप्राप्त अशा शान्त्यादि नैमित्तिक कर्मांचाही निषेध नाहीं. ज्या कर्मांचा काळ टळला असेल त्यांना मात्र निषेध आहे. याप्रमाणेंच व्रतोद्यापन, वास्तुप्रवेश वगैरे जीं मंगलकार्यें तीं लघु आहेत, म्हणून तीं विवाहानंतर करण्याचा निषेध आहे. हे चारी निषेध त्रिपुरुषकुलांत सहा महिन्यांच्या आंतले समजावेत. याप्रमाणेंच मुंडन व व्रतबन्ध हीं दोन कर्में झाल्यावर चौलकर्मांचा ( सहा महिन्यांच्या आंत ) निषेध असल्याचें कांहीं ग्रन्थकार सांगतात.

अथैषामपवादाः सोदराणामपिसमानसंस्कारौविवाहौचसंकटेअब्दभेदात्कार्यौ चतुर्दिनव्यवधानादेकदिनव्यवधानाद्वाकार्यौ अतिसंकटेएकदिनेकर्तृभेदेनमण्डपभेदेनवा कार्यौ द्वाभ्यांकर्तृभ्यांएकस्मिन्नपिलग्नेएकस्मिन्नपिगृहेभिन्नोदरयार्विवाहः कार्यः एवंपूर्वोक्तनिषेधचतुष्टयेपिवर्षभेदेदोषाभावः यमलयोरेककालेएकमण्डपे वासमानसंस्काराणांनदोषः एवंमातृभेदेपिषण्मासाभ्यन्तरेसमानसंस्कारेदोषोन मातृभेदेएकजातकन्ययोरेकदिनेएकमण्डपेपिवेदीभेदेनविवाहोनदोषायेतिकेचित् पुरुषत्रयात्मककुलेमङ्गलकार्योत्तरंषण्मासाभ्यन्तरेमुण्डनमुक्तंकर्मनकार्यम् अत्र सर्वत्रपुरुषत्रयगणनाप्रकारःप्रतिकूलविचारेस्पष्टीकरिष्यते मुण्डनकर्मतुचौलंनामसंस्कारादिकमाधानादिकमभ्युदयार्थमैच्छिकसर्वप्रायश्चित्तादिकंक्षौरप्रापकतीर्थयात्रादिकंचोह्यम् व्रतबन्धस्तुकात्यायनमते मङ्गलरूपत्वाद्विवाहाद्युत्तरं कार्यः अन्येषांमतेमुण्डनरूपत्वान्नकार्यः पित्रोरन्त्यक्रियादिप्राप्तमुण्डनमाकस्मिकप्राप्त-

प्रायश्चित्तमुण्डनमासन्नमरणेनसर्वप्रायश्चित्तीयमुण्डनंचकर्तव्यमेव नित्यत्वाद्दर्श-पूर्णमासचातुर्मास्यादिस्यामुण्डनेपि नदोषः नचमुण्डनंचौलमित्युक्तंव्रतोद्वाहौ-तुमङ्गलमिति वचसामण्डनमुण्डनयोःपरिगणनादाधानादीनांनदोषइतिवाच्यम् वाक्यस्योदाहरणार्थत्वात् अन्यथाव्रतोद्वाहान्नचौलकमित्येववक्तव्येमण्डला-न्नतुमुण्डनमितिसामान्येन वचनरचनानर्थक्यापातात् तस्माद्गर्भाधानादिलघु-मङ्गलादुद्वाहादिज्येष्ठमङ्गलाच्चाधानादिमुण्डनमपिवर्ज्यमितिभाति एवंसतिकु-लेबहुकर्मोपरोधःस्यादितिचेत् विवाहव्रतचूडोत्तरमङ्गलेषुपिण्डदानादौमासाद्य-ल्पकालप्रतिबन्धवत्पित्राद्यन्यमरणेल्पकालप्रतिकूलनिर्णयवच्चलघुमङ्गलोत्तरं-मासाद्यल्पकालमुण्डननिषेधकल्पनंयुक्तिबलादाश्रयणीयमितिभाति अत्रविषये-प्राचीननिबन्धेषुविशेषोनदृश्यतेतथापिधार्ष्ट्येनमयोक्तोविशेषोयुक्तश्चेद्ग्राह्यः इतिमण्डनमुण्डननिर्णयः ॥

**मण्डनमुण्डननिर्णय**—सोदर ( सख्खे ) भाऊ अथवा बहिणी यांचे समान संस्कार करणें असल्यास संकटकालीं ते एका वर्षाच्या अंतरानें, चार दिवसांच्या अंतरानें किंवा निदान एक दिवसाच्या तरी अंतरानें करावेत. अत्यन्त संकट असल्यास तीं कर्में कर्तृभेदानें ( निरनिराळ्या कर्त्यांकडून ) अथवा मण्डपभेदानें ( निरनिराळ्या मंडपांत ) करावींत. दोघे कर्ते असल्यास एकाच घरांत व एकाच मण्डपांत भिन्नोदरांचे विवाह एकाच लग्नावर करण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें वर सांगितलेल्या चारी निषेधांविषयीं वर्षभेद असल्यास दोष नाहीं. एकाच वेळीं व एकाच मंडपांत जुळ्यांचे समानसंस्कार करण्यांत दोष नाहीं. माता निराळ्या असल्यास सहा महिन्यांत समानसंस्कार करण्यास हरकत नाहीं. माता अनेक असतां एकाच बापाच्या दोन कन्यांचे विवाह एकाच दिवशीं व एकाच मंडपांत दोन निराळ्या वेदींवर ( बहुल्यांवर ) विवाह लावण्यास हरकत नाहीं, असें कांहीं ग्रन्थकार सांगतात. त्रिपुरुषकुलांतलें मंगलकार्य झाल्यानंतर सहा महिन्यांत मुंडनयुक्त करूं नये. या सर्व बाबतींसंबंधानें त्रिपुरुषगणनेचा प्रकार प्रति-कूलविचारसमयीं स्पष्टपणें सांगितला जाईल. चौल, नागसंस्कार ( नागबलि, ) आधानादिक कर्में, अभ्युदयार्थ ऐच्छिक अशीं सर्व प्रायश्चित्तादिक कर्में आणि क्षौराला कारणीभूत तीर्थयात्रा वगैरे सर्व मुंडनकर्में होत. कात्यायनाच्या मतानें व्रतबन्धकर्म मंगल असल्यानें, तें विवाहानंतर करावें. व इतरांच्या मतानें—तें मुंडन-रूप असल्यानें विवाहानन्तर करूं नये असें आहे. पितरांच्या अन्त्यक्रियेंत करावें लागणारें मुंडन, आकस्मिक प्रायश्चित्तामुळें करावें लागणारें मुंडन व मरणाच्या दारीं बसलेल्यानें सर्व प्रायश्चित्तांत केलेलें मुंडन—हीं सर्व अवश्य करावींत. दर्श, पूर्णमास, चातुर्मास वगैरेसंबंधानें करायचीं मुंडनें नित्य ( आवश्यक ) असल्यानें, तीं करण्यांत दोष नाहीं. चौल हें मुंडन होय व व्रतबन्ध आणि हीं मङ्गल होत. या वचनावरूनच मंडन व मुंडन हीं जरी निरनिराळीं सांगितलीं, तरी आधानादिक करण्यांत दोष नाहीं असें म्हणूं नये; कारण, वरचें वचन उदाहरणार्थ दिलें आहे. तसें

न मानिल्यास—व्रतबन्ध आणि विवाह हीं झाल्यावर चौल करूं नये—असें सांगण्याऐवजीं—मंगलानंतर मुंडन करूं नये—असा जो सामान्य नियम सांगितला, तो फुकट सांगितला असें होईल. यास्तव गर्भाधानादि लघुमंगल कार्यें व विवाहादि जीं ज्येष्ठमंगल कार्यें, त्यांच्यानंतर आधानादिक मुंडनही करूं नये असें वाटतें. अशानें जर कुळांतलीं अनेक कार्यें बंद होतील, तर विवाह, मुंज व चौल यांनंतर जर मंगल कार्यें झालीं तर पिंडदानादिकांसंबंधानें जसा एक महिन्याचा थोडा काळ प्रतिबंध असतो, आणि आई व बाप यांच्याशिवाय इतर कोणी मेल्यास जसा अल्प काळ प्रतिकूळ होतो, तद्वतच निर्णय सांगितल्याप्रमाणें लघुमंगलकार्यानंतर एक महिना वगैरे थोडा काळ मुंडन करूं नये, अशी कल्पना युक्तिवादानें सोयिस्कर दिसते. या बाबतींत प्राचीन ग्रंथांत निर्णय सांगितलेला जरी आढळत नाहीं. तरी मीं हा जो निर्णय धाष्टर्यानें सांगितला आहे, तो इष्ट वाटल्यास पत्करावा असा हा मंडनमुंडननिर्णय येथें सांगितला.

**अथप्रतिकूलविचारः विवाहनिश्चयोत्तरंवरस्यकन्यायावासगोत्रत्रिपुरुषात्मककुलेकस्यचित्मरणेप्रतिकूलदोषःविवाहनिश्चयश्चयवैदिकोलौकिकोवाग्राह्यः तत्रवैदिकोवाग्दानाख्यविधिनाकृतोमुख्यः लौकिकोलग्नतिथिनिश्चयादिर्वरवध्वोः शुल्कभाषाबन्धपूगीफलदानादिश्च सगोत्रत्रिपुरुषेत्युक्त्या मातामहकुलादिव्यावृत्तिः तथाच वरस्तत्पूर्वपत्नीवरमातापितरौवरपितामहपितामह्यावनूढापितृष्वसाचेतिपूर्वत्रिपुरुषी वरस्तस्यभ्रातापत्नीपुत्रानूढकन्यासहितोवरस्यानूढाभगिनीवरस्यस्नुषापुत्रौअनूढाकन्याचपौत्रस्तद्भार्याचानूढापौत्रीचेतिपरत्रिपुरुषी पितृव्यतत्पत्न्यौपितृव्यपुत्रतत्पत्न्यावनूढापितृव्यकन्याचेतिसंतानभेदेत्रिपुरुषीचेतिसगोत्रत्रिपुरुषीपुरुषपरिगणना एतेषामन्यतममरणेप्रतिकूलमितिपर्यवसितोर्थः अत्रभ्रातापुत्रपौत्रादिश्चानुपनीतोपित्रिवर्षाधिकवयाःग्राह्यः एवमनूढभगिन्यादेरपित्रिवर्षाधिकत्वंयुक्तं भाति एवंवधूकुलेप्यूह्यमेवमेवमण्डनमुण्डनादावपित्रिपुरुषगणनोह्या ॥**

**प्रतिकूलविचार**—लग्न करण्याचें ठरल्यावर वराच्या किंवा वधूच्या सगोत्रांपैकीं त्रिपुरुषकुळांत कोणी मेल्यास प्रतिकूळदोष होतो. येथें विवाहनिश्चय वैदिक किंवा लौकिक समजावा. वाग्दानविधीचा जो वैदिक तोच यांत खरा समजावा. लग्नतिथीचा निश्चय वगैरे, वरवधूंच्या अलंकारादि दानांचा भाषाबन्ध व सुपारी देणें हा लौकिकनिश्चय होय. सगोत्रांचें त्रिपुरुषकुल—या शब्दांनीं मातामहकुळाची व्यावृत्ति ( वगळणूक ) झाली. त्रिपुरुषकुलाचे प्रकार येणेंप्रमाणें—वर, त्याची पूर्वींची पत्नी, वराची आई, वराचा बाप, आजा, बापाची आई आणि लग्न न झालेली बापाची बहीण ( आत्या ) ही पूर्वत्रिपुरुषी होय. वर, त्याचा भाऊ, त्याच्या भावाची बायको, त्याच्या भावाचा मुलगा, लग्न न झालेली त्याच्या भावाची मुलगी, विवाह न झालेली त्याची बहीण, त्याची सून, त्याचा मुलगा, त्याची अविवाहित कन्या, त्याचा नातू, त्याची नातसून व त्याची अविवाहित नात–ही

परात्रिपुरुषी होय. वर, त्याचा चुलता, त्याची चुलती, त्याच्या चुलत्याचा मुलगा व त्याची बायको, त्याच्या चुलत्याची अविवाहित मुलगी आणि सन्तानभेद असल्यास त्रिपुरुषी—अशी ही सगोत्र त्रिपुरुषी होय. यांतलें जर कोणी मरेल तर प्रतिकूल होय, असा याचा अर्थ समजावा. भाऊ, मुलगा व नातू हे जरी उपनयन झालेले नसले, तरी ते तीन वर्षांचे असल्यापासून यांत धरावेत. याप्रमाणेंच लग्न न झालेल्या बहिणी वगैरेंच्या संबंधानें सुद्धां तीन वर्षांचीच मर्यादा घेणें योग्य दिसतें. वधूकुलांतल्या त्रिपुरुषींबद्दलही असेंच समजावें. मंडनमुंडनादिकांतही अशीच त्रिपुरुषगणना समजावी.

अत्रविशेषः पितामातापितामहःपितामहीपितृव्यःपूर्वपत्नीपूर्वस्त्रियाः पुत्रोभ्रातानूढाभगिनीचैनेषांमरेणविशेषतःप्रतिकूलदोषान्नैवकर्तव्योविवाहः एतदन्यत्रिपुरुषसपिण्डमरणेशान्त्यादिनादोषंपरिहृत्यविवाहःकार्यः संकटेतु-पित्रादिमरणेपिकालप्रतीक्षाशान्तिभ्यांदोषंनिर्हृत्यविवाहः कार्यः तत्रव्यवस्था निश्चयोत्तरंमातापित्रोर्द्वयोरपिमरणेकालप्रतीक्षाशान्तिभ्यामपिदोषशान्त्यभावान्नकार्योविवाहः मातापित्रोरेकैकमरणेतुशान्त्यादिनाविवाहः तत्र पितुरब्दमिहाशौचंतदर्धंमातुरेवच । मासत्रयंतुभार्यायास्तदर्धंभ्रातृपुत्रयोः १ अन्येषांतु सपिण्डानामाशौचंमाससंमितम् । तदन्तेशान्तिकंकृत्वाततोलग्नंविधीयते २ प्रतिकूलेनकर्तव्यंलग्नंयावदृतुत्रयम् । प्रतिकूलेसपिण्डस्यमासमेकंविवर्जयेत् ३ इत्यादिवाक्याश्रयेणव्यवस्थोच्यते अत्राशौचपदेनप्रतिकूलकृतंविवाहानाधिकारमात्रंकालप्रतीक्षार्थमुच्यते अतःपितृमरणेवर्षोत्तरंविनायकशान्तिंकृत्वा-संकटेविवाहःकार्यः अतिसंकटेषण्मासोत्तरंविनायकशान्तिं श्रीपूजनादिशान्तिंचकृत्वाविवाहः ततोप्यतिसंकटेमासोत्तरंशान्तिद्वयान्तेविवाहइतिसंकटतारतम्येनपक्षत्रयम् मातुर्मरणेषण्मासान्तेविनायकशान्त्याविवाहः अतिसंकटेमासान्तेशान्तिद्वयंकृत्वोद्वाहः यत्तु प्रमीतौपितरौयस्य देहस्तस्याशुचिर्भवेत् । नदैवंनापिवापित्र्यंयावत्पूर्णोनवत्सरः १ इतिपित्रोर्मृतौवर्षपर्यन्तंसर्वशुभकर्मनिषेधवचनंतत्प्राङ्निश्चयात्पित्रोर्मृतौसंकटाभावेवाज्ञेयम् भार्यामरणेमासत्रयान्तेमासान्तेवाश्रीपूजनादिशांतिः भ्रातृमरणेसार्धमासान्तेमासान्तेवा-विनायकशांतिः पुत्रमृतौसार्धमासंमासंवाप्रतीक्ष्य श्रीपूजनादिशांतिः पितृव्यमरणेमासांतेविनायकशांतिः पितामह्याअनूढभगिन्याश्चमरणेमासांतेश्रीपूजनादिशांतिः एतदन्यत्रिपुरुषसपिंडमरणेमासांतेश्रीपूजनादिशांतिः ततोविवाहः गुणवत्तरमातुर्मृतौषण्मासेन मनःखेदानपगमेवर्षप्रतीक्षा एवंगुणवत्तरभार्यायाः षण्मासपर्यंतंप्रतीक्षा ज्योतिःप्रकाशेतु अतिसंकटवशेनमात्रादिमरणेमासाधिकप्रतीक्षायाअसंभवे मासमध्येपिदशाहोत्तरंकंचित्कालं प्रतीक्ष्योक्तव्यवस्थया विनायकशांतिंश्रीपूजनादिशांतिंचकृत्वावाग्दत्वापुनर्वाग्दानादिचरेदित्युक्तम् सर्वोप्ययमपवादःसंकटेषुतारतम्येनबुधैर्याज्यःअल्पसंकटविषयेमहासंकटविषयकविधिकथनेवक्तुःकर्तुश्चदोषएव दुर्भिक्षराष्ट्रभंगादिभयेपित्रोर्मरणाशंकायां-

च्चनप्रतिकूलम् दीर्घरोगिदूरदेशस्थविरक्तानांकन्यायाः प्रौढत्वेचप्रतिकूलदोषौ-नेत्यपवादः ।

**प्रतिकूलापवादविशेष**—बाप, आई, आजा, आजी, चुलता, पूर्वींची बायको, पूर्वींच्या बायकोचा मुलगा, भाऊ व अविवाहित बहीण—यांपैकीं कोणी मेल्यास विशेष प्रतिकूल होय, म्हणून विवाह करूं नये. यांवांचून इतर कोणी जर त्रिपुरुषसपिण्डांपैकीं मेलें तर शांति वगैरेंनीं दोषपरिहार करून लग्न करावें. विशेषच अडचण असल्यास बाप वगैरे कोणी मेलें असतांही कालप्रतीक्षा व शान्ति यांनीं दोष दूर करून जें लग्न करावें त्याचा निर्णय पुढीलप्रमाणें:—लग्न करणें कायम ठरल्यावर जर बाप व आई हीं दोघें मेलीं, तर कालप्रतीक्षा व शान्ति या दोहोंनींही दोष निरसन होत नसल्यानें, विवाह करूं नये. आई किंवा बाप या दोहोंपैकीं कोणी एक मेल्यास शान्ति करून विवाह करावा. त्या बाबतींत बापाचें एक वर्ष, आईचें सहा महिने, पूर्वींच्या बायकोचें तीन महिने, भाऊ व मुलगा यांचें दीड महिना व इतर सपिण्डांचें एक महिना, असें विवाहाच्या बाबतींत अशौच असतें. अशौच संपल्यावर शान्ति करून विवाह करावा. प्रतिकूल असतांना सहा महिनेपर्यंत विवाह करूं नये. सपिण्डाच्या मरणानें प्रतिकूल असल्यास एक महिन्यानंतर विवाह करावा, वगैरे जीं वचनें आहेत त्यांच्याच आधारानें जी व्यवस्था आतां सांगतों ती अशी:—येथें 'अशौच' या शब्दानें प्रतिकूलानें होणाऱ्या विवाहाचा अनधिकार तेवढा कालप्रतीक्षेकरितां सांगितला आहे, म्हणून बाप मेल्यावर एक वर्षानें विनायकशान्ति करून संकट असल्यास लग्न करावें. अति संकट असल्यास सहा महिन्यांनीं विनायकशान्ति व श्रीपूजनादि शान्ति करून विवाह करावा. त्याहूनही अत्यन्तात्यन्त संकट असल्यास एक महिन्यानंतर वरील दोन्ही शान्ति करून विवाह करावा. कमीजास्तीच्या प्रमाणानें संकटाचे असे तीन पक्ष होतात. आई मेल्यास सहा महिन्यांनीं विनायकशान्ति करून लग्न करावें. अतिसंकटकाळीं दोन्ही शान्ति करून एक महिन्यानंतर लग्न करावें. ज्याचीं आईबापें मृत होतात त्याचा देह एक वर्षपर्यंत अशुद्ध असतो. एक वर्षपर्यंत अशानें देवकर्म व पितृकर्म हीं करूं नयेत. या वचनाप्रमाणें बाप किंवा आई यांच्या मरणानंतर एक वर्षपर्यंत कोणचेंही शुभकर्म करण्याचा जो निषेध सांगितला, तो विवाहनिश्चय झाल्यानंतर जर पिता किंवा माता मृत होईल तर, किंवा संकटकाल नसेल तरच समजावा. बायको मेल्यास तीन किंवा एक महिन्यानंतर श्रीपूजनादि शान्ति करावी. भाऊ मेल्यास दीड किंवा एक महिन्यानंतर विनायकशान्ति करावी. मुलगा मेल्यास दीड किंवा एक महिन्यानंतर श्रीपूजनादि शान्ति करावी. आजी किंवा लग्न न झालेली बहीण मेल्यास एक महिन्यानें श्रीपूजनादि शान्ति करावी. यांहून इतर कोणी त्रिपुरुषसपिण्ड जर मेलें तर एक महिन्यानें श्रीपूजनादि शान्ति करावी. याप्रमाणें शान्तीनंतर विवाहकार्य करावें. अति गुणवती अशी आई मेल्यावर सहा महिन्यांनींही ज मनांतलें दुःख गेलें नाहीं, तर एक वर्ष वाट पाहावी. अति गुणवती

बायको मेल्यासही याचप्रमाणें सहा महिने थांबावें. ज्योतिःप्रकाश ग्रंथांत आई वगैरे मेल्यास एक महिन्यापेक्षां ज्यास्त वाट पाहाण्यास अतिसंकटामुळें अशक्य झाल्यास किंवा महिन्यांतही सहा दिवसांनंतर थोडया दिवसांनीं, वर सांगितल्याप्रमाणें विनायकशान्ति, श्रीपूजनादि शान्ति व नंतर गोदान हीं ( तीन ) करून पुन्हा वाग्दान वगैरे करण्यास सांगितलें आहे. हे सर्व अपवाद, खरेंच संकट असल्यास ब्राह्मण्यांनीं कमीअधिक प्रमाणानें उपयोगांत आणावेत. क्षुल्लक संकट असतां महान् संकटाचा विधि सांगितल्यास, सांगणारा व करणारा हे दोघेही दोषपात्र होतात. दुर्भिक्ष, राष्ट्रनाश वगैरे भय, माता किंवा पिता यांच्या मृत्यूची शंका—हीं असतां प्रतिकूलाचा दोष नाहीं. फार दिवसांचा रोगी, दूरदेशीं राहाणारा, विरक्त व कन्येचें प्रौढत्व—यांत प्रतिकूलाचा दोष नाहीं—असा अपवाद समजावा.

श्रीपूजनादिशांतिश्चश्रियेजातइतिश्रियंइदंविष्णुरितिविष्णुंगौरीर्मिमायेतिगौरींत्र्यम्बकमितिरुद्रंपरंमृत्योरितियमंचसंपूज्याष्टोत्तरशततिलाज्यंजुहुयात् भूः-स्वाहामृत्युर्नश्यतां स्नुषायैसुखंवर्धतांस्वाहेतिततोहोमंसमाप्याथगोद्वयंदक्षिणा-भवेदितिकौस्तुभेद्रष्टव्या इतिप्रतिकूलविचारः ॥

**श्रीपूजनादि शान्ति**—‘श्रिये जात०’ या मंत्रानें लक्ष्मीपूजन, ‘इदं विष्णु०’ या मंत्रानें विष्णुपूजन, ‘गौरीर्मिमाय०’ या मंत्रानें गौरीपूजन, ‘ त्र्यम्बकं० ’ या मंत्रानें रुद्रपूजन आणि ‘परं मृत्यो०’ या मंत्रानें यमपूजन करून, ‘भू स्वाहा मृत्युर्नश्यातां स्नुषायै सुखं वर्धतां स्वाहा’ या मंत्रानें तिलघृतांचा १०८ होम करावा आणि नंतर होमसमाप्ति करून गोप्रदानें व दक्षिणा द्यावी. अशी जी कौस्तुभांत शान्ति सांगितली आहे ती पाहावी. याप्रमाणें येथें प्रतिकूलविचार संपला.

अथान्त्यकर्माभावप्रतिबन्धनिर्णयः प्रेतकर्माण्यनिर्वर्त्यचरेन्नाभ्युदयक्रियाम् । आचतुर्थंततःपुंसिपंचमेशुभदंभवेत् १ अत्रप्रेतकर्मपदेनसपिण्डीकरणात्पूर्व-भाविकर्माणिसपिण्डीकरणंचसपिण्डीकरणोत्तरंपार्वणविधिनोक्तानिमासिकानि-चोच्यंते सपिंडीकरणादर्वागपकृष्यकृतान्यपि । पुनरप्यपकृष्यन्तेवृद्ध्युत्तर-निषेधनात् १ इत्यनुमासिकानाप्यपकर्षोक्तेःअभ्युदयपदेननान्दीश्राद्धयुक्तंकर्म-मात्रंग्राह्यम् कैश्चिद्विवाहाद्येवग्राह्यमित्युक्तम् आचतुर्थमितिनान्दीश्राद्धकर्तारं-पुरुषमारभ्यजनकचतुःपुरुषीजन्यचतुःपुरुषीसंतानभेदेचचतुःपुरुषीसगोत्रागृह्यते तथाचनान्दीश्राद्धकर्तुःपितृपितामहप्रपितामहाः पत्नीसहिताः कर्तुर्भार्यापुत्र-पौत्रप्रपौत्रास्तद्भार्याश्चभ्रातातत्पुत्रपौत्रास्तद्भार्याःपितृव्यतत्पुत्रपौत्रास्तद्भार्याश्च प्रपितामहस्यपुत्रपौत्रप्रपौत्रस्तद्भार्याश्चैतेषांमृतानामनुमासिकान्तप्रेतकर्माकरणे-मंगलंनकार्यमित्यर्थः नान्दीश्राद्धकर्ताऽत्रमुख्यएवग्राह्योनतुमातुलादिर्गौणः मृतपितृकस्योपनयनादौसंस्कार्यमारभ्यैवचतुःपुरुषीगणना मातामहादेर्भिन्नगो-त्रत्वेपिनान्दीश्राद्धदेवतात्वात्प्रेतकर्माभावेमंगलंनभवति मातामह्यादेःस्वात-

न्त्येणदेवतात्वाभावात्दशाहान्त्यकर्माभावेपिमंगलप्रतिबन्धोनास्ति इत्यन्त्यकर्माभावनिमित्तकमंगलप्रतिबंधनिर्णयः ॥

**अन्त्यकर्माभावप्रतिबन्धनिर्णय**—प्रेतकर्म संपविण्याच्या आधीं चार पुरुषांच्या (आचतुर्थ) सापिण्डयांपर्यंत मंगलकार्य करूं नये. त्यानंतर पांचव्या पुरुषापासून शुभदायक होतें—या वचनांतला 'प्रेतकर्म' हा शब्द—सपिण्डी करण्याच्या आधीं करायचीं कर्में, सपिण्डी आणि सपिण्डीनंतर पार्वणविधीनें करायाचीं जीं मासिकें—त्या सर्वांना लागतो, (म्हणजे येथपर्यंत प्रेतकर्म हा शब्द व्यापक आहे.) सपिण्डीकरणाच्या आधीं अपकर्षानें (पुढचें आधीं करणें) केलेलीं कर्में पुन्हां अपकर्षानें करावींत; कारण—वृद्धिश्राद्धनंतर प्रेतकर्म करण्याचा निषेध सांगितला आहे—असें अनुमासिकांच्या अपकर्षाबद्दल वचन आहे. 'अभ्युदय' शब्दानें नान्दीश्राद्धयुक्त जें कर्म तेवढेंच ग्रहण करावें. कोणी ग्रन्थकार विवाहादिकच घ्यावें असें म्हणतात. 'आचतुर्थ' या शब्दानें नान्दीश्राद्ध करणाऱ्या पुरुषापासून आरंभ करून बापापासून मागचे चार पुरुष, पुढें होणारे चार पुरुष आणि सन्तानभेद असल्यास ते चार पुरुष इतक्या सगोत्र पुरुषांचें जें ग्रहण करावें ते पुरुष येणेंप्रमाणें:—नान्दीश्राद्ध करणाऱ्याचा बाप, आजा, पणजा हे सपत्नीक (बायकांसह). नान्दीश्राद्ध करणाऱ्याची बायको, मुलगे, नातू, पणतू व त्यांच्या बायका. (नान्दीश्राद्ध करणाऱ्याचा) भाऊ, त्याचे मुलगे, नातू व त्यांच्या बायका. चुलता, त्याचे मुलगे, नातू व त्यांच्या बायका. आजाचे मुलगे, नातू, पणतू व त्यांच्या स्त्रिया यांपैकीं जर कोणी मेलें, व त्यांचें अनुमासिकापर्यंतचें प्रेतकर्म जर केलें नसलें, तर मंगलकार्य करूं नये. या ठिकाणीं नान्दीश्राद्ध करणाराच मुख्य कर्ता समजायचा. मातुलादि गौण कर्ता धरायचा नाहीं. ज्याचा बाप मेलेला असेल त्याच्या उपनयनादिकांसंबंधानें, त्या संस्कार्य (ज्याचा संस्कार करायचा तो) बटूपासूनच आरंभ करून चार पुरुषांची गणना (मोजणी) करावी. आईचा बाप, आजा व पणजा हे जरी भिन्न गोत्री असतात, तरी ते नान्दीश्राद्धांत देवतारूपी असल्यानें, त्यांचें प्रेतकर्म झालेलें नसल्यास, मंगलकार्य होत नाहीं. आईची आई, आजी व पणजी या नान्दीश्राद्धांत स्वतंत्रपणें देवता नसल्यानें, त्यांचें जरी दशाहान्त प्रेतकर्म झालें नसलें, तरी मंगलकार्य करण्यास आडकाठी नाहीं; अन्त्यकर्म पूर्ण न झाल्यानें मंगलकार्याला होणाऱ्या प्रतिबन्धासंबंधानें, याप्रमाणें निर्णय आहे.

**अथचतुर्थीकर्ममध्येदर्शादिनिर्णयः** मौंजीविवाहयोर्नान्दीश्राद्धमारभ्यमण्डपोद्वासनपर्यंतमध्येदर्शादिनंयथानपतेत्तथाकार्यं दर्शान्यत्पित्रोः क्षयाहादिश्राद्धदिनंयदिज्ञानादज्ञानाद्वापततितदात्रिपुरुषसापिंडैर्विवाहादिमंगलसमाप्त्युत्तरंश्राद्धंकार्यं एवंचदर्शान्यश्राद्धस्यैवस्वरूपतांविवाहमध्येनिषेधः नतुदर्शवच्छ्राद्धरहितस्यापिश्राद्धतिथिमात्रस्य वृत्तेविवाहेपरतस्तुकुर्याच्छ्राद्धमित्याद्युक्तेः एतेनसंक्रांतिमन्वाद्यष्टकादिदिनानांश्राद्धदिनत्वाद्दर्शवन्मध्येपातोनिषिद्धइति-

शंकानिरस्ता तेनषण्णवतिश्राद्धकर्तृभिःसपिंडैर्मध्यपतितमन्वादेःप्रायश्चित्तादि नासंपत्तिःसंपाद्या इतिचतुर्थीकर्ममध्येदर्शादिनिर्णयः ॥

**लग्नाच्या चार दिवसांतला दर्शनिर्णय**—मुंज किंवा लग्न यांच्या नान्दीश्राद्धाला आरंभ करून मण्डपोद्वासन ( देवदेवकसमाप्ति ) होईपर्यंत मध्येंच दर्शदिवस येणार नाहीं असें करावें. दर्शाशिवाय मातापितरांचा क्षयदिवस ( मृत्युतिथि ) वगैरे जर समजून अथवा न समजून मध्यंतरीं येईल तर त्रिपुरुषसपिण्डांनीं विवाहादि मंगलकार्य समाप्त करून नंतर श्राद्ध करावें. याप्रमाणें दर्शावांचून इतर श्राद्धांचाच विवाहादिकांत स्वरूपतः ( स्पष्टपणें ) निषेध सांगितला. दर्शाच्या निषेधाप्रमाणें श्राद्धरहित अशा श्राद्धतिथिमात्राचा निषेध सांगितला नाहीं; कारण—विवाहानंतर श्राद्ध करावें—असें जें वचन आहे, त्यावरून—संक्रान्ति, मन्वादि, अष्टकादि वगैरे श्राद्धदिन असल्यानें 'ते मध्यें येण्याचा निषेध आहे कीं काय ?' या शंकेचें निरसन झालें. यावरून षण्णवति श्राद्ध करणाऱ्या सपिण्डांनीं, मन्वादि दिवस जर विवाहांत येईल, तर प्रायश्चित्तादिकांनीं त्याची सिद्धि करावी. असा हा विवाहांतल्या चार दिवसांत येणाऱ्या दर्शत्यादिकांचा निर्णय आहे.

अथविवाहादौरजोदोषसूतकनिर्णयः प्रारम्भात्प्रागारम्भोत्तरंवामातुः पितृव्यादेः कर्त्रन्तरस्यपत्न्यावारजोदोषेयद्वक्तव्यंतद्व्रतबन्धप्रकरणेविस्तरेणोक्तंततएवज्ञेयम् रजोदोषजननाशौचादिसंभावनायांनान्दीश्राद्धस्यापकृष्यानुष्ठानेदिनावधिः एकविंशत्यहर्यज्ञेविवाहेदशवासराः । त्रिषट्चौलोपनयनेनान्दीश्राद्धंविधीयते १ दर्शदिनाद्यतिक्रमेपुनर्नान्दीश्राद्धमित्यर्थात्सिद्धम् नान्दीश्राद्धोत्तरंसूतकमृतकयोः प्राप्तौनविवाहादिप्रतिबन्धः विवाहव्रतयज्ञेषुश्राद्धेहोमेऽर्चनेजपे । आरब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकम् १ प्रारम्भोवरणंयज्ञेसंकल्पोव्रतसत्रयोः । नान्दीमुखंविवाहादौश्राद्धेपाकपरिक्रिया २ इत्युक्तेः इदंसन्निहितमुहूर्तान्तराभावादिसंकटेएवज्ञेयम् संकटाभावेतु नान्दीश्राद्धेजातेपिसूतकान्ते मुहूर्तान्तरेएवमंगलम् सर्वोप्याशौचापवादोऽनन्यगतिकत्वे आर्तौचज्ञेयइतिसिन्धूक्तेः तेनव्रतेसंकल्पोत्तरमाशौचेपिविप्रद्वारैवपूजादि यज्ञादौमधुपर्कविधिनावरणोत्तरमपिऋत्विगन्तरालाभादिकेऽनन्यगतौसंकटेएवचमधुपर्कविधिनावृतस्याशौचाभावः एवंजपहोमादावप्यूह्यम् श्राद्धे पाकपरिक्रिया पाकप्रोक्षणम् एतदप्यार्तिसत्त्वे महासंकटेप्रारम्भात्प्रागपिसूतकप्राप्तौकूश्माण्डमन्त्रैर्घृतहोमंकृत्वापयस्विनींगांदत्वापञ्चगव्यंप्राश्यशुद्धश्चूडोपनयनोद्वाहप्रतिष्ठादिकमाचरेत् उपकल्पितबहुसंभारस्यसन्निहितलग्नान्तराभावेननाशाद्यापत्तावप्येवंशुद्धिःइदंजननाशौचमात्रविषयमितिमार्तण्डादौ ॥

**विवाहांतील रजोदर्शन व सुतक यांचा निर्णय**—विवाहादिकांस आरंभ करण्याच्या आधीं किंवा आरंभ केल्यानंतर वराच्या किंवा वधूच्या आईला किंवा चुलता वगैरे

कर्त्याच्या बायकोला जर विटाळशीपणा आला तर काय करावें, त्याचा निर्णय उपनयनप्रकरणांत जो विस्तारपूर्वक सांगितलाच आहे, तोच विवाहसंबंधीही समजावा. रजोदर्शन, सोयर वगैरे गोष्टींचा संभव असल्यास, नान्दीश्राद्ध जर पूर्वी अपकर्षानें केलें तर तें किती दिवस राहातें, तें आतां सांगतों. यज्ञासंबंधीं एकवीस दिवस, विवाहासंबंधीं दहा दिवस आणि चौल व उपनयन यांसंबंधानें अनुक्रमें तीन व सहा दिवस, याप्रमाणें नान्दीश्राद्ध करावें. दहा दिवस वगैरे जी संख्या सांगितली ती जर टळली, तर पुन्हा नान्दीश्राद्ध केलें पाहिजे, हें यावरूनच सिद्ध होतें. नान्दीश्राद्धानंतर सोयर किंवा सुतक आलें तरी विवाहाला तें प्रतिबंधक होत नाहीं. कारण—विवाह, व्रत, यज्ञ, श्राद्ध, होम, अर्चन व जप यांना आरंभ केल्यावर अशौच नाहीं; आरंभापूर्वी तें आहे. यज्ञाचा आरंभ म्हणजे ऋत्विजाचें वरण ( पसंत करणें ), व्रत व सत्र यांचा आरंभ म्हणजे त्यांचा संकल्प, विवाहादिकांचा आरंभ म्हणजे नान्दीश्राद्ध व श्राद्धप्रारंभ म्हणजे पाकपरिक्रिया—असें वचन आहे. संकट असून जवळचा दुसरा मुहूर्त न मिळाल्यास हा निर्णय अमलांत आणावा. संकट नसल्यास नान्दीश्राद्ध झालें असतांही, सुतक संपल्यावरच दुसऱ्या मुहूर्तास मंगलकार्य करावें. अशौचासंबंधानें सांगितलेले सर्व अपवाद, दुसरा मार्ग जर नसेल आणि आपत्ति असेल, तरच अमलांत आणावेत—असें जें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे, त्यावरून व्रतसंबंधाचा संकल्प झाल्यानंतर जर अशौच येईल तर, पूजा वगैरे ब्राह्मणाकडूनच करवावी. यज्ञांत मधुपर्कविधीनें ऋत्विजाचें वरण झाल्यावर, दुसरा ऋत्विज मिळत नाहीं वगैरे न टाळण्यासारखें संकट आलें, तरच मधुपर्कविधीनें पसंत केलेल्या ऋत्विजाला अशौच नाहीं. जप, होम वगैरे संबंधानेंही हेंच समजावें. श्राद्धांतली पाकप्रक्रिया म्हणून जी वर सांगितली, तिचा अर्थ पाकप्रोक्षण असा जो आहे, तो सुद्धां संकटावस्थेंतच आंगिकारावा. महान् संकट जरी असलें तरी आरंभाच्या आधीं जर सुतक आलें, तर कूष्माण्डमंत्रांनीं तुपाचा होम करून दुभत्या गाईचें दान करावें आणि पंचगव्य पिऊन शुद्ध झाल्यावर—चूडाकर्म, उपनयन, विवाह, प्रतिष्ठा वगैरे करावीत. जवळचा दुसरा मुहूर्त नाहीं आणि तयार केलेल्या सामुग्रीचा तर नाश होणार, अशा आपत्कालीं देखील अशौच शुद्धि समजावी. हा सर्व निर्णय सोयरासंबंधानेंच ( जननाशौच ) आहे, असें मार्तण्ड वगैरे ग्रंथांत म्हटलें आहे.

कूश्माण्डहोमादिनाशुद्धिपूर्वकंसूतकमृतकयोर्मध्येआरब्धेविवाहादौविप्राणांपूर्वसंकल्पितान्नभोजनेदोषोन पाकपरिवेषणादिकमपिसूतकिभिः कार्यं होमादिविधिनाशुद्धिसंपादनादितिकौस्तुभेस्थितम् नैतद्युक्तं लोकविद्विष्टत्वादतः परगोत्रैरेवान्नदानंयुक्तंभाति नान्दीश्राद्धोत्तरंसूतकमृतकयोः प्राप्तौपूर्वमन्नसंकल्पाभावेपिविवाहोत्तरकालसंकल्पितान्नभोजनंविप्रैःकार्यम् अत्रापि परैरन्नंप्रदातव्यंभोक्तव्यंचद्विजोत्तमैरितिसर्वसंमतम् परैरसगोत्रैरितिसिन्धुमयूखादौव्याख्यानात् पूर्वसंकल्पितान्नस्यापिभोजनसमयेसूतकप्राप्तौभोक्तृभिर्भुक्तशेषंत्यक्त्वा-

परगृहोदकैराचान्ततादिविधेयम् पाकशेषः सूतकिभिर्भोक्तव्यः भुञ्जानेषुचविप्रेषु त्वन्तरामृतसूतके । अन्यगेहोदकाचान्ताइतिस्मृतेः नान्दीश्राद्धोत्तरंभोजनादन्यकालेसूतकप्राप्तौसूतकिगृहेभोक्तव्यम् भुञ्जानेषुसूतकप्राप्तौभोक्तभिः पात्रस्थमप्यन्नंत्याज्यमितिवाचनिकएवविशेषः नहिवचनस्यातिभारइतिन्यायात् ममतुभुञ्जानेष्वितिवाक्यमारब्धानारब्धसर्वकर्मसुअसंकल्पितान्नविषयमितिभाति इतिविवाहादौरजोदोषसूतकप्राप्तिनिर्णयः ॥

**अशौचान्नभक्षणनिर्णय**—कूष्माण्डहोमादिकांनीं शुद्धि करून, सोयर व सुतक यांत आरंभ केलेल्या विवाहादिकांत, पूर्वीं तयार ठेवलेलें अन्न ब्राह्मणांनीं खाण्यास दोष नाहीं. पानांवर वाढण्याचे पदार्थही अशौचांनींच वाढावेत; कारण होमादि विधि केल्यामुळें त्यांना शुद्धि येते, असें जें कौस्तुभांत सांगितलें आहे, तें योग्य दिसत नाहीं; कारण, ती गोष्ट लोकांत निन्दास्पद होते. परगोत्री माणसांनींच वाढावें हे योग्य दिसतें. नान्दीश्राद्ध केल्यानंतर जरी सोयर किंवा सुतक हीं येतील, तरी पूर्वीं जरी अन्न तयार केलें नसलें तरी विवाहानंतर तयार केलेल्या अन्नाचें ब्राह्मणांनीं भोजन करावें. अशा प्रसंगीं सुद्धां—परगोत्रांतल्या माणसांनीं ( पर ) अन्न वाढावें व ब्राह्मणांनीं जेवावें—हें सर्वसम्मत आहे. 'पर' म्हणजे परगोत्री असा निर्णयसिन्धु, मयूख वगैरे ग्रंथांत अर्थ दिलेला आहे. पूर्वीं तयार केलेल्या अन्नाचें जेवण जेवीत असतां जर सुतक येईल, तर जेवणाऱ्यांनीं राहिलेलें ( पानांतलें ) अन्न टाकून दुसऱ्याच्या घरांतल्या पाण्यानें आंचवावें व शिल्लक ( तयार पाकांतलें ) अन्न सुतक्यांनीं खावें. कारण ब्राह्मण जेवीत असतां मध्येंच जर ( यजमानाला ) मृताशौच ( सुतक ) येईल तर दुसऱ्याच्या घरांतल्या पाण्यानें आंचवावें—असें श्रुतिवचन आहे. नान्दीश्राद्ध केल्यानंतर जेवणाव्यतिरिक्त इतर वेळीं जर सुतक येईल, तर सुतक्याच्या घरीं जेवावें व जेवीत असतां जर सुतक येईल तर मात्र पानांतलें अन्न टाकून उठावें—असा जो निर्णय आहे, तो केवळ ( पुस्तकांत ) वाचण्यापुरताच आहे, आणि वाचनिक निर्णयाचें महत्त्व विशेष नाहीं—असा न्याय आहे. यावरून मला तर असें वाटतें कीं, 'ब्राह्मण जेवीत असतां मध्येंच सुतक आल्यास दुसऱ्याच्या घरांतल्या पाण्यानें आंचवावें'—असें जें वाक्य आहे तें—आरंभ केलेल्या किंवा न आरंभिलेल्या सर्व कर्मांत पूर्वीं तयार झालेल्या अन्नासंबंधानें असावें. याप्रमाणें विवाहादिकांत–रजोदर्शन, सुतक वगैरे प्राप्त झालीं असतां, त्यासंबंधाचा जो निर्णय सांगितला, तो येथें संपला.

अथकन्यारजोदोषनिर्णयः विवाहात्पूर्वंकन्यायारजोदर्शनेमातृपितृभ्रातॄणांनरकपातः कन्यायाःवृषलीत्वंतद्भर्तुर्वृषलीपतित्वम् अत्रशुद्धिप्रकारः कन्यादाता ऋतुसंख्ययागोदानानिएकंवागोदानंयथाशक्तिब्राह्मणभोजनंवा कृत्वाकन्यादानेयोग्योभवेत् कन्यातूपवासत्रयान्तेगव्यपयःपानंकृत्वाविप्रकुमार्यैसरत्नभूषणंदत्त्वोद्वाहयोग्याभवति वरश्चकूश्माण्डहोमपूर्वकंतामुद्वहन्न दोषीस्यादिति विवाहहोमकालेरजोदोषेतांस्नापयित्वायुञ्जानेतितैत्तिरीयमन्त्रेणप्रायश्चित्तं

**हुत्वाहोमतन्त्रंसमापयेत् यदातुदातृभावाद्रजोदर्शनं तदाकन्यावर्षत्रयंप्रतीक्ष्य- स्वयंवरंवृणुयात् नात्रवरस्यापिदोषः इतिकन्यारजोदोषनिर्णयः ॥**

**कन्यारजोदर्शननिर्णय**—विवाह होण्याच्या आधीं जर कन्येला रजोदर्शन होईल, तर तिची आई, बाप व भाऊ यांना नरकप्राप्ति होतेच. कन्येला जें वृषलीपतित्व येतें, त्याची शुद्धि पुढीलप्रमाणें करावीः—कन्येला जितक्या वेळां ऋतु प्राप्त झाला असेल तितकीं गोप्रदानें किंवा एक गोप्रदान अथवा यथाशक्ति ब्राह्मणभोजन–हें केल्यानें कन्या कन्यादानाला योग्य होते. कन्येनें-ही तीन दिवस उपास करून गाईचें दूध प्यावें व ब्राह्मणकुमारीला रत्नयुक्त अलं-काराचें दान करावें, म्हणजे ती विवाहाला योग्य होते. वरानें कूष्माण्ड होम करून वधूला वरावें. म्हणजे त्याला दोष लागत नाहीं. विवाहहोमप्रसंगीं जर रजोदर्शन होईल, तर कन्येला स्नान घालून 'युंजान०' तैत्तिरीय मंत्रानें प्रायश्चित्तहोम करून होम-तंत्र संपवावें. दान करणारा कोणी नसल्यानें जर रजोदर्शन होण्याचा प्रसंग आला, तर तिनें तीन वर्षेंपर्यंत ( दान करणारा मिळण्याची ) वाट पाहून, मग स्वतःच पति वरावा. अशा कन्येचें दान घेणाऱ्या वराला दोष नाहीं. असा हा कन्यारजो-दर्शनाचा निर्णय आहे.

**अथक्षयपक्षादिविचारः पक्षमध्येतिथिद्वयस्यक्षयेणयस्त्रयोदशदिनात्मकः पक्षःसक्षयपक्षः तदाबहुप्रजासंहारोराजसंहारोवा क्षयपक्षेचौलोपनयनोद्वाहा-दिवास्तुकर्मादिशुभंनकार्यम् क्षयमासाधिमासगुरुशुक्रास्तादौविवाहनिषेधः प्रथमपरिच्छेदे एवं सिंहस्थगुरुनिषेधनिर्णयोऽपिप्रथमपरिच्छेदेद्रष्टव्यः क्षयसंव त्सरोपिनिषिद्धः शीघ्रगत्यापूर्वराशिशेषमतिक्रम्यराश्यन्तरसंचारोतिचारस्तं प्राप्तोगुरुःपुनःपूर्वराशिंवक्रगत्यायदिनायातितदासक्षयसंवत्सरःसर्वकर्मसुवर्ज्यः तत्रमेषवृषभवृश्चिककुम्भमीनराशिषु नदोषःकेचिद्गोदादक्षिणदेशेकोप्यतिचारा-दिगुरुदोषोनेत्याहुः इतिक्षयपक्षादिविचारः ॥**

**क्षयपक्षनिर्णय**—एका पंधरवड्यांत दोन तिथींचा क्षय होऊन जो तेरा दिव-सांचा पक्ष होतो, त्याला क्षयपक्ष म्हणतात. क्षयपक्षांत पुष्कळ राजांचा व प्रजांचा संहार होतो. क्षयपक्षांत चौल, उपनयन, विवाह, वास्तुकर्म वगैरे शुभ कार्यें करूं नयेत. क्षयमास, अधिक मास, गुरुशुक्रांचे अस्त इत्यादिकांतला विवाहनिषेध पहिल्या परिच्छेदांतच जो सांगितला आहे, तो पाहावा. त्याप्रमाणेंच सिंहस्थ गुरु असतांनाही जो निर्णय पहिल्या परिच्छेदांत सांगितला आहे, तो पाहावा. क्षयसंवत्सरहि याप्रमाणेंच निषिद्ध आहे. वेगानें पूर्वराशीचा शेष उल्लंघून दुसऱ्या राशींत संचार करणें याला अतिचार म्हणतात. तसा अतिचार करून जर गुरु पुन्हां वक्रगतीनें पूर्व राशीला आला नाहीं, तर तो क्षयसंवत्सर होतो. असा हा क्षयसंवत्सर सर्व कर्मांना जरी वर्ज्य समजावा असें आहे, तरी त्यांतल्यात्यांत–मेष, वृषभ, वृश्चिक, कुम्भ व मीन या राशींच्या गुरूचा दोष नाहीं. गोदावरीच्या दक्षिणेस गुरूच्या अतिचाराचा दोष नसल्याचें कांहीं ग्रन्थकार सांगतात. असा हा क्षयपक्ष-विचार येथें संपला.

अथवधूवरयोर्गुरुरविबलम् मुख्यंगुरुबलंवध्वावरस्येष्टंरवेर्बलम् । द्विपञ्च-सप्तनवैकादशस्थोगुरुःकन्यायाःशुभः जन्मतृतीयषष्टदशस्थानेषुपूजाहोमात्मक-शांत्या शुभः चतुर्थाष्टमद्वादशस्थानेषुदुष्टफलः कर्कधनुर्मीनगश्चतुर्थादिस्थाने-ष्विनदुष्टः संकटे चतुर्थद्वादशस्थोद्विवारमष्टमस्त्रिवारंहोमादिरूपपूजयार्चितः-शुभः वरराशेस्त्रिषद्दशैकादशस्थानेरविःशुभः अन्यत्रग्रहमखोक्तपूजयाशुभः गुरुपूजाप्रकारउपनयनप्रकरणेउक्तः ॥

**वधूचें गुरुबल व वराचें रविबल**—वधूला मुख्यत्वें गुरुबल आणि वराला रविबल हीं (विवाहार्थ) लागतात. जन्मराशीपासून–दुसरा, पांचवा, सातवा, नववा आणि अकरावा–या स्थानांतले गुरु कन्येला शुभकारक होत. पहिल्या, तिसऱ्या, सहाव्या आणि दहाव्या स्थानचे गुरु वाईट फल देणारे असतात. कर्क, धनु व मीन या राशींचा गुरु चौथ्या वगैरे स्थानीं असला तरी तो दुष्ट नाहीं. संकटकाळीं चौथ्या व बाराव्या स्थानचा गुरु, दुप्पट होमादिरूप पूजा केल्यानें आणि आठव्या स्थानचा तिप्पट होमादिरूप पूजनानें शुभ होतो. वराच्या राशीपासून–तिसरा, सहावा, दहावा आणि अकराव्या स्थानचा रवि शुभ होय. इतर स्थानचा (रवि) ग्रहमखांत सांगितलेलें पूजन केल्यानें शुभ होतो. गुरूच्या पूजेचा प्रकार उपनयनप्रकरणांत सांगितला आहे.

कन्याविवाहककालः जन्मतोगर्भतोवापञ्चमवर्षप्रभृतिअष्टमवर्षपर्यंतं कन्या-विवाहेउचितकालः षड्वर्षोत्तरंवर्षद्वयंप्रशस्ततरः षडब्दमध्येनोद्वाह्याकन्या-वर्षद्वयंयतः । सोमोभुङ्क्तेततस्तद्वद्गन्धर्वश्चततोनलः १ इत्युक्तेः नवमदशमयो-र्मध्यमः एकादशवर्षेअधमः द्वादशादौप्रायश्चित्तावहः ॥

**कन्याविवाहकाल**—जन्मापासून, गर्भ राहिल्या दिवसापासून किंवा पांचव्या वर्षापासून आठव्या वर्षापर्यंत कन्येच्या विवाहाचा योग्य काल आहे. सहाव्या वर्षापासून पुढें दोन वर्षेपर्यंत अधिक प्रशस्त होय. कन्येचा विवाह (तिच्या) सहाव्या वर्षापूर्वीं करूं नये. कारण–पहिलीं दोन वर्षे सोम, नंतर दोन वर्षें गंधर्व व त्यापुढचीं दोन वर्षें अग्नि–याप्रमाणें देवता तिचा उप-भोग घेत असतात–असें वचन आहे. नवव्या व दहाव्या वर्षीं (कन्येचा) विवाह करणें मध्यम, अकराव्या वर्षीं अधम आणि बाराव्या वर्षीं वगैरे पुढच्या सर्व वर्षीं प्रायश्चित्तावह आहे.

अथविवाहभेदाः ब्राह्मोदैवआर्षःप्राजापत्यआसुरोगांधर्वोराक्षसःपैशाच-इत्यष्टौविवाहाः योग्यवरमाहूयालंकृत्यकन्यादानविधिनातस्मैदानंब्राह्मोविवा-हः १ यज्ञेऋत्विक्कर्मकुर्वतेऽलंकृत्यकन्यार्पणंदैवः २ वरादेकं गोमिथुनंद्वेवागृ-हीत्वातस्मैकन्यार्पणमार्षः इदंगोमिथुनग्रहणंनानिन्दितम् तस्यकुमारीपूजनार्थ-त्वेनकन्याविक्रयाभावात् ३ त्वयैतयैवसहगृहधर्मआचरणीयएतस्याजीवनप-र्यन्तंविवाहान्तरंचतुर्थाश्रमोवानकार्यइत्याभाष्यकन्यादानंप्राजापत्यः ४ ज्ञाति-भ्योयथेच्छंधनंदत्वाविवाहआसुरः ५ वरवध्वोरिच्छयान्योन्यसंयोगोगान्धर्वः

६ युद्धादिनाबलाद्धरणंराक्षसः ७ चौर्येणकन्याहरणंपैशाचः ८ पूर्वचतुर्षुपूर्वः पूर्वःश्रेष्ठः उत्तरेषूत्तरउत्तरोनिन्द्यः तत्राविप्रस्यब्राह्मदेवौप्रशस्तौ क्षत्रियस्य-गांधर्वराक्षसौआसुरोवैश्यस्य आर्षप्राजापत्यपैशाचाःसर्वेषाम् संकटेराक्षस भिन्नाःसप्तविप्रस्य ब्राह्मदैवेतरेषट्क्षत्रियस्य वैश्यशूद्रयोर्ब्राह्मदैवराक्षसभिन्नाः पञ्च सर्वेष्वपिविवाहेषुतत्तत्प्रकारैःकन्यापरिग्रहोत्तरंस्वस्वगृह्यरीत्याविवाह-होमादिविधिरावश्यकःदानविधिदानंसर्वत्रनभवति पैशाचादौसप्तपदीविधेः-पूर्वमन्यस्मै कन्यादेया ब्राह्मादिष्वपिकन्यादानोत्तरमपिसप्तपदीविधेः पूर्ववर-स्यषण्ढत्वादिदोषज्ञानेवरमृतौवाकन्याऽन्यस्मैदेया ब्राह्मविवाहोढायांजातः पुत्रोदशपूर्वान्दशपरान्पितॄंस्तारयेते दैवोढापुत्रःसप्तसप्त प्राजापत्योढापुत्रः षट्षट् आर्षोढापुत्रस्त्रींस्त्रीन् आश्वलायनसूत्रेतुब्राह्मादिषुद्वादशदशाष्टौसप्तच-पूर्वान्परांश्चपुत्रस्तारयतइत्युक्तम् अन्येषुदुर्विवाहेषुब्रह्मधर्मद्विषःसुताः । वा-ग्दानोत्तरंवरस्यदेशांतरगमनेषण्मासंप्रतीक्ष्यान्यस्मैदेया कन्यायाःशुल्कंप्रदाय गमनेवर्षप्रतीक्षा यत्तुबलाद्विवाहेसगोत्रत्वक्लीबत्वादिवरदोषेवाकन्यासप्त-पदीविध्युत्तरमप्यन्यस्मैदेयेतितत्कलियुगेनिषिद्धम् वाग्दानोत्तरंपातित्यादि-दोषाभावेपिकन्यामदातुर्दण्डउक्तः एवंकन्यायाअपस्मारदोषमनुक्त्वादातापि-दण्ड्यः अधर्म्योद्वाहेषुद्विजैर्भोजनादौकृते आसुरेएकरात्रमुपवासोगान्धर्वे त्रिरात्रंराक्षसपैशाचयोश्चांद्रायणंप्रायश्चित्तम् इतिविवाहभेदाः ॥

**विवाहभेद**—ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच—असे लग्नाचे आठ भेद (प्रकार) आहेत. योग्य वराला आमंत्रण केल्यावर त्याला अलंकार देऊन, कन्यादानविधीनें कन्या देणें हा ब्राह्म-विवाह. यज्ञांत ऋत्विजकर्म करणाऱ्याला अलंकारांसह (सालंकृत) कन्यार्पण करणें हा दैवविवाह. वरापासून एक किंवा दोन गोमिथुनें (गाय व बैल) घेऊन त्याला कन्या देणें हा आर्षविवाह—हें गोमिथुन घेणें निंद्य नाहीं. तें कन्यापूजनार्थ घ्यावयाचें असल्यानें, त्यानें कन्याविक्रयदोष होत नाहीं. तूं हिच्यासह गृहस्थाश्रमधर्माचें आचरण करावें. व ही जिवंत असेपर्यंत दुसरा विवाह किंवा संन्यासग्रहण करूं नये, असें सांगून कन्यादान करणें तो प्राजापत्यविवाह. ज्ञातीला मनसोक्त द्रव्य देऊन विवाह करणें तो आसुरविवाह. वर आणि वधू यांच्या इच्छेनें परस्पर विवाह होणें तो गांधर्वविवाह. युद्धांत बळानें कन्याहरण करणें तो राक्षसविवाह. चोरी करून कन्या हरण करणें तो पैशाचविवाह. पहिल्या चोहोंत दुसऱ्याहून पहिला श्रेष्ठ—म्हणजे प्राजापत्यापेक्षां आर्ष श्रेष्ठ, आर्षाहून दैव श्रेष्ठ आणि दैवाहून ब्राह्म श्रेष्ठ. दुसऱ्या चोहोंत पहिल्याहून दुसरा निंद्य म्हणजे आसुराहून गांधर्व निंद्य, गान्धर्वाहून राक्षस निंद्य व राक्षसाहून पैशाच निंद्य. यांत ब्राह्मणाला ब्राह्म व दैव, क्षत्रियाला गान्धर्व व राक्षस, वैश्याला आसुर व आर्ष, प्राजापत्य व पैशाच हे सर्वांनाच प्रशस्त होत. संकटकालीं ब्राह्मणानें राक्षसविवाहावांचून इतर सातांपैकीं वाटेल तो करावा. क्षत्रियानें ब्राह्म आणि दैव या दोहोंवांचून इतर सहांपैकीं वाटेल तो

करावा. वैश्य व शूद्र यांनीं ब्राह्म, दैव आणि राक्षस यांवांचून बाकीच्या पांचांपैकीं हवा तो करावा. सर्व विवाहांत योग्य प्रकारें कन्यापरिग्रह झाल्यानंतर आपापल्या गृह्यसूत्रांच्या पद्धतीप्रमाणें विवाहहोम वगैरे विधि करणें आवश्यक आहे. केवळ दानविधीनें सर्वत्र दान होत नाहीं. पैशाच वगैरे विवाहांत सप्तपदी होण्याच्या आधीं कन्या दुसऱ्याला देतां येते. ब्राह्म विवाहांतसुद्धां कन्यादान केल्यानंतरही सप्तपदी झाली नसल्यास वराचें षंढत्वादि न्यून समजल्यास किंवा वर मेल्यास दुसऱ्या वराला देतां येते. ब्राह्मविवाहानें लग्न लावलेल्या स्त्रीला झालेला पुत्र पुढच्या व मागच्या दहा दहा अशा वीस पितरांना व दैवविवाहित स्त्रीचा पुत्र सात सात मागच्या पुढच्या पितरांना तारतो. प्राजापत्यविवाहित स्त्रीचा पुत्र सहा सहा आणि आर्षविवाहितेचा पुत्र तीन तीन पुरुषांचें तारण करतो. आश्वलायनसूत्रांत तर ब्राह्मादिक विवाहांनीं वरलेल्या स्त्रीचा पुत्र अनुक्रमें—बारा, दहा, आठ व सात अशा पूर्वींच्या व पुढच्या पुरुषांना तारतो असें सांगितलें आहे. इतर चार दुर्विवाहांनीं वरलेल्या स्त्रीचे पुत्र ब्राह्मणधर्मद्वेषक होतात. वर जर वाग्दानानंतर देशांतरीं गेला असेल तर त्याची सहा महिने वाट पाहून कन्या दुसऱ्या वराला द्यावी. कन्येचें शुल्क ( मूल्य ) देऊन गेला असल्यास एक वर्ष वाट पाहावी. बलात्कारानें विवाह केला असल्यास अथवा सगोत्रत्व, नपुंसकत्व ( क्लीबत्व ) वगैरे दोष जर वरांत आढळले, तर सप्तपदीविधि जरी झालेला असला तरी कन्या दुसऱ्या वराला द्यावी असें जें वचन आहे तें कलियुगांत निषिद्ध आहे. वाग्दानानंतर पातित्य वगैरे दोष नसतांना कन्येचा दाता ( कन्यादान करणारा ) जर कन्या न देईल तर त्याला जसा दण्ड सांगितला आहे, तद्वतच कन्येचे अपस्मारादिक दोष लपवून ठेवून कन्यादान करणाराही दण्डास पात्र होतो असें सांगितलें आहे. अधर्म्य विवाहांत ब्राह्मणांनीं भोजन केल्यास—आसुरविवाहांतल्याकरितां एक रात्र उपास, गांधर्वासाठीं तीन दिवस उपास आणि पैशाचांतल्याकरितां चान्द्रायण प्रायश्चित्त—असें सांगितलें आहे. असे हे विवाहभेद आहेत.

अथपरिवेत्तादिविचारः दाराग्निहोत्रसंयोगंकुरुतेयोऽग्रजेस्थिते। सकनिष्ठः परिवेत्ताज्येष्ठः परिवित्तिः एवं ज्येष्ठायामनूढायांकनिष्ठकन्योद्वाहे ज्येष्ठा-कन्यादिधिषुः कनिष्ठाग्रेदिधिषुः अत्रप्रायश्चित्तम् अज्ञानतःपित्रादिदत्तोद्वाहे-भ्रात्रोःपरिवेत्तृपरिवित्तिसंज्ञयोःकृच्छ्रद्वय कन्यायाःकृच्छ्रंदातुरतिकृच्छ्रंयाजक-स्यचांद्रायणम् ज्ञानतःपित्राद्यदत्तोद्वाहेसर्वेषांवत्सरंकृच्छ्राचरणम् कामतः-पित्रादिदत्तोद्वाहेत्रैमासिकम् अज्ञानेनादत्तोद्वाहेचांद्रायणादि दिधिष्वादिपते-रतिकृच्छ्रकृच्छ्रौ अत्रापवादः सापत्नेदत्तकेवाज्येष्ठेकनिष्ठस्यदाराग्निहोत्रग्रहणे-दोषोन सोदरेपिक्लीबमूकबधिरवामनभग्नपादत्वादिदोषयुतेदेशांतरस्थेवेश्या-सक्तेपतितेमहारोगिण्यतिवृद्धेकृषिसक्तेधनवृद्धिराजसेवादिव्यापारासक्तेचौर्या-सक्तेउन्मत्तेविवाहाग्निहोत्रेच्छानिवृत्तेचज्येष्ठेकनिष्ठस्यदाराग्निहोत्रग्रहणेदोषोन देशांतरगतंज्येष्ठमष्टौद्वादशवावर्षाणिकनिष्ठःप्रतीक्षेत् एवंकन्यायाअपिज्येष्ठा-

याभिन्नमातृजस्त्वेकनिष्ठायाविवाहेदोषोन एवं मूकत्वादिदोषयुतायांज्येष्ठाया-मूह्यम् इतिपरिवेत्रादिनिर्णयः ॥

**परिवेत्ता व परिवेत्ति यांचा निर्णय**—वडील भाऊ ( जिवंत ) असतांना त्याच्या आधीं जो आपला विवाह करून अग्निहोत्र धारण करतो, त्याला परिवेत्ता असें म्हणतात व ज्येष्ठ भ्रात्याला परिवित्ति असें म्हणतात. याप्रमाणेंच थोरल्या बहिणीच्या आधीं धाकटीचें लग्न केल्यास थोरलीला दिधिषु व धाकटीला अग्रेदिधिषु म्हणतात. असें ( कर्म ) केल्यास जीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत, तीं येणेंप्रमाणें:—बाप वगैरेंनीं दिलेल्या कन्येशीं अजाणतेपणानें लग्न झाल्यास परिवेत्ता व परिवित्ति ( लहान व थोर, ) या दोघां भावांनीं दोन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें, कन्येनें एक कृच्छ्र करावें, कन्यादात्यानें अतिकृच्छ्र करावें आणि उपाध्यायानें चांद्रायणव्रत करावें. बापादिकांनीं दिलेल्या कन्येशीं जाणूनबुजून विवाह झाला, तर एक वर्षपर्यंत कृच्छ्रप्रायश्चित्त सर्वांनीं करावें व पित्यानें स्वतःच्या इच्छेनेंच कन्या दिली असल्यास तीन महिने कृच्छ्रप्रायश्चित्त करावें. बापानें दिली नसतां अजाणपणें विवाह झाला असल्यास चान्द्रायणादि प्रायश्चित्त दिधिषूच्या ( ज्येष्ठ कन्या ) नवऱ्यानें अतिकृच्छ्र व ( कनिष्ठ कन्या ) अग्रेदिधिषूच्या पतीनें कृच्छ्र अशीं प्रायश्चित्तें करावींत, याविषयीं अपवाद आहे तो असाः— ज्येष्ठ भ्राता सावत्र अथवा दत्तक असल्यास तो जर क्लीब ( नपुंसक ), मुका, बहिरा, खुजा, पंगु, परदेशीं राहणारा, वेश्याभक्त (रंडीबाज), बाटलेला, महारोगी, अत्यंत म्हातारा, कृषिसक्त (शेतकीच्या नादीं लागलेला), द्रव्य मिळविण्यांत गुंतलेला, राजसेवेंत अथवा व्यापारांत गुंतलेला—अशांपैकींच्या प्रकारचा असल्यास, धाकट्याला लग्न करण्यांत व अग्निहोत्र घेण्यांत दोष नाहीं. देशांतरीं गेलेल्या थोरल्या भावासाठीं धाकट्यानें आठ किंवा बारा वर्षेपर्यंत त्याची वाट पहावी. थोरली मुलगी सावत्र असल्यास धाकट्या मुलीचें लग्न करण्यांत दोष नाहीं. तद्वतच थोरली मुलगी जर मुकेपणा वगैरे दोषांची असेल, तर धाकट्या लेंकीचें लग्न (तिच्या आधीं) करण्यांत दोष नाहीं. असा हा परिवेत्ता वगैरेंचा निर्णय आहे.

अथकन्यादातृक्रमः पितापितामहोभ्रातापितृकुलस्थः पितृव्यादिर्मातृकुलस्थो मातामहमातुलादिः सर्वाभावेजननीत्येवंपूर्वाभावेपरःपरःभ्रातॄणामुपनीतानामेवाधिकारः अनुपनीतभ्रातुर्मात्रादेश्चसत्त्वेमात्रादेरेवाधिकारोनत्वनुपनीतभ्रातुः सर्वाभावे कन्यास्वयंवरंवृणुयात् कन्यास्वयंवरमातुर्दातृत्वेच्चताभ्यामेवनांदीश्राद्धंकार्यम् तत्रमाताकन्यावास्वयंप्रधानसंकल्पमात्रंकृत्वान्यद्ब्राह्मणद्वाराकारयेत् वरस्तुसंस्कृतभ्रात्राद्यभावेस्वयमेवनान्दीश्राद्धं कुर्यान्नमाता उपनयनेनकर्माधिकारस्यजातत्वात् द्वितीयादिविवाहेवरःस्वयमेवनांदीश्राद्धं कुर्यात् परकीयकन्यादानेविशेषः आत्मीयांत्यसुवर्णेनपरकीयांतुकन्यकाम् । धर्मेणविधिनादानमसगोत्रापियुज्यते १ इतिदातृनिर्णये वरदध्वोरपिनांदीकर्तृत्वनिर्णयः॥

**कन्यादानक्रम**—कन्येचा बाप, आजा, भाऊ पितृकुलांतला चुलता, आईचा बाप, मामा किंवा या सर्वांच्या अभावीं ( जागीं ) तिचा आई यांनीं कन्यादान करावें. पहिल्याच्या ऐवजीं दुसरा, असा वरील क्रम समजावा. भावाची मुंज झाली असेल तरच त्याला ( कन्या ) दानाचा अधिकार आहे. उपनयन झालें नाहीं असा भाऊ आणि माता अशीं (दोघें) असल्यास, मातेलाच कन्यादानाचा अधिकार आहे. मुंज न झालेल्या भावाला, तो अधिकार नाहीं. अशा वेळीं माता व कन्या अशा दोघींनीं स्वतः मुख्य संस्कार तेवढा करून, बाकीचें नान्दीश्राद्धाचें कर्म त्यांनीं ब्राह्मणाकडून करवावें. वराचा भाऊ संस्कार झालेला नसल्यास, वरानें स्वतःच नान्दीश्राद्ध करावें, त्याच्या मातेनें तें करूं नये. कारण—उपनयन झाल्यामुळें त्याला त्या कर्माचा अधिकार आलेला असतो. दुसऱ्यांदाच्या वगैरे लग्नांत वरानें स्वतःच नान्दीश्राद्ध करावें. दुसऱ्याच्या कन्येचें दान करण्याला विशेष असा आहे कीं, दुसऱ्याची कन्या जर परगोत्रांतली असली तर तिला सुवर्णदानानें आपली करून घेऊन, नंतर तिचें धर्मविधीनें दान करणें योग्य आहे. याप्रमाणें कन्यादानकर्त्यांच्या क्रमाचा निर्णय सांगतांना, वर आणि वधू यांच्या नान्दीश्राद्धकर्तृत्वाचाही जो निर्णय सांगितला, तो येथें संपला.

**अथवधूवरयोर्मूलजत्वादिगुणदोषाः मूलनक्षत्राद्यपादत्रयजातौवधूवरौस्वस्वश्वशुरंनाशयतः आश्लेषान्त्यपादत्रयजातौश्वश्रूम् ज्येष्ठान्त्यपादजातावन्योन्यज्येष्ठभ्रातरम् विशाखान्त्यपादजातावन्योन्यकनिष्ठभ्रातरम् मघाप्रथमपादेमूलवत्फलंकेचिदाहुः केचिदुपनयनस्यद्वितीयजन्मरूपत्वात्तेनचद्वितीयजन्मनापूर्वजन्मसंभवमूलादिदोषस्यनिरस्तत्वाद्वरस्यश्वशुरघातित्वादिदोषोनेत्यपवादंसंकटेवदन्ति श्वशुराद्यभावेवध्वाअपिनदोषः नर्क्षवृक्षनदीनाम्नींनान्त्यपर्वतनामिकाम् । नप्रक्ष्यहिप्रेष्यनाम्नींनविभीषणनामिकामुद्वहेदिति वरायपुंस्त्वंपरीक्ष्यकन्यादेया यस्याप्सुप्लवतेबीजंह्लादिमूत्रंचफेनिलमित्यादिपुंस्त्वपरीक्षा कुलंचशीलंचवपुर्वयश्चविद्यांचवित्तंचसनाथतांच । एतान्गुणानूसप्तपरीक्ष्यदेयाकन्याबुधैःशेषमचिन्तनीयम् ॥ इतिवधूवरयोर्मूलजातत्वादिगुणदोषनिर्णयः ॥**

**मूलनक्षत्रदोषनिर्णय**—मूलनक्षत्राच्या पहिल्या तीन चरणांत जन्मलेली वधू आणि वर, आपापल्या सासऱ्यांचा नाश करतात. आश्लेषानक्षत्राच्या शेवटच्या तीन चरणांत जन्मलेलीं ( वरवधू ) सासवांचा नाश करतात. विशाखानक्षत्राच्या चरणीं जन्म झाला असल्यास मूळ नक्षत्राप्रमाणेंच फळ समजावें असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. उपनयन हा दुसरा जन्मच ( द्विजत्व ) असल्यानें, त्याच्या आधींचा जन्म ( मातेच्या पोटांतून बाहेर पडणें ) जरी मूळनक्षत्रावर झालेला असला तरी त्यायोगें वराकडून श्वशुराचा ( सासरा ) घात होत नाहीं, असें जरी दुसरा एक ग्रंथकार म्हणतो, तरी हा अपवाद संकटकालींच तेवढा उपयोगांत आणावा, असेंही तो सांगतो. सासरा नसल्यास वधूला दोष नाहीं.

आस्वल, वृक्ष, नदी. चाण्डाळ, पर्वत, पक्षी, सर्प, दास व भयंकर नांवाची कन्या करूं नये. वराच्या पुरुषत्वाची परीक्षा करूनच त्याला कन्या द्यावी. रेत पाण्यांत तरणें व मूत्र सशब्द आणि फेंसाळ असणें वगैरे पुरुषत्वाची परीक्षा होय. कुल, स्वभाव, शरीरसौंदर्य, विद्या, वित्त व समानत्व—हे सात गुण पाहून, शहाण्यांनीं कन्या वराला द्यावी. याहून अधिक बघण्याचें कारण नाहीं. असा हा येथें वधू-वरांच्या मूळ वगैरे नक्षत्रांवरच्या जन्मसंबंधाचा निर्णय सांगितला, तो येथें संपला.

**अथविवाहेमासादिनिर्णयः माघफाल्गुनवैशाखज्येष्ठमासाःशुभप्रदाः मार्गशीर्षोमध्यमः स्यात्क्वचिदाषाढकार्तिकौ अत्रमिथुनेऽर्केआषाढोवृश्चिकेकार्तिकश्चदेशाचारानुरोधेनग्राह्यौनसर्वदेशे एवंमकरस्थपौषोमेषस्थचैत्रोपि ज्येष्ठयोर्वधूवरयोर्ज्येष्ठमासिविवाहोनशुभः मासान्तरेमध्यमः नज्येष्ठयोर्विवाहः स्याज्ज्येष्ठमासिविशेषतः । द्वौज्येष्ठौमध्यमौप्रोक्तावेकंज्येष्ठंसुखावहम् १ ज्येष्ठत्रयंनकुर्वीतविवाहेसर्वसंमतम् इत्युक्तेः । तथाचज्येष्ठमासोज्येष्ठगर्भस्यमंगलेमध्यमःजन्ममासजन्मनक्षत्रादिकंज्येष्ठापत्यस्यनिषिद्धम् सार्वकालमेकेविवाहमितित्वासुराद्यधर्मविवाहविषयम् ॥**

**विवाहमासनिर्णय**—माघ, फाल्गुन, वैशाख व ज्येष्ठ हे महिने (विवाहास) शुभ होत. मार्गशीर्ष मध्यम होय. क्वचित् आषाढ व कार्तिक हेही सांगितले आहेत. या बाबतींत मिथुनेचा सूर्य असतां आषाढ व वृश्चिकेचा रवि असतां कार्तिक, हे महिने देशाचाराप्रमाणें घ्यावेत. सर्वच जागीं घेऊं नयेत. मकरेचा रवि असतां पौष आणि मेषस्थ सूर्य असतां चैत्र यांविषयींही (या विवाहसंबंधांत) वरीलप्रमाणेंच समजावें. ज्येष्ठ वधू व ज्येष्ठ वर यांचा विवाह ज्येष्ठांत करणें अशुभ होय. व इतर महिन्यांत करणें हें मध्यम होय. कारण—वर व वधू हीं दोघेंही ज्येष्ठ असतां, त्यांचा विवाह, विशेषेंकरून ज्येष्ठांत करूं नये. दोन ज्येष्ठ असल्यास तो विवाह मध्यम व एक ज्येष्ठ असल्यास सुखावह आणि तीन ज्येष्ठ असल्यास तो विवाह करूं नये. (याचा अर्थ—ज्येष्ठ वर, ज्येष्ठ वधू आणि ज्येष्ठ मास) हें सर्वसम्मत आहे—असें वचन आहे. ज्येष्ठ अपत्याच्या मंगलकार्यास ज्येष्ठ मास मध्यम आहे. जन्ममास, जन्मनक्षत्र इत्यादि ज्येष्ठ अपत्याला निषिद्ध आहेत. वाटेल तेव्हां लग्न करावें. असें जें कोणी ग्रंथकार म्हणतात, तें आसुर वगैरे विवाहासंबंधानें होय.

मयूखेआर्द्रादिदशनक्षत्रेषुसूर्याधिष्ठितेषुविवाहमौञ्ज्यादिकंवसिष्ठादिभिर्निषिद्धमित्युक्तम् नैतत्कौस्तुभसिन्ध्वादिग्रन्थेमार्तण्डादिज्योतिर्ग्रन्थेऽपीतिबहवः शिष्टाःआर्द्रादिप्रवेशदोषंनमन्यन्ते अमावास्यानिषिद्धा रिक्ताष्टमीषष्ठ्योल्पफलाः अन्यास्तिथयोबहुफलाः शुक्लपक्षःश्रेष्ठः कृष्णश्चापोदशीपर्यन्तो मध्यमः सोमबुधगुरुशुक्रवाराः शुभाः अन्येमध्यमाः रोहिणीमृगमघा तिस्रउत्तराहस्तस्वातीमूलानुराधारेवत्यः सर्वसंमतनक्षत्राणि इतरदक्षमघाचित्राश्रवणधनिष्ठाश्विन्यइत्यधिकानिचत्वारि तत्रापिखलग्रहयुतंनक्षत्रंवर्ज्यम् ।

**नक्षत्रनिर्णय**—मयूखांत असें सांगितलें आहे कीं, आर्द्रादि दहा नक्षत्रीं सूर्य असतां, वसिष्ठ वगैरेंनीं-विवाह, उपनयन वगैरे मंगलकार्यें करणें निषिद्ध आहे, असें जरी सांगितलें आहे, तरी हा निषेध निर्णयसिन्धु वगैरे ग्रन्थांत आणि मार्तण्डादि ज्योतिषग्रन्थांत सांगितलेला नसल्यानें, बहुतेक शिष्टलोक आर्द्रादि नक्षत्रांचा प्रवेशदोष मानीत नाहींत. विवाहाला अमावास्या निषिद्ध आहे. चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, अष्टमी व षष्ठी या तिथि अल्पफलदायी असून, इतर तिथि शुभफलदायी आहेत. शुक्लपक्ष श्रेष्ठ होय. कृष्णपक्ष त्रयोदशीपर्यंत मध्यम. सोम, बुध, गुरु व शुक्र हे वार शुभ व बाकीचे मध्यम. रोहिणी, मृग, मघा, तीन उत्तरा, हस्त, स्वाति, मूळ, अनुराधा व रेवती—हीं नक्षत्रें सर्वसम्मत आहेत. चित्रा, श्रवण, धनिष्ठा आणि अश्विनी—हीं नक्षत्रेंही हरदत्ताच्या मतें, वरील नक्षत्रांप्रमाणेंच शुभ आहेत, यांतलें दुष्ट ग्रहयुक्त असलेलें तेवढें नक्षत्र वर्ज्य करावें.

**चन्द्रतारावलंकन्यावरयोरुभयोरपि । अन्यतरस्यचन्द्रबलाभावेरजतादि-दानंकार्यम् मेषःकन्याघटःसिंहोनक्रंयुग्मंधनुर्वृषः । मीनःसिंहोधनुःकुम्भोऽ-जादीनांघातचन्द्रमाः १ यात्रायांयुद्धकार्येषुघातचन्द्रंविवर्जयेत् । विवाहेसर्व-मांगल्येचौलादौव्रतबन्धने ॥ २ ॥ घातचन्द्रौनैवचिन्त्योयज्ञेसीमन्तजातयोः । मृत्युयोगेपरिघार्धेभद्रायांपातवैधृतौ ॥ ३ ॥ विष्कम्भादेर्दुष्टभागेतिथिवृद्धि-क्षयेपिच । यामार्धकुलिकादौचगण्डान्तेरविसंक्रमे ॥ ४ ॥ केतूद्गमेभूमिकम्पे-विवाहाद्यंविवर्जयेत् । ग्रहणेपादादिग्रासेत्रिचतुःषडष्टदिवसाःप्रागर्धितावर्ज्याः भूकम्पेउल्कापातेच त्रिदिनंवज्रपातेचैकंदिनंवर्ज्यम् यावत्केतूद्गमस्तावदशुभः-समयोभवेत् । अस्यापवादःभूकम्पादेर्नदोषोस्तिवृद्धिश्राद्धेकृतेसति । दिवा-विवाहःप्रशस्तः रात्रावपिकन्यादानंहेमाद्र्यादिमतेप्रशस्तंभवति ॥**

**चन्द्रबल**—वर आणि वधू या दोघांनाही चन्द्रबल व ताराबल अवश्य पाहावें. दोघांपैकीं एकाला चन्द्रबल नसल्यास, रूपें दान द्यावें. मेषेचा पहिला, वृषभेचा पांचवा, मिथुनेचा नववा, कर्केचा दुसरा, सिंहेचा सहावा, कन्येचा दहावा, तूळेचा तिसरा, वृश्चिकेचा सातवा, धनेचा चौथा, मकरेचा आठवा, कुंभेचा अकरावा आणि मीनेचा बारावा—हे चन्द्र घातक होत. यात्रा व युद्ध यांत घातचंद्र वर्ज्य करावेत. लग्न, सारीं मंगलकार्यें, चौल, व्रतबन्ध, यज्ञ, सीमन्तोन्नयन व जातकर्म या कृत्यांना घातचंद्र पाहूं नये. मृत्युयोग, परिघाचें पूर्वार्ध, भद्रा, व्यतीपात, वैधृति, विष्कम्भाचे दुष्ट भाग, तिथिवृद्धि, तिथिक्षय, यामार्ध, कुलिकादिक, गण्डान्त, रविसंक्रमण, धूमकेतूदय, धरणीकम्प वगैरे असतां, विवाह करूं नये. ग्रहणाचा एक पाद ग्रास असल्यास तीन दिवस, दोन पाद ग्रास असल्यास चार दिवस, त्रिपाद ग्रास असल्यास सहा दिवस आणि चतुःपाद ग्रास ( खग्रास ) असल्यास आठ दिवस—याप्रमाणें ग्रहणाच्या आधीं अर्धे व पुढें अर्धे ( दिवस ) वर्ज्य करावेत. भूकम्प आणि उल्कापात असतां तीन दिवस, वज्रपात ( वीज पडणें ) झाल्यास एक दिवस व धूमकेतु दिसत असेल तोंपर्यंतचा काल—हें अशुभ होत.

यांबद्दलचा अपवाद–नान्दीश्राद्ध केल्यानंतर भूकम्पादि झाल्यास दोष नाहीं. विवाह दिवसास करणें चांगलें. हेमाद्रीच्या मतें रात्रीसुद्धां कन्यादान करण्यास हरकत नाहीं.

अथ मुहूर्तविचारः तत्रलग्नेग्रहबलम् त्रि ३ षष्ठा ६ ऽष्ट ८ स्वर्कस्त्रि ३ जल ४ धन २ गोऽब्जःक्षितिसुतास्त्रि ३ षष्ट ६ स्थो ज्ञेज्यौव्ययनिधन १२।८ वर्ज्यौ भृगुसुतः ॥ द्वितीयाधिष्वङ्काभ्रतनुषु २।४।५।९।१०।१ रि ६ त्र्य ३ ष्ट ८ सुशनिस्तमसःकेतुश्चाये ११ भवतिसुखहेतुश्चसकलः ॥ १ ॥

**लग्नग्रहबल**—ज्या लग्नीं विवाह करायचा, त्या लग्नापासून–३–६–८ या स्थानीं रवि, ३–४–२ या स्थानीं चन्द्र, ३–६ या स्थानीं मंगळ व १२–८ या स्थानीं बुध व गुरु– हे ग्रह वर्ज्य होत. २–४–५–९–१०–१ या स्थानीं शुक्र, ६–३–८ या स्थानीं शनि, राहु व केतु हे सुखदायक होत.

अथलग्नेवर्ज्यग्रहाःरविर्लग्ने १ चन्द्रस्तनूरिपुमृति १।६।८ स्थःक्षितिसुतोऽष्टलग्नाभ्रे ८।१।१० ज्ञेज्यौ निधन ८ उशनास्त्र्य १ ष्ट ८ रिपु ६ षु ॥ शनिः शेषोलग्ने १ तनुपतिरथार्य ६ ष्टम ८ गृहेविवाहेस्युःसर्वेमदनसदने ७ नैवशुभदाः ॥ १ ॥ शेषौ राहुकेतू ॥ अन्येद्वादशगं १२ चन्द्रंदृक्केशनमांशपौ ॥ षष्ठाष्ट ६।८ गौबुधंचाभ्रे १० वर्ज्यानाहुर्मनीषिणः ॥ २ ॥ मेषान्नक्रात्तुलात्कर्कात्त्रिर्गण्यानवमांशकाः ॥ शस्तावृषनृयुक्कर्ककन्यातुलधनुर्झषाः ॥ १ ॥

**लग्नीं वर्ज्यग्रह**—लग्नीं रवि, चन्द्र १–६–८ या स्थानीं, मंगळ ८–१–१० या स्थानीं, बुध व गुरु ८ व्या स्थानीं, शुक्र १–८–६ या स्थानीं, शनि व बाकीचे ग्रह लग्नीं, लग्नस्वामी ६ किंवा ८ या स्थानीं, आणि बाकीचे सर्व ग्रह सातव्या स्थानीं वर्ज्य होत. बाकीचे म्हणजे राहु व केतु हे होत. बारावा चन्द्र, द्रेष्काणस्वामी व नवमांशस्वामी हे ६–८ या स्थानीं व दहावा बुध हे वर्ज्य करण्यास इतर ग्रन्थकार सांगतात. नवमांश प्रवृत्ति म्हणजे–मेष, सिंह, धन हे मेषापासून, वृषभ, कन्या व मकर, हे मकरापासून, मिथुन, तूळा व कुम्भ हे तूळेपासून, आणि कर्क, वृश्चिक व मीन हे कर्कापासून तीन तीन वेळ मोजले असतां जे नवमांश होतात, त्यांतले वृषभ, मिथुन, कर्क, कन्या, तूळ, धनु व मीन –हे नवमांश शुभ होत.

अथैकविंशतिमहादोषाः दुःपञ्चांगष्टमोसृट्कसविधुखलतनुःषण्मृतीन्दुः सितोरौसंक्रान्तिर्गण्डदोषःसखलभदिनजौचक्रचक्रार्धपातौ ॥ रन्ध्रेलग्नेकुवर्गोस्तगखलउदयास्ताशुचिःक्रूरवेधःकर्त्तर्येकार्गलांत्रिर्ग्रहणभकुलवौदुःक्षणोत्पातभेच ॥

**एकवीस महादोष**—दुष्ट तिथि, वार, नक्षत्रें, योग आणि करण ( दुःपञ्चाग ) लग्नापासून अष्टमस्थानीं मंगळ ( अष्टमोसृट्क ), चन्द्र व पापग्रह यांनीं युक्त असणारें लग्न–(सविधुखलतनुः), लग्नापासून सहाव्या व आठव्या स्थानीं चन्द्र–( षण्मृतीन्दु ), लग्नापासून सहाव्या स्थानीं शुक्र–( सितोरौ ), सूर्य संक्रमणकाळ किंवा दिवस–( संक्रान्ति ), लग्नगण्डान्त, तिथिगंडान्त, व नक्षत्रगंडान्त-

( गण्डदोष ), दुष्टग्रहयुक्त नक्षत्र–( ग्रहवलभ ), वाराचे कुलिक व अर्धयामादि दोष ( दिनज ), वैधृतिव्यतीपातसंज्ञक चंद्रसूर्याचें क्रान्तिसाम्यलक्षण–( चक्रचक्रार्धपातौ ), जन्मराशि व जन्मलग्न यांपासूनचें आठवें लग्न–( रन्ध्रलग्न ), षड्वर्गांत पापग्रह अधिक असणें–( कुवर्ग ), लग्नापासून सप्तमस्थानीं पापग्रह असणें–( अस्तगखल ), लग्न व अंश हे आपापल्या स्वामींनीं युक्त अथवा दृष्ट ही उदयशुद्धि, आणि लग्नापासून सप्तमस्थान व अंश हे आपापल्या स्वामींनीं युक्त किंवा दृष्ट ही अस्तशुद्धि व या दोहोंचा अभाव म्हणजे ( उदयास्तशुद्धि ), क्रूरग्रहविद्ध नक्षत्र–( क्रूरवेध ), चन्द्रापासून किंवा लग्नापासून दुसऱ्या व बाराव्या स्थानीं पापग्रह असणें–( कर्तरि ), विष्कम्भ, अतिगण्ड, व्याघात, वज्र, व्यतीपात, परिघ, वैधृति, शूल व गण्ड–हे नऊ दुष्ट योग असतां, दिवस नक्षत्रापासून अभिजित्सहित मोजून सम नक्षत्रीं सूर्य असल्यास जो एकार्गल योग होतो, त्यानें विद्ध नक्षत्रचरण–(एकार्गलांघ्रि ), ज्या दिवशीं ग्रहण असेल तें नक्षत्र–( ग्रहणभ ), अनुक्त नवांश–( कुलक ), दुर्मुहूर्त–( दुःक्षण ) म्हणजे–शुक्रवारीं व सोमवारीं नववा मुहूर्त, गुरुवारीं बारावा व शनिवारीं पहिला हे दिवसास व मंगळवारीं रात्रीं सातवा–हे दुर्मुहूर्त होत. भूकम्प वगैरे उत्पात ज्या नक्षत्रीं होईल तें नक्षत्र–( उत्पातभम् ). असे जे हे एकवीस दोष आहेत, त्यांतला एकही दोष विवाहाच्या बाबतींत नसावा.

अथसंकटेगोधूलं गोधूलंपदजातकेशुभकरंपञ्चाङ्गशुद्धौरवेरर्धास्तात्परपूर्वतोऽर्धघटिकंतत्रेन्दुमष्टारिगम् ॥ सोग्रङ्कुमष्टमंगुरुयमाहःपातमर्कक्रमंजह्याद्विप्रमुखेतिसंकटइदंसद्यौवनाद्येक्वचित् ॥ १ ॥ यथोक्तचन्द्रताराद्यभावेदानानि चन्द्रेचशङ्खलवणंचतारेतिथौविरुद्धेत्वथतण्डुलांश्च ॥ धान्यंचदद्यात्करणेचवारयोगेविरुद्धेकनकंचदेयम् ॥ १ ॥ षड्वर्गशुद्ध्यादिविचारः कालसाधनादिप्रकारः कुलिकादिस्वरूपाणिच ज्योतिर्ग्रन्थेभ्योज्ञातव्यानि विस्तरभयान्नेहोच्यन्ते इतिमुहूर्तविचारसंक्षेपः ॥

**संकटगोधूल–( गोरज )–मुहूर्त**—सूर्यास्तापूर्वीची पंधरा पळें व नंतरची पंधरा पळें मिळून जी अर्धघटिका तिला गोधूल ( गोरज ) लग्न म्हणतात. या लग्नावरच्या मुहूर्तावर, योग्य पञ्चांगशुद्धि असल्यास, शूद्रादिकांनीं तो शुभ मुहूर्त म्हणून विवाह करावा. सहावा आणि आठवा चन्द्र, पापग्रहयुक्त लग्न, आठवा मंगळ, गुरु व शनि हे वार, महापात ( याचें लक्षण सिद्धान्तशिरोमणींत सांगितलें आहे ) व सूर्यक्रान्तीचा दिवस हे दोष गोरज मुहूर्ताला वर्ज्य करावेत. इतर दोष गोरज मुहूर्ताला त्याज्य नाहींत. संकटकालीं अथवा कन्या उपवर झाली असल्यास ब्राह्मणांनीं गोरज मुहूर्त विवाहार्थ घ्यावा, असें क्वचित् ग्रन्थकारांनीं सांगितलें आहे. चन्द्र व तारा हीं अशुभ असल्यास चन्द्राकरितां शंख व तारेकरितां लवण अशीं दानें करावींत. अशुभ तिथीकरितां तांदूळ, कल्याणीकरितां धान्य व दुष्ट योग व वार यांकरितां सोनें अशीं दानें द्यावींत. षड्वर्गशुद्धि,

कालसाधन, कुलिक वगैरेबद्दलचें स्वरूप आणि इतर माहिती ज्योतिःशास्त्रविषयक ग्रन्थांत पाहावी. विस्तारभयास्तव ती येथें सांगितली नाहीं. संक्षेपानें मुहूर्तविचार सांगितला.

अथविवाहाङ्गमण्डपादिविचारः॥ मण्डपनिर्माणाद्यङ्गजातमङ्गिनो विवाहादेरुक्तनक्षत्रादौकार्यम् कण्डनदलनयवारकमण्डपमृद्वेदिवर्णकाद्यखिलम् । तत्संबन्धिगतागतमृक्षेवैवाहिकेकुर्यात् १ इत्युक्तेः यवारकंचिकसाइतिभाषायाम् एवंहरिद्रादिषुअङ्गेषुचन्द्रबलंनापेक्ष्यम् विवाहागंविवाहात्प्राक्तृतीयषष्ठनवमदिनेषुनकार्यम् तत्रमण्डपः षोडशद्वादशदशाष्टान्यतमसंख्यहस्तश्चतुर्द्वारः कार्यः मण्डपेचतुर्वरकरांपञ्चवधूकरांवावेदींचतुरस्रांसोपानयुतांप्राक्प्रवणांरम्भास्तंभादिभिःसर्वतःसुशोभितांगृहनिर्गमाद्वामभागेकुर्यात् ॥

**विवाहमण्डपादिविचार**—विवाहार्थ मण्डपादि जीं तदंगभूत कार्यें, तीं विवाहोक्त नक्षत्रांवर करावीत. कांडण, दळण, यवारक, मंडप, बहुलें, घर व भिंती यांना रंग देणें वगैरे सर्व गोष्टी विवाहोक्त नक्षत्रीं कराव्या, असें वचन आहे. 'यवारक' याला प्राकृतांत 'चिकसा' असें म्हणतात. हळद लावणें, उडदामुहूर्त वगैरेंना चन्द्रबळाचें कारण नाहीं. विवाहाचीं अंगभूत कर्में, विवाहाच्या पूर्वींच्या तिसऱ्या, सहाव्या व नवव्या दिवशीं करूं नयेत. विवाहमण्डप—सोळा, बारा, सहा किंवा आठ हातांचा आणि चार दारांचा असावा. मंडपांत वराच्या हातानें चार हात किंवा वधूच्या हातानें पांच हात अशी चतुष्कोणी व पायऱ्या असलेली वेदी ( बहुलें ) करावी. ती पूर्वेच्या बाजूस उतरती असून कदलीस्तंभांनीं सुशोभित व घरांतून बाहेर पडण्याच्या दरवाजाच्या डाव्या बाजूला करावी.

अथकन्यायाजन्मकालीनग्रहादियोगसूचितवैधव्यपरिहारोपायः तत्रमूर्तिदानम् कन्यादेशकालौसंकीर्त्यवैधव्यहरंश्रीविष्णुप्रतिमादानंकरिष्यइतिसंकल्प्यपलतदर्धतदर्धान्यतमप्रमाणहेमनिर्मितांविष्णुप्रतिमांचतुर्भुजांसायुधांवृतेनाचार्येणाग्न्युत्तारणादिपूर्वकंषोडशोपचारैःपूजयेत् वस्त्रार्पणकालेपीतवस्त्रेपुष्पार्पणकालेकुमुदोत्पलमालांचदद्यात् पूजान्ते कन्या देवंप्रणम्यमन्त्रेणदद्यात् । यन्मयाप्राश्चिजनुषिघ्नन्त्यापतिसमागमम् । विषोपविषशस्त्राद्यैर्हतोवापिविरक्तया १ प्राप्यमाणंमहाघोरंयशःसौख्यधनापहम् । वैधव्याद्यतिदुःखौघंतन्नाशयसुखाप्तये २ बहुसौभाग्यवृध्द्यैचमहाविष्णोरिमांतनुम् । सौवर्णींनिर्मितांशक्त्यातुभ्यंसंप्रददेद्विज ३ इति ततोयथाशक्तिहेमदक्षिणांदत्त्वा अनघाद्याहमस्मीतित्रिर्वदेत् एवमस्त्वितिविप्रोर्पित्रिः ततोविप्रभोजनम् ॥

**वैधव्यपरिहारोपाय**—कन्येच्या जन्मकाळीं असणाऱ्या दुष्ट ग्रहांमुळें तिच्या वैधव्याची जी आगाऊ सूचना होते, तिच्या परिहाराचे उपाय येणेंप्रमाणें:—देशकालादिकांचा उच्चार करून, 'वैधव्यहरं श्रीविष्णुप्रतिमादानं करिष्ये' असा संकल्प करावा. एक पल ( ४० मासे ), अर्ध पल किंवा चतुर्थांशपल

यांपैकीं कोणच्या तरी एका प्रमाणाची चतुर्भुज व सायुध अशी श्रीविष्णूची सुवर्ण-मूर्ति करून, पूर्वी ठरवून ठेविलेल्या आचार्याकडून तिची अग्न्युत्तारणपूर्वक षोडशोपचारें पूजा करवावी. पूजेंत वस्त्रार्पणाच्या वेळीं दोन पिंवळीं वस्त्रें व पुष्पार्पणाच्या वेळीं कुमुदें आणि कमळें यांची माळ अर्पण करावी. पूजा झाल्यावर कन्येनें मूर्तीला वन्दन करून तिचें—"यन्मया प्राञ्चि जनुषि घ्नन्त्यापतिसमागमम् । विषोपविषशस्त्राद्यैर्हतोवापि विरक्तया ॥ प्राप्यमाणं महाघोरं यशःसौख्यधनापहम् । वैधव्याद्यति दुःखौघं तन्नाशय सुखाप्तये ॥ बहु सौभाग्यवृद्ध्यैच महाविष्णोरिमां तनुम् । सौवर्णीं निर्मितां शक्त्या तुभ्यं संप्रददे द्विज ॥" हा मंत्र म्हणून दान करावें व नंतर यथाशक्ति सुवर्णदान करून,—'अनघाद्याहमस्मि' असें कन्येनें त्रिवार म्हणावें व आचार्यानें त्या तिन्ही वेळां 'एवमस्तु' असें तिला सांगावें. यानंतर ब्राह्मणभोजन घालावें.

अथवैधव्यहरःकुम्भविवाहः विवाहकर्तापित्रादिःकन्यावैधव्यहरं कुम्भविवाहंकरिष्यइतिसंकल्प्यनान्दीश्राद्धान्तंकृत्वामहीद्यौरित्यादिनाकुम्भस्थापनान्तेतत्रवरुणप्रतिमायांवरुणंसंपूज्यतत्रकलशमध्येविष्णुप्रतिमायांविष्णुंषोडशोपचारैःसंपूज्यप्रार्थयेत् वरुणाङ्गस्वरूपायजीवनानांसमाश्रय । पतिंजीवकन्यायाश्चिरंपुत्रसुखंकुरु १ देहिविष्णोवरंदेवकन्यांपालयदुःखतः । इति ततोविष्णुरूपिणेकुम्भायेमांकन्याश्रीरूपिणींसमर्पयामिति समर्प्यपरित्वेत्यादिमन्त्रैरधस्तादुपरिचकुम्भंकन्यांचमन्त्रावृत्त्यापरिवेष्ट्यततःकुम्भंनिःसार्यजलाशयेप्रभज्यशुद्धजलेनसमुद्रज्येष्ठेत्यादिमन्त्रैःपञ्चपल्लवैःकन्यामभिषिच्यविप्रान्भोजयेदिति इतिकुम्भविवाहः ॥

**वैधव्यहारक कुम्भविवाह**——कन्येचा विवाह करून देणाऱ्या बाप वगैरेंनीं 'कन्यावैधव्यहरं कुम्भविवाहं करिष्ये' असा संकल्प करून, नान्दीश्राद्धापर्यंतचें कर्म करावें. आणि मग—'मही द्यौ०' इत्यादि मंत्रांनीं कुम्भस्थापना करावी. नंतर त्या कुम्भावर वरुणप्रतिमेची वरुणपूजा करून, कलशाच्या मध्यभागीं विष्णूच्या प्रतिमेची षोडशोपचारें पूजा केल्यावर 'वरुणांगस्वरूपाय जीवनानां समाश्रय । पतिं जीवय कन्यायाश्चिरं पुत्रसुखं कुरुम् ॥ देहि विष्णो वरं देव कन्यां पालय दुःखतः ।'—अशी प्रार्थना करावी, आणि—'विष्णुस्वरूपिणे कुम्भाय इमां कन्यां श्रीरूपिणीं समर्पयामि'—असें वाक्य उच्चारून, कुम्भस्वरूपी विष्णूला कन्यार्पण करावें. त्यानंतर 'परि त्वा०' या मंत्रांनीं खालींवर कुम्भ आणि कन्या यांना मंत्रांच्या आवृत्तीसह सुतानें वेष्टित करावें. मग तो कुम्भ जलाशयांत फेंकून द्यावा आणि—'समुद्र ज्येष्ठा०' इत्यादि मंत्रांनीं कन्येवर पंचपल्लवांनीं अभिषेक करून, ब्राह्मणांना भोजन द्यावें. असा हा कुम्भविवाह येथें संपला.

अथवरस्यमृतभार्यात्वपरिहारोपायः तत्रपरिवेत्तृत्वपापान्मृतभार्यात्वंतत्पापपरिहारायप्राजापत्यत्रयंचान्द्रायणत्रयंकृत्वाअसकृन्मृतभार्यात्वयोगेतदुभयत्रयमावृत्त्याकृत्वामृतभार्यात्वनिरासद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थअयुतसंख्य-

चर्वाज्यहोमंकरिष्यइतिसंकल्प्याग्निस्थापनान्तेऽन्वाधानम् दुर्गाग्निविष्णूनअ-ष्टाधिकायुतसंख्याभिश्चर्वाज्याहुतिभिःशेषेणस्विष्टकृतमित्यादि प्रतिदैवतंतूष्णीं-निरूप्यप्रोक्ष्यचत्यागकाले अष्टोत्तरायुतसंख्याहुतिपर्याप्तंचर्वाज्यद्रव्यंयथामं-त्रलिङ्गदुर्गायैअग्नयेविष्णवेचनममेतित्यजेत् जातवेदसेइत्यनुवाकस्यउपनिष-दृषयः दुर्गाग्निविष्णवोदेवताः त्रिष्टुपछन्दः चर्वाज्यहोमविनियोगः अनु-वाकानुवृत्त्याप्रत्यृचंहोमः तत्रप्रथमंचतुरधिकपञ्चसहस्रसंख्यश्चरुहोमस्ततश्च-तुरधिकपञ्चसहस्राज्यहोमइत्येवमयुतहोमः होमशेषंसमाप्यदशविप्रान्भोजये-दिति अथवाकस्यचिद्ब्राह्मणस्यविवाहंकुर्यात् ॥

**मृतभार्यात्वदोषपरिहार**—परिवेतृत्वाच्या (थोरल्या भावाच्या आधीं धाक-त्यानें लग्न करण्याच्या) पापानें मृतभार्यात्व येतें, यासाठीं त्या पापाच्या क्षालनार्थ तीन प्राजापत्यें व तीन चान्द्रायणें करावीत. वारंवार जर बायका मरत असतील, तर (जितक्या वेळां बायका मरतील तितक्या वेळां) वरील प्रायश्चित्तें करून,–'मृतभार्यात्वनिरासद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं अयुतसंख्यचर्वाज्यहोमं-करिष्ये'–असा संकल्प करावा आणि अग्निस्थापनेपर्यंतचें कर्म केल्यावर,–'दुर्गा-ग्निविष्णून्अष्टाधिकायुतसंख्याभिश्चर्वाज्याहुतिभिः शेषेण स्विष्टकृतमित्यादि'–असें अन्वा-धान करावें. प्रत्येक देवतेला मंत्रसहित निर्वाप करून म्हणजे चरु शिजविण्यासाठीं थाळींत तांदूळ घेऊन ते धुवावे व त्यागाच्या वेळीं–'अष्टोत्तरायुतसंख्याहुतिपर्याप्तं-चर्वाज्यद्रव्यं यथामंत्रलिंगं दुर्गायै अग्नये विष्णवे च न मम'–असा त्याग करावाः त्यानंतर–'जातवेदसे इत्यनुवाकस्य उपनिषदऋषयः दुर्गाग्निविष्णवो देवताः त्रिष्टुप् छन्दः चर्वाज्यहोमेविनियोगः' असा पुनःपुनः तोच अनुवाक् म्हणून-५००४ चरुहोम करून, मग ५००४ आज्यहोम करावा. असा हा होम एक अयुत (दहा हजार) करून, होमशेषसमाप्तीनंतर दहा ब्राह्मणांना भोजन घालावें, किंवा एका ब्राह्मणाचा विवाह करावा.

अथमृतपुत्रत्वदोषे ब्राह्मणोद्वाहनंहरिवंशश्रवणंमहारुद्रजपश्चेतित्रीणिव्य-स्तानिसमस्तानिवाशक्त्यपेक्षयाकुर्यात् रुद्रजपेदशांशेनाज्याक्तदूर्वाहोमःहरि-वंशश्रवणविधिरन्येपिविधयोविस्तरेणप्रागुक्ताः ॥

**मृतपुत्रत्वदोषपरिहार**—पुत्र होऊन मरत असल्यास–ब्राह्मणाचा विवाह, हरिवंशग्रन्थश्रवण आणि महारुद्र–असे तीन उपाय (करण्यास) सांगितले आहेत. म्हणून–हे सर्व, यांतले दोन किंवा एक–जसें सामर्थ्य असेल त्याप्रमाणें करावें. रुद्रजप केल्यास त्याच्या दशांशानें तुपांत भिजवि-लेल्या दूर्वांचा होम करावा. हरिवंशश्रवणविधि व इतर विधि मागें विस्तारपूर्वक सांगितलेच आहेत.

अथकन्यादानप्रशंसातद्गृहेभोजननिषेधादिच यथाशक्तिभूषणालंकृत-कन्याप्रदाताऽश्वमेधयाजीभयेषुप्राणदाताचेतित्रयःसमपुण्याः श्रुत्वाकन्याप्रदा-

तारंपितरः सपितामहाः । विमुक्ताःसर्वपापेभ्योब्रह्मलोकंव्रजन्तिते १ इतिकन्यादानप्रशंसा विष्णुंजामातरंमत्वातस्यकोपंनकारयेत् । अप्रजायांतुकन्यायांनाश्नीयात्तस्यवैगृहे: १ इतिकन्यागृहेपित्रोर्भोजननिषेधः विवाहमध्येस्त्रियासहभोजनेपिनदोषः अन्यदापत्न्यासहभोजनेचान्द्रायणंप्रायश्चित्तम् ॥

**कन्यादानपुण्य**—यथाशक्ति अलंकार घालून कन्यादान करणारा, अश्वमेध यज्ञ करणारा आणि संकटग्रस्ताचें प्राणरक्षण करणारा—हे तिघे सारखेच पुण्यवान् होत. आपल्या वंशांतल्या कन्येचें दान केल्याचें ऐकून पितामहादि सर्व पितर सर्वपापमुक्त होत्साते ब्रह्मलोकाप्रत जातात—अशी कन्यादानप्रशंसा सांगितली आहे. जामात ( जांवई ) हा विष्णु आहे असें समजून, त्यावर राग करूं नये. कन्येला अपत्य होईपर्यंत तिच्या मातापित्यांनीं, तिच्या नवऱ्याच्या ( जांवयाच्या ) घरीं जेवूं नये, असा निषेध आहे. विवाहांत स्त्रीसह (मातापित्यांनीं) भोजन केल्यास दोष नाहीं. इतर प्रसंगीं भोजन केल्यास चान्द्रायणप्रायश्चित्त करावें.

अथवाग्दानादिविचारः विवाहनक्षत्रादियुतेसुदिनेवरस्यपित्रादिःकन्यागृहंगत्वा कन्यापूजनंकरिष्ये तदङ्गत्वेनगणपतिपूजनंवरुणपूजनंचकरिष्य इतिसंकल्पयेत् कन्यापितातुकरिष्यमाणकन्यादानाङ्गभूतंवाग्दानंकरिष्ये तदङ्गगणपतिपूजनंवरुणपूजनंचकरिष्ये इतिसंकल्पयेत् अवशिष्टप्रयोगोन्यत्रज्ञेयः अथविवाहदिनेतत्पूर्वदिनेवावध्वाहरिद्रातैलादिनामङ्गलस्नानंकारयित्वातच्छेषहरिद्रादिनावरस्यमङ्गलस्नानंकारणीयमित्याचारः ।

**वाग्दानविचार**—विवाहोक्त नक्षत्राच्या शुभदिवशीं वराच्या पित्यादिकांनीं कन्यागृहीं जाऊन, 'कन्यापूजनं करिष्ये तदंगत्वेन गणपतिपूजनं वरुणपूजनं च करिष्ये' असा संकल्प करावा. कन्येच्या पित्यानें—'करिष्यमाण कन्यादानांगभूतं वाग्दानं करिष्ये तदंग गणपतिपूजनं च करिष्ये'—असा संकल्प करावा. बाकीचा प्रयोग इतर ग्रन्थांत पाहावा. त्यानंतर विवाहाच्या दिवशीं किंवा त्याच्या आदल्या दिवशीं वधूला हळद, तेल वगैरेंनीं मंगलस्नान घालून, त्यांतले शेष राहिलेल्या हळद तेल वगैरेंनीं वराला मंगलस्नान घालावें असा हा (उष्टया हळदीचा ) आचार आहे.

एवंवरस्यपित्रादिः पत्न्यासंस्कार्येणचसहकृताभ्यङ्गस्नानोऽहतवासाः प्राङ्मुखउपविश्यस्वदक्षिणपत्नींतद्दक्षिणेसंस्कार्यमुपवेश्यदेशकालौसंकीर्त्यममास्यपुत्रस्यदैवपित्र्यऋणापाकरणहेतुधर्मप्रजोत्पादनसिद्धिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विवाहाख्यंसंस्कारकर्मकरिष्ये तदङ्गत्वेनस्वस्तिवाचनंमातृकापूजनंनान्दीश्राद्धंनन्दिन्यादिमण्डपदेवतास्थापनंचकरिष्ये तदादौनिर्विघ्नतासिद्ध्यर्थंगणपतिपूजांकरिष्येइतिपुत्रविवाहेसंकल्पः कन्याविवाहेतुजातकर्मादिलोपे ममास्याः कन्यायाःजातकर्मनामकर्मसूर्यावलोकनानिष्क्रमणोपवेशनान्नप्राशनचौलसंस्काराणांबुद्धिपूर्वकलोपजन्यप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारमर्धकृच्छ्रंचूडायाः कृच्छ्रंतत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतदानेनाहमाचरिष्ये गर्भाधानसीमन्तयोर्लोपेतयोरप्युक्तः ततो ममास्याः कन्यायाःभर्त्रासहधर्मप्रजोत्पादनद्रव्य-

परिग्रहधर्माचरणेश्वधिकारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विवाहाख्यंसंस्कारं करिष्यइतिविशेषः शेषंपूर्ववत् भ्राताममभ्रातुरिति भगिन्याइतिवा पितृव्यादिः कर्ताममभ्रातृसुतस्यभ्रातुकन्यायाइतिवासंकल्पोहंकुर्यात् वरवध्वोः स्वयंकर्तृत्वे ममदैवपित्र्यऋणेत्यादिममभर्त्रासहेत्यादिचसंकल्पः केचित्स्वस्तिवाचनकाले कन्यादानादिकाले वा प्रधानविवाहसंस्कारसंकल्पंनकुर्वन्तिसप्रमादइतिबहवः अन्येतुकन्यादानविवाहहोमादिसंकल्पएवप्रधानसंकल्पस्तदतिरिक्तविवाहपदार्थाभावादित्याहुः मातृकापूजान्तेमृतापितृमातृमातामहोवरवध्वोः पितास्वपित्राद्युद्देश्यकपार्वणत्रययुतंनान्दीश्राद्धंकुर्यादित्यसंदिग्धम् मातर्येवजीवन्त्यांतत्पार्वणलोपः मातामहमात्रजीवनेतत्पार्वणमात्रलोपः तथाचोभयत्रपार्वणद्वयेनैवनान्दीश्राद्धसिद्धिः मातृमातामहयोर्जीवनेपितृपार्वणेनैवतत्सिद्धिः पितृप्रपितामहमृतौ पितामहजीवनेचपितृप्रपितामहतत्पितॄनुद्दिश्यपितृपार्वणम् तथाचपितृप्रपितामहतत्पितरोनांदीमुखाइदंवःपाद्यमित्यादिप्रयोगः प्रपितामहमात्रजीवनेपितृपितामहतत्पितामहाइत्युद्देशः पितृमृतौपितामहप्रपितामहजीवने पिता पितामहस्यपितामहप्रपितामहौचनान्दीमुखाइत्युच्चारः एवंमतृमारणेपितामहीमात्रजीवनेमातःपितुःपितामहीप्रपितामह्यौचनान्दीमुखाइत्युच्चारः प्रपितामहीमात्रजीवनेमातृपितामही पितुःप्रपितामहीचनान्दीमुखाइत्युच्चारः पितामहीप्रपितामह्योर्जीवनेमातःपितामहस्यपितामहीप्रपितामह्यौचेत्युच्चारः मुख्यमातृजीवनेसपत्नमातृमरणेपिनमातृपार्वणम् एवंमुख्यापितामहीजीवनेपितामह्याः सपत्नीमृतावपितयासहनमातृपार्वणंकिंतुपूर्वोक्तएवोच्चारः एवंप्रपितामहीसपत्नीविषयेपि एवंमुख्यमातामहीजीवनेतत्सपत्न्यादिमरणेपिनमातामहादीनांसपत्नीकत्वेनोच्चारः किंतुकेवलानामेव दर्शादौमातृजीवनेसापत्नमातुर्मृतौकेवलानामेवपित्रादिनामुद्देशइतिसिद्धान्तात् ।

**विवाहसंकल्प वगैरे**—वर व त्याचीं आईबापें यांनीं अभ्यंगस्नानानंतर नवीं वस्त्रें परिधान करून पूर्वाभिमुख बसावें. वरपित्याच्या उजव्या हाताकडे त्याच्या पत्नीनें व तिच्या उजव्या हाताकडे संस्कार्यानें ( ज्याचा विवाह व्हायचा असेल त्यानें ) बसावें. नंतर वरपित्यानें देशकालादिकांचा उच्चार करून,–'ममास्य पुत्रस्य दैवपित्र्यऋणापाकरणहेतुधर्मप्रजोत्पादनासिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विवाहाख्यं संस्कारकर्म करिष्ये । तदंगत्वेन स्वस्तिवाचनं मातृकापूजनं नान्दीश्राद्धं नन्दिन्यादिमण्डपदेवतास्थापनं च करिष्ये । तदादौ निर्विघ्नतासिद्ध्यर्थं गणपतिपूजां करिष्ये । '—असा पुत्राच्या विवाहाचा संकल्प करावा. कन्येचा विवाह असल्यास व जातकर्मादिक संस्कारांचा लोप झाला असल्यास–'ममास्याः कन्यायाः जातकर्मनामकर्मसूर्यावलोकननिष्क्रमणोपवेशनान्नप्राशनचौलसंस्काराणां बुद्धिपूर्वकंलोपजन्यप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारमर्धकृच्छ्रं चूडायाः कृच्छ्रं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये'–असा संकल्प करावा. आपल्या गर्भाधान व सीमन्तोन्नयन यांचा लोप झाला असल्यास

त्यांचाही याच संकल्पांत उच्चार करावा आणि नंतर–"ममास्याः कन्यायाः भर्त्रा-सह धर्मप्रजोत्पादनद्रव्यपरिग्रहधर्माचरणेष्वधिकारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विवाहाख्यं संस्कारं करिष्ये "--असा संकल्पांत विशेष समजावा. आणि बाकीचा प्रयोग पूर्वीप्रमाणें करावा. कर्ता जर संस्कार्याचा भाऊ असला, तर त्यानें 'मम भ्रातुः' किंवा 'मम भगिन्याः' असें म्हणावें. वर व वधू यांच्या स्वतःकडेच जर कर्तेपणा असेल, तर 'मम दैवपित्र्यऋण०' व 'मम भर्तासह०' वगैरे प्रकारचा संकल्प करावा. स्वस्तिवाचन किंवा कन्यादान या प्रसंगीं मुख्य विवाहसंस्काराचा संकल्प करूं नये, असें जरी कांहीं ग्रन्थकार सांगतात, तरी ही त्यांची चूक असल्याचेंच अनेक ग्रन्थकार प्रतिपादितात. कन्यादान व विवाहहोम यांचा जो संकल्प तोच मुख्य संकल्प असल्यानें, त्यावांचून त्या संस्कारास विवाह हें नांवच नसल्याचें. इतर ग्रन्थकार सांगतात. मातृकापूजनानंतर वरपिता किंवा वधूपिता यानें, आपला बाप, आई, आईचा बाप वगैरे मेलेलीं असल्यास, तीन पार्वणांचें नान्दीश्राद्ध केलें पाहिजे. आई जिवंत असल्यास मातृपार्वणाचा लोप करावा व आईचा बाप जिवंत असल्यास मातामहपार्वणाचा लोप करावा. याप्रमाणें त्या दोहोंपैकीं जें कोणी जिवंत असेल त्याच्या पार्वणाचा लोप करून बाकीच्या दोन पार्वणांनीं नान्दीश्राद्धाची सिद्धि होते. आई व आईचा बाप अशीं दोघेंही जिवंत असल्यास फक्त पितृपार्वणच करावें. बाप व पणजा हे मेलेले असून, आजा जिवंत असल्यास–पिता, प्रपितामह व प्रपितामहपिता ( पणजा ) यांचें पितृतर्पण करावें. अशा वेळीं--'पितृप्रपितामहतत्पितरो नान्दीमुखा इदंवः पाद्यम्'–इत्यादि प्रयोग करावा. फक्त आजाच जिवंत असल्यास–बाप, आजा व त्याचा आजा यांच्या नांवानें पितृपार्वण करावें. बाप मेलेला असून आजा व पणजा जर जिवंत असतील, तर बाप, आजाचा बाप व त्याचा बाप ( पणजा ) यांच्या नांवानें पितृपार्वण करावें व तसा उच्चारही करावा. तद्वतच आई मेलेली असून बापाची आई तेवढी जिवंत असेल, तर–'मातः पितः पितामही प्रपितामह्यौच नान्दीमुखाः'–असा उच्चार करावा. पणजीच तेवढी जिवंत असल्यास–'मातृपितामह्यौ पितृप्रपितामह्यौ च नान्दीमुखाः'–असा उच्चार करावा. आजी व पणजी या दोघी जिवंत असल्यास–'मातः पितामहस्य पितामही प्रपितामह्यौच'–असा उच्चार करावा. खरी आई जिवंत असून सावत्र आई मेलेली असल्यास, मातृपार्वण नाहीं. तद्वतच खरी पितामही ( आजी ) जिवंत असतां तिची सवत मेलेली असल्यास, त्या सवतीसह मातृपार्वण करूं नये, व पूर्वी सांगितलेलाच उच्चार करावा. व याप्रमाणेंच पणजीच्याही सवतीबद्दल जाणावें. मुख्य आईच आई जिवंत असून तिची सवत जरी मेलेली असली, तरी आईच्या जनकादिकांचा सपत्निक उच्चार करूं नये, फक्त त्यांच्याच नांवाचा उच्चार करावा; कारण, दर्शादिश्राद्धांविषयींही माता जिवंत असून सापत्न माता मृत असल्यास, पित्यादिकांचाच उच्चार करावा असा सिद्धांत आहे.

अथमातामहमृतौमातुःपितामहजीवनेमातामहतत्पितामहप्रपितामहाइत्युच्चारः मातुः प्रपितामहमात्रजीवनेमातामहमातृपितामहौमातामहस्यप्रपितामहश्चनान्दीमुखाइत्युच्चारः द्वयोर्जीवनेमातामहमातुःपितामहस्यपितामहप्रपितामहौचनान्दीमुखाइत्युच्चारः

**मातामहत्रयोच्चारविचार**—आईचा बाप मेलेला असून तिचा आजा जिवंत असल्यास,–'मातामहतत्पितामहप्रपितामहा':—असा उच्चार करावा. आईचा आजाच तेवढा जिवंत असल्यास–'मातामह मातृपितामहौ मातामहस्य प्रपितामहश्च नान्दीमुखा:'–असा उच्चार करावा. आईचा आजा व पणजा हे दोघेही जिवंत असल्यास,–मातामह मातुः पितामहस्य पितामहप्रपितामहौ च नान्दीमुखाः'–असा उच्चार करावा.

अथजीवत्पितृकोमृतमातृमातामहश्चविवाहोपनयनजातकर्मादिषुपुत्रसंस्कारेषुमातृमातामहपार्वणद्वयमेवकुर्यात् मातर्यपिजीवत्यांमातामहपार्वणमेव मातामहजीवनेमातृमरणेजीवत्पितृकः सुतसंस्कारेमातृपार्वणमेवदेवरहितंकुर्यात् त्रिष्वपिजीवत्सुसुतसंस्कारेपितुः पित्रादीनुद्दिश्यपार्वणत्रयंकुर्यात् त्रिष्वपिजीवत्सुसुतसंस्कारेनान्दीश्राद्धलोपएवेतिपक्षान्तरंग्रन्थारम्भेउक्तम् ॥

**मातृपार्वणविधि**—बाप जिवंत असून आई व आईचा बाप हीं जर मेलेलीं असतील, तर जातकर्मादि पुत्रसंस्कारांत मातृपार्वण व मातामहपार्वण, अशीं दोन पार्वणें (संस्कारकर्त्यानें) करावींत. आईसुद्धां जिवंत असल्यास फक्त एकच मातामहपार्वण तेवढें करावें. आई मेलेली असून, तिचा बाप जिवंत असल्यास, ज्याचा बाप जिवंत असेल त्यानें पुत्रसंस्कारांत फक्त देवरहित असें मातृपार्वणच करावें. आई, बाप व आईचा बाप अशीं तिघें जिवंत असतां, पुत्रसंस्कारांत बापाचा बाप वगैरे (त्रयीच्या) उद्देशानें तीन पार्वणें करावींत किंवा नान्दीश्राद्ध करूं नये, असाही दुसरा पक्ष असल्याचें, (तिसऱ्या) या परिच्छेदाच्या आरंभीं सांगितलेंच आहे.

द्वितीयविवाहसमावर्तनाधानादिषुस्वसंस्कारेषुनान्दीश्राद्धंकुर्वन्जीवत्पितृकः पितुः पित्रादीनुद्दिश्यपार्वणत्रयंकुर्यात् पितुर्मातृपितामहीप्रपितामह्यः पितुः पितृपितामहप्रपितामहाः पितुर्मातामहमातुः पितामहमातुःप्रपितामहानान्दीमुखाइतितत्रोच्चारः अत्रपितुर्मात्रादिजीवनेतत्पार्वणलोपः मृतपितृकस्तुस्वपित्रादीनुद्दिश्येतित्वसंदिग्धम् पितृपितामहयोर्जीवनेपितामहस्यमात्रादिपार्वणत्रयोद्देशः त्रयाणांजीवनेपितृपार्वणलोपः तत्रसुतसंस्कारेइवस्वसंस्कारेमातृमातामहयोः पार्वणाभ्यामेवनान्दीश्राद्धसिद्धिः पित्रादित्रयजीवनेमातृमातामहयोश्चजीवनेप्रपितामहस्यपित्रादिपार्वणत्रयोद्देशेननान्दीश्राद्धम् एवंप्रथमविवाहेपिकर्त्रन्तराभावात्वरएवनांदीश्राद्धंकुर्वन्मृतपितृकःस्वपित्रादीनुद्दिश्यजीवत्पितृकस्तु पितुः पित्रादीनुद्दिश्यकुर्यात् जीवत्पित्रपितामहस्तुपितामहस्यपित्रादिपार्वणत्रयोद्देशेन प्रपितामहस्यापिजीवनेप्रपितामहपित्रादिपार्वणत्रयोद्देशेनवा पितृ-

पार्वणलोपेनवानान्दीश्राद्धम् अत्रसर्वत्रपितुः पितामहादेर्वापित्रादिपार्वणो-द्देशपक्षेस्वमातृमातामहयोर्मरणेपिनस्वमातृमातामहयोःपार्वणंकिंतुपित्रादेर्मातृ-मातामहयोरेवेतिज्ञेयम् इतिजीवत्पितृकनान्दीश्राद्धप्रयोगः ॥

**जीवन्पितृकनान्दीश्राद्धप्रयोग**—कर्त्याचा दुसरा विवाह, समावर्तन, आधान वगैरे संस्कारांत, बाप जिवंत असणाऱ्यानें त्यानें आपल्या—आजा, पणजा व निपणजा यांच्या नांवांचीं तीन पार्वणें करावींत. व तीं करतांना—'पितुर्मातृपितामही प्रपितामह्यः पितुः पितृपितामहप्रपितामहाः पितुर्मातामह मातुः पितामहमातुः—प्रपितामहाः नान्दीमुखाः'—असा उच्चार करावा. अशा वेळीं बापाची आई जिवंत असल्यास तिच्या तेवढ्या पार्वणाचा लोप करावा. बाप मेलेला असल्यास, बाप इत्यादिकांच्या नांवानें नान्दीश्राद्ध करावें, यांत संशय नाहीं. बाप व आजा जिवंत असल्यास बापाच्या आजी वगैरेंच्या उच्चारानें तीन पार्वणें करावींत. तिघेही जिवंत असतां पितृपार्वणें मुळींच करूं नयेत. त्या वेळीं पुत्रसंस्काराप्रमाणें आपल्या संस्कारांत—आई व तिचा बाप यांच्या दोन पार्वणांनींच नान्दीश्राद्ध पुरें होतें. बाप वगैरे तिघे आणि आई व तिचा बाप—हीं सर्व जर जिवंत असलीं, तर पणजादिकांच्या उद्देशाचीं तीन पार्वणें करून नान्दीश्राद्ध करावें. दुसरा कोणी कर्ता नसल्यास पहिल्या विवाहप्रसंगींही जर स्वतःचा ( कर्ता ) नान्दीश्राद्ध करणारा असेल, तर त्याचा बाप मेलेला असेल त्यानें आपल्या पित्यादिकांच्या उद्देशानें आणि बाप जिवंत असल्यास—आजा, पणजा, निपणजा यांच्या नांवानें (तीन, पार्वणें करून, नान्दीश्राद्ध करावें. पणजाही जिवंत असल्यास निपणजा वगैरे (पुढच्या) तयींचीं पार्वणें करून, किंवा पितृपार्वणांचा लोप करून, नान्दीश्राद्ध करावें. येथें सर्वत्र बापाचा बाप किंवा आजा यांचा उच्चार करून पितृपार्वण करण्याचा पक्ष असल्यास, आपली आई व तिचा बाप जरी, मेलेलीं असलीं तरी, आपल्या स्वतःचें मातृपार्वण किंवा मातामहपार्वण न करतां, बापाची आई व आईचा बाप यांचींच पार्वणें ( दोन ) करावींत. असा हा जीवन्पितृकनान्दीश्राद्धाचा प्रयोग येथें संपला.

यदातुकन्याविवाहंपुत्रस्योपनयनंप्रथमविवाहंचपितृव्यामातुलादिः करोतितदासंस्कार्यस्यमृतपितृकत्वे अस्यसंस्कार्यस्यपितृपितामहप्रपितामहाइत्यादि प्रयोगंकुर्यात् सोदरभ्रातुर्नोच्चारेविशेषःभ्रातुःपित्रादीनां संस्कार्यपित्रादीनां-चैक्यात् सापत्नभ्रातातुसंस्कार्यस्यमातृपितामहीप्रपितामह्यइत्याद्युच्चारयेत् संस्कार्यमातृजीवनेतत्पार्वणलोपः संस्कार्यस्यजीवत्पितृकत्वेमातुलादिःकर्ता संस्कार्यपितुःमातृपितामहीप्रपितामह्यः संस्कार्यपितुःपितृपितामहप्रपितामहा इत्याद्युच्चार्यतत्पितुः पित्रादिपार्वणत्रयंकुर्यात् संस्कार्यस्यपितृपितामहयोर्जीवनेमातुलादिः संस्कार्यस्य पितुर्मात्रादीन्मातामहादींश्चोद्दिश्यपार्वणद्वयंकुर्यात् पितुर्वर्गद्वयाद्यजीवनेपकैकवर्गपार्वणम् पितृवर्गत्रयाद्यजीवनेमातुलादिःपिता-महस्यमात्रादिपार्वणत्रयोद्देशं कुर्यात् पितामहस्यमात्रादि जीवनेतत्पार्वणलोपः

पूर्ववत् पितृव्येजीवत्पितृकसंस्कारकर्तरिनोच्चारेविशेषः संस्कार्यपितुः पित्रादीनांपितृव्यस्यपित्रादीनां चैक्यात् पितामहस्यसंस्कर्तृत्वेसंस्कार्यपितृमरणे संस्कार्यस्य पितुःममपितृपितामहौचनान्दीमुखाःसंस्कार्यस्यमात्रादयोमातामहादयश्चेत्याद्युच्चारः संस्कार्यपितृजीवनेपितामहःकर्तास्वमातृपितृमातामहपार्वणानि ममेतिपदरहितानि तत्सहितानिवोच्चारयेत् एवंप्रपितामहेकर्तर्यपियोज्यम् ॥

**पित्याव्यतिरिक्त संस्कारकर्त्याचा निर्णय**—कन्याविवाह, उपनयन अथवा प्रथमविवाह—हीं करणारा जेव्हां—चुलता, मामा वगैरेंपैकीं कोणी असेल तेव्हां संस्कारकर्त्यानें—संस्कार्याचा बाप मेलेला असल्यास—'अस्य संस्कार्यस्य पितृपितामहप्रपितामहाः'—असा प्रयोग करावा. सख्खा भाऊच कर्ता असल्यास, निराळा प्रयोग करण्याचें कारण नाहीं; कारण—भावाचा बाप व संस्कार्याचा बाप वगैरे एकच असतात. सावत्र भाऊ ( कर्ता ) असल्यास त्यानें 'संस्कार्यस्य मातृपितामही प्रपितामह्यः'—असा उच्चार करावा. संस्कार्याची आई जिवंत असल्यास मातृपार्वण करूं नये. संस्कार्य जीवत्पितृक असून, मामा वगैरे इतर कोणी कार्यकर्ता असल्यास—'संस्कारपितुः मातृपितामहीप्रपितामह्यः संस्कार्यपितुः पितृपितामहप्रपितामहाः'—अशा उच्चारानें संस्कार्याच्या बापाचा बाप वगैरे तिघांचीं पार्वणें करावीत. संस्कार्याचा बाप व आजा हे जिवंत असल्यास व मामा वगैरे कोणी जर कर्ता असेल तर संस्कार्याच्या बापाची आई व आईचा बाप यांच्या उद्देशानें दोन पार्वणें करावींत. पितृत्रयी, मातृत्रयी व मातामहत्रयी—( पितृवर्ग, मातृवर्ग आणि मातामहवर्ग ) या तिहींपैकीं कोणत्याही दोन वर्गांचा पहिला जिवंत असल्यास तिसऱ्या वर्गापुरतें एकच पार्वण करावें. तिन्ही वर्गांतले पहिले ( तिघे प्राणी ) जिवंत असतील, व कर्ता जर मामा असेल, तर संस्कार्याच्या आजाची आई वगैरेंच्या तीन पार्वणांचा उद्देश करावा. पितामहाची माता जिवंत असल्यास, त्या पार्वणाचा लोप करण्यास पूर्वीं जें सांगितलें आहे, तसेंच करावें. संस्कार्य जर जीवत्पितृक असेल व कर्ता जर पितृव्य (चुलता) असेल, तर उच्चारांत वेगळेपणा नसतोच. कारण, संस्कार्याच्या बापाचा बाप वगैरे आणि चुलत्याचा पिता वगैरे एकच असतात. संस्कार्याचा बाप मेलेला असून आजा कर्ता असल्यास—'संस्कार्यस्य पितुः मम पितृपितामहौ च नान्दीमुखाः संस्कार्यस्य माता० मातामह०'—वगैरे प्रकारचा उच्चार करावा. संस्कार्याचा बाप जिवंत असतां; कर्ता जर आजा असेल तर, त्यानें आपली आई, बाप व आईचा बाप यांचीं पार्वणें—'मम' पदयुक्त किंवा तें पद गाळल्याच्या उच्चारानें करावींत. प्रपितामह ( पणजा ) कर्ता असेल, तेव्हांही असेंच करावें.

दातुमशक्नुवताकन्यादानाधिकारिणात्वंकन्यादानंकुर्विति प्रार्थितोयः परकीयकन्यांदातुमिच्छतियश्चसुवर्णेनात्मीयांकृत्वा अनाथांज्ञात्वावान्यकन्यांदातुमिच्छतिसोपिसंस्कार्याया कन्यायाःपित्रादीनुच्चारयेत् तस्याः पितृजीवने तदीयमात्रादींस्तस्यावर्गत्रयाद्यजीवनेपितुःपित्रादीनितियथासंभवमूह्यम् इति पित्रकर्तृकनांदीश्राद्धप्रयोगः ॥

**पित्रकर्तृकनान्दीश्राद्धप्रयोग**—कन्यादान करण्यास असमर्थ असणाऱ्यानें —तूं माझ्या कन्येचें दान कर—अशी ज्याची प्रार्थना केली असेल, त्या कन्यादान करणाऱ्यानें, किंवा ज्यानें दुसऱ्याची कन्या सुवर्ण देऊन आपली अशी केली असेल त्यानें, अथवा अनाथा कन्येचें दान करूं इच्छिणाऱ्यानें—संस्कार्य कन्येचा बाप वगैरेंचा ( त्रयीचा ) उच्चार करून नान्दीश्राद्ध करावें. कन्येचा बाप जिवंत असल्यास, कन्येचें मातृपार्वण व मातामहपार्वण, अशीं दोनच पार्वणें करावींत. कन्येच्या ( पितृवर्गातले ) पहिले तीन जिवंत असल्यास, पित्याचा पिता वगैरे जसा योग असेल त्याप्रमाणें उच्चार करावा. याप्रमाणें बापावांचून इतर जो कोणी नान्दीश्राद्ध करणारा असेल त्याच्याबद्दलचा असा प्रयोग आहे.

दत्तकन्यायाविवाहंकुर्वन्प्रतिग्रहीतापितास्वपित्रादीनुद्दिश्यैवकुर्यात् दत्तकस्तुपुत्रो यदिअधिकार्यन्तराभावाल्लब्धजनकपितृधनस्तदाजनकपित्रादीन्प्रतिग्रहीतृपित्रादींश्चपितरौपितामहौप्रपितामहौचनान्दीमुखाइत्येवमुच्चार्यश्राद्धंकुर्यात् एवं मातृपार्वणेमातामहपार्वणेचद्विवचनप्रयोगऊह्यः यदितुजनकधनग्रहणेधिकार्यन्तरसत्त्वादलब्धजनकधनस्तदाप्रतिगृहीतृपित्रादीनेवोद्दिश्यकुर्यात्नपितृद्वयोद्देशेन अत्रसर्वत्र संभ्रमेणक्वचित्क्वचिन्मातृपार्वणपितृपार्वणयोः क्रमवैपरीत्यपातेऽपिसक्रमोनविवक्षितः सर्वत्रनांदीश्राद्धेषुपूर्वंमातृपार्वणंततःपितुः पार्वणंततोमातामहस्येति क्रमस्यनिश्चितत्वात् बह्वृचकात्यायनैर्मातृपितामहीप्रपितामह्य इत्यादिनानुलोम्येनपार्वणत्रयेप्युच्चारः तैत्तिरीयादिभिस्तुप्रपितामहपितामहपितरइत्येवमादिनाव्युत्क्रमेणोच्चारः कार्यः एकसंस्कार्यस्यानेकसंस्काराणांसहानुष्ठानेनान्दीश्राद्धंसकृदेव एवं यमलयोर्द्वयोःपुत्रयोः कन्ययोर्वाविवाहोपनयनादिसंस्काराणांसहैवानुष्ठानेपिनान्दीश्राद्धं सकृदेवयमलयोः संस्काराणामेकमण्डपेएककालेएकेनकर्त्रासहकरणेदोषोनेत्युक्तम् नान्दीश्राद्धेअन्नाभावेआममामाभावेहिरण्यंदद्यात्हिरण्याभावेयुग्मब्राह्मणभोजनपर्याप्तान्ननिष्क्रयीभूतंयथाशक्तिकिंचिद्द्रव्यंस्वाहानममेतिवदेत् अन्यःसर्वोपिविशेषोगर्भाधानप्रकरणे विस्तरेणोक्तस्ततएवानुसंधेयः इतिनान्दीश्राद्धम् ॥[२] ततोमण्डपदेवतास्थापनंग्रहयज्ञश्चस्वस्तिवाचनात्पूर्वं नान्दीश्राद्धोत्तरंवाकार्यः ॥

**दत्तकन्याविवाह**—दत्तक कन्येचें लग्न, तिला दत्तक घेणाराच जर करणारा असला, तर त्यानें आपल्या पितरांच्या नांवांनीं पार्वणें करून नान्दीश्राद्ध करावें. दत्तक पुत्राला जर त्याला जन्म देणाऱ्या त्याच्या बापाचें द्रव्य मिळालें असलें, तर जन्म देणारा बाप व दत्तक घेणारा बाप—या दोघांच्याही पितरांचा उच्चार दत्तकानें जो करावा तो—'पितरौ पितामहौ प्रपितामहौच नान्दीमुखाः'—असा द्विवचनान्त करून, नान्दीश्राद्ध करावें. मातृपार्वण व मातामहपार्वण यांमध्येंही याचप्रमाणें द्विवचनान्त उच्चार करण्यास ( त्यास ) सांगितलें आहे. जन्म देणाऱ्या बापाचें द्रव्य घेणारा दुसरा कोणी अधिकारी असल्यानें, जेव्हां तें दत्तक पुत्राला

मिळालें नसेल, तेव्हां दत्तक पुत्रानें दोन्ही पितरांच्या नांवानें नान्दीश्राद्ध न करतां, फक्त दत्तक घेणाऱ्याच्याच उद्देशानें करावें. या प्रसंगीं क्वचित् मातृपार्वण व पितृपार्वण यांच्या अनुक्रमाचा विपरीतपणानें जर घोंटाळा होईल, तर तो अनुक्रम घेऊं नये. कोणत्याही प्रसंगीं नान्दीश्राद्धांत आधीं मातृपार्वण, नंतर पितृपार्वण व त्यानंतर मातामहपार्वण—असें करण्याचाच खरा क्रम लक्षांत ठेवावा. ऋग्वेदी व कात्यायन यांनीं—'मातृपितामहीप्रपितामह्यः'—असा अनुलोमानें ( सरळपणानें ) तिन्ही पार्वणांत उच्चार करावा. तैत्तिरीयांनीं—'प्रपितामह पितामहपितरः'—असा विलोमानें ( उलट क्रमानें ) उच्चार करावा. संस्कार्य एकच असतां, त्याचे अनेक संस्कार जरी एकाच वेळीं करायचे असले तरी, नान्दीश्राद्ध एकदांच करावें. जुळ्या मुलांचे संस्कार एकाच वेळीं, एकाच मण्डपांत व एकाच कर्त्यानें करण्यांत दोष नाहीं, असें सांगितलें आहे. नान्दीश्राद्धांत अन्न ( देण्यास ) नसल्यास आमान्न द्यावें, आमान्न नसल्यास द्रव्य ( हिरण्य ) द्यावें व हिरण्यही नसल्यास—'युग्मब्राह्मणभोजनपर्याप्तान्ननिष्क्रयीभूतं यथाशक्ति किंचिद्द्रव्यं स्वाहा न मम'—अशा उच्चारानें, दोन ब्राह्मणांना पुरेल इतक्या अन्नाचें मूल्य ( किंमत ) यथाशक्ति ( द्रव्य ) द्यावें. बाकीचा सर्व निर्णय (विशेष) गर्भाधानप्रकरणांत जो सांगितला आहे तो पाहावा. असा हा नान्दीश्राद्धाचा निर्णय आहे. मण्डपदेवतांची स्थापना व ग्रहयज्ञ हीं दोन्ही पुण्याहवाचनाच्या आधीं किंवा नान्दीश्राद्धानंतर करावींत.

**अथकन्यादातावरगृहंगतः करिष्यमाणकन्याविवाहाङ्गत्वेनवरस्यसीमान्तपूजांकरिष्यइतिसंकल्प्यगणेशवरुणौसंपूज्यवरंपादप्रक्षालनंवस्त्रगन्धपुष्पनीरांजनैःसंपूज्ययथाचारंदुग्धादिप्राशयेत् ततोवरोमङ्गलघोषैर्वाहनारूढोवधूगृहंगच्छेत् वरपितावधूंवस्त्रादिनापूजयेदितियथाचारम् लग्नदिनेकन्यापिताकन्यावाअन्योन्यालिङ्गितगौरीहरयोः प्रतिमांसुवर्णरौप्यादिनिर्मितांकात्यायनीमहालक्ष्मीशचीभिःसहपूजयेत् तत्रकोणचतुष्टयस्थापितकलशश्रेणीनांमध्ये उपलयुतदृषदिवस्त्रेवातण्डुलपूर्णेगौरीहरौमन्त्रेणपूजयेत् तत्र ।सिंहासनस्थांदेवेशींसर्वालंकारसंयुताम् । पीतांबरधरंदेवंचन्द्रार्धकृतशेखरम् ॥ १ ॥ करेणाधःसुधापूर्णकलशंदक्षिणेनतु । वरदंचाभयंवामेनाश्लिष्यचतनुप्रियाम् ॥ २॥ इतिध्यानमंत्रः । गौरीहर महेशान सर्वमंगलदायक । पूजां गृहाण देवेश सर्वदा मङ्गलं कुरु ॥ १ ॥ इतिपूजामन्त्रः । कन्यादेहप्रमाणेन सप्तविंशतितन्तुभिः कृतया वर्तिकया दीपं प्रज्वाल्य सुवासिनीब्राह्मणान् भोजयेत् इतिगौरीहरपूजा ॥**

**सीमान्तपूजन व गौरीहरपूजा**—कन्या देणारानें वराच्या घरीं जाऊन, 'करिष्यमाण कन्याविवाहांगत्वेन वरस्य सीमान्तपूजां करिष्ये'—असा संकल्प करावा आणि गणपति व वरुण यांच्या पूजा करून, वराचे पाय धुवावे. नंतर वस्त्र, गन्ध, पुष्प व नीरांजन यांनीं त्याची पूजा केल्यावर, परिपाठाच्या आचाराप्रमाणें दूध वगैरे त्याला पिण्यास द्यावें. त्यानंतर वरानें वाहनावर बसून मंगलवाद्य घोषांत वधूच्या घरीं जावें. घरच्या आचाराप्रमाणें

वराच्या बापानें वधूची मग वस्त्रादिकांनीं पूजा करावी. विवाहाच्या दिवशीं कन्येचा बाप किंवा कन्या, यांनीं—परस्परालिङ्गित अशी गौरी व हर यांची सोन्याची किंवा रुप्याची प्रतिमा-कात्यायनी, महालक्ष्मी, शची वगैरे देवतांसह पूजावी. चौकोनी केलेल्या निराळ्या जागेंतल्या चार कलशांच्या पंक्तींच्या (उतरंडींच्या) मध्यें—पाटावर बंटा किंवा वस्त्र यांवरच्या तांदुळाच्या ढिगावर मांडलेल्या गौरीहरांची पूजा करावी. त्या पूजाप्रसंगीं—'सिंहसनस्थादेवेशीं सर्वालंकारसंयुताम्। पीतांबरधरं देवं चन्द्रार्धकृतशेखरम् ॥ करेणाधः सुधापूर्णं कलशं दक्षिणेन तु। वरदं चाभयं वामेनाश्लिष्य च तनुप्रियाम् ॥'—याप्रमाणें ध्यान करावें. आणि नंतर—'गौरीहर महेशान सर्वमंगलदायक। पूजां गृहाण देवेश सर्वदा मङ्गलं कुरु ॥' अशी प्रार्थनापूर्वक पूजा करावी. कन्येच्या उंचीच्या प्रमाणानें सत्तावीस सुतांच्या केलेल्या वातीचा दिवा लावून, ब्राह्मणसुवासिनींना भोजन द्यावें. अशी गौरीहरपूजा आहे.

**पञ्चविंशतिदर्भाणांवेण्यग्रग्रन्थिसंयुतोलम्बाग्रोविष्टरः संपाद्यः वरस्यया-भवेच्छाखातच्छाखागृह्यचोदितः। मधुपर्कःप्रदातव्योह्यन्यशाखेपिदातरि ॥१॥ दधिमधुमिश्रं मधुपर्कः। तत्र दध्यलाभेपयोजलं वा मध्वलाभे सर्पिर्गुडो वा प्रतिनिधिः गृहागतं स्नातकं वरं मधुपर्केणार्हयिष्य इति संकल्पः वरस्यद्विती-योद्वाह तु स्नातकमितिपदलोपः ततो यथा गृह्यं मधुपर्कप्रयोगोज्ञातव्यः। एवं गुरुःश्रेष्ठविप्राःराजाचातिगृहागतायज्ञेवृताऋत्विजश्च। मधुपर्केणपूजनीयाः ऋत्विगादीनामपि अर्च्यशाखयैवमधुपर्को न तु दातृशाखया। जयन्तस्तु सर्वत्र यजमानशाखयैवमधुपर्क इत्याह अत्र गन्धपुष्पधूपदीपपूजान्ते उपहारो माषविकारसहितो भोजनार्थंदेयः। एवं मधुपर्के तत्पूर्वं वा कृतभोजनायैव वरायो पोषितो दाता कन्यां दद्यात् ॥**

**मधुपर्कविधि**—पंचवीस दर्भांची वेणी करून तिच्या शेवटीं गांठ दिलेला व लांब टोकें असलेला असा विष्टर (आसन) करावा. कन्यादान करणारा जरी भिन्नशाखेचा असला, तरी वराच्या शाखेच्या गृह्यसूत्रांत जसा सांगितला असेल तसा मधुपर्क तयार करावा. दहीं व मध यांचें मिश्रण म्हणजे मधुपर्क. दहीं न मिळाल्यास दूध किंवा पाणी व मध न मिळाल्यास तूप किंवा गूळ हीं प्रतिनिधि म्हणून घ्यावींत. 'गृहागतं स्नातकं वरं मधुपर्केणार्हयिष्ये'—असा मधुपर्काचा संकल्प करावा. वराचा जर दुसरा विवाह असेल, तर 'स्नातक' शब्द उच्चारूं नये. मधुपर्क गृह्यसूत्राप्रमाणें करावा. गुरु, श्रेष्ठ ब्राह्मण व राजा हे घरीं आले असतां त्यांची व यज्ञांत पसंत केलेल्या ऋत्विजांची, याप्रमाणेंच मधुपर्कपूजा करावी. ऋत्विजादिकांची पूजा करते वेळीं, ज्यांची पूजा करायची त्यांच्या शाखेंत सांगितलेल्या विधीप्रमाणें, त्यांचा मधुपर्क करावा. असें जयन्त ग्रन्थकार म्हणतो. या मधुपर्कपूजेंत गन्धपुष्पधूपदीप वगैरे पूजा झाल्यावर, उडदाच्या डाळीचा तयार केलेला लाडू खायला द्यावा. अशा तऱ्हेनें उपहार केलेल्या वराला, उपास केलेल्या कन्येच्या पित्यादिकांनीं कन्या द्यावी.

अथ लग्नघटीस्थापनम् । दशपलमितताम्रघटितंषडङ्गुलोन्नतंद्वादशाङ्गुलविस्तृतंघटीयंत्रंकुर्यादितिसिन्धुः द्वादशार्धपलोन्मानंचतुर्भिश्चतुरङ्गुलैः । स्वर्णमाषैःकृतच्छिद्रंयावत्प्रस्थजलप्लुतम् १ इतितुश्रीभागवतेतृतीयस्कन्धेउक्तम् अस्यार्थः अशीतिगुञ्जात्मकः कर्षः अस्यैवसुवर्णसंज्ञा कर्षचतुष्टयंपलम् तथाचषट्पलताम्रविरचितंपात्रंविंशतिगुञ्जोन्मितसुवर्णनिर्मितचतुरङ्गुलदीर्घशलाकयामूलेकृतच्छिद्रंकुर्यात् तेनच्छिद्रेणयावत्प्रस्थपरिमितजलंप्रविशतितेनचप्रस्थजलपूरणेनतत्पात्रंजलेमग्नंभवतितत्पात्रं घटीकालप्रमाणम् तत्रप्रस्थमानंतुषोडशपलात्मकम् पलंसुवर्णाश्चत्वारः कुडवप्रस्थमाढकम् द्रोणंचखारिकाचेतिपूर्वंपूर्वंचतुर्गुणमित्युक्तेः ग्रन्थान्तरेचतुर्मुष्टिःकुडवश्चत्वारः कुडवाःप्रस्थइति केचित्षष्टिसंख्याकगुरुवर्णोच्चारेपलसंज्ञःकालःषष्टिपलकालानाडिकेत्याहुः एवंप्रमाणीकृतंघटीयंत्रंसूर्यमण्डलस्यार्धोदयेर्धास्तेवाजलपूर्णेताम्रपात्रेमृत्पात्रेवाक्षिपेत् तत्रमंत्रः मुख्यंत्वमसियन्त्राणांब्रह्मणानिर्मितंपुरा । भवभावायदम्पत्योःकालसाधनकारणम् १ अनेनमन्त्रेणगणेशवरुणपूजनपूर्वकंघटीयन्त्रंस्थापयेत् एवंस्थापिताघटी आग्नेययाम्यनैर्ऋतवायव्यदिग्गतानशुभा मध्यस्थितान्यदिग्गताचशुभा एवमाग्नेयादिपञ्चदिक्षुपूर्णानशुभा इतिघटीविचारः ॥

**लग्नघटिकास्थापनविचार**—दहा पलें (तेहेतीस तोळे व चार मासे) तांबें घेऊन त्याचें सहा बोटें उंच व बारा बोटें रुंद असें घटिकापात्र (अभिषेकपात्र) तयार करावें, असें निर्णयसिन्धूंत सांगितलें आहे व भागवतांत—'द्वादशार्धपलोन्मानं चतुर्भिश्चतुरंगुलैः । स्वर्णमाषैः कृतच्छिद्रं यावत्प्रस्थजलप्लुतम् ।'—असें जें म्हटलें आहे, त्याचा अर्थः—ऐंशी गुंजांचा जो एक कर्ष त्यालाच सुवर्ण असें नांव आहे. चार कर्ष म्हणजे एक पल. अशीं सहा पलें तांबें घेऊन त्याची घटिका करावी. वीस गुंजा सोन्याची चार बोटें लांबीची (सळई) करून, तिनें घटीयंत्राच्या बुडाला (मूळांत) भोंक पाडावें. नंतर त्या भोंकावाटें घटीपात्रांत एक प्रस्थपरिमित (बत्तीस पलें) पाणी शिरलें म्हणजे जें घटिकापात्र पाण्यांत बुडतें, तें घटकेचें प्रमाण होय. या प्रस्थाचें प्रमाणः—सोळा पलें म्हणजे एक प्रस्थ होतो; कारण, चार सुवर्ण=एक पल, चार पलें=एक कुडव, चार कुडव=एक प्रस्थ, चार प्रस्थ=एक आढक, चार आढक=एक द्रोण व चार द्रोण=एक खारिका —असें वचन आहे. दुसऱ्या ग्रन्थांत, चार मुष्टि=एक कुडव आणि चार कुडव=एक प्रस्थ—असें सांगितलें आहे. 'गुरु' हा शब्द साठ वेळ उच्चारण्याला जितका वेळ लागतो, तितका काळ म्हणजे एक पल व अशीं साठ पलें म्हणजे एक घटका, असें कोणी ग्रन्थकार म्हणतात. अशा तऱ्हेनें तयार केलेलें घटियंत्र—सूर्यमण्डलाचा अर्धा उदय किंवा अर्धा अस्त झाल्याबरोबर, तांब्याच्या किंवा मातीच्या भांड्यांत ठेवावें. त्याचा मंत्र—'मुख्यं त्वमसि यन्त्राणां ब्रह्मणा निर्मितं पुरा । भवभवाय दंपत्योः कालसाधनकारणम् ॥' गणपति व वरुण यांची पूजा केल्यावर या मंत्रानें घटिकायंत्र (मागें सांगितलेल्या जलपूर्ण भांड्यांत) ठेवावें. हें घटीयंत्र—

आग्नेय, दक्षिण, नैर्ऋत्य किंवा वायव्य—या दिशांकडे तरंगत गेल्यास अशुभ, मध्येंच राहिल्यास अथवा इतर दिशांकडे गेल्यास शुभ समजावें. आग्नेयादि (वर सांगितलेल्या) पांच दिशांकडे घटीयंत्र पूर्ण भरल्यास अशुभ. असा हा घटिकायंत्रस्थापनविचार आहे.

अथ ज्योतिर्विदादिष्टेशुभकालेहस्तान्तरालेतन्दुलराशीपूर्वापरौकृत्वापूर्वराशौप्रत्यङ्मुखंवरमपरस्मिन्प्राङ्मुखींकन्यामवस्थाप्यतयोर्मध्येकुंकुमादिकृतस्वस्तिकांकितमन्तःपटमुदग्दशंधारयेयुः कन्यावरयोःपित्रादिर्ज्योतिर्विदंसंपूज्यतद्दत्ताक्षताःफलयुताःकन्यावरयोरञ्जलौदद्यात् कन्यावरौसाक्षतहस्तौस्वास्तिकालोकनपरौअमुकदेवतायैनमइतिस्वस्वकुलदेवतांध्यायन्तौतिष्ठतः ज्योतिर्विदामङ्गलपद्याष्टकपाठान्तेस्वोक्तकालेतदेवलग्नमितिपठित्वासुमुहूर्तमस्तुॐप्रतिष्ठेत्युक्तेअन्तःपटमुत्तरतोपसारयेयुः ततःकन्यावरौपरस्परशिरसोरक्षतप्रक्षेपंपरस्परेक्षणंचकुर्यातामूवरोवध्वाभ्रूमध्येदर्भाग्रेणॐभूर्भुवःस्वरितिपरिमृज्यदर्भंनिरस्यापः स्पृशेत् वैदिकैःपठ्यमानब्राह्मणखण्डवाक्यान्तेकन्यापूर्वकंताभ्यामक्षतारोपणंप्रतिवाक्यंकार्यम् ततः प्राङ्मुखंवरंप्रत्यङ्मुखींकन्यांकृत्वादातादक्षिणेसपत्नीकउपविश्यवरदत्तालंकारादिरहितामहतवस्त्रस्वदेयालंकारमात्रयुतांकनकयुक्ताञ्जलिंवरपूजावाशिष्टगन्धलिप्तहस्तपादांकन्यामेवंदद्यात् कुशहस्तोदेशकालौसंकीर्त्यअमुकप्रवरामुकगोत्रोमुकशर्माहंममसमस्तपितृणां निरतिशयानन्दब्रह्मलोकावाप्त्यादिकन्यादानकल्पोक्तफलावाप्तयेअनेनवरेणास्यांकन्यायामुत्पादयिष्यमाणसंतत्याद्वादशावरान्द्वादशपरान्पुरुषांश्चपवित्रीकर्तुमात्मनश्चश्रीलक्ष्मीनारायणप्रीतयेब्राह्मविवाहविधिनाकन्यादानंकरिष्यइतिकुशाक्षतजलेनसंकल्प्यउत्थायकन्यांसंप्रगृह्यकन्यांकनकसंपन्नांकनकाभरणैर्युताम्। दास्यामिविष्णवेतुभ्यंब्रह्मलोकजिगीषया १ विश्वंभरःसर्वभूतः साक्षिण्यःसर्वदेवताः। इमांकन्यांप्रदास्यामिपितृणांतारणायच २ इत्युक्त्वा कांस्यपात्रस्थकन्याञ्जलेरुपरिवराञ्जलिंनिधायदक्षिणास्थितपत्न्यासंततांक्रियमाणांशुद्धोदकधारांसहिरण्येवरहस्तेनिक्षिपेत् कन्यातारयतु पुण्यंवर्धयतु शान्तिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु पुण्याहंभवन्तोब्रुवन्तुइत्यादिवाक्यचतुष्टयान्ते अमुकप्रवरामुकगोत्रोमुकशर्माहंममसमस्तेत्यादिप्रीतयेइत्यन्तमुक्त्वा अमुकप्रवरोपेतामुकगोत्रायामुकशर्मणः प्रपौत्रायामुकशर्मणः पौत्रायामुकशर्मणःपुत्रायामुकशर्मणेश्रीधररूपिणेवरायअमुकप्रवरामुकगोत्रामुकशर्मणःप्रपौत्रींअमुकशर्मणःपौत्रींअमुकशर्मणःममपुत्रींअमुकनाम्नींकन्यांश्रीरूपिणींप्रजापतिदैवत्यांप्रजोत्पादनार्थंतुभ्यमहंसंप्रददेइतिसहिरण्यहस्तेसाक्षतजलंक्षिपेत्प्रजापतिःप्रीयतां कन्यांप्रतिगृह्णातुभवानितिवदेत् एवंत्रिवारंकन्यांतारयत्वित्यादिनाकन्यादानंकार्यम् वरःॐस्वस्तिइत्युक्त्वाकन्यादक्षिणांसंस्पृश्याकइदंकस्माअदात० पृथिवीप्रतिगृह्णात्वितित्रिरुक्त्वाधर्मप्रजासिद्ध्यर्थंप्रतिगृह्णामीतिवदेत् दाता गौरींकन्यामिमांविप्रयथाशक्तिविभूषिताम्। गोत्रायशर्मणेतुभ्यंदत्तांविप्रसमाश्रय १ कन्येममाग्रतोभूयाः कन्येमेदेविपार्श्वयोः। कन्येमेपृष्ठतोभूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयाम् २ ममवंशकुलेजातापालितावत्सराष्टकम्।तुभ्य-

विप्रमयादत्तापुत्रपौत्रप्रवर्धिनी ३ धर्मेचार्थेचकामेचनातिचरितव्यात्वयेयम् । वरोनातिचरामीतिदातउपविश्य कन्यादानप्रतिष्ठासिद्ध्यर्थंइदंसुवर्णमग्निदैवत्यंदक्षिणात्वेनसंप्रददे ॐस्वस्तीतिवरःततोभोजनपात्रजलपात्रादिदानानि पितामहोदानकर्ताचेत्पौत्रीमित्यतःपूर्वममेतिवदेत् पुत्रीमित्यतःपूर्वंनवदेत्भ्रात्रादिः पुरुषत्रयकीर्तनमेवकुर्यात्क्वापिममेतिनवदेत् प्रपितामहःप्रपौत्रीमित्यत्रममेतिवदेत्मातुलादिरन्योवादातास्वगोत्रंस्वविशेषणत्वेनोक्त्वामुकशर्मणःसमस्तपितृणामितिकन्यापितृनामषष्ठ्यन्तमुक्त्वाकन्याविशेषणत्वेनतद्गोत्रादिवदेत् ममवंशकुलेजातेत्यत्रममेतिस्थानेकन्यापितृनामवदेत् दत्तककन्यादाने ममवंशकुलेदत्तेतिऊहः ॥

**कन्यादानविधि**—ज्योतिष्यानें सांगितलेल्या शुभवेळीं, एक हात मध्यें जागा टाकून पूर्वेकडे एक व पश्चिमेकडे एक अशा अंतरानें तांदुळाचे दोन ढीग ( राशि ) करावे आणि पूर्वेकडच्या राशीवर पश्चिमाभिमुख असा वर, व पश्चिमेकडच्या राशीवर पूर्वाभिमुख कन्या—अशीं उभीं करून, त्या दोघांच्यामध्यें कुंकुमादिकांनीं काढलेल्या स्वस्तिकादिकांनीं अलंकृत असा उत्तरदिशेकडे दशा केलेला अंतरपट धरावा. कन्या व वर यांच्या पित्यादिकांनीं ज्योतिष्याची पूजा करून त्यानें दिलेल्या अक्षता फळासह कन्या व वर यांच्या ओंजळींत द्याव्या. वधू आणि वर यांनीं आपापल्या हातांत अक्षता घेऊन, अंतरपटावरच्या स्वस्तिकाकडे पाहात 'अमुक दैवतायै नमः' असें ध्यान करीत उभें राहावें. मंगळाष्टकें म्हटल्यावर ज्योतिष्यानें स्वतः सांगितलेल्या मुहूर्तावर—'तदेव लग्नं०' हें वाक्य उच्चारून 'सुमुहूर्तमस्तु ॐ प्रतिष्ठ०'—असें म्हटल्यावर, अंतरपट उत्तरदिशेकडे काढून घ्यावा व मग वधूवरांनीं एकमेकांच्या डोक्यांवर अक्षता टाकून, एकमेकांना न्याहाळावें. वरानें वधूच्या दोन्ही भुवयांच्या मध्यें दर्भानें 'ॐ भूर्भुवः स्वः' या मंत्रानें रेघ ओढून, दर्भ टाकून द्यावा व पाण्यानें हात धुवावा ( उदकस्पर्श ). वैदिक ब्राह्मणांनीं ब्राह्मणखण्डांतलीं जीं ( या प्रसंगीं ) म्हणायचीं वाक्यें, तीं ते म्हणत असतां, त्यांतल्या प्रत्येक वाक्याच्या शेवटीं—कन्येनें वराच्या व वरानें कन्येच्या मस्तकावर अक्षता टाकाव्या. नंतर वरवधू यांना अनुक्रमें पूर्वाभिमुख आणि पश्चिमाभिमुख बसवून, कन्यादान करणारानें दक्षिणेकडे आपल्या स्त्रीसह बसावें व वरानें दिलेल्या अलंकाररहित नवें वस्त्र नेसलेली, (कन्यादान करणाऱ्यानें) स्वतः दिलेले अलंकार घातलेली, ओंजळींत सोनें घेतलेली आणि वरपूजा करून शिल्लक राहिलेल्या गन्धानें हातपाय माखलेली अशी कन्या दान करावी, तो प्रकार येणेंप्रमाणें:—हातांत दर्भ घेऊन, देशाकालादिकांचा उच्चार करावा, आणि—'अमुकप्रवरामुकगोत्रोमुकशर्माहं मम समस्त पितॄणां निरतिशयानन्दब्रह्मलोकावाप्त्यादिकन्यादानकल्पोक्तफलावाप्तये अनेन वरस्यां कन्यायामुत्पादयिष्यमाण संतत्या द्वादशावरान् द्वादशपरान् पुरुषांश्च पवित्रीकर्तुमात्मनश्च श्रीलक्ष्मीनारायणप्रीतये ब्राह्मविवाहविधिना कन्यादानं करिष्ये'—असा दर्भाक्षतांसह हातीं पाणी घेऊन संकल्प करावा आणि उभें ( स्त्रीसह ) राहून कन्येला घेऊन—'कन्यां

कनकसम्पन्नां कनकाभरणैर्युताम् । दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया ॥ विश्वम्भरः सर्वभूतः साक्षिण्यः सर्वदेवताः । इमां कन्यां प्रदास्यामि पितॄणां तारणाय च ॥' या मंत्रांनीं कन्येच्या अञ्जलांवर वराची अञ्जलि ( ओंजळ ) कांश्याच्या भांड्यावर धरून, ( कर्त्याच्या ) बायकोनें एकसारखी पाण्याची धार धरलेलें स्वच्छ पाणी ( शुद्धोदक ) वराच्या हिरण्ययुक्त ( सोनें असलेल्या ) हातावर सोडावें. 'कन्या तारयतु । पुण्यं वर्धयतु । शान्तिः पुष्टिस्तुष्टिश्चास्य । पुण्याहं भवन्तो ब्रुवन्तु ।' हीं चार वाक्यें ( नंतर ) उच्चारल्यावर—'अमुक प्रवरामुकगोत्रोमुकशर्माहं मम समस्त० इत्यादि प्रीतये'—येथपर्यंतचें वाक्य म्हणून—'अमुकप्रवरोपेतामुकगोत्रायामुकशर्मणः प्रपौत्रायामुकशर्मणः पौत्रायामुकशर्मणः पुत्रायामुकशर्मणे श्रीधररूपिणे वराय । अमुकप्रवरामुकगोत्रामुकशर्मणः प्रपौत्रींअमुकशर्मणः पौत्रींअमुकशर्मणः मम पुत्रीं अमुक नाम्नीं कन्यां श्रीरूपिणीं प्रजापतिदेवत्यां प्रजोत्पादनार्थं तुभ्यमहं संप्रददे ।'—असें म्हटल्यावर, वराच्या सुवर्णयुक्त हातावर अक्षतांसह पाणी सोडावें, आणि—'प्रजापतिः प्रीयतां कन्यां प्रतिगृह्णातु भवान्'—असें म्हणावें व तीन वेळ—'कन्या तारयतु' हें वाक्य म्हणून कन्येचें दान करावें. वरानें—'ॐस्वस्ति'—असें म्हणून कन्येच्या उजव्या खांद्याला स्पर्श करावा आणि—'क इदं कस्मा अदात्० पृथिवी प्रतिगृह्णातु'—हा मंत्र तीन वेळां म्हणून,—'धर्मप्रजासिद्ध्यर्थं प्रतिगृह्णामि'—असें म्हणावें. कन्यादान करणारानें—'गौरीं कन्यामिमां विप्र यथाशक्तिविभूषिताम् । गोत्राय शर्मणे तुभ्यं दत्तां विप्र समाश्रय ॥ कन्ये ममाग्रतो भूयाः कन्ये मे देवि पार्श्वयोः । कन्ये मे पृष्ठतो भूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयाम् ॥ मम वंशकुले जाता पालिता वत्सराष्टकम् । तुभ्यं विप्र मया दत्ता पुत्रपौत्रप्रवर्धिनी ॥ धर्मे चार्थेच कामेच नातिचरितव्यात्वयेयम् ॥' अशीं वाक्यें म्हणावींत, व मग वरानें—'नातिचरामि'—असें म्हणावें. दानकर्त्यानें नंतर बसून—'कन्यादान० प्रतिष्ठासिद्ध्यर्थं इदं सुवर्णमाग्निदैवत्यं दक्षिणात्वे व सम्प्रददे' असें म्हणून वराला सुवर्णदक्षिणा द्यावी व वरानें—'ॐ स्वस्ति'—असें म्हणावें. त्यानंतर भोजनपात्रें, जलपात्रें वगैरे ( वराला ) दान द्यावींत. दानकर्ता जर आजा असेल, तर 'पौत्रीं' या शब्दाच्या पूर्वीं 'मम' असें त्यानें म्हणावें व 'पुत्रीं' या शब्दाच्या आधीं 'मम' असें म्हणूं नये. दानकर्ता भाऊ असल्यास, पूर्वीप्रमाणें तीन पुरुषांचीं फक्त नांवेंच त्यानें उच्चारावींत व 'मम' हा शब्द कोणाच्याही आधीं उच्चारूं नये. दानकर्ता जर पणजा असेल, तर 'प्रपौत्रीं'—या शब्दापूर्वीं त्यानें 'मम' असें म्हणावें. मामा वगैरे दुसरा कोणी जर दानकर्ता असेल, तर त्यानें आपलें गोत्र आपल्या नांवासह उच्चारून—'अमुक शर्मणः समस्तपितॄणां' असें कन्येच्या बापाचें नांव षष्ठ्यन्त उच्चारावें, आणि विशेषणासहित तिच्या बापाचें गोत्रादिक म्हणावें. 'मम वंशकुले जाता' यांतल्या 'मम' या शब्दाच्या ऐवजीं कन्येच्या बापाचें नांव षष्ठ्यन्त उच्चारावें. दत्तक कन्येचें कन्यादान असल्यास, पिता वगैरे जें कोणी दान करणारें असेल त्यानें, 'मम वंशकुले जाता'—याच्या ऐवजीं 'मम वंशकुले दत्ता'—असें म्हणावें.

अथ कन्यादानाङ्गत्वेनगवादिदानेमन्त्राः यज्ञसाधनभूतायाविश्वस्याघौघनाशिनी। विश्वरूपधरोदेवःप्रीयतामनयागवा १ इतिगोः। हिरण्यगर्भसंभूतंसौवर्णंचाङ्गुलीयकम्। सर्वप्रदंप्रयच्छामिप्रीणातुकमलापतिः १ इत्यङ्गुलीयस्यः। क्षीरोदमथनेपूर्वमुद्धृतं कुण्डलद्वयम्। श्रियासहसमुद्भूतंददेश्रीःप्रीयतामिति १ कुण्डलयोः काञ्चनंहस्तवलयंरूपकान्तिसुखप्रदम्। विभूषणप्रदास्यामिविभूषयतुमेसदा १ इतिवलययोः परापवादपैशून्यादभक्ष्यस्यचभक्षणात्। उत्पन्नपापंदानेनताम्रपात्रस्यनश्यतु १ इतिताम्रजलपात्रस्य यानिपापानिकाम्यानिकाम्योत्थानिकृतानिच। कांस्यपात्रप्रदानेनतानिनश्यन्तुमेसदा १ इतिभोजनार्थकांस्यपात्रस्य अगम्यागमनंचैवपरदाराभिमर्शनम्। रौप्यपात्रप्रदानेनतानिनश्यन्तुमेसदा १ इतिजलार्थस्यभोजनार्थस्यचरौप्यपात्रस्यपूरितंपूगपूगेननागवल्लीदलान्वितम्। पूर्णेनचूर्णपात्रेणकर्पूरपिष्टकेनच। सपूगखण्डनंदिव्यंगन्धर्वाप्सरसांप्रियम् १ ददेदेवनिरातङ्कत्वत्प्रसादात्कुरुष्वमाम्। इतिताम्बूलस्य एवंदासीमहिषीगजाश्वभूमिस्वर्णपात्रपुस्तकशय्यागृहरजतवृषभानांदानमन्त्राः कौस्तुभेद्रष्टव्याः॥

**कन्यादानाङ्गभूत गोदानादिमंत्र**—यज्ञसाधनभूताया विश्वस्याघौघनाशिनी। विश्वरूपधरो देवः प्रीयतामनया गवा॥" आंगठी दानमंत्रः—"हिरण्यगर्भसंभूतं सौवर्णं चांगुलीयकम्। सर्वप्रदं प्रयच्छामि प्रीणातु कमलापतिः॥" कुण्डलदानमंत्र—'क्षीरोदमथने पूर्वमुद्धृतं कुंडलद्वयम्। श्रियासह समुद्भूतं ददे श्रीः प्रीयतामिति॥' वलयें (कडींतोडे) वगैरे देण्याचा मन्त्रः—'काञ्चनं हस्तवालयं रूपकान्तिसुखप्रदम्। विभूषणं प्रदास्यामि विभूषयतु मे सदा॥' तांब्याचीं पाण्याचीं भांडीं वगैरे देण्याचा मंत्रः—'परापवाद पैशून्यादभक्ष्यस्य च भक्षणात्। उत्पन्नपापं दानेन ताम्रपात्रस्य नश्यतु॥' जेवणासाठीं कांश्याचें भांडें दान करण्याचा मंत्रः—'यानि पापानि काम्यानि काम्योत्थानि कृतानि च कांस्यपात्रप्रदानेन तानि नश्यन्तु मे सदा॥' पाणी प्यायला व जेवण्यासाठीं रुप्याचीं भांडीं देण्याचा मंत्रः—'अगम्यागमनं चैव परदाराभिमर्शनम्। रौप्यपात्रप्रदानेन तानि नश्यन्तु मे सदा॥' विडा दान देण्याचा मंत्रः—'पूरितं पूगपूगेन नागवल्लीदलान्वितम्। पूर्णेन चूर्णपात्रेण कर्पूरपिष्टकेन च॥ पूगखण्डनं दिव्यं गन्धर्वाप्सरसां प्रियम्। ददे देव निरातङ्क त्वत्प्रसादात्कुरुष्व माम्॥' याप्रमाणेंच—दासी, म्हैस, हत्ती, घोडा, जमीन, सोन्याचीं भांडीं, पुस्तकें, अंथरूण, घर, रुपें, बैल वगैरे दानें देण्याचे जे मंत्र, ते कौस्तुभांत पाहावेत.

अन्तःपटधारणादिकन्यादानान्तंकेचिदग्निप्रतिष्ठापनोत्तरंकुर्वंति केचित्पूर्वाङ्गहोमोत्तरंकेचिदाज्यसंस्कारोत्तरमित्यनेकपक्षास्तत्रस्वस्वगृह्यानुसारेणाचारानुसारेणचव्यवस्था ततोवधूवराभिषेकः ततःकङ्कणबन्धनम् अथाक्षतारोपणम् वधूवराभ्यांअन्योन्यतिलककरणम् मालाबन्धनम् अष्टपुत्रींकंचुकीमाङ्गल्यतन्त्वादिदानम् गणेशपूजा लड्डुकबन्धनम् उत्तरीयवस्त्रान्तग्रन्थियोजनम् लक्ष्म्यादिपूजादि इतिकन्यादानानुक्रमःप्रायोबह्वृचानामन्येषांचयथा गृह्यंज्ञेयः॥

**ऋग्वेद्यांचा कन्यादानानुक्रम**—अन्तःपट (अंतर्पाट) धरल्यापासून कन्यादानापर्यंतचें कृत्य, कोणी अग्निस्थापनेनंतर करतात कोणी पूर्वांगहोमानंतर करतात व कोणी आज्यसंस्कारानंतर करतात. असे हे जे अनेक पक्ष (रिवाज) आहेत, त्यांबद्दल ज्याच्या गृह्यसूत्रांत जसें (सांगितलें) असेल तसें त्यानें करावें. त्यानंतर वधूवरांना अभिषेक करावा. नंतर वधूवरांनीं एकमेकांच्या हातांत कंकणें बांधावीत. एकमेकांनीं एकमेकांवर (वधूवरांनीं) अक्षता टाकणें, तिलक लावणें, माळा घालणें, अष्टपुत्री, चोळी, मंगलसूत्र वगैरे वरानें वधूला देणें, गणपतीची पूजा करणें, (पदरीं) लाडू बांधणें, अंगावरच्या (दोघांच्या) वस्त्रांच्या टोंकांस गांठ देणें, लक्ष्मी वगैरे देवतांचें पूजन करणें वगैरे (एकामागून एक करणें असा हा) ऋग्वेद्यांच्या कन्यादानाचा अनुक्रम आहे. इतरांनीं आपापल्या गृह्यसूत्रांप्रमाणें अनुक्रम समजावा.

अथविवाहहोमः । वधूवरौपूर्वोक्तलक्षणांवेदींमन्त्रघोषेणारुह्यवरःस्वासने-उपविश्यवधूंदक्षिणतउपवेश्यदेशकालौसंकीर्त्य प्रतिगृहीतायामस्यांवध्वांभार्यात्वसिद्धये विवाहहोमंकरिष्ये इतिसंकल्प्य यथागृह्यंविवाहहोमंकुर्यात् । एतदादिविवाहाग्निरक्षेत् रक्षितोग्निश्चतुर्थीकर्मपर्यन्तंगृहप्रवेशनीयहोमात्पूर्वमनुगतश्चेद्विवाहहोमःपुनःकार्यः गृहप्रवेशनीयोत्तरंगतौहोमद्वयमपिपुनः कार्यम् केचित्तुद्वादशरात्रपर्यन्तंवृत्त्युक्तायाश्चेत्याज्याहुतेःसार्वत्रिकत्वमाश्रित्यात्रापि-अयाश्चेत्याहुतिमेवाहुः ॥

**विवाहहोम**—पूर्वीं सांगितलेल्या लक्षणांच्या वेदीवर (बहुल्यावर) वधूवरांनीं मोठ्यानें मंत्र म्हणत चढून, वरानें आपल्या जागीं बसावें व वधूला (त्यानें) आपल्या दक्षिणेकडे बसवावें. नंतर देशकालादिकांचा उच्चार करून,—'प्रतिगृहीतायामस्यां वध्वां भार्यासिद्धये विवाहहोमं करिष्ये'—असा संकल्प करावा आणि नंतर आपल्या गृह्यसूत्राप्रमाणें विवाहहोम करावा. विवाहाग्नीचें रक्षण या वेळेपासून (वरवधूंनीं) करावें. हा अग्नि जर चतुर्थीकर्मापर्यंत गृहप्रवेशनीय होमाच्या आधीं विझाला, तर विवाहहोम पुन्हा करावा, व गृहप्रवेशनीय होमानंतर विझाला, तर ते दोन्ही होम पुन्हा करावेत. बारा दिवसपर्यंत जर गृह्याग्नि विझाला, तर वृत्तींत सांगितलेली 'अयाश्चा०' ही आहुति द्यावी असें कोणी ग्रंथकार सांगतात.

अथगृहप्रवेशनीयहोमः सचवध्वासहस्वगृहंगतस्यविहितस्तथापिशिष्टाः-श्वशुरगृहेएवकुर्वन्ति तत्रार्धरात्रोत्तरंविवाहहोमेपरेद्युः प्रातस्तिथ्यादिसंकीर्त्य-ममाग्नेर्गृह्याग्नित्वसिद्धिद्वाराश्रीपरमे०र्थे गृहप्रवेशनीयाख्यंहोमंकरिष्यइति-संकल्प्यकार्यःअर्धरात्रात्पूर्वं विवाहहोमेतद्दैवहोमोत्तरंपुनस्तिथ्यादिसंकीर्त्य-संकल्पपूर्वकंरात्रावपिगृहप्रवेशनीयहोमकरणेदोषोन यत्तुविवाहहोमगृहप्रवेशनीयहोमयोरेकतन्त्रेणानुष्ठानंकुर्वन्तितदयुक्तम् विवाहाग्नेरेवगृहप्रवेशनीयहो-

मोत्तरंगृह्यत्वसिद्धिराश्वलायनतैत्तिरीयादीनांभवति तैत्तिरीयकात्यायनादीनां-पुनराधानेप्रकारान्तरमस्ति यदिरात्रौषट्घटीमध्येऽग्न्युत्पत्तिस्तदागृहप्रवेशनी-याभावेपिव्यतीपातादिसंभवेपितदैवोपासनहोमारम्भःतदुत्तरंचेत्परदिनेसायमौ-पासनारंभः सचेत्थम् सायंसंध्यामुपास्याविवाहाग्निंप्रज्वाल्यप्राणानायम्यदेश-कालौसंकीर्त्यास्मिन्विवाहाग्नौयथोक्तकालेश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंयावज्जीवमुपास-नंकरिष्यइतिसंकल्प्यपुनर्देशकालौसंकीर्त्यश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंसायंप्रातरुपासन-होमौकरिष्येतत्रेदानींसायमौपासनहोमंकरिष्ये प्रातस्तुपूर्वसंकल्पितप्रातरौपास-नहोमंकरिष्येइतिसंकल्प्यहोमः कार्यः ।

**गृहप्रवेशनीय होम**——वधूसह वर आपल्या घरीं आल्यावर त्यानें गृहप्रवेशनीय होम करावा, असें जरी (शास्त्रांत) सांगितलें आहे, तरी शिष्ट लोकांत, (तो होम) सासुरवाडीच करण्याचा प्रघात (वहिवाट) आहे. विवाहहोम मध्यरात्रीनंतर जर झाला असेल, तर दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिथि-वगैरेंचा उच्चार करून—'ममाग्नेर्गृह्याग्नित्वसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गृहप्रवेशनी-याख्यं होमं करिष्ये'—असा संकल्प करावा आणि मग गृहप्रवेशनीय होम करावा. विवाहहोम जर मध्यरात्रीच्या आधीं झाला असला, तर विवाहहोमानंतर लगेच पुन्हा तिथ्यादिकांचा उच्चार करून, त्याचे संकल्पपूर्वक गृहप्रवेशनीय होम (वराच्या घरांत वधूसह वरानें शिरण्याचा) करण्यास (तशी शिष्टरीति असल्यानें) हरकत नाहीं. विवाहहोम व गृहप्रवेशनीय होम हे दोन्ही, जे कोणी एक तंत्रानेंच करतात तें अशास्त्र होय. आश्वलायन व तैत्तिरीय यांच्या गृह्याग्नीची सिद्धि, विवाहाग्नीपासून गृहप्रवेशनीय होम झाल्यानंतर होते. तैत्तिरीय व कात्यायन यांच्या पुनराधाना-विषयीं (पुन्हा समिध देण्याचा) दुसरा एक प्रकार आहे. रात्रीं जर सहा घटकांच्या आंत अग्नि उत्पन्न झाला, तर गृहप्रवेशनीय होमाच्या अभावीं आणि व्यतीपातादि दुष्ट योगांचा जरी संभव असला तरी, त्या वेळींच उपासनहोमाचा आरंभ करावा, आणि सहा घटकांनंतर अग्नि उत्पन्न झाल्यास दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं जो आरंभ करावा, तो असा:—सायंसन्ध्या करून विवाहाग्नि प्रज्वलित (ताजातवाना) केल्यावर प्राणायाम केल्यावर देशकालादिकांचा उच्चार करावा व मग—'अस्मिन्वि-वाहाग्नौ यथोक्तकाले श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं यावज्जीवमुपासनं करिष्ये'—असा संकल्प केल्यावर देशकालादिकांच्या उच्चारानंतर—'श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सायंप्रातरौपासनहोमौ करिष्ये तत्रेदानीं सायमोपासनहोमं करिष्ये'—असा संकल्प करावा. सकाळीं संकल्प करायचा असल्यास—'पूर्वसंकल्पित प्रातरौपासनहोमं करिष्ये'—असा संकल्प करून मग होम करावा.

अथत्रिरात्रंवधूवरौब्रह्मचारिणावलंकुर्वाणावधःशायिनावक्षारालवणाशिनौ-तिष्ठेताम् ॥

**वधूवरांचें त्रिरात्रव्रत**——वधूवरांनीं नंतर तीन रात्रींपर्यंत ब्रह्मचर्यानें व अलंकार घालून (व्यवहारांत) राहावें. आणि भूमीवर (त्रिरात्र) निजून—खार व मीठ यांवांचूनचें अन्न (तीन दिवस) खावें.

अथचतुर्थदिवसेऽरिणीदानम् । तच्चवधूपितृभ्यामुपोषिताभ्यामुपोषिता-यैवरमात्रेकार्यम् वरमातुरजोदोषेतस्याःशुद्धिप्रतीक्षाकरणासंभवेमनसापात्रमु-द्दिश्येतिरीत्यातांमनसोद्दिश्यैरिणीदानम् वधूवरमात्रोर्विवाहोत्तरंदेवकोत्थाप-नात्प्राक्रजोदोषेपूर्वोक्तांशान्तिंकृत्वाशुद्ध्यन्तेसंकटेशुद्धेःप्रागपिदेवकोत्थापनं-कार्यम् मातुलादेःकर्त्रन्तरस्यपत्न्यारजसिमौञ्जीप्रकरणेउक्तम् एवंविवाहोत्तर-माशौचपाते चतुर्थीकर्मपर्यन्तंप्राप्तकर्मकरणे दातुर्वरस्यकन्यायाश्चनाशौचम् आशौचान्तेदेवकोत्थापनम् असंभवेआशौचमध्येएवदेवकोत्थापनंकृत्वा-आशौचंकार्यम् विवाहात्पूर्वमाशौचरजोदोषयोस्तुप्रागुक्तम् चतुर्थीकर्महोमः-कौस्तुभेउक्तःएतंकेचित्ऋक्शाखिनोनकुर्वन्ति मण्डपोद्वासनदिननिर्णयोमण्डपो-द्वासनपर्यन्तंकर्तव्याकर्तव्यनिर्णयश्चोपनयनप्रकरणेउक्तस्तत्रैवद्रष्टव्यः ॥

**ऐरिणीदान**—लग्नाच्या चौथ्या दिवशीं ऐरिणीदान करावें. वधूच्या उपास केलेल्या आईबापांनीं तें ( दान ) वराच्या उपोषित आईला द्यावें. वराची आई विटाळशी असल्यास व ती शुद्ध होईपर्यंत थांबण्यास अवकाश नसल्यास, जशी इच्छा होईल तसें त्याचें दान द्यावें. वधू आणि वर यांच्या आया जर विवाहानंतर देवक उठवण्याच्या आधीं विटाळशा होतील, तर पूर्वीं सांगितलेली शान्ति करून, शुद्धीनन्तर देवक उठविण्याचें काम करावें, किंवा ( इतर कांहीं ) संकट असल्यास शुद्धीच्या आधीं सुद्धां तें करावें. मामा वगैरे इतर कोणी कर्ता असल्यास त्याची बायको जर विटाळशी झाली, तर त्याबद्दलचा निर्णय मुंजीच्या प्रकरणांत जो सांगितला आहे तो पाहावा. विवाहानंतर अशौच आल्यास चतुर्थीकर्मापर्यंत जें कर्म केलेंच पाहिजे तें करायला—कर्ता, वर व वधू यांना अशौच नाहीं. अशौच संपल्यावर देवक उठवणें व तसें करणें अशक्य असल्यास अशौचांतच तें करून, मग अशौच धरावें. लग्न लागण्याच्या आधीं अशौच आल्यास व रजोदर्शन झाल्यास, त्यांचा निर्णय पूर्वीं सांगितलाच आहे. चतुर्थीकर्माचा होम कौस्तुभांत सांगितला आहे. कित्येक ऋक्शाखी हा होम करीत नाहींत. मण्डपोद्वासनदिननिर्णय आणि मण्डपोद्वासन होईपर्यंत जीं कोणचीं करायचीं व करूं नयेत. त्यांचा निर्णय—उपनयनप्रकरणांत जो सांगितला आहे, तो पाहावा.

अथमण्डपोद्वासनोत्तरंकार्याकार्यविचारः । नस्नायादुत्सवेऽतीतेमङ्गलंविनि-वर्त्यच । अनुव्रज्यसुहृद्बन्धूनर्चयित्वेष्टदेवताम् ॥ १ ॥ स्नानंसचैलंतिलमिश्र-कर्मप्रेतानुयानंकलशप्रदानम् । अपूर्वतीर्थामरदर्शनंचविवर्जयेन्मङ्गलतोऽब्दमे-कम् ॥ २ ॥ मासषट्कंविवाहादौव्रतप्रारम्भणेपिच । जीर्णभाण्डादिनत्याज्यं-गृहसंमार्जनंतथा ॥ ३ ॥ ऊर्ध्वंविवाहात्पुत्रस्यतथाचव्रतबन्धनात् । आत्मनो-मुण्डनंचैववर्षंवर्षार्धमेवच ॥ ४ ॥ मासमन्यत्रसंस्कारेत्रिमासंचौलकर्मणि । पिण्डदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणम् ॥ ५ ॥ अयंविवाहव्रतबन्धचौलोत्तरंवर्ष षण्मासत्रिमासेषुअन्यवृद्धिश्राद्धयुतमङ्गलोत्तरंचमासमेकंपिण्डदानतिलतर्पणनि-षेधस्त्रिपुरुषसपिण्डानामेव एवंमुण्डननिषेधोपि व्रतोद्वाहोतुमङ्गलमितिपक्षे-

मौञ्ज्युत्तरंमुण्डननिषेधः व्रतबन्धस्यमुण्डनरूपत्वपक्षेतुननिषेधः आत्मनोमुण्डनमिति कर्मांगतयाप्राप्तंरागप्राप्तंचमुण्डनंनिषिध्यते अत्रापवादः गङ्गायांभास्करक्षेत्रेमातापित्रोर्मृताहनि । आधानेसोमयागादौदर्शादौक्षौरमिष्यते ॥१॥ महालयेगयाश्राद्धेपित्रोः प्रत्याब्दिकेतथा । सपिण्डयन्तप्रेतकर्मश्राद्धषोडशकेष्वपि ॥ २ ॥ कृतोद्वाहादिकःकुर्यात्पिण्डदानंचतर्पणम् । केचिद्भ्रातृपितृव्यादौराब्दिकेप्येवमूचिरे ॥ ३ ॥ एवंपिण्डपितृयज्ञेअष्टकान्वष्टकापूर्वेद्युःश्राद्धेषुनपिण्डदाननिषेधः दर्शश्राद्धंत्वपिण्डकमेव तेनबव्हृचानांव्यतिषषगोन इतिमण्डपोद्वासनोत्तरंकार्याकार्यनिर्णयः ॥

**मण्डपोद्वासनोत्तर कार्यें**— उत्सव संपल्यावर, मंगलकार्य उरकल्यावर, इष्टमित्रांना निरोप दिल्यावर आणि देवतार्चन केल्यावर स्नान करूं नये. सचैलस्नान ( अंगवस्त्रासह स्नान ), तिलतर्पण, प्रेताबरोबर जाणें, कुम्भदान आणि अपूर्व (पूर्वी न पाहिलेल्या) तीर्थांचें व अपूर्व देवाचें दर्शन—हीं कृत्यें मंगलकार्य झाल्यावर एक वर्षपर्यंत करूं नयेत. विवाहादिक आणि व्रतांचा आरंभ केल्यासही, हीं कर्में केल्यास—सहा महिनेपर्यंत जुनीं भांडीं टाकून देणें, घराची झाडसारव—हीं कामें करूं नयेत. आपल्या मुलाचा विवाह आणि मुंज केल्यानंतर बापानें ( किंवा जो कोणी कर्ता असेल त्यानें ) आपलें मुण्डन अनुक्रमें एक वर्ष व सहा महिने करूं नये. चौलकर्मानंतर तीन महिनेपर्यंत आणि इतर संस्कारानंतर एक महिनापर्यंत पिण्डदान, मृत्तिकास्नान व तिलतर्पण—हीं ( तीं कर्त्यानें ) करूं नयेत. विवाह, व्रतबन्ध व चौल--या संस्कारांनंतर अनुक्रमें—एक वर्ष, सहा महिने व तीन महिने आणि नान्दीश्राद्धयुक्त मंगलकार्य झाल्यावर एक महिनापर्यंत —पिण्डदान व तिलतर्पण हीं न करण्याचें जें सांगितलें आहे, तें त्रिपुरुषसपिण्डासाठींच असून मुंडनाचाही निषेध त्रिपुरुषसपिण्डाकरतांच आहे. व्रतबन्ध आणि विवाह हीं दोन्ही कार्यें मंगल आहेत, असें धरून चालल्यास मुंजीनंतर जरी मुंडनाचा निषेध आहे, तरी—व्रतबन्ध मुंडनरूप आहे, या पक्षीं निषेध नाहीं. आपलें मुंडन करूं नये—असें जें सांगितलें, तें कर्मांगत्वानें व संतापानें होणाऱ्या मुंडनाच्या निषेधाबद्दलचें होय. या बाबतींतला अपवादः—गंगा, भास्करक्षेत्र, मातापितरांचा मृतदिवस, आधान, सोमयाग वगैरे आणि दर्शादिक पर्वणी या बाबतींत क्षौर करणें योग्य आहे. महालय, गयाश्राद्ध, मातापितरांचीं प्रतिवार्षिक श्राद्धें, सपिण्डीपर्यंतचीं प्रेतकर्में व सोळा श्राद्धें—यांत ज्यानें विवाह केला असेल, त्यानेंही पिण्डदान व तिलतर्पण हीं करावीत. भाऊ, चुलता वगैरेंचे प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करतांनाही त्यांत पिण्डदान व तिलतर्पण करावें, असें कोणी ग्रंथकार सांगतात. पिण्डपितृयज्ञ, अष्टका, अन्वष्टका आणि पूर्वेद्यु या श्राद्धांत पिण्डदानाचा निषेध नाहीं. दर्शश्राद्ध पिण्डरहितच करावें. ऋक्‌शाखीयांनीं व्यतिषम (दोन्ही एकदम करणें) करूं नये. असा हा जो मण्डपोद्वासनानंतर कोणचीं कर्में करावींत व कोणचीं करूं नयेत, याचा निर्णय सांगितला, तो येथें संपला.

अथवधूप्रवेशः विवाहात्षोडशदिनान्तःसमदिनेषुपञ्चमसप्तमनवमदिनेषु-षरात्रौस्थिरलग्नेनूतनभिन्नगृहेवधूप्रवेशःशुभः प्रथमदिनेपिकेचित् षष्ठदिनेनि-षेधःप्रयोगरत्नोक्तोनिर्मूलः षोडशदिनमध्येपूर्वोक्तदिनेषुप्रवेशोक्तनक्षत्रतिथि-वारगोचरस्थचन्द्रबलाद्यभावेपिगुरुशुक्रास्तादावपिनदोषः व्यतीपातेक्षयातिथौ-ग्रहणेवैधृतौतथा । अमासंक्रान्तिविष्ट्यादौप्राप्तकालेपिनाचरेत् ॥ १ ॥ प्रथम-नववधूप्रवेशेविवाहार्थगमनेचप्रतिशुक्रदोषोनास्ति द्विरागमनेएवसंमुखशुक्र-दोषः षोडशदिनोत्तरंमासपर्यन्तंविषमदिनेषुमासोत्तरंविषममासेषुवर्षोत्तरं-विषमवर्षेषुवधूप्रवेशःशुभः समेष्वेतेषुवैधव्यादिदोषः पञ्चमवर्षोत्तरंसमविषम-विचारोनास्ति षोडशदिनोत्तरंवधूप्रवेशेनक्षत्राणि अश्विनीरोहिणीमृगपुष्यमघो-त्तरात्रयहस्तचित्रास्वात्यनुराधामूलश्रवणधनिष्ठारेवत्यःशुभाः मासोत्तरंमार्ग-शीर्षमाघफाल्गुनवैशाखज्येष्ठमासाःशुभाः चतुर्थीनवमीचतुर्दशीपञ्चदश्यमा-वास्याभिन्नतिथयोरविभौमेतरवाराश्चशुभाः इतिनववधूप्रवेशः ॥

**वधूप्रवेश**—विवाह झाल्यापासून सोळा दिवसपर्यंत सम दिवशीं, आणि पांचवा, सातवा व नववा या दिवसांच्या रात्रौ स्थिरलग्नावर नव्या वधूचा निराळ्या घरीं ( भिन्नगृह—सासर ) वधूनें जाणें (प्रवेश) शुभ होय. प्रथम (पहिल्या) दिवशींही जाणें, क्वचित् ग्रंथांत शुभ असल्याचें जें सांगितलें आहे, त्याला आधार नाहीं. परगृहप्रवेशाला योग्य अशीं नक्षत्रें, तिथि, वार, गोचरस्थ चन्द्रबल वगैरेंचा जरी अभाव असला, तरी वर सांगितलेल्या सोळा दिवसांपैकीं वाटेल त्या दिवशीं वधूनें ( सासरीं ) गृहप्रवेश करण्यांत दोष नाहीं. त्यांतही जर प्राप्तकालीं ( योग्य वाटणाऱ्या समयीं ) व्यतीपात, क्षयतिथि, ग्रहण, वैधृति, अमावास्या, सूर्यसंक्रान्ति आणि भद्रा—हीं असतील तर वर्ज्य होय. याचा अर्थ—शुभ दिवशीं जर हे योग येतील, तर ते दिवस वर्ज्य समजावेत असा आहे.नववधूचा पहिल्यानें ( सासरीं ) गृहप्रवेश आणि लग्नासाठीं गमन ( जाणें ) यासाठीं प्रतिशुक्राचा दोष नाहीं. दुसऱ्या प्रवेशाच्या वेळीं सन्मुख ( समोरच्या ) शुक्राचा दोष आहे. सोळा दिवसांनंतर आणि एक महिन्याच्या आंतल्या विषम दिवशीं, एक महिन्यानंतर विषम महि-न्यांत आणि एक वर्षानंतर विषम वर्षी—वधूप्रवेश ( सासरीं जाणें ) शुभ होय. सोळा दिवसांनंतर सम दिवस, सम मास ( महिना ) व सम वर्ष—यांत जर वधू सासरीं गेली, तर वैधव्यदोष येतो. पांच वर्षांनंतर समविषमांचा विचार नाहीं. सोळा दिवसांनंतर वधूनें सासरीं जाण्यास अश्विनी, रोहिणी, मृग, पुष्य, मघा, तीन उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाति, अनुराधा, मूळ, श्रवण, धनिष्ठा व रेवती—हीं नक्षत्रें शुभ होत. एका महिन्यानंतर—मार्गशीर्ष, माघ, फाल्गुन, वैशाख व ज्येष्ठ—हे महिने शुभ होत. चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, पौर्णिमा व अमावास्या या तिथि आणि रवि व मंगळ हे वार वर्ज्य करून, इतर तिथि व वार हीं ( सासरीं जाण्यास ) शुभ होत. असा हा नववधूप्रवेशनिर्णय येथें संपला.

अथद्विरागमनम् तत्रमाघफाल्गुनवैशाखाः शुक्लपक्षश्वशुभाः अश्विनीरोहिणीपुनर्वसुपुष्योत्तरात्रयानुराधाज्येष्ठाहस्तस्वातीचित्राश्रवणशततारका नक्षत्रेषु चन्द्रबुधगुरुशुक्रेवारगुरुशुक्रास्तादिरहितेस्थिरलग्नादिशुभकालेद्वितीयवधूप्रवेशःशुभः द्विरागमनेऽधिमासविष्णुशयनमासाःसमवत्सराःप्रतिशुक्रादिदोषाश्चवर्ज्याः द्विरागमोपियदिविवाहमारभ्यषोडशादिनमध्येक्रियतेतदाप्रतिशुक्रादिदोषोऽस्तादिदोषश्चनास्ति द्विरागमेषोढशवासरान्तरेकादशाहेसमवासरेषु । नचात्रऋक्षंनतिथिर्नयोगोनवारशुद्धयादिविचारणीयम् १ केवलाङ्गिरसकेवलभृगुभरद्वाजवसिष्ठकश्यपात्रिवत्सगोत्राणांप्रतिशुक्रदोषोन रेवत्यश्विनीभरणीकृत्तिकाद्यचरणेषुचन्द्रेसतिशुक्रस्यान्धत्वात्प्रतिशुक्रदोषोन दुर्भिक्षे देशविप्लवेविवाहेतीर्थगमनेएकनगरग्रामयोश्चप्रतिशुक्रदोषोन इतिद्विरागमः ॥

**वधूचें दुसऱ्यांदां सासरीं जाणें**—याला ( द्विरागमनम् ) असें जें म्हणतात, त्या बाबतींत—माघ, फाल्गुन, आणि वैशाख हे महिने व शुक्लपक्ष हीं शुभ सांगितलीं आहेत. अश्विनी, रोहिणी, पुनर्वसु, पुष्य, तीन उत्तरा, अनुराधा, ज्येष्ठा, हस्त, स्वाति, चित्रा, श्रवण आणि शततारका—हीं नक्षत्रें व चन्द्र, बुध, गुरु आणि शुक्रवार—हीं दुसऱ्यांदां सासरीं जाण्यास वधूला शुभ होत. गुरुशुक्रांचे अस्त वर्ज्य करावेत. स्थिरलग्नादि शुभकाल घ्यावेत. दुसऱ्यांदा सासरीं जाण्यास ( वधूला )—अधिक महिना, विष्णुशयनमास ( आषाढ शुद्ध एकादशीपासून कार्तिक शुद्ध द्वादशीपर्यंतचा अदमासें चार महिन्यांचा काळ ), सम वर्षें व प्रतिशुक्रादि दोष—हे वर्ज्य करावेत. लग्न लागल्यापासून सोळा दिवसांच्या आंत जर ( वधूनें सासरीं जाणें ) दुसऱ्यांदां केलें, तर त्यांत प्रतिशुक्रदोष किंवा अस्तादिक दोष नाहींत. लग्न लागल्यापासून सोळा दिवसांतल्या अकराव्या आणि सम—या दिवशीं द्विरागमन करण्यास—नक्षत्रतिथियोगवारादिकांची शुद्धि पाहाण्याचें कारण नाहीं. केवलांगिरस, केवलभृगु, भरद्वाज, वसिष्ठ, कश्यप, अत्रि आणि वत्स—या गोत्राच्यांना प्रतिशुक्रदोष नाहीं. रेवती, अश्विनी, भरणी व कृत्तिकांचा पहिला चरण यांवर चन्द्र असतां शुक्र अंधळा असतो, म्हणूनत्या वेळीं प्रतिशुक्रदोष नाहीं. दुर्भिक्ष ( भिक्षा मिळण्यासही कठीण असा धान्यादिकांच्या तुटवड्याचा दुष्काळ ), देशविप्लव ( देशांतील अंदाधुंदी ), विवाह, तीर्थगमन ( तीर्थयात्रेला जाणें ), एक नगर अथवा एकग्राम ( एकाच शहरांत अथवा एकाच गांवीं सासरीं दुसऱ्यांदां वधूला जाण्यास ) प्रतिशुक्रदोष नाहीं. असा हा द्विरागमनाचा निर्णय आहे.

अथवध्वाःप्रथमाब्देनिवासः उद्वाहात्प्रथमेशुचौयदिवसेद्भर्तुर्गृहेकन्यकाहन्यात्तज्जननींक्षयेनिजतनुंज्येष्ठेपतिज्येष्ठकम् । पौषेचश्वशुरंपतिंचमलिनेचैत्रेस्वपित्रालयेतिष्ठन्तीपितरंनिहन्तिनभयंतेषामभावेभवेत् १ इतिवध्वाःप्रथमाब्देनिवासविचारः ॥

**नवविवाहित वधूचा प्रथमाब्दनिवास**—म्हणजे लग्न लागल्यानंतर पहिल्या वर्षीं वधू आषाढाच्या महिन्यांत जर नवऱ्याच्या घरीं राहिली, तर त्यायोगें नवऱ्याच्या आईचा ( सासूचा ) प्राणनाश होतो, क्षयमासीं ( सासरीं नववधू ) राहिल्यास स्वतः मरते. ज्येष्ठांत राहील तर नवऱ्याच्या थोरल्या भावाचा ( ज्येष्ठ दिराचा ) ती नाश करते. पौषांत ( सासरीं ) राहिल्यानें सासऱ्याचा प्राणनाश करते. अधिक महिन्यांत ( सासरीं ) राहिल्यास नवराच मरतो. चैत्रांत ( नववधू ) माहेरीं ( पितृगृहीं ) राहिल्यास बापाचा नाश करते. सासू नसल्यास भीति नाहीं. असा हा लग्नानंतर पहिल्या वर्षीं वधूनें कोठें राहावें त्याचा निर्णय आहे.

अथपुनर्विवाहः दुष्टलग्नेयथोक्तग्रहताराद्यभावेऽन्यत्रापिदुष्टयोगाद्यशुभकाले कूष्माण्डीघृतहोमादियथोक्तविधिंविनासूतकादौचविवाहेजातेतयोरेवदम्पत्योःसुमुहूर्तेपुनर्विवाहः कर्तव्यः सुरापीव्याधिताधूर्ताबंध्यार्थघ्न्याप्रियंवदा । स्त्रीप्रसूश्चाधिवेत्तव्यापुरुषद्वेषिणीतथा १ अधिवेदनंभार्यान्तरकरणम् अप्रजांदशमेवर्षेस्त्रीप्रजांद्वादशेत्यजेत् । मृतप्रजांपञ्चदशेसद्यस्त्वप्रियवादिनीम् १ अत्राप्रियवादोव्यभिचारः प्रातिकूलभाषणरूपस्यतस्यप्रायःकलौसार्वात्रिकत्वात् आज्ञासंपादिनींदक्षांवीरसूंप्रियवादिनीम् । पत्नींत्यक्त्वाभोगार्थमन्योद्वाही-पूर्वभार्यायैस्वधनस्यतृतीयांशंदद्यात् निर्धनश्चेतांपोषयेत् मनुः अधिविन्नातुयानारीनिर्गच्छेद्रोषितागृहात् । सासद्यःसन्निरोद्धव्यात्याज्यावाकुलसन्निधौ १ अग्निशुश्रूषादिधर्माचरणंज्येष्ठयासहकार्यम् नतुकनिष्ठया इदंज्येष्ठायाआज्ञासंपादिनीत्वे यदितुरोषादिशीलेनसमनन्तरोक्तमनुवाक्याज्ज्येष्ठाकुलसान्निधौ त्यागार्हागृहान्तरेनिरोधार्हावातर्हिकनिष्ठयापिसहधर्मंचरेदन्यथाधर्मभ्रंशापातात् तथावीरसुतायास्यादाज्ञासंपादिनीचया । दक्षाप्रियंवदाशुद्धातामत्रविनियोजयेत् १ इतिमाधवीयेस्मृतेश्च द्वितीयविवाहहोमः पूर्वविवाहसंबन्धिगृह्याग्नावेवकार्यः तदसंभवेलौकिकाग्नौकार्यः लौकिकाग्नौकरणपक्षेद्वितीयविवाहहोमादिनोत्पन्नाग्नेर्गृह्याग्नित्वाद्द्वयोर्गृह्याग्न्योः संसर्गः कार्यः ॥

**पुनर्विवाह**—याचा अर्थ येथें विधवाविवाह असा नसून, दुष्ट लग्नीं उक्त ग्रह व नक्षत्र नसतां, इतर वाईट योगांच्या अशुभ काळीं, कूष्माण्डमंत्रांनीं तुपाचा होम यथोक्त विधीनें केल्याशिवाय, सुतक वगैरे अशौच असतांना जर लग्न लागलें गेलें असलें, तर त्याच वधूवरांचें सुमुहूर्तावर पुन्हां लग्न लावावें. दारूबाज, रोगी, धूर्त ( लबाड ), वन्ध्या, संपत्तीचा नाश करणारी, न आवडणारें बोलणारी, मुली होणारी व नवऱ्याचा द्वेष करणारी—अशी जर स्त्री असली, तर त्यांतल्या वन्ध्या स्त्रीचा दहाव्या वर्षीं त्याग करावा. मुलीच फक्त होणाऱ्या स्त्रीचा बाराव्या वर्षीं त्याग करावा. जिचीं मुलें जगत नाहींत त्या स्त्रीचा पंधराव्या वर्षीं त्याग करावा. आणि वाईट भाषण करणारणीचा तात्काळ त्याग करावा. येथें अप्रियवादिनी याचा अर्थ व्यभिचारिणी असाही करण्यास जें सांगितलें आहे, त्याचें कारण

असें कीं, कलियुगांत प्रतिकूलभाषण हें बहुधा सार्वत्रिकच आहे. आज्ञा पाळणारी, घरचीं कृत्यें करण्यांत तरबेज, वीरपुत्रांना जन्म देणारी आणि मनाला पटणारें बोलणारी (प्रियवादिनी) अशा स्त्रीचा त्याग करून (केवळ) संभोगार्थ जर दुसऱ्या स्त्रीशीं लग्न लावलें तर पहिल्या भार्येला (बायकोला) नवऱ्यानें आपल्या धनाचा तिसरा हिस्सा द्यावा व धनच नसेल, तर तिचें पालनपोषण करावें. दुसऱ्या स्त्रीशीं विवाह केल्यानंतर पहिली स्त्री जर संतापानें घरांतून निघून गेली, तर तिला बंदोबस्तानें ठेवावी किंवा आपल्या कुळांतल्या थोर पुरुषांच्या ताब्यांत द्यावी—असें मनूचें वचन आहे. अग्निसेवा वगैरे सर्व धर्माचरण थोरल्या बायकोसह करावें, (थोरलीला सोडून) धाकट्या बायकोसह करूं नये. असें जें शास्त्र आहे, तें तरी थोरली बायको आज्ञापालन करणारी असेल तरचेंच समजावें. ती (थोरली स्त्री) रागीट असल्यानें, वर सांगितलेल्या मनूच्या वचनाप्रमाणें घरांत बंदोबस्तानें ठेवायला किंवा आपल्या कुळांतल्या थोर पुरुषाच्या ताब्यांत द्यायला जर लायक असेल, तर धाकट्या बायकोसह धर्माचरण करावें. व तसें न केल्यास धर्महानि (धर्मभ्रंश) होण्याची भीति आहे. याशिवाय माधवग्रंथांत अशी स्मृति सांगितली आहे कीं, वीरपुत्रांना जन्म देणारी, आज्ञाधारक, गृहकृत्यांत दक्ष, प्रियवादिनी व पवित्र अशीच बायको धर्मकृत्यांतल्या उपयोगांत घ्यावी. दुसऱ्या लग्नाचा होम, पहिल्या लग्नांतल्या गृह्याग्नीवरच करावा, आणि तो (अग्नि) नसल्यास लौकिकाग्नीवर करायचा जर पक्ष असेल, तर दुसऱ्या लग्नाच्या वेळीं होमानें सिद्ध केलेला जो अग्नि, तोच गृह्याग्नि होत असल्यानें, दोन गृह्याग्नींचा संसर्ग (स्पर्श—एकीकरण) करावा.

अथाग्निद्वयसंसर्गप्रयोगः। देशकालौसंकीर्त्यसमद्वाभ्यभार्या[illegible]निष्पन्न-गृह्याग्न्योस्ताभ्यांसहाधिकारसिद्धद्वारा श्री०र्थं संसर्गंकरिष्यइतिसंकल्प्यस्व-स्तिवाचनंकृत्वा उदगपवर्गस्थण्डिलेकृत्वादक्षिणेस्थण्डिलेज्येष्ठायागृह्याग्निमु-त्तरेकनिष्ठायागृह्याग्निंप्रतिष्ठाप्यप्रथमाग्नौज्येष्ठपत्न्यान्वारब्धोऽन्वाधानंकुर्यात् अग्निद्वयसंसर्गार्थेप्रथमाग्निहोमकर्मणिदेवतापरिग्रहार्थमन्वाधानंकरिष्ये चक्षु-षीआज्येनेत्यन्तेअग्निंनवभिराज्याहुतिभिःशेषेणेत्यादि अग्निमीळेइतिनवानांम-धुच्छन्दोग्निर्गायत्री अग्निद्वयसंसर्गार्थंप्रथमाग्नौप्रधानाज्यहोमे वि० अग्निमीळे-इत्यादि नवभिर्ऋग्भिःप्रत्यृचंस्रुवेणनवाज्याहुतीर्जुहुयात् अग्नयइदंमि[illegible]-त्यागः होमशेषंसमाप्य अयंतेयोनिरितिमन्त्रेणज्येष्ठाग्निंसमिधिसमारो[illegible]-वरोहेति मन्त्रेणतंद्वितीयाग्नौप्रत्यवरोह्य[illegible]पत्नीद्वयान्वारब्धोऽन्वाधानंकु-र्यात् अग्निद्वयसंसर्गार्थेप्रथमसंसृष्टद्वितीयाग्नौविहितहोमेदेवतापरिग्रहार्थमन्वा-धानंकरिष्ये आज्यभागान्तेअग्निंप्रधानंषड्वारमाज्येनशेषेणेत्यादि प्रोक्षणींकु-शान्दर्वींस्रुवौप्रणीताज्यपात्रेइध्माबर्हिरित्यग्नौपात्राणि स्रुचिचतुर्गृहीतसाज्यं-गृहीत्वा पत्नीद्वयान्वारब्धोजुहुयात् अग्नावग्निरित्यस्यहिरण्यगर्भोग्निरग्नि-अग्निद्वयसंसर्गार्थेसंसृष्टाग्नौप्रधानाज्यहोमे[illegible]अग्नावग्निश्चरतिप्रविष्टऋषीणां

पुत्रोअधिराजएषः । तस्मैजुहोमिहविषाघृतेनमादेवानांमोमुहद्भागधेयंस्वाहा अग्नयइदं० । एवमग्रेपि आज्यस्यस्रुचिचतुर्ग्रहणंविनियोगस्त्यागश्च अग्निनाग्निर्मेधातिथिःकाण्वोग्निर्गायत्री अग्निनाग्निःसमिध्यते० । अस्तीदमितितिसृणांविश्वामित्रोग्निरनुष्टुप्अन्त्येत्रिष्टुभौ अस्तीदमधि० । अरण्यो० उत्तानायाम० ॥ पाहिनोअग्नइत्यस्यभर्गःप्रगाथोग्निर्बृहती पाहिनो० भिर्वसोस्वाहा । होमशेषंसमाप्याहिताग्नयेगोयुग्मंदत्त्वाविप्रान्भोजयेत् इत्यग्निद्वयसंसर्गप्रयोगः पत्न्योरेकायदि मृतादग्ध्वातेनैवतांपुनः । आदधीतान्ययासार्धमाधानविधिनागृही ॥१॥

**अग्निद्वयसंसर्गप्रयोग**—देशकालादिकांचा उच्चार करून—'मम द्वाभ्यां भार्याभ्यां सहनिष्पन्नगृह्याग्न्योस्ताभ्यां सहाधिकारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं संसर्गं करिष्ये'- असा संकल्प करून पुण्याहवाचन करावें. नंतर उत्तरेकडे एक व दक्षिणेकडे एक अशीं दोन स्थंडिलें ( मातीचे चौकोनी ओटे ) करून त्यांतल्या दक्षिणेकडच्या स्थंडिलावर थोरल्या बायकोचा गृह्याग्नि व उत्तरेकडच्या स्थण्डिलावर धाकट्या बायकोचा गृह्याग्नि—यांच्या स्थापना कराव्या आणि नंतर थोरल्या बायकोनें अन्वारब्ध ( स्पर्शित ) होऊन—'अग्निद्वयसंसर्गार्थे प्रथमाग्निहोमकर्मणि देवताप्रतिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये । चक्षुषी आज्येनेत्यन्ते अग्निं नवभिराज्याहुतिभिः शेषेणेत्यादि' असें अन्वाधान करावें. 'अग्निमीळे इति नवानां मधुच्छन्दोग्निर्गायत्री अग्निद्वयसंसर्गार्थे प्रथमाग्नौ प्रधानाज्यहोमे वि०' अग्निमीळे इत्यादि नऊ ऋचांनीं प्रत्येक ऋचेचें एक—असें नऊ आज्याहुतींचें ( तुपाचें ) स्रुवापात्रानें ( लांकडी चमच्यानें ) हवन करावें. 'अग्नय इदं न मम' असा सर्वत्र त्याग करावा ( प्रत्येक आहुती देण्याच्या वेळीं असें म्हणावें ). होमशेष संपल्यावर—'अयंते योनि०'—या मंत्रानें थोरलीच्या अग्नीचा ( ज्येष्ठाग्नीचा ) समिधेवर समारोप ( नेणें ) करून —'प्रत्यवरोह०'—या मंत्रानें, त्याचा दुसऱ्या ( कनिष्ठाग्नीवर ) प्रत्यवरोह ( थोरलीच्या अग्नीनें धाकटीचा अग्नि पेटवण्याचें कार्य ) करावा. अग्नीचें नंतर ध्यान करून दोघी बायकांनीं अन्वारब्ध ( एकत्र ) व्हावें व—'अग्निद्वयसंसर्गार्थे प्रथमसंसृष्ट द्वितीयाग्नौ विहित होमे देवतापरिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये । आज्यभागान्ते अग्निं प्रधानं षड्वारमाज्येन शेषेणेत्यादि असें अन्वाधान करावें. प्रोक्षणी (पाणी शिंपडण्याचें भांडें), दर्भ, दर्वी ( लाकडी पसरट तोंडाची पळी ), स्रुवा ( लांकडी चमचा ) प्रणीता ( यज्ञपात्र ), आज्यपात्र ( तुपाचें भांडें ), इध्मा ( लांकडें ) व बर्हि ( कुश किंवा पानें ) अशीं आठ पात्रें मांडावीत. स्रुवेनें चार वेळ तूप घेऊन, दोन्ही बायकांनीं अन्वारब्ध (एकत्र) होऊन जें हवन करावयाचें. त्याचा मंत्रः—'अग्नावग्निरित्यस्य हिरण्यगर्भोग्निरष्टी अग्निद्वयसंसर्गार्थे संसृष्टाग्नौ प्रधानाज्यहोमे विनियोगः । अग्नावग्निश्चरति प्रविष्टऋषीणां पुत्रो अधिराज एषः । तस्मै जुहोमि हविषा घृतेन मा देवानां मोमुहद्भागधेयं स्वाहा'—असें म्हणून—'अग्नय इदं न मम,'—त्याग करावा ( आहुति द्यावी ). पुढेंही असेंच समजावें. प्रत्येक आहुतीच्या वेळीं दर्वींत चार वेळ तूप घ्यावें. विनियोग व त्याग हे पूर्वीप्रमाणेंच पुढेंही करावेत. पुढच्या आहुतीचे मंत्रः-

—'अग्निनाग्निर्मेधातिथिः काण्वोग्निर्गायत्री अग्निनाग्निः समिध्यते० । अस्तीदमितितिसृणां विश्वामित्रोग्निरनुष्टुभ् अन्त्ये त्रिष्टुभौ अस्तीदमधि० ॥ अरण्यो० । उत्तानायाम० पाहिनो अग्न इत्यस्य भर्गः प्रगाथोग्निर्बृहती पाहिनो० भिर्वसो स्वाहा० ।' यानंतर होमशेष संपवून अग्निहोत्री ब्राह्मणाला दोन गोप्रदानें द्यावीं व ब्राह्मणभोजन घालावें. असा हा दोन अग्नींचा संसर्गप्रयोग आहे. दोन बायकांपैकीं एक मेल्यास, या संसर्गाग्नीनेंच तिला जाळून टाकून, गृहस्थाश्रम्यानें दुसऱ्या बायकोसह आधान-विधीनें अग्नि उत्पन्न करून, तो धारण करावा (त्याची उपासना करावी).

**द्वितीयादिविवाहकालः। प्रमदामृतिवासरादितः पुनरुद्वाहविधिर्वरस्यच। विषमेपरिवत्सरेशुभोयुगलेचापिमृतिप्रदोभवेत् १ संकटेमहारुद्राभिषेकंमृत्युंजयमन्त्रजपंचाकृत्वाविवाहः कार्यइतिभाति तृतीयामानुषींकन्यानोद्वाह्याम्रियतेहिसा। विधवावाभवेत्तस्मात्तृतीयेर्केसमुद्वहेत् ॥ १ ॥**

**द्वितीयविवाहकाल**—बायको मेल्यापासून विषम वर्षीं दुसरा विवाह करणें शुभ होय. समवर्षीं केल्यास मृत्युदायक होतो. संकटकालीं महारुद्राभिषेक अथवा मृत्युञ्जयजप करून विवाह करावा असें वाटतें. तिसरी बायको मनुष्यकन्या करूं नये, केल्यास ती मरते अथवा विधवा होते, म्हणून तिसरें लग्न रुईशीं (अर्कविवाह) करावें.

**अथार्कविवाहः। रविशन्योर्वारेहस्तर्क्षेवान्यत्रशुभदिनेवापुष्पफलयुतमर्कंगत्वाअर्ककन्यादातारमाचार्यंकृत्वारक्तगन्धादिभूषितोदेशकालौस्मृत्वाममतृतीयमानुषीविवाहजन्यदोषपरिहारार्थंतृतीयमर्कविवाहंकरिष्ये आचार्यंवृत्वानान्दीश्राद्धान्तंकुर्यात् दातामधुपर्कयज्ञोपवीतवस्त्रगन्धमाल्यादिभिर्वरंपूजयेत्अर्कस्यपुरतःस्थित्वा त्रिलोकवासिन्सप्ताश्वच्छाययासहितोरवे तृतीयोद्वाहजंदोषंनिवारयसुखंकुरु १ इतिप्रार्थ्यछायायुतंरविमर्केध्यात्वाऽब्लिङ्गैरभिषिच्यवस्त्रादिभिराकृष्णेनेतिमन्त्रेण संपूज्यश्वेतवस्त्रेणसूत्रेणचावेष्ट्य गुडौदानंनिवेद्यताम्बूलं दद्यात् ममप्रीतिकरायेयंमयासृष्टापुरातनी। अर्कजाब्रह्मणासृष्टाह्यस्मान्संप्रतिरक्षतु १ इत्यर्कंप्रदक्षिणीकृत्य नमस्तेमङ्गलेदेविनमः सवितुरात्मजे। त्राहिमांकृपयादेविपत्नीत्वं मइहागता ॥१॥ अर्कत्वंब्रह्मणासृष्टः सर्वप्राणिहितायच। वृक्षाणामधिभूतस्त्वंदेवानांप्रीतिवर्धन ॥ २ ॥ तृतीयोद्वाहजंपापंमृत्युंचाशुविनाशय। इतिचप्रदक्षिणीकुर्यात् अन्तःपटधारणादिकन्यादानपर्यन्तंविधिंकृत्वा कन्यादाताऽऽदित्यस्यप्रपौत्रींसवितुःपौत्रीमर्कस्यपुत्रींकाश्यपगोत्रामर्ककन्याममुकगोत्रायवरायतुभ्यंसंप्रददे अर्ककन्यामिमांविप्रयथाशक्तिविभूषिताम्। गोत्रायशर्मणेतुभ्यंदत्तांविप्रसमाश्रय १ दक्षिणांदत्वागायत्र्यावेष्टितसूत्रेणबृहत्सामेतिमंत्रेणअर्कवरयोःकंकणंबध्वार्कस्यचतुर्दिक्षुकुम्भेषुविष्णुंनाममंत्रेणषोडशोपचारैः संपूज्यअर्कस्योत्तरेऽर्कपत्न्यान्वारब्धोवरःअस्याःसम्यक्भार्यात्वसिद्ध्यर्थंपाणिग्रहहोमंकरिष्येआधारदेवते आज्येनेत्यन्तेबृहस्पतिंअग्निंअग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचाज्यद्रव्येणशेषेणस्विष्टकृतं आधारान्तंकृत्वा संगोभिरित्य**

स्यांगिरसोबृहस्पतिस्त्रिष्टुप् आज्यहोमेविनियोगः संगोभिराङ्गिरसो० बृहस्पतय इदं० । यस्मैत्वेतिवामदेवोग्निस्त्रिष्टुप् यस्मैत्वाकामकामायवयंसम्राडयजामहे । तमस्मभ्यंकामं दत्वाथेदंत्वंघृतंपिबस्वाहा अग्नयइदं० । ततोव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्हुत्वाहोमशेषंसमाप्य मयाकृतमिदंकर्मस्थावरेषुजरायुणा । अर्कापत्यानिनोदेहितत्सर्वंक्षन्तुमर्हसि १ इतिप्रार्थ्यशांतिसूक्तपाठान्तेगोयुग्ममाचार्यायदत्वास्वधृतवस्त्राणिगुरवेदत्वाऽन्यानिधारयेत् दशत्रयोवाविप्राभोज्याः इत्यर्कविवाहः ॥

**अर्कविवाह**—रविवारीं किंवा शनिवारीं, हस्तनक्षत्रीं किंवा इतर शुभ दिवशीं फुलें व फळें आलेल्या रुईच्या झाडापाशीं जाऊन, अर्करूपी कन्यादान करणाऱ्या आचार्याला बोलावून वरानें तांबडें गन्ध वगैरेनीं सजून देशकालादिकांचा उच्चार केल्यावर—'मम तृतीय मानुषीविवाहजन्यदोषपरिहारार्थं तृतीयमर्कविवाहं करिष्ये ।'—असा संकल्प केल्यावर आचार्यवरणापासून नान्दीश्राद्धापर्यंतचें सर्व कर्म करावें. दान करणारानें ( आचार्यानें ) मधुपर्क, जानवें, वस्त्र, गंध, माळा वगैरेनीं वराची पूजा करावी व अर्कवृक्षाच्या पुढें ( आचार्यानें ) बसून,—'त्रिलोकवासिन् सप्ताश्वच्छयया सहितो रवे । तृतीयोद्वाहजं दोषं निवारय सुखं कुरु ॥'—अशी प्रार्थना करून, सावलीसह रवीचें अर्कवृक्षांत ध्यान करावें व पाण्याच्या ( उदक ) मंत्रांनीं ( समुद्र ज्येष्ठा० ) अभिषेक करावा, आणि त्यानंतर—'आकृष्णेन०' या मंत्रानें वस्त्रादिकांनीं पूजा करावी. पांढरें वस्त्र व ( पांढरें ) सूत यांनीं नंतर गुंडाळून ( आवेष्टन ) गुळाच्या अन्नाचा नैवेद्य दाखवावा. आणि विडा द्यावा. त्यानंतर—'मम प्रीतिकरायेयं मया सृष्टा पुरातनी । अर्कजा ब्रह्मणा सृष्टाद्यास्मान्संप्रति रक्षतु ॥' या मंत्रानें रुईला प्रदक्षिणा करून,—'नमस्ते मंगले देवी नमः सवितुरात्मजे । पाहि मां कृपया देवि पत्नीत्वं मइहागता । अर्क त्वं ब्रह्मणा सृष्टः सर्वप्राणिहिताय वै ॥ वृक्षाणामधिभूतस्त्वं देवानां प्रीतिवर्धनम् तृतीयोद्वाहजं पापं मृत्युं चाशु विनाशय ॥' हे मंत्र म्हणून पुन्हा प्रदक्षिणा करावी. अंतःपटधारणापासून कन्यादानापर्यंतचे सर्व विधि केल्यानंतर, कन्यादान करणाऱ्यानें ( आचार्यानें ) —'आदित्यस्य प्रपौत्रीं सवितुः पौत्रीं अर्कस्य पुत्रीं काश्यपगोत्रामर्ककन्यां अमुक गोत्राय वराय तुभ्यं संप्रददे । अर्ककन्यामिमांविप्र यथाशक्तिविभूषिताम् । गोत्राय शर्मणे तुभ्यं दत्तां विप्र समाश्रय ॥'—या मंत्रांनीं अर्ककन्यादान करावें. आणि नंतर दक्षिणा देऊन गायत्री मंत्रानें रुई आणि वर ( लग्न करूं इच्छिणारा ) यांना सूत गुंडाळून—'बृहत्साम०'—या मंत्रानें रुई व नवरा मुलगा यांना ( त्या सुताचें ) कंकण बांधावें. रुईच्या झाडाच्या चारी दिशांना चार कुंभ ( मडकीं ) मांडून, त्यांची विष्णूच्या रूपांत षोडशोपचारें पूजा करावी. रुईच्या उत्तर दिशेस अर्कपत्नीनें अन्वारब्ध होऊन, वरानें—'अस्याः सम्यग्भार्यात्वसिद्ध्यर्थं पाणिग्रहहोमं करिष्ये ।' असा संकल्प करावा आणि 'आधारदेवते आज्येनेत्यन्ते बृहस्पतिं अग्निं अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं चाज्यद्रव्येण शेषेण स्विष्टकृतम्'—असें अन्वाधान करावें व मग

आधानापर्यंतचें कर्म केल्यावर मुख्य होम करावा. 'संगोभिरित्यस्यांगिरसो बृहस्पतिस्त्रिष्टुप् आज्यहोमे विनियोगः । संगोभिराङ्गिरसो० बृहस्पतय इदं न मम । यस्मैत्वेति वामदेवोऽग्निस्त्रिष्टुप् । यस्मै त्वा कामकामाय वयं सम्राड्यजामहे । तमस्मभ्यं कामं दत्वाथेदं त्वं घृतं पिब स्वाहा अग्नय इदं न मम ।' या मंत्रांनीं होम केल्यावर व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं हवन करून, बाकीचें होमकृत्य पुरें करावें. 'मया कृतमिदं कर्म स्थावरेषु जरायुणा । अर्कापत्यानि नो देहि तत्सर्वं क्षन्तुमर्हसि ॥' अशी प्रार्थना केल्यावर शान्तिसूक्ताचा पाठ करावा. आचार्याला दोन गोप्रदानें देऊन, स्वतःच्या अंगावरचींही वस्त्रें त्यालाच द्यावींत व आपण दुसरीं धारण करावींत व दहा किंवा तीन ब्राह्मणांना नंतर भोजन घालावें. असा हा अर्क-विवाह आहे.

**अथाह्निकम् । श्रीमन्नाथांघ्रिकमलंदीनानाथदयार्णवम् । स्मारंस्मारंकामपूरमाह्निकाचरणंब्रुवे ॥ १ ॥ प्रथमोक्तो बव्हृचानां प्रकारः स तु याजुषैः । ग्राह्यो यत्र स्वसूत्रोक्तो विशेषःस्यान्नबाधकः ॥ २ ॥ ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय श्रीविष्णुं स्मृत्वा गजेन्द्रमोक्षादिपठित्वा इष्टदेवतादिस्मरेत् । समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डिते । विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्वमे ॥ २ ॥ इति भूमिं प्रार्थ्य गवादिमङ्गलानि पश्येत् ।**

**आन्हिक**—अनाथांचा कृपासागर, व भक्तांच्या इच्छा पुऱ्या करणाऱ्या श्रीमान् लक्ष्मीपती (विष्णु) चे चरणकमल वारंवार स्मरून, मी आन्हिककर्म सांगतों. पूर्वीं सांगितलेला ऋग्वेद्यांचा प्रकार जेथें आपल्या (गृह्य) सूत्रांत सांगितलेल्या विशेषाला बाधक होत नसेल तेथें तो यजुर्वेद्यांनीं घ्यावा. ब्राह्ममुहूर्तीं (रात्रीच्या शेवटच्या प्रहरीं) उठून विष्णूचें स्मरण केल्यावर गजेन्द्रमोक्ष म्हणावा आणि मग इष्टदेवतेचें स्मरण केल्यावर–'समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डिते । विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ॥' अशी भूमीची प्रार्थना करावी आणि गाय वगैरेंचें मंगलदर्शन करावें.

अथमूत्रपुरीषोत्सर्गादिविधिः । तृणाद्यन्तर्हितभूमौशिरःप्रावृत्ययज्ञोपवीतंनिवीतंपृष्ठतःकर्णेवाकृत्वाघ्राणपिधानंकृत्वादिवासंध्ययोरुदङ्मुखोरात्रौदक्षिणामुखोमौनीअनुपानत्कआसीनोमूत्रपुरीषोत्सर्गंकुर्यात् यज्ञोपवीतस्यनिवीतत्वंविनैवकर्णेधारणमनाचारः मार्गजलदेवालयनदीतीरादौमलोत्सर्गोनिषिद्धः हस्तान्द्वादशसंत्यज्यमूत्रंकुर्याज्जलाशयात् । अवकाशेषोडशवापुरीषेतु चतुर्गुणम् ॥ १ ॥ प्रत्यर्कादिमेहनेस्वशकृद्दर्शनेचसूर्यंगांवापश्येत् ततोगृहीतशिश्नउत्थायशौचंकुर्यात् मूत्रोत्सर्गेशुद्धमृदंसकृत्लिङ्गेत्रिवारंवामकरेद्विवारमुभयोःकरयोर्दत्वातावद्वारंजलेनक्षालयेत् मूत्राद्विगुणंशुक्रेमैथुनेत्रिगुणंस्मृतम् । पुरीषेतु एकांलिङ्गेगुदेतिस्रस्तथावामकरेदश । उभयोः करयोःसप्तसप्तत्रिर्वापिपादयोः ॥ १ ॥ द्विगुणंब्रह्मचर्येस्याद्यतीनांचचतुर्गुणम् एवंमृद्भिर्जलैः शौचंतदर्ध-

निशिकीर्तितम् ॥ २ ॥ तदर्धमातुरेशूद्रस्त्रीबालानांतदर्धतः । उक्तसंख्यया-गन्धलेपक्षयाभावेयावतातत्क्षयस्तावच्छौचम् मृदार्द्रामलकमात्रा जलालाभे नशौचविलम्बेसचैलंस्नानम् यथोक्तशौचाकरणेतु गायत्र्यष्टशतंजप्त्वाप्राणा-यामत्रयंचरेत् । अथमूत्रेचत्वारोगण्डूषाःपुरीषेद्वादशाष्टौवाभोजनान्तेषोडश-कार्याः ॥

**मूत्रपुरीषोत्सर्गविधि**—गवत असलेल्या जमिनीवर–डोक्याला वस्त्र गुंडाळून, जानवें माळेसारखें पाठीवर किंवा कानावर ठेवून, नाक वस्त्रांत धरून, दिवसां व सन्धिकालीं उत्तरेकडे तोंड करून आणि रात्रीं दक्षिणेकडे तोंड करून, मुक्यानें ( न बोलतां ), पायांत जोडा वगैरे कांहीं न घालतां, खालीं बसून मूत्र आणि पुरीष ( विष्ठा ) यांचें विसर्जन–हीं करावींत. माळेसारखें जानवें केल्याशिवायच कानावर ठेवणें हा अनाचार आहे. रस्ता, पाणी, देऊळ व नदीकांठ यांच्या जागीं व यांच्याजवळ मलोत्सर्ग करणें शास्त्रानें निषिद्ध मानलें आहे. पाणवठ्याची जागा (जलाशय ) सोडून बारा हातांवर लघवी करावी व पुरी जागा असल्यास सोळा हातांपलीकडे करावी, पुरीषोत्सर्ग करण्यास त्याच्या चौपट ( लांबीची ) जागा सोडावी, सूर्याच्या पुढें उत्सर्ग केल्यास किंवा स्वतःचा मल पाहिल्यास सूर्य किंवा गाय यांचें दर्शन घ्यावें व नंतर शिस्न हातांत धरून तें धुवावें. लघवी केल्यावर एकदां लिंगाला, तीनदां डाव्या हाताला व दोनदां दोन्ही हातांना माती लावून, तितक्याच वेळां पाण्यानें तीं सर्व धुवावींत. शुक्रपतन ( धातुस्राव ) झाल्यास दुप्पट व मैथुन ( संग ) केल्यास तिप्पट शुद्धि करण्यास सांगितलें आहे. शौचानंतर –लिंगास एकदां, गुदाला तीनदां, डाव्या हाताला दहादां व दोन्ही हातांना प्रत्येकीं सात वेळां व पायांना सात वेळां किंवा तीन वेळां माती लावावी. ब्रह्म-चाऱ्यानें याच्या दुप्पट वेळां व संन्याशानें याच्या चौपट वेळां ( अशीच माती लावून ) शुद्धि करावी. ही शुद्धि रात्रींच्या वेळीं निम्मी करावी व रोग्यानें त्याच्या निम्मी करावी. स्त्री शूद्र व बाल यांनीं त्याच्याही निमपटीनें करावी. वर सांगित-लेल्या शुद्धीनेंही जर दुर्गन्धी नाहींशी झाली नाहीं, तर ती नाहींशी होईपर्यंत शुद्धि करावी. माती प्रत्येक वेळीं ओल्या आंवळ्याएवढी ( शुद्धीसाठीं ) घ्यावी. पाणी नसल्यानें शुद्धि करण्यास वेळ लागला तर सचैल स्नान करावें. वरीलप्रमाणें शुद्धि न केल्यास आठशें गायत्रीजप करून, तीन प्राणायाम करावेत. मूत्रानंतर चार वेळां, शौचानंतर बारा किंवा आठ वेळां आणि जेवल्यावर सोळा वेळां चुळा भरून टाकाव्या.

अथाचमनविधिः । अप्रावृतशिरः कंठउपविष्टः उपवीतीप्राङ्मुखउदङ्मु-खोवाअंगुष्ठमूलेनमुक्ताङ्गुष्ठकनिष्ठहस्तेनानुष्णफेनादिरहितंजलंहृदयंगतंत्रिः पिबेत् केशवाद्यैस्त्रिभिःपीत्वैकेनदक्षकरंमृजेत् । द्वाभ्यामोष्ठौचसंमृज्यपरेनो-न्मार्जयेच्चतौ १ जलमेकेनसंमन्त्र्यैकेनवामकरंमृजेत् । एकेनदक्षिणंपादंवाममेके-

नचैवहि २ संप्रोक्ष्यैकेनमूर्धानमूर्धोष्ठंनासिकाद्वयम् । नेत्रयुग्मंश्रोत्रयुग्मंदक्षिणोपक्रमंक्रमात् ३ नाभिंहृदयमूर्धानौदक्षवामभुजौस्पृशेत् । केचित् केशवाद्यैस्त्रिभिः पीत्वाद्वाभ्यांप्रक्षालयेत्करौ । गण्डोष्ठौमार्जयेद्विर्द्विरेकैकंपाणिपादयोः १ यद्वा ओष्ठंमार्ज्योन्मृजेद्विर्द्विरेकैकंपाणिपादयोः । शेषंप्राग्वदित्याहुः तत्रोर्ध्वोष्ठस्यांगुल्यग्रैःस्पर्शः अङ्गुष्ठतर्जनीभ्यांनासिकयोःअङ्गुष्ठानामिकाभ्यांनेत्रयोः अङ्गुष्ठकनिष्ठिकाभ्यांकर्णयोर्नाभेश्च तलेनहृदयस्य पाणिनामूर्ध्नःअङ्गुल्यग्रैर्भुजयोः एतावदाचमनविधावशक्तस्त्रिः पीत्वाकरंप्रक्षाल्यदक्षिणकर्णंस्पृशेत् कांस्यायःसीसत्रपुपित्तलपात्रैर्नाचामेत् श्रौताचमनंतुदेव्यास्त्रयः पादाआपोहिष्ठेतिनवपादाःसप्तव्याहृतयोदेवीपादत्रयंद्वेधाविभक्तंदेवीशिरश्चेतिचतुर्विंशतिस्थानानि ॥

**आचमनविधि**—ज्याचें डोकें व गळा ह्यांवर वस्त्र नाहीं, ज्यानें आपल्या डाव्या खांद्यावरून व उजव्या बगलेला जानवें घातलेलें आहे, जो पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख आहे आणि ज्याचा अंगठा ( अङ्गुष्ठ ) व करंगळी ( कनिष्ठिका ) हीं ( दोन बोटें ) मोकळीं आहेत अशानें आपल्या त्या हातानें अनुष्ण ( उष्ण नसलेलें ) आणि ज्यावर केंस नाहीं. असें पाणी 'केशवाय नमः । नारायणाय नमः । माधवाय नमः' अशा तीन उच्चारांनीं, हृदयापर्यंत जाईल असें तीनदां प्यावें, म्हणजेच तीन आचमनें करावींत. 'गोविंदाय नमः' या नांवानें उजवा हात धुवावा. 'विष्णवेनमः ।' व 'मधुसूदनाय नमः'—या दोन नांवांनीं दोन्ही ओठ धुवावेत व त्रिविक्रमायनमः' या मंत्रानें त्यांवर पाणी शिंपडावें. 'वामनाय नमः' या मंत्रानें पाणी ( अभिमन्त्रण ) ढवळावें. 'श्रीधराय नमः' या मंत्रानें डावा हात धुवावा. 'हृषीकेशाय नमः' या मंत्रानें उजवें पाऊल आणि 'पद्मनाभाय नमः' यानें डावें पाऊल—अशीं पाण्यानें ( वरून ) ओलीं करावींत. 'दामोदराय नमः' यानें कपाळावर पाणी शिंपडावें. 'संकर्षणाय नमः' यानें वरचा ओठ पाण्यानें भिजवावा. 'वासुदेवाय नमः' यानें उजव्या नाकपुडीला आणि 'प्रद्युम्नाय नमः यानें डाव्या नाकपुडीला ( उजव्या हाताच्या बोटांनीं ) स्पर्श करावा. 'अनिरुद्धाय नमः' यानें उजव्या डोळ्यास व 'पुरुषोत्तमाय नमः' यानें डाव्या डोळ्यास ( हाताचा ) स्पर्श करावा. 'अधोक्षजाय नमः' यानें उजव्या कानाला व 'नारसिंहाय नमः' यानें डाव्या कानास ( कर ) स्पर्श करावा. 'अच्युताय नमः' यानें बेंबीला स्पर्श करावा. 'जनार्दनाय नमः' यानें हृदयाला, 'उपेन्द्राय नमः' यानें मस्तकाला आणि 'हरये नमः' व श्रीकृष्णाय नमः' यांनीं अनुक्रमें उजवा हात व डावा हात यांस स्पर्श करावा. कांहीं ग्रन्थकारांचें असें सांगणें आहे कीं:—'केशवादि' पहिल्या तीन नांवांनीं आचमन करून, 'गोविन्द व विष्णु' यांनीं दोन हातांचें प्रक्षालन करावें. 'मधुसूदन व 'त्रिविक्रम' यांनीं दोन्ही गालांवर ( कपोल ) पाणी शिंपडावें. 'वामन व श्रीधर' यांनीं दोन ओठांवर मार्जन ( पाणी शिंपडणें ) करावें. 'हृषीकेश' यानें हातांवर मार्जन करावें. 'पद्मनाभ' यानें पायांवर मार्जन

करावें, किंवा दोन नांवांनीं ओठांवर मार्जन करून ते धुवावेत. हात व पाय यांवर एकेका नांवानेंच मार्जन करावें. बाकीचें सर्व आधींच्या प्रमाणेंच करावें. या कर्मीत बोटांच्या टोंकांनीं वरच्या ओंठाला स्पर्श करावा, अंगठा व त्याच्या शेजारचें बोट (तर्जनी) यांनीं दोन नाकपुड्यांना स्पर्श करावा. अंगठा व करंगळीजवळचें बोट अनामिका यांनीं डोळ्यांना स्पर्श करावा. अंगठा व करंगळी (कनिष्ठिका) यांनीं दोन्ही कानांना बेंबीला स्पर्श करावा. अशा तऱ्हेचा आचमनविधि करण्याची अंगीं शक्ति नसल्यास, तीन वेळां आचमन करून, उजव्या कानाला स्पर्श करावा. कांसें, लोखंड, शिसें, कथील आणि पितळ यांच्या भांड्यांतल्या पाण्याचें आचमन करूं नये. गायत्रीमंत्राचे तीन चरण, आपोहिष्ठा० मंत्राचे नऊ चरण, सात व्याहृति-मंत्र, (गायत्री) देवीचे तीन चरण आणि गायत्री शिरोमंत्राचे दोन भाग-या-प्रमाणें चोवीस ठिकाणीं श्रोताचमनांत (मार्जन) करावें.

अथाचमननिमित्तानि कर्मकुर्वन्नधोवायुनिःसरणेऽश्रुपातेक्रोधेमार्जारस्पर्शे-क्षुतेवस्त्रपरिधानेरजकाद्यन्त्यजदर्शने आचामेत् स्नात्वापीत्वाभुक्त्वासुप्त्वाचा-चामेत् विण्मूत्ररेतःशौचान्ते आचामेत् सर्वत्राचमनासंभवेदक्षिणकर्णस्पर्शः दन्तलग्नान्नंमृदूपायेननिर्हरेत् रक्तनिर्गमेदोषोक्तेः दन्तलग्नंचदन्तवत् तस्यान्न-स्यकालान्तरेनिर्गमेआचमनम् वामहस्तस्थितेदर्भेदक्षिणेननचाचमेत् । करद्वय-स्थितेदर्भेआचामेत्सोमपोभवेत् १ नचोच्छिष्टंपवित्रंतद्भुक्तेपित्र्येचसंत्यजेत् । विण्मूत्रोत्सर्गेचत्यजेत् ॥

**आचमननिमित्तें**—कर्म करीत असतां अधोवात सरणें, अश्रुपात (डोळ्यांतून पाणी गळणें) होणें, मांजराला स्पर्श होणें, शिंक येणें, वस्त्रपरिधान (केल्यास) व परीट व चाण्डाल हे दृष्टीस पडल्यास—(यांपैकीं कोणचेंही निमित्त घडल्यास) आचमन करावें. स्नान केल्यावर, पाणी वगैरे (पातळ पदार्थ) प्यायल्यावर, जेवल्यावर, आणि निजून उठल्यावर आचमन करावें. लघवी, परसाकडणें व रेतस्खलन—हीं झाल्यावर शुद्ध होऊन आचमन करावें. आचमन करणें शक्य नसल्यास उजव्या कानाला (कर) स्पर्श करावा. दांतांत अडकलेलें अन्न (कण) संभाळून काढावें; कारण, दांतांतून रक्त निघाल्यास दोष सांगितला आहे. दांतांत अडकलेलें अन्न तें दांतांप्रमाणेंच होय. तें अन्न कांहीं वेळानें (भोजनोत्तर) निघाल्यास (तोंड धुऊन) आचमन करावें. डाव्या हातांत दर्भ असतां उजव्या हातानें आचमन करूं नये. दोन्ही हातांत दर्भाचीं पवित्रकें घालून आचमन केलें असतां, सोमपानाचें श्रेय येतें. तें पवित्रक उष्टें (उच्छिष्ट) होत नाहीं. जेवण व पित्र्यकर्म (तर्पण वगैरे) झाल्यावर पवित्रक काढून टाकावें. मलोत्सर्ग व मूत्रोत्सर्ग यांनंतरही (पवित्रक) टाकावें.

अथदन्तधावनम् कण्टकिक्षीरवृक्षापामार्गादिकाष्ठैः कार्यम् काष्ठालाभे-श्राद्धोपवासादिनिषिद्धदिनेचपर्णादिनाप्रदेशिनीवर्ज्याङ्गुल्यावाद्वादशगण्डूषै-र्वादन्तान्शोधयेत् ॥

**दन्तधावन**—खैरासारखीं कांटेरी झाडें, रुईप्रमाणें चिकाचीं झाडें व अघाडा यांच्या सारख्यांच्या काटक्यांनीं दांत धुवावेत. अशांच्या कांटक्या न मिळाल्यास आणि श्राद्ध, उपास वगैरे ( दन्तधावनास ) निषिद्ध अशा दिवशीं —झाडाच्या पानानें किंवा अंगठ्याजवळच्या बोटाखेरीज इतर ( चार ) बोटांनीं अथवा बारा चुळांनीं दांत स्वच्छ करावेत.

अथसंक्षेपतःस्नानविधिः नद्यादौगत्वाशिखांबध्वाजानूर्ध्वजलेतिष्ठन्नन्यथा-तूपविश्याचम्यममकायिकवाचिकमानसिकदोषनिरसनपूर्वकंसर्वकर्मसुशुद्धि-सिद्ध्यर्थंप्रातःस्नानंकरिष्ये इति संकल्प्यजलंनत्वाप्राङ्मुखःप्रवाहाभिमुखोवा-त्रिरवगाह्याङ्गानिनिमृज्यस्नात्वाद्विराचम्यापोहिष्ठतिमार्जनंकृत्वाइमंमेगंगेइति-त्रिर्जलमालोड्याघमर्षणंत्रिरावृतेन ऋतंचेतिसूक्तेन कात्यायनैर्द्रुपदेति ऋचा-जलनिमग्नतयाकृत्वाप्लुत्याचम्यजलतर्पणंकुर्यान्नवा तदित्थम् उपवीतीब्रह्माद-योयेदेवास्तान्देवांस्त० भूर्देवानित्यादि निवीतीकृष्णद्वैपायनादयोयेऋषयस्ता-नित्यादि प्राचीनावीतीसोमःपितृमान्यमोङ्गिरस्वानग्निष्वात्तादयोयेपितरस्ता-नित्यादि एकनद्यांस्नानेअन्यांनदींन स्मरेत् अत्रतैत्तिरीयादिभिस्तर्पणेऋष्यादी-नांनामान्तराण्युक्तानिसंक्षेपविधौतस्यतर्पणस्यकृताकृतत्वान्नोक्तानि ॥

**तीर्थस्नानविधि**—नदी वगैरे तीर्थाच्या ठिकाणीं गेल्यावर शेंडीला गांठ मारून, गुढघ्यापेक्षां जास्त पाणी असेल तेथें त्या पाण्यांत उभें राहावें किंवा कमी पाणी असल्यास बसून आचमन करावें, आणि मग 'मम कायिक-वाचिक-मानसिक दोषनिरसनपूर्वक सर्वकर्मसु शुद्धिसिद्ध्यर्थं प्रातःस्नानं करिष्ये'--असा संकल्प करून पाण्याला स्पर्श केल्यावर पूर्वेकडे किंवा प्रवाहाच्या दिशेला तोंड करून, तीन वेळां ( पाण्यांत ) बुडी मारावी आणि अंग धुवावें. स्नानानंतर दोन वेळां आचमन करून, 'आपोहिष्ठा०'—या मंत्रानें मार्जन ( डोक्यावर पाणी उडवणें ) करावें व —'इमं मे गङ्गे०'या मंत्रानें तीन वेळ पाणी ढवळून, 'ऋतं च०'-या सूक्तानें कात्या-यनशाखेच्यांनीं—'द्रुपद०' या ऋचेनें अघमर्षण ( पापनाश ) करावें. त्यानंतर पाण्यांत बुडी मारून स्नान केल्यावर आचमन करावें आणि मग जें जलतर्पण विकल्पें करून जें ( करावें अथवा न ) करावें तें असें:—उजव्या हाताच्या बगलेखालीं जानवें घालून ( उपवीति )—'ब्रह्मादयो ये देवास्तान्देवास्त० । भूर्देवान्० ।' इत्यादि माळेसारखें जानवें करून ( निवीति )—'कृष्णद्वैपायनादयो ये ऋषयस्तान्० । इत्यादि आणि प्राचीनावीतीनें ( डाव्या हातांत जानवें घालून )—'सोमः पितृमान्यमोङ्गिरस्वा-नग्निष्वात्तादयो ये पितरस्तान्०।—' असें तर्पण ( पाण्याचें ) करावें. ( तर्पण करणें म्हणजे नांवानें पाणी सोडणें ). एका नदींत स्नान करीत असतां दुसऱ्या नदीची आठवण करूं नये. अशा वेळच्या तर्पणांत तैत्तिरीय शाखेच्यांनीं ऋषि वगैरे इतर देवता घेण्यास जरी सांगितलें आहे तरी तर्पणविधि येथें थोडक्यांत सांगायचा असल्यानें, त्या येथें सांगितल्या नाहींत.

अथगृहेउष्णोदकेस्नानंनतुशीतोदकेन तद्विधिश्च पात्रेशीतोदकंप्रक्षिप्यतदुपरिउष्णोदकेनापूर्य शंनोदेवी०।आपःपुनंतु०।द्रुपदादिवे०। ऋतंच०। आपोहिष्ठेतिपंचभिर्ऋग्भिरभिमन्त्र्यइमंमेत्यादिनातीर्थानि स्मरन्स्नायात् गृहेस्नाने संकल्पआचमनमघमर्षणंतर्पणंचन अन्ते आचमनंमार्जनंचकार्यम् एवंस्नात्वावस्त्रेणपाणिनावाजलापनयनमकृत्वाशुष्कंशुभ्रंकार्पासवस्त्रंपरिधायस्नानार्द्रवस्त्रमूर्ध्वतउत्तारयेत् विकच्छोनुत्तरीयश्चनग्नश्चावस्त्रएवच । श्रौतस्मार्तंनैवकुर्यात् द्विगुणवस्त्रोदग्धवस्त्रः स्यूतग्रथितवस्त्रःकाषायवस्त्रादयोदिगम्बरश्चनग्नाः निष्पीडितंवस्त्रंनस्कन्धेक्षिपेत् चतुर्गुणीकृत्यवस्त्रंगृहेऽधोदशंनद्यामूर्ध्वदशंनद्यामूर्ध्वदशंस्थलेनिष्पीडयेत् नतुत्रिगुणम् उत्तरीयंजीवत्पितृकजीवज्ज्येष्ठभ्रातृकैर्नधार्यम् प्रावारवस्त्रंतुसर्वैर्धार्यम् इतिप्रातर्नित्यस्नानम्। मध्याह्नस्नानमपि नित्यमित्यन्ये।

**गृहस्नानविधि**—घरीं ऊन पाण्यानें अंघोळ करावी, थंडानें करूं नये. त्या स्नानाचा विधि येणेंप्रमाणें:—भांड्यांत आधीं थंड पाणी घालून त्यावर ऊन पाणी ओतावें व 'शंनो देवि०। आपः पुनंतु०। द्रुपदादिवे०। ऋतं च०। आपो हिष्ठा०।' या पांच ऋचांनीं तें (स्नानाचें) पाणी अभिमंत्रित (मंतरलेलें) करून, 'इमं मे०' वगैरे मंत्रांनीं तीर्थांचें स्मरण करीत अंघोळ करावी. घरीं करायच्या स्नानांत संकल्प, आचमन, अघमर्षण आणि तर्पण हीं नाहींत. अंघोळीनंतर आचमन व मार्जन हीं करावीत. या घरच्या स्नानांत तें केल्यानंतर अंगावरचें पाणी वस्त्रानें किंवा हातानें न पुसतां, कापसाचें कोरडें वस्त्र नेसून, वरच्या बाजूनें (कमरेवरून) ओलें वस्त्र काढून द्यावें. कासोटा न घालणारा, उत्तरीय (उपरणें) न घेतलेला, नागवा आणि वस्त्ररहित अशाला श्रौत किंवा स्मार्त हीं कर्में करण्याचा अधिकार नाहीं. दुहेरी वस्त्र अंगावर वापरणारा, जळकें वस्त्र वापरणारा, शिवलेलें फाटकें व गांठी मारलेलें वस्त्र घेणारा, भगव्या वस्त्रांचा आणि दिगंबर (नागवा) हे सर्व नग्न होत. पिळलेलें वस्त्र खांद्यावर ठेवूं नये. घरीं जें वस्त्र पिळायचें, तें चौपदरी (चौघडी) करून त्याच्या दशा जमीनीकडे केल्यावर तें जमिनीवर पिळावें आणि नदीकांठीं वर दशा करून पिळावें. तिहेरी वस्त्र पिळूं नये. सर्वांनीं पांघरायला वस्त्र (अवश्य) घ्यावें. असा हा नित्याचें (घरचें) प्रातःस्नान करण्याचा विधि आहे. मध्यान्हस्नान सुद्धां नित्य (रोजचें) आहे, असें कोणी ग्रंथकार म्हणतात.

चण्डालसूतकिसूतिकोदक्याचितिकाष्ठशवचण्डालच्छायादिस्पर्शेस्नानम् चाण्डालादिस्पर्शिनमारभ्यतत्स्पृष्टस्पृष्टेषुतृतीयपर्यन्तंसचैलंस्नानम् चतुर्थस्याचमनमात्रम् तदूर्ध्वंप्रोक्षणम् द्वितीयादेर्दण्डतृणाद्यन्तरितस्पर्शेत्वाचमनमेव वस्त्रान्तरितः साक्षात्स्पर्शएवेतितत्रचतुर्थस्यैवाचमनम् नैमित्तिकस्नानंरात्रावपि मृतेजन्मनि संक्रान्तौश्राद्धेजन्मदिनेतथा। अस्पृश्यस्पर्शनेचैवनस्नायादुष्णवारिणा १ नैमित्तिकेजलतर्पणादिविधिर्न नित्यस्नानमकृत्वाभुक्तौउपवासः ग्रहसं-

क्रान्त्यादिनैमित्तिकस्नानमकृत्वाभोजनेपाने अष्टसहस्रजपः शूद्रादिस्पर्शनिमित्ते- उपवासः श्वकाकचण्डालादिस्पर्शेस्नानमकृत्वाभुक्तौपानेचत्रिरात्रम् रजका- दिस्पर्शेतदर्धम् इतिनैमित्तिकस्नानम् ।

**नैमित्तिक स्नान**—चाण्डाळ, सुतकी, बाळंतीण. विटाळशी, चिताकाष्ठ, प्रेत व चाण्डाळाची सावली—याचा स्पर्श झाल्यास अंघोळ करावी. चांडाळाला स्पर्श करणारा—त्याला शिवणारा व त्याला शिवणारा—असा तिघांना विटाळ ( स्पर्श ) झाला असतां—या तिघांनीं सचैल ( अंगावरच्या कपड्यां- सह ) अंघोळ करावी, आणि त्यांतल्या तिसऱ्याचा स्पर्श होणाऱ्या चौथ्यानें फक्त आचमन करावें, व त्याच्या पुढच्या कोणाला स्पर्श झाल्यास फक्त प्रोक्षण ( पाणी शिंपडणें ) करावें. काठी, काडी वगैरे वस्तूंमुळें ( पहिला साक्षात् स्पर्श करणाऱ्याचा स्पर्श होणारा ) दुसऱ्याला स्पर्श झाल्यास त्यानें फक्त आचमन मात्र करावें. वस्त्रा- च्या अंतरानें होणारा जो स्पर्श तो साक्षात् स्पर्श होय. व तसा स्पर्श झाल्यास वरच्याप्रमाणें तिघांनीं स्नान करावें व चौथ्यानें मात्र आचमन तेवढें करावें. नैमित्तिक ( कांहीं कारणामुळें करावें लागणारें ) स्नान रात्रींसुद्धा केलें पाहिजे. मृत- दिवस, जन्मदिवस, संक्रान्ति, श्राद्धदिवस व स्वतःचा जन्मदिवस आणि ज्याचा स्पर्श (विटाळ) होऊं नये अशाचा स्पर्श—अशा प्रसंगीं कढत पाण्याचें स्नान करूं नये. आणि तशा नैमित्तिक स्नानप्रसंगीं जलतर्पणादि करण्याचें कारण नाहीं. रोजचें स्नान न केल्यास उपास करावा. ग्रहण, संक्रान्ति, वगैरे प्रसंगींचें नैमित्तिक स्नान केल्यावांचून जेवण किंवा ( पान ) कांहीं पिणें—हीं कर्में केल्यास आठ हजार गायत्री- जप करावा. शूद्रादिकांच्या स्पर्शाचें निमित्त असल्यास उपास करावा. कुत्रा व चाण्डाळ यांचा स्पर्श झाल्यावर स्नान न करतां भोजनपानादि केल्यास त्रिरात्रव्रत करावें, व परटाचा स्पर्श झाल्यास त्याच्या अर्धें ( दीडरात्र ) प्रायश्चित्त करावें. नैमि- त्तिकस्नानविधि व त्याचीं प्रायश्चित्तें येणेंप्रमाणें आहेत.

दर्शव्यतीपातरथसप्तम्यादौस्नानंकार्तिकस्नानंमाघस्नानादिकंचकाम्यम् इति- जलावगाहादिरूपवारुणस्नानानि ।

**वारुणस्नानें**—दर्श, व्यतीपात, रथसप्तमी वगैरे दिवशीं स्नान करणें व कार्तिक- स्नान, माघस्नान—हीं स्नानें—काम्य स्नानें काम्य असून, हीं पाण्यांत बुडी मारून करायचीं वारुण स्नानें होत.

अथगौणस्नानानि आपोहिष्ठादिभिर्मंत्रैः प्रोक्षणंमन्त्रस्नानम् गायत्र्यादश- कृत्वोजलमभिमन्त्र्यतेनसर्वाङ्गप्रोक्षणंगायत्रम् भस्मस्नानमाग्नेयम् आर्द्रवस्त्रेणा- ङ्गमार्जनंकापिलम् विष्णुपादोदकंविप्रपादोदकप्रोक्षणविष्णुध्यानादिभिश्च- स्नानान्तराणि गौणस्नानैर्जपसंध्यादौशुद्धिर्नतुश्राद्धदेवार्चनादौ ब्रह्मयज्ञेविकल्पः ॥

**गौणस्नानें**—'आपोहिष्ठा०'—वगैरे मंत्रांनीं अंगावर पाणी उडवून स्नान करणें हें मंत्रस्नान, गायत्रीमंत्रानें दहा वेळां पाणी मंत्रून तें सर्व अंगावर शिंपडणें हें गायत्रीस्नान, सर्वांगाला भस्म लावणें हें आग्नेय स्नान, ओल्या कपड्यानें

अंग पुसणें तें कपिलस्नान, विष्णूचें चरणतीर्थ व ब्राह्मणाचें चरणतीर्थ ( पायाचें पाणी ) अंगावर उडवणें, किंवा विष्णूचें ध्यान करणें अशींही स्नानें आहेत. अशा या गौणस्नानांनीं जप, सन्ध्या वगैरे करण्यास जरी शुद्धत्व आहे, तरी या स्नानांनीं श्राद्ध व देवपूजा करतां येत नाहींत. या स्नानानें ब्रह्मयज्ञ कदाचित् ( विकल्पें ) करतां येतो.

अथतिलकविधिः । प्रातः पुण्ड्रंमृदाकुर्याद्धुत्वाचैवतुभस्मना । मृदश्चगोपीचन्दनतुलसीमूलसिन्धुतीरजान्हवीतीरवल्मीकादिस्थाः ललाटोदरहृदयकण्ठेदक्षिणपार्श्वबाहुकर्णदेशेवामपार्श्वबाहुकर्णदेशेपृष्ठेककुदिचेतिद्वादशस्थानेषुशुक्लकेशवादिनामभिः कृष्णपक्षेसंकर्षणादिनामभिः शिरसिवासुदेवेतिमृदातिलकोविधेयः ॥

**तिलकविधि**—सकाळची अंघोळ ( प्रातःस्नान ) केल्यावर मातीचा टिळा ( तिलक ) लावावा. रोजचा होम ( नित्यहोम ) केल्यावर भस्माचा टिळा लावावा. गोपीचन्दन, तुळशीमूळ ( तुळशी खालची ), सिन्धुतीरे ( सिन्धुनदी कांठची किंवा समुद्रकांठची ), भागीरथीतीर ( गंगेच्या कांठची ) आणि वारुळें या ठिकाणच्या मृत्तिका ( माती ) तिलक करण्यास घ्याव्या. कपाळ, पोट, ऊर, ( हृदय ) गळा, पाठीचा उजवा फरा, उजवा दंड, उजवा कान, पाठीचा डावा फरा, डावा दंड, डावा कान, पाठ, व मान ( कुकुद ) या बारा जागीं, शुक्लपक्षांत, केशवादि बारा नांवांनीं आणि डोक्यावर वासुदेव या नांवानें टिळे लावावेत.

अथभस्मत्रिपुण्ड्रः ॥ श्राद्धेयज्ञेजपेहोमेवैश्वदेवेसुरार्चने । भस्मत्रिपुण्ड्रैःपूतात्मामृत्युंजयति मानवः भस्मगृहीत्वाअग्निरितिभस्मवायुरितिभस्मजलमितिभस्मस्थलमितिभस्मव्योमेतिभस्मसर्वꣳहवाइदंभस्ममनएतानिचक्षूंषिभस्मानीतिमन्त्रेणाभिमन्त्र्यजलमिश्रितेनमध्यमाङ्गुलित्रयगृहीतेनललाटहृदयनाभिगलांसबाहुसंधिपृष्ठशिरः स्थानेषुशिवमन्त्रेणनारायणाष्टाक्षरेणवागायत्र्यावाप्रणवेनवात्रिपुण्ड्रान्कुर्यात् ॥

**भस्मत्रिपुण्ड्र**—श्राद्ध, यज्ञ, जप, होम, वैश्वदेव आणि देवतार्चन—इतक्या प्रसंगीं भस्माचा त्रिपुण्ड्र ( तीन बोटांचे तीन पट्टे ) लावणारा मृत्यूला जिंकतो. ( डाव्या ) हातावर भस्म घेऊन—'अग्निरिति भस्म वायुरिति भस्म जलमिति भस्म स्थलमिति भस्म व्योमेति भस्म सर्वꣳहवा इदं भस्म मन एतानि चक्षूंषि भस्म'—या मंत्रानें ( उजव्या हाताच्या बोटांनीं ) मंत्रून त्यांत पाणी घालावें व मग ( उजव्या हाताच्या ) मधल्या तीन बोटांनीं ( तें ) कपाळ, ऊर, बेंबी, गळा, खांदे, हातांचे सांधे, पाठ आणि डोकें—इतक्या ठिकाणीं—शिवमंत्रानें, नारायणाच्या अष्टाक्षरमंत्रानें, गायत्रीमंत्रानें किंवा प्रणवमंत्रानें ( यांपैकीं वाटेल त्या एकानें ह्या ओल्या भस्माचे ) त्रिपुण्ड्र लावावेत.

अथसंध्याकालः उत्तमातारकोपेतामध्यमालुप्ततारका । अधमासूर्यसहिताप्रातःसंध्यात्रिधामता १ उत्तमासूर्यसहितामध्यमालुप्तभास्करा । अधमातार-

कोपेता सायंसंध्यात्रिधामता २ अध्यर्धयामादासायंसंध्यामाध्यान्हिकीष्यते। सर्वेषांसंध्यात्रयंनद्यादौबहिरेव प्रशस्तम् साग्निकस्यतुप्रादुष्करणाद्यनुरोधेन-सायंप्रातःसंध्येगृहेकर्तव्ये ॥

**सन्ध्याकाल**—सकाळीं नक्षत्रें ( आकाशांत ) दिसत असतांना संध्या करणें हा उत्तम वेळ होय. नक्षत्रें दिसतनाशीं होत असतां ( संध्या करणें हा ) मध्यम काळ होय. आणि ( त्या कर्माला ) सूर्योदयानंतरचा वेळ कनिष्ठ होय. असे हे प्रातःसन्ध्येचे ( सकाळच्या ) तीन काळ आहेत. सायंकाळीं ( क्षितिजावर ) सूर्य असतां संध्या करणें हा उत्तम काळ, सूर्यास्तानंतर करण्याचा मध्यम काळ आणि नक्षत्रें दिसूं लागल्यावर करण्याचा तो कनिष्ठ काळ. असे हे सायंसन्ध्येचे तीन काळ, आहेत. दीडप्रहर दिवसापासून संध्याकाळपर्यंतचा जो काळ, तो मध्यान्हसंध्येचा समजावा. या सर्व संध्या नदी वगैरे ठिकाणीं बाहेर करणेंच उत्तम होय. जो साग्निक ( घरीं अग्नीची उपासना करणारा ) असेल त्यानें अग्नि प्रदीप्त करणें (प्रादुष्करण) वगैरेच्या अनुरोधानें सायंसंध्या व प्रातःसंध्या कराव्यात.

अथसंक्षेपतःसंध्याप्रयोगोबव्हृचानाम् । दर्भद्वयकृतेपवित्रेग्रन्थियुतेग्रन्थि-रहितेवाहस्तयोर्धृत्वाद्विराचम्यप्राणायामंकुर्यात् प्रणवस्यपरब्रह्मऋषिःपरमात्मादेवतादेवीगायत्रीच्छन्दःसप्तानांव्याहृतीनांविश्वामित्रजमदग्निभरद्वाजगौतमात्रिवसिष्ठकश्यपा ऋषयः अग्निवाय्वादित्यबृहस्पतिवरुणेंद्रविश्वेदेवादेवताः गायत्र्युष्णिगनुष्टुप्बृहतीपङ्क्तित्रिष्टुप्जगत्यश्छन्दांसि गायत्र्या विश्वामित्रऋषिः सवितादेवतागायत्रीच्छन्दः गायत्रीशिरसःप्रजापतिर्ऋषिःब्रह्माग्निवाय्वादित्यादेवताःयजुश्छन्दःप्राणायामेविनियोगः सर्वाङ्गुलीभिस्तर्जनीमध्यमाभिन्नाभिर्वानासांधृत्वादक्षिणेनवायुमाकृष्यरोधयेत् ॐभूः ॐभुवः ॐस्वः ॐमहः ॐजनः ॐतपः ॐसत्यम् ॐतत्सवितुर्वरेण्यं० यात् ॐआपोज्योती रसोऽमृतंब्रह्मभूर्भुवःसुवरोम् इतिसप्रणवसप्तव्याहृतिगायत्रीशिरस्त्रिःपठित्वा वामनासयावायुंविसृजेदितिप्राणायामःसर्वशाखासाधारणः ममोपात्तदुरितक्षयद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंप्रातःसंध्यामुपासिष्ये आपोहिष्ठेतितृचस्यांबरीषः सिन्धुद्वीप-आपोगायत्रीमार्जनेविनि० आपोहिष्ठेतिनवभिःपादैःसप्रणवैःकुशोदकेनमूर्ध्निनवकृत्वो मार्जयेत् यस्यक्षयायेत्यधोमार्जयेत् नद्यादौतीर्थस्थंताम्रमृन्मयादिभूमिष्ठपात्रस्थंवावामकरस्थं वाजलंदर्भादिनादायमार्जनंसर्वत्र नतुधाराच्युतजलेन।

**संक्षेपतः सन्ध्याप्रयोग**—दोन दोन दर्भांचीं गांठी मारून किंवा तशींच केलेलीं दोन पवित्रकें दोन्ही हातांच्या ( अनामिकांत ) बोटांत घालून, दोन वेळां आचमन केल्यावर प्राणायाम करावा. तो असाः— 'प्रणवस्य परब्रह्म ऋषिः परमात्मा देवता देवी गायत्रीच्छन्दः सप्तानां व्याहृतीनां विश्वामित्रजमदग्निभरद्वाजगौतमात्रिवसिष्ठकश्यपा ऋषयः अग्निवाय्वादित्यबृहस्पति वरुणेंद्रविश्वेदेवा देवताः गायत्र्युष्णिगनुष्टुप् बृहतीपंक्तित्रिष्टुप् जगत्यश्छन्दांसि गायत्र्या विश्वामित्रऋषिः सविता देवता गायत्रीच्छन्दः गायत्रीशिरसः प्रजापतिर्ऋषिः ब्रह्माग्नि-

वाय्वादित्या देवताः यजुश्छन्दः प्राणायामे विनियोगः।' सर्व बोटांनीं किंवा मधलें व आंगठयाजवळचें अशीं दोन बोटें सोडून बाकीच्या तीन बोटांनीं नाक धरून उजव्या नाकपुडीनें वारा वर खेंचावा आणि मग—'ॐभूः ॐभुवः ॐस्वः ॐमहः ॐजनः ॐतपः ॐसत्यम्ः ॐतत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्यधीमहि धियोयोनः प्रचोदयात् ॐआपोज्योतिरसोमृतं ब्रह्मभूर्भुवः सुवरोम्।'—असें प्रणवासह सात व्याहृति, गायत्री आणि शिर तीन वेळां (मनांत) म्हणून, डाव्या नाकपुडीनें वायु खालीं सोडावा. असा प्राणायाम (श्वासोच्छ्वास थांबविणें) करावा. सर्व शाखेच्यांनीं असाच प्राणायाम करावा. नंतर —'ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःसंध्यामुपासिष्ये।' असा संकल्प करावा.—'आपोहिष्ठेति तृचस्याम्बरऋषिः सिंधुद्वीप आपो गायत्रीमार्जने विनियोगः। आपोहिष्ठा०' ऋचांच्या नऊ पादांनीं दर्भांनें मस्तकावर नऊ वेळां मार्जन (पाणी उडविणें) करावें. 'यस्य क्षयाय०' या मंत्रानें कपाळावर मार्जन करावें. नदी वगैरे ठिकाणच्या तीर्थांतलें (पवित्र जागचें) पाणी किंवा तांब्याचें अथवा मातीचें भांडें जमीनीवर ठेवून, त्यांतलें पाणी किंवा डाव्या हाताच्या तळव्यावरचें पाणी दर्भानें (किंवा उजव्या हाताच्या करंगळीच्या जवळच्या बोटानें) घेऊन मार्जन करावें. धारेनें पडणाऱ्या पाण्यानें मार्जन करूं नये.

**अथमन्त्राचमनम्। सूर्यश्चेतिमन्त्रस्ययाज्ञवल्क्यउपनिषदृषिःसूर्यमामन्युमन्युपतयोरात्रिश्चदेवताः प्रकृतिश्छन्दः आचमनेविनियोगः सूर्यश्चमामन्युश्चमन्युपतयश्चमन्युकृतेभ्यः। पापेभ्योरक्षन्ताम्। यद्रात्र्यापापमकार्षम्। मनसावाचाहस्ताभ्याम्। पद्भ्यामुदरेणशिश्ना। रात्रिस्तदवलुम्पतु। यत्किंचदुरितंमयि। इदमहंमाममृतयोनौ। सूर्येज्योतिषिजुहोमिस्वाहा। इतिजलंपिबेत् आचम्य आपोहिष्ठेतिनवऋचस्याम्बरीषःसिन्धुद्वीपआपोगायत्री पञ्चमीवर्धमाना सप्तमीप्रतिष्ठा। अन्त्येद्वेअनुष्टुभौ मार्जनेविनियोगः प्रणवेनव्याहृतिभिर्गायत्र्याप्रणवान्तया। आपोहिष्ठेतिसूक्तेन मार्जनंचचतुर्थकम्॥ १॥ ऋगन्तेर्धऋचान्तेवापादान्तेवापिमार्जयेत्। गायत्रींशिरसाचान्तेमार्जयित्वाघमर्षणम्॥ २॥ ऋतंचेतितृचस्यमाधुच्छन्दसोघमर्षणोभाववृत्तमनुष्टुप् अघमर्षणेविनि० दक्षिणहस्तेजलंकृत्वाऋतंचेतिऋक्त्रयंद्रुपदेतिऋचंवाजप्त्वादक्षिणनासयापापंपुरुषंनिरस्यतज्जलंनावलोक्यवामभागेक्षितौक्षिपेत् आचम्यगायत्र्याविश्वामित्रःसवितागायत्री श्रीसूर्यायार्घ्यदानेवि० प्रणवव्याहृतिपूर्वयागायत्र्यातिष्ठन्सूर्योन्मुखः जलाञ्जलिंत्रिःक्षिपेत् कालातिक्रमेप्रायश्चित्तार्थंचतुर्थम् असावादित्योब्रह्मेतिप्रदक्षिणंभ्रमनूजलंसिञ्चेत् अर्घ्यांजलौतर्जन्यङ्गुष्ठयोगोनकार्यः इदमर्घ्यदानंप्रधानमित्येके अङ्गमितिपरे।**

**मन्त्राचमन**—'सूर्यश्चेतिमंत्रस्य याज्ञवल्क्य उपनिषद ऋषिः सूर्यमामन्युमन्युपतयो रात्रिश्च देवताः प्रकृतिश्छन्दः आचमने विनियोगः सूर्यश्चमामन्युश्च मन्युपतयश्च मन्युकृतेभ्यः। पापेभ्यो रक्षन्ताम्। यद्रात्र्या पापमकार्षम्। मनसा वाचा हस्ताभ्याम् पद्भ्यामुदरेण शिश्ना। रात्रिस्तदवलुम्पतु। यत्किंच दुरितं मयि

इदमहं माममृतयोनौ सूर्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा।' याप्रमाणें मंत्र म्हणून उदक-प्राशन करावें. नंतर आचमन करून मार्जन करावें, तें असें—"आपोहिष्ठेति नवर्च-स्याम्बरीषः सिन्धुद्वीप आपो गायत्री पञ्चमी वर्धमाना सप्तमी प्रतिष्ठा। अन्त्ये द्वे अनुष्टुभौ मार्जने विनियोगः" प्रणवमंत्रानें पाहिलें, व्याहृतिमंत्रांनीं दुसरें, प्रणवान्त गायत्रीमंत्रानें तिसरें आणि "आपोहिष्ठा०" या ऋचेनें चवथें—अशीं मार्जनें करावीं. एक ऋचा, अर्धी ऋचा अथवा ऋचेचा पाद म्हणूनही मार्जन करावें. अखेरीस गायत्रीशिरोमंत्रानें मार्जन करून अघमर्षण करावें. उजव्या हस्तामध्यें पाणी घेऊन "ऋतं च०" या तीन ऋचा अथवा "द्रुपद०" ही ऋचा म्हणून उजव्या नाकपुडीनें पापपुरुष उच्छ्वासरूपानें खालीं हातावर टाकून तें उदक न पहातां डाव्या बाजूला जमिनीवर सोडावें व नंतर आचमन केल्यावर 'गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री श्रीसूर्यायार्घ्यदाने विनियोगः।' असें म्हणून, सूर्यासन्मुख उभें राहावें आणि प्रणवव्याहृतिपूर्वक गायत्रीमंत्रानें तीन वेळां उदकांजलि सोडावे. संध्येचा कालातिक्रम झाला असेल तर प्रायश्चित्तार्थ चवथें अर्घ्य द्यावें. "असावादित्यो ब्रह्म" या मंत्रानें (स्वतःभोंवतीं) प्रदक्षिण फिरून अर्घ्य द्यावें. अर्घ्यांजलि देतांना अंगठा व त्याच्या जवळचें बोट (तर्जनी) यांचा उपयोग करूं नये. हें अर्घ्यप्रदान मुख्य असल्याचें कोणी ग्रंथकार म्हणतात, व तें अंगभूत कर्म आहे, असें दुसरे ग्रंथकार म्हणतात.

अथगायत्रीजपः प्राणायामंकृत्वा गायत्र्याविश्वामित्रःसविता गायत्री जपेवि० तत्सवितुर्हृदयायनमः वरेण्यंशिरसेस्वाहा भर्गोदेवस्यशिखायैवषट् धीमहिक-वचायहुम् धियोयोनोनेत्रत्रयायवौषट् प्रचोदयात्अस्त्रायफट् इतिषडङ्गन्यासः कार्यः नवाकार्यो न्यासविधेरवैदिकत्वादिति गृह्य परिशिष्टे स्पष्टम् एतेनाक्षरन्या-सपादन्यासादीनांमुद्रादिविधेः शापमोचनादिविधेश्चतान्त्रिकत्वेनावैदिकत्वा-दनावश्यकत्वंवेदितव्यम् मंत्रदेवतांध्यायेत् केचिद्गायत्र्यादिध्यानंवदन्ति आ-गच्छवरदेदेविजपेमेसन्निधौभव। गायन्तंत्रायसेयस्माद्गायत्रीत्वंततः स्मृता १ इतितामावाह्ययोदेवःसवितास्माकंधियोधर्मादिगोचरे। प्रेरयेत्तस्यतद्भर्गस्तद्वरे-ण्यमुपास्महे इतिमंत्रार्थंचिन्तयन् मौनीप्रातःसूर्याभिमुखस्तिष्ठन्नामण्डलदर्शना-त्सप्रणवव्याहृतिकायाः गायत्र्ययाअष्टशतमष्टाविंशतिंदशकंवाजपेत् सायंवा-यव्याभिमुखआनक्षत्रदर्शनादितिविशेषः अनध्यायेऽष्टाविंशतिंप्रदोषेदशैवज-पेदितिकारिकायाम् रुद्राक्षविद्रुमादिमालाभिरङ्गुलीपर्वभिर्वाजपः अष्टशतं-चतुःपञ्चशत्सप्तविंशतिर्वामालामणयः उत्तरन्यासंकृत्वोपस्थानम् जातवेदसे०। तच्छंयो०। नमोब्रह्मणइतिमन्त्रैःसायंप्रातश्चोपतिष्ठेदितिपरिशिष्टमतम् स्मृत्य-न्तरेमित्रस्यचर्षणीत्यादिमित्रदेवताकैःप्रातः इमंमेवरुणेत्यादिभिर्वरुणपदोपेतैः सायंसूर्योपस्थानमुक्तम् प्राच्यैदिशेनमइन्द्रायनमः आग्नेय्यैदिशे० अग्नयेनमः इत्यादिना दशदिग्वन्दनान्ते संध्यायैनमःगायत्र्यैनमः सावित्र्यै० सरस्वत्यै० सर्वाभ्योदेवताभ्योनमइतिनत्वा उत्तमेशिखरेजातेभूम्यांपर्वतमूर्धनि। ब्राह्मणैर-भ्यनुज्ञातागच्छदेवियथासुखम् ॥ १ ॥ इतिविसृज्य मन्त्रेणापिवातयमनः

**इतित्रिरुक्त्वाप्रदक्षिणंभ्रमन्आसत्यलोकादापातालादालोकालोकपर्वतात् येसन्तिब्राह्मणादेवास्तेभ्योनित्यंनमोनमः १ इतिभूम्युपसंग्रहंनमस्कृत्याद्विराचामेदिति ॥**

**गायत्रीजप**—प्राणायाम करून—'गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री जपे वि० तत्सवितुर्हृदयाय नमः । वरेण्यं शिरसे स्वाहा । भर्गोदेवस्य शिखायै वषट् । धीमहि कवचायहुम् । धियोयो नो नेत्रत्रयाय वौषट् । प्रचोदयात् अस्त्राय फट् ।' असा षडंगन्यास करावा. किंवा न्यास करूं नये. कारण न्यासविधि वेदामध्यें सांगितला नाहीं असें गृह्यपरिशिष्टांत स्पष्ट सांगितलें आहे. याप्रमाणें अक्षरन्यास, पादन्यास, मुद्रादि विधि, शापमोचनादि विधि हे तंत्रकर्मामध्यें सांगितले असल्यामुळें अवैदिक आहेत. यास्तव हे अनावश्यक आहेत असें जाणावें. मंत्रदेवतेचें ध्यान करावें. कोणी गायत्रीचें ध्यान करावें, असें म्हणतात. 'आगच्छ वरदे देवि जपे मे सन्निधो भव । गायन्तं त्रायसे यस्माद्गायत्री त्वं ततः स्मृता ॥' या मंत्रानें गायत्रीचें आवाहन करून "यो देवः सवितास्माकं धियो धर्मादिगोचरे । प्रेरयेत्तस्य तद्भर्गस्तद्वरेण्यमुपास्महे ।' असें मंत्रार्थाचें चिंतन करीत प्रातःकाळीं न बोलतां सूर्यासन्मुख उभें राहून, सूर्यमंडलाचें दर्शन होईपर्यंत प्रणवव्याहृतिपूर्वक गायत्रीमंत्राचा एकशें आठ, अठ्ठावीस अथवा दहा जप करावा. सायंकाळीं वायव्येकडे तोंड करून नक्षत्रदर्शन होईपर्यंत जप करावा, असा यांतला विशेष जाणावा. अनध्यायाच्या दिवशीं अठ्ठावीस आणि प्रदोषदिवशीं दहा जप करावा, असें कारिकेमध्यें सांगितलें आहे. जप करायचा तो रुद्राक्ष, पोवळीं यांच्या माळेनें अथवा बोटाच्या पेऱ्यांनीं करावा. माळेचे मणि १०८ अथवा ५४ किंवा २७ असावे. जप केल्यानंतर उत्तरन्यास करून उपस्थान करावें. तें असें—'जातवेदसे० । तच्छंयो । नमो ब्रह्मण०।' या मंत्रांनीं प्रातःकाळीं व सायंकाळीं उपस्थान करावें, असें गृह्यपरिशिष्टाचें मत आहे. 'मित्रस्य चर्षणी०' इत्यादि सूर्यदेवतेच्या मंत्रांनीं प्रातःकाळीं आणि 'इमं मे वरुण०' इत्यादि वरुणाच्या पदांनीं युक्त अशा मंत्रांनीं सायंकाळीं—याप्रमाणें सूर्योपस्थान करावें, असें इतर स्मृतिग्रंथांत सांगितलें आहे. नंतर—'प्राच्यै दिशे नम इंद्राय नमः आग्नेय्ये दिशे० अग्नये नमः इत्यादि दहा दिशांना वंदन केल्यावर—'संध्यायै नमः गायत्र्यै नमः सावित्र्यै० सरस्वत्यै० सर्वाभ्यो देवताभ्यो नमः'—याप्रमाणें वंदन केल्यावर—'उत्तमे शिखरे जाते भूम्यां पर्वतमूर्धनि ब्राह्मणैरभ्यनुज्ञाता गच्छ देवि यथासुखम् ॥ या मंत्रानें संध्येचें विसर्जन करून "भद्रं नो अपि वातयमनः" असें तीन वेळां उच्चारून प्रदक्षिण फिरत—'आसत्यलोकादापातालादालोकालोकपर्वतात् ये सन्ति ब्राह्मणा देवास्तेभ्यो नित्यं नमो नमः ॥' या मंत्रानें भूमीला स्पर्श करून नमस्कार करावा व दोनदां आचमन करावें.

**अथतैत्तिरीयाणांसंकल्पान्तंपूर्ववत् गायत्रींध्यात्वा आयातुवरदादेवी अक्षरंब्रह्मसंमितम् । गायत्रींछन्दसांमातरिदंब्रह्मजुषस्वमे १ सर्ववर्णेमहादेविसंध्याविद्येसरस्वति । अजरेअमरेदेविसर्वदेविनमोस्तुते २ ओजोसिसहोसिबल-**

मसिभ्राजोसि देवानांधामनामासिविश्वमसिविश्वायुःसर्वमसिसर्वायुरभिभूरो-म्गायत्रीमावाहयामि सावित्रीमावाहयामि सरस्वतीमावाहया० छन्दऋषी-नावाह० श्रियं० ह्रियमावाहयामि इत्यावाह्यमार्जनंपूर्ववत् आपोवाइदꣳसर्वं-विश्वाभूतान्यापःप्राणावाआपः पशवआपोन्नमापोमृतमापःसम्राडापोविरा-डापःस्वराडापश्छन्दाꣳस्यापोज्योतीꣳष्यापोयजूꣳष्याप: सत्यमापः सर्वा-देवताआपोभूर्भुवःसुवरापओमितिजलमभिमन्त्र्यसूर्यश्चेतिपूर्ववन्मन्त्राचमनम् दधिक्राव्णोअकारिषमितिऋचमुक्त्वाआपोहिष्ठेतितिसृभिःहिरण्यवर्णाइतिपव-मानः सुवर्चनइत्यनुवाकेनचऋगन्तेमार्जनान्तेऽघमर्षणंकृत्वानकृत्वावार्घ्य-दानादिगायत्रीजपान्तमावाहनमंत्रवर्ज्यंपूर्ववत् न्यासविधेरवैदिकत्वमुक्तमेव जपान्तेउपस्थानं मित्रस्यचर्षणी० । मित्रोजनान्० । प्रसमित्र० । यच्चिद्धिते० । यत्किंचेदं ० कितवासोयद्रि० । इतिषड्भिरुपस्थाय प्राच्यैदिशेयाश्चदेवता एतस्यांप्रतिवसन्त्येताभ्यश्चनमोनमइत्यादिनाअधरान्ताःषट्नत्वाअवांतरायै-दिशेयाश्चदेवताइतिचनत्वानमोगङ्गायमुनयोर्मध्येइत्यादिनामुनिदेवान्नत्वास-ꣳस्रवंतुदिशोइतिमंत्रंपठित्वागोत्राद्युच्चार्यपूर्ववद्भूम्युपसंग्रहंनत्वापूर्ववत्संध्यां-विसृजेदिति ॥

**तैत्तिरीय शाखेचा संध्याप्रयोग**—आचमनापासून संकल्पापर्यंतचें वरच्या प्रमाणेंच सर्व कर्म केल्यावर—'आयातु वरदा देवी अक्षरं ब्रह्मसम्मितम् गायत्रीं छन्दसां मातरिदं ब्रह्म जुषस्व मे ॥ सर्व-वर्णे महादेवि सन्ध्याविद्ये सरस्वती । अजरे अमरे देवि सर्वदेवि नमोऽस्तु ते ॥ ओजोसि सहोसि बलमसि भ्राजोसि देवानां धामनामासि विश्वमसि विश्वायुः सर्व-मसि सर्वायुरभिभूरोम् गायत्रीमावाहयामि सावित्रीमावाहयामि सरस्वतीमावाहयामि छन्द ऋषीमावाहयामि श्रियं०ह्रियमावाहयामि ।'—या मंत्रांनीं सन्ध्येला (बोलावणें) आवाहन करून, मागच्याप्रमाणेंच मार्जन करावें, व नंतर—'आपो वा इदꣳसर्वं विश्वाभूतान्यापः प्राणा वा आपः पशव आपोन्नमापोमृतमापः सम्राडापो विराडापः स्वराडापश्छन्दाꣳस्यापो ज्योतिꣳष्यापो यजूꣳष्यापः सत्यमापः सर्वा देवता आपो भूर्भुवः सुवराप आप ॐ ॥' या मंत्रानें पाणी मंत्रून 'सूर्यश्च०' या मंत्रानें मागिलप्रमाणेंच मंत्राचमन करावें आणि मग 'दधिक्राव्णो अकारिषं०'—ही ऋचा म्हटल्यावर—'आपोहिष्ठा०'—या तीन ऋचा, 'हिरण्यावर्णा०' आणि 'पवमानः सुवर्च नः०' हा अनुवाक् यांनीं प्रत्येक ऋचेच्या शेवटीं मार्जन—असें मार्जन करावें. त्यानंतर (हवें तर) अघमर्षण करून अर्घ्यदानापासून-गायत्रीजपापर्यंत पूर्वीप्रमाणेंच मंत्रांवां-चून आवाहन करावें. न्यासविधि हा वैदिक नसल्याचें पूर्वींच सांगितलें आहे. गायत्रीजपानंतर—'मित्रस्य चर्षणी० । मित्रो जनान्० । प्रसमित्र० । यच्चिद्धि-ते० । यत्किंचेदं० । कितवासो यद्रि० ।' या सहा ऋचांनीं उपस्थान (हात जोडून उभ्यानें सन्मुख प्रार्थना करणें) केल्यावर 'प्राच्यै दिशे याश्च देवता एतस्यां प्रति-वसन्त्येताभ्यश्च नमोनमः ।' इत्यादि मंत्रांनीं पूर्व वगैरे चार दिशा व ऊर्ध्वा

( आकाशाची दिशा ) आणि अधरा ( जमिनीची दिशा ) अशा सहा दिशांना नमस्कार करावा, व –'अवान्तरायै दिशे याश्च देवता०' वगैरे मंत्रांनीं इतर ( चार कोंपऱ्यांच्या ) दिशांना नमस्कार केल्यावर–'नमो गंगा यमुनयोर्मध्ये०' या मंत्रांनीं –मुनि व देव यांना नमस्कार करून, 'स॒ श्रवन्तु दिशो०' हा मंत्र म्हणून गोत्रादिकांचा उच्चार केल्यावर मागें सांगितल्याप्रमाणें भूमीला नमस्कार करावा आणि सन्ध्येचें विसर्जन ( संपवणूक ) करावें.

अथकात्यायनानांसंध्याप्रयोगः आचम्यभूःपुनातुभुवःपुनातुस्वःपुनातुभुर्भुवःस्वः पुनात्वित्यादिनापावनंकृत्वा अपवित्रःपवित्रोवेतिविष्णुंस्मृत्वा आसनादिविधिंकृत्वाद्विराचम्य प्राणानायम्यपूर्ववत्संकल्प्य गायत्रींत्र्यक्षरांबालांसाक्षसूत्रकमण्डलुम् । रक्तवस्त्रांचतुर्वक्त्रांहंसवाहनसंस्थिताम् १ ब्रह्माणींब्रह्मदैवत्यांब्रह्मलोकनिवासिनीम् । आवाहयाम्यहंदेवीमायातींसूर्यमण्डलात् २ आगच्छवरदेदेवित्र्यक्षरेब्रह्मवादिनि । गायत्रीछन्दसांमातर्ब्रह्मयोनेनमोस्तुते ३ इत्यावाह्यपूर्ववत् आपोहिष्ठेतितृचेनमार्जयेत् सूर्यश्चेतिमंत्रस्यनारायणऋषिः सूर्योदेवताअनुष्टुप्छन्दःआचमनेविनियोगः सूर्यश्चेतिजलंप्राश्याचम्य आपोहिष्ठेतिनवऋग्भिर्मार्जनंकुर्यादितिकेचिदाहुःबहवस्तुसंकल्पाद्यन्तेसूर्यश्चेतिमंत्राचमनंकृत्वाऽऽपोहिष्ठेतितिसृभिःप्रतिपादंमार्जनान्तेऽघमर्षणंकार्यंनतुमार्जनद्वयमित्याहुः सुमित्र्यादुर्मित्र्याइतिद्वयोः प्रजापतिर्ऋषिः आपोदेवतायजुश्छंदःआदानप्रक्षेपवि० सुमित्र्यानआपओषधयःसन्तुइतिजलमादायदुर्मित्र्यास्तस्मैसन्तुयोस्मान्द्वेष्टियंचवयंद्विष्मइतिवामभुविक्षिपेत् । ततऋतंचेतितृचेनद्रुपदादिवेतित्र्यृचस्यवाघमर्षणंपूर्ववत् सायंप्रातश्चत्रिरर्घ्यदानंपुष्पयुतजलेनपूर्ववत् मध्याह्नेसकृत् गायत्र्यापरितउक्षणम् अथोपस्थानम् उद्वयमुदुत्यमितिद्वयोःप्रस्कण्वः सूर्योनुष्टुप्गायत्र्यौ चित्रंदेवानामाङ्गिरसःकुत्सःसूर्यस्त्रिष्टुप् तच्चक्षुर्दध्यङ्ङाथर्वणः सूर्यःपुरउष्णिक् उपस्थाने० उद्वयंतमस० १ उदुत्यंजा० १ चित्रंदे० १ तच्चक्षुर्देवहितं० इतिऊर्ध्वबाहुःसूर्यमुदीक्षमाणोयथाशाखंपठेत् प्राणायामादिविधायन्याससमुद्रातर्पणादिविधिःकृताकृतः तेजोसीतिपरमेष्ठीप्रजापतिराज्यंयजुः आवाहने० तेजोसिशुक्रमस्यमृतमसिधामनामासिप्रियंदेवानामनाधृष्टंदेवयजनमसिपरोरजसइतिविमलःपरमात्मानुष्टुप् गायत्र्युपस्था० गायत्र्यस्येकपदीद्विपदीत्रिपदीचतुष्पद्यपदसिनहिपद्यसेनमस्तेतुरीयायदर्शनायपदायपरोरजसेसावदोम् ततोगायत्रीजपान्तंपूर्ववत् ततःशक्तेनविभ्राडित्यनुवाकेनपुरुषसूक्तेनवाशिवसंकल्पेनवामण्डलब्राह्मणेनवोपस्थानंकार्यम् अत्रऋक्शाखोक्तवद्दिग्वन्दनंकेचित्कुर्वन्ति ततउत्तमेशिखरे० देवागातुविदोगातुमितिमंत्राभ्यांविसर्जनम् भूम्युपसंग्रहंनमस्कारादिपूर्ववत् इतिकात्यायनसंध्या ।

**कात्यायनांचा संध्याप्रयोग**—आचमन करून "भूः पुनातु भुवः पुनातु स्वः पुनातु भूर्भुवः स्वः पुनातु" इत्यादि मंत्रांनीं शुद्धि करून "अपवित्रः पवित्रो वा०" इत्यादि मंत्रांनीं विष्णूचें स्मरण करावें

आसनादि विधि करून दोनदां आचमन करून प्राणायाम केल्यावर, पूर्वींप्रमाणें संकल्प करावा व गायत्रीचें आवाहन करावें. 'गायत्रीं त्र्यक्षरां बालां साक्षसूत्रकमण्डलुम् । रक्तवस्त्रां चतुर्वक्त्रां हंसवाहनसंस्थिताम् ॥ ब्रह्माणीं ब्रह्मदैवत्यां ब्रह्मलोकनिवासिनीम् । आवाहयाम्यहं देवीमायांतीं सूर्यमंडलात् ॥ आगच्छ वरदे देवि त्र्यक्षरे ब्रह्मवादिनि । गायत्रिच्छन्दसां मातर्ब्रह्मयोने नमोस्तु ते ॥ ' या मंत्रांनीं गायत्रीदेवीचें आवाहन केल्यानंतर पूर्वींप्रमाणें 'आपोहिष्ठा०'–या तीन ऋचांनीं मार्जन करावें. 'सूर्यश्चेति मंत्रस्य नारायण ऋषिः सूर्योदेवता अनुष्टुप् छन्दः आचमने विनियोगः । सूर्यश्च०'—हे मंत्र म्हणून पाणी प्यायल्यावर आचमन करावें. 'आपोहिष्ठा०' इत्यादि नऊ ऋचांनीं मार्जन करावें असेंही कोणी ग्रंथकार सांगतात. बरेच ग्रंथकार–संकल्प केल्यानंतर– 'सूर्यश्चेति०' या मंत्रानें आचमन करून–'आपोहिष्ठा०' या तीन ऋचांनीं प्रत्येक पादाच्या शेवटीं मार्जन करून अघमर्षण करावें, दोन मार्जनें करूं नयेत, असें म्हणतात. 'सुमित्र्या दुर्मित्र्या इति द्वयोः प्रजापति ऋषिः आपोदेवता यजुश्छन्दः आदानप्रक्षेपे वि० सुमित्र्यान् आप ओषधयः सन्तु '–या मंत्रानें उदक घेऊन 'दुर्मित्र्यास्तस्मै सन्तु योस्मान्द्वेष्टि यं च वयं द्विष्मः '–या मंत्रानें डावीकडे टाकावें. त्यानंतर–'ऋतं च०' या तीन ऋचांनीं, अथवा 'द्रुपद०' ही ऋचा तीन वेळां म्हणून, पूर्वींप्रमाणें अघमर्षण करावें. सकाळीं व सायंकाळीं पूर्ववत् तीन वेळां फुलें घातलेल्या पाण्याचें अर्घ्य द्यावें, मध्याह्नकालीं एकदांच द्यावें. गायत्रीमंत्रानें सभोंवार उदक शिंपडीत प्रदक्षिण फिरावें. यानंतर उपस्थान करावें तें–'उदयमुदुत्यमिति द्वयो प्रस्कण्वः सूर्योनुष्टुप् गायत्र्यौ चित्रं देवानामाङ्गिरसः कुत्सः सूर्यस्त्रिष्टुप् तच्चक्षुर्दध्यङ्ङाथर्वणः सूर्यः पुरउष्णिक् उपस्थाने० उद्वयंतमस० ॥ १ उदुत्यंजा० १ चित्रं देवानां० १ तच्चक्षुर्देवहितं' या ऋचा वर हात करून सूर्याकडे पहात आपापल्या शाखेनुसार म्हणाव्या व नंतर प्राणायाम करावा. न्यास, मुद्रा, तर्पण इत्यादि विधि कृताकृत आहे. 'तेजोसीति परमेष्ठी प्रजापतिराज्यं यजुः आवाहने विनियोगः । तेजोसि शुक्रमस्यमृतमसिधामनामासि प्रियं देवानामनाधृष्टं देवयजनमसि परोरजस इति विमलः परमात्मानुष्टुप् गायत्र्युपस्था० गायत्र्यस्येकपदी द्विपदी त्रिपदी चतुष्पद्यपदसि नहिपद्यसे नमस्ते तुरीयाय दर्शनाय पदाय परो रजसे सावदोम् '–या मंत्रांनीं उपस्थान करून, पूर्ववत् गायत्रीजपापर्यंतचें कर्म करावें. नंतर सामर्थ्य असेल त्याप्रमाणें– 'विभ्राट्०'–हा अनुवाक्, पुरुषसूक्त, शिवसंकल्प, अथवा मण्डल ब्राह्मण यांपैकीं एक म्हणून उपस्थान करावें. ऋक्शाखीयाप्रमाणें कोणी दिशांना वंदन करतात. नंतर 'उत्तमे शिखरे०, व 'देवा गातु विदो गातुम्०'–या मंत्रांनीं संध्येचें विसर्जन करावें. भूमीला नमस्कार वगैरे सर्व पूर्वींप्रमाणेंच करावें. याप्रमाणें कात्यायनशाखीयांचा संध्याविधि आहे.

संध्यामुपासतेयेतेनिष्पापाब्रह्मलोकगाः । अन्यकर्मफलंनास्तिसंध्याहीनेऽशुचित्वतः । जीवमानोभवेच्छूद्रोमृतःश्वाजायतेध्रुवम् संध्यात्रयकालातिक्रमेप्रायश्चित्तार्थमेकमर्घ्यमधिकं दत्वा रात्रौप्रहरपर्यन्तंदिनोक्तकर्माणिकुर्यात् ब्रह्म-

यज्ञंसौरंचवर्जयेत् सर्वथा संध्यालोपेप्रतिसंध्यमेकोपवासोयुतमष्टोत्तरसहस्रं-वागायत्रीजपः अत्यशक्तौ प्रतिसंध्यालोपेशतगायत्रीजपः द्व्यहंत्र्यहंलोपेतदा-वृत्तिः ततःपरंकृच्छ्रादि कल्प्यम् ॥

**सन्ध्याकाल व सन्ध्यालोपप्रायश्चित्त**—जे कोणी सन्ध्या नियमानें करतात, ते पापमुक्त होऊन ब्रह्मलोकाला जातात. जे कोणी सन्ध्या करीत नाहींत, ते अशुद्ध असल्यानें, त्यांना इतर कर्मांचें फळ मिळत नाहीं. ते जिवंत असून शूद्रच होत. त्यांना मेल्यावर खात्रीनें कुत्र्याचा जन्म येतो. तिन्ही सन्ध्या जर वेळेवर झाल्या नाहींत, तर प्रायश्चित्त म्हणून ( प्रत्येक सन्ध्येचे वेळीं ) एकेक अर्घ्य अधिक देऊन, रात्रीं एक प्रहरपर्यंत दिवसां करण्याचीं शास्त्रोक्त कर्में करावींत. रात्रीं फक्त ब्रह्मयज्ञ व सौर हीं वर्ज्य करावींत. सन्ध्या जर ( एके दिवशीं ) मुळींच केली गेली नाहीं, तर प्रत्येक वेळे-च्या सन्ध्यालोपाबद्दल एक उपास किंवा १०००० ( दहा हजार ) अथवा १००८ ( एक हजार आठ ) गायत्रीजप करावा. आति अशक्तानें प्रत्येक सन्ध्या-लोपाबद्दल १०० ( शंभर ) गायत्रीजप करावा. दोन किंवा तीन दिवस मुळींच सन्ध्या न करण्यांत आल्यास वरच्या प्रायश्चित्तांची आवृत्ति करावी. त्याहून अधिक दिवस लोप झाल्यास कृच्छ्रादि प्रायश्चित्त करावें.

अथौपासनहोमःस्वयंहोमोमुख्यः अशक्तौपत्नीपुत्रःकुमारीभ्राताशिष्योभा-गिनेयोजामाताऋत्विग्वा पुत्रादिर्दम्पत्योः संनिधानेएकतरसंनिधानेवाजुहुयात् त्यागंयजमानःपत्नीवाकुर्यात् तस्याअसंनिधौतदाज्ञयाऋत्विगादिरपि पत्न्याऋ-तुप्रसवोन्मादादिदोषेतुतदाज्ञांविनापिऋत्विगादिस्त्यागंकुर्यात् स्वयंहोमेफलंय-त्स्यादन्यैर्होमेतदर्धकम्। पर्वणितुस्वयमेवजुहुयात् तत्रप्रातःसूर्योदयात्प्राक्सायं-सूर्यास्तात्प्राक् अग्नीनांगृह्याग्नेर्वाप्रादुष्करणंकृत्वासूर्योदयास्तोत्तरंहोमःकार्यः प्रादुष्करणकालातिक्रमेॐभूर्भुवःस्वःस्वाहेतिमंत्रेणस्रुवाज्याहुतिरूपंसर्वप्रायश्चित्त-मान्यंसस्कारपूर्वकंकृत्वाहोमः सूर्योदयोत्तरंदशघटिकापर्यन्तंप्रातर्होमकालोमु-ख्यः ततआसायंगौणः सायंनवनाडिकापर्यन्तंमुख्यः ततआप्रातर्गौणः मुख्य-कालातिक्रमेकालातिक्रमनिमित्तप्रायश्चित्तपूर्वकममुकहोमंकरिष्यइतिसंकल्प्या-ज्यंसस्कृत्यस्रुचिचतुर्गृहीतंगृहीत्वासायंकालेदोषावस्तर्नमःस्वाहेतिहुत्वाप्रातस्तु-प्रातर्वस्तर्नमः स्वाहेतिहुत्वाहोम्यंसंस्कृत्यनित्यहोमः श्रौतहोमंकृत्वास्मार्तः होमः केचित्स्मार्तहोमंपूर्वमाहुः आधानेपुनराधानेसायमुपक्रमोहोमः सायंप्रातर्होमयो-र्द्रव्यैक्यंकर्त्रैक्यंच प्रातर्यजमानःकर्ताचेत्कर्तृभेदोनदोषाय ॥

**औपासनहोम**—खरा मार्ग म्हणजे स्वतः होम करणें हा होय. स्वतः करण्याची अंगीं शक्ति नसल्यास—आपली बायको, मुलगा, मुलगी, भाऊ, शिष्य, भाचा, जांवई किंवा ऋत्विज—यांपैकीं शक्य असेल त्याच्याकडून करवावा. पुत्रादिकांनीं जें हवन करणें तें यजमान व त्याची बायको हीं जवळ असतां किंवा त्या दोघांपैकीं कोणीतरी एक समीप असतां करावें. व त्याग ( आहुतिमंत्र )

यजमानानें किंवा त्याच्या बायकोनें म्हणावा. बायकोजवळ नसल्यास तिच्या आज्ञेनें ऋत्विजादिकांनीं म्हणावा. पत्नी जर–विटाळशी, बाळंतीण किंवा भ्रष्ट असली, तर तिच्या आज्ञेवांचूनही ऋत्विजादिकांनीं त्याग म्हणावा. स्वतः होम केल्यानें जें फळ मिळतें, त्याच्या अर्धें दुसऱ्याकडून होम करविल्यास मिळतें. पर्व-दिवशीं स्वतःच होम करावा. रोज सकाळीं सूर्योदयाच्या आधीं आणि सायंकाळीं सूर्यास्तापूर्वी–(दक्षिणाग्नि, गार्हपत्य, आहवनीय किंवा गृह्याग्नि) प्रज्वलित करून, अनुक्रमें–सूर्योदयानंतर व सूर्यास्तानंतर होम करावा. अग्नि प्रज्वलित कर-ण्याचा (प्रादुष्करण) जर कालातिक्रम (वेळ चुकणें) झाला, तर–'ॐ भुर्भुवः स्वः स्वाहा'–या मंत्रानें आज्यसंस्कारानें तुपाची आहुति द्यावी व हें प्रायश्चित्त झाल्यावर (रोजच्याप्रमाणें) होम करावा. सूर्योदयानंतर दहा घटकांपर्यंतचा सकाळ-च्या होमाचा मुख्य काळ आहे व त्यानंतरचा सायंकालपर्यंतचा वेळ गौण आहे. संध्याकाळच्या होमाचा मुख्य वेळ सूर्यास्तानंतर नऊ घटकांपर्यंतचा आहे व त्या-नंतर प्रातःकालपर्यंतचा गौण होय. कोणच्याही वेळच्या मुख्य कालाचा अतिक्रम झाल्यास–'कालातिक्रमानिमित्तप्रायश्चित्तपूर्वकामुकहोमं करिष्ये ।'–असा संकल्प करून आज्यसंस्कार (तूप देणें) करावा व त्यानंतर स्रुवापात्रांत चार वेळ तूप घेऊन, सायंकाळीं 'दोषावस्तर्नमः स्वाहा ।' अशा उच्चारानें हवन (आहुति देणें) करावें आणि प्रातःकाळीं 'प्रातर्वस्तर्नमः स्वाहा' असें म्हणून हवन करावें. असें हें प्रायश्चित्ताचें कर्म झाल्यावर होमद्रव्यांचा संस्कार (शुद्धीकरण) करून रोजचा होम करावा. स्मार्तहोम श्रौतहोमानंतर करावा. स्मार्तहोम आधीं करण्यासही कांहीं ग्रंथकार सांगतात. पुनराधानांत होमाचा आरंभ सायंकाळीं करावा. सकाळच्या व संध्याकाळच्या (दोन्ही) होमांतलें द्रव्य व कर्ता–दोन्ही एकच असावींत. सकाळच्या होमाचा कर्ता यजमान असतां, सायंकाळच्यास निराळा कर्ता हा दोष नाहीं.

अथाश्वलायनस्मार्तहोमः। आचम्यप्राणानायम्यदेशकालौसंकीर्त्यश्रीपरमेश्वर-प्रीत्यर्थं सायमौपासनहोमं प्रातरौपासनहोमंवामुकद्रव्येणकरिष्ये चत्वारिशृंगे-तिध्यात्वासोदकहस्तेनत्रिःपरिसमुह्यपरिस्तीर्यत्रिःपर्युक्ष्य होमद्रव्यंसमिद्युतमुत्त-रतःस्थितंदर्भेणावज्वाल्यप्रोक्ष्यात्रिःपर्यग्निकृत्वाऽग्नेःपश्चिमतादर्भेनिधायविश्वा-निनइत्यभ्यर्च्यप्रजापतिंमनसाध्यायनूसमिधमग्नौप्रक्षिप्यतथैवत्यक्त्वासमिधिदी-प्तायांशततण्डुलैरग्नयेस्वाहेतिसायंप्रथमाहुतिः सूर्यायस्वाहेतिप्रातःप्रथमाहुतिः शताधिकतण्डुलैः प्रजापतयइतिमनसोच्चार्यहोमत्यागाभ्यांद्वितीयाहुतिरुभयकाले परिस्तरणंविसृज्यपरिसमूहनपर्युक्षणेकृत्वोपस्थानम् अग्नआयूंषीतितिसृणां-शतंवैखानसाअग्निःपवमानोगायत्री अग्न्युपस्थानेविनियोगः अग्नेत्वन्नइति-चतसृणांगौपायनाबन्धुःसुबन्धुः श्रुतबन्धुर्विप्रबन्धुश्चाग्निर्द्विपदाविराट् अग्न्यु-पस्थानेवि० प्रजापतेहिरण्यगर्भःप्रजापतिस्त्रिष्टुप् प्रजापत्यपस्थानेविनियोगः तंतुतन्वन्देवाअग्निर्जगतीयद्वा देवाप्रजापतिर्जगती उपस्थानेविनियोगः हिरण्य-गर्भोहिरण्यगर्भःप्रजापतिस्त्रिष्टुप् प्रजाप्रत्युप० इतवायव्यद्शोतिष्ठन्नुपस्थाय

उपविश्यमानस्तोक इत्यादिनाविभूतिधारणंक्वचिदुक्तम् विष्णुंस्मृत्वा अनेनहोम-कर्मणापरमेश्वरःप्रीयतामित्यर्पयेत् प्रातस्तुसूर्योनोदिवःसूर्यश्चक्षुःसूर्योगायत्री सूर्योप० उदुत्यंकाण्वःप्रस्कण्वःसूर्योगायत्री सूर्योप० चित्रंदेवानामाङ्गिरसः कुत्सःसूर्यस्त्रिष्टुप् सूर्योप०नमोमित्रस्यसूर्योभितपाःसूर्योजगती सूर्यो० इतिचतुर्भिः पूर्वोक्तैस्त्रिभिःप्राजापत्यैश्चोपस्थानम् केचित्प्रातस्तंतुंतन्वन्निति न पठन्ति पत्नीकुमारीकर्तृकहोमे ध्यानोपस्थानादौमन्त्रावर्ज्याः ॥

**आश्वलायनस्मार्तहोम**—आचमन करून प्राणायाम केल्यावर देशकालादिकांचा उच्चार करावा आणि मग—'श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सायमौपासनहोमं वामुकद्रव्येण करिष्ये' असा संकल्प केल्यावर 'चत्वारि–शृंगा०' या मंत्रानें अग्नीचें ध्यान करावें. नंतर हातांत पाणी घेऊन तीन वेळ परिसमूहन (अग्नीच्या भोंवतालची घाण काढणें), परिस्तरण (अग्नीच्या भोंवतालीं दर्भ अथरणें) आणि त्यावर तीन वेळ पाणी प्रोक्षण (शिंपडणें) करावें.. उत्तरेच्या बाजूला आधींच ठेवलेलें समिधांसह होमद्रव्य, पेटविलेल्या दर्भानें प्रकाशित करावें व नंतर पाण्याचें त्या (द्रव्यांवर) प्रोक्षण करून, तोच दर्भ अग्नीच्या भोंवतीं तीन वेळ फिरवून टाकून द्यावा. होमद्रव्यें अग्नीच्या पश्चिमेस (आपल्यापुढें) दर्भांवर ठेवून 'विश्वानि नो०'—या मंत्रानें अग्नीची पूजा करावी व मनानें प्रजापतीचें ध्यान करीत अग्नीला समिध देऊन मनांतच त्याग (स्वाहा म्हणणें) करावा.. समिध पेटल्यावर—'अग्नये स्वाहा'—या मंत्रानें शंभर तांदुळांची सायंकाळीं पहिली आहुति, व—'सूर्याय स्वाहा'—या मंत्राचा उच्चार करून शंभरांहून अधिक तांदुळांची प्रातःकाळीं पहिली आहुति देऊन—'प्रजापतये०'—असा मनांत उच्चार करावा आणि होम व त्याग हीं करून, दोन्ही वेळेस (अशी) दुसरी आहुति द्यावी. परिस्तरणाचे अग्नि-भोंवतालचे दर्भ नंतर काढून टाकून परिसमूहन आणि पर्युक्षण केल्यावर जें उप-स्थान करावें तें असें:—'अग्न आयूंषीति तिसृणां शतं वैखानसा अग्निः पवमानो गायत्री अग्न्युस्थाने विनियोगः। प्रजापते हिरण्यगर्भः प्रजापतिस्त्रिष्टुप् प्रजापत्युपस्थाने विनियोगः। तन्तुं तन्वन्देवा अग्निर्जगती यद्वा देवा प्रजापतिर्जगती उपस्थाने विनि-योगः। हिरण्यगर्भं हिरण्यगर्भः प्रजापतिस्त्रिष्टुप् प्रजापत्युप०'—हे मंत्र वायव्यदिशे-कडे उभें राहून म्हटल्यावर बसावें, व 'मानस्तोके०'—वगैरे मंत्रांनीं विभूति (अंगारा) लावावी असें क्वचित् ग्रन्थांत सांगितलें आहे. नंतर विष्णूचें स्मरण करून—'अनेन होमकर्मणा परमेश्वरः प्रीयताम्'—असें म्हणून तें सर्व कर्म देवास अर्पण करावें. सकाळच्या उपस्थानाचा मंत्रः—'सूर्यो नो दिवः सूर्यश्चक्षुः सूर्यो गायत्री सूर्यस्त्रिष्टुप् सूर्यो०। नमो मित्रस्य सूर्योभितपाः सूर्यो जगती सूर्यो०'—या चार मंत्रांनीं व पूर्वी सांगितलेल्या प्रजापति देवतेच्या तीन मंत्रांनीं प्रातःकाळचें उपस्थान करावें. 'तन्तुं तन्वन्०'—हा मंत्र कोणी सकाळीं म्हणत नाहींत. बायको अथवा कुमारी जर होम करणाऱ्या असतील तर ध्यान व उपस्थान यांचे मंत्र वर्ज्य करावेत.

अथहिरण्यकेशीयानां पूर्वोक्तसंकल्पाद्यन्ते यथाहतद्रुसवइतिपरिसमुह्यपरिस्तीर्य अदितेनुमन्यस्वेतिदक्षिणतः प्राचीनंपर्युक्षेत् अनुमतेनुमन्यस्वेतिपश्चादुदीचीनम् सरस्वतेनुमन्यस्वेतिउत्तरतःप्राचीनम् देवसवितःप्रसुवेति सर्वतः तूष्णींसमिधमाधायहोमादिप्राग्वत् अदितेन्वमꣳस्थाः अनुमतेन्व० सरस्वतेन्व० देवसवितःप्रासावीरितिपूर्वत्वपरिषेचनम् उदुत्यंचित्रंदेवानामितिप्रातरुपस्थानम् अग्निर्मूर्धादिवइति त्वामग्नेपुष्करादधीतिद्वाभ्यांसायमुपस्थानम् ॥

**हिरण्यकेशीस्मार्तहोम**—पूर्वी सांगितल्याप्रमाणें संकल्प केल्यावर 'यथाहतद्रुसव०'—या मंत्रानें कुण्डाभोंवतीं पाणी शिंपडून व दर्भ अंथरून—'अदितेनुमन्यस्व०'—या मंत्रानें दक्षिणेकडे पश्चिमेकडून पूर्वेस,—'अनुमतेनुमन्यस्व०'—या मंत्रानें पश्चिमेकडे दक्षिणेकडून उत्तरेस,—'सरस्वतेनुमन्यस्व०'—या मंत्रानें उत्तरेकडे पश्चिमेकडून पूर्वेस आणि—'देवः सवितुः प्रसुव०'—या मंत्रानें ईशान्येकडून ईशान्येपर्यंत सर्व बाजूंनीं पाणी शिंपडावें. मंत्रावांचूनच समिध देऊन होम वगैरे सर्व पूर्ववत् करावें. नंतर 'अदितेन्वमꣳस्थाः अनुमतेन्व० । सरस्वतेन्व० । देवः सवितः प्रासावी०'—या चार मंत्रांनीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें (परिषेचन) पाणी शिंपडावें. 'उदुत्यं० ।' व 'चित्रंदेवानां०'—या दोन मंत्रांनीं सकाळीं उपस्थान करावें. 'अग्निर्मूर्धादिव० आणि 'त्वामग्ने पुष्करादधी०' या दोन मंत्रांनीं सायंकाळचें उपस्थान करावें.

आपस्तम्बानां सायमग्नयेस्वाहाऽग्नये स्विष्टकृतेस्वाहेतिआहुती प्रातस्तुसूर्यायस्वाहाग्नयेस्विष्टकृतेस्वाहेतिविशेषः शेषंहिरण्यकेशीयवत् ॥

**आपस्तम्बस्मार्तहोम**—आपस्तम्बांनीं संध्याकाळीं—'अग्नये स्वाहा' आणि 'अग्नये स्विष्टकृते स्वाहा'—या दोन मंत्रांनीं व सकाळीं—'सूर्याय स्वाहा' आणि 'अग्नये स्विष्टकृते स्वाहा'—या दोन मंत्रांनीं आहुति द्याव्या. ह्याच काय तो यांत विशेष आहे. बाकीचा सर्व प्रयोग हिरण्यकेशीप्रमाणेंच आहे.

अथकात्यायनानां सायमस्तमितेहोमः प्रातःसूर्येऽनुदितेहोमः तत्रप्रातरुपस्थानान्तांसंध्यांकृत्वा होमान्ते गायत्रीजपादिसंध्यासमापनम् तत्र पूर्ववत्संकल्पान्ते उपयमनान्कुशानादायसव्येकृत्वादक्षिणकरेणतिस्रःसमिधोग्नावाधाय मणिकोदकेन र्युक्ष्याभिमन्त्र्ययित्वाग्नयेस्वाहाप्रजापतयेस्वाहेतिसायंदध्नातण्डुलैर्वाहुत्वाप्रातस्तथैवसूर्यायप्रजापतयेचजुहुयात् समास्त्वेत्यनुवाकेनसायमुपस्थानं प्रातस्तुविभ्राडित्यनुवाकेन अत्रदर्विहोमादौसंस्रावप्राशनमाहुः होमलोपेऽष्टोत्तरसहस्रगायत्रीजपः मुख्यकालातिक्रमेअनादिष्टहोमः ॥

**कात्यायनस्मार्तहोम**—कात्यायनांनीं सन्ध्याकाळीं सूर्यास्तानंतर व सकाळीं सूर्योदयापूर्वी होम करावा. तो येणेंप्रमाणें:—सकाळीं उपस्थानापर्यंत सन्ध्या करून होम करावा आणि मग बाकीची सन्ध्या पुरी करावी. या बाबतींतळा पूर्वी सांगितल्याप्रमाणें संकल्प केल्यावर उपयमन नांवाचा दर्भ आणून

तो डाव्या हातांत धरावा आणि मग उजव्या हातानें तीन समिधा अग्नीला दिल्यावर कलशांतल्या ( तांब्यांतल्या ) पाण्यानें पर्युक्षण करावें. त्यानंतर अग्नीची पूजा करून संध्याकाळीं 'अग्नये स्वाहा' व 'प्रजापतये स्वाहा'—या आहुतिमंत्रांनीं दहीं किंवा तांदूळ यांचें हवन करावें. सकाळीं सूर्य व प्रजापति यांना हवन करावें. 'समस्त्व०' या अनुवाकानें सायंकाळीं व सकाळीं—'विभ्राट०'—या अनुवाकानें उपस्थान करावें. हें हवन दह्यादिकांनीं केलें असल्यास संस्रावाचें प्राशन ( शिल्लक राहिलेलें खाऊन टाकणें ) करावें असें सांगितलें आहे. होम लोप झाल्यास १००८ गायत्रीजप करावा. मुख्य काळ चुकल्यास अनादिष्टहोम (म्हणजे अग्नि, वायु, सूर्य, प्रजापति, अग्न्यावरुणौ, अथाअग्नि, वरुण, सविता, विष्णु, विश्वेदेव, मरुत्, स्वर्कवरुण, आदित्य व अदिति यांच्या नऊ देवतांच्या नांवानें नऊ आहुति देण्याचा) करावा.

अथहोमद्रव्याणिव्रीहिश्यामाकयवानांतण्डुलाःपयोदधिसर्पिर्यवव्रीहिगोधूमप्रियंगवःस्वरूपेणापिहोम्याः तिलास्तुस्वरूपेणैव तण्डुलादयः शतसंख्याहस्तेनहोतव्याः दध्यादिद्रवद्रव्यं स्रुवेण सर्वत्रोत्तराहुतिःपूर्वतोभूयसी समिधश्चार्कपलाशखदिरापामार्गपिप्पलोदुम्बरशमीदूर्वादर्भमयादशद्वादशाङ्गुलाःसत्वचः वटप्लक्षबिल्वादिजाहेमाद्रौ होमाहुत्योःसंसर्गे यत्रवेत्थेतिमन्त्रेणाग्नयेसमिद्धोमः नित्यहोमेत्वतिक्रान्तेआज्यंसंस्कृत्यचतुर्गृहीत्वामनोज्योतिर्जुषतामिति जुहुयात् द्वादशदिनपर्यन्तंहोमलोपेइदमेवप्रायश्चित्तम् ततः परमग्निनाशः एवंहोमलोपप्रायश्चित्तंकृत्वातिक्रान्तहोमार्थंद्रव्यंसंस्कृत्यसायंप्रातः क्रमेणद्वेद्वेआहुतीदिनगणनयाजुहुयात् अग्निसूर्यप्रजापतीनुपतिष्ठेत्रवाजुहुयात्प्रायश्चित्तेनचारिताऽर्थात् सूतकादिनाहोमलोपेप्येवम् हिरण्यकेशीयानामप्येवम् आपस्तम्बादीनांत्रिरात्रात्परमग्निनाशोभवतीतिसूतकेपिस्वयंहोमःकार्यःसमारोपोत्तरंसूतकपाते प्रत्यवरोहासंभवेनत्रिरात्रंहोमलोपेपुनराधानम् ॥

**होमद्रव्यें आणि होमनिर्णय**—भात, श्यामाक ( सांवे ) व यव यांचे तांदूळ म्हणजे कोंडा वगैरे काढून टाकलेलें बीं, अथवा—दूध, दहीं, तूप, यव, भात, गहूं, प्रियंगु ( राळे ) हीं सर्व द्रव्यें—त्यांच्यातलीं जीं फोलपटांचीं असतील त्यांच्या वरचीं फोलपटें काढल्यावांचून होमाला घ्यावींत. तीळ मूळ स्वरूपानेंच ( जशाचे तसेच ) द्यावे. प्रत्येक आहुतीला शंभर याप्रमाणें तांदूळ घेऊन हातानेंच आहुति द्याव्या. दहीं वगैरे जीं पातळ द्रव्यें त्यांचें हवन स्रुवापात्रानें करावें. जेथें जेथें म्हणून दोन आहुति एकदम देण्यास सांगितलें असेल, तेथें तेथें नेहमीं पहिलीपेक्षां दुसरी आहुति मोठी घ्यावी. रुई, पळस, खैर, आघाडा, पिंपळ, उंबर, शमी, दूर्वा व दर्भ यांच्या समिधा दहा किंवा बारा बोटें लांबीच्या सालींसकट घ्याव्या. वड प्लक्ष ( अंजीर ) व बेल यांच्याही ( समिधा ) घ्याव्या असें हेमाद्रींत सांगितलें आहे. होमांच्या दोन आहुत्यांचा संसर्ग ( एकमेकींना स्पर्श ) झाल्यास—'अत्रवेत्थ०'—या मंत्रानें अग्नीच्या नांवानें समिधा

होम करावा. रोजचा होम टळल्यास आज्यसंस्कार ( तूप शुद्ध करून ) करून, तें तूप चार वेळां पळींत घ्यावें व–'मनोज्योतिर्जुषतां०'–या मंत्रानें त्याचें हवन करावें. होमलोप बारा दिवस झाला तरी हेंच त्याचें प्रायश्चित्त होय. बारा दिवसांहून अधिक दिवस होमलोप झाल्यास अग्नि विझतो. होमलोपाचें असें प्रायश्चित्त केल्यानंतर, अतिक्रान्त होमासाठीं द्रव्यसंस्कार करावा आणि सन्ध्याकाळीं व सकाळीं –अतिक्रांत दिवसांची संख्या मोजून क्रमानें तितक्या दिवसांबद्दल दोन दोन आहुति अग्नीला द्याव्या व–अग्नि, सूर्य आणि प्रजापति यांचें उपस्थान करावें, किंवा हा होम करूं नये. कारण, प्रायश्चित्त केल्यानें होमाचें फळ मिळतें. सुतक वगैरे प्रसंगीं होमलोप झाल्यासही हाच निर्णय समजावा. आपस्तम्बादिकांचा अग्निनाश तीन दिवसांनन्तर होतो, म्हणून त्यांनीं सुतकादिकांतही स्वतःच होम करावा. अग्नीचा समारोप केल्यानंतर जर सुतक वगैरे येतील, तर प्रत्यवरोह शक्य नसल्यानें, होमलोपाचे तीन दिवस झाल्यावर पुनराधान करावें.

**अथसमस्यहोमः । सायंप्रातर्होमौसमस्यकरिष्ये पूर्ववत्सायंकालहोमान्तंकृत्वापर्युक्ष्यपुनर्द्रव्यंसंस्कृत्यसमिधंप्रक्षिप्यसूर्यप्रजापत्याहुतीर्दत्वाहविष्पांतामित्युपतिष्ठेत् हविष्पांतमितिपञ्चर्चस्यवामदेवः सूर्यवैश्वानरौत्रिष्टुप् नित्यवत्प्रजापत्युपस्थानम् ॥**

**समस्यहोम**—अडचणीमुळें सकाळचा व संध्याकाळचा होम एकदम करण्याला समस्यहोम म्हणतात. अशा प्रसंगीं–'सायंप्रातर्होमौ समस्य करिष्ये' –असा संकल्प करून, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें सन्ध्याकाळच्या होमाचें सर्व कर्म केल्यावर, पर्युक्षण करून, पुन्हा द्रव्यसंस्कार करावा, आणि मग अग्नीला समिध देऊन, सूर्य व प्रजापति यांच्या नांवानें आहुति द्याव्या. त्यानंतर–'हविष्यान्त०' या मंत्रानें उपस्थान करावें तें असें:–'हविष्यान्तमिति पञ्चर्चस्य वामदेवः सूर्यविश्वानरौ त्रिष्टुप्०'–वगैरे जें प्रजापतीचें उपस्थान, तें नित्याप्रमाणेंच करावें.

**अथपक्षहोमः । प्रतिपदि अद्यसायमारभ्यचतुर्दशीसायमवधिकान्पक्षहोमान्तन्त्रेणकरिष्ये सायंतण्डुलान्पात्रद्वयेवृद्धिक्षयानुसारेणचतुर्दशादिवारंगृहीत्वाहोमकालेऽग्नयेस्वाहेतिसर्वान्पूर्वपात्रस्थानेकदैवहुत्वाद्वितीयपात्रस्थान्प्रजापतयेतथैवजुहुयात् एवंद्वितीयायांप्रातरद्यावधिपर्वप्रातरवधिकान्पक्षहोमान्तंत्रेणकरिष्यइत्यादिसायंवत् विशेषस्तुप्रथमपात्रस्थान्सूर्यायस्वाहेति जुहुयात् द्वितीयपात्रस्थान्प्रजापतयेस्वाहेतिहुत्वोभयत्रसमिदेकोपस्थानादिसकृत् पक्षमध्येआपत्प्राप्तौतत्सायंकालाच्चतुर्दशीसायंपर्यंतान्शेषहोमान्सायंपक्षहोमवद्धुत्वापर्वप्रातर्होमान्तान्प्रातर्जुहुयात् सर्वथापर्वसायंहोमःप्रतिपत्प्रातर्होमश्चपृथगेव इतिपक्षहोमशेषहोमौ पक्षमध्येआपन्निवृत्तावपकृष्टाहोमाःपुनःकार्याःसंतन्पक्षहोमत्रयेऽग्निनाशात्तृतीयेपक्षेप्रतिदिनंहोमः सर्वथापन्निवृत्त्यभावेयावज्जीवंपक्षहोमाः ॥**

**पक्षहोम**—पुढें आपत्तिकाल ( अडचणीची वेळ ) येणार असल्याचा संभव असल्यानें प्रतिपदेपासून चतुर्दशीपर्यंतचे चौदा दिवसांचे सकाळचे व संध्याकाळचे होम अपकर्षानें ( थोडक्यांत ) करण्याला पक्षहोम असें म्हणतात. प्रतिपदेला—'अद्य सायमारभ्य चतुर्दशीसायमवधिकान् पक्षहोमान् तन्त्रेण करिष्ये'—असा संकल्प करून, वृद्धि किंवा क्षय असेल त्याप्रमाणें-चौदा, पंधरा किंवा तेरा वेळां तांदूळ घ्यावे आणि 'अग्नये स्वाहा'—या मंत्रानें ते सर्व तांदूळ एकदमच अग्नींत टाकावे. नंतर दुसऱ्या पात्रांत वरच्या इतके घेतलेले तांदूळ—'प्रजापतये स्वाहा'—या मंत्रानें एकदम हवन ( अग्नींत टाकणें ) करावेत. द्वितीयेला—'प्रातरद्यावधिपर्वप्रातरवधिकान् पक्षहोमान् तन्त्रेण करिष्ये'—इत्यादि सायंहोमाप्रमाणें कर्म करावें. या वेळीं पहिल्या पात्रांतले तांदूळ—'सूर्याय स्वाहा'—म्हणून एकदम अग्नींत टाकावेत व दुसऱ्या पात्रांतले तांदूळ 'प्रजापतये स्वाहा'- असें म्हणून एकदमच अग्नींत टाकावेत, हा यांतला विशेष आहे. दोन्ही दिवशीं समिध एकेक वेळच द्यावी व उपस्थानही एकेकच वेळ करावें. पक्षाच्या मध्यें कांहीं विघ्न उपस्थित झाल्यास त्या दिवसाच्या सायंकाळापासून चतुर्दशीच्या सायंकाळापर्यंतचा सर्व शेष होम सायंपक्षहोमाप्रमाणें करून, पर्वाचा प्रातःकाळच्या होमापर्यंतचा होम प्रातःकाळीं करावा. पर्वाचा संध्याकाळचा होम व प्रतिपदेचा सकाळचा होम हे सर्वस्वीं निरनिराळे आहेत. हे अपकर्षानें केलेले पक्षहोम व शेषहोम, पक्षांत आपत्ति टळली तर पुन्हां करावेत. एक सारख्या तीन पक्षहोमांनीं अग्निनाश ( विझणें ) होतो; यास्तव तिसरा पक्षहोम करण्याचा जर प्रसंग आला, तर रोज होम करावा. आपत्ति केव्हांहीं टळणें शक्य नसल्यास, नेहमींच पक्षहोम ( यावज्जीव ) करावेत.

**अथसमारोपः**। अयंतेयोनिरित्यस्यविश्वामित्रोऽग्निरनुष्टुप् अग्निसमारोपेवि० अनेनमंत्रेणहोमोत्तरमरणीमश्वत्थसमिधंवाप्रताप्याग्निसमारोहंतत्रभावयेत् होमादिकालेअरणींनिर्मथ्यप्रत्यवरोहेतिमंत्रेणस्थण्डिलेऽग्निंप्रतिष्ठापयेत् सामत्समारोपेश्रोत्रियागारादग्निंप्रतिष्ठाप्यप्रत्यवरोहेतिमंत्रेणतांसमिधमग्नावादध्यात् सूत्रान्तरेआजुव्हानउद्बुध्यस्वेतिमंत्राभ्यांप्रत्यवरोहणम् प्रत्यहंसमारोपादिद्वादशदिनमेव पर्वणिसायंहोमकालपर्यन्तंप्रत्यवरोहरणाभावेऽग्निनाशइतिकेचित् समारोपप्रत्यवरोहौयजमानकर्तृकावेव तेनसमारोपोत्तरंपर्वण्याशौचप्राप्तौप्रत्यवरोहासंभवादग्निनाशः इदमापस्तम्बादिपरम् आश्वलायनानांतुद्वादशरात्रमध्येपर्वणिप्रत्यवरोहाभावेपनाग्निनाशः किंतुद्वादशरात्रोत्तरंहोमलोपएवेत्यपरे राजक्रान्त्यादिसंकटेऋत्विग्द्वारापिसमारोपादि केचिदृत्विगाद्यभावेनानन्यगतिकत्वे आशौचपातात्पूर्वंपर्वहोमसहितानपिहोमानपकृष्यकृत्वानकृत्वावासमारोपंकृत्वासूतकान्तेप्रत्यवरोहः कार्योनात्रपर्वोल्लङ्घनदोषइत्याहुः ॥

**अग्निसमारोप**—ज्याचा अग्नि असेल त्यानें तो आपला अग्नि अरणींत म्हणजे विस्तव उत्पन्न करण्याच्या ( शमीसारख्या वृक्षाच्या ) लांकडांत किंवा समिधेंत आला आहे अशी जी भावना ( कल्पना ) करणें, त्याला

अग्निसमारोप असें म्हणतात. त्याचा प्रकार येणेंप्रमाणें:—'अयं ते योनिर्ऋ-त्वियः' विश्वामित्रोऽग्निरनुष्टुप् अग्निसमारोपे विनियोगः।'—मंत्रानें होम केल्यावर अरणीची (शमी) किंवा पिंपळाची समिध लावून तींत अग्नि आला अशी भावना करावी. पुन्हां जेव्हां होम करायचा असेल तेव्हां अरणीमंथन (लांकडावर लांकूड घांसून अग्नि पाडणें) करून—'प्रत्यवरोह०' या मंत्रानें स्थण्डिलावर अग्नि स्थापन करावा. समिधेंत अग्नि असल्याचा समारोप केला असल्यास, श्रोत्रियाच्या (वेदज्ञ) घरचा अग्नि आणून त्याची स्थापना करावी व—'प्रत्यवरोह०'—या मंत्रानें ती समिध अग्नीला द्यावी. दुसऱ्या सूत्रांत असें सांगितलें आहे कीं,—'आजुहान०' आणि उद्बुध्यस्व०'—या दोन मंत्रांनीं प्रत्यवरोहण (पुन्हा अग्निस्थापन) करावें. दररोज जो समारोप करायचा तो बारा दिवसच करावा. पर्वदिवशीं संध्याकाळच्या होमापर्यंत जर प्रत्यवरोहण केलें नाहीं तर अग्निनाश होतो असें कोणी ग्रन्थकार सांगतात. समारोप व प्रत्यवरोह—हे दोन्ही यजमानानेंच करायचे असतात, म्हणून समारोप केल्यावर पर्वदिवशीं जर अशौच येईल, तर प्रत्यवरोह करणें अशक्य होतें व त्यामुळें अग्निनाश होतो. हा निर्णय आपस्तम्बादिकांचा आहे. आश्वलायनांच्या अग्नीचा नाश, बारा दिवसांतल्या पर्वदिवशीं जरी प्रत्यवरोह केला नाहीं तरी होत नाहीं. बारा दिवसांनंतर होमलोपच होतो, असें इतर कांहीं ग्रन्थकार म्हणतात. राजक्रांतीसारख्या संकटांच्या वेळीं ऋत्विजादिकांकडूनही समारोपादि कर्म करवावें. ऋत्विजादि कोणी (समारोपादि करण्यास) नसल्यानें अनन्यगति (नाइलाज) झाल्यास अशौच येण्याच्या आधीं पर्वहोमासह सर्व होमांचा अपकर्ष (संक्षेप) करून अथवा न करून समारोप करावा आणि अशौच संपल्यावर प्रत्यवरोह (पुन्हा अग्निस्थापन) करावा. या बाबतींत पर्वोल्लंघनदोष नसल्याचें कांहीं ग्रन्थकार सांगतात.

समारोपोत्तरंदंपत्योःप्रवासेसीमानद्योरुल्लङ्घनकाले उभाभ्यामन्यतरेणवास मिदाद्यन्वारम्भःकार्यः अन्यथाग्निनाशः यजमानस्यैवप्रवासेकृत्यम् अभयं-वोभयंमेस्त्विति अग्निमुपस्थायप्रवासंगच्छेत् ततआगत्यगृहामाबिभीतोपवः स्वस्त्येवोस्मासुचप्रजायध्वंमाचवोगोपतीरिषतिमंत्रेणस्वगृहंनिरीक्ष्यगृहानहंसु-मनसः प्रपद्येवीरघ्नोवीरवतःसुवीरान् । इरांवहंतोघृतमुक्षमाणास्तेष्वहंसुमनाः संविशामीतिगृहंप्रविश्यशिवंशग्मंशयोःशंयोरितिपुनर्गृहाननुवीक्ष्यनित्यहोमान्ते-अभयंवोभयंमस्त्वित्यग्निमुपतिष्ठेत् ज्येष्ठपुत्रशिरःपाणिभ्यांपरिगृह्यअङ्गादंगा-त्संभवसीतिमंत्रंजपित्वामूर्धानंत्रिर्जिघ्रेत् एवमितरपुत्राणांप्रत्तकन्यानांतूष्णीं-जिघ्रेत् प्रवासादागतंप्रतिज्ञातमपिअप्रियंतद्दिनेनवदेयुः ॥

**समारोपोत्तरकर्म**—समारोप केल्यावर नवरा व बायको (दम्पति) प्रवासाला जाऊं लागतांना जेव्हां गांवाची हद्द व नदी यांना उलटून जाण्याचा त्यांना प्रसंग येईल तेव्हां दोघांनीं किंवा एकानें जवळच्या (शेकून घेत) ठेल्या) समिधेला स्पर्श करावा. न केल्यास अग्निनाश (अग्नि विझविण्याचें पाप-

होतो. एकट्या यजमानालाच जर प्रवास करायचा असला तर त्यानें–‘अभयं वोभयं येस्तु०’–या मंत्रानें अग्नीचें उपस्थान करून प्रवासाला निघावें. प्रवासाहून परत आल्यावर–‘गृहा या बिभीतोपवः स्वस्तेवोस्त्वासुच प्रजायध्वं माचवोगोपतीरिषत्’ –या मंत्रानें आपलें घर पाहावें आणि–‘गृहानहं सुमनसः प्रपद्ये वीरघ्नो वीरवतः सुवीरान्। इरां वहन्तो घृतमुक्षमाणास्तेष्वहं सुमनाः संविशामि’–हा मंत्र म्हणून घरांत जावें. मग–‘शिवं शग्मं शंयोः शंयोः’–हा मंत्र तीन वेळां म्हणून पाठीमागें वळून पाहावें. त्यानंतर रोजचा होम केल्यावर–‘अभयं वोभयं येस्तु०’–या मंत्रानें अग्नीचें उपस्थान करावें. थोरल्या मुलाचें डोकें दोन तळहातांत धरून–‘अंगादंगात्सम्भवति०’–हा मंत्र म्हणत तीन वेळां त्याची टाळू हुंगावी. इतर मुलगे व लग्न न झालेल्या कन्या यांच्याही टाळू याप्रमाणेंच मंत्र न म्हणतां हुंगाव्या. स्वतःला जरी कांहीं वाईट गोष्ट माहीत असली, तरी प्रवासांतून आलेल्याला माहीत असल्याची खात्री असल्यासही, ती अप्रिय गोष्ट त्या दिवशीं बोलूं नये.

प्रोषितेपत्यौपत्नीस्मार्तहोमौस्वयंकृत्वादर्शपूर्णमासस्थालीपाकपिण्डपितृयज्ञान्विप्रेणकारयेत् अनुगतप्रायश्चित्तादिपत्न्यारजस्वलायामपिऋत्विक्कुर्यात् पुनःसंधानंतुपत्यौप्रोषितेनभवेत् नैमित्तिकाजातेष्टिगृहदाहेष्टयोपिनभवन्ति प्रायश्चित्तेष्टेःपूर्णाहुतिः ॥

**पत्नीचें स्मार्तहोमकार्य**—नवरा प्रवासांत असतांना पत्नीनें स्मार्तहोम स्वतः करावा व दर्शपूर्णमास, स्थालीपाक आणि पिण्डपितृयज्ञ हीं कर्में ब्राह्मणाकडून करवावींत. अग्निनाशाचें प्रायश्चित्त यजमानीण विटाळशी असतां ऋत्विजानें करावें. पति प्रवासांत असतां पुनःसंधान (पुनः अग्निस्थापन) जसें होत नाहीं तद्वतच नैमित्तिक इष्टि, गृहदाहेष्टि व जातेष्टि आणि प्रायश्चित्तेष्टीची पूर्णाहुति–हीं कर्मेंही होत नाहींत.

अथौपासनाग्न्यनुगमनेगृह्याग्नेरनुगमनप्रायश्चित्तंकरिष्ये इतिसंकल्प्यआयतनस्थं भस्मदूरीकृत्योपलेपादिकृत्वाग्निंप्रतिष्ठाप्याज्यंसंस्कृत्यअयाश्चेतिमंत्रेणैकामाज्याहुतिंसर्वप्रायश्चित्तंच हुत्वादंपत्योरन्यतरेणापरहोमकालपर्यंतमुपोषितेनस्थातव्यम् एवंद्वादशरात्रपर्यन्तम् केचिदुपवासमयाश्चेतिहोमंवाकुर्यात्नद्वयमित्याहुः एतद्वृत्तिकारमतम् केचित्तुपद्यग्न्यनुगमनेहोमकालद्वयातिक्रमस्तदानष्टाग्निसंधानम् तत्रत्रिरात्रमग्निनाशेप्राणायामशतम् ततआविंशतिरात्रमेकदिनोपवासःततआमासद्वयांत्रिरात्रोपवास ततऊर्ध्वंसंवत्सरपर्यन्तं प्राजापत्यकृच्छ्रम् ततःप्रतिवर्षं कृच्छ्रावृत्तिः एवंप्रायश्चित्तं कृत्वाआधानोक्तसंभाराद्यभिधायनष्टस्यगृह्याग्नेःप्रायश्चित्तंकरिष्ये इतिसंकल्प्यायाश्चेत्याज्येनस्रुवाहुतिपत्न्युपवासादिपूर्ववत् लाजाहोमादिकंवा एवंद्वादशरात्रपर्यन्तमग्न्युत्पत्तिरित्याहुः द्वादशदिनोत्तरंविच्छेदप्रायश्चित्तं होमादिद्रव्यदानंचकृत्वाविवाहहोमादिविधिनायथास्वस्वगृह्यंपुनःसंधानम् ॥

**औपासनाग्निनाशप्रायश्चित्त**—औपासनाग्नि विझाला असतां—'गृह्याग्नेरनुगमनप्रायश्चित्तं करिष्ये'—असा संकल्प करून, कुंडांतलें भस्म काढून तें सारवल्यावर त्यांत पुन्हा अग्नि ठेवून त्याला आज्यसंस्कार करावा. 'अयाश्च०'—या मंत्रानें एक आज्याहुति द्यावी व सर्वप्रायश्चित्तहोम करून, दंपतीपैकीं एकानें दुसऱ्या होमकालापर्यंत उपास करावा. बारा रात्रीपर्यंत अग्नि विझाला असला तर हा निर्णय समजावा. उपास किंवा—'अयाश्च०'—या मंत्रानें होम यांपैकीं कोणचें तरी एक करावें. हीं दोन्हीही न करण्याबद्दल कांहीं ग्रंथकार जें सांगतात, तें वृत्तिकाराचें (सिद्धान्तरूप अर्थनिष्पत्ति करणारा) मत आहे. कोणी ग्रंथकार असें सांगतात कीं,—अग्निनाशानंतर दोन होमकालांची जर वेळ टळेल, तर विझालेला अग्नि पुन्हां पेटवावा ( सन्धान करावें ). तीन दिवस अग्निनाश झाल्यास शंभर प्राणायाम करावेत. वीस दिवसांच्या अग्निनाशाला एक दिवस उपास करावा. दोन महिन्यांच्या अग्निनाशाला तीन दिवस उपास करावा. एक वर्षाच्या नाशाला प्राजापत्यप्रायश्चित्त करावें. दरवर्षाबद्दलच्या अग्निनाशार्थ प्राजापत्यकृच्छ्र करावें. अशा-तऱ्हेचीं योग्य तीं प्रायश्चित्तें केल्यावर, अग्न्याधानाच्या तयार केलेल्या सामुग्रीनें —'नष्टस्य गृह्याग्नेः प्रायश्चित्तं करिष्ये'—असा संकल्प केल्यावर—'अयाश्च०'—या मंत्रानें तुपाच्या आहुति स्रुवापात्रानें द्याव्या, पत्नीनें उपास करावा वगैरे सर्व पूर्वीं सांगितल्याप्रमाणें करावें. अशा प्रकारानें बारा रात्रींपर्यंत अग्नीची उत्पत्ति करावी, असें म्हणतात. बाराहून अधिक दिवस असल्यास विच्छेदाचें ( नाशाचें ) प्रायश्चित्त व होमद्रव्याचें दान—हीं करून, विवाहहोमाच्या विधीनें आपल्या गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणें पुनःसन्धान ( पुनः अग्नि निर्माण करणें ) करावें.

अथान्वाहिताग्नेः प्राक्यागादनुगतौअयाश्चेतिपूर्ववदग्निमुत्पाद्यपुनरन्वाधानंकृत्वाभूर्भुवः स्वरित्युपस्थायसर्वप्रायश्चित्तंहुत्वास्थालीपाकंकुर्यात् अन्वाधानोत्तरंप्रयाणप्राप्तौ तुभ्यंताअंगिरस्तमइत्याज्याहुतिमग्नयेहुत्वासर्वप्रायश्चित्तंहुत्वाग्निंसमारोप्यगच्छेत् समारूढसमिन्नाशेपुनराधेयमिष्यते । उपलेपादिकंकृत्वानष्टाग्निप्रायश्चित्तंपुनराधेयंसंकल्प्यआधानोक्तसंभाराग्निधायाग्निंप्रतिष्ठाप्यअयाश्चेतिस्रुवाज्याहुतिंसर्वप्रायश्चित्तंचजुहुयादितिपुनराधेयम् स्वाग्निभ्रमेणान्याग्नौस्वयंयजनेस्वाग्नावन्ययजमेवावापथिकृत्स्थालीपाकंकरिष्यइतिसंकल्प्यचरुःकार्योथवापथिकृत्स्थाने पूर्णाहुतिंहोष्यामीति संकल्प्यस्रुचिद्वादशवारंचतुर्वारंवाज्यंगृहीत्वाअग्नयेपथिकृतेस्वाहेतिजुहुयात् विवाहोत्तरमाधानोत्तरंवापौर्णमास्यांस्थालीपाकारम्भः प्रतिपदियागोतिक्रान्तश्चेदागामिपर्वपूर्वातिथिषुचतुर्थीनवमीचतुर्दशीद्वितीयापञ्चम्यष्टमीर्विहायकार्यः नात्रकालातिक्रमप्रायश्चित्तम् अन्वाधानोत्तरंप्रतिपदीष्ट्यकरणेतृतीयादितिथिषुसर्वप्रायश्चित्तंहुत्वापुनरन्वाधाययागः द्वितीयपर्वप्राप्तौअतीतेष्टिः पथिकृच्चरुपूर्वकंपर्वणिकार्या तत्राप्यतिक्रमेद्वितीयप्रतिपदिलुप्तेष्टेः पादकृच्छ्रंकृत्वाप्राप्तकालयागः द्वितीययागस्यापिआगामितिथिषुलोपेतत्पर्वणिपादकृच्छ्रपथिकृत्पूर्वकंद्वितीययागः तत्राप्यतिक्रमेतृ-

तीयप्रतिपदिअर्धकृच्छ्रंयागद्वयस्यकृत्वाप्राप्तयागः तृतीययागस्योक्तौथावर्धकृच्छ्रपथिकृत्पूर्वकंचतुर्थपर्वणिवाअकरणेअग्निनाशात्पुनराधेयम् अत्रपुनराधेयस्वरूपंसंभारनिधानपूर्वकमयाश्चेतिस्रुवाज्याहुत्यातारित्यन्वारूढसमिन्नाशस्थलेउक्तमेव पुनराधानंतुविवाहहोमादिरूपं पुनराधेयाद्भिन्नम् आयतनाद्बहिःशम्यापरासात्प्राक्वह्निपातेइदंतएकमित्यृचातमायतनेप्रक्षिप्यसर्वप्रायश्चित्तंजुहुयात् पर्वणिव्रतलोपेअग्नयेव्रतपतयेचरुःपूर्णाहुतिर्वा पर्वणिदंपत्योरन्यतराश्रुपातेअग्नयेव्रतभृतेचरुःपूर्णाहुतिर्वापवित्रनाशेऽग्नयेपवित्रवतेचरुः पूर्णाहुतिर्वाअन्वाधानेष्टिमध्येचन्द्रग्रहणे अत्राहगोरितिचन्द्रायाज्यंहुत्वानवोनवोइत्युपस्थायेध्माधानादियागः सूर्योपरागेउद्वयमितिसूर्यायाज्यंहुत्वाचित्रंदेवानामित्युपस्थानम् अन्वाधानोत्तरं स्वप्नेरेतोविसर्गेइमंमेवरुणतत्वायामीतिवरुणायद्वेआज्याहुतीरविपूजापुनर्मामैतिसौत्रमन्त्रयोर्जपश्चबुद्ध्यारेतोविसर्गेग्निव्रतपतिचरुःअन्यदास्वप्नेरेतोविसर्गेसूर्यनमस्कारत्रयम् इध्माधानोत्तरंहविर्दोषदुष्टस्थानेआज्यंप्रतिनिधिंकृत्वायागंसमाप्यदुष्टंजलेत्यक्त्वान्वाधानादिस्तद्देवताकः पुनर्यागइध्माधानात्पूर्वं हविर्दोषेतद्देवताकंहविःपुनरुत्पाद्ययागस्विष्टकृदर्थहविर्दोषेआज्येनस्विष्टकृतंकुर्यात् अङ्गहविर्दोषेतदाज्यंपुनरुत्पादयेत् ॥

**अन्वाधानाग्निनाशप्रायश्चित्त**—यागाच्या आधीं अन्वाधान केलेल्या अग्नीचा नाश झाल्यास—'अयाश्च०'—या मंत्रानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अग्नि उत्पन्न करून पुन्हा अन्वाधान करावें आणि-'भूर्भुवः स्वः०'—हें उपस्थान केल्यावर मग सर्वप्रायश्चित्ताहुति देऊन स्थालीपाक करावा. अन्वाधानानंतर जर प्रवासाला जाण्याचा प्रसंग आला तर 'तुभ्यन्ता अंगिरस्तम०'—या मंत्रानें अग्नीला आज्याहुति देऊन प्रायश्चित्ताहुति द्यावी आणि अग्नीचा समारोप करून प्रयाण (जाणें) करावें. समारोप केलेली समिध नष्ट झाल्यास पुन्हा आधान करणें जरूर आहे. कुंड सारवणें झाल्यावर नष्टाग्नीच्या प्रायश्चित्ताचा व पुनराधानाचा संकल्प करून, आधानासाठीं लागणाऱ्या सामग्रीनें अग्नीची स्थापना (मांडणी) करावी. 'अयाश्च०' या मंत्रानें स्रुवेनें तुपाची आहुति व सर्व प्रायश्चित्ताहुति द्यावी. असें पुनराधान करावें. दुसऱ्याचा अग्नि आपलाच असल्याच्या भ्रमानें त्याचें जर यजन (यज्ञ) केलें, तर किंवा आपल्या अग्नीवर दुसऱ्याचा यज्ञ केला तर—'पथिकृत्स्थालीपाकं करिष्ये'—अशा संकल्पानें चरु (भात) करावा किंवा—'पथिकृत्स्थाने पूर्णाहुतिं होष्यामि'—असा संकल्प करून, स्रुवापात्रांत बारा किंवा चार वेळां तूप घ्यावें आणि—'अग्नये पथिकृते स्वाहा' या मंत्रानें आहुति द्यावी. लग्नानंतर किंवा आधानानंतर पौर्णिमेला स्थालीपाकाला आरंभ करावा. प्रतिपदेला वेळेवर त्याग करणें टळल्यास जवळच्याच पर्वतिथीवर, चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, द्वितीया, पञ्चमी आणि अष्टमी या तिथि वर्ज्य करून —करावा. या कालातिक्रमाला प्रायश्चित्त नको. अन्वाधानानंतर प्रतिपदेची इष्टि न केल्यास तृतीयेला सर्व प्रायश्चित्ताहुति देऊन पुन्हा अन्वाधानयाग करावा. करायची

राहिलेली इष्टि दुसरें पर्व आल्यास–पथिकृत्स्थालीपाक आधीं करून मग ती त्या पर्वावर करावी. त्याहीं वेळीं करणें टळल्यास पुढच्या प्रतिपदेला लुप्त (टळलेली) झालेल्या इष्टीचें पापकृच्छ्रप्रायश्चित्त करून प्राप्तकालयाग करावा. पुढच्या तिथीवरही जर यागाचा लोप झाला, तर त्या पर्वदिवशीं पापकृच्छ्र व पथिकृत्स्थालीपाक हीं कर्में करून दुसरा याग करावा. त्या वेळींही जर अतिक्रम झाला तर प्रतिपदेला दोन यागांबद्दल अर्धकृच्छ्र करून (प्राप्त) याग करावा. उक्त (सांगितलेल्या) तिथीला अर्धकृच्छ्र व पथिकृत्स्थालीपाक हीं आधीं करून तिसरा याग जर केला नाहीं, तर अग्निनाश होतो; यास्तव जें पुनराधान करावें, त्यांत सामुग्री मिळविल्यावर–'अयाश्च०'–या मंत्रानें स्रुवापात्रानें तुपाची आहुति द्यावी. अशा अन्वाधान केलेल्या समिधेचा नाश झाल्यास काय करावें तें पूर्वीं सांगितलेंच आहे. पुनराधान हें विवाहाग्निहोमरूप असून, पुनराधेयाहून निराळें आहे. कुण्डाच्या बाहेर छत्तीस बोटांच्या अंतराच्या आंत जर अग्नि पडला, तर–'इदन्त एकं०'–या ऋचेनें तो अग्नि कुण्डांत ठेवून सर्व प्रायश्चित्ताहुति द्यावी. पर्वदिवशीं व्रतलोप झाल्यास व्रतपति जो अग्नि त्याला पूर्णाहुति द्यावी. पर्वदिवशीं दंपतीपैकीं कोणाच्या डोळ्यांतून अश्रु गळल्यास व्रतस्वामि जो अग्नि त्याला चरु किंवा पूर्णाहुति द्यावी. पवित्राचा नाश झाल्यास पवित्रस्वामी जो अग्नि त्याला चरु किंवा पूर्णाहुति द्यावी. अन्वाध्वनेष्टींत चन्द्रग्रहण आल्यास–'अत्राहगो०'–या मंत्रानें चन्द्राला आज्याहुति देऊन,–'नवो नवो०'–या मंत्रानें उपस्थान करावें आणि इध्माधानादि याग करावा. सूर्यग्रहण आल्यास–'उद्वयं०'–या मंत्रानें सूर्याला आज्याहुति देऊन–'चित्रं देवानां०' –या मंत्रानें उपस्थान करावें. अन्वाधानानंतर स्वप्नावस्था (स्वप्नांत रेतोत्सर्ग) झाल्यास–'इमं मे वरुण०'–आणि 'तत्त्वायामि०' या दोन मंत्रांनीं वरुणाला दोन आज्याहुति देऊन, रवीची पूजा करावी आणि–'पुनर्मामा०'–या सूर्यमंत्राचा जप करावा. जाणून रेतोत्सर्ग झाल्यास व्रतपति अग्नीला चरु द्यावा. इतर प्रसंगीं जर स्वप्नांत धातुपात झाला, तर सूर्याला तीन नमस्कार करावे. इध्माधानानंतर जर हविर्दोष उत्पन्न झाला, तर दोषाच्या जागीं तुपाला प्रतिनिधि करून याग संपविल्यावर दोषयुक्त असणारें हविर्द्रव्य पाण्यांत टाकून देऊन, अन्वाधानापासून त्याच देवतेच्या नांवानें पुन्हा याग करावा. इध्माधानापूर्वीं हविर्दोष उत्पन्न झाल्यास त्याच देवतेचा हवि पुन्हा आणून याग करावा. स्विष्टकृताच्या हविर्द्रव्यांत दोष आढळल्यास तुपानेंच स्विष्टकृत करावें. अंगाच्या हविर्द्रव्याला दोष झाल्यास नवें तूप घ्यावें.

**हविर्दोषास्तु । प्रच्युतनखकेशैःकीटैरक्तास्थिविण्मूत्रश्लेष्माद्यैर्बीभत्सितैश्च-मार्जारनकुलकाकैर्मुखजलबिन्दुघर्मनासिकामलाश्रुकर्णमलैः सूतिकारजस्वला-चाण्डालादिदृष्टिभिश्चसंसर्गाः देवताहविर्मन्त्रादिविपर्यासेयद्वोदेवाइतिमरुद्भ्य-आज्यहोमः कृत्स्नहविर्दाहेतद्धविरुत्पाद्यसएवयागोनतुपुनर्योगः पूर्वादिचतुर्दि-क्षुचरूत्सेके अग्नयेयमायवरुणायसोमायेतिक्रमेणहुत्वासर्वतउत्सेकेचतुर्भ्योपि-**

हुत्वाकोणेषूत्सेकेव्याहृतीर्हुत्वाचरुमाप्यायस्वसंतेपयांसीतिमन्त्राभ्यामाज्येना-प्याययति अग्नौमिन्दाहुतीचद्वेइतिकेचित् स्वगृह्याग्नेरन्यगृह्याग्निनासंसर्गेउभौ-यजमानौयुगपत्तमग्निंसमारोप्योभौप्रत्यवरोहणंकृत्वाऽग्नयेविविचयेचरुंकुर्याताम् शवाग्निनासंसर्गेऽग्नयेशुचयेचरुः पचनाग्निनासंसर्गेसंवर्गायाग्नयेचरुः सर्वत्रसं-सर्गे समारोपप्रत्यवरोहणोत्तरंचरुः स्वयमग्निप्रज्वलनेउद्दीप्यस्वजातवेदो० । मानोहिंसीर्जातवेदोगामश्वंपुरुषंजगत् । अबिभ्रदग्नआगहिश्रियामापरिपातये-तिद्वाभ्यां द्वेसमिधावग्नयेजुहुयात् सर्वत्रविध्यपराधेसाङ्गतार्थंसर्वप्रायश्चित्तम् गृहदाहेग्नयेक्षामवतेचरुः एवमन्यान्यपिप्रायश्चित्तानिबव्हृचब्राह्मणादिषूक्ता-निज्ञेयानि यत्रतुप्रायश्चित्तविशेषोनोक्तस्तत्रसर्वप्रायश्चित्तम् भूर्भुवःस्वरित्यने-नाज्याहुतेःसर्वप्रायश्चित्तसंज्ञा ॥

**हविर्द्रव्यदोष**—तुटलेलीं नखें, केस, कीटक, रक्त, अस्थि, गू, मूत, शेंबूड वगैरे घाणेरडे ( बीभत्स ) पदार्थ, मांजर, मुंगूस, कावळा, थुंकी, घाम, नाकांतलें पाणी ( मेकडें वगैरे ), कानांतला मळ आणि बाळंतीण, विटाळशी, चाण्डाळ यांची दृष्टि—या सर्वांचा संसर्ग ( स्पर्श ) हेच ते सर्व दोष होत. देवता, हविर्द्रव्य आणि मंत्र यांचा विपर्यास ( उलटें सुलटें ) झाल्यास—'यद्वो देवा०'—या मंत्रानें मरुदेवांना आज्यहोम करावा. सर्व हविर्द्रव्य जळून गेल्यास, तें सर्व पुन्हां तयार करून, तोच याग करावा. येथें पुन्हा दुसरा याग करायचा नाहीं. पूर्व वगैरे, चारी दिशांस चरूचा विस्कलितपणा ( उत्सेक ) झाल्यास, त्या चारी दिशांना अनुक्रमें—अग्नि, यम, वरुण व सोम यांना आहुति द्यावी. सर्व बाजूंना उत्सेक झाल्यास चारी देवतांना आहुति द्यावी. चार कोसांवर उत्सेक झाल्यास व्याहृतिहोम करून—'आप्यायस्व०' आणि 'सन्ते पयांसि०'--या दोन मंत्रांनीं तुपांत भात ( चरु ) बुडवून त्याच्या दोन मिन्दाहुति ( जोडीच्या दोन मिळून एक ) अग्नीला द्याव्या, असें कोणी ग्रन्थकार सांगतात. आपल्या गृह्याग्नीचा दुसऱ्याच्या गृह्याग्नीस स्पर्श झाल्यास, दोघांनींही अग्नीचा एकदम समारोप करून, प्रत्यवरोहण ( पुनःस्थापना ) करावें, आणि विविचि नांवाच्या अग्नीच्या नांवानें चरु करावा. पाकाग्नीला स्पर्श झाल्यास संवर्गनांवाच्या अग्नीसाठीं चरु करावा. सर्वत्रच स्पर्श ( दोष ) झाल्यास अग्नीचा समारोप व प्रत्यवरोहण करून, मग चरु करावा. अग्नि जर आपोआप प्रदीप्त झाला, तर—'उद्दीप्य स्व जातवेदो०' आणि 'मानो हिंसीर्नोजा-तवेदो गामश्वं पुरुषं जगत् । अबिभ्रदग्न आगहि श्रिया मा परिपातये ।'--या दोन मंत्रांनीं अग्नीला दोन समिधा द्याव्या. सर्व विधींतच जर घोंटाळा उडाला असेल तर, अनुष्ठानाची सांगता ( अंगिकारलेलें काम पुरें होण्यासाठीं ) व्हावी येवढ्यासाठीं सर्व प्रायश्चित्ताहुति द्यावी. घर जळाल्यास क्षामवत् नांवाच्या अग्नीसाठीं चरु करावा. इतर दोषांचीं प्रायश्चित्तें ऋग्वेदाच्या ब्राह्मणांत जीं सांगितलीं आहेत, तीं पाहावींत. जेथें विशेष असें प्रायश्चित्त सांगितलें नाहीं, तेथें सर्वप्रायश्चित्ताहुति

द्यावी. 'भूर्भुवः स्व०' या मंत्रानें आहुति देण्याच्या कर्माला सर्वप्रायश्चित्ताहुति असें नांव आहे.

अथाग्न्युपघातनिमित्तानि श्वशूकररासभकाकसृगालमर्कटशूद्रान्त्यजपतितकुणपसूतिकारजस्वलाभिः पुरीषमूत्ररेतोश्रुपूयश्लेष्मशोणितास्थिमांसादिभिरन्यैर्वाजुगुप्सितैरारोपितारणि स्पर्शेऽग्नेःस्पर्शेवाऽग्निनाशः तत्रारणिगतेवह्नौनष्टेपुनराधेयमग्नेःस्पर्शेपुनराधानम् यद्वा पुनस्त्वादित्यारुद्रावसवः समिन्धतांपुनर्ब्रह्माणोवसुनीथयज्ञैः। घृतेनत्वंतन्वंवर्धयस्वसत्याःसन्तुयजमानस्यकामाः स्वाहा। आदित्यरुद्रवसुब्रह्मभ्यइदंनममेतिसमिद्धोमःस्रुवेणाज्याहुतिर्वा अग्नौ जलोपघातेपीदमेव स्वस्यजीविनोमृतशब्दश्रवणेऽग्नयेसुरभिमतेचरुःपूर्णाहुतिर्वा प्रधानाहुतीनांस्विष्टकृतासंसर्गेसर्वप्रायश्चित्तम् पिण्डपितृयज्ञे अतिप्रणीतनाशे तत्राहोमपक्षेसर्वप्रायश्चित्तम् होमपक्षेपुनःप्रणयनमपि आपस्तम्बानांप्रायश्चित्तान्तेप्रणयनमेवनित्यम् पिण्डपितृयज्ञलोपेवैश्वानरश्चरुः सप्तहोत्राख्यमहाहविर्होतेत्यादिमंत्रैःपूर्णाहुतिर्वा श्रवणाकर्मसर्पबल्याश्वयुज्याग्रयणप्रत्यवरोहणकर्मणामन्यतमलोपेप्राजापत्यकृच्छ्रम्। अकृताग्रयणस्यनवान्नभक्षणेऽग्नयेवैश्वानरायचरुःअष्टकालोपेउपवासः पूर्वेद्युःश्राद्धलोपेऽप्युपवासःउपवासप्रत्याम्नायपक्वविप्रभोजनंवाअन्वष्टक्यालोपेपश्विर्घृभिःसुमनापश्भिरिंदुभिरितिऋचः शतंजपः सर्वत्रचरुस्थानेपूर्णाहुतिः दर्शपूर्णमासानारम्भे आलस्यादिनापूर्णाहुतिकरणेतुयागपर्याप्तव्रीह्याज्यंदेयमितिगृह्याग्निसागरे निषिद्धतिथ्यादौस्वभार्यागमनेअयाज्ययाजने लशुनादिगणिकाद्यभोज्यभोजनेनिषिद्धप्रतिग्रहेपुनर्मामैत्विन्द्रियं• इमेयेधिष्ण्यासइतिद्वाभ्यामाज्यहोमःसमिद्धोमोवाजपोवा गृहोपरिकपोतोपवेशनेदेवाःकपोतइति पञ्चर्चसूक्तजपःप्रत्यृचमाज्यहोमोवापाकयज्ञतंत्रेण दुःस्वप्नदर्शनेयोमेराजन्युज्योवेतिऋचासूर्योपस्थापनम् आतुरत्वनाशाययक्ष्मरोगनाशायवामुञ्चामित्वेतिसूक्तेनप्रत्यृचंचरोर्होमः यक्ष्मनाशायेदंनममेतिपञ्चसुत्यागः षष्ठंस्विष्टकृदिति प्रोक्षणीप्रणीतास्थजलानांबिन्दुपातेस्रावेवाआपोहिष्ठेतितृचेनपुनःपूरणम् ततंमेअपस्तदुतायतेइत्यृचाज्याहुतिः इध्माधानलोपेतस्याज्यभागोत्तरं स्मरणेविपर्यासप्रायश्चित्तंकृत्वेध्माधानंचकृत्वाप्रधानयागः प्रधानयागोत्तरं स्मरणेग्निसमिन्धनरूपद्वारस्याभावाल्लोपएवेतिप्रायश्चित्तेनैवासिद्धिः अन्याङ्गेष्वप्येवमूह्यम्॥

**अग्न्युपघातनिमित्तें व त्यांचीं प्रायश्चित्तें**—कुत्रें, डुकर, गाढव, कावळा, कोल्हा, माकड, शूद्र, अंत्यज (चाण्डाल), बाटलेला, प्रेत, बाळंतीण, विटाळशी, गू, मूत, रेत (सजीव धातु), अश्रु, पू, शेंबूड, रक्त, हडुक, मांस, इत्यादि व इतर कोणच्याही घाणरड्या वस्तूचा, ज्या अरणीवर अग्नीचा समारोप केला असेल त्या अरणीला (विस्तव उत्पन्न करण्याच्या लांकडाला) किंवा अग्नीला स्पर्श झाल्यास अग्निनाश (दूषिताग्नि) होतो. अरणीवरच्या अग्नीचा (अशा तऱ्हेनें) नाश झाल्यास पुनराधेय (पुन्हा अरणीवरील

अग्निस्थापन ) करावें. प्रत्यक्षच अग्निस्पर्शानें अग्निनाश झाल्यास पुनराधान करावें, किंवा–'पुनस्त्वादित्या रुद्रा वसवः समिन्धतां पुनर्ब्रह्माणो वसुनीथ यज्ञैः । घृतेन त्वं तन्वं वर्धयस्व सत्याः सन्तु यजमानस्य कामाः स्वाहा । आदित्यरुद्रवसुब्रह्मभ्य इदं न मम । '–या मंत्रानें समिधाहोम करावा, अथवा स्रुवापात्रानें आज्याहुति द्यावी. अग्नींत पाणी पडल्यासही हेंच प्रायश्चित्त करावें. स्वतः जिवंत असतां, स्वतःची मृत्युवार्ता ऐकल्यास सुरभिमान् अग्नीच्या नांवानें चरु किंवा पूर्णाहुति द्यावी. मुख्य आहुतींचा स्विष्टकृताला स्पर्श झाल्यास सर्वप्रायश्चित्ताहुति द्यावी. पिण्डपितृयज्ञांत अतिप्रणीत नांवाच्या अग्नीचा नाश झाल्यास होमपक्ष नसेल तर, सर्वप्रायश्चित्ताहुति द्यावी. व होमपक्ष असल्यास पुन्हां अग्नि नेऊन (प्रणयन) सर्व प्रायश्चित्ताहुति द्यावी. आपस्तम्बांना प्रायश्चित्ताहुतीनंतर प्रणयनच जरूर आहे. पिण्डपितृयज्ञाचा लोप झाल्यास वैश्वानरचरु करावा, किंवा–'सप्तहोत्राख्य महाहविर्होता०'–या मंत्रानें पूर्णाहुति द्यावी. श्रवणाकर्म, सर्पबलि, अश्वयुजीकर्म, आग्रयण आणि प्रत्यवरोहण–यांपैकीं कोणत्याही एका कर्माचा लोप झाल्यास प्राजापत्यकृच्छ्रप्रायश्चित्त करावें. आग्रयण करण्याच्या आधीं नवान्न ( नवें धान्य ) भक्षण केल्यास वैश्वानर नांवाच्या अग्नीला चरु द्यावा. अष्टकाश्राद्धाचा लोप झाल्यास उपास करावा, व पूर्वेद्युःश्राद्धाचा लोप झाला असतांही उपासच करावा, किंवा उपासाचा प्रतिनिधि म्हणून एका ब्राह्मणाला भोजन द्यावें. अन्वष्टक्यश्राद्धाचा लोप झाल्यास–'एभिर्द्युभिः सुमना एभिरिन्दुभिः'–या ऋचेचा शंभर वेळां जप करावा. जेथें जेथें म्हणून ( अग्नीला चरु ) भात द्यावा, असें सांगितलें असेल तेथें तेथें, दर्शपूर्णमासाला आरंभ केला नसल्यास, पूर्णाहुति द्यावी. अमावास्यादिकांमुळें पूर्णाहुति करणें असल्यास यागाला पुरतील इतके तांदूळ व तूप यांचें दान ( दुसऱ्यास ) करावें, असें गृह्याग्निसागरांत सांगितलें आहे. निषिद्ध तिथीवर केलेलें स्वभार्यागमन, अयोग्याच्या घरीं याग करणें, लसूण खाणें, रांडेच्या घरचें अन्न जेवणें, निषिद्ध दान घेणें वगैरे पातकें घडल्यास–'पुनर्मामैत्विन्द्रियं०' आणि 'इमे ये धिष्ण्यासः०'–दोन ऋचांनीं आज्यहोम, समिधाहोम अथवा जप–यांपैकीं जमेल तें करावें. घरावर कपोत ( कबूतर, पारवा ) बसल्यास–'देवाः कपोत०'–वगैरे पांच सूक्तांचा जप करावा, किंवा पाकयज्ञतंत्रानें या प्रत्येक ऋचेचा आज्यहोम करावा. वाईट स्वप्न पडल्यास 'यो मे राजन्युज्यो वा०'–या ऋचेनें सूर्याचें उपस्थान करावें. रोगनाश होण्यासाठीं–'मुञ्चामि त्वा०'–या सूक्तांतल्या प्रत्येक ऋचेनें चरुहोम करावा, आणि–'यक्ष्मनाशायेदं न मम ।' असें पांची ऋचांचे शेवटीं म्हणून आहुति देऊन, सहावी स्विष्टकृताची द्यावी. प्रोक्षणी व प्रणीता या पात्रांतल्या पाण्याचा एक थेंब जरी खालीं पडला किंवा सर्वच पाणी सांडलें, तर 'आपोहिष्ठा०'–या तीन ऋचांनीं पुन्हा पाण्यानें तीं पात्रें भरावींत आणि–'ततं मे अपस्तदुताय ते०'–या ऋचेनें आज्याहुति द्यावी. इध्माधानाचा लोप झाल्यास आज्यभाग झाल्यावर जर त्याची आठवण होईल, तर अग्निसमिन्धनरूप मार्गाच्या

अभावामुळें तो लोपच होतो व त्याची सिद्धि प्रायश्चित्तानेंच होते. इतर अंगांविषयींही ह्याच निर्णय समजावा.

अथाग्निनाशकानि । दम्पत्योरन्यतरोऽग्निसमीपेउदयास्तमयकालेवसेत् उभौदंपतीगृहसीमांग्रामसीमांवानदींवोल्लङ्घ्यहोमकालेबहिर्वसेतांनदापुनराधानम् अग्नीनामजस्रहरणेशम्याप्रासात्प्रागुच्छ्वासऽग्निनाशः कर्मार्थहरणेऽग्नीनांनानुच्छ्वासादिचोद्यते आत्मसमारोपणपक्षेऽप्सुमज्जनेमैथुनेशूद्रादिस्पर्शनेऽग्निनाशः पत्न्यनेकत्वेपिएकस्यामपिहोमकालेगृहसीम्नोबहिर्गतायामग्निनाशः ॥

**अग्निनाशनिमित्तें**—सूर्योदय व सूर्यास्त या दोन्ही वेळीं दम्पतीपैकीं ( नवरा किंवा बायको ) एकानें अग्नीजवळ बसावें. दोघांनींही जर होमाच्या वेळीं घराबाहेर किंवा गांवाबाहेर अथवा नदीच्या पलीकडे गेलीं असलीं तर पुनराधान करावें. कुण्डांतला सर्व अग्नि बाहेर काढून नेतांना त्यावर जर उच्छ्वास ( शम्याप्रास ) पडला, तर अग्निनाश ( दूषिताग्नि ) होतो. कांहीं कामासाठीं विस्तव नेत असतां त्यावर उच्छ्वास पडल्यास त्याचा दोष नाहीं. अग्नि-समारोप करणाऱ्यानें स्वतः पाण्यांत बुडी मारणें, मैथुन करणें व शूद्रादिकांस शिवणें —हीं कर्में केलीं असल्यासही अग्नि अपवित्र ( अग्निनाश ) होतो. अनेक बायका ( पत्नी ) असतां त्यांपैकीं एकही जरी होमाच्या वेळीं घराबाहेर गेलेली असली, तरी अग्नि भ्रष्ट होतो.

ज्येष्ठायामग्निसमीपस्थायांकनिष्ठयासहयजमानप्रवासोनदोषाय । दंपती-उभावपिग्रामगृहयोःसीम्नोबहिर्नेत्वा होमकालात्पूर्वमागतौचेन्नदोषः। यजमाने-ऽग्निसमीपस्थेपिहोमकालेपत्न्याग्रामान्तरस्थितौपुनराधानमाहुः । प्रवासेऽन्य-तरेणसमारूढाग्निरन्वारम्भासत्वेनदीसीम्नोरुल्लङ्घने पुनराधानम् । अग्निंविहाय-यजमानस्यशतयोजनगमनेवर्षपर्यन्तंस्वयंहोमाभावेवाग्निनाशः । तत्रपुनरा-धानंपवित्रेष्टिर्वा । विनाग्निभिर्यदापत्नीनदीमम्बुधिगामिनीम् । अतिक्रमेत्तदा-ग्नीनांविनाशः स्यादितिश्रुतिः ॥ १ ॥ अग्निसमीपेपत्यौपत्न्यन्तरेवापत्न्यानदी-लङ्घनेदोषोन पतिप्रवासपत्न्याअग्निभिः सहसीमोल्लङ्घनेऽग्निनाशः । एवं-पत्युरपिपत्नीप्रवासे जलेनहेतुनाग्निरुपशायान्तश्चेत्पुनराधेयम् । तदेवपुनराधे-यमग्नावनुगतेसति । असमाधायचेत्स्वामीसीमामुल्लङ्घ्यगच्छति ॥ १ ॥ समारोपणविनाशम्यापरासादूर्ध्वमग्नीनांहरणनाशः रजोदोषेमृतप्रसूतके-मृतकेपिवा प्रवसन्नाग्निमान्विप्रःपुनराधानमर्हति ॥ ॥ बव्हीनामपिचैकस्याः सुर-क्याः ... नतुव्रजेत् । एकादशेचतुर्थेन्हिगन्तुमच्छेद्ग्राममतनः ॥ २ ॥ नचाग्नि-होम... लायांप्रवसेन्नचपर्वणि । होमद्वयात्ययदर्शपूर्णमासात्ययेपुनराधेयमाप-स्तम्बादिविषयम् । पचनाग्नौपचेदन्नंसूतकेमृतकेपिवा । अपक्त्वातुवसेद्रात्रिंपुन-राधानमर्हति ॥ १ ॥ इदंकात्यायनादपरम् । पत्नीप्रवासेपुनराधानमुक्तं ... के-भार्यस्य बहुभार्यस्यतुज्येष्ठाप्रवासएवपुनराधानमितिकेचित् एतन्निमित्तेषुस्थ-

तानग्नीनुत्सृज्यान्येषामाधानम् । आरादुपकारकाङ्गलोपेकर्मसमाप्तेः प्राक्प्रायश्चित्तंकृत्वादङ्गंकुर्यात् । कर्मसमाप्तौप्रायश्चित्तमेवनाङ्गवृत्तिः । सन्निपत्योपकारकाङ्गस्यद्रव्यसंस्काररूपस्यलोपेप्रधानात्प्राक्तत्कार्यम् । प्रधानोत्तरंप्रायश्चित्तमेवनावृत्तिः

**पतिपत्नींचें अग्निकार्य**—थोरली बायको घरांत अग्नीजवळ असतांना, नवरा व धाकटी बायको अशीं दोघेंजण जरी प्रवासाला गेलीं तरी दोष नाहीं. नवरा व बायको अशीं दोघेंही जरी घराच्या अथवा गांवाच्या हद्दीबाहेर जाऊन होमाच्या वेळेच्या आधीं घरीं परत येतील तरी त्यांत दोष नाहीं. यजमान एकटाच अग्नीसमीप असतां त्याची पत्नी जर परगांवीं असेल, तर पुनराधान करण्यास सांगितलें आहे. नवराबायकोपैकीं कोणीही जरी समारूढ अग्नीला स्पर्श न करील, किंवा नदी व सीमा यांचें उल्लंघन करील तरी पुनराधान करावें. अग्नीपासून यजमान शंभर योजनांपलीकडे जाईल किंवा एक वर्ष स्वत: होम करणार नाहीं. तर अग्निनाश होतो; म्हणून पुनराधान किंवा पवित्रेष्टि करावी. समुद्राला मिळणारी नदी जर पत्नी अग्नीवांचून उतरून पलीकडे जाईल, तर अग्निनाश होतो, अशी श्रुति आहे. अग्नीपाशीं पति किंवा दुसरी बायको हीं असतील, तर एका पत्नीनें अग्नीवांचून नदी ओलांडून जाण्यांत दोष नाहीं. नवरा प्रवासांत असतांना बायकोनें जर अग्नीसह नदी ओलांडली तर अग्निनाश होतो. नवरा प्रवासांत असतां बायकोनें अग्नीसह सीमोल्लंघन ( घराच्या हद्दीबाहेर जाणें ) केलें तर जसा अग्नि नष्ट होतो, तद्वत पत्नी प्रवासांत असतांना पतीनें केलें तरी अग्निनाश होतो. पाण्यानें अग्नि विझाल्यास पुनराधेय करावें. अग्निनाश झाला असतां, त्याचें आधान केल्यावांचून यजमान जर घर सोडील, तर हेंच पुनराधेय करावें. समारोप केल्यावांचून छत्तीस बोटें अंतराच्या पलीकडे अग्नि नेला असतां, त्याचा नाश होतो. बायको विटाळशी असतां, सुतकांत किंवा सोयरांत यजमान जर प्रवास करील तर त्यानें पुनराधान केलेंच पाहिजे. अनेक बायकांपैकीं ( यजमानाची ) एक बायको जरी विटाळशी असली, तरी त्यानें प्रवास करूं नये. अशांपैकीं जें निमित्त होईल त्याच्या अनुक्रमें चौथ्या व अकराव्या दिवशीं प्रवासास निघावें. अग्नीचा होमकाल व पर्वदिवस अशा वेळीं प्रवास करूं नये. दोन होमांची वेळ टळेल किंवा दर्शपूर्णमासही टळेल तर पुनराधेय करावें. म्हणून जें सांगितलें आहे, तें आपस्तम्बांबद्दलचें आहे. सुतक व सोयर यांत पचनाग्नीवर पाक करावा. पाकावांचून रात्र गेल्यास पुनराधान करावें. असें जें सांगितलें आहे तें ज्याला एकच बायको असेल, त्याच्याबद्दलचें आहे, असें जें वचन आहे, तें कात्यायनासंबंधाचें आहे. पत्नी प्रवासांत असतां यजमानानें पुनराधान करावें असें जें सांगितलें, तें ज्याला एकच बायको असेल त्याच्या संबंधानें आहे, ज्याला अनेक बायका असतील त्याची सर्वांत थोरली बायको जर प्रवासांत असेल तर पुनराधान करण्यास कित्येक ग्रन्थकार सांगतात. हीं निमित्तें पूर्वींचा अग्नि टाकून नव्या अग्नीचें आधान करण्याबद्दचीं होत. साक्षात् उपकारकर्त्या अङ्गभूत अशा कर्मांचा जर लोप

झाला, तर कर्मसमाप्तीच्या आधीं प्रायश्चित्त करून, तें अंगभूत कर्म करावें व कर्मसमाप्तीनंतर प्रायश्चित्त करावें. अंगभूत कर्मांची आवृत्ति (पुन्हां तेंच करणें) करूं नये. परंपराभूत अशा द्रव्यसंस्काररूपी अंगभूत कर्माचा लोप झाला असतां, तें अंगभूत कर्म प्रधान ( मुख्य ) कर्माच्या आधीं करून, मग प्रायश्चित्त करावें. अंगभूतकर्मांची आवृत्ति करूं नये.

मृतायैपत्न्यैदाहायार्धाग्निदत्त्वावशिष्टाग्नौसायंप्रातर्होमस्थालीपाकाग्रयणानिकुर्यात् कौस्तुभतुअर्धाग्निदानादिकमुक्त्वाविधुरस्यापूर्वाधानप्रकारस्तस्यविच्छेदपुनराधानप्रकारश्चोक्तः तत्राधानप्रकारोवशिष्टाग्नेःप्राक्होमान्नाशपरः यद्वा श्रौताग्निषुभार्यायैअर्धाग्निदानकृत्वाउत्सर्गेष्ट्यापूर्वाग्नीन्परित्यज्यपुनराधानंकृत्वाग्निहोत्रंकार्यमित्युक्तं तद्वदत्रापिउत्सर्गेष्ट्यापूर्वाग्नित्यागोत्तरमपूर्वाधानंकौस्तुभउक्तमितियोज्यमितिभाति ॥

**भार्यादहनाग्नि**—बायको मेल्यास तिला जाळण्यासाठीं अर्धा अग्नि देऊन बाकीच्या अर्ध्या अग्नीवर—सायंप्रातर्होम, स्थालीपाक आणि आग्रयण हीं करावींत. अर्धा अग्नि मेलेल्या बायकोला जाळण्यास द्यावा व विधुरानें ( बायको मेलेला ) जें अपूर्वाधान करावें त्याचा प्रकार आणि अग्नीचा विच्छेद ( नाश ) झाला असतां जें पुनराधान करावें त्याचा प्रकार—कौस्तुभांत सांगितले आहेत. हा जो आधानाचा प्रकार, तो शिल्लक राहिलेला अर्धा अग्नि जर होमाच्या पूर्वीं नष्ट होईल तर त्या संबंधाचा किंवा श्रौताग्नीपैकीं बायको जाळण्यास अर्धा अग्नि देऊन उत्सर्गेष्टि केल्यावर पूर्वींच्या ( शिल्लक अर्ध्याचा ) अग्नीचा त्याग करावा आणि पुनराधान करून अग्निहोत्र करावें असें जें सांगितलें आहे, त्यालाच अनुसरून, उत्सर्गेष्टीनें पूर्वींच्या अग्नीचा त्याग केल्यावर अपूर्वाधान करण्याबद्दल जें कौस्तुभांत सांगितलें आहे. त्याची योजना ( अशा वेळीं ) करावी असें वाटतें.

अरणिस्रुवादिपात्राणांलक्षणवृक्षादिविचारोऽन्यत्रज्ञेयः एतेषांविधीनांसंकल्पादिविस्तरयुक्ताःप्रयोगागृह्याग्निसागरे प्रायश्चित्तादिविधयः प्रायःसर्वसूत्रेषुसमानाएव क्वचित्क्वचित्स्वस्वसूत्रोक्ताविशेषाऊह्याः विवाहहोमोगृहप्रवेशनीयहोमेनसमानतंत्रोऽनुष्ठीयमानोबह्वृचानांपुनराधानम् अन्येषांविवाहहोमाद्भिन्नमेवेतिविशेषः ॥

**होमपात्रलक्षणें वगैरे**—अरणी, स्रुवा वगैरे पात्रांचीं ( भांडीं ) लक्षणें व तीं कोणच्या झाडांच्या लांकडांचीं करावींत याची माहिती इतर ग्रंथांत पाहावी. त्या विधींचे संकल्पासहित विस्तारपूर्वक प्रयोग गृह्याग्निसागरांत पाहावेत. प्रायश्चित्त वगैरे विधि बहुधा सर्व सूत्रांत सारखेच आहेत. क्वचित् प्रसंगीं आपापल्या गृह्यसूत्रांतले त्यांचे विशेष पाहावेत. गृहप्रवेशनीय होमाबरोबरच विवाहहोम एक तंत्रानें करणें हें ऋग्वेद्यांचें पुनराधान होय. इतरांनीं जें पुनराधान करणें तें विवाहहोमाहून निराळेंच करावें, असा यांतला विशेष समजावा.

अथकात्यायनोपयोगीकिंचिदुच्यते पराग्निपक्कंनाश्नीयादृतेगोरसमन्तरा । आहिताग्नेरयंधर्मोयाज्ञिकानांतुसंमतः १ इक्षुक्षीरविकाराश्चभ्राष्ट्रभृष्टयवाअपि । पराग्निपक्कंनज्ञेयंप्रवासेचाग्निहोत्रिणः २ यदन्नंवारिहीनंचपक्कंकेवलपावके । तदन्नंफलवद्ग्राह्यमन्नदोषोनविद्यते ३ प्रातर्होमंतुनिर्वर्त्यसमुद्धृत्यहुताशनात् । शेषंमहानसेकृत्वातत्रपाकंसमाचरेत् ४ पूर्वेणयोजयित्वातं तस्मिन्होमोविधीयते । अतोस्मिन्वैश्वदेवादिकर्मकुर्यादतन्द्रितः ५ ॥

**कात्यायनोपयोगी कांहीं निर्णय**—गूळ व गाईचें दूध या दोहोंवांचून दुसऱ्याच्या विस्तवावर पक्व झालेले पदार्थ ( शिजलेले ) खाऊं नयेत, हा जो आहिताग्निधर्म ( अग्निहोत्र्याचा ) तो याज्ञिकांना कबूल आहे. ऊंस व दूध यांपासून केलेले पदार्थ आणि खापरांत भाजलेले यव—हे प्रवासांत असणाऱ्या अग्निहोत्र्यानें दुसऱ्याच्या अग्नीवर पक्व झालेले म्हणून अभक्षणीय ( खाण्यास अशुद्ध ) असें समजूं नये. जें अन्न पाण्यावांचून लौकिकाग्नीवर ( साध्या विस्तवावर ) शिजविलेलें असेल तें फळांप्रमाणें ग्राह्य ( घेण्यास योग्य—शुद्ध ) असें समजावें. तशा अन्नाला दोष नाहीं. सकाळचा होम संपवून, त्यांतला कांहीं अग्नि स्वयंपाकगृहांत ( सैंपाकघरांत ) नेल्यावर, त्यावर पाक ( जेवणाचे पदार्थ ) करावा व नंतर तो अग्नि पुन्हा होमाग्नींत टाकून त्यावर होम करण्यास सांगितलें आहे. यास्तव, आळस टाकून वैश्वदेव करावा.

बह्वृचकारिकायाम् । नित्यंपाकायशालाग्नेरेकदेशस्यकार्यतः । पाकार्थमुल्मुकंहृत्वा तत्रपक्त्वामहानसे ॥ १ ॥ वैश्वदेवोऽग्न्यगारेस्यात्पाकार्थोग्निश्चलौकिकः । भूरिपाकोभवेद्यत्रश्राद्धादावुत्सवेषुच ॥२॥ कृतेचवैश्वदेवेऽथलौकिकोनैवकार्यतः । दीपकोधूपकश्चैवतापार्थंयश्चनीयते ॥ ३ ॥ सर्वेतेलौकिकाज्ञेयास्तावन्मात्रापवर्गतः । बहुधाविहृतोह्यग्निरावसथ्यात्कथंचन ॥ ४ ॥ यावदेकोपितिष्ठेततावदन्योनमथ्यते । वैश्वदेवात्तथाहोमात्प्राक्ज्ञेयंनैवमन्थनम् ॥ ५ ॥ पचनाग्नावपक्त्वाहः पुनराधानमर्हति । आरोपितारणीचोभेएकावायदिनश्यति ॥ ६ ॥ तत्राग्न्याधेयमिच्छन्तिपुनराधेयमेववा । अथानारोपितारण्योःक्षयेग्राह्येनवेपुनः ॥ ७ ॥ तदलाभेयदोद्वायादन्नस्यात्पुनराहितिः । शूद्रोदक्यान्त्यजैश्चैवपतितामेध्यरासभैः ॥ ८ ॥ अनारूढारणिस्पर्शेतेविहायान्ययोर्ग्रहः । आरूढारणिस्पर्शेपुनराधेयमुक्तम् । भवतंनःसमेत्यप्सुमज्जयेद्दूषितारणी ॥ ९ ॥ एकारण्येवदुष्टाचेत्तामेवाप्सुनिमज्जयेत् । तत्रान्यारणिलाभात्प्रागुद्वातेपुनराहितिः ॥ १० ॥ उद्वातेअग्नौनष्टे नग्राह्यामरणीयावदग्निस्तिष्ठतिवेश्मनि । तावद्धोमादिकंकृत्वातन्नाशेपुनराहरेत् ॥ ११ ॥ अत्रैकारणिनाशेन्यामेकांमंत्रेणोपादायोभ्यांमन्थनमितिकेचित् अवशिष्टांतामवच्छित्त्वामन्थनमित्यपरे एकस्याः दोषेप्यरणिद्वयंत्यक्त्वानूतनद्वयोपादानमितिनारायणवृत्त्याशयः अयमरणिविचारः श्रौतस्मार्तसाधारणः सर्वशाखासाधारणश्च ॥

**अरणिविचार**—दररोज करायच्या सैपाकाकरितां गृह्याग्नींतलें एकाबाजूचें कोलीत आणून, त्यावर जेवणाचे पदार्थ तयार करावेत; कारण पाकासाठीं नेलेला अग्नि हा लौकिकाग्नि आहे. श्राद्ध, उत्सव, वगैरे दिवशीं जेव्हां मोठा सैंपाक करायचा असतो, तेव्हां त्याच सैंपाकाच्या (पाकाग्नीवर) विस्तवावर वैश्वदेव करावा; कारण, कार्याच्या महत्त्वामुळें तो अग्नि तेव्हां लौकिकाग्नि नसतो. दिवा लावणें, धूप पेटवणें, (कांहीं वस्तु) तापविणें वगैरे उपयोगार्थ नेलेले जेवढे अग्नि तेवढे सारे लौकिकाग्निच होत. कारण, ज्या कार्याकरितां ते नेण्यांत येतात, तीं त्यांचीं कार्यें संपलीं म्हणजे त्यांतलें गृह्याग्नित्व नष्ट होतें. गृह्याग्नींतून जेव्हां अनेक कामांसाठीं अनेक वेळां अग्नि नेणें असेल, तेव्हां एकदां नेलेल्या अग्नीपैकीं जोंपर्यंत कांहींतरी शिल्लक असेल, तोंपर्यंत दुसऱ्यांदा नेऊं नये. वैश्वदेव आणि होम होण्यापूर्वीं गृह्याग्नींतला अग्नि (इतर कामांसाठीं) नेऊं नये. सैंपाका करतां म्हणून गृह्याग्नींतून नेलेला जो पचनाग्नि, त्यावर जर दिवसां सैंपाक केला नाहीं तर पुनराधान करावें. अग्निसमारोप केलेल्या अरणि जर नष्ट झाल्या तर त्या पुन्हा नव्या घ्याव्या व नव्या न मिळाल्यास आणि अग्नि नष्ट होत असेल तर पुनराधान करावें. शूद्र, विटाळशी, अंत्यज, पतित (बाटगा), अपवित्र व गाढव (रासभ) यांचा स्पर्श जर समारोप न केलेल्या अरणींना झाला तर त्या टाकून दुसऱ्या घ्याव्या व समारोप केलेल्यांना विटाळ झाल्यास पुनराधान करून विटाळलेल्या अरणी—'भवतं नः सम०'—या मंत्रानें पाण्यांत टाकून द्याव्या, एकाच अरणीला विटाळ झाल्यास तेवढी एकच पाण्यांत टाकावी. तिच्याबद्दल दुसरी मिळविण्याच्या आधींच जर अग्नि विझाला, तर पुनराधान करावें. अरणि नाहींशी झाली असतां, घरांत अग्नि असेपर्यंत होमादिक करून, त्या अग्नीचा नाश झाल्यावर पुनराधान करावें. एक अरणि नाहींशी झाली असतां दुसरी एक (तिच्या जागीं) मंत्र म्हणून घ्यावी व दोन्ही अरणि एकमेकींवर घांसून (मन्थन) अग्नि उत्पन्न करण्यास कांहीं ग्रंथकार सांगतात. व कांहीं असें सांगतात कीं, शिल्लक असलेली एकच अरणि तोडून तिच्या दोन कराव्या आणि त्यांच्या घर्षणांतून अग्नि उत्पन्न करावा. एक अरणि जरी विटाळली तरी दोन्ही टाकून दुसऱ्या दोन नव्या घ्याव्या असें नारायणवृत्तींत सांगणें आहे. हा अरणींसंबंधाचा निर्णय श्रौत व स्मार्त या दोन्ही कर्मांना व सर्व शास्त्रांना सारखाच आहे. हें सर्व बव्हृचकारिकेंत सांगितलेलें आहे.

अग्निसमारोपेकार्तीथैर्वैश्वदेवःपाकश्चलौकिकेऽग्नौकार्यइत्याहुः यस्यवेदश्चवेदीचविच्छिद्येतेत्रिपूरुषम् । सवैदुर्ब्राह्मणोज्ञेयःसर्वकर्मसुगर्हितः ॥ १ ॥ अग्निहोत्रंप्रकुर्वीतज्ञानवाञ्छ्रद्धयान्वितः । अग्निहोत्रात्परोधर्मोनभूतोनभविष्यति ॥ २ ॥ श्रौतेकर्मणिनाशक्तोज्ञानद्रव्याद्यभावतः । स्मार्तंकुर्याद्यथाशक्तोऽत्राप्याचारंलभेत्सदा ॥ ३ ॥ कृतदारोनतिष्ठेतक्षणमप्यग्निनाद्विना । तिष्ठेतचेद्द्विजोव्रात्यस्तथाचपतितोभवेत् ॥ ४ ॥ नगृह्णीयाद्द्विजाज्ञाग्निंगृहस्थइतिमन्यते । अन्नंतस्यनभोक्तव्यंवृथापाकोहिसंस्मृतः ॥ ५ ॥ योदद्यात्काञ्चनंमेरुंपृथिवींचससागराम् । तत्सायंप्रातर्होमस्यतुल्यंभवतिवानवा ॥ ६ ॥ इतिहोमप्रकरणम् ।

**अग्नुपासनाविशेष**—अग्नीचा जर समारोप केला असेल तर कात्यायनांनीं वैश्वदेव आणि स्वयंपाक ( हीं दोन्हीं ) लौकिकाग्नीवर करण्यास सांगितलें आहे. अग्नि आणि वेदाध्ययन या दोहोंचा ज्या कुळांत तीन पुरुषांपर्यंत ( पिढ्या ) विच्छेद ( बंद ) झाला असेल ( तें कुल ) दुर्ब्राह्मण होय. व सर्व कर्मांबद्दल ते पुरुष अयोग्य होत. पुरुषानें ज्ञानी ( विद्वान् ) होऊन श्रद्धेनें अग्निहोत्र करावें. अग्निहोत्रावांचून दुसरा धर्म झाला नाहीं व होणारही नाहीं. श्रौतकर्म करण्यास द्रव्यादिकांच्या अभावामुळें जो असमर्थ असेल त्यानें यथाशक्ति स्मार्तकर्म केलें असतां, त्यानेंही तो आचारयुक्त ( धार्मिक ) बनतो. ज्याचें लग्न झालें असेल तो क्षणभरही जरी अग्नीवांचून राहिला, तरी तो ब्राह्मण संस्काररहित आणि पतित होतो. विवाहाग्नि ( गृह्याग्नि ) न ठेवतांच आपण गृहस्थाश्रमी आहोंत असें ज्याला वाटतें, त्याचें अन्न खाऊं नये, त्याचा सैंपाक फुकट आहे असें समजावें. समुद्रासह पृथ्वी आणि सुवर्णमय असा मेरुपर्वत यांचें दानसुद्धां रोजच्या सायंप्रातर्होमाच्या योग्यतेचें होईल किंवा नाहीं याचा संशयच आहे. होमप्रकरण येथें संपलें.

अथनित्यदानम् । एकस्मिन्नप्यतिक्रान्तेदिनेदानविवर्जिते । दस्युभिर्मुषित-स्येवयुक्तमाक्रन्दितुंभृशम् ॥ १ ॥ तस्माद्विभवानुसारेणधनधान्यादिदेयमसं-भवेपूगीफलादिकमपिप्रत्यहंदेयम् । ततोगोब्राह्मणादिमङ्गलदर्शनम् । इत्यष्ट-धाविभक्तदिनस्यप्रथमभागकृत्यम् ॥

**नित्यदान**—दान केल्यावांचून एक जरी दिवस गेला तरी तो, चोरांनीं लुटल्या-प्रमाणें दुःख करीत बसण्यासच योग्य आहे असें समजावें. यास्तव सामर्थ्याप्रमाणें धनधान्यादिकांचें ( रोज कांहीं तरी ) दान करावें, व तसें करणें अशक्य असल्यास, रोज एका सुपारीचें तरी निदान दान करावें. आणि मंगल वस्तूंचें दर्शन घ्यावें. दिवसाच्या आठ भागांपैकीं पहिल्या भागांतलें हें ( रोजचें ) कृत्य ( प्रत्येकाचें ) आहे.

द्वितीयभागेवेदशास्त्राभ्यासः । पठेदध्यापयेद्वेदाञ्जपेच्चैवविचारयेत् । अवेक्षे-तचशास्त्राणिधर्मादीनिद्विजोत्तमः ॥१॥ देवार्चनमपिप्रातर्होमोत्तरंवाचतुर्थभागे-ब्रह्मयज्ञोत्तरंवाकार्यम् । विधायदेवतापूजांप्रातर्होमादनन्तरम् । कुर्वीतदेवता-पूजांजपयज्ञादनन्तरम् इत्यादिद्विविधस्मृतेः । देवार्चनंप्रकर्तव्यंत्रिकालेपियथाक्र-मम् । अशक्तौविस्तरात्प्रातर्मध्याह्नेगन्धमादितः ॥१॥सायंनीराजनंकुर्यात्त्रिकाले-तुलसीदलम् । यथासंध्यातथापूजात्रिकालेमोक्षदास्मृता ॥ २ ॥ इतिकमलाकरः तत्रविष्णुशिवब्रह्मसूर्यशक्तिविनायकादिष्वभिमतांदेवतामर्चयेत् । तत्रापिकलौ हरिहरयोःपूजा प्रशस्ता । नविष्णवाराधनात्पुण्यंविद्यतेकर्मवैदिकम् । तस्मादना-दिमध्यान्तंनित्यमाराधयेद्धरिम् ॥ १ ॥ अथवादेवमीशानंभगवन्तंसनातनम् । प्रणवेनाथवारुद्रगायत्र्यात्र्यम्बकेनवा ॥ २ ॥ तथोनमःशिवायेतिमंत्रेणानेन-वायजेत् । तत्रापिप्रतिमास्थण्डिलादिभ्यः शालिग्रामेबाणलिङ्गेचप्रशस्ता । आवाहनादिकंविनासदादेवतासान्निधानात् । श्रीमद्भागवते उद्धासावाहनेनस्तः-स्थिरायामुद्धवार्चने । अस्थिरायांविकल्पःस्यात्स्थण्डिलेतुभवेद्द्वयम् ॥ १ ॥

**दिनद्वितीयभागकर्म**—दिवसाच्या दुसऱ्या भागांत वेदशास्त्रांचा अभ्यास करावा. ब्राह्मणानें (या दिवसाच्या दुसऱ्या भागांत)–वेदपठन, वेदाध्यापन, जप, मनन आणि धर्मशास्त्रादिकांचें अवलोकन करावें. प्रातर्होमानंतर किंवा ब्रह्मयज्ञानंतर देवपूजा करावी अशीं अनेक स्मृतिवचनें आहेत. देवतार्चन त्रिकाल करावें व तसें करणें ज्याला अशक्य असेल त्यानें सकाळीं किंवा मध्यान्हकाळीं गन्धादिक उपचारांनीं सम्पूर्णपणें करावें, आणि सन्ध्याकाळीं (धूपार्ति), आरती करावी. त्रिकाल तुलसीदल वहावें. त्रिकालसन्ध्येप्रमाणेंच त्रिकालपूजा मोक्ष देणारी आहे, असें स्मृतिवचन असल्याचें कमलाकरानें सांगितलें आहे. विष्णु, शिव, ब्रह्मा, सूर्य, देवी, गणपति वगैरेंपैकीं आवडत असेल त्याची पूजा करावी. कलियुगांत विष्णु व शिव यांचीच पूजा श्रेयस्कर आहे. विष्णूच्या आराधनेहून अधिक असें दुसरें कोणचेंही कर्म, पुण्यकारक वैदिक कर्म नसल्यानें, आदिमध्यान्तरहित अशा हरीचें रोज आराधन करावें, किंवा सनातन भगवान् महादेवाचें आराधन–'ॐ नमः शिवाय'–या मंत्रानें, रुद्रगायत्रीनें किंवा प्रणवमंत्रानें करावें. प्रतिमा व स्थण्डिल यांहून शालिग्राम व बाणलिंग यांचीच पूजा करणें योग्य होय. याचें कारण, त्यांत आवाहनादि केल्यावांचूनच देवतेचें अक्षय सान्निध्य असतें. श्रीमद्भागवतांत असें सांगितलें आहे कीं, हे उद्धवा, स्थिर प्रतिमेची (स्थापित मूर्तींची) पूजा करतांना आवाहन आणि विसर्जन हीं करावींत. अस्थिर प्रतिमेंत त्यांचा (आवाहनविसर्जनांचा) विकल्प आहे. स्थण्डिलावर मात्र हीं दोन्ही केलीं पाहिजेत.

तत्रसंक्षेपतःपूजाप्रयोगउच्यते। विशेषविचारस्तुमूर्तिप्रतिष्ठाप्रसङ्गेनवक्ष्यते तत्रोदयात्पूर्वंनिर्माल्यमपसार्ययथाकालेपूजारम्भः येभ्योमाता० एवापित्रे० इतिपठनघण्टानादंकृत्वाऽऽचम्यप्राणानायम्यदेशकालादिसंकीर्तनान्ते श्रीमहाविष्णुपूजांकरिष्ये इति पञ्चायतनपक्षे श्रीरुद्रविनायकसूर्यशक्तिपरिवृतश्रीमहाविष्णुपूजांकरिष्यइतिसंकल्प्यासनादिविधाय सहस्रशीर्षेतिषोडशर्चस्यसूक्तस्यनारायणः पुरुषोनुष्टुप् अन्त्यात्रिष्टुप्न्यासेपूजायांचविनि० ततःप्रथमामृचंवामेकरेद्वितीयांदक्षिणेन्यसेत् तृतीयांवामेपादेचतुर्थींदक्षिणेपञ्चमींवामेजानुनिषष्ठींदक्षिणेसप्तमींवामकटौअष्टमींदक्षिणेनवमींनाभौदशमींहृदिएकादशींकण्ठेद्वादशींवामबाहौत्रयोदशींदक्षिणेचतुर्दशींमुखेपञ्चदशीमक्ष्णोः षोडशींमूर्ध्नि एवंदेहेचदेवेचन्यासंकुर्याद्विधानतः। अन्त्याभिःपञ्चभिर्ऋग्भिर्हृदयाद्यङ्गपञ्चकं ॥ १ ॥ कलशंशङ्खघण्टंचपाद्यार्घ्याचमनीयकम्। संपूज्यप्रोक्ष्यचात्मानंपूजासंभारमेवच ॥ २ ॥ ध्यायेदभिमतांविष्णुमूर्तिंसंपूजयेत्ततः। प्रथमयापुरुषसूक्तस्यर्चावाहनं शालिग्रामादौआवाहनाभावान्मन्त्रपुष्पम् ऋगन्ते-श्रीमहाविष्णवेश्रीकृष्णायेत्येवमभिमतमूर्तिंचतुर्थ्योद्दिश्यसर्वोपचारार्पणम् पञ्चायतनेतुश्रीविष्णवे शिवविनायकसूर्यशक्तिभ्यश्चेत्येवंयथोपास्यमुच्चारः नैवेद्यादौपार्थक्याभावेयथांशतइतिवदेत् द्वितीययाऽऽसनंदद्यात् तृतीययापाद्यम् चतुर्थ्यार्घ्यम् पञ्चम्याऽऽचमनम् षष्ठ्यास्नानम् संभवेपञ्चामृतस्नाना-

न्याप्यायस्वेत्यादिमन्त्रैः चन्दनोशीरकर्पूरकुङ्कुमागरुवासितजलैः सुवर्णघर्मा-नुवाकमहापुरुषविद्यापुरुषसूक्तराजनसामभिरभिषेकः सप्तम्यावस्त्रम् अष्टम्या-यज्ञोपवीतम् नवम्यागन्धम् दशम्यापुष्पाणि एकादश्याधूपम् द्वादश्यादीपम् स्नानेधूपेचदीपेचघण्टादेर्नादमाचरेत् । त्रयोदश्यानैवेद्यम् संभवेताम्बूलफलदाक्षि-णानीराजनंच चतुर्दश्यानमनम् पञ्चदश्याप्रदक्षिणा षोडश्याविसर्जनंपुष्पाञ्जलि-र्वास्नानेवस्त्रेचनैवेद्येदद्यादाचमनंतथा । दत्वाषोडशभिर्ऋग्भिषोडशान्नस्यचा-हुतीः ॥१॥ सूक्तेनप्रत्यृचंपुष्पंदत्वासूक्तेनसंस्तुयात् । ततः पौराणैःप्राकृतैश्चस्तुत्वा शिरोमत्पादयोःकृत्वाबाहुभ्यांचपरस्परम् । प्रपन्नंपाहिमामीशभीतंमृत्यु-ग्रहार्णवात् ॥ १ ॥ इति वदन्नमेत् निर्माल्यंदेवदत्तंभावयित्वाशिरसिधारयेत् विष्णुमूर्ध्निस्थितंपुष्पंशिरसानवहेन्नरः । शङ्खोदकंशिरसिधृत्वादेवतीर्थंपूजान्ते-वैश्वदेवान्तेवाशिरसिधार्यंपेयंच तत्रक्रमः विप्रपादोदकं पीत्वाविष्णुपादोदकं-पिबेत् । शालिग्रामशिलातोयमपीत्वायस्तुमस्तके ॥ १ ॥ प्रक्षेपणंचकुरुतेब्रह्म-हासनिगद्यते । पात्रान्तरेणवैग्राह्यंनकरेणकदाचन ॥ २ ॥ इतिकमलाकरः क्षालनेनैकरूयेववस्त्रस्य प्रतिदिनेदानेदोषोन एवंस्वर्णादिभूषणानामपि सुवर्ण-मययज्ञोपवीतेप्येवमाचारः एवं पूजायाः फलंस्कान्दे कामासक्तोऽथवाक्रुद्धः शालिग्रामशिलार्चनात् भक्त्यावायदिवाऽभक्त्याकलौमुक्तिमवाप्नुयात् ॥१॥ कथांयः कुरुतेविष्णोःशालिग्रामशिलाग्रतः । वैवस्वतभयंनास्तितथाचकालि-कालजम् ॥ २ ॥ प्रायश्चित्तंहिपापानांकलौपादोदकंहरेः । धृतेशिरसिपीतेच-सर्वास्तुष्यन्तिदेवताः ॥ ३ ॥ बौधायनोक्तोहरिहरयोः पूजाविधिः पराशर-माधवे मयातुशिवपूजाविधिः शिवरात्रिप्रकरणेद्वितीयपरिच्छेदेउक्तइतिनेहो-च्यते कौर्मे योमोहादथवालस्यादकृत्वादेवतार्चनम् । भुङ्क्तेसयातिनरकंसूकरे-ष्वभिजायते ॥ १ ॥ एवंदेवंसंपूज्यमातापितृप्रमुखान्गुरून्पूजयेत् यस्यदेवे-पराभक्तिर्यथादेवेतथागुरौ । इतिश्रुतेरितिमाधवः ॥

**षोडश्यांत पूजाप्रयोग**—येथें आतां फक्त पूजेचा प्रयोग षोडश्यांत सांगतों व त्याचा विशेष विचार, मूर्तींची प्राणप्रतिष्ठा करणा-ऱ्या वेळीं सांगेन. देवावरचा निर्माल्य सूर्योदयापूर्वी काढून योग्य वेळीं पूजा करणें सुरू करावें. 'येभ्यो माता एवापित्रे०' या मंत्रानें घंटा वाजवावा व नंतर आचमन व प्राणायाम हीं कर्मै करून, देशकालादिकांचा उच्चार केल्यावर—'श्रीमहाविष्णुपूजां करिष्ये'—असा संकल्प करावा. पञ्चायतनपूजा करणें असल्यास 'श्रीरुद्रविनायकसूर्य-शक्तिपरिवृतश्रीमहाविष्णुपूजां करिष्ये'—असा संकल्प करून आसनादिक केल्यावर —'सहस्रशीर्षेति षोडशर्चस्य सूक्तस्य नारायणः पुरुषोनुष्टुप् अन्त्यात्रिष्टुप्न्यासे पूजा-यांच विनियोगः'—असा न्यास ( प्रतिज्ञा ) करावा. पहिल्या ऋचेनें डाव्या हातावर, दुसरीनें उजव्या हातावर, तिसरीनें डाव्या पायावर, चौथीनें उजव्या पायावर, पांच-वीनें डाव्या गुडघ्यावर, सहावीनें उजव्या गुडघ्यावर, सातवीनें डाव्या कटीवर, आठवीनें उजव्या कटीवर, नववीनें बेंबीवर, दहावीनें हृदयावर, अकरावीनें गळ्या-

वर, बारावीनें डाव्या दंडावर, तेरावीनें उजव्या दण्डावर, चौदावीनें तोंडावर, पंधरावीनें दोन्ही डोळ्यांवर आणि सोळावीनें मस्तकावर असा न्यास करावा. हा न्यास स्वतःच्या देहावर आणि मूर्तीवरही करावा. पुन्हा शेवटच्या पांच ऋचांनीं हृदय, मस्तक, शिखा, कवचरूप व अस्त्ररूप न्यास करावा. कलश ( पाण्याचा तांब्या ) शंख व घंटा यांना पाद्य ( पाय धुण्यास पाणी ), अर्घ्य ( हात धुण्यास पाणी ) आणि आचमनीय ( आचमन करण्यास पाणी ), हीं अर्पण करावींत. नंतर शंखांतलें पाणी आपल्या अंगावर व पूजेच्या साहित्यावर शिंपडावें. आपल्याला आवडत्या मूर्तीचें नंतर ध्यान करून पूजा करावी. पुरुषसूक्ताच्या पहिल्या ऋचेनें आवाहन ( बोलावणें, आमंत्रण ) करावें. शालिग्रामादिकांना आवाहन करण्याचें कारण नसल्यानें मन्त्रपुष्प अर्पण करावें. प्रत्येक ऋचेच्या शेवटीं 'श्रीमहाविष्णवे श्रीकृष्णाय'—अशा प्रकारचा ऐच्छिक ( आवडत्या ) मूर्तीच्या नांवाचा चतुर्थी विभक्ति लावलेला उच्चार करून, सर्व उपचार ( त्या मूर्तीला ) द्यावेत. पञ्चायतन असल्यास —'श्रीविष्णवे शिवविनायकसूर्यशक्तिभ्यश्च'—असें—जसें उपास्य दैवत असेल त्याप्रमाणें त्याचें आधीं नांव उच्चारून, प्रत्येक देवतेला निराळा नैवेद्य नसल्यास एकच नैवेद्य —'यथांशतः'—असें म्हणावें आणि द्यावा. दुसऱ्या ऋचेनें आसन द्यावें. तिसऱ्या ऋचेनें पाद्य द्यावें. चौथीनें अर्घ्य, पांचवीनें आचमन व सहावीनें स्नान अशीं अर्पण करावींत. शक्य असल्यास—'आप्यायस्व०' या मंत्रांनीं पंचामृतस्नानें घालावींत. चन्दन, वाळा, कापूर, केशर व कृष्णागरु, यांनीं सुवासित केलेल्या पाण्यानें सुवर्ण-घर्मानुवाक ( सुवर्णं घर्मं परिवेदवेनं० ), महापुरुषविद्या ( जितं ते पुण्डरीकाक्ष० नमस्ते विश्वभावन० ) पुरुषसूक्त ( सहस्रशीर्षादि १६ ऋचा ) आणि राजनस —( इन्द्रं नरो नेमधिता हवन्ते० )—या मंत्रांनीं अभिषेक करावा. ( पुरुषसूक्ताच्या ) सातव्या ऋचेनें वस्त्र, आठवीनें जानवें, नववीनें गन्ध, दहावीनें फुलें, अकरावीनें धूप, बारावीनें दीप, तेरावीनें नैवेद्य अशीं अर्पण करावींत. शक्य असल्यास विडा, फळ, दक्षिणा व नीरांजन हींही अर्पण करावींत. चौदाव्या ऋचेनें नमस्कार करून पंधरावीनें प्रदक्षिणा करावी आणि सोळावीनें मंत्रपुष्पाञ्जलि द्यावा किंवा विसर्जन करावें. वस्त्र आणि नैवेद्य हीं दिल्यावर आचमनासाठीं पाणी द्यावें. त्यानंतर सोळा ऋचांनीं अन्नाच्या ( भाताच्या ) सोळा आहुति हवन करून, प्रत्येक ऋचेला एकेक अशीं ( सोळा ) फुलें वाहावींत आणि पुरुषसूक्तानें स्तुति करावी. त्यानंतर पुराणमंत्र व प्राकृत ( स्वभाषा ) मंत्रांनीं स्तवन करून, देवाच्या पायांवर डोकें ठेवून ( त्याचे ) दोन्ही पाय ( आपल्या ) दोन हातांनीं धरावेत, व—'प्रपन्नं पाहि मामीश भीतं मृत्युग्रहार्णवात्'—अशी प्रार्थना केल्यावर नमस्कार करावा. निर्माल्य देवानें ( आपल्याला ) दिला आहे असें मनांत समजून ( भावून ) तो आपल्या डोक्यावर ठेवावा. विष्णूच्या मस्तकावर वाहिलेलें फूल मनुष्यानें आपल्या डोक्यावर ठेवूं नये. शंखोदक डोक्यावर शिंपडून पूजा अथवा वैश्वदेव झाल्यावर देवाचें तीर्थ ( अभिषेकाचें पाणी ) डोक्यावर शिंपडून मग पोटांत घ्यावें त्याचा क्रम असाः—

ब्राह्मणाच्या पायाचें तीर्थ घेतल्यावर विष्णुपादोदक घ्यावें. शालिग्रामाचें तीर्थ पोटांत घेण्याच्या आधींच जो डोक्यावर शिंपडतो, त्याला ब्रह्महत्त्येचा दोष लागतो असें म्हणतात. हें ( शालिग्रामाचें ) तीर्थ दुसऱ्या पात्रानें ( पळी वगैरेंनीं ) घ्यावें, हातानें कधींही घेऊं नये असें कमलाकर सांगतो. रोजचें धुतलेलें एकच वस्त्र रोज देवाला देण्यास हरकत नाहीं. सुवर्णादिकांच्या अलंकारांचेंही असेंच समजावें. सोन्याच्या दागिन्याचाही असाच प्रघात आहे. पूजेचें फळ स्कन्दपुराणांत जें सांगितलें आहे तें असें:--कामक्रोध अंगीं असतांही कलियुगांत शालिग्रामशिलेचें अर्चन जरी भक्तीनें किंवा अभक्तीनेंही केलें, तरी मुक्ति मिळते. शालिग्रामशिलेपुढें जो विष्णूची स्तुति करतो त्याला यमाचें किंवा कलिकाळाचेंही भय नाहीं. हरीचें पादोदक( तीर्थ ) हें कलियुगांत सर्व पापांचें प्रायश्चित्त असून, तें डोक्यावर शिंपडल्यानें अथवा पोटांत घेतल्यानें सर्व देवता सन्तुष्ट होतात. विष्णु व शिव यांच्या पूजांचा विधि बौधायनानें जो पराशरमाधवांत दिला आहे तो पाहावा. शिवपूजाविधि मीं दुसऱ्या परिच्छेदांतल्या शिवरात्रिप्रकरणांत सांगितला असल्यानें येथें सांगितला नाहीं. कूर्मपुराणांत असें सांगितलें आहे कीं, मोहानें किंवा आळसानें जो कोणी देवपूजा केल्यावांचून जेवतो, तो नरकांत जातो व सूकर (डुकर) होतो. देवपूजा केल्यावर मातापितादि गुरुजनांचें पूजन करावें. देवासंबंधानें जशी भक्ति असावी तशीच गुरूबद्दलही असावी, असें श्रुतिवचन असल्याचें माधवांत सांगितलें आहे.

तृतीयभागेपोष्यवर्गार्थंधनार्जनम्। यजनाध्ययनदानयाजनाध्यापनप्रतिग्रहाः षड्विप्रकर्माणि षण्णांतुकर्मणामस्यत्रीणिजीविका। याजनाध्यापनेचैवविशुद्धाच्चप्रतिग्रहः १ श्रीभागवते प्रतिग्रहंमन्यमानस्तपस्तेजोयशोनुदम्। अन्याभ्यामेवजीवेतशिलैर्वादोषदृक्तयोः १ इति तथा वार्ताविचित्राशालीनयायावरशिलोञ्छनम्। विचित्रावार्ता कृष्यादिः शालीनमयाचितम् यायावरंप्रत्यहंधान्ययाञ्चा कणिशोपादानंकणोपादानंचशिलोञ्छनम् अत्रोत्तरोत्तराप्रशस्ता शिलोञ्छनंकलौनिषिद्धम् । कुसूलकुम्भीधान्योवात्र्याहिकोश्वस्तनोपिवा । कुटुम्बपोषणेद्वादशाहपर्याप्तधान्यः कुसूलधान्यः षडहपर्याप्तधान्यः कुम्भीधान्यः नकुर्यात्कृषिवाणिज्यंसेवावृत्तिंतथैवच । ब्राह्मण्याद्धीयतेतेनतस्मात्तानिविवर्जयेत् ॥ १ ॥ इत्युक्तेर्वार्तावृत्तिरापद्विषया पुत्रमांसं वरंभोक्तुंनतुराजप्रतिग्रह इतिवाक्यमधर्मवर्तिराजप्रतिग्रहविषयम् वृद्धौचमातापितरौसाध्वीभार्याशिशुःसुतश्चायाज्ययाजनशूद्रप्रतिग्रहादिनापिपोषणीया इत्यप्यापदि शाकपयोदधिपुष्पजलकुशभूमयः कुलटाषण्ढपतितभिन्नात्नीचादयाचितग्राह्याः ब्रह्मचारीयतिश्चैवविद्यार्थीगुरुपोषकः । अध्वगःक्षीणवृत्तिश्चषडेतेभिक्षुकाः ॥ १ ॥ शूद्रस्यद्विजशुश्रूषावृत्तिः आपदिकृष्यादिः ॥

**दिनतृतीयभागकर्म**--दिवसाच्या तिसऱ्या भागांत पोष्यवर्गासाठीं ( ज्यांचें पोषण करायचें त्यांच्याकरितां ) द्रव्यार्जन ( धन मिळविणें ) करावें. पोष्यवर्गांत--आई, बाप, गुरु, बंधु, बायको, पुत्रकन्या,

अनाथ, आश्रित, पूर्वी कधीं न आलेला पाहुणा, एक रात्र राहणारा पाहुणा आणि गृह्याग्नि–इतकीं येतात. वेदशास्त्र शिकणें (अध्यापन), दानकर्मान्तर्गत ऋत्विक् कर्म करणें, वेदादिकांचें (अध्यापन) शिक्षण देणें व दान घेणें (प्रतिग्रह), हीं सहा कर्में ब्राह्मणाचीं आहेत. या सहांपैकीं यज्ञांत ऋत्विक् कर्म करणें, वेदशास्त्रें शिकविणें आणि शुद्धकर्मी (पुण्यवान्) यजमानापासून दान घेणें–या तीन कर्मांपासून ब्राह्मणानें उपजीविका करावी. 'वार्ताविचित्रा' म्हणजे शेतकी, 'शालीन' म्हणजे याचनेवांचून (मागणी केल्याशिवाय) कोणी कांहीं दिल्यास घेणें, 'यायावर' म्हणजे रोज धान्य मागणें, आणि 'शिलोञ्छन' म्हणजे रोज शेतांतून कणसें अथवा धान्याचे कण वेंचून घेणें, या गोष्टी कलियुगांत निषिद्ध आहेत. ब्राह्मणानें कुसूलधान्य, कुम्भीधान्य आणि त्र्याहिक अथवा श्वस्तन असें असावें. कुटुंबपोषणार्थ ज्याच्यापाशीं बारा दिवस पुरेल इतकें धान्य आहे, तो कुसूलधान्य, सहा दिवस पुरेल इतकें असणारा कुम्भीधान्य, तीन दिवस पुरेसें असणारा त्र्याहिक आणि दुसऱ्या दिवसापुरतेंच असणारा तो श्वस्तन. शेतकी, व्यापार आणि सेवा या गोष्टी ब्राह्मणानें करूं नयेत. केल्यानें ब्राह्मण्य भ्रष्ट होतें, म्हणून तीं कर्में वर्ज्य करावींत. असें वचन असल्यानें, शेतकी करणें हें आपत्कालविषयक (बुडत्या पायाचें) जाणावें. राजापासून दान घेण्यापेक्षां स्वपुत्राचें मांस खाणें बरें–असें जें वचन आहे, तें अधर्मी राजासंबंधानें होय. वृद्ध अशीं आईबापें, साध्वी बायको व लहान पोर यांचें पोषण, अयोग्य यजमानाकडे याग करणें व शूद्रापासून दान घेणें इत्यादि जें करणें तेंही आपत्कालविषयकच होय. भाजी, दूध, दहीं, फूल, पाणी, दर्भ व जमीन–इतक्या गोष्टी जर मागितल्यावांचून मिळतील, तर त्या कुलटा, षण्ढ, व पतित यांच्याशिवाय इतर कोणच्याही नीच माणसापासूनसुद्धां घ्याव्या. ब्रह्मचारी, संन्यासी, विद्यार्थी, गुरूचें पोषण करणारा, प्रवासी आणि उपजीविकेचें साधन नसलेला–हे सहा पक्वान्नाचे (सैंपाकाचे) भिक्षुक (भीक मागणारे) होत. द्विजांची (ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य) सेवा करणें हें शूद्राचें कर्म आहे. वाईट प्रसंगीं (आपत्काल) शेतकी करावी.

चतुर्थभागेनध्याह्नस्नानम् प्रातर्गोमयस्नानम् मध्याह्नमृत्तिकोस्नानम् अनयोर्विधिःप्रायश्चित्तेउक्तः शेषविधिःप्रातःस्नानवत् ब्रह्मयज्ञाङ्गतर्पणात्प्राक्वस्त्रंनिष्पीडयमितिविशेषः ततोधृतपुण्ड्रोमध्याह्नसंध्यांकुर्यात् अध्यर्धयामादासार्धसंध्यामाध्याह्निकीष्यते । तत्रविशेषसूर्यश्चेतिस्थानेआपःपुनन्त्वितिमन्त्राचमनम् आपःपुनन्त्वित्यस्यनारायणयाज्ञवल्क्यआपःपृथिवीब्रह्मणस्पतिरष्टी मन्त्राचमनेविनियोगः ॐआपःपुनन्तुपृथिवींपृथिवीपूतापुनातुमाम् । पुनन्तुब्रह्मणस्पतिर्ब्रह्मपूतापुनातुमाम् । यदुच्छिष्टमभोज्यंयद्वादुश्चरितंमम । सर्वंपुनन्तुमामापोसतांचप्रतिग्रहꣳ स्वाहा । इतिपिबेत् अघमर्षणान्तेतिष्ठन्हंसःशुचिषदित्यस्यगौतमः सूर्योजगतीसूर्यार्घ्यदानेविनियोगः ॐहंसःशुचिषः एकार्घ्यम् अर्घ्यान्तेउपस्थानम् ऊर्ध्वबाहुः उदुत्यमितित्रयोदशर्चस्यप्रस्कण्वः सूर्योगाय-

**त्रीअन्त्याश्चतस्रोऽनुष्टुभः सूर्योपस्थाने० केचिच्चित्रं देवानामितिषड्भिरप्युप-तिष्ठन्ते शेषमुपस्थानवर्ज्यंप्रातःसंध्यावत् रात्रौमध्याह्नसंध्यायांआकृष्णेनेत्य-र्घ्यदानंगायत्र्याप्रायश्चित्तार्थंद्वितीयंदत्वाहविष्पान्त्रमितिपञ्चर्योपस्थानम् ॥**

**दिनचतुर्थभागकर्म**—दिवसाच्या चौथ्या भागांत मध्याह्नस्नान करावें. सकाळीं गोमयस्नान ( गाईचें शेण कालवलेल्या पाण्यानें ) करावें. हा स्नानविधि प्रायश्चित्तप्रकरणांत सांगितला आहे. इतर विधि प्रातःस्नानाप्रमाणेंच जरी समजावा, तरी ब्रह्मयज्ञांत जें तर्पण करायचें असतें तें केल्यावांचून वस्त्र पिळूं नये, हा यांतला विशेष आहे. त्यानंतर पुण्ड्र ( गन्ध ) लावून मध्याह्नसन्ध्या करावी. दीडप्रहर दिवसाच्यापुढें व सायंकाळाच्या आंत ही मध्याह्नसंध्या करणें जें इष्ट आहे, त्याचा विशेष असा:—'सूर्यश्च०'—या ठिकाणीं–'आपः पुनन्तु०'—हा मंत्र म्हणून आचमन करावें. 'आपः पुनन्त्वित्यस्य नारायण याज्ञवल्क्य आपः पृथिवी ब्रह्मणस्पतिरष्टी मन्त्राचमने विनियोगः । ॐ आपः पुनन्तु पृथिवीं पृथिवी पूता पुनातु माम् । पुनन्तु ब्रह्मणस्पतिर्ब्रह्मपूता पुनातु माम् । यदु-च्छिष्टमभोज्यं यद्वादुश्चरितं मम । सर्वं पुनन्तु मामापो सतांच प्रतिग्रहꣳस्वाहा ।'—असें म्हणून पाणी प्यावें व अवमर्षण झाल्यावर उभें राहावें व–'हंसः शुचिषादि-त्यस्य गौतमः सूर्योजगती सूर्यार्घ्यदाने विनियोगः । ॐ हंसःशुचिषः०'—हा मंत्र म्हणून, एक अर्घ्य दिल्यावर उपस्थान करणें तें ( दोन्ही ) हात वर करून—उदुत्यमिति त्रयोदशर्चस्य प्रस्कण्वः सूर्यो गायत्री अन्त्याश्चतस्रोऽनुष्टुभः सूर्योपस्नाने०'—असें करावें. 'चित्रं देवानां०'—या सहा ऋचांनींही कोणी उपस्थान करतात. उपस्थानावांचून इतर सर्व कर्म प्रातःसन्ध्येप्रमाणेंच करावें. रात्रीं जर मध्यान्हसन्ध्या करायची असेल तर–'आकृष्णेन०'—या मंत्रानें अर्घ्य देऊन, प्रायश्चित्ताकरितां गायत्रीमंत्रानें दुसरें अर्घ्य द्यावें, आणि–'हविष्यान्त०'—या पांच ऋचांनीं उपस्थान करावें.

**अथतैत्तिरीयाणाम् आपः पुनन्त्वित्यपःपीत्वा दधिक्राव्णेतिपूर्ववत्कृत्वा-सूर्यायैकमर्घ्यंगायत्र्यादत्वोर्ध्वबाहुतिष्ठन्नुपातिष्ठेत् उद्वयं १ उदुत्यंजातवेदसं० १ चित्रंदेवाना० १ तच्चक्षुर्देवहितंपुरस्तात्० १ यउदयगान्महतो० १ ततो-जपादिउपस्थानवर्ज्यं प्राग्वत् ।**

**तैत्तिरीय मध्याह्नसन्ध्या**—'आपः पुनन्तु०'—या मंत्रानें आचमन करून,—'दधिक्राव्णो०' पूर्वी सांगितल्यासारखें कर्म केल्या-वर गायत्रीमंत्रानें सूर्याला एक अर्घ्य द्यावें. आणि नंतर ( दोन्ही ) हात वर करून उभें राहिल्यावर–'उद्वयं० १, उदुत्यं जातवेदसं० १, चित्रं देवानां० १, तच्चक्षुर्दे-वहितं० पुरस्तात् १, आणि यउदयगान्महतो० १,'—असें उपस्थान करावें. जप वगैरे सर्व पूर्ववत् करावें.

**अथकातीयानाम् आपःपुनन्त्विप्राग्वत्गायत्र्यापकार्घ्यम् उद्वयमित्यादि-चतुर्भिरुपस्थापनम् जपान्तेशक्तस्यपूर्वोक्तैर्विभ्राडित्यनुवाकादिभिरुपस्थानम् शेषंप्राग्वत् ॥**

**कात्यायनमध्याह्नसंध्या**—'आपः पुनन्तु०' वगैरे वरच्याप्रमाणेंच करावें. गायत्रीमंत्रानें एक अर्घ्य द्यावें. 'उद्वयं०' वगैरे चार ऋचांनीं उपस्थान करावें. जप केल्यावर ज्याला सामर्थ्य असेल त्यानें—'विभ्राट०' वगैरे अनुवाकांनीं उपस्थान करावें. इतर सर्व विधि मागीलप्रमाणेंच.

अथब्रह्मयज्ञः । सचप्रातर्होमोत्तरंवामध्याह्नसंध्योत्तरंवावैश्वदेवान्तेवासकृदेवकार्यः भट्टोजिदीक्षितीयेतुप्रातराहुतेरनन्तरकालः शाखान्तरविषयः आश्वलायनैस्तु मध्याह्नसंध्योत्तरमेवानुष्ठेयइत्युक्तम् शुष्कंवासस्तदभावेआर्द्रंत्रिर्विधुन्वन्परिधायाचम्यप्राणानायम्यश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंब्रह्मयज्ञं करिष्ये तदङ्गतयादेवऋष्याचार्यतर्पणंकरिष्ये मृतपितृकैःपितृतर्पणंचकरिष्ये इति संकल्प्य दर्भेषुदर्भपाणिः प्राङ्मुखएवोपविश्यवामजङ्घोपरिमूलदेशेदक्षिणपादंनिधायाथवावामपादाङ्गुष्ठोपरिदक्षिणपादाङ्गुष्ठंनिधायैवमुपस्थंकृत्वादक्षिणजानुस्थेवामेकरेउत्तानेप्रागग्राङ्गुलौ प्रागग्रेद्विपवित्रेधृत्वादक्षिणकरेणतथैवसंपुटीकृत्यद्यावापृथिव्योःसंधिमीक्षमाणोनिमीलिताक्षोवाॐकारव्याहृतीः सकृदुच्चार्यगायत्रींपच्छोर्धर्चशः सर्वामनवानामितित्रिर्जपेत् ततोग्निमीळइतिसूक्तंपठित्वा संहिताब्राह्मणषडङ्गानिएकंसमाप्यापरमितिअध्यायंसूक्तमृचंवायथाशक्तिक्रमशःपठेत् मंत्रब्राह्मणादीनिभागशः सर्वाणियथाशक्तिप्रतिदिनंपठेदितिकेचित् एवंचतुर्वेदाध्यायीक्रमशश्चतुर्वेदान्भागशःसर्वानेववाऋग्वेदपूर्वकान्पठेत् एकैकशाखाध्यायीतुस्वशाखामेव शाखाध्ययनाभावे सूक्तमृचंवापठित्वैकंयजुः सामचोपनिषदश्चेतिहासपुराणादींश्चपठेत् पुरुषसूक्तमुक्त्वा नमोब्रह्मणेनमोअस्त्वग्नयइतिऋचंत्रिःपठेत् नात्रऋष्यादिस्मरणम् विद्युदसीत्यादेराद्यन्तेपाठस्तैत्तिरीयविषयःउपविश्यपाठाशक्तस्तिष्ठन्व्रजन्शयानोवापठेदित्याश्वलायनः अनध्यायेष्वल्पंपठेत् ।

**ब्रह्मयज्ञ**—सकाळचा होम, मध्यान्हसन्ध्या किंवा वैश्वदेव यांच्यानंतर ब्रह्मयज्ञ रोज एकदांच करावा. भट्टोजी दीक्षितांच्या ग्रंथांतला प्रातर्होमानंतरचा ब्रह्मयज्ञकाल हा इतर शाखीयांसाठीं आहे. आश्वलायनांनीं मध्यान्हसन्ध्येनंतरच करावा, असें सांगितलें आहे. कोरडें वस्त्र न मिळाल्यास ओलें वस्त्र तीन वेळां झाडून नेसावें व नंतर आचमन-प्राणायामादि केल्यावर—'श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ब्रह्मयज्ञं करिष्ये । तदङ्गतया देवऋष्याचार्यतर्पणं करिष्ये।'—असा संकल्प करावा. ज्याचा बाप मेला असेल त्यानें वरील संकल्पांत—'पितृतर्पणंच करिष्ये'—असें म्हणावें. दर्भासनावर हातांत दर्भांचीं पवित्रकें घालून पूर्वेकडे तोंड करून बसावें. डाव्या मांडीवर मूलस्थानीं उजवा पाय ठेवावा, किंवा डाव्या पायाच्या अंगठ्यावर उजव्या पायाचा अंगठा ठेवावा. असें उपस्थ केल्यावर उजव्या गुडघ्यावर पूर्वेकडे बोटें करून उताणा ठेवलेल्या डाव्या हातावर, पूर्वेकडे अग्रें केलेलीं दोन पवित्रकें घातलेला उजवा हात ठेवावा आणि क्षितिजाकडे दृष्टि लावावी किंवा डोळे मिटावे. ॐकार व व्याहृति मंत्र एकदां म्हणून, गायत्रीमंत्राचा पादशः, अर्धशः व सर्व

असा तीन वेळां जप केल्यावर—'अग्निमीळे०' हें सूक्त म्हणून—संहिता, ब्राह्मण व षडंगें हीं एकामागून एक अशीं—एक अध्याय, एक सूक्त किंवा एक ऋचा अशीं क्रमानें म्हणावींत. (षडंगें=शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्द व ज्योतिष.) मंत्र व ब्राह्मण हीं सर्व रोज यथाशक्ति भागशः म्हणावींत असें कोणी ग्रन्थकार सांगतात. चतुर्वेदाध्यायानें चारी वेद भागशः किंवा सर्व ऋग्वेदापासून आरंभ करून म्हणावे. एका शाखेच्यानें आपल्याच शाखेचा पाठ करावा. शाखेचें शिकणें झालें नसल्यास सूक्त किंवा ऋचा तरी म्हणावी. त्यानंतर यजुर्वेद व सामवेद यांचा एकेक मंत्र व एकेक उपनिषद्, इतिहास व पुराण हीं पठन करावींत. त्यानंतर पुरुषसूक्ताचा जप केल्यावर—'नमो ब्रह्मणे नमो अस्त्वग्नय०'—ही ऋचा तीनदां म्हणावी पण तींत ऋष्यादिकांचें स्मरण करूं नये. 'विद्युदसि०' हा मंत्र तैत्तिरीयांनीं सुरवातीला व शेवटीं म्हणावा. बसून म्हणण्यास असमर्थ असलेल्यानें उभें राहून, फिरत अथवा आडवें पडूनसुद्धां पाठ म्हणावा असें आश्वलायन सांगतो. अनध्यायाच्या दिवशीं थोडा पाठ म्हणावा.

अथतर्पणम् तत्रसव्येनदेवतीर्थेनदर्भाग्रैर्देवतर्पणम् तद्यथा साक्षतजलैर्देवर्षितर्पणम् सतिलजलैराचार्यपितृतर्पणम् प्रजापतिस्तृप्यतु १ ब्रह्मातृप्य० २ वेदास्तृप्यन्तु ३ देवास्तृप्यन्तु ४ ऋषयस्तृप्यन्तु ५ सर्वाणिच्छन्दांसितृप्यन्तु ६ ॐकारस्तृप्य० ७ वषट्कारस्तृप्य० ८ व्याहृतयस्तृप्यं० ९ सावित्रीतृप्य० १० यज्ञास्तृप्यं० ११ द्यावापृथिवीतृप्यतां १२ अन्तरिक्षंतृप्य० १३ अहोरात्राणितृप्यंतु १४ सांख्यास्तृप्यं० १५ सिद्धास्तृप्यं० १६ समुद्रास्तृप्यं १७ नद्यस्तृप्यं० १८ गिरयस्तृप्यं० १९ क्षेत्रौषधिवनस्पतिगन्धर्वाप्सरसस्तृप्यं० २० नागास्तृप्यं० २१ वयांसितृप्यं० २२ गावस्तृप्यं० २३ साध्यास्तृप्यं० २४ विप्रास्तृप्यं० २५ यक्षास्तृप्यं० २६ रक्षांसितृप्यं० २७ भूतानितृप्यं० २८ एवमन्तानितृप्यंतु २९ अथऋषयः निवीती कनिष्ठिकामूलेनदर्भमध्यैः शतर्चिनस्तृप्यं० माध्यमास्तृप्यं० गृत्समदस्तृप्यं० विश्वामित्रस्तृप्य० वामदेवस्तृप्यं० अत्रिस्तृप्य० भरद्वाजस्तृप्य० वसिष्ठस्तृप्य० प्रगाथास्तृप्यं० पावमान्यस्तृप्यं० क्षुद्रसूक्तास्तृप्यं० महासूक्तास्तृप्यं० १२ एकत्वद्वित्वबहुत्वेषु तृप्यतुतृप्यतांतृप्यंतुइतियथायथंवदेत् अथप्राचीनावीती पितृतीर्थेनद्विगुणीकृतदर्भमूलाग्रैःसुमन्तुजैमिनिवैशंपायनपैलसूत्रभाष्यभारतमहाभारतधर्माचार्यास्तृप्यंतु १ जानन्तिबाहविगार्ग्य गौतमशाकल्यबाभ्रव्यमाण्डव्यमाण्डूकेयास्तृप्यंतु २ गर्गीवाचक्नवीतृप्य० ३ वडवाप्रातीथेयीतृप्य० ४ सुलभामैत्रेयीतृप्य० ५ कहोळंतर्पयामि० ६ कौषीतकंत० ७ महाकौषीतकंत० ८ पैङ्ग्यंत० महापैङ्ग्यंत०सुयज्ञंतर्पया० ११ सांख्यायनंत० १२ ऐतरेयंत० १३ महैतरेयंत० १४ शाकलंत० १५ बाष्कलंत० १६ सुजातवक्त्रंत० १७ औदवाहिंत० १८ महौदवाहिंत० १९ सौजामिंत० २० शौनकंत० २१ आश्वलायनंत० २२ येचान्येआचार्यास्तेसर्वेतृप्यंतु २३ ततोमृतपितृकः पित्रत्रयींमातृत्रयींसपत्नीक-

मातामहत्रयींपत्न्याद्येकोद्दिष्टगणाश्वमहालयप्रकरणोक्तान्मृतांस्तर्पयेत् संबन्धं-प्रथमंब्रूयान्नामगोत्रमनन्तरम् । पश्चाद्रूपंविजानीयात्क्रमएषसनातनः १ एकैक-मञ्जलिंदेवेभ्योद्वौद्वौऋषिभ्यस्त्रींस्त्रीन्पितृभ्यइतिसंख्याविशेषः आश्वलायनानां-वैकल्पिकः तत्सूत्रेसंख्यानुक्तेः येषांसूत्रेसंख्योक्तिस्तेषांनित्यइतिमाधवः मातृ-त्रयींभिन्नस्त्रीभ्यएकाञ्जलिः एतावद्भिस्तर्पणाशक्तौ आब्रह्मस्तम्बपर्यन्तंदेव-र्षिपितृमानवाः । तृप्यन्तुपितरः सर्वेमातृमातामहादयः ॥ १ ॥ अतीतकुलको-टीनांसप्तद्वीपनिवासिनाम् । आब्रह्मभुवनाल्लोकादिदमस्तुतिलोदकम् ॥ २ ॥ इतित्रिस्त्रिर्दद्यात् ततो येकेचास्मत्कुलेजाताअपुत्रागोत्रिणोमृताः । तेगृह्णन्तु-मयादत्तंवस्त्रनिष्पीडनोदकम् ॥ १ ॥ इतिपरिधानवस्त्रंभूमौनिष्पीड्य दद्यात् अत्रबह्वृचानांप्राचीनावीती अन्येषांनिवीती इदंगृहेनिषिद्धम् ब्रह्मयज्ञोग्रामा-द्बहिरुदकसमीपेविहितो ग्रामेमनसाधीयीत सव्यान्वारब्धदक्षिणेनवाअञ्जलि-नावातर्पणम् तर्पणंबर्हिषाच्छन्नेस्थलेकार्यंनतुजले पात्राद्वाजलमादायशुभे-पात्रान्तरेक्षिपेत् । जलपूर्णेथवागर्तेनस्थलेतुविबर्हिषि ॥ १ ॥ हेमरौप्यताम्र-कांस्यमयेपात्रेनमृण्मये । यत्राशुचिस्थलंतत्रतर्पणंस्यान्नदीजले ॥ २ ॥ अना-मिकाधृतंहेमतर्जन्यांरौप्यमेवच । कनिष्ठिकाधृतंखड्गंतेनपूतोभवेन्नरः ॥ ३ ॥ अङ्गुल्यग्रेतीर्थं दैवंस्वल्पाङ्गुल्योर्मूलकायम् मध्येऽङ्गुष्ठाङ्गुल्योःपित्र्यं-मूलेत्वङ्गुष्ठस्यब्राह्मम् ॥ १ ॥ उद्धृतजलेनपितृतर्पणेतिलान्संमिश्रयेज्जले अनुद्धृतजलेनतर्पणेवामहस्तेतिलाग्राह्याः तिलतर्पणंगृहे निषिद्धम् रविभृगुवारे-सप्तमीनन्दासुकृत्तिकामघाभरणीषुमन्वादौयुगादौच पिण्डदानंमृदास्नानंनकुर्या-त्तिलतर्पणम् पित्रोः श्राद्धदिनेनित्यतर्पणेतिलानिषिद्धाः पर्वदिनेनिषिद्धतिथि-वारादिष्वपितिलतर्पणम् विकिरेपिण्डदानेचतर्पणेस्नानकर्मणि । आचान्तः सन्प्रकुर्वीतदर्भसंत्याजनंबुधः ॥ १ ॥ दर्भत्यागमन्त्रस्तु येषांपितानभ्राता-पुत्रोनान्यगोत्रिणः । तेसर्वेतृप्तिमायान्तुमयोत्सृष्टैः कुशैस्तथा ॥ १ ॥

**तर्पण**—देवांचें तर्पण सव्यानें, देवतीर्थाचें ( अंगुलीच्या अग्रांनीं ) व दर्भांच्या अग्रांनीं करावें. अक्षतायुक्त उदकानें देवर्षींचें तर्पण करावें. तिलयुक्त उदकानें आचार्य व पितर यांचें तर्पण करावें. देवांचें तर्पण असें—"प्रजापतिस्तृ-प्यन्तु १ ब्रह्मा० तृप्य० २ वेदास्तृप्यन्तु ३ देवास्तृप्यन्तु ४ ऋषयस्तृप्यन्तु ५ सर्वाणि छन्दांसि तृप्यन्तु ६ ॐकारस्तृप्य० ७ वषट्कारस्तृप्य० ८ व्याहृतय स्तृप्यं ९ सावित्री तृप्य० १० यज्ञास्तृप्यं० ११ द्यावापृथिवी तृप्यतां० १२ अंतरिक्षं तृप्यं० १३ अहोरात्राणि तृप्यन्तु १४ सांख्यास्तृप्यं० १५ सिद्धास्तृप्यं० १६ समुद्रास्तृप्यं० १७ नद्यस्तृप्यं० १८ गिरयस्तृप्यं १९ क्षेत्रौषधिवनस्पतिगंधर्वाप्सरसस्तृप्यं० २० नागास्तृप्यं० २१ वयांसि तृप्य० २२ गावस्तृप्यं० २३ साध्यास्तृप्यं० २४ विप्रास्तृप्यं० २५ यक्षास्तृप्यं० २६ रक्षांसिस्तृप्यं० २७ भूतानि तृप्यं० २८ एवमन्तानि तृप्यन्तु २९. "ऋषींचें तर्पण निवीती ( गळ्यामध्यें सरळ यज्ञोपवीत ) करून कनिष्ठिकेच्या मूलानें दर्भांच्या मध्यभागांनीं करावें. तें असें—"शतर्चिनस्तृप्यं० माध्यमास्तृप्यं० गृत्समदस्तृप्यं विश्वा-

मित्रस्तृप्यं० वामदेवस्तृप्य० अत्रिस्तृप्य० भरद्वाजस्तृप्य० वसिष्ठस्तृप्य० प्रगाथास्तृप्यं० पावमान्यस्तृप्यं० क्षुद्रसूक्तास्तृप्यं महासूक्तास्तृप्यं० १२ " एकवचन, द्विवचन अथवा बहुवचन जसें असेल त्याप्रमाणें तृप्यतु, तृप्यतां, तृप्यन्तु इत्यादि उच्चार करावा. नंतर प्राचीनावीती करून पितृतीर्थानें द्विगुणित केलेल्या दर्भांच्या मूलाग्रांनीं पितृतर्पण करावें. तें असें––सुमन्तु जैमिनी वैशंपायन पैलसूत्र भाष्य भारत महाभारत धर्माचार्यास्तृप्यन्तु १ जानन्तिबाहविगार्ग्य गौतमशाकल्य बाभ्रव्यमाण्डव्यमाण्डूकेयास्तृप्यन्तु २ गार्गी वाचक्नवी तृप्य० ३ वडवा प्रातीथेयी तृप्य० ४ सुलभामैत्रेयी तृप्य० ५ कहोळं तर्पयामि० ६ कौषितकं त० ७ महाकौषीतकं त० ८ पैङ्ग्यं त० ९ महा पैङ्ग्यं त० १० सुयज्ञं तर्प० ११ सांख्यायनं त० १२ ऐतरेयं त० १३ महैतरेयं त० १४ शाकलं त० १५ बाष्कलं० १६ सुजातवक्त्रं त० १७ औदवाहिं त० १८ महौदवाहिं त० १९ सौजामिं त० २० शौनकं त० २१ आश्वलायनं त० २२ ये चान्ये आचार्यास्ते सर्वे तृप्यन्तु २३ " नंतर मृतपितृक असेल त्यानें पितृत्रयी, मातृत्रयी, सपत्नीक मातामहत्रयी० पत्नी इत्यादि एकोद्दिष्ट गण इत्यादि महालय प्रकरणांमध्यें सांगितलेल्या सर्व मृतांच्या उद्देशानें तर्पण करावें. तर्पण करितांना संबंधाचा उच्चार प्रथम करून नंतर नाम व गोत्र यांचा उच्चार करावा; आणि त्यानंतर रूप ( वस्वादिरूप, वसुरुद्रादित्यस्वरूप, वसुरूप ) इत्यादिकांचा उच्चार करावा. देवांना एकेक अंजलि, ऋषींना दोन दोन आणि पितरांना तीन तीन याप्रमाणें संख्याविशेष देणें हें आश्वलायनांना वैकल्पिक आहे. कारण त्यांच्या सूत्रामध्यें संख्या सांगितली नाहीं. ज्यांच्या सूत्रामध्यें संख्या सांगितली आहे त्यांना नित्य आहे असें माधवाचें मत आहे. मातृत्रयीखेरीजकरून इतर स्त्रियांना एक अंजलि द्यावा. इतकें विस्तारानें तर्पण करण्यास असमर्थ असेल त्यानें–" आब्रह्मस्तंबपर्यन्तं देवर्षिपितृमानवाः । तृप्यन्तु पितरः सर्वे मातृमातामहादयः ॥ अतीतकुलकोटीनां सप्तद्वीप निवासिनाम् । आब्रह्मभुवनाल्लोकादिदमस्तु तिलोदकम् ॥"–याप्रमाणें तीन तीन वेळ उदक द्यावें. नंतर " ये के चास्मत्कुले जाता अपुत्रा गोत्रिणो मृताः । ते गृह्णन्तु मया दत्तं वस्त्रनिष्पीडनोदकम् ॥"–याप्रमाणें परिधान केलेलें वस्त्र भूमीवर पिळून उदक द्यावें. याविषयीं आश्वलायनांनीं प्राचीनावीती करावी, इतरांनीं निवीती करावी. हें निष्पीडनोदक घरामध्यें निषिद्ध आहे. ब्रह्मयज्ञ गांवाच्या बाहेर उदकासन्निध करावा. गांवांत करणें असल्यास मनांत उच्चार करून करावा. डावा हात लावलेल्या उजव्या हातानें अथवा अंजलीनें तर्पण करावें. तर्पण दर्भानें आच्छादिलेल्या स्थलीं करावें, उदकांत करूं नये; अथवा एका पात्रामधून उदक घेऊन तें दुसऱ्या शुद्ध पात्रांत सोडावें. उदकानें भरलेल्या जमिनीच्या खांचेंत सोडावें, पण दर्भविरहित भूमीवर सोडूं नये. सुवर्ण, रौप्य, ताम्र, कांसें यांच्या पात्रांत सोडावें, मृत्तिकेच्या पात्रांत सोडूं नये. जर भूमि अशुद्ध असेल तर नदीच्या उदकामध्यें तर्पण करावें. अनामिकेमध्यें सुवर्ण, तर्जनीमध्यें रौप्य आणि कनिष्ठिकेमध्यें खड्ग हीं धारण केल्यानें मनुष्य शुचिर्भूत असतो. अंगुलीचें अग्र तें देवतीर्थ, अनामिका व

कनिष्ठिका यांचें मूल तें कायतीर्थ ( प्रजापतितीर्थ ) अंगुष्ठ व तर्जनी यांचा मध्य तें पितृतीर्थ आणि अंगुष्ठाचें मूल तें ब्राह्मतीर्थ. बाहेर काढलेल्या उदकानें पितृतर्पण करणें असेल तर उदकामध्यें तिळांचें मिश्रण करावें. बाहेर उदक काढलेलें नसेल तर डाव्या हातामध्यें तीळ घ्यावे. तिलतर्पण गृहामध्यें निषिद्ध आहे. रविवार, शुक्रवार, सप्तमी, नन्दातिथि, कृत्तिका, मघा, भरणी, मन्वादि, युगादि यांवर पिंडदान, मृत्तिकास्नान व तिलतर्पण-हीं करूं नयेत. पितरांच्या श्राद्धदिवशीं नित्यतर्पणाविषयीं तिल निषिद्ध आहेत. पर्वदिवशीं व निषिद्ध तिथि, वार यांवरही तिलतर्पण करावें. विकिर ( फेंकून पसरलेलें ) पिंडदान, तर्पण व स्नानकर्म हीं केल्यानंतर आचमन करून, ज्ञात्या माणसानें दर्भांचा त्याग करावा. त्याचा मंत्रः-"येषां पिता न न भ्राता न पुत्रो नान्यगोत्रिणः । ते सर्वे तृप्तिमायान्तु मयोत्सृष्टैः कुशैस्तथा ॥"

अथहिरण्यकेशीयानांसंकल्पादित्रिर्गायत्रीजपांतं प्राग्वत् ततइषेत्वोर्जेत्वेति- अध्यायमनुवाकंवायथाशक्तिपठित्वा ऋचंसामषडङ्गेतिहासपुराणादीनिपठि- त्वानमोब्रह्मणइत्येतयात्रिः परिदधाति । अथतर्पणम् तच्चतैत्तिरीयाणांब्रह्म- यज्ञाङ्गंनभवति तेनब्रह्मयज्ञोत्तरंव्यवहितकालेपिब्रह्मयज्ञात्प्रागपिभवति एवं- काण्वमाध्यन्दिनानामपि अतोदेवर्ष्याचार्यपितृतृप्तिद्वाराश्रीपरमेश्वर० देवर्ष्या- चार्यपितृतर्पणंकरिष्येइतिपृथगेवसंकल्पः पूर्ववदेकैकाञ्जलिनादेवतर्पणम्ब्रह्माणं- तर्पयामि प्रजापतिंतर्प० बृहस्पतिं० अग्निं० वायुं० सूर्यं० चन्द्रमसं० नक्षत्राणि० इन्द्रꣳराजानं० यमꣳराजानं० वरुणꣳराजानं० सोमरा‌ꣳ राजानं० वैश्रवणꣳराजानं० वसून्० रुद्रान्० आदित्यान्० विश्वा- न्देवान्० साध्यान्० ऋभून्० भृगून्० मरुतः० अथर्वणः० अङ्गिरस- स्तर्पयामीति निवीती उदङ्मुखः विश्वामित्रं० जमदग्निं० भरद्वाजं० गौतमं० अत्रिं० वसिष्ठं कश्यपं० अरुन्धतीं० अगस्त्यं० कृष्णद्वैपायनं० जातूकर्ण्यं० तरुक्षं० तृणबिन्दुं० वर्मिणं वरूथिनं० वाजिनं० वाजिश्रवसंतर्प- यामि सत्यश्रवसंत० सुश्रवसंत० सुतश्रवसं० सोमशुष्मायणं० सत्ववन्तं० बृहदुक्थं० वामदेवं० वाजिरत्नं० हर्यज्वायनं० उदमयं० गौतमं० ऋणंजयं० ऋतंजयं० कृतजयं० धनंजयं० बभ्रुं० त्र्यरुणं० त्रिवर्षं० त्रिधातुं० शिबिं० पराशरं० विष्णुंत० रुद्रं० स्कंदं० काशीश्वरं० ज्वरंत० धर्मं० अर्थं० कामं० क्रोधं० वसिष्ठं० इन्द्रं० त्वष्टारंत० कर्तारं० धर्तारं० धातारं० मृत्युं० सवितारंत० सावित्रींतर्प० ऋग्वेदंत० यजुर्वेदं० सामवेदं० अथर्ववेदं० इतिहासपुराणं० ६१ इतिद्वाद्वावञ्जली० प्राचीनावीतीदक्षिणामुखः वैशंपायनं० पिलिंगुं० तित्तिरिंत० उखंत० आत्रेयंपदकारं० कौडिण्यंवृत्तिकारं० सूत्रकारान्० सत्याषाढंत०प्रवचनकर्तॄन्० आचार्यान्० ऋषीन्० वानप्रस्थान्० ऊर्ध्वरेतसः० एकपत्नीस्तर्पयामीतित्रींस्त्रीनञ्जलीनितिविशेषः शेषंपितृतर्पणादिसर्वंप्रागुक्तमेव ।

**हिरण्यकेशी ब्रह्मयज्ञ**—संकल्पापासून तीन वेळां गायत्रीजप करण्यापर्यंत कर्म पूर्वीप्रमाणें करावें. नंतर "इषेत्वोर्जेत्वा०" हा अध्याय अथवा अनुवाक यथाशक्ति पठन करून ऋचा, साम, षडंगें, इतिहासपुराण इत्यादि पठन करावीं. नंतर "नमो ब्रह्मणे०" ही ऋचा त्रिवार म्हणावी. तर्पणाचा विधि— तैत्तिरीयांना तर्पण हें ब्रह्मयज्ञांगभूत नाहीं; करितां हें ब्रह्मयज्ञानंतर कांहीं वेळानें अथवा ब्रह्मयज्ञाच्या पूर्वींही करावें. याचप्रमाणें कण्व, माध्यंदिन यांचाही निर्णय जाणावा. म्हणून देवर्ष्याचार्यपितृतृप्तिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं देवर्ष्याचार्य-पितृतर्पणं करिष्ये' असा वेगळा संकल्प करावा. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें एकेक अंजलि देऊन देवतर्पण करावें. तें असें-"ब्रह्माणं तर्पयामि प्रजापतिं तर्प० बृहस्पतिं० अग्निं० वायुं० सूर्यं० चन्द्रमसं० नक्षत्राणि० इन्द्रꣳ राजानं० यमꣳ राजानं० वरुणꣳराजानं० सोमꣳराजानं० वैश्रवणꣳराजानं० वसून्० रुद्रान्० आदित्यान्० विश्वान् देवान्०साध्यान्० ऋभून्० भृगून्० मरुत० अथर्वण० अंगिरसस्तर्पयामि." नंतर निवीती करून उत्तराभिमुख होऊन ऋषितर्पण करावें. तें असें—"विश्वामित्रं० जमदग्निं० भारद्वाजं० गौतमं० अत्रिं० वसिष्ठं० कश्यपं० अरुन्धतीं० अगस्त्यं० कृष्णद्वैपायनं० जातूकर्ण्यं० तरुक्षं० तृणबिंदुं० वर्मिणं० वरूथिनं० वाजिनं० वाजिश्रवसं० सत्यश्रवसं० सुश्रवसं० सुतश्रवसं० सोमसुष्मायणं० सत्ववन्तं० बृहदुक्थं० वामदेवं० वाजिरत्नं० हर्यज्वायनं० उदमयं० गौतमं० ऋणंजयं० ऋतंजयं० कृतंजयं० धनंजयं० बभ्रुं० त्र्यरुणं० त्रिवर्षं० त्रिधातुं० शिबिं० पराशरं० विष्णुं० रुद्रं० स्कन्दं० काशीश्वरं० ज्वरं० धर्मं० अर्थं० कामं० क्रोधं० वसिष्ठं० इंद्रं० त्वष्टारं० कर्तारं० धर्तारं ०धातारं० मृत्युं०सवितारं० सावित्रीं० ऋग्वेदं० यजुर्वेदं० सामवेदं० अथर्ववेदं० इतिहास-पुराणं०" यांना प्रत्येकीं दोन दोन अंजली द्यावे. नंतर प्राचीनावीती करून दक्षिणा-भिमुख होऊन आचार्यतर्पण करावें. तें असें—"वैशंपायनं० पिलिंगुं० तित्तिरं० उखं० आत्रेयं० पदकारं० कौण्डिण्यं० वृत्तिकारं० सूत्रकारान्० सत्याषाढं० प्रवचन-कर्तॄन्० आचार्यान्० ऋषीन्० वानप्रस्थान्० उर्ध्वरेतस:० एकपत्नींस्तर्पयामि." यांना प्रत्येकीं तीन तीन अंजली द्यावे. याप्रमाणें विशेष जाणावा. इतर पितृतर्पण वगैरे पूर्वीं सांगितल्याप्रमाणेंच करावें.

अथापस्तम्बादीनां ब्रह्मादयोयेदेवास्तान्० सर्वान्देवांस्त० सर्वान्देवगणांस्त० सर्वादेवपत्नी:० सर्वान्पुत्रां० सर्वान्पौत्रांस्त० भूर्देवां० भुवर्देवां० सुवर्देवां० भूर्भुव:सुवर्देवां० कृष्णद्वैपायनादयोयेऋषय: तानृषीं० सर्वानृषीं सर्वानृषी-गणान्० सर्वाऋषिपत्नी:० सर्वानृषिपुत्रां० सर्वानृषिपौत्रां० ६ भूर्ऋषीं० ४ एवंसोम: पितृमान्यमोङ्गिरस्वानग्निष्वात्ता:० तान्पितॄनित्यादयोदशपितृपर्या-याऊह्या: एवमन्येषामप्यूह्यम् ।

**आपस्तम्बी तर्पण**—"ब्रह्मदयो ये देवास्तान्० सर्वान्देवान्० सर्वान्देवगणान्० सर्वा देवपत्नी:० सर्वान् पुत्रान्० सर्वान् पौत्रान्० भूर्देवान्० भुवर्देवान्० सुवर्देवान्० भूर्भुव:सुवर्देवान्० कृष्णद्वैपायनादयो ये ऋषय:

तानृषीन्० सर्वानृषीन्० सर्वानृषिगणान्० सर्वा ऋषिपत्नीः० सर्वानृषिपुत्रान्० सर्वानृषिपौत्रान्० भूर्ऋषीन्०" याप्रमाणें सोमःपितृमान्यमोंगिरस्वाग्निस्वात्ताः० तान्पितॄन्०" इत्यादि दहा पितृतर्पणांचा उच्चार करावा. याप्रमाणें इतरांसंबंधानेंही जाणावें.

**अथकात्यायनानाम् प्राङ्मुखआचम्यपवित्रेधृत्वाप्राणानायम्यश्रीपर०र्थे-ब्रह्मयज्ञेनयक्ष्ये दर्भानञ्जलौधृत्वादक्षिणजानौधृत्वासूत्रान्तराद्गायत्रींत्रिरुच्चार्य-इषेत्वेत्यादिआरभ्यसंहितां ब्राह्मणंचपूर्वोक्तरीत्यापठेत् अन्तेउपनिषदितिहास-पुराणादिपठित्वाअन्तेॐस्वस्तीतिवदेत् सूत्रान्तरोक्तत्वात्नमोब्रह्मणइतित्रिः पठन्तिकेचित् ।**

**कात्यायनी ब्रह्मयज्ञ**—पूर्वाभिमुख होऊन आचमन करून पवित्रकें धारण केल्यावर प्राणायाम करावा. नंतर "श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ब्रह्मयज्ञेन यक्ष्ये०" असा संकल्प केल्यावर हातांच्या अंजलीमध्यें दर्भ घेऊन उजव्या गुडघ्यावर अंजलि ठेवावा. इतर सूत्रांत सांगितल्याप्रमाणें गायत्रीचा त्रिवार उच्चार करून "इषेत्वा०" यापासून आरंभ करून संहिता व ब्राह्मण पूर्वी सांगितलेल्या रीतीनें पठन करावीं. अखेरीस "ॐ स्वस्ति" असें म्हणावें. इतर सूत्रामध्यें सांगितलें आहे. याकरितां "नमो ब्रह्मणः०" कोणी त्रिवार पठन करितात.

**अथतर्पणम् एतच्चप्रातःसंध्योत्तरंवामध्याह्नेब्रह्मयज्ञोत्तरंवासकृद्देवकार्यम् ब्रह्मयज्ञस्यवैकल्पिकंकालत्रयमुक्तम् तत्रदेवर्षिपितृतर्पणंकरिष्यइतिसंकल्प्यादौ-पूर्वोक्तधर्मेणदेवतर्पणम् भूमौताम्रादिपात्रेवादर्भानास्तीर्य विश्वेदेवासआगते-तिदेवानावाह्यविश्वेदेवाःशृणुतेममितिजपित्वात्रीन्प्रागग्रान्दर्भान्धृत्वादेवतीर्थेन ॐब्रह्मातृप्यताम् विष्णुस्तृप्य० रुद्र० प्रजापति० देवास्तृ० छन्दांसि० वेदा० ऋषय० पुराणाचार्या० गन्धर्वा० इतराचार्या० संवत्सराःसावयव० देव्यस्तृ-प्यन्तां अप्सरसः देवानुगा० नागा० सागरा० पर्वता० सरित० मनुष्या० यक्षा० रक्षांसि० पिशाचा० सुपर्णा० भूतानि० पशव०वनस्पतय०ओषधय० भूतग्रामश्चतुर्विधस्तृप्यतामितिसर्वत्रसप्रणवंप्रथमान्तंनामोच्चार्यतर्पयेत् २९ सप्तऋषयइतिमंत्रेणर्षीनावाह्यनिवीतीद्विर्द्विः सनकस्तृप्यतु सनन्दन० सनातन० कपिल० आसुरी० वोढुस्तृ० पञ्चशिख० ७ अपसव्यं उशंतस्त्वेतिपितॄनावाह्य आयन्तुनः पितरइतिजपित्वापितृतीर्थेनात्रीस्त्रिः कव्यवाडनलस्तृप्यताम् सोम० यम० अर्यमा० अग्निष्वात्ताःपितरस्तृप्यन्ताम् सोमपाः पितरः० बर्हिषदः८ यमायनमस्तर्पयामि धर्मराजाय० मृत्यवे अन्तकाय० वैवस्वताय० कालाय० सर्वभूतक्षयाय० औदुम्बराय० दध्नाय० नीलाय० परमेष्ठिने० वृकोदराय० चित्राय० चित्रगुप्ताय० २१ यमतर्पणंवैकल्पिकम् सूत्रेएकइत्युक्तेः जीवत्पितृक-स्यमणिबन्धपर्यन्तमपसव्यं सर्वत्र ततोमृतपितृकःपित्रादित्रयींमात्रादित्रयींच-तर्पयित्वा उदीरतामितिनवभिर्ऋग्भिस्तर्पणं जलस्थानेअञ्जलिधारांनिषिञ्चेत् उदीरतां० अङ्गिरसोनः पितरो० २ आयन्तुनः ३ ऊर्जंवहन्तीरमृतं० ४**

पितृभ्यः स्वधानमः० ५ येचेह० ६ मधुवातइतितिस्रइति ९ प्रत्यृचंप्रत्येकं-कुर्यात्तृप्यध्वमितिचत्रिःसिञ्चेत् ततोनमोवः पितरइत्यष्टौयजूंषिपठित्वामाता-महादीनेकोद्दिष्टगणांश्चतर्पयेत् देवागातुत्रिदइतिविसर्जयेत् स्नानवस्त्रनिष्पीडनो-दकदानादिप्राग्वत् प्रातर्होमोत्तरंदेवतार्चनंनकृतंचेच्चतुर्थभागे ब्रह्मयज्ञोत्तरंकार्यम् ।

**कात्यायनी तर्पण**— प्रातःसंध्येनंतर अथवा मध्यान्हीं ब्रह्मयज्ञानंतर एकदांच करावें. ब्रह्मयज्ञाचे तीन काल विकल्पानें सांगितले आहेत. तर्पणाविषयीं "देवर्षिपितृतर्पणं करिष्ये" असा संकल्प करून प्रथम पूर्वी सांगित-लेल्या प्रकारानें देवतर्पण करावें. भूमीवर अथवा ताम्र इत्यादिकांच्या पात्रांवर दर्भ पसरून "विश्वेदेवा स आगत०" या मंत्रानें देवाचें आवाहन करून "विश्वेदेवासः श्रृणुतेमं." या मंत्राचा जप करावा. पूर्वेकडे अग्रें केलेले तीन दर्भ घेऊन देव-तीर्थानें तर्पण करावें. तें असें–"ॐ ब्रह्मा तृप्यताम् विष्णुस्तृप्य० रुद्र० प्रजापतिः० देवाः० छन्दांसि० वेदाः० ऋषयः० पुराणाचार्याः० गंधर्वाः० इतराचार्याः० संवत्सरः० सावयवः० देव्यः० अप्सरसः० देवानुगाः० नागाः० सागराः० मनुष्याः० यक्षाः रक्षांसि० पिशाचाः० सुपर्णाः० भूतानि० पशव० वनस्पतयः० ओषधयः० पर्वताः० सरिताः भूतग्रामश्चतुर्विधस्तृप्यताम् २९ याप्रमाणें सर्वत्र प्रणवांसहित नामाचा उच्चार प्रथमा विभक्तीमध्यें करून तर्पण करावें. "सप्त ऋषयः०" या मंत्रानें ऋषींचें आवाहन करून निवीती करून दोन दोन अंजलि द्यावे. ऋषींचें तर्पण––"सनक-स्तृप्यतु सनन्दनस्तृ० सनातनः० कपिलः० असुरिः० वोढुः० पञ्चशिखः०" नंतर अपसव्य करून "उशतस्त्वा०" या मंत्रानें पितरांचें आवाहन करून "आयान्तु नः पितरः०" या मंत्राचा जप करून पितृतीर्थानें तीन तीन अंजलि द्यावे. पितृतर्पण–"कव्यवाडनलस्तृप्यताम् सोमः० त्यमः० अर्यमा० अग्निष्वान्त पितर-स्तृप्यंताम् सोमपः पितरः० बर्हिषदः० यमाय नमस्तर्पयामि धर्मराजाय नमस्तर्प० मृत्यवे० अन्तकाय० वैवस्वताय० कालाय० सर्वभूतक्षयाय० औदुम्बराय० दध्नाय० नीलाय० परमेष्ठिने० वृकोदराय० चित्राय० चित्रगुप्ताय० २१" यामध्यें यमतर्पण वैकल्पिक आहे. कारण सूत्रामध्यें 'एके' म्हणजे 'कोणी ग्रंथकार म्हणतात' असें आहे. जीवत्पितृकानें अपसव्य करावयाचें तें फक्त मनगटापर्यंत असें सर्वत्र जाणावें. यानंतर मातृपितृकानें पितृत्रयीमातृत्रयी यांचें तर्पण करून "उदीरतां०" या नऊ ऋचांनीं तर्पण करावें. व जलस्थानीं अंजलीनें धारा सोडावी. "उदीरतां० १ अंगिरसोनः० पितरो० २ आयान्तु नः ३ ऊर्जं वहन्तीरमृतं० ४ पितृभ्यःस्वधानमः० ५ ये चेह० ६ मधुवाता० इति ७–९" या नऊ ऋचांनीं प्रत्येक वेळीं 'तृप्यध्वं०' असें म्हणून त्रिवार उदक द्यावें. नंतर "नमो वः पितरः०" हे आठ यजुर्मंत्र म्हणून मातामहादिक व एकोद्दिष्टगण यांचें तर्पण करावें. नंतर "देवागातुविद० असें म्हणून विसर्जन करावें. स्नानाचें वस्त्र पिळून उदकदान करणें इत्यादि पूर्वी-प्रमाणेंच जाणावें. प्रातर्होमानंतर देवतार्चन केलें नसल्यास चवथ्या भागांत ब्रह्म-यज्ञानंतर करावें.

अथपञ्चमभागकृत्यम् वैश्वदेवःप्रकर्तव्यःपञ्चसूनापनुत्तये । कण्डनीपेषणी-चुल्लीजलकुम्भोपमार्जनी ॥ १ ॥ इतिपञ्चहिंसास्थानानिपञ्चसूनाः वैश्वदेवस्य-प्रातरेवप्रारम्भोनत्वाग्निहोत्रादिवत्सायम् तेनप्रातःसायंवैश्वदेवेत्यादिरेव-संकल्पः पञ्चमहायज्ञाअहरहःकर्तव्याः तेचब्रह्मयज्ञदेवयज्ञभूतयज्ञपितृयज्ञ-मनुष्ययज्ञाख्याः तत्रब्रह्मयज्ञउक्तः बह्वृचादीनांवैश्वदेवोदेवयज्ञादियज्ञत्रय-रूपः मनुष्ययज्ञस्तुमनुष्येभ्योऽन्नदानम् गृहपक्वहविष्याक्षैस्तैलक्षारादिवर्जितैः। जुहुयात्सर्पिषाभ्यक्तैर्गृह्येऽग्नौलौकिकेऽपिवा १ यस्मिन्नग्नौपचेदन्नंतस्मिन्हो-मोविधीयते । वैश्वदेवान्तर्गतपितृयज्ञेनैवनित्यश्राद्धसिद्धेर्नंनित्यश्राद्धार्थं-विप्रभोजनम् अनेनैवदर्शश्राद्धस्यापिसिद्धयादर्शश्राद्धमप्यशक्तैः संवत्सर-मध्येसकृदेवकार्यमितिभट्टोजीये सूतकेपञ्चमहायज्ञालोप इत्युक्तम् सचायं-वैश्वदेवआत्मसंस्कारार्थोऽन्नसंस्कारार्थश्चतेनाविभक्तानां पाकैक्येपृथग्वैश्वदेवो-नविभक्तानांतुपाकैक्येपिहविष्यान्तरेणपृथगेवअविभक्तानांपाकभेदेपृथक्वैश्व-देवःकृताकृतइतिभट्टोजीये पाकासंभवेएकादश्यादौतण्डुलैर्वापयोदधिघृतफलो-दकादिभिर्वाकार्यः हस्तेनान्नादिभिः कुर्याद्भिरञ्जलिनाजले । कोद्रवंचणकं-माषंमसूरंचकुलित्थकम् १ क्षारंचलवणंसर्वंवैश्वदेवेविवर्जयेत् । प्रसवतागृहे-पुत्रर्त्विगादिद्वारावैश्वदेवः कारयितव्यः गृहेकर्त्रन्तराभावेप्रवासेस्वयंकार्यः वैश्वदेवोबह्वृचैस्तैत्तिरीयैश्चादिवारात्रौचेतिद्विवारंकार्यः अशक्तैस्त्वेककाले-एवाद्विरावृत्त्यासहवाकार्यः बह्वृचतैत्तिरीययोर्लौकिकाग्नौपाकोवैश्वदेवश्चेति-प्रायेणाचारः ॥

**दिनपञ्चभागकर्म**—कांडण, दळण, चूल, पाणी भरणें व केरसुणी—अशीं हीं पांच कामें (नकळत) हिंसा होण्याचीं असल्यानें त्यांना (शास्त्रांत) पञ्चसूना असें म्हटलें आहे. हीं (हिंसारूप) पातकें नाहींशीं होण्या-साठीं गृहस्थानें वैश्वदेव करावा. वैश्वदेव प्रातःकाळींच (दिवसां) करावा. अग्नि-होत्राप्रमाणें तो सायंकाळीं करूं नये. 'प्रातःसायंवैश्वदेवाख्यः कर्म करिष्ये' असा त्याचा संकल्प करावा. पञ्चमहायज्ञ जे रोज करावेत, ते हेः—ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ आणि मनुष्ययज्ञ. यांपैकीं ब्रह्मयज्ञ (प्रकार मागें) सांगितला. मनुष्ययज्ञ म्हणजे मनुष्यांना अन्नदान करणें. तैलक्षारांवाचून घरांत शिजवलेले खाण्याचे पदार्थ तुपांत मिश्रित करून गृह्याग्नीवर किंवा लौकिकाग्नीवर हवन करावेत. ज्या अग्नीवर सैंपाक केला असेल त्यावरच होम करावा. वैश्वदेवान्तर्गत करण्याच्या पितृयज्ञानें श्राद्धसिद्धि (पितरांची शान्ति) होते म्हणून रोजच्या श्राद्धाला ब्राह्मणभोजनाची जरूरी नाहीं. याच पितृयज्ञानें दर्शश्राद्धाचीसुद्धां सिद्धि होत असल्यानें, ज्याला शक्ति नसेल त्यानें दर्शश्राद्धही वर्षांतून एकदांच करावें, असें भट्टोजी दीक्षितांच्या ग्रन्थांत म्हटलें आहे. सुतकांत पञ्चमहायज्ञ करूं नये असें सांगितलें आहे. वैश्वदेव हा स्वतःच्या व अन्नाच्या संस्काराकरितां करायचा आहे, म्हणून विभक्त नसलेल्या भावांचा एकच सैंपाक असेल तर एकच वैश्वदेव करावा. विभक्त असतांही जरी

एकच सैंपाक असला, तरी हविष्यान्नानें निराळा वैश्वदेव करावा. विभक्त नसतां जर पाक दोन असतील, तर निराळे वैश्वदेव कृताकृत ( करणें न करणें ) आहे, असें भट्टोजी दीक्षित सांगतात. एकादशी वगैरे उपासाच्या दिवशीं सैंपाक करणें अशक्य असल्यास—तांदूळ, दूध, दहीं, तूप, फळ किंवा पाणी यांपैकीं शक्य असेल त्यानें वैश्वदेव करावा. अन्नाचा वैश्वदेव हातानें करावा व पाण्याचा ओंजळीनें करावा. कोद्रु, चणे, उडीद, मसुरा, कुळीथ, क्षार व मीठ—हीं वैश्वदेवाला वर्ज्य आहेत. प्रवाशानें आपल्या घरांतला वैश्वदेव मुलगा किंवा ऋत्विक् यांजकडून करवावा. घरांत करण्यासारखें कोणी नसल्यास स्वतःच प्रवासांत करावा. ऋग्वेदी व तैत्तिरीय यांनीं दिवसां व रात्रीं असा दोन वेळ वैश्वदेव करावा. जे दोन वेळां करण्यास असमर्थ असतील त्यांनीं, एकदांच एकतंत्रानें किंवा द्विरावृत्तीनें ( दुप्पट ) करावा. ऋग्वेदी व तैत्तिरीय यांचा सैंपाक व वैश्वदेव हे दोन्ही एकाच लौकिकाग्नीवर करण्याचा बहुधा प्रघात आहे.

अथप्रातःसायंवैश्वदेवस्यसहकरणपक्षेतन्त्रप्रयोगः तत्रवैष्णवैर्भगवते-षोडशोपचारेषुदीपान्तानुपचारान्समर्प्यसर्वान्नात्पुरुषाहारपर्याप्तंनैवेद्यंसम-र्प्यशेषान्नेनवैश्वदेवःकार्यः वैष्णवभिन्नैस्तुवैश्वदेवान्तेतच्छेषेणनैवेद्यः कार्यः विष्णोर्निवेदितान्नेनयष्टव्यंदेवतान्तरम् । पितृभ्यश्चापितद्देयंतदानन्त्यायकल्पते ॥ १ ॥ इत्यादिवचनानांवैष्णवविषयकत्वस्यनिबन्धकारैरुक्तत्वात् अत्रवैष्णवा-नारायणाष्टाक्षरादिवैष्णवमन्त्रदीक्षोपदेशजपवन्तोमुख्याः उपदेशः कलौयुगइति स्मृत्यौपदेशमात्रस्यापिदीक्षासमफलत्वात् गौणाश्वपारंपर्यागतारुणोदयविद्धै-कादश्यनुपवासशुक्लकृष्णैकादश्युपवासादियत्किंचिद्धर्ममात्रपरामन्त्रोपदेशा-दिरहिताः ननुपाश्वरात्राद्यागमोक्तदीक्षांप्राप्तोहिवैष्णवः । इत्युक्तेः किंचि-द्धर्ममात्रानुष्ठानेनकथंवैष्णवत्वमितिचेत् गायत्र्यध्ययनादिक्षत्रियवैश्यसाधा-रणधर्मवतांयाजनाध्यापनप्रतिग्रहरूपासाधारणधर्मशून्यानां पित्रादिपरंपरया-वैश्यादिवृत्तिपराणामप्यव्यभिचरितैकगोत्रत्वादियत्किंचिद्ब्राह्मणधर्ममात्रेण-यथाब्राह्मणत्वंतदुचितसूतकाद्याचारश्चतथाकलियुगेकिंचिद्धर्मेणापिवैष्णवत्वं-तदुचिताचारश्चयुज्यते क्षत्रियाणांहिपुरोहितभेदेनगोत्रभेदस्तेनयद्वंशेषुपर-स्परंविवाहोनैवं ब्राह्मणेष्वितिस्पष्टम् एवं श्राद्धेपिनैवेद्यंसमर्प्य पितृभ्योन्ननिवे-दनंज्ञेयम् ममात्मान्नसंस्कारपञ्चसूनाजनितदोषपरिहारद्वाराश्रीपर० प्रातर्वै-देवंसायंवैश्वदेवंचसहतंत्रेणकरिष्ये कुण्डेस्थण्डिलादौवापचनाग्निंव्याहृतिभिः पावकनामानंप्रतिष्ठाप्यचत्वारिशृङ्गेतिध्यात्वापरिसमुह्यपर्युक्ष्यविश्वानिनइत्य-र्चनादिविधायघृताक्तसन्नमग्नावधिश्रित्यप्रोक्ष्योद्वास्याग्नेःपश्चान्निधायत्रिधावि-भज्यप्रथमभागंदेवेभ्यो जुहुयात् तद्यथा हृदिसव्यंकरंनिधायोत्तानहस्तेन सूर्यायस्वाहासूर्यायेदंन मम प्रजापतये० सोमायवनस्पतये० अग्नीषोमाभ्यां० इन्द्राग्निभ्यां० द्यावापृथिवीभ्यां० धन्वन्तरये० इन्द्राय० विश्वेभ्योदेवेभ्यः ब्रह्मणे इतिदशप्रातर्वैश्वदेवाहुतयः ।

**सांजसकाळचा एकदम वैश्वदेव**—वैष्णवांनीं भगवान् विष्णूला षोडशोपचारांपैकीं दीपापर्यंतचे उपचार केल्यावर सर्वान्नापैकीं एका पुरुषाला पुरेशा अन्नाचा नैवेद्य दाखवून, राहिलेल्या अन्नानें वैश्वदेव करावा. आणि जे वैष्णव नसतील त्यांनीं आधीं वैश्वदेव करून, त्यांतल्या शिल्लक राहिलेल्या अन्नानें वैश्वदेव करावा. असें करण्याचें कारण इतकेंच कीं, विष्णूला अर्पण केलेल्या अन्नानें इतर देवतांचें यजन (यज्ञ) करावें. व तें अन्न पितरांनासुद्धां द्यावें म्हणजे अनन्त फल मिळतें वगैरे वचनें वैष्णवांसंबंधानें असल्याचें निबन्धकार सांगतात. नारायणाचा आठ अक्षरांचा मंत्र वगैरे वैष्णवी दीक्षेचा उपदेश घेऊन त्याचा जप करणारे जे तेच मुख्य वैष्णव होत. कलियुगांत उपदेश घ्यावा—या स्मृतिवचनाप्रमाणें—केवळ उपदेश घेण्यानेंच दीक्षेचें फळ मिळतें. परंपरेला धरून करण्याचा जो अरुणोदयविद्ध एकादशीचा उपास तो न करतां, शुक्ल व कृष्ण एकादशांच्या उपासांसारखेंच केवळ थोडेंसें धर्मकर्म करणारे आणि ज्यांना मंत्रोपदेश झालेला नाहीं ते गौण वैष्णव होत. पाञ्चरात्रादि शास्त्रांत सांगितलेली दीक्षा घेतलेला जो तोच वैष्णव—या वचनानुसारें जे किंचित् धर्मकर्म करणारे ते वैष्णव कसे? अशी शंका घेतली असतां, त्याचें समाधान जें करतां येतें तें येणेंप्रमाणें:—गायत्री व शिक्षण या ज्या गोष्टी क्षत्रिय आणि वैश्य यांना समान आहेत. त्यांचेंच फक्त आचरण करणारे; यज्ञ करणें, शिक्षण देणें व दान घेणें हा जो ब्राह्मणी धर्म त्याप्रमाणें न वागणारे आणि वडिलार्जित अशा परंपरेनें आलेल्या व्यापारांत मग्न झालेले—हे समान गोत्री व जरासा ब्राह्मणी धर्म पाळणारे जसे समजले जातात व ते जसे ब्राह्मण्याला उचित असा अशौचादि धर्माचाही अवलंब करतात, तद्वतच कलियुगांत किंचित्सा जरी धर्म आचरिला, तरी वैष्णवत्व व वैष्णवांना योग्य असाच तो आचार होय. पुरोहितांच्या (उपाध्याय) गोत्रांच्या भेदानें क्षत्रियांचीं गोत्रें जीं निरनिराळीं होतात, त्यामुळें यदुवंशांत जशीं एकमेकांत लग्नें लागलीं, तद्वत् ब्राह्मणांत होत नाहीं हें स्पष्टच आहे. याप्रमाणेंच श्राद्धांतसुद्धां नैवेद्य दाखवून पितरांना (वैश्वदेवालाही) अन्न अर्पण करावें. वैश्वदेवाचा संकल्पः—'ममात्मान्नसंस्कारपञ्चसूनाजनितदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातर्वैश्वदेवं सायंवैश्वदेवं च सहतंत्रेण करिष्ये'—असा संकल्प केल्यावर, कुंडांत किंवा स्थण्डिलावर पचनाग्नीची व्याहृतिमंत्रांनीं पावकाग्नि या नांवानें स्थापना करावी, आणि—'चत्वारिश्रृंगा०' या मंत्रांनीं त्याचें ध्यान केल्यावर परिसमूहन व पर्युक्षण करावें. 'विश्वानिनः०' या मंत्रानें अर्चन करून, तूपभात अग्नींत शिजल्यासारखें करावें. व त्यावर प्रोक्षण (पाणी शिंपडणें) केल्यावर तो उत्तरेकडून अग्नीच्या पश्चिमभागीं (आपल्यापुढें) ठेवावा आणि त्याचे तीन (सारखे) भाग करावे. हे भाग करतांना आपल्या हृदयावर आपला डावा हात ठेवून उजव्या हातानें आहुति द्याव्या. दिवसां देण्याच्या दहा आहुति येणेंप्रमाणें:—'सूर्याय स्वाहा सूर्याय इदं न मम। प्रजापतये०। सोमाय वनस्पतये० अग्नीषोमाभ्यां०।

इन्द्राग्निभ्यां० । द्यावापृथिवीभ्यां० । धन्वन्तरये० । इन्द्राय० । विश्वेभ्यो देवेभ्य० । ब्रह्मणे० ।'

अथसायंवैश्वदेवीयाः । अग्नयेस्वाहेति हुत्वाप्रजापतयइत्यादिपुनर्नवजुहुयात् एवंविंशत्याहुतीर्हुत्वाप्रायश्चित्तार्थंव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्हुत्वानहुत्वावापरिसमूहनपर्युक्षणेकुर्यात् ओंचमइत्युपतिष्ठेत् इतिदेवयज्ञः ॥

**सन्ध्याकाळच्या आहुति**—'अग्नये स्वाहा० ।' ही आहुति देऊन पुन्हा 'प्रजापतये स्वाहा० ।' वगैरे नऊ आहुति द्याव्या. अशा या वीस आहुति एकंदर द्याव्या. प्रायश्चितार्थ 'व्यस्तसमस्तव्याहृति'–मंत्रांनीं हवन करणें वैकल्पिक (करावें व करूंही नये असें) आहे. त्यानंतर परिसमूहन (अग्नीच्या भोंवतालीं झाडणें) आणि पर्युक्षण (झाडलेल्या जागेवर पाणी शिंपडणें) केल्यावर–'ॐ च मे०' या मंत्रानें उपस्थान करावें. असा हा देवयज्ञ आहे.

अथबलिहरणाख्योभूतयज्ञः द्वितीयभागाद्गृहीत्वाशुद्धभूमौ सूर्यायस्वाहासूर्यायेदंनममेत्येवंदशाहुतीःप्राक्संस्थानिरन्तराहुत्वामध्येन्तरालंत्यक्त्वा अद्भ्यःस्वाहा ओषधिवनस्पतिभ्यः० गृहाय० गृहदेवताभ्यः० वास्तुदेव० इतिप्राक्संस्थाहुत्वा अद्भ्यआहुतेःपश्चात् इन्द्राय० तदुत्तरेइन्द्रपुरुषेभ्यः० अन्तरालस्यदक्षिणे यमाय० यदुत्तरे यमपुरुषेभ्यः० ब्रह्मण आहुतेःप्राक् वरुणाय० तदुत्तरे वरुणपुरुषेभ्यः० अन्तरालस्योत्तरे सोमाय० तदुत्तरे सोमपुरुषेभ्यः० अन्तराले ब्रह्मणे० ब्रह्मपुरुषेभ्यः० विश्वेभ्योदेवेभ्यः० सर्वेभ्योभूतेभ्यः० दिवाचारिभ्यः० सोमपुरुषोत्तरे रक्षोभ्यः एवमेवसूर्यस्थानेप्रथनमग्नयेहुत्वाप्रजापतयइत्यादिपूर्ववत्सायंवैश्वदेवसंबन्धिद्वितीयबलिहरणंकुर्यात् तत्रदिवाचारिभ्यइत्यस्यस्थानेनक्तंचारिभ्यःस्वाहेतिजुहुयादितिविशेषः इतिभूतयज्ञः ॥

**बलिहरण नांवाचा भूतयज्ञ**—(मागें जे भाताचे तीन भाग करण्यास सांगितले, त्यांतला एक भाग आहुतींना गेला व बाकी जे दोन राहिले त्यांतला एक) दुसरा भाताचा भाग घेऊन स्वच्छ (शुद्ध) जागेवर–'सूर्याय स्वाहा सूर्याय इदं न मम।' अशा (मागें सांगितलेल्या) दहा आहुति पूर्वेकडे एकीच्या पुढें दुसरी अशा घालाव्या. मध्यें थोडें अंतर सोडून पुन्हा पूर्वेकडे 'अद्भ्यः स्वाहा० । ओषधिवनस्पतिभ्यः० । गृहाय० । गृहदेवताभ्यः० । वास्तुदेव० ।' अशा आहुति मांडाव्या. 'अद्भ्यः' या आहुतीच्या पश्चिमेस–'इन्द्राय स्वाहा' व हिच्या उत्तरेस –'इन्द्रपुरुषेभ्यः स्वाहा' अशा आहुति द्याव्या. मध्यें सोडलेल्या जागेच्या दक्षिणेस 'यमाय०' व हिच्या उत्तरेस 'यमपुरुषेभ्यः०' अशा आहुति ठेवाव्या. 'ब्रह्मणेस्वाहा०' या आहुतीच्या पूर्वेस 'वरुणाय०' व हिच्या उत्तरेस 'वरुणपुरुषेभ्यः०' अशा आहुति मांडाव्या. मध्यभागीं सोडलेल्या जागेच्या उत्तरेस–'सोमाय०' व हिच्या उत्तरेस–'सोमपुरुषेभ्यः०' अशा आहुति ठेवाव्या. मध्यें सोडलेल्या जागीं 'ब्रह्मणे० । ब्रह्मपुरुषेभ्यः० । विश्वेदेवेभ्यः० । सर्वेभ्यो भूतेभ्यः० । दिवाचारिभ्यः० ।' अशा आहुति देऊन–'सोमपुरुषेभ्यः०' या आहुतीच्या उत्तरेस

—'रक्षोभ्यः०' अशी आहुति ठेवावी. सन्ध्याकाळचा वैश्वदेव असा जरी करावा, तरी पहिल्यांदा सूर्याच्या (आहुतीच्या) जागीं अग्नीला आहुति देऊन मग—'प्रजापतये०' वगैरे पूर्वीप्रमाणेंच द्याव्या आणि बलिहरण संपवावें. 'दिवाचारिभ्यः०' च्या जागीं 'नक्तंचारिभ्यः०' अशी आहुति द्यावी, असा हा भूतयज्ञांतला विशेष आहे.

प्राचीनावीती तृतीयभागादादायस्वधापितृभ्यः इति यमबलेर्दक्षिणतो दत्त्वापितृभ्य इदं न ममेतित्यक्त्वा द्वितीयबलेर्दक्षिणतः द्वितीयपितृयज्ञमेवं कुर्यात् इति पितृयज्ञः ॥

**पितृयज्ञ**—वरचें भूतयज्ञाचें काम संपल्यावर डाव्या हातांत जानवें (प्राचीनावीती) घालून, भाताच्या उरलेल्या तिसऱ्या भागांतला थोडा भात घेऊन यमाच्या आहुतीच्या दक्षिणेस—'स्वधा पितृभ्यः पितृभ्य इदं न मम।' अशी आहुति द्यावी. दुसऱ्या दक्षिणभागींही पितृयज्ञच करावा.

अपरे चक्राकारंबलिमाहुः बलावनुद्धृतेनाद्यान्नोद्धरेच्चस्वयंबलिम् । ततोगृहाङ्गणेभूमावपआसिच्य ऐन्द्रवारुणवायव्यांयाम्यांनैर्ऋतिकाश्चये । तेकाकाः प्रतिगृण्हन्तुभूम्यांपिण्डंमयोज्झितम् १ इतिपितृयज्ञशेषेणदत्वा वैवस्वतकुलेजातौद्वौश्यामशबलौशुनौ । ताभ्यांपिण्डोमयादत्तोरक्षेतांपथिमांसदा १ येभूताःप्रचरन्ति० इतिद्वयंभूतयज्ञशेषेणदद्यात् येभूताइतिमन्त्रेतन्त्रेणवैश्वदेवप्रयोगेदिवानक्तंबलिमितिपाठः अह्निरात्रौचपृथक्प्रयोगे दिवाबलिमिच्छन्तोनक्तंबलिमिच्छन्तइतिविभागेनपाठः प्रक्षालितपाणिपादआचम्य गृहंप्रविश्यशान्तापृथिवीत्यादिजपित्वाविष्णुंस्मृत्वाकर्मार्पयेत् ॥

**शेषान्नबलिदान**—दुसरे ग्रंथकार बलिदान वाटोळ्या आकाराचें करावें असें सांगतात. बलिहरण स्वतः काढून टाकूं नये व तें काढून टाकल्यावांचून जेवूं नये. घराच्या अंगणांतल्या जमिनीवर पाणी शिंपडून त्यावर ऐन्द्रवारुणवायव्यां याम्यां नैर्ऋतिकाश्च ये। ते काकाः प्रतिगृह्णन्तु भूम्यां पिण्डं मयोज्झितम्।'—अशा उच्चारानें पितृयज्ञशेषान्नांतील आहुति द्यावी, व 'वैवस्वतकुले जातौ द्वौ श्यामशबलौ शुनौ ताभ्यां पिण्डो मया दत्तो रक्षेतां पथि मां सदा। ये भूताः प्रचरन्ति०' हे दोन मंत्र नंतर म्हणून बाकीच्या सर्व भाताची आहुति (जमिनीवर) द्यावी. सांजसकाळचा प्रयोग (वैश्वदेव) एकदमच (दिवसां) करणें असल्यास, 'ये भूताः०' या मंत्रांत 'दिवानक्तं बलिमिच्छन्तः' असा पाठ म्हणावा, आणि दोन्ही वेळचे वैश्वदेव दोन वेळ निरनिराळे करायचे असल्यास दिवसाच्यांतून—'नक्तं' हा शब्द गाळावा आणि रात्रीच्यांतून—'दिवा' हा शब्द गाळावा आणि बलिदानानंतर हातपाय धुऊन आचमन केल्यावर घरांत जाऊन—'शान्ता पृथिवी०'—हा मंत्र म्हणावा आणि विष्णूचें स्मरण केल्यावर, त्यालाच सर्व कर्म अर्पण करावें.

अथ मनुष्ययज्ञः। अतिथिभोजनपर्याप्तंवा षोडशग्रासमितंवा ग्रासचतुष्टयंवा ग्रासमितंवान्नं सनकादि मनुष्येभ्योहंत इदं नममेमति दद्यात् बहुषुभिक्षुकेष्वागतेष्वशक्तेनत्रिभ्योग्रासत्रयं देयम् ॥

**मनुष्ययज्ञ**—एका अतिथीला जेवायला पुरेल इतकें किंवा सोळा घांस, चार घांस अथवा एक घांस अन्न—'सनकादि मनुष्येभ्योहंत इदं न मम'—असें म्हणून द्यावें. बरेच भिक्षु ( आगांतुक भिकारी ) आले असल्यास व तितक्यांना अन्न देणें शक्य नसल्यास तिघांना तीन घांस द्यावे.

अथदेवयज्ञादिचतुष्टयम् । देवयज्ञेनयक्ष्येइतिसंकल्प्याग्निंपरिषिच्यदेवेभ्यः स्वाहेत्यग्नौहुत्वोत्तरपरिषेकः प्राचीनावीती पितृयज्ञेनयक्ष्ये दक्षिणतो भूमौ· पितृभ्यःस्वधास्तुइतिदत्त्वात्यक्त्वा परिषिच्य यज्ञोपवीतीअपःस्पृष्ट्वा भूतयज्ञेन-यक्ष्ये भूतेभ्योनमइतिभूमौदत्त्वापरिषिच्य निवीती मनुष्ययज्ञेनयक्ष्ये उक्तप्रमाणमन्नं मनुष्येभ्योहंतेतिदद्यात् सर्वयज्ञेषुआद्यन्तयोःक्रमेणविद्युदसि-वृष्टिरसीतिमंत्रयोः पाठः प्रायेणैषाम् बलिशिष्टमन्नं येभूताः प्रचरन्तीति-गृहाङ्गणेगत्वाकाशेउत्क्षिपेत् ततोयथाचारंश्ववायसादिबलिः ॥

**देवयज्ञादि चार यज्ञ**—'देवयज्ञेन यक्ष्ये।'—असा संकल्प करून अग्नीच्या भोंवतीं पाणी शिंपल्यावर ( परिषिञ्चन )—'देवेभ्यः स्वाहा'—या मंत्रानें अग्नींत आहुति देऊन ( उत्तरपरिषेक ) उत्तरेकडे पाणी शिंपडावें. डाव्या हातांत ( प्राचीनावीती ) जानवें घालून—'पितृयज्ञेन यक्ष्ये'—अशा संकल्पानें दक्षिणेकडच्या जमिनीवर—'पितृभ्यः स्वधास्तु'—म्हणून आहुति द्यावी आणि ( परिषेचन ) पाणी शिंपडावें. पुन्हा जानवें ( यज्ञोपवीती ) उजव्या हातांत घालून पाण्याला स्पर्श केल्यावर—'भूतयज्ञेन यक्ष्ये भूतेभ्योनमः'—अशा उच्चारानें जमिनी-वर आहुति देऊन ( परिषिञ्चन ) पाणी शिंपडावें. माळेसारखें गळ्यांत जानवें करून—'मनुष्ययज्ञेन यक्ष्ये'—अशा संकल्पानंतर ( मागें ) सांगितलेल्या प्रमाणाचें अन्न—'मनुष्येभ्यो हन्त०'—या मंत्रानें द्यावें. सर्व यज्ञांत सुरुवातीला व शेवटीं —'विद्युदसि०' आणि 'वृष्टिरसि०'—हे मंत्र अनुक्रमें बहुधा तैत्तिरीय शाखी म्हणतात. बलिहरणांतला शिल्लक राहिलेला भात, अंगणांत जाऊन—'ये भूताः प्रचरन्ति०'—या मंत्रानें आकाशांत उडवावा व नंतर परिपाठाप्रमाणें कुतरें, कावळा वगैरेकरितां बलि द्यावा.

अथकातीयानाम् तत्रसाग्निकानामेकपाकेनैवश्राद्धदिनेआदौवैश्वदेवः अन्येषामन्ते आवसथ्योल्मुकंमहानसेकृत्वातत्रपाकंविधाय महानसस्थाङ्गारान्-गृह्याग्नौनिधायपाकादन्नंघृताक्तमादायपूर्ववदात्म० र्थं वैश्वदेवाख्यंकर्मकरिष्य-इतिसंकल्पः अथवादेवभूतपितृमनुष्यान्वैश्वदेवान्नेन यक्ष्ये गृह्याग्निंमणिको-दकेनपर्युक्ष्यहस्तेनाग्नौजुहुयात् ब्रह्मणेस्वाहाइदंब्रह्मणेनमम एवमग्रेपि प्रजाप-तये० गृह्याभ्यः कश्यपाय० अनुमतये० इतिदेवयज्ञः ततोमणिकसमीपेबलित्रय-मुदक्संस्थम् पर्जन्यायनमःस्वाहाइदंपर्जन्यायनमम अद्भ्योन० पृथिव्यैन० अथ द्वार्यशाखयोःप्राक्संस्थंबलिद्वयम् धात्रे० विधात्रे० उदकेनचतुरस्रंकृत्वा-तत्रपूर्वेवायवे० दक्षिणेवायवे० पश्चिमेवायवे० उत्तरेवायवे प्रागादिषुवायु-बलेःप्रागुदग्वा प्राच्यैदिशे० दक्षिणस्यैदि० प्रतीच्यैदि० उदीच्यैदि० मध्ये-

प्राक्संस्थम् ब्रह्मणे० अन्तरिक्षाय० सूर्याय० एषामुत्तरे विश्वेभ्योदेवेभ्यो० विश्वेभ्योभूतेभ्यो० अस्योत्तरत उषसे० भूतानांचपतये० इतिभूतयज्ञः प्राचीनावीती ब्रह्मादिबलिभ्यस्यदक्षिणेपितृतीर्थेन पितृभ्यःस्वधानमइदंपितृभ्यो-नममेतिदद्यात् इतिपितृयज्ञः ॥

**कात्त्यायनी वैश्वदेव**—साग्निकांनीं ( गृह्याग्नि ठेवणारांनीं ) श्राद्धाच्या दिवशीं आधीं वैश्वदेव करून मग त्याच पाकानें श्राद्ध करावें. इतरांनीं भागून वैश्वदेव करावा. गृह्याग्नींतला विस्तव सैंपाकघरांत नेऊन त्यावर सैंपाक करावा. सैंपाकघरांतले निखारे गृह्याग्नींत न्यावेत. सैंपाकांतला भात तुपांत मिळवावा. 'आत्मसंस्कारार्थमन्नसंस्कारार्थं वैश्वदेवाख्यं कर्म करिष्ये'—असा पहिल्या-सारखाच किंवा—'देवभूतपितृमनुष्यान् वैश्वदेवान्नेन यक्ष्ये'—असाहि संकल्प करावा. गृह्याग्नीभोंवतीं तांब्यातलें पाणी (कलशोदक) शिंपडून, हातानें अग्नींत आहुति द्याव्या त्या येणेंप्रमाणें:—'ब्रह्मणे स्वाहा इदं ब्रह्मणे न मम। प्रजापतये० ।गृह्याभ्य० ।कश्यपाय० । अनुमतये० ।' येथें देवयज्ञ संपला. त्यानंतर कलशाजवळ उत्तरेकडे जाणाऱ्या आहुति द्याव्या त्या अशा:—'पर्जन्यायनमः स्वाहाः इदं पर्जन्याय न मम। अद्भ्योन० पृथिव्यैन०।' दाराच्या रस्त्यांत पूर्वेच्या बाजूला जाणाऱ्या दोन आहुति—'धात्रे० । विधात्रे० ।'—अशा द्याव्या. पाण्याचें चौकोनी मंडळ काढून त्यावर पूर्वेकडे—'वायवे०'—दक्षिणे-कडे—'वायवे०'—पश्चिमेकडे—'वायवे०' आणि उत्तरेकडे—'वायवे०'—अशा (चार) आहुति द्याव्या. पूर्वादि दिशांकडून वायुबलीच्या पूर्वेस किंवा उत्तरेस—'प्राच्यै दिशे० । दक्षिणस्यै दिशे० । व उदीच्यै दिशे० ।'—अशा तीन आहुति द्याव्या. मध्यभागीं पूर्वेकडे जाणाऱ्या अशा—'ब्रह्मणे० । अन्तरिक्षाय० । सूर्याय० ।'—आहुति द्याव्या. त्यांच्या उत्तरेस—'विश्वेभ्यो देवेभ्यो० । विश्वेभ्यो० भूतेभ्यो० ।'—अशा आहुति द्याव्या. यांच्या उत्तरेस—'उषसे० । भूतानांच पतये० ।' अशा आहुति द्याव्या. येथें भूतयज्ञ संपला. डाव्या हातांत जानवें ( प्राचीनावीती ) घालून, ब्रह्मादि तीन आहुतींच्या दक्षिणेस ( पितृतीर्थानें ) हाताचा अंगठा व त्याच्या जवळचें ( तर्जनी ) बोट यांच्या मधल्या जागेंतून—'पितृभ्यः स्वधा नमः इदं पितृभ्यो न मम ।'—अशी आहुति द्यावी. पितृयज्ञ येथें संपला.

पात्रंप्रक्षाल्यसव्येनब्रह्मादिबलितोवायव्यांयक्ष्मैतत्तेनिर्णेजनामितितज्जलं-निनयेत् पूर्ववन्मनुष्ययज्ञः निरग्निकस्तु लौकिकाग्निमाहृत्यपृष्टोदिवीतिप्रति-ष्ठाप्यतत्सवितु० तां सवितु० विश्वानिदेव० इति त्रिभिःसावित्रैःप्रज्वाल्य-तत्रनित्योपासनहोमं कृत्वापाकंपचेद्वैश्वदेवंचकुर्यादितिगदाधरः अत्राप्यश-क्तौबह्वृचाद्युक्तरीत्यापचनाग्निंप्रतिष्ठाप्यध्यात्वासंपूज्यतत्रपूर्वोक्तरीत्यावैश्व-देवस्तत्रअग्नयेस्विष्टकृतेस्वाहेतिपश्चाहुतीनामुत्तरंहोमःसर्वत्रनिरग्नेरितिविशेषः शेषंप्राग्वत् कात्यायनानांदिवैवैकोवैश्वदेवोनद्वितीयोरात्रौ सामगाथर्वणैरपि-स्वगृह्योक्तरीत्यापञ्चमहायज्ञाः कार्याःस्वगृह्यानुपलम्भेबह्वृचोक्तरीत्योपनय-नादिसंस्काराःपञ्चमहायज्ञादयश्चकार्याः ॥

**कात्यायनी वैश्वदेवशेषकर्म**—भाताचें भांडें पाण्यानें ( प्रक्षालन ) धुऊन तें पाणी उजव्या बगलेखालीं जानवें ( सव्य ) असतांना, ब्रह्मादि आहुतींच्या वायव्येस 'यक्ष्मै तत्ते निर्णेजनम्०'–या मंत्रानें द्यावें. मनुष्ययज्ञ मागीलप्रमाणेंच करावा. ज्याच्या घरीं गृह्याग्नि नसेल ( निरग्नि ) त्यानें लौकिकाग्नि ( साधा विस्तव ) घेऊन–'पृष्टो दिवि०'–या मंत्रानें त्याची स्थापना करावी, आणि–'तत्सवितु० । ताऽँसवितु० व विश्वानि देव०'—या तीन सूर्याच्या ( सवितृ ) मंत्रांनीं तो प्रज्वलित करावा. त्यावर औपासनहोम व भात करून त्यानें वैश्वदेव करावा, असें गदाधर सांगतो. असें करण्याचीही ज्याच्या अंगीं शक्ति नसेल त्यानें, ऋग्वेद्यांच्या कर्मांत सांगितल्याप्रमाणें पचनाग्नि मांडून त्याची ध्याना-सह पूजा केल्यावर त्यावर, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें वैश्वदेव करावा. पहिल्या पांच आहुति दिल्यावर–' अग्नये स्विष्टकृते स्वाहा '–असें म्हणून सहावी आहुति द्यावी. निरग्निकांचा हाच सर्वत्र विशेष समजावा. बाकीचें कर्म मागिल प्रमाणेंच करावें. कात्यायनांनीं दिवसां एकदांच वैश्वदेव करावा, रात्रीं दुसऱ्यांदां करूं नये. सामवेदी व अथर्वणवेदीयांनींसुद्धां त्यांच्या गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणें पञ्च महायज्ञ करावेत. ज्यांना गृह्यसूत्र न मिळेल त्यांनीं ऋग्वेद्यांच्या रीतीनें उपनयनादि संस्कार करावे.

शाखान्तरमतंसम्यगनालोच्यस्वधाष्टर्यतः । शाखान्तराह्निकंप्रोक्तंज्ञात्वा-शोध्यंस्वशाखिभिः १ इक्षूनपः फलंमूलंताम्बूलंपयऔषधम् । भक्षयित्वाऽ-पिकर्तव्याःस्नानदानादिकाः क्रियाः २ पञ्चमहायज्ञेष्वन्यतमस्यलोपेउपवासः धनिकस्यातुरस्यचप्रतियज्ञंकृच्छ्रार्धम् अन्येत्वेकाहं लोपेमनस्वत्याहुतिःद्व्य-हेत्र्यहंलोपेतिसृभिस्तंतुमतीभिर्होमोवारुणीनांचतसृणांजपोद्वादशाहंलोपेतंतु-मतीस्थालीपाकोवारुणीभिराज्यहोमश्चेत्याहुः ॥

**पञ्चमहायज्ञलोपप्रायश्चित्त**—( माझ्या शाखेवांचून ) इतर शाखांचें मत, मीं नीटपणें पाहिल्याशिवाय धीटपणानें त्यांचें आह्निक ( येथपर्यंत ) सांगितलें असल्यानें, त्यांनीं आपापलें आह्निक शोधून पाहावें. ऊंस, पाणी, फळ, मूळ, विडा, दूध व औषध–हीं खाल्लीं असतील तरी त्यांवर स्नानादिक क्रिया कराव्या. पञ्चमहायज्ञांपैकीं एकाद्याचा लोप झाल्यास उपास करावा. श्रीमान् व आजारी यांनीं प्रत्येक यज्ञलोपाबद्दल अर्धकृच्छ्रप्रायश्चित्त करावें. दुसरे ग्रन्थकार म्हणतात कीं, एक दिवस लोप झाल्यास–'मनस्वति०' आहुति द्यावी दोन किंवा तीन दिवस लोप झाल्यास–'तन्तुमती०' आहुति द्यावी आणि वरुणाच्या चार ऋचांचा जप करावा आणि बारा दिवस लोप झाल्यास तन्तुमतीस्थालीपाक करून वरुणऋचांनीं होम करावा.

अथतैत्तिरीयाणाम् । श्राद्धदिनेभिन्नपाकेनादौवैश्वदेवःदेवयज्ञादिचतुष्टयं-चभवति अपरेआदौवैश्वदेवांतेतुपंचमहायज्ञाइत्याहुः याजुषाः सामगाः पूर्वं-मध्येकुर्वंत्यथर्वणाः बह्वृचाः श्राद्धशेषेणतत्राप्यादौतुसाग्निकाः स्वर्गपुष्ट्यर्थं-

मात्मसंस्कारार्थंप्रातःसायंवैश्वदेवौतंत्रेणकरिष्ये औपासनाग्निंपचनाग्निंवा- प्रतिष्ठाप्यितमौपासनहोमवत्परिसमुह्यपरिषिच्यान्नमग्नावधिश्रित्य प्रोक्ष्योद्वा- स्याभिघार्याग्निंसंपूज्यान्नंत्रेधाविभज्य हस्तेनजुहुयात् अग्नयेस्वाहा विश्वेभ्यो- देवेभ्यः० ध्रुवायभूमाय० ध्रुवक्षितये० अच्युतक्षितये० अग्नयेस्विष्टकृते० परि- समुह्यपर्युक्ष्य अग्नेः पश्चादेकत्रैवदेशेव्यजनाकारश्चक्राकारोवाबलिः तत्र- देवताः धर्मायस्वाहा धर्मायेदं० अधर्माय० अद्भ्यः० ओषधिवनस्पतिभ्यः० रक्षोदेवजनेभ्यः० गृह्याभ्यः० अवसानेभ्यः० अवसानपतिभ्यः सर्वभूतेभ्यः० कामाय:० अंतरिक्षाय० यदेजतिजगतियच्चचेष्टतिनाम्नोभागोयन्नाम्नेस्वाहा नाम्नइदं० केचिद्वायवइदमितित्यागमाहुः पृथिव्यैस्वाहा अंतरिक्षाय० दिवे० सूर्याय० चंद्रमसे० नक्षत्रेभ्यः० इंद्राय० बृहस्पतये० प्रजापतये० ब्रह्मणे० सर्वान्सकृत्परिषिच्यपृथक्पृथक्परिषेचनपक्षे द्वावेकंद्वेचचत्वारिप्रत्येकंत्रीणि- चैवहि पृथिव्यादिदशस्यैकमतऊर्ध्वंपृथक्क्रमादितिज्ञेयं प्राचीनावीती तद्दक्षिणतः स्वधापितृभ्यःस्वाहा तदुत्तरतउपवीती नमोरुद्रायपशुपतयेस्वाहा पितृरुद्रबलीपृथक्परिषिंचेत् इतिवैश्वदेवः ॥

**तैत्तिरीय वैश्वदेवप्रयोग**—तैत्तिरीय शाखेच्यांनीं श्राद्धाच्या दिवशीं निराळा भात करून, श्राद्धाच्या आधीं वैश्वदेव आणि देवयज्ञादि चार यज्ञ करावेत. यजुःशाखीय व सामवेदी यांनीं श्राद्धाच्या आधीं वैश्वदेव करावा. सामवेद्यांनीं श्राद्धाच्या मध्यें वैश्वदेव करावा. आणि ऋग्वेद्यांनीं श्राद्धानंतर श्राद्धांतल्या उरलेल्या भातानें करावा. साग्निक ऋग्वेद्यांनीं श्राद्धाच्या आधीं वैश्वदेव करावा. वैश्वदेवाचा संकल्पः—'स्वर्गपुष्ट्यर्थं आत्मसंस्कारार्थं प्रातः- सायंवैश्वदेवौ तंत्रेण करिष्ये ।'—असा संकल्प करून, औपासनाग्नि किंवा स्थापन केलेला पचनाग्नि ( ज्यावर स्वयंपाक केला तो ) याला औपासनहोमाप्रमाणें परि- समूहन व परिसिञ्चन करून, अग्नीवर भात थोडा ऊन केल्यासारखें करावें आणि त्यावर पाणी शिंपडून ( प्रोक्षण ) तो खालीं उतरल्यावर त्यावर तूप घालून त्याला अग्नीच्या पश्चिमेस ( आपल्यापुढें ) ठेवावा. नंतर अग्नीची पूजा करून त्या भाताचे तीन विभाग करावेत. त्यांतल्या पहिल्या भागाचा जो होम हातानें करावा, त्याचे मंत्रः—'अग्नये स्वाहा अग्नय इदं न मम । विश्वेभ्यो देवेभ्यः० । ध्रुवाय भूमाय० - ध्रुवक्षितये० । अच्युतक्षितये० । अग्नये स्विष्टकृते० ।' आहुती दिल्यानंतर परिसमू- हन आणि पर्युक्षण करून, अग्नीच्या पश्चिमेस ( आपल्या पुढच्या जमिनीवर ) एकाच जागीं विंझण्याच्या ( चौकोनी ) किंवा वर्तुळाच्या आकाराचें जें बलिहरण घालावें, त्यांतल्या आहुती येणेंप्रमाणें:—'धर्माय स्वाहा धर्माय इदं न मम । अध- र्माय० । अद्भ्यः० । ओषधिवनस्पतिभ्यः० । रक्षोदेवजनेभ्यः० । गृह्याभ्यः० । अव- सानेभ्यः० । अवसानपतिभ्यः० । सर्वभूतेभ्यः० । कामाय० । अन्तरिक्षाय० । यदे- जतिजगतियच्चचेष्टतिनाम्नो भागोयन्नाम्ने स्वाहा नाम्न इदं न मम । ' येथें कोणी ग्रन्थकार 'वायव इदं न मम ।' असा ( शेवटच्या आहुतीचा ) त्याग ( देणें )

करण्यास सांगतात. 'पृथिव्यै स्वाहा। अन्तरिक्षाय०। दिवे०। सूर्याय०। चन्द्रमसे०। नक्षत्रेभ्यः०। इन्द्राय०। बृहस्पतये०। प्रजापतये०। ब्रह्मणे०।' अशा आहुति देऊन त्यांवर पाणी शिंपडावें. निरनिराळें सिञ्चन ( पाणी शिंपडणें ) करणें असल्यास–धर्म व अधर्म या दोन आहुतींवर एकदम सिञ्चन, 'अद्भ्यः' या आहुतीवर सिञ्चन, 'ओषधिवनस्पति व रक्षोदेवजन'–या दोहींवर एकदम सिञ्चन, 'गृह्याभ्यः०, अवसान०, अवसानपति० व सर्वभूत०'–या चारींवर एकदम सिञ्चन, 'काम०, अन्तरिक्ष० व यदेजति०' या तिहींवर निरनिराळें तीनदां सिञ्चन, आणि 'पृथिवी पासून ब्रह्म' पर्यंतच्या दहा आहुतींवर एकदम सिञ्चन करावें. याच्या पुढच्या प्रत्येक आहुतीवर निराळें सिञ्चन करावें आणि मग अपसव्य करून, पृथिव्यादि दहा आहुतींच्या दक्षिणेस–'स्वधापितृभ्यः स्वाहा'-- ही आहुति दिल्यावर, उपवीती ( सव्य ) करून तिच्या उत्तरेकडे–'नमो रुद्राय पशुपतये स्वाहा।' ही आहुति द्यावी आणि पितर व रुद्र यांच्या आहुतींवर निरनिराळें पाणी ( सिञ्चन ) शिंपडावें. येथें वैश्वदेव प्रकरण संपलें.

अथसर्वसाधारणोभोजनादिविधिः। हैमेराजतेपात्रेआम्रादिपत्रेवाभोजनंशस्तम् एकएवतुभुञ्जीतकांस्यपात्रेनान्योच्छिष्टे ताम्बूलाभ्यञ्जनंचैवकांस्यपात्रेचभोजनम्। यतिश्चब्रह्मचारीचविधवाचविवर्जयेत् ॥ १ ॥ पलाशपर्णेषुयत्यादेःप्रशस्तम् गृहिणस्तुचान्द्रायणम्। इदंवल्लीपलाशविषयमितिस्मृत्यर्थसारेकदलीकुटजमधुजम्बूपनसाम्रचम्पकोदुम्बरपत्राणिशस्तानि अर्काश्वत्थवटादिपत्राणिनिषिद्धानि ॥

**सर्वसाधारण भोजनविधि**—सोन्यारुप्याच्या ताटांत किंवा आंब्याच्या पानांवर ( पत्रावळ ) जेवण करणें उत्तम. कांशाच्या भांड्यांत जेवायचें असल्यास, त्यांत ( आपणाशिवाय ) इतरांनीं जेवण करूं नये. कारण, दुसऱ्यांनीं जेवलेलें कांश्याचें भांडें उष्टें ( उच्छिष्ट ) झालेलें असतें. संन्यासी, ब्रह्मचारी आणि विधवा यांनीं–विडा खाणें, तैलाभ्यंग करणें व कांश्याच्या भांड्यांत जेवणें–हें सर्व वर्ज्य करावें. संन्याशादिकांनीं पळसाच्या पानांवर जेवावें. गृहस्थाश्रम्यानें पळसाच्या पानांवर जेवूं नये. व जेवल्यास, चान्द्रायण करावें. हें चान्द्रायण वल्लीरूप पलाशवृक्षासंबंधाचें होय–असें स्मृत्यर्थसारांत म्हटलें आहे. कदळ, कुडा, मोह, जांभूळ, फणस, आंबा, चांफा व उंबर–यांचीं पानें जेवायला उत्तम होत. रुई, पिंपळ, वड वगैरे झाडांचीं पानें ( भोजनाला ) निषिद्ध आहेत.

चतुरस्रमण्डलेप्रक्षालितपात्रंनिधायपञ्चयज्ञावशिष्टंघृतादियुतंपरिविष्टमन्नमस्माकंनित्यमस्त्वेतदितिवदन्नत्वाग्रन्थिरहितपवित्रयुतदक्षिणपाणिः पादाभ्यांपादेनवाभुवंस्पृशन्व्याहृतिभिर्गायत्र्याचाभिमन्त्र्य सत्यंत्वर्तेनपरिषिञ्चामीतिदिवा ऋतंत्वासत्येनपरिषिञ्चामीतिरात्रौपरिषेचनंकृत्वा अन्तश्चरतिभूतेषुगुहायांविश्वतोमुखः। त्वंयज्ञस्त्वंवषट्कारस्त्वंविष्णु।पुरुषःपरः॥ १ ॥ पात्राद्दक्षिणेभूमौ भूपतयेनमः भुवनपतयेनमः भूतानांपतये० इतित्रीन्बली-

न्दद्यात् यद्वा चित्राय० चित्रगुप्ताय० यमाय० यमधर्माय० सर्वेभ्योभूतेभ्य० इतिवा व्यस्तसमस्तव्याहृतिभिर्वाचत्वारः धर्मराजायचित्रगुप्तायेतिद्वौवा भूपत्यादित्रययुतावेताविति पञ्चवादेयाः हस्तपादमुखार्द्रः आपोशनार्थंजलमादाय अन्नंब्रह्मरसोविष्णु० अहंवैश्वानरोभूत्वेत्यर्थंध्यात्वावामकरेणपात्रंधृत्वाअमृतोपस्तरणमसीत्यपः प्राश्यमौनी ॐप्राणायस्वाहा ॐअपानायस्वाहा ॐव्यानाय० ॐउदानाय० ॐसमानाय० इतिसघृताः सक्षीरावापञ्चाहुतीः सर्वाङ्गुलिभिः सर्वग्रासंग्रसन् मुखेजुहुयात् ब्रह्मणेस्वाहेतिषष्ठीक्वचित् प्राणाहुतिपर्यन्तंपात्रालम्भोमौनंचनियतमग्नेऐच्छिकंद्वयम् भोजनंप्राङ्मुखंप्रत्यङ्मुखंवाशस्तं दक्षिणामुखंयशःफलंकाम्यम् उदङ्मुखमधमम् विदिङ्मुखंनिषिद्धम् कृत्स्नंग्रासंग्रसन्द्वात्रिंशदादिनियतग्रासमनियतग्रासंवाभुक्त्वाअमृतापिधानमसीतिगण्डूषार्धंपीत्वाऽर्धंभूमौनिनीयपवित्रंत्यक्त्वामुखहस्तोच्छिष्टंसम्यक् प्रक्षालयेत् तर्जन्यामुखंनशोधयेत् किंचिद्गण्डूषोत्तरं हस्तप्रक्षालनंषोडशगण्डूषान्तेद्विराचामेत् भोजनगृहेचनाचामेत् अनाचान्तोमूत्रपुरीषेनकुर्यात् उत्तरापोशनमकृत्वोत्थानेस्नात्वाशुद्धिः हस्तौसंमृज्यप्रस्राव्याङ्गुष्ठेननेत्रयोर्निषिञ्च्येष्टदेवतांस्मरेत् नाञ्जलिनापिबेत् पालाशं दग्धमयोबद्धंचपीठंवर्जयेत् नशिशुभिःसहभुञ्जीत भार्ययासहविवाहवर्जंन भुञ्जीत बालवृद्धेभ्योन्नमदत्वानभुञ्जीत नप्रौढपादोनासनारूढपादोनप्रसारितपादोनाविदिक्तुण्डोनदुष्टैकपङ्क्तौनशून्याग्निपाकगृहेनदेवालयेभुञ्जीत नसंध्ययोर्नमहानिशायांनयज्ञोपवीतहीनोनवामहस्तेननशूद्रशेषंभुञ्जीत आदौमधुरंमध्येलवणाम्लमन्तेतिक्तादिपूर्वंद्रवंमध्येकठिनमन्तेद्रवम् अष्टौग्रासायतेः षोडशद्वात्रिंशद्वागृहिणो वनस्थस्यषोडश यथेष्टंब्रह्मचारिणः सर्वंसशेषमश्नीयान्विः शेषंघृतपायसम्। क्षीरंदधिंमधुभुञ्जीत दिवारात्रौचेतिद्विवारमेवनान्तराभोजनम् ॥

**कसें व केव्हां जेवावें**—चौकोनी मंडल ( जमिनीवर पाण्याचें ) करून त्यावर स्वच्छ केलेलें ताट ( पत्रावळ, पान वगैरे ) ठेवावें व पञ्चमहायज्ञ केल्यावर यांतला—'शिलक राहिलेला तुपासह पानावर वाढलेला भात आम्हांला निरंतर मिळो'—असें म्हणून नमस्कार करावा, आणि बिनगांठीचें दर्भाचें पवित्रक उजव्या हातांत घालून, दोन्ही अथवा एक्या पायानें जमीनीला स्पर्श करीत करीत—व्याहृति व गायत्री—या मंत्रांनीं पानांत वाढलेलें अन्न अभिमंत्रित करावें. दिवसा —'सत्यं त्वर्तेन परिषिञ्चामि' व रात्रीं 'ऋतं त्वा सत्येन परिषिञ्चामि'—या मंत्रांनीं ( परिषेचन ) अन्नावर पाणी शिंपडावें. त्यानंतर—'अन्तश्चरति भूतेषु गुहायां विश्वतो मुखः । त्वं यज्ञस्त्वं वषट्कारस्त्वं विष्णुः पुरुषः परः ॥'—हा मंत्र म्हणून पात्राच्या उजव्या बाजूला जमिनीवर—'भूपतये नमः । भुवनपतये नमः । भूतानां पतये नमः ।' अशा तीन मंत्रोच्चारांनीं तीन आहुति ठेवाव्या, किंवा 'चित्राय स्वाहा । चित्रगुप्ताय स्वाहा । यमाय स्वाहा । यमधर्माय स्वाहा । सर्वेभ्यो भूतेभ्यः स्वाहा ।'—या पांच मंत्रांनीं पांच आहुति ठेवाव्या. 'धर्मराजाय० । चित्रगुप्ताय०' अशा

दोन किंवा–'भूपत्यादि' तीन आहुति व 'धर्मराजाय नमः चित्रगुताय नमः।' अशा दोन मिळून पांच आहुति द्याव्या. नंतर हात, पाय व तोंड हीं ओलीं (आर्द्र) असतां आपोशनासाठीं (पोटांतल्या अन्नाच्या राहाण्याच्या जागेच्या आसनाकरितां) हातांत (उजव्या) पाणी घ्यावें आणि–'अन्नं ब्रह्मरसो विष्णु-र्भोक्ता०' आणि 'अहं वैश्वानरो भूत्वा०' हे (दोन) मंत्र म्हणून तें पाणी प्यावें. तें प्यायल्यावर कोणाशीं न बोलतां (मौनानें) 'ॐ प्राणाय स्वाहा। ॐ अपानाय स्वाहा। ॐ व्यानाय स्वाहा। ॐ उदानाय स्वाहा। ॐ समानाय स्वाहा।' असें पांच वेळां म्हणत तूप लावलेल्या किंवा दूध लावलेल्या भाताच्या पांच आहुति प्रत्येक मंत्राला एकेक याप्रमाणें पांची बोटांनीं, पुरतें तोंड उघडून (एक सबंद घांस घेण्याइतकें) त्यांत (अंतराअंतरानें) घ्याव्या. कित्येक ग्रन्थांत–'ब्रह्मणे स्वाहा'–ही सहावी आहुति घेण्यासही सांगितलें आहे. (पांची) प्राणाहुति तोंडांत घेईपर्यंत डाव्या हातानें (भोजन) पात्र धरणें आणि कोणाशीं न बोलणें हें कृत्य, नित्य (रोजचें आवश्यक) आहे. व प्राणाहुति घेतल्यानंतर या दोन्ही गोष्टी ऐच्छिक (मनाप्रमाणें करणें) आहेत. पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे तोंड करून जेवायला बसणें योग्य आहे. दक्षिणेकडे तोंड करून जेवायला बसणें हें काम्य (हेतुपूर्ण) असून, त्याचें फळ यशःप्राप्ति हें आहे. उत्तरेकडे तोंड करून जेवणें निंद्य आहे. विदिशांकडे (कोनदिशा) तोंड करून जेवायला बसणें निषिद्ध आहे. सर्व घांस खात असतां नियमित असे बत्तीस घांसांचें किंवा यथेच्छ (मनसोक्त) जेवण झाल्यावर–'अमृतापिधानमसि' असें म्हणून (उजव्या हातांत घेतलेलें) अर्धें पाणी प्यावें व अर्धें जमिनीवर सोडावें व नंतर हातांतलीं पवित्रकें काढून टाकून तोंड व हात–तर्जनीवांचून इतर–बोटांनीं चांगलीं धुवावींत. आधीं कांहीं चुळा भरून टाकल्यावांचून हात धुऊं नयेत. सोळा चुळा भरून टाकल्यावर सैंपाकघरावांचून इतर ठिकाणीं आचमन करावें. आचमन केल्यावांचून लघवी व शौच करूं नयेत. उत्तरापोशन (जेवण संपल्यानंतरचें आचमन) केल्यावांचून जेवून उठल्यास स्नान केल्याशिवाय शुद्धि नाहीं. हातांत पाणी घेऊन तें खालीं ओघळवावें आणि तें पाणी अंगठ्यानें डोळ्यांस लावून इष्टदेवतास्मरण करावें. पाणी ओंजळीनें पिऊं नये. पळसाच्या लांकडाचा, जळकट व लोखंडी खिळे मारलेला पाट बसायला घेऊं नये. लहान मुलांना जवळ घेऊन जेवूं नये. लग्नांतल्या वेळेवांचून इतर वेळीं (केव्हांही) बायकोबरोबर जेवूं नये. लहान व म्हातारे यांना जेवूं घातल्याशिवाय जेवूं नये. मांडीवर पाऊल चढवून, पायावर पाय ठेवून, पाय पसरून, किंवा कोनदिशेकडे तोंड करून जेवण करूं नये. दुष्टाच्या पंक्तीला बसून जेवूं नये. अग्नि नसलेल्या, जेथें सैंपाक होत नाहीं अशा घरांत किंवा देवळांत जेवण करूं नये. दिवसरात्रीच्या सन्धींत किंवा मध्यरात्रीं जेवूं नये. शूद्रानें जेवण करून उरलेलें अन्न खाऊं नये. जानव्यावांचून (यज्ञोपवीत) जेवूं नये. डाव्या हातानें भोजन करूं नये. सुरुवातीला मधुर, मध्यें खारट व आंबट आणि शेवटीं कडू

पदार्थ खावेत. आरंभीं पातळ, मध्यें कठिण व शेवटीं पातळ पदार्थ खावेत. संन्याशानें आठ, गृहस्थानें सोळा किंवा बत्तीस, वानप्रस्थानें सोळा व ब्रह्मचाऱ्यानें हवे तेवढे–घांस घेऊन जेवण करावें. सर्व पदार्थ थोडथोडे पानांत ठेवून शेवटीं ते सर्व जरी खावेत, तरी तुपादुधाचे पूर्वींच सगळे खाऊन टाकावेत. जेवणांत–दूध, दहीं व मध–हे पदार्थ ( अवश्य ) खावेत. दिवसां एकदां व रात्रीं एकदां असें दोनदांच जेवावें. मध्यंतरीं तिसऱ्यांदां जेवूं नये.

अर्कपर्वद्वयेरात्रौचतुर्दश्यष्टमीद्दिवा । एकादश्यामहोरात्रंभुक्त्वाचान्द्रायणंचरेत् १ यस्तुपाणितलेभुङ्क्तेयश्चफूत्कारसंयुतम् । प्रसृताङ्गुलिभिर्यश्चतस्यगोमांसवच्चतत् ॰ नाजीर्णे भोजनंकुर्यात्कुर्यान्नातिबुभुक्षितः । नार्द्रवासनार्द्रशिरानपादारोपितेकरे २ ग्रासशेषंचनाश्नीयात्पीतशेषंपिबेन्नच । शाकमूलफलादीनिदन्तच्छेदैर्नभक्षयेत् नोच्छिष्टोघृतमादद्यान्नपदाभाजनंस्पृशेत् । पिबतोयत्पतेत्तोयंभाजनेमुखनिःसृतम् ४ अभोज्यंतत् पीतावशिष्टतोयपाने चान्द्रायणम् हस्तनखस्पृष्टजलपानेवामहस्तोद्धृतजलपानेचसुरापानसमम् एकपङ्क्त्युपविष्टानांविप्राणांभुञ्जानानामेकस्मिन्नप्युत्थितेआचान्तेवाऽन्यैर्नभोज्यम् अत्रोत्थितस्यभोक्तुश्चदोषः गुरोर्नदोषः लवणंव्यञ्जनंचैवघृततैलंतथैवच । लेह्यंपेयंचविविधंहस्तदत्तंनभक्षयेत् ताम्रेगव्यं कांस्येनारीकेलेक्षुरसौ सगुडंदधिसगुडमार्द्रकंचमद्यसमम् सैन्धवसामुद्रभिन्नप्रत्यक्षलवणभक्षणंमृद्भक्षणंचगोमांससम् उदक्यामपिचाण्डालंश्वानंकुक्कुटमेवच । भुञ्जानोयदिपश्येत्तुतदन्नंतुपरित्यजेत् १ भुंजानस्यगुदस्रावेउपवासः पञ्चगव्यं च आपोशनोत्तरंप्राणाहुतेः प्राक्तत्स्रावेस्नानंषट्प्राणायामाः भुंजानस्याशौचप्राप्तौग्रासंत्यक्त्वास्नानम् ग्रासाशनेउपवासः सर्वाशनेत्रिरात्रम् विष्टादिस्पर्शेस्नानंप्राणायामत्रयंच चाण्डालपतितोदक्यावावाक्यंश्रुत्वाभोजने एकोपवासः स्नात्वाशतगायत्रीजपोवा कलहघरट्टोलूखलमुसलानांयावच्छब्दस्तावद्भोजनम् अप्येकपङ्क्त्यांनाश्नीयाद्ब्राह्मणैःस्वजनैरपि । कोपिजानातिकिंकस्यप्रच्छन्नंपातकंभवेत् १ ततोग्निनामस्मनाचस्तम्भेनसलिलेनच । द्वारेणैवचमार्गेणपङ्क्तिभेदंचरेद्बुधः २ केशपिपीलिकामक्षिकाभिः सहपक्वमन्नंत्यजेदेव पाकोत्तरंकेशपिपीलिकादिकीटकमक्षिकासंसृष्टेगवाघ्राते वान्ने सलिलंभस्ममृद्वापिप्रक्षेप्तव्यंविशुद्धये । इतिविज्ञानेश्वरः शूद्रान्नंशूद्रदत्तब्राह्मणान्नंरात्रिपर्युषितंरजस्वलाचाण्डालपतितादिदृष्टंकाकादिपक्ष्युच्छिष्टमभोज्यम् स्नेहपक्वंमण्डकादिचपर्युषितंग्राह्यम् अवत्सायागोरनिर्दशानांगोमहिष्यजानांगर्भिण्याएककालान्तरितदोहायायमलसूस्रवत्स्तन्योरजवर्जद्विस्तनीनामुष्ट्रीवडवयोरारण्यकमृगादेश्वक्षीराणि वर्ज्यानि शिग्रुहिङ्गुवर्ज्यरक्तंवृक्षनिर्यासंपुरीषस्थानोत्पन्नतण्डुलीयकादिकंदेवाद्युद्देशंविनाकृतंसंयावपायसापूपशष्कुलीकृसरंवर्जयेत् शणकुसुम्भालाबुवार्ताककोविदारवटादिफलानिमातुलिङ्गंचवर्ज्यम् पलाण्डुलशुनगृञ्जनभक्षणेचान्द्रायणम् । भुञ्जानेषुपरस्परस्पर्शे पात्रस्थान्नभक्षणेस्नात्वाष्टोत्तरशत

गायत्रीजपः अधिकभोजनेसहस्रम् भुञ्जानस्याशुचिनाविप्रेणस्पर्शेऽन्नत्यागः भुक्तोच्छिष्टस्पर्शेसवर्णेस्नानंजपोवा असवर्णेतूपवासः भुक्तोच्छिष्टस्यश्वशूद्रादिस्पर्शेउपोष्यपञ्चगव्यम् रजकादिस्पर्शेत्रिरात्रम् परिवेषणंकुर्वन्नुच्छिष्टस्पर्शे पयोदधिघृतादिलघुद्रव्यमत्यजन्नाचान्तःशुचिः भक्ष्याद्यन्नस्यत्यागएव वस्त्रे-विकल्पः परिवेषणादिकालेरजोदृष्टौतस्पृष्टान्नत्यागः ॥

**केव्हां व कोणचें जेवण करूं नये?**—रविवार, पौर्णिमा व अमावास्या या दिवशीं रात्रीं जेवूं नये. चतुर्दशी व अष्टमी या तिथींना दिवसा जेवूं नये. एकादशीला अहोरात्र जेवूं नये. जेवल्यास चान्द्रायण करावें. हातावर अन्न घेऊन, उन्हुन अन्न फुंकीत व पसरलेल्या बोटांनीं जो जेवतो, त्याला गोमांस खाण्याचा दोष लागतो. अजीर्ण झाल्यास किंवा अतिशय भूक लागल्यास ताबडतोब जेवूं नये. ओलें नेसून, कपाळ ओलें असतां किंवा पायावर हात ठेवून जेवूं नये. खाऊन उरलेला घांस खाऊं नये व पाणी पिऊन उरलेलें भांड्यांतलें पाणी पिऊं नये. भाजी, फळ व मूळ दांतांनीं तोडून खाऊं नयेत. उष्टयानें तूप घेऊं (तुपाला शिवूं) नये. भांड्याला पाय लावूं नये. पाणी पीत असतां तोंडांतलें पाणी जेवण्याच्या पात्रांत पडलें तर तें अन्न खाऊं नये. खाल्ल्यास चान्द्रायण करावें. बोटांच्या नखांचा स्पर्श झालेलें व डाव्या हातानें उचललेलें पाणी प्यालें असतां सुरापानासारखें आहे. एका पंक्तीला बसून ब्राह्मण जेवीत असतां, मध्येंच जर कोणी उठेल किंवा उत्तरापोशन घेईल, तर बाकीच्यांनीं जेवण बंद करावें. अशा तऱ्हेनें उठणारा व अशा वेळीं जेवणारा—हे दोघेही दोषी होतात. गुरूला हा दोष नाहीं. मीठ, चटण्या (व्यञ्जन), तूप, तेल, चाटण्याचे पदार्थ (लेह्य), पिण्याचे पदार्थ (पेय) वगैरे नानाप्रकारचे हातानें दिलेले पदार्थ खाऊं नयेत. तांब्याच्या भांड्यांतलें गाईचें दूध, कांश्याच्या भांड्यांतलें नारळाचें पाणी व उंसाचा रस, गूळ मिसळलेलें दहीं व गुळांत कालवलेलें अलें—हीं सर्व मद्यवत् होत. शेंदेलोण (सैन्धव) आणि समुद्राचें मीठ यांशिवाय इतर प्रत्यक्ष मीठ खाणें व माती खाणें—हें गोमांस खाण्याप्रमाणें आहे. जेवीत असतां—विटाळशी, चाण्डाळ, कुत्रें व कोंबडें—हीं दृष्टीस पडल्यास तें अन्न टाकून द्यावें. जेवण करीत असतां शौचाला (गुदस्राव) झाल्यास उपास करून पञ्चगव्य घ्यावें. जेवीत असतांना अशौच (सुतक व सोयर) कळल्यास न जेवतां—तोंडांतला घांस टाकून—तसेंच उठून स्नान करावें; तोंडांतला घास (तशा स्थितींत) खाल्ल्यास स्नान करून उपास करावा व न उठतां सर्व जेवण जेवल्यास, तीन रात्रीं उपास करावा. जेवीत असतां विष्ठा वगैरे (घाणेरड्या) वस्तूंचा विटाळ झाल्यास स्नान करून तीन प्राणायाम करावे. चाण्डाळ, पतित व विटाळशी यांचा शब्द ऐकून जेवल्यास एक उपास करावा किंवा स्नान करून शंभर गायत्रीजप करावा. कांडण, दळण, उखळ व मुसळ यांचे आवाज होत असतां जेवूं नये. आपल्या आतांच्या (नातेवाईक)

बरोबर एका पंक्तीला बसूनही ब्राह्मणानें जेवूं नये. कारण, कोणाचें काय गुप्त पातक असेल तें कोणाला माहीत असणार ? म्हणून शहाण्या पुरुषानें—भस्म, खांब, पाणी, दरवाजा किंवा रस्ता—यांतून कोणच्या तरी एका मार्गानें ( यांतलें कांहीं तरी मध्यें आणून ) पंगत निराळी ( पंक्तिभेद ) करावी. केंस, मुंग्या व माशा—यांसह शिजलेलें अन्न टाकून द्यावें. सैंपाक तयार झाल्यावर जर-केंस, मुंग्या व माशा व इतर किडे यांचा त्याला स्पर्श झाला, किंवा गाईनें जर तें हुंगलें तर तें शुद्ध करण्यासाठीं त्यावर—पाणी, भस्म किंवा माती—यांपैकीं कांहीं तरी टाकावें असें विज्ञानेश्वर सांगतो. शूद्रान्न, शूद्रानें दिलेलें ब्राह्मणाकडचें अन्न, रात्रीचें शिळें अन्न, चाण्डाळ, पतित, विटाळशी वगैरेंनीं पाहिलेलें अन्न आणि कावळे वगैरे पक्ष्यांचें उष्टें अन्न—खाण्यास जरी वर्ज्य आहे, तरी तुपानें तेलांत तळलेले मांडे, घीवर वगैरे पदार्थ शिळे असले तरी खावे. वांसरूं नसलेली गाय, विऊन दहा दिवस न झालेली गाय, म्हैस, शेळी, गाभण, एका दिसाड दूध देणारी, जुळें विणारी, थानांतून अक्षय दूध पाघळणारी, बकरीवांचून दोन थानांची, उंटीण, घोडी, व रानांतली हरिणी एडकी यांचें दूध वर्ज्य आहे. शेवगा आणि हिंग यांवांचून झाडाचा तांबडा चीक, खातेऱ्यांत ( विष्टास्थल ) उगवलेला माठ, तांदुळजा वगैरे भाज्या, व देवादिकांच्या कारणांवांचून केलेलीं—मोहनभोग, खीर, अपूप ( मोदक वगैरे ), करंज्या, खिचडी व तिलमिश्रित भात—हीं वर्ज्य करावींत. ताग ( सण ) कर्डई, (कुसम्भा) दुध्या भोपळा ( अलाबु ), वांगें ( वार्ताक ), कोरळ ( कोविदार ), वड ( वट ) आणि महाळुंग ( मातुलिंग ) —हीं फळें वर्ज्य करावींत. कान्दा ( पलाण्डु ), लसून ( लशुन ) आणि गाजर ( गृञ्जन )—हीं खाल्ल्यास चान्द्रायण करावें. जेवतांना एकमेकांस स्पर्श झाल्यास पुढें अन्न खाऊं नये व तसेंच जेवण केल्यास स्नान करून एकशें आठ गायत्रीजप करावा. पानांतलें ( एकदां वाढलेलें ) अन्न खाऊन पुन्हा ( दुसऱ्यांदा मागून घेतलेलें ) अन्न खाल्ल्यास स्नान करून एक हजार गायत्रीजप करावा. जेवीत असतां अशुद्ध ब्राह्मणाचा विटाळ झाल्यास अन्न टाकून उठावें, व जेवण झाल्यावर उष्टेपणीं विटाळ झाल्यास स्पर्श करणारा आपल्या वर्णांतला असल्यास स्नान किंवा जप करावा. स्पर्श करणारा आपला वर्णीय नसल्यास उपास करावा. जेवल्यावर उष्टेपणीं—कुत्रा, शूद्र वगैरे कोणाचा स्पर्श ( विटाळ ) झाल्यास उपास करून पञ्चगव्य घ्यावें. रजक ( परीट ) वगैरे कोणाचा विटाळ झाल्यास त्रिरात्रव्रत ( मागें सांगितलेलें ) करावें. पानावर पदार्थ वाढीत असतांना जर उष्टिविटाळ झाला—तर दूध, तूप, दहीं वगैरे हलके पदार्थ टाकूं नयेत. हातपाय धुऊन आचमन केल्यानें तशा स्थितींत शुद्धि होते. भक्ष्य ( खाण्याजोगें ) आणि भोज्य ( खाण्याचे ) पदार्थ टाकूनच द्यावेत. वस्त्र टाकावें किंवा टाकूं नये. जेवण वाढीत असतांना जर स्त्री विटाळशी झाली, तर तिच्या विटाळाचें तेवढेंच अन्न टाकून द्यावें.

**भोजनान्तेउच्छिष्टशेषान्नम् रौरवेपूयनिलयेपद्मार्बुदनिवासिनाम् । प्राणिनांसर्वभूतानामक्षय्यमुपतिष्ठतु ॥ १ ॥ इतिदद्यात् । आचान्तोप्यशुचिस्ता-**

वद्यावत्पात्रमनुद्धृतम् । उद्धृतेप्यशुचिस्तावद्यावन्नोन्मृज्यतेमही ॥ २ ॥
पर्णस्याग्रंचमूलंचशिरांचैवविशेषतः । चूर्णपर्णवर्जयित्वातांम्बूलंखादयेद्बुधः
॥ ३ ॥ अनिधायमुखेपर्णपूगंवैभक्षयेन्नच । इतिपञ्चमभागकृत्यम् ।

**भोजनोत्तरविधि**—जेवण झाल्यावर उरलेलें उष्टें अन्न घेऊन—'रौरवे पूयनिलये पद्मार्बुद निवासिनाम् । प्राणिनां सर्वभूतानामक्षय्यमुपतिष्ठतु ॥' असें म्हणून तें द्यावें. हातपाय धुवून आचमन केलें असलें तरी भोजनपात्र वाढीपर्यंत व भोजनोत्तर पान उचलून त्याची जागा सारवीपर्यंत जेवण करणार अशुद्ध असतो. नागवेलीच्या (विड्याच्या पानाचें) शेवट, मूळ व मुख्यत्वें त्याच्या शिरा हीं काढून चुन्यावांचूनच शहाण्यानें विडा खावा. आधीं तोंडांत पान (विड्याचें) घालून मग सुपारी खावी. आधीं पान व मग सुपारी असा विडा खावा. येथें दिवसाच्या पांचव्या भागाचें कृत्य संपलें.

अथषष्ठभागादिकृत्यविचारः । इतिहासपुराणाद्यैः षष्ठसप्तमकौनयेत् ।
अष्टमेलोकयात्रातुबहिःसंध्याततःपुनः ॥ १ ॥ सायंसंध्याप्रातःसंध्यावत्
अग्निश्चमामन्युश्च० यदह्नापापमकार्षं० अहस्तदवलुम्पतु० सत्येज्योतिषि-
जुहोमिस्वाहेतिमन्त्राचमनेविशेषः पश्चिमाभिमुखस्तिष्ठन् अर्घ्यंदद्यात् ऊर्ध्व-
जानुरुपविश्यप्रत्यङ्मुखएवगायत्रींजपेत् सायंहोमस्तूक्तएव सायंवैश्वदेवेपुनः
पाकः अतिथिंसंपूज्यघटीत्रयान्ततरंसार्धयामात्प्राक्भुक्त्वाशयीत् ॥

**दिवसाच्या सहाव्या, सातव्या व आठव्या भागांतलें कर्म**—

दिवसाचा सहावा आणि सातवा भाग हे भारतादि इतिहास व पुराणें यांच्या वाचनांत व मननांत घालवावेत. दिवसाच्या आठव्या भागांत इष्टमित्रांना भेटणें संसारसंबंधीं चर्चा करणें व नंतर गांवाबाहेरील नदीवर तळ्यावर वगैरे ठिकाणीं सन्ध्या करण्यास जाणें—हीं कामें करावींत. सन्ध्याकाळची संध्या सकाळच्या सन्ध्येप्रमाणेंच करावी. प्रातःसन्ध्येंत व सायंसन्ध्येंत जो थोडा फरक आहे तो असाः—'अग्निश्च मामन्युश्च० । यदह्ना पापमकार्षं० । अहस्तदव लुम्पतु० । सत्येज्योतिषि जुहोमि स्वाहा ।' असा हा मंत्राचमनांत विशेष आहे. पश्चिमेकडे तोंड करून अर्घ्य द्यावेत. गुडघे वर राहतील अशा तऱ्हेनें पश्चिमाभिमुख बसून गायत्रीजप करावा. सायंकाळचा होम पूर्वीं सांगितल्याप्रमाणेंच करावा. सन्ध्याकाळीं वैश्वदेव करणें असल्यास नवा सैंपाक करावा. अतिथीची पूजा करून तीन घटका रात्रीनंतर व दीड प्रहर रात्रीच्या आंत जेवण करून निजावें.

भोजनकालेदीपनाशेपात्रमालभ्यसूर्यंस्मृत्वापुनर्दीपंदृष्ट्वापात्रस्थंभुञ्जीतना-
न्यत् श्राद्धतत्पूर्वदिनेपातधृतिसंक्रान्त्यादिषुननिशिभोजनम् चतुर्थप्रथमौ
यामौविद्याभ्यासैर्नयेन्निशि । प्रहरद्वयशायीतुब्रह्मभूयायकल्पते १ प्राक्प्रत्यक्-
दक्षिणस्यांशिरःकृत्वाशयीनकदाचिदुदक्शिराः रात्रिसूक्तंजप्त्वासुखशायिनः
स्मृत्वाविष्णुंनस्वास्वप्यात् अगस्तिर्माधवश्चैवमुचकुन्दोमहामुनिः। कपिलोमुनि-
रास्तीकःपञ्चैतेसुख शायिनः ॥

**सुखशयन**—जेवीत असतां दिवा गेल्यास भोजनपात्र (ताट) हातांत घेऊन सूर्याचें स्मरण करावें व दिवा लागल्यावर तो पाहून पानांतलें अन्न खावें; दुसरें अन्न खाऊं नये. श्राद्धाचा व त्याच्या आधींचा दिवस, व्यतीपात, वैधृति व संक्रान्त—यांवर रात्रीं जेवूं नये. रात्रीचा पहिला व चौथा प्रहर विद्याभ्यासांत घालवावे. मधल्या दोन (दुसरा व तिसरा) प्रहरांत झोंप घेणारा ब्रह्मत्वाला योग्य होतो. पूर्व, पश्चिम किंवा दक्षिण यांपैकीं हव्या त्या दिशेस उसें करून निजावें. उत्तरेकडे उसें (डोकें) करून कधींही निजूं नये. रात्रि सूक्ताचा जप केल्यावर सुखशायीचें स्मरण करून विष्णूला नमस्कार केल्यावांचून निजूं नये. अगस्ति, माधव, मुचकुन्द, महामुनि कपिल व आस्तिक हे पांच मुनि सुखशायी होत. निजतांना यांचें स्मरण केल्यास सुखानें झोंप येते.

नसंध्यायांनधान्येनगोगृहेनदेवविप्रगुरूणामुपरिनोच्छिष्टोनदिवाननग्नःशयीत। निद्राकालेताम्बूलंमुखात् स्त्रियंशयनाद्भाल।त्तिलकं शिरसःपुष्पंत्यजेत्। गर्भाधानप्रकरणोक्तकाले सार्धयामोत्तरंदीपेसत्यसतिवा निवीतंयज्ञोपवीतंकण्ठादौकृत्वापत्नींगच्छेत्। अष्टम्यांचचतुर्दश्यांदिवापर्वणिमैथुनम् । कृत्वासचैलंस्नात्वातुवारुणीभिश्चमार्जयेत् ॥ १ ॥ मनुर्मामैत्विविजपश्चोक्तएव ॥

**कोठें निजूं नये व कसें निजावें**—तिनिसांजा, धान्यांत, गोठ्यांत, देव, ब्राह्मण व गुरु यांच्यापेक्षां उंचावर, उष्टेपणीं, दिवसां आणि नागव्यानें निजूं नये. निजतांना तोंडांतला विडा, आपल्या अंथरुणावरची स्त्री, कपाळाचें गन्ध आणि (रतिकालचीं) डोक्यावरचीं फुलें—हें सर्व आपल्यापासून दूर करावें. गर्भाधानप्रकरणांत सांगितलेल्या वेळीं म्हणजे दीड प्रहर रात्रीनंतर, दिवा असो अथवा नसो, गळ्यांत माळेसारखें जानवें घालून स्त्रीकडे जावें. अष्टमीला किंवा चतुर्दशीला, आणि दिवसां किंवा पर्वणी असतां मैथुन केल्यास स्नान करून वारुणीमंत्रांनीं मार्जन करावें, आणि 'मनुर्मामैत्वि०' मंत्राचा जप करावा. हा जप कसा करावा तें पूर्वीं सांगितलेंच आहे.

एवंस्नानभोजनादिकेबहुविधविधिनिषेधाकुलेआह्निककर्मणिन्यूनाधिकदोषविधिनिषेधातिक्रमदोषपरिहारार्थंप्रायश्चित्ताज्ञानेतत्साङ्गतार्थं प्रायश्चित्तसाङ्गतार्थंचश्रीविष्णुनामोच्चारणादिकंकार्यम् ।प्रायश्चित्तान्यशेषाणि तपः कर्मात्मकानिच । यानितेषामशेषाणांकृष्णानुस्मरणंपरम् ॥ १ ॥ यस्यस्मृत्याचनामोक्त्यातपोयज्ञक्रियादिषु । न्यूनंसंपूर्णतांयातिसद्योवन्देतमच्युतम् ॥ २ ॥ नाम्नोस्तियावतीशक्तिः पापनिर्हरणेहरेः । तावत्कर्तुंनशक्नोतिपातकंपातकीजनः ॥ ३ ॥ लौकिकंवैदिकंकर्मेश्वरेऽर्पणीयम् । यत्करोषियदश्नासियज्जुहोषिददासियत् । यत्तपस्यसिकौन्तेयतत्कुरुष्वमदर्पण ॥१॥ इत्युक्तेः सुमपत्सर्वकर्मार्पणेमन्त्रः। कामतोकामतोवापियत्करोमिशुभाशुभम् । तत्सर्वंत्वयिसंन्यस्तंत्वत्प्रयुक्तः करोम्यहम् ॥

**प्रायश्चित्तसाङ्गतार्थ श्रीविष्णुनामोच्चारण**—मागें सांगितल्याप्रमाणें अनेक तऱ्हांच्या विधि-निषेधांच्या स्नानभोजनादि आन्हिक कर्मांतले कमीजास्त दोष अथवा विधिनिषेधांचें उल्लंघन केल्याचा दोष घडला असल्यास, त्यांचा परिहार होण्यासाठीं, प्रायश्चित्ताचें ज्ञान नसल्यास कर्म व प्रायश्चित्त यांची सांगता ( पूर्णपणा ) होण्याकरतां, श्रीविष्णुनामोच्चारादिक करावें. तपोरूप व कर्मरूप प्रायश्चितांत, श्रीकृष्ण-स्मरण हेंच थोर प्रायश्चित्त होय. तपश्चर्या आणि यज्ञयागादिक कर्मांतला कमीपणा ज्याच्या स्मरणानें व नामोच्चारानें नाहींसा होतो अशा अच्युताला मी नमस्कार करतों. पातकनाश करण्याचें हरिनामांत जितकें सामर्थ्य आहे तितकें पाप करण्या-चेंही सामर्थ्य पापी माणसांत नाहीं. लौकिक व वैदिक हीं कर्मं परमेश्वराला अर्पण करावींत. कारण, या बाबतींत भगवान् श्रीकृष्ण म्हणतात—अर्जुना, तूं जें कर्म करतोस, जें खातोस, जें हवन करतोस, जें देतोस व जें तप करतोस–तें सर्व मला अर्पण कर. एकदांच सारीं कर्में ईश्वराला अर्पण करण्याचा मंत्रः—'कामतोकामतो वापि यत्करोमि शुभाशुभम् । तत्सर्वं त्वयि संन्यस्तं त्वत्प्रयुक्तः करोम्यहम् ॥'

**अपारमान्हिकंकर्मगहनंबहुभेदयुक् । निःशेषमक्षमोवक्तुंयथामत्यवदल्लघु १ अनन्तोपाध्यायजनिःकाशीनाथाभिधःसुधीः । तुष्यतांतेनभगवाञ्छ्रीनोथाविट्ठ-लःप्रभुः । इत्यनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेतृती-यपरिच्छेदेआह्निकाचारप्रकरणंसमाप्तम् ॥**

**ग्रन्थकाराची प्रार्थना**—नानाप्रकारचें हें आन्हिक कर्म मोठें कठीण व अनेक भेदांचें असल्यानें, तें सर्व सांगायला मी अनन्तो पाध्यायांचा मुलगा काशीनाथ अगदीं असमर्थ आहें. असें जरी आहे तरी थोडक्यांत जें कांहीं त्या बाबतींत मीं सांगितलें आहे त्यानें, भगवान् श्रीरुक्मिणीपति पाण्डुरंग सन्तुष्ट होवो. याप्रमाणें अनन्तोपाध्यायांच्या काशीनाथ नांवाच्या मुलानें येथपर्यंत धर्मसिन्धुसाराच्या तिसऱ्या परिच्छेदांत आन्हिकाचार नांवाचें जें प्रकरण सांगितलें, तें येथें संपलें.

**अथकाम्यनैमित्तिकविचारः अवश्यंप्रत्यहंकृत्यमुक्त्वातच्छेषउच्यते । काम्यंनैमित्तिकं चापिप्रायःसिन्धुक्रमादथ ॥**

**काम्य व नैतिक या कर्मांची सूचि**—रोजचें आवश्यक असें करावयाचें जें आन्हिककर्म तें सांगितल्यावर, आतां यांतलेंच शिल्लक राहिलेलें जें काम्य आणि नैतिक कर्म तें बहुतेक निर्णय-सिन्धूच्याच क्रमानें ( यापुढें ) आतां सांगतों.

**अथाधानविचारः । तत्राधाननक्षत्रादिकालविचारःप्रथमपरिच्छेदेउक्तः आवसथ्याधानंतुदारकालेदायविभागकालेवअग्निर्वैवाहिकोयेननगृहीतःप्रमा-दिना । पितर्युपरतेतेन गृहीतव्यःप्रयत्नतः १ गृह्याग्निहीनस्यान्नमभोज्यम् पितरिज्येष्ठभ्रातरिवासाग्निकेकनिष्ठादेरविभक्तस्यनिरग्निकत्वदोषोन एवंज्ञाना-**

ध्ययनादिनिष्ठस्यापिनदोषः गृहस्थस्याप्यध्ययनोक्तेः स्मार्ताधानमपिज्येष्ठे-भ्रातरिअकृताधानेसतिनकार्यमितिनिर्णयसिन्ध्वादौगार्ग्योक्तिःअत्रैवंनिर्णयोभाति यत्रज्येष्ठेनदायाद्यपक्षमवलम्ब्य विवाहकालेयावज्जीवमौपासनंकरिष्येइत्येवंसं-कल्पपूर्वकंविवाहाग्निर्नगृहीतस्तद्विषयोऽयंकनिष्ठस्यनिषेधः येनज्येष्ठेनविवाह-कालेनथासंकल्पपूर्वकमग्निःपरिगृहीतःसपश्चात्परिचरणाभावेनाविद्यमानाग्नि-कोऽपिउच्छिन्नाग्निरेवनत्वकृताधानइतितत्रकनिष्ठस्याधानेदोषोनेति अत्राधि-कारिणोऽपिभ्रातुरनुज्ञयाकनिष्ठस्याधानंभवति विवाहस्तुअनुज्ञयापिन एवंपि-तुरनुज्ञयाप्याधानम् संन्यस्तेछिन्नहस्तादौयद्वाषण्ढादिदूषणे। जनकेसोदरेज्येष्ठे-कुर्यादेवेतरः क्रियाम् १ इत्यादिविशेषः विवाहप्रकरणेपरिवेत्तुप्रसङ्गेउक्तः ॥

**आधानविचार**—कोणच्या नक्षत्रावर आणि केव्हां आधान करावें तें पहिल्या परिच्छेदांत सांगितलें आहे. गृह्याग्नीचें जर आधान करणें असेल तर तें लग्नाच्या वेळीं किंवा बापाची संपत्ति वांटण्याच्या वेळीं करावें. प्रमाद (चुकी) वगैरे कारणांनीं ज्यानें विवाहाग्नि (गृह्याग्नि) बाळगला नसेल त्यानें, बाप मेल्यानंतर अनेक संकटांना हव्या त्या रीतीनें बाजूला सारून मोठ्या प्रयत्नानें गृह्याग्निव्रत घ्यावें. ज्याच्या घरांत गृह्याग्नि नसेल त्याच्याकडे जेवूं नये. बाप किंवा वडील भाऊ हे साग्निक असले व धाकटा भाऊ विभक्त नसला, तर त्या धाकट्या भावाला गृह्याग्नि धारण न केल्याचा दोष लागत नाहीं; ज्ञानाध्ययनादिकांविषयीं निष्ठा असलेल्या गृहस्थालाही अग्नि धारण न केल्याचा, याचप्रमाणें दोष नाहीं. कारण, गृहस्थानेंही वेदाध्ययन करावें असें वचन आहे. वडील भावानें आधान केलें नसल्यास, धाकट्या भावानेंही स्मार्ताग्नीचें आधान करूं नये, असें निर्णयसिन्धु वगैरे ग्रन्थांत गर्गऋषींचें वचन दिलेलें आहे. या बाबतींत माझा असा निर्णय आहे कीं, वडील भावानें दायाचा (देणगी) पहिला पक्ष अंगिकारून आपल्या लग्नांत—'यावज्जीवमौपासनं करिष्ये'—असा संकल्प करूनही जर विवाहाग्नि घेतला नसेल तरच त्या बाबतींत धाकट्या भावाला आधानाचा हा निषेध सांगितलेला असला पाहिजे. वडील भावानें आपल्या लग्नाच्या वेळीं वरच्या प्रमाणें संकल्प करून विवाहाग्नि घेतल्यावर पुढें तो त्यानें टाकल्यानें तो जो अविद्यमानाग्निक (जवळ अग्नि नसलेला असा) होतो, त्याचा अग्नि (उच्छिन्न) नष्टच होतो. तो अग्न्याधान न केलेला असा कांहीं होत नाहीं. यास्तव, अशा प्रसंगीं धाकट्या भावानें आधान केल्यास ह्यांत दोष नाहीं. अशा तऱ्हेनें धाकटा भाऊ आधान करायला जरी पात्र असला तरी त्यानें तें थोरल्या भावाच्या परवानगीनेंच करावें. वडील भावानें जरी आज्ञा दिली तरी धाकट्या भावाचें लग्न होणार नाहीं. बापाच्या आज्ञेनेंही मुलानें आधान करावें. बाप किंवा वडील भाऊ संन्यासी, हात तुटलेला, नपुंसक वगैरे दोषांनीं युक्त असल्यास सर्व कर्मं धाकट्या मुलानेंच करावींत, वगैरे जो विशेष निर्णय, तो विवाहप्रकरणांतल्या परिवेत्त्याच्या प्रसंगीं सांगितलाच आहे.

अथशूद्रसंस्कारविचारः गर्भाधानपुंसवनानवलोभनसीमन्तोन्नयनजातकर्म-नामकर्मनिष्क्रमणान्नप्राशनचौलोपनयनमहानाम्न्यादिव्रतचतुष्टयसमावर्तन-विवाहइतिषोडशसंस्काराद्विजानाम् जातकर्मनामकर्मनिष्क्रमणान्नप्राशन-चूडाविवाहाइतिषट्द्विजस्त्रीणाम् तत्रविवाहः समंत्रकोऽन्यमंत्ररहिताः गर्भाधानसीमन्तोस्त्रीपुरुषसाधारणौ चूडान्तानवविवाहाश्चेतिदशामंत्रकाःशूद्रा-णामितिबहुसंमतम् शूद्रकमलाकरेशूद्राणांपञ्चमहायज्ञाअप्युक्ताः केचिदवैदिक-मंत्रेणोपयनमप्याहुः ब्राह्मेतुविवाहमात्रंसंस्कारंशूद्रोपिलभतांसदा । इत्युक्तम् अत्रसदसच्छूद्रगोचरत्वेनवापरंपराप्राप्तप्रकारेणवाव्यवस्था अस्यद्विजसेवावृत्तिः आपदिवाणिज्यशिल्पादि शूद्रेणलवणादिविक्रेयम् मद्यंमांसंचन कपिलाक्षीर-पानेनब्राह्मणीगमनेनच । वेदाक्षरविचारेणशूद्रश्चाण्डालतांव्रजेत् १ शूद्रोवर्ण-श्चतुर्थोपिवर्णत्वाद्धर्ममर्हति । वेदमंत्रस्वधास्वाहावषट्कारादिभिर्विना २ स्त्रीशूद्रधर्मेषुव्रतादिषुसर्वत्रविप्रेणमंत्रःपठनीयःसोपिपौराणएव भारतपुराणयोः श्रवणेस्त्रीशूद्रयोरधिकारोनत्वध्ययने श्रावयेच्चतुरोवर्णान्कृत्वाब्राह्मणमग्रतः । शूद्रस्यपञ्चयज्ञश्राद्धादिकर्माणिकातीयसूत्रानुसारेणेतिमयूखे आगमोक्ताविष्णु-शिवादिमंत्रानमोन्ताःप्रणवरहिताः पुराणादिनाश्रवणनिदिध्यासनादिकृत्वा-ब्रह्मज्ञानमपिस्त्रीशूद्रैःसंपाद्यम् उपनिषच्छ्रवणेतुनाधिकारइतिशूद्रस्यतदनादर-श्रवणादित्यधिकरणे शूद्रस्यसर्वश्राद्धान्यामेनैव केचित्सर्वप्रजानांकाश्यपत्वा-त्सर्वशूद्राणांकाश्यपगोत्रंतच्चश्राद्धएवकीर्तनीयंनान्यत्रेत्याहुः एवंशान्तिकादाव-धिकारोविप्रद्वारैव यदिविप्रः शूद्रदक्षिणामादायवैदिकमंत्रैस्तदीयहोमाभिषेका-दिकरोतितदातत्रशूद्रस्तत्पुण्यफलभाक् विप्रस्तुमहाग्रस्यवार्यातिमाधवः ॥

**शूद्रसंस्कार-विचार**—गर्भाधान, पुंसवन, अनवलोभन, सीमन्तोन्नयन, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल, उपनयन, महा-नाम्न्यादि चार व्रतें, सोडमुंज आणि लग्न—असे ब्राह्मणाचे सोळा संस्कार आहेत. जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, चौल, अन्नप्राशन आणि विवाह—असे जे ब्राह्मण स्त्रियांचे सहा संस्कार आहेत, यांपैकीं विवाहसंस्कार तेवढा समंत्रक करावा आणि बाकीचे सारे ( पांच ) अमंत्रक करावेत. गर्भाधान व सीमन्तोन्नयन हे दोन्ही संस्कार ( ब्राह्मण ) स्त्रीपुरुषांना सारखेच आहेत. गर्भाधान, पुंसवन, अनवलोभन, सीमन्तो-न्नयन, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण व अन्नप्राशन—हे नऊ आणि दहावा विवाह—हे शूद्राचे अमंत्रक असावेत, असें जरी बहुमत आहे, तरी शूद्रकमलाकर ग्रन्थांत शूद्रांना पञ्चमहायज्ञही करण्याचा अधिकार असल्याचें सांगितलें आहे. वेदवाक्य-रहित असें पुराणोक्त मंत्रांनीं शूद्राचें उपनयनही ( मुंज ) करण्यास कित्येक ग्रन्थकार सांगतात. ब्रह्मपुराणांत शूद्राचा विवाहसंस्कारच फक्त करण्यास सांगितलें आहे. म्हणून सच्छूद्र ( जातीवंत ) व असच्छूद्र ( कडू ) याचा विचार करून किंवा परंपरा पाहून व्यवस्था करावी. शूद्राचें कर्म द्विजसेवेचें—( ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांच्या नोकरीचें ) आहे. तशी सोय नसल्यास ( आपत्कालीं ) व्यापार, शिल्प वगैरे

करून आपला धर्म ( शूद्रानें ) चालवावा. शूद्रानें मीठ वगैरे पदार्थ विकावेत. पण मद्य आणि मांस यांची विक्री करूं नये. कपिला गाईचें दूध पिणें, ब्राह्मणीशीं संग करणें व वेदाक्षरांचा विचार करणें–या गोष्टी केल्यानें शूद्र चाण्डाळ बनतो. शूद्रवर्ण जरी चौथा आहे तरी तो मुख्य वर्णांतला असल्यानें–वेदमंत्र, स्वधाकार, स्वाहाकार व वषट्कार–यांवांचून इतर धर्माचरणाला पात्र आहे. स्त्रिया व शूद्र यांच्या व्रतादि धर्मकर्मांत ब्राह्मणानें नेहमीं पुराणोक्त मंत्र म्हणावेत. शूद्र व स्त्रिया यांना भारत व पुराणें ऐकण्याचा जरी अधिकार आहे, तरी तीं शिकण्याचा नाहीं. ब्राह्मणाला पुढें बसवून वक्त्यानें ( पुराणिकानें ) चारी वर्णांना पुराण ऐकवावें. शूद्राचे पञ्चमहायज्ञ व श्राद्धादि कर्मे कातीय ( कात्यायन ) सूत्राप्रमाणें होतात, असें मयूखांत सांगितलें आहे. आगमांत ( धर्मशास्त्रग्रंथांत ) सांगितलेले व शेवटीं 'नमः' हा शब्द असलेले विष्णु व शिव वा देवतांचे मंत्र प्रणवरहित ( ॐकारावांचून ) शूद्रांनीं पाठ करावेत. स्त्रिया व शूद्र यांनीं पुराणादि साधनांनीं–श्रवण, मनन व निदिध्यास–यांच्या साह्यानें ब्रह्मज्ञान सुद्धां मिळवावें. त्यांना उपनिषदें ऐकण्याचा अधिकार नाहीं. कारण,–'तदनादरश्रवणात्'–या वाक्यांत शूद्रांना आदरानें उपनिषद ऐकण्याचा अधिकार नाहीं, असें सांगितलें आहे. शूद्रानें सर्व श्राद्धें आमान्नानें (कच्च्या पदार्थांनीं) करावींत. म्हणजे शिधा द्यावा. सर्व प्रजा ( सन्तति ) कश्यपाची असल्यानें सर्व शूद्रांचें गोत्र काश्यप होय, म्हणून या काश्यप गोत्राचा उच्चार शूद्रांनीं फक्त श्राद्धांतच करावा, इतर कोठें करूं नये, असें कित्येक ग्रन्थकारांनीं सांगितलें आहे. शूद्राला शान्त्यादि कर्मे करण्याचा सांगितलेला अधिकार ब्राह्मणाकडूनच करवण्याचा आहे असें समजावें. एखाद्या शूद्रापासून दक्षिणा घेऊन वैदिक मंत्रांनीं त्या शूद्राची होम, अभिषेक वगैरे कर्मे जर ब्राह्मण करील, तर त्या पुण्याचा फलभागी तो शूद्र होईल; पण ब्राह्मण महादोषी होतो असें माधवग्रन्थांत सांगितलें आहे.

अहिंसासत्यास्तेयशौचेन्द्रियनिग्रहदानशमदमक्षमादयःशूद्रादिसर्वसाधारणाधर्माः परपदप्रापकाः स्वस्तिवाचनादिशूद्रकर्मणांप्रयोगास्तुशूद्रकमलाकरे ज्ञेयाः ॥

**शूद्रांचे सर्वसाधारणधर्म**—हत्या न करणें, खरें बोलणें, चोरी न करणें, शुद्धता राखणें, सर्व इन्द्रियें आपल्या ताब्यांत ठेवणें ( इन्द्रियनिग्रह ), दान करणें, नम्रता धरणें ( दम ), दुसऱ्याचा अपराध विसरणें ( क्षमा ) वगैरे शूद्र आणि इतर लोक यांचे सर्वसाधारण धर्म असून ते परमेश्वराची प्राप्ति करून देणारे आहेत. पुण्याहवाचन वगैरे शूद्रांच्या कर्मांचे प्रयोग जर पाहायचे असतील, तर ते शूद्रकमलाकरांत पाहावेत.

अथवापीकूपाद्युत्सर्गादि। गृहग्रामयोराग्नेयदक्षिणनैर्ऋत्यवायव्येषु मध्येच दुष्टफलः कूपः शेषदिक्षुशुभः वापीकूपतडागाद्युत्सर्गउत्तरायणेमाघादिमासषट्कस्यशुक्लपक्षेषुप्रशस्तः जलक्षयसंभावनायांकार्तिकमार्गशीर्षयोरपि नकाल-

नियमस्तत्रसलिलंतत्रकारणम्। इत्युक्तेःचतुर्षुविष्णुशयनमासेषुशुक्रास्तादौच-वर्ज्यम् ॥

**विहिरी, तलाव वगैरेंचा उपसा**—घर किंवा गांव यांच्या—आग्नेय, नैर्ऋत्य, दक्षिण आणि वायव्य—या दिशांस किंवा गांवाच्या मध्यभागीं असलेली विहीर वाईट फळ देणारी होते व इतर दिशांस असणारी शुभदायक असते. उत्तरायणांत, माघादि सहा महिन्यांतल्या ( माघ ते आषाढ ) शुद्ध पक्षांत—विहिरी, आड, तलाव वगैरेंतल्या पाण्याचा उपसा केल्यास बरें. माघादि सहा महिन्यांत—विहिरी, आड वगैरेंतलें पाणी आटून जाण्याचा जर संभव असला, तर कार्तिक व मार्गशीर्ष या महिन्यांतहि त्यांचा उपसा करावा. कारण—उत्सर्ग ( उपसा ) करण्याचें कारण पाणीच असून, त्याला कालनिर्णय नाहीं, असें वचन आहे; म्हणून, विहिरी वगैरेंत ( शिल्लक ) पाणी आहे तोंच त्याचा उपसा केलेला बरा. विष्णुशयनाच्या चार महिन्यांत ( आषाढ शुद्ध एकादशी ते कार्तिक शुद्ध एकादशी ) व शुक्रास्तांत पाण्याचा उपसा करूं नये.

अश्विनीरोहिणीमृगपुष्यमघात्र्युत्तरामूलश्रवणादित्रयहस्तज्येष्ठानुराधारेवती-षुद्वितीयातृतीयापञ्चमीसप्तमीदशम्येकादशीत्रयोदशीतिथिषुबुधगुरुशुक्रसो-मवारेषुजलोत्सर्गःशुभः उत्सर्गाभावेजलंनग्राह्यम् वापीकूपतडागादौयज्जलं-स्यादसंस्कृतम् नस्पृष्टव्यंनपेयंचपीत्वाचान्द्रायणंचरेत् ? उत्सर्गप्रयोगोऽन्य-तोज्ञेयः ॥

**जलोत्सर्गनक्षत्रें**—अश्विनी, रोहिणी, मृग, पुष्य, मघा, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, मूळ, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हस्त, ज्येष्ठा, अनुराधा व रेवती—हीं नक्षत्रें, द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, दशमी, एकादशी व त्रयोदशी—या तिथि, आणि बुध, गुरु, शुक्र व सोम—हे वार जलोत्सर्गास ( पाण्याचा उपसा करण्यास ) शुभ होत. ज्या पाण्याचा उपसा झाला नसल, त पाणी घेऊं नये. विहिरी, आड, तळीं वगैरेंचा जर उत्सर्गसंस्कार झाला नसला, तर त्यांतल्या पाण्याला स्पर्शही करूं नये, मग पिण्याचीं गोष्टच नको. तसलें पाणी पिण्यांत आल्यास चान्द्रायण करावें. उत्सर्गप्रयोग इतर ग्रन्थांत पाहावा.

अथवृक्षादिरोपणम् । अश्विनीरोहिणीमृगपुष्यमघोत्तरात्रयहस्तचित्रा-विशाखानुराधामूलशततारकारेवतीषुसत्तिथिवारेषुवृक्षलतारोपः शस्तः आश्ले-षायांसोमवारःसोमोलग्नेबलान्वितः ।-योगेऽस्मिन्रोपयेदिक्षुकदलीक्रमुकादि-कान् १ नारीकेलान्वपेद्भूमावश्विन्यांलग्नगेरवौ । नागवल्लींगुरौलग्नेचन्द्रेस्वांश-स्थितेसति ॥

**वृक्षरोपण**—अश्विनी, रोहिणी, मृग, पुष्य, मघा, तिन्ही उत्तरा, हस्त, चित्रा, विशाखा, अनुराधा, मूळ, शततारका आणि रेवती—हीं नक्षत्रें, शुभतिथि आणि शुभवार यांवर असतील तेव्हां झाडें व वेल यांची लागण

( रोपण ) करावी. ती चांगली होय. आश्लेषा नक्षत्र, सोमवार, व लग्नीं ( लावणाऱ्याच्या ) बलवान् चन्द्र—असा योग असतां, ऊंस, केळी व पोंफळी यांची लावणी करावी. लग्नीं रवि असतां अश्विनी नक्षत्रावर नारळाचीं झाडें जमिनींत लावावींत. स्वांशस्थ ( आपल्या अंशांत ) चन्द्र व लग्नीं गुरु असतां, नागवेलीची ( विड्याच्या पानांच्या वेलीची ) लावणी करावी.

**अथमूर्तिप्रतिष्ठा । प्रतिष्ठासर्वदेवानांवैशाखज्येष्ठफाल्गुने । चैत्रेतुस्याद्विकल्पेनमाघेविष्णवन्यमूर्तिषु १ सौम्यायनेशुभाप्रोक्तानिन्दितादक्षिणायने । मातृभैरववाराहनरसिंहत्रिविक्रमाः २ दक्षिणेप्ययनेस्थाप्यादेव्यश्चेत्युचिरेपरे । विष्णोः शस्ताश्चैत्रमासाश्विनश्रावणकाअपि ३ माघफाल्गुनवैशाखज्येष्ठाषाढसहः सुच । श्रावणेचनभस्येचलिङ्गस्थापनमुत्तमम् ४ देव्यामाघेऽश्विनेमासेप्युत्तमासर्वकामदा । अश्विनीरोहिण्युत्तरात्रयमृगपुनर्वसुपुष्यहस्तचित्रास्वात्यनुराधाश्रवणत्रयरेवतीषुशनिभौमान्यवासरदर्शरिक्तान्यतिथौसर्वदेवप्रतिष्ठाशुभा श्रवणेकृत्तिकादिविशाखन्तेषुचद्वादश्यांचविष्णोःप्रशस्ता चतुर्थीगणेशस्योक्ता नवमीमूलभंचदेव्याःतथास्वस्वनक्षत्राणिसर्वेषाम् यथार्द्राशिवस्य हस्तः सूर्यस्येत्यादि ॥**

**मूर्तिस्थापना**—वैशाख, ज्येष्ठ व फाल्गुन या महिन्यांत सर्व देवतांच्या मूर्तींची प्रतिष्ठा म्हणजे अर्चा करावी. चैत्रांत विकल्पानें स्थापना होते. याचा अर्थ—कित्येकांच्या मतें स्थापना होते व कित्येकांच्या मतें होत नाहीं. विष्णूच्या मूर्तीच्या स्थापनेवांचून इतर मूर्तींची प्राणप्रतिष्ठा ( अर्चा ) माघांत करावी. उत्तरायणांतच अर्चा करणें शुभ असून दक्षिणायनांत करणें अशुभ होय. मातृका, भैरव, वाराह, नारसिंह, त्रिविक्रम आणि देवी—यांची संस्थापना दक्षिणायनांतही करावी, असें कित्येक ग्रन्थकार सांगतात. चैत्र, आश्विन आणि श्रावण—या महिन्यांत विष्णूमूर्तीचें अर्चन करावें. माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, मार्गशीर्ष, श्रावण आणि भाद्रपद—या महिन्यांत लिंगस्थापना करणें उत्तम. माघ व आश्विन यांत देवीची स्थापना करणें चांगलें. त्यामुळें सर्व मनोरथ पूर्ण होतात. अश्विनी, रोहिणी, तिन्ही उत्तरा, मृग, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाति, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका व रेवती या नक्षत्रांवर, शनि व मंगळ या वारांवांचून इतर वारीं, अमावास्या आणि रिक्ता ( चतुर्थी, नवमी व चतुर्दशी ) या तिथि वर्ज्य करून, इतर सर्व तिथींवर देवतांची स्थापना करणें शुभकारक आहे. श्रवण, कृत्तिका, रोहिणी, मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वा, उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाति, विशाखा व द्वादशी यांवर विष्णुस्थापना चांगली. गणपतीच्या अर्चेला चतुर्थी उत्तम. देवीच्या अर्चेला नवमी व मूळनक्षत्र हीं चांगलीं असल्याचें सांगितलें आहे. शिवाची आर्द्रा नक्षत्रीं, सूर्याची हस्त नक्षत्रीं. याप्रमाणें ज्या देवतेचें जें नक्षत्र असेल त्या नक्षत्रावर त्या देवतेची स्थापना करावी.

हन्त्यर्थहीनाकर्तारं मंत्रहीनातुऋत्विजम् । स्त्रियंलक्षणहीनातुनप्रतिष्ठा-समोरिपुः १ ब्रह्मातुब्राह्मणैःस्थाप्योगायत्रीसहितःप्रभुः । सर्ववर्णैस्तथाविष्णुः प्रतिष्ठाप्यःसुखार्थिभिः २ मातृभैरवाद्याःसर्वैःशिवलिङ्गंयतिनापि पुराणप्रसिद्धं-जीर्णलिङ्गंस्त्रीशूद्रैरपिपूज्यम् नूतनस्थापितलिङ्गंस्त्रीशूद्रोवापिनस्पृशेत् । शिवा-दिप्रतिष्ठायांस्त्रीशूद्रादेर्नाधिकारःशूद्रोवाऽनुपनीतोवास्त्रियोवापतितोपिवा । केशवंवाशिवंवापिस्पृष्ट्वानरकमश्नुते १ स्थिरप्रतिमाःप्राङ्मुखोरुदङ्मुखोयजेत् चलप्रतिमासुप्राङ्मुखः सौवर्णीराजतीताम्रीमृन्मयीप्रतिमाभवेत् पाषाणधातु-मुक्तावाकांस्यपित्तलयोरपि १ अङ्गुष्ठपर्वमानात्सावितस्तियावदेवतु । गृहेषु-प्रतिमाकार्यानाधिकाशस्यतेबुधैः २ मृद्दारुलाक्षागोमेदमधूच्छिष्टेनचक्वचित् । श्रीमद्भागवतेशैलीदारुमयीलोहीलेप्यालेख्याचसैकती । मनोमयीमणिमयी-प्रतिमाऽष्टविधास्मृता १ लौहीसौवर्णी दारुमधूकवृक्षस्यैव सप्ताङ्गुलाधिकाद्वा-दशाङ्गुलपर्यन्तागृहेप्रतिमेतिदेवीपुराणे अर्चकस्यतपोयोगादर्चनस्यातिशाय-नात् । आभिरूप्याच्चबिम्बानांदेवःसान्निध्यमृच्छति १ प्रतिमापट्टयंत्राणांनित्यं-स्नानंनकारयेत् । कारयेत्पर्वदिवसेयदाचमलधारणम् १ पार्थिवलिङ्गपूजादि-विचारोद्वितीयपरिच्छेदेउक्तः ॥

**देवमूर्ति कशाच्या असाव्या व कशा पूजाव्या**—द्रव्यावांचून (धन आणि स्थापनासाहित्य) यावांचून अर्चा (मूर्तिस्थापना) केल्यानें, कर्त्याचा (स्थापना करणाराचा) नाश होतो. व मंत्रांवांचून (स्थापना) केल्यास ऋत्विजाचा (उपाध्याय) नाश होतो. लक्षणहीन (मूर्ति ज्या देवाची करायची त्याच्या विशेष खुणेवांचून असणारी मूर्ति) मूर्तीची स्थापना स्त्रीनाश करते. यावरून अर्चेसारखा दुसरा शत्रु नाहीं असें ठरतें. ब्राह्मणांनींच गायत्रीसह ब्रह्मदेवस्थापना करावी. सुखेच्छूनें व सर्व वर्णांनीं विष्णूची स्थापना करावी. मातृका, भैरव वगैरे देवतांची स्थापना हवी त्यानें करावी. शिवलिंगस्थापना संन्याशानेंही करावी. पुराणप्रसिद्ध अशा जुनाट लिंगाची पूजा, स्त्री व शूद्र यांनींही करावी, मात्र नवीन स्थापलेल्या लिंगाची त्या दोहोंनींही करूं नये. शिवलिंगस्थापनेचा अधिकार स्त्रीशूद्रांना नाहीं. शूद्र, मुंज न झालेला, स्त्री आणि पतित यांपैकीं जर कोणीही शिवविष्णूंना स्पर्श करील, तर त्याला नरकवास भोगावा लागेल. स्थिर (न हलणाऱ्या) पूर्वाभिमुख मूर्तीची पूजा करणारानें उत्त-राभिमुख बसावें व चल (हलणाऱ्या) मूर्तीची पूजा करणाऱ्यानें पूर्वाभिमुख बसावें. सोनें, रुपें, तांबें, माती, दगड, धातु, मोतीं, कांसें व पितळ यांपैकीं हवी त्याची मूर्ति करावी. घरांतल्या पूजेसाठीं अंगठ्यापासून एक वितीपेक्षां अधिक उंचीची मूर्ति करणें इष्ट नसल्याचें शास्त्र्यांनीं सांगितलें आहे. माती, लांकूड, लाख, डिंक, मणि (रत्न) किंवा मेण यांपैकींही हवी त्याची मूर्ति करण्यास कित्येक ग्रन्थांत सांगितलें आहे. दगडी, लांकडी, लोखंडी, मातट, रंगीत, वाळवेची, मनोमयी (मनांत अस-णारी) आणि रत्नाची (मणिमयी) अशा आठ प्रकारच्या मूर्ति करण्यास भागवतांत

सांगितलें आहे. येथें लोखंडी ( लौही ) याचा अर्थ सोन्याची असा घ्यावा. ( मूर्तीसाठीं ) दारु म्हणजे जें लांकूड घ्यायचें तें मोहाचेंच ( मधुक ) घ्यावें. घरांतल्या पूजेसाठीं जी मूर्ति करायची ती सात ते बारा बोटें उंचीची असावी, असें देवीपुराणांत सांगितलें आहे. पूजा करणाराचें तप ( दैव ), पूजेचा भक्तिविशेष आणि मूर्तीचें सौन्दर्य—या तीन कारणांनींच पूजेच्या वेळीं देवता ( सान्निध्य ) जवळ असते. मूर्ति, पट्ट ( चित्र ) आणि यन्त्रें—यांना रोज स्नान घालूं नये. पर्वणीला किंवा मूर्ति मळकट झाल्या असल्यास स्नान घालावें, पार्थिव लिंगपूजा वगैरेंचा निर्णय दुसऱ्या परिच्छेदांत सांगितलाच आहे.

**अथपञ्चसूत्रीनिर्णयः। लिङ्गोच्चतालिङ्गविस्तारोलिङ्गस्थौल्यंपीठविस्तारः प्रणालिकामानंचेतिपञ्चसूत्राणि तत्रलिङ्गमस्तकविस्तारंलिंगोच्चतातुल्यंकृत्वा- तद्द्विगुणसूत्रवेष्टनार्हंलिंगस्थौल्यंकृत्वालिंगात्सर्वतोलिंगसमविस्तारंपीठंवर्तुलं- कुर्यात् पीठोच्चतालिंगोच्चद्विगुणा पीठाद्बहिः पीठोत्तरभागेलिंगसमदीर्घा- मूलेदैर्घ्यसमविस्तारा अग्रेतदर्धविस्ताराप्रणालिका लिंगोच्चत्वात्रिगुणापीठोच्चते- तिकेचित् अथपीठमध्यभागे लिंगात्द्विगुणस्थूलंपीठोच्चतातृतीयांशेनकण्ठं- कुर्यात् कण्ठस्योर्ध्वाधोभागयोःसमंवप्रद्वयंकृत्वापीठोपरिलिङ्गविस्तारषष्ठांशे- नमेखलांकृत्वातदन्तःसंलग्नंतत्समंखातंकुर्यात् प्रणालिकायामपिविस्तारतृतीयांशे नखातः पीठवन्मेखलाचकार्येति ॥**

**पञ्चसूत्रीनिर्णय**—लिंगाची उंची, रुंदी व जाडपणा, शाळुंखीचा ( पीठ ) विस्तार आणि प्रणालिकापरिमाण ( पन्हळीची लांबी, रुंदी व खोली ) हीं पांच सूत्रें होत. लिंगाची जेवढी उंची असेल तेवढाच लिंगाच्या मस्तकाचा विस्तार ( घेर ) करून, त्याच्या मापाच्या सूत्राची दुप्पट पुरेल इतका लिंगाचा जाडपणा ( स्थूलत्व ) करावा, आणि लिंगाच्या भोंवतालीं लिंगाच्या जाडीएवढें वाटोळें पीठ ( साळुंखी ) करावें. पीठाची उंची लिंगाच्या उंचीच्या दुप्पट असावी. साळुंखीच्या बाहेर तिच्या उत्तरेस लिंगाएवढी लांब, मूळांत लांबीइतकीच जाडी आणि शेवटीं मूळाच्या अर्ध्यानें विस्तार ( रुंद ) असलेली प्रणालिका ( पन्हळी ) असावी. कित्येक ग्रंथकार म्हणतात कीं, साळुंखीची उंची लिंगाच्या तिप्पट असावी. साळुंखेच्या मध्यावर लिंगापेक्षां दुप्पट जाड असा तिच्या उंचीच्या तिसऱ्या हिश्शाएवढा कंठ ( गळा ) करावा. गळयाचा वरचा व खालचा असे दोन्ही भाग यांवर सारख्या प्रमाणाच्या दोन मेखला ( कटिसूत्र ) करून, साळुंखीवर लिंगाच्या व्यासाच्या सहाव्या हिश्शाएवढी मेखळा करावी आणि त्या मेखळेला लागूनच राहील अशी तिच्यांत गर्ता ( खांच ) करावी. प्रणालिकेंतही तिच्या विस्ताराच्या तिसऱ्या हिश्शाइतकी खांच करून, साळुंखीच्या मानानें मेखला करावी.

**गृहेलिङ्गद्वयंनार्च्यंशालग्रामद्वयंतथा। द्वेचक्रेद्वारकायास्तुनार्च्येसूर्यद्वयं- तथा १ शक्तित्रयंत्रिविघ्नेशंद्वौशङ्खौनार्चयेत्सुधीः। अन्यत्रतुचक्राङ्कमिथुनं- पूज्यंनैकंचक्राङ्कमर्चयेत्। इत्युक्तंतेनविकल्पः नार्च्येचतथामत्स्यकूर्मादिदशकं-**

गृहे । अग्निदग्धाश्चभग्नाश्चन पूज्याःप्रतिमागृहे १ भग्नावास्फुटितावापिशालग्रामशिलाशुभा । शालग्रामाःसमाःपूज्याःसमेषुद्वितयंनहि २ विषमानैवपूज्यन्तेविषमेष्वेकएवहि । ससुवर्णशालग्रामदानेपृथ्वीदानफलम् शतशालग्रामपूजनेऽनन्तफलम् अविभक्तानामपिभ्रातॄणांदेवतार्चनमग्निहोत्रंसंध्याब्रह्मयज्ञश्चपृथगेव स्त्रीशूद्रोवास्पर्शसहितंशालग्रामचक्राङ्कितबाणलिङ्गानिनार्चयेत् शूद्रोवाऽनुपनीतोवासधवाविधवाङ्गना । दूरादेवास्पृशन्पूजांप्रकुर्याच्छिवकृष्णयोः ॥ १ ॥ शालग्रामबाणयोरेवस्पर्शननिषेधोनतुप्रतिमादौ सर्ववर्णैस्तुसंपूज्याःप्रतिमाःसर्वदेवताः लिङ्गान्यपितुपूज्यानिमर्णिभिःकल्पितानिच ॥ २ ॥ इत्युक्तेःशालग्रामशिलाक्रीतामध्यमायाचिताऽधमा । उक्तलक्षणसंपन्नापारंपर्येक्रमागता ॥ १ ॥ उत्तमासातुविज्ञेयागुरुदत्तातुतत्समा । तत्राप्यामलकीतुल्यापूज्यासूक्ष्मैवयाभवेत् ॥ २ ॥ यथायथाशिलासूक्ष्मातथास्यात्तुमहत्फलम् । यवमात्रंतुगर्तःस्याद्यवार्धंलिङ्गमुच्यते ॥ ३ ॥ शिवनाभिरितिख्यातस्त्रिषुलोकेषुदुर्लभः । शालग्रामशिलायास्तुप्रतिष्ठानैवविद्यते ॥ ४ ॥ महापूजांतुकृत्वादौपूजयेत्तांततोबुधः । बाणलिङ्गानिराजेन्द्रख्यातानिभुवनत्रये ॥ ५ ॥ नप्रतिष्ठानसंस्कारस्तेषामावाहनंतथा । वासुदेवसंकर्षणप्रद्युम्नानिरुद्धविप्राद्यैःक्रमेण पूज्याः तल्लक्षणंतु पञ्चचक्रोवासुदेवः षडभिश्चक्रैः प्रद्युम्नः सप्तभिःसंकर्षणः एकादशभिरनिरुद्धइति प्रणवोच्चारणाच्चैवशालग्रामशिलार्चनात् ब्राह्मणीगमनाच्चैवशूद्रश्चाण्डालतांव्रजेत् ॥ १ ॥ दीक्षायुक्तैस्तथाशूद्रैर्मद्यपानविवर्जितैः कर्तव्यंब्राह्मणद्वाराशालग्रामशिलार्चनम् २ विष्णुप्रीतिकरंनित्यंतुलसीकाष्ठचन्दनम् । कार्तिकेकेतकीपुष्पंयेनदत्तंहरेःकलौ ३ दीपदानंचदेवर्षेतारितंतेनवैकुलम् । शालग्रामसंबन्धितोयवच्चक्राङ्कशिलातोयस्यापिपानविधानात्सापिशालग्रामसन्निधौपूज्या अग्राह्यंशिवनिर्माल्यंपत्रंपुष्पंफलंजलम् । शालग्रामस्यसंस्पर्शात्सर्वंयातिपवित्रताम् ॥ १ ॥ मध्यमानामिकामध्येपुष्पंसंगृह्यपूजयेत् । अंगुष्ठतर्जन्यग्राभ्यांनिर्माल्यमपनोदयेत् ॥ २ ॥ विनाभस्मत्रिपुण्ड्रेणविनारुद्राक्षमालया । पूजितोपिमहादेवोनस्यात्तस्यफलप्रदः ॥ ३ ॥ विनामन्त्रंनबिभृयाद्रुद्राक्षान्भुविमानवः । पञ्चामृतंपञ्चगव्यं स्नानकालेप्रयोजत् ॥ ४ ॥ रुद्राक्षस्यप्रतिष्ठायां मन्त्रंपञ्चाक्षरंतथा । त्र्यम्बकादिकमन्त्रंचतथातत्रप्रयोजयेत् ५ । अष्टोत्तरशतं कुर्याच्चतुःपञ्चाशदेवतु । सप्तविंशतिमानावामालाहीनानयुज्यते ॥ ६ ॥ सप्तविंशतिरुद्राक्षमालयादेहसंस्थया । यःकरोतिनरःपुण्यंसर्वकोटिगुणंभवेत् ॥

**शालग्राम आणि बाण ( लिंग ) यांची पूजा**—घरांत दोन लिंगें पुजूं नयेत व त्याचप्रमाणें दोन शालग्राम, दोन चक्रांकें ( द्वारकाचक्रें ), दोन सूर्यकान्त, तीन देवि, तीन गणपति आणि दोन शंख—यांची शहाण्यानें पूजा करूं नये. दुसऱ्या ग्रन्थांत दोन चक्रांकें पूजावींत, एकत्र पूजूं नये असें जें सांगितलें आहे, त्यावरून दोन चक्रांकें

पूजण्याविषयीं विकल्प असल्याचें सिद्ध होतें. मत्स्यकूर्मादि दहा अवतारांच्या मूर्तींची पूजा घरांत करूं नये. आगीनें जळलेल्या व फुटक्या मोडक्या मूर्ति घरांत पूजूं नयेत. शालग्रामशिला फुटकी कीं तुटकी असली तरी पूजेला ती शुभकारकच आहे. सम (म्हणजे–४-६-८-१० वगैरे) शालग्रामांची पूजा करावी, पण समांतल्या (फक्त) दोहोंचीच पूजा करूं नये. आणि विषम (म्हणजे–३-५-७-९ वगैरे) शालग्रामही जरी पूजूं नयेत तरी एकाच शालग्रामाची पूजा करण्यास हरकत नाहीं. शंभर शालग्रामांच्या पूजेचें फळ अनन्त मिळतें. भाऊ भाऊ जरी विभक्त नसले तरी त्यांनीं देवपूजा, अग्निहोम, सन्ध्या व ब्रह्मयज्ञ हीं कर्में निरनिराळीं करावींत. स्त्रिया किंवा शूद्र यांनीं शालग्राम, चक्रांक व बाणलिंग यांना शिवून पूजा करूं नये; कारण, शूद्र, मुंज न झालेला, सौभाग्यवती स्त्री (नवरा असलेली) आणि विधवा (नवरा मेलेली) यांनीं स्पर्श न करतां दुरूनच शिव आणि विष्णु यांची पूजा करावी, असें वचन आहे. शालग्राम आणि बाणलिंग यांच्याच स्पर्शाबद्दल निषेध आहे, मूर्तींच्या बाबतींत निषेध नाहीं; कारण सर्व वर्णांनीं सर्व देवतांच्या मूर्तींची पूजा करावी आणि मणिमय (रत्नांचीं) लिंगें सुद्धां पूजावींत, असें वचन आहे. विकत घेतलेली शालग्रामशिला मध्यम आणि भिक्षा मागून मिळवलेली अधम होय. योग्य लक्षणांची व परंपरेनें मिळालेली शालग्रामशिला ही उत्तम समजावी. आपल्या गुरूनें दिलेलीही शालग्रामशिला उत्तम समजावी. आंवळ्याएवढी लहान शालग्रामशिला पूज्य (पूजा करण्यास योग्य) समजावी. हिच्या पेक्षांही जेवढी जेवढी लहान मिळेल तेवढें तेवढें तिच्या पूजेपासून उत्तरोत्तर महाफल मिळतें. ज्या शालग्रामशिलेवरच्या यवाएवढ्या खळग्यांत अर्धयवाएवढें लिंग असतें, तिला शिवनाभिशिला म्हणतात. ही शिला स्वर्ग, मृत्यु व पाताळ यांतही मिळणें कठीण आहे. शालग्रामशिलेची अर्चा (प्राणप्रतिष्ठा) करूं नये. आधीं महापूजा करून मग तिची पूजा करावी. राजेन्द्रा, बाणलिंगें त्रिभुवनांत प्रसिद्ध आहेत. त्यांचा अर्चासंस्कार व आवाहन–हीं करूं नयेत. वासुदेव, संकर्षण प्रद्युम्न व अनिरुद्ध यांचो ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांनीं अनुक्रमें पूजा करावी. या चारी शालिग्रामशिलांचीं लक्षणें येणेंप्रमाणें:—पांच चक्रांचीं ती वासुदेवरूप, सहा चक्रांची ती संकर्षणरूपी, सात चक्रांची ती प्रद्युम्न आणि अकरा चक्रांची ती अनिरुद्धरूपी. प्रणवाचा (ॐ) उच्चार, शालग्रामपूजा व ब्राह्मणीसमागम हीं केल्यानें शूद्राला चाण्डाळपणा येतो. मद्यपान न करणारे व विष्णुदीक्षा घेतलेले अशा शूद्रांनीं ब्राह्मणाकडून शालग्रामशिलापूजन करवावें. नारदा, विष्णूला नेहमीं संतुष्ट करणारें तुलशीच्या काष्ठाचें गन्ध आणि कार्तिकांत केवडा व दीपदान हीं कलियुगांत ज्यानें हरीला अर्पण केलीं, त्यानें आपल्या कुलाला तारल्यासारखें होतें. शालग्रामाच्या तीर्थाप्रमाणेंच चक्रांकितांचेंही तीर्थ घेण्याचा विधि असल्यानेंच शालग्रामशिलेजवळ त्याचीही तिच्याबरोबरच पूजा करावी. शिवनिर्माल्याचीं पानें, फुलें, फळें व पाणी हीं जरी घेण्यास अयोग्य आहेत, तरी शालग्रामशिलास्पर्शानें तें सर्व पवित्र होतें. मधलें बोट व

अनामिका ( त्याच्याजवळचें बोट ) यांनीं फुलें उचलून देवाला वहावींत. अंगठा व तर्जनी ( अंगठ्याजवळचें बोट ) यांच्या टोंकांनीं देवावरचा निर्माल्य काढावा. भस्माचा त्रिपुण्ड्र लावल्यावांचून व रुद्राक्षमाला घातल्याशिवाय केलेली महादेवाची पूजा फलदायी होत नाहीं. या पृथ्वीवर मनुष्यानें मंत्रावांचून रुद्राक्षधारण करूं नये. रुद्राक्षस्नानाच्यावेळीं पञ्चामृत व पञ्चगव्य यांचा उपयोग करावा. रुद्राक्ष-स्थापनेच्या वेळीं ( प्रतिष्ठा ) पञ्चाक्षरमंत्र ( ॐ नमः शिवाय ) व त्र्यम्बकादि मंत्र योजावेत. एकशें आठ, चौपन किंवा सत्तावीस रुद्राक्षांची माळ करावी. यापेक्षां कमी रुद्राक्षांची माळ करूं नये. सत्तावीस रुद्राक्षांची माळ गळ्यांत घालून जो मनुष्य जपादि पुण्यकर्म करतो, त्याचें तें सर्व कर्म कोटिपट होतें.

**अथरुद्राक्षतुलस्यादिसर्वजपमालानांसंस्कारः । कुशोदकसहितैःपञ्चगव्यैर्मालांप्रक्षाल्यॐ ऱ्हींअंआंइंईंउंऊंऋंॠंऌंॡंएंऐंओंऔंअंअः कंखंगंघंङं चंछंजंझंञं टंठंडंढंणं तंथंदंधंनं पंफंबंभंमंयंरंलंवंशंषंसंहंक्षं इत्येतानि पञ्चाशन्मातृकाक्षराणि अश्वत्थपत्रस्थापितमालायांविन्यस्य ॐ सद्योजातं० वामदेवाय०अघोरेभ्यो०तत्पुरुषाय० ईशानःसर्वविद्याना० इतिपञ्चमन्त्रानूजपित्वा सद्योजातेतिमन्त्रेणमालांपञ्चगव्येनप्रोक्ष्यशीतजलेनप्रक्षाल्यवामदेवेतिचंदनेनाघृष्याघोरेति मालांधूपयित्वातत्पुरुषेतिचन्दनकस्तूर्यादिनालेपयित्वेशानइतिमन्त्रेणप्रतिमाणिंशतवारंदशवारंवाभिमन्त्र्यअघोरइतिमन्त्रेणमेरुंशतवारमभिमन्त्रयेत् ततएतैरेवपञ्चभिर्मन्त्रैर्मालांपञ्चोपचारैः पूजयेदिति ॥**

**रुद्राक्ष व तुलसी यांचा मालासंस्कार**—दर्भ व पाणी यांसह पंचगव्यांनीं माला धुऊन ती पिंपळाच्या पानावर ठेवावी व 'ॐ ऱ्हीं अं आं इं ईं उं ऊं ऋं ॠं ऌं ॡं एं ऐं ओं औं अं अः कं खं गं घं ङं चं छं जं झं ञं टं ठं डं ढं णं तं थं दं धं नं पं फं बं भं मं यं रं लं वं शं षं सं हं क्षं' या पन्नास मातृकाक्षरांचा त्या मालेवर न्यास ( स्थापना ) करावा व नंतर 'सद्योजातं० ।' वामदेवाय० । अघोरेभ्यो० । तत्पुरुषाय० । व ईशानः सर्व विद्यानां० । या पांच मंत्रांचा जप करून 'सद्योजातं०' या मंत्रानें पंचगव्य माळेवर शिंपडावें आणि थंड पाण्यानें मग ती माळ धुवावी. नंतर 'वामदेवाय०' या मंत्रानें तिला चन्दन चोळून 'अघोरे०' या मंत्रानें धूप दाखवावा. 'तत्पुरुषाय०' या मंत्रानें चंदन, कस्तुरी इत्यादिकांचा मालेला नंतर लेप केल्यावर 'ईशानः सर्व०' या मंत्रानें प्रत्येक मणि शंभर वेळ किंवा दहा वेळ अभिमंत्रावा आणि मग 'अघोरे०' हा मंत्र म्हणून, मालेचा मेरुमणि शंभरदां अभिमंत्रित करावा. आणि मग हें सर्व झाल्यावर याच पांच मंत्रांनीं मालेची गंधादि पंचोपचारांनीं पूजा करावी. याप्रमाणें येथें संस्कारविधि संपला.

**बोपदेवः रुद्राक्षान्कण्ठदेशेदशनपरिमिताम्मस्तकेविंशतीद्वे षट्षट्कर्णप्रदेशेकरयुगुलकृतेद्वादशद्वादशैव । बाह्वोरिन्दोःकलाभिर्नयनयुगकृतेएकमेकंशिखायांवक्षस्यष्टाधिकंयःकलयतिशतकंसस्वयंनीलकण्ठः १ रुद्राक्षदानाद्ध्रुवपदमाप्तिः ॥**

**रुद्राक्षधारण**—गळ्यांत बत्तीस, मस्तकावर चाळीस, प्रत्येक कानांत सहा सहा, दोन्ही मणगटें मिळून चोवीस, दोन्ही दण्ड मिळून बत्तीस, दोन डोळ्यांवर दोन, शेंडींत एक आणि वक्षस्थळावर ( ऊर ) एकशें आठ–असे जो कोणी रुद्राक्ष धारण करतो, तो प्रत्यक्ष शंकरच समजावा. असें बोपदेवांचें म्हणणें आहे. रुद्राक्षदान दिल्यानें रुद्रपद मिळतें.

**पञ्चविंशत्पलंलिङ्गेष्वभ्यङ्गंकारयेदथ । स्नापयेत्तिलतैलैश्चकरयन्त्रोद्भवैः-शिवम् ॥ १ ॥ स्नानंपलशतंज्ञेयमभ्यङ्गःपञ्चविंशतिः ॥ २ ॥ पलनांद्विसहस्रेण-महास्नानंजलेनतत् । पयोदधिघृतक्षौद्रशर्कराद्यैस्ततःक्रमात् ॥ ३ ॥ शिवस्य-सर्पिषास्नानंप्रोक्तंपलशतेनवै । तावतामधुनाचैवदध्नाचदयसापिच ॥ ४ ॥ पल-सार्धसहस्रेणरसेनैवेक्षवेणच । भक्त्याचोष्णोदकैःशीतोदकैःसंस्नापयेच्छिवम् ॥ ५ ॥ श्रीविष्णुंक्षीरदध्याद्यैःक्रमाद्दशगुणोत्तरैः । स्नापयेत्केचिदूचुश्चक्षीराद्यैः-पञ्चभिःसमैः ॥ ६ ॥**

**लिंगस्नान**—पंचवीस पलांचा लिङ्गाला अभ्यंग करावा. हातघाण्यानें काढलेल्या तिळाच्या तेलानें शिवाला ( लिङ्गाला ) स्नान घालावें. ( एक पल हल्लींचे ४० मासे ). शंभर पलें पाण्याचें स्नान व पंचवीस पलांचा सुगन्धी लेप ( अभ्यंग ) करावा. दोन हजार पलें पाण्यानें स्नान घालणें तें महास्नान होय. त्यानंतर दूध, दहीं, मध, तूप व साखर यांचीं अनुक्रमें स्नानें घालावींत. शंकराला शंभर पलें तुपाचें स्नान घालायला सांगितलें आहे. मध, दहीं व दूध हीं प्रत्येकीं शंभर पलें घेऊन त्यांचीं स्नानें ( लिङ्गाला ) घालावींत. पंधराशें पलें उंसाच्या रसाचें स्नान घालावें. शिवाला ऊन व थंड पाण्याचीं स्नानें भक्तीनें घालावींत. विष्णूला जीं–दूध, दहीं वगैरेंचीं स्नानें घालायचीं तीं पहिल्यापेक्षां दुसरें दहापट अधिक, अशीं म्हणजे–दुधापेक्षां दहीं दसपट, दह्यापेक्षां तूप दसपट असें उत्तरोत्तर समजावें. कोणी ग्रन्थकार म्हणतात कीं, दूध, दहीं, तूप वगैरे पञ्चामृतें सारख्याच प्रमाणांचीं घेऊन स्नान घालावें.

**अथश्रीविष्ण्वादिपञ्चायतनानि विष्णुर्मध्येशिवेभास्यसूर्यार्थाईशादिक्क्रमात् । शम्भोमध्येविष्णुसूर्यगजास्यार्यास्तथाक्रमात् २ रवौमध्यगतेरुद्रगणेशाच्युत-शक्तयः । मध्येदेवीविष्णुशिवगणेशरवयःक्रमात् २ मध्येगणपतिर्विष्णुशिव-सूर्याम्बिकास्यथा । ईशानदिक्रमेणैवपञ्चायतनपंचकम् ।**

**पञ्चायतन**—विष्णुपंचायतन—मध्यें विष्णु, ईशान्येस शंकर, आग्नेयीस गणपति, नैर्ऋत्येस सूर्य व वायव्येस देवी. शिवपंचायतन—मध्यें शिव, ईशान्येस विष्णु, आग्नेयीस सूर्य, नैर्ऋत्येस गणपति व वायव्येस देवी. सूर्यपंचायतन—मध्यें सूर्य, ईशान्य दिशेपासून क्रमानें शिव, गणपति विष्णु, व देवी. देवीपंचायतन—मध्यें देवी. ईशान्य दिशेपासून क्रमानें विष्णु, शिव, गणपति व सूर्य. गणपतिपंचायतन—मध्यें गणपति, ईशान्य दिशेपासून क्रमानें विष्णु, शिव, सूर्य व देवी. याप्रमाणें ईशान्य दिशेपासून क्रमानें पांच पंचायतनें मांडण्याचा क्रम समजावा.

| उत्तर दिशा. | शंकर गणेश | विष्णु सूर्य | शंकर गणेश | विष्णु शंकर | विष्णु शंकर | दक्षिण दिशा. |
|---|---|---|---|---|---|---|
| | २ ३ | २ ३ | २ ३ | २ ३ | २ ३ | |
| | विष्णु | शंकर | सूर्य | देवी | गणपति | |
| | १ | १ | १ | १ | १ | |
| | देवी सूर्य | देवी गणेश | देवी विष्णु | सूर्य गणेश | देवी सूर्य | |
| | ५ ४ | ५ ४ | ५ ४ | ५ ४ | ५ ४ | |

अथकेशवादिचतुर्विंशतिमूर्तिनिर्णायकबोपदेवश्लोकःसिन्धौव्याख्यातः तस्यायंसंग्रहः केशवादेश्चतुर्बाहोर्दक्षिणोर्ध्वकरक्रमात् । शङ्खचक्रगदापद्मायुधैःकेशवउच्यते १ नारायणः पद्मगदाचक्रशङ्खायुधैःक्रमात् । माधवश्चक्रशङ्खाभ्यांपद्मेनगदयाभवेत् २ गोविन्दोगदयापद्मशङ्खचक्रैः क्रमाद्भवेत् । विष्णुःपद्मेनशङ्खेनचक्रेणगदयाक्रमात् ३ शङ्खपद्मगदाचक्रैर्मधुसूदनईरितः । त्रिविक्रमोगदाचक्रशङ्खपद्मैरनुक्रमात् ४ वामनःशङ्खचक्राभ्यांपद्मेनगदयापिच । चक्रेणगदयाशङ्खपद्माभ्यांश्रीधरः स्मृतः ५ हृषीकेशःस्मृतश्चक्रपद्मशङ्खगदायुधैः । पद्मनाभःपद्मचक्रगदाशङ्खैः क्रमात्स्मृतः ६ दामोदरःशङ्खगदाचक्रपद्मैरुदीर्यते । संकर्षणःशङ्खपद्मचक्रायुधगदायुधैः ७ वासुदेवश्चक्रगदापद्मशङ्खाख्यलक्षणैः । प्रद्युम्नःस्याच्छङ्खगदापद्मचक्रैः क्रमाद्धृतैः ८ अनिरुद्धोगदाशङ्खपद्मचक्रैरनुक्रमात् । पद्मशङ्खगदाचक्रायुधैःस्यात्पुरुषोत्तमः ९ अधोक्षजोगदाशङ्खचक्रपद्मैः करस्थितैः । नरसिंहःपद्मगदाशङ्खचक्रायुधैर्भवेत् १० अच्युतः पद्मचक्राभ्यांशङ्खेनगदयाक्रमात् । जनार्दनश्चक्रशंखैःगदापद्माढ्यबाहुभिः ११ उपेन्द्रोगदयाचक्रपद्मशङ्खान्वितैःकरैः चक्रपद्मगदाशङ्खैःकरस्थैःस्यात्क्रमाद्धरिः १२ श्रीकृष्णाख्योगदापद्मचक्रशङ्खैर्मतोविभुः । इतिप्रोक्ताःकेशवादिचतुर्विंशतिमूर्तयः १३ ॥

**केशवादि चोवीस विष्णुमूर्तिनिर्णय**—केशवादि चोवीस मूर्तींच्या निर्णयाचा बोपदेवानें केलेला श्लोक निर्णयसिंधूंत व्याख्येसहित जो दिला आहे, तो येथें देतों. केशवादि चोवीस मूर्तींच्या हातांतल्या आयुधांच्या उलटपालटीनें त्या त्या मूर्ति समजाव्यात. हा आयुधांचा क्रम वरच्या उजव्या हातापासून समजावा. ( १ ) वरच्या उजव्या हातांत शंख, खालच्या उजव्या हातांत चक्र; खालच्या डाव्या हातांत गदा व वरच्या डाव्या हातांत पद्म असलेला तो केशव. ( २ ) वरच्या उजव्या हातांत पद्म, खालच्या उजव्या हातांत गदा, खालच्या डाव्या हातांत चक्र व वरच्या डाव्या हातांत शंख असलेला तो नारायण. ( ३ ) त्याचप्रमाणें चक्र, शंख, पद्म व गदा हीं आयुधें असलेला तो माधव. ( ४ ) गदा, पद्म, शंख आणि चक्र यांनीं युक्त तो गोविंद. ( ५ ) पद्म, शंख, चक्र व गदा हीं क्रमानें हातांत घेणारा तो विष्णु. ( ६ ) शंख, पद्म, गदा व चक्र

यांनीं युक्त असलेला तो मधुसूदन. ( ७ ) गदा, चक्र, शंख व पद्म हीं क्रमानें घेणारा तो त्रिविक्रम. ( ८ ) शंख, चक्र, पद्म व गदा हीं क्रमानें घेणारा तो वामन. ( ९ ) चक्र, गदा, शंख व पद्म यांनीं युक्त तो श्रीधर. ( १० ) चक्र, पद्म, शंख व गदा यांनीं युक्त तो हृषीकेश. ( ११ ) पद्म, चक्र, गदा व शंख यांनीं युक्त तो पद्मनाभ. ( १२ ) शंख, गदा, चक्र, व पद्म हीं धारण करणारा तो दामोदर. ( १३ ) शंख, पद्म, चक्र व गदा यांनीं युक्त तो संकर्षण. ( १४ ) चक्र, गदा, पद्म व शंख यांनीं युक्त तो वासुदेव. ( १५ ) शंख, गदा, पद्म व चक्र यांनीं युक्त तो प्रद्युम्न. ( १६ ) गदा, शंख, पद्म व चक्र हीं क्रमानें धारण करणारा तो अनिरुद्ध. ( १७ ) पद्म, शंख, गदा व चक्र यांनीं युक्त तो पुरुषोत्तम. ( १८ ) गदा, शंख, चक्र व पद्म हीं क्रमानें हातांत धारण करणारा तो अधोक्षज. ( १९ ) पद्म, गदा, शंख व चक्र यांनीं युक्त तो नारसिंह. ( २० ) पद्म, चक्र, शंख व गदा हीं क्रमानें धारण करणारा तो अच्युत. ( २१ )चक्र, शंख, गदा व पद्म हीं आयुधें धरणारा तो जनार्दन. ( २२ ) गदा, चक्र, पद्म व शंख यांनीं युक्त तो उपेंद्र. ( २३ ) चक्र, पद्म, गदा व शंख हीं आयुधें क्रमानें हातांत धारण करणारा तो हरि आणि (२४) गदा, पद्म, चक्र व शंख या आयुधांनीं युक्त तो श्रीकृष्ण. अशा या आयुधें धारण करणाऱ्या केशवादि चोवीस मूर्ति आहेत.

अथसिन्ध्वनुसारेणदेवप्रतिष्ठाप्रयोगः। यजमानोद्वादशादिहस्तंमण्डपंकृत्वा आग्नेयेपूर्वतोवाहस्तमात्रंकुण्डंस्थण्डिलंवाकृत्वामध्येवेदींतदुपरिसर्वतोभद्रंग्रहेष्विकीर्षायांपूर्वतःईशान्यांवाग्रहवेदींप्रासादसंस्कारेमण्डपसंस्कारे वाचिकीर्षिते नैर्ऋतेवास्तुपीठंकृत्वा अस्यांमूर्तौलिङ्गेवादेवतासान्निध्यार्थंदीर्घायुर्लक्ष्मीसर्वकामसमृद्ध्यक्षय्यसुखकामोऽमुकदेवमूर्तिप्रतिष्ठांकरिष्ये इतिसंकल्प्य स्वस्तिवाचनादिश्राद्धान्ते आचार्यंवृत्वाष्टौचतुरोवाऋत्विजोवृत्वापूजयेत् आचार्योयदत्रेतिसर्षपान्विकीर्यापोहिष्ठेतिकुशोदकैर्भूमिंप्रोक्ष्य देवाआयान्तुयातुधानाअपयान्तुविष्णोदेवयजनंरक्षस्वेतिभूमौप्रादेशंकृत्वामंडपप्रतिष्ठांकृत्वानकृत्वावामूर्तिंपञ्चगव्यहिरण्ययवदूर्वाश्वत्थपलाशपर्णान्युदकुम्भेप्रक्षिप्यताभिरद्भिरापोहिष्ठेतितिसृभिः हिरण्यवर्णाःशुचयःपावकायासुजातःकश्यपोयास्विन्द्रः। अग्निंयागर्भंदधिरेविरूपास्तानआपःशंस्योनाभवन्तु १ यासांराजावरुणोयातिमध्येसत्यानृतेअवपश्यंजनानाम् मधुश्चुतःशुचयोयाःपावकास्ता० २ यासांदेवादिविकृण्वन्तिभक्षंयाअन्तरिक्षेबहुधाभवन्ति। याःपृथिवींपयसोन्दन्तिशुक्रास्तान० ३ शिवेनमाचक्षुषापश्यतापःशिवयातनुवोपस्पृशतत्वचंमे। सर्वांअग्नींरप्सुषदोहुवेवोमयिवर्चोबलमोजोनिधत्त ४ पवमानःसुवर्जनःपवित्रेणविचर्षणिः यःपोतासपुनातुमा पुनन्तुमादेवजनाः पुनन्तुमनवोधिया पुनन्तु विश्वआयवः जातवेदःपवित्रवत् पवित्रेणपुनाहिमा शुक्रेणदेवदीद्यत् अग्नेक्रत्वाक्रतूंरनु १ यत्तेपवित्रमर्चिषि अग्नेविततमंतरा ब्रह्मतेनपुनीमहे उभाभ्यांदेवसवितः पवित्रेणसवेनच इदंब्रह्मपुनीमहे वैश्वदेवीपुनतीदेव्यागात् यस्यैबह्वीस्तनुवोवीतपृष्ठाः तयामदंतः

सधमाद्येषु वय२ स्यामपतयोरयीणाम् २ वैश्वानरोरश्मिभिर्मापुनातु वातःप्राणे-
नेषिरोमयोभूः द्यावापृथिवीपयसापयोभिः ऋतावरीयज्ञियेमापुनीताम् बृहद्भिः
सवितस्तृभिःवर्षिष्टैर्देवमन्माभिः अग्नेदक्षैःपुनाहिमा येनदेवाअपुनत येनापो-
दिव्यंकशः तेनदिव्येनब्रह्मणा ३ इदंब्रह्मपुनीमहे यःपावमानीरध्येति ऋषि-
भिःसंभृत२ रसम् सर्व२सपूतमश्नाति स्वदितंमातरिश्वना पावमानीर्योअध्येति
ऋषिभिः सभृत२रसम् तस्मैसरस्वतीदुहे क्षीर२सर्पिर्मधूदकम् पावमानीः-
स्वस्त्ययनीः ४ सुदुघाहिपयस्वतीः ऋषिभिःसंभृतोरसः ब्राह्मणेष्वमृत२हितं
पावमानीर्दिशंतुनः इमंलोकमथोअमुम् कामान्समर्धयंतुनः देवीर्देवैःसमाभृताः
पावमानीःस्वस्त्ययनीः सुदुघाहिघृतश्चुतः ऋषिभिःसंभृतोरसः ५ ब्राह्मणेष्व-
मृत२ हितम् येनदेवाः पवित्रेण आत्मानंपुनतेसदा तेनसहस्रधारेण पावमान्यः
पुनंतुमा प्राजापत्यंपवित्रम् शतोद्याम२हिरण्मयम् तेनब्रह्मविदोवयम् पूतंब्रह्म-
पुनीमहे इन्द्रःसुनीतीसहमापुनातु सोमःस्वस्त्यावरुणःसमीच्या यमोराजाप्र-
मृणाभिः पुनातुमा जातवेदामोर्जयन्त्यापुनातु ६ इत्यनुवाकेनचाभिषिच्यव्या-
हृतिभिरिदंविष्णुरितिचफलयवदूर्वाः समर्प्य रक्षोहणमितिदेवहस्तेकङ्कणंबध्वा-
वाससाच्छाद्यअवतेहेळोउदुत्तममितिजलेऽधिवासयेत् ॥

**निर्णयसिन्धुकृत देवप्रतिष्ठाप्रयोग**—यजमानानें बारा हात ( औरसचौरस ) मापाचा मण्डप करवून आग्नेयीला किंवा पूर्वेला एक हात ( औरसचौरस ) मापाचें कुण्ड करावें आणि ( मण्डपाच्या ) मध्य-भागीं वेदी ( बहुलें ) करून, तिच्यावर सर्वतोभद्र मण्डल काढावें. ग्रह ( पूजा ) करण्याची इच्छा असल्यास, पूर्वेस किंवा ईशान्येस ग्रहांची स्थापना करण्यासाठीं वेदी करावी. प्रासादाचा ( देवळाचा ) किंवा मण्डपाचा संस्कार करणें असल्यास, नैर्ऋ-त्येला वास्तुपीठ करून,—'अस्यां मूर्तौ लिंगे वा देवतासान्निध्यर्थं दीर्घायुर्लक्ष्मीसर्वकाम-समृध्द्यक्षय्यसुखकामोऽमुकदेवमूर्तिप्रतिष्ठां करिष्ये'—असा यजमानानें संकल्प करावा व मग पुण्याहवाचन आणि नान्दीश्राद्ध केल्यानंतर आचार्य आणि आठ ऋत्विज पसंत करून त्यांची पूजा करावी. नंतर आचार्यानें—'यदत्र०' हा मंत्र म्हणून पूर्वादि आठ दिशांकडे मोहऱ्या ( सर्षप ) टाकाव्या आणि—'आपोहिष्ठा०' या मंत्रानें जमिनीवर दर्भांचें पाणी शिंपडल्यावर—'देवा आयान्तु यातुधाना अपयान्तु विष्णो देवयजनं रक्षस्व।'—असें म्हणत भूमीवर आंखणी ( प्रादेश ) करावी आणि मग मण्डपप्रतिष्ठा केल्यावर किंवा त्याच्या आधीं मूर्तीला पञ्चगव्य, सोनें, यव, दूर्वा, पिंपळ व पळस यांचीं पानें पाण्याच्या गडव्यांत ( कलशांत ) घालून त्या पाण्यानें—'आपोहिष्ठा०ऋचा ३। हिर-ण्यवर्णाः शुचयः पावका........जातवेदा मूर्जयन्त्या पुनातु।' हा अनुवाक म्हणत अभिषेक केल्यावर, व्याहृतिमंत्रानें व—'इदंविष्णु०' या मंत्रानें- फळ, दूर्वा व यव हे पदार्थ देवाला अर्पण करावेत. त्यानंतर—'रक्षोहणं०'हा मंत्र म्हणत देवाच्या हातांत कंकण बांधावें आणि वस्त्रानें झाकून,—'अवते हेळो०' आणि 'उदुत्तमं०'—हे मंत्र म्हणत देवाला पाण्यांत बुडवून ठेवावें.

अथचलप्रतिष्ठायामग्निप्रतिष्ठाख्यस्यात्वाग्रहादिपक्षेग्रहान्वास्तुदेवताश्चप्र-तिष्ठाख्यान्वादध्यात्चक्षुषीआज्येनेत्यन्ते । ग्रहादिहोमपक्षेग्रहानाधिदेवतादींश्च-समिच्चर्वाज्येनवास्तुपीठदेवताश्चान्वाधानेउद्दिश्यइन्द्रंपृथिवींशर्वं अग्निंअ-ग्निमूर्तिंपशुपतिंयमंयजमानमूर्तिंउग्रंनिर्ऋतिंसूर्यमूर्तिंरुद्रंवरुणंजलमूर्तिं भवंवा-युंवायुमूर्तिंईशानंकुबेरंसोममूर्तिंमहादेवंईशानंआकाशंभीमंएताःलोकपालमूर्ति-मूर्तिपतिदेवताःपलशोदुम्बराश्वत्थशम्यपामार्गसमिद्भिराज्याहुतिभिस्तिलाहु-तिभिश्चप्रतिदैवतंप्रतिद्रव्यमष्टाष्टसंख्याकाभिःस्थाप्यदेवताममुकांपलाशोदुम्ब-राश्वत्थशम्यपामार्गसमित्तिलचर्वाज्यैःप्रतिद्रव्यमष्टोत्तरसहस्रमष्टोत्तरशतमष्टा-विंशतिसंख्ययावाअग्निर्यजुर्भिरित्यनुवाकेनविश्वान्देवांस्तिलाज्याभ्यांदशदशा-हुतिभिः एवं द्वितीयेपर्यायेएताएवदेवतास्तत्तत्संख्याकैस्तैरेवद्रव्यैरेवंतृतीयेपर्या-येएताएवदेवतास्तत्तत्संख्याकैस्तैरेवद्रव्यैर्ब्रह्मादिमण्डलदेवतास्तिलाज्याहुतिभिः प्रतिदैवतंदशदशसंख्याकाभिः शेषेणस्विष्टकृतमित्यादि । शूर्पे प्रधानदेवतार्थे-तूष्णींचतुरोमुष्टीन्निरूप्यहोमपर्यासंगृहीत्वातथैवप्रोक्ष्यगोक्षीरेनीवारचरुंश्रपये-दाज्यभागान्तेयजमानःइदमुपकल्पितमन्वाधानोक्तद्रव्यजातमन्वाधानोक्ताहु-तिसंख्यापर्याप्तमन्वाधानोक्ताभ्योयक्ष्यमाणाभ्योदेवताभ्योस्तुनममेतित्यागंकु-र्यात्गृह्यासिद्धाग्न्यादिनाग्रहादिहोमंविधायलोकपालमूर्तिमूर्तिपतिभ्यःसमित्पक्वं-तिलाज्येष्वजुहुयात् प्रतिद्रव्यहोमान्तेदेवंपादनाभिशिरसिस्पृशेत्आज्यहोमेषो-त्तरतःसजलकुम्भेसंपातान्नयेत् तेषांमन्त्राः । इन्द्रायेन्द्रोइतीन्द्रस्य स्योनेतिपृ-थिवीमूर्तेः । अघोरेभ्यइतितत्पतेःशर्वस्य । अग्नआयाहीत्यग्नेः । अग्निंदूत-मित्यग्निमूर्तेः । नमःशर्वायचपशुपतयेचेतिपशुपतेः । यमायसोममितियमस्य । आसिहिवीरेतियजमानमूर्तेः । स्तुहिश्रुतमितितत्पतेरुग्रस्य असुन्वन्तमि-तिनिर्ऋतेः । आकृष्णेनेतिसूर्यमूर्तेः । योरुद्रोअग्नावितितत्पतेरुद्रस्य । इमंमे० । वरुणस्य शंनोदेवी० । जलमूर्तेः । नमोभवायचेतिभवस्य । आनोनियुद्भिः० । वायोः वातआवातु० । वायुमूर्तेः । तमीशानं० । ईशानस्य । आप्यायस्व० । कुबेरस्य । वयंसोम० । सोममूर्तेः । तत्पुरुषाय० । महादेवस्य । अभित्वादे० । ईशानस्य । आदित्प्रत्नस्य० । आकाशस्य । नमउग्रायचेतिभीमस्य । ततः स्थाप्यदेवमन्त्रेणसमित्पक्वपायसचरुतिलाज्यहोमः । प्रतिद्रव्यहोमान्तेदेवे-पादनाभिशिरस्पर्शः । देवमन्त्रश्चतान्त्रिकोमूलमन्त्रोदेवगायत्रीवावैदिकोवा-ग्राह्यः । अग्निर्यजुर्भिः सवितास्तोमैः इन्द्रउक्थामदैः मित्रावरुणावाशिषाअ-ङ्गिरसोधिष्णियैरग्निभिः मरुतःसदोहविर्धानाभ्यां आपःप्रोक्षणीभिः ओषध-योबर्हिषा अदितिर्वेद्या सोमोदीक्षया त्वष्टेध्मेन विष्णुर्यज्ञेन वसवआज्येन आदित्यादक्षिणाभिः विश्वेदेवाऊर्जा पूषास्वगाकारेण बृहस्पतिःपुरोधसा प्र-जापतिरुद्गीथेन अन्तरिक्षंपवित्रेण वायुःपात्रैःअहश्श्रद्धयास्वाहेत्यनुवाकेनति-लाज्ययोर्दशदशाहुतयः ततोदेवस्य पादौस्पृशेत् संपातजलेनदेवमभिषिञ्चेत् ॥

**चलदेवतार्चनविधि**—हलणाऱ्या मूर्तींची स्थापना करायची असल्यास अग्नि मांडून त्याचें ध्यान करावें. ग्रहादिकांची पूजा करायची असल्यास, नऊ ग्रह व वास्तुदेवता यांची मांडणी करावी आणि पुढें सांगितल्याप्रमाणें अन्वाधान करावें. 'चक्षुषी आज्येन'—असें म्हटल्यावर, ग्रहादिकांचा होम करणें असल्यास, ग्रह व त्यांच्या अधिदेवता आणि समिधा, चरु व आज्य—हीं त्यांचीं द्रव्यें व वास्तुपीठदेवता या सर्वांचा अन्वाधानांत नामनिर्देश करून,—'इन्द्रं पृथिवीं शर्वंअग्निमूर्तिं.........स्विष्टकृतमित्यादि'—असें अन्वाधान करावें. त्यानंतर मुख्य (प्रधान) देवतांकरितां सुपांत (शूर्प) मंत्र न म्हणतां चार मुठी देवभात (नीवार) होमाला पुरेसा चरु (भात) होण्यासारखे घेऊन त्यावर मंत्ररहित पाणी शिंपडावें आणि गाईच्या दुधांत त्यांचा भात शिजवावा. त्यानंतर आज्यभागापर्यंतचें कृत्य केल्यावर-'इदमुपकल्पितमन्वाधानोक्ताहुति संख्यापर्याप्तमन्वाधानोक्ताभ्यो यक्ष्यमाणाभ्यो देवताभ्योस्तु न मम।'—असें म्हणून यजमानानें त्याग (टाकणें—सोडणें—देणें) करावा. त्यागानंतर घरांत शिजवलेल्या भातानें ग्रहादिकांचा होम करावा. प्रत्येक द्रव्याचा होम आणि आज्यहोम केल्यावर देवाचे पाय व डोकें यांना स्पर्श करावा. त्यानंतर उत्तरेकडे मांडलेल्या कलशांत सम्पातोदक (आणविलेलें पाणी) घालावें. 'इन्द्रायेन्द्रो०' हा इन्द्रमंत्र 'स्योना०'—हा पृथ्विमूर्तिमंत्र, अघोरेभ्यो०'—हा शर्वमंत्र, 'अग्न आयहि०' हा अग्निमंत्र, 'अग्निं दूतं०'—हा अग्निमूर्तिमंत्र, 'नमः शर्वाय च पशुपतये च०'—हा पशुपतिमंत्र, 'यमाय सोमं०'—हा यममंत्र, 'असि हि वीर०'—हा यजमानमूर्तिमंत्र, 'स्तुहिश्रुतं०'—हा उग्रमंत्र, असुन्वन्त०'— हा निर्ऋतिमंत्र, 'आकृष्णे०'- हा सूर्यमंत्र, 'यो रुद्रो अग्नौ०'—हा रुद्रमंत्र, 'इमं मे०'—हा वरुणमंत्र, 'शं नो देवि०'—हा जलमंत्र, 'नमो भवाय च०'—हा भवमंत्र, 'अयोनियुद्भिः'० हा वायुमंत्र, वात अवातु०'—हा वायुमूर्तिमंत्र, 'तमीशानं०'—हा ईशानमंत्र, 'आप्यायस्व०' -हा कुबेरमंत्र, 'वयं सोम०'—हा सोममूर्तिमंत्र, 'तत्पुरुषाय०'—हा महादेवमंत्र, अभित्वादे०'—हा ईशानमंत्र, 'आदित्प्रत्न०'—हा आकाशमंत्र आणि 'नमः उग्राय०'—हा भीममंत्र. हे मंत्र म्हणत त्या त्या देवतेचें संपातोदक कलशांत घालावें. त्यानंतर ज्या देवतेची स्थापना करायची असेल त्या देवतेच्या मंत्रानें पांच प्रकारच्या समिधा, खीर (पायस), भात (चरु), तीळ व तूप (आज्य) यांचा होम करावा आणि नंतर देवतेचे पाय, बेंबी व मस्तक यांना स्पर्श करावा. स्थापन करण्याच्या देवतेचा जो मंत्र जपायचा तो—तांत्रिक, मूलमंत्र, देवगायत्रीमंत्र किंवा वेदमंत्र घ्यावा आणि मग—'अग्निर्यजुर्भिः सवितास्तोमैः इन्द्रउक्थामदैः मित्रावरुणावाशिषा अंगिरसो धिष्णियैरग्निभिः मरुतः सदोहविर्धानाभ्यां आपः प्रोक्षणीभिः.........पात्रैः अह्न्श्रद्धया स्वाहा।' हा अनुवाक म्हणून तिळांच्या व तुपाच्या दहा दहा आहुति देऊन देवाच्या पायांना स्पर्श करावा आणि संपातोदकानें देवाला अभिषेक करावा.

**एवमेवद्वितीयपर्यायेणहुत्वादेवस्यनाभिंस्पृशेत् एवंतृतीयपर्यायेणहुत्वाशिरःस्पृशेत् प्रतिपर्यायंसंपाताभिषेकः एकपर्यायेआहुतिसंख्या पलाशसमिधः १०८**

उदुम्बर १९२ अश्वत्थ १९२ शमी १९२ अपामार्ग १९२ आज्यम् १९२ तिलाः १९२ स्थाप्यदेवस्याष्टाविंशतिपक्षेसमित्पञ्चकं १४० चर्वाज्यतिलाः ८४ अनुवाक २० मिलिताः १५८८ पर्यायत्रये ४७६४ एवंहुत्वार्चांशोधयेत् देवंनत्वा स्वागतंदेवदेवेशविश्वरूपनमोस्तुते । शुद्धेपित्वदधिष्टानेशुद्धिंकुर्मः-सहस्वताम् ॥ १ ॥ इति प्रार्थ्यउत्तिष्ठब्रह्मणस्पतइतिसर्त्विग्युत्थाप्याग्न्युत्तारणं-कुर्यात् अग्निःसप्तिमिति सूक्तमाग्निपदहीनंपठित्वातत्सहितंपुनःपठेत् एवमष्टशत-मष्टाविंशतिवारंवापठन्जलंपातयेत् ततोर्चांद्वादशवारंमृदाजलेनचप्रक्षाल्य मन्त्रैःपञ्चगव्यंकृत्वा पयःपृथिव्यांपयओषधीषुपयोदिव्यन्तरिक्षेपयोधाः । पयस्वतीःप्रदिशःसन्तु मह्यम् ॥ १ ॥ आवोराजानमितिपञ्चसंस्नाप्यआप्याय-स्वेतिपञ्चमंत्रैःपञ्चामृतेनसंस्नाप्य लिंगंचेन्नमस्तेरुद्रइत्यष्टाभिःसंस्नाप्यघृताभ्य-ङ्गमुद्वर्तनमुष्णोदकेनक्षालनंचकृत्वागन्धंदत्वासंपातोदकैरभिषिच्यसपल्लवैश्च-तुर्भिःकुम्भैःक्रमेणापोहिष्टा० । योवः० । तस्मा० । आकलशेषु० । इतिसंस्ना-प्यसमुद्रज्येष्ठेतिचतसृभिराकलशेष्वितिचमिलितचतुःकुम्भैःसंस्नाप्य औदुम्ब-रादर्पीठेऽर्चांमपवेश्यपरितोऽष्टदिक्षुसजलकुम्भेषुगन्धपुष्पदूर्वाः क्षिप्त्वाद्यकुम्भे-सप्तमृदः द्वितीयेपुष्करपर्णशमीविकङ्कताश्मन्तकत्वचःपल्लवांश्च तृतीये सप्त-धान्यानि चतुर्थेपञ्चरत्नानि पञ्चमेफलपुष्पाणि षष्ठेकुशदूर्वागोरोचनाः सप्तमे-संपातोदकम् अष्टमेसर्वौषधीः क्षिप्त्वा क्रमेणापोहिष्ठेतित्रिभिः हिरण्यवर्णाः शुचयइतिचतुर्भिः पवमानानुवाकेनचाभिषिच्यएककुम्भेशमीपलाशवटखादिर-बिल्वाश्वत्थविकङ्कतपनसाम्रशिरीषोदुम्बराणांपल्लवान्कषायांश्चक्षिप्त्वाऽश्व-त्थेवइत्यभिषिच्यपञ्चरत्नोदकेनहिरण्यवर्णाःशुचयइतिसंस्नाप्यवाससीदत्वो-परिवितानंबध्नन्तिकेचित् ॥

**चलदेवताभिषेक**—याचप्रमाणें दुसऱ्या पर्यायानें होम करून देवाच्या नाभीला स्पर्श करावा. तिसऱ्या पर्यायानें होम करून देवाच्या मस्तकाला स्पर्श करावा. प्रत्येक पर्यायाच्या वेळीं संपातोदकानें देवाला अभिषेक करावा. एका पर्यायाचे आहुतीची संख्या पुढें दिल्याप्रमाणें असावी. पलाश (पळस) समिधा १९२, औदुंबर (उंबर) १९२, अश्वत्थ (पिंपळ) १९२, शमी १९२, अपामार्ग (आघाडा) १९२, आज्याहुति १९२, तिलाहुति १९२, स्थाप्य देवतेचा अठ्ठावीस होम करण्याच्या आहुतींची संख्या पांच प्रकारच्या समि-धांच्या आहुति १४०, चरु, आज्य व तिल यांच्या (प्रत्येकाच्या २८ प्रमाणें) ८४, अनुवाक २०, एकंदर १५८८, तीन पर्यायांच्या मिळून एकंदर आहुति ४७६४. याप्रमाणें होम करून मूर्तीची शुद्धि केल्यावर देवाला नमस्कार करावा आणि "स्वागतं देवदेवेश विश्वरूप नमोऽस्तु ते । शुद्धेऽपित्वदधिष्ठाने शुद्धिं कुर्मः सहस्वतां ।।" अशी प्रार्थना केल्यावर "उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते०—" हा मंत्र म्हणून ऋत्विजासहवर्तमान आचार्यानें देवाला उठवावें व 'अग्न्युत्तारण' करावें. "अग्निः सप्तिं०" हें सूक्त अग्निपदहीन म्हणून पुन्हा अग्निपदसहित म्हणावें. याप्रमाणें एकशें आठ किंवा

अठ्ठावीस वेळ पठण करीत असतां, देवतेवर उदक पाडावें व नंतर मृत्तिका व जल यांनीं मूर्तीला बारा वेळ धुऊन, मंत्रयुक्त पंचगव्याचें 'पयः पृथिव्यां पय ओषधीषु पयो दिव्यंतरिक्षे पयोधाः । पयस्वतीः प्रदिशः संतुमह्यं । आवो राजानं०' या मंत्रांनीं स्नान घातल्यावर 'आप्यायस्व०' इत्यादि पांच मंत्रांनीं पंचामृताचें स्नान घालावें. लिंग असेल तर 'नमस्ते रुद्र०' या आठ ऋचांनीं स्नान घालून, घृताचा अभ्यंग व उटणें लावल्यावर उष्णोदकानें स्नान घालावें. नंतर गंध लावून संपातोदकांनीं अभिषेक केल्यावर, सपल्लव अशा चार कुंभांनीं, क्रमानें 'आपोहिष्ठा० । योवः० । तस्मा० । आकलशेषु० ।' या मंत्रांनीं स्नान घालून 'समुद्रज्येष्ठा०' या चार ऋचा व 'आकलशे०' ही एक ऋचा मिळून चार कलशांनीं स्नान घालावें. यानंतर उंबराच्या पाटावर मूर्ति बसवून सभोवतीं पूर्वादि आठ दिशांस उदकयुक्त कलश मांडावेत. या कलशांत गंध, पुष्प व दूर्वा टाकून पहिल्या कुंभांत सप्तमृत्तिका, दुसऱ्यांत कमलपत्र, शमी, विकंकत (वेहकळीचा वृक्ष), व अश्मंतक (आपटा) यांच्या त्वचा (साली) व पल्लव, तिसऱ्यांत सप्त धान्यें (यव, गहूं, भात, तिल, कांग, सावे, हरभरे), चौथ्यांत पंचरत्नें (सुवर्ण, वज्रमणी, नीलमणी, पोंवळें व मौक्तिक), पांचव्यांत फलें व पुष्पें, सहाव्यांत कुश, दूर्वा व गोरोचन; सातव्यांत संपातोदक व आठव्यांत सर्वौषधी (कुष्ट, जटामांसी, हळद, दारुहळद, मोरमांसी, शिलाजित, चंदन, वेखंड, चंपक व मुस्ता) याप्रमाणें आठ कलशांत पदार्थ टाकून, क्रमानें 'आपोहिष्ठा० मंत्र ३, ।' "हिरण्यवर्णाः शुचयः० । मंत्र ४ व पवमानानुवाक १' या आठ मंत्रांनीं आठ कलशोदकाचा अभिषेक करून एका कलशांत शमी, पळस, वट, खदिर, बिल्व, अश्वत्थ, विकंकत, आम्र, फणस, शिरीषवृक्ष व उंबर यांचे पल्लव व कषाय टाकून 'अश्वत्थेव०' या मंत्रानें अभिषेक केल्यावर 'हिरण्यवर्णाः शुचयः०" या मंत्रांनीं पंचोदकाचें स्नान घालून देवाला दोन वस्त्रें द्यावीं. कित्येकजण देवावर चांदवा बांधतात.

यज्ञोपवीतगन्धपुष्पधूपदीपान्दत्त्वा हिरण्यगर्भः० १ यआत्मदा० २ यः प्राणतो० ३ यस्येमे० ४ येनद्यौ० ५ यंक्रंदसी० ६ आपोहयत्० ७ यश्चिदापो० ८ इत्यष्टौपीठदीपान्दत्त्वा सुवर्णशलाकयातैजसपात्रस्थंमधुघृतंचगृहीत्वा चित्रंदेवाना० तेजोसि० शुक्रमस्यमृतमसिधामनामासिप्रियंदेवानामनाधृष्टं देवयजनमितिमन्त्राभ्याम् ॐ नमोभगवतेतुभ्यंशिवायहरयेनमः हिरण्यरेतसे विष्णोविश्वरूपायतेनमइतिचदक्षिणसव्येदेवनेत्रेमन्त्रावृत्त्यालिखेत् अञ्जन्तित्वेत्यञ्जनेनाक्त्वान्द देवस्यत्वासवितुः प्रसवे० इन्द्रस्येन्द्रियेणानज्मीतिमध्वाज्यशर्कराभिरक्त्वा अंजनेनपुनरञ्जयेत् ततआदर्शभक्ष्यादिदर्शयेत् अत्रकर्ताचार्यायगामृत्विग्भ्योदक्षिणांदद्यात् आचार्यःप्रत्यृचमादौप्रणवंवदन्पुरुषसूक्तेनस्तुत्वावंशपात्रस्थ पञ्चवर्णोदनेन देवंनीराजयित्वारुद्रायचंतुष्पथादौदद्यात् मन्त्रस्तु ॐनमोरुद्रायसर्वभूताधिपतयेदीप्तशूलधरायोमादयितायविश्वाधिपतयेरुद्रायवै नमोनमः शिवमगर्हितंकर्मास्तुस्वाहेति अश्वत्थपर्णेभूतेभ्योनमइति ॥

**चलदेवतानैवेद्यादि**—यानंतर यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप दीप अर्पण करून हिरण्यगर्भः० । यआत्मदा० यः प्राणतो० । यस्येमे० । येनद्यौ० । यंक्रंदसी० । आपोहयत्० । व यश्चिदापो० । या आठ मंत्रांनीं आठ दिवे देवाच्या पीठावर लावून सोन्याच्या सळईनें धातूच्या पात्रांतील मध व घृत घेऊन 'चित्रं देवाना० । तेजोसि० ।' या दोन मंत्रांनीं 'शुक्रमस्यमृतमसि धामनामासि प्रियंदेवानामनाधृष्टं देवयजन् ।' या मंत्रांनीं ॐ नमो भगवतेतुभ्यं शिवाय हरये नमः । हिरण्यरेतसे विष्णो विश्वरूपायतेनमः ॥' हे मंत्र दोनदां म्हणून देवाच्या उजव्या व डाव्या डोळ्यांवर डोळे काढल्यासारखें करावें. 'अंजन्तित्वा०' हा मंत्र म्हणून देवाचे नेत्रांस काजळ लावावें. व 'देवस्यत्वा० । इंद्रस्येंद्रियेणाभिषिंचामि' या मंत्रानें मध, घृत व शर्करा यांची खूण करून पुन्हा एकदां नेत्रांस काजळ लावावें. यावर आरसा दाखवून भक्ष्यादि पदार्थ अर्पण करावेत. या वेळीं कर्त्यानें आचार्याला गोप्रदान व ऋत्विजाला दक्षिणा द्यावी. आचार्यानें पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेच्या प्रारंभीं ॐकार म्हणून पुरुषसूक्तानें स्तुति करावी व वंशपात्रांत (वेळू) पंचवर्ण अन्न (भात) घालून त्याची देवाला आरती करावी व तें अन्न चवाठ्यावर रुद्राला द्यावें तें 'ॐ नमो रुद्राय सर्व भूताधिपतये दीप्तशूलधरायोमादयिताय विश्वाधिपतये रुद्रायवैनमोनमः ॥ शिवमगर्हितं कर्मास्तुस्वाहा ॥' असें म्हणून पिंपळाच्या पानावर "भूतेभ्यो नमः" असें म्हणून द्यावें.

अथाचार्यः सर्वतोभद्रेदेवताआवाहयेत् मध्येब्रह्माणम् पूर्वादिदिक्षुइन्द्रादिलोकपालान् ईशानेन्द्राद्यन्तरालेषुवसून् १ रुद्रान् २ आदित्यान् ३ अश्विनौ ४ विश्वान्देवान् ५ पितॄन् ६ नागान् ७ स्कन्दवृषौ ८ ब्रह्मेशानाद्यन्तरालेषु दक्षं १ विष्णुं २ दुर्गां ३ स्वधाकारं ४ मृत्युरोगान् ५ समुद्रान्सरितः ६ मरुतः ७ गणपतिं ८ मध्येपृथिवींमेरुं स्थाप्यदेवंचावाह्य प्रागादिषु वज्रंशक्तिंदंडंखड्गंपाशंअंकुशंगदांशूलं तद्बाह्येगौतमंभरद्वाजंविश्वामित्रंकश्यपंजमदग्निंवसिष्टमत्रिंअरुंधतींच तद्बाह्येनवग्रहान् तद्बाह्येऐन्द्रींकौमारींब्राह्मींवाराहींचामुण्डांवैष्णवींमाहेश्वरींवैनायकींएतानामभिरावाह्यसंपूज्य प्रतिमायांदेवंतन्मंत्रेणावाह्यमण्डलमध्येप्रतिमांसुप्रतिष्ठितोभवेतिनिवेश्यसंपूज्यवह्नौमण्डलदेवतानांनामभिस्तिलाज्येनदशदशाहुतीर्हुत्वापुष्पाञ्जलिंसमर्प्य नमोमहदितिदेवंनत्वामण्डलादुत्तरतः स्वस्तिकेमञ्चकंतदुपरिशय्यांकृत्वाउत्तिष्ठेतिदेवमुत्थाप्यमङ्गलघोषैः शय्यायांदेवमुपवेश्य पुरुषसूक्तोत्तरनारायणाभ्यांस्तुत्वादेवेन्यासं कुर्यात् तथाहि पुरुषात्मनेनमः प्राणात्मने० प्रकृतितत्त्वाय० बुद्धितत्त्वाय० अहंकारतत्त्वाय० मनस्तत्त्वाय० इतिसर्वांगेषु प्रकृतितत्त्वाय० बुद्धितत्त्वाय० हृदि शब्दतत्त्वाय० शिरसि स्पर्शतत्त्वाय० त्वचिरूपतत्त्वाय० हृदि एवंहृद्येवरसगन्धश्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणवाक्पाणिपादपायूपस्थपृथिव्यप्तेजोवाय्वाकाशसत्त्वरजस्तमोदेहतत्त्वानिविन्यसेत् ततःपुरुषसूक्ताद्यऋग्द्वयंकरयोः तदुत्तरद्वयंजानुनोः तदुत्तरद्वयंकट्योः ततस्तिस्रोनाभिहृत्कण्ठेषु ततोद्वयंबाह्वोः ततोद्वयंनासयोः

ततोद्वयमक्ष्णोः अन्त्यांशिरसि ततःसुखशायीभवेतिशय्यायांदेवंस्वापयित्वा मण्डलशय्ययोरन्तरानगन्तव्यमितिप्रैषंदत्वास्विष्टकृदादिहोमशेषंसमाप्यमण्डलदेवताभ्योनामभिश्वरुणाबलीन्दद्यात् नीवारचरुशेषेणदिग्बलिम् ततोधामन्त-इतिपूर्णाहुतिंजुहुयात् इत्यधिवासनम् ॥

**चलदेवताधिवासनप्रयोग**—यानंतर आचार्यानें सर्वतोभद्र मंडलावर आवाहन करावें. मध्यभागीं ब्रह्मा, पूर्वादि अष्ट दिशांला इंद्रादिक आठ लोकपाल, ईशान, इंद्र इत्यादिकांच्या मध्यें वसु, रुद्र, आदित्य, अश्विनी, विश्वेदेव, पितर, नाग व स्कंदवृष, ब्रह्मा व ईशान इत्यादिकांच्या मध्यें दक्ष, विष्णु, दुर्गा, स्वधाकार, मृत्युरोग, समुद्र, सरित्, मरुत व गणपति, मध्यें पृथिवी, मेरु व स्थाप्य देव यांस आवाहन करून पूर्वादिक आठ दिशांला वज्र, शक्ति, दंड, खड्ग, पाश, अंकुश, गदा व शूल यांची स्थापना करावी. त्यांच्या बाह्यप्रदेशीं गौतम, भरद्वाज, विश्वामित्र, कश्यप, जामदग्नि, वसिष्ठ, अत्रि व अरुंधती यांची स्थापना करावी. त्यांच्या बाह्यप्रदेशीं नवग्रहांची स्थापना करावी, त्यांच्या बाह्यप्रदेशीं ऐंद्री, कौमारी, ब्राह्मी, वाराही, चामुंडा, वैष्णवी, माहेश्वरी व विनायकी यांचें नाममंत्रांनीं आवाहन करून पूजन करावें. नंतर देवतेच्या मंत्रानें देवतेचें आवाहन मूर्तीवर करून "सुप्रतिष्ठितोभव०" असें म्हणून मंडलाच्या मध्यभागीं मूर्ति बसवावी व तिची पूजा करून मंडलदेवतांच्या नाममंत्रांनीं तिल व आज्य या प्रत्येक द्रव्याच्या दहा दहा आहुतींनीं अग्नीमध्यें होम करावा. नंतर देवाला पुष्पांजलि समर्पण केल्यावर "नमो महत्०" या मंत्रानें देवाला नमस्कार करून मंडलाच्या उत्तरेस स्वस्तिकावर मंचक स्थापून त्यावर शय्या करून "उत्तिष्ठ" हा मंत्र म्हणून देवाला उठवून मंगलवाद्यांच्या घोषांत देवाला शय्येवर बसवावें. यावर पुरुषसूक्त व उत्तरनारायण यांनीं देवाची स्तुति करून 'पुरुषात्मने नमः प्राणात्मने नमः प्रकृतितत्त्वाय०, बुद्धितत्त्वाय०, अहंकारतत्त्वाय० मनस्तत्त्वाय०' याप्रमाणें देवाच्या सर्व अवयवांवर न्यास करून 'प्रकृतितत्त्वाय० बुद्धितत्त्वाय० हृदिशब्दतत्त्वाय० शिरसि स्पर्शतत्त्वाय० त्वचि रूपतत्त्वाय हृदि" असा न्यास करून हृदयाचे ठायींच 'रस, गंध, श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण, वाक्, पाणि, पाद, वायु, उपस्थ, पृथिवी, आप, तेज वायु, आकाश, सत्त्व, रज व तम या देहतत्त्वांचा न्यास करावा. नंतर पुरुषसूक्तांतील पहिल्या दोन ऋचांचा दोन्ही हस्तांवर, पुढच्या दोन ऋचांचा जानूंवर, त्याच्या पुढील ऋचांचा कटीवर, पुढच्या तीन ऋचांचा नाभि, हृदय व कंठ यांवर, पुढील दोन ऋचांचा दोन बाहूंवर, पुढील दोन ऋचांचा दोन नासारंध्रांवर, त्या पुढील दोन ऋचांचा नेत्रांवर व शेवटच्या ऋचेचा मस्तकावर न्यास करून 'सुखशायी भव०' असें म्हणून देवाला शय्येवर निजवावें व मंडल आणि शय्या यांजमधून कोणीं जाऊं नये असें सांगून, स्विष्टकृत् इत्यादिक होमशेष समाप्त केल्यावर मंडलदेवतांना नाममंत्रांनीं भाताचे बलि द्यावेत. नीवारचरुशेषानें दिग्बलि दिल्यावर "धामं ते०" या मंत्रानें पूर्णाहुति हवन करावी. याप्रमाणें अधिवासनाचा प्रयोग सांगितला.

अथस्थिरार्चायांक्रमोविशेषश्च संकल्पादिजलाधिवासान्तंकृत्वास्वादेवं-नत्वास्वागतंदेवदेवेशेत्यादि प्रार्थनोत्थापनाग्न्युत्तारणादिनेत्रोन्मीलनान्तं-पूर्ववत् । तत्रस्थिरेशिवलिङ्गेस्वर्णसूच्यागन्धेनॐनमोभगवतेरुद्रायाहिरण्यरेत-सेपरायपरमात्मने विश्वरूपायोमाप्रियायनमइत्यङ्क्त्वाअञ्जनादिनाञ्जयेदिति नेत्रोन्मीलनेलिङ्गविशेषः ततःसूक्तस्तुत्यादिमण्डलदेवतास्थापनान्तम् ततो-मण्डलेमूर्तिनिवेशस्ततःशय्यायांदेवतारोहणंततःस्तुःपूर्वोक्तन्यासाःततः शय्या-यांदेवशयनम् ततोग्निस्थापनादि पूर्वोक्तान्वाधानेविष्णौ नारायणंषोडशाज्या-हुतिभिः शिवश्चेत् यातइषुःद्रापेसहस्राणीत्यनुवाकस्थऋग्भी रुद्रमाज्येनेति-प्रधानोत्तरमूहइतिविशेषः लोकपालमूर्तिमूर्तिपतिहोमान्तंपूर्ववत् स्थाप्यदेवता-होमेनैवारश्चरुर्नास्तिसप्तैवहवींषि ततश्चविष्णोःस्थिरार्चायांपूर्वोक्तसमित्तिलाज्य होमोत्तरंपुरुषसूक्तेनप्रत्यृचमाज्यंहुत्वाइदंविष्णुरितिपादौस्पृष्ट्वापुनस्ताएवहुत्वा अतोदेवेतिशिरः स्पृष्ट्वापुनस्ताएवहुत्वापुरुषसूक्तेनसर्वाङ्गंस्पृशेत् स्थिरलिङ्गेचे-त्समिदाज्यतिलहोमान्ते यातइषुइत्यनुवाकान्तेनद्रापेइतिसहस्राणीत्यनुवाका-भ्यांचप्रत्यृचमाज्यं हुत्वासर्वोवैरुद्रइतिमूलंस्पृशेत् पुनस्ताएवहुत्वाकद्रुद्रायेति-मध्यं पुनस्ताएवहुत्वानमोहिरण्यबाहवइत्यग्रंस्पृशेत् पुनस्ताएवहुत्वासर्वरुद्रेण-सर्वाङ्गंस्पृशेत् इत्यधिवासनेविशेषः ॥

**स्थिरार्चाकर्मानुष्ठानविशेष**—संकल्प इत्यादिकापासूनचें जलाधिवासपर्यंत कर्म करून देवाला नमस्कार करावा व 'स्वागतं देवदेवेश०' इत्यादि प्रार्थना, उत्थापन, अग्न्युत्तारण इत्यादि नेत्रोन्मीलनापर्यंतचें सर्व कर्म पूर्वींप्रमाणेंच करावें. स्थिर शिवलिंगाची अर्चा करणें असल्यास सोन्याच्या सळईनें गंध घेऊन त्या गंधानें 'ॐ नमो भगवते रुद्राय हिरण्यरेतसे पराय परमात्मने विश्वरूपायोमाप्रियायनमः' असा मंत्र म्हणावा व काजळानें नेत्रचिन्हित (लावलेसे) करावेत. शिवलिंगाच्या नेत्रोन्मीलनाविषयीं हा विशेष आहे. यावर पुरुषसूक्तानें स्तुति करून मंडलदेवस्थापनेपर्यंतचें सर्व कर्म केल्यावर मंडलावर मूर्ति बसवावी. नंतर देवाला शय्येवर ठेवून स्तुति व पूर्वोक्त न्यास करावेत. नंतर देवाला शय्येवर निजवून अग्निस्थापनादि कर्में करावींत. पूर्वोक्त अन्वाधान करतांना विष्णुदेवता असेल तर 'नारायणं षोडशाज्याहुतिभिः' व देवता, शिव असेल तर 'यात इषुः० द्रापे० सहस्राणीत्यनुवाकस्थऋग्भीरुद्रमाज्येन' असा प्रधानदेवतेच्या अन्वाधानांत फरक (ऊह) करावा. लोकपालमूर्ति व मूर्तिपति यांच्या होमापर्यंत पूर्वींप्रमाणेंच कर्म करावें. स्थाप्य देवतेचा होम करतांना देवभाताचा चरु करूं नये. होमद्रव्यें सातच घ्यावींत. विष्णूची स्थिर अर्चा करतांना पूर्वीं सांगितलेल्या समिधा, तिल व तूप यांचा होम केल्यावर पुरुष-सूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें त्या तुपाचा होम करून—'इदं विष्णु०' या मंत्रानें देवाच्या चरणास स्पर्श करावा. नंतर पुरुषसूक्ताच्या त्याच ऋचांनीं पुनः होम करून, 'अतो-देवा०' या मंत्रानें देवाच्या मस्तकास स्पर्श करावा. नंतर त्याच ऋचांनीं होम करून, पुरुषसूक्त म्हणावें व सर्वांगास स्पर्श करावा. स्थिर लिंगाची अर्चा करणें

असेल, तर समिधा, आज्य व तिल यांचा होम केल्यावर, 'यात इषु०' 'द्रापे०'। व 'सहस्राणि०' या तीन अनुवाकांच्या प्रत्येक ऋचेनें आज्याचा होम करून, 'सर्वोवै रुद्र०' या मंत्रानें लिंगाच्या मुळास स्पर्श करावा. त्याच ऋचांनीं पुनः होम करून, 'कद्रुद्राय०' या मंत्रानें लिंगाच्या मध्यभागास स्पर्श करावा. पुनः त्याच ऋचांनीं होम करून, 'नमो हिरण्य बाहवे०' या अनुवाकानें लिंगाच्या अग्रास स्पर्श करावा. यानंतर त्याच ऋचांनीं होम करून सर्व रुद्र म्हणून सर्वांगास स्पर्श करावा. असा हा अधिवासनाचा विशेष आहे.

**परेद्युःपीठिकांस्नापयित्वामहीमूष्विल्यावाह्यअदितिर्द्यौरितिस्तुत्वाऱ्हींनम-इतिसंपूज्य तेनैवपूर्णाहुतिं हुत्वाउत्तिष्ठब्रह्मणइतिदेवमुत्थाप्यपुष्पाञ्जलिंदत्वा-पुरुषसूक्तेनस्तुत्वाउदुत्यमित्युत्थाप्यकनिक्रददितितिसूक्तेनविष्णुं सद्योजातमि-तिपञ्चानुवाकैर्लिङ्गंगृहंप्रवेश्य पीठिकायामिन्द्रादिनामभिरष्टरत्नानिक्षिप्त्वा सप्तधान्यरौप्यमनःशिलाःक्षिप्त्वा पायसेनसंलिप्यप्रणवेनाङ्गन्यासंकृत्वा-सुवर्णशलाकामन्तरितांकृत्वासुलग्नेप्रतितिष्ठपरमेश्वरेतिउक्त्वाऽतोदेवेतिविष्णुं-रुद्रेणलिंगंचस्थापयेत् ततश्चरुहोमप्राणप्रतिष्ठादि इति स्थिरार्चायामधिवासने-परेद्युःकृत्येचविशेषोऽन्यत्सर्वमुक्तवक्ष्यमाणचलार्चावदेव ॥**

**स्थिरार्चाधिवासनविशेष**—दुसऱ्या दिवशीं पीठिकेला स्नान घालवून 'महीमूपु०' या मंत्रानें आवाहन करावें. व 'अदितिर्द्यौ०' या मंत्रानें स्तुति करावी. 'ऱ्हीं नमः' या मंत्रानें पूजा करून, त्याच मंत्रानें पूर्णाहुति हवन करावी. 'उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते' या मंत्रानें देवास जागें करून पुष्पांजली द्यावी व पुरुषसूक्तानें स्तुति करून, 'उदुत्यं०' या मंत्रानें देवास उठवून 'कनिक्रद०' या सूक्तानें विष्णुमूर्तीचा, व 'सद्योजातं०' या पांच अनुवाकांनीं लिंगाचा घरांत प्रवेश करवून पीठिकेवर इंद्रादि नांवांनीं आठ रत्नें, रौप्य, व मनशिळ हे पदार्थ घालून, खिरीनें मारवावेत. व प्रणवमंत्रानें (ॐकार) अंगन्यास करून सोन्याची सळई मध्यें ठेवावी आणि 'सुलग्ने प्रतितिष्ठ परमेश्वर' असें म्हणून 'अतो देवा०' या सूक्तानें विष्णूची व रुद्रानें लिंगाची स्थापना करावी. यानंतर चरुहोम, प्राणप्रतिष्ठा इत्यादि कर्मे करावींत. स्थिर अर्चेतील अधिवासनांत व दुसऱ्या दिवशींच्या कृत्यांत जो विशेष प्रकार आहे तो असा आहे. इतर सर्व कर्म पूर्वी सांगितल्याप्रमाणें व पुढें सांगण्यांत येणाऱ्या चलार्चेप्रमाणें करावें.

**अथ चलप्रतिष्ठायामधिवासनान्तेपरेद्युरेकाहपक्षेसद्योवाउत्तिष्ठब्रह्मणइति-देवमुत्थाप्यपुरुषसूक्तोत्तरनारायणाभ्यांस्तुयात् ॥**

**देवजागृति**—चलार्चेत अधिवासन केल्यावर दुसऱ्या दिवशीं किंवा लगेच करण्याची इच्छा असल्यास तत्कालीं 'उत्तिष्ठ ब्रह्मण०' या मंत्रानें देवास उठवावें; व पुरुषसूक्त व उत्तरनारायण यांनीं स्तुति करावी.

**अथप्रायःस्थिरचलार्चयोः साधारणः प्रयोगः। प्रतिष्ठाङ्गंपरेद्युर्होमंकरि-ष्यइतिसंकल्प्य चक्षुषीआज्येनेत्यन्तेस्थाप्यदेवंतन्मन्त्रेणघृतपक्वव्रीहिचरुणा-**

दशाहुतिभिरग्निसोमंधन्वन्तरिंकुहूमनुमतिंप्रजापतिंपरमेष्ठिनंब्रह्माणमग्निं सोमं-
अग्निमन्नादंअग्निमन्नपतिंप्रजापतिंविश्वान्देवान्सर्वान्देवानग्निंस्विष्टकृतं पूजाङ्ग-
होमेविष्णुश्चेत्संकर्षणादिद्वादशदेवताः शार्ङ्गिणंश्रियंसरस्वतींविष्णुंकृसरेणै-
कैकयाहुत्याविष्णुंषड्वारंकृसरेण शिवश्चेद्भवंशर्वंईशानंपशुपतिंरुद्रमुग्रंभीमं-
महान्तंकृसरेणैकैकया० भवस्यदेवस्यपत्नीमित्याद्यष्टौगुडौदनेनैकैकया० भवस्य-
देवस्यसुतामित्यादि ८ हरिद्रौदनेनपकै० रुद्रंसप्तदशवारंशिवंशंकरंसहमानांशि-
तिकण्ठंकपर्दिनंताम्रमरुणमपगुरमाणंहिरण्यबाहुंसस्पिंजरंबभ्लुशंहिरण्यमेताः-
कृसरेणैकैकया० शेषेणस्विष्टकृतमित्यादि शूर्पेतूर्ष्णीस्थाप्यदेवतायै चतुर्मुष्टी-
नग्न्यादिषोडशदेवताभ्योनाम्नाचतुश्चतुर्मुष्टीनिरूप्यतथैवप्रोक्ष्यसघृतजलेश्रप-
यित्वास्रुच्यावदान धर्मेणस्थाप्यदेवमंत्रेणदशाहुतीर्हुत्वानामभिर्जुहुयात् अग्न-
येस्वाहा १ सोमाय० २ धन्वन्तरये० ३ कुह्वै० ४ अनुमत्यै० ५ प्रजापतये०
६ परमेष्ठिने० ७ ब्रह्मणे० ८ अग्नये० ९ सोमाय० १० अग्नयेऽन्नादाय०
११ अग्नयेऽन्नपतये० १२ प्रजापतये० १३ विश्वेभ्योदेवेभ्यः १४ सर्वेभ्योदे-
वेभ्यः १५ भूर्भुवःस्वरग्नयेस्विष्टकृतेस्वाहा १६ इतिसप्ततेअग्नेसमिधः सप्तजिह्वाः
सप्तऋषयःसप्तधामप्रियाणि सप्तहोत्राःसप्तधात्वायजन्तिसप्तयोनीरापृणस्वाघृ-
तेन पुनस्त्वादित्यारुद्रावसवःसमिन्धतांपुनर्ब्रह्माणोवसुनीथयज्ञैः घृतेनत्वंतन्वं-
वर्धयस्वसत्याः सन्तुयजमानस्यकामाः इतिमंत्राभ्यांपूर्णाहुतिंकृत्वाचार्योया-
ओषधीरितिपुष्पफलसर्वौषधीः समर्प्यसंपातोदकं ताम्रपात्रेआदायदेवमंत्रेण-
शतवारमभिमंत्र्यतेनदेवशिरसिसिञ्चेत् ततउत्तिष्ठब्रह्मणइतिदेवमुत्थाप्यविश्वत-
श्चक्षुरित्युपतिष्ठेत् एतेउत्थापनोपस्थाने चलार्चायामेव देवंध्यात्वाजपेत्
ब्रह्मणेनमः विष्णवेनमः रुद्राय० इंद्रादीनष्टौ० ८ वसुभ्यो० रुद्रेभ्यो० आदि-
त्येभ्यो० अश्विभ्यां० मरुद्भ्यो० कुबेराय० गङ्गादिमहानदीभ्यो० अग्नीषो-
माभ्यां० इन्द्राग्निभ्यां० द्यावापृथिवीभ्यां० धन्वन्तरये० सर्वेशाय० विश्वेभ्यो-
देवेभ्यो० ब्रह्मणइति ततःसंपातोदकेनयजमानाभिषेकः देवंध्यात्वाप्रतितिष्ठ-
परमेश्वरेतिपुष्पाञ्जलिंदत्वासच्चिदानन्दंब्रह्मैवभक्तानुग्रहायगृहीतविग्रहंस्वायुधा-
ढ्यंनिजवाहनाद्युपेतंनिजहृत्कमलेऽवस्थितंसर्वलोकसाक्षिणमणीयांसंपरमेष्ठ्य-
सिपरमांश्रियंगमयेतिमंत्रेण पुष्पांजलवागतंविभाव्यार्चायांविन्यस्यप्राणप्रति-
ष्ठांकुर्यात् यथा अस्यश्री प्राणप्रतिष्ठामंत्रस्य ब्रह्माविष्णुरुद्राऋषयः ऋग्यजुः
सामानिच्छन्दांसि क्रियामयवपुःप्राणाख्यादेवता आंबीजं क्रौंशक्तिः प्राणप्र-
तिष्ठायांविनियोगः । ब्रह्माविष्णुरुद्रऋषिभ्योनमः शिरसि ऋग्यजुःसामच्छन्दो-
भ्यो० मुखे प्राणाख्यदेवतायै० हृदि आंबीजाय० गुह्ये क्रौंशक्त्यै० पादयोः
ॐकंखंगंघंङंअंपृथिव्यप्तेजोवाय्वाकाशात्मनेआंहृदयाय० ॐचंछंजंझंञंइं
शब्दस्पर्शरूपरसगन्धात्मनेईंशिरसेस्वाहा ॐटंठंडंढंणंउंश्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वा-
घ्राणात्मनेऊंशिखायैवषट् ॐतंथंदंधंनंएंवाक्पाणिपादपायूपस्थात्मनेऐंकवचा-
यहुं ॐपंफंबंभंमं ॐवचनादानविहरणोत्सर्गानन्दात्मनेऔंनेत्रत्रयायवौषट्

ॐयंरंलंवंशंषंसंहंक्षंअं मनोबुद्ध्यहंकारचित्तात्मनेअःअस्रायफट् एवमात्मनि-देवेचकृत्वादेवं स्पृष्ट्वाजपेत् ॐआंह्रींक्रौंयंरंलंवंशंषंसंहंसः देवस्यप्राणाइहप्राणाः ॐआंह्रीं० हंसः देवस्यजीवइहस्थितः ॐआंह्रीं० हंसः देवस्यसर्वेन्द्रियाणि ॐआंह्रीं० हंसः देवस्यवाङ्मनश्चक्षुः श्रोत्रघ्राणप्राणाइहागत्यस्वस्तयेसुखेनसु-चिरंतिष्ठन्तु स्वाहा अर्चाहृदयङ्गुष्ठंदत्वाजपेत् अस्यैप्राणाःप्रतिष्ठन्तु अस्यै-प्राणाः क्षरन्तुच अस्यैदेवत्वमर्चायैमामहेतिचकश्चन १ प्रणवेनसंरुध्यसजीवं-ध्यात्वाध्रुवाद्यौरितित्र्यृचंजप्त्वाकर्णे गायत्रींदेवमत्रंचजप्त्वा पुरुषसूक्तेनोपस्था-यपादनाभिशिरःस्पृष्ट्वा इहैवैधीतित्रिर्जपेत् ततः कर्ता स्वागतं देवदेवेशमद्भाग्या-त्वमिहागतः प्राकृतंत्वमदृष्ट्वामांबालवत्परिपालय ॥ १ ॥ धर्मार्थकामसिद्ध्यर्थे-स्थिरोभवशिवायनः।सान्निध्यंतुसदादेवस्वार्चायांपरिकल्पय॥ २॥ यावच्चन्द्रा-वनीसूर्यास्तिष्ठन्त्यप्रतिघातिनः। तावत्त्वयाऽत्रदेवेशस्थेयंभक्तानुकम्पया ॥३॥ भगवन्देवदेवेशत्वंपितासर्वदेहिनाम् येनरूपेणभगवंस्त्वयाव्याप्तंचराचरम्॥४॥ तेनरूपेणदेवेशस्वार्चायांसन्निधोभव । इतिनमेत् ॥

**स्थिरचलार्चाप्रयोगसार**—'प्रतिष्ठांगं परेद्युर्होमं करिष्ये ।' असा संकल्प करून, 'चक्षुषि आज्ये नेत्यंते......स्विष्ट कृतम्' असें अन्वाधान करावें. पूजेंतला होम करतांना देवता जर विष्णु असेल तर, 'संकर्षणादि द्वादश देवताः शारिंगिणं श्रियं सरस्वतीं विष्णुं कृसरेणैकैकयाहुत्या विष्णुं षड्वारं कृसरेणं' असें व देवता शिव असेल तर 'भवंशर्वं ईशानं..............स्विष्टकृत-मित्यादि' असें अन्वाधान करावें. नंतर सुपांत स्थाप्यदेवतेसाठीं मंत्ररहित चार मुठी व अग्नि इत्यादि सोळा देवतांसाठीं प्रत्येकीच्या नांवानें चार चार मुठी तांदूळ घेऊन, त्या त्या देवतेच्या नांवानें प्रोक्षण केल्यावर घृतयुक्त उदकानें चरु शिजवावा आणि स्रुच्याच्या व दानाच्या नियमाप्रमाणें स्थाप्यदेवतेच्या मंत्रांनीं दहा आहुति देऊन, "(१) अग्नये स्वाहा (२) सोमाय स्वाहा (३) धन्वंतरये स्वाहा (४) कुह्वै स्वाहा (५) अनुमत्ये स्वाहा (६) प्रजापतये स्वाहा (७) परमेष्ठिने० (८) ब्रह्मणे० (९) अग्नये० (१०) सोमाय० (११) अग्नयेन्नादाय० (१२) अग्नयेन्नपतये० (१३) प्रजापतये० (१४) विश्वेभ्योदेवेभ्यो० (१५) सर्वेभ्योदेवेभ्यः० (१६) भूर्भुवस्वरग्नये स्विष्टकृते स्वाहा०" असा नाममंत्रांनीं होम करावा. 'सप्तते अग्ने०' व "पुनस्त्वादि-त्या०" या दोन मंत्रांनीं पूर्णाहुति देऊन, 'या ओषधि०' या मंत्रानें आचार्यानें पुष्पें, फलें व सर्वौषधि समर्पण करून संपातोदक तांब्याच्या भांड्यांत घ्यावें व तें देवाच्या मंत्रानें शंभर वेळ अभिमंत्रून त्याच मंत्रानें देवाच्या मस्तकावर शिंपडावें. नंतर 'उत्तिष्ठ ब्रह्मण०' या मंत्रानें देवाला उठवून 'विश्वतश्चक्षु०' या मंत्रानें उपस्थान करावें. उत्थापन व उपस्थान हीं चलार्चेंतच करावींत. याप्रमाणें ध्यान करून 'ब्रह्मणे नमः । विष्णवे नमः । रुद्राय नमः । इंद्राय० । अग्नये० । यमाय० । निर्ऋतये० । वरुणाय० । वायवे० । सोमाय० । ईशानाय० । वसुभ्यो० । रुद्रेभ्यो० । आदित्येभ्यो० । अश्विभ्यां० । मरुभ्यो० । कुबेराय० । गंगादि महानदीभ्यो०।

अग्नीषोमाभ्यां० । इंद्राग्निभ्यां० । द्यावापृथिवीभ्यां० । धन्वंतरये० । सर्वेशाय० । विश्वेभ्यो देवेभ्यो० । ब्रह्मणे० ।' असा जप करावा. जपानंतर संपातोदकानें यजमानावर अभिषेक करावा व देवाचें ध्यान करून, 'प्रतितिष्ठ परमेश्वर ।' असें म्हणून त्याला पुष्पांजलि समर्पण करावी. नंतर हातांच्या ओंजळींत फुलें घेऊन, 'सच्चिदानंदं ब्रह्मैव भक्तानुग्रहाय गृहीतविग्रहं स्वायुधाढ्यं निजवाहनाद्युपेतं निजहृत्कमलेवस्थितं सर्व लोक साक्षिणमणीयांसं परमेष्ठयसि परमांश्रयंगमय ।' असें म्हणून आपल्या पुष्पांजलींत देव आला आहे अशी भावनेनें तीं पुष्पें मूर्तीवर समर्पण करावींत व प्राणप्रतिष्ठा करावी ती अशी:--'अस्य श्री प्राणप्रतिष्ठा मंत्रस्य ब्रह्मविष्णुरुद्रा: ऋषय: अ: अस्त्राय फट्'' याप्रमाणें आपल्या शरीरीं व देवाच्या शरीरीं न्यास करून देवास स्पर्श करावा आणि 'ॐ आं ऱ्हीं क्रं यं रं लं वं शं षं सं हं स: देवस्य प्राणा इह प्राणा: । ॐ आं ऱ्हीं हंस: देवस्य जीव इह स्थित: । ॐ आं ऱ्हीं हंस: देवस्य सर्वेंद्रियाणि ॐ आं ऱ्हीं हं स: देवस्य वाङ्मनश्चक्षु: श्रोत्र प्राण प्राणा इह आगत्य स्वस्तये सुचिरं तिष्ठतु स्वाहा' असा जप करावा. जप झाल्यावर मूर्तीच्या हृदयावर अंगठा ठेवून, 'अस्यै प्राणा: प्रतिष्ठन्तु अस्यै प्राण: सन्तु च अस्यै देवत्वमर्च्यायै मामहेति च कश्च न ।' असा ( दुसरा ) जप करून व प्रणवानें वायु रोधून सजीव असें ध्यान करावें. 'ध्रुवाद्यौ०' या ऋचेचा जप करून देवाच्या कानांत गायत्री व देवमंत्र यांचा जप करावा. नंतर पुरुषसूक्तानें स्तुति करून देवाचे चरण, नाभि व मस्तक यांस स्पर्श करून, 'इहैं वैधि०' या मंत्राचा तीन वेळ जप करावा. यानंतर कर्त्यानें 'स्वागतं देवदेवेश मद्भाग्यात्त्वमिहागत............... स्वार्चायां सन्निधीभव ॥' हे मंत्र म्हणून देवास नमस्कार करावा.

**अथाचार्य:कर्तावालिंगमर्चांवा भू:पुरुषमावाहयामि भुव:पुरुषमा० स्व:पुरुष० भूर्भुव:स्व:पुरुष० इत्यावाह्य प्रणवेनासनंदत्वा दूर्वाश्यामाकविष्णुक्रान्तापद्ममिश्रंपाद्यं ॐइमाआप:शिवतमा:पूता:पूततमामेध्यामेध्यतमाअमृता अमृतरसा:पाद्यास्ताजुषतांप्रतिगृह्यतांप्रतिगृह्णातुभगवान्महाविष्णुर्विष्णवेनमइतिपाद्यम् भगवान्महादेवोरुद्रायनमइतिलिङ्गे एवंदेवतांतरेपूह्यम् इमाआप:शिव० आचमनीयास्ताजुषतांप्रतिगृह्य० इमाआ० अर्घ्यास्ताइत्यर्घ्यम् पञ्चामृतस्नानम् देवंमन्त्रै:संस्नाप्यइदंविष्णुरितिविष्णौ नमो अस्तुनीलग्रीवायेतिलिङ्गे कङ्कणंविसृज्यवस्त्रंयज्ञोपवीतंचदत्वा इमेगन्धा:शुभादिव्या:सर्वगन्धैरलंकृता: । पूताब्रह्मपवित्रेण पूता: सूर्यस्यरश्मिभि: ॥ १ ॥ पूताइत्यादिपूर्ववदितिगन्धम् इमेमाल्या:शुभादिव्या: सर्वमाल्यैरलंकृता: । पूताइत्यादिइतिमाला: । इमेपुष्पाइतिपुष्पाणि । वनस्पतिरसोद्भूतो० धूपोयंप्रतिगृह्यतां । प्रतिगृह्णातुभगवानित्यादिज्योति:शुक्रं चतेजश्चदेवानांसततंप्रियम् । भास्कर:सर्वभूतानांदीपो० तां प्रतिगृह्णातु भगवानितिदीपंदत्वाविष्णौसंकर्षणादिद्वादशनामभि: पुष्पाणिसमर्प्य तैरेवतर्पणंकृत्वापायसगुडौदनचित्रौदनानिपवित्रंतेविवतमितिनिवेद्यसंकर्षणादिनामभिर्द्वादशगृहसिद्धान्नकृसराहुतीर्हुत्वा कृसरेणैव**

शार्ङ्गिणे० श्रियै० सरस्वत्यै० विष्णवे० इतिहुत्वा विष्णोर्नुकं०|तदस्यप्रियम० प्रतद्विष्णु० परोमात्रया० विचक्रमे० त्रिर्देवपृथिवीं० इतिमंत्रैः षट्जुहुयात् लिङ्गेतुदीपान्तंकृत्वाभवायदेवाय० शर्वायदेवाय० ईशानायदेवाय० पशुपतये देवा० रुद्रायदेवा० उग्रायदेवाय० भीमायदेवाय० महतेदेवायनमइतिपुष्पाणिदत्वातैरेवतर्पणंकृत्वापवित्रेतेइतिपायसंगुडौदनंचनिवेद्यभवायदेवायस्वाहेत्याद्यष्टभिःकृसरंजुहुयात् तिलमिश्रौदनः कृसरः भवस्यदेवस्यपत्न्यैस्वाहेत्याद्यष्टभिर्गुडौदनंहुत्वाभवस्यदेवस्यसुतायस्वाहेत्याद्यष्टभिर्हरिद्रौदनंहुत्वा त्र्यंबकं० मानोमहान्तं० मानस्तोके० आरात्ते० विकिरिद० सहस्राणिसहस्र० इतिद्वादशऋचःएतैःकृसरंहुत्वा शिवाय० शंकराय० सहमानाय० शितिकण्ठाय० कपर्दिने० ताम्राय० अरुणाय० अपगुरमाणाय० हिरण्यबाहवे० सस्पिञ्जराय० बभ्लुशाय० हिरण्यायेतिद्वादशनामभिर्जुहुयात् स्विष्टकृदादिहोमशेषंसमाप्यपूर्वोक्तसर्वहविर्भिर्विष्णवेलिङ्गायवाबलिंदद्यात् मन्त्रस्तुत्वामेकामाद्यंपुरुषंपुरातनंनारायणंविश्वसृजंयजामहे। त्वमेवयज्ञोविहितोविधेयस्त्वमात्मनात्मन्प्रतिगृह्णीष्वहव्यम् ॥ १ लिङ्गेतुनारायणपदेरुद्रंशिवमिति वदेत् अश्वत्थपर्णेभूर्भुवः स्वरोमितिहुतशेषंनिधायप्रदक्षिणीकृत्य विश्वभुजे सर्वभुजे आत्मनेपरमात्मनेनमइतिनत्वाचार्यायद्वादशतिस्रएकांवागांदत्वाऋत्विग्भ्योदक्षिणांदत्वाशतंद्वादशवाविप्रान्भोजयेदिति प्रासादेनूतनेजलाशयोक्तप्रतिष्ठाविधिः कार्यः तत्रगोरुत्तारणपात्रीप्रक्षेपादिनकुर्यात् वारुणहोमस्थाने वास्तुहोमः इतिस्थिरार्चाचलार्चयोःप्रतिष्ठाप्रयोगः ॥

**स्थिरचलार्चाप्रतिष्ठाप्रयोगशेष**—आचार्यानें किंवा यजमानानें लिंग अथवा मूर्ति यांचे 'भूःपुरुषमावाहयामि भुवः पुरुषमावाहयामि। स्वःपुरुषमा०। भूर्भुवस्वःपुरुषमा०।' असें आवाहन करावें व प्रणवमंत्रानें आसन देऊन—दूर्वा, सावे, विष्णुक्रांता ( काळी गोकर्णी ) व कमल यांनीं मिश्र असें पाद्योदक करून तें 'ॐ इमाआपः शिवतमाः पूताः पूततमा मेध्या मेध्यतमा अमृता अमृतरसाः पाद्यास्ताः जुषतांप्रतिगृह्यताम् प्रतिगृण्हातुभवान् महाविष्णुर्विष्णवे नमः।' या मंत्रानें समर्पण करावें. लिंग असेल तर 'भगवान् महादेवरुद्राय नमः' असा वरील मंत्राच्या शेवटच्या भागांत फरक करावा. याचप्रकारें इतर देवताविषयींही कल्पना करावी. 'इमाआपः शिव०। आचमनीयास्ता जुषतां प्रतिगृह्य इमाआपः०। अर्घ्यास्ताः।' असें म्हणून आचमन व अर्घ्य देऊन देवास पंचामृतस्नान घातल्यावर मंत्रांनीं शुद्धस्नान घालावें. 'इदं विष्णु०' या मंत्रानें विष्णूस, व 'नमो अस्तु नीलग्रीवाय०' या मंत्रानें लिंगास स्नान घालावें. नंतर कंकण काढून टाकून वस्त्र व यज्ञोपवीत द्यावें आणि 'इमे गन्धाःशुभादिव्याः सर्वे गन्धैरलंकृताः। पूताब्रह्मपवित्रेण पूताःसूर्यस्य रश्मिभिः ॥' या मंत्रानें व 'पूताः०' इत्यादि पूर्वोक्त मंत्रानें गंध द्यावें. 'इमेमाल्याःशुभादिव्याःसर्वमाल्यैरलंकृताः । पूताब्रह्मपवित्रेण० " या मंत्रानें माला अर्पण कराव्या, 'इमेपुष्पाःशुभा ०' या मंत्रानें पुष्पें अर्पण करावीत. 'वनस्प-

तिरस्रोधुनो० धूपोयं प्रतिगृह्यताम् प्रतिगृह्णातु भवान् ॥' या मंत्रानें धूप अर्पण करावा. 'ज्योतिःशुक्रंच तेजश्च देवानां सततंप्रियम् । प्रभाकरःसर्वभूतानां दीपोयं प्रतिगृह्यताम् प्रतिगृह्णातु भवान्' या मंत्रानें दीप दाखवून देवता विष्णु असेल तर संकर्षणादि द्वादश नांवांनीं फुलें अर्पण केल्यावर खीर, गूळ, भात व नाना प्रकारचे इतर खाद्य पदार्थ 'पवित्रंते विततं०' या मंत्रानें निवेदन करून, संकर्षणादि बारा नांवांनीं घरांत सिद्ध केलेल्या कृसराच्या (तिलमिश्रित भात) दहा दहा आहुति हवन कराव्या. व त्या अन्नानेंच 'शार्ङ्गिणे स्वाहा श्रियै०। सरस्वत्यै०। विष्णवे०।' याप्रमाणें होम करावा. नंतर 'विष्णोर्नुकं०। तदस्य प्रिय०। प्रत विष्णु०।परोमात्रया०। विचक्रमे०। त्रिर्देवःपृथिवि०।' या सहा मंत्रांनीं होम करावा. देवता शिव असेल तर दिवा दाखविण्यापर्यंतची पूजा करून, 'भवाय देवाय०। शर्वाय देवाय०। ईशानाय देवाय०। पशुपतये देवाय०। रुद्राय देवाय०। उग्राय देवाय०। भीमाय देवाय०। महते देवाय नमः' असें म्हणून पुष्पें अर्पण करावीत. नंतर त्याच नाममंत्रांनीं तर्पण करून, 'पवित्रन्ते०' या मंत्रानें पायस, गुडौदन (गूळभात) निवेदन करून, 'भवाय देवायस्वाहा०' इत्यादि आठ नाममंत्रांनीं कृसरान्नाचा होम करावा. तिलमिश्रित भाताला कृसर असें म्हणतात. 'भवस्य देवस्य पत्न्यै स्वाहा' इत्यादि आठ नाममंत्रांनीं गुडौदनाचा होम करावा. यावर 'भवस्य देवस्य सुताय स्वाहा' इत्यादि आठ नांवांनीं हरिद्रौदनाचा (हळदभात) होम करावा. यावर 'त्र्यंबकं०। मानोमहान्तं०। मानस्तोके०। आरात्ते०। विकिरिद०। सहस्राणि०।'' या बारा ऋचांनीं कृसरान्नाचा होम केल्यावर 'शिवाय० शंकराय० सहमानाय० शितिकंठाय कपर्दिने० ताम्राय० अरुणाय० अपगुरमाणाय० हिरण्यबाहवे० सस्पिंजराय० बभ्लुशाय० हिरण्याय०'' या बारा नामांनीं त्याच अन्नाचा होम करावा. त्यानंतर स्विष्टकृत् इत्यादि होमशेष संपूर्ण करून, सर्व होमद्रव्यांचें विष्णु अथवा शिव जी देवता असेल तिला बलिदान द्यावें. बलिदान देतांना 'त्वमेकमाद्यं पुरुषं पुरातनं नारायणं विश्वसृजं यजामहे । त्वमेव यज्ञो विहितो विधेयस्त्वमात्मनात्मन् प्रतिगृह्णष्वहव्यम् ॥' असा मंत्र म्हणावा. देवता शिव असेल तर नारायण या शब्दाबद्दल 'रुद्र शिव' असें म्हणावें. पिंपळाच्या पानावर 'भूर्भुवस्वरों' या मंत्रानें हुतशेष (आहुति देऊन राहिलेला भात) ठेवून प्रदक्षिणा करावी व 'विश्वभुजे सर्वभुजे आत्मने परमात्मने नमः' या मंत्रानें नमस्कार करावा. नंतर आचार्यास बारा, तीन किंवा एक गोप्रदान देऊन ऋत्विजांस दक्षिणा द्यावी व शंभर अथवा बारा ब्राह्मणांस भोजन घालावें. देवालय नवीन असेल तर जलाशयाचा सांगितलेला प्रतिष्ठाविधि करावा. प्रासादविधींत गाईचा उत्तारणविधि व पात्रीप्रक्षेप (पात्र फेंकणें) इत्यादि विधि करूं नयेत. वारुणहोमस्थानीं वास्तुदेवतेच्या नांवानें होम करावा. असा हा स्थिरार्चा व चलार्चा यांचा अखेरचा विधि आहे.

**अथातोपिसंक्षिप्तपक्वाध्वरविधानेनचलप्रतिष्ठाप्रयोगः संकल्पादिनान्दीश्राद्धान्तंप्राग्वत् पक्वमाचार्यंवृणुयात् आचार्योमुकदेवप्रतिष्ठाकर्मकरिष्येइत्या-**

दिसर्षपविकिरणान्ते सर्वतोभद्रमण्डलेप्राग्वन्नामभिर्ब्रह्मादिमण्डलदेवताआवाह्यसंपूज्ययथागृह्यमग्निंप्रतिष्ठाप्यान्वादध्यात् आज्यभागान्तेस्थाप्यदेवतांसहस्रमष्टोत्तरशतंवासमिदाज्यचरुतिलद्रव्यैर्ब्रह्मादिमण्डलदेवताः प्रत्येकंदशदशतिलाज्याहुतिभिःशेषेणेत्यादि तूष्णींनिर्वापप्रोक्षणे आज्यभागान्ते तडागनदीतीरगोष्ठचत्वरपर्वतगजाश्वह्रदवल्मीकसंगमेतिदशमृद्भिरष्टवारंदेवंस्नाप्यपञ्चगव्यैःक्रमेणस्नापयित्वादूर्वासिद्धार्थपल्लवोपेतैरष्टकलशैरापोहिष्ठादिमन्त्रैरभिषिच्याग्न्युत्तारणंकुर्यात् सर्वतोभद्रपीठेदेवमुपवेश्य नाम्नावस्त्रगन्धधूपादिदत्त्वाऽष्टदिक्षुपल्लवादियुतोदकुम्भानष्टौदीपांश्चसंस्थाप्यप्राग्वन्नेत्रोन्मीलनम् चित्रान्नेनबलिंदत्त्वापुरुषसूक्तेनस्तुत्वोक्तद्रव्यचतुष्टयंस्थाप्यदेवमन्त्रेणहुत्वा एकैकद्रव्यहोमान्तेदेवंस्पृशेत् आज्यहोमेकुम्भेसंपातान्क्षिपेत् मण्डलदेवताभ्योहुत्वाहोमशेषंसमाप्यपूर्णाहुतिंकुर्यात् ॥

**एकाध्वरचलप्रतिष्ठाप्रयोगसंक्षेप**—संकल्पापासून नांदीश्राद्धापर्यंत सर्व कर्म पूर्वीप्रमाणेंच करावें. एक आचार्य वरावा. आचार्यानें 'अमुकदेवताप्रतिष्ठाकर्म करिष्ये' इत्यादि संकल्पापासून मोहोऱ्या टाकण्यापर्यंत कर्म केल्यावर, सर्वतोभद्र मंडलावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें नाममंत्रानें ब्रह्मादि मंडलदेवतांचें आवाहन करून, त्यांची पूजा करावी व गृह्यसूत्रानुसार अग्नीची स्थापना करून अन्वाधान करावें. आज्यभागापर्यंतचें कर्म झाल्यावर 'स्थाप्यदेवतां सहस्रमष्टोत्तरशतं वासमिदाज्यचरुतिलद्रव्यैर्ब्रह्मादिमंडलदेवताः प्रत्येकं दश दश तिलाज्याहुतिभिः शेषेण इत्यादि' याप्रमाणें अन्वाधान करावें. चरूसाठीं प्रत्येक देवतेला चार चार मुठी तांदूळ सुपांत घेणें व त्यांचें प्रोक्षण करणें हीं कर्में मंत्ररहित करावींत. आज्यभागापर्यंतचें कर्म झाल्यावर—तडाग ( तळें ) नदीतीर, गोष्ठ, ( गोठा ) आंगण, पर्वत, गजशाळा, अश्वशाळा, ह्रद, (सरोवर), वारूळ व चवाठा या दहा ठिकाणच्या मातींनीं देवास आठ वेळ स्नान घालून क्रमानें पंचगव्याचें स्नान घालावें व दूर्वा, शिरस आणि पंचपल्लव यांनीं युक्त असलेल्या आठ कलशांतील पाण्यानें 'आपोहिष्ठा०' इत्यादि मंत्रांनीं अभिषेक केल्यावर अग्न्युत्तारण करावें. सर्वतोभद्रावरील पीठावर देवांस बसवून नाममंत्रानें वस्त्र, गंध, धूप इत्यादि देऊन आठ दिशेस पंचपल्लवादिकांनीं युक्त असलेलें आठ उदकुंभ व आठ दीप स्थापन करावे व पूर्वीप्रमाणें नेत्रोन्मीलन (डोळ्यांस लावणें) करावें. चित्रान्नानें बलिदान करून पुरुषसूक्तानें स्तुति करावी व पूर्वोक्त चार द्रव्यांचा स्थाप्यदेवतेच्या मंत्रानें होम करून प्रत्येक द्रव्याच्या होमाच्या अंतीं देवास स्पर्श करावा. आज्यहोम झाल्यावर कुंभांत संपात ( एकत्रित ) टाकून मंडलदेवतांचा होम करावा. व मग होमशेष समाप्त करून पूर्णाहुति अर्पण करावी.

ततःपूर्वोक्तरीत्यासूक्तन्यासावाहनप्राणप्रतिष्ठान्तंकृत्वा इहैवैधीतितृचंपुरुषसूक्तंचजप्त्वामूलमन्त्रादिनावाहनादिपञ्चामृतस्नानान्तेसंपातोदकैरिमाआपःशिवतमाइत्यादिनाभिषेकःवस्त्रादिनैवेद्यान्तंप्राग्वत् ताम्बूलफलदक्षिणानीराजन-

नमस्कारप्रदक्षिणादिविधाय पुष्पाञ्जलिंदत्त्वासाचार्यःकर्तादेवंनत्वाक्षमाप्या-चार्यदक्षिणान्तेऽष्टकुम्भोदकैर्यजमानाभिषेकः विष्णुंस्मृत्वाकर्मेश्वरेऽर्पयेदिति-संक्षेपः ॥

**अर्चाशेषविधि**— पूर्वीं सांगितलेल्या रीतीनें सूक्ताचा न्यास, आवाहन प्राणप्रतिष्ठा येथपर्यंत कर्म करून 'इहैवैधि०' या तीन ऋचांचा जप करावा व मूलमंत्रादिकानें आवाहनादिकापासून पंचामृतस्नानापर्यंतचें कर्म केल्यावर, संपातोदकानें 'इमाआपःशिवतमा०' इत्यादि मंत्रांनीं अभिषेक करावा. वस्त्रादिकांपासून नैवेद्यापर्यंतची पूजा पूर्वींप्रमाणें केल्यावर—तांबूल, फल, दक्षिणा, नीरांजन, नमस्कार, प्रदक्षिणा इत्यादि करून पुष्पांजली समर्पण करावी व नंतर कर्त्यानें आचार्यासह देवास नमस्कार करून प्रार्थना करावी आणि विष्णूचें स्मरण करून सर्व कर्म परमेश्वरास अर्पण करावें. याप्रमाणें हें थोडक्यांत सांगितलें.

अथपुनःप्रतिष्ठा । मद्यचाण्डालस्पृष्टावह्निदग्धाविप्ररक्तदूषिताशवपापि-स्पृष्टाचप्रतिमापुनः संस्कार्या खण्डितेस्फुटितेस्थानभ्रंशेपूजनाभावेऽश्वगर्दभादि-स्पर्शेपतितरजस्वलाचोरैःस्पर्शेच पुनःप्रतिष्ठा खण्डितांभग्नांविधिनोद्धृत्यान्यां-स्थाप्य अर्चायाभङ्गचौर्यादौतद्दिनेउपवासः ताम्रादिधातुमूर्तीनांचोरचांडा-लादिस्पर्शेताम्रादिधातूक्तशुद्धिंकृत्वापुनःप्रतिष्ठा पूर्वप्रतिष्ठितस्या बुद्धिपूर्वकमे-करात्रमेकमासंद्विमासंवार्चनादिविच्छेदेशूद्ररजस्वलाद्युपस्पर्शनेवा जलाधि-वासंकृत्वाकलशेनस्नपयेत् ततः पञ्चगव्येनस्नपयित्वाऽष्टसहस्रमष्टशतमष्टा-विंशतिसंख्यंवाकलशैः शुद्धोदकेनपुरुषसूक्तेनस्नपयेत् गन्धपुष्पादिनापूज-यित्वागुडौदनंनिवेदयेदितिशुद्धिः ॥

**पुनःप्रतिष्ठा**—मद्याचा अथवा चांडाळाचा स्पर्श झालेली, अग्नीनें दग्ध झालेली, ब्राह्मणाच्या रक्तानें दूषित झालेली, प्रेत व पापी यांचा स्पर्श झालेली अशी जी मूर्ति असेल तिची अर्चा पुनः करावी. त्याचप्रमाणें खंडित, स्फुटित, स्थानभ्रष्ट, पूजारहित असलेली व कुत्रा, गाढव इत्यादिकांचा स्पर्श झालेली अथवा पतित, रजस्वला व चोर यांचा स्पर्श जिला झाला आहे तिची पुनः प्रतिष्ठा करावी. खंडित झालेली अथवा भंगलेली मूर्ति विधीनें काढून तिच्या जागीं दुसरी मूर्ति स्थापावी. मूर्ति भंगेल अथवा चोरीस जाईल, त्या दिवशीं उपवास करावा. तांबें इत्यादि धातूंच्या मूर्तीस चोराचा अथवा चांडाळाचा स्पर्श झाल्यास पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तांबें इत्यादि धातूंची शुद्धि करून पुनः प्रतिष्ठा करावी. पूर्वीं प्रतिष्ठा केलेल्या मूर्तीची नकळत एक रात्र, एक महिना किंवा दोन महिनेपर्यंत पूजा न होईल अथवा शूद्र, रजस्वला, इत्यादिकांचा स्पर्श होईल तर जलाधिवास करून कलशानें स्नान घालावें व नंतर पंचगव्यानें स्नान घालून आठ हजार किंवा आठशें, किंवा अठ्ठावीस कलशांनीं शुद्धोदकानें पुरुषसूक्तयुक्त स्नान घालावें आणि नंतर गंध, पुष्प इत्यादिकांनीं पूजा करून गुडौदन समर्पण करावें. याप्रमाणें मूर्ति शुद्ध करावी.

बुद्धिपूर्वपूजनविच्छेदेशूद्रस्पर्शादौचपुनःप्रतिष्ठयैवशुद्धिः अन्येतुएकाहपूजाविहतौकुर्याद्विगुणमर्चनम्। द्विरात्रेतुमहापूजांसंप्रोक्षणमतःपरम्। मासादूर्ध्वंपूजाविहतौपुनःप्रतिष्ठाप्रोक्षणविधिर्वाकार्येत्याहुः पुनःप्रतिष्ठादिमलमासशुक्रास्तादावपिकार्यम् देवालयवापीकूपतडागभेदनेआरामसेतुसभाभङ्गे- इदंविष्णुर्मानस्तोकेविष्णोःकर्माणिपादोस्येतिचरुआज्याहुतीर्हुत्वाब्राह्मणान्भोजयेदिति ॥

**पूजानाशशुद्धि**—बुद्धिपूर्वक पूजानाश अथवा शूद्रादिकांचा स्पर्श झाला असतां, पुनः प्रतिष्ठा केल्यानें मूर्तिशुद्धि होते. कित्येकांच्या मतें तर एक दिवस पूजा अंतरल्यास दुप्पट पूजा करावी व दोन दिवस अंतरल्यास महापूजा करावी. यापेक्षां अधिक दिवस अंतरल्यास प्रोक्षणविधि करावा. महिन्यापेक्षां अधिक दिवस अंतरल्यास पुनः प्रतिष्ठा किंवा प्रोक्षणविधि करावा, असें आहे. मलमास, शुक्रास्त इत्यादि असतांही पुनः प्रतिष्ठा करावी. देवालय, वापी, कूप, तडाग यांचा भेद झाला असतां, बाग, सेतु व सभा यांचा नाश झाला असतां 'इदंविष्णु०। मानस्तोके०। विष्णोःकर्माणि०। पादोस्य०'—या चार ऋचांनीं चार आज्याहुति अग्नीला देऊन, ब्राह्मणांस भोजन घालावें.

अथप्रोक्षणविधिः देवमुद्वास्यपञ्चवारंमृज्जलैःप्रक्षाल्यपंचगव्यैःस्नापयित्वाकुशोदकैर्विशोध्यमूलेनाष्टोत्तरशतवारंप्रोक्ष्यमूलेनमूर्धादिपीठान्तंसंस्पृश्यतत्त्वन्यासलिपिन्यासमन्त्रन्यासपूर्वकंप्राणप्रतिष्ठांकृत्वामहापूजांकुर्यात् पूजाहीनादिषुह्येषसंप्रोक्षणविधिःस्मृतः ॥

**प्रोक्षणविधि**—देवाचें विसर्जन करून मृत्तिका व उदक यांनीं देवास पांच वेळ धुवावें व नंतर पंचगव्यानें स्नान घालून कुशोदकांनीं देवास शुद्ध केल्यावर मूलमंत्रानें १०८ वेळ प्रोक्षण (पाणी शिंपडणें) करावें. मूलमंत्रानें मस्तकापासून पाठीपर्यंत स्पर्श करून तत्त्वन्यास, लिपिन्यास व मंत्रन्यास करावे आणि प्राणप्रतिष्ठा करून महापूजा करावी. पूजाहीन अथवा शूद्रादिकांनीं स्पर्श केलेल्या मूर्तींचा असा हा प्रोक्षणविधि आहे.

अथजीर्णोद्धारः सचलिङ्गादौभग्नेदग्धेवाकार्यः अयंचानादिसिद्धप्रतिष्ठितलिङ्गादौभङ्गादिदोषेपिनकार्यः तत्रतुमहाभिषेकःकार्यः ॥

**जीर्णोध्दार**—लिंग (मूर्ति) वगैरे फुटल्यास, जळाल्यास किंवा स्थानभ्रष्ट (जागेवरून हलणें) झाल्यास त्यांचा जीर्णोद्धार (दुरुस्ती) करावा. अनादिसिद्ध अशीं स्थापित लिंगें किंवा मूर्ति जर फुटल्या गेल्या असल्या, तर त्यांचा जीर्णोद्धार करूं नये. फक्त महाभिषेक करावा.

कर्ताऽमुकदेवस्यजीर्णोद्धारंकरिष्येइत्युक्त्वानान्दीश्राद्धान्तंकृत्वाचार्यंवृत्वापीठेमण्डलदेवताआवाह्यलिङ्गेॐव्यापकेश्वरहृदयायनमः ॐव्यापकेश्वरशिरसेस्वाहेत्यादिषडङ्गंकृत्वादेवतान्तरेमूलमन्त्रेणषडङ्गंकृत्वाऽर्चयेत् अघोरेतिमन्त्रमष्टोत्तरशतंजप्त्वाग्निंप्रतिष्ठाप्यअघोरेणघृताक्तसर्षपैःसहस्रंहुत्वेन्द्रादिभ्योना-

स्त्राबलिंदत्वाजीर्णदेवंप्रणवेनसंपूज्यसाज्यतिलैर्मण्डलदेवताहोमंकृत्वाप्रार्थयेत् जीर्णभग्नमिदंचैवसर्वदोषावहंनृणाम् । अस्योद्धारेकृतेशान्तिःशास्त्रेस्मिन्कथितात्वया १ जीर्णोद्धारविधानंचनृपराष्ट्रहितावहम् । तदधस्तिष्ठतांदेवप्रहरामितवाज्ञया २ क्षीराज्यमधुदूर्वासमिद्भिर्देवमन्त्रेणाष्टोत्तरशतंहुत्वातिलैःसहस्रंहुत्वापायसेनशतंहुत्वालिङ्गंप्रार्थयेत्—लिङ्गरूपंसमागत्ययेनेदंसमधिष्ठितम् । यायास्त्वंसंमितंस्थानंसंत्यज्यैवशिवाज्ञया १ अत्रस्थानेचयाविद्यासर्वविद्येश्वरैर्युता । शिवेनसहसंतिष्ठेतिमन्त्रितजलेनाभिषिच्यविसर्जयेत् अस्त्रमन्त्रितेनखनित्रेणखात्वालिङ्गमादायवामदेवमन्त्रेणनद्यादौक्षिपेत् मूर्तिंप्रणवेनक्षिपेत् दारुजं मधुनाभ्यज्याघोरेणदहेत् हेमादिमयंयोग्यंकृत्वातत्रैवस्थापयेत् ततः शान्त्यर्थमघोरेणघृतक्षीरमध्वक्तैस्तिलैःसहस्रंहुत्वाप्रार्थयेत् भगवन्भूतभव्येशलोकनाथजगत्पते । जीर्णलिङ्गसमुद्धारःकृतस्तवाज्ञयामया १ अग्निनादारुजंदग्धंक्षिप्तंशैलादिकंजले । प्रायश्चित्तायदेवेशअघोरास्त्रेणतर्पितम् २ ज्ञानतोऽज्ञानतोवापियथोक्तंनकृतंयदि । तत्सर्वंपूर्णमेवास्तुत्वत्प्रसादान्महेश्वर ३ अथयजमानानःप्रार्थयेत् गोविप्रशिल्पिभूपानामाचार्यस्यचयज्वनः । शान्तिर्भवतुदेवेशअच्छिद्रंजायतामिदम् १ मूर्तौतुविशेषः त्वत्प्रसादेननिर्विघ्नंदेहंनिर्मापयत्यसौ । वासंकुरुसुरश्रेष्ठतावत्त्वंचाल्पकेगृहे २ वसक्लेशंसहित्वेहमूर्तिर्वैतत्रपूर्ववत् । यावत्कारयतेभक्तःकुरुतस्यचवाञ्छितम् २ ततोनवांमूर्तिं लिङ्गंवाकृत्वोक्तविधिनाप्रतिष्ठाकालानपेक्षयामासादर्वाक्स्थापयेत् इतिजीर्णोद्धारः॥

**जीर्णोद्धारविधि**—हा करणारानें 'अमुक देवस्य जीर्णोद्धारं करिष्ये' असा संकल्प करून नांदीश्राद्धापर्यंतचें कर्म केल्यावर आचार्य वरावा व सर्वतोभद्रपीठावर मंडलदेवतांचें आवाहन करून, 'व्यापकेश्वर हृदयायनमः । ॐव्यापकेश्वर शिरसे स्वाहा ।' इत्यादि षडंगन्यास करून पूजा करावी. इतर देवता असल्यास मूलमंत्रानें षडंगन्यास करून पूजा करावी. 'अघोरे०' या मंत्राचा एकशें आठ जप करून अग्नीची स्थापना करावी व 'अघोरेभ्यो०' या मंत्रानें तुपानें भिजविलेल्या मोहऱ्यांचा हजार होम करून, इन्द्रादि देवतांस नाममंत्रांनीं बली द्यावा व प्रणवमंत्रानें जीर्ण देवांची पूजा करून घृतयुक्त तिलांनीं मंडलदेवतेचा होम केल्यावर 'जीर्णभग्नमिदंचैव सर्वदोषावहंनृणां । अस्योद्धारे कृते शांतिः शास्त्रेऽस्मिन्कथितात्वया ॥ जीर्णोद्धारविधानंच नृपराष्ट्रहितावहं । तदधिष्ठायतां देव प्रहरामि तवाज्ञया ॥' अशी प्रार्थना करावी. अशी प्रार्थना केल्यावर दूध, तूप, मध, दूर्वा व समिधा यांनीं देवांच्या मंत्रानें १०८ होम करून तिलांचा एक हजार होम करावा व मग खिरीचा शंभर होम करून, 'लिंगरूपं समागत्य येनेदं समधिष्ठितं । यायास्त्वं संमितं स्थानं संत्यज्यैव शिवाज्ञया ॥ अत्रस्थाने च या विद्याःसर्वविद्येश्वरैर्युताः' अशी प्रार्थना करावी, आणि 'शिवेनसहसंतिष्ठ०' या मंत्रानें अभिमंत्रिलेल्या पाण्यानें अभिषेक करून विसर्जन करावें. अस्त्रमंत्रानें मंतरलेल्या कुदळीनें खणून तें लिंग 'वामदेव०' या मंत्रानें नदी, तडाग इत्यादिकांत टाकावें.

मूर्ति असल्यास ती प्रणवमंत्रानें टाकावी. लिंग लांकडी असल्यास तें मधांत भिजवून 'अघोरेभ्यो०' या मंत्रानें जाळावें. लिंग सुवर्णादि धातूंचें असेल तर तें नीट करून पुन्हा जागच्या जागींच स्थापावें. यानंतर शांतीसाठीं 'अघोरे०' या मंत्रानें घृत, दूध व मध यांत भिजविलेल्या तिलांचा हजार होम करावा व 'भगवन्भूतभव्येश लोकनाथ जगत्पते। जीर्णलिंगसमुद्धारः कृतस्तवाज्ञया मया॥ अग्निना-दारुजं दग्धं क्षिप्तं शैलादिकं जले। प्रायश्चित्ताय देवेश अघोरास्त्रेण तर्पितं॥ ज्ञानतोऽज्ञानतो वापि यथोक्तं न कृतंयदि। तत्सर्वं पूर्णमेवास्तु त्वत्प्रसादान्महेश्वर॥' अशी प्रार्थना करावी. या प्रार्थनेनंतर यजमानानें 'योविप्रशिल्पिभूपानामाचार्यस्य च यज्वनः। शांतिर्भवतु देवेश अच्छिद्रं जायतामिदं॥' अशी प्रार्थना करावी. मूर्ति असेल तर 'त्वत्प्रसादेन निर्विघ्नं देहं निर्मापयत्यसौ। वासं कुरु सुरश्रेष्ठ तावत्त्वं चाल्पके गृहे॥ वसक्लेशं सहित्वेह मूर्तिर्वै तव पूर्ववत्। यावत्कारयते भक्तः कुरु तस्य च वांछितं॥' अशी विशेष प्रार्थना करावी. यावर नवीन मूर्ति किंवा लिंग करून पूर्वोक्त विधीनें अर्चेच्या कालाची वाट पहात न बसतां, एक महिन्याच्या आंत ती स्थापावी. असा हा जीर्णोद्धारविधि आहे.

प्रतिमाशिवलिङ्गप्रासादकलशादिभङ्गे स्वामिनोमरणंभवेत् तत्र शान्तिः कुण्डंकृत्वाविधानेनततोहोमंसमाचरेत्। चरुंचयमदैवत्यंसाधयित्वा विधानतः॥ १॥ दधिक्षौद्रघृताक्तानामश्वत्थसमिधांततः। जुहुयादष्टशतंप्राज्ञइमारुद्रेतिमन्त्रवित्॥ २॥ माषैर्मुद्गैस्तिलैश्चैवघृतेनमधुनापिच। एभिःपञ्चसहस्राणि-शक्तिबीजेनहोमयेत्॥ ३॥ शक्तिबीजं ह्रींबीजं भूमिंधेनुमनड्वाहंस्वर्णंधान्य सदक्षिणम्। दत्त्वाथपञ्चगव्येनस्नायाद्देवालयेद्विजः॥ ४॥ बलिंदद्याद्यमाया-थकृसरैःपायसैस्तथा। ईशानायबलिंदत्वाकृतकृत्योभवेन्नरः॥ ५॥ अत्रमूलं कमलाकरे॥

**प्रतिमालिंगप्रासादकलशादिभंगदोषनिवारण**—मूर्ति, शिवलिंग, देवालय अथवा देवालयाचा कळस इत्यादिकांचा नाश झाला असतां मालक मरतो म्हणून पुढें सांगितल्याप्रमाणें शांति करावी. विधियुक्त कुण्ड करून होम करावा व विधिपूर्वक यमदेवतेसाठीं चरु करून त्याचा व दहीं, मध व तूप यांत भिजविलेल्या पिंपळाच्या समिधांचा 'इमारुद्रा०' या मंत्रानें मंत्रज्ञ व विज्ञान आचार्यानें एकशेंआठ होम करावा. उडीद, मूग, तिल, तूप व मध यांनीं प्रत्येकाचा हजार याप्रमाणें शक्तिबीजमंत्रानें होम करावा. 'ऱ्हीं' हें शक्तिबीज जाणावें. ब्राह्मणानें भूमि, गाय, बैल, सुवर्ण व धान्य यांचीं दक्षिणेसहित दानें करून, देवालयांत पंचगव्यानें स्नान करावें. यावर कृसरान्नाचा बली यमास देऊन ईशानास पायसाचा बली द्यावा. असें केलें असतां मनुष्य कृतकृत्य होतो, असें कमलाकरग्रंथांत सांगितलें आहे.

अथपुष्पादिविचारः अपर्युषितनिश्छिद्रैःप्रोक्षितैर्जन्तुवर्जितैः। आत्मारामोद्भवैर्मुख्यैर्भक्त्यासंपूजयेत्सुरान्॥ १॥ त्यजेत्कीटावपन्नानिशीर्णपर्युषितानिच।

स्वयंपतितपुष्पाणिमलाद्युपहतानिच ॥ २ ॥ मुकुलैर्नार्चयेद्देवमपक्वैः कृमि-युक्तफलैःपुष्पाभावेपत्रपूजापत्रालाभेफलैरपि ॥ ३ ॥ निवेदयेत्फलालाभे तृणगु-ल्मौषधीरपि । समित्पुष्पकुशादीनिब्राह्मणःस्वयमाहरेत् ॥ ४ ॥ शूद्रानीतैः क्रयक्रीतैः कर्मकुर्वन्पतत्यतः । लक्षपुष्पार्चनंक्रयक्रीतैरपि केचित्तु धर्मार्जित-धनक्रीतैर्यः कुर्यात्केशवार्चनम् । नपर्युषितदोषोस्तिमालाकारगृहेषुच ॥ १ ॥ इत्याद्युक्तेर्मालाकारानीतै क्रयक्रीतैरपिपुष्पपत्रैः पूजयन्ति नित्यपूजार्थंपरोपव-नादेरपिपुष्पादिग्रहेचौर्यदोषोन पूजार्थंपुष्पादिनयाचेत् समित्पुष्पकुशादीनि-वहन्तंनाभिवादयेत् । तद्धारीचैवनान्याञ्नहिनिर्माल्यंतद्भवेत्तयोः १ देवोपरि-धृतंवामहस्तेऽधोवस्त्रेचधृतंजलेन्तः क्षालितंचपुष्पंनिर्माल्यम् वर्ज्यंपर्युषितंपुष्पं वर्ज्यंपर्युषितंजलम् नवर्ज्यंतुलसीपत्रंनवर्ज्यंतीर्थजंजलम् ॥ १ ॥ प्रहरंतिष्ठते-जातीकरवीरमहर्निशम् । नैवपर्युषितंपद्मंतुलसीबिल्वपत्रकम् ॥ २ ॥ कुन्दंच-दमनंचैवागस्त्यंचकलिकातथा ॥

**देवपूजापुष्पविचार**—शिळीं नसलेलीं, भोकें न पडलेलीं, पाणी शिंपडलेलीं व जंतुरहित असून आपल्या बागेंत उत्पन्न झालेलीं अशीं पुष्पें मुख्य आहेत. अशा पुष्पांनीं देवाची भक्तीनें पूजा करावी. किड्यांनीं खाल्लेलीं, गळलेलीं, शिळीं झालेलीं, आपोआप पडलेलीं व मलादिकानें खराब झालेलीं फुलें देवपूजेस घेऊं नयेत. कळ्या व न कच्चीं व किडे असलेलीं फळें यांनीं देवपूजा करूं नये. पुष्पें न मिळाल्यास पत्रांनीं, पत्रें न मिळाल्यास फळांनीं व फळें न मिळाल्यास दूर्वादि तृणें, गुल्म ( वल्लीच्या तंतूंचे गुच्छ ) व ओषधि यांनीं पूजा करावी. समिधा, पुष्पें व दर्भादि पदार्थ ब्राह्मणानें स्वतः आणावेत. शूद्राकडून आणलेल्या व विकत घेतलेल्या पुष्पादिकांनीं पूजा करणारा अधोयोनीस ( नीच जन्माला ) जातो. लक्ष पुष्पांनीं पूजा करणें असल्यास विकत घेतलेल्या पुष्पां-नींही ( पूजा ) करावी. न्यायानें संपादिलेल्या द्रव्यानें विकत घेतलेल्या पुष्पादि-कांनीं पूजा करणारास दोष नाहीं व माळ्याकडच्या पुष्पांसही शिळेपणाचा दोष नाहीं, असें वचन असल्यामुळें, कित्येक माळ्यांकडून विकत आणलेल्या पुष्पांनीं पूजा करितात. नित्यपूजेकरितां दुसऱ्याच्या बागांतून अथवा इतर ठिकाणून पुष्पें, पत्रें इत्यादि आणलीं असतां चोरीचा दोष नाहीं. पूजेसाठीं पुष्पें, पत्रें इत्यादिकां-ची याचना करूं नये. समिधा, पुष्पें, दर्भ इत्यादि पूजासाहित्य नेत असतां त्यास कोणीं नमस्कार करूं नये व त्यानेंही कोणास नमस्कार करूं नये. कारण, तसें केलें असतां जवळ असलेलें पूजासाहित्य निर्माल्य होतें. देवास वाहिलेलें, केवळ डाव्या हातांत घेतलेलें, नेसलेल्या वस्त्रांत घेतलेलें व पाण्यांत घालून धुतलेलें पुष्प निर्माल्य होय. ( पूजेला ) शिळें फूल व पाणी वर्ज करावींत. तुलसीपत्रें व तीर्थोदक हीं पर्युषित म्हणजे शिळीं असलीं तरी वर्ज्य नाहींत. जाईचें फूल एक प्रहरपर्यंत व कण्हेरीचें फूल एक अहोरात्रपर्यंत शिळें होत नाहीं. तुळसी, बिल्वपत्रें, कुंदपुष्पें, दवणा, अगस्त्याचीं ( हतग्याचीं ) फुलें व कळ्या शिळ्या होत नाहीत.

बिल्वादेरपर्युषितत्वदिनसंख्या बिल्वः ३० अपामार्गः ३ जाती १ तुलसी ६ शमी ६ शतावरी ११ केतकी ४ भृङ्गराजः ९ दूर्वा ८ मन्दारः १ पद्मं १ नागकेसरः २ दर्भाः ३० अगस्त्यः ३ तिला १ मल्लिका ४ चम्पकः ९ करवीरं ८ एतेषामेतद्दिनोत्तरं पर्युषितत्वम् ॥

**पुष्पपत्रें शिळीं केव्हां होतात?**—बिल्वादि पत्रें व पुष्पें किती दिवसपर्यंत शिळीं होत नाहींत, त्या दिवसांची संख्या त्या प्रत्येकापुढें दिली आहे. बिल्व ३०, आघाडा ३, जाई १, तुलसी ६, शमी ६, शतावरी ११, केतकी ४, भृंगराज ( माका ) ९, दूर्वा ८, मंदार १, पद्म १, नागचांफा २, दर्भ ३०, अगस्त्य ३, तिल १, मल्लिका ४, सोनचांफा ९ व कण्हेर ८, इतक्या दिवसांनंतर हीं फुलें शिळीं होतात.

तुलसीग्रहणकालः । वैधृतौचव्यतीपातेभौमभार्गवभानुषु । पर्वद्वयेचसंक्रान्तौद्वादश्यांसूतकद्वये १ तुलसींयेविचिन्वन्तितेछिन्दन्तिहरेःशिरः । नैवच्छिन्द्याद्रवौदूर्वांतुलसींनिशिसंध्ययोः २ धात्रीपत्रंकार्तिकेचपुण्यार्थीमतिमान्नरः । द्वादश्यांचदिवास्वापस्तुलस्यवचयस्तथा ३ विष्णोश्चैवदिवास्नानंवर्जनीयंसदाबुधैः । अत्र दिवानिषेधाद्रात्रौस्नानादिषोडशोपचारैःपूजाकार्या दिवातुगन्धादिपुष्पाञ्जल्यन्तापवोपराचाराइतिकमलाकराह्निके विष्णोर्द्वादश्यांनिर्माल्यापनयनमपिनकार्यमितितन्त्रान्तरेस्मरुते एतदपवादः पुरुषार्थचिन्तामणौ नारदीये पञ्चामृतेनसंस्नाप्यएकादश्यांजनार्दनम् । द्वादश्यांपयसास्नाप्यहरिसायुज्यमश्नुते ॥ १ ॥ इति देवार्थेतुलसीछेदोहोमार्थेसमिधांतथा । इन्दुक्षयेनदुष्येतगवार्थेतुतृणस्यच ॥ १ ॥ तुलसीग्रहणमन्त्रः । तुलस्यमृतजन्मासिसदात्वंकेशवप्रिये । केशवार्थेविचिन्वामिवरदाभवशोभने ॥ २ ॥ जातिमल्लिकाकरवीराशोकोत्पलचम्पकवकुलबिल्वशमीकुशापत्तानिसर्वदेवतानांविहितानि ॥

**तुलसीग्रहणकाल**—वैधृति, व्यतीपात, मंगळवार, शुक्रवार, रविवार, पौर्णिमा, अमावास्या, संक्रांति, द्वादशी, जननाशौच व मृताशौच या कालीं तुलसी तोडणारे हरीचा शिरच्छेदच ( केल्यासारखें ) करितात, म्हणून या दिवशीं तुलसी तोडूं नयेत. शहाण्या मनुष्यानें रविवारीं दूर्वा, रात्रीं व दोन्ही संधिकालीं तुलसी व कार्तिक महिन्यांत आंवळीचें पान तोडूं नये. त्याचप्रमाणें शहाण्या माणसानें द्वादशीला दिवसां झोंप घेणें, तुलसी तोडणें व विष्णूस दिवसां स्नान घालणें, या गोष्टी वर्ज कराव्यात या वाक्यांत स्नानाचा निषेध दिवसां असल्यामुळें रात्रीं स्नानादि षोडशोपचारानें पूजा करावी असें ठरतें. कमलाकराच्या आन्हिकांत असें सांगितलें आहे कीं, दिवसा गंधापासून पुष्पांजलीपर्यंतचे उपचार परमेश्वरास अर्पण करावेत. द्वादशीला विष्णूवरील निर्माल्यही काढूं नये, असें दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे. एकादशीला जनार्दनास पंचामृताचें स्नान घातल्यानें व द्वादशीला दुधाचें स्नान घातल्यानें श्रीहरि सायुज्य मुक्ति देतो, असें पुरुषार्थचिंतामणींत नारदाचें पुराणवचन असल्यामुळें, वरील वचनास अपवाद आहे. अमावास्येला विष्णुपूजेसाठीं तुळशी

तोडल्यास, होमासाठीं समिधा आणल्यास व गाईसाठीं गवत कापल्यास दोष लागत नाहीं. 'तुलस्यमृतनामासि सदा त्वं केशवप्रिये। केशवार्थे विचिन्वामि वरदाभव शोभने ॥' असा मंत्र म्हणून तुलसी तोडाव्यात. जाई, भोगरा, कण्हेर, अशोक, कमलें, चांफा, बकुळीचें फूल, शमी व कुश हीं सर्व देवांस अर्पण करण्यास प्रशस्त आहेत.

अथ विहितप्रतिषिद्धत्वाद्वैकल्पिकानि पाटलाशमीपत्रंचदुर्गायाः कुन्द-पलाशबकुलदूर्वाः शिवस्य कुमुदतगरेसूर्यस्य तुलसीभृङ्गराजतमालपत्राणि-शिवदुर्गयोः अगस्तिमाधवीलताळोध्रपुष्पंविष्णुशिवयोः धत्तूरमन्दारौविष्णु-सूर्ययोः इतिविकल्पितानि ॥

**कोणचीं फुलें कोणास निषिध्द आहेत?**—वाहण्यास योग्य पण अमक्यास अमुक वाहूं नयेत असा जो विकल्प आहे तो पुढीलप्रमाणें:—पाटला व शमीपत्र हीं दुर्गादेवीस निषिद्ध आहेत. कुंद, पलाश, बकुल व दूर्वा हीं शिवास निषिद्ध सांगितलीं आहेत. कुमुदें व तगर हीं सूर्यास निषिद्ध आहेत. तुलसी, माका व तमालपत्र हीं शिव व दुर्गा, यांस निषिद्ध प्रतिपादिलीं आहेत. अगस्ती, माधवीलता व लोध्र (घायटी) पुष्प, हीं शिव व विष्णु, यांस प्रतिषिद्ध सांगितलीं आहेत. धोत्रा व मंदार हीं पुष्पें विष्णु व सूर्य यांस प्रतिषिद्ध आहेत. अशीं हीं वैकल्पिक फुलें होत.

अथविष्णोःप्रियाणि। मालतीजातीकेतकीमल्लिकाशोकचम्पकपुन्नागबकुलो-त्पलकुन्दकरवीरपाटलातगरपुष्पाणि अन्यानिचसुरभीणिविष्णोः प्रियाणि अपामार्गभृङ्गराजखदिरशमीदूर्वाकुशदमनकबिल्वतुलसीपत्राण्युत्तरोत्तराधि-कप्रियाणि तुलसीसर्वाधिका जातिपुष्पसहस्रेणमालार्पणेकल्पकोटिसहस्रंविष्णु-पुरेवासः आम्रमञ्जर्यापूजनेगोकोटिदानफलम् ॥

**विष्णूला आवडणारीं फुलें**—मालती, जाई, केतकी, मोगरी, अशोक, चंपक, पुन्नाग, बकुल, कमल, कुंद, कण्हेर, पाटला, तगर हीं सुगंधी पुष्पें विष्णूस प्रिय आहेत. अपामार्ग (आघाडा), माका, खादिर, शमी, दूर्वा, दवणा, बिल्व व तुळशी यांचीं पानें उत्तरोत्तर एकापेक्षां एक अधिक प्रिय आहेत. तुलसीपत्र सर्वांत अधिक प्रिय आहे. जाईच्या हजार फुलांची माळ विष्णूला अर्पण केली असतां कल्पकोटिसहस्रवर्षेंपर्यंत विष्णुपुरीं वास होतो. आंब्याच्या मोहरानें पूजा केली असतां गोकोटिदानाचें फल मिळतें.

अथशिवस्य चतुर्णांपुष्पजातीनांगन्धमाघ्रातिशंकरः। अर्कस्यकरवीरस्य-बिल्वस्यचबकस्यच ॥ १ ॥ दशसुवर्णदानफलंश्वेतार्कपुष्पम् तत सहस्रगुणं-बकपुष्पम् एवं धत्तूरशमीपुष्पद्रोणपुष्पनीलोत्पलानामुत्तरोत्तराणांसहस्रगुण-त्वम् मणिमुक्ताप्रवालैस्तुरत्नैरप्यर्चनंकृतम्। नगृह्णामिविनादेविबिल्वपत्रैर्व-रानने ॥ १ ॥ सर्वकामप्रदं बिल्वंदारिद्र्यस्यविनाशनम्। नीलोत्पलसहस्रेण-मालार्पणेकल्पकोटिसहस्रं शिवपुरेवासः धत्तूरैर्बृहतीपुष्पैश्चपूजनेगोलक्षफलम्

पाटलामन्दारापामार्गजातीचम्पकोशीरतगरनागकेसरपुन्नागजपामल्लिसहकार-कुसुम्भपुष्पाणिशिवप्रियाणि धत्तूराणिकदम्बानिरात्रौदेयानिशंकरे । मदनरत्ने केतकानिकदम्बानीतिपाठःअभावेपुष्पपत्राणामन्नाद्येनाभिपूजयेत् शालितण्डुल-गोधूमयवैर्वापिसमाचरेत् ॥

**शिवप्रियपुष्पें**—अर्क ( रुई ), कण्हेर, बिल्व व बक (अगस्ता किंवा अशोक) या चार जातींच्या फुलांचा सुगंध शंकरास प्रिय आहे. पांढऱ्या रुईच्या फुलानें शंकराची पूजा केली असतां १० सुवर्णाच्या ( नाण्याच्या ) दानाचें फळ मिळतें; अर्कपुष्पापेक्षां बकपुष्प सहस्रपट प्रिय आहे. याचप्रमाणें धोत्रा शमी-पुष्प, द्रोणपुष्प व निळें कमळ हीं उत्तरोत्तर एकापेक्षां एक सहस्रपटीनें प्रिय आहेत. हे वरानने पार्वति, बिल्वपत्रावांचून हिरे, मोत्यें, पोंवळीं व रत्नें यांनीं माझी पूजा केली तरी ती मी ग्रहण करणार नाहीं, असें शंकराचें वचन आहे. बिल्वपत्र हें दारिद्र्याचा नाश करून सर्व मनोरथ पूर्ण करणारें आहे. हजार निळ्या कमलांची माला शिवास अर्पण केली असतां, कल्पकोटिसहस्रवर्षेंपर्यंत शिवपुरांत वास घडतो. धत्तुरपुष्पें ( धोतरा ) व बृहतीपुष्पें ( पाटल ) यांनीं पूजा केली असतां एक लक्ष गोदानाचें फळ मिळतें. पाटली, मंदार, आघाडा, जाई, चांफा, वाळा, तगर, नागकेशर, पुन्नाग, जास्वंद, मोगरी, आंबा, व कर्डईचें फूल हीं शिवाला प्रिय आहेत. धोत्रा व कदंब यांचीं फुलें शिवास रात्रीं अर्पण करावींत. मदनरत्नग्रंथांत केतकी व कदंब असा पाठ आहे. पुष्पें व पत्रें न मिळाल्यास अन्नादिकानें पूजा करावी. साळीचे तांदूळ, गहूं अथवा यव यांनीं शंकराची पूजा करावी.

अथनिषिद्धानि बन्धूककुन्दातिमुक्तकेतकीकपित्थबकुलशिरीषनिम्बानि पुष्पपत्रादिकंस्वाभिमुखमुत्तानमर्पयेत् पत्रंपुष्पंफलंचैवयथोत्पन्नंतथार्पयेत् । इतिवचनात् बिल्वपत्रंतुस्वाभिमुखाग्रंन्युब्जमर्पयेत् पक्वाम्रफलस्यशिवार्पणे-वर्षायुतंशिवपुरेवासः सव्यंव्रजेत्ततोसव्यंप्रणालींनैवलंघयेदित्यादिस्थिरलिंगे-प्रदक्षिणाप्रकारः चरेतुसव्येनैव देव्याअपिबकुलकुन्दादिसहितान्येतान्येव-प्रियाणि धान्यानांसर्वपत्रैश्चपुष्पैर्देवींप्रपूजयेत् । दूर्वाकुन्दैःसिन्दुवारैर्बन्धू-कागस्तिसंभवैः ॥ १ ॥ बिल्वपत्रैःपूजनेराजसूयफलम् करवीरस्रजाग्निष्टोमस्य बकुलस्रजावाजपेयस्य द्रोणस्रजाराजसूयस्येति एवंसूर्यविघ्नेशादेरपिप्रायो-विष्णुवत्ज्ञेयानि ॥

**निषिद्ध पुष्पें**—बन्धूक (दुपारी), कन्द (कटोली), अतिमुक्त ( टेंभुर्गी किंवा निवस ), केवडा, कवठी (कापित्थ), बकुल, शिरस (शिरीष) व निंब—हीं फुलें शिवास वाहूं नयेत. पानें, फुलें व फळें जशीं उत्पन्न होतात तशी-च्या तशींच अर्पण करावींत असें वचन असल्यानें, त्यांचीं शेंवटें (अग्रें) आपणांकडे करूनच तीं देवार्पण करावींत, असें जरी आहे तरी बेलाच्या पानाचें शेंवट आपल्या-कडे करून तें उपडें करून वहावें. पिकलेला आंबा शिवार्पण केल्यास दहा हजार वर्षेंपर्यंत शिवपुरींत राहायला मिळतें. शिवाला प्रदक्षिणा करणें ती शिवाच्या उजव्या

बाजूनें (आपल्या डावीकडून) प्रणालीपर्यंत (तीर्थ जाण्याचें गायमुख) जाऊन तेथून परत फिरावें आणि आपल्या उजव्या हाताकडून पुन्हां परत प्रणालीपर्यंत जावें प्रणालि उलटून जाणेंयेणें करूं नये. (त्याला सोमसूत्री प्रदक्षिणा म्हणतात.) ही गोष्ट स्थापन केलेल्या (स्थिरशिव) लिङ्गाची होय. हलणाऱ्या (चर) लिङ्गास सव्य (दक्षिणेकडून) प्रदक्षिणाच (सबंद) करावी. बकुल व कुन्द यांचीं फुलें देवीला (पार्वति) प्रिय आहेत. धान्यें येणाऱ्या सर्व गवतांचीं पानें व फुलें आणि दूर्वा, कुन्द, निर्गुंड, पांढरी (दुधारी) व अगस्ता—यांच्या फुलांनीं देवीची पूजा करावी. फक्त बेलाच्याच पानांनीं पूजा केल्यास राजसूय यज्ञाचें फळ मिळतें. कण्हेरीच्या फुलांची माळ अर्पण केल्यानें अग्निष्टोमाचें, बकुलपुष्पमालेनें वाजपेयाचें व द्रोणपुष्पमालेनें (केळी, निळी किंवा केतकी) राजसूयाचें—अशीं फळें मिळतात. सूर्य, गणपति, वगैरे देवांना विष्णूला प्रिय असलेलींच फुलें आवडतात.

अथशिवनिर्माल्यग्रहणविचारः।अग्राह्यंशिवनैवेद्यंपत्रंपुष्पंफलंजलम् शालग्रामशिलासंगात्सर्वंयातिपवित्रताम् ॥ १ ॥ शैवसौरनैवेद्यभक्षणेचान्द्रायणं अभ्यासेद्विगुणम् मत्याभ्यासेसांतपनम् अन्यनिर्माल्येप्यनापद्येवम् इदंचज्योतिर्लिंङ्गस्वयंभूलिङ्गसिद्धप्रतिष्ठापितलिङ्गातिरिक्तस्थावरलिङ्गविषयम् ज्योतिर्लिङ्गादौतुपूजकेनदत्तंफलतीर्थादिकंभक्त्याशुद्ध्यर्थंग्राह्यंनलोभेन पञ्चायतनस्थितलिङ्गेषुचरेषुप्रतिमासुचान्नादेरपिस्वयंग्रहणेपिनदोषः ज्योतिर्लिङ्गाद्यन्यस्थिरलिङ्गेषुतीर्थोदकचंदनमात्रंश्रद्धावद्भिः शिवोपासकैरेवग्राह्यम् ज्योतिर्लिङ्गादौपूजकदत्तमन्नमपिभक्ष्यमितिकेचित् ॥

**शिवनिर्माल्यग्रहणनिर्णय**—शिवास अर्पण केलेला नैवेद्य, पत्र, पुष्प, फल व जल हीं अग्राह्य होत. पण शालिग्राम—शिलेच्या संसर्गानें शिवाचे नैवेद्य पवित्र होत. शिव व सूर्य यांचा नैवेद्य भक्षण केला असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. संवय असल्यास दुप्पट चांद्रायण करावें. समजून उमजून संवय झाली असल्यास सांतपन करावें. आपत्ति नसेल तर देवतांच्या निर्माल्यग्रहणाविषयीं हाच निर्णय जाणावा. ज्योतिर्लिंग स्वयंभू लिंग व सिद्धपुरुषांनीं स्थापिलेलें लिंग यांवांचून असलेल्या स्थावर लिंगाविषयीं हा शिवनिर्माल्यग्रहणाचा निषेध जाणावा. ज्योतिर्लिंग, स्वयंभू लिंग इत्यादिकांच्या बाबतींत पुजाऱ्यानें दिलेलें फल व तीर्थादिक भक्तियुक्त अंतःकरणानें शुद्ध होण्यासाठीं ग्रहण करावें, लोभानें ग्रहण करूं नये. पञ्चायतनांतील चार बाणलिंगें व प्रतिमा यांचा अन्नादिक नैवेद्य स्वतः ग्रहण केला तरी दोष नाहीं. ज्योतिर्लिंगाव्यतिरिक्त असलेल्या स्थिर लिंगाचें तीर्थोदक व चंदन हीं भाक्तिमान् शिवोपासकांनींच ग्रहण करावीं. ज्योतिर्लिंगादिकांच्या ठिकाणीं पुजाऱ्यानें दिलेलें अन्नही भक्षण करावें, असें कित्येक म्हणतात.

अथसाधारणमुहूर्तविचारः त्र्युत्तरारोहिणीध्रुवम् मघाभरणीपूर्वात्रयंक्रूरम् श्रवणत्रयपुनर्वसुस्वात्यश्चरम् अश्विनीहस्तपुष्यंक्षिप्रम् अनुराधारेवतीमृगचित्रंमृदु कृत्तिकाविशाखेमिश्रम् मूलाश्लेषाज्येष्ठार्द्रास्तीक्ष्णम् इतिनक्षत्रसंज्ञाः ॥

**नक्षत्रांच्या संज्ञा**—उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा व रोहिणी या नक्षत्रांस ध्रुव (स्थिर) अशी संज्ञा आहे. मघा, भरणी व पूर्वात्रय म्हणजे पूर्वा, पूर्वाषाढा व पूर्वाभाद्रपदा यांस क्रूर अशीं संज्ञा आहे. श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु व स्वाति यांस चर (हलणारीं) ही संज्ञा आहे. अश्विनी, हस्त व पुष्य यांस क्षिप्र संज्ञा आहे. अनुराधा, रेवती, मृग व चित्रा यांस मृदु ही संज्ञा आहे. कृत्तिका व विशाखा यांस मिश्र संज्ञा आहे; व मूळ, आश्लेषा, ज्येष्ठा व आर्द्रा या नक्षत्रांस तीक्ष्ण अशी संज्ञा आहे. येथें नक्षत्रसंज्ञा संपल्या.

**यत्रनोक्तातिथिस्तत्रग्राह्यारिक्तामर्मांविना । वारोपियत्रनप्रोक्तस्तत्रार्कार्कि-कुजान्विना १ चरमृदुक्षिप्रध्रुवमूलविशाखामघासुसकुजेशुभवारेभूकर्षणंहितम् सूर्यस्यक्तनक्षत्रात्त्र्यष्टनवाष्टसु अशुभंशुभमशुभंशुभमितिहलचक्रम् अत्रैवनक्षत्रे शनिभौमभिन्नवारेबीजवापःसस्यारोपणंच धान्यच्छेदश्च क्षीरवृक्षजन्यःखल-मध्येस्तम्भः धान्यानांमर्दनंज्येष्ठामूलमघाश्रवणरेवतीरोहिण्यनुराधाफल्गुनी-द्वयेशुभम् धान्यसंग्रहः क्षिप्रध्रुवचरमृदुमूलेषुज्ञगुरुशुक्रेषुचरभिन्नलग्नेशुभः ॐधनदायसर्वलोकहितायदेहिमेधान्यंस्वाहेतिमन्त्रंलिखित्वाधान्यागारेक्षिपेत् तेनधान्यवृद्धिः बुधमन्ददिनेनैवधनधान्यव्ययःशुभः । अद्यान्नवान्नंसद्वारेमृदु-क्षिप्रचरेदिवा ॥**

**हलचक्रनिष्पन्नधान्यव्यवहार**—जेथें तिथीचा उल्लेख केला नाहीं तेथें रिक्ता व अमावास्या या तिथींशिवाय इतर तिथि घ्याव्या; जेथें वाराचाही उल्लेख नसेल तेथें रविवार, शनिवार, भौमवार हे सोडून इतर वार घ्यावेत. चर, मृदु, क्षिप्र, ध्रुव, मूल, विशाखा व मघा हीं नक्षत्रें असतांना भौमवार किंवा चंद्र, बुध, बृहस्पति व भृगु (शुक्रवार) या वारीं जमीन नांगरणें शुभकारक होय. सूर्यानें भोगून टाकिलेल्या नक्षत्रापासून तीन, आठ, नऊ, आठ या नक्षत्रीं क्रमानें अशुभ, शुभ असें हलचक्र जाणावें. हीं हलचक्राचीं नक्षत्रें असतां शनि व भौम हे वार सोडून अन्यवारीं बीज पेरणें, शेत लावणें व शेत कापणें हीं शुभकारक होत. क्षीरवृक्षाचा (वटवृक्षाचा) स्तंभ (तिवडा) खळ्यांत असावा. ज्येष्ठा, मूळ, मघा, श्रवण, रेवती, रोहिणी, अनुराधा, पूर्वा व उत्तरा या नक्षत्रांवर धान्याची मळणी केली असतां शुभकारक आहे. क्षिप्र, ध्रुव, चर, मृदु व मूळ हीं नक्षत्रें असतां बुध, गुरु, शुक्र या वारीं चर लग्नाशिवाय इतर लग्नीं धान्याचा संग्रह करणें शुभकारक आहे. धान्यसंग्रहाचे वेळीं "ॐ धनदाय सर्वलोकहिताय देहिमे धान्यं स्वाहा" हा मंत्र लिहून धान्याच्या कोठारांत टाकावा म्हणजे धान्याची वृद्धि होते. बुधवार व मंदवार या वारीं धन (रुपये) व धान्य यांचा व्यय करणें शुभकारक नाहीं. म्हणून या वारीं व्याजीं लावणें, सवाई दिढीवर धान्य देणें इत्यादि व्यवहार करूं नयेत. मृदु, क्षिप्र व चर नक्षत्रें असतांना शुभ वारीं दिवसां नवान्न भक्षण करावें.

अथवस्त्रादि । वस्त्रभूषणविधिर्ध्रुवाश्विनीहस्तपञ्चकपुनर्वसुद्वये । पौष्णवासवभयोश्चसत्तिथौमन्दभौमशशिवासरान्विना ॥ १ ॥ अनुक्तेपीष्टदं वस्त्रंविप्राज्ञोत्सवलब्धिषु । ध्रुवपुष्यादितौयोषिद्धत्तेयावस्त्रभूषणे ॥ १ ॥ नप्राप्नोतिपतिप्रीतिंस्नातिवारुणभेचया । पादुकासनशय्यादेर्भोगःसत्तिथिवासरे ॥ २ ॥ ध्रुवक्षिप्रमृदुश्रोत्रभरणीषुपुनर्वसौ । चेन्नव्यवस्त्रंमध्यांशेदग्धस्फुटितपङ्कितम् ॥ ३ ॥ तस्याजेच्छान्तिकंकुर्यात्त्यजेदेवान्त्यभागयोः । विज्ञेयमेतच्छय्यायामास्तृतौपादुकास्वपि ॥ ४ ॥ सूचीकर्मानुराधाश्विचित्रामृगपुनर्वसौः । वस्त्रं क्षाल्यंधारणोक्तेकालेबुधदिनंविना ॥ ५ ॥ भोजनंभाजनेरौप्यस्वर्णकांस्यादिनिर्मिते । कुर्यादमृतयोगेषुचरक्षिप्रमृदुध्रुवैः ॥ ६ ॥ स्याद्भूषणानांघटनंचरक्षिप्रमृदूद्भवैः । शुभवारेरत्नवतांमिश्रभेपिरवौकुजे ॥ ७ ॥ इतिवस्त्रादिविचारः ॥

**वस्त्रधारणास मुहूर्त**—ध्रुवनक्षत्रीं, अश्विनी, हस्त, चित्रा, स्वाति, विशाखा, अनुराधा, पुनर्वसु, पुष्य, रेवती व धनिष्ठा या नक्षत्रीं, शुभतिथीस व भौम, शनि व चंद्र यांशिवाय इतर वारीं वस्त्रें व भूषणें धारण करावींत, ब्राह्मणाची आज्ञा असल्यास, विवाहादि उत्सव असल्यास, अथवा कांहीं लाभ असल्यास निंद्य दिवशींही वस्त्रधारण केलें असतां तें इष्टदायक होतें. ध्रुवसंज्ञक नक्षत्रीं व पुष्य, पुनर्वसु या नक्षत्रीं वस्त्रें व अलंकार धारण करणारी व शततारका नक्षत्रीं स्नान करणारी स्त्री पतीच्या प्रीतीस पात्र नाहीं. पादुका, आसन, शय्यादि पदार्थांचा उपभोग शुभतिथीस, शुभवारीं व ध्रुव, क्षिप्र, मृदु, श्रवण, भरणी, पुनर्वसु या नक्षत्रीं घ्यावा. नवीन वस्त्राने नऊ भाग कल्पिले असतां मधल्या तीन अंशांवर तें नवीन वस्त्र फाटेल, जळेल किंवा कर्दमयुक्त होईल तर तें टाकून द्यावें व शांति करावी. शेवटच्या दोन अंशांवर जळाल्यास तें वस्त्र फक्त टाकून द्यावें, शांति करूं नये. शय्येवरील गादी इत्यादि वस्तु, पादुका व आसन यांविषयींही हाच निर्णय समजावा. अनुराधा, अश्विनी, मृग व पुनर्वसु या नक्षत्रांवर शिवणकाम करावें. वस्त्रधारणास सांगितलेल्या कालीं बुधवाराशिवाय इतर वारीं वस्त्रक्षालन करावें. रुपें, सोनें व कांसें इत्यादि धातूंच्या पात्रांत भोजन करणें असल्यास तें अमृतयोगावर व चर, क्षिप्र, मृदु आणि ध्रुवसंज्ञक नक्षत्रें असतांना करावें. चर, क्षिप्र, मृदु व ध्रुवनक्षत्रीं आणि शुभवारीं अलंकार घडवावेत. मिश्रनक्षत्रीं व रवि आणि मंगळ या वारीं रत्नजडित अलंकार घडवावेत. असे हे वस्त्रादि धारणांचे मुहूर्त आहेत.

शस्त्राणांघटनंक्रूरमिश्राश्विमृगतीक्ष्णभे । शस्त्रंधार्यंध्रुवक्षिप्रमृदुज्येष्ठाविशाखके ॥ १ ॥ सेवाकार्याक्षिप्रमैत्रध्रुवैर्ज्येज्यार्कभार्गवे । मन्देपिचेत्सेवकर्क्षेस्वामिभात्स्याद्द्वितीयकम् ॥ २ ॥ हस्तषट्कध्रुवश्रोत्ररेवतीपुष्यभेशुभम् । पुनर्वसौचशिबिकागजाश्वादिषुरोहणम् ॥ ३ ॥ राज्ञांविलोकनंक्षिप्रश्रुतिद्वयमृदुध्रुवे । भृत्यारम्भःपुष्यमृगध्रुवज्येष्ठाधनिष्ठयो ॥ ४ ॥ अनुराधाशतभिषग्घस्तेस्याच्छुभवासरे । विपणिः स्यान्मृदुक्षिप्रध्रुवैरिक्ताकुजान्विना ॥ ५ ॥ क्रयःकार्योश्वि-

नीस्वातीश्रवश्चित्राशतान्त्यभे । विक्रयोभरणीपूर्वात्रयाश्लेषाश्रमिश्रभे ॥ ६ ॥ सेतुबन्धोध्रुवेस्वात्यांजीवार्कशनिवासरे । नानापशुक्रियाहस्तपुष्यार्द्रामृगमिश्रभे ॥ ७ ॥ पुनर्वसौधनिष्ठाश्विपूर्वाज्येष्ठाशतान्त्यभे । त्यक्त्वार्कभौमेन्दुशनीन्श्रुतिचित्राध्रुवाणिच ॥ ८ ॥ अमारिक्ताष्टमीश्चापिगतिक्रयमुखाःशुभाः । द्रव्यंलघुचरैर्योज्यंवृद्ध्यर्थंचरलग्नके ॥ ९ ॥ ऋणंभौमेनगृह्णीयाद्वृद्धियोगेऽर्कसंक्रमे । धनिष्ठापञ्चकेहस्तेत्रिपुष्करद्विपुष्करे ॥ १० ॥ भौमादिषुऋणच्छेदंकुर्याच्चधनसंग्रहम् । बुधेधनंनप्रदेयंसंग्रहस्तुबुधेशुभः ॥ ११ ॥ शन्यर्कारैस्त्रिपादर्क्षभद्रातिथ्यात्रिपुष्करः । मृगचित्राधनिष्ठासुतत्तिथ्याह्निद्विपुष्करः ॥ १२ ॥ शुभाशुभेषुत्रिगुणंद्विगुणंचफलंक्रमात् । मिश्रक्रूरेषुतीक्ष्णेषुस्वात्यांद्रव्यंनलभ्यते ॥ १३ ॥ दत्तंप्रयुक्तंनिक्षिप्तंनष्टंचेत्याहनारदः ॥

**नारदोक्त कर्मकालमुहूर्त**—क्रूर, मिश्र, अश्विनी, मृग व तीक्ष्ण नक्षत्रांवर खड्गादि शस्त्रें घडवावींत. ध्रुव, क्षिप्र, मृदु, ज्येष्ठा व विशाखा नक्षत्रांवर शस्त्रें धारण करावींत. क्षिप्र, मैत्र व ध्रुव हीं नक्षत्रें असतां बुध, गुरु, रवि व शुक्र या वारीं आणि स्वामिनक्षत्रापासून सेवकाचें नक्षत्र दुसरें नसेल तर शनिवारींही स्वामीची सेवा करण्यास आरंभ करावा. हस्त, चित्रा, स्वाति, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, ध्रुवनक्षत्रें, श्रवण, रेवती, पुष्य व पुनर्वसु या नक्षत्रांवर पालखी, हत्ती, अश्व, इत्यादिकांवर आरोहण केलें असतां शुभप्रद आहे. राजदर्शन घेणें असल्यास क्षिप्र, श्रवण, धनिष्ठा, मृदु व ध्रुव हीं नक्षत्रें असतांना घ्यावें. पुष्य, मृग, ध्रुव, ज्येष्ठा, धनिष्ठा, अनुराधा, शततारका, हस्त हीं नक्षत्रें असतांना शुभवारीं नृत्यारंभ शुभप्रद होय. मृदु, क्षिप्र व ध्रुव हीं नक्षत्रें असतां रिक्तातिथि व भौमवार वर्ज्य करून विक्रीचा बाजार शुभ होय. अश्विनी, स्वाति, श्रवण, चित्रा, शततारका, व रेवती या नक्षत्रांवर वस्तु विकत घ्याव्यात; व भरणी, पूर्वात्रय, आश्लेषा व मिश्र नक्षत्रें असतांना वस्तूंचा विक्रय करावा. ध्रुव व स्वाति नक्षत्रीं व गुरु, रवि व शनि या वारीं सेतुबंध करावा. हस्त, पुष्य, आर्द्रा, मृग, मिश्र नक्षत्रें, पुनर्वसु, धनिष्ठा, अश्विनी, तिन्ही पूर्वा, ज्येष्ठा, शततारका व रेवती हीं नक्षत्रें असतां, रवि, भौम, चंद्र व शनि हे वार, श्रवण, चित्रा व ध्रुव हीं नक्षत्रें, अमावास्या, रिक्तातिथि व अष्टमी हीं वर्ज्य करून पशु नेणें व आणणें, त्यांचा क्रयविक्रय करणें इत्यादि पशुसंबंधीं कर्में शुभकारक होत. द्रव्याची वृद्धि होण्यासाठीं त्यांचा व्यवहार लघु, चर या संज्ञा असलेल्या नक्षत्रांवर व चर लग्नावर करावा. मंगळवार, वृद्धियोग व सूर्यसंक्रांत या दिवशीं कर्ज काढूं नये. धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, रेवती, हस्त, त्रिपुष्कर, द्विपुष्कर, भौम, बुध, गुरु, शुक्र व शनि या मुहूर्तांवर कर्ज द्यावें व धनसंग्रह करावा, पण बुधवारीं धन देऊं नये. या दिवशीं धनसंग्रह शुभकारक होय. शनि, रवि व भौम हे वार, त्रिपाद नक्षत्रें म्हणजे कृत्तिका, पुनर्वसु, उत्तरा, विशाखा, उत्तराषाढा व पूर्वाभाद्रपदा आणि भद्रातिथी म्हणजे द्वितीया, सप्तमी व द्वादशी या तिहींचा योग झाला असतां त्रिपुष्कर योग होतो. मृग, चित्रा व धनिष्ठा

हीं नक्षत्रें, शनि, रवि व भौम हे वार व भद्रातिथी या तिहींचा योग झाला असतां द्विपुष्करयोग होतो. त्रिपुष्कर व द्विपुष्कर या योगांवर शुभाशुभ कार्यें झालीं असतां त्यांचीं फलें क्रमानें दुप्पट व तिप्पट अशीं मिळतात. या योगांवर एकाद्या वस्तूचा लाभ झाला असतां त्या वस्तूसह दुप्पट किंवा तिप्पट लाभ होतो. मिश्र, क्रूर, तीक्ष्ण व स्वाति हीं नक्षत्रें असतांना दिलेलें, योजिलेलें, ठेविलेलें व नष्ट झालेलें द्रव्य पुनः मिळत नाहीं, असें नारदानें म्हटलें आहे.

अन्धंमन्दंचचिबिटंसुलोचनमितिक्रमात् १४ गणनीयंरोहिणीभादन्धेनष्टंलभेद्द्रुतम् १५ मन्देयत्नाल्लभेतैवचिबिटस्वक्षयोर्नहि । अन्विष्यंपूर्वतोन्धेषुमंदसंज्ञेषुदक्षिणे १६ प्रतीच्याचिबिटाख्येषुसुलोचनउदग्दिशि । राज्याभिषेकःश्रवणेध्रुवर्क्षेज्येष्ठामृदुक्षिप्रउदग्रवौस्यात् । त्यक्त्वाररिक्ताधिकचैत्ररात्रीश्चन्द्रेज्यशुक्राभ्युदयेशुभाय ॥ १ ॥ जलाशयानांखननंमघापुष्यध्रुवेमृगे । पूर्वाषाढानुराधान्त्यधनिष्ठाशतहस्तभे ॥ १ ॥ जलराशिगतेचन्द्रेलग्नस्थेचबुधेगुरौ । क्षौरंचौलोक्तनक्षत्रवारादिषुशुभंजगुः ॥२॥ पञ्चमेपञ्चमेराज्ञांदिनेन्येषांयदृच्छया । श्मश्रुकर्मभवेन्नैवनवमेदिवसेक्वचित् ॥ ३ ॥ क्षौरंभूतेरतंदर्शेवर्जयेच्चजिजीविषुः क्षौरंनकुर्युरभ्यक्तभुक्तस्नातविभूषिताः ॥ ४ ॥ प्रयाणसमरारम्भेनरात्रौनचसंध्ययोः । श्राद्धाहप्रतिपद्रिक्ताव्रताह्निचनवैधृतौ ॥ ५ ॥ प्रशस्तंजन्मनक्षत्रंसर्वकर्मसुकीर्तितम् । क्षौरप्रयाणभैषज्यविवादेषुनशोभनम् ॥ ६ ॥ षष्ठ्यमापूर्णिमापातचतुर्दश्यष्टमीतथा । आशुसन्निहितंपापंतैलेषुस्त्रीभगेक्षुरे ॥ ७ ॥ राजकार्यनियुक्तानांनराणांभूपजीविनाम् । श्मश्रुलोमनखच्छेदेनास्तिकालविशोधनम् ॥ ८ ॥ क्षौरंनैमित्तिकंकार्यंनिषेधेसत्यपिध्रुवम् । यज्ञेमृतौबन्धमोक्षेनृपविप्राज्ञयापिच ॥ ९ ॥ प्रांग्वयस्कैःसपितृकैर्नकार्यंमुण्डनंसदा । मुण्डनस्यानिषेधेपिकर्तनंतुविधीयते ॥ १० ॥ उदङ्मुखःप्राङ्मुखोवावपनंकारयेत्सुधीः । केशश्मश्रुलोमनखान्युदक्संस्थानिवापयेत् ॥ ११ ॥ आनर्तोहिच्छत्रःपाटलिपुत्रोदितिर्दितिःश्रीशः । क्षौरेस्मरणादेषांदोषानश्यन्तिनिःशेषाः ॥ १२ ॥

**नक्षत्रमुहूर्त**—रोहिणी नक्षत्रापासून चार चार नक्षत्रें क्रमानें अंध, मंद, चिबिट व सुलोचन या संज्ञेनें मोजावींत. उदाहरणार्थः—रोहिणी—अंध, मृग—मंद, आर्द्रा—चिबिट, व पुनर्वसु—सुलोचन. अंधनक्षत्रावर नष्ट झालेली वस्तु लवकर सांपडेल. मंद नक्षत्रावर नष्ट झालेली वस्तु यत्नानें सांपडेल; व चिबिट आणि सुलोचन नक्षत्रावर नाहींशी झालेली वस्तु सांपडणार नाहीं. अंध नक्षत्रावर नाहींशी झालेली वस्तु पूर्वेस पहावी. मंदनक्षत्रावर नाहींशी झालेली वस्तु दक्षिणेस शोधावी. चिबिट नक्षत्रावर नाहींशी झालेली वस्तु पश्चिमेस व सुलोचन नक्षत्रावर नाहींशी झालेली वस्तु उत्तरेस पहावी. श्रवण, ध्रुव, ज्येष्ठा, मृदु व क्षिप्र या नक्षत्रांवर रवि उत्तरायणीं असतांना सोमवारीं गुरु व शुक्र यांचा उदय असतां, मंगळवार, रिक्ता तिथि, अधिकमास, चैत्रमास व रात्री हीं वर्ज्य करून राज्याभिषेक केला असतां तो शुभकारक होतो. मघा, पुष्य, ध्रुव, मृग, पूर्वाषाढा, अनुराधा,

रेवती, धनिष्ठा, शततारका व हस्त हीं नक्षत्रें असतांना चंद्र जलराशिगत असून बुध व गुरु हे लग्नीं असतां वापी, कूप, तडाग इत्यादि खणावेत. चौलकर्मास उक्त असलेलीं नक्षत्रें व वार हीं असतांना क्षौरकर्म करणें शुभकारक होय. राजांनीं पांच पांच दिवसांनीं क्षौर करावें. इतरांनीं इच्छेप्रमाणें उक्तदिवशीं क्षौर करावें. नवव्या दिवशीं श्मश्रुकर्म कधींही करूं नये. जिवंत राहाण्याची इच्छा करणाऱ्यानें चतुर्दशीच्या दिवशीं श्मश्रु व अमावास्येला स्त्रीसंभोग करूं नयेत. अभ्यंग, भोजन व स्नान केलेल्यानें व अलंकारादिकांनीं भूषित असलेल्यानें क्षौर करूं नये. प्रयाण-दिवस, युद्धाचा आरंभदिवस, रात्री, संधिकाल, श्राद्धदिवस, प्रतिपदा, रिक्तातिथि, व्रतदिवस व वैधृति यांवर श्मश्रुकर्म करूं नये. सर्व कर्में करण्यास जन्मनक्षत्र प्रशस्त आहे, पण श्मश्रु, प्रयाण, औषधसेवन व वादविवाद यांस तें प्रशस्त नाहीं. षष्ठी, अमावास्या, पौर्णिमा, व्यतीपात, चतुर्दशी व अष्टमी यांवर तैलसेवन, स्त्रीसंभोग व श्मश्रु हीं करूं नयेत. राजाचें काम करण्यास नेमलेल्या पुरुषानें किंवा राजाच्या आश्रयानें आपली उपजीविका करणारानें श्मश्रु, लोम व नखें काढून टाकतांना बऱ्या वाईट कालाचा विचार करूं नये. क्षौराविषयीं निषेध असला तरी नैमित्तिक व यज्ञ, स्मृति, बंध, मोक्ष, राजाज्ञा व विप्राज्ञा असतां क्षौर करावें. आईबाप जिवंत असणाऱ्या पूर्ववयस्कांनीं मुंडन करूं नये. मुंडनाविषयीं निषेध असला तरी केशांचे कर्तना ( कापण्या ) विषयीं विधि आहे. शहाण्या पुरुषानें उत्तराभिमुख किंवा पूर्वाभिमुख होऊन श्मश्रुकर्म करवावें. केश, श्मश्रु, लोम व नखें यांचा छेद पाण्याच्या जागीं करावा. निंद्य दिवशीं श्मश्रुकर्म करण्याचा प्रसंग आल्यास 'आन-र्तोच्छित्रः पाटलिपुत्रोऽदितिः श्रीशः । क्षौरे स्मरणादेषां दोषा नश्यन्ति निःशेषाः ॥' हा श्लोक म्हणावा म्हणजे दोष नाहींसे होतात.

अथरोगोत्पत्तौनक्षत्रफलम् । अश्विन्यांरोगोत्पत्तौएकाहंनवादिनानि वापञ्चविंशतिदिनानिवापीडा ॥ १ ॥ भरण्यामेकादशैकविंशतिर्वामासंवामृत्युर्वा (२) कृत्तिकायां दशनवैकविंशतिर्वा (३) रोहिण्यांदशवानववासप्तवात्रीणिवा-हानि (४) मृगेपञ्चनववात्रिंशद्वा (५) आर्द्रायांमृत्युर्वादशाहंवामासंवा (६) पुनर्वसौसप्तनववामृत्युर्वा (७) पुष्येसप्तवामृत्युर्वा (८) आश्लेषायांमृत्युर्विंशति-स्त्रिंशद्वानववादिनानिपीडा (९) मघायांमृत्युर्वासार्धमासंवामासंवाविंशति-दिनानिवापीडा (१०) पूर्वाफल्गुन्यांमृत्युर्वाब्दंमासंवापीडापञ्चदशवाषष्टिर्वा-दिनानि (११) उत्तरायांसप्तविंशतिःपञ्चदशसप्तवादिनानि (१२) हस्तेमृत्यु-रष्टवानववासप्तवापञ्चदशवाहानि (१३) चित्रायांपक्षमष्टवादशवाएकादश-वाहानि (१४) स्वात्यां मृत्युर्वैकद्वित्रिचतुःपञ्चमासैर्वादशदिनैर्वारोगनाशः (१५) विशाखायांमासंवापक्षंवाष्टदिनंविंशतिदिनंवापीडा (१६) अनुराधायां-दशरात्रमष्टाविंशतिरात्रंवा (१७) ज्येष्ठायांमृत्युर्वापक्षंवामासंवैकविंशतिरात्रं-वापीडा (१८) मूलेमृत्युःपक्षंनवरात्रंविंशतिरात्रंवापीडा (१९) पूर्वाषाढायां-मृत्युर्वाद्वित्रिषडादिमासैर्विंशतिदिनैःक्लेशेनवारोगनाशः (२०) उत्तराषाढायां-

सार्धमासंविंशतिरात्रंवामासंवा (२१) श्रवणेपञ्चविंशतिर्दशवापकादशवाषष्टिर्वाहानि (२२) धनिष्ठायांदशरात्रंपक्षंमासंत्रयोदशरात्रंवा (२३) शततारकायांद्वादशैकादशवा (२४) पूर्वाभाद्रपदायांमृत्युर्वाद्वित्र्यादिमासंवादशरात्रंवा (२५) उत्तराभाद्रायांसार्धमासंपक्षंसप्ताहंदशाहंवा (२६) रेवत्यांज्वराद्युत्पत्तौदशामहमष्टाविंशतिरात्रंवापीडा (२७) जन्मनक्षत्रेजन्मराशौअष्टमचन्द्रेरोगोत्पत्तौमृत्युः (२८) अर्कादिवारेक्रमेणमघाद्वादश्यौविशाखैकादश्यौपञ्चम्यार्द्रेतृतीयोत्तराषाढेशतताराषष्ठ्यौअष्टम्यश्विन्यौपूर्वाषाढानवम्यौचेतित्रयाणांयोगेमृत्युः एवमर्कादौअनुराधाभरण्यौआर्द्रोत्तराषाढेमघाशततारेविशाखाश्विन्यौज्येष्ठामृगौश्रवणाश्लेषेपूर्वाभाद्रपदाहस्तौचेन्मृत्युयोगः अत्रोक्तास्तिथिवारनक्षत्रशांतयोविस्तृताःकार्याःयेषुनक्षत्रेषुमरणमुक्तंतत्रशान्तिरावश्यकी अन्यत्रकृताकृता।

**रोगोत्पत्तिकारक नक्षत्रफलें**—(१) अश्विनी नक्षत्रावर ज्वरादि रोग झाल्यास एक, नऊ किंवा २५ दिवस पीडा होईल, असें जाणावें. (२) भरणी नक्षत्रावर रोग झाल्यास ११ दिवस, २१ दिवस, किंवा महिनाभर पीडा होईल अथवा मृत्युही येईल. (३) कृत्तिका नक्षत्राची पीडा १० दिवस, ९ दिवस किंवा २१ दिवस. (४) रोहिणी नक्षत्राची १०, ९, ७ किंवा ३ दिवस पीडा. (५) मृगाची ५, ९ किंवा ३० दिवस. (६) आर्द्रा नक्षत्रीं रोग झाला असतां मृत्यु, १० दिवस किंवा एक महिनाभर पीडा. (७) पुनर्वसूची ७ किंवा ९ दिवस पीडा अथवा मृत्यु. (८) पुष्याची पीडा ७ दिवस किंवा मृत्यु. (९) आश्लेषा नक्षत्रीं मृत्यु अथवा २०, ३० किंवा ९ दिवस पीडा. (१०) मघा नक्षत्रीं मृत्यु किंवा १॥ महिना, १ महिना किंवा ३० दिवस पीडा. (११) पूर्वा नक्षत्रीं मृत्यु किंवा वर्षभर, महिनाभर, १५ दिवस किंवा ६० दिवस पीडा. (१२) उत्तरा नक्षत्रीं आजारी पडल्यास २७ दिवस, १५ दिवस किंवा ७ दिवस पीडा. (१३) हस्त नक्षत्रीं मृत्यु किंवा ८, ९, ७ अथवा १५ दिवस पीडा. (१४) चित्रा नक्षत्रावर आजारी पडल्यास १५, ८, १० किंवा ११ दिवस पीडा. (१५) स्वाति नक्षत्रीं मृत्यु किंवा १, २, ३, ४ व ५ महिन्यांनीं किंवा १० दिवसांनीं रोगनाश. (१६) विशाखा नक्षत्रीं १ महिना, पंधरवडा, आठवडा किंवा २० दिवस पीडा. (१७) अनुराधा नक्षत्रीं १० किंवा २८ रात्री पीडा. (१८) ज्येष्ठा नक्षत्रीं मृत्यु किंवा एक पक्ष, मास किंवा २१ रात्रींपर्यंत पीडा. (१९) मूळ नक्षत्रावर रोग आल्यास मृत्यु किंवा एक पक्ष, ९ रात्री किंवा २० रात्रींपर्यंत पीडा. (२०) पूर्वाषाढा नक्षत्रीं मृत्यु किंवा २, ३, ६ महिन्यांनीं अथवा २० दिवस किंवा पक्ष यांच्या आंत रोगनाश. (२१) उत्तराषाढा नक्षत्रीं १॥ महिना, २० रात्रीं किंवा महिनाभर पीडा. (२२) श्रवण नक्षत्रीं २५–१०–११ किंवा ६० दिवस पीडा. (२३) धनिष्ठा नक्षत्रीं १० रात्री, पक्ष, मास किंवा तेरा रात्री पीडा. (२४) शततारका नक्षत्रीं १२ किंवा

११ दिवस पीडा. (२५) पूर्वाभाद्रपदा नक्षत्रीं मृत्यु किंवा २-३ महिने अथवा १० रात्री पीडा. (२६) उत्तराभाद्रपदा नक्षत्रीं १॥ महिना, पंधरवडा, आठवडा, किंवा १० दिवस पीडा. (२७) रेवती नक्षत्रावर ज्वरादि रोग उत्पन्न झाला असतां दहा दिवस किंवा २८ रात्री पीडा. जन्मनक्षत्र, जन्मराशी व आठवा चंद्र असतां रोग झाल्यास मृत्यु येईल. रवि इत्यादि वारीं क्रमानें मघा व द्वादशी, विशाखा व एकादशी, पंचमी व आर्द्रा, तृतीया व उत्तराषाढा, शततारका व षष्ठी, अष्टमी व अश्विनी; पूर्वाषाढा व नवमी असे वार, तिथि व नक्षत्र या तिहींचा योग असतां रोग उत्पन्न झाल्यास याचप्रमाणें रवि, चंद्र इत्यादि वारीं अनुराधा व भरणी, आर्द्रा व उत्तराषाढा, मघा व शततारका, विशाखा व अश्विनी; ज्येष्ठा व मृग; श्रवण व आश्लेषा, पूर्वाभाद्रपदा व हस्त, हीं असतां मृत्युयोग होतो. यासाठीं उक्त तिथि, वार व नक्षत्रें यांच्या शांति कराव्यात. ज्या नक्षत्रीं मरण सांगितलें आहे त्या नक्षत्राची शांति अवश्य करावी. अन्य नक्षत्राची करावी अथवा करूं नये.

अथसर्वनक्षत्रसाधारणःशान्तिप्रयोगः देशकालौसंकीर्त्यममोत्पन्नव्याधेर्जीवच्छरीराविरोधेनसमूलनाशार्थममुकनक्षत्रशान्तिंकरिष्यइतिसंकल्प्यगणेशपूजादि आचार्यंवृत्वाकुम्भोपरिपूर्णपात्रेद्वादशदलेनक्षत्रदेवताप्रतिमांसौवर्णींसंपूज्यद्वादशदलेषुसंकर्षणादिद्वादशमूर्तीर्द्वादशादित्यान्वासंपूज्यदूर्वासमित्तिलक्षीराज्यैर्गायत्र्यातत्तद्देवतायैअष्टोत्तरशतंहुत्वामरणादिपीडाधिक्येक्तौसहस्रंहुत्वादध्योदनबलिंदत्वाचार्यायगांप्रतिमांचदद्यादितिसंक्षेपःशान्तिमयूखादौनक्षत्रभेदेनहविर्मन्त्रबलिधूपादिभेदस्तिथिवारदेवतामन्त्रादिभेदइत्यादिविस्तरोद्रष्टव्यः कर्मविपाके जातवेदसइत्यृचोयुतंलक्षंवाजपोरुद्रेनमकानुवाकैःसहस्रकलशस्नानंवाविष्णौसहस्रावृत्तपुरुषसूक्तेनसहस्रघटस्नानंवाज्वरनाशकम् यद्वाश्रीभागवतस्थज्वरस्तोत्रजपः ॥

**नक्षत्रशांतिप्रयोग**—देशकालाचा उच्चार केल्यावर 'ममोत्पन्नव्याधे जीवच्छरीराविरोधेन समूलनाशार्थं अमुक नक्षत्रशांतिं करिष्ये' असा संकल्प करावा व गणपतिपूजादिक कर्म करावें. नंतर आचार्य पसंत करून कलशावर पूर्णपात्रांत बारा पांकळ्यावर नक्षत्रदेवतेच्या सुवर्णप्रतिमेची पूजा करून द्वादश दलांवर संकर्षणादि बारा मूर्ति किंवा बारा आदित्य यांची पूजा करावी व दूर्वा, समिधा, तिल, दुग्ध व आज्य यांनीं गायत्रीमंत्रानें त्या त्या देवतेस उद्देशून १०८ होम करावा. मरण इत्यादि बहुत पीडा होईल असें असल्यास त्यासाठीं हजार होम करून, दहींभाताचा बलि द्यावा व आचार्यास गोप्रदान व प्रतिमादान करावें, हें थोडक्यांत सांगितलें. नक्षत्रांच्या भेदानें होम-द्रव्यें, मंत्र, बलिदान धूपादिकांचे निरनिराळे प्रकार, तिथि, वार ह्यांच्या देवता व मंत्रादिकांचे निरनिराळे प्रकार, यांची पूर्ण माहिती हवी असल्यास ती शांतिमयूख इत्यादि ग्रंथांत पहावी. 'जातवेदसे०' या ऋचेचा दहा हजार किंवा एक लक्ष जप अथवा नमकानुवाकांनीं सहस्र कलशांनीं शिवास स्नान अथवा पुरुषसूक्ताच्या सहस्र आवर्तनांनीं सहस्र घटांनीं

विष्णूस स्नान घातलें असतां ज्वराचा नाश होतो, असें कर्मविपाकांत सांगितलें आहे. श्रीमद्भागवतांतील ज्वरस्तोत्राचा जप केल्यानेंही तापशान्ति होते.

अथसर्वरोगनाशकानि । रोगानुसारेणलघुरुद्रमहारुद्रातिरुद्राणांजपोभिषेकोवा विष्णुसहस्रनामस्तोत्रस्यशतंसहस्रमयुतंवाजपः सौरजपः सूर्यनमस्काराव्यदाना-निमुञ्चामित्वेतिसूक्तजपोऽच्युतानन्तगोविन्देतिनामत्रयजपोमृत्युंजयजपश्च-रोगानुसारेणेतिसर्वरोगहराणि ॥

**सर्वरोगनाशविधि**—रोग जसा लहान किंवा मोठा असेल त्याप्रमाणें—लघुरुद्र महारुद्र किंवा अतिरुद्र यांचा जप अथवा अभिषेक करावा. विष्णुसहस्रनामस्तोत्राचा शंभर, एक हजार किंवा दहा हजार जप करावा. अथवा सौराच्या 'उद्यन्नद्य०' या ऋचेचाच जप, सूर्याला नमस्कार व अर्घ्यप्रदान, 'मुञ्चामित्वा०' या सूक्ताचा जप, 'अच्युतानंदगोविंद०' या नामत्रयाचा जप व मृत्युंजयजप हे, रोग जसा लहानमोठा असेल त्याप्रमाणें सर्व रोग दूर करणारे आहेत.

ज्येष्ठामूलश्रुतिस्वातीमृदुक्षिप्रपुनर्वसौ । गुरुशुक्रेन्दुवारेषुशस्तंभेषजभक्षण-म् १ रिक्तायांचरलग्नेमिश्रक्षिप्रेन्द्रमूलपूर्वासु । चित्राभरणीश्रवणत्रयभेरविकुजबुधार्कजेस्नायात् २ वैधृतौचव्यतीपातेभद्रायांसंक्रमेतथा । रोगमुक्तस्नान-मत्रचन्द्रताराबलंनवा ॥ ३ ॥

**औषध घेण्यास व रोगमुक्तस्नानास मुहूर्त**—ज्येष्ठा, मूल, श्रवण, स्वाति, मृदु व क्षिप्र नक्षत्रें आणि पुनर्वसु नक्षत्र हीं असतां गुरु, शुक्र व सोम या वारीं औषध घेणें प्रशस्त होय. रिक्ता तिथि, चरलग्न, मिश्र व क्षिप्र संज्ञक नक्षत्रें, ज्येष्ठा, मूल, पूर्वात्रय, चित्रा, भरणी, श्रवण, धनिष्ठा व शततारका हीं नक्षत्रें असतां रवि, मंगळ, बुध व शनि या वारीं स्नान करावें. वैधृति, व्यतीपात, भद्रा व संक्रांत या दिवशीं चंद्रबल व ताराबल असलें किंवा नसले तरी रोगमुक्त स्नान करावें.

अथाभ्यङ्गः । भद्रासंक्रमपातवैधृतिसितेज्यार्कारषष्ठ्यादिषुश्राद्धाहे प्रतिपद्द्वये परिहरेद्धेतुंविनाभ्यञ्जनम् । माङ्गल्यंविजयोत्सवोब्दवदनंदीपावलीहेतवोभ्यङ्ग-स्याथबुधाम्बुपर्क्षेपितृभाभ्यङ्गात्पतिव्यङ्गना १ अथापवादः सार्षपंगन्धतैलं-चयत्तैलंपुष्पवासितम् । द्रव्यान्तरयुतंतैलंपक्वतैलंनदुष्यति १ किंचिद्वाघृतयुक्तं-वाविप्रपादरजोन्वितम् नित्याभ्यङ्गेचनोदुष्टंतैलंनिन्द्येह्निसर्वदा २ रवौपुष्पंगुरौ-दूर्वांभौमवारेचमृत्तिकाम् भार्गवेगोमयंक्षिप्त्वा तैलस्नानंसुखावहम् ॥ ३ ॥

**अभ्यंगनिषिद्धकाल**—भद्रा, संक्रांत, व्यतीपात, वैधृति, शुक्र, गुरु रवि, व मंगळ हे वार, षष्ठीपासून दशमीपर्यंत तिथि, श्राद्धदिवस, प्रतिपदा व द्वितीया, या काळीं कारणाशिवाय अभ्यंगस्नान करूं नये. विवाहादि मंगलकार्य, विजयादशमी, वर्षारंभ, दीपावलि ( दिवाळी ) हे अभ्यंग करण्याचेच दिवस असल्यामुळें या दिवशीं अभ्यंगस्नान करावें. बुधवार व शततारका आणि

मघा हीं नक्षत्रें असतां, स्त्री जर अभ्यंगस्नान करील तर पतीचा नाश करणारी होईल. यास अपवाद सांगतोः—मोहरीचें तेल, सुगंधी तेल, पुष्पांनीं सुवासिक केलेलें, कढविलेलें, गाईच्या तुपानें युक्त असलेलें किंवा ब्राह्मणाच्या पदरजांनीं युक्त असलेलें तेल याचा अभ्यंग निषिद्ध दिवशीं केला असतां दोष नाहीं. नित्य अभ्यंग करणारांस दोष नाहीं. रविवारीं पुष्प, गुरुवारीं दूर्वा, मंगळवारीं माती व शुक्रवारीं गाईचें शेण तेलांत टाकून निषिद्ध दिवशीं त्या तेलाच्या अभ्यंगानें स्नान केलें असतां सुखावह होतें.

गृहारम्भः । वैशाखेफाल्गुनेपौषेश्रावणेमार्गशीर्षके । गृहारम्भप्रवेशौस्तः-स्तम्भोच्छ्रायश्वशस्यते ॥ १ ॥ ज्येष्ठकार्तिकमाघांश्वशुभदान्प्राहनारदः । तृणगेहंसर्वमासेपौषेमुख्यगृहंनहि ॥ २ ॥ हस्तत्रयध्रुवमृदुधनिष्ठाद्वयपुष्यभे । रिक्ताअर्ककुजौत्यक्त्वागृहंकुर्याद्विशेदपि ॥ ३ ॥ शिलान्यासंचखातंचश्रुत्यश्विक्रूरमित्रभैः आश्लेषामूलपुष्यार्कमृगान्त्यध्रुवभैरपि ॥ ४ ॥ केन्द्राष्टमेपापहीनेवेश्मकृत्यंस्थिरोदये । धनिष्ठापञ्चकेवर्ज्यःस्तम्भोच्छ्रायःसदाबुधैः ॥ ५ ॥ नेष्टानि सप्तसूर्यर्क्षादिष्टान्येकादशाष्टमात् । दशशिष्टानिनेष्टानिचक्रेस्युर्वृषवास्तुनि ॥ ६ ॥ यद्वातुर्यात्पश्वदशात्त्रयोविंशतिसंख्यकात् । वेदाब्धिपश्चनेष्टानिगृहारम्भप्रवेशयोः ॥ ७ ॥ स्नानपाकस्वापवस्त्रभुजीनांपशुकोशयोः देवानांचगृहान्कुर्यात्पूर्वादौमुख्यवेश्मनः ॥ ८ ॥ उदग्दिशंध्रुवमुखाज्ज्ञात्वाप्राचीं-प्रसाधयेत् । कोणाध्वभ्रमकूपद्वाःपङ्कस्तम्भद्रुमामरैः ॥ ९ ॥ विद्धाद्दुष्टाद्वार्नदोषोगृहोच्चद्विगुणान्तरे । सूत्रंभित्तिशिलान्यासंस्तम्भस्यारोपणंतथा ॥ १० ॥ आग्नेयींदिशमारभ्यकुर्यादित्याहकश्यपः । अन्यवेश्मस्थितंदारुनान्यवेश्मनियोजयेत् ॥ ११ ॥ नूतनेनूतनंकाष्ठंजीर्णेजीर्णंप्रशस्यते । द्वात्रिंशाधिकहस्तेष्चतृणागारेचतुर्मुखे ॥ १२ ॥ नतत्रचिन्तयेद्धीमान्गुणानायव्ययादिकान् ।

**गृहारंभमुहूर्त**—वैशाख, फाल्गुन, पौष, श्रावण व मार्गशीर्ष या महिन्यांत घर बांधण्याचा आरंभ करणें, प्रवेश करणें व तसेंच खांब उभा करणें हीं शुभकारक होत. ज्येष्ठ, कार्तिक व माघ हे महिने गृहकर्मास शुभप्रद आहेत, असें नारद म्हणतात. गवताचें झोपडें ( तृणगृह ) हव्या त्या महिन्यांत बांधावें. पौष महिन्यांत मुख्य घर बांधूं नये. हस्त, चित्रा, स्वाति, ध्रुव, मृदु संज्ञक नक्षत्रें, धनिष्ठा, शततारका व पुष्य हीं नक्षत्रें असतां रिक्तातिथि, रविवार व मंगळवार वर्ज्य करून घर ( बांधण्याला ) आरंभ करावा व गृहप्रवेशही ( यांवर ) करावा. श्रवण, अश्विनी, क्रूरसंज्ञक, अनुराधा, आश्लेषा, मूळ, पुष्य, हस्त, मृग, रेवती व ध्रुव या नक्षत्रांवर शिलान्यास (पायाचा मुहूर्त करणें) व खात ( विहीर, खंदक वगैरे ) हीं करावीत. केंद्रांत व अष्टमस्थानीं पापग्रह नसतां स्थिरलग्नावर गृहकृत्य करावें. धनिष्ठापंचक असतांना घराचा खांब शहाण्यानें पुरूं नये. सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत नक्षत्रें मोजिलीं असतां पहिलीं ७ नक्षत्रें अशुभ, ८ ते ११ शुभ व बाकीचीं १० नक्षत्रें अशुभ. याप्रमाणें वृषवास्तुचक्र पाहून शुभनक्षत्रीं घर बांधण्यास आरंभ

करावा; किंवा चौथ्या, पंधराव्या व तेविसाव्या नक्षत्रापासून क्रमानें ४।४।५ हीं नक्षत्रें गृहस्तंभ व गृहप्रवेश यांस अशुभकारक होत. मुख्य घराच्या पूर्व दिशेकडे स्नानगृह (न्हाणीघर) पाकगृह (सैंपाकघर) भांडारगृह (द्रव्य ठेवण्याची जागा), देवगृह (देवघर) या जागा बांधाव्या. ध्रुवमुखावरून उत्तर दिशा जाणून पूर्व दिशा साधावी. कोण, मार्ग, घरट, कुलालचक्रादियंत्र (कुंभाराचें चाक), विहीर, द्वार, चिखल, खांब, वृक्ष व देव यांच्या समोरासमोर असलेलें गृहद्वार दुष्ट होय. पण घराच्या उंचीच्या दुपटीनें कोणादिकांचें अंतर असल्यास हा दोष नाहीं. सूत्रन्यास (मोजणी), भिंतीचा आरंभ, शिलान्यास व खांब पुरणें यांचा आरंभ आग्नेय दिशेपासून करावा असें कश्यप म्हणतात. एका घराला लाविलेलें लांकूड दुसऱ्या घराला लावूं नये. नवीन घरास नवीन व जुन्या घरास जुनीं लांकडें प्रशस्त होत. ३२ हातांपेक्षां अधिक मोठें घर, चार दारांचें घर व गवती घर हीं बांधायचीं असतां शहाण्यानें आयव्ययादि, (जमाखर्चाचा) गुणांचा विचार करूं नये.

**अथगृहप्रवेशः। वास्तुपूजाविधिः कार्यःपूर्वमेवप्रवेशतः। मैत्रध्रुवक्षिप्रचरमूलभैर्धनपुत्रकृत् ॥ १ ॥ वास्तुशान्तिप्रयोगोन्यतोज्ञेयः वास्तुशान्तिर्दिवैवोक्ताप्रवेशस्तुनिशिक्वचित्। गृहप्रवेशः प्रारम्भोदितमासादिकैःशुभः ॥ १ ॥ क्वचिन्माघोर्जशुक्रेषुकैश्विदुक्तोमृदुध्रुवे । श्रेष्ठःक्षिप्रैश्चरैर्मध्योनिन्द्यस्तीक्ष्णोग्रमिश्रभैः ॥ २ ॥ त्रिषडायेखलैःसद्भिःषडष्टव्ययवर्जितैः। शुद्धेम्बुरन्ध्रेचखनौविजनुर्लग्नभाष्टमे ॥ ३ ॥ ऋक्षाणिपञ्चसूर्यर्क्षान्नेष्टान्यष्टचतुर्दशात। शेषभानिशुभान्येवंप्रवेशेघटचक्रकम् ॥ ४ ॥ इतिवास्तुप्रकरणम् ॥**

**गृहप्रवेश व वास्तुशान्ति**—नवीन घरांत प्रवेश करण्यापूर्वीं मैत्र, ध्रुव, क्षिप्र व चरसंज्ञक नक्षत्रीं व मूल नक्षत्रीं वास्तुशांति केली असतां धन पुत्र व प्राप्त होतात. वास्तुशांतीचा प्रयोग इतर ग्रंथांत पहावा. वास्तुशांति दिवसा करणें प्रशस्त आहे. पण गृहप्रवेश रात्रीं करावा, असें कित्येक ग्रंथांत म्हटलें आहे. उक्त महिने व नक्षत्रें यांवर गृहप्रवेश केला असतां शुभप्रद होय. कित्येक ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, माघ, कार्तिक व ज्येष्ठ या महिन्यांत मृदु व ध्रुव या नांवांचीं नक्षत्रें असतां गृहप्रवेश करणें फार उत्तम. क्षिप्र व चर या नक्षत्रीं केलेला गृहप्रवेश मध्यम असून, तीक्ष्ण, उग्र व मिश्र या नक्षत्रीं केलेला गृहप्रवेश निंद्य होय. ज्या लग्नीं गृहप्रवेश करावयाचा असेल त्या लग्नापासून तिसऱ्या, अकराव्या व सहाव्या स्थानीं पापग्रह असल्यास (तो काळ) शुभकारक होय. सहाव्या, आठव्या व बाराव्या स्थानीं शुभग्रह असूं नयेत. चौथ्या व आठव्या स्थानीं कोणताही ग्रह असूं नये. जन्मलग्न व जन्मराशी यांपासून आठवें लग्न नसावें. सूर्य नक्षत्रापासून पांच नक्षत्रें व चौदाव्या नक्षत्रापासून आठ नक्षत्रें म्हणजे १।२।३।४।५ १४।१५।१६।१७।१८।१९।२०।२१ हीं नक्षत्रें अशुभ होत. बाकीचीं नक्षत्रें गृहप्रवेशास शुभ आहेत. यांस 'कलशचक्र' असें म्हणतात. याप्रमाणें वास्तुप्रकरण सांगितलें.

अथधनाद्यर्थगमनम् । श्रुतिद्वयाश्विपुष्यान्त्यानुराधामृगहस्तभे । पुनर्वसौ-गोचरेष्टप्रदवारेव्रजेन्नरः ॥ १ ॥ अभिजिद्गमेश्रेष्ठंदक्षिणाशांविनाक्षणः मघा-चित्राद्वयाश्लेषाभरण्यार्द्राःसकृत्तिकाः ॥ २ ॥ पूर्वाभाद्राचनेष्टाःस्युःप्रयाणे-जन्मभंतथा । त्यजेद्रिक्तांपर्वषष्ठचष्टमीद्वादशिकास्तिथीः ॥ ३ ॥ कृत्तिका-भरणीपूर्वामघानांघाटिकाक्रमात् । एकविंशतिसप्ताथषोडशैकादशत्यजेत् ॥४॥ ज्येष्ठाश्लेषाविशाखासुस्वात्यांचापिचतुर्दश । भृगोर्मतेसंकटेऽतिसर्वांस्वातीं-मघांत्यजेत् ॥ ५ ॥ भरण्याः पूर्वमर्धंचचित्राश्लेषांतकोत्तरम् ॥

**द्रव्य मिळविण्यास जाण्यास मुहूर्त**—श्रवण, धनिष्ठा, अश्विनी, पुष्य, रेवती, अनुराधा, मृग, हस्त, पुनर्वसु हीं नक्षत्रें असतां व गोचरी शुभफल देणाऱ्या ग्रहांचे वारीं घराबाहेर जावें. दक्षिण दिशेशिवाय अभिजित् नक्षत्र व अभिजिन्मुहूर्त प्रयाणास शुभ होय. मघा, चित्रा, स्वाति, विशाखा, आश्लेषा, भरणी, आर्द्रा, कृत्तिका, पूर्वाभाद्रपदा व जन्मनक्षत्र हीं प्रयाणास अशुभ होत. रिक्तातिथी, पर्वणी, षष्ठी, अष्टमी, द्वादशी ह्या तिथी वर्ज्य कराव्या. तसेंच कृत्तिका, भरणी, तीन पूर्वा व मघा ह्या नक्षत्रांच्या क्रमानें पहिल्या २१।७।१६ व ११ घटका सोडाव्या. ज्येष्ठा, आश्लेषा, विशाखा व स्वाति ह्या नक्षत्रां-च्या १४।१४ घटिका टाकाव्या. भृगूच्या मतानें स्वाति व मघा हीं नक्षत्रें सर्वच टाकावीं. स्वाति, मघा व कृत्तिका यांचा पूर्वार्ध व चित्रा, आश्लेषा आणि भरणी यांचा उत्तरार्ध सोडावा.

वारशूलः । सोमशशीप्राच्यामीज्यस्तुदक्षिणे ६ रविशुक्रौप्रतीच्यांस्यादुदी-च्यांबुधमङ्गलौ । पूर्वादिदिक्षुमेषाद्याःक्रमात्त्रिश्चन्द्रराशयः ७ संमुखोदक्षि-णोऽब्जःसन्पृष्टेवामेऽतिनिन्दितः । दिशियत्रोदेतिशुक्रस्तांदिशंनव्रजेन्नरः ८ नव्रजेत्संमुखेज्ञेपिशुभंपृष्ठोपिवामतः रेवतीमेषगेचन्द्रेशुक्रान्ध्यात्संमुखंव्रजेत् ॥

**वारशूल**—सोमवारीं व शनिवारीं पूर्वेस, गुरुवारीं दक्षिणेस, रविवारीं व शुक्रवारीं पश्चिमेस आणि बुधवारीं व मंगळवारीं उत्तरेस प्रयाण करूं नये. पूर्वादि दिशांत क्रमानें मेषादिक चंद्रराशि तीन वेळ मोजून चंद्र सन्मुख किंवा दक्षिणेकडे आल्यास शुभ, व पाठीमागें किंवा डाव्या हाताला निंद्य जाणावा. ज्या दिशेस शुक्र उदयास येत असेल त्या दिशेस प्रयाण करू नये. बुध सन्मुख असतां प्रयाण करूं नये. पण पाठीवर व डावीकडे बुध असल्यास शुभ जाणावा. रेवतीनक्षत्रीं व मेष राशीस चंद्र असतां शुक्र अंध होतो म्हणून शुक्राच्या तोंडाकडे प्रयाण करणें शुभ-कारक होय.

प्रयाणेशुभाःकेन्द्र १।४।७।१० कोणेषु ९।५ प्रशस्ताःखलास्त्र्यायषट्खेष्व ३।११।६।१० निष्टःशनिःखे १० कविःसप्तमे ७ ग्लौःषडष्टान्त्यलग्ने ६।८।१२।१ विलग्नेश्वरोप्यस्तषष्टाष्टमान्त्ये ७।६।८।१२ ॥ १ ॥ केन्द्रेवक्रीवक्रिवर्गोलग्नेवार श्ववक्रिणः । कुम्भःकुम्भःनवांशश्चलग्नेत्याज्याःप्रयत्नतः ॥ २ ॥ मीनलग्नेतदं-शेवायातुर्मार्गोऽतिदुःखदः । शत्रुलग्नभूतःषष्ठंतत्पतिर्नामृतिप्रदः ॥ ३ ॥ शत्रु-

क्षेत्रेतदंशेवातद्दृष्टेगमनंनसत् । लग्नेस्तंगतराशिश्चजन्मराशिश्चनोशुभः ॥ ४॥
शशीवर्गोत्तमेलग्नेवर्गोत्तमयुतेजयः ॥

**प्रयाणास लग्नशुद्धि**—ज्या लग्नीं प्रयाण करावयाचें असेल त्या लग्नापासून १।४।७।१०।९ व ५ या स्थानीं असलेले शुभग्रह इष्ट होत. ३।११।६।१० या स्थानीं असलेले पापग्रह अशुभ होत. दहावा शनि व सातवा शुक्र हे अनिष्ट होत. ६।८।१२।१ या स्थानीं असलेला चंद्र अशुभ होय. यात्रा लग्न ५ स्वामी ७।६।८ व १२ या स्थानीं अशुभ होय. लग्नीं वक्री ग्रहाचा वर्ग, वक्री ग्रहाचा वार, कुंभलग्न व कुंभलग्नाचा नवांश हे प्रयाणलग्नीं प्रयत्नानें वर्ज्यावेत. मीन-लग्नावर किंवा मीनांशांत प्रयाण करणाराचा प्रवास अत्यंत दुःखदायक होतो. आपल्या लग्नापासून किंवा जन्मराशीपासून ६ वी राशी अथवा तिचा स्वामी हे मृत्यु देणारे होत. शत्रुगृहीं किंवा त्याच्या अंशीं त्याची दृष्टि असतां प्रयाण करणें शुभकारक नाहीं. अस्तंगतराशी व जन्मराशी लग्नीं शुभ नाहीं. वर्गोत्तमीं व वर्गोत्तमयुक्त लग्नीं चंद्र असल्यास जय प्राप्त होतो.

शुक्लादितिथिवारर्क्षयोगोऽश्वैरष्टभिस्त्रिभिः ५ त्रिस्थस्तष्टोवशिष्टश्चेत्सर्वा-ङ्कःसार्वकामिकः । त्रिषुक्रमाद्भवेच्छून्यंदुःखदारिद्र्यमृत्युदम् ६ यद्येकस्मिन्नेव-दिनेपुराद्गच्छेत्पुरान्तरम् । प्रावेशिकीकालशुद्धिस्तदाज्ञेयानयात्रिकी ७ प्रवे-शान्निर्गमोनेष्टःप्रवेशोनिर्गमादपि । जिष्णोःकदापिनवमेधिष्ण्येवारेतिथौतथा ८ याम्यादिग्गमनंशय्यावितानंछादनंगृहे । नकुम्भमीनगेचन्द्रेतृणकाष्ठस्यसं-ग्रहः ९ तर्पिताग्निसुहृद्विप्रभार्यादिस्तृप्तिमान्व्रजेत् । स्वकीयांपरकीयांवास्त्रियं-पुरुषमेववा १० ताडयित्वातुयोगच्छेद्ब्राह्मणानवमान्यच । व्याधितःक्षुधितो-वाऽपितदन्तंतस्यजीवितम् ॥

**प्रयाणास शुभाशुभमुहूर्त**—शुक्लपक्षापासून तिथी, वार व नक्षत्रें मोजून त्यांची बेरीज केल्यावर तिला ७।८ व ३ या अंकांनीं भागिलें असतां त्या सर्वांचा जर शेष अंक राहील तर तो सर्व काम देणारा होतो. तिन्हीही वेळीं जर शेष शून्य राहिलें तर क्रमानें दुःख, दारिद्र्य व मृत्यु देणारें होतें. एका-च दिवशीं एका नगरांतून दुसऱ्या नगरांत प्रयाण केल्यास प्रवेशकालाची शुद्धि पहावी. प्रयाणकालाची शुद्धि पाहण्याचें कारण नाहीं. जय इच्छिणाऱ्या पुरुषानें प्रयाणदिवसा-पासून ९ व्या वारीं, ९ व्या तिथीस, ९ व्या नक्षत्रीं स्वगृहीं प्रवेश करूं नये व प्रवेश केल्या दिवसापासून ९ व्या वारीं ९ व्या तिथीस व ९ व्या नक्षत्रीं प्रयाण करूं नये. कुंभ व मीन राशीस चंद्र असतां दक्षिणेस गमन, माचा, पलंगडी अगर बाज विणणें व गवत आणि लांकडें यांचा संग्रह हीं कामें करूं नयेत. अग्नि, मित्र, ब्राह्मण व स्त्री यांची तृप्ति करून स्वतः तृप्त होऊन प्रयाण करावें. स्वस्त्रीस, परस्त्रीस किंवा पुरुषास हाणमार करून, ब्राह्मणांचा अपमान करून किंवा रोगग्रस्त व क्षुधित असतांना प्रयाण करील तर मरण येईल.

क्रोधंक्षौरंतथावान्तितैलाभ्यङ्गाश्रुमोचनम् । मद्यंमांसंगुडंतैलंसितान्यति-लकंतथा १२ श्वेतभिन्नंचवसनंप्रयाणेपरिवर्जयेत् । क्षौरंपंचदिनदुग्धंत्रिदिनं सप्तरात्रकम् । मैथुनंचापरंतैलंमध्वाज्यंतद्दिनेत्यजेत् । स्त्र्यार्तवंबीजदानान्तंतथा-कुशकुनांस्त्यजेत् १४ सुमुहूर्तेस्वयंगमनासंभवेप्रस्थानंकार्यम् प्रस्थानंनामाभीष्ट-वस्तुचालनम् यज्ञोपवीतकंशस्त्रंमधुचस्थापयेत्फलम् विप्रादिः क्रमतःसर्वैः स्वर्णधान्याम्बरादिकम् १ राजादशाहंपञ्चाहमन्योनप्रस्थितोवसेत् । स्वयंगम-नाद्वस्तुस्थापनाख्यप्रस्थानेर्धफलम् ॥

**प्रयाणकाळचे नियम**—प्रयाणकाळीं क्रोध, श्मश्रुकर्म, वांति, तैलाभ्यंग, अश्रुपात, मद्य, मांस, गुड, तैल, श्वेततिलकाशिवाय इतर तिलक व श्वेतभिन्न वस्त्र हीं वर्जावीत. प्रयाणाच्या दिवसापूर्वी श्मश्रुकर्म पांच दिवस, दूध तीन दिवस, मैथुन ७ रात्रीं व मध, तेल आणि घृत हीं प्रयाणाच्या दिवशीं वर्ज करावीत. संभोगदानापर्यंतचा स्त्रियेचा विटाळशीपणा व इतर दुष्ट शकुन हे प्रयाणास वर्ज्य करावेत. सुमुहूर्तावर स्वतः जाणें अशक्य असेल तर प्रस्थान करावें. इष्ट वस्तु दुसऱ्या स्थलीं नेऊन ठेवणें यास प्रस्थान असें म्हणतात. ब्राह्मणानें यज्ञोपवीत, क्षत्रियानें आयुध, वैश्यानें मध व शूद्रानें फल हीं गमनमुहूर्तीं दुसऱ्याच्या घरीं नेऊन ठेवावीत. सुवर्ण, धान्य, वस्त्र इत्यादि सर्वांनीं ठेवावीत. प्रस्थान केल्यावर राजानें दहा दिवस व इतरांनीं पांच दिवस घरीं रहावें. यापेक्षां अधिक दिवस राहू नये. स्वतः प्रयाण करण्या-ऐवजीं यज्ञोपवीतादि वस्तु बाहेर नेऊन ठेविल्या असतां, म्हणजे प्रस्थान केलें असतां शुभकालीं प्रयाण करण्यानें मिळणाऱ्या फलाचें अर्धें फल मिळतें.

प्रस्थानदेशावधिः । गेहाद्गेहान्तरंगर्गःसीम्नःसीमान्तरंभृगुः । बाणक्षेपंभर-द्वाजोवसिष्ठोनगराद्बहिः १ प्रस्थानेपिकृतेनेयान्महादोषान्वितेदिने । प्रस्थान-दिनेपिक्रोधादिकंवर्जयेत् शकुनापशकुनप्रपञ्चोऽन्यत्र इतियात्राप्रकरणम् ॥

**प्रस्थानमर्यादा**—आपल्या घराहून दुसऱ्याचे घरीं जावें असें गर्गाचें मत आहे. सीमा उल्लंघून दुसऱ्या सीमेंत जावें असें भृगूचें मत आहे. बाण सोडला असतां जितका लांब जाईल तितकें जावें असें भरद्वाजाचें मत आहे. नगराच्या बाहेर जावें असें वसिष्ठाचें मत आहे. प्रस्थान केलें असलें तरी महादोष-युक्त दिवशीं प्रयाण करूं नये. प्रस्थान करण्याच्या दिवशींही क्रोधादिक गोष्टी वर्ज्य कराव्यात. शुभ शकुन व अपशकुन यांचा विस्तार दुसऱ्या ग्रंथांत पहावा. येथें यात्रा-प्रकरण संपलें.

अथगोचरप्रकरणम् । जन्मराशेःक्रूरचन्द्रास्त्रिषट्दशमगाःशुभाः सप्ताद्यग-श्चापिचन्द्रःशुक्रेद्विनवपञ्चसु १ बुधोव्यन्त्यसमे २ । ४ । ६ । ८ । १० । जीवोद्विपञ्चनवसप्तसु । जन्मादिपञ्चसुतथानवाष्टद्वादशेभृगुः २ एकादशेसर्व-खेटाःशुभाःस्युरितिसंग्रहः । जन्मसंपद्विपत्क्षेमंप्रत्यरिःसाधिकावधः । मैत्राति-मैत्राःस्युस्ताराश्रिरावृत्त्यास्वजन्मभात् १ क्रमतःसूर्यादिबलंनृपदर्शनसर्वकार्य-युद्धेषु । शास्त्रकरग्रहयात्रादीक्षासूद्वंविशेषेण २ अनिष्टसूर्यादीनांदानानि द्वितीयपरिच्छेदान्ते ॥

**गोचरप्रकरण**—जन्मराशीपासून पापग्रह व चंद्र ३।६।१० या स्थानीं शुभ, ७ व १ या स्थानीं असलेला चंद्रही शुभ होय. शुक्लपक्षांत २।९ व ५ या स्थानीं चंद्र शुभ होय. २।४।६।८ व १० या स्थानीं बुध, २।५।९।७ या स्थानीं गुरु व १।२।३।४।५।९।८ व १२ या स्थानीं शुक्र शुभ होय. एकादश स्थानीं सर्वच ग्रह शुभ होत. जन्मनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापर्यंत त्रिदावृत्तीनें (तीन टाकून एक) नक्षत्रें मोजिलीं असतां ९।९ नक्षत्रांस जन्म, संपत्, विपत्, क्षेम, प्रत्यरि, साधिका वध, मैत्र व अतिमैत्र अशीं नांवें येतात. क्रमानें सूर्यादि ग्रहांचें बल पहावें. राजदर्शनास रविबल, सर्व कृत्यांस चंद्रबल, युद्धास भौमबल, शास्त्राभ्यासास बुधबल, विवाहास गुरुबल, प्रयाणास शुक्रबल व मंत्रदीक्षेस शनिबल याप्रमाणें मुख्यत्वें त्या त्या ग्रहाचें बल पाहून तें तें कार्य करावें. सूर्यादि अनिष्ट ग्रहांचीं दानें दुसऱ्या परिच्छेदाच्या शेवटीं सांगितलींच आहेत.

अथपल्लीसरठफलम् । दक्षांगोदरनाभिहृत्सुपतितापल्लीवरांगेहनुंमुक्त्वानुः शुभदास्त्रियाःफलमिदंवामेतरव्यत्ययात् । इत्याहुःसरठप्ररोहणफलंपातेऽन्यथैकेवृथापल्ल्यारोहणकेऽपिवस्त्रसहितंस्नात्वाचरेच्छान्तिकम् ॥ १ ॥

**पल्लीसरठपतनफल**—पुरुषाचें उजवें अंग, पोट, बेंबी, ऊर व डोकें यांजवर पाल पडली असतां शुभ फल मिळतें. हनुवटीवर पडली असतां शुभदायक नाहीं. स्त्रीच्या डाव्या अंगावर पाल पडली असतां शुभफल मिळतें. सरडा अंगावर चढला असतांही हेंच फळ जाणावें. पाल अंगावर चढली असतां व सरडा अंगावर पडला असतां वाईट फल मिळतें. पल्ली–सरठांचे आरोहणपतनीं शुभाशुभ फल व्यर्थ (नाहीं) असें कित्येक म्हणतात. पाल व सरडा हीं अंगावर चढलीं किंवा पडलीं असतां सचैल स्नान करून शांति करावी.

अथपल्लीसरठशान्तिः । तयोःस्पर्शमात्रेस्नानंकृत्वापञ्चगव्यंप्राश्याज्यमवलोक्याशुभनाशार्थंशुभवृद्ध्यर्थंवाशान्तिःकार्या पल्ल्याः सरठस्यवाहेम्नाप्रतिमांकृत्वारक्तवस्त्रेणसंवेष्टयसंपूज्यकलशेरुद्रंसंपूज्यमृत्युंजयमन्त्रेणखादिरसमिद्भिरष्टोत्तरशतंतिलैर्व्याहृतिभिरष्टोत्तरसहस्रंशतंवाहुत्वास्विष्टकृदाद्यभिषेकान्तेस्वर्णवस्त्रतिलदानम् ॥

**पल्लीसरठशान्ति**—पाल व सरडा यांचा स्पर्श होतांक्षणींच स्नान करून पंचगव्य प्राशन करावें व तुपांत तोंड पाहून अशुभनाशार्थ व शुभवृद्ध्यर्थ शांति करावी. पालीची किंवा सरड्याची सुवर्णप्रतिमा करून तिची लाल वस्त्र गुंडाळून पूजा करावी. कलशावर रुद्राची पूजा करून मृत्युंजयमंत्रानें खदिर (खैराच्या) समिधांचा १०८, व्याहृतिमंत्रांनीं तिलाचा १००८ किंवा शंभर होम करून स्विष्टकृतापासून अभिषेकापर्यंत कर्म करावें व सुवर्ण, वस्त्र तिल यांचीं दानें करावींत.

अथकपोतप्रवेशमधुवल्मीकोत्पत्तिपिङ्गलास्वरकाकवैकृतग्राम्यारण्यादिमृगपक्षिविकारेशान्तिः देवाः कपोतइतिपञ्चर्चंसूक्तंसहस्रंशतंवाजपित्वा यतइंद्रभयामहेस्वस्तिदाविशस्त्र्यम्बकमितिमन्त्रैर्हुत्वाव्याहृतिभिरष्टोत्तरशतंतिलहोमं-

कुर्यात् अथवापञ्चविप्रैः क्रमेणदेवाःकपोतइतिसूक्तंसुदेवोअसीत्यृचंकनिक्रद्-दितिशाकुन्तसूक्तंनमोब्रह्मणेनमोऽइतिमन्त्रंचसहस्रादिसंख्ययाजप्त्वोपनिषदश्च-पठित्वाव्याहृतिभिस्तिलहोमंकुर्यात् ॥

**दुष्टपक्षिगृहप्रवेशशान्ति**—कपोत म्हणजे पारवा घरांत शिरला असतां, मध-माशांचें मोहोळ किंवा वारूळ घरांत झालें असतां, पिंगळ्याचा शब्द, काकवैकृत ग्राम्य व अरण्यक इत्यादि मृगपक्ष्यांचा विकार असतां शांति करावी. 'देवाःकपोत०'—या पांच ऋचांचे सूक्ताचा हजार किंवा शंभर जप केल्यावर 'यत इंद्रभयामहे०' व 'स्वस्तिदाविशस्त्र्यंबक०' या मंत्रांनीं होम करावा आणि व्याहृतिमंत्रानें एकशें आठ तिलहोम करावा. अथवा पांच ब्राह्मणांकडून क्रमानें "देवाःकपोत०" हें सूक्त, "सुदेवो असि०" ही ऋचा, 'कनिक्रंदत्०' हें शाकुंतल-सूक्त व 'नमो ब्रह्मणे नमो अग्नये०' हा मंत्र यांच्या सहस्रादिसंख्येनें जप करून उप-निषदांचें पठण करावें व व्याहृतिमंत्रांनीं तिलांचा होम करावा.

अथकाकस्पर्शमैथुनदर्शनादिशान्तिः संकल्पाग्निप्रतिष्ठापनान्तेकुम्भेसौवर्ण-मिंद्रंलोकपालांश्चसंपूज्याग्नौचरुंश्रपयित्वापलाशसमिच्चर्वाज्यव्रीहिभिःप्रत्येक-मष्टोत्तरसहस्रंशतंवा यतइन्द्रेतिमन्त्रेणहुत्वालोकपालेभ्यस्तैरेद्रव्यैर्दशकृत्वोहुत्वा लोकपालबलिंकुम्भाग्रेवायसेभ्योबलिमैन्द्रवारुणेतिमन्त्रेणदत्वायजमानोभिषे-कान्तेशतंदशवाविप्रान्भोजयेत् घरट्टोलूखलमुसलदृषदासनमञ्चकादेरकस्मात्स्फो-टनेघृतोक्तमधुयुताश्वत्थसमिधःप्रजापतयेहुत्वागायत्र्याष्टोत्तरसहस्रेणाभिमन्त्रयेत्

**काकस्पर्शमैथुनदर्शनादिकांची शान्ति**—संकल्प व अग्निस्थापन इतकें कर्म झाल्यावर कलशावर सुवर्ण-मय इंद्राची व लोकपालांची पूजा करावी. नंतर अग्नीवर भात शिजवून पळ-साच्या समिधा, चरु, तूप व व्रीहि (देवभात) या प्रत्येक द्रव्याचा एक हजार आठ किंवा १०० 'यतइंद्र०' या मंत्रानें होम करावा. व लोकपालदेवतांस उद्देशून त्याच द्रव्याच्या १०।१० आहुतींनीं होम करून, कुंभाच्या पुढें लोकपालांना व कावळ्याला 'ऐंद्रवारुण०' या मंत्रानें बलिप्रदान करावें. व अभिषेकानंतर यज-मानानें १०० किंवा दहा ब्राह्मणांस भोजन घालावें. दळण, उखळ, मुसळ, पाटा, वरवंटा, आसन, पाट, मंचक, इत्यादिक एकाएकीं फुटल्यास तुपांत भिजविलेल्या व मध माखलेल्या पिंपळाच्या समिधांचा प्रजापतीस उद्देशून होम करावा. आणि १००८ गायत्रीमंत्रानें अभिमंत्रण करावें.

नानाविधदिव्यभौमान्तरिक्षोत्पातेषुशांतिः। संकल्पादिकृत्वकुम्भेइन्द्ररुद्रौ-संपूज्ययतइन्द्रस्वस्तिदाविशस्पतिःअघोरेभ्योथेतिमन्त्रैःसमिदाज्यचरुव्रीहितिला-न्प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतंहुत्वाव्याहृतिभिःकोटिहोमंलक्षहोममयुतहोमंतत्पादहोमं-वातिलैर्वित्तानुसारेणनिमित्तानुसारेणचसप्तरात्रंत्रिरात्रमेकरात्रं वाकृत्वासूर्य-गणेशक्षेत्रपालदुर्गामन्त्राणांजपंकृत्वापायसादिनाब्राह्मणभोजनं कार्यम् यद्वा-चण्डीसप्तशतीजपः अथवारुद्रैर्जपोभिषेकोवा अश्वत्थप्रदक्षिणाशिवपूजागो-विप्रपूजादिवेतिनानोत्पातसामान्यशान्तयः ॥

**उत्पातशान्ति**—नानाप्रकारचे अलौकिक, पृथ्वीवरचे व आकाशांतले उत्पात झाले असतां संकल्पादिक करून कलशावर इंद्र व रुद्र यांची पूजा करावी. नंतर 'यतइंद्र० । स्वस्तिदाविशस्पतिः० । अघोरेभ्योथ०' या मंत्रांनीं समिधा, आज्य, चरु, व्रीहि व तिळ या प्रत्येक द्रव्याचा १००८ होम करावा. व्याहृतिमंत्रांनीं तिळांचा कोटिहोम, लक्षहोम, अयुतहोम, अथवा त्याचा चतुर्थांश म्हणजे २५०० होम द्रव्यशक्ति असेल त्याप्रमाणें व लहानमोठें निमित्त असेल त्याप्रमाणें सात रात्री, तीन रात्री किंवा एक रात्र करून—सूर्य, गणेश, क्षेत्रपाल व दुर्गा यांच्या मंत्रांचा जप करावा आणि पायसादिकानें ब्राह्मणभोजन घालावें अथवा चंडी सप्तशतीचा जप करावा; किंवा रुद्राचा जप, अथवा अभिषेक हीं करावींत. अथवा अश्वत्थाला प्रदक्षिणा, शिवपूजा, गाईब्राह्मणांची पूजा इत्यादिक गोष्टी कराव्या. याप्रमाणें नानाप्रकारच्या उत्पातांच्या शांति सामान्यतः आहेत.

अथगायत्रीपुरश्चरणप्रयोगः देशकालौसंकीर्त्यकरिष्यमाणगायत्रीपुरश्चरणेऽधिकारसिद्ध्यर्थंकृच्छ्रत्रयममुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्येइतिसंकल्प्यहोमादिप्रत्याम्नायविधिनाकृच्छ्राण्यनुष्ठायामुकशर्मणोममगायत्रीपुरश्चरणेऽनेनकृच्छ्रत्रयानुष्ठानेनाधिकारसिद्धिरस्त्वितिविप्रान्वदेत् विप्राअधिकारसिद्धिरस्त्वितिब्रूयुः ततःकरिष्यमाणपुरश्चरणाङ्गत्वेनविहितंगायत्रीजपादिकरिष्येइतिसंकल्प्यस्वयंविप्रद्वारावाकुर्यात् तद्यथा सप्रणवव्याहृतिकगायत्र्याअयुतंजप्त्वाआपोहिष्ठेतिसूक्तंपतोन्विन्द्रमितितिस्रःऋतंचेतिसूक्तंस्वस्तिनइत्याद्याःस्वस्तिमतीःस्वादिष्ठयेत्याद्याःपावमानीश्चसर्वाःप्रत्येकं दशवारंस्वयमन्यद्वारावाजपित्वा तत्सवितुरित्यस्याचार्यमृषिंविश्वामित्रंतर्पयामि गायत्रीछन्दस्त० सवितारंदेवतां० इतितर्पणंकृत्वारुद्रंनमस्कृत्यकद्रुद्रायेत्यादीनिरुद्रसूक्तानिजपेत् ततोदिनान्तरेदेशकालौसंकीर्त्यममसकलपापक्षयद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंचतुर्विंशतिलक्षात्मकगायत्रीपुरश्चरणंस्वयंविप्रद्वारावाकरिष्ये तदङ्गत्वेनस्वस्तिवाचनंमातृकापूजनंनान्दीश्राद्धं विप्रद्वाराजपेजपकर्तृवरणंचकरिष्यइतिसंकल्पः संकल्पस्यापि ऋत्विक्कर्तृकत्वेऽमुकशर्मणोयजमानस्यसकलपापक्षेत्यादियजमानानुज्ञयाकरिष्ये एवंपूर्वत्रापिसंकल्पऊह्यः नान्दीश्राद्धान्तेसविताप्रीयतामिति गायत्रीपुरश्चरणेजपकर्तारंत्वांवृणेइतिविप्रमेकैकंवृणुयात् वस्त्रादिभिःपूजयेत् ॥

**गायत्रीपुरश्चरणप्रयोग**—देशकालाचा उच्चार करून—'करिष्यमाणगायत्री पुरश्चरणेऽधिकारसिद्ध्यर्थं कृच्छ्रत्रयममुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्ये'—असा संकल्प करावा व होमादिकांच्या प्रत्याम्नायविधीप्रमाणें कृच्छ्र करून—'अमुकशर्मणोमम गायत्रीपुरश्चरणेऽनेन कृच्छ्रत्रयानुष्ठानेनाधिकारसिद्धिरस्तु'—असें ब्राह्मणांस म्हणावें. 'अधिकार सिद्धिरस्तु' असें ब्राह्मणानें म्हणावें, व नंतर 'करिष्यमाण पुरश्चरणांगत्वेनविहित गायत्रीजपादि करिष्ये ।'—असा संकल्प करून, स्वतः किंवा ब्राह्मणद्वारा जो जप करावा, तो असाः—प्रणवव्याहृतींनीं युक्त असा गायत्रीचा दहा हजार (१००००) जप करून 'आपोहिष्ठा०' हें सूक्त 'एतोन्विंद्र' या तीन

ऋचा 'ऋतंच०' हें सूक्त 'स्वस्तिनो०' इत्यादि स्वस्तिमति ऋचा व स्वादिष्टया इत्यादि पावमानी ऋचा या सर्व ऋचांचा—प्रत्येक ऋचेचा दहा वेळ याप्रमाणें स्वतः किंवा दुसऱ्याकडून जप करवून 'तत्सवितुरित्यस्याचार्यमृषिं विश्वामित्रं तर्पयामि । गायत्री छंदस्तर्पयामि । सवितारं देवतां तर्पयामि ।' असें तर्पण करून रुद्रास नमस्कार करावा व 'कद्रुद्राय०' इत्यादि रुद्रसूक्तांचा जप करावा. दुसऱ्या दिवशीं देशकालाचा उच्चार केल्यावर—'मम सकलपापक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं चतुर्विंशतिलक्षात्मकगायत्रीपुरश्चरणं स्वयं विप्रद्वारा करिष्ये । तदंगत्वेन स्वस्तिवाचनं मातृकापूजनं नांदीश्राद्धं विप्रद्वारा जपकर्तृवरणंच करिष्ये'—असा संकल्प करावा. ऋत्विकास संकल्प करणें असल्यास—'अमुकशर्मणो यजमानस्य सकलपापक्षयेत्यादि० यजमानाज्ञया करिष्ये' याप्रमाणें संकल्प करावा. नांदीश्राद्धाच्या शेवटीं—'सविता प्रीयतां०' असें म्हणावें "गायत्रीपुरश्चरणे जपकर्तारं त्वां वृणे' असें वाक्य म्हणून एकेका ब्राह्मणास पसंत करून त्याची वस्त्रादिकांनीं पूजा करावी.

**अथनित्यकर्म । एकैकोविप्रः स्वयंवाकुशाद्यासनोपविष्टःपवित्रपाणिराचम्यप्राणानायम्यदेवताःप्रार्थयेत् । सूर्यःसोमोयमः कालःसंध्येभूतान्यहःक्षपा । पवमानोदिक्पतिर्भूराकाशंखेचरामराः ॥ १ ॥ ब्रह्मशासनमास्थायकल्पध्वमिहसंनिधिम् १ इति ततोदेशकालौसंकीर्त्यप्रत्याहिकजपसंकल्प्य गुरवेनमः गणपतये० दुर्गायै० मातृभ्यो० इतिनत्वात्रिःप्राणानायम्य तत्सवितुरितिगायत्र्याविश्वामित्रऋषिःसवितादेवतागायत्रीछन्दःजपेवि० विश्वामित्रऋषयेनमः शिरसि गायत्रीछन्दसेनमोमुखे सवितृदेवतायैनमोहृदि इतिन्यस्य तत्सवितुरङ्गुष्ठाभ्यां० वरेण्यंतर्जनी०भर्गोदेवस्यमध्यमा० धीमह्यनामिका० धियोयोनः कनिष्ठिकाभ्यांप्रचोदयात्करतलकरपृष्ठाभ्यांनमइतिकरन्यासंकृत्वैवंहृदयादिषडङ्गन्यासंकुर्यात् पूर्वोक्तरीत्यासंस्कृतांजपमालांपात्रेनिधायसंप्रोक्ष्यॐमहामायेमहामालेसर्वशक्तिस्वरूपिणि । चतुर्वर्गस्त्वयिन्यस्तस्तस्मान्मांसिद्धिदाभव १ इतिप्रार्थ्य ॐअविघ्नंकुरुमालेत्वमितितामादायमन्त्रदेवतांसवितारंध्यायन्मन्त्रार्थंस्मरन्मध्यांदिनावधिजपेत् अतित्वरायांसार्धत्रयप्रहरावधि जपान्तेपुनःप्रणवमुक्त्वा त्वंमालेसर्वदेवानांप्रीतिदाशुभदाभव शिवंकुरुष्वमेभद्रेयशोवीर्यंचसर्वदा ॥ १ ॥ इतिमालांशिरसिनिधायत्रिःप्राणानायम्यन्यासत्रयंकृत्वाजपमीश्वरार्पणंकुर्यात् प्रत्यहंसमानसंख्यएवजपोनतुन्यूनाधिकःएवंपुरश्चरणजपसमाप्तौहोमः पुरश्चरणसाङ्गतासिद्ध्यर्थंहोमविधिंकरिष्यइतिसंकल्प्याग्निंप्रतिष्ठाप्यपीठेसूर्यादिनवग्रहपूजनादिकलशस्थापनान्ते अन्वादध्यात् चक्षुषीआज्येनेत्यन्तेग्रहपीठदेवतान्वाधानमर्कादिसमिच्चर्वाज्याहुतिभिः कृत्वाप्रधानदेवतांसवितारंचतुर्विंशतिसहस्रतिलाहुतिभिस्त्रिसहस्रसंख्याकाभिःपायसाहुतिभिर्घृतमिश्रतिलाहुतिभिर्दूर्वाहुतिभिःक्षीरमत्स्समिदाहुतिभिश्च शेषेणस्विष्टकृतमित्यादिचरुपायसतिलैःसहाज्यस्य पर्यग्निकरणादि आज्यभागान्तेइदंहवनीयद्रव्यमन्वाधानोक्तदेवताभ्यःअस्तुनममेतियजमानस्त्यागंकुर्यात् होमेसप्रणवा-**

व्याहृतिरहितास्वाहांतागायत्री दूर्वात्रयस्यैकाहुतिः दूर्वासमिधांदधिमध्वाज्या-अन्नं स्विष्टकृदादिबलिदानान्ते समुद्रज्येष्ठाइत्यादिभिर्यजमानाभिषेकः प्रतिलक्षं सुवर्णनिष्कत्रयंतदर्धंवाशक्त्यावादक्षिणाहोमान्तेजलेदेवंसवितारंसंपूज्यहोम-संख्यादशांशेन २४०० गायत्र्यन्तेसवितारंतर्पयामीत्युक्त्वातर्पणंकार्यम् तर्पण-दशांशेन २४० गायत्र्यन्तेआत्मानमभिषिञ्चामिनमइति स्वमूर्ध्न्यभिषेकः होमतर्पणाभिषेकाणांमध्येयदेवनसंभवतितत्स्थानेतद्द्विगुणोजपःकार्यः अभिषेक-संख्यादशांशेनाधिकंवाविप्रभोजनम् पुरश्चरणंपूर्णमस्त्वितिविप्रान्वाचयित्वे-श्वरार्पणंकार्यम् प्रत्यहं यज्जाग्रतइतिशिवसंकल्पमन्त्रस्यत्रिःपाठः कर्ताब्राह्मणैः सहहविष्याशीसत्यवागधःशायीपरिगृहीतभूप्रदेशानतिचारीचभवेत् इत्यनन्त-देवीयानुसारेणचतुर्विंशतिलक्षपुरश्चरणप्रयोगः ऋग्विधानेतु मध्याह्नमितभुक्-मौनीत्रिःस्नानार्चनतत्परः । लक्षत्रयंजपेद्धीमानितित्रिलक्षंपुरश्चरणमुक्तम् जप-शतांशस्त्रिसहस्रं होमः कलौचतुर्गुणंप्रोक्तमितिपक्षेद्वादशलक्षजपः द्वादशसहस्र-होमइत्यायूह्यम् विष्णुशयनमासेषुपुरश्चरणंनकार्यम् तीर्थादौशीघ्रंसिद्धिः बिल्ववृक्षाश्रयेणजपेएकाहात्सिद्धिरितिसर्वमन्त्रप्रक्रियाब्धिः । इतिगायत्रीपुर-श्चरणम् ॥

**नित्यकर्म**—एकेका ब्राह्मणानें किंवा स्वतः ( यजमानानें ) दर्भाच्या आसनावर बसून हातांत दर्भाचें पवित्रक घालावें आणि आचमन प्राणायामादि केल्यावर—'सूर्यः सोमोयमकालसन्ध्येभूतान्यहक्षपा......सन्निधिम्'—अशी देवतांची प्रार्थना केल्यावर देशकालादिकांचा उच्चार करून रोजच्या जपाचा उच्चार केल्यावर '—गुरवे नमः०' वगैरे नमस्कार करावेत. नंतर तीन प्राणायाम करून—'तत्सवितु-रिति......नमो हृदि'—असा न्यास करावा आणि—'तत्सवितुरंगुष्ठाभ्यां०...... प्रचोदयात् करतलकरपृष्ठाभ्यां०'—असा करन्यास करून हृदयादि षडंगन्यास करावा. नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें संस्कार केलेली जपमाला पात्रांत ठेवून तिच्यावर ( पाण्याचें ) प्रोक्षण करावें, आणि -'ॐ महामाये......सिद्धदा भव'—अशी तिची प्रार्थना करावी. नंतर—'ॐ अविघ्नं कुरु माले त्वं०' मंत्रानें ती माळ हातांत घेऊन मंत्रदेवता जी सविता ( सूर्य ) तिचें ध्यान करीत करीत तिला गळ्यांत घालून व मध्य दिवसापर्यंत मंत्राच्या अर्थाला लक्षांत ठेवून, जप करावा. घाई असल्यास साडेतीन प्रहरपर्यंतच जप करावा. जपाच्या शेवटीं पुन्हां 'ॐ' म्हणून—'त्वं माले... यशोवीर्यंच सर्वदा'—या मंत्रानें माळ डोक्यावर ठेवावी आणि तीन प्राणायाम व तीन न्यास केल्यावर ईश्वराला जपार्पण करावें. रोज सारख्याच संख्येचा जप घरावा. कमी किंवा ज्यास्त करूं नये. अशा प्रकारें पुरश्चरणाच्या जपाची संपूर्णता झाल्यावर जो होम करावा, त्याचा 'पुरश्चरणसांगतासिद्ध्यर्थं होमविधिं करिष्ये'—असा संकल्प केल्या-वर, अग्नि मांडून पीठावर सूर्यादि नऊ ग्रहांच्या पूजेपासून कलशस्थापनेपर्यंतचें कर्म व अन्वाधान हीं एकामागून एक कर्में करावींत. नंतर 'चक्षुषि आज्येन' असें म्हणून —चरु, अर्कादिक समिधा व तूप यांच्या आहुतींनीं—'प्रधानदेवतां....... स्विष्टकृ-

तमित्यादि'–असें मुख्य अन्वाधान करावें. भात, खीर व तिळ यांच्यासह तुपाचें पर्यग्निकरणादि ( द्रव्यसंस्कार ) करावे. आज्यभावान्त कर्म झाल्यावर–'इदं हवनीयद्रव्यं ......न मम–असा यजमानानें त्याग ( आहुति देणें ) करावा. होमाच्या वेळीं व्याहृतिरहित अशा ॐकारासह गायत्री म्हणावी. तीन दूर्वांची एक आहुति द्यावी. दूर्वा आणि समिधा–दहीं, मध व तूप यांत भिजवल्यावर स्विष्टकृतापासून बलिदानापर्यंतचें कर्म करावें आणि मग–'समुद्रज्येष्ठा०'–इत्यादि मंत्रांनीं यजमानावर अभिषेक करावा. एक लक्ष जपाला तीन निष्क किंवा दीड निष्क अथवा यथाशक्ति सुवर्णदक्षिणा द्यावी. होमानंतर पाण्यांत सूर्यदेवाची पूजा करून, होमसंख्येच्या दशांशानें ( २४०० ) गायत्रीमंत्राच्या शेवटीं 'सवितारं सर्पयामि' असें म्हणून तर्पण करावें. तर्पणाच्या दशांशानें ( २४० ) गायत्रीमंत्राच्या शेवटीं–'आत्मानमभिषिञ्चामि नमः' –असें म्हणून आपल्या मस्तकावर अभिषेक करावा. होम, तर्पण आणि अभिषेक या तिहींपैकीं जें करणें अशक्य असेल त्याच्या ऐवजीं दुप्पट जप करावा. अभिषेकाच्या संख्येच्या दशांशाइतकें किंवा त्याहून अधिक ब्राह्मणभोजन करावें आणि मग– 'पुरश्चरणं पूर्णमस्तु' असें ब्राह्मणांकडून वदविल्यावर सर्व कर्म ईश्वरार्पण करावें. 'यज्जाग्रतो०'–या शिवसंकल्पमंत्राचे रोज तीन पाठ करावेत. कर्त्यानें ब्राह्मणांसह हविष्यभोजन करावें, खरें बोलावें, उच्चासनावर निजूं नये. आणि परिगृहीत (ठरविलेल्या ) जागेच्या बाहेर जाऊं नये. अनन्तदेवाच्या ग्रन्थांत जो चोवीस लक्ष पुरश्चरणाचा प्रयोग सांगितला आहे, तोच हा होय. मध्याह्नीं मितभोजन (भूक ठेवून) करून, मौनव्रतानें ( मुक्यानें ) त्रिकालस्नान व देवपूजा यांसह शहाण्यानें गायत्रीमंत्राचा तीन लक्ष जप करावा. हें तीन लक्षांचें गायत्रीपुरश्चरण ऋग्विधानग्रंथांत सांगितलें आहे. जपाच्या शतांशानें तीन हजार होम करावा. कलियुगांत चौपट करण्यास जें सांगितलें आहे तें लक्षांत घेतां बारा लक्ष जप व बारा हजार होम–असीं करावींत. विष्णुशयनाच्या महिन्यांत म्हणजे आषाढ शुद्ध एकादशीपासून कार्तिक शुद्ध एकादशीपर्यंत हें पुरश्चरण करूं नये. या पुरश्चरणाची सिद्धि तीर्थादिकांच्या जवळ फार लवकर होते. बेलाच्या झाडाजवळ हा जप केला असतां एकाच दिवसांत सिद्धि होते. सर्व मंत्रांची क्रिया अशीच समजावी. गायत्रीमंत्रपुरश्चरणाचा असा विधि वगैरे आहेत.

अथपूर्तकमलाकरेअश्वत्थोपनयनम् । तत्त्रवर्णैःक्रमेणवृक्षस्थापनादष्टमेपकादशेद्वादशेवर्षेउपनयनोक्तमुहूर्तेपूर्वाह्णेकार्यम् शूद्रस्थापिताश्वत्थेपौराणिकमन्त्रैरारामप्रतिष्ठामात्रंकार्यंनोपनयनम् अथप्रयोगः कर्तादेशकालौसंकीर्त्यसर्वपापक्षयकुलकोटिसमुद्धरणपूर्वकविष्णुसायुज्यप्राप्तिकामोऽश्वत्थोपनयनंकरिष्येइतिसंकल्प्यनान्दीश्राद्धान्तेआचार्यंवृणुयात् आचार्यःपञ्चामृतैःशुद्धोदकैःसर्वौषधिजलैश्चाश्वत्थमभिषिञ्चयतिष्ठातकेनालंकृतत्पूर्वेस्थण्डिलेऽग्निंप्रतिष्ठाप्यान्वाधाने अग्निंवायुंसूर्यंत्रिरग्निंपवमानंप्रजापतिंद्विरोषधीर्वनस्पतिंपिप्पलंप्रजापतिंचपालाशसमिच्चर्वाज्यैःप्रत्येकमेकैकयाहुत्या शेषेणेत्यादि अष्टचत्वारिंशन्मुष्टीनांतूष्णींनिर्वापप्रोक्षणे अपणाद्याज्यभागान्तेयुवंवस्त्राणीत्यश्वत्थंवस्त्रयुग्मेनावेष्ट्य-

यज्ञोपवीतमितियज्ञोपवीतंदत्त्वाप्रावेपामेतिमेखलांत्रिरावेष्टयअजिनंदण्डंच-तूष्णींदत्त्वाअश्वत्थेवइत्यृचागन्धपुष्पैःसंपूज्यदेवस्यत्वेतिमन्त्रान्ते हस्तंगृह्णाम्य-श्वत्थेतिस्पृष्ट्वासप्रणवव्याहृतिकांगायत्रींत्रिजपित्वा अश्वत्थेवोपनिषदनसूक्तेन व्याहृतिभिश्चाश्वत्थंस्थापयामीतिस्वर्णशलाकयास्पृष्ट्वाऽऽज्यपलाशसमिच्चरुभिः प्रत्येकं द्वादशमन्त्रैर्द्वादशाहुतीर्जुहुयात् मन्त्रस्तु भूःस्वाहा अग्नयइदं० । भुवःस्वा० वायव० । स्वःस्वा० सूर्याये० । अग्नआयूंषि० अग्निर्ऋषिः अग्नेपव-स्वस्वेतित्रिभिरग्नयेपवमानायेदं० । प्रजापतेनत्व० प्रजापतय० । ओषधयः संवदन्ते० अश्वत्थेहो० ओषधीभ्यइदं० । वनस्पतेशत० वनस्पतयइ० । द्वासुपर्णा० पिप्पलायेदं । समस्तव्याहृतिभिःप्रजापतयइदं० स्विष्टकृदादिहोमशेषंस-माप्याश्वत्थेवइतिगन्धपुष्पधूपदीपनैवेद्यफलताम्बूलाद्यैःसंपूज्याश्वत्थंस्पृष्ट्वाचा-र्यायगामन्येभ्योदक्षिणांदत्त्वाश्वत्थवस्त्रादिकमाचार्यायदत्त्वाष्टौविप्रान्भोजयेदिति॥

**पूर्तकमलाकरांतला पिंपळाच्या मुंजीचा प्रयोग**--ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांनीं वृक्ष लाविल्यापासून क्रमानें ८ व्या, ११ व्या व १२ व्या वर्षीं उपनयनास उक्त असलेल्या मुहूर्तावर पूर्वाह्णकालीं अश्वत्थाचें उपनयन करावें. अश्वत्थाची स्थापना शूद्रानें केली असेल तर पुराणोक्त मंत्रांनीं आरामप्रतिष्ठाच करावी, उपनयन करूं नये. कर्त्यानें देशकालाचा उच्चार करून, 'सर्वपापक्षयकुलकोटिसमुद्धरणपूर्वकं विष्णुसायुज्यप्राप्तिकामोऽश्वत्थोपनयनं करिष्ये'-असा संकल्प करावा व नांदीश्राद्धान्त कर्म केल्यावर आचार्य पसंत करावा. आचार्यानें पंचामृतें, शुद्धोदकें व सर्वौषधियुक्त जलें यांनीं अश्वत्थास स्नान घालून, पिष्टातकानें ( बुक्यानें ) अश्वत्थास सुशोभित करावें. अश्वत्थाच्या पूर्व दिशेस स्थंडिलावर अग्नीची स्थापना करावी, व 'अग्निंवायुं सूर्यमिग्निं...याहुत्याशेषेणेत्यादि'' अन्वाधान करावें. ४८ मुठी तांदूळ मंत्ररहित घेऊन व मंत्ररहितच ते प्रोक्षण करून, चरुश्रवणापासून आज्यभागान्त कर्म केल्यावर, 'युवं वस्त्राणि०'—या मंत्रांनीं दोन वस्त्रें अश्वत्थासभोंवतीं गुंडाळावींत व मग-'यज्ञोपवीतं०' —या मंत्रानें यज्ञोपवीत देऊन—'प्रावेपा०' या मंत्रानें मेखलेचें तीनदां वेष्टन करून अजिन व दंड हे मंत्र न म्हणतां द्यावेत. 'अश्वत्थे०' या ऋचेनें गंधपुष्पादिकांनीं पूजा करून—'देवस्यत्वा०'—हा मंत्र म्हणून 'हस्तंगृह्णाम्यश्वत्थ'—असें वाक्य म्हणावें व अश्वत्थाला स्पर्श करून, प्रणव व व्याहृति यांनीं युक्त गायत्रीमंत्राचा तीन वेळ जप करावा. 'अश्वत्थेवोनिषदनं०'--या सूक्तानें व व्याहृतिमंत्रांनीं—'अश्वत्थंस्थापयामि' असें वाक्य म्हणून, सोन्याच्या काडीनें स्पर्श करून आज्य, पळसाच्या समिधा व चरु या द्रव्यांपैकीं प्रत्येकाच्या बारा बारा आहुतींचा बारा मंत्रांनीं होम करावा. होमाचे मंत्र 'भूः स्वाहा अग्नयइदं० ( या तीन ऋचांचा प्रत्येक ऋचेनें होम करावा ) अग्नयेपवमानायेदं०.........समस्त व्याहृतिभिः प्रजापतयइदं०'—असा होम करून स्विष्टकृत् इत्यादि होमशेष समाप्त केल्यावर 'अश्वत्थेवो०' या मंत्रानें गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, फल, तांबूल, इत्यादि उपचारांनीं पूजा करून अश्वत्थास स्पर्श करावा

व आचार्याला गोप्रदान व इतर ब्राह्मणांस दक्षणा देऊन अश्वत्थास समर्पण केलेलीं वस्त्रें इत्यादि सर्व पदार्थ आचार्यास देऊन आठ ब्राह्मणांस भोजन घालावें. असा हा पिंपळाच्या मुंजीचा प्रयोग आहे.

अपुत्रेणपुंसास्त्रियावावटप्लक्षाम्रादेःपुत्रत्वेनप्रतिग्रहःकार्यः देशकालौसंकीर्त्य-महापापक्षयकुलत्रयसमुद्धरणप्रजापतिपुरगमननिरयस्थपित्रुद्धारमधुधारातृप्तिसि-द्ध्यर्थंसपुत्रत्वसिद्ध्यर्थममुकवृक्षंप्रतिग्रहीष्येइतिसंकल्प्योपवासंकृत्वारात्रौअ-ष्टविप्रानाहूयचन्द्रंसंपूज्यजागरंभूशयनंवाकृत्वाप्रातर्वृक्षंसंपूज्यतच्छायायांवि-प्रान्संभोज्यपुण्याहंवाचयित्वाप्रार्थयेत् अपुत्रौभगवन्तोऽत्रपुत्रप्रतिकृतिंतरुम् । गृहीष्यामिममानुज्ञांकर्तुमर्हथसत्तमाः १ ताम्रपात्रेपञ्चसौवर्णफलानिबीजपञ्च-रत्नयुतान्यधिवास्यलोकपालबलीन्दद्यात् ॥

**निपुत्रिकस्त्रीपुरुषव्रत**—पुत्रहीन पुरुषानें किंवा स्त्रीनें वट, प्लक्ष (पिंपरी), आंबा इत्यादि वृक्षांस पुत्र मानून त्यांचा प्रतिग्रह (अंगिकार) करावा. देशकालांचा उच्चार केल्यावर 'महापापक्षयकुलत्रयसमुद्धरणप्रजापतिपुरगमननिरयस्थपित्रुद्धारमधुधारातृप्तिसिद्ध्यर्थं अमुकवृक्षं प्रतिग्रहीष्ये'—असा संकल्प करावा व उपोषण करून रात्रीं आठ ब्राह्मणांना बोलावून चंद्राची पूजा करावी. रात्रीं जागरण किंवा भूमिशयन करून प्रातःकालीं वृक्षाची पूजा करावी व त्याच्याच छायेखालीं ब्राह्मणांस भोजन घालून, 'पुण्याहं०' असें म्हणून—'अपुत्रो भगवंतोऽत्र पुत्रप्रतिकृतिं तरुं ॥ गृहीष्यामि ममानुज्ञां कर्तुमर्हथ सत्तमाः ॥'—या मंत्रानें ब्राह्मणांची प्रार्थना करावी. तांब्याच्या भांड्यांत बीजरूपानें पंचरत्नें ज्यांत आहेत अशीं पांच सुवर्णाचीं फलें ठेवून, लोकपालास बलि द्यावेत.

परेद्युस्तिलाज्यचरुभिरष्टशतंवनस्पतिमन्त्रेणहुत्वाजातकर्मादिविवाहान्त-संस्कारान्कृत्वाऽभिषिक्तःकर्तापुष्पाञ्जलिमादायप्रार्थयेत् येशाखिनःशिखरिणां-शिरसा विभूषायेनन्दनादिषुवनेषुकृतप्रतिष्ठाः । येकामदाःसुरनरोरग-किन्नराणांतेमे नतस्यदुरितार्तिहराभवन्तु १ एतेद्विजाविधिवदत्रहुतोहुताशःपश्य-त्यसौचहिमदीधितिरन्तरस्थः । त्वंवृक्षपुत्रपरिकल्प्यमयावृतोऽसिकार्यंसदैव-भवताममपुत्रकार्यम् २ अङ्गादङ्गादितिस्पृष्ट्वाविप्रेभ्योदक्षिणांदत्त्वाविसृजेत् इतिवटादितरुपुत्रविधिः ॥

**वटादिवृक्षपुत्रविधि**—दुसऱ्या दिवशीं तिल, आज्य व चरु यांचा आठशें होम वनस्पतिमंत्रानें करावा आणि जातकर्मापासून विवाहापर्यंत संस्कार करून अभिषेक केलेल्या कर्त्यानें पुष्पांजलि घेऊन, 'ये शाखिनः शिखरिणां शिरसां विभूषा...सदैव भवता मम पुत्र कार्यं ॥' या मंत्रानें प्रार्थना करावी व 'अंगादंगात्सं०' या मंत्रानें वृक्षाला स्पर्श करून ब्राह्मणांस दक्षिणा देऊन विसर्जन करावें. याप्रमाणें वटादि वृक्षांचा पुत्रविधि आहे.

अथसकलकर्मसाधारणपरिभाषा । सर्वेष्वपाकयज्ञेषुभवेद्ब्रह्माकृताकृतः । पात्रासादनमिच्छातआज्यादिश्रपणादिच ॥ १ ॥ स्रुवादिमार्जनंचेध्मरज्जुग्रह-

रणंतथा । पूर्णपात्रंभवेन्नित्यमाज्यस्योत्पवनेतथा ॥ २ ॥ व्रीहीणामवघातश्चतण्डुलेष्वकृताकृतः । द्रवीभूतघृतस्यापिविलापनविधिस्तथा ॥ ३ ॥ प्रतिपदोक्ताज्यहोमेपरिस्तरणंविकल्पितम् । अनादिष्टाज्यहोमेतुनित्यम् आज्यभागसहिततद्रहितकर्मणोस्तन्त्रप्रयोगेआज्यभागाननुष्ठानमेवयुक्तम् सर्वत्राज्यभागयोर्विकल्पनात् अनेकपाकयज्ञानामेककालानुष्ठानेसमानतन्त्रता तेनस्विष्टकृदाद्येकमेव यत्रद्रव्यंनोक्तंतत्राज्यंग्राह्यम् मन्त्रान्तेकर्मकर्तव्यंमन्त्रास्यकरणत्वतः । कर्मावृत्तौतुमन्त्रस्याप्यावृत्तिर्गृह्यकर्मणि १ समन्त्रकहोमेतूष्णींनिर्वापःनाम्नाहोमेनाम्नैवनिर्वापादि यत्रमन्त्रेणनाम्नावाहोमोनोक्तस्तत्रनाम्नैवहोमः समन्त्रकहोमे सहैवानेकदैवत्यचरुपाकेपिनविभागोनाभिमर्शश्च अनुक्तौदक्षिणकरः दिशामनुक्तौप्राच्युदीचीशान्यः तिष्ठन्नासीनइत्याद्यनुक्तावासीनतैव अनादेशेस्वयंकर्ता अविज्ञातस्वरोमन्त्रःसौत्रएकश्रुतिर्भवेत्। होमेषुमन्त्रंस्वाहान्तंप्रणवाद्यंचकारयेत् २ विप्रादीनांद्विदर्भस्यात्पवित्रंग्रथितंनवा ॥

**सर्व कर्मांची साधारण परिभाषा**—कोणच्याही पाकयज्ञांत ब्रह्मा कृताकृत आहे. पात्रासादन व तूप वगैरे द्रव्यांचें ( श्रपण ) शिजविणें हें इच्छेप्रमाणें करायचें असतें. स्रुवादि पात्रांचें धुणें (संमार्जन) इध्मांचें (जाड समिधा इंधन) रज्जुप्रहरण ( दोरी सोडणें ), पूर्णपात्र आणि आज्योत्पवन (तूप गाळणें ) या गोष्टी केल्याच पाहिजेत. व्रीहि ( देवभात ) कांडावें किंवा कांडूं नये. द्रवीभूत ( पाघळणाऱ्या ) तुपाचा विरलापनविधिही ( थोडें फार मिळवणें) कृताकृतच आहे. प्रतिपदोक्त तुपाच्या होमांत परिस्तरण विकल्पित ( कृताकृत ) आहे. अनादिष्ट आज्यहोमांत परिस्तरण नित्य (जरूर) आहे. आज्यभागसहित व आज्यभागरहित कर्मांच्या तंत्रप्रयोगांत आज्यभाग न देणेंच बरें; कारण, त्याचा सर्वत्र विकल्प आहे. अनेक पाकयज्ञ एकदमच करावयाचे असल्यास, ते सर्व समान तंत्रानें करावेत, असें शास्त्र असल्यानें स्विष्टकृत् एकच करावें. जेथें द्रव्याचें नांव सांगितलें नसेल तेथें तूप समजावें. मंत्र हा कर्माचें साधन असल्यानें, त्याच्या शेवटीं कर्म करावें. गृह्यकर्मांत पुन्हा कर्म करणें असल्यास पुन्हा मंत्र म्हणावा. नाममंत्रानें होम करावयाचा असतां नाममंत्रानेंच निर्वापादि ( विझवणें, देणें वगैरे ) कर्में करावींत. समंत्रक होमांत मंत्र न म्हणतां निर्वाप करावा. नाममंत्रानें किंवा मंत्रानें जेथें होम सांगितला नसेल तेथें नाममंत्रानेंच होम करावा. समंत्रक होमांत अनेक देवतांना देण्याच्या चरूचें श्रपण ( शिजविणें ) असतांही त्याचा विभाग व स्पर्श ( अभिमर्श ) हीं करूं नयेत. कोणच्या हातानें कर्म करावें तें व दिशा हीं सांगितलीं नसल्यास, अनुक्रमें उजवा हात व पूर्व, उत्तर किंवा ईशान्य अशीं समजावींत. उभें राहून किंवा बसून कर्म करण्याची सूचना नसल्यास यजमानच कर्ता समजावा. अविज्ञात स्वर व सूत्रोक्त मंत्र सरळ म्हणावेत. होमांतल्या मंत्रोच्चाराच्या आधीं ॐकार व शेवटीं स्वाहाकार म्हणावेत. गांठ असलेलें किंवा नसलेलें दोन दर्भांचें पवित्रक ब्राह्मणादिकांनीं घालावें.

आहुतिप्रमाणम् । कर्षप्रमाणमाज्यादिलाजामुष्टिमितामता: । अन्नंग्रास-समंग्राह्यंकन्दानामष्टमोंशकः ॥ १ ॥ तिलसक्तुकणादीनामृगीमुद्राप्रमाणतः ।

**आहुतिप्रमाण**—प्रत्येक आहुतीला तुपासारखे पातळ पदार्थ एक तोळा प्रमाणाचे घ्यावेत. लाह्या मूठभर व भात एका घांसाएवढा घ्यावा. कन्दाचा अष्टमांश घ्यावा. तिल, सातु वगैरे धान्यांची आहुति मृगीमुद्राप्रमाण ( हरिणीच्या पावलाएवढी ) घ्यावी.

ताम्रपात्रेणपिहितेताम्रपात्रादिकेशुभे ॥ २ ॥ अग्निप्रणयनंकार्यंमृन्मयेराजतादिके । उत्तमःश्रोत्रियागारान्मध्यमःस्वगृहादितः ॥ ३ ॥ नाप्रोक्षितमिन्धनमग्नावादध्यात् सदोपवीतिनाभाव्यंसदाबद्धशिखेनच । सदेतिकर्माङ्गतापुरुषार्थताच तेनकर्मकालेशिखाबन्धाद्यभावेप्रायश्चित्तद्वयमन्यदैकमेव दशविधा दर्भाउक्ताः वटप्लक्षबिल्ववैकङ्कतचन्दनदेवदारुसरलवृक्षजाअपिक्वचित् समिधः प्रभुःप्रथमकल्पस्ययोऽनुकल्पेनवर्तते सनाप्नोतिफलंतस्यपरत्रेतिश्रुतिः स्मृतिः १ बह्वल्पंवास्वगृह्योक्तंयस्ययत्कर्मचोदितम् । तस्यतावतिशास्त्रार्थेकृतेसर्वः कृतोभवेत् ॥

**होमव्यवस्था**—रुप्याच्या किंवा तांब्याच्या पात्रांत किंवा मृत्तिकापात्रांत अग्नि घेऊन त्या पात्रावर तांब्याच्या पात्राचें आच्छादन घालून अग्नि आणावा. श्रोत्रियाचे घरांतून आणलेला अग्नि उत्तम व आपल्या घरांतून आणलेला अग्नि मध्यम समजावा. उदकानें प्रोक्षित न केलेलें इंधन अग्नींत घालूं नये. सदोदित उपवीति व शिखाबद्ध असें असावें. 'सदा' या पदानें शिखाबंधन हें एक कर्मांग असून तें पुरुषार्थसूचक असल्यानें कर्मकालीं शिखाबंधनादिक केलें नाहीं तर दोन प्रायश्चित्तें करावीं लागतात व इतर वेळीं एकच प्रायश्चित्त घ्यावें लागतें, हें सिद्ध होतें. दर्भ दहा प्रकारचे सांगितले आहेत. वट, प्लक्ष ( पिंपरी ), बेल, वेहकळ, चंदन, देवदारु व सरल या वृक्षांच्याही समिधा क्वचित्प्रसंगीं सांगितल्या आहेत. प्रथम कल्पानें कर्म करण्याचें सामर्थ्य असतांही जो गौण कल्पानें कर्म करितो त्यास कृतकर्माचें फल परलोकीं मिळत नाहीं, अशी श्रुति व स्मृति आहे. आपल्या गृह्यसूत्रांत जें कांहीं कमीअधिक कर्म करायला सांगितलें असेल तें यथाशास्त्र केलें असतां सर्व कर्म शास्त्रार्थानें केल्यासारखें होतें.

अथकर्मविशेषेग्निनामानि । अग्निस्तुमरुतोनामगर्भाधानेविधीयते । पवमानःपुंसवनेसीमन्तेमङ्गलाभिधः ॥ १ ॥ प्रबलोजातसंस्कारेपार्थिवोनामकर्माणि । अन्नाशनेशुचिःप्रोक्तःसभ्यःस्याच्चौलकर्मणि ॥ २॥ व्रतादेशेसमुद्भवः गोदानादौसूर्यः विवाहेयोजकः आवसथ्येद्विजनामाप्रायश्चित्तेविटः पाकयज्ञेषुपावकः पित्र्येकव्यवाहनःदैवेहव्यवाहनः शान्तिकेवरदःप्रोक्तःपौष्टिकेबलवर्धनः मृतदाहेक्रव्यादःज्ञात्वैवमग्निनामानिगृह्यकर्मसमारभेत् ॥

**कर्मविशेषाग्निनामें**—गर्भाधानसंस्कारांतल्या अग्नीचें नांव जसें मरुत्, तद्वतच पुंसवनांतला पवमान, सीमन्तोन्नयनांतला मंगल,

कर्मांतला प्रबल, नामकरणांतला पार्थिव, अन्नप्राशनांतला शुचि, चौलांतला सभ्य, व व्रतादिकांतला समुद्भव, गोदानांतला व सूर्यविवाहसंस्कारांतला योजक, आवसथ्य म्हणजे गृह्याग्न्यादि कर्मांतला द्विज, प्रायश्चित्तांतला विट, पाकयज्ञांतला पावक, पित्र्यकर्मांतला कव्यवाहन व दैवकर्मांतला हव्यवाहन, शान्तिकर्मांतला वरद, पौष्टिक कर्मांतला बलवर्धन, मृतदहनांतला क्रव्याद, अशीं हीं अग्नींचीं नांवें समजून कर्म करावें.

पलाशेनजुहूःकार्याखदिरेणस्रुवःस्रुचः । तदभावेयथालाभयज्ञियवृक्षजाः तदभावेपलाशमध्यपर्णैर्वापिप्पलपर्णैर्वाहोमः एवंचमसादयोपिखदिरादियज्ञियवृक्षजाः काम्येप्रतिनिधिर्नास्तिनित्येनैमित्तिकेहिसः।काम्येप्युपक्रमादूर्ध्वमन्येप्रतिनिधिंविदुः॥१॥नस्यात्प्रतिनिधिर्मंत्रकर्मदेवाग्निकर्तृषु। नदेशारणिकालेषुत्रिषुप्रतिनिधिर्मतः ॥ २॥ नापिप्रतिनिधानव्यंनिषिद्धंवस्तुकुत्रचित् । स्वकालादुत्तरोगौणःकालःसर्वस्यकर्मणः ॥३ ॥ तर्पणेष्वासनेश्राद्धेभुक्तौमूत्रपुरीषयोः षट्सुनिर्माल्यकादर्भादर्व्याद्याअभिचारके ४ मन्त्रोपियश्चशूद्रार्थेब्राह्मणःप्रेतभोजने ॥

**होमसमिधादर्भपात्रादि**—जुहू (पळी), पळसाच्या लांकडाची स्रुवा व वडाच्या पानाच्या स्रुचि या खदिराच्या लांकडाच्या ( खैर ) कराव्या. हे वृक्ष न मिळाल्यास जे मिळतील त्या यज्ञीय वृक्षांच्या कराव्या. यज्ञीय वृक्ष न मिळाल्यास या पात्रांच्या ऐवजीं पळसाचीं किंवा पिंपळाचीं पानें वापरावीत. काम्य कर्मांत प्रतिनिधि चालत नाहीं. नित्य व नैमित्तिक कर्मांत प्रतिनिधि चालतो. कित्येक ग्रन्थकार सांगतात कीं, काम्य कर्मांतही तें कर्म सुरू झाल्यावर प्रतिनिधि चालतो. मंत्र, कर्म, देवता, कर्ता, अरणी आणि काल यांच्या जागीं प्रतिनिधि करूं नये. निषिद्ध पदार्थ कोणच्याही कर्मांत प्रतिनिधीच्या जागीं उपयोगांत आणूं नये. कर्माच्या खऱ्या वेळेच्या पुढचा काळ गौण होय. तर्पण, श्राद्ध, आसन, जेवण, लघवी व पुरीष या सहा कर्मांतले दर्भ निर्माल्य (निरुपयोगी) होत. अभिचार कर्मांतलीं (जारणमारणादि) दर्व्यादि पात्रें इतर कर्मांत निरुपयोगी समजावीत. शूद्रकार्यांत उपयोग केलेला मंत्र व प्रेतश्राद्धांत जेवलेला ब्राह्मण हे निर्माल्यवत् होत.

अथकर्माङ्गदेवताः विवाहस्याग्निर्देवता तेनविवाहाङ्गभूतस्वस्तिवाचनाद्यन्ते-कर्माङ्गदेवताग्निःप्रीयतामितिवदेत् औपासनेऽग्निसूर्यप्रजापतयःस्थालीपाके-ऽग्निः गर्भाधानेब्रह्मा पुंसवनेप्रजापतिः सीमन्तेधाता जातकर्मणि मृत्युः नाम-कर्मनिष्क्रमणान्नप्राशनेषुसविता चौलेकेशिनः उपनयनेइन्द्रश्रद्धामेधा अन्तेसु-श्रवाः पुनरुपनयनेऽग्निः समावर्तनस्येन्द्रः उपाकर्मणिव्रतेषुचसविता वास्तुहोमे-वास्तोष्पतिरन्तेप्रजापतिःआग्रयणेआग्रयणदेवताःसर्पबलेःसर्पाः तडागादीनां-वरुणःग्रहयज्ञेआदित्यादिनवग्रहाःकूष्माण्डहोमेचान्द्रायणेअग्न्याधानेचाग्न्या-दयः अग्निष्टोमस्याग्निः अन्येष्विष्टकर्मसुप्रजापतिरिति ॥

**कर्मांगदेवता**—विवाहाची देवता अग्नि असल्यामुळें विवाहांगभूत पुण्याहवाचनादि कर्मांच्या अंतीं 'कर्मांगदेवता अग्निः प्रीयतां' असें म्हणावें. औपासनाच्या देवता—आग्नि, सूर्य व प्रजापति ह्या होत. स्थालीपाकाची देवता अग्नि, गर्भाधानाची ब्रह्मा, पुंसवनसंस्काराची प्रजापति, सीमंतोन्नयनाची धाता, जातकर्माची मृत्यु, नामकर्म, निष्क्रमण व अन्नप्राशन यांची देवता सविता, चौलसंस्काराची केशिन, उपनयनाच्या देवता-इंद्र, श्रद्धा व मेधा, अंतीं सुश्रवा देवता, पुनरुपनयनाची देवता अग्नि, समावर्तनाची इंद्र, उपाकर्म व महास्नानादि व्रतांची देवता सविता, वास्तुहोमाची देवता वास्तोष्पति, त्यांच्या अंतीं प्रजापति, आग्रयणाची आग्रयण, सर्पबलीची देवता—सर्प, तडागादिकांची देवता वरुण, ग्रहयज्ञाच्या देवता आदित्यादि नवग्रह, कूष्मांडहोम, चांद्रायण व अग्न्याधान यांच्या अग्न्यादि देवता, अग्निष्टोमाची देवता अग्नि व इतर इष्ट कर्मांची देवता प्रजापति.

अथ कलियुगेकार्याकार्यविवेकः। गीतागङ्गातथाविष्णुःकपिलाश्वत्थसेवनम्। एकादशीव्रतंचैवसप्तमंनकलौयुगे ॥ १ ॥ विष्णुंशिवंवाभजतांगुरोःपित्रोश्चसेविनाम्। गोवैष्णवमहाशैवतुलसीसेविनामपि ॥ २ ॥ नस्यात्कलिकृतोदोषः काश्यांनिवसतामपि। कलौगुरूणांभजनमीशभक्त्यधिकंस्मृतम् ॥ ३ ॥ जपादौयत्रयासंख्याकलौसास्याचतुर्गुणा। कलौदानंमहाश्रेष्ठंशिवविष्णोश्चकीर्तनम् ॥ ४ ॥ कृतेयद्दशभिर्वर्षैस्त्रेतायांहायनेनतु। द्वापरेतत्तुमासेनअहोरात्रेणतत्कलौ ॥ ५ ॥ प्रथमस्कन्धे कुशलान्याशुसिद्ध्यन्तिनेतराणिकृतानियादितिकलौपुण्यकर्मणांसंकल्पेऽपिसिद्धिः पापानांत्वाचरणादेवेत्युक्तम् स्मृत्यन्तरविरोधेतुकलौपाराशरस्मृतिः। ध्यायन्कृतेयजन्यज्ञैस्त्रेतायांद्वापरेऽर्चयन्। यदाप्नोतितदाप्नोतिकलौसंकीर्त्यकेशवम् ॥ १ ॥ इतिहेमाद्रौव्यासवचनम्अत्रकृतयुगाद्यधिकरणकध्यानादिफलार्थेकल्यधिकरणकंकीर्तनंविधीयतइतिवाक्यार्थःकौस्तुभकर्तृपितामहैर्भक्तिनिर्णयेविस्तरेणनिरूपितः हेमाद्रौ कलिंसभाजयन्त्यार्यागुणज्ञाःसारभागिनः। यत्रसंकीर्तनेनैवसर्वःस्वार्थोभिलभ्यते ॥ १ ॥ इति श्रीभागवतवचनमुदाहृत्यसंकीर्तनेन हरिसंकीर्तनेत्यर्थइतिहेमाद्रावेवव्याख्यातम् कृष्णवर्णंत्विषाकृष्णंसाङ्गोपाङ्गास्त्रपार्षदम्। यज्ञैः संकीर्तन प्रायैर्यजन्तिहिसुमेधसः ॥ १ ॥ यज्ञादिस्वस्वाचारमाचरद्भिरपिकालेषुसंकीर्तननिष्ठैर्भाव्यमित्याशयइतिकौस्तुभे अनेनचतुर्वर्गफलंनारायणाश्रयणमात्रेणभवतीतिसिद्धम् यावैसाधनसंपत्तिः पुरुषार्थचतुष्टये। तयाविनातदाप्नोतिनरोनारायणाश्रयः ॥ १ ॥ इतिभारतोक्तेः ॥

**कलियुगांतला कार्याकार्यविचार**—गीता, गंगा, विष्णु, कपिला गाय, अश्वत्थसेवा व एकादशीव्रत हीं सहा सेव्य आहेत. कलियुगांत सातवें (सेव्य) नाहीं. विष्णु किंवा शिव यांचें भजन करणारे, गुरु व मातापिता यांची सेवा करणारे, तसेंच गाई, वैष्णव, महाशैव व तुलसी यांची सेवा करणारे व काशीक्षेत्रांत वास करणारे या सर्वांस कलीसंबंधीं दोष लागत नाहीं. कलियुगांत गुरुभक्ति ही देवाच्या भक्तीहून अधिक आहे असें सांगितलें

आहे. जपाविषयीं जी संख्या सांगितली असेल ती कलियुगांत चौपट जाणावी. दान व शिव आणि विष्णु यांचें नामसंकीर्तन हीं कलियुगांत महाश्रेष्ठ होत. कृतयुगीं जी सिद्धि दहा वर्षांनीं होते तीच त्रेतायुगीं एका वर्षानें, द्वापरयुगीं एका महिन्यानें व कलियुगांत एका अहोरात्रानें सिद्ध होते. कलियुगांत पुण्यें जशीं शीघ्रफलदायी होतात तशीं पापें होत नाहींत; कारण—केलेलीं पापेंच सिद्ध होतात, असें वचन असल्यामुळें कलियुगांत पुण्यकर्मांची सिद्धि केवळ संकल्पानें होते; पण पापें मात्र आचरलेलींच सिद्ध होतात, असें प्रथम स्कंधांत सांगितलें आहे. दुसऱ्या स्मृतीशीं विरोध असेल तर कलियुगांत पराशरस्मृति ग्राह्य धरावी, कृतयुगांत ध्यानानें, त्रेतायुगांत यज्ञानें व द्वापरयुगांत पूजेनें जें सिद्ध होतें तें कलियुगांत केवळ केशवाच्या नामसंकीर्तनानें प्राप्त होतें, असें हेमाद्रींत व्यासांचें वचन आहे. कृतयुगांत ध्यानानें जें फल मिळतें तें मिळविण्यासाठीं कलियुगांत केशवाचें नामसंकीर्तन करावें असा वाक्यार्थ कौस्तुभाचा कर्ता जो अनंतदेव त्याच्या पितामहांनीं भक्तिनिर्णयग्रंथांत विस्तारानें प्रतिपादिला आहे. हेमाद्रीमध्यें चार युगांत कलिच श्रेष्ठ आहे असें समजून गुणज्ञ व गुणग्राहक आर्यांनीं म्हणजे साधूंनीं कलीची प्रशंसा केली आहे. कारण केवळ संकीर्तनानेंच कलियुगांत सर्व स्वार्थ प्राप्त होतो असें श्रीभागवतांतील वचन सांगून संकीर्तन म्हणजे हरिकीर्तन असा अर्थ हेमाद्रींतच सांगितला आहे. हृदयादि अंगें, कौस्तुभादि उपांगें, सुदर्शनादि अस्त्रें व सुनंदनंदादि पार्षदगण यांनीं युक्त असलेल्या इंद्रनील मण्याप्रमाणें वर्ण असलेल्या उज्ज्वल श्रीकृष्ण परमात्म्याची पूजा शहाणे लोक संकीर्तनयुक्त यज्ञांनीं करितात. पंचमहायज्ञादि आपआपले आचार आचरणारांनींही नित्यकर्म करून राहिलेला काल भगवन्नामसंकीर्तनांत घालवावा, असा अभिप्राय कौस्तुभांत आहे. यावरून धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचें फल नारायणाच्या आश्रयानेंच होतें असें सिद्ध झालें; कारण चतुर्विध पुरुषार्थांच्या प्राप्तीस आवश्यक असलेल्या साधनसंपत्तीशिवाय केवळ नारायणाच्या आश्रयानें पुरुषास हे चतुर्विध अर्थ प्राप्त होतात, असें भारतांत वचन आहे.

श्रीभागवतेऽपि धर्मार्थकाममोक्षाख्यंयइच्छेच्छ्रेयआत्मनः। एकंह्येवहरेस्तत्रकारणंपादसेवनम् १ इति अत्रएकपदावधारणादिपदैरन्यसाधनानपेक्षत्वंभक्तियोगस्योच्यते ज्ञानयोगादेश्चहरिपादसेवनसापेक्षत्वंध्वन्यते तथाचस्पष्टमेकादशादौ तस्मान्मद्भक्तियुक्तस्ययोगिनोवैमदात्मनः । नज्ञानंनचवैराग्यंप्रायःश्रेयोभवेदिह १ यत्कर्मभिर्यत्तपसाज्ञानवैराग्यतश्चयत् । योगेनदानधर्मेणश्रेयोभिरितरैरपि २ सर्वंमद्भक्तियोगेनमद्भक्तोलभतेऽञ्जसा । स्वर्गापवर्गंमद्धामकथंचिद्यदिवाञ्छति ३ इतिश्रेयःसृतिंभक्तिमुदस्यतेविभोक्लिश्यन्तियेकेवलबोधलब्धये । तेषामसौक्लेशलएवशिष्यतेनान्यद्यथास्थूलतुषावघातिनाम् इत्यादिपरसहस्रवचनानि ज्ञानयोगस्यभगवदाराधनंतत्प्रसादंचविनैवसिद्धिरितिकापिकेनाप्यनुक्तेश्च सर्वापेक्षाचयज्ञादिश्रुतेरश्ववदित्यधिकरणेज्ञानोत्पत्तौयज्ञादिसर्वसाधनापेक्षोक्तेश्च किंचभक्तियोगेदुराचारिणोपिदृढवैराग्यरहितस्याप्यधिकारोगम्यते अ-

पिचेत्सुदुराचारोभजतेमामनन्यभाक् । साधुरेवसमंतव्यः सम्यग्व्यवसितोहिसः १ क्षिप्रंभवतिधर्मात्माशश्वच्छांतिंनिगच्छति । कौन्तेयप्रतिजानीहिनमेभक्तः प्रणश्यति २ ननिर्विण्णोनातिसक्तोभक्तियोगोस्यसिद्धिदः । इत्यादिवचनेभ्यः नैवंदुराचारिणापिदृढवैराग्यादिसाधनचतुष्टयसंपत्त्यभावेपि वेदान्तश्रवणाद्यनुष्ठितौज्ञानोत्पत्तिर्भवतीतिक्वाप्युलभ्यते नचयथोक्ताधिकारसंपत्तिं विनानुष्ठितंसाधनंकिमपिफलायकल्पते तस्मात्सर्वथासर्वैःकलौश्रीहरिपादसेवनादिभक्तियोगाश्रयणमेवकर्तव्यमितिसिद्धम् ॥

**भागवताचा कलिकर्मविचार**—श्रीभागवतांतही असें सांगितलें आहे कीं, धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे मिळवूं इच्छिणाऱ्या पुरुषानें एक हरीच्या चरणाचेंच सेवन करावें. या वाक्यांत 'एक' इत्यादि अवधारणादि पदांवरून भक्तियोगास इतर साधनांची गरज नाहीं असें सूचित होतें व ज्ञानयोगादिकांस हरिपादसेवेची अपेक्षा आहे असें ध्वनित होतें. तसेंच अकराव्या स्कंधांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, माझ्या भक्तीनें युक्त असल्यानें माझ्या ठायीं चित्त असणाराचें कल्याणाचें साधन ज्ञान व वैराग्य हीं होणार नाहींत; कर्मांनीं तपश्चर्येनें, ज्ञानानें, वैराग्यानें, योग, दान, धर्म व इतर तीर्थव्रतादि इतर श्रेय साधनांनीं जें प्राप्त होतें तें सर्व माझ्या भक्ताला भक्तियोगानें अनायासें प्राप्त होतें. स्वर्ग, मोक्ष व वैकुंठ यांची जर तो इच्छा करील तर त्यास तेंही प्राप्त होतील. हे विभो, अभ्युदय व मोक्ष यांना देणारी अशी तुझी भक्ति सोडून जे कोणी ज्ञानप्राप्तीसाठीं यत्न करतात त्यांना केवळ क्लेश मात्र होतात; दुसरें कांहींएक मिळत नाहीं. जाडा कोंडा घेऊन तो कांडणारास जसे क्लेशच होतात त्याप्रमाणें तुझी भक्ति तुच्छ मानून ज्ञानासाठीं धडपडणारास श्रमच होतात. अशा प्रकारचीं आणखी हजारों वचनें आहेत. भगवदाराधन व भगवत्प्रसाद यांशिवाय ज्ञानयोगाची सिद्धि होते असें कोणीही कोठेंही सांगितलेलें नाहीं. 'सर्वापेक्षाच यज्ञादिश्रुतेरश्ववत्' या अधिकरणांत 'अश्व जसा रथवाहनाला साधन आहे,' या दृष्टांतानें 'विविदिशंती यज्ञेन, दानेन' या श्रुतींस अनुसरून ज्ञानप्राप्तीस सर्व साधनांची आवश्यकता आहे असें सांगितलें आहे. पण भक्तियोगामध्यें दृढवैराग्यरहित दुराचाऱ्यासही अधिकार आहे. अत्यंत दुराचारी असला तरी जर तो माझी अनन्यभक्ति करील तर तो साधुच आहे असें मानावें; कारण मी भगवद्भक्तीनें कृतार्थ होईन, 'असा सद्व्यवसाय त्यानें केला आहे. यामुळें तो लवकरच धर्मात्मा होऊन परमेश्वरनिष्ठारूप शांति पावतो. हे अर्जुना, माझ्या भक्तांचा कधीं नाश होत नाहीं हें पक्कें ध्यानांत धर. तो निर्विण्ण नसला व अति आसक्त नसला तरी भक्तियोगानें त्याला सिद्धि प्राप्त होते, इत्यादि वचनें आहेत. दृढवैराग्य इत्यादि साधनचतुष्टयसंपत्ति जवळ नसतां वेदान्ताचें श्रवण केलें तर ज्ञान प्राप्त होतें. असें कोठेंही आढळत नाहीं. यथोक्त अधिकारसंपत्तीवांचून कांहींएक साधन आचरिलें तरी फलप्राप्ति होत नाहीं; म्हणून सर्वांनीं सर्वात्मभावानें कलियुगांत श्रीहरिचरणांची सेवा करणें हा जो भक्तियोग त्याचा आश्रय करावा, असें सिद्ध होतें.

अथकलौनिषिद्धानि । समुद्रयात्रास्वीकारःकमण्डलुविधारणम् द्विजानामसवर्णासुकन्यासूपयमस्तथा ॥ १ ॥ देवराद्यैःसुतोत्पत्तिर्मधुपर्केपशोर्वधः मांसदानंतथाश्राद्धेवानप्रस्थाश्रमस्तथा ॥ २ ॥ दत्ताक्षतायाःकन्यायाः पुनर्दानंपरस्यच । दीर्घकालंब्रह्मचर्यंनरमेधाश्वमेधकौ ॥ ३ ॥ महाप्रस्थानगमनंगोमेधश्चतथामखः । इमान्धर्मान्कलियुगेवर्ज्यानाहुर्मनीषिणः ॥ ४ ॥ मद्यंवर्ज्यंमहापापेमरणान्तविशोधनम् । सौत्रामण्यादियज्ञेपिसुरापात्रग्रहस्तथा ॥ ५ ॥ मद्यभक्षादिवामाद्यागमस्यतुनमानता । मीमांसाद्वितयेसर्वशिष्टैश्चतदनादरात् ॥ ६ ॥ औरसोदत्तकश्चैतौपुत्रौकलियुगेस्मृतौ । अन्यान्दशविधान् पुत्रान्क्रीताद्यान्वर्जयेत्कलौ ॥ ७ ॥ कौस्तुभेस्वयंदत्तस्तृतीयोपिकलौविहितइतिनैवकलौनिषिद्धाइत्युक्तम् कलियुगेब्रह्महन्त्रादेरेवाव्यवहार्यत्वादिरूपंपातित्यम् तत्संसर्गिणस्तुनरकहेतुदोषसत्त्वेपिपातित्यंनास्ति संसर्गदोषःपापेष्विति कलिवर्ज्येषुवचनात् कृतेसंभाष्यपततित्रेतायांस्पर्शनेनतु । द्वापरेत्वन्नमादायकलौपततिकर्मणा ॥ १ ॥ इतिवचनाच्च ब्रह्महननादिकर्मणैवपातित्यंनसंसर्गमात्रेणेतितदर्थात् इदंचलोकेष्वबहिष्कृतपातकिषुलोकविद्विष्टत्वेनापरिहार्यसंसर्गेपातित्याभावपरम् नहिलोकेष्वबहिष्कृतानांप्रच्छन्नाभक्ष्यभक्षणापेयपानागम्यागमनादिपातकवतांतज्ज्ञानवतातिशिष्टेनापिसंभाषणादिसंसर्गोनरकहेतुरपि परिहर्तुंशक्यते लोकविद्वेषापातात् लोकबहिष्कृतपापिनांसंसर्गस्तुपातित्यहेतुरेवतथैवशिष्टाचारादितिमेभाति अतएव त्यजेद्देशंकृतयुगेत्रेतायांग्राममुत्सृजेत् । द्वापरेकुलमेकंतुकर्तारंतुकलौयुगे ॥ १ ॥ इतिवाक्येकर्तृत्यागोविधीयते त्यागोहिसंसर्गपरिहारएव किंचानेनवाक्येनयत्रकुलादौब्रह्महत्यादिपातकीनिष्पद्यतेतत्कुलादिकंद्वापरादावेवबहिष्कार्यंनतुकलौकुलादेर्बहिष्कारः किंतुकर्तुरेवकलौबहिष्कारइतिप्रतिपाद्यते नचैतद्वाक्यविरोधिवाक्यान्तरंपतितसगोत्रसपिण्डादीनांकर्मानर्हत्वासंव्यवहार्यत्वप्रतिपादकंक्वापिग्रन्थेउपलभ्यते यत्तुनिर्णयसिन्धौघटस्फोटप्रकरणेगृहेषुस्वैरमापद्येरन्नितिवसिष्ठवचनसामर्थ्यात्पात्रनिनयनात्प्राक्पतितज्ञातीनांधर्मकार्येष्वधिकारोनास्तीत्यपरार्कव्याख्यानमुपन्यस्तंतन्नसर्वपतितविषयम् किंतु घटस्फोटार्हप्रायश्चित्तानिच्छुतितविषयम् अन्यथापात्रनिनयनात्प्रागितिनवदेत् प्रायश्चित्तात्प्रागित्येववदेत् कर्तारंतुकलौयुगेइत्यादिप्रत्यक्षवचनेनविरोधेर्थापत्तिमूलकस्यसर्वपतितविषयककुलबहिष्कारवर्णनस्यपुरुषव्याख्यानरूपस्याप्रामाण्यापाताच्चेतिभातिइतिसंक्षेपः ॥

**पातित्यनिर्णय**—समुद्रपर्यटन करणाराचा स्वीकार करणें, उदकयुक्त कमंडलूचें धारण करणें, असवर्ण (स्वजातिभिन्न) कन्यांशीं द्विजांनीं विवाह करणें, दीर इत्यादिकांपासून पुत्र उत्पन्न करणें, मधुपर्कांत पशूचा वध करणें, श्राद्धांत मांस देणें, वानप्रस्थाश्रम स्वीकारणें, एकदां दान केलेल्या अक्षता व कन्येचें पुन्हा दुसऱ्यास दान करणें, दीर्घकाल ब्रह्मचर्य, नरमेध, अश्वमेध, महाप्रस्थानगमन म्हणजे उत्तर दिशेची यात्रा करणें, व गोमेधयज्ञ हे धर्म

कलियुगांत ब्राह्मणांनीं वर्ज्य करावेत, असें शहाण्यांचें मत आहे. मद्यसेवनादि वाम-मार्गादिकांचीं शास्त्रें मानूं नयेत; कारण पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या दोन्ही शास्त्रांत मद्याचा निषेध केला आहे. मद्यपान वर्ज्य करावें. महापातकास मरणान्त प्रायश्चित्त. सौत्रामण्यादि यज्ञांतही सुरापात्रांचें ग्रहण वर्ज्य करावें. कलियुगांत औरस व दत्तक हे दोन पुत्र उक्त आहेत. इतर म्हणजे क्रीतादिक दहा प्रकारचे पुत्र कलीमध्यें वर्ज्य करावेत. कौस्तुभग्रंथांत स्वयंदत्त पुत्रही कलीमध्यें विहित असें सांगून नऊच प्रकारचे पुत्र निषिद्ध सांगितले आहेत. कलियुगांत ब्रह्महत्त्या कर-णारास अव्यवहार्यत्वादिरूप पातित्य आहे. ब्रह्महत्त्या करणाराबरोबर संसर्ग करणारास नरकास कारण असलेला दोष लागतो, पण त्यास पातित्य नाहीं. पापांत संसर्गदोष नाहीं असें कलिवर्ज्यांत वचन आहे. कृतयुगांत पाप्याशीं संभाषण केलें असतां पातित्य येतें, त्रेतायुगांत पाप्याला स्पर्श केल्यानें, द्वापरयुगांत पाप्याचें अन्न ग्रहण केल्यानें व कलियुगांत साक्षात् कर्म केल्यानें पातित्य येतें, असेंही वचन आहे. ब्रह्महत्त्यादि कर्मानेंच पातित्य येतें, संसर्गानें तसें होत नाहीं, असा या वचनांचा अर्थ आहे. म्हणून लोकांत बहिष्कृत नसून ज्या पातकी लोकांच्या संसर्गाचा परिहार करणें लोकविद्विष्टत्वामुळें अशक्य आहे अशा संसर्गाविषयींच हें वचन आहे असें जाणावें. लोकांत बहिष्कृत नाहींत पण जे गुप्तपणानें अभक्ष्यभक्षण, अपेयपान, अगम्यगमन इत्यादि पातकें करितात असें ज्याला माहीत आहे त्यानें त्यांच्याशीं संभाषणादि संसर्ग करणें नरकास कारण असलें तरी त्याचा परिहार करणें शक्य नाहीं, कारण तसें केल्यानें लोकांत द्वेष उत्पन्न होतो. लोकांनीं बहिष्कृत केलेल्या पाप्यांचा संसर्ग पातित्याला कारण आहे व शिष्टाचारही असाच आहे असें मला वाटतें. यासाठीं कृतयुगांत देशाचा, त्रेतायुगांत ग्रामाचा, द्वापरयुगांत कुळाचा व कलियुगांत पातककर्त्यांचा त्याग करावा असें जें वाक्य आहे, त्यांत कर्त्यांचा त्याग करावा असा विधि प्राप्त होतो. त्याग म्हणजे संसर्गाचा परिहार समजावा. या वाक्यावरून ब्रह्महत्त्यादि पातकें करणारा पापी जर कुलांत उत्पन्न झाला तर तें कुल द्वापरयुगांत बहिष्कृत करावें. कलियुगांत कुलास बहिष्कार नाहीं. प्रत्यक्ष पापकर्त्यासच बहिष्कार आहे असें प्रतिपादन होतें. पतिताचे सगोत्र सपिंडांनीं कोणतेंही कर्म करूं नये व लोकांशीं व्यवहार ठेवूं नये असें प्रतिपादणारें व वरील वाक्याशीं विरोध असणारें दुसरें वचन कोणत्याही ग्रंथांत आढळत नाहीं. निर्णयसिंधूंत घटस्फोटप्रकरणीं 'गृहा-मध्यें स्वेच्छेनें यावें' हें वसिष्ठवचन प्रबल मानून पात्रनिनयनाच्यापूर्वीं पतिताच्या ज्ञातीला धर्मकार्यास अधिकार नाहीं असा जो अपरार्कग्रंथाचे व्याख्यानाचा उपन्यास केला आहे, तो सर्व पतितविषयक नसून, घटस्फोटास योग्य व प्रायश्चित्ताची इच्छा न करणारा जो पतित तद्विषयक आहे. तसें नसतें तर 'पात्रनिनयानाच्या पूर्वीं' असें न सांगतां 'प्रायश्चित्ताच्या पूर्वीं' असेंच सांगितलें असतें. कलियुगांत कर्त्याचा त्याग करावा इत्यादि प्रत्यक्ष वचनाशीं विरोध असतां अर्थापत्तिमूलक सर्व पतितविषयक

णें पुरुषव्याख्यानरूप कुलबहिष्कारवर्णन, तें अप्रमाण होईल असें वाटतें. असा हा थोडक्यांत निर्णय आहे.

नचैवंघटस्फोटविधिर्व्यर्थइतिवाच्यम् । तस्यपारलौकिकदोषपरिहारार्थत्वात् लोकबहिष्कृतपातकिविषयेसंभाषणादिसंसर्गस्यपातित्यहेतुत्वाभावेऽपि परत्रनरकजनकदोषहेतुत्ववत्पतितेनसहैककुलत्वसंसर्गस्यापीहपातित्यादिदोषहेतुत्वाभावेऽपिपारत्रिकदोषहेतुत्वात् अत्रचघटस्फोटविधेरेवार्थापत्तिविधायमानत्वात् तथाच पारत्रिकदोषपरिहारार्थघटस्फोटविधिरितिनतद्विधिबलेनपतितमात्रस्यकुलेबहिष्कारः सत्राख्यंयज्ञःकलौवर्ज्यः ब्रह्महत्त्यादिमहापातकेषुप्रायश्चित्तेननरकनिवृत्तिर्नभवतिकिंत्विहलोकेव्यवहार्यतामात्रंकलौभवति स्वर्णस्तेयादिषुतुप्रायश्चित्तेननरकानिवृत्तिर्व्यवहार्यताच केचित्तुरहस्यकृतेषुमहापापेषुरहस्यप्रायश्चित्तंकलौनोपदेष्टव्यमित्याहुः विप्रादिस्त्रीसंभोगेन भ्रष्टानांशूद्रादीनांप्रायश्चित्तेऽपिसंसर्गोनिषिद्धः यज्ञेपशुमारणंसोमविक्रयश्च विप्राणांकलौवर्ज्यः ज्येष्ठादिसर्वभ्रातृणांसमभागःकलौस्मृतः । आततायिद्विजानांनोधर्मयुद्धेऽपिहिंसनम् ॥ १ ॥ अब्धौनौयातुर्द्विजस्यप्रायश्चित्तेऽपिसंसर्गोन गवार्थेब्राह्मणार्थेचप्राणत्यागःकलौनहि । द्विजानांगोपशूद्रादौभोज्यान्नत्वंकलौनहि ॥ १ ॥ शिष्यस्यगुरुपत्नीषुनचिरंवासशीलता । आपदिक्षत्रवैश्यादिवृत्तिंविप्रः कलौत्यजेत् ॥ २ ॥ कलौद्विजोनहिभवेदश्वस्तनिकजीविकः । द्वादशाब्दं गुरौवासंमुखाग्निधमनंक्रियाम् ॥३॥ यतेर्भिक्षांसर्ववर्णेकलौत्रीणिविवर्जयेत् । नवोदकनिषेधंचदक्षिणांगुरुवाञ्छिताम् ॥ ४ ॥ वृद्धरुग्णादिमरणंजलाग्निपतनादिभिः । गोतृप्तिमात्रेभूमिष्ठेपयस्याचमनक्रियाम् ॥ ५ ॥ पितृवादेसाक्षिदण्डंकलौपञ्चविवर्जयेत् । घृतदुग्धादिभिःपक्कमन्नंशूद्रात्कलौत्यजेत् ॥ ६ ॥ भिक्षामटन्यतीरात्रौनवसेद्गृहिणांगृहे । विधूमसन्नमुसलेकालेभिक्षांकलौत्यजेत् ॥ ७ ॥ चत्वार्यब्दसहस्राणिचत्वार्यब्दशतानिच । कलेर्यदागमिष्यन्तितदात्रेतापरिग्रहः ॥८॥ संन्यासश्चनकर्तव्योब्राह्मणेनविजानता । त्रेतापरिग्रहःसर्वाधानम् अर्धाधानंस्मृतंश्रौतस्मार्ताग्न्योस्तुपृथक्कृतिः सर्वाधानंतयोरैक्यकृतिःपूर्वयुगाश्रया ॥ ९ ॥ अस्यापवादः यावद्वर्णविभागोऽस्तियावद्वेदःप्रवर्तते । संन्यासंचाग्निहोत्रंचतावत्कुर्यात्कलौयुगे ॥ १० ॥ इतिशपथाः शकुनाःस्वप्नाःसामुद्रिकमुपश्रुतिः । देवपूजोपहारादेःसंकल्पःकार्यसिद्धये ॥ ११ ॥ प्रश्नोत्तरंकालविदांसंभवन्तिकलौक्वचित् इतिकलौकार्याकार्यनिर्णयः ॥

**घटस्फोटादि कलिनिर्णय**—यावरून घटस्फोटाचा विधि व्यर्थ आहे असें म्हणूं नये. कारण, घटस्फोटविधि केला असतां परलोकसंबंधीं दोषाचा परिहार होतो. लोकांनीं बहिष्कृत केलेल्या पातकी पुरुषाबरोबर संभाषणादि संसर्ग केला असतां तो पातित्यास कारण नसला तरी परलोकीं नरक उत्पन्न करणाऱ्या दोषास जसा कारण आहे, तसा पतितासह एक कुलसंसर्ग या लोकीं पातित्यादि दोषास जरी कारण नसला तरी तो परलोकसंबंधीं दोषास

कारण आहे. येथें घटस्फोटविधि अर्थापत्तिप्रकारानें प्रमाण होत आहे व परलोकसंबंधीं दोषाचा परिहार होण्यासाठीं घटस्फोटविधि आहे, म्हणून घटस्फोटविधीच्या सामर्थ्यानें पतिताच्या कुलावर बहिष्कार घडत नाहीं. सत्र नांवाचा यज्ञ कलियुगीं करूं नये. कलियुगांत ब्रह्महत्त्यादि महापातकें झालीं असतां प्रायश्चित्तानें नरकनिवृत्ति होत नाहीं. या लोकीं व्यवहाराची मात्र योग्यता कलींत प्राप्त होते. सुवर्णाची चोरी इत्यादि पातकें झालीं असतां प्रायश्चित्तानें नरकनिवृत्ति व व्यवहाराची योग्यता हीं प्राप्त होतात. कित्येक ग्रंथकारांचें असें मत आहे कीं, एकांतांत झालेल्या महापातकांस कलियुगांत रहस्य प्रायश्चित्त सांगूं नये. ब्राह्मणादिकांच्या स्त्रियांच्या संभोगानें भ्रष्ट झालेल्या शूद्रादिकांनीं प्रायश्चित्त घेतलें तरी त्यांचा संसर्ग निषिद्ध आहे. यज्ञांत पशूचा वध व सोमविक्रय हीं कलियुगांत ब्राह्मणांनीं करूं नयेत. कलियुगांत ज्येष्ठ इत्यादि सर्व भ्रात्यांस समान भाग उक्त आहे. आततायी द्विजांची धर्मयुद्धांतही हिंसा करूं नये. नौकेंत बसून समुद्रयान करणाऱ्या द्विजानें प्रायश्चित्त घेतलें तरी त्याशीं संसर्ग करूं नये. कलियुगांत गाईसाठीं व ब्राह्मणासाठीं प्राणत्याग करूं नये. कलीमध्यें ब्राह्मणांनीं गवळी, शूद्र इत्यादिकांचें अन्न सेवन करूं नये. शिष्यानें गुरूच्या स्त्रियांजवळ चिरकाल वास करूं नये. आपत्कालीं ब्राह्मणांनीं क्षत्रिय, वैश्य इत्यादि वृत्तींचा त्याग करावा. कलियुगांत ब्राह्मणानें अश्वस्तनिक, जीविक म्हणजे दोन तीन दिवस पुरेल इतका धान्यसंचय करून उपजीविका करणारा असें राहूं नये. कलियुगीं गुरूजवळ बारा वर्षें वास, मुखानें अग्नि प्रदीप्त करणें व संन्यासानें सर्व वर्णांकडे भिक्षा मागणें, या तीन गोष्टी वर्ज्य कराव्या. त्याचप्रमाणें नूतन उदक न घेणें, गुरूस इच्छित दक्षणा देणें, वृद्ध, रोगी इत्यादिकांनीं जलसमाधि, अग्निपतन, भृगुपतन ( कड्यावरून पडणें ) यापासून मरणें, गाईची तृप्ति होईल इतक्याच उदकांत आचमन करणें व पितापुत्रांच्या वादांत साक्षीदारांस दंड करणें या पांच गोष्टी कलींत वर्ज कराव्या. तुपांत व दुधांत पक्क झालेलें अन्न शूद्रापासून घेऊं नये. भिक्षेसाठीं भ्रमण करणाऱ्या संन्याशानें गृहस्थाश्रमी पुरुषाचे घरीं राहूं नये. धूम व मुसळाचा आघात नसेल अशा कालीं संन्याशानें भिक्षा घेऊं नये. कलीचीं ४४०० वर्षें गेल्यावर झाल्या ब्राह्मणानें त्रेतापरिग्रह व संन्यास हीं धारण करूं नयेत. त्रेतापरिग्रह म्हणजे सर्वाधान श्रौताग्नि व स्मार्ताग्नि निरनिराळे करणें, याचें नांव अर्धाधान व तें एकत्र करणें तें सर्वाधान. हें पूर्वयुगीं होतें. कलींत जोंपर्यंत वर्णाश्रमधर्म व वेद चालत आहेत. तोंपर्यंत संन्यास व अग्निहोत्र यांचें आचरण करावें, हा यास अपवाद होय. शपथ, शकुन, स्वप्न, सामुद्रिक, उपश्रुति कार्यसिद्धीसाठीं देवपूजा, उपहार इत्यादिकांचा संकल्प व कालवेत्त्यांचीं प्रश्नोत्तरें हीं कलियुगांत क्वचित् संभवतील. याप्रमाणें कलियुगांत काय करावें व काय करूं नये, याचा निर्णय सांगितला.

**अथस्वप्नविचारः स्वप्नोद्विविधः इष्टफलोऽनिष्टफलश्चेति तत्रसामान्यतइष्टफलोयथा नदीसमुद्रतरणमाकाशगमनंतथा। गृहनक्षत्रमार्तंडचंद्रमंडलदर्शनम् १ हर्म्यस्यारोहणंचैवप्रासादशिरसोऽपिवा स्वप्नेचमदिरापानंवसामांसस्यभक्षणम्**

२ कृमिविष्टानुलेपश्चरुधिरेणाभिषेचनम् ॥ भोजनंदधिभक्तस्यश्वेतवस्त्रानुलेपनम् ३ रत्नान्याभरणादीनिस्वप्नेदृष्ट्वाप्रसिद्ध्यति । देवताविप्रपृथ्वीशान्प्रशस्ताभरणाङ्गनाः ४ वृषेभपर्वतक्षीरिफालेवृक्षाधिरोहणम् । दर्पणामिषमाल्याप्तिशुक्लपुष्पाम्बराश्रितान् द्रष्टुःस्वप्नेऽर्थलाभःस्याद्व्याधिमोक्षश्चजायते ॥

**स्वप्ननिर्णय**—शुभ फलदायक व अशुभ फलदायक असे जे स्वप्नांचे दोन प्रकार आहेत, त्यांपैकीं, सामान्यतः शुभफल स्वप्न सांगतों. नदी व समुद्र तरणें, आकाशांत गमन, ग्रह, नक्षत्रें, सूर्यमंडल व चंद्रमंडल यांचें दर्शन, घर, देवालय अथवा राजवाडा यांच्या शिखरांवर आरोहण; मद्यपान, मज्जा व मांसभक्षण, कृमि, विष्ठा यांचा अंगास लेप, रुधिराचें स्नान, दहींभाताचें भोजन व श्वेतवस्त्र, श्वेतग्रंथ, रानें, अलंकार हीं स्वप्नांत पाहिलीं असतां कार्यसिद्धि होईल. देवता, विप्र, राजा, उत्तम अलंकार धारण केलेल्या स्त्रिया, बैल, हत्ती, पर्वत, औदुंबर वृक्ष यांवर आरोहण, आरसा, मांस व पुष्पें यांची प्राप्ति, श्वेत पुष्पें व वस्त्रें धारण करणारे स्वप्नांत पाहिले असतां पाहाणारास द्रव्यलाभ होईल व रोग दूर होईल.

अथानिष्टफलः दुष्टंकिंशुकवल्मीकपारिभद्राधिरोहणम् । तैलकार्पासपिण्याकलोहप्राप्तिर्विपत्तये ॥ १ ॥ विवाहकरणंस्वप्नेरक्तस्रग्वस्त्रधारणम् । स्रोतसाहरणंनेष्टंपक्वमांसस्यभोजनम् ॥ २ ॥ आदित्यस्याथचन्द्रस्यनिष्प्रभस्यावलोकनम् नक्षत्रादेश्चपातस्यस्वप्नेमरणशोककृत् ॥ ३ ॥ अशोककरवीरपलाशानांपुष्पितानांस्वप्नेदर्शनेशोकःनौकारोहणेप्रवासः रक्तवस्त्रगन्धधारिण्यास्त्रियालिङ्गनेमृत्युः घृततैलादिनाभ्यङ्गेव्याधिःकेशदन्तपातेधननाशःपुत्रशोकोवा खरोष्ट्रमहिषैर्यानेतशुक्करथारोहणेवामृत्युःकर्णनासाकरादिच्छेदेपङ्कमज्जनेतैलाभ्यङ्गेविषभक्षणेप्रेतालिङ्गनेनलदमालिनोदिगम्बरस्ययानेकृष्णपुरुषदर्शनेच मृत्युः ॥

**अशुभस्वप्ननिर्णय**—पळस, वारूळ व कडुलिंब यांवर आरोहण, तेल, कापूस पेंड व लोखंड यांची प्राप्ति, हें विपत्तिकारक होय. विवाह करणें, तांबड्या पुष्पांची माला व आरक्त वस्त्र धारण करणें, उदकाच्या प्रवाहानें वाहून जाणें व शिजलेलें मांस भक्षण करणें हीं पाहिलीं असतां नाशकारक जाणावीत. स्वप्नांत सूर्य व चंद्र हे प्रभाहीन पाहाणें व आकाशांतून तारे पडतांना दिसणें यांपासून मरण अथवा शोक प्राप्त होतो. अशोक, करवेल व पळस हे वृक्ष पाहिले असतां शोक प्राप्त होतो. नौकेंत आरोहण केलेलें पाहिल्यास, प्रवास प्राप्त होतो. आरक्त वस्त्र व आरक्त पुष्पें धारण करणाऱ्या स्त्रियेस आलिंगन केलें असतां मृत्यु प्राप्त होतो. घृत व तेलादिकांचा अंगास अभ्यंग केलेला पाहिल्यास व्याधि प्राप्त होईल. केश गळाले व दांत पडले असें पाहिल्यास धननाश किंवा पुत्रशोक होईल. गर्दभ व उंट अथवा रेडा यांजवर बसलेले किंवा रथास जुंपून त्यांत आरोहण केलेले पाहिल्यास मृत्यु येईल. नाक, कान इत्यादि अवयवाचा छेद

चिखलांत बुडणें, तैलाभ्यंग, विषभक्षण, प्रेताचें आलिंगन व जास्वंदीच्या फुलांच्या माळा धारण केलेल्या नग्न व कृष्णवर्ण पुरुषाचें दर्शन, हीं सर्व मृत्युकारक होत.

अथजागृतावनिष्टानि । अरुन्धतींध्रुवंचैवनभोमन्दाकिनीतथा । स्वनासाग्रं-चन्द्राङ्कमायुर्हीनोनपश्यति ॥ १ ॥ पांसुपङ्कादिषुन्यस्तचरणंखण्डितं यदि । स्नानाम्बुलिप्तगात्रस्ययस्यास्यंप्राक्प्रशुष्यति ॥ २ ॥ मात्रेष्वार्द्रेषुसूर्यादिद्वय-दर्शनम् । स्वर्णप्रतीतिर्वृक्षेषुस्वपदानामदर्शनम् ॥ ३ ॥ पिहितेकर्णयुगुलेयस्य-घोषानुपश्रुतिः अदर्शनंस्वशिरसःप्रतिबिम्बेजलादिषु ॥ ४॥ छिद्रप्रतीतिच्छा-यायांसचिरंनैवजीवति ॥

**जागृतींतलीं अरिष्टें**—ज्याचें आयुष्य संपलें असेल त्याला—अरुंधति, ध्रुव, आकाशगंगा स्वतःच्या नाकाचा शेंडा व चन्द्रावरचे डाग दिसत नाहींत. ज्याचीं पावलें धूळ व चिखल यांत भरलीं तरी ( छापांत ) तुटक दिसतील किंवा अंघोळ केल्यावर सर्व शरीराच्या आधीं ज्याचें तोंड आधीं आपल्याआपण कोरडें होईल, सूर्यादि तारे ज्याला दोन दिसूं लागतील, सारीं झाडें ज्याला सोन्यासारखीं ( पीतवर्ण ) दिसूं लागतील, ज्याचीं पावलें त्याला चिख-लांत दिसणार नाहींत, कानांत बोटें घातलीं असतां त्यांतला आवाज ज्याला ऐकूं येणार नाहीं, पाण्यांत ज्याला स्वतःच्या मुंडक्याची पडछाया दिसणार नाहीं व आपल्याच सावलींत ज्याला भोंकें दिसतात—तो पुरुष फार दिवस जगत नाहीं.

अथविशेषतइष्टफलाःस्वप्नाः । यस्तुपश्यतिवैस्वप्नेराजानंकुञ्जरंहयम् । सुवर्णं-वृषभंगांवाकुटुम्बंतस्यवर्धते ॥ १ ॥ वृषंवृक्षंवारुह्यतत्रस्थस्यजागरेधनाप्तिःश्वेतस-र्पेणदक्षिणभुजदंशेदशदिनेसहस्रधनलाभःजलस्थस्यवृश्चिकोरगग्रासेजयपुत्रधना-निप्रासादशैलारोहणेसमुद्रतरणेराज्यम् तडागमध्येपद्मपत्रेषुघृतपायसभोजने राज्यम् बलाकाकुक्कुटीक्रौञ्चीदर्शनेभार्याप्राप्तिःनिगडैर्बन्धेबहुपाशबन्धेवापुत्र-धनादि आसनेशयनेयाने शरीरेवाहनेगृहे । ज्वलमानेविबुध्येततस्यश्रीःसर्वतो-मुखी ॥ १ ॥ सूर्यचन्द्रमण्डलदर्शनेरोगिणोरोगनाशोन्यस्यधनम् सुरारुधिरयोः पानेविप्रस्यविद्याशूद्रादेर्धनम् शुक्लाम्बरगन्धधारिण्यासुभगास्त्रियालिङ्गनेसंप-त्तिःछत्रपादुकोपानखड्गलाभेधनम् वृषभयुक्तरथारोहणेधनम् दधिलाभेवेदाप्तिः दधिपयःपानेघृतलाभेचयशःघृतभक्षणेक्लेशःअन्त्रैर्वेष्टनेराज्यम् मनुष्यस्यचरण-मांसभक्षणेशतंलाभः बाहुभक्षणेसहस्रम् शीर्षमांसभक्षणेराज्यं वा सहस्रधनंवा सफेनक्षीरपानेसोमपानम् गोधूमदर्शनेधनलाभः यवदर्शने यज्ञः गौरसर्षपदर्शने-लाभःनागपत्रंलभेत्स्वप्नेकर्पूरागमनंतथा चन्दनंपाण्डुरंपुष्पंतस्यश्रीःसर्वतोमुखी ॥१॥ सर्वाणिशुक्लान्यतिशोभनानिकार्पासभस्मौदनतक्रवर्ज्यम् । सर्वाणिकृष्णा-न्यतिनिन्दितानिगोहस्तिदेवद्विजवाजिवर्ज्यम् ॥ २ ॥ स्वप्नस्तुप्रथमेयामेवत्स-रान्ते फलप्रदः । द्वितीयेऽष्टमासैः तृतीयेत्रिमासान्ते चतुर्थेयामेमासान्ते अरुणोदयेदशाहान्ते सूर्योदयेसद्यःफलम् ॥

**शुभस्वप्नफल**—जो कोणी स्वप्नांत राजा, हत्ती, घोडा, सोनें, बैल व गाय पाहातो त्याची कुटुंबवृद्धि होते. बैल किंवा झाड यांवर बसलेला पाहूनच जो जागा होतो त्याला द्रव्य मिळतें. पांढरा साप उजव्या बाजूला डसलेला पाहिल्यास हजारों ( प्रकारचें ) द्रव्य मिळतें. देऊळ, पर्वत किंवा राजवाडा यांच्या डोक्यांवर आपण बसलों आहोंत असें पाहणाराला राज्य मिळतें. तळयाच्या मध्यावर कमळाच्या पानावर तूपखिरीचें जेवण जेवतांना स्वतःला जो पाहील किंवा बलात्कार, कोंबडी व क्रौंच पक्षी जो पाहील त्याला स्त्रीलाभ होतो. दोर किंवा साखळदंड यांनीं स्वतःस बांधलेलें जो पाहील त्याला पुत्र व धन मिळतात. आसन, बिछाना, पालखी, गाडी व वाहन यांना आग लागलेली पाहून जागा होणाऱ्याला सर्वदा लक्ष्मी पुढें उभी असलेली दिसेल. आजारी जर सूर्यमंडळ व चन्द्रमंडल पाहील तो लवकर रोगमुक्त होईल व साधा धनसंपन्न होईल. मद्य किंवा रक्त पितांना पाहाणारा ब्राह्मण विद्यासंपन्न होईल व शूद्राला धन मिळेल. पांढऱ्या वस्त्राच्या व पांढरें गंध लावलेल्याला सुंदर स्त्री आलिंगन देतांना पाहिल्यास धन मिळतें. छत्री, पादुका, जोडा व तलवार यांचा लाभ झाल्यास धन मिळतें. बैलाच्या रथावर बसलेलें पाहिल्यास द्रव्यप्राप्ति होते. दहीं मिळाल्यास वेदप्राप्ति होते. दहीं व दूध प्यायल्यास किंवा तूप मिळाल्यास यश मिळतें. तूप खातांना पाहिल्यास क्लेश होतात. आंतड्यांत गुंडाळलेलें पाहिल्यास राज्यप्राप्ति होते. मनुष्याच्या पायाचें मांस खातांना पाहिल्यास शंभर प्रकारचे लाभ व बाहू खाल्लेले पाहिल्यास हजार प्रकारचे लाभ होतात. मस्तकाचें मांस खाल्लेलें पाहिल्यास राज्यप्राप्ति किंवा हजारों धनांची प्राप्ति होते. फेंसाळ दूध पितांना पाहिल्यास सोमपान घडतें. गहूं, यव व पांढरी मोहरी पाहिल्यास अनुक्रमें धनलाभ, यशप्राप्ति व कांहींतरी लाभ होतात. नागपत्र, कापूर, चन्दन व पांढरें फूल यांचा स्वप्नांत लाभ झाल्यास सर्वकाल लक्ष्मी मिळते. स्वप्नांत भस्म, भात व ताक यांवांचून इतर कोणचेही पांढरे पदार्थ पाहिल्यास उत्तम, आणि गाय, हत्ती व देव यांवांचून पाहिलेले सर्व काळे पदार्थ वाईट. पहिल्या प्रहरांतलें स्वप्न एक वर्षानें फल देतें, दुसऱ्या प्रहरांत आठ महिन्यांनीं फल देतें, तिसऱ्या प्रहरांतलें तीन महिन्यांनीं फल देतें, चौथ्या प्रहराचें एक महिन्यानें फलद्रूप होतें, अरुणोदयाच्या वेळचें दहा दिवसांनीं फल देतें व सूर्योदयाचें तत्काळ फलप्राप्तिकर होतें.

अथदुःस्वप्नदर्शनेकृत्यम् योमेराजन्नित्यृचासूर्योपस्थानेदुःस्वप्ननाशः अधःस्वप्नस्येतिजपाद्वाक्वचिद्दर्शवच्छ्राद्धेनदुःस्वप्ननाशःचण्डीसप्तशतीपाठेनवा यद्वाश्रीविष्णुसहस्रनामस्तोत्रजपःकार्यः अथवाश्रीभारतस्थस्य श्रीमद्भागवतस्थस्यवागजेन्द्रमोक्षस्यश्रवणंपाठोवा । इतिदुःस्वप्ननाशकविधिः ॥

**दुःस्वप्नपरिहार**—'योमेराजन्' या ऋचेनें उपस्थान केलें असतां किंवा 'अधःस्वप्नस्य०' या मंत्राचा जप केला असतां दुष्ट स्वप्नाचा नाश होतो. क्वचित् ग्रंथांत दर्शाप्रमाणें श्राद्ध केल्यानें चंडीसप्तशतीचा पाठ केल्यानें, विष्णुसहस्रनामस्तोत्राचा जप केल्यानें अथवा श्रीभारतांतील अथवा श्रीमद्भागवतांतील

गजेंद्रमोक्षाचें श्रवण अथवा पठण केल्यास दुष्ट स्वप्नाचा नाश होतो, असें सांगितलें आहे. याप्रमाणें दुःस्वप्ननाशक विधि आहे.

**इत्थंगर्भाधानादुद्वाहान्ताःसमस्तसंस्काराः। सपरिकरानिर्णीता अस्मिंस्तार्तीयपूर्वार्धे ॥**

याप्रमाणें तिसऱ्या परिच्छेदाच्या या पूर्वार्धांत गर्भाधानापासून विवाहापर्यंतचे सर्व संस्कार व प्रयोग व त्यांचे निर्णय सांगितले.

**ततआह्निकआचारस्ततआधानादिकाःप्रकीर्णार्थाः। शान्तिकपौष्टिकमुख्यानित्यनैमित्तिकाश्चोक्ताः ॥**

नंतर आह्निकाचार, आधानादिक मिश्र विषय, शांतिक, पौष्टिक, प्रमुख, नित्यनैमित्तिक वगैरे सांगितले.

**पूर्वपरिच्छेदकयोःकालः सामान्यतोविशेषाच्च । निर्णीतःसहकृत्यैस्तिथिमासाद्येषुविध्युक्तैः ।**

पहिल्या व दुसऱ्या परिच्छेदांत विधियुक्त असे नानाविध कृत्यांसहित सामान्यतः व विशेषतः तिथिमहिन्यांतले कालनिर्णय सांगितले.

**नानापापेप्रायश्चित्तंव्यवहारविस्तरश्चापि । उपदानमहादानादिविधिश्चोक्तोमयूखादौ ।**

नानाविध पातकांविषयीं प्रायश्चित्तें, व्यवहारांचा विस्तार, उपदानें व महादानें, इत्यादिकांचा विधि हे विषय मयूखादि ग्रंथांत सांगितले आहेत.

**श्राद्धविधिःसाङ्गोप्याशौचेनिर्णीतिरन्त्यसंस्कारः । तार्तीयकस्योत्तरखण्डेग्रेसंप्रवक्ष्यन्ते ।**

यथासांग श्राद्धविधि, अशौचनिर्णय व अंत्यसंस्कार हे तिसऱ्या परिच्छेदाच्या उत्तरार्धांत सांगूं.

**मूलभूतानिपद्यानिविकृतानिक्वचित्क्वचित्। निर्विकाराण्यपिनवान्यन्प्युक्तान्यत्रकानिचित् ।**

मूळचे श्लोक क्वचित् अशुद्ध असल्यामुळें कित्येक नवीन श्लोक शुद्ध लिहिले आहेत.

**मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोनलसाबुधाः। कृतकार्याःप्राङ्निबन्धैस्तदर्थंनायमुद्यमः ७ येपुनर्मन्दमतयोऽलसाअज्ञाश्चनिर्णयम्। धर्मेवेदितुमिच्छन्तिरचितस्तदपेक्षया ८ निबन्धोयं धर्मसिन्धुसारनामासुबोधनः । अमुनाप्रीयतांश्रीमद्विठ्ठलोभक्तवत्सलः ९ प्रेम्णासद्भिर्ग्रन्थःसेव्यःशब्दार्थतःसदोषोपि। संशोध्यवापिहरिणासुदामसुनिसतुषपृथुकमुष्टिरिव ॥ १० ॥**

**ग्रंथप्रयोजन**—मीमांसा व धर्मशास्त्र जाणणारे बुद्धिमान् व आलस्यरहित असे जे पंडित आहेत ते महाविद्वानांनीं केलेले पूर्वींचे ग्रंथ पाहून त्याप्रमाणें प्राप्त झालेलीं कार्यें करितात. हा ग्रंथ अशांच्यासाठीं लिहिलेला नसून जे मंद-

बुद्धि, आळशी व अविद्वान् असून धर्माविषयीं निर्णय जाणण्याची जे कोणी इच्छा करितात त्यांच्यासाठीं धर्मसिंधुसार नांवाचा हा सुबोध ग्रंथ मीं केला आहे. या ग्रंथानें भक्तवत्सल श्रीमद्विठ्ठल संतुष्ट होवोत. या ग्रंथांत क्वचित् स्थलीं शब्दार्थांचे जरी दोष असले तरी विद्वानांनीं विचारपूर्वक शोधून हा ग्रंथ ग्रहण करण्यास योग्य आहे. सुदामा ब्राह्मणाचे पोहे जरी कोंड्यांनीं युक्त होते तरी हरीनें कोंडा टाकून देऊन ते चांगले शुद्ध करून जसे भक्षण केले, त्याचप्रमाणें विद्वानांनीं या माझ्या ग्रंथाचा प्रेमानें स्वीकार करावा.

श्रीकाश्युपाध्यायवरोमहात्माबभूवविद्वाद्द्विजसार्वभौमः । तस्मादुपाध्याय- कुलावतंसोयज्ञेश्वरोनन्तइमावभूताम् ११ यज्ञेश्वरोयज्ञविधानदक्षोदैवज्ञवेदा- ङ्गसुशास्त्रशिक्षः । भक्तोत्तमोऽनन्तगुणैकधामानन्ताह्वयोनन्तकलावतारः १२ एषोत्यजज्जन्मभुवंस्वकीयांतांकौङ्कणाख्यांसुविरक्तिशाली । श्रीपाण्डुरंगेवसतिं- विधायभीमातटेमुक्तिमगात्सुभक्त्या १३ तस्यानन्ताभिधानस्योपाध्यायस्यसुतः- कृती । काशीनाथाभिधोधर्मसिन्धुसारं समातनोत् ॥

विद्वान् ब्राह्मणांमध्यें केवळ सार्वभौम असे महात्मे श्रीकाश्युपाध्याय होऊन गेले. त्यांपासून उपाध्याय कुलावतंस असे यज्ञेश्वर उपाध्याय व अनंतोपाध्याय असे दोन पुत्र झाले. त्यांपैकीं यज्ञेश्वरोपाध्याय श्रौतमार्गांत निष्णात असून ज्योतिषी वेदाचें अंग जें व्याकरणशास्त्र त्यांत पारंगत होते. अनंतोपाध्याय भक्तांत श्रेष्ठ असून अनंताचा अंशभूत अवतार असल्यामुळें ते अनंत गुणांचें वसतिस्थान, असे होते. हे अनंतोपाध्याय वैराग्यशाली होऊन त्यांनीं आपली कोंकणांतील जन्मभूमि सोडून दिली व श्रीपंढरीक्षेत्रांत श्रीपांडुरंगासमीप वास्तव्य करून पांडुरंगाच्या भक्तीनें भीमानदीच्या तटाकीं त्यांनीं मुक्ति मिळविली, अशा अनंतोपाध्यायांचा कृतार्थ पुत्र जो काशीनाथ त्यानें धर्मसिंधुसार नांवाचा ग्रंथ केला.

इति श्रीमत्काश्युपाध्यायसूरिसूनुयज्ञेश्वरोपाध्यायानुजानन्तोपाध्याय- सूरिसुतकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिं० तृतीय० परिच्छेदे पूर्वार्धः समाप्तः ॥

---

## अथ तृतीयपरिच्छेदोत्तरार्धःप्रारभ्यते ।

**श्रीगणेशायनमः श्रीपाण्डुरङ्गायनमः । श्रीरुक्मिणीपाण्डुर- ङ्गंप्रणम्य पितरौगुरून् । तृतीयच्छेदोत्तरार्धं तनोमि श्रीशतुष्टये ॥**

श्रीरुक्मिणी पांडुरंग व मातापिता यांस नमस्कार करून श्रीपांडुरंगास संतोष व्हावा, म्हणून तृतीय परिच्छेदाचें उत्तरार्ध करितों (लिहितों).

श्रीनाथः करुणासिन्धुरिन्दिराशंकरःसती । विघ्नेशो भास्करेन्द्राद्या विघ्नान्घ्नन्तु सदैवमे ॥

करुणासागर श्रीनाथ, इन्दिरा, शंकर, पार्वती, विघ्नेश, सूर्य व इंद्रादिक देव हे सर्वकाळ माझ्या विघ्नाचा नाश करोत.

तत्रतावच्छ्राद्धादिनिर्णयंवक्तुमधिकारनिर्णयायजीवत्पितृकाधिकारोविविच्यते पादुकेचोत्तरीयंचतर्जन्यांरूप्यधारणम् । नजीवत्पितृकः कुर्याज्ज्येष्ठेभ्रातरि-जीवति ॥ १ ॥ अत्रपादुकेकाष्ठमय्यौ उत्तरीयं सग्रन्थिपरिमण्डलंवस्त्रमेकद्व्य-ङ्गुलादिविस्तृतंसूत्रकृतंपरिमण्डलरूपंवाउत्तरीयस्थानापन्नंस्मृत्युक्तंतृतीययज्ञो-पवीतंवाजीवत्पितृकेणजीवज्ज्येष्ठभ्रातृकेणच नधार्यमितितात्पर्यम् प्रावरणरूपं-द्वितीयवस्त्रंतुजीवत्पितृकादिभिःसर्वैर्धार्यम् एकवस्त्रोनभुञ्जीतनकुर्याद्देवतार्चनम् इत्यादिनासर्वकर्मस्वेकवस्त्रत्वनिषेधात् पितरिपितामहेज्येष्ठभ्रातरिचाकृताधाने-जीवतिपुत्रपौत्रकनिष्ठभ्रातृभिराधानं नकार्यम् ज्येष्ठभ्रातर्यकृतविवाहेकनिष्ठेन विवाहोनकार्यः अत्रविशेषःपूर्वार्धेउक्तः एवंपित्रादिष्वकृतसोमयागेषुजीवत्सु-पुत्रादेःसोमेनाधिकारः एवंपूर्णमासेष्टौदर्शेष्टावग्निहोत्रहोमेचपित्राद्यैरनाब्धे-पुत्रादेर्नाधिकारः एवंसंन्यासेपि कनिष्ठस्यसोदरस्यैवदोषोनभिन्नोदरस्यभ्रातुः पित्रादेराज्ञायांपुत्रादेर्नदोषइतिकेचित् अधिकारिणिपितरिसत्याज्ञायामपिदोषः पातित्यजात्यन्धत्वादिदोषैरनधिकारिण्याज्ञयानदोषः पातित्यादावाज्ञांविना-पिनदोषइत्यपरे तथाजीवत्पितृकस्यापितृकृत्येषुदर्शादिश्राद्धतर्पणपैतृकदानेषुना-धिकारः अत्रविशेषः स्वापत्यसंस्कारस्वद्वितीयविवाहादिनिमित्तकनान्दी-श्राद्धेचातुर्मास्यान्तर्गतपितृयज्ञेसोमाङ्गतृतीयसवनस्थपितृयज्ञेजीवत्पितुरधिकारः पिण्डपितृयज्ञेहोमान्तःपिण्डपितृयज्ञोनारम्भोवापिण्डपितृयज्ञस्येतिपक्षद्वयम् पितुःपित्राद्युद्देशेनपिण्डदानमितितृतीयःपक्षःक्वचित् एवमष्टकादिविकृतिष्वपि-पक्षत्रयम् गयांप्रसङ्गतोगत्वामातुःश्राद्धंसुतश्चरेत् । जीवत्पितामातुःश्राद्धमु-द्दिश्यगयां नगच्छेत् महानदीषुसर्वासुतीर्थेचप्राप्तेजीवत्पितृकःपितुःपितृमात्रा-द्युद्देशेनश्राद्धंकुर्यात् नवम्यामन्वष्टकाश्राद्धंक्षयाहेमातुःप्रत्यब्दश्राद्धंचसपिण्ड-कमेवजीवत्पितृकः कुर्यात् तथासंन्यस्तेतातेपतितेचतातेजीवत्यपिसतिदर्श-श्राद्धमहालयसंक्रान्तिग्रहणादिश्राद्धानिसर्वाणिपितुः पित्राद्युद्देशेनजीवत्पितृ-केणकार्याणि एतानिचसांकल्पिकविधिनापिण्डरहितानिकार्याणि अन्वष्टक्यादा-विवपिण्डदानेविशेषवचनाभावात् ॥

**जीवत्पितृकाधिकार**—श्राद्धादिकांचा निर्णय सांगण्याच्या आधीं जीवत्पितृ-काचा अधिकार आतां सांगतों; ज्याचा थोरला भाऊ जिवंत आहे त्यानें—पादुका, उत्तरीय आणि तर्जनींत रुपें (अंगठी) यांचा उपयोग करूं नये. येथें लांकडी खडाव असा पादुका या शब्दाचा अर्थ समजावा. उत्तरीय या शब्दाचा अर्थ गांठी मारलेलें वाटोळें वस्त्र, दोन बोटें रुंदीची सुताची वाटोळी पट्टी किंवा स्मृति-

वचनाप्रमाणें तिसरें जानवें असा येथें जो अर्थ घ्यायचा, त्या वस्तूचा उपयोग वडील भाऊ व बाप हे जिवंत असणाऱ्यानें करूं नये. प्रावरणरूप ( पांघरण्याचें ) असलेलें दुसरें वस्त्र ( उपरणें ) जीवत्पितृकादि सर्वांनीं वापरावें. कारण, एकवस्त्रयुक्त होऊन भोजनदेवपूजादिक कर्मे करण्याचा निषेध असल्याचें वचन असल्यानें एक वस्त्राचा निषेध आहे. बाप, आजा आणि वडील भाऊ हे जिवंत असून, त्यांनीं जर आधान केलेलें नसेल, तर–मुलगा, नातू व धाकटा भाऊ–यांनीं आधान करूं नये. थोरल्या भावाचें लग्न झाल्यावांचून धाकट्यानें आपलें करूं नये, याचा निषेध निर्णयपरिच्छेदाच्या पूर्वार्धांत सांगितला आहे. पिता जिवंत असून त्यानें जर सोमयाग केला नसेल, तर त्याच्या मुलांना तो करण्याचा अधिकार नाहीं. पूर्णमासेष्टि, दर्शेष्टि व अग्निहोत्रहोम यांचा आरंभ जर बापानें केला नसला, तर तो, त्याच्या मुलांना करण्याचा अधिकार नाहीं. संन्यासाच्या बाबतींतही हाच निर्णय समजावा. या बाबतींत सोदर कनिष्ठालाच ( सख्ख्या धाकट्या भावाला ) दोष आहे, सावत्र भावाला दोष नाहीं. बापाची परवानगी असल्यास मुलांना दोष नाहीं, असें कित्येक ग्रन्थकारांचें मत आहे. पिता हाच जर अधिकारी असेल, तर त्याची आज्ञा असतांही ( मुलास ) दोष आहे. पातित्य व जन्मान्धत्व या दोषामुळें बाप जर अनधिकारी असला, तर त्याच्या आज्ञेचा दोष नाहीं. बाडगेपणा ( पातित्य ) वगैरे दोष असतां जरी परवानगी नसली, तरी दोष नाहीं, असें इतर ग्रन्थकार म्हणतात. बापासाठीं म्हणून जीं–दर्शश्राद्ध, तर्पण व पैतृक–हीं कर्मे, तीं जिवंत बापाच्या मुलांना करण्याचा अधिकार नाहीं. या बाबतींतला विशेष निर्णय:–अपत्यसंस्कार व दुसरें लग्न यांतलि नान्दीश्राद्ध, चातुर्मास्यांतला पितृयज्ञ व सोमयागाङ्गभूतांतल्या तिसऱ्या सवनांतला पितृयज्ञ यांचा जीवत्पितृकाला अधिकार नाहीं. पिण्डपितृयज्ञांत होमापर्यंत पिण्डपितृयज्ञ करावा किंवा करूं नये असे त्याचे दोन पक्ष आहेत. बापाच्या बापाच्या ( आजाच्या ) नांवानें पिण्डदान करण्यास सांगणाराहि आणखी एक तिसरा पक्ष कांहीं ग्रन्थांत आहे. अष्टकादिक विकृतींसंबंधानेंही असेच तीन पक्ष आहेत. प्रसंगवशात् गयेस गेलें असतां मुलानें आईचें श्राद्ध करावें. बाप जिवंत असलेल्यानें आईच्या श्राद्धासाठीं म्हणून मुद्दाम गयेस जाऊं नये. सर्व महानद्या व तीर्थें यांच्या कांठीं बाप जिवंत असणारानें आपला आजा व आई यांचीं श्राद्धें करावींत. नवमीचें अन्वष्टकाश्राद्ध व क्षयतिथीवरचें आईचें दरसालचें श्राद्ध हीं बाप जिवंत असलेल्यानेंही सपिण्डकच करावींत. बाप संन्याशी किंवा बाडगा असून जरी जिवंत असला, तरी दर्शश्राद्ध, महालय, संक्रान्ति, ग्रहण वगैरे श्राद्धें–आजा, आई वगैरेंच्या नांवानें जीवत्पितृकानें सांकल्पिक विधीनें पिण्डरहित अशीं करावींत; कारण, अन्वष्टक्यादि श्राद्धांत पिण्डदानाबद्दल जसें वचन आहे तसें या श्राद्धांतल्या पिण्डदानाविषयीं विशेष वचन नाहीं.

आश्विनशुक्लप्रतिपदि दौहित्रो जीवत्पितृकः सपिण्डकं मातामहश्राद्धं कुर्यात्
तथा भ्रातृपुत्रोऽपुत्रस्य पितृव्यस्य प्रत्यब्दश्राद्धं सपिण्डं कुर्यात् एवं कनिष्ठभ्राताप्य-

पुत्रज्येष्ठभ्रातुःप्रत्यब्दम् तथासपत्नीपुत्रःसापत्नमातुःश्राद्धम् एवंदौहित्रोऽपुत्रस्यमातामहस्यप्रत्यब्दम् इत्थंचपितृव्यादिश्राद्धचतुष्टयेजीवत्पितृकस्याप्यधिकारः पितृव्यभ्रात्रादीनामपुत्राणांपत्नीसावेसैवाधिकारिणीनतुभ्रातृपुत्रादेःश्राद्धाधिकारः एवंपतिरेवपुत्राभावेभार्याश्राद्धंकुर्यात् सपत्नीपुत्रसावेतुसएवकुर्यान्नभर्ता दौहित्रभ्रातृतत्पुत्रयोःसत्त्वेमृतस्यविभक्तत्वेदौहित्रएव अविभक्तत्वेभ्रातृपुत्रःकेचित्भ्रातृतत्पुत्रयोःसत्त्वेभ्रात्रैवश्राद्धंकार्यमित्याहुः तथा जीवत्पितृकस्य पितृपितामहादिमनुष्यपितृतर्पणनिषेधेप्यग्निष्वात्तादिदेवपितृतर्पणानिषेधाभावात्स्नानाङ्गपितृतर्पणेब्रह्मयज्ञाङ्गभूतदेवरूपिपितृतर्पणेचाधिकारोस्त्येव एवंयदिश्राद्धेधिकारस्तदीयश्राद्धाङ्गतर्पणेप्यधिकारः जीवत्पितापिकुर्वीततर्पणंयमभीष्मयोः । श्राद्धाङ्गतर्पणभिन्नतर्पणंजीवत्पितृकेणतिलैर्नकार्यम् श्राद्धप्रयोगमध्येवाजानुन्यग्भावोनीवीबन्धश्चनकार्यः नद्यादौस्नात्वातर्पणान्तेसमन्त्रकंवस्त्रनिष्पीडनेविहितंतन्नकार्यम्तथाखड्गमौक्तिकहस्तेनकर्तव्यंपितृतर्पणमितिविहितंखड्गधारणंनकार्यम् अपसव्यंद्विजाग्र्याणांपित्र्येकर्मणिकीर्तितम् । आप्रकोष्ठात्तुकर्तव्यमेतत्पितरिजीवति ॥ १ ॥ जीवतिसंन्यस्तादिरूपेपितरिमृतमातृमातामहाकोपिपुत्रःपितुःपितृपितामहप्रपितामहानांपितुर्मातृपितामहीप्रपितामहीनांपितुर्मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानामितिपार्वणत्रयमेकोद्दिष्टगणंचस्वमातरंपितुःपत्न्याइतिस्वपितृव्यंपितुर्भ्रातुरितिस्वंमातामहंचपितुःश्वशुरस्येत्येवमादिना पितृसंबन्धपुरस्कारेणैवोद्दिश्यमहालयश्राद्धंकुर्यात् एवंदर्शादिषूह्यम् पितुःसंन्यासाभावेपितीर्थेश्राद्धंजीवत्पितुरेवमेव एवंवृद्धिश्राद्धेप्यूह्यं ब्रह्मयज्ञान्ते नित्यंपितृतर्पणमपिसंन्यस्तादिरूपजीवत्पितृकेणैवमेवकार्यमित्याहुः ॥

**श्राद्धाधिकारी**—बाप जिवंत असणाऱ्यानें अश्विन शुद्ध प्रतिपदेला आईच्या बापाचें सपिण्डक श्राद्ध करावें. भावाच्या मुलानें पुत्रहीन चुलत्याचें सपिण्डक असें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावें. धाकट्या भावानेंही निपुत्रिक अशा थोरल्या भावाचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावें. सवतीच्या मुलानें सावत्र आईचें श्राद्ध करावें. नातवानें (दौहित्र) आपल्या आईच्या बापाचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावें. याप्रमाणें पितृव्यादिक ( चुलता ) चार श्राद्धें करण्याचा जीवत्पितृकालाही अधिकार आहे. मुलगा नसलेला चुलता, व भाऊ यांच्या जर बायका असतील तर त्याच आपापल्या नवऱ्यांचीं श्राद्धें करण्यास अधिकारिणी आहेत. तशा स्थितींत भावाच्या पुत्रादिकांना अधिकार नाहीं. पुत्र नसल्यास बायकोनेंच नवऱ्याचें श्राद्ध करावें, सवतीचा मुलगा असल्यास त्यानें करावें. मुलीचा मुलगा व भावाचा मुलगा असतां मेलेले जर विभक्त झालेले असतील तर (त्यांच्या श्राद्धाचा) अधिकारी दौहित्र, किंवा विभक्त नसल्यास भावाचा मुलगा असे अधिकारी समजावे. भाऊ व त्याचा मुलगा हे दोघे असतां, भावानेंच ( भावाचें श्राद्ध ) करावें, असें कित्येक ग्रंथकार सांगतात. जीवत्पितृकाला बाप, आजा वगैरे मनुष्यपितरांचें तर्पण करण्याचा जरी निषेध असला, तरी अग्निष्वात्तादिक देवर्षिपितृतर्पणाचा निषेध नसल्यानें—स्नानाङ्गतर्पण व

ब्रह्मयज्ञाङ्गभूत देवर्षिपितृतर्पण करण्याचा अधिकार आहे. ज्याचें श्राद्ध ज्याला करण्याचा अधिकार आहे त्याला त्याचें श्राद्धांतलें तर्पणही करण्याचा अधिकार आहे. यम व भीष्म यांचें तर्पण बाप जिवंत असणाऱ्यानेंही करावें. बाप जिवंत असलेल्यानें श्राद्धाङ्गतर्पणावांचून इतर तर्पण तिळांनीं करूं नये व श्राद्धप्रयोगांत डावा गुडघा न वांकवितां नेसायच्या धोतराचा नीविबंध (निरावरची गांठ) हीं करूं नयेत. नदींत स्नान करून तर्पण केल्यावर समंत्रक वस्त्र पिळूं नये. तद्वतच हातांत लोखंड व मोतीं असतां पितृतर्पण करावें. या वचनानें प्राप्त असलेलें खड्ग (लोह) धारण करूं नये. द्विजाग्र्यांनीं पित्र्यकर्मांत अपसव्य करावें असें सांगितलें असल्यानें, बाप जिवंत असलेल्यानें कोंपराच्या खालच्या भागापर्यंतच अपसव्य करावें. बाप संन्यासरूपानें जिवंत असतां आई व तिचा बाप हीं दोघें ज्याचीं मेलेलीं आहेत त्यानें —'पितुःपितृपितामहप्रपितामहानाम् पितुर्मातृपितामहमातृप्रपितामहानाम् पितुर् मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानाम्'—हीं तीन पार्वणें, एकोद्दिष्टगण, आपल्या मातेचा 'पितुः पत्न्याः'—असा उच्चार, आपल्या चुलत्याचा—'पितुर् भ्रातुः' असा उच्चार, व आपल्या आईच्या बापाचा 'पितुःश्वशुरस्य' असा उच्चार—हीं सर्व करून महालय (वार्षिक पितृपक्ष) करावा. दर्शादि श्राद्धांतही हेंच समजावें. बाप संन्यासी नसला तरी बाप जिवंत असणाऱ्यानें असेंच तीर्थश्राद्ध करावें. नान्दीश्राद्धाचाहि हाच निर्णय समजावा. ब्रह्मयज्ञाच्या शेवटीं जें पितृतर्पण करायचें तें, संन्याशीरूपानें ज्याचा बाप जिवंत असेल अशानेंही करावें, असें म्हणतात.

यदातु मातुर्वार्षिकमपुत्रमातामहवार्षिकमपुत्रपितृव्यवार्षिकंवाक्रियततेदा-क्रमेणमातृपितामहीप्रपितामहीनांमातामहमातृपितामहमातृप्रपितामहानांपि-तृव्यपितामहप्रपितामहानामित्येवोवेशः यदाचपित्रादिभिःस्वाशक्त्यादिना-नियोजितःपित्रादिकरणीयंश्राद्धं स्वयंपित्रादेःप्रतिनिधिभूयकरोतितदापितुर-मुकशर्मणोयजमानस्यपितृपितामहप्रपितामहानामित्येवंयथाश्राद्धमुद्देशः सर्वत्र-पितृकृत्येभ्रातृष्वविभक्तेषुज्येष्ठस्यैवाधिकारः विभक्तेषुपृथक्पृथक् सापत्न-भ्रातरिज्येष्ठेसत्यपिकनिष्ठएवस्वमातृवार्षिकान्वष्टक्यादिकुर्यात् जीवत्पितृपि-तामहकस्यसंन्यस्तपितृपितामहकस्यचपितामहस्यपित्राद्युद्देशेनवृद्धिश्राद्धंतीर्थ-श्राद्धंदर्शादिश्राद्धंवाभवति पित्रादिषुत्रिषुजीवत्सुसत्सुसंन्यस्तेषुचनकिमपिश्राद्धं-कार्यम् केचित्तुपित्रादित्रयात्परेभ्यः श्राद्धंदेयमाहुः मृतेपितरिपितामहजीवने-पित्रेपितामहत्पराभ्यांचश्राद्धंदेयम् एवंपितृपितामहमरणेप्रपितामहजीवनेप्यूह्यम्॥

**श्राद्धसंकल्पभेद**— आईचें वार्षिक श्राद्ध, आईच्या बापाचें वार्षिक श्राद्ध अथवा बापाच्या चुलत्याचें वार्षिक श्राद्ध करण्याच्या वेळीं अनुक्रमें— 'मातृपितामहीप्रपितामहीनाम्, मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानाम्' आणि 'पितामहप्रपितामहानाम्'—असा उच्चार करावा. अशक्त बापानें जेव्हां प्रतिनिधि म्हणून मुलाची योजना केली असेल तेव्हां—'पितुःअमुक शर्मणो यजमानस्य पितृपितामहप्रपितामहानाम्'—अशा प्रकारचा जसें श्राद्ध असेल तसा उच्चार करावा.

भाऊ भाऊ जर एकत्रच असतील, तर सर्व पितृकृत्यांत थोरल्या भावालाच अधिकार आहे व विभक्त असल्यास सर्व भावांना आहे. सावत्र भाऊ जरी वयानें मोठा असला तरी धाकटयानेंच आपल्या आईचें वार्षिक व अन्वष्टक्यादि श्राद्धें करावीत. बाप व आजा जिवंत असून ते दोघेही जर संन्यासी असतील, तर पितामहाच्या (आजाच्या) पितरांच्या नांवानें—नान्दीश्राद्ध, तीर्थश्राद्ध किंवा दर्शश्राद्ध—हीं करावींत. बाप, आजा व पणजा हे तिघेही संन्यासाश्रमांत जिवंत असतां कोणाचेंच श्राद्ध करूं नये. वृद्ध प्रपितामहादिकांच्या नांवानें श्राद्ध करण्यास कित्येक ग्रन्थकार सांगतात. बाप मेलेला असून आजा जर जिवंत असेल तर बाप व पणजा आणि निपणजा या तिघांच्या नांवानें श्राद्ध करावें. बाप व आजा हे मेलेले असतां पणजा जर जिवंत असेल तर—बाप, आजा व खापरपणजा यांच्या नामोच्चारानें श्राद्ध करावें.

यस्तुगृह्याग्निमान्जीवन्मातृपितृकःपितुःपित्रादिभ्यःपिण्डदानमिति तृतीयपक्षाश्रयेणारब्धपिण्डपितृयज्ञाष्टकान्वष्टकाश्राद्धोन्वष्टकायांचपितुःपित्रादिमात्रादिमातामहादिभ्यःपिण्डादिकंददानआसीदनन्तरंचमातामृतासोन्वष्टकायांस्वमात्रादिभ्यः पितुःपित्रादिभ्यश्चदद्यात् यदाचपिण्डपितृयज्ञान्वष्टकाद्यनारम्भपक्षोजीवत्पितृकस्यतदापिसंन्यस्तादिपितृकस्यदर्शादिश्राद्धं पितुः पित्राद्युद्देशेनव्यतिषङ्गभिन्नप्रयोगेणसांकल्पिकेनभवत्येव ॥

**गृह्याग्निधारक पुत्रकर्म**—आई व बाप जिवंत असतां ज्यानें गृह्याग्नि बाळगलेला असेल त्यानें आजा वगैरेंच्या नांवानें पिण्डदान करावें असा जो तिसरा एक पक्ष आहे त्याला अनुसरून पिण्ड, पितृयज्ञ, अष्टका व अन्वष्टका यांपैकीं आरंभ केलेल्या अन्वष्टका श्राद्धांत बापाची पितृत्रयी, मातृत्रयी व मातामहत्रयी यांच्या नांवानें पिण्डदान करावें. बाप जिवंत असल्यामुळें जेव्हां पिण्ड, पितृयज्ञ व अन्वष्टका यांचा आरंभ केला नसेल तेव्हां व बाप संन्यासी असतां दर्श वगैरे जें बापानें करायचें कर्म तें, व्यतिषंगाहून (अदलाबदल) निराळा जो सांकल्पिक प्रयोगविधि त्यानें होतेंच.

पितुरविभक्तैःपुत्रैःपृथग्वैश्वदेवोनकार्यः पितृपाकोपजीवीस्याद्भ्रातृपाकोपजीवकः। इत्युक्तेःअतएवगृह्याग्नौपाकवैश्वदेवकरणपक्षेपिसाग्निकेपितरिसाग्निकैरप्यविभक्तैःपुत्रैःपृथग्वैश्वदेवोनकार्यः येषांपाकाभावेऽग्नेर्लौकिकत्वंमतंतैःपाकमात्रमग्निसंस्कारार्थंकार्यमितिभाति विभक्तैस्तुपृथग्वैश्वदेवःकार्यः तत्रवैश्वदेवस्यदेवयज्ञभूतयज्ञपितृयज्ञात्मकत्वाज्जीवत्पितृकैरपिपञ्चमहायज्ञान्तर्गतःपितृयज्ञःकार्यःवैश्वदेवाद्भिन्नाःपञ्चमहायज्ञास्तैत्तिरीयाणांतैरपिविभक्तैर्जीवत्पितृकैः पितृयज्ञःकार्यः तस्यदेवरूपपितृदेवताकत्वेनपितृपितामहादिमनुष्यरूपपितृदेवताकत्वाभावात् मुण्डनंपिण्डदानंचप्रेतकर्मचसर्वशः । नजीवत्पितृकःकुर्याद्गुर्विणीपतिरेवच ॥ १ ॥ अत्रमुण्डनंक्षुरेणशिरसोपवनं तेनकर्तनंसिध्यति सर्वंप्रेतकर्मप्रेतदहनवहनसपिण्डीकरणान्तौर्ध्वदेहिकादिकमित्यर्थः मुण्डनं-

रागप्राप्तमेव निषिध्यते तेनचौलोपनयनादिषुआधानदर्शपौर्णमासज्योतिष्टोमादिषुनित्यप्राप्तंतीर्थप्रायश्चित्तमातृमरणादौनैमित्तिकप्राप्तंचभवत्येव केचित्काम्यनागबल्यादिषुकाम्यमपिभवतीत्याहु गङ्गायांभास्करक्षेत्रेमातापित्रोर्गुरोर्मृतौ। आधानेसोमपानेचवपनंसप्तसुस्मृतम्॥ १॥ गुरोरितिदत्तकस्यपूर्वापरपित्रोरित्यर्थः वाक्यान्तरेतीर्थमात्रेक्षौरोक्तेर्गङ्गाभास्करक्षेत्रग्रहणंजीवत्पितृकस्यतत्रविशेषतःक्षौरविधानार्थम् जीवत्पितृकस्यपिण्डदाननिषेधःनान्दीश्राद्धतीर्थश्राद्धयोःसंन्यस्तादिपितृकस्यदर्शमहालयादिश्राद्धेषुचपिण्डरहितसांकल्पिकश्राद्धबोधनार्थः॥

**पितुरविभक्त पुत्रकर्म**—बापापासून विभक्त न झालेल्या पुत्रानें निराळा वैश्वदेव करूं नये. कारण, तो पितृपाकानें व भ्रातृपाकानें उपजीविका करणारा असावा असें वचन आहे, म्हणून गृह्याग्नीवर पाक करण्याचा जरी पक्ष असला, तरी साग्निक बाप असतां एकत्र राहणारे त्याचे मुलगे साग्निक असून अविभक्त असतील तर त्यांनीं निराळा वैश्वदेव करूं नये. ज्या गृह्याग्नीवर पाक होत नाहीं तो लौकिकाग्नि होतो, अशा मतवाल्यांनीं अग्निसंस्कारासाठीं गृह्याग्नीवर पाक मात्र करावा असें वाटतें. विभक्तांनीं निरनिराळे वैश्वदेव करावे. वैश्वदेव हा-देवयज्ञ, भूतयज्ञ व पितृयज्ञ यांच्या रूपीं असल्यानें जीवत्पितृकानेंही पंचमहायज्ञांतला, पितृयज्ञ करावा. तैत्तिरीयशाखीयांचे पंचमहायज्ञ जरी वैश्वदेवाहून भिन्न असले, तरी त्यांस पितृपितामहादि मनुष्यरूपी पितृदेवकत्व नाहीं. मुंडन, पिंडदान व सर्व प्रेतकर्म-या गोष्टी बाप जिवंत असणाऱ्यानें व गर्भारशीच्या नवऱ्यानें करूं नयेत. मुंडन म्हणजे डोक्यावरच्या केसांची वस्तऱ्यानें हजामत करणें होय. (सध्यांच्या आचाराप्रमाणें नुसती दाढी करणें म्हणजे मुंडन नव्हे). यावरून केशकर्तन (केंस कांपणें) सिद्ध होतें (कसें तें समजत नाहीं). सर्व प्रेतकर्म म्हणजे-प्रेतवहन, प्रेतदहन व सपिण्डीकरणापर्यंतचें और्ध्वदेहिक असा अर्थ समजावा. मुंडन हें रागप्राप्तचं निषिद्ध आहे. यावरून चौल व उपनयन यांत आधान, दर्शपौर्णमास व ज्योतिष्टोम यांतलें आवश्यक कर्म आणि तीर्थ, प्रायश्चित्त व मातामृत्यु-यांतलें जें नैमित्तिक मुंडन तें करावेंच. नागबलीसारख्या काम्यकर्मांतही कर्तव्यच म्हणून जें काम्यमुंडन करायचें तें केलेंच पाहिजे असें कित्येक ग्रंथकारांचें मत आहे. गंगा, भास्करक्षेत्र, माता, पिता व गुरु यांचा मृत्यु, आधान व सोमपान यांपैकीं प्रत्येक प्रसंगीं क्षौर करावें. येथें गुरु याचा अर्थ दत्तक घेणारा व देणारा हे दोन्ही समजायचे. दुसऱ्या वाक्यांत तीर्थावर क्षौर करावा असें सांगितलें असतांही गंगा व भास्करक्षेत्र यांवर क्षौर करावा असें जें सांगितलें आहे. तें एवढ्याच करतां कीं, बाप जिवंत असणाऱ्यानें त्या स्थानींच विशेषेंकरून क्षौर करावा. बाप जिवंत असणाऱ्याला पिंडदान करणाचा जो निषेध सांगितला त्यांतलें मर्म हें कीं, नान्दीश्राद्ध, तीर्थश्राद्ध व बाप संन्यासी असल्यानें त्याचें जें पित्र्यकर्म-दर्शमहालयादि यांत पिंडरहित असें सांकल्पिक श्राद्ध करावें हें समजण्यासाठीं होय.

महापितृयज्ञेसोमयागेमातृमातामहादेर्वार्षिकश्राद्धेषुगयायामन्वष्टक्यादौ-च्पिण्डदानंभवत्येत्युक्तम् पिण्डदानंप्रकुर्वीतमातापित्रोःक्षयाहनि । इतिश्राद्ध-विधिनापिण्डदानेसिद्धेपुनःपिण्डविधिःपित्रोर्वार्षिकेगर्भिणीपतित्वनिषिद्धका-लादिप्रयुक्तनिषेधबाधनार्थम् तेन विवाहव्रतचूडासुवर्षमर्धंतदर्धकम् । पिण्ड-दानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणम् १ इति निषेधस्यापिबाधः क्षयाहग्रहणं-सपिण्डीकरणमासिकेष्वपिपिण्डदानोपलक्षणपरम् ॥

**पिण्डदाननिषेधकाल**—महापितृयज्ञ, सोमयाग, मातामहादिकांचीं वार्षिक श्राद्धें गयाश्राद्ध व अन्वष्टक्यादि श्राद्धें—यांत पिंडदान होतें असें मागें सांगितलेंच आहे. क्षयदिवशीं मातापितरांचें पिण्डदान करावें असा जो श्राद्धविधि आहे, त्यावरून पिण्डदान करावें असें सिद्ध होत असतांही पुनः जो पिण्डदानविधि सांगितला आहे तो मातापितरांच्या वार्षिक श्राद्धांत गर्भिणीपतित्वा-सारख्या सांगितलेल्या निषिद्ध कालांचा बोध होण्यासाठीं होय. यावरूनच विवाह, उपनयन व चौल हीं झालीं असतां अनुक्रमें एक वर्ष, सहा महिने व तीन महिनेपर्यंत—पिण्डदान, मृत्तिकास्नान व तिलतर्पण हीं करूं नयेत, असा निषेध आहे, त्याचाही बोध होतो. सपिण्डीकरण व मासिकें यांमधल्या पिण्डदानासंबंधानेंही उपलक्षणपर असेंच क्षयदिवसाचें ग्रहण केलें आहे.

अथप्रेतकर्मप्रतिप्रसवः जीवत्पितृकः स्वमातुरपुत्रसापत्नमातुःस्वपुत्रसपत्नीपु-त्ररहितभार्याया अपुत्रपितृव्यस्यापुत्रमातामहमातामह्योश्वदाहादिप्रेतकर्माणिकुर्यात् अत्रापुत्रपदेनमुख्यगौणपुत्रपौत्रप्रपौत्राभावोविवक्षितः मातुरौर्ध्वदेहिकमनुपनी-तोपिजीवत्पितृकःकुर्यात् तत्रविशेषः ऊनत्रिवर्षश्चूडारहितश्चेद्दाहमात्रंसमन्त्र-कंकृत्वान्यदन्येनकारयेत् यदातुकृतचूडःपूर्णत्रिवर्षोवा तदासर्वंसमन्त्रकंप्रेतकर्म-कुर्यात् ब्रह्मचारीतुपित्रोर्मातामहस्यचान्त्यकर्मकुर्यान्नान्यस्य भर्तृदौहित्रयोःसत्त्वे-भर्तैवपत्न्यादाहादिकुर्यात् मुण्डनंतुभर्तुर्न एवमपुत्रस्यपत्नीदौहित्रयोःसत्त्वेपत्न्ये-वपत्युःकुर्यात् तत्रदाहमात्रंसमन्त्रकंकृत्वान्यत्संकल्पमात्रंस्वयंविधायब्राह्मणद्वा-राकारयेत् भर्तृसपत्नीपुत्रयोःसत्त्वेसापत्नपुत्रएवकुर्यान्नभर्ता सपत्नीपुत्रदौहित्रयोः सत्त्वे सपत्नीपुत्रएव अपुत्रयोर्विधवाविधुरयोर्भ्रातृपुत्रदौहित्रयोः सत्त्वेदौहित्रएवा-धिकारीतिबहवः विधवाया भर्तुर्भ्रातृपुत्रएवविधुरस्यस्वभ्रातृपुत्रएवेतिजीवत्पितृ-कनिर्णयेभट्टाः अपुत्रस्य पत्नीभ्रातृपुत्रयोःसत्त्वेपत्न्येव एवंपुत्रासन्निधौपौत्रादेः पितामहपितामह्याद्यौर्ध्वदेहिकाद्यधिकारः इत्थंपित्र्यकर्ममुण्डनप्रेतकर्माद्यधिका-रानधिकारौजीवत्पितृकस्यप्रपञ्चितौ अत्रविषयभेदाद्बालबोधार्थत्वाच्चापुनरुक्ति-र्नातिदोषायसपिण्डानांसगोत्रसपिण्डमरणेसकृत्सकृत्तिलाञ्जलिदानंविहितंतज्जी-वत्पितृकेणापिकार्यम् एवंमातामहाचार्यादिभ्योपि इतिजीवत्पितृकनिर्णयः ॥

**प्रेतकर्मप्रतिप्रसव**—(प्रतिप्रसव=सामान्य निषेधाचा विशेष गोष्टीपुरता पुनः विधि)—ज्याचा बाप जिवंत आहे अशानें—आपली आई, मुलगा नसलेली आपली सावत्र आई, आपला मुलगा, मुलगा नसलेली आपल्या मुलाची

बायको ( सून ), अपुत्र चुलता, मुलगा नसलेला आपल्या आईचा बाप व त्याची बायको ( आजी )—यांचीं दहनादि प्रेतकर्मे करावींत. येथें अपुत्र म्हणजे मुख्य व गौण पुत्र आणि पौत्र व प्रपौत्र नसणें असा अर्थ घ्यायचा. मुंज न झालेल्यानेंही बाप जिवंत असतां आपल्या आईचें जें अंत्यकर्म करावें, त्याबद्दलचा विशेष निर्णय येणेंप्रमाणें:—मुलगा तीन वर्षांपेक्षां कमी वयाचा व चौल न झालेला असल्यास, त्यानें आपल्या आईचें प्रेत फक्त समंत्रक दहन करावें व पुढची क्रिया दुसऱ्याकडून करवावी. चौल झालेला व पुरा तीन वर्षांचा असल्यास सर्व प्रेतकर्म त्यानें समंत्रक करावें. ब्रह्मचाऱ्यानें—बाप, आई व आईचा बाप (मातामह) यांचेंच तेवढें अंत्यकर्म करावें, इतरांचें करूं नये. नवरा व मुलीचा मुलगा ( दौहित्र ) असलेलीचें दहन भर्त्याप्रमाणेंच करावें, मुंडन मात्र करूं नये. मुलगा नसलेल्याची बायको व दौहित्र जर असतील तर स्त्रियेनेंच आपल्या पतीचें अंत्यकर्म फक्त दहनापर्यंत समंत्रक असें तिनें करून, पुढचें कर्म संकल्पमात्र आपण करावें व बाकीचें ब्राह्मणाकडून करवावें. नवरा व सवतीचा मुलगा असतां त्या मुलानेंच आईचें अंत्यकर्म करावें. मुलगा नसलेली विधवा व बायको नसलेला विधुर यांचें अंत्यकर्म भावाचा मुलगा व दौहित्र असतां, दौहित्रानेंच करावें, असें बरेच ग्रंथकार सांगतात. विधवेच्या नवऱ्याच्या भावाचा मुलगा व विधुराच्या भावाचा पुत्र हेच अधिकारी असल्याचें जीवत्पितृकनिर्णयांत भट्ट सांगतात. अपुत्राची बायको व भावाचा मुलगा असतां पत्नीच अधिकारी होय. पुत्र जवळ नसेल तर आजा व आईची आई (मातामही) यांच्या अंत्यकर्माचा अधिकार त्यांच्या नातवादिकांस आहे. पितृकर्म, मुंडन व प्रेतकर्म यांचे जीवत्पितृकाचे अशा प्रकारचे अधिकार व अनधिकार विस्तारपूर्वक सांगितले. या विषयाचे बरेच भेद असल्यानें, अज्ञानी जनांना ते कळावे म्हणून जरी पुनरुक्ति झाली असली तरी ती दोषास्पद मानूं नये. सपिण्ड मेल्यास एक वार तिलांजली देण्यास सांगितलें असल्यानें ती जीवत्पितृकानेंही द्यावी. आईचा बाप व गुरु यांनांही ती ( तिलांजली ) द्यावी. असा हा जीवत्पितृकाचा प्रेतकर्मप्रसव आहे.

अथश्राद्धाद्यधिकारिनिर्णयः तत्रसांवत्सरिकादिश्राद्धेषुदाहाद्यौर्ध्वदेहिकक्रियायांचौरसःपुत्रोमुख्योऽधिकारी औरसपुत्राणांबहुत्वेज्येष्ठएवाधिकारी ज्येष्ठस्याभावेऽसन्निधानेवापातित्यादिनाधिकाराभावेवाज्येष्ठानुजः यत्तुज्येष्ठासान्निध्येसर्वतःकनिष्ठोऽधिकारी नतुमध्यमाइतितन्निर्मूलम् तत्रपुत्राणांविभक्तत्वेकनिष्ठेभ्योधनंगृहीत्वाज्येष्ठेनैवसपिण्डीकरणान्ताक्रियाकार्या सांवत्सरिकादिकंतुपृथक्पृथक् अविभक्तत्वेतुसांवत्सरिकादिकमप्येकेनैवकार्यम् एकेनकृतेपिसर्वेषांफलभागित्वात्सर्वैःपुत्रैर्ब्रह्मचर्यपरान्नवर्जनादयोनियमःकार्याःपुत्राणामेकदेशस्थित्यभावेदेशान्तरेगृहान्तरेवास्थितैस्तैरविभक्तैरपिपृथगेववार्षिकादिकंकार्यम् तत्रयदा ज्येष्ठासन्निधौकनिष्ठोदाहादिकंकरोतितदाषोडशश्राद्धान्तमेवकुर्यान्नसपिण्डीकरणम् वर्षपर्यन्तंज्येष्ठप्रतीक्षांकुर्यात् तन्मध्ये ज्ञातेज्येष्ठेनैवकार्यम् नोचे-

द्वर्षान्तेकनिष्ठेनापिकार्यम् वर्षात्प्राक्पुत्रभिन्नेनकृतमपिमासिकानुमासिकसपिण्डीकरणंपुत्रेणपुनःकार्यम् एवंकनिष्ठेनकृतमपिज्येष्ठपुत्रेणपुनःकार्यम् विशेषस्त्वग्रेवक्ष्यते ॥

**श्राद्धाधिकारीनिर्णय**—सांवत्सरिकादिक श्राद्धें आणि और्ध्वदेहिकादि क्रिया यांचा मुख्याधिकारी मुलगा ( पुत्र ) होय. अनेक औरस पुत्र असतील तर त्यांतल्या सर्वांत थोरल्यालाच हे अधिकार आहेत. थोरला मुलगा नसेल, तो दूर असेल किंवा पातित्यादिकांनीं त्याचा अधिकार जर उडाला असेल, तर त्याच्या खालचा मुलगा अधिकारी समजावा. थोरला मुलगा सन्निध नसतां कनिष्ठालाच त्याचे सर्व अधिकार असतात. मधले मुलगे अधिकारी नसल्याचें जें सांगतात, त्याला कोठेंच आधार नाहीं. मुलगे विभक्त असल्यास भाकटथापासून द्रव्य घेऊन थोरल्यानेंच सपिंडीपर्यंतची सर्व क्रिया करावी व सांवत्सरिक श्राद्ध निराळें करावें. विभक्त नसल्यास सांवत्सरिक श्राद्ध एकानेंच करावें म्हणजे बाकीचे सर्व त्याचे फलभागी होतात; यास्तव, सर्व पुत्रांनीं—ब्रह्मचर्य, परान्नवर्जन वगैरे नियम धरावेत. सर्व पुत्र एकाच देशांत राहात नसतील, देशांतरीं असतील किंवा निरनिराळ्या घरांतून राहात असतील, तर त्या अविभक्तांनीं वार्षिक श्राद्ध निरनिराळें करावें. ज्येष्ठ सन्निध नसल्यानें कनिष्ठानें जर दहन केलें असेल तर त्या कनिष्ठानें षोडशश्राद्धापर्यंतच क्रिया करावी, सपिंडीकरण करूं नये. थोरल्या भावाची एक वर्ष वाट पाहावी व तो जर त्या मुदतींत आला तर त्यानेंच सपिंडी करावी आणि तसें न झाल्यास वर्षाच्या शेवटीं कनिष्ठानेंच ती ( सपिंडी ) करावी. वर्षाच्या आंत जरी पुत्रावांचून इतर कोणी मासिक, अनुमासिक वगैरे केलीं असलीं, तरी पुत्रानें तीं पुन्हा करावींत. कनिष्ठानें जर तीं केलीं असलीं तरी ज्येष्ठानें पुन्हां तीं सर्व करावींत. या बाबतीचा निर्णय पुढें सांगूं.

कनिष्ठस्यसाग्निकत्वेसपिण्डीकरणमपिद्वादशेह्निकनिष्ठेनकार्यम् औरसपुत्राभावेपुत्रिकासुतक्षेत्रजादयोद्वादशविधाः पुत्राउक्तास्तथापिकलौतेषांपुत्राणांनिषेधादौरसपुत्राभावेदत्तकएवाधिकारी मातापितृभ्यामन्यतरेणवाविधिपूर्वदत्तःप्रतिग्रहीतृसवर्णोदत्तकः भार्यानुमत्यापत्युःपुत्रदातृत्वंतदप्यापदि अत्यन्तापदितुभार्यानुमत्यभावेपि पत्न्याःमत्यनुमत्यैव अत्रविशेषविचारःप्रागुक्तः दत्तकाभावेपौत्रः पौत्राभावे प्रपौत्रः अन्येत्वौरसाभावेपौत्रःतदभावेप्रपौत्रः प्रपौत्राभावे दत्तकइत्याहुः उपनीतपौत्रसत्त्वेप्यनुपनीतस्याप्यौरसपुत्रस्यैवाधिकारः सच-कृतचूडस्यैववर्षाधिकवयसःपूर्णात्रिवर्षस्यत्वकृतचूडस्यापि अनुपनीतेनापिमन्त्रपाठपूर्वकमेव पित्रोरौर्ध्वदेहिकंसांवत्सरिकादिकंश्राद्धंचकार्यम् अशक्तोत्वग्निदानमात्रंसमन्त्रकमनुपनीतेनकार्यम् अन्यत्त्वन्यद्वारा एवंश्राद्धेपिदर्शमहालयादौसंकल्पमात्रंकार्यम् अन्यदितरेण केचित्तूनत्रिवर्षेणचूडारहितेनापिदाहमात्रंसमन्त्रकंकार्यंशेषमन्येनेत्याहुः दत्तकस्तूपनीतएवाधिकारी दत्तकाभावेप्रपौत्राभावेचभर्तुःपत्नीपत्न्याभर्ताचदाहाद्यौर्ध्वदेहिकंसांवत्सरिकश्राद्धादिकंचकुर्यात्

भर्तुरापिसपत्नीपुत्रसत्त्वेऽधिकारोन विदध्यादौरसःपुत्रोजमन्याऔर्ध्वदेहिकम्।
तदभावेसपत्नीजइत्युक्तेः भार्ययापिसमन्त्रकमेवौर्ध्वदेहिकादिकंकार्यम्अशक्तौ-
त्वग्निदानमात्रंसमन्त्रकंकृत्वाशेषमन्येनकार्यम् श्राद्धे संकल्पमात्रंकृत्वाशेषमन्येन॥

**औरसपुत्राभावाधिकारी-निर्णय**—धाकटा मुलगा अग्नियुक्त असल्यास त्यानें सपिंडीकरणही बाराव्या दिवशीं करावें. औरस पुत्र नसल्यास–मुलीचा मुलगा, क्षेत्रज पुत्र वगैरे बारा प्रकारचे जे पुत्र आहेत, ते जरी अधिकारी होतात, तरी कलियुगांत औरस पुत्रावांचून इतर कोणा-लाही अधिकार नसल्यानें त्या सर्वांच्या जागीं दत्तक पुत्रासच तो अधिकार पोंचतो. आई व बाप यांनीं किंवा त्या दोहोंतून एकानें विधिपूर्वक दिलेला ( दत्तक ) आणि तो घेणाऱ्याच्या वर्गांतला ( गोत्र ) असलेला जो (पुत्र) तोच दत्तक होय. स्त्रीची परवानगी घेऊन पतीनें मुलगा दत्तक देणें ही गोष्ट आपत्तिविषयक समजावी. अत्यंत आपत्प्रसंगीं स्त्रीचें अनुमोदन नसतांही पतीनें पुत्राला दत्तक द्यावें. पुत्र दत्तक देण्याचा स्त्रीला अधिकार तिच्या पतीच्या अनुमतीनेंच आहे व त्याचा विशेष विचार पूर्वीं सांगितलाच आहे. दत्तकाच्या अभावीं नातू व नातवाच्या अभावीं पणतू हे अधिकारी आहेत. यांच्या अभावीं दत्तक असाही कित्येक ग्रंथकारांचा अभिप्राय आहे. मुंज झालेला नातू असतांही मुंज न झालेला औरस पुत्रच जरी अधिकारी आहे, तरी तो एक वर्षांहून मोठा व चौल झालेला मात्र पाहिजे. चौल-संस्कार झालेला नसतांही तो जर पुऱ्या तीन वर्षांचा असेल तर तोच अधिकारी होय. मुंज न झालेल्यानेंही मातापित्यांचीं अंत्यकर्मे आणि सांवत्सरादिक श्राद्धें समंत्रक करावींत. सर्व कर्मे करण्याची गैरसोय असल्यास मुंज न झालेल्यानें समंत्रक अग्नि मात्र द्यावा आणि इतर कर्म दुसऱ्याकडून करवावें. त्याचप्रमाणें त्यानें–श्राद्ध, दर्शश्राद्ध व महालय यांत फक्त संकल्प तेवढा स्वतः करून, इतर कर्म दुसऱ्याकडून करवावें. कित्येक ग्रंथकारांचें असें म्हणणें आहे कीं, तीन वर्षांहून कमी वयाचा असून, त्याचा जरी चौलसंस्कार झालेला नसला तरी त्यानेंही दहन तेवढें समंत्रक करून, बाकीचें कर्म दुसऱ्याकडून करवावें. मुंज झालेलाच दत्तक पुत्र अधिकारी होतो. दत्तक व पणतू यांच्या अभावीं स्त्रीनें नवऱ्याचें व नवऱ्यानें स्त्रीचें दहन करून बाकीचें और्ध्वदेहिक कर्म आणि वार्षिक श्राद्धही स्वतःच करावें. सावत्र मुलगा असतां नवऱ्याला अधिकार नाहीं; कारण, आईचें अन्त्यकर्म औरस पुत्रानें व त्याच्या अभावीं सावत्र मुलानें करावें असें वचन आहे. स्त्रियेनेंही आपल्या पतीचें और्ध्व-देहिक कर्म समंत्रक करावें. शक्ति नसल्यास तिनें अग्निमात्र समंत्रक देऊन बाकीचें कर्म दुसऱ्याकडून करवावें.

यद्यप्यविभक्तस्यसंसृष्टस्यवाभ्रातुरेवधनग्रहाधिकारस्तथापिक्रियाधिकारः
पत्न्याएवविभक्तासंसृष्टेतुभ्रातरिधनाधिकारोपिपत्न्याएव पत्यभावेविभक्तासं-
सृष्टस्यकन्यापिण्डदाधनहारिणीच तत्रापिविवाहितैवपिण्डदा धनहरात्वनूढाऽपि
दुहितुरभावेदौहित्रोधनहारीपिण्डदश्च दौहित्राभावेभ्राताभ्रातुरभावेभ्रातुःपुत्रः

अविभक्तस्यसंसृष्टस्यचपत्न्यभावे भ्राता संसृष्टोनामपूर्वंविभक्तोभूत्वापुनः स्वधनंभ्रातृधनैरेकीकृत्यैकपाकाद्युपजीवनः तत्रसोदरासोदरसमवायेसोदरएव तत्रापि ज्येष्ठकनिष्ठयोः. सत्त्वेकनिष्ठएव कनिष्ठभ्रातुरभावेज्येष्ठभ्रातैव कनिष्ठबहुत्वेमृतानन्तरस्तदभावेतदनन्तरादयः एवंज्येष्ठबहुत्वेमृतानन्तरक्रमेणैव सोदरभ्रातुरभावेसापत्नभ्राता अत्रापिज्येष्ठत्वादिविचारःपूर्ववदेव केचित्तुदुहितृदौहित्रयोर्धनहारित्वेपिविभक्तासंसृष्टस्यदाहादिकंभ्रात्रैवकार्यम् सगोत्रसद्भावेभिन्नगोत्रस्यतदनधिकारादित्याहुः भ्रातुरभावेभ्रातृपुत्रः तत्रापिसोदरभ्रातृपुत्रोमुख्यः तदभावेसापत्नभ्रातृपुत्रः तदभावेपिता पितुरभावेमाता मातृभावेस्नुषा तदभावे-भगिनी तत्रानुजाग्रजसोदराणांसमवायेभ्रातृवत् भगिन्यभावेभगिनीपुत्रः समवायेतद्वदेव तदभावेपितृव्यतत्पुत्रादयःसपिण्डाः तदभावेसोदकाः तदभावे-गोत्रजाः तदभावेमातामहमातुलतत्पुत्रादयोमातृसपिण्डाअनुक्रमेण मातृसपिण्डाभावेस्वपितृष्वसृमातृष्वसृपुत्राः तदभावेपितुः पितृष्वसृमातृष्वसृमातुलपुत्ररूपाः पितृबन्धवः एवंमातुः पितृष्वस्रादिपुत्ररूपमातृबन्धवः पितृबन्धूनामभावेधिकारिणः तदभावेशिष्यः शिष्याभावेजामाताश्वशुरस्य श्वशुरोजामातुः तदभावेसखा तदभावेविप्रस्यकश्चिद्धनहारी विप्रभिन्नस्यराज्ञाधनंगृहीत्वातेनधनेनान्यद्वाराकारणीयम् अथवाविप्राद्यैर्मरणोन्मुखैर्धर्मपुत्रःकार्यः ॥

**मृतधनाधिकारनिर्णय**—अविभक्त म्हणजेच संसृष्ट भावाला जरी अधिकार असला, तरी क्रियेचा अधिकार स्त्रीलाच आहे. भाऊ जर विभक्त व असंसृष्ट असेल तर स्त्रीलाच धनाधिकार आहे. पत्नी नसणारा विभक्त व असंसृष्ट असा जो कोणी मेलेला असतो त्याची कन्या हीच त्याला पिंड देणारी व त्याच्या धनाची अधिकारीण असते. अविवाहित कन्येला जरी पिंडाधिकार नाहीं, तरी धनाधिकार आहे. कन्या मृत असल्यास तिचा पुत्र पिंड देण्यास व धन घेण्यास अधिकारी होतो. अविभक्त व संसृष्ट अशाला जर बायको नसली तर त्याचा भाऊ अधिकारी होतो. संसृष्ट म्हणजे आधीं विभक्त होऊन व पुन्हा आपलें धन भावाच्या धनांत मिळवून एकाच सैंपाकांत जेवणारे जे ते जर सख्खे किंवा सावत्र असतील तर त्यांतला सख्खाच अधिकारी होय. त्यांतही जर ज्येष्ठ व कनिष्ठ असले तर कनिष्ठच अधिकारी होय. कनिष्ठाच्या अभावीं ज्येष्ठ भाऊच अधिकारी होतो. धाकटे भाऊ जर पुष्कळ असले तर मेलेल्या भावाच्या जवळचा जो धाकटा भाऊ तोच अधिकारी व तो नसल्यास त्याच्याच क्रमानें त्याच्या खालचा वगैरे अधिकारी होत. तद्वतच वडील भाऊ जर बरेच असले तर मृताच्या पश्चात् त्याच्यानंतर जो त्याच्या क्रमानेंच अधिकारी समजावेत. सख्खा भाऊ नसल्यास सावत्र भाऊ अधिकारी होतो. व तशा त्या सावत्रांतही ज्येष्ठत्वादिकांचा निर्णय मागें सांगितल्याप्रमाणेंच समजावा. कित्येक ग्रंथकारांच्या मतानें कन्या व तिचा पुत्र हे जरी धनग्रहणाचे अधिकारी असले, तरी विभक्त असून असंसृष्ट अशा भावाचें दहनादिक भावानेंच करावें; कारण, सगोत्री असतां भिन्न गोत्रांतल्याला कर्माधिकार नाहीं. भाऊ नसल्यास भावाचा मुलगा व त्यांतही सख्ख्या भावाचा

मुलगा मुख्याधिकारी होय. तोही नसल्यास सावत्र भावाचा मुलगा, तोही नसल्यास बाप, बापाच्या अभावीं माता, मातेच्या अभावीं सून, सुनेच्या अभावीं बहीण व त्यांतही जर अनुजा, (पाठची), अग्रजा (थोरली) सोदरा (सख्खी) असोदरा (सावत्र) अशा जर अनेक बहिणी असतील तर त्यांचाही निर्णय भावाप्रमाणेंच समजावा. बहीण नसल्यास तिचा मुलगा व तेही पुष्कळ असले तर त्यांचाही निर्णय मागें सांगितलेल्या भ्रातृनिर्णया प्रमाणेंच समजावा. बहिणीचा मुलगा नसल्यास चुलता व त्यांचे पुत्र हे अधिकारी समजावेत. सपिंड नसल्यास सोदक, सोदक नसल्यास गोत्रज, गोत्रज नसल्यास आईचा बाप, मामाचा, मामाचा मुलगा वगैरे जे मातृपिंड ते अधिकारी होतात. मातृसपिंडांतलेही कोणी नसल्यास आतेभाऊ व मावसभाऊ. तेही नसल्यास बापाचे आतेभाऊ, मामेभाऊ किंवा मावसभाऊ हे पितृबंधुरूप होत. चुलता नसल्यास आईचे पितृष्वस्रादि पुत्ररूप मातृबंधु अधिकारी होतात. तेही नसल्यास शिष्य, शिष्य नसल्यास जांवई सासऱ्याचा व सासरा जांवयाचा असे अधिकारी होतात. जांवई नसल्यास सखा (मित्र) व मित्रही नसल्यास कोणातरी ब्राह्मणाला धनहारी समजावा. ब्राह्मणही नसल्यास राजानें त्याचें धन घेऊन दुसऱ्याकडून कर्म करवावें किंवा मरणोन्मुख अशा ब्राह्मणांदिकांनीं धर्मपुत्र करावा.

अथस्त्रीणांदाहाद्यधिकारिणः। अनूढायाः स्त्रियाः पिता तदभावेभ्रात्रादिः ऊढायास्तत्पुत्राभावेसपत्नीपुत्रः तदभावेपौत्रप्रपौत्राः तदभावेपतिः तदभावेदुहिता तदभावेदौहित्रः तदभावेपत्युर्भ्राता तदभावेपत्युर्भ्रातृपुत्रः तदभावेस्नुषा तदभावेपिता पितुरभावेभ्राता तदभावेभ्रातृपुत्रादयः पूर्वोक्ताः अत्रसर्वत्रपुत्रभिन्नानां पुत्रासंनिधानात्पुत्राभावाद्वाकर्तृत्वंविमिस्थितम् तत्रयदिपुत्रासंनिधानात्कर्तृत्वं तदापुत्रभिन्नैर्दाहमारभ्यसपिण्डीकरणात्प्राचीनकर्मैवकार्यम् नतुपुत्रभिन्नैःसपिण्डीकरणंकार्यम् पुत्राभावेत्वन्यैःसपिण्डीकरणमपिकार्यम्। तत्रापिसपिण्डादिभिर्नृपान्तैर्दाहमारभ्यदशाहक्रियाःकार्याएव ताएवपूर्वाइत्युच्यन्ते ततएकादशाहमारभ्यसपिण्डीकरणान्तामध्यसंज्ञास्तासुसपिण्डादीनांकृताकृतत्वम् तदूर्ध्वा अनुमासिकसांवत्सरिकाद्यास्ताउत्तराख्याःसपिण्डादिभिर्न कार्याएव इदंचतदीयवृत्त्यादिस्थावरधनस्यचरधनस्यवाग्रहणाभावे तदन्यतरधनग्रहणेतुसपिण्डादिभिरपिमध्यमोत्तराख्याअपिक्रियाः कार्याएवराज्ञातुमृतधननसत्त्वेतद्धनद्वारा तत्सजातीयवर्णहस्तेनसर्वाअपिक्रियाः कारणीयाएव धनाभावेतुपूर्वान्ताएवावश्यंकारणीयानान्याः सपिण्डादिनृपान्तभिन्नानांतुमृतस्यधनाभावेपिस्वधनेनैवसपिण्डीकरणान्तक्रियाकरणमावश्यकम् मृतस्यधनंगृहीत्वाप्रेतकार्याकरणेनृपान्तानांतद्वर्णवधप्रायश्चित्तम् पुत्राद्यैर्भ्रातृसंतत्यन्तैर्दौहित्रैश्चतत्पुत्रैश्चत्रिविधाअपिक्रियाधनग्रहणसत्त्वेतदसत्त्वेवापिकार्याएव तत्रस्त्रीणामुत्तराः क्रियामृताहन्येव नतुदर्शादौ भर्तृश्राद्धेनैवनिर्वाहस्मृतेः पूर्वमध्यमाख्यास्तुपृथगेवस्त्रीणाम् केचित्पुत्रपत्योरभावेस्त्रीणांदौहित्रादिभिःसपिण्डीकरणरहिता एवोत्तराः क्रियाःकार्याः सपिण्डीकरणंतुतासांनकार्यम् सपिण्डीकरणाभावेपिएकोद्दिष्टवि-

धिनावार्षिकादिकंकार्यमित्याहुः ब्राह्मणस्त्वन्यवर्णानांनकुर्यात्कर्मपैतृकम् । कामाल्लोभाद्भयान्मोहात्कृत्वातज्जातितांव्रजेत् १ शूद्रेणापिब्राह्मणस्यनकार्यंपैतृकंक्वचित् ॥

**स्त्रीदहनाधिकारी**—अविवाहित स्त्रीचा अधिकारी बाप व भाऊ. विवाहित स्त्रीस पुत्र नसल्यास सावत्र मुलगा, नातू किंवा पणतू यांपैकीं कोणीही नसल्यास नवरा व तोही नसल्यास कन्या किंवा कन्यापुत्र. तींही दोन्ही नसल्यास दीर किंवा दिराचा मुलगा, तेही नसल्यास स्नुषा ( सून ), तीही नसल्यास बाप किंवा भाऊ. तेही नसल्यास मागील सर्वांच्या अभावीं पूर्वीं सांगितलेले भ्रातृपुत्रादि अधिकारी होत. येथें जे मुलावांचून इतर अधिकारी सांगितले ते, पुत्र नसल्यास किंवा दूर असेल तरच क्रियाधिकारी होतात. पुत्र जवळ नसल्यानें जर दुसरा कर्ता असला, तर पुत्राव्यतिरिक्तांनीं दहनाला आरंभ करून, सपिंडीच्या पूर्वीपर्यंतचेंच कर्म करावें. त्यांनीं सपिंडीकरण करूं नये. पुत्र नसेलच तर मात्र त्यांनीं तें करावें. सपिंडापासून राजापर्यंत जे अधिकारी, त्यांतल्या कोणीही दहनाला आरंभ करून दहा दिवसांच्या क्रिया कराव्या. यांनाच पूर्वाक्रिया असें म्हणतात, अकराव्या दिवसापासून सपिंडीच्या शेवटापर्यंतच्या क्रियेला मध्यमाक्रिया म्हणतात. सपिंडीकरणाच्या पुढच्या ज्या अनुमासिक, सांवत्सरिक वगैरे क्रिया त्यांना उत्तराक्रिया म्हणतात. या क्रिया सपिंडादिकांनीं करूं नयेत असा जो निर्णय आहे तो—मृताची वृत्ति (उत्पन्नांची बाबत) आणि स्थावर व जंगम धन—हीं जर घेतलीं नसतील तरच लागू आहे. स्थावर किंवा जंगम-यांतून कोणचेंही जरी धन घेतलें, तरी सपिण्डादिकांनींही मध्यमा व उत्तरा या दोन्ही क्रिया कराव्याच. मृताचें धन असल्यास, राजानें सजातीयाकडून सर्व क्रिया करवाव्या व धन नसल्यास पूर्वाक्रिया तेवढ्या करवाव्या, इतर करवूं नयेत. सपिंडापासून राजापर्यंतच्या अधिकाऱ्यांहून जे इतर त्यांनीं, मृताचें जरी धन नसलें तरी आपल्या धनानेंच सपिंडीकरणान्त क्रिया करणें अवश्य आहे. मृताचें धन घेऊन त्याचें प्रेतकार्य न करणाऱ्या सपिंडापासून राजापर्यंतच्या सर्व अधिकाऱ्यांना तद्वर्णवधाचें प्रायश्चित्त आहे. पुत्रापासून भावाच्या पुत्रापर्यंतचे सर्व, दौहित्र व दौहित्रपुत्र—यांनीं मृताचें धन घेतलें असो वा नसो, त्यांनीं पूर्वीं सांगितलेल्या तिन्ही क्रिया अवश्य कराव्या व त्यांत ज्या स्त्रियांच्या उत्तर क्रिया करणें त्या मृतादिनींच कराव्या, दर्शादि दिवशीं करूं नयेत; कारण, भर्त्याच्या श्राद्धानेंच तें काम होतें, असें वचन आहे. स्त्रियांच्या पूर्वा आणि मध्यमा नांवांच्या क्रिया निरनिराळ्या कराव्या. पुत्र व पति नसल्यास दौहित्रादिकांनीं स्त्रियांच्या सपिंडीकरणावांचून उत्तरा क्रिया तेवढ्याच कराव्या. स्त्रियांचें सपिंडीकरण करूं नये, असें कित्येक ग्रंथकार जरी सांगतात, तरी सपिंडीकरण जरी केलें नाहीं तरी एकोद्दिष्टविधीनें वार्षिकादि करावें असें म्हणतात. ब्राह्मणानें इतर वर्णांचें पैतृककर्म करूं नये. काम, मोह व लोभ यांच्या आधीनतेनें जर यदाकदाचित् केलेंच तर तो तज्जातीयत्वाला पावतो (त्या जातीचा ठरतो). शूद्रानेंही ब्राह्मणाचें पैत्रिककर्म करूं नये,

दत्तकस्तुजनकपितुःपुत्राद्यभावेजनकपितुः श्राद्धंकुर्याद्धनंचगृह्णीयात् जनकपालकयोरुभयोःपित्रोःसंतत्यभावेदत्तकोजनकपालकयोरुभयोरपिधनंहरेत् श्राद्धं चप्रतिवार्षिकमुभयोः कुर्यात् दर्शमहालयादौतुद्वयोःपित्राद्योःश्राद्धंदेयम् तत्र द्वयोः पित्राद्योःपृथक्पिण्डदानम् पित्रादिद्वयद्वयोद्देशेनैकैकोवापिण्डःएवंदत्तकस्यपुत्रोपि दत्तकजनकस्यपुत्राद्यभावेस्वपितरंपितामहद्वयंप्रपितामहद्वयंचोच्चार्यदर्शादिकंकुर्यात् तथैवधनंहरेत् एवंदत्तकपौत्रोपितज्जनककुलेप्रपितामहस्यपुत्राद्यभावेपितरंपितामहंचैकमुच्चार्यप्रपितामहद्वयमुच्चार्यदर्शादिश्राद्धंकुर्यात् प्रपितामहस्यधनंचहरेत् यद्येषांस्वसुभार्यास्वपत्यंनस्याद्रिक्थंहरेयुःपिण्डंचैभ्यस्त्रिपुरुषंदद्युरित्यादिरेकपिण्डेद्वावनुकीर्तयेद्ग्रहीतारंचोत्पादयितारंचातृतीयात्पुरुषादित्यादेश्चलौगाक्ष्यादिस्मृतिवचनात् यदिजनकपालकयोरुभयोरपिपुत्रादिसन्ततिसत्त्वं तदादत्तकउभयोरप्यौर्ध्वदेहिकंवार्षिकादिकंचनकुर्यात् पालकपितुरौरसपुत्राद्विभक्तेनदत्तकेनदर्शमहालयादिश्राद्धमात्रंपालकपित्रादिपार्वणोद्देशेनकार्यम् अविभक्तस्यतुतदौरसकृतदर्शादिनैवदत्तकस्यदर्शादिसिद्धिरितिभाति ॥

**दत्तकाधिकार**—दत्तक देणाऱ्याला जर कोणी पुत्रादिक अधिकारी नसेल तर दत्तक गेलेल्यानें त्या आपल्या जन्मदात्या बापाचें श्राद्ध करावें व धनही घ्यावें. जन्मदाता बाप व दत्तक घेणारा पिता या दोघांनाही जर संतति नसेल तर दत्तकानें त्या उभयतांचें धन घ्यावें व त्यांची प्रतिसांवत्सरिक श्राद्धें करावींत. दोन्हीकडच्या पितरांस निरनिराळें पिंडदान करावें, किंवा पित्रादिक दोघादोघांच्या नांवानें एकेक पिंड द्यावा. याप्रमाणेंच दत्तकाच्या पुत्रांनींही दत्तकाला जन्म देणाऱ्या बापाला पुत्रादि कोणी नसल्यास—आपला बाप, दोन आजे व दोन पणजे यांचीं नांवें उच्चारून दर्शश्राद्ध करावें व धनही घ्यावें. दत्तकाच्या नातवांनींही, त्यांच्या जन्मदात्या बापाच्या कुलांतल्या पणज्यास पुत्र नसल्यास एक पिता व एक पितामह यांचा उच्चार करून, दोन प्रपितामहांच्या नांवानें दर्शश्राद्ध करावें व प्रपितामहाचें धनही घ्यावें. कारण, जनक पित्यापासून मागचे जे तीन पुरुष त्यांच्या स्वस्त्रियांना जर अपत्य नसेल, तर दत्तकानें व त्याच्या पुत्रांनीं तीन पुरुषांस पिंड देऊन, त्यांचें धन घ्यावें व दत्तक घेणारा पिता व जनक पिता या दोघांच्या नांवानें एकच पिंड द्यावा. तिसऱ्या पुरुषापर्यंतच हें समजावें, असें लौगाक्षिस्मृतिवचन आहे. जनक पिता व पालक पिता या दोघांनाही जर पुत्रादि संतति असली तर दत्तकानें दोघांचेंही अन्त्यकर्म व वार्षिक श्राद्ध—हीं करूं नयेत. पालक पित्याला औरस मुलगा असतां, त्याच्यापासून दत्तक मुलगा जर विभक्त असेल, तर त्यानें पालक पित्याचें पार्वणाच्या उद्देशानें दर्शमहालयादि श्राद्ध तेवढें करावें. विभक्त नसल्यास, औरसपुत्रानें केलेल्या श्राद्धादिकांनींच श्राद्धसिद्धि होते असें वाटतें.

ब्रह्मचारिणोमासिकाब्दिकादिश्राद्धंमातापितृभिःकार्यम् ब्रह्मचारिणातुमातृपितृमातामहोपाध्यायाचार्यभिन्नानांशवनिर्हरणंदाहाद्यन्त्यकर्मचनकार्यम् अन्याधिकार्यभावेमातृपितृमातामहाचार्याणांदाहादिकंब्रह्मचारिणाकार्यम् तत्र

दशाहकर्मकरणेदशाहमाशौचम् दाहमात्रकरणेएकाहम् तदाप्यस्यनित्यकर्म-लोपोनास्ति अशुचित्वेप्याशौचिनामन्नंतेननभोक्तव्यम् तैःसहनवस्तव्यम् तदु-भयकरणेप्रायश्चित्तपुनरुपनयनेवक्ष्येते अन्येषांदाहादौकृच्छ्रत्रयंपुनरुपनयनंच धर्मार्थंकेनचित्कस्यचित्सवर्णस्यदाहादिश्राद्धादिकरणेसंपत्त्यादिफलम् अयं-सर्वोपिश्राद्धविधिः शूद्राणाममन्त्रकः कार्यः अत्रकेचिद्वैदिकमन्त्रपाठएवशूद्रा-णांवर्ज्यः पौराणमन्त्रास्तुपठनीयाइत्याहुः पौराणमन्त्राअपिशूद्रेणस्वयंनपठनी-याः किंतुविप्रद्वारापठनीयाः वेदमन्त्रास्तुनविप्रद्वारापीतिसिन्धुः एवंद्विजस्त्रियो पिव्रतोद्यापनादाविवसंकल्पमात्रंस्वयंकृत्वावैदिकमन्त्रादिप्रयुक्तंसर्वंश्राद्धंविप्र-द्वाराकारयेयुरितिपारिजातकारमतम् शूद्रस्यसदामश्राद्धमेव पित्रेनमःपितामहा-यनमइत्येवमादिनानमोन्तनाममन्त्रेणनिमन्त्रणपाद्यासनगन्धपुष्पादिनाविप्रान्सं-पूज्यामंनिवेद्यसक्तुनापिण्डदानादिकृत्वादक्षिणादानादिनाश्राद्धंसमाप्यसजा-तीयान्गृहसिद्धपक्वान्नेनभोजयेत् यत्तुसिन्धौनाममन्त्रेणावाहनाग्नौकरणकाश्यप-गोत्रोच्चारपूर्वकपिण्डदानादिकंतर्पणादिकंपाकेन पिण्डदानादिकंचोक्तंतत्सच्छू-द्रविषयम् सप्तपुरुषंत्रिपुरुषंवापरंपरयास्नानवैश्वदेवतर्पणादिकंशूद्रकमलाकरा-दिग्रन्थसंगृहीतंधर्मंनियमेनाचरन्सच्छूद्रउच्यते एवंकिरातयवनादिहीनजातीया-नांविप्रेभ्यआमदानदक्षिणादानपूर्वकं स्वस्वजातीयभोजनात्मकमेवश्राद्धम् राजकार्येनियुक्तस्यबन्धनिग्रहवर्तिनः । व्यसनेषुचसर्वेषुश्राद्धंविप्रेणकारयेत् १ अत्रप्रथमंजीवत्पितृकनिर्णयउक्तस्तत्रप्रसङ्गात्किंचिदधिकारविचारोप्युक्तः इदा-नींतुसर्वोप्यधिकारक्रमविचारः सविस्तरउक्तइतितेनात्रपुनरुक्तिर्बालबोधनार्थ-त्वान्नदोषाय इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुविरचितेधर्मसिन्धुसारेश्राद्धाधिकार-दाहाद्यधिकारनिर्णयः॥

**ब्रह्मचार्यधिकार**—ब्रह्मचाऱ्याचीं-मासिक, वार्षिक इत्यादि श्राद्धें मातापितरां-नींच करावींत. माता, पिता, मातामह, उपाध्याय व आचार्य यांवांचून इतरांचें ब्रह्मचाऱ्यानें शव नेऊं नये. व दहनादि अंत्यकर्म करूं नये. दुसरा कोणी जर अधिकारी नसेल तरच—माता, पिता, मातामह व आचार्य यांचें दहनादिक अंत्यकर्म त्यानें करावें. त्यांत दहा दिवसांचें कर्म करणें असल्यास दहा दिवस अशौच धरावें, व दहनच फक्त केलें असल्यास एक दिवस अशौच धरावें. त्या कालीं म्हणजे अंत्यकर्मामध्यें ब्रह्मचाऱ्याचे नित्यकर्माचा लोप नाहीं. ब्रह्मचारी अशुचि असला तरी त्यानें अशौच धारण करणाराचें अन्न भक्षण करूं नये व त्याजबरोबर राहूं नये. तसें केलें तर प्रायश्चित्त व पुनरुपनयन हीं कशीं करावींत तें पुढें सांगेन. इतरांचें दहनादि कर्म केल्यास तीन कृच्छ्र व पुनरुपनयन करावें. कोणा एका स्वकीय वर्णाचें दहनादिक व श्राद्धादिक धर्मार्थ करील तर संपत्ति इत्यादि फल प्राप्त होतें. हा सर्व श्राद्धविधि शूद्रांचा अमंत्रक करावा. कित्येक ग्रंथकार असें म्हणतात कीं, वैदिक मंत्राचा पाठ मात्र शूद्रास वर्ज्य आहे. पौराणमंत्र तर शूद्रांनीं पठण करावे. निर्णयसिंधूंत असें म्हटलें आहे कीं, पौराण मंत्रही शूद्रांनीं स्वतः

पठण करूं नयेत. ब्राह्मणाकडूनच पठण करवावेत व वेदमंत्र तर ब्राह्मणाकडूनही पठण करवूं नयेत. याप्रमाणें ब्राह्मणांच्या स्त्रियांनींही व्रतोद्यापनाप्रमाणें संकल्प मात्र स्वतः करून वैदिक मंत्रांनीं सर्व श्राद्ध ब्राह्मणाकडूनच करवावें, असें पारिजात-कारांचें मत आहे. शूद्रानें सदोदित आमान्नानेंच (शिधा) श्राद्ध करावें. 'पित्रे नमः पितामहाय नमः' इत्यादिक नमोन्तनाममंत्रानें निमंत्रण, पाद्य, आसन, गंध, पुष्प इत्यादि उपचारांनीं ब्राह्मणाची पूजा करून आमान्न (कच्चें अन्न) निवेदन केल्यावर, सातूच्या पिठानें पिंडदानादि करून–दान, दक्षिणादान इत्यादि विधीनें श्राद्ध समाप्त करावें व आपले सजातीयांस घरांत सिद्ध झालेल्या पक्वान्नांनीं भोजन घालावें. निर्णय-सिंधूंत नाममंत्रानें आवाहन, अग्नौकरण, काश्यपगोत्रोच्चारपूर्वक पिंडदानादिक तर्पणादिक आणि पक्वान्नांनीं पिंडदानादिक करावें असें सांगितलें आहे, तें सच्छूद्रा-विषयीं जाणावें. सात पुरुषांपर्यंत किंवा तीन पुरुषांपर्यंत परंपरेनें स्नान, वैश्वदेव, तर्पणादिक शूद्रकमलाकारादि ग्रंथांत संग्रहित केलेला धर्म नियमानें जो आचरण करणारा तोच सच्छूद्र होय. याप्रमाणें भिल्ल, यवन इत्यादि हीनजातीयांनीं ब्राह्म-णास आमान्नदान व दक्षिणादान करून आपआपल्या जातीस भोजन देणें हेंच श्राद्ध करावें. राजकार्यांत नियुक्त असलेल्यानें, कारागृहांत पडलेल्यानें व सर्व प्रकारच्या व्यसनाधीन असणारानें ब्राह्मणांकडून श्राद्ध करवावें. या उत्तरार्धांत प्रथम जीवत्पितृकाचा जो निर्णय सांगितला, त्यांतच प्रसंगानें किंचित् अधिकारा-चाही विचार सांगितला व आतां तर सर्व अधिकाऱ्यांचा क्रमानें सविस्तर विचार सांगितल्यामुळें व शास्त्रव्युत्पत्ति नसणाऱ्या अज्ञान्यांना बोध व्हावा या हेतूनें येथें जरी पुनरुक्ति झाली आहे तरी ती दोषास कारण नाहीं. इतिश्रीमदनंतोपाध्याय-सूनुविरचिते धर्मसिंधुसारे श्राद्धाधिकारनिर्णयः समाप्तः

**अथश्राद्धशब्दार्थः। पित्रादीन्मृतानुद्दिश्यविहितेकालेदेशेपक्वान्नामान्नहिर-ण्यान्यतमद्रव्यस्यविधिनादानंश्राद्धम् तत्राग्नौकरणंपिण्डदानंब्राह्मणभोजनंच-प्रधानम् तदुक्तम् होमश्चपिण्डदानंचतथाब्राह्मणभोजनम्। श्राद्धशब्दाभिधेयं-स्यादेकस्मिन्नौपचारिकम् १ इतिक्वचिद्वचनादशक्त्यावापिण्डदानाद्यकरणेब्रा-ह्मणभोजनादिमात्रमपिश्राद्धपदार्थःसंपद्यतइतिचतुर्थपादार्थः तथाचवचनान्त-रम् यजुषांपिण्डदानंतुबह्वृचानांद्विजार्चनम् श्राद्धशब्दाभिधेयंस्यादुभयंसाम-वेदिनाम् ॥ १ ॥ अश्रद्धयापितरोनसन्तीतिमत्वाश्राद्धमकुर्वाणस्यरक्तंपितरः पिबन्ति ॥**

**श्राद्धशब्दार्थ**—मृत पिता इत्यादिकांस उद्देशून विहितकालीं व देशीं–पक्वान्न, आमान्न व हिरण्य यांतून कोणत्याही एका द्रव्याचें विधियुक्त दान करणें तें श्राद्ध होय. त्यांत अग्नौकरण, पिंडदान व ब्राह्मणभोजन हें प्रधान आहे. कारण–होम, पिंडदान व ब्राह्मणभोजन या तीन कर्मांनीं मिळून झालेल्या विशिष्ट कर्मास श्राद्ध असें म्हटलें आहे. क्वचित् स्थळीं वचनावरून किंवा सामर्थ्य नसल्यामुळें पिंडदानादिक न केलें तरी ब्राह्मणभोजनादि मात्र करणें तें श्राद्ध होय,

असा श्राद्धपदाचा अर्थ सिद्ध होतो. याप्रमाणें चौथ्या पदाचा अर्थ सांगितला. तसेंच दुसरेंही वचन आहे तें असें:—'पिंडदान हेंच यजुःशाखीयांचें श्राद्ध होय, द्विजांचें पूजन हेंच ऋक्‌शाखियांचें श्राद्ध होय, व पिंडदान व ब्राह्मणपूजन हें सामवेदीयांचें श्राद्ध होय. पितर नाहींत असें अश्रद्धेनें मानून जो श्राद्ध करीत नाहीं त्याचे पितर रुधिरपान करितात.

अथश्राद्धभेदाः तत्रश्राद्धंचतुर्विधम् पार्वणश्राद्धमेकोद्दिष्टश्राद्धंनान्दीश्राद्धं सपिण्डीकरणश्राद्धंचेतिभेदात् पित्रादित्रयोद्देशेनविहितंपिण्डत्रययुतंपार्वणम् तच्चैकपार्वणकद्विपार्वणकत्रिपार्वणकमितित्रिविधम् तत्रपित्रादेर्मृततिथौक्रियमाणंप्रतिसांवत्सरिकमेकपार्वणकम् अमावास्यादिषण्णवतिश्राद्धनित्यश्राद्धानि महालयान्वष्टक्यभिन्नानिद्विपार्वणकानि एतेषुसपत्नीकपित्रादित्रयसपत्नीकमातामहादित्रययोरेवोद्देशात् अन्वष्टकाश्राद्धंत्रिपार्वणकं पित्रादित्रयमात्रादित्रयसपत्नीकमातामहादित्रयाणामुद्देशात् महालयश्राद्धंतीर्थश्राद्धंचपार्वणैकोद्दिष्टरूपम् पित्रादिपार्वणत्रयस्यपत्न्याद्येकोद्दिष्टगणस्यचोद्देशात् केचिदेतद्द्वयंमातामहमातामह्योः पार्वणभेदेनपार्वणचतुष्टययुतंकुर्वन्ति केषांचित्सूत्रेदर्शोपित्रिपार्वणकश्चतुः पार्वणकोवेतिहेमाद्रौ एकोद्देशेनक्रियमाणमेकंपिण्डयुतमेकोद्दिष्टम् तदपित्रिविधम् नवसंज्ञंनवमिश्रसंज्ञंपुराणसंज्ञंचेति मृतस्यप्रथमदिनमारभ्यदशाहान्तंविहितानिनवसंज्ञानि एकादशाहादीन्यूनाब्दान्तानिनवमिश्राणि एतानिविश्वदेवहीनानि ततःपराणि कनिष्ठभ्रातृवार्षिकशस्त्रहतचतुर्दशीश्राद्धादीनिपुराणसंज्ञानि केचित्सपिण्डयुत्तरंक्रियमाणानांपार्वणानामपिपुराणसंज्ञामाहुः पुत्रजन्मविवाहादौक्रियमाणंवृद्धिश्राद्धंनान्दीश्राद्धम् इदंपूर्वार्धेविस्तरेणप्रपञ्चितम् एतदेवगर्भाधानपुंसवनसीमन्तेषुआधानेसोमेचक्रियमाणंकर्माङ्गमिष्टिश्राद्धमितिचोच्यते अत्रक्रतुदक्षौविश्वेदेवाः अन्यकर्मसुवृद्धिसंक्रम् तत्रसत्यवसुविश्वेदेवाः इतिनामभेदोदेवभेदश्चान्यत्समानम् एतच्चपार्वणत्रययुतत्वात्पार्वणभेदान्तर्गतमपिदर्शादितोबहुधर्मभेदात्पृथगुद्दिष्टम् मृतस्यद्वादशाहादिकालेपिण्डार्घ्यसंयोजनादिरूपंसपिण्डीकरणम् एतदपिपार्वणैकोद्दिष्टविकाररूपम् अत्रविशेषोवक्ष्यते एवंचपार्वणमेकोद्दिष्टमिति द्विविधमेवश्राद्धम् एतत्पुनस्त्रिविधम् नित्यंनैमित्तिकंकाम्यंचेति नियतनिमित्तेविहितंनित्यम् यथा-दर्शादि प्रत्यहंविहितमपिश्राद्धंनित्यंसंज्ञंपार्वणद्वययुतंविश्वदेवहीनमुक्तम् अनियतनिमित्तेविहितंनैमित्तिकम् यथासूर्यचन्द्रग्रहणादौ एतदपिषड्दैवतम् फलकामनोपाधिकंकाम्यम् यथापञ्चम्यादितिथौकृत्तिकादिनक्षत्रेच ॥

**श्राद्धभेद**—पार्वण, श्राद्ध, एकोद्दिष्ट श्राद्ध, नांदीश्राद्ध व सपिंडीकरणश्राद्ध असे श्राद्धाचे चार प्रकार आहेत. पित्रादि त्रयीस उद्देशून विहित व तीन पिंडांनीं युक्त तें पार्वण श्राद्ध होय. त्याचे एक पार्वणक, द्विपार्वणक व त्रिपार्वणक असे तीन प्रकार आहेत. पित्याच्या मृततिथीच्या दिवशीं जें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध केलें जातें तें एक पार्वणक होय. अमावास्यादि षण्णवति श्राद्धें, नित्य श्राद्धें, महालय

व अन्वष्टक्य यांशिवाय इतर जीं श्राद्धें तीं द्विपार्वणक होत. या श्राद्धांमध्यें सपत्निक पित्रादि त्रयी व सपत्निक मातामहादि त्रयी यांचाच उद्देश आहे. अन्वष्टका श्राद्ध त्रिपार्वणिक होय. या श्राद्धांत पित्रादि त्रयी, मातादि त्रयी व सपत्निक मातामहादि त्रयी या तीन पार्वणांचा उद्देश आहे. महालयश्राद्ध व तीर्थ–श्राद्ध हीं पार्वणैकोद्दिष्टरूप श्राद्धें आहेत; कारण, या दोन्ही श्राद्धांत पित्रादि तीन पार्वणें व पत्नी इत्यादि एकोद्दिष्टगण यांचा उद्देश आहे. कित्येक शिष्ट मातामह व मातामही यांचीं पृथक् पार्वणें करून चार पार्वणांनीं युक्त अशीं हीं दोन श्राद्धें करितात. कित्येकांच्या सूत्रांत दर्शश्राद्धही तीन पार्वणांनीं युक्त किंवा चार पार्वणांनीं युक्त करावें, असें हेमाद्रींत सांगितलें आहे. एकाच्याच उद्देशानें करायचें असलेलें व एक पिंडानें युक्त तें एकोद्दिष्ट श्राद्ध. एकोद्दिष्टाचेही नवसंज्ञक, नवमिश्रसंज्ञक व पुराणसंज्ञक असे तीन प्रकार आहेत. मृताच्या प्रथम दिवसापासून दहादिवसपर्यंतचीं जीं विहित श्राद्धें तीं नवसंज्ञक होत. एकादशाहापासून पुनाब्दापर्यंत जीं श्राद्धें तीं नवमिश्र श्राद्धें होत. हीं श्राद्धें विश्वेदेवहीन आहेत. त्यांहून पुढचीं–कनिष्ठभ्रात्यांचें वार्षिक, शस्त्रानें मेलेल्याचें चतुर्दशी श्राद्ध, इत्यादि जीं तीं पुराणसंज्ञक होत. (कित्येक ग्रंथकारांचें मत असें आहे कीं, सपिंडीनंतर करावीं लागणारीं जीं पार्वणश्राद्धें तीं पुराणसंज्ञक होत.) पुत्रजन्म, विवाह, इत्यादि प्रसंगीं जें वृद्धिश्राद्ध करायचें असतें तें नांदीश्राद्ध होय. हें नांदीश्राद्ध पूर्वार्धांत विस्तारानें सांगितलें आहे. गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, आधान व सोमयाग यांत करावें लागणारें व कर्मांगभूत असलेलें जें वृद्धिश्राद्ध त्यास इष्टिश्राद्ध असें म्हणतात. या श्राद्धांत क्रतु, दक्षसंज्ञक, विश्वेदेव घ्यावेत, अन्य कर्मांतलें जें नांदीश्राद्ध तें वृद्धिसंज्ञक होय. वृद्धिसंज्ञक श्राद्धांत सत्यवसुसंज्ञक विश्वेदेव असे नामभेद व देवभेद आहेत. इतर सर्व समान जाणावें. हें नांदीश्राद्ध तीन पार्वणांनीं युक्त असल्यामुळें पार्वणभेदांतर्गत असें जरी असलें तरी दर्शादि श्राद्धांहून त्याचे धर्म पुष्कळ भिन्न असल्यानें, तें निराळें सांगितलें. मृताच्या बाराव्या दिवशीं पिंड व अर्घ्य यांचें संयोजनरूप जें कर्म तें सपिंडीकरण होय. हें सपिंडीकरण, पार्वण व एकोद्दिष्ट असें जें विकाररूप आहे, त्याविषयींचा विशेष निर्णय पुढें सांगेन. याप्रमाणें पार्वण व एकोद्दिष्ट असें दोन प्रकारचें श्राद्ध आहे. हें श्राद्ध पुनः नित्य, नैमित्तिक व काम्य असें तीन प्रकारचें आहे. नियत निमित्तप्राप्त जें विहित श्राद्ध तें नित्य होय. जसें:–दर्शादि श्राद्ध. प्रत्यहीचें विहित श्राद्धही नित्यसंज्ञक आहे. तें दोन पार्वणांनीं युक्त व विश्वेदेवहीन असें सांगितलें आहे. अनियतनिमित्तप्राप्त जें विहित श्राद्ध तें नैमित्तिक होय. जसें–सूर्यचंद्रांच्या ग्रहणादिकालीं हेंही षड्दैवत आहे. फलाच्या इच्छेनें जें कर्तव्य तें काम्यश्राद्ध. जसें पंचमी इत्यादि तिथीस व कृत्तिका नक्षत्रीं जें कर्तव्य श्राद्ध तें.

**अथश्राद्धदेशाः । दक्षिणाप्रवणेगोमयोपलिप्तेकृमिकेशास्थिश्लेष्मादिवर्जितेकृत्रिमभूमिवर्जितेरजस्वलादर्शनादिवर्जितेश्राद्धंकार्यम् कुरुक्षेत्रप्रभासपुष्करप्रयागकाशीगङ्गायमुनानर्मदादितीरेनैमिषगङ्गाद्वारगयाशीर्षाक्षय्यवटादिषु श्रा-**

द्धंमहाफलम् शमीपत्रप्रमाणेनदपिण्डंदद्याद्गयाशिरे उद्धरेत्सप्तगोत्राणिकुलमेकोत्तरंशतम् ॥ १ ॥ पितामाताचभार्याचभगिनीदुहितातथा । पितृमातृष्वसाचैवसप्तगोत्राणिवैविदुः ॥ २ ॥ एषांगोत्राणांपुरुषाःक्रमेणचतुर्विंशतिर्विंशतिषोडशद्वादशैकादशदशाष्टाविंत्येकोत्तरशतसंख्यास्तेषामुद्धारइत्यर्थः तत्रापितृकुलेद्वादशपूर्वाद्वादशपराइतिचतुर्विंशतिरेवमग्रेपितुलसीकाननच्छायाशालग्रामस्यसान्निधिः । चक्राङ्कितस्यसान्निध्यमेषुयत्क्रियतेनरैः ॥ १ ॥ स्नानंदानंतपः श्राद्धंसर्वमक्षय्यतांव्रजेत् । गोगजाश्वादिजुष्टप्रदेशेम्लेंच्छदेशेचश्राद्धंनकार्यम् परकीयगृहादौश्राद्धकरणेतद्भूमिस्वामिपितरोभागंहरन्ति तेनगृहस्वामिनेमूल्यंदत्त्वाकार्यम् स्वाम्यनुज्ञयावाकार्यम् वनानिगिरयोनद्यस्तीराण्यायतनानिच । देवखाताश्चगर्ताश्चनस्वाम्यंतेषुकस्यचित् ॥ १ ॥ नैकवासानचद्वीपेनान्तरिक्षेकदाचन । श्रुतिस्मृत्युदितंकर्मनकुर्यादशुचिः क्वचित् ॥ २ ॥

**श्राद्धस्थानें**—उतरती, गोमयानें सारवलेली, किडे, केश, हाडकें, शेंबूड वगैरे नसलेली मुद्दाम तयार न केलेली व रजस्वलेच्या दृष्टीस न पडणारी अशी दक्षिणेकडची जागा श्राद्ध करायला उत्तम होय. पुष्कर, प्रयाग, काशी, गंगा, यमुना, नर्मदा यांचे तीर, नैमिषारण्य, गंगाद्वार, गयाशीर्ष (गया) व अक्षय्यवट—या ठिकाणीं श्राद्ध केल्यानें महाफल मिळतें. गयाशिरावर शमीच्या पानाएवढा जरी पिंड दिला तरी, सात गोत्रें व एकशें एक कुळें यांचा उद्धार होतो. बाप, आई, बायको, कन्या, बहीण, आत्या व मावशी—हीं (वरील) सात गोत्रें समजावीत. त्यांचीं गोत्रें म्हणजे अनुक्रमें–२४–२०–१६–११–१२–११–१० व ८ अशीं मिळून १०१ जीं कुळें त्यांचा उद्धार होतो. त्यांतल्या पितृकुळांतले मागले १२ व पुढचे १२ मिळून २४ पुरुष. मातृकुलांतले मागचे १० व पुढचे १० मिळून २० पुरुष—याप्रमाणें इतर सर्व कुळांचें समजावें. तुळशीच्या वनाची छाया, शालग्रामसान्निध्य व चक्रांकिताची समीपता—अशा स्थळीं जीं माणसें स्नान, दान, तप व श्राद्ध हीं करतील, तें त्यांचें करणें अक्षय्य होतें. गाय, हत्ती, घोडे यांनीं दूषित झालेल्या जागीं व म्लेंच्छाच्या देशांत श्राद्ध करूं नये. परक्याच्या घरीं श्राद्ध केल्यास त्या भूमीच्या मालकाचे पितर त्या श्राद्धाचा भाग हरण करतात; म्हणून त्या घराच्या मालकाला मूल्य ( भाडें ) देऊन किंवा त्याच्या परवानगीनें श्राद्ध करावें. वन, पर्वत, नदीकांठ, देऊळ, देवखात ( गुहा ) व गर्त ( बीळ, खळगा, खांच वगैरे ) यांवर कोणाचेंही स्वत्व (मालकी) नाहीं. एका वस्त्रानें अशुद्धावस्थेंत बेट व अंतरिक्ष ( अंतराळीं ) अशा ठिकाणीं कोणचेंही श्रुतिस्मृतींनीं सांगितलेलें कर्म करूं नये.

अथश्राद्धकालाः तेचप्रायेणामासंक्रान्तियुगादिमन्वादि महालयादयः पूर्वपरिच्छेदउक्ताएव केचित्तूच्यन्ते महातीर्थप्राप्तिर्व्यतीपातोमृताहोग्रहणद्वयंश्राद्धंप्रतिरुचिःश्रोत्रियादिब्राह्मणसंपत्तिरर्धोदयकपिलाषष्ठयाद्यलभ्ययोगाग्रहपीडादुःस्वप्नदर्शनंनवान्नप्राप्तिर्नवोदकप्राप्तिर्गृहप्रच्छादनादिनिमित्तंचश्राद्ध–

कालाः यदाविष्टिर्व्यतीपातो भानुवारस्तथैवच । पद्मकोनामयोगोयमयनादेश्चतुर्गुणः ॥ १ ॥ सर्वमासानांकृष्णपक्षेषुश्राद्धमुक्तम् अत्रप्रत्यहंपञ्चम्यादिवायदहःसंपत्तिर्वेतित्रयःपक्षाः एकदिनपक्षेदर्शएव नारायणवृत्तौतुदर्शश्राद्धेनैवपक्षश्राद्धसिद्धिरुक्ता सर्वमासेषुदर्शश्राद्धाशक्तोकन्याकुम्भवृषस्थेर्केसतिदर्शत्रयेएकत्रदर्शेवाश्राद्धम् साग्निकस्यत्वशक्तस्यपिण्डपितृयज्ञमात्रेणदर्शसिद्धिः निरग्निकस्यब्राह्मणभोजनमात्रेणधान्यादिद्रव्यदानेनवादर्शसिद्धिःकृष्णपक्षेषुमहालयापरपक्षस्यश्रेष्ठत्वम् तत्रापिपञ्चदशाहादिपक्षाअन्योपिबहुविस्तरोद्वितीयपरिच्छेदउक्तः अत्रविशेषान्तरंकालतत्त्वविवेचने पञ्चदशाहव्यापिमहालयप्रयोगारम्भोत्तरमाशौचपातेकृतमहालयानांवैफल्यम् तेनशुद्धयन्तेकस्यांचित्तिथौसकृन्महालयमात्रमनुष्ठेयम् एवंपञ्चम्यादिपक्षेपि प्रतिबन्धान्तरेप्रतिनिधिद्वाराशेषमहालयानुष्ठाम् पितृव्यज्येष्ठभ्रात्रादीनामपुत्राणांमहालयापरपक्षेतत्तन्मृततिथौतदेकपार्वणकमहालयश्राद्धंजीवत्पितृकेणापिकार्यमिति द्वादशपौर्णिमास्योऽसंभवेमाघीश्रावणीप्रौष्ठपद्योनित्याः कस्मिंश्चित्कृष्णपक्षेप्रतिपदादिपञ्चदशतिथिषुकृत्तिकादिभरण्यन्तनक्षत्रेषुविष्कम्भादियोगेषुसूर्यादिवारेषुबवादिकरणेषुचश्राद्धेफलविशेषोक्तेरेतेतिथ्यादयःकाम्यश्राद्धकालाज्ञेयाः इतिसामान्यकालः ॥

**श्राद्धकाल**—अमावास्या, संक्रांति, युगादि, मन्वादि व महालय इत्यादि बहुधा पूर्वींच्या परिच्छेदांत सांगितले आहेतच. आणखीही कित्येक आहेत ते सांगतों:––महातीर्थप्राप्ति, व्यतिपात, मृतदिवस, दोन्ही ग्रहणें, श्राद्ध करण्याविषयीं इच्छा, श्रोत्रिय ब्राह्मणाचें आगमन, अर्धोदय, कपिलाषष्ठी इत्यादि अलभ्य योग, ग्रहपीडा, दुःस्वप्नदर्शन, नवान्नप्राप्ति नवोदकप्राप्ति, गृहप्रच्छादन इत्यादिक हे श्राद्धकाल होत. भद्रा, व्यतिपात व रविवार यांचा योग आला तर तो जो पद्मक योग तो अयनादिकांहून चतुर्गुणित पुण्यकारक आहे. व सर्व मासांतल्या कृष्णपक्षांत श्राद्ध करावें, असें सांगितलें आहे. या पक्षांत रोज किंवा पंचमीपासून किंवा ज्या दिवशीं श्राद्ध करण्यास अनुकूलता असेल त्या दिवशीं—असे तीन पक्ष आहेत. महिन्यांतून एक दिवस श्राद्ध करायचें असल्यास अमावास्येच्या दिवशीं करावें. नारायणवृत्तींत असें सांगितलें आहे कीं, दर्शश्राद्धानेंच श्राद्धाची सिद्धि होते. सर्व मासांत दर्शश्राद्ध करण्यास सामर्थ्य नसेल तर—कन्या, कुंभ व वृषभ या राशींस रवि असतां तीन अमावास्या तिथींस किंवा एका अमावास्या तिथीस श्राद्ध करावें. साग्निक पण अशक्त असेल तर त्यानें पिंडपितृयज्ञ मात्र केला असतां दर्शश्राद्धाची सिद्धि होते. निरग्निकाच्या दर्शश्राद्धाची सिद्धि ब्राह्मणभोजनमात्रानें किंवा धान्यादि द्रव्यदानानें होते. सर्व कृष्णपक्षांत महालयाचा (भाद्रपदांतला) कृष्णपक्ष श्रेष्ठ होय. त्यांतलाही पंधरा दिवसांचा पक्ष व इतरही बराच विस्तार दुसऱ्या परिच्छेदांत सांगितलाच आहे. याविषयीं दुसरा विशेष निर्णयकाल तत्त्वविवेचनग्रंथांत आहे. पंधरा दिवसपर्यंत जो महालय पक्ष त्याच्या प्रयोगाचा आरंभ केल्यावर अशौच प्राप्त झालें असतां, महालय

निष्फळ होतात. म्हणून अशौचनिवृत्ति झाल्यावर कोणत्या तरी दिवशीं सकृन्महालय मात्र करावा. याप्रमाणें पंचमी इत्यादि पक्षींही असाच निर्णय करावा. अशौचावांचून दुसरा प्रतिबंध प्राप्त झाल्यास प्रतिनिधिद्वारा शेष महालय करावेत. अपुत्र असे पितृव्य, ज्येष्ठ भ्राता इत्यादिकांचें एक पार्वणक महालय श्राद्ध अपरपक्षांत त्यांच्या त्यांच्या मृततिथींच्या दिवशीं जीवत्पितृकानेंही करावें. बारा पौर्णिमांचा संभव नसेल तर माघी, श्रावणी व भाद्रपदी ह्या नित्य आहेत. कोणत्याही कृष्णपक्षांत प्रतिपदादि पंधरा तिथि कृत्तिकापासून भरणीपर्यंत नक्षत्रें, विष्कंभादिक योग, सूर्यादिक वार व बवादिक करणें यांवर श्राद्ध करावें, असें जें विशेष वचन आहे, त्यावरून तिथी इत्यादिक जे काल सांगितले ते काम्य श्राद्धाचे काल जाणावे. असा हा श्राद्धाचा सामान्य काल आहे.

**अथापराह्णादिविशेषनिर्णयः । दिनस्यपञ्चविभागास्त्रित्रिमुहूर्तकास्तत्राद्योभागः प्रातः संज्ञः द्वितीयःसंगवःतृतीयोमध्याह्नः चतुर्थोपराह्णःपञ्चमोभागःसायाह्नः दिनस्यपञ्चदशोभागोमुहूर्तः तत्रसप्तमोगन्धर्वोष्टमोमुहूर्तःकुतुपःनवमोरौहिणः तत्रदर्शादिश्राद्धानांनिर्णयःपूर्वपरिच्छेदयोःप्रायेणोक्तःविशेषस्तूच्यते साग्निकानांकात्यायनादीनामन्वाधानपिण्डपितृयज्ञदर्शश्राद्धानामेकदिनकर्तव्यत्वनियमात्त्रेधाविभक्तदिनतृतीयभागरूपापराह्णव्यापिन्याममायांदर्शश्राद्धंकर्तव्यम् ॥**

**अपराण्हादिविशेषनिर्णय**—तीन मुहूर्तांचा एक भाग याप्रमाणें दिवसाचे पांच भाग करून त्यांतला पहिला भाग तो प्रातःसंज्ञक, दुसरा भाग संगव, तिसरा भाग मध्यान्ह, चौथा भाग अपराह्ण व पांचवा भाग सायाह्न. दिवसाचा जो पंधरावा भाग तो मुहूर्त. यांत सातवा मुहूर्त—गंधर्वसंज्ञक, आठवा कुतुपसंज्ञक व नववा रोहिणी संज्ञक. दर्शादि श्राद्धाचा निर्णय जो पूर्वींच्या दोन परिच्छेदांत सांगितला आहे, त्याहून विशेष निर्णय आतां सांगतों. साग्निक अशा कात्यायनादिकांनीं अन्वाधान, पिंड, पितृयज्ञ व दर्शश्राद्ध हीं तीनही एके दिवशींच करावींत, असा नियम सांगितला आहे, म्हणून दिवसाचे तीन भाग करून त्यांतला जो तिसरा भाग तो अपराह्ण काल, त्याला व्यापणाऱ्या अमावास्येंत दर्शश्राद्ध करावें.

**अथप्रतिसांवत्सरिकमासिकादिनिर्णयउच्यते । तत्रैकोद्दिष्टंमध्याह्नेसप्तमाष्टमनवममुहूर्तरूपेकार्यम् तत्रापिकुतुपरौहिणसंज्ञकावष्टमनवममुहूर्तौमुख्यःकालः तत्रपूर्वत्रैवपरत्रैववादिनेमध्याह्नव्याप्तौसैवतिथिर्ग्राह्या दिनद्वयेमध्याह्नव्याप्तौमध्याह्नास्पर्शेवापूर्वत्रैव दिनद्वयेसाम्येनैकदेशव्याप्तौपूर्वा खर्वदर्पाद्यैर्व्यवस्थेत्यन्ये वैषम्येणैकदेशव्याप्तावाधिक्येननिर्णयः पार्वणेत्वपराह्णव्यापिनीग्राह्या पूर्वत्रैवपरत्रैववापराह्णव्याप्तौसैवग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तौतदस्पर्शेवांशतःसमव्याप्तौवापूर्वा विषमव्याप्तौत्वधिकाग्राह्या माधवाचार्यास्तुदिनद्वयेपूर्णापराह्णव्याप्तावंशतःसमव्याप्तौचोत्तरातिथेःक्षयेपूर्वा वृद्धौपरा उत्तरातिथेःक्षयवृद्धभावेपिपरेत्याहुः अयंक्षयाहनिर्णयः प्रत्याब्दिकेमासिकेसकृन्महालयेचज्ञेयः**

**प्रतिसांवत्सरिक व मासिकादिक यांचा निर्णय**—सातवा, आठवा व नववा या मुहूर्तानें युक्त अशा मध्याह्नकालीं एकोद्दिष्ट श्राद्ध करावें. त्यांतही कुतुपरौहिण संज्ञक आठवा व नववा असे जे दोन मुहूर्त तो मुख्य काल होय. त्यांतही पूर्व दिवशींच अथवा दुसऱ्या दिवशींच मध्याह्नव्याप्ति असेल तीच तिथि घ्यावी. दोन दिवशीं जर मध्यान्हव्याप्ति असेल किंवा दोन दिवशीं मध्यान्हकालीं स्पर्श नसेल तर पूर्व दिवशींच करावें. दोन्ही दिवशीं जर सारखी, एकदेशव्याप्ति असेल तर पूर्व दिवशींच करावें. खर्व दर्प इत्यादिकांनीं व्यवस्था जाणावी. असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. वैषम्यानें एक देशव्याप्ति असेल तर आधिक्यानें निर्णय करावा. पार्वणश्राद्धास अपराण्हव्यापिनी तिथि घ्यावी. पूर्व दिवशीं अथवा दुसऱ्या दिवशीं जी अपराह्णव्याप्ति असेल तीच घ्यावी. दोन्ही दिवशीं अपराह्णव्याप्ति असेल किंवा नसेल किंवा अंशानें सारखी व्याप्ति असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. विषम व्याप्ति असेल तर अधिक व्यापिनी घ्यावी. माधवाचार्य असें म्हणतात कीं, दोन्ही दिवशीं पूर्ण अपराह्णव्याप्ति व अंशत सारखी व्याप्ति असून उत्तर तिथीचा क्षय असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. उत्तर तिथीची वृद्धि असतां, दुसऱ्या दिवसाची घ्यावी. उत्तर तिथीचा क्षय व वृद्धि नसतील तरीही दुसऱ्या दिवशींचीच घ्यावी. हा क्षय दिवसाचा निर्णय—प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, मासिक श्राद्ध व मृत तिथीचे दिवशीं करावयाचा जो सकृन्महालय त्यांविषयीं जाणावा.

**श्राद्धेभरण्यादिनक्षत्रंव्यतीपातादियोगश्चापराह्णव्यापीत्युक्तंद्वितीये केचिच्छुक्लपक्षेउदयव्यापिनक्षत्रंकृष्णपक्षेऽस्तमयव्यापि योगस्तुकुतुपादिव्यापीत्याहुः एतच्चपार्वणश्राद्धंकुतुपादिमुहूर्तपञ्चकेकार्यं न सायाह्ने नरात्रौ नप्रातः संगवयोः पिण्डपितृयज्ञादिनेसायाह्नेपिपार्वणमनुज्ञायते यदाविघ्नवशाद्दिनेसांवत्सरिकश्राद्धंनकृतं तदारात्रावपिप्रथमप्रहरपर्यन्तंकार्यम् मृताहातिक्रमेचाण्डालत्वादिदोषोक्तेः ग्रहणदिने दर्शमासिकप्रातिवार्षिकादिश्राद्धप्राप्तौतद्दिनेएवान्नेनामेनवाहेम्नावा कुर्यान्नोत्तरदिने प्रथमाब्दिकंत्रयोदशेमलमासेकार्यमित्युक्तम् तेनयत्रद्वादशमासिकंशुद्धमासेभवतितत्रत्रयोदशेऽधिकएवप्रथमाब्दिकंकार्यम् यदात्वधिकमध्येद्वादशंमासिकंतदाद्वादशमासिकस्याद्विरावृत्तिंकृत्वाचतुर्दशेशुद्धमासेप्रथमाब्दिकम् एवंद्वितीयादिमासिकस्यापिमलमासेप्राप्तस्याद्विरावृत्तिर्ज्ञेयाद्वितीयाद्याब्दिकंतुशुद्धमासेएव एवंमहालयोपिशुद्धेएवनाधिकेमासेकिंचिदपि मलमासमृतानांतुयदासएवमलमासोभवतितदाधिकएवसांवत्सारिकंनशुद्धे दर्शदिनेवार्षिकप्राप्तौपूर्ववार्षिकंकृत्वाततःपिण्डपितृयज्ञंपाकान्तरेणदर्शश्राद्धंच कुर्यात् परेतुआदौपिण्डपितृयज्ञस्ततोवार्षिकं ततोदर्शइतिक्रममाहुः एवंमासिकादिष्वपिज्ञेयम् ॥**

**मासिकादिश्राद्धनिर्णय**—भरणी इत्यादि नक्षत्रें व व्यतिपातादि योग श्राद्धास घेणें ते अपराह्णव्यापी घ्यावे, असें दुसऱ्या परिच्छेदांत सांगितलें आहे. कांहीं ग्रंथकार म्हणतात कीं, शुक्ल पक्षांत सूर्योदयव्यापी

व कृष्ण पक्षांत अस्तमयव्यापी नक्षत्र घ्यावें आणि योग कुतुपादिव्यापी घ्यावेत. हें पार्वणश्राद्ध कुतुपादिक पांच मुहूर्त असतां करावें, सायान्हीं, रात्रीं, प्रातःकालीं व संगवकालीं करूं नये. पिंडपितृयज्ञाच्या दिवशीं सायान्हकालींही पार्वणश्राद्ध करावें. कांहीं विघ्नामुळें योग्य दिवशीं जर सांवत्सरिक श्राद्ध केलें नसेल, तर त्या कालीं रात्रींही पहिल्या प्रहरापर्यंत तें करावें; कारण, मृत दिवसाचें उल्लंघन झाल्यावर चांडालत्वादि दोष प्राप्त होतात असें वचन आहे. ग्रहणदिवशीं दर्श, मासिक व प्रतिसांवत्सरिक श्राद्ध हीं तीन प्राप्त झालीं असतां, त्या दिवशींच अन्न, आमान्न किंवा हिरण्य यांनीं तीं करावींत, दुसऱ्या दिवशीं करूं नयेत. प्रथमाब्दिक श्राद्ध तेरावे मलमासांत करावें असें सांगितलें आहे. यासाठीं जेव्हां बारावें मासिक श्राद्ध शुद्ध मासांत होतें, तेव्हां तेराव्या अधिक मासांतच प्रथमाब्दिक करावें. जेव्हां अधिक मासांत बारावें मासिक येईल तेव्हां बाराव्या मासिकाची द्विरावृत्ति करावी, व चौदाव्या शुद्ध मासांत प्रथमाब्दिक करावें. याप्रमाणें मलमासांत आलेल्या द्वितीयादि मासिकाची द्विरावृत्ति करावी, द्वितीयादिक अब्दिक श्राद्ध शुद्ध मासांतच करावें. याप्रमाणें महालयही शुद्ध मासांतच करावा, अधिक मासांत कांहींएक करूं नये. मलमासांत मृत झालेल्याचें सांवत्सरिक श्राद्ध त्याच अधिक मासांत आलें तर अधिक मासांतच श्राद्ध करावें, शुद्ध मासांत करूं नये. दर्शाचे दिवशीं वार्षिक श्राद्ध प्राप्त झाल्यास पूर्वीं वार्षिक श्राद्ध करून दुसऱ्या पाकानें पिंडपितृयज्ञ व दर्शश्राद्ध हीं करावींत. कांहीं ग्रंथकार असें म्हणतात कीं, पूर्वीं पिंडपितृयज्ञ, नंतर वार्षिक श्राद्ध व त्यानंतर दर्शश्राद्ध अशा क्रमानें करावींत. असा हा मासिकादि श्राद्धांविषयींचा निर्णय आहे.

**सपिण्डीकरणादूर्ध्वंयावदब्दत्रयंभवेत् । तावदेवनभोक्तव्यंतदीयेश्राद्धमात्रके १ प्रथमाब्देस्थ्यादिभोजीद्वितीयेमांसभक्षकः । तृतीयेरक्तभोजीस्याच्छुद्धंश्राद्धंचतुर्थके २ इत्यास्तांप्रासङ्गिकंप्रकृतमनुसरामः पार्वणमपिहेमश्राद्धमामश्राद्धंचद्वेधाविभक्तदिनपूर्वभागेएवकार्यम् सर्वंचश्राद्धंतत्तन्निर्णीतकालेतत्तात्तिथ्यभावेपिकर्तव्यंसाकल्यवचनादिनाशास्त्रतस्तत्रतत्तत्तिथिसत्त्वादितिकालतत्त्वविवेचने वृद्धिश्राद्धंप्रातःसङ्गवयोःकार्यम् मध्याह्नोगौणः अपराह्णसायाह्नरात्रयोनिषिद्धाःरात्रौविवाहेप्रातर्वृद्धिश्राद्धंनकृतं तदारात्रावपिकार्यमितिकश्चित् ग्रहणनिमित्तकंपार्वणश्राद्धंपुत्रजन्मनिमित्तकंजातकर्माङ्गवृद्धिश्राद्धंचरात्रावपिकार्यम् इतिकालनिर्णयः ॥**

**श्राद्धकालनिर्णय**—सपिंडीकरणानंतर त्याच्या श्राद्धामात्रीं भोजन करूं नये. पहिल्या वर्षीं भोजन केल्यानें अस्थि इत्यादिकांचें भोजन करणारा, दुसऱ्या वर्षीं मांसभक्षक; तिसऱ्या वर्षीं रक्तभोजी व चौथ्या वर्षीं तें श्राद्ध शुद्ध होय, याप्रमाणें प्रासंगिक विषय पुरे. आतां प्रकृत विषयाचा विचार करूं. पार्वणरूप असलें तरी हिरण्यश्राद्ध व आमश्राद्ध हीं श्राद्धें दिवसाचे दोन भाग करून पूर्वभागातच करावीं. सर्व श्राद्धें त्याच्या त्याच्या निर्णीत कालीं त्याच्या तिथीचा

अभाव असला तरी करावी. कारण साकल्य वचनादिकांवरून व शास्त्रावरून त्या कालीं ती तिथि आहे असें कालतत्त्वविवेचन ग्रंथांत सांगितलें आहे. प्रातःकालीं व संगवकालीं वृद्धिश्राद्ध करावें. मध्यान्हकाल गौण आहे. अपराह्ण, सायाह्न व रात्री हे काल निषिद्ध होत. रात्रीं विवाह करायचा असतां प्रातःकालीं वृद्धिश्राद्ध केलें नाहीं तर तें रात्रींही करावें, असें कित्येक ग्रंथांत सांगितलें आहे. ग्रहणनिमित्तक पार्वण श्राद्ध व पुत्रजन्मनिमित्तक जातकर्मांगभूत वृद्धिश्राद्ध रात्रींही करावींत. असा हा श्राद्धकालनिर्णय आहे.

**अन्नादिनापितृतृप्तिविचारः पुत्रादिभिः पितृमात्राद्युद्देशेनश्राद्धेक्रियमाणेनाम-गोत्रंमन्त्राश्चतत्तदन्नंतान्पितॄन्प्रापयन्ति तत्रपित्रादीनांदेवरूपत्वेतदन्नममृतरूपं-भूत्वातत्रोपतिष्ठते गन्धर्वत्वेभोग्यरूपेणपशुत्वेतृणरूपेणसर्पत्वेवायुरूपेणयक्ष-त्वेपानरूपेणदानवादित्वेमांसत्वेनप्रेतत्वेरुधिरत्वेनमनुष्यत्वेन्नादिरूपेणेति ग्रन्थान्तरे तस्यतेपितरःश्रुत्वश्राद्धकालमुपस्थितम् । अन्योन्यं मनसाध्यात्वा-संपतन्तिमनोजवाः १ तेब्राह्मणैःसहाश्नन्तिपितरोवायुरूपिणः । अतएवश्रीरामे-णश्राद्धेक्रियमाणेसीताविप्रेषुदशरथादीन्ददर्शेतिकथाश्रूयते प्रावृष्यन्तेयमः प्रेतान्पितॄंश्चाथयमालयात् । विसर्जयतिभूलोकंकृत्वाशून्यंस्वकंपुरम् १ तेपुत्रादेःप्रकाशन्तिपायसंमधुसंयुतम् । कन्यागतेसवितरिपितरोयान्तिवैसुतान् २ अमावास्यादिनेप्राप्तेगृहद्वारंसमाश्रिताः । श्राद्धाभावेस्वभवनंशापंदत्त्वाव्रज-न्तिते अतोमूलैःफलैर्वापितथाप्युदकतर्पणैः । पितृतृप्तिंप्रकुर्वीतनैवश्राद्धंविवर्ज-येत् ४ किंचश्राद्धेनब्रह्मादिस्तम्बपर्यन्तंसकलभूततृप्तिःश्रूयते तत्र पिशाचादि-रूपाणांविकिरादिभिस्तृप्तिर्वृक्षादिरूपाणांस्नानवस्त्रोदकादिनाकेषांचिदुच्छिष्ट-पिण्डादिनेति अतोब्रह्मीभूतपितृकेणापिश्राद्धंकार्यम् तत्रापितृपितामहप्रपिता-महादिरूपमेकैकंपार्वणंवसुरुद्रादित्यादिभेदेनध्येयम् एकोद्दिष्टंवसुरूपेणेति-सर्वत्र केचित्तुपितृपितामहप्रपितामहाःप्रद्युम्नसंकर्षणवासुदेवात्मनाध्येयाःकर्ता-निरुद्धात्मनेत्याहुः एवंवरुणप्रजापत्यग्निरूपेणक्वचित् क्वचिन्मासऋतुवत्सररू-पेणेति तत्रयथाचारंसमुच्चयेनविकल्पेनवाध्यानमितिव्यवस्था पित्रादिपार्वणं-यत्रतत्रमातामहादयः । सर्वत्रैवहिकर्तव्यानाब्दिकेमासिकेषुनः १ मासिकेषुत्वा-ब्दिकेचत्रिदैवत्यंप्रकीर्तितम् । वृद्धौतीर्थेन्वष्टकासुगयायांचमहालये २ त्रिपा-र्वणकमत्रेष्टंशेषंषाट्पौरुषंविदुः । सपत्नीकंपित्रादित्रयंसपत्नीकंमातामहादित्रय-मितिषाट्पौरुषत्वम् क्षयाहंवर्जयित्वैकंस्त्रीणांनास्तिपृथक्क्रिया । अन्वष्टका-सुवृद्धौचगयायांचक्षयेहनि १ अत्रमातुः पृथक्श्राद्धमन्यत्रपतिनासह ॥**

**पितरान्नतृप्ति**—आई, बाप वगैरेंस उद्देशून पुत्रानें उच्चार केलेले जे श्राद्धांतले—नाम, गोत्र व मंत्र ते—तें अन्न पितरांस पोंचवितात. पिता वगैरे जर देवरूप असतील, तर तें अन्न अमृतरूपानें, गंधर्वरूपी असल्यास भोग्यरूपानें, पशुरूपी असल्यास तृणरूपानें, सर्परूपी असल्यास वायुरूपानें, यक्षरूपी असल्यास पानरूपानें, दानवरूपी असल्यास मांसरूपानें प्रेतरूपी असल्यास रुधिररूपानें

व मनुष्यरूपी असल्यास अन्नरूपानें—याप्रमाणें ज्या स्थानीं ते असतील तेथें त्यांस या रूपांनीं मिळतें. दुसऱ्या ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, श्राद्धकर्त्याचे पितर, श्राद्धकाल आल्याचें ऐकून व परस्परांचें मनांत ध्यान करून मनोवेगानें येतात व ते वातरूप पितर श्राद्धाला बोलावलेल्या ब्राह्मणांबरोबर जेवतात. म्हणूनच, श्रीरामानें जेव्हां श्राद्ध केलें तेव्हां सीतेला ब्राह्मणरूपांत दशरथादि पितर दिसल्याचें ऐकिवांत आहे. वर्षर्तु संपल्यावर यम आपल्या नगरांतून सर्व प्रेतपितरांना पृथ्वीवर धाडतो, तेव्हां त्यांना त्यांच्या पुत्रादिकांपासून मधुयुक्त पायस मिळावें अशी इच्छा होते. सूर्य कन्येचा झाल्यावर पितर पुत्रांकडे येतात. अमावास्येला ते घराच्या दारांत येऊन श्राद्धाची वाट पाहातात. श्राद्ध न केल्यास ते पुत्रादिकांना शाप देऊन आपापल्या मंदिरांत परत जातात, म्हणून मूलफलें किंवा पाण्यानें (उदकतर्पण) तरी निदान त्यांची तृप्ति करावी. श्राद्धानें आब्रह्मस्तंबपर्यंतच्या सर्व भूतांची तृप्ति होते, असें श्रुतिवचन असल्यानें श्राद्ध करण्यास चुकूं नये. श्राद्धांतल्या विकिरान्नानें (पसरून टाकलेला भात) पिशाचादिकांची तृप्ति होते. स्नानानंतरच्या वस्त्र पिळण्यांतून गळलेल्या पाण्यानें वृक्षरूप असलेल्यांची तृप्ति होते. कित्येकांची तृप्ति उच्छिष्ट (उष्टें) पिंडादिकांनीं होते, म्हणून ब्रह्मीभूत पितृकानेंही (ज्याचे पितर ब्रह्मलोकाला गेले असतील अथवा संन्यास घेऊन समाधिस्थ झाले असतील अशानेंही) जें श्राद्ध करावें, त्यांत,—पितृपितामहप्रपितामहादिरूप असें एकेक पार्वण, वसुरुद्रादित्यांच्या भेदांनीं ध्यान करण्यास योग्य आहे. एकोद्दिष्टगणाचें ध्यान वसुरूपानें करावें असें सर्व ठिकाणीं समजावें. कित्येक ग्रंथकारांचें असें सांगणें आहे कीं, पिता, पितामह व प्रपितामह यांचें ध्यान—प्रद्युम्न, संकर्षण व वासुदेव या रूपांनीं अनुक्रमें करावें. कर्ता अनिरुद्धरूपी असल्याचें ते सांगतात. त्याचप्रमाणें कित्येक ग्रन्थांत यांचें ध्यान वरुण, प्रजापति व अग्नि यांच्या रूपानें करण्यास सांगितलें आहे, तर कित्येक ग्रन्थांत—मास, ऋतु व वर्ष या रूपांनीं त्यांचें ध्यान करावें असें म्हटलें आहे. वास्तव, जसा आचारपरिपाठ असेल त्याप्रमाणें समुच्चयानें किंवा विकल्पानें ध्यान करावें. पित्याच्या पार्वणकाळीं मातामहाच्या पार्वणाचा उच्चार करावा. वार्षिक व मासिक श्राद्धांत मातामहादिकांचा उच्चार करूं नये. मासिक व वार्षिक श्राद्धांत तीन देवता सांगितलेल्या आहेत. वृद्धिश्राद्ध (नान्दी), तीर्थश्राद्ध, अन्वष्टकाश्राद्ध, गयाश्राद्ध व महालय—यांत तीन पार्वणें इष्ट आहेत. इतर श्राद्धें पौरुष असल्याचें सांगतात. सपत्नीक अशी पित्रादि त्रयी व सपत्नीक अशी मातामहादि त्रयी यांना षाट्पौरुष असें नांव आहे. क्षयदिवस वर्ज्य करून, स्त्रियांचें निराळें श्राद्ध नाहीं. अन्वष्टकाश्राद्ध, वृद्धिश्राद्ध, गयाश्राद्ध क्षयदिवस—यांवर मातेचें निराळें श्राद्ध करावें व इतर वेळीं पतिसह करावें.

**अथविश्वेदेवाः। यत्रविशेषोनोच्यतेतत्रसर्वत्रपार्वणश्राद्धेपुरूरवार्द्रवसंज्ञका-विश्वेदेवाः काम्यश्राद्धेमहालयेचधूरिलोचनसंज्ञकाः नैमित्तिकेऽष्टकाख्याष्टमी-श्राद्धेचकामकालसंज्ञकाःएकोद्दिष्टंसपिण्डीकरणंवानैमित्तिकसंज्ञस नान्दीश्राद्धे-**

सत्यवसुसंज्ञकाः तत्रापिगर्भाधानपुंसवनसीमन्तोन्नयनेतिसंस्कारत्रयाङ्गमन्याधानसोमयागाङ्गंचनान्दीश्राद्धमिष्टिश्राद्धसंज्ञकंकर्माङ्गश्राद्धसंज्ञकंचतत्रक्रतुदक्षसंज्ञकाविश्वेदेवाः पार्वणद्वयाद्ययोर्जीवनान्मातृपार्वणकमेवक्रियमाणंनान्दीश्राद्धं देवरहितंकार्यम् एवंपार्वणत्रयस्यभिन्नत्वेनानुष्ठीयमानेनान्दीश्राद्धेपिमातृपार्वणं देवहीनम् नान्दीश्राद्धेहिदिनत्रयेक्रमेणपार्वणत्रयं कार्यम् । एकस्मिन्दिनेपृथक्पृथक्पार्वणत्रयं सहतन्त्रेणवापार्वणत्रयमितित्रयः पक्षाः नित्यश्राद्धंदेवरहितंकार्यम् एवंसपिण्डीकरणात्प्राक्तनान्येकोद्दिष्टश्राद्धान्यपिदेवहीनानि इतिश्राद्धदेवतानिर्णयः ॥

**विश्वेदेव**— ज्या श्राद्धांत विशेष सांगितला नसेल त्या सर्व पार्वणश्राद्धांत पुरूरवार्द्रसंज्ञक विश्वेदेव घ्यावे. काम्यश्राद्ध व महालयश्राद्ध यांत धूरिलोचनसंज्ञक विश्वेदेव घ्यावेत. नैमित्तिक श्राद्ध व अष्टकाख्य अष्टमीश्राद्ध यांत कामकालसंज्ञक विश्वेदेव घ्यावेत. एकोद्दिष्ट किंवा सपिंडीकरणश्राद्ध हें नैमित्तिक श्राद्ध होय. नांदीश्राद्धांत सत्यवसुसंज्ञक विश्वेदेव घ्यावेत. त्यांतही गर्भादान, पुंसवन व सीमंतोन्नयन या तीन संस्कारांगभूत व अन्वाधान आणि सोमयोग यांचे अंगभूत अशा नांदीश्राद्ध, इष्टिश्राद्धसंज्ञक व कर्मांगसंज्ञक नांदीश्राद्धांत क्रतुदक्षसंज्ञक विश्वेदेव घ्यावेत. पितृपार्वण व मातामहपार्वण या दोन पार्वणांतला पाहिला म्हणजे जो पिता तो जिवंत असतां, मातृपार्वणयुक्तच जें नांदीश्राद्ध करावयाचें तें देवरहित करावें. याप्रमाणें निरनिराळ्या पार्वणांनीं नांदीश्राद्ध कर्तव्य असतां, त्यांतही मातृपार्वण देवहीन करावें. तीन दिवस नांदीश्राद्धांत क्रमानें तीन पार्वणें करावीं तीं एका दिवशीं निरनिराळें पार्वण, बरोबर तीन पार्वणें, किंवा एकतंत्रानेंच तिन्ही पार्वणें करण्याचे तीन पक्ष आहेत. नित्यश्राद्ध जें करावयाचें तें देवरहित करावें. त्याप्रमाणेंच सपिंडीकरणाच्या पूर्वीचीं जीं एकोद्दिष्ट श्राद्धं, तींही देवहीनच करावींत. याप्रमाणें श्राद्धदेवतांचा निर्णय आहे.

अथश्राद्धेब्राह्मणाः । तत्र जातकर्मादिसंस्कारैःसंस्कृताः सत्यवाक्शुचिः । वेदाध्ययनसंपन्नःषट्सुकर्मस्ववस्थितः १ पुरुषत्रयविख्यातः सवैब्राह्मणउच्यते । इतिब्राह्मणसामान्यलक्षणम् तत्रोत्तममध्यमाधमभेदेनत्रिविधाब्राह्मणाः ॥

**ब्राह्मणलक्षण**—जातकर्मादि संस्कारांनीं संस्कृत असून, सत्यवक्ता, शुचिर्भूत, वेदाध्ययनांनीं युक्त, अध्ययन, अध्यापन, यजनयाजन, दान व प्रतिग्रह हीं षट्कर्में करणारा व पिता इत्यादि तीन पुरुष ज्याचे विख्यात आहेत असा जो तो ब्राह्मण श्राद्धाला योग्य होय. याप्रमाणें ब्राह्मणाचें सामान्य लक्षण सांगितलें. त्यांत उत्तम, मध्यम व अधम या भेदानें ब्राह्मणाचे तीन प्रकार आहेत.

तत्रोत्तमः । वेदाध्ययनसंपन्नावेदाङ्गाध्यायिनोपिच । येवैयाकरणायेचमीमांसाध्ययनेरतः १ पौराणिकश्चवेदान्तीधर्मशास्त्ररतोपिच । एतेषामपियेपुत्राब्रह्मवेत्तातथैवच २ वेदार्थज्ञःकर्मनिष्ठस्तपोनिष्ठश्चयोगिनः पितृमातृपरश्चैव-

स्वधर्मनिरतस्तथा ३ शिशुरप्यग्निहोत्रीचसोमादिश्रौतकर्मवित् । शिवभक्तो-विष्णुभक्तोभार्यायामृतुकालगः ४ गुरुभक्तोज्ञाननिष्ठः सोमयाजीचसत्यवाक् । सुशीलस्नातकयतिब्रह्मचारिणउत्तमाः ५ एतेसर्वेसपत्नीकायुवत्वादिगुणान्विताः सापिंड्ययोनिशिष्यत्वादिसंबंधैश्चवर्जिताः ६ कुष्टापस्मारादिदोषैर्हीनाश्चे-दुत्तमाःस्मृताः । तत्रदशाहादिसूतकादिप्रयोजकसापिण्ड्यसगोत्रसोदकत्वरूप-संबन्धः सापिण्ड्यपदाभिधेयः योनिसंबन्धोमातुलत्वश्वशुरत्वशालकत्वादिः आदिनागुरुत्वसहाध्यायित्वमित्रत्वादयः तथाचसपत्नीकत्वादिगुणयुक्ताउक्त-संबन्धहीनाअपस्मारान्धत्वादिदोषहीनावेदाध्यायित्वादिसप्तविंशतिप्रकाराविप्राउत्तमाइतिसिद्धम् तत्रविशेषः यद्येकंभोजयेच्छ्राद्धेछन्दोगंतत्रपूजयेत् । ऋचो-यजुंषिसामानित्रितयंतत्रविद्यते १ ऋग्वेदिनंचपित्रर्थेयाजुषंतुपितामहे । प्रपितामहेसामगंचभोजयेच्छ्राद्धकर्मणि २ अथर्ववेदिनंवैश्वदेवेपित्र्येच-भोजयेत् । एतेनस्वशाखीयद्विजाभावेद्विजानन्यान्निमन्त्रयेदितिनिरस्तम् केचि-द्यथाकन्यातथाहविरितिनियमाद्यैः सहयोनिसंबन्धस्तएवपरशाखीयाःश्राद्धार्हा इत्याहुस्तान्निर्मूलम् केचिच्छ्राद्धकर्तृसगोत्रसप्रवरावर्ज्याः पितृपुत्रौभ्रातरौ-द्वौनिराग्निंगुर्विणीपतिम् । सगोत्रप्रवरंचैववर्जयेच्छ्राद्धकर्मणि १ इतिवचना-दित्याहुः विनामांसेनमधुनाविनादक्षिणयाशिषा । परिपूर्णंभवेच्छ्राद्धंयति-षुश्राद्धभोजिषु १ इतियतिप्रशंसा ॥

**उत्तमब्राह्मणलक्षण**—वेदाध्ययनानीं युक्त, वेदांगांचें अध्ययन करणारे, वैय्याकरण, मीमांसाशास्त्राचें अध्ययन करणारे, पौराणिक, वेदांती, धर्मशास्त्ररत असे व अशांचे पुत्र, ब्रह्मवेत्ता, वेदार्थ जाणणारा, कर्मनिष्ठ, तपोनिष्ठ, योगी, पिता व माता यांची सेवा करणारा, स्वधर्मसक्त, वयानें लहान, पण अग्निहोत्री, सोमादि श्रौत कर्म जाणणारा, शिवभक्त, विष्णुभक्त, स्वस्त्रीशीं ऋतुकाळीं गमन करणारा, गुरुभक्त, ज्ञाननिष्ठ, सोमयाग करणारा, सत्यवक्ता, सुशील, स्नातक, संन्यासी व ब्रह्मचारी हे सर्व उत्तम होत. हे सर्व सपत्नीक व तारुण्यादिक गुणांनीं युक्त असून सापिंड्यसंबंध, योनिसंबंध व शिष्यत्वादि संबंध, यांनीं विरहित व कुष्ठ, अपस्मार इत्यादि दोषांनीं रहित असे असतील तर ते उत्तम होत. दशाहादिक जें सुतक (जननाशौच व मृताशौच) यास कारण असा जो सापिंड्य, सगोत्र व सोदकत्वरूपसंबंधाचा तो सापिंड्यसंबंध व मातुलत्व, श्वशुरत्व व शालकत्व इत्यादिरूप जो संबंध तो योनिसंबंध. आदिशब्दावरून गुरुत्व, साहाध्यायित्व व मित्रत्व इत्यादि संबंध ग्रहण करावे. याप्रमाणें विचार केला असतां सपत्नीकत्वादि गुणयुक्त असून पूर्वोक्त संबंधविरहित, अपस्मार व अंधत्व इत्यादि दोषरहित, वेदाध्य-यनानें युक्त इत्यादि सत्तावीस प्रकारचे ब्राह्मण उत्तम होत, असें सिद्ध झालें. त्यांत विशेष जर एक ब्राह्मण श्राद्धास सांगणें असेल तर तो छंदोग (अथर्वणवेदी) सांगावा. कारण, छंदोग ब्राह्मणाचे ठायीं ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद असे तीन वेद राहातात. श्राद्धकर्मांत भोजनाला जे ब्राह्मण सांगायचे ते ऋग्वेदी पितृस्थानीं,

यजुर्वेदी पितामहस्थानीं, सामवेदी प्रपितामहस्थानीं व अथर्वणवेदी विश्वेदेव व पितर या स्थानीं सांगावे. यावरून स्वशाखीय द्विजांचा अभाव असतां, अन्यशाखीयांस निमंत्रण करावें असें जें मत त्याचें खंडन झालें. कोणी ग्रंथकार असें म्हणतात कीं, 'जशी कन्या तसें हवि' हा नियम असल्यामुळें ज्यांच्या बरोबर योनिसंबंध घडतो तेच परशाखीय श्राद्धास योग्य होत; पण हें म्हणणें निर्मूल आहे. कांहीं ग्रंथकार म्हणतात कीं, श्राद्धकर्त्याचे सगोत्री व सप्रवर्य वर्ज करावेत; कारण पिता व पुत्र, दोन भ्राते, निरग्निक, गर्भिणीपति, सगोत्रि व सप्रवरी हे श्राद्धकर्मांत वर्ज करावेत, असें वचन आहे. श्राद्धांत संन्याशानें भोजन केलें असतां मांसावांचून, मधुवांचून, दक्षिणेवांचून व आशीर्वादावांचून श्राद्ध परिपूर्ण होतें. अशी संन्याशाची प्रशंसा आहे.

**अथमध्यमाविप्राः मातामहोमातुलोभागिनेयोदौहित्रोजामातागुरुःशिष्योयाज्यःश्वशुरऋत्विक्शालकःपितृष्वसृपुत्रोमातृष्वसृपुत्रोमातुलपुत्रोऽतिथिःसगोत्रोमित्रमित्येते मध्यमाः दौहित्रजामातृस्वस्रीयादीनांविद्यादिगुणवतांश्राद्धनिमन्त्रणाभावेदोषः गुणहीनत्वेतुनदोषः षड्भ्यस्तुपुरुषेभ्योर्वाक्श्राद्धार्हानैवगोत्रिणः। षड्भ्यस्तुपरतोभोज्याअलाभेगोत्रजाअपि १ अत्रविशेषः ऋत्विजःसपिण्डाःसंबन्धिनःशिष्याश्ववैश्वदेवस्थानेनियोज्या नतुपित्र्ये एवमन्येपिविगुणाविप्रादेवस्थानेयोज्याः पितापितामहोभ्रातापुत्रोवाथसपिण्डकाः। नपरस्परमर्घ्याःस्युर्नश्राद्धेऋत्विजस्तथा १ वैश्वदेवेनियोक्तव्यायद्येतेगुणवत्तराः ॥**

**मध्यमब्राह्मणलक्षण**—मातामह, मातुळ, भागिनेय, दौहित्र, जामाता, गुरु, शिष्य, यजमान, श्वशुर, ऋत्विज, शालक, आतेभाऊ, मावसभाऊ, मामेभाऊ, अतिथि, सगोत्री व मित्र हे मध्यम होत. दौहित्र, जामाता, भगिनीपुत्र हे विद्यादि गुणांनीं युक्त असून त्यांस श्राद्धास निमंत्रण न केलें तर दोष आहे; गुणहीन असल्यास दोष नाहीं. सहा पुरुषांच्या अलीकडे सगोत्री श्राद्धास निमंत्रण करण्यास योग्य नाहींत. परगोत्री न मिळाल्यास सहा पुरुषांपलीकडचे गोत्रजही भोजनास (क्षणास) सांगावे. याविषयीं विशेष असा कीं, ऋत्विज व शिष्य यांची योजना अनुक्रमें सपिंडस्थानीं व देवस्थानीं करावी, पितृस्थानीं करूं नये. याप्रमाणें दुसरेही गुणहीन ब्राह्मण देवस्थानीं योजावे. पिता, पितामह, भ्राता अथवा पुत्र किंवा सपिंडक हे एकमेकांची पूजा करण्यास योग्य नसल्यानें त्यांना श्राद्धास सांगूं नये. त्याचप्रमाणें ऋत्विजही श्राद्धांमध्यें पूज्य नाहींत ते जर अत्यंत गुणवान् असतील तर त्यांस देवस्थानीं योजावें.

**अथवर्ज्याविप्राःक्षयश्वासमूत्रकृच्छ्रभगन्दरादिमहारोगी हीनाङ्गोधिकाङ्गः काणोबधिरोमूकःशत्रुःकितवोभृतकाध्यापकोमित्रद्रोहीपिशुनःकुनखी कृष्णदन्तः क्लीबोमातापितृगुरुत्यागी चोरोनास्तिकःपापकर्माविहितकर्मत्यागीनक्षत्रोपजीवीवैद्योराजभृत्योगायको लेखकः कुसीदजीवीवेदविक्रयीकावित्वजीवीदेवार्चनजीवीनटोगृहदाहीसमुद्रगामीशस्त्रकर्तासोमविक्रयीपक्षिपोषकःपरिवेत्तादिधिषूपतिःकुमाराध्यापकःपुत्राद्यामविद्योद्रव्यप्राप्त्यर्थवेदघोषकारीग्रामयाजी-**

केशपशुविक्रयीशिल्पीपित्राविवादकारीशूद्रयाजकोजटीश्मश्रुहीनोनिर्दयोरज-स्वलापतिर्गार्भिणीपतिःकुब्जोवामनोरक्तनेत्रोवाणिज्योपजीवीछिन्नोष्ठश्छिन्न-लिङ्गोगड्डमान्ज्वरितोदेवलकोविधुरोनिरग्निःशूद्रगुरुःशूद्रशिष्योदाम्भिकोगोवि-क्रयीरसविक्रयी वेदनिन्दकोवृक्षरोपकः कदर्यःसदायाचकःकृषिजीवीसाधुनि-न्दितोमेषमाहिषयोःपोषकः कपिलकेशोविस्मृतवेदोनिष्ठुरवागित्यादयोविप्राह-व्यकव्ययोर्वर्ज्यःधर्मार्थमुदरार्थंवौषधकारीविगर्हितः। देवार्चनपरोनित्यंवित्तार्थी-वत्सरत्रयम् १ असौदेवलकोनामदेवस्वग्राहकोपिच। वर्जनीयःसविज्ञेयःसर्व-कर्मसुसर्वदा २ इदंमनुष्यस्थापितदेवताविषयमितिभाति दाराग्निहोत्रसंयोगं-कुरुतेयोग्रजेस्थिते। परिवेत्तासविज्ञेयःपरिवित्तिस्तुअग्रजः १ अग्रजानुज्ञादौन-दोषइत्युक्तम् ज्येष्ठायांयद्यनूढायांकन्यामामूह्यतेऽनुजा। साचाग्रेदिधिषूर्ज्ञेया-पूर्वातुदिधिषूर्मता १ प्रतिमाविक्रयंयोवैकरोतिपतितस्तुसः जीवनार्थंपरास्थी-निनयतेपतितःसच २ गाननृत्यादिकमुदरार्थंनिषिद्धंनतुभगवदर्थम् ॥

**अधमब्राह्मणलक्षण**—क्षय, दमा, मूत्रकृच्छ्, भगंदर इत्यादि महारोगांनीं युक्त असलेला, हीनांग, अधिकांग, काणा, बहिरा, मुका, शत्रु, कितव (जुवेबाज), वेतन घेऊन अध्याय सांगणारा, मित्रद्रोही, दुर्जन, कुनखी, कृष्णदंत, षंढ, माता पिता गुरु यांचा त्याग करणारा, चोर, नास्तिक, पापकर्मी, स्नानसंध्यादि विहित कर्मांचा त्याग करणारा, नक्षत्रविद्येवर उपजीविका करणारा, वैद्य, राजसेवक, गायक, लेखक, व्याजबट्टा करून उपजीविका करणारा, वेदविक्रय करणारा, कविता करून उपजीविका करणारा, देवपूजा करून उपजीविका करणारा, नट, गृहास अग्नि लावणारा, समुद्रगमन करणारा, शस्त्रें करणारा, सोमविक्रय करणारा, पक्षी पाळणारा, परिवेत्ता, दिधिषूचा पति, कुमाराध्यापक पुत्रापासून विद्या शिकलेला, द्रव्यप्राप्तिस्तव वेदघोष करणारा, ग्रामोपाध्याय, केश व पशु यांचा विक्रय करणारा, शिल्पकाम करणारा, पित्याशीं अतिवाद करणारा, शूद्राकडे यजन करणारा, जटाधारी, श्मश्रुहीन, निर्दय, रजस्वलापति, गर्भिणीपति, कुबडा, खुजा, आरक्तनेत्र, वाणिज्यावर उपजीविका करणारा, छिन्नोष्ठ, छिन्नलिंग, गड्डमान्, ज्वरित, देवलक, विधुर, निरग्नि, शूद्र-गुरु, शूद्रशिष्य, दांभिक, गाई, बैल यांचा विक्रय करणारा, रसाचा विक्रय करणारा, वेदनिंदक, वृक्षाची लावणी करणारा, कृपण, सदा याचना करणारा, शेतकीवर उपजीविका करणारा, साधुनिंदित, मेंढे व महिष पाळणारा, पिंगट केश असणारा, वेदाध्ययन विसरलेला, निष्ठुर भाषण करणारा; इत्यादि ब्राह्मण दैवकर्म व पित्र्यकर्म यांस वर्ज्य होत. धर्मासाठीं किंवा उदरनिर्वाहासाठीं औषधें करणारा ब्राह्मण निंद्य होय. द्रव्यासाठीं सतत तीन वर्षेंपर्यंत देवाची पूजा करणारा व देवाचें द्रव्य घेणारा तो देवलक होय, हा सर्व कर्मांत वर्ज्य करावा. हें वचन मनुष्यस्थापित देवतांविषयीं असावें असें वाटतें. ज्येष्ठ भ्राता, अविवाहित व निरग्निक असतां जो कनिष्ठ भ्राता विवाह व अग्निहोत्र धारण करितो तो परिवेत्ता, व ज्येष्ठ परिवित्ती असें जाणावें. ज्येष्ठ भ्रात्याची आज्ञा असल्यास दोष नाहीं, असें सांगितलें आहे. ज्येष्ठ कन्या अविवाहित

असून ज्या कनिष्ठ कन्येचा विवाह केला ती कनिष्ठ कन्या अग्रेदिधीषु जाणावी व ज्येष्ठ कन्या दिधीषु जाणावी. मूर्तींचा विक्रय करणारा पतित होय, व उपजीविकेकरितां परकीयांच्या अस्थि नेणाराही पतित होय. गायन, नृत्य इत्यादिक उपजीविकेसाठीं करणें निषिद्ध आहे, पण तें भगवत्प्रीत्यर्थ निषिद्ध नाहीं.

**अत्रविप्राणां ग्राह्यत्वोक्त्यैवतद्भिन्नानांवर्ज्यत्वेसिद्धेपुनर्वर्ज्यपरिगणनंवर्ज्य-भिन्नानांनिर्गुणानामपिग्राह्यत्वार्थम् विद्याशीलादिगुणवत्तकुष्ठित्वकाणत्वादि-शारीरदोषाणांनदूषकत्वम् गयायांतुनिर्गुणाअपितेएवभोज्याः नविचार्यंकुलं-शीलंविद्याचतपएवच। पूजितैस्तैस्तुष्टादेवाःसपितृगुह्यकाः १ इत्युक्तेः ब्राह्मणा-न्नपरीक्षेततीर्थेक्षेत्रनिवासिनः। यत्तु नब्राह्मणंपरीक्षेतदैवेकर्मणिधर्मवित् पित्र्ये-कर्मणितुप्राप्तेपरीक्षेतप्रयत्नतः १ इतितदसंभवपरम् गायत्रीसारमात्रोपिवरंविप्रः सुयन्त्रितः। नायन्त्रितश्चतुर्वेदीसर्वाशीसर्वविक्रयी १ इति हेमाद्रौव्यासः श्राद्धेकाणादयोभोज्यामिश्रितावेदपारगैः। विप्रानिमन्त्रणात्पूर्वमेवपरीक्षणी-यानतुनिमन्त्रणोत्तरम् इतिब्राह्मणविचारः॥**

**ब्राह्मणविचार**—ग्राह्य ब्राह्मणाविषयीं जें सांगितलें त्याहून भिन्न ते वर्ज्य असें सिद्ध असतां पुनः वर्ज्य ब्राह्मणांची जी परिगणना सांगितली ती अशासाठीं कीं, वर्ज्याहून भिन्न ( निराळे ) निर्गुण असले तरी ते ग्राह्य होत. विद्या, आचरण इत्यादि गुणांनीं युक्त असतां कुष्ठित्व, काणत्व इत्यादि शारीरदोष दूषणकारक नाहीं. गयेस तर निर्गुण असले तरी गयेचेच ब्राह्मण श्राद्धीं भोजनास सांगावे. कुलशील, विद्या व तप यांचा विचार करूं नये. त्यांची पूजा केल्यानें पितर व गुह्यक यांसहवर्तमान देव संतुष्ट होतात, असें वचन आहे. म्हणून तीर्थाचे ठायीं व क्षेत्रांत राहाणाऱ्या ब्राह्मणाची परीक्षा करूं नये. धर्मवेत्त्या पुरुषानें दैव-कर्माचे ठायीं ब्राह्मणाची परीक्षा करूं नये. पित्र्यकर्म प्राप्त झालें असतां प्रयत्नानें परीक्षा करावी, असें जें वचन आहे तें असंभवपरच आहे. आचारसंपन्न असून केवळ गायत्री मात्र जाणणारा असला तरी उत्तम होय व आचारसंपन्न नसून सर्व खाणारा व सर्व पदार्थ विकणारा असा जरी चार वेद जाणणारा असला तरी तो निंद्य जाणावा, असें हेमाद्रींत व्यासांचें वचन आहे. वेदपारग ब्राह्मणांनीं मिश्र असे काणादिकही श्राद्धांत भोजनास सांगावे. श्राद्धास क्षण देण्यापूर्वीं ब्राह्मणांची परीक्षा करावी, क्षण दिल्यावर परीक्षा करूं नये. असा हा विचार आहे.

**अथश्राद्धार्हद्रव्याणि। तत्रदर्भाःदर्भग्रहणेकालोमन्त्रोदर्भभेदाश्चद्वितीय-परिच्छेदेउक्ताः विशेषस्तूच्यते कुशामुख्याःकुशाभावेकाशदूर्वोशीरतृणादयः तत्रकाशैर्दूर्वाभिर्वाकृतपवित्रहस्तोनाचामेत् द्वाभ्यामनामिकाभ्यांतुधार्येदर्भ-पवित्रके। एकानामिकयावापिद्वयोर्मध्येतुपर्वणोः १ साग्रौविगर्भौतुकुशौकार्यै-ताभ्यांपवित्रकम्। द्वाभ्यांतत्स्याच्चतुर्भिर्वाग्रन्थियुक्तंनवाभवेत् २ स्नानेदाने-जपेहोमेस्वाध्यायेपित्रकर्मणि। सपित्रौसदर्भोवाकरौकुर्वीतनान्यथा ३ ब्रह्म-ग्रन्थीपवित्राढ्यो नाचामेद्बुधःसदा। केचिद्ग्रथित पवित्राभावेसाग्रदर्भौद्वौ-**

दक्षिणकरेवामेतुत्रीन्द्वौवाबिभृयादित्याहुः आसनेद्वौदर्भौ पितृकर्मणिसमूलाद्विगुणादर्भाः दैवेसाग्राऋजवः पित्र्यपिसपिण्डीकरणपर्यन्तमृजुदर्भास्तदूर्ध्वंद्विगुणाभुग्नाइति येचपिण्डाश्रितादर्भायैःकृतंपितृतर्पणम् । मलमूत्रोत्सर्गधृतामलमूत्राद्यमेध्यगाः १ मार्गेचितौकइभूमौस्थितायेस्तरणासने । ब्रह्मयज्ञेचयेदर्भास्त्यागार्हाःसर्वएवते २ अन्यानिचपवित्राणिकुशदूर्वात्मकानिच । हेमात्मकपवित्रस्यकलांनार्हन्तिषोडशीम् ३ पञ्चगुञ्जमाषमानेनषोडशमाषंहेममयंपवित्रकमित्याहुः ॥

**श्राद्धदर्भ**—आधीं दर्भ सांगतों:-दर्भग्रहणाचा काल, मंत्र व दर्भांचे भेद दुसऱ्या परिच्छेदांत सांगितले आहेत म्हणून येथें विशेष मात्र सांगतों. दर्भांत कुश मुख्य असून त्याच्या अभावीं काश, दूर्वा, उशीर, तृण इत्यादि घ्यावे. काश अथवा दूर्वा यांचें पवित्रक हातांत घालून आचमन करूं नये. दोन अनामिकांमध्यें दोन दर्भपवित्रकें धारण करावीं किंवा एकाच अनामिकेच्या दोन पेरांच्यामध्यें पवित्रक धारण करावें. दर्भांत अन्यदल नसलेले दोन साग्रकुश घेऊन त्यांचें पवित्रक करावें. दोन किंवा चार कुशांचें ग्रंथियुक्त किंवा ग्रंथिविरहित पवित्रक करावें. स्नान, दान, जप, होम, पितृकर्म व ब्रह्मयज्ञ कर्तव्य असतां, दोन्ही हातांत पवित्रकें अथवा दर्भ धारण करावेत. दर्भांशिवाय कर्म करूं नये. शाहण्या पुरुषानें ब्रह्मग्रंथियुक्त पवित्रक हातांत घालून आचमन करूं नये. ग्रंथियुक्त पवित्रक असेल तर उजव्या हातांत दोन साग्र दर्भ व डाव्या हातांत तीन किंवा दोन दर्भ धारण करावे, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. आसनास दोन दर्भ, पितृकर्माला मुलासहित दुप्पट दर्भ घ्यावेत. दैवकर्मांत साग्र व सरळ दर्भ घ्यावेत. पित्र्यकर्मांतही सपिंडीकरण झाल्यावर दोन वेळ मोडलेले असे असावेत. पिंडप्रदान केलेले, पितृतर्पण केलेले, मलमूत्रोत्सर्गाच्या वेळीं धारण केल्यानें अशुद्ध झालेले व मलमूत्रादिकांनीं अपवित्र झालेले, मार्ग, चिता व यज्ञभूमि या स्थानचे, परिस्तरण, आसन व ब्रह्मयज्ञांतले हे सर्व दर्भ टाकण्यासच योग्य होत. सुवर्णपवित्रकाच्या सोळाव्या अंशाच्या योग्यतेचीं इतर कुश व दूर्वादिकांचीं पवित्रकें नाहींत. म्हणजे सर्व जातीच्या पवित्रकापेक्षां सुवर्णपवित्रक श्रेष्ठ आहे. पांच गुंजांचा एक मासा, या मानानें सोळा मासे वजनाचें सुवर्णपवित्रक असावें असें म्हणतात.

अथहविः । व्रीहियवतिलमाषगोधूमश्यामकप्रियङ्गुमुद्गसर्षपाःश्राद्धेप्रशस्ताः चणकोविकल्पितः यावनालोपिविकल्पितः इष्टापूर्तेमृताहेचदर्शवृद्ध्यष्टकासुच । पात्रेभ्यस्त्वेषुकालेषुदेयंनैवकुभोजनम् १ अगोधूमंचयच्छ्राद्धंमाषमुद्गविवर्जितम् तैलपक्वेनरहितंकृतमप्यकृतंभवेत् २ राजमाषाश्चनिष्पावाअपिशस्ताःसतीनकाः । राजमाषामहाराष्ट्रभाषया'चवळी'तिप्रसिद्धाः निष्पावाः 'पावटे'इति सतीनकाः'वाटाणे'इति कदलीफलमाम्रफलंसूरणःपनसःत्रिविधंकर्कटीफलम् कोशातकी 'दोडका' इतिप्रसिद्धा कुस्तुम्बुरुवैकल्पिकम् पटोलंबदरमामलकंखर्जूरीफलंचिंचाद्रकंशुण्ठीमूलकंद्राक्षालवंगैलापत्रकाणिजीरकंहिङ्गुदाडिमफल-

मिक्षुःशर्करागुडःकर्पूरःसैन्धवसामुद्रेलवणेपूगीफलंताम्बूलपत्रमितिश्राद्धेप्रोक्ता-
निहवींषि गव्ये दधिदुग्धे घृतंगव्यंमाहिषंच केचिन्माहिषंतक्रंसद्यःकृतमनुद्धृत
नवनीतंग्राह्यमाहुःकेचिन्महिषीक्षीरंशर्करादियुतंग्राह्यमाहुःमथितंनिर्जलंदधि-
सर्वनिषिद्धम् जम्बीरफलं विहितप्रतिषिद्धत्वाद्विकल्पितम् अक्षोटः 'अक्रोड'-
इतिप्रसिद्धः शृङ्गाटकः 'शिंगाडे' इतिप्रसिद्धः चिर्भटं 'खर्बूज' इतिप्रसिद्धम्
शीतकंदली 'रताळी'ति प्रसिद्धम् एते श्राद्धेविहिताःआम्रातकः 'आंबाडा'
इतिप्रसिद्धस्तण्डुलीयो'माठ' इतिप्रसिद्धः एतौद्वौविहितप्रतिषिद्धौ केचिद्राज-
माषंकृष्णेतरमुद्गंकृष्णनिष्पावंचनिषिद्धमाहुः कथंचिद्यादिविप्रेभ्योनदत्तंभोजने-
मधु। पिण्डास्तुनैवदातव्याःकदाचिन्मधुनाविना १ अक्षतागोपशुश्चैवश्राद्धे-
मांसंतथामधु। देवराच्चसुतोत्पत्तिःकलौपञ्चविवर्जयेत् १ इतिवचनद्वयान्मधु-
निऐच्छिकविकल्पः केचिद्यथाचारंप्रदेयंतुमधुमांसादिकंतथा। इतिवचनाद्देशा-
चारानुसारेणव्यवस्थितविकल्पमाहुः मांसंश्राद्धेषुनैवदेयंकलिवर्ज्यत्वात् नद-
द्यादमिषंश्राद्धेनचाद्याद्धर्मतावित्। इत्यादिश्रीभागवतवचनाच्च अन्यानिमु-
ञ्जातचव्यकसेरुकालेयादिद्रव्याणिबहूनिमहानिबन्धेषूक्तानितान्यप्रसिद्धत्वा-
च्छ्राद्धेवश्यापेक्षोपयोगयोरभावाच्चनोच्यंते ॥

**श्राद्धशुद्धपदार्थ**—हविस् म्हणजे श्राद्धास शुद्ध पदार्थ कोणते लागतात ते सांगतों. व्रीहि, जव तिल, उडीद, गहूं, सावे, प्रियंगु, मूग, मोहरी हे पदार्थ श्राद्धास प्रशस्त होत. चणे विकल्पानें प्रशस्त आहेत. जोंधळेही विकल्पानें प्रशस्त आहेत. इष्टापूर्त, मृतदिवस, दर्शश्राद्ध, नांदीश्राद्ध व अष्टकश्राद्धें यांत ब्राह्मणास निंद्य पदार्थांचें भोजन देऊं नये. ज्यांत गहूं, उडीद, मूग व तैलपक्क पदार्थ नाहींत तें श्राद्ध केलें तरी न केल्यासारखेंच होय. राजमाष, सतीनक व निष्पाव हेही प्रशस्त होत. मराठी भाषेंत राजमाषास चवळी, निष्पावास पावटे, सतीनकास व वाटाणे असें म्हणतात. केळीं, आंबे, सुरण तीन प्रकारचे फणस, काकडी व कोशातकी म्हणजे दोडकीं हीं प्रसिद्ध आहेत. कुस्तुंबुरु (कोथिंबीर) वैकल्पिक होय. पडवळ, बोरें, आवळे, खजूर, चिंच, आलें, सुंठ, मुळा, द्राक्षें, लवंगा, वेलदोडे, पत्री, जिरें, हिंग, डाळिंब, ऊंस, साखर, गूळ, कापूर, सैंधव, समुद्रलोण, (साधें मीठ) सुपारी, नागवेलीचीं पानें, हे पदार्थ श्राद्धास प्रशस्त होत. गाईचें दहीं व दूध, गाईचें व म्हशीचें तूप, हींही प्रशस्त होत. म्हशीचें ताक ताबडतोब केलेलें असून त्यांतून लोणी काढलेलें नसलेलें ग्राह्य आहे, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. म्हशीचें दूध साखर घालून घ्यावें, असें कांहीं ग्रंथकारांचें मत आहे. निर्जल असें घुसळलेलें दहीं सर्वत्र निषिद्ध होय. ईडनिंबू विहित व निषिद्ध असल्यामुळें वैकल्पिक आहे. अक्रोड, शृंगाटक म्हणजे शिंगाडे, चिर्भट म्हणजे खरबूज, शीत कंदली म्हणजे रताळीं, हे विहित होत. आम्रातक म्हणजे आंबाडा व तंदुलीय म्हणजे (तांदुळजा) आणि माठ, हे विहित प्रतिषिद्ध जाणावेत. काळे मुगाशिवाय इतर मूग, चवळी व काळे पावटे हे निषिद्ध होत, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. कदाचित् भोजनांत ब्राह्मणांस

मद्य न वाढला तर चालेल, पण मद्याशिवाय पिंड कधींही देऊं नये. अक्षता, गोरूपपशु, श्राद्धामध्यें मांस व मद्य आणि देवरापासून पुत्रोत्पत्ति हीं पांच कलींत वर्ज्य होत, असें वचन असल्यामुळें मद्याविषयीं इच्छेनुरूप विकल्प आहे. कित्येक ग्रंथकार 'स्वकीय आचारानुसार मद्य, मांस इत्यादि द्यावें' असें वचन असल्यामुळें देशाचारानुरोधानें व्यवस्थित विकल्प आहे, असें म्हणतात. श्राद्धांत मांस देऊं नये, कारण कलियुगांत मांस वर्ज्य सांगितलें आहे, व धर्मतत्त्ववेत्त्या पुरुषानें श्राद्धांत मांस देऊं नये व खाऊंही नये, असें श्रीभागवतवचनही आहे. खारा रानसुरण, वेखंड, कशेरू व काळेय इत्यादि बरेच पदार्थ मोठ्या निबंधग्रंथांतही सांगितले आहेत, पण ते अप्रसिद्ध असून श्राद्धास निरुपयोगी असल्यामुळें येथें सांगत नाहीं.

अथवर्ज्यानि। यद्यपिविहितोक्त्यैवतद्भिन्नानामग्राह्यत्वंप्राप्तंतथापिविशेष-दोषप्रदर्शनायाप्राप्तनिषेधज्ञापनायचतानिसंगृह्यन्ते उत्कोचादिनाप्राप्तंपतितान्त्यजादेःप्राप्तमन्यायार्जितंकन्याविक्रयादिलब्धंधनंनिन्द्यम् पित्रर्थंमेदेहीति-याचनार्जितमपिनिषिद्धम् आढकीकुलित्थमसूरकोद्रवराजसर्षपानिषिद्धाः लांकेतिप्रसिद्धाःमर्कटकाश्चवर्ज्याःशिग्रुकुष्माण्डोभयविधालाबुकरमर्दार्द्रमरीच-पिण्डमूलककुसुम्भशणवंशांकुराः दशविधालशुनादिपलाण्डुभेदाः कृत्रिम-लवणानिरक्ताबिल्वंश्वेतंकृष्णंवृन्ताकं गाजरापरपर्यायंगृंजनंभोकरसंज्ञःश्लेष्मात-कोरक्तनिर्यासाश्चवर्ज्याः सामुद्रसैन्धवेभक्ष्येप्रत्यक्षंलवणेबुधैः। बिडालोच्छिष्ट-माघ्रातंचश्राद्धेद्रव्यंविवर्जयेत् ॥ १ ॥ करीरफलपुष्पाणि विडङ्गमरिचानिच। बीजपूरंपटोलंचश्राद्धेदत्त्वापतत्यधः ॥ २ ॥ कृष्णधान्यानिसर्वाणिवर्जयेच्छ्राद्ध कर्माणि । नवर्जयेत्तिलांश्चैवमुद्गमाषांस्तथैवच ॥ ३ ॥ दातुर्यद्यत्प्रियंतत्तद्देयं-निन्द्यंनचेद्भवेत् । अजाविमहिषीक्षीरंतद्विकारांश्चवर्जयेत् ॥ ४ ॥ वालुकाकीट-पाषाणैःकेशैर्यच्चाप्युपद्रुतम् । वस्त्रेणवीजितंचान्नंवर्जयेच्छ्राद्धकर्मणि ॥ ५ ॥ अमेध्यैर्जङ्गमैःस्पृष्टंशुष्कं पर्युषितंचयत् । द्विःपक्वंपरिदग्धंचसिद्धभक्षांश्चवर्ज-येत् ॥ ६ ॥ यत्सकृत्पाकेनभक्षणार्हमपिहिङ्गुजीरकादिसंस्कारार्थंपुनःपच्यते-तद्द्विःपक्वं वर्ज्यम् यत्तुद्विःपाकेनैवभक्षणार्हंतन्ननिषिद्धमितिसिन्धुः यदन्नैकदेशः केनाचित्पूर्वमास्वादितस्तदन्नंश्राद्धेवर्ज्यम् मारीषं'राजगिरे'तिप्रसिद्धंशाकंधान्यं चवर्ज्यम् वटप्लक्षोदुम्बरकपित्थनीपमातुलिङ्गफलानिनभक्षयेत् क्षीरंचलवणैर्मिश्रं-ताम्रेगव्यंसुरासमम् । अस्यापवादः पयोनुद्धृतसारंचपयसासंयुतंदधि । घृतं-चैतानिगव्यानिनैवदुष्टानिताम्रके ॥ १ ॥ पिप्पलीवर्तुलमरीचादेःप्रत्यक्षस्य-निषेधोनत्वद्रव्यमिश्रितस्य नारिकेलंविहितप्रतिषिद्धम् यच्चपौतिकशाकादिकं-जीर्णतक्रंसंधिन्यादिक्षीरमनिर्दशायाःक्षीरंमृग्यादिक्षीरंफेनिलतक्रादिकंहस्तदत्त-स्नेहलवणादिकंचनित्यभोजनेनिषिद्धंतत्सर्वंश्राद्धेपिवर्जयेत् माधवीये मृते-मक्षिकाक्रामिजन्तुभिःकेशरोमनखादिभिश्चदूषितंसतिसंभवेवर्जयेत् असंभवेतु-केशादिकमुद्धृत्यसंप्रोक्ष्यहिरण्यस्पर्शंकृत्वाभुञ्जीत श्वमार्जारमूषकादिभिरालीढादिकंत्वापद्यपिवर्ज्यमित्युक्तम् यत्तुमण्डकवटकसक्तुपायसापूपकृसरादीनां-

स्नेहसिद्धानांचपर्युषितत्वदोषोनास्तीतिवचनंतन्नित्यभोजनपरंतुनश्राद्धपरमिति शिष्टाः यदग्निपक्वंसदेकरात्रिद्विरात्राद्यन्तरितंतत्पर्युषितमुच्यते ॥

**श्राध्दवर्ज्यपदार्थ**—विहित पदार्थ सांगितल्यानें तद्भिन्न पदार्थ अग्राह्य होत, असें जरी सिद्ध होत असलें तरी विशेष दोष दाखविण्यासाठीं व अप्राप्य पदार्थांचा निषेध जाणविण्यासाठीं ते सांगतों. लांच इत्यादिकांपासून मिळालेलें, पतित व अंत्यज इत्यादिकांपासून मिळालेलें, अनीतीनें संपादन केलेलें व कन्याविक्रयापासून मिळालेलें द्रव्य निंद्य होय. पितृकर्मासाठीं ' मला दे ' अशी याचना करून मिळविलेलें द्रव्यही निषिद्ध होय. तूर, कुळिथ, मसूर, कोद्रू, काळे शिरस, लाख म्हणून प्रसिद्ध जें मर्कटक तें, शेवगा, कूष्मांड, दोन प्रकारचे भोपळे, करवंदें, ओलीं मिऱ्यें, वाटोळा मुळा, करडई, करटोली, वेळूचे कोंब, १० प्रकारचे लसूण, इत्यादि पलांडूचे भेद कृत्रिम लवणें, तांबडें बेलफळ, पांढरें व काळें वांगें, गाजर, भोंकर, वस्तुवर्ण व चीक हे पदार्थ वर्ज्य होत. समुद्र व सैंधव हीं लवणें प्रत्यक्ष भक्षण करावींत. मांजरानें हुंगलेला पदार्थ श्राद्धामध्यें वर्ज्य करावा असें बुधांनीं सांगितलें आहे. करीर ( कण्हेर ) वृक्षाचीं फलें व पुष्पें, वावडिंग व मिऱ्यें, महाळुंग व पटोल ( पडवळ ) हीं श्राद्धांत दिलीं असतां अधोयोनी प्राप्त होते. श्राद्धांत सर्व काळीं धान्यें वर्ज्य करावींत, पण तीळ, मूग व उडीद हीं वर्ज्य करूं नयेत. दात्यास प्रिय असलेला पदार्थ निंद्य नसेल तर त्यास द्यावा, तो हितकारक होतो. शेळी, मेंढी व म्हैस यांचें दूध व त्यांचें दहीं इत्यादि पदार्थ वर्ज्य करावेत. वाळू, कीटक, खडे, रेंव व केंस यांनीं दूषित झालेलें व वारा घातलेलें अन्न श्राद्धांत वर्ज्य करावें. अशुद्ध प्राण्यांनीं स्पर्शिलेलें, शुष्क, शिळें, द्विपक्व, दग्धान्न व पूर्वीं तयार करून ठेवलेले पदार्थ, हे सर्व वर्ज्य करावे. एक वेळ शिजविल्यानें भक्षण करण्यास योग्य असतांही हिंग, जिरें इत्यादिकांचा संस्कार करण्याकरितां जें अन्न पुनः शिजविलें जातें तें दोनदां शिजविलेलें ( द्विपक्व ) अन्न वर्ज्य होय. दोन वेळ शिजविल्यानेंच खाण्यास योग्य होणारें अन्न निषिद्ध नाहीं, असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. ज्या अन्नाचा एकदेश एखाद्या प्राण्यानें हुंगिला तें अन्न श्राद्धांत वर्ज्य करावें. मारीष म्हणजे राजगिरा या नांवानें प्रसिद्ध असलेली शाक व धान्य वर्ज्य होय. वड, पिंपरी, उंबर, कवठ, नीप व महाळुंग यांचीं फळें भक्षण करूं नयेत. लवणयुक्त दूध व तांब्याच्या भांड्यांतील गाईचें दूध हीं सुरेसमान होत. यास अपवाद—अनुघृत सार, दूध व पयोयुक्त दहीं आणि घृत हीं तांब्याच्या पात्रांत असलीं तरी निषिद्ध नाहींत. पिंपळीं व वाटोळीं मिऱ्यें यांच्या प्रत्यक्ष उपयोगाचा निषेध आहे. त्यांत दुसरें द्रव्य मिश्रित केलें तर दोष नाहीं. नारळ विहित व प्रतिषिद्ध आहे. पौतिक, शाक, शिळें ताक, संधिनी म्हणजे बैलानें मैथुनांत आक्रमिलेल्या गाईचें दूध, प्रसूत होऊन दहा दिवस न झालेल्या गाईचें दूध, हरिणीचें दूध, फेंसयुक्त ताक, हातावर दिलेलें स्नेहद्रव्य व लवण इत्यादिक पदार्थ जे नित्य भोजनांत निषिद्ध आहेत, ते सर्व श्राद्धांतही वर्ज्य करावेत. मृत झालेल्या माशा व

किडे इत्यादि प्राणी व केस, रोम व नखांनीं दूषित झालेलें अन्न, संभव असतां वर्ज्य करावें. संभव नसल्यास केशादि काढून प्रोक्षण करून हिरण्याचा स्पर्श करून भक्षण करावें. कुत्रा, मांजर, उंदीर इत्यादिकांनीं जर चाटलेलें अन्न असेल तर तें आपत्तींतही वर्ज्य करावें, असें माधवाच्या ग्रंथांत सांगितलें आहे. मांडे, वडे, सातूचें पीठ, पायस, अपूप, कृसर इत्यादिक तेलांत:सिद्ध केलेले पदार्थ शिळे असले तरी त्यांस दोष नाहीं, असें जें वचन आहे तें नित्यभोजनपर आहे, श्राद्धपर नाहीं, असें शिष्ट सांगतात. अग्नीनें पक्व झालें असून त्यावर एक दोन इत्यादि रात्री गेल्या असतां तें अन्न पर्युषित ( शिळें ) म्हणतात.

**कदर्यादीनामन्नंनित्यभोजनेश्राद्धकर्मणिचनग्राह्यम् तेचकदर्यश्चोरोनटोवीणोपजीवीवार्धुषिकोभिशस्तोगणिकाचिकित्सकःपुंश्चलीमत्तःक्रूरःपतितोदाम्भिकः पतिपुत्ररहितास्त्रीस्वर्णकारः स्त्रीजितोग्रामयाजकोघातुकःकर्मारस्तन्तुवायःकृतघ्नोवस्त्रक्षालनोपजीवीदारोपजीवीसोमविक्रयीचित्रकर्मागायक इत्यादयस्त्रैवर्णिकाअपिअग्राह्यान्नाः आत्मानंधर्मकृत्यंचपुत्रदारांश्चपीडयेत् । लोभाद्यः पितरौभृत्यान्सकदर्यइतिस्मृतः १ द्वावेवाश्रमिणौभोज्यौब्रह्मचारीगृहीतथा । वानप्रस्थोयतीलिङ्गीनभोज्यान्नाःप्रकीर्तिताः २ षण्मासंयोद्विजोभुङ्क्ते शूद्रस्यान्नंविगर्हितम् । सतुजीवन्भवेच्छूद्रोमृतःश्वाचाभिजायते ३ अन्यानि च द्रव्याणिनिबन्धेषुबहूनिनिषिद्धानितानिविहितोक्त्यर्थसिद्धत्वादप्रसिद्धत्वाच्चनोक्तानि दुर्गन्धेफेनिलंक्षारंपङ्किलंपल्वलोदकम् । नभवेद्यत्रगोतृप्तिर्नक्तंयच्चाप्युपाहृतम् १ नग्राह्यंतज्जलंश्राद्धेयच्चाभोज्यनिपानजम् । स्नानमाचमनंदानंदेवतापितृतर्पणम् २ शूद्रोदकैर्नकुर्वीततथामेघाद्विनिःसृतैः । नाहरेदुदकंरात्रौतुलसींगोमयंमृदम् ३ तुलसीबिल्वजान्हवीजलभिन्नंपर्युषितंजलंपुष्पंचत्यजेत् दौहित्रःकुतुपःकालश्छागःकृष्णाजिनंतथा । रौप्यंदर्भास्तिलागावःखड्गपात्रंपितृप्रियम् १ आरण्याःकृष्णतिलामुख्याः तदभावेग्राम्यागौराःकृष्णाश्च छागसांनिध्यंश्राद्धेतिप्रशस्तम् कुक्कुटविड्वराहकाकमार्जारशूद्रषण्ढरजस्वलासान्निध्यमतिनिन्द्यम् चाण्डालरजस्वलाखञ्जश्वित्रिन्यूनाङ्गातिरिक्ताङ्गादिभिर्वीक्षितमन्नमभोज्यम् आपदिमृद्भस्महिरण्योदकस्पर्शाद्भोज्यम् पावमानीतरत्समन्दीमन्त्रैर्गायत्र्यादिभिश्चदर्भजलप्रोक्षणेदुष्टान्नशुद्धिःपादुकोपानहौछत्रंरक्तचित्राम्बरंतथा । रक्तपुष्पंच मार्जारंश्राद्धभूमौविवर्जयेत् १ घण्टानादोश्वधत्तूरशङ्खशुक्तिसान्निध्यंचवर्ज्यम् ॥**

**श्राद्धान्न**—कदर्य म्हणजे चिक्कूचें व इतर ज्या कोणाचें अन्न नित्यभोजन व श्राद्धकर्म यांस घेऊं नये, ते येणेंप्रमाणें:—कदर्य, चोर, नट, वीणावाद्यावर किंवा व्याजावर उपजीविका करणारा, लोकापवादानें दूषित झालेला, गणिका, वैद्य, क्रुद्ध, जारिणी, मत्त, क्रूर, शत्रु, पतित, दांभिक पति व पुत्ररहित स्त्री, सोनार, स्त्रीजित, ग्रामोपाध्याय, घातुक, कर्मार ( शिल्पी ) कोष्टी, कृतघ्न, वस्त्रक्षालनावर उपजीविका करणारा ( रजक ), स्त्रीपासून उपजीविका करणारा, सोमविक्रयी, चितारी व गायक हे जरी त्रैवर्णिक असतील तरी त्यांचेपासून अन्न घेऊं नये.

आत्मा, धर्मकृत्य, पुत्र, स्त्रिया व मातापितर यांना जो लोभामुळें पीडा देतो तो कदर्य होय. ब्रह्मचारी व गृहस्थाश्रमी हे दोनच आश्रमी भोज्यान्न होत. वानप्रस्थ, संन्यासी व लिंगी हे भोज्यान्न नाहींत. जो द्विज सहा महिनेपर्यंत शूद्राचें अन्न भक्षण करितो, तो जिवंतपणींच शूद्र होऊन मेल्यावर कुत्र्याचे योनीस जातो. इतर जे पदार्थ मोठ्या निबंधांत पुष्कळसे निषिद्ध केलेले आहेत, ते विहित पदार्थांच्या उक्तीवरून निषिद्धच होत, हें अर्थसिद्ध असल्यामुळें व ते अप्रसिद्ध असल्यामुळें येथें सांगितले नाहींत. दुर्गंधयुक्त, केंसयुक्त, खारें, चिखलाचें, डबक्यांतील व ज्यानें गाईची तृषा हरण होत नाहीं तें आणि रात्रीं भरून ठेविलेलें व अभोज्यान्नाच्या डोणींतील पाणी श्राद्धास घेऊं नये. शूद्रानें आणिलेल्या उदकानें व मेघोदकानें स्नान, आचमन, दान, देवता व पितर यांचें तर्पण करूं नये. उदक, तुळशी, गोमय व मृत्तिका हीं रात्रीं आणूं नयेत. तुळशी, बेल यांशिवाय इतर पुष्पें व जान्हवी-शिवाय इतर पर्युषित उदक (शिळें) टाकावें. दौहित्र, कुतुपकाल, छाग (बोकड) कृष्णाजिन, रौप्य, दर्भ, तिल, गाय व गेंड्याचे शिंगाचें पात्र हे पदार्थ पितृप्रिय होत. अरण्यसंबंधीं काळे तीळ मुख्य होत. ते नसतील तर ग्रामसंबंधीं पांढरे व काळे तीळ घ्यावेत. श्राद्धीं छागाचें सान्निध्य अत्यंत प्रशस्त आहे. कुक्कुट, गांवडुकर, काक, मांजर, शूद्र, षंढ व रजस्वला यांचें सान्निध्य अत्यंत निंद्य होय. चांडाळ, रजस्वला, लंगडा, कुष्ठी, न्यूनांग अतिरिक्तांग इत्यादिकांनीं पाहिलेलें अन्न अभोज्य जाणावें व आपत्ति असल्यास मृत्तिका, भस्म, हिरण्य किंवा उदक यांच्या स्पर्शानें भक्षण करण्यास योग्य होय. पावमानी ऋचा व 'तरत् समंदी' या मंत्रांनीं व गायत्री इत्यादि मंत्रांनीं दर्भांनीं जलाचें प्रोक्षण केलें असतां दूषित अन्न शुद्ध होतें. पादुका, उपानह, छत्री, तांबडें वस्त्र, चित्रवस्त्र, तांबडें पुष्प व मांजर हे पदार्थ श्राद्धभूमीवर असूं नयेत. घंटानाद, अश्व घोत्रा, शंख व शुक्ति हे पदार्थ जवळ असूं नयेत.

अथश्राद्धदिनकृत्यम् । गोमयादिभिर्भूमिभाण्डशुद्धिः देवताब्रह्मचारियति-शिशूनांपिण्डदानपर्यन्तमन्नंनदेयम् अतिशिशवस्तुगृहान्तरेभोजनीयाः तिला-नवकिरेत्तत्रसर्वतोबन्धयेदजान् । पाकःश्राद्धकर्त्रास्वयमेवकार्यःतदभावेशुद्धप-त्न्यातदभावेतुबान्धवैः । सगोत्रैर्वासपिण्डैर्वामित्रैर्वासुगुणान्वितैः ॥ १ ॥पुंश्च-लींचतथावंध्यांविधवांचान्यगोत्रजाम् वर्जयेच्छ्राद्धपाकार्थममातृपितृवंशजाम् ॥ २ ॥ नपाकंकारयेत्पुत्रींगर्भिणींचापिदुर्मुखीम् । पाकभाण्डानिसौवर्णरौप्य-ताम्रोद्भवानिच ॥ ३ कांस्यानिमृन्मयंतूक्तंनव्यमेवमनीषिभिः । पैत्तलंरङ्गजा-तंचविहितंनोननिन्दितम् ॥ ४ ॥ नकदाचित्पचेदन्नमयस्थालीषुपैतृकम् । फलशाकादिच्छेदनार्थभिन्नानामायमानांशस्त्राणांभाण्डानांचदर्शनमपिपाकादि-स्थानेनिषिद्धम् पक्वान्नस्थापनार्थंतुशस्यन्तेदारुजान्यपि । गृह्याग्नौतुपचेदन्नं-श्राद्धीयंलौकिकेपिवा ॥ १ ॥ यस्मिन्नग्नौपचेदन्नंतस्मिन्होमोविधीयते ॥

**श्राद्धदिनकृत्य**—गोमयानें भूमि व पात्रें यांची शुद्धि करावी. देवता, ब्रह्मचारी, संन्यासी व बालक यांस पिंडदान होईपर्यंत अन्न देऊं नये.

फार लहान मुलांस दुसऱ्या घरीं भोजन घालावें. श्राद्धभूमीचे ठिकाणीं तिल टाकावे, बोकड बांधावे व पाक श्राद्धकर्त्यानें स्वतःच करावा. स्वतः करण्याचा अभाव असल्यास शुचिर्भूत पत्नीकडून करवावा. अशी स्त्री नसेल तर बांधव, सगोत्र, सपिंड किंवा गुणवान् मित्र यांजकडून करवावा. वंध्या, जारिणी, विधवा, परगोत्रांत जन्मलेली व श्राद्धकर्त्याच्या मातापितरांच्या वंशांत न जन्मलेली अशा स्त्रीच्या हातून श्राद्धाचा पाक करवूं नये. श्राद्धपाकाचीं भांडीं सोन्याचीं, रुप्याचीं, तांब्याचीं व काशाचीं असावींत. मृत्तिकेचीं असल्यास सर्व नवीन असावींत असें विद्वानांनीं सांगितलें आहे. पितळेचीं व रंगजात भांडीं विहित किंवा निषिद्धही नाहींत. लोखंडाच्या स्थालींत श्राद्धान्न कधींही शिजवूं नये. फळें, शाका, इत्यादि चिरण्यासाठीं जी विळी इत्यादिक शस्त्रें, त्यांशिवाय लोखंडी शस्त्रें व भांडीं यांचें दर्शनही पाकादि स्थानीं निषिद्ध आहे. पक्व झालेले पदार्थ ठेवण्यास काष्ठाचीं पात्रें प्रशस्त होत. श्राद्धाचा पाक गृह्याग्नीवर किंवा लौकिकाग्नीवर करावा. ज्या अग्नीवर पाक केला असेल त्याच अग्नीवर होम करावा.

तत्रगृह्याग्नौपाकेविशेषः प्रातर्होमंकृत्वातदेकदेशंमहानसेकृत्वापाकंकुर्यात् पाकान्तेपावकाग्न्येकदेशंगृह्याग्नौसंयोज्यगृह्येऽग्नौकरणवैश्वदेवादिकार्यम् अत्रैवंव्यवस्था कात्यायनादीनांगृह्याग्नौपाकः आश्वलायनानांतुनैत्यकेपचनाग्नौ अग्नौकरणंत्वाश्वलायनानांव्यतिषङ्गेणश्राद्धेगृह्याग्निपक्वचरुणागृह्येएवव्यतिषङ्गाभावेपाणिहोमः अन्यशाखीयस्यगृह्याग्नावग्नौकरणम् विधुरस्योच्छिन्नाग्निकस्यचपृष्टोदिविविधानादिनाग्निसंपादनम् तच्चपूर्वार्धेउक्तम् भोजनपात्राणितुहेमरौप्यकांस्यजानिवापलाशकमलकदलीमधूकपत्रनिर्मितानिवा ॥

**गृह्याग्निपाकविशेष**—प्रातःकाळीं होम करून त्या गृह्याग्नींतून एकीकडचा अग्नि सैंपाकघरांत नेऊन त्या अग्नीवर पाक करावा. पाक झाल्यावर पाकाग्नींतून कांहीं अग्नि गृह्याग्नींत मिळवून गृह्याग्नीवर अग्नौकरण, वैश्वदेव इत्यादिक करावें. कात्यायनादिकांनीं गृह्याग्नीवर पाक करावा. आश्वलायनांनीं नित्याच्या पाकाग्नीवर पाक करावा. अग्नौकरण करायचें तें आश्वलायनांनीं श्राद्ध असतां गृह्याग्नीवर चरु पक्व करून गृह्याग्नीवरच व्यतिषंगानें करावें. व्यतिषंगाचा अभाव असल्यास पाणिहोम करावा. अन्यशाखीयांनीं गृह्याग्नीवरच अग्नौकरण करावें. विधुर व विच्छिन्नाग्निक असल्यास 'पृष्टोदिवि०' या विधानानें अग्नि उत्पन्न करावा. हें विधान पूर्वार्धांत सांगितलेंच आहे. भोजनाचीं पात्रें—सुवर्णाचीं, रुप्याचीं, काशाचीं किंवा पळस, कमल, केळीं, मोह यांच्या पानांचीं केलेलीं असावींत.

अथनिमन्त्रणादिश्राद्धाहेभुक्तान्नपरिणामपर्यन्तंकर्तुर्विप्राणांचनियमः स्त्रीसङ्गपुनर्भोजनानृतभाषणाध्यापनद्यूतायासभारोद्वहनहिंसादानप्रतिग्रहचौर्याध्वगमनदिवास्वापकलहादिवर्जनंकर्तृभोक्तृभयधर्माः स्त्रीसङ्गश्चश्राद्धादनेतत्पूर्वेदिनेचऋतुकालेपिवर्ज्यः ताम्बूलक्षुरकर्माभ्यङ्गदंतधावनवर्जनंकर्तृधर्माः भोक्तृविप्राणांतैलाभ्यङ्गेउद्वर्तनेक्षौरेचाविकल्पः कर्तुर्भोक्तुश्चमुख्यवारुणस्नाने

नैवाधिकारोनतुगौणस्नानेन श्राद्धकृच्छुक्लवासाःस्यान्मौनीचविजितेन्द्रियः । उपवासंपरान्नंचऔषधंचविवर्जयेत् ॥ १ ॥ अवस्त्रत्वंमलवद्वस्त्रत्वंकौपीनवत्त्वं कच्छहीनत्वमनुत्तरीयत्वंकाषायवस्त्रत्वमार्द्रवस्त्रत्वंद्विगुणवस्त्रत्वंरक्तवस्त्रत्वं दग्धवस्त्रत्वंस्यूतवस्त्रत्वमित्येकादशविधनग्नत्वं कर्तृभोक्तृभ्यांवर्ज्यम् कर्तुर्ललाटेऊर्ध्वपुण्ड्रादेर्विकल्पः भोक्तुस्तुभवत्येव चन्दनतिलकस्तुपिण्डदानात्प्राक्कर्तुर्वर्ज्यः भोक्तुस्तुभोजानकालात्प्राक्वर्ज्यः सदर्भहस्तेनतिलकोनकार्यः करणेआचमनंदर्भत्यागश्च कर्त्रानिमन्त्रितविप्रत्यागोनकार्यः प्रमादेनत्यागेयत्नेनविप्रः प्रसादनीयः बुद्धिपूर्वकत्यागेयतिचान्द्रायणंप्रायश्चित्तम् आमन्त्रितस्तुयोविप्रो भोक्तुमन्यत्रगच्छति । नरकाणांशतंगत्वाचाण्डालेष्वभिजायते ॥१॥ आमन्त्रितस्तुयःश्राद्धेविलम्बंकुरुतेद्विजः । देवद्रोहीपितृद्रोहीपच्यतेनरकेषुसः ॥ २ ॥ स्त्रीसङ्गपुनर्भोजनंचश्राद्धपूर्वरात्रावपिकर्तृभोक्तृभ्यांवर्ज्यम् दशकत्वःपिबेदापो गायत्र्याश्राद्धभुग्द्विजः । सायंसंध्यामुपासीतजपेच्चजुहुयादपि ॥१॥ सूतकेचप्रवासेचअशक्तौश्राद्धभोजने । औपासनादिकंहोमंनकुर्यात्किंतुकारयेत् ॥२॥ निमन्त्रितस्तुनश्राद्धेकुर्याद्भार्यादिताडनम् । अपराह्णाख्यमुहूर्तत्रयेवनस्पतिच्छेदं दधिमन्थनंसर्वैर्नकार्यम् यदाकर्तुरशक्त्यातत्पुत्रशिष्यादिःप्रतिनिधिःश्राद्धंकरोति तदायजमानप्रतिनिधिभ्यामुभाभ्यापूर्वोक्ताःसर्वेकर्तृनियमाःकार्याःमुक्तकच्छातुयानारीमुक्तकेशीतथैवच । हसतेवदतेऽत्यन्तंनिराशाःपितरो गताः ॥१॥ सवर्णं प्रेषयेदाप्तंद्विजानांतुनिमन्त्रणे । अभोज्यंब्राह्मणस्यान्नंवृषलेन निमन्त्रितम् ॥२॥ तथैववृषलस्यान्नंब्राह्मणेननिमन्त्रितम् । वृषलःशूद्रः ॥

**श्राद्धब्राह्मणनियम**—निमंत्रणापासून श्राद्ध दिवशीं भक्षिलेल्या अन्नाचा परिपाक होईपर्यंत श्राद्धकार्याचे व ब्राह्मणांचे नियम सांगतों.

स्त्रीसंग, पुनः भोजन, अनृत भाषण, अध्यापन, द्यूत, आयास, भार वाहणें, हिंसा, दान, प्रतिग्रह, चोरी करणें, मार्ग चालणें, दिवसा निद्रा व कलह हे कर्त्याचे व भोक्त्याचे वर्ज्य धर्म होत. श्राद्धदिवसाच्या पूर्वी व श्राद्धदिवशीं स्त्रीचा ऋतुकाल असला तरी स्त्रीसंग वर्ज्य करावा. तांबूल, श्मश्रुकर्म, अभ्यंग व दंतधावन हीं वर्ज्य करणें हे श्राद्धकर्त्याचे धर्म होत. श्राद्धभोक्त्या ब्राह्मणांस उद्वर्तन, श्मश्रुकर्म व तैलाभ्यंग याविषयीं विकल्प आहे. कर्ता व भोक्ता यांस उदकस्नानानेंच अधिकार येतो; गौण स्नानानें येत नाहीं. श्राद्धकर्ता—शुक्लवस्त्र परिधान केलेला, मौनी व जितेंद्रिय असून त्यानें उपोषण, परान्न व औषध वर्ज्य करावें. अवस्त्रत्व, मलिनवस्त्रत्व, कौपीनत्व, कच्छहीनत्व, अनुत्तरीयत्व, काषायवस्त्रत्व, आर्द्रवस्त्रत्व, द्विगुणवस्त्रत्व, रक्तवस्त्रत्व, दग्धवस्त्रत्व व स्यूत (शिवलेलें) वस्त्रत्व, याप्रमाणें ११ प्रकारचें नग्नत्व कर्ता व भोक्ता यांनीं वर्ज्य करावें. ललाटीं ऊर्ध्वपुंड्र इत्यादि धारण करण्याविषयीं कर्त्यास विकल्प आहे, पण भोक्त्यानें ऊर्ध्वपुंड्र धारण करावाच. पिंडदानाच्या पूर्वी कर्त्यानें चंदनाचा तिलक लावूं नये व भोक्त्यास तो भोजनकालाच्या पूर्वी वर्ज्य आहे. दर्भसहित हस्तानें तिलक लावूं नये. लाविल्यास आचमन करून दर्भांचा त्याग करावा. कर्त्यानें निमं-

त्रित ब्राह्मणाचा त्याग करूं नये. प्रमादानें त्याग केल्यास मोठ्या प्रयत्नानें त्या ब्राह्मणास प्रसन्न करावें. बुद्धिपूर्वक त्याग केल्यास यतिचांद्रायण प्रायश्चित्त करावें. आमंत्रित ब्राह्मण भोजनास अन्यत्र गेल्यास शंभर नरकाप्रत जाऊन शेवटीं चांडालांत जन्मास येतो. आमंत्रित द्विज श्राद्धकालीं विलंब करील तर तो देवद्रोही व पितृद्रोही होऊन नरकास जातो. कर्ता व भोक्ता यांनीं श्राद्धदिवसाच्या पूर्व रात्रींही स्त्रीसंग व पुनर्भोजन करूं नये. श्राद्धीं भोजन केलेल्या ब्राह्मणानें दहा वेळ गायत्री मंत्रानें अभिमंत्रित केलेलें उदक प्राशन करावें, सायंसंध्या करावी व जप आणि होमही करावा. सुतक, प्रवास, असामर्थ्य व श्राद्धभोजन या प्रसंगीं औपासनादिक होम स्वतः करूं नये. दुसऱ्याकडून करवावा. श्राद्धीं निमंत्रित असतां स्त्री इत्यादिकांस ताडन करूं नये. अपराह्ण नामक त्रिमुहूर्तकालीं सर्वांनीं वृक्ष तोडूं नये. व दधिमंथन करूं नये. कर्त्यास सामर्थ्य नसल्यामुळें त्याचा पुत्र, शिष्य इत्यादिक जेव्हां प्रतिनिधि होऊन श्राद्ध करितो तेव्हां यजमान व प्रतिनिधि या दोघांनींही पूर्वी सांगितलेले कर्त्याचे सर्व नियम पाळावेत. मुक्तकच्छा व मुक्तकेशी स्त्री फार हंसली व बोलली असतां पितर निराश होऊन जातात. ब्राह्मणांस निमंत्रण करण्यासाठीं स्वकीय वर्णांतील आप्त पाठवावा. ब्राह्मणाचें अन्न वृषलानें निमंत्रित असेल व वृषलाचें अन्न ब्राह्मणानें निमंत्रित असलें तरी तें अपूज्य होय. वृषल म्हणजे शूद्र होय.

अथश्राद्धेब्राह्मणसंख्या वैश्वदेवेसमाः पित्र्येविषमाः तेनद्वौवैश्वदेवे त्रयः पितृपार्वणेइतिपञ्चविप्राः अथवाचत्वारोदैवेपार्वणेतुपित्रादीनामेकैकस्यत्रयस्त्रयइतित्रयोदशविप्राः यद्वापित्रादेरेकैकस्यपञ्चेत्येकोनविंशतिः किंवाएकैकस्यसप्तेतिपञ्चविंशतिः एवंदर्शादौपार्वणाधिक्येविप्राधिक्यमूह्यम् तथाच वैश्वदेवेद्वौचतुरोवोपवेश्यपित्रादिष्वेकैकस्यस्थानेएकंत्रीन्पञ्चसप्तनववोपवेशयेदितिनिष्कर्षःसत्क्रियांदेशकालौचद्रव्यब्राह्मणसंपदं । शौचंचविस्तरो हन्तीतिपक्षेअशक्तोवादैवेएकः पितृपार्वणेचैकइतिद्वौविप्रौ तदुक्तंश्रीभागवते द्वौदैवेपितृकार्येत्रीनेकैकमुभयत्रवा । भोजयेत्सुसमृद्धोपिश्राद्धेकुर्यान्न विस्तरम् १ देशकालोचितश्रद्धाद्रव्यपात्रार्हणानिच । सम्यग्भवन्तिनैतानिविस्तरात्स्वजनार्पणात् २ इति एतेनद्वौदैवेएकः पित्र्येइतिविप्रत्रयपक्षोनिर्मूलोवेदितव्यः द्वौदैवेथर्वणौविप्रौप्राङ्मुखावुपवेशयेत् । पित्र्येतूदङ्मुखांस्त्रीश्चऋग्यजुःसामवेदिनः १ अत्यशक्तौपार्वणद्वयेएकोविप्रः ॥

**श्राद्धब्राह्मणसंख्या**— वैश्वदेवस्थानीं सम व पित्र्यस्थानीं विषम ब्राह्मण असावेत असें असल्यामुळें वैश्वदेवाकडे दोन व पितृपार्वणीं तीन मिळून पांच ब्राह्मण असावेत. किंवा देवस्थानीं ४ व पार्वणस्थानीं पिता इत्यादिक जे ३ त्या एकेकास तीन तीन मिळून १३ ब्राह्मण असावेत; अथवा पिता इत्यादिक एकेकास ५।५ असे सर्व मिळून १९, किंवा एकेकास ७।७ मिळून २५ ब्राह्मण असावेत. याप्रमाणें दर्शादि श्राद्धीं पार्वणें अधिक असतील तर ब्राह्मणही अधिक सांगावे. म्हणजे वैश्वदेवस्थानीं २ किंवा ४ बसवून पिता इत्यादिकांच्या

एकेकाच्या ठिकाणीं १।३।५।७ किंवा ९ बसवावेत. असा याचा अर्थ श्राद्धविस्तार केला असतां सत्क्रिया, देश, काल, द्रव्य, ब्राह्मण, संपत्ति व शुचिर्भूतपणा यांचा नाश होतो. यापक्षीं अथवा असामर्थ्य असतां देवस्थानीं एक व पितृपार्वणीं एक मिळून २ सांगावे असेंच श्रीमद्भागवतांतही सांगितलें आहे. देवकार्यीं २ व पितृकार्यीं ३ किंवा देवाकडे १ व पितरांकडे १ असे ब्राह्मण भोजनास सांगावे. सुसमृद्ध असला तरी श्राद्धाचा विस्तार करूं नये. स्वकीयातांस भोजनास सांगितल्यानें जो विस्तार होतो. त्यानें—देश, काळ, उचितश्रद्धा, द्रव्यें, पात्रें, पूजा, हीं यथाविधि घडत नाहींत, यावरून देवस्थानीं २ व पित्र्यस्थानीं १ अशा तीन ब्राह्मणांचा जो पक्ष तो निर्मूळ समजावा. देवस्थानीं २ अथर्वणवेदी ब्राह्मण पूर्वाभिमुख बसवावेत. पित्र्यस्थानीं ऋग्यजुःसामवेदी असे उत्तराभिमुख तीन ब्राह्मण बसवावेत. अत्यंत असामर्थ्य असेल तर दोन पार्वणीं १ ब्राह्मण सांगावा.

यदैकएवविप्रस्तदाविश्वदेवस्थानेशिवलिङ्गंशालग्रामंवासंस्थाप्यसर्वंश्राद्धंसमाचरेत् दैवान्नंतत्क्षिपेदग्नौदद्याद्वाब्रह्मचारिणे । स्थानत्रयेएकोविप्रइतिपक्षः सपिण्डीकरणादन्यत्र सपिण्डीकरणेतुपार्वणेत्रयएवविप्राः वृद्धिश्राद्धेतुदैवेद्वौप्रतिपार्वणंद्वौद्वावेवमष्टौनिकृष्टपक्षे संपदिदैवेचत्वारः प्रतिपार्वणंचत्वारइतिषोडशेत्येवंदैवेपित्र्येचसमा विप्राइतिविशेषः सर्वथाब्राह्मणालाभेकृत्वादर्भमयान्बटून् । प्रेषानुप्रेषसंयुक्तं सर्वंश्राद्धंप्रकल्पयेत् ॥ १ ॥ अत्रविप्रानुकूल्यरूपदृष्टप्रयोजनाभावेप्यदृष्टार्थंदक्षिणादेया एवंयतेःश्राद्धोपवेशनेपि साचदक्षिणाकालान्तरेन्यस्मैप्रतिपादनीया अथवाभ्यर्चितंलिंगंशालग्राममथापिवा । संस्थाप्यदेवपित्रर्थंपीठेश्राद्धंचरेन्नरः ॥ १ ॥ पितरस्तस्यतिष्ठंतिकल्पकोटिशतंदिवि । निमन्त्रणंतुविप्राणांपूर्वेद्युःसद्यएववा ॥ २ ॥ कुर्याद्विप्रांश्चनियमाञ्छ्रावयेत्पैतृकान्बुधः । अक्रोधनैःशौचपरैःसततंब्रह्मचारिभिः । भवितव्यंभवद्भिश्चमयाचश्राद्धकारिणा ॥ १ ॥ इति ॥

**एकविप्रश्राद्ध**—जेव्हां एकच ब्राह्मण असेल तेव्हां विश्वेदेवस्थानीं शिवलिंग किंवा शाळिग्राम स्थापून सर्व श्राद्ध करावें. देवांचें अन्न अग्नींत टाकावें किंवा ब्रह्मचाऱ्यास द्यावें. तीन स्थानीं मिळून एक ब्राह्मण सांगावा. असा जो पक्ष तो सपिंडीकरणाहून अन्यत्र जाणावा. सपिंडीकरणांत तर पार्वणास तीनच ब्राह्मण सांगावेत. नांदीश्राद्धांत देवस्थानीं २ व प्रत्येक पार्वणीं २।२ मिळून ८ ब्राह्मण निकृष्टपक्षीं असावेत. संपत्ति असल्यास देवस्थानीं ४ व प्रत्येक पार्वणीं ४ याप्रमाणें १६ असे देवस्थानीं व पितृस्थानीं सम ब्राह्मण सांगावेत हा विशेष आहे. सर्वथा ब्राह्मण न मिळतील तर दर्भमय बटु करून प्रेष, अनुप्रेष यांसहित सर्व श्राद्ध करावें. या दर्भबटुश्राद्धीं अनुकूलरूप दृष्ट प्रयोजन नसलें तरी अदृष्ट फळाकरितां दक्षिणा द्यावी. याप्रमाणें संन्यासी श्राद्धांत बसला असतांही त्यास दक्षिणा द्यावी. दर्भबटूस दिलेली दक्षिणा अन्यकालीं दुसऱ्यास द्यावी. जो मनुष्य पूजिलेलें लिंग किंवा शाळग्राम देवपितृस्थानीं पीठावर ठेवून श्राद्ध करितो त्याचे पितर

कल्पकोटिशतपर्यंत स्वर्गी राहातात. ब्राह्मणास श्राद्धाचें जें निमंत्रण करायचें तें पूर्वदिवशीं किंवा श्राद्धदिवशींच करावें व श्राद्धसंबंधीं नियम आपण करून ब्राह्मणाकडून ते श्रवण करावावेत, ते असेः—श्राद्धकर्ता जो मी व श्राद्धभोक्ते ब्राह्मण जे तुम्ही त्या सर्वांनीं क्रोधरहित, शौचतत्पर व निरंतर ब्रह्मचारी स्थितींत असावें.

अथसामान्यतःश्राद्धपरिभाषा । निपात्यदक्षिणंजानुदेवान्परिचरेत्सदा । पितॄणांपरिचर्यातुवामजानुनिपातनात् ॥ १ ॥ प्रदक्षिणंतुदेवानांपितॄणामप्रदाक्षिणम् । पितॄणांद्विगुणाभुग्नादर्भादैवेऋजुत्वगाः ॥ २ ॥ दैवेतूदङ्मुखःकर्तापित्र्येस्याद्दक्षिणामुखः । संकल्पेक्षणदानेपाद्येआसनेआवाहनेर्घ्यदानेगन्धाद्याच्छादनान्तपञ्चोपचारेन्नदानेपिण्डदानेञ्जनाभ्यञ्जनयोरक्षय्येस्वधावाचनेचसंबन्धगोत्रनामोच्चारणमावश्यकमन्यत्रकृताकृतम् संबन्धगोत्रनामरूपाणीतिसंबन्धनामगोत्ररूपाणीतिवोच्चारणेक्रमः तत्रसकारगेतुवक्तव्यंगोत्रंसर्वत्रधीमतेतिवाक्यात्काश्यपगोत्रस्यकाश्यपगोत्रस्येतिवोच्चारः केचिच्छाखाभेदाद्व्यवस्थामाहुः गोत्रस्यत्वपरिज्ञानेकाश्यपंगोत्रमुच्यते । शर्मान्तंविप्रनामोक्तंवर्मान्तंक्षत्रियस्यतु ॥१॥ गुप्तान्तंचैववैश्यस्यदासान्तंशूद्रजन्मनः । पित्रादिनामाज्ञानेतुतातपितामहप्रपितामहेत्येवंब्रूयात् न नामोच्चारयेत्याश्वलायनःशाखान्तरेतुपितुर्नाम्नःस्थानेपृथिवीषदितिपितामहस्यान्तरिक्षसदितिप्रपितामहस्यदिविषदिति नामोच्चार्यम् स्त्रीणांदान्तंनामसावित्रीदेत्येवमुच्चार्यम् केचिद्देवीशब्दान्तमाहुः अन्ये देवीदापदयोःसमुच्चयमूचुः विभक्तिभिस्तुयत्किंचिद्दीयतेपितृकर्मणि । तत्सर्वंसफलंज्ञेयंविपरीतंनिरर्थकम् ॥ १ ॥ षष्ठीविभक्त्यासंकल्पःक्षणश्चाक्षय्यकर्मच । षष्ठ्यावास्याच्चतुर्थ्यावासनदानंद्विजातये ॥ २ ॥ द्वितीययावाहनंस्याद्विभक्तिस्तुचतुर्थिका ॥ ३ ॥ अन्नदानेपिण्डपूजास्वधास्वस्तीतिवाचने । पिण्डदानेतुसंबुद्धिर्येचत्वेत्यादितःपुरा ॥ ४ ॥ ततःपरंचतुर्थीचेत्युभयंसर्वसंमतम् । शेषाणि सर्वकर्माणिसंबुध्यन्तेयथायथम् ॥ ५ ॥ इदंतेवाइदंवोवाप्रयुज्यैवसमाचरेत् । सव्येनदैवंकर्मस्यादपसव्येनपैतृकम् ॥ ६ ॥ विप्रप्रदक्षिणाविप्रस्वागतंचार्घ्यदानकम् । सूक्तस्तोत्रजपोन्नस्यपात्रेषुपरिवेषणम् ॥ ७ ॥ आह्वानमन्त्रास्याघ्राणंतथाचस्वस्तिवाचनम् । ताम्बूलदानमारभ्यासमाप्तेरितिपैतृकम् ॥ ८ ॥ प्रदक्षिणाद्येतदुक्तंसव्येनैवसमाचरेत् देवार्चादक्षिणादिःस्यात्पादजान्वंसमूर्धसु॥९॥ शिरोंसजानुपादेषुवामाङ्गादिषुपैतृके । अक्षय्यासनार्घ्यवर्ज्यंस्वधाकारेणपितृभ्यःसर्वदानम् देवेभ्यः स्वाहापदेन दैवतीर्थेनदैवंतत्पितृतीर्थेनपैतृकम्॥

**श्राद्धपरिभाषा**—देवपूजेला उजवा गुडघा खालीं टेंकावा आणि पितृपूजेला डावा गुडघा खालीं टेंकावा. देवकृत्य ( प्रदक्षिण ) सव्यानें व पितृकृत्य (अप्रदाक्षिण) अपसव्यानें करावें. पितृकर्मास मध्यें मोडलेले व देवकर्मास सरळ आणि न मोडलेले दर्भ असावेत. देवकर्माला कर्त्यानें उत्तराभिमुख व पितृकर्माला दक्षिणाभिमुख बसावें. संकल्प, क्षण देणें (आमंत्रण), पाद्य, आसन, आवाहन, अर्घ्यदान, गन्धापासून आच्छादनापर्यंतचे पांच उपचार, अन्नदान, पिण्डदान, अञ्जन, अभ्यञ्जन, अक्षय्य

व स्वधावाचनांतला संबंध, गोत्र व नाम--यांचे उच्चार (श्राद्धांत) आवश्यक आहेत व इतर ठिकाणीं कृताकृत आहेत. संबंध, गोत्र, नाम व रूप अशा क्रमानें किंवा— संबंध, नाम, गोत्र व रूप असा उच्चार करावा. त्यांतही बुद्धिवन्तानें गोत्राचा उच्चार सकारयुक्त करावा, असें वचन असल्यामुळें (उदाहरणार्थ) काश्यप सगोत्रस्थ अथवा काश्यप गोत्रस्थ—असा उच्चार करावा. कित्येक ग्रन्थकार शाखाभेदानें व्यवस्था सांगतात. गोत्र माहीत नसल्यास काश्यपगोत्राचाच उच्चार करावा. ब्राह्मणानें शर्मान्त (उ०—विष्णुशर्मा), क्षत्रियानें वर्मान्त (उ०—वीरवर्मा) वैश्यानें गुप्तान्त (उ०—चन्द्रगुप्त) आणि शूद्रानें दासान्त (उ०—शिवदास) असे आपापल्या नांवांचे उच्चार करावे. बाप वगैरेंचीं नांवें माहीत नसल्यास—पिता, पितामह, प्रपितामह (बाप, आजा, पणजा) असाच नुसता उच्चार करावा. नामोच्चार न करण्याबद्दल आश्वलायनाचें मत आहे. इतर शाखीयांनीं बापाच्या नांवाच्या जागीं 'पृथिवीषद्', आजाच्या नांवाच्या जागीं 'अन्तरिक्षसद्' व पणजाच्या नांवाच्या जागीं 'दिविषद्' असा उच्चार करावा. स्त्रियांचीं नांवें दान्त उच्चारावींत. जसें सावित्रिदा. कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें असें आहे कीं, स्त्रियांच्या नांवांचे उच्चार देवी शब्दांतानें (सावित्रीदेवी) व कांहींचें म्हणणें—देवी व दा--या दोन्ही पदांच्या समुच्चयानें--सावित्रीदेवीदा—असे उच्चार करावे. पितृकर्मांत विभक्ति लावून अर्पण केलेलें सर्व सफल होतें व विभक्ति न लावतां दिलेलें सर्व निष्फल होतें असें समजावें. संकल्प, क्षण व अक्षय्यकर्म—हीं षष्ठी विभक्तीनें करावींत. ब्राह्मणाला षष्ठी किंवा चतुर्थी यांतून कोणच्या तरी एका विभक्तीचा प्रत्यय लावून आसन द्यावें. आवाहन द्वितीया विभक्तीनें करावें. अन्नदान, पिण्डपूजा, स्वधा, व स्वस्तिवाचन—हीं चतुर्थी विभक्तीनें करावींत. 'येचत्वा०' इत्यादिक उच्चाराच्या पूर्वी जें पिण्डदान करायचें तें संबोधन विभक्तीनें करावें व नंतर चतुर्थी विभक्तीचा उपयोग करावा, हें सर्वसंमत आहे. बाकीचीं सारीं कर्में संबोधन विभक्तीच्या शेवटीं 'इदं ते' किंव 'इदं वो' असें यथायोग्य लावून कर्म करावें. देवकर्म सव्यानें व पितृकर्म अपसव्यानें करावें. विप्रप्रदक्षिणा, विप्रस्वागत, अर्घ्यदान, सूक्तें व स्तोत्रें यांचा जप, पात्रावर अन्न वाढणें, आव्हान, अवघ्राण, स्वस्तिवाचन व ताम्बूलदान—हें सर्व पितृकर्म सव्यानेंच करावें. देवपूजा—पाय, गुडघे, व मस्तक—अशी दक्षिणाङ्गपूर्वक म्हणजे पायांपासून मस्तकापर्यंत करावी. पितृस्थानीं वामाङ्गपूर्वक म्हणजे मस्तकाकडून पायांकडे करावी. अक्षय्य पितरांना आसन व अर्घ्य—हीं सर्व वर्ज्य करून, इतर जें देणें तें स्वधाकारानें द्यावें व देवांना स्वाहाकारानें द्यावें. देवकर्म देवतीर्थानें (यवोदक) व पित्र्यकर्म पितृतीर्थानें (तिलोदक) करावें.

**अथाचमनानि श्राद्धारम्भेद्विराचमनंविप्रपादक्षालनान्तेस्वपादक्षालनपूर्वकंद्विराचमनंदेवार्चनान्तेपित्र्यर्चनान्तेचैकैकमाचमनमाघ्राणान्तेएकंविकिरदानान्तेद्विरेकंवाश्राद्धान्तेस्वपादक्षालनपूर्वकंद्विराचमनमिति अन्येभस्ममर्यादान्तेकरशुद्धयन्तेउच्छिष्ट चालनान्तेचाप्येकैकमाहुः ॥**

**श्राद्धान्तर्गतआचमनविधि**—श्राद्धाच्या आरंभीं दोनदां आचमन करावें. ब्राह्मणाचे पाय प्रक्षालन केल्यावर आपले पाय प्रक्षालन करून दोनदां आचमन करावें, व देवांची पूजा केल्यावर आणि पितरांची पूजा केल्यावर एकेक आचमन करावें. अवघ्राणानंतर एक आचमन, विकिर दिल्यानंतर एक वेळ किंवा दोन वेळ आचमन व श्राद्धाच्या अंतीं आपले पाय प्रक्षालन केल्यावर दोनदां आचमन करावें. कित्येक ग्रंथकारांच्या मतें भस्ममर्यादा घातल्यावर, करशुद्धि केल्यावर व उष्टें काढल्यावर एकेक आचमन करावें–असें आहे.

अथ भोक्तुःपादशौचान्तेद्विराचमनंपाणिहोमान्तेएकं भोजनान्तेद्विरिति ॥

**भोक्त्याचा आचमनविधि**—भोक्त्यानें पादप्रक्षालनानंतर दोनदां आचमन, पाणिहोम म्हणजे हस्तावर अग्नौकरण झाल्यावर एकदां आचमन व भोजनांतीं दोनदां आचमन करावें.

अथदर्भाः आचान्तःप्राक्कुशांस्त्यक्त्वापाणावन्यांश्चधारयेत् । तथाच श्राद्धारम्भेधृतान्दर्भान्पाद्यान्तेचविसर्जयेत् ततोदेवार्चनान्तेपित्र्यर्चनांतेपिण्डशेषाघ्राणान्तेविकिरदानान्तेश्राद्धान्तेचपूर्वधृतदर्भास्त्यजेत् श्राद्धसागरादिप्रयोगेतुपित्र्यर्चनान्तेदर्भत्यागोनदृश्यते तेनक्वचिदाचमनेपिदर्भत्यागोनेतिभाति ॥

**दर्भत्याग**—आचमन केल्यावर पूर्वीं धारण केलेले दर्भ टाकून देऊन, दुसरे दर्भ धारण करावेत. तसेंच श्राद्धाच्या आरंभीं धारण केलेले दर्भ पाद्याच्या शेवटीं टाकावेत. देवपूजा, पितरपूजा, पिण्डशेषावघ्राण, विकिरान्नदान व श्राद्धाचा शेवट हीं झाल्यावर पूर्वीं धारण केलेले दर्भ टाकून द्यावेत. पूर्वीं धारण केलेले दर्भ टाकून देण्याबद्दलचेंही वचन श्राद्धसागरादि प्रयोगग्रंथांत आढळत नसल्यानें, क्वचित् आचमनींही दर्भत्याग करावा असें वाटत नाहीं.

अथोहविचारःयत्रबहुवचनान्तःपितृशब्दस्तत्रपितृशब्दस्यसर्वपितृवाचित्वादूहोन यथार्घ्यपात्रेपितॄनिमान्प्रीणयेत्यत्रमात्रादिश्राद्धेमातॄनितिनवदेत्तत्रापिशुंधनमन्त्रेषुशुन्धन्तांपितरःशुन्धंतांपितामहाइत्यादिशुन्धंतांमातरःइत्यादिच्चोहएव बहुवचनंतुनोह्यते प्रथममन्त्रेएवपूज्यत्वार्थकत्वात् ऋचंनोहेदितिनिषेधाहङ्मन्त्रेषुनोहः पिण्डदानेयेचत्वामत्रानुतेभ्यश्चेत्यत्रमातृश्राद्धेयाश्चत्वामत्रानुताभ्यश्चेतिनवदेत् स्त्रीणांस्त्रियःपुरुषाश्चानुगाइति पुमान्स्त्रियेतिपुलिङ्गशेषादितिवृत्तिकृत् अन्येतुयाश्चेत्याद्यूहमाहुः मात्रादिद्वित्वेपिण्डदानेएतद्वामस्मन्मातरौयश्चदाश्रीदेयेचयुवामत्रान्वित्येकंपिण्डंदत्त्वास्मन्मातृभ्यां० अयर्पि० इत्यादिअभ्यञ्जनेस्मन्मातरौ० अभ्यञ्जाथां० अञ्जनेअञ्जाथां एवंपितामहीप्रपितामहीद्वित्वेप्यूहः ॥

**ऊहविचार**—जेथें बहुवचनान्त पितृशब्द असेल तेथें पितृ शब्द सर्व पितृवाचक असल्यामुळें ऊह (बदल) करूं नये. जसें अर्घ्य देतांना 'पितॄनिमान् प्रीणय' च्या जागीं आईच्या श्राद्धांत 'मातॄन्' म्हणूं नये. त्यांतही शुंधन मंत्रांत 'शुंधन्तां पितरः शुंधन्तां पितामहः' इत्यादि व 'शुंधन्तां मातरः' असा ऊह करावा, पण बहुवचनी

करूं नये. कारण पहिल्या मंत्रांतच पूजत्वाचा अर्थ आहे. ऋग्वेदाविषयीं ऊह करूं नये' असा निषेध असल्यानें ऋग्वेद मंत्रांत तो करूं नये. पिण्डदानामध्यें 'येचत्वामत्रानुतेभ्यश्च' या स्थलीं मातृश्राद्धीं 'याश्चत्वामत्रानुताभ्यश्च' असा ऊह करूं नये. स्त्रियांमध्यें स्त्रिया व पुरुष हीं दोन्हें अनुयायी होत; कारण, 'पुमान् स्त्रिया' या सूत्रानें स्त्रिया सहोक्ती असतां पुल्लिंग शेष राहतें असें वृत्तिकार म्हणतो. कांहीं ग्रंथकार असें म्हणतात कीं, 'याश्च' असा ऊह करावा. माता जर दोन असतील तर पिंडदानामध्यें 'एतद्वास्मन्मातरौ यज्ञदाश्री देयेच युवामत्रानु...'असा ऊह करून, एक पिंड द्यावा व 'अस्मन्मातृभ्या अयं पिंडः' असा उच्चार करावा. अभ्यंजनाचे वेळीं 'अस्मान्मातरौ० अभ्यंजाथां' व अंजनाचे वेळीं 'अंजाथां' असें म्हणावें. पितामही व प्रपितामही दोन दोन असतांही असाच ऊह करावा.

**अथबहुत्वे एतद्वोस्मन्मातरोयज्ञदेश्रीदेरुद्रदेयथानामगोत्रायेचयुष्मानत्रानु-इत्येकपिण्डदानादि अभ्यञ्जनेऽभ्यङ्ध्वं अञ्जने अङ्ध्वमित्यादि एकनामत्वे-एकमेवनामद्विवचनान्तंबहुवचनान्तंवावदेत् एवमर्घ्यदानकालेप्यस्मन्मातरा-वित्यायूहेनसंबोध्यइदंवामर्घ्यमिदंवोऽर्घ्यमित्यूहोबोद्धव्यः तथाचायन्तुनः पितरःसो० तिलोसिसोमदेवत्यो० उशंतस्त्वानि० पिण्डानुमन्त्रणदशादानो-पस्थानप्रवाहणप्राशनादिमन्त्रेषुबहुवचनान्तपितृपदयुक्तत्वादिहेतोर्नोहइति-सिद्धम् नाप्रोक्षितंस्पृशेद्वस्तुनवदेन्मानुषींगिरम् । नचोद्वीक्षेतभुञ्जानं नचैवाश्रूणिपातयेत् १ दैवेपित्र्येचसर्वत्रजपहोमादिकर्मसु । मौनंकुर्यात्प्रयत्नेन सकलंफलमाप्नुयात् २ यादिमौनस्यलोपःस्याज्जपहोमार्चनादिषु । व्याहरेद्वैष्णवंमन्त्रंस्मरेद्वाविष्णुमव्ययम् ३ यस्यस्मृत्याचनामोक्त्यातपोयज्ञक्रियादिषु । न्यूनंसंपूर्णतांयातिसद्योवन्देतमच्युतम् ४ आदिमध्यावसानेषुश्राद्धस्येदमुदाहरेत् ॥**

**श्राद्धान्तर्गत विष्णुनामोच्चार**—बहुत माता असतील तर—'एतद्वोस्मन्मातरौ यज्ञदे श्रीदे रुद्रदे यथानामगोत्रा येच युष्मानत्रानु' असा ऊह करून, एक पिंड द्यावा. अभ्यंजन करतांना अभ्यंग्ध्वं व अंजन लावतांना अंग्ध्वं, असें म्हणावें. एक नांव असतां तें द्विवचनान्त किंवा बहुवचनान्त उच्चारावें. अर्घ्यदानकालींही 'अस्मन्मातरौ' इत्यादिक ऊहानें संबोधन करून 'इदंवामर्घ्यमिदं वो अर्घ्यं' असा ऊह करावा. 'आयंतुनः पितरः सो० तिलोसि सोमदेवत्यो० उशन्तस्त्वानि०' पिंडानुमंत्रण, दशादान, उपस्थान, प्रवाहण व प्राशन, यांचे मंत्र बहुवचनान्त पितृपदांनीं युक्त असल्यानें त्यांमध्यें ऊह नाहीं, हें यावरूनच सिद्ध झालें. प्रोक्षणविरहित वस्तूला स्पर्श करूं नये. मानुषी वाणी उच्चारूं नये. भोजन करणाऱ्या ब्राह्मणांकडे अवलोकन करूं नये व अश्रु पाडूं नये. दैवकर्म, पित्र्यकर्म, जप व होमादिक कर्मे करतांना प्रयत्नानें मौन धारण केल्यानें कर्माचें सर्व फल मिळतें. जप, होम, पूजा, इत्यादि कर्मांत मौनाचा लोप झाल्यास वैष्णवमंत्राचा उच्चार करावा किंवा सनातन विष्णूचें 'यस्य स्मृत्याच नामोक्त्या तपोयज्ञ क्रियादिषु न्यूनं संपूर्णतां याति सद्योवंदेतमच्युतं,' या मंत्रानें स्मरण करावें. श्राद्धाच्या आरंभीं, मध्यें व अंतीं विष्णुनाम इत्यादिकांचा उच्चार करावा.

अथसंक्षेपतआश्वलायनादीनांप्रयोगक्रमः सव्येनापसव्येनवादेशकालौसंकीर्त्यापसव्येनतत्तच्छ्राद्धार्हपितॄणांषष्ठीविभक्त्याएतेषाममुकश्राद्धंसदैवंसपिण्डंपार्वणविधिनैकोद्दिष्टेनवान्नेनामेनवाहिरण्येनवाश्वःसद्योवाकरिष्यइतिसंकल्पोयथासंभवंकार्यः सर्वत्रकुरुष्वेत्यादियथोचितंब्राह्मणैःप्रतिवचनंदेयमेव ततोदैवधर्मेणविप्रस्यदक्षिणजानुंस्पृष्ट्वामुकपितॄणाममुकश्राद्धअमुकविश्वेदेवार्थेत्वयाक्षणःक्रीयतामितिक्षणंदद्यात् ओंतथेतिविप्रोवदेत् कर्ताप्राप्नोतुभवानिति विप्रःप्राप्नुवानीति एवंपैतृधर्मेणवामजानुस्पर्शेनामुकश्राद्धेमुकस्यस्थानेत्वयाक्षणइत्यादिपूर्ववत् त्रयस्थानेएकविप्रत्वेपितृपितामहप्रपितामहानांस्थानेइत्यादि आक्रोधनैरित्यादिप्रार्थना अत्रसर्वत्रदेवपूर्वत्वम् क्वचित्पितृपूर्वकत्वंवक्ष्यते इदंसंकल्पक्षणदानादिपूर्वेद्युः सद्योवाकार्यम् ततःकुतुपेस्नातः स्नातान्धौतपादान्विप्रान्सन्निधापयेत् ततःसव्येनतिलोदकयवोदकेआचारात्कार्ये ततःसव्येनशुद्ध्यर्थंप्रायश्चित्तार्थसूक्तजपः प्रदक्षिणाच्चसमस्तसंपदिति नमस्कारःअपसव्येनाचारादधिकारवाचनम् ततआचमनप्राणायामौसव्येनकृत्वाअपसव्येनाद्वितीयः संकल्पः केचित्सद्यःकरणपक्षेद्वितीयसंकल्पंनेच्छन्ति ततस्तिष्ठन्सव्येनैवदेवेपिञ्येचभवतांस्वागतमितिप्रतिविप्रंप्रश्नः पूर्ववद्द्वितीयंक्षणदानम् अत्रबह्वृचानांगृह्याग्निमतांदर्शश्राद्धान्वष्टकापूर्वेद्युःश्राद्धेषुपिण्डपितृयज्ञव्यतिषङ्गेणश्राद्धप्रयोगो नान्येषांनापिश्राद्धान्तरेषु सचद्वितीयक्षणदानान्तश्राद्धतन्त्रंकृत्वापरिसमूहनादीध्माधानान्तेपिण्डपितृयज्ञतन्त्रान्तेपादक्षालनादिभस्ममर्यादान्तम् अग्नावग्नौकरणं कृत्वापरिवेषणादिसंपन्नवचनान्तेपिण्डदानादिपात्रोत्सर्गपर्यन्तंकृत्वाविकिरादिश्राद्धशेषंसमापनीयमित्येवंरूपः एवंहिरण्यकेशीयादीनामपिप्रथमसंकल्पोत्तरमग्न्युपसमाधानान्वाधानाद्याज्यसंस्कारान्तेपाद्यादिपूजान्तेतत्तन्मन्त्रोह्युतःसविस्तरोग्नौकरणहोमोज्ञेयः ॥

**आश्वलायनप्रयोगसंक्षेप**—सव्यानें किंवा अपसव्यानें देशकालाचा उच्चार करून अपसव्यानें श्राद्धास योग्य जे पितर त्यांचा षष्ठी विभक्तीनें–'एतेषाममुकश्राद्धं सदैवं सपिंडं पार्वणविधिनैकोद्दिष्टेन वान्नेनामेन वा हिरण्येन वाश्वःसद्योवाकरिष्ये'–असा जसा संभव असेल त्याप्रमाणें संकल्प करावा. सर्व ठिकाणीं ब्राह्मणांनीं 'कुरुष्व' असें यथायोग्य प्रतिवचन अवश्य द्यावें. त्यानंतर दैवधर्मानें ब्राह्मणांच्या उजव्या गुडघ्यांना स्पर्श करून 'अमुकपितॄणाममुकश्राद्धे अमुकविश्वेदेवार्थेत्वयाक्षणक्रीयताम्' असें म्हणून क्षण द्यावा. नंतर ब्राह्मणानें 'ॐ तथा' असें म्हणावें. कर्त्यानें 'प्राप्नोतुभवान्' असें व ब्राह्मणानें 'प्राप्नुवानि' असें म्हणावें. याप्रमाणें पितृधर्मानें डाव्या गुडघ्याला स्पर्श करून 'अमुकश्राद्धे अमुकस्यस्थाने त्वयाक्षणः०' इत्यादिक पूर्वीप्रमाणें करावें. त्र्यींच्या ठिकाणीं एक ब्राह्मण असेल तर 'पितृपितामहप्रपितामहानांस्थाने' असें म्हणावें व 'अक्रोधनैः०' इत्यादि प्रार्थना करावी. येथें सर्व ठिकाणीं देवपूर्वक कर्म करावें. क्वचित् स्थलीं जें पितृपूर्वक कर्म करावें तें पुढें सांगेन. संकल्प करणें, क्षण देणें, इत्यादि कर्म पूर्वदिवशीं किंवा

श्राद्धदिवशीं करावें. नंतर कुतुपकालीं म्हणजे अष्टममुहूर्तीं स्नान केलेल्या कर्त्यानें स्नात व पाय धुतलेले ब्राह्मण सन्निध बसवावेत. नंतर प्रघाताप्रमाणें सव्यानें तिलोदक व यवोदक करावें. नंतर सव्यानें शुद्धीसाठीं प्रायश्चित्तार्थ सूक्तांचा जप व प्रदक्षिणा करावी, व 'समस्त संपत्०' या मंत्रानें नमस्कार करावा. परिपाठ असल्यामुळें अधिकारवाचन अपसव्यानें करावें. नंतर आचमन व प्राणायाम सव्यानें करून, अपसव्यानें दुसरा संकल्प करावा. सद्यःकरणपक्ष असेल तर दुसरा संकल्प करूं नये, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. मग उभें राहून देवांकडे व पितरांकडे सव्यानेंच 'भवतां स्वागतं' असा प्रत्येक ब्राह्मणास प्रश्न करून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें दुसऱ्यानें क्षण द्यावा. गृह्याग्नियुक्त बह्वृच असल्यास दर्शश्राद्ध, अन्वष्टकाश्राद्ध व पूर्वेद्युःश्राद्ध यांत पिंडपितृयज्ञाच्या व्यतिषंगानें श्राद्धप्रयोग करावा, इतरशाखीयांनीं बह्वृचांनींही इतर श्राद्धांत तसा करूं नये. व्यतिषंगप्रयोग येणेंप्रमाणें:—दुसऱ्यानें क्षण देणें, येथपर्यंत श्राद्धतंत्र करून परिसमूहनापासून इध्मास्थापनापर्यंत पिंडपितृयज्ञाचें तंत्र केल्यावर ब्राह्मणाचे पादप्रक्षालनापासून भस्ममर्यादान्त म्हणजे पिशंगी घालीपर्यंत कर्म करावें. नंतर अग्नौकरण करून परिवेषनापासून 'संपन्न' वचनापर्यंत कर्म झाल्यावर पिंडदानापासून पात्रचालनापर्यंत कर्म करावें, व विकिरादिक श्राद्धशेष समाप्त करावें. व्यातिषंगप्रयोग अशा स्वरूपाचा जाणावा. याप्रमाणें हिरण्यकेशीय इत्यादिकांचा पहिला संकल्प केल्यावर अग्नीचें स्थापन, अन्वाधान, इत्यादिक आज्यसंस्कारान्त कर्म करून पाद्यादिक पूजा व त्यावर त्या त्या मंत्रांनीं युक्त असा सविस्तर अग्नौकरण होम जाणावा.

अथपाद्यम् अङ्गणेश्राद्धदेशद्वारेवाचतुरस्रंद्विहस्तंप्रादेशमात्रंवोदक्प्लवंदेवमण्डलंकृत्वाततोदक्षिणेषडङ्गुलंत्यक्त्वादक्षिणाप्लवंचतुर्हस्तंवितस्तिमात्रंवापितृमण्डलंवर्तुलंसव्यापसव्यप्रादक्षिण्याप्रादक्षिण्यादिदैवपैतृधर्मेणगोमूत्रगोमयाभ्यांकार्यम् यथायथंदर्भयवतिलगन्धपुष्पैरतदर्चनम् मण्डलसमीपेपीठेउपविष्टस्यैवप्राङ्मुखस्यविप्रस्यपादयोरुदङ्मुखः प्रत्यङ्मुखोवाकर्तामुकसंज्ञकाविश्वेदेवाइदंवःपाद्यंस्वाहानमइतियवगन्धपुष्पयुतजलमञ्जलिनाप्रक्षिप्यशंनोदेवीरितिशुद्धोदकेनपादावुपर्येवप्रक्षालयेत् नाधोभागेनापिसग्रन्थिकपवित्रहस्तेन पितृमण्डलेउदङ्मुखस्योपविष्टस्यपादयोर्दक्षिणामुखस्तिलगन्धादिजलमञ्जलिनापितृतीर्थेन पितरमुकनामरूपगोत्रेदंतेपाद्यंस्वधानमइतित्रयस्थानेएकविप्रत्वेपितृपितामहप्रपितामहाइदंवःपाद्यमितिबहुवचनान्तेनप्रक्षिप्यशंनोदेवीरित्यादिपूर्ववत् एवमग्रेपिपित्रादित्रयेब्राह्मणत्रयपक्षेइदंतेइत्येकविप्रपक्षेइदंवइतिवचनोहोज्ञेयः एवंमातामहादिपार्वणेपिबोध्यम् अत्रपाद्यात्पूर्वपादार्घ्यः पाद्योत्तरंचगन्धपुष्पाक्षतैःपादादिमूर्धान्तमर्चनपूर्वकंदैवे एषवःपादार्घ्यइतिदत्त्वापित्र्येपितिलैर्मूर्धाद्यर्चनपूर्वकंपादार्घ्यदानमुक्तंतत्कात्यायनादीनामेवाचारात्तेषामेव बह्वृचानांतुनैषआचारः ततः पाद्यशेषंगन्धयवतिलादिसव्यापसव्याभ्यां मण्डलयोस्त्यक्त्वास्वपादक्षालनंपवित्रत्यागंचकृत्वान्यपवित्रेधृत्वादे-

वमण्डलोत्तरेस्वयंविप्राश्चद्विराचम्यश्राद्धदेशंगच्छेयुःपादक्षालनोदकाचमनो-दकयोःसंसर्गोनकार्यःअपसव्येनामुकश्राद्धसिद्धिरस्त्वितिवदेत्तैःप्रत्युक्तःनिर-ङ्गुष्ठंविप्रदक्षिणहस्तंधृत्वासव्यापसव्याभ्यांभूर्भुवःस्वःसमाध्वमितिसदर्भेषुपी-ठेष्वविलम्बेनोपवेशयेत् तत्रदैवे, प्राङ्मुखोविप्रःपित्र्येतूदङ्मुखः असंभवेद-क्षिणान्यदिङ्मुखः ॥

**पाद्यविधि**—अंगणांत किंवा श्राद्धभूमीच्या दारांत दोन हात चौरसचौरस किंवा टीचभर (प्रादेश) प्रमाणाचें उत्तरेकडे उतरतें असें एक देव-मंडळ व दुसरें दक्षिणेच्या बाजूला सहा बोटें जागा सोडून, दक्षिणेकडे उतरतें असें चार हात चौरसचौरस किंवा एक वीत (वितस्ति) प्रमाणाचें पितृमंडलवर्तुळ—अनुक्रमें सव्यानें व अपसव्यानें—सुलट (प्रादक्षिण्य) व उलट (अप्रादक्षिण्य) अशा कृतीनें—गोमूत्र व गोमय यांचीं काढावींत, व मग त्या मंडळांचीं—दर्भ, यव, तिळ, गंध व फुलें यांनीं यथायोग्य पूजा करावी. मंडळापुढें पाटावर बसलेल्या पूर्वाभिमुख ब्राह्मणाच्या पायावर—उत्तराभिमुख किंवा पश्चिमाभिमुख बसलेल्या श्राद्ध-कर्त्यानें—अमुकसंज्ञका विश्वेदेवा इदं वः पाद्यं स्वाहा न मम'—असें म्हणून—यव, गंध व फुलें यांनीं युक्त असलेलें पाणी ओंजळीनें घालून—'शं नो देवी०'—या मंत्रानें शुद्धोदकानें ब्राह्मणाचे पाय वरूनच प्रक्षालन (धुणें) करावेत. तळपाय धुऊं नयेत. पाय धुतांना गांठीचें पवित्रक हातांत असूं नये. पितृमंडळापुढें (वाटोळ्या) उत्तरा-भिमुख पाटावर बसलेल्या ब्राह्मणाच्या पायांवर, कर्त्यानें दक्षिणाभिमुख बसून—तिल, गंध व पुष्प यांनीं युक्त असलेलें पाणी ओंजळीनें—'पितरममुकनामरूप-गोत्रे इदं ते पाद्यं स्वधा नमः'—असें म्हणत पितृतीर्थानें (तिलोदक) तीन ठिकाणीं द्यावें. ब्राह्मण एकच असल्यास—'पितृपितामहप्रपितामहाः इदं वः पाद्यं' असें बहुवचनान्त वाक्य म्हणून पाणी सोडावें व—'शं नो देवी०'—या मंत्रानें पूर्वींप्रमाणेंच पाय धुवावेत. पित्रादि तीन ठिकाणीं तीन ब्राह्मण जर असतील, तर 'इदं ते' असा बहुवचनी व एकच ब्राह्मण असल्यास—'इदं वः' असा एकवचनी प्रयोगाचा (भाषेंत) फरक (ऊह) करावा. मातामहादि पार्वणांतही असेंच करावें. देवस्थानच्या ब्राह्मणाला पाद्याच्या आधीं पाद्यार्घ्य व नंतर गन्धपुष्पाक्षतांनीं 'एष वः पादार्घ्यः' असें म्हणून पायांपासून मस्तकापर्यंत पूजनपूर्वक देऊन पितरांकडे तिलांनीं मस्तकाकडून पायांकडे पूजनपूर्वकच पादार्घ्यदान द्यावें, असें जें सांगितलें आहे, तो कात्यायनादिकांचा आचार अस-ल्यानें त्यांनाच योग्य असून, ऋग्वेद्यांचा तसा आचार नाहीं. पाद्य दिल्यानंतर शिल्लक राहिलेल्या गंधतिलयवांतील थोडथोडे सव्यापसव्यांनीं दोन्ही मंडलांवर अनुक्रमें टाकून आपले पाय धुवावेत आणि पहिलीं पवित्रकें टाकून दुसरीं घातल्यावर देव-मंडळाच्या उत्तरेकडे आपण व ब्राह्मण यांनीं दोनदां आचमन करून श्राद्ध करण्याच्या जागीं जावें. पाय धुण्याचें पाणी व आचमनाचें पाणी यांचा एकमेकांना स्पर्श होऊं देऊं नये. अपसव्यानें 'अमुकश्राद्धसिद्धिरस्तु' असें म्हणावें. ब्राह्मणांनीं उत्तर (प्रति-वचन) दिल्यावर त्यांचा अंगठ्याशिवाय उजवा हात धरून सव्यापसव्यांनीं अनुक्रमें

—'भूर्भुवःस्वः समाध्वम्'—असें म्हणून दर्भसहित पाटांवर ब्राह्मणांना तावडतोब बसवावेत. देवस्थानीं पूर्वाभिमुख व पितृस्थानीं दक्षिणाभिमुख असे ब्राह्मण बसवावेत. तसें करणें अशक्य असल्यास दक्षिणदिशा वर्ज्य करून इतर दिशांकडे तोंडें करून त्यांना बसवावें.

अथआसनानि ॥ हैमंराजतं ताम्रंवादुकूलंकम्बलंवादारुजंतृणमयंपर्णमयंवासनंप्रशस्तम्दारुजेषुश्रीपर्णीजम्बूकदम्बाम्रबकुलशमीश्लेष्मातकशालवृक्षजन्यान्यासनानिशस्तानि अयःशङ्कुमयंपीठंप्रदेयंनोपवेशने । अग्निदग्धान्यायसानिभग्नानिचविवर्जयेत् १ प्राक्संस्थादक्षिणासंस्थाभोक्तृपङ्क्तिस्तुपैतृके । तत्रदेवासनेप्रागग्रौद्वौदर्भौपित्र्येदक्षिणाग्रैकैकंदर्भंस्थापयेत् घृतैस्तिलादितैलैर्वास्थापयेच्चप्रतिद्विजम् । दीपंसव्यापसव्याभ्यांदीपमेकंतुसव्यतः १ ब्राह्मणाश्चेतःप्रभृत्याश्राद्धसमाप्तेर्मौनिनःपवित्रहस्ताउच्छिष्टोच्छिष्टस्पर्शंवर्जयन्तोवर्त्तेरन् । अत्रयथालक्षणअतिथिरागतश्चेत्सव्येनविप्रपङ्क्तौविष्णूद्देशेनपूजयेत् सव्येनापवित्रःपवित्रोवेतिमन्त्रंपठित्वावैष्णव्यैनमः काश्यप्यैनमः क्षमायै० इतिभूमिंनत्वा मेदिनीलोकमातात्वमित्यादिश्लोकैःस्तुत्वाच श्राद्धभूमिंगयांध्यात्वाध्यात्वादेवंगदाधरम् । प्राचीनावीति तद्विष्णोःपरमंपदं०तद्विप्रासो० गायत्रींचजपित्वा-सव्येनप्राणायामतिथ्यादिसंकीर्तनान्तेऽपसव्येनामुकपितृणामुपक्रान्तममुकश्राद्धंकरिष्येइतिसंकल्प्यात्रादौमध्येन्तेचदेवताभ्यःपितृभ्यश्च० अमूर्तानांच० चतुर्भिश्च० यस्यस्मृत्येतिचात्रिःपठेत् ॥

**आसनविधि**—सुवर्णाचें, रुप्याचें, तांब्याचें किंवा वस्त्रमय, किंवा कंबल किंवा काष्ठमय, तृणमय व पर्णमय यांपैकीं वाटेल तें आसन प्रशस्त होय. काष्ठाच्या आसनांत—शिवण, जांबूळ, कदंब, आंबा, वकुळ, शमी, भोकर, साळवृक्ष यांचीं आसनें म्हणजे पाट प्रशस्त होत. लोखंडाचे खिळे असलेले पाट व अग्नीनें दग्ध झालेलीं लोखंडाचीं व भग्न झालेलीं आसनें वर्ज्य होत. पितरांकडे प्राक्संस्था, दक्षिणसंस्था, ब्राह्मणांची पंक्ति बसवावी. त्यांत देवांच्या आसनीं पूर्वेकडे अग्रें होतील असे दोन दर्भ व पितरांच्या आसनीं दक्षिणेकडे अग्र होईल असे एकेक दर्भ आसनांवर ठेवावेत. प्रत्येक ब्राह्मणाजवळ तुपाचा किंवा तेलाचा एकेक दिवा सव्यानें व अपसव्यानें अनुक्रमें लावावा. एकच दिवा लावणें असल्यास सव्यानें लावावा. या वेळेपासून श्राद्धाची समाप्ति होईपर्यंत न बोलतां हातांत पवित्रकें घालून व उच्छिष्टोच्छिष्टाचा स्पर्श करून ब्राह्मणांनीं राहावें. या वेळीं लक्षणयुक्त असा जर अतिथि येईल, तर त्यास सव्यानें ब्राह्मणांच्या पंक्तीस बसवून, विष्णूच्या उद्देशानें त्याची पूजा करावी. सव्यानें—'अपवित्रःपवित्रोवा०'—हा मंत्र म्हणून,—वैष्णव्यैनमः काश्यप्यैनमः क्षमायैनमः' याप्रमाणें भूमीस नमस्कार करावा. 'मेदिनी लोकमातात्वं०'—इत्यादि श्लोकानें स्तुति करावी. नंतर श्राद्धभूमिं गयांध्यात्वा ध्यात्वा देवं गदाधरं०'—इत्यादि मंत्र म्हणून प्राचीनावीति करावी व 'तद्विष्णोः परमंपदं०' व तद्विप्रासो०' या मंत्राचा जप करून सव्यानें प्राणायाम व तिथ्यादिकांचा उच्चार

केल्यावर, अपसव्यानें 'अमुक पितॄणामुकपक्षांतममुकश्राद्धं करिष्ये' अशा संकल्पानें मध्यें व शेवटीं 'देवताभ्यः पितृभ्यश्च अमूर्तानां चतुर्भिश्च यस्य स्मृत्या' असें तीनदां म्हणावें.

अथदक्षिणेवामेवाकुक्षौतिलैःसहकुशत्रयंपरिहितवस्त्राञ्चलबद्धंकृत्वाकटिसंलग्नवस्त्रबहिर्भागेनसंवेष्टयरक्षणाख्योनीवीबन्धोनिहन्मिसर्वंयदमेध्यवद्भवेदितिश्लोकमन्त्रेणकार्यः सर्वतश्चापसव्येनापहतेत्यप्रदक्षिणम्। तिलान्क्षिप्त्वोदीरतेतिसव्येनप्रोक्षणंस्मृतम् ॥ १ ॥ तिलारक्षन्तुमन्त्रेणद्वारेकुशातिलान्क्षिपेत्। तरत्समन्दीसूक्तेनपावमानीभिरेवच ॥ २ ॥ अभिमन्त्र्यजलंतेनपाकादिप्रोक्षयेत्सुधीः। यद्वातद्विष्णोर्मन्त्रेणगायत्र्यावाभिमन्त्रितम् ॥ ३ ॥ यद्देवाइतिमन्त्राणांत्रयेणैवान्यशाखिनः। वाचयेत्पाकपूतत्वंपुष्पाद्यंसर्वमुक्षयेत् ॥ ४ ॥ नाप्रोक्षितंस्पृशेच्छ्राद्धकालेत्येतंजपेत्ततः। पदार्थयोग्यतांवाचयित्वादेवार्चनंचरेत् ॥ ५ ॥ तत्रप्रत्युपचारंदैवेपित्र्येचाद्यंतयोरपादेद्यात् देवद्विजसंनिधावुदङ्मुखउपविश्यतद्दक्षिणकरमुत्तानंवामकरेण धृत्वादक्षिणेनसयवंदर्भद्वयममुकेषांविश्वेषांदेवानां भूर्भुवःस्वरिदमासनंस्वाहेतिदक्षिणहस्तेजलमासिच्यदक्षिणभागेआसनेक्षिपेन्नहस्तेदर्भदानम् आसनेष्वासनंदद्यान्नतुपाणौकदाचन। पितृकर्मणिवामेचदैवेदद्यात्तुदक्षिणे ॥ १ ॥ विप्रोधर्मोसिविशिराजाप्रतिष्ठितइतिमन्त्रेणगृहीत्वास्वासनमितिवदेत् कर्तासनंस्पृशन्नपोदत्वास्यतामिति विप्रोधर्मोसीतिवदेत्अपोदत्वादैवेक्षणःक्रियतामितिनिरङ्गुष्ठंकरंगृह्णीयादोंतथेत्यादिप्राग्वत् इदंतृतीयनिमन्त्रणम् ॥

**आसनोत्तरविधि**—यावर दक्षिण किंवा वामकुक्षीस तिळासहित तीन कुश परिधान केलेल्या वस्त्राच्या शेवटास बांधून कटीस संलग्न असलेल्या वस्त्राच्या बाहेरच्या भागानें वेष्टन करून रक्षण नामक नीविबंध 'निहन्मिसर्वंयदमेध्यवद्भवेत्' या श्लोकमंत्रानें करावा. अपसव्यानें 'अपहता' या मंत्रानें अप्रदक्षिण कर्म करावें, व 'उदीरता' या मंत्रानें सर्वत्र तिल टाकून सव्यानें प्रोक्षण करावें. 'तिलारक्षन्तु' या मंत्रानें श्राद्धभूमीचे द्वारदेशीं कुशयुक्त तिळ टाकावे. 'तरत्समन्दी' या सूक्तानें व पावमानी या ऋचांनीं उदक अभिमंत्रण करून त्या उदकानें पाकादि पदार्थ प्रोक्षण करावे. अथवा 'तद्विष्णो०' या मंत्रानें किंवा गायत्री मंत्रानें किंवा 'यद्देवा' या मंत्रानें उदक अभिमंत्रित करावें. अन्यशाखीयांनीं तीन मंत्रांनींच अभिमंत्रण करावें. पाक पवित्र झाला आहे असें ब्राह्मणांकडून म्हणवून मग त्या अभिमंत्रित उदकानें पुष्पादिक पूजेचे सर्व उपचार प्रोक्षण करावेत. श्राद्धकाळीं प्रोक्षणरहित पदार्थांस स्पर्श करूं नये. प्रोक्षणाचें उल्लंघन झाल्यास त्या मंत्राचा जप करावा. पदार्थयोग्यता बोलविल्यावर देवांची पूजा करावी. प्रत्येक उपचार समर्पण करतांना देवांकडे व पितरांकडे उपचाराचे आद्यंतीं उदक द्यावें. देवस्थानीं असलेल्या ब्राह्मणाच्या सन्निध उत्तराभिमुख बसून त्या ब्राह्मणाचा उताणा उजवा हात डाव्या हातानें धरून उजव्या हातानें यवासहित दोन दर्भ 'अमुकेषां विश्वेषां देवानां भूर्भुवःस्वरिदमासनं स्वाहा' असें म्हणून हातावर उदक शिंपडून ते उजवीकडे आसनावर

द्यावेत, हातावर देऊं नयेत. आसनाचे ठायीं आसन द्यावें, हातावर कदापि देऊं नये. पितृकर्मांत डावीकडे व देवकर्मांत उजवीकडे आसन द्यावें. ब्राह्मणानें 'धर्मोसि विसिराजाप्रतिष्ठितः' या मंत्रानें ते दर्भ, घेऊन, 'स्वासनं' असें प्रतिवचन द्यावें, व त्यानें आसनास स्पर्श करून उदक देऊन 'आस्यतां' असें म्हटल्यावर ब्राह्मणानें 'धर्मोसि' असें म्हणावें. नंतर उदक देऊन 'दैवेक्षणः क्रियतां' असें म्हणून अंगुष्ठरहित हात धरावा. 'ओंतथा' इत्यादि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें जाणावें. हें तिसरें निमंत्रण होय.

अथार्घ्यकल्पना । तत्रपात्राणिहैमंरौप्यंताम्रमयंवादारुजंवापलाशादिपर्णमयंवाकांस्यंवाशङ्खशुक्तिजंवाखड्गपात्रंप्रशस्तम् अत्रविप्रैकत्वाद्वित्वचतुष्टयत्वादावपिदैवेर्घ्यपात्रद्वयमेव यत्तुदैवेद्वे अर्घ्यपात्रेपित्र्येत्रीण्युभयत्रैकैकंवेत्यकपात्रत्वपक्षान्तरंतदशक्तिपरम् एवंपात्रद्वयंप्रोक्षितायांभुविप्रागग्रकुशेषुन्युब्जमुत्तानंवासाद्यप्रोक्ष्यन्युब्जपक्षेउत्तानीकृत्यतयोर्द्विकुशेद्वेद्वेपवित्रेनिधायशंनोदेवीरितिमन्त्रावृत्त्याऽपआसिच्ययवोसीतिमन्त्रेणावृत्त्या यवानोप्यतूष्णींगन्धपुष्पाणिक्षिपेत् केचिद्गन्धद्वारांओषधीःप्रतिमोदध्वमित्यृग्भ्यांगन्धपुष्पाणिक्षिपन्ति देवार्घ्यपात्रेसंपन्नेइत्युक्त्वा सुसंपन्नेइतिप्रत्युक्तोवामकरंविप्रदक्षिणजानुनिन्यस्यामुकेविश्वान्देवान्भवत्स्वावाहयिष्येइतिपृष्ट्वावाहयेत्यनुज्ञातो विश्वेदेवासआगतेत्यृचाप्रतिविप्रंदक्षिणपादादियुग्मक्रमेणजान्वंसमूर्धान्तंयवान्विकिरेत् विश्वेदेवाःशृणुतेत्यृचोपस्थायभूमौशिष्टान्यवान्विकिरेत् हिरण्यकेशियादयस्त्वर्घ्यदानगन्धादिपूजोत्तरमग्नौकरणकालेयेदेवासइत्यायातपितरइतिमन्त्राभ्यामग्निदक्षिणतोदेवपित्रावाहनंकुर्वन्ति कातीयैस्त्वर्घ्यपात्रासादनात्प्रागेवदेवपित्रावाहनंकार्यम् तथैवकात्यायनसूत्रात् ततोर्घ्यपात्रसंपत्तिंवाचयित्वाद्विजोत्तमान् । तदग्रेचार्घ्यपात्रेतुस्वाहार्घ्यमितिविन्यसेत् १ अपोदत्त्वाविप्रहस्तेदद्यादर्घ्यपवित्रके । यादिव्याइतिमन्त्रेणहस्तेष्वर्घ्यावनिक्षिपेत् २ विश्वेदेवाइदंवोर्घ्यस्वाहानमइतीरयन् । प्रतिविप्रंयादिव्येत्यावृत्तिःकेचित्तुयादिव्याइत्यनेन दत्तार्घ्यानुमंत्रणमाहुः मयूखेकातीयप्रयोगेविप्रहस्तेर्घ्यपवित्रदानान्तेआवाहनवदङ्गेष्वर्चनंकृत्वार्घ्यदानमित्युक्तम् एकविप्रत्वेएकस्यैवहस्तेद्विरर्घ्यदानम् विप्रचतुष्टयपक्षेएकैकंपात्रंविभज्यद्वयोर्द्वयोर्देयम् कूर्चस्तुतत्तत्पात्रस्थएव ॥

अर्घ्यदानविधि—पात्रांमध्यें सुवर्णाचें, रुप्याचें, तांब्याचें, काष्ठाचें, पळसाच्या पानांचा द्रोण किंवा कांस्यपात्र, शंख, शुक्ति, (शिंप) किंवा गेंड्याच्या शिंगाचें पात्र हीं अर्घ्यपात्रें प्रशस्त होत. एक अथवा दोन किंवा चार ब्राह्मण असले तर देवाकडे अर्घ्यपात्रें दोनच मांडावीत. दैवकर्माकडे दोन अर्घ्यपात्रें पित्र्यकर्माकडे तीन अथवा दोहोंकडे एकेक पात्र असावें. एक पात्रत्वाचा पक्ष गरीबीचा आहे, प्रोक्षण केलेल्या भूमीवर पूर्वेस अग्रें होतील असे दर्भ घालून त्यांवर उपडीं अथवा उताणीं दोन पात्रें ठेवून प्रोक्षण करावें. उपडीं असल्यास उताणीं करून त्या दोन पात्रांवर दोन दोन दर्भांचें एक याप्रमाणें २–२ पवित्रें ठेवून 'शन्नोदेवी०' या मंत्रावृत्तीनें त्या पात्रांत उदक घालावें, व यवोसि०' या मंत्रावृत्तीनें

यव घालून मंत्ररहित गंधपुष्पें टाकावींत. कोणी 'गंधद्वारा०' व 'ओषधी: प्रतिमोदध्वं०' या दोन ऋचांनीं गंधपुष्पें घालतात. नंतर 'देवार्घ्यपात्रे संपन्ने' असें म्हणून 'सुसंपन्ने' असें ब्राह्मणांनीं म्हटल्यावर कर्त्यानें आपला डावा हात ब्राह्मणाच्या उजव्या गुडघ्यावर ठेवावा व 'अमुक विश्वान्देवान्भवास्वावाहइष्ये' असा प्रश्न करून 'आवाहय' अशी ब्राह्मणांनीं आज्ञा दिल्यावर, 'विश्वेदेवासआगत०' या ऋचेनें प्रत्येक ब्राह्मणाचे उजवे पायापासून आरंभ करून युग्मक्रमानें जोडीनें जानु, (गुडघे) अंस (खांदे) व मस्तक यांवर यव टाकावेत; नंतर 'विश्वेदेवाः शृणुत' या ऋचेनें उपस्थान करून शेष राहिलेले यव भूमीवर टाकावे. हिरण्यकेशी तर अर्घ्यदान गंधादि पूजा केल्यावर अग्नौकरणकालीं 'येदेवास०' व 'आयातपितर०' या दोन मंत्रांनीं अग्नीचे दक्षिण प्रदेशीं देव व पितर यांचे आवाहन करितात. कातियांनीं अर्घ्यपात्रें स्थापन करण्यापूर्वींच देवपितरांचें आवाहन करावें. कारण, कात्यायनसूत्र तसेंच आहे. यावर ब्राह्मणांकडून अर्घ्यपात्रसंपत्ति वदवून 'स्वाहा अर्घ्यः' असें म्हणून ब्राह्मणाच्या पुढें अर्घ्यपात्रें मांडावीत. यावर ब्राह्मणाच्या हातावर उदक देऊन अर्घ्यपात्रांतील पवित्रकें हातावर द्यावींत. व 'यादिव्या०' या मंत्रानें हातावर अर्घ्य देऊन, 'विश्वेदेवा इदंवोर्घ्योस्वाहानमः' असें म्हणावें. प्रत्येक ब्राह्मणास अर्घ्य देतांना 'यादिव्या०' हा मंत्र म्हणावा 'यादिव्या०' या मंत्रानें दिलेल्या अर्घ्याचें अनुमंत्रण (अनुकूल भाषण) करावें असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. मयूखांत व कातीय प्रयोगांत ब्राह्मणाच्या हातावर अर्घ्यावरचीं पवित्रकें दिल्यावर आवाहनासारखें अंगाचे ठायीं अर्चन करून, अर्घ्यदान करावें असें सांगितलें आहे, एकच ब्राह्मण असेल तर एकाच्या हातावर दोन वेळ अर्घ्य द्यावें. चार ब्राह्मण असल्यास एकेक पात्र वांटून दोन दोन ब्राह्मणांस द्यावें. कूर्च (दर्भांचा कुंचला) तर त्या त्या पात्रावरचाच ग्रहण करावा.

क्वचित्क्षीरदधिघृततिलतण्डुलसर्षपकुशाग्रपुष्पेतिद्रव्याष्टकमर्घ्यपात्रेप्रक्षिप्य मित्युक्तम् आद्यन्तयोरपोयच्छन्गन्धाद्यैरर्चनंचरेत् । अमुकविश्वेदेवाअयंवोगन्धःस्वाहानमइतिवरेणैवाविप्रहस्तेष्वेवाद्भिर्द्दिदानम् एवंसर्वत्रदैवेस्वाहानमइत्यन्तमुच्चार्योपचारदानम् चन्दनागरुकर्पूरकुंकुमानिप्रदापयेत्। गन्धद्वारेतिवैगन्धमायनेतेचपुष्पकम् ॥ १ ॥ धूरसीत्यमुनाधूपमुद्दीप्यस्वेतिदीपकम् सुवंवस्त्राभिमन्त्रेणवस्त्रंदद्यात्प्रयत्नतः ॥ २ ॥ आसनेस्वासनंब्रूयादर्घ्येऽस्त्वर्घ्यंद्विजोत्तमः । सुगंधश्चसुपुष्पाणिसुमाल्यानिसुधूपकः सुज्योतिश्चैवदीपश्चस्वाच्छादनामितिक्रमः । कर्तास्कंधधृतोत्तरीयोविगतपवित्रकरोविप्रहस्तदत्तगन्धैर्विप्रभालाद्यङ्गेषुलिम्पेत् विप्रभालेवर्तुलपुण्ड्रंत्रिपुण्ड्रंवानकुर्यात् अत्रविप्राणांकस्तूरीविकल्पिता । आयनेतेइतिवौषधीःप्रतिमोदध्वमितिवागन्धदानवद्धस्तेष्वेवेदंवः पुष्पमितिपुष्पदानंकार्यम् ॥

**धूपदीपादिदानविधि**—कित्येक ग्रंथांत दूध, दहीं, घृत, तीळ, तांदूळ, शिरस, कुशाग्रें व पुष्पें अशीं आठ द्रव्यें, अर्घ्यपात्रांत टाकावीं असें म्हटलें आहे. प्रत्येक उपचाराच्या आद्यंतीं उदक देऊन गंधादि उपचारांनीं

पूजा करावी. 'अमुक विश्वेदेवा अयं वो गंधः स्वाहानमः' या वाक्यानें हातानें ब्राह्मणाच्या हातावर दोन दोन वेळ गंध द्यावें. 'स्वाहानमः' येथपर्यंत उच्चार करून, देवांना उपचार द्यावेत. चंदन, अगरु, कापूर व केशर हे पदार्थ अर्पण करावेत. 'गंधद्वारां०' या मंत्रानें गंध, 'आयनेते०' या मंत्रानें पुष्प, 'धूरसि०' या मंत्रानें धूप, 'उद्दीपस्य०' या मंत्रानें दीप, व 'युवं वस्त्राणि०' या मंत्रानें वस्त्र द्यावें. आसनाविषयीं ब्राह्मणांनीं 'स्वासनं' असें व अर्घ्याविषयीं 'अस्त्वर्घ्यं' असें म्हणावें. गंधादिकांविषयीं 'सुगंधः सुपुष्पाणि, सुमाल्यानि, सुधूपकः सुज्योतिः' अथवा 'सुदीपः' व 'स्वाच्छादनं' असें क्रमानें म्हणावें. कर्त्यानें खांद्यावर उत्तरीय वस्त्र धारण करून हातांतील पवित्रक काढावें. व ब्राह्मणाच्या हातावर दिलेल्या गंधानें ब्राह्मणाचें कपाळ व अंग यांना उटी लावावी, ब्राह्मणाच्या कपाळीं वाटोळा पुंड्र किंवा त्रिपुंड्र करूं नये. गंधलेपन करितांना ब्राह्मणांस कस्तुरी विकल्पित आहे. 'आयनेते०' या मंत्रानें अथवा 'ओषधीः प्रतिमोदध्वं०' या मंत्रानें गंधदानासारखें हातावरच, 'इदं वः पुष्पं' असें म्हणून पुष्पदान करावें.

तत्रविहितपुष्पाणि । आगस्त्यंभृङ्गराजंचतुलसींकमलंतथा । चम्पकंतिलपुष्पंचदूर्वाश्चपितृवल्लभाः ॥ १ ॥ विहिताप्रतिषिद्धाचतुलसीपिण्डपूजने । सुकुमारैः किसलयैर्यवदूर्वाङ्कुरैरपि २ जलोद्भवैश्चकुसुमैर्मल्लिकाचूतपुष्पकैः । अतिमुक्तैश्चतगरैःसंपूज्याःपितरःसदा ३ जातीपुष्पैर्विप्रपूजांकुर्यात्पिण्डार्चनंतुन॥

**श्राद्धपुष्पें**—अगस्त्य, ( हदगा ), भृंगराज ( माका ), तुलसी, कमल, चंपक, तिलपुष्प व दूर्वा हीं पितरांना आवडणारीं होत. पिंडाच्या पूजेला तुलसीही विहित व प्रतिषिद्ध आहेत. कोंवळे पल्लव, यव, दूर्वांकुर, जलोत्पन्न पुष्पें, मोगरी, आंब्याचा मोहोर, मधुमाधवीचें पुष्प व तगरपुष्पें यांनीं पितरांची पूजा सदोदित करावी. जाईच्या पुष्पांनीं ब्राह्मणाची पूजा करावी, पिंडांची पूजा करूं नये.

अथवर्ज्यपुष्पाणि । करवीरंचधत्तूरंबिल्वपत्रंचकेतकीम् । बकुलंकुन्दपुष्पंच किंशुकंचकुरण्टिकाम् १ सर्वाणिरक्तपुष्पाणिवर्जयेच्छ्राद्धकर्मणि । जलोद्भवानिदेयानिरक्तान्यपिविशेषतः २ ॥

**श्राद्धवर्ज्यपुष्पें**—कण्हेर, धोत्रा, बिल्वपत्र, केतकी, बकुल, कुंदपुष्प, पलाशपुष्प कोरांटी व सर्वप्रकारचीं तांबडीं फुलें श्राद्धकर्मास वर्ज्य होत. पाण्यांत उत्पन्न झालेलीं आरक्त पुष्पें विशेषेंकरून अर्पण करावींत.

अथधूपः । धूपस्तुगुग्गुलुर्देयस्तथाचन्दनसारजः । अगरुश्चसकर्पूरोघृतमध्वादिसंयुतः १ येतुप्राण्यङ्गजाधूपाहस्तवाताहताश्चये । नतेश्राद्धेनियोक्तव्यायेचकेचोग्रगन्धयः २ घृतंनकेवलंदद्याद्दुष्टंवातृणगुग्गुलम् । पाददेशेऽयंवोधूपइतिदानम् ॥

**धूपदान**—गुग्गुळधूप, चंदनाचे नारापासून ( गाभा ) झालेला, घृतमध इत्यादिकांनीं युक्त व कापुरासहित अगरु समर्पण करावा. प्राण्यांच्या अंगापासून उत्पन्न झालेले व हातानें वारा घालून प्रदीप्त केलेले, उग्रगंधी धूप श्राद्धांत

अर्पण करूं नयेत. निषिद्ध घृत किंवा तृण गुग्गुलानें दुष्ट झालेलें घृत देऊं नये. ब्राह्मणांच्या पायाजवळ 'अयंवोदीपः अयंवोधूपः' असें म्हणून धूप द्यावा.

**अथदीपः घृतेनदीपोदातव्यस्तिलतैलेनवापुनः । वसामेदादिदीपोवर्ज्यः । इदंवोज्योतिरितिवा यंवोदीपप्रकाशइतिवामुखसमीपेदीपः ॥**

**दीपदान**—तूप किंवा तिळेल यांचें दीपदान करावें. चरबी ( वसा ) मांसजन्य स्नेह ( मांसतैल ) मेदोधातु ( गुग्गुळादिकांचें तेल ) यांचा दिवा (श्राद्धांत) वर्ज्य समजावा. 'इदं वो ज्योतिः' अथवा ' अयं वो दीपप्रकाशः ' असें म्हणून ब्राह्मणाच्या तोंडापुढें दिवा ठेवावा.

**कौशेयंकार्पासंवावस्त्रंविहितम् कृष्णंमलिनमुपभुक्तंछिद्रितंनिर्दशरजकधौतंचनिषिद्धम् यज्ञोपवीतंदातव्यंवस्त्राभावेविजानता । निष्क्रयोवायथाशक्तिवस्त्रालाभेप्रदीयते १ पितॄन्सत्कृत्यवासोभिर्दद्याद्यज्ञोपवीतकम् । यज्ञोपवीतदानेनविनाश्राद्धंतुनिष्फलम् २ यज्ञोपवीतंयतिस्त्रीशूद्रश्राद्धेष्वपिज्ञेयम् ॥**

**श्राद्धदानवस्त्र**—रेशमाचें किंवा कापसाचें वस्त्र विहित होय. काळें, मलिन, नेसलेलें, छिद्रें पडलेलें, दशाविरहित व रक्तानें भिजलेलें, हीं वस्त्रें निषिद्ध होत. वस्त्र नसेल तर ज्ञात्यांनीं यज्ञोपवीत द्यावें, किंवा यथाशक्ति वस्त्राचें मूल्य द्यावें. वस्त्रांनीं पितरांचा सत्कार करून त्यास यज्ञोपवीत अर्पण करावें. यज्ञोपवीतदानाशिवाय केलेलें श्राद्ध निष्फळ होतें. संन्यासी, स्त्रिया व शूद्र ह्यांच्या श्राद्धांतही यज्ञोपवीत द्यावें.

**अथान्यान्यपिदेयानि । धातुमयानिधूपदीपपात्राणि कमण्डलुंताम्रमयंकाष्ठजंवापिमृन्मयम् । नारिकेलमयंवापिश्राद्धेदद्यात्प्रयत्नतः १ छत्रोपानदासनशयनदर्पणचामरव्यजनपादुकाकेशप्रसाधनीपटवासादिसुगन्धचूर्णाङ्गारधानिकायष्टिकम्बलाञ्जनशलाकाश्चदेयाः अलंकाराश्चदातव्यायथाशक्तिहिरण्मयाः केयूरहारकटकमुद्रिकाकुण्डलादयः १ स्त्रीभ्योयोषिदलंकारादेयाःश्राद्धेषुयोषिताम् । मञ्जीरमेखलादामकर्णिकाकङ्कणादयः २ सौवर्णराजतंकांस्यंदद्याद्भोजनभाजनम् । कर्पूरादेश्चभाण्डानिताम्बूलायतनंतथा ३ स्वयमन्येनवाबन्दीकृतानांकेनाप्युपायेनमोचनेपितॄणांब्रह्मपदम् ॥**

**अन्यदानवस्तु**—धातुमय धूपदीपपात्रें द्यावीत. श्राद्धांत प्रयत्नांनीं तांब्याचा, काष्ठाचा, मृत्तिकेचा किंवा नारळाचा कमंडलु द्यावा. छत्री, जोडा, आसन, मंचक, बिछाना, आरसा, चवरी, पंखा, पादुका, फणी; बुका, इत्यादि सुगंध चूर्ण; शेगडी, काठी, कांबळें, काजळ व सळई हे पदार्थ द्यावेत. केयूर, हार, कडीं, तोडे, आंगठ्या, कुंडलें, इत्यादिक यथाशक्ति सुवर्णाचे अलंकारही द्यावे. स्त्रियांचे श्राद्धांत मंजीर ( नूपुर ), कमरपट्टा, दाव, कर्णभूषणें, कंकणें, इत्यादिक स्त्रियांचे अलंकार स्त्रियांस द्यावेत. सुवर्णाचीं, रुप्याचीं व काशाचीं भोजनपात्रें. कर्पूराचीं भांडीं व तांबूलपात्रेंही द्यावींत. स्वतः किंवा दुसऱ्यानें बंदिवान्

केलेल्या पुरुषांस कोणत्याही उपायानें ( श्राद्धदिनीं ) बंधमुक्त केलें असतां पितरांस ब्रह्मपद प्राप्त होतें.

इत्थंचोक्तवचनादाच्छादनदानान्तेपृथग्यज्ञोपवीतंदत्वाशक्तिसत्वेछत्रालंकारादिकंदत्वातत्कालेस्पर्शायोग्यानांसंकल्पंकृत्वापूजनंपूर्णमस्तुसंकल्पसिद्धिरस्त्वित्युक्त्वाप्रत्युक्तो मन्त्रहीनंक्रियाहीनंसंपद्धीनंद्विजोत्तमाः । श्राद्धंसंपूर्णतांयातुप्रसादाद्भवतांमम ॥ १ ॥ यस्यस्मृत्या० देवताभ्य० इतिजपेत् एवमासनादिसर्वपूजाकाण्डंदैवंसमाप्यपैतृकमासनप्रभृतिपूजाकाण्डमारभेदितिकाण्डानुसमयक्रमएवमाधवसंमतः ॥

**यज्ञोपवीतदान**—देण्यासंबंधीं वचन असल्यानें तें यज्ञोपवीत देऊन शक्ति असल्यास छत्रालंकारादिक द्यावे. तत्कालीं स्पर्श करण्यास जे अयोग्य असतील त्यांचा संकल्प करून ‘ पूजनं पूर्णमस्तु ’ व ‘ संकल्पसिद्धिरस्तु ’ असें म्हणून, प्रतिवचन दिल्यावर ‘ मंत्रहीनं क्रियाहीनं० यस्यस्मृत्या० देवताभ्यः’ असा जप करावा. याप्रमाणें आसनादिक सर्व पूजाकांड देवासंबंधीं समाप्त करून पितृसंबंधीं आसनादिक पूजाकांडास आरंभ करावा. हाच कांडानुसमयक्रम माधवास संमत आहे.

कातीयास्त्वासनक्षणावाहनार्घ्यपर्यन्तं पाद्यान्तप्रयोगवत्पदार्थानुसमयक्रमेणैवदैवेपित्र्येचकृत्वागन्धादिपूजामेवकाण्डानुसमयैंकुर्वन्तिएकंपदार्थंदैवपित्र्यादिषु सर्वत्रानुष्ठायतेनैवक्रमेणद्वितीयादिपदार्थाअनुष्ठेयाइत्ययंपदार्थानुसमयः एकत्रैवसर्वपदार्थान्समाप्यान्यत्रसर्वपदार्थानुष्ठानमितिकाण्डानुसमयः ॥

**कात्यायनश्राद्धदानप्रयोग**—कात्यायनशाखेचे लोक—आसन, क्षण, आवाहन, पाद्य व अर्घ्य येथपर्यंतचा प्रयोग पदार्थानुसमयक्रमानेंच देव व पितर यांच्या संबंधाचा करून गन्धपूजादिक काण्डानुसमयानें करतात. एकच पदार्थ देव आणि पितर यांना अर्पण करून, तसेंच दुसऱ्या व इतर पदार्थांचेंही अर्पण करण्यास पदार्थानुसमय; व एकीकडेच सर्व पदार्थ अर्पण करण्याला काण्डानुसमय असें अनुक्रमें म्हणतात.

अथान्यपवित्रेधृत्वापित्रर्चनंसंकल्प्यासनाद्याच्छादनान्तपूजावैश्वदेवोक्तरीत्यैवपितृधर्मेणकार्या विशेषस्तूच्यते द्विगुणभुग्नंकुशत्रयंविप्रवामेक्षिपेत् पार्वणस्थानेविप्रत्रयपक्षेपितुयथानामगोत्रस्येदमासनमित्यादिपृथगुच्चारः एकविप्रत्वेपितृपितामहप्रपितामहानामिदमासनमित्युच्चारः एवमग्रिमोपचारेष्वप्यूह्यम् शेषंप्राग्वत् ततस्तृतीयनिमन्त्रणमपिप्राग्वद्धस्तधारणपूर्वकंकार्यम् ॥

**कात्यायनांचा दानप्रयोगापुढचा प्रयोग**—दुसरीं पवित्रकें घालून पितरांच्या पूजेचा संकल्प केल्यावर—वैश्वदेवोक्त रीतीनें म्हणजे देवासंबंधानें जी रीति सांगितली तीप्रमाणें—आसनापासून आच्छादनापर्यंतची पूजा पितृधर्मानें ( अपसव्य व तिलोदक ) जी करावी, त्यांतला विशेष येणेंप्रमाणें:—मध्यें मोडून दुहेरी केलेले तीन दर्भ ब्राह्मणाच्या डाव्या भागीं टाकावेत.

श्राद्धाला जर तीन ब्राह्मण असतील तर 'पितुरयथानामगोत्रस्येदमासनम्' असा प्रत्येक वेळीं निराळा उच्चार करावा. एकच ब्राह्मण असल्यास 'पितृपितामहप्रपितामहानामिदमासनम्' असें म्हणावें. पुढच्या उपचारांतही असाच फरक समजावा. बाकीचें कर्म मागें सांगितल्याप्रमाणेंच करावें व नंतर तिसरें निमंत्रणसुद्धां पूर्वी सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणाचा हात धरून करावें.

अथार्घ्यासादनम् द्विजाग्रेदक्षिणाग्रांस्त्रीन्दर्भान्प्रास्तीर्यतेष्वाग्नेयीसंस्थानि-
प्रतिपार्वणंपात्राणित्रीणित्रीण्येवासाद्यपितृदात्रपश्चिमेमातामहादिपार्वणस्य प्र-
तिपार्वणमेकविप्रत्वेनवविप्रत्वादिपक्षेपित्रीण्येवपात्राणि एकविप्रत्वेतद्धस्तेएवा-
र्घ्यत्रयम् नवविप्रत्वादिपक्षेएकैकं पात्रंविभज्यत्रिषुदेयम् प्रतिपात्रोपरिदक्षिणा-
ग्राद्विगुणाःसाग्रानिरग्रावात्रयस्त्रयःकुशाः पितृतीर्थेन पात्रेषुजलमापूर्यशंनोदेवी-
रितिससर्वपात्रेषुसकृदनुमन्त्रणमाश्वलायनानाम् तच्छिन्नैःकातीयादिभिःशन्नोदे-
वीरितिमन्त्रेणप्रतिपात्रं मन्त्रावृत्त्याजलमापूर्य हिरण्यकेशीयास्तुशन्नोदेवीरि-
तिमन्त्रंनेच्छन्तिसर्वमतेतिलोसीतिमन्त्रावृत्त्याप्रतिपात्रंतिलावापः अत्रापितृशब्द-
स्यानूहइत्युक्तम् गन्धादिप्रक्षेपःप्राग्वत् ततःपित्रर्घ्यपात्रंसंपन्नमित्यादियथा-
लिङ्गंसंपन्नंवाचयित्वापोदत्वादक्षिणामुखस्तिष्ठन् सव्यंकरंकुशतिलयुतंविप्रवा-
मजानुनिन्यस्यपितृपितामहादीन्द्वितीयान्तानुच्चार्यभवत्सुआवाहयिष्यइतिपङ्क्ति
मूर्धन्यमेकंविप्रंपृच्छेत् सर्वत्रपङ्क्ति मूर्धन्यंप्रत्येवप्रश्नः आवाहयेत्यनुज्ञातउशं-
तस्त्वेतिमन्त्रावृत्त्याअमुकममुकनामगोत्ररूपमावाहयामीतिप्रतिविप्रंमूर्धादिपादा-
न्तमंसादियुग्माङ्गेषुतिलविकिरणेनावाह्यसर्वविप्रावाहनान्तेआयंतुनःपितरइ-
तिसकृदुपतिष्ठेत् अत्रकातीयैर्नमोवःपितरइत्यादिइहसंतःस्यामेत्यन्तेनार्चनमु-
क्तम् आवाहनेसव्यापसव्ययोर्विकल्पः हस्तावशिष्टतिलान्विप्राग्रेभूमौविकीर्य-
पित्रर्घ्यपात्रसंपत्तिरस्त्वित्युक्त्वाप्रत्युक्तःसव्यंकृत्वाऽधःस्थदर्भैःसहार्घ्यपात्रमे-
कैकंपाणिभ्यामुद्धृत्यविप्राग्रेस्वधार्घ्याइतिमन्त्रावृत्त्यास्थापयेत् एकविप्रत्वेएका-
ग्रेएवपात्रत्रयं मन्त्रावृत्त्या नवविप्रत्वेपितृविप्रत्रयमुख्याग्रेपात्रन्यासोमन्त्रेण
एवंपितामहादिषुमुख्याग्रेएव एवंचत्रिरेवस्वधार्घ्याइतिमन्त्रोच्चारःप्रतिपार्वणे ॥

**अर्घ्यपात्रस्थापन**—ब्राह्मणाच्या पुढें दक्षिणेस शेंडे होतील असे तीन तीन दर्भ अंथरून, त्यांवर आग्नेयीकडे प्रत्येक पार्वणास तीन तीन पात्रें मांडावीत. पितृपात्राच्या पश्चिमेकडे मातामहादि पार्वणांचीं–एक किंवा नऊ ब्राह्मण असले तरी–तीनच पात्रें मांडावीत. एकच ब्राह्मण असल्यास त्याच्या हातावर तीन अर्घ्यें द्यावीं. नऊ ब्राह्मण असल्यास एकेक अर्घ्यपात्र तीन तीन ब्राह्मणांना वांटून द्यावें. प्रत्येक पात्रावर दक्षिणेकडे अग्रें करून किंवा मोडलेले दोन दोन दर्भ ठेवावेत. त्या पात्रांत तिलोदक घालून 'शं नो देवी०' या मंत्रानें त्यांचें अभिमंत्रण आश्वलायनांनीं करावें व कात्यायनांनीं 'शं नो देवी०' या मंत्रानें प्रत्येक पात्रांत पाणी घालावें. हिरण्यकेशी या मंत्राचा उपयोग करीत नाहींत. सर्वांच्या मतानें 'तिलोसि०' या मंत्रानें पात्रांत तिळ घालावेत असें आहे. येथें

'पितृ' या शब्दांत फरक न करण्यास सांगितलें आहे. गंधादिक द्रव्यें पूर्वींप्रमाणेंच (पात्रांत) टाकावींत. नंतर 'पित्रर्घ्यपात्रं सम्पन्नम्' असें लिंगभेदाला अनुसरून संपत्ति वदवावी व उदक देऊन दक्षिणाभिमुख व्हावें. डाव्या हातांत दर्भ व तिल घेऊन तो ब्राह्मणाच्या डाव्या गुडघ्यावर ठेवावा आणि पितृपितामहांचा उच्चार करून 'भवासु आवाहयिष्ये'—असें म्हटल्यावर पंक्तीच्या आरंभाला बसलेल्या ब्राह्मणाला हा प्रश्न करावा. पंक्तीच्या पहिल्याच ब्राह्मणाला सर्व ठिकाणीं प्रश्न करावा व त्याच्याकडून—'आवाहय'—अशी अनुज्ञा मिळाल्यावर 'उशंतस्त्वा०' या मंत्रावृत्तीनें—'अमुकममुकनामगोत्रारूपमावाहयामि' असें म्हणून प्रत्येक ब्राह्मणाच्या मस्तकापासून खांद्यांसह (अंस) जोड अंगांवर तिल टाकण्याचें आवाहन करावें. सर्व ब्राह्मणांचें असें आवाहन केल्यावर 'आयन्तु नः पितरः०' या मंत्रानें एक वेळ प्रार्थना करावी. कात्यायनशाखेच्यांनीं 'नमो वः पितरः' पासून 'इह सन्तस्याम' येथपर्यंत मंत्रार्चन करण्यास या जागीं सांगितलें आहे. आवाहनाच्या प्रसंगीं सव्यापसव्याचा विकल्प आहे. आवाहन करून हातांत उरलेले तिल ब्राह्मणांच्या पुढें जमिनीवर टाकावेत व 'पित्रदर्भपात्रसंपत्तिरस्तु' असें म्हणून (ब्राह्मणांकडून) उत्तर मिळाल्यावर सव्यानें उदक द्यावें आणि भूमीवर पसरलेल्या दर्भांसह एकेक अर्घ्यपात्र दोन्ही हातांनीं उचलून ब्राह्मणांच्या पुढें 'स्वधार्घ्याः' या मंत्रावृत्तीनें ठेवावें. एकच ब्राह्मण असल्यास तिन्ही पात्रें, तीनदां हाच मंत्र म्हणून, त्याच्यापुढें ठेवावींत. नऊ ब्राह्मण असल्यास पितृस्थानच्या तीन ब्राह्मणांतल्या मुख्याच्या पुढें, मंत्र म्हणून तिन्ही पात्रें ठेवावींत. याप्रमाणें पितामहादिकासाठींही मुख्याच्याच पुढें (तिन्ही) पात्रें मांडावींत. प्रत्येक पार्वणाच्या वेळीं 'स्वधार्घ्याः' असा तीन वेळां उच्चार करावा.

अथर्ववेदिनां। प्रपितामहादिपित्रन्तंप्रातिलोम्येनसर्वःप्रयोगः ततःसन्त्वर्घ्या-इतिप्रत्युक्तोऽपोदत्वापात्रस्थंपवित्रंविप्रहस्तेषुदत्वाप्रथमपात्रोदकंसशेषंखड्गपात्रे-पात्रान्तरेवा गृहीत्वापित्ररितंतेअर्घ्यंपितामहेदंतेअर्घ्यमित्यादियथालिङ्गंप्रत्येक-मर्घ्यंदेयम् पित्रादित्रयाणामेकविप्रत्वेत्रिभिःपात्रैरेकस्यैवहस्तेर्घ्यंदेयम् षण्णा-मेकविप्रत्वे षट्पात्राण्येकहस्ते पितुःस्थानेविप्रयादिपक्षेएकार्घ्यंविभज्यतेषुदे-यम् अर्घ्यान्तेजलदानंपितारदंतेअर्घ्यमित्यर्घ्यमन्त्रश्चप्रतिविप्रमावर्तते एवं-पितामहादिविप्रेष्वपि एवमर्घ्यंदत्वाविप्रहस्तात्स्रवन्तीरपोयादिव्याइतिमन्त्रेण-प्रतिविप्रमनुमन्त्रयेदितिबह्वृचः अन्यशाखिनांतुयादिव्याइतिमन्त्रेणार्घ्यदानम् अर्घ्यदानान्तेप्रतिविप्रमपोदानम् तथाचैकविप्रत्वेनुमन्त्रणमपोदानंचान्तेसकृ-देव विप्रभेदेत्वावर्तते अर्घ्यदानेनामगोत्राद्युच्चारोनक्रियते श्राद्धसागरकारै-स्तुकार्यइतियुक्तंभातीत्युक्तम् ॥

**अथर्ववेद्यांचा प्रयोग**—अथर्वणवेद्यांचा सारा प्रयोग प्रपितामहापासून पित्यापर्यंत प्रतिलोमाचा (उलटा) आहे. ब्राह्मणांकडून सन्त्वर्घ्याः' असें उत्तर मिळाल्यावर, पात्रांतलें पवित्रक ब्राह्मणाच्या हातावर

देऊन पहिल्या भांड्यांतलें पाणी खड्गपात्रांत ( लोखंडी भांड्यांत ) किंवा दुसऱ्या भांड्यांत घेऊन 'पितरिदन्ते अर्घ्यं पितामहेदन्ते अर्घ्यं' अशा लिंगानुरूप उच्चारानें प्रत्येक अर्घ्य द्यावें. पितृत्रयीच्या जागीं एकच ब्राह्मण असल्यास सहा पात्रें त्या एकाच्याच हातावर द्यावीत. तीन ब्राह्मण जर पितृस्थानीं असतील तर एक अर्घ्य वांटून तीन ब्राह्मणास द्यावें. अर्घ्य दिल्यावर उदक देणें व 'पितरिदन्ते अर्घ्यं' हा अर्घ्यमंत्र म्हणणें हें प्रत्येक ब्राह्मणापाशीं करावें. पितामहादिकांच्या जागीं बसलेल्या ब्राह्मणांबद्दलही असेंच करावें. उदक दिल्यावर 'या दिव्या०' या मंत्रानें, ब्राह्मणांच्या हातांवरून पाघळणारें पाणी प्रत्येक ब्राह्मणाला अनुमंत्रण ( सांगणें ) करावें असा क्रम ऋग्वेद्यांचा समजावा. इतर शाखेच्यांनीं 'या दिव्या०' या मंत्रानें अर्घ्यदान करावें आणि नंतर प्रत्येक ब्राह्मणाला उदक द्यावें. ब्राह्मण एकच असल्यास अनुमंत्रण करणें व उदक देणें हें एकच वेळ करावें व अनेक ब्राह्मण असल्यास प्रत्येकाला हें निरनिराळें करावें. अर्घ्यदान करतांना-नाम, गोत्र वगैरेंचा उच्चार करूं नये. श्राद्धसागरांत नामगोत्रादिकांचा उच्चार करणें योग्य वाटतें असें म्हटलें आहे.

**अथशेषजलयुतप्रथमार्घ्यपात्रेपात्रद्वयस्थशेषोदकमेकीकृत्यतेनजलेनमुखोअनंकार्यम् । आयुःकामेननेत्रसेचनंकार्यम् संस्रवान्समवनीयेत्याद्याश्वलायनसूत्रात् केचिद्विप्रहस्तगलिताम्बुसंस्रावस्तस्यैकीकरणमाहुः दर्शादौमातामहपात्रोदकेतत्पात्रद्वयोदकंसमवनीय मातामहपात्रोदकंपितृपात्रस्थसंस्रावेसंनयेत् मातृपार्वणभेदेमातामहपात्रसमवनीतोदकंमातृपात्रस्थसमवनीतोदकेतदुदकंपितृपात्रस्थैकीकृतोदकइति तत्संस्रावपात्रंदैविकविप्रादुत्तरतोरत्निमात्रेप्रोक्षितेदर्भेषुन्युब्जंसकूर्चंपितृभ्यःस्थानमसीत्यासादयेत् यद्वाप्रथमपात्रमुत्तानंसंस्रावोदकसहितंमन्त्रेणासाद्यतृतीयपात्रेणसकूर्चपवित्रंतदाच्छादयेत् पक्षद्वयेपिगन्धादिनाभ्यर्च्यासमाप्तेर्नचालयेन्नचस्पृशेत् ॥**

**संस्रावोदकमीलन**—शिल्लक पाणी असलेल्या पहिल्या अर्घ्योदकपात्रांत दुसऱ्या दोन पात्रांतलें शिल्लक पाणी ओतून त्या सम्मिश्र पाण्यानें आपले ओठ ओले करावेत व जगण्याची मर्यादा वाढण्याची इच्छा करणाऱ्यानें त्या पाण्यानें डोळे धुवावेत. कारण,-'संस्रवान्समवनीय०' असें आश्वलायन सूत्र आहे. ब्राह्मणाच्या हातापासून गळलेल्या पाण्याला संस्राव असें म्हणतात व त्याचें एकीकरण करावें असें कांहीं ग्रन्थकारांचें म्हणणें आहे. दर्शश्राद्धांत मातामहाच्या पात्रांतलें पाणी व मातुःपितामहादि दोन पात्रांतलें पाणी एकत्र करून तें मातामहाच्या पात्रांतलें ( सम्मिश्र ) पाणी पितृपात्रांतल्या संस्रवानें मिसळावें. मातृपार्वण निराळें असल्यास मातामहाच्या पात्रांत एकत्र केलेलें ( तीन द्रोणांतलें ) पाणी मातृपात्रांतल्या पाण्यांत ओतून ते पितृपात्रांत एकत्र केलेल्या पाण्यांत ओतावें, आणि तें सहा द्रोणांतलें एकत्र झालेलें संस्रावाच्या पाण्याचें पात्र देवब्राह्मणाच्या उत्तरेस मुंडा हात दूर (अरत्निमात्र) पाणी शिंपडलेल्या जागीं अंथरलेल्या दर्भांवर कूर्चासह 'पितृभ्यः

स्थानमसि०' या मंत्रानें उपडें घालावें. किंवा पहिलें पात्र संस्रावोदकासह मंत्रोच्चारानें ठेवून तिसऱ्या पात्रानें कूर्चपवित्रासह झांकावें. या दोहोंपैकीं कोणचेंही केलें तरी गंधादिकांनीं त्या पात्राची पूजा करून समाप्तीपर्यंत तें पात्र हालवूं नये व त्याला शिवूंही नये.

कातीयास्तुशुन्धन्तामितिभूमिंप्रोक्ष्यपितृषदनमसीतिकुशानास्तीर्यपितृभ्यः स्थानमसीतिप्रथमंन्युब्जंकृत्वागन्धादिदीपान्तैरर्चन्ति ॥

**कात्यायनीसंस्राव**—'शुन्धन्ताम्०' या मंत्रानें भूमीवर पाणी शिंपडून—'पितृषदनमसि०'—या मंत्रानें दर्भ पसरून,—'पितृभ्यः स्थानमसि०'—या मंत्रानें पहिलें पात्र ( द्रोण ) उपडें करून गंधापासून दीपापर्यंत, कात्यायन पूजा करतात.

अथप्राचीनावीती आद्यन्तयोरपोशच्छनुगन्धाद्यैःपूजनंचरेत् अमुकशर्मन्यथानामंगोत्रायंतेगन्धःस्वधानमइति एकविप्रत्वेशर्माणोयंगन्धइत्यादिनात्रिस्त्रिर्गन्धदानंशेषंप्राग्वत् केचिदमीतेगन्धाइतिबहुत्वंगन्धेप्राहुः अर्घ्यदानभिन्नेसर्वत्रस्वधानमइत्यन्तेनदानम् अत्रपित्र्यविप्रपूजनेगन्धादेःपदार्थानुसमयःकाण्डानुसमयोवा संपूर्णवाचनादिप्राग्वत्कृत्वाचतुष्कोणंवर्तुलंचयथाक्रमं वारिणागोमयभस्मादिनावामण्डलानिसव्यापसव्याभ्यांकुर्यात् तत्रनैर्ऋतीमारभ्येशानीपर्यन्तंदैवे ईशानीतोनैर्ऋतीपर्यन्तंपित्र्येच प्रादक्षिण्याप्रादक्षिण्याभ्यांकार्याणि तत्रपूर्वोक्तपात्राण्यासादयेत् नायसान्यपिपात्राणिपैत्तलानिनतुक्वचित् नचसीसभयानीहशस्यन्तेत्रपूजान्यपि १ कांस्यपात्रंविकल्पितं पर्णपात्रेषुपलाशमधूकोदुम्बरकुटजप्लक्षजानिशस्तानि कदलीचूतपनसजम्बुचम्पकानिमध्यमानि एवंपात्राण्यासाद्यपितृपूर्वकंपरितोभस्ममर्यादांपितृपूर्वकांविप्राणांकरशुद्धिंचसव्यापसव्याभ्यांकुर्यात् तत्रपिशङ्गइतिरक्षाणइतिमन्त्राद्वयंकेचिदाहुः आचम्यकरशुद्धिजलंपादक्षालनमण्डलेक्षिपेत् ॥

**शेषकर्म**—नंतर प्राचीनावीति करून आद्यंतीं उदक देऊन गंधादि उपचारांनीं पूजा करावी. ती अशीः—'अमुकशर्मन् यथानामगोत्रायम् ते गंधः स्वधानमः' असें एक ब्राह्मण असेल तर; 'शर्माणो यंवोगंधः' इत्यादि प्रकारांनीं तीन तीन वेळ गंध द्यावें व शेषकर्म पूर्वींप्रमाणें करावें. 'अमीतेगंधाः' असा बहुवचनान्त उच्चार गंध देतांना करावा, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. अर्घ्यदानाशिवाय सर्वत्र 'स्वधानमः' असा शेवटीं उच्चार करून उपचार द्यावे. येथें पितरांकडील ब्राह्मणाच्या पूजेमध्यें गंधादिक उपचार पदार्थानुसमयानें किंवा कांडानुसमयानें द्यावे. संपूर्ण वाचनादिक पूर्वींप्रमाणें करून चतुष्कोण, वर्तुळ यथाक्रमानें उदकानें, किंवा गोमय, भस्म, इत्यादिकांनीं सव्यापसव्यानें मंडलें करावींत. नैर्ऋत्य दिशेस आरंभ करून ईशानीपर्यंत देवाकडे व ईशानीपासून नैर्ऋतीपर्यंत पितरांकडे प्रदक्षिण (सुलट) व अप्रदक्षिण (उलट) मंडलें करून त्यांवर पूर्वीं सांगितलेलीं पात्रें मांडावींत. लोखंडाचीं, पितळेचीं शिशाचीं व कथलाचीं पात्रें प्रशस्त नाहींत. कांस्यपात्र विकल्पित आहे. पानांच्या

पात्रांत-मोह, पळस, उंबर, कुडा, पिंपरी या वृक्षांचीं पानें द्रोणास प्रशस्त होतें. कर्दळी, आंबा, फणस, जांभूळ व चांफा या वृक्षांचीं पानें मध्यम होत. याप्रमाणें पात्रें मांडून पितृपूर्वक पात्राच्या सभोंवार भस्ममर्यादा (पिशंगी) व पितृपूर्वक ब्राह्मणांची करशुद्धि सव्यापसव्यांनीं करावी. पिशंगीसमयीं 'पिशंग' व रक्षणो' हे दोन मंत्र कोणी म्हणतात. आचमन करून पाय धुतल्याचें पाणी पाय धुण्याच्या मंडलावर टाकावें.

**अथाग्नौकरणम् तच्चाश्वलायनानांगृह्याग्निमतांव्यतिषङ्गेणश्राद्धप्रयोगेगृह्याग्निपक्वचरुणागृह्याग्नावेवकार्यम् व्यतिषंगाभावेपाणिहोमः श्रौताग्निमतांदर्शेव्यतिषङ्गाभावात्पाणिहोमएव पूर्वेद्युरन्वष्टक्ययोर्दक्षिणाग्नौश्रपणंहोमश्च निरग्निकानांतुसर्वत्रपाणिहोमएव आपस्तम्बादीनांश्रौताग्निमतां सर्वाधानिनांदक्षिणाग्नौ अर्धाधानिनांगृह्याग्निमात्रवतांचगृह्याग्नावेव प्रवासस्थानांनिरग्निकानांचअयाश्चाग्नेमनोज्योतिरुद्बुध्यव्याहृतिहोमेनोत्पादितेलौकिकाग्नौहुत्वाग्नेरुत्सर्गः नत्वेषांक्कापिपाणिहोमः पाकस्तुसर्वत्रपचनाग्नावेवकातीयानांगृह्याग्निविहृतपचनाग्नौपाकोग्नौकरणंतुगृह्याग्नावेव श्रौताग्निमतांसर्वाधानपक्षेदक्षिणाग्नावर्धाधानपक्षे औपासनाग्नाविविति काशिकायामुक्तम् कातीयानामर्धाधानपक्षएवयुक्तइतिभाति निरग्निनांकातीयानामपसव्यादिनापित्र्यादिद्विजहस्तएवाग्नौकरणम् तत्रपक्षद्वयम् देवद्विजकरेएवसव्येनहोमः यद्वाऽपसव्येनपित्र्यद्विजपङ्क्तौप्रथमद्विजकरे इतिबह्वृचानांतुपित्र्यद्विजकरेष्वेवप्रतिविप्रंहोमः वाजसनेयिनांत्वेकहोमएवेति श्राद्धकाशिकायांकातीयसूत्रवृत्तौ केचित्तुपृष्ठोदिविविधानेनाग्निमुत्पाद्याग्नावेव जुह्वतिसामगादीनांसाग्नीनामग्नावग्नेरसंनिधानेदेवकरेपित्र्यकरेवानिरग्नीनांतुदेवद्विजकरएव मृतभार्यस्यापत्नीकस्यप्रथमदेवद्विजकरएवहोमोनपित्र्येइतिसर्वसाधारणम् ॥**

**अग्नौकरण**—गृह्याग्निमान् आश्वलायनांनीं, व्यतिषंगानें श्राद्धप्रयोग करायचा असतां गृह्याग्नीवर चरु शिजवून त्या चरूनें गृह्याग्नीवरच अग्नौकरण करावें. व्यतिषंगप्रयोग नसेल तर ब्राह्मणाच्या हातावर होम करावा. श्रौताग्निमंतांनीं दर्शश्राद्धीं व्यतिषंगाभाव असल्यानें पाणिहोमच करावा. पूर्वेद्युःश्राद्ध व अन्वष्टक्य श्राद्ध यांत दक्षिणाग्नीवर भात शिजविणें व होम हीं करावींत. निरग्निकांनीं सर्वत्र ब्राह्मणाच्या हातावरच होम करावा. आपस्तंबशाखीयांनी व श्रौताग्निमंत सर्वाधानी यांनीं दक्षिणाग्नीवर भात शिजविणें व होम हीं करावींत व अर्धाधानी व गृह्याग्नियुक्तांनीं गृह्याग्नीवरच करावींत. प्रवासांत असणाऱ्यांनीं व निरग्निकांनीं 'अयाश्चाग्नेमनोज्योतिरुद्बुध्यध्वं' व व्याहृति यांचा होम करून तयार केलेल्या लौकिकाग्नीवर होम करावा, आणि अग्नीचें विसर्जन करावें. या आपस्तंबादिकांस पाणिहोम कोठेंही सांगितलेला नाहीं. पाक करणें तो पचनाग्नीवरच करावा. गृह्याग्नियुक्त कात्यायनांनीं गृह्याग्नींतून अग्नि घेऊन त्या पचनाग्नीवर पाक व अग्नौकरण करावें. श्रौताग्नियुक्त असून सर्वाधान पक्ष जर असेल तर दक्षिणाग्नीवर अग्नौकरण, व अर्धाधान पक्ष असेल तर गृह्याग्नीवर अग्नौकरण करावें, असें काशिका ग्रंथांत सांगितलें

आहे. कात्यायनांस अधाधानपक्ष योग्य आहे असें वाटतें. निरग्निक कात्यायनांनीं अपसव्यादिकानें पितरांकडच्या पहिल्या ब्राह्मणाचे हातावरच अग्नौकरण करावें, याविषयीं जे दोन पक्ष आहेत ते ( १ ) देवाकडच्या ब्राह्मणाच्या हातावर सव्यानें होम करावा किंवा ( २ ) पितरांकडच्या ब्राह्मणांचे पंक्तींतील पहिल्या ब्राह्मणाचे हातावर अपसव्यानें होम करावा, असे हे दोन पक्ष जाणावे. ऋग्वेद्यांनीं पितरांकडचे ब्राह्मणांचे हातावरच निरनिराळा होम करावा. वाजसनेयी यांनीं एकच होम करावा, असें श्राद्धकाशिका ग्रंथांत कातीयसूत्राच्या वृत्तींत सांगितलें आहे, कित्येक 'पृष्टोदिवि०' या विधानानें अग्नि उत्पन्न करून अग्नीमध्येंच अग्नौकरण होम करितात. साग्निक सामगादिकांनीं अग्नीवर अग्नौकरण करावें. अग्नि सन्निध नसेल तर देवाकडचे ब्राह्मणाचे हातावर किंवा पितरांकडचे ब्राह्मणांचे हातावर करावें. निरग्निक असतील तर देवाकडचे ब्राह्मणाचे हातावर करावें. बायको मेलेल्यानें पहिल्या देवब्राह्मणाचे हातावरच होम करावा, पितरांकडच्या ब्राह्मणांचे हातावर करूं नये. याप्रमाणें हा निर्णय सर्वसाधारण जाणावा.

**अथहोमप्रकारः ।** बह्वृचानांव्यतिषङ्गपक्षेऽग्नावग्नौकरणंकरिष्ये । इतिपृष्ट्वा क्रियतामितिअनुज्ञातोगृह्यपक्वंचरुमुद्धृत्यद्विधाविभज्यापसव्येनोत्तरभागादवदानसंपदामेक्षणेऽवदायसोमायपितृमतेस्वधानमः सोमायपितृमतइदंनममेतिहोमत्यागौकृत्वादक्षिणभागात्पुनस्तथैवावदायाग्नये कव्यवाहनायस्वधानमइतिहोमत्यागौकुर्यात् सव्येनापसव्येनवामेक्षणमग्नावनुप्रहरेत् यद्वासव्येनस्वाहान्तोक्तमन्त्रेणाहुतिद्वयंसोमाग्न्योर्व्यत्यासेनादाय जुहुयादिति कातीयानांतुगृह्येऽपणमकृत्वैवपचनाग्निपक्वमन्नमादायघृताक्तंकृत्वापूर्ववत्प्रश्नानुज्ञानन्तरंस्मार्ताद्यग्निंपरिस्तीर्यतिस्रःसमिधआधायसव्येनाग्नयेकव्यवाहनायस्वाहासोमायपितृमतेस्वाहेतिमेक्षणेनाहुतिद्वयंजुहुयादपसव्येनवापाणिहोमेपीत्थमेवप्रकारऊह्योविशेषसूक्तः आपस्तम्बानांतुआज्यभागान्तेउद्ध्रियतामग्नौचक्रियतामितिप्रश्नेकाममुद्ध्रियतामितिअनुज्ञानम् हिरण्यकेशीयानामुद्धरिष्याम्यग्नौकरिष्यामीतिप्रश्नः यन्मेमातेत्यादिमन्त्रैःसप्तान्नाहुतयःषडाज्याहुतयइतित्रयोदशाहुतयः मन्त्रास्तु विस्तरभयान्नोक्ताः हिरण्यकेशीयानामाज्यभागान्तेसोमायपितृमतेइत्यादिषोडशमन्त्रैःषोडशाज्याहुतयः षोडशान्नाहुतयश्चप्रतिपार्वणंबोध्याःमन्त्रेषुपित्रादिपदोहआज्यान्नपदयोरूहश्च तद्ग्रन्थेष्वेवज्ञेयोतिविस्तृतत्वान्नोच्यते ॥

**होमप्रकार**—ऋग्वेद्यांचा जर व्यतिषंगपक्ष असेल तर 'अग्नौकरणंकरिष्ये' असा प्रश्न करून 'क्रियताम्' अशी आज्ञा मिळाल्यावर गृह्याग्नीवर पक्व झालेला चरु घेऊन त्याचे दोन भाग करावेत. अपसव्यानें उत्तर भागांतून अवदान धर्मानें चरु घेऊन ' सोमाय पितृमते स्वधानमः सोमाय पितृमते इदंनमम 'याप्रमाणें होम करून दक्षिण भागांतून पुनः तसेंच अवदान घेऊन 'अग्नये कव्यवाहनाय स्वधानमः' असें म्हणून होम व त्याग करावा. सव्यानें किंवा अपसव्यानें अग्नींत आहुति टाकावा, अथवा सव्यानें स्वाहान्त उक्त मंत्रानें दोन आहुति सोम व अग्नि यांच्या

व्यत्यासानें ( उलटापालट ) घेऊन होम करावा. कात्यायनांनीं तर गृह्याग्नीवर चरु शिजविल्यावांचून पचनाग्नीवर शिजलेला चरु घेऊन त्यावर घृत घालावें व पूर्वीं सांगितल्याप्रमाणें प्रश्न व आज्ञा झाल्यावर स्मार्ताग्नीस परिस्तरणें घालून तीन समिधा हवन कराव्या व सव्यानें किंवा अपसव्यानें 'अग्नये कव्यवाहनायस्वाहा, सोमाय पितृमते स्वाहा' असें म्हणून दोन आहुति हवन कराव्या, पाणिहोमाविषयींही असाच प्रकार जाणावा. इतर विशेष पूर्वीं सांगितलाच आहे. आपस्तंबांचा तर आज्यभागानंतर 'उद्ध्रियतां अग्नौच क्रियतां' असा प्रश्न झाल्यावर 'काममुध्रियतां' अशी अनुज्ञा जाणावी. हिरण्यकेशीयांचा 'उद्धरिष्याम्यग्नौ करिष्यामि' असा प्रश्न व 'यन्मे माता०' इत्यादि मंत्रांनीं सात चरूच्या आहुति व सहा आज्याच्या आहुति अशा तेरा आहुति जाणाव्या. विस्तारभयास्तव मंत्र सांगितले नाहींत. हिरण्यकेशीयांच्या आज्य-भागानंतर 'सोमाय पितृमते०' इत्यादि सोळा मंत्रांनीं सोळा आज्याहुति व सोळा अन्नाहुति अशा प्रत्येक पार्वणाविषयीं जाणाव्या. मंत्रांत पदांचा ऊह करणें तो त्या ग्रंथांत पहावा. अतिविस्तारभयास्तव येथें सांगत नाहीं.

**अथपाणिहोमप्रकारः । तत्र विप्रपाणावग्नौकरणंकरिष्येइतिप्रश्नः क्रियता-मित्यनुज्ञा करिष्येइतिप्रश्नेकुरुष्वेत्यनुज्ञा नभवतीतिसर्वत्राश्वलायनमतम् का-तीयादीनांतुभवत्येव आश्वलायनसूत्रवृत्तौतुपाणिहोमेकथमपिप्रश्नःप्रतिवचनं-चनकार्यमितिद्योतितम् ॥**

**पाणिहोमप्रकार**—पाणिहोमामध्यें 'विप्रपाणावग्नौकरणं' 'क्रियताम्' असें अनु-मोदन 'करिष्ये' असा प्रश्न असतां 'कुरुष्व' अशी अनुज्ञा होत नाहीं असें सर्वत्र आश्वलायनांचें मत आहे. कात्यायन इत्यादिकांचें तर असेंच मत आहे. आश्वलायनच सूत्राचे वृत्तींत तर पाणिहोमांत कसाही प्रश्न व प्रतिवचन करूं नये, असें स्वच्छ सांगितलें आहे.

**सदर्भेपित्र्यविप्रपाणिंसव्येनपरिसमुह्यपर्युक्ष्यप्रेक्षणेनकरेणवापूर्ववदाहुतिद्वयं सोमायेत्यादिमंत्राभ्यांप्राचीनावीत्येवजुहुयात् तत्रकरेणहोमपक्षेवामहस्तेन-दर्भेणदक्षिणकरेउपस्तीर्यदक्षिणेनाद्विरवदायवामेनाभिधार्यचतुरवत्त्विादिसं-पाद्यम् बह्वृचानांसर्वपित्र्यकरेषुहोमएकोद्दिष्टविप्रकरेहोमःकृताकृतः होमान्ते सव्येनपरिसमूहनोक्षणे पाणिहोमेप्रेक्षणानुप्रहरणंन केचित्पाणिहोमेपरिसमूह-नादिकंप्रेक्षणंचनेच्छन्ति विप्राश्चपाणिहुतान्नं कर्त्रादेवपूर्वंसव्येनैवामासुपक्रमि-तिमन्त्राभिधारितेस्वस्वपात्रेसंस्थाप्य भोजनस्थानादन्यत्राचम्ययथास्थानमुपवि-शेयुः अग्नौकरणशेषंपिण्डार्थमवस्थाप्यापित्र्यपात्रेष्वेवसर्वान्नपरिवेषणान्तेपरि-षणीयम् केचिदग्नौकरणशेषपरिवेषणोत्तरंसर्वान्नपरिवेषणमाहुःअग्नौकरणशेषं-देवपात्रेषुनदेयम् कातीयानांतुसाग्नीनामग्नौहोमेदेवपूर्वंसर्वपात्रेषुशेषदानम् निरग्नेर्देवविप्रकरेहोमेपितृपात्रेष्वेवपित्र्यकरेहोमेदेवादिसर्वपात्रेषुहुतशेषदान-मितिकाशिका अन्नंपाणौहुतंयच्चयच्चान्यत्परिवेषितम् । एकीकृत्यैवभोक्तव्यं-पृथक्भक्षोनविद्यते १ बौधायनानांतुपाणिहुतेन्नेभक्षितेन्यान्नपरिवेषणमुक्तम् ॥**

**अग्नौकरणान्नशेष**—पितरांकडचे ब्राह्मणांचा दर्भसहित हात सव्यानें परिसमूहन व पर्युक्षण करून प्रेक्षणानें किंवा हस्तानें पूर्वीप्रमाणें 'सोमाय' इत्यादि दोन मंत्रांनीं प्राचीनावीतीनेंच दोन आहुति हवन कराव्यात. त्यांत हातानें होम करण्याचा पक्ष असल्यास डाव्या हातानें दर्भानें उजव्या हातास घृत लावून उजव्या हातानें दोन वेळ चरु घेऊन डाव्या हातानें अभिघार (तूप लावणें) करून चतुरवत्तित्व इत्यादिक करावें. ऋग्वेदीयांनीं सर्व पितरांकडच्या ब्राह्मणांच्या हातावर होम करावा. एकोद्दिष्टाच्या ब्राह्मणांच्या हातावार होम कृताकृत आहे. होम झाल्यावर सव्यानें परिसमूहन व पर्युक्षण करावें. पाणिहोमांत प्रेक्षण व अनुप्रहरण करूं नये. कित्येक ग्रंथकार पाणिहोमांत परिसमूहन इत्यादिक प्रेक्षणही इच्छीत नाहींत. ब्राह्मणांनीं हातावर होम केलेलें अन्न कर्त्यानें देवपूर्वक सव्यानेंच 'आमासुपक्वं०' या मंत्रानें अभिघार केलेल्या आपापल्या पात्रावर ठेवून भोजनस्थानाहून अन्यस्थलीं आचमन करून पुनः आपल्या स्थानीं येऊन बसावें. अग्नौकरण करून शेष राहिलेलें अन्न पिंडासाठीं ठेवून पितरांकडचे ब्राह्मणांच्या पात्रांवरच सर्व पदार्थ वाढल्यावर तें वाढावें. अग्नौकरणाचें शेष अन्न वाढल्यावर इतर सर्व पदार्थ वाढावेत असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. अग्नौकरणाचें शेष अन्न देवांचे पात्रांवर वाढूं नये. साग्निक कात्यायनांनीं अग्नीमध्यें अग्नौकरण होम असतां देवपूर्वक सर्व पात्रांवर शेष अन्न वाढावें. निरग्निकांस देवाकडच्या ब्राह्मणांचे हातावर होम असतां पितरांच्या पात्रावरच शेष अन्नदान करावें व पितरांच्या ब्राह्मणांचे हातावर होम असेल तर देवादिक सर्व पात्रांवर शेष अन्नदान करावें असें श्राद्धकाशिका ग्रंथांत सांगितलें आहे. हातावर हवन केलेलें व पात्रावर वाढलेलें सर्व अन्न एकत्र करूनच भक्षण करावें. निराळें भक्षण करूं नये. बौधायनशाखीयांस तर हातावर हवन केलेलें भक्षण केल्यावरच दुसरें अन्न वाढावें असें सांगितलें आहे.

अथपूर्वोक्तवद्देवपूर्वंघृताभिघारितपात्रेषुपूर्वोक्तहविष्यान्नपरिवेषणंस्वयंपत्नीवान्योवाकुर्यात् नापवित्रेणनैकेनहस्तेनचविनाकुशम् । नायसेनापिपात्रेणश्राद्धेषुपरिवेषयेत् ॥ १ ॥ व्यञ्जनादिकंपर्णाद्यन्तर्हितहस्तैर्देयम् दर्व्यादेयंघृतंचान्नंसमस्तव्यञ्जनानिच । उदकं चैवपक्वान्नंनोदर्व्यातुकदाचन ॥ १ ॥ हस्तदत्तंतुनाश्नीयाल्लवणव्यञ्जनादिकम् अपक्वंतैलपक्वंचहस्तेनैवप्रदीयते ॥ २ ॥ घृतादिपात्राणिभूमौस्थापयेन्नभोजनपात्रे ओदनेपरमान्नेचपात्रमासाद्यतत्रघृतपूरणेरुधिरतुल्यता पङ्क्तौविषमदातुश्चनिष्कृतिर्नैवविद्यते । सर्वदाचतिलाग्राह्याःपितृकृत्येविशेषतः १ भोज्यपात्रेतिलान्दृष्ट्वानिराशाःपितरोगताः । हिङ्गुशुण्ठीपिप्पलीमरीचकानिशाकादिसंस्कारार्थान्येवनतुसाक्षाद्भक्षयेत् परिवेषणकालेएवतत्सर्वप्रकारमन्नंपिण्डार्थंपिण्डपात्रेपरिषणीयमितिसागरे ॥

**श्राद्धान्नपरिवेषण**—पूर्वीं सांगितल्याप्रमाणें देवपूर्वक घृताचा अभिघार केलेल्या पात्रावर पूर्वीं सांगितलेलें हविष्यान्न स्वतः स्त्रीनें किंवा दुसऱ्या कोणीं काढावें. अपवित्र हातानें दर्भावांचून एका हातानें व लोखंडाच्या

पात्रानें श्राद्धामध्यें पदार्थ वाढूं नयेत. कोशिंबरी, चटण्या, इत्यादि पदार्थ द्रोणादिकांनीं वाढावेत. तूप, अन्न व सर्व चटण्याकोशिंबरी, इत्यादि पदार्थ व उदक पळीनें वाढावें, पण पक्वान्न मात्र पळीनें वाढूं नये. हातानें वाढलेलें मीठ, चटण्या, कोशिंबरी इत्यादि पदार्थ भक्षण करूं नयेत. अपक्व व तैलपक्व पदार्थ हातानेंच वाढावेत. घृतादिक पदार्थांचीं पात्रें भूमीवर ठेवावींत. भोजनपात्रावर ठेवूं नयेत. भात व क्षीर यांत पात्र ठेवून त्या पात्रांत तूप वाढलें असतां तें रुधिरसमान होय. पंक्तींत एकास कमी एकास अधिक अशा भेदबुद्धीनें वाढणाराच्या पापाचा नाश होण्यासारखें प्रायश्चित्त नाहींच. पितृकृत्यांत सर्वदा विशेषतः तीळ घ्यावेत. भोजनपात्रावर तीळ पाहून पितर निराश होऊन जातात. हिंग, सुंठ, पिंपळी, मिऱ्यें, हे पदार्थ शाकादिकांचा संस्कार म्हणजे फोडणी इत्यादिकांत परिणाम झालेले (तरंगणें) भक्षण करूं नयेत. पदार्थ वाढण्याच्या वेळींच तें सर्व अन्न पिंडाकरितां पिंडपात्रावर वाढावें. असें श्राद्धसागर ग्रंथांत सांगितलें आहे.

अथोपवीतीदैवेपात्रेपरितःकुशयवान्विकीर्यपित्र्येतुतिलान्विकीर्यान्नंगायत्र्याप्रोक्ष्यतूष्णींपरिषिच्यदक्षिणहस्तउपरिवामोधोदैवेपित्र्येतुविपरीतइत्येवंस्वस्तिकाकारकराभ्यांपात्रमालभेत् तत्रमन्त्रः पृथिवीतेपात्रंद्यौरपिधानंब्राह्मणस्त्वामुखेमृतंजुहोमिब्राह्मणानांत्वाविद्यावतांप्राणापानयोर्जुहोम्यक्षितमसिमैषांक्षेष्ठा अत्रामुष्मिँल्लोकेइति अयंमन्त्र आपस्तम्बकात्यायनादिभिर्नानाविधःपठितोयथासंप्रदायंवाच्यःइत्यभिमन्त्र्यअतोदेवेतिवइदंविष्णुरितिवाऋचमुक्त्वाविष्णोहव्यंरक्षस्वेतिपित्र्येतुकव्यंरक्षस्वेतिन्युब्जेनकरेणन्युब्जंद्विजाङ्गुष्ठमनखमन्नेनिवेश्यप्रदक्षिणंभ्रामयेत् पित्र्येत्वप्रदक्षिणम् अत्रकातीयानामहताइतियवानांदैवे तिलानां पित्र्येपात्रपरितोवकिरणमुक्तम् ततोवामकरेणपात्रंस्पृशन्नमुकेविश्वेदेवादेवता इदमन्नंहव्यमयंब्राह्मणआहवनीयार्थेइयंभूर्गयाअयंभोक्तागदाधरइदमन्नं ब्रह्म इदंसौवर्णपात्रमक्षय्यवटच्छायेयंअमुकदेवेभ्यःइदमन्नंसोपस्करममृतरूपं परिविष्टंपरिवेक्ष्यमाणंचातृप्तेःस्वाहाहव्यंनमोनमम ओंतत्सदितिसयवदर्भजलंदक्षिणकरेणपात्रवामभागेभूमौक्षिपेत् एवंदैविकविप्रान्तरेपि ततोयेदेवासइत्युपस्थानम् ततःपित्र्यधर्मेणपितृपात्रालम्भाङ्गुष्ठनिवेशनाद्यन्तेवामेनपात्रमालभ्यपितादेवताएकविप्रत्वेपित्रादयोयथानामगोत्रादेवताइदमन्नंकव्यमित्यादि० इदंराजतंपात्रमक्षय्यवटच्छायेयं अस्मत्पित्रेऽमुकनामगोत्ररूपायत्रयस्थानेविप्रैक्येऽस्मत्पितृपितामहप्रपितामहेभ्योऽमुकनामगोत्रनामरूपेभ्यः इदमन्नंसोपस्करममृतरूपंपरिविष्टंपरिवेक्ष्यमाणंचातृप्तेःस्वधाकव्यंनमोनममओंतत्सदितितिलकुशजलंपितृतीर्थेनवामकराधोनीतेनदक्षिणकरेणपात्रदक्षिणे भूमौक्षिपेत् एवमन्यत्रापियथादैवतमूहः पितृस्थानेनेकपित्रत्वेत्रिषुविप्रेषुपित्रेइत्यादिनैकवचनान्तेनत्यागः एवमग्रेपित्रिषुत्रिषूह्यम् ततोयेचेहेतिसकृदुपस्थानम् अतिथिश्चेद्देवधर्मेणस्वेष्टदेवतायैइदमन्नमित्यादियेदेवासइत्यादि अपसव्यम् देवताभ्यःपितृभ्य० सप्तव्या० अमूर्तानां० ब्रह्मार्पणं० हरिर्दाता०

**चतुर्भिश्च० ओंतत्सद्ब्रह्मार्पणमस्तुयेषामुद्दिष्टंतेषामक्षय्याप्रीतिरस्तु इतितिलोदकमुत्सृजेत् सव्यम् एकोविष्णु० अन्नहीनंक्रियाहीनंमन्त्रहीनंचयद्भवेत् तत्सर्वमच्छिद्रं जायतामित्युक्त्वाविप्रैर्जायतांसर्वमच्छिद्रमित्युक्ते अनेनपितृयज्ञेन पितृरूपीजनार्दनवासुदेवप्रीयतातामितितिलकुशजलमुत्सृजेदित्याचारः॥**

यावर उपवीति करून दैवपात्राच्या सभोंवार कुश व यव टाकावेत व पितरांच्या पात्रांच्या सभोंवार तिल टाकून गायत्रीमंत्रानें अन्न प्रोक्षण करावें, व मंत्ररहित उदक सिंचन करून उजवा हात वर व डावा हात खालीं याप्रमाणें देवाकडे व डावा हात वर व उजवा हात खालीं याप्रमाणें पितरांकडे स्वस्तिकाकार हातांनीं पात्र धरावें. त्याविषयीं मंत्र 'पृथिवीतेपात्रं०' हा मंत्र आपस्तंब, कात्यायन, इत्यादिकांनीं नानाप्रकारें पठण केला आहे म्हणून जसा संप्रदाय असेल तसा म्हणावा. असें अभिमंत्रण करून 'अतोदेवा०' किंवा 'इदंविष्णु०' यांतून एक ऋचा म्हणून 'विष्णो हव्यं रक्षस्व' असें देवांकडे व 'कव्यं रक्षस्व' असें पितरांकडे म्हणून उपड्या हातानें उपडा नख वर्ज्य असा ब्राह्मणाचा अंगुष्ठ ठेवून प्रदक्षिण फिरवावा. पितरांकडे अप्रदक्षिण फिरवावा. येथें कात्यायनांस 'अपहता०' या मंत्रानें यव देवांकडे व तिल पितरांकडे पात्राचे सभोंवार नंतर टाकण्याविषयीं सांगितलें आहे. डाव्या हातानें पात्राला स्पर्श करून 'अमुके विश्वेदेवा० ॐ तत्सत्' असा मंत्र म्हणून यव व दर्भासहित उदक उजव्या हातानें पात्राच्या डाव्या भागीं भूमीवर सोडावें. देवाकडच्या दुसऱ्या ब्राह्मणाविषयींही असेंच करावें. यावर 'ये देवास०' या मंत्रानें प्रार्थना करावी, व पित्र्यधर्मानें पितरांच्या पात्रांचें आलंभन (धरणें) व अंगुष्ठनिवेशन येथपर्यंत कर्म झाल्यानंतर डाव्या हातानें पात्र धरून 'पितादेवता' असा ऊह, एक ब्राह्मण असल्यास 'पित्रादयो यथा नामगोत्रा देवता इदमन्नं कव्यं' इत्यादि 'इदं राजतं गोत्ररूपाय' असें व त्रयीच्या ठायीं एक ब्राह्मण असेल तर अस्मत्पितृपितामह ॐ तत्सत्' असा मंत्र म्हणून तिळ, कुश व उदक पितृतीर्थानें डाव्या हाताच्या खालीं केलेल्या उजव्या हातानें पात्राच्या दक्षिणेस भूमीवर सोडावें. याप्रमाणें दुसरीकडेही जसें दैवत असेल तसा ऊह करावा. पितृस्थानीं अनेक ब्राह्मण असतील तर ३।३ ब्राह्मणांचे ठायीं 'पित्रे' इत्यादि एकवचनांतानें त्याग करावा. व पुढेंही तीन तीन ब्राह्मणांचे ठायीं असेंच जाणावें. नंतर 'इयेचेह०' या मंत्रानें एकदां प्रार्थना करावी. अतिथि असेल तर देवधर्मानें 'देवताये इदमन्नं' असें म्हणून 'येदेवास०' इत्यादि मंत्र म्हणावा. नंतर अपसव्यानें 'देवताभ्यः० पितृभ्यः०' वगैरे मंत्र म्हणून तिलोदक सोडावें व सव्य करून 'एकोविष्णु०' असें म्हणून ब्राह्मणांनीं 'जायतां सर्वमच्छिद्रं' असें प्रतिवचन दिल्यावर 'अनेन पितृयज्ञेन पितृयज्ञरूपी जनार्दनवासुदेवः प्रीयतां' असें म्हणून तिल व कुश यांसहित उदक सोडावें. असा विचार आहे.

**केचिद्ब्रह्मार्पणमित्यादिसंकल्पोत्सर्गे सव्यमेकोविष्णुरित्यादावपसव्यंकुर्वन्तितत्रब्रह्मार्पणेतिएकोरित्यनयोःसंकलपयोर्विभागेसव्यापसव्यविभागेचप्रत्यक्षव-**

हे पदार्थ सर्व भक्षण करावे. ब्राह्मणानें स्वतः आपोशन घेतलें असतां, ( ब्रह्मार्पणं एकोविष्णु ) हा संकल्प केला असतां व छिद्रभाषण म्हणजे पाकासंबंधीं खारट, तिखट इत्यादि दोष काढले असतां पितर निराश होऊन जातात. आपोशन दक्षिण-भागीं करावें, वामभागीं करूं नये. आपोशनास उदक एकदांच पूर्ण घ्यावें, पुनः पूर्ण केलें असतां तें सुरापानासारखें होतें. आपोशन घेतल्याशिवाय कधींही अन्नमर्दन करूं नये. ब्राह्मणांनीं चित्राहुति घालूं नयेत. कित्येक घृताच्या चित्राहुति घालतात पण तें योग्य नाहीं, कारण पायस, घृत व माषान्न यांच्या आहुति घालण्याविषयीं निषेध आहे. ब्राह्मणांनीं डाव्या हातानें व पायानें अन्नास व पात्रास स्पर्श करूं नये. सिद्ध केलेले पदार्थच हातांनीं खुणेनें मागावेत. सिद्ध न झालेले पदार्थ मागूं नयेत. अन्नाचे गुणदोष बोलूं नयेत. कर्त्यानें निषिद्ध नसलेले व पित्यास प्रिय असलेले पदार्थ भोक्त्यास द्यावेत. व त्या त्या अन्नाच्या माधुर्यादि गुणांच्या कथनानें रुचि उत्पन्न करून देतों असें न म्हणतां जे मागतील ते द्यावेत. भोजन करणाराकडे पाहूं नये. पदार्थांचे गुण विचारूं नयेत. दैन्य, अश्रुपात, क्रोध इत्यादि न करितां पिण्यास पाणी देऊन ब्राह्मणांस सावकाश जेववावें. लवणादिक पदार्थ 'पाहिजेत' असें विचारिलें असतां त्याचे पितर उच्छिष्ट होऊन जातात.

**अथसव्येनैवसव्याहृतिगायत्रींत्रिरुक्त्वापौरुषंसूक्तंकृणुष्वपाजोरक्षोहणमित्याद्यारक्षोघ्नीःपितृलिङ्गकानृइन्द्रेशसोमसूक्तपावमानीसूक्तानिअप्रतिरथसंज्ञमाशुःशिशानसूक्तमर्दिष्णुब्रह्मरुद्रार्कस्तोत्रादिकंभोक्तृविप्रानृश्रावयेत् असंभवेगायत्रीजपंकुर्यात् वीणावंशध्वनिंचापिविप्रेभ्यःसन्निवेदयेत् । मण्डलब्राह्मणपाठ्यंनाचिकेतत्रयंतथा १ त्रिमधुत्रिसुपर्णंचपावमानयजूंषिच । आशुःशिशानसूक्तंचअग्नये कव्यवाहनम् २ प्रौढपादोबहिःकक्षोबहिर्जानुकरोपिवा । अङ्गुष्ठेनविनाऽश्नातिमुखशब्देन वापुनः ३ पीतावशिष्टतोयानिपुनरुद्धृत्यवापिबेत् । खादितार्धंपुनः खादेन्मोदकादिफलादिकम् ४ मुखेनवाधमेदन्नंनिष्ठीवेद्भाजनेपिच । इत्थमश्नन्द्विजःश्राद्धंहत्वागच्छत्यधोगतिम् ५ श्राद्धपङ्क्तौतुभुञ्जानोब्राह्मणोब्राह्मणंस्पृशेत् । तदन्नमत्यजन्भुक्त्वागायत्र्यष्टशतंजपेत् ६ पात्रेविप्रान्तरोच्छिष्टसंसर्गेतन्निरस्तहस्तंप्रक्षाल्यभुत्रास्नात्वाद्विशतंजपेत् उच्छिष्टभोजनेसहस्रंजपेत् भुञ्जानेषुतुविप्रेषुप्रमादात्स्रवतेगुदम् । पादकृच्छ्रंततःकृत्वाअन्यंविप्रं नियोजयेत् ॥**

**अभिश्रवण**—नंतर सव्यानें व्याहृतिसहित गायत्रीमंत्र तीन वेळ म्हणून पुरुषसूक्त 'कृणुष्वपाजः व रक्षोहणं' इत्यादि रक्षोघ्न ऋचा व पितरलिंगांशी, जे इंद्र, ईश व सोम यांचीं सूक्तें, पावमानी सूक्तें, अप्रतिरथ संज्ञक 'आशुः शिशान०' सूक्त, विष्णु, ब्रह्मा, रुद्र व अर्क यांचीं स्तोत्रें इत्यादिक भोजनकर्त्या ब्राह्मणांकडून श्रवण करवावीत. इतकीं सूक्तें श्रवण करविणें अशक्य असेल तर गायत्रीमंत्राचा जप करावा. वीणा व मुरली, यांचा ध्वनि ब्राह्मणांस श्रवण करवावा. मंडल ब्राह्मण, नाचिकेत त्रय, त्रिमधु, त्रिसुपर्ण, पावमान अशीं यजुर्वेदांतील सूक्तें, आशुःशिशान

सूक्त व आग्नेय कव्यवाहन हीं सूक्तें श्रवण करवावींत. पायावर पाय चढवून कक्षा बाहेर करून म्हणजे आसनमर्यादा सोडून जानूच्या बाहेर हात ठेवून अंगुष्ठाशिवाय केवळ अंगुलींनींच जो खातो किंवा मिटक्या मारीत जो भोजन करितो, एकदां जलपान करून पात्रांत शेष राहिलेलें उदक पुनः घेऊन जो तें पितो, मोदकादिक व फलादिक पदार्थ अर्धे भक्षण करून पात्रावर ठेवून जो पुनः भक्षण करतो, मुखानें जो अन्नावर फुंकर मारतो अथवा पात्रांत थुंकी टाकतो, तें श्राद्ध व्यर्थ जाऊन तो ब्राह्मण अधोगतीस जातो. श्राद्धपंक्तींत भोजन करणारा ब्राह्मण जर दुसऱ्या ब्राह्मणास स्पर्श करील तर त्यानें तें पात्रावरचें अन्न न टाकतां भोजन करावें, व १०८ गायत्रीजप करावा. भोजनपात्रांत दुसऱ्या ब्राह्मणाचे उच्छिष्टाचा संसर्ग झाल्यास तें अन्न टाकून हात धुऊन भोजन केल्यावर स्नान करावें व २०० गायत्रीजप करावा. उच्छिष्ट अन्न भक्षण केल्यास सहस्र गायत्रीजप करावा. ब्राह्मण भोजन करीत असतां प्रमादानें जर गुदस्राव होईल तर पादकृच्छ्र करून, दुसरा ब्राह्मण श्राद्धास बसवावा.

अथविप्रवमने तत्रपित्रादिविप्रवमनेलौकिकाग्निस्थापनचरुनिर्वापाज्यभागान्तेनामगोत्रपूर्वकमग्नौपितॄनावाह्यवैश्वदेविकवमनेदेवानावाह्य संपूज्यान्नत्यागं कृत्वाप्राणायस्वाहेत्यादिमन्त्रैर्द्वात्रिंशदाहुतीर्जुहुयात्पुनःश्राद्धंवाकुर्यादितिपक्षद्वयम् पक्षद्वयेपीन्द्रायसामेतिसूक्तजपोनित्यः अनयोःपक्षयोर्व्यवस्थोच्यते वैश्वदेविकविप्रवमनेहोमएवनपुनः श्राद्धंपित्र्यविप्रेष्वपिपिण्डदानोत्तरंवान्तौहोमएवनपुनःश्राद्धम् पिण्डदानात्प्राक्पित्र्यविप्रवान्तौतद्दिनेउपवासंकृत्वापरेद्युः पुनःश्राद्धंकार्यम् इदंसपिण्डीकरणमहैकोद्दिष्टमासिकाब्दिकप्रत्याब्दिकश्राद्धेष्वेवदर्शादौतुवमनेतद्दिनेएवामेनश्राद्धंकार्यम् एवमष्टकान्वष्टकापूर्वेद्युःश्राद्धेष्वपि तत्रामश्राद्धेसाग्नेर्बह्वृचस्यव्यतिषङ्गादियथोक्तप्रयोगासंभवात्सांकल्पिकविधिनादर्शान्वष्टकापूर्वेद्युः श्राद्धान्यामेनकार्याणितत्तल्लोपप्रायश्चित्तंवानिबन्धोक्तंकर्तव्यमितिभाति वृद्धिश्राद्धेपिण्डरहितसंक्रान्त्यादिश्राद्धेनित्यश्राद्धेचवमनेआवृत्तिरेव तीर्थश्राद्धे दर्शवदामेनैव महालयश्राद्धेपार्वणस्थानीयविप्रवमनेपुनरावृत्तिः एकोद्दिष्टस्थानीयविप्रवमनेहोमएवेतिभाति वैश्वदेविकविप्रवमनेसर्वश्राद्धेषुहोमएवेत्युक्तमेव होमपक्षेआवृत्तिपक्षेचसर्वत्रसूक्तजपोनित्यइत्यप्युक्तम् ॥

**विप्रवमनशुध्दि**—पिता इत्यादिक ब्राह्मणास लौकिक अग्नि स्थापन करून आज्यभागापर्यंत चरूच्या निर्वापानें कर्म करून नामगोत्रपूर्वक अग्नींत पितरांचें आवाहन करावें. विश्वेदेवाकडच्या ब्राह्मणास वांति झाली असेल तर देवाचें आवाहन करावें. नंतर पूजा करून देवतोद्देशानें अन्नत्याग करून 'प्राणायस्वाहा' इत्यादि मंत्रांनीं ३२ आहुतींनीं हवन करावें किंवा पुनः श्राद्ध करावें, असे दोन पक्ष आहेत. दोन्ही पक्षीं 'इंद्रायसाम०' या सूक्ताचा जप नित्य आहे. आतां दोन पक्षांची व्यवस्था सांगतो. वैश्वदेवाकडच्या ब्राह्मणास वांति झाली असतां होमच करावा

पुनः श्राद्ध करूं नये. पितरांकडच्या ब्राह्मणासही पिंडदानानंतर वांति झाली असतां होमच करावा, पुनः श्राद्ध करूं नये. पिंडदानापूर्वीं पितरांकडच्या ब्राह्मणास वांति झाल्यास त्या दिवशीं उपवास करून दुसऱ्या दिवशीं पुनः श्राद्ध करावें. हा निर्णय सपिंडीकरण, महैकोद्दिष्ट, मासिक, आब्दिक व प्रतिसांवत्सरिक श्राद्धांविषयींच जाणावा. दर्शादिक श्राद्धीं वांति झाल्यास त्याच दिवशीं आमानें (शिधा) श्राद्ध करावें. अष्टका, अन्वष्टका व पूर्वेद्युः श्राद्ध यांविषयींही असाच निर्णय जाणावा. त्यांतही साग्निक ऋग्वेदी यांस आमश्राद्धांत व्यतिषंगादि यथोक्त प्रयोगाचा असंभव असल्यानें सांकल्पिक विधीनें दर्श, अष्टका, अन्वष्टका व पूर्वेद्युः हीं आमानें करावींत किंवा त्या त्या श्राद्धलोपाचें प्रायश्चित्त निबंधांत सांगितलेलें करावें, असें वाटतें. वृद्धिश्राद्ध, पिंडरहित संक्रांत्यादि श्राद्ध व नित्यश्राद्ध यांत वांति झाली असतां पुनः श्राद्ध करावें. तीर्थश्राद्ध असेल तर दर्शाप्रमाणें आमान्नानेंच करावें. महालयश्राद्धीं पार्वणस्थानींच्या ब्राह्मणास वांति झाल्यास श्राद्धाची पुनरावृत्ति करावी. एकोद्दिष्ट स्थानींच्या ब्राह्मणास वांति झाल्यास होमच करावा, असें वाटतें. देवाकडच्या ब्राह्मणास वांति झाल्यास सर्व श्राद्धांत होमच करावा, असें पूर्वीं सांगितलेंच आहे. होमपक्षीं व पुनः श्राद्ध करावें या पक्षीं सर्वत्र सूक्ताचा जप नित्य आहे, असेंही सांगितलें आहे.

भोजनान्तेप्राचीनावीती । तृप्ताःस्थेतिविप्रान्पृष्ट्वा तृप्ताःस्मइतिप्रत्युक्तेगायत्रींमधुवाताइतितृचमक्षन्नमीतिचश्रावयित्वा अथवाक्षन्नमीत्येतदन्तेतृप्तिप्रश्नंकृत्वाश्राद्धंसंपन्नमितिपृष्ट्वासुसंपन्नमित्युक्तः परिवेषणकालेनुद्धरणेऽधुनापिण्डार्थंसर्वान्नादुद्धृत्यविकिरार्थंचोद्धृत्य अन्नशेषैश्चकिंकार्यमितिपृच्छेत्तुसद्विजान् । तेइष्टैःसहभोक्तव्यमितिप्रत्युक्तिपूर्वकम् १ प्रदद्युःसकलंतस्मैस्वीकुर्युर्वायथारुचि। कातीयैस्तुतृप्तानुज्ञात्वावक्ष्यमाणप्रकारेणविकिरंदेवेपित्र्येचदत्वाविप्रेभ्यःपितृपूर्वकंसकृदपोदत्वागायत्रींमधुमतीश्च श्रावयित्वातृप्तिप्रश्नःसंपत्तिप्रश्नश्चकार्यः एवंशाखान्तरेप्युत्तरापोशनात्पूर्वमेवविकिरेदानम् बह्वृचानांतुपिण्डान्तेएवविकिरः हिरण्यकेशीयैराचान्तेउक्तः ॥

**ब्राह्मणभोजनान्त्यकर्म**—ब्राह्मणांचें भोजन झाल्यावर प्राचीनावीती करून 'तृप्ताःस्थ' असें ब्राह्मणांस विचारून 'तृप्ताःस्मः' असें ब्राह्मणांनीं प्रतिवचन दिल्यावर 'गायत्री० मधुवाता०' या तीन ऋचा व 'अक्षन्नमि' हे मंत्र श्रवण करवावेत. अथवा 'अक्षन्नमि०' ही ऋचा म्हटल्यावर तृप्तिप्रश्न करून 'श्राद्धसंपन्नं' असें विचारून 'सुसंपन्नं' असें प्रतिवचन मिळाल्यावर पात्रें वाढतांना पिंडाकरितां अन्न काढून ठेवलेलें नसेल तर या वेळीं सर्व अन्नांतून पिंडाकरितां व विकिराकरितां अन्न काढून ठेवावें. शेषान्नाचें काय करावें? असें कर्त्यानें ब्राह्मणांस विचारावें. इष्टांसहवर्तमान भोजन करावें, असें ब्राह्मणांनीं प्रतिवचन पूर्वी देऊन सर्व अन्न श्राद्धकर्त्यास द्यावें, अथवा आपण घ्यावें याप्रमाणें यथारुचि करावें. कात्यायनांनीं तर ब्राह्मण तृप्त झाले हें जाणून पुढें सांगितला जाणारा जो प्रकार त्यानें विकिर देवांकडे व पितरांकडे देऊन ब्राह्मणांस एकवार पितृपूर्वक उदक देऊन

'गायत्री०' व 'मधुमति०' ऋचा हे मंत्र श्रवण करवावे, व तृप्तिप्रश्न व संपत्तिप्रश्न करावे. याप्रमाणें अन्यशाखीयांनींही उत्तरापोशनापूर्वींच विकिर द्यावा. ऋग्वेदीयांनीं पिंडदानानंतरच विकिर द्यावा, ब्राह्मणांनीं आचमन केल्यावर हिरण्यकेशीयांनीं विकिर द्यावा.

ततउच्छिष्टभाग्भ्योन्नंदीयतामित्युक्त्वाविप्राःपात्रस्थंभुक्तशेषंदैविकंदक्षिणे पैतृकंवामेबहिःकृत्य पितृपूर्वंदत्तमुत्तरापोशनममृतापिधानमसीतिकुर्युः पिण्डदानंत्वाचान्तेष्वनाचान्तेषुवाविप्रेषुकार्यम् विप्राश्चमुखप्रक्षालनपूर्वकहस्तप्रक्षालनादिशरावादौकुर्युर्नकांस्यताम्रपात्रयोः शुद्धोदकेनाचम्यकयानइतितृचंजपेयुः ॥

**आपोशन**—यानंतर 'उच्छिष्टभाग्भ्योन्नं दीयतां' असें ब्राह्मणांस सांगितल्यावर ब्राह्मणांनीं भोजन करून शेष राहिलेलें पात्रावरील अन्न उजवीकडे देवाकडच्या ब्राह्मणांनीं पात्राच्या उजवीकडे व पितरांच्या ब्राह्मणांनीं पात्राच्या डावीकडे बाहेर ठेवावें. पितृपूर्वक दिलेलें आपोशन 'अमृता पिधानमसि' या मंत्रानें घ्यावें. ब्राह्मणांनीं आचमन केल्यावर किंवा आचमनाचे पूर्वीं पिंडदान करावें. ब्राह्मणांनीं मुखप्रक्षालन करणें तें शरावांत ( मृत्तिकापात्र ) करावें. कास्यपात्रांत किंवा ताम्रपात्रांत करूं नये. शुद्धोदकानें आचमन करून 'कयान०' या ऋचेचा जप करावा.

अथपिण्डदानम् तच्चार्चनोत्तरमग्नौकरणोत्तरंभोजनोत्तरंविकिरोत्तरं स्वधावाचनोत्तरंविप्रविसर्जनोत्तरमितिषट्पक्षाःस्मृत्युक्ताः तेषांशाखाभेदेनव्यवस्थेतिसिन्धुःतत्राश्वलायनानांभुक्तवत्स्वनाचान्तेष्वाचान्तेषुवाविप्रेषुपिण्डदानंततोविकिरः आपस्तम्बहिरण्यकेशीयादीनांविप्रविसर्जनान्तेपिण्डदानम् कातीयानांविकिरोत्तरमाचान्तेष्वनाचान्तेषुवा तत्राग्निहोमेऽग्निसमीपेपाणिहोमेविप्रसमीपेबह्वृचानांपिण्डदानम् अन्येषांप्रायोविप्रसमीपएव तत्राद्विजोच्छिष्टादुत्तरतोव्याममात्रेऽरत्निमात्रेवापिण्डदानंसंकल्प्य बह्वृचानामेककरेणान्येषांकराभ्यांधृतेन स्फ्येन खादिरकाष्ठेनदर्भमूलेन वाऽपहताअसुराइतिमन्त्रंप्रतिलेखांपठन्प्राग्रेष्यग्रंप्रत्यगपवर्गंपार्वणसंख्ययारेखामेकांद्वित्र्यादिकांवोल्लिख्यप्रत्येकमभ्युक्षेत् पिण्डसंकल्पेरेखाकरणेचसव्यापसव्ययोर्विकल्पः अत्रकातीयैर्येरूपाणीतिमन्त्रेणाग्नौकरणाग्निरुल्मुकंरेखादक्षिणतोनिधेयम् रेखासुसकृदाच्छिन्नंबर्हिर्दक्षिणाग्रमास्तीर्य शुन्धतांपितरःशुन्धन्तांपितामहाइत्यादिमन्त्रैस्तिलोदकंबर्हिष्यासिञ्चेत् अत्रकातीयानांपितरमुकनामगोत्रावनेनिक्ष्वेत्यादिमन्त्राः अन्येषांमार्जयन्तांपितरः सोम्यासइत्यादयोमन्त्राः ॥

**पिण्डविधि**—ब्राह्मणांची पूजा केल्यावर, अग्नौकरणानंतर, भोजनोत्तर, विकिर दिल्यावर, स्वधावाचनानंतर किंवा ब्राह्मणांचें विसर्जन केल्यानंतर, असे पिण्डदान करण्याचे जे सहा पक्ष स्मृतींत सांगितले आहेत, त्यांची व्यवस्था शाखापरत्वें जाणावी, असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. त्यांत ब्राह्मण जेवले असतां आचमनाच्या पूर्वीं किंवा आचमनानंतर आश्वलायनांनीं पिंडदान करून विकिर द्यावा.

आपस्तंब, हिरण्यकेशीय, इत्यादिकांनीं ब्राह्मणांचें विसर्जन केल्यावर पिंडदान करावें. कात्यायनांनीं विकिर दिल्यावर आचमन करून किंवा आचमनापूर्वी—त्यामध्यें ऋग्वेद्यांनीं अग्नींत अग्नौकरण केलें असतां अग्नीच्या सन्निध व पाणिहोम असेल तर ब्राह्मणांच्या सन्निधच पिंडदान करावें व अन्यशाखीयांनीं बहुधा ब्राह्मणांच्या सन्निधच करावें. ब्राह्मणांच्या उष्टयापासून उत्तरेकडे चार हात किंवा अरत्निप्रमाणप्रदेशीं, पिंडदानाचा संकल्प करून ऋग्वेद्यांनीं एका हातानें व अन्यशाखीयांनीं दोन हातांनीं धरलेल्या खैराच्या काष्ठाच्या कुदलीनें (स्फिय) किंवा दर्भमूलानें 'अपहता असुरा०' हा मंत्र प्रत्येक रेषेच्या वेळीं म्हणून, आग्नेयीस अग्रें व पश्चिमेस समाप्ति होईल म्हणजे पश्चिमसंस्था अशीं—जितकीं पार्वणें असतील तितक्या म्हणजे—एक, दोन अथवा तीन इत्यादि रेषा काढून प्रत्येक रेषेवर पाणी शिंपडावें. पिंडसंकल्प व रेखाकरण यांविषयीं सव्य व अपसव्य यांचा विकल्प आहे. या स्थलीं कात्यायनांनीं 'ये रूपाणि' या मंत्रानें अग्नौकरणाग्नीचें कोलित रेषेच्या दक्षिणभागीं ठेवावें. रेखांवर एक वेळ छिन्न केलेला बर्हि ( दर्भमुष्टि ) दक्षिण दिशेस अग्रें होतील असा पसरून 'शुन्धन्तां पितरः शुन्धन्तां पितामहाः' या शब्दांनीं त्या दर्भबर्हीवर तिलोदक सिंचन करावें. या स्थळीं कात्यायनांस 'पितुरमुकनाम गोत्रावने निक्ष्व' इत्यादि मंत्र आहेत व इतर शाखीयांस 'मार्जयन्तां पितरः सोम्यासः' इत्यादि मंत्र आहेत.

अग्नौकरणशेषयुतसर्वान्नेनमधुसर्पिस्तिलमिश्रेणपिण्डान्पत्न्याकारयित्वारेखायांपराचीनपाणिनापितृतीर्थेनपित्रादिभ्योदद्यात् एतत्तेऽस्मत्पितर्यथानामगोत्ररूपयेचत्वामत्रानुपित्रेअमुकनामगोत्ररूपायायंपिण्डःस्वधानमस्तेभ्यश्चगयायांश्रीरुद्रपदेदत्तमस्त्वित्यादिमन्त्रैरूहेण अत्रकेषांचित्पिण्डपात्रावनेजनंपात्रन्युब्जीकरणंच केचित्पिण्डेषुमाषान्नंवर्जयन्ति ततोलेपभाक्तृप्तयेहस्तलेपंपिण्डदर्भमूलेषुनिमृज्यात्रपितरोमादयध्वंयथाभागमावृषायध्वमितिपिण्डान्सकृदनुमन्त्र्यसव्यपार्श्वेनोदङ्ङावृत्त्ययथाशक्तिप्राणान्नियम्यपर्यावृत्यामीमदन्तपितरतितथैवानुमन्त्र्यसव्येनपिण्डशेषमाघ्रायाचम्यान्यपवित्रेधृत्वापसव्येनशुन्धन्तामित्यादियथासूत्रंजलनिनयनंपूर्ववत्कुर्यात् अत्रभुक्तशेषान्नाभावेद्रव्यान्तरेणपिण्डदानंकार्यम् कपित्थबिल्वकुक्कुटाण्डामलकबदराणांमध्येशक्तितोन्यतमप्रमाणाःपिण्डाः केचित्पार्वणपिण्डत्रयेयथोत्तरंप्रमाणाधिक्यमाहुः तथाहस्तलेपाभावेपिदर्भेषुहस्तंनिमृज्यादेवेतिमेधातिथिः एकोद्दिष्टश्राद्धेषुदर्भलेपोनेतिसुमन्तुः अत्रनीवीविस्त्रंसनमभ्यञ्जनादीतिकेचित् पिण्डपूजनान्तेउपस्थानात्प्राक्नीवीविस्त्रंसइतिसागरे ॥

**पिण्डकृति**—अग्नौकरणाचे शेषासहित सर्व अन्नांत मध, घृत, तिल हे मिश्रित करून त्या अन्नाचे पिंड स्त्रीकडून करवून ते रेखेवर पराचीन म्हणजे उतरत्या हातानें पितृतीर्थासह पिता इत्यादिकांस देतांना 'एतत्तेस्मत् पितर्यथानामगोत्ररूपयेचत्वामत्रानु पित्रे अमुक नामगोत्ररूपायायं पिंडः स्वधानमस्तेभ्यश्च गयायां श्रीरुद्रपदेदत्तमस्तु ' असें म्हणून ऊहानें द्यावे. या पिंडदानांत कित्येकांस पिंडपात्र प्रक्षालन

करणें व पात्र उपडें करणें हीं सांगितलीं आहेत. कित्येक पिंडांविषयीं माषान्न वर्ज्य करितात. नंतर जे लेप करण्यास योग्य असतील त्यांच्या तृप्तीसाठीं हस्तलेप पिंडाच्या दर्भांचे मूलांचे ठायीं पुसून, 'अत्रपितरो मादयध्वं यथाभाग मावृषायध्वं' असा मंत्र म्हणून व पिंडाचें एकवार अनुमंत्रण करून उजव्या पार्श्व भागानें उत्तरेकडे वळावें आणि यथाशक्ति प्राणांचा रोध करून पुनः फिरून 'अमीमदंत पितर०' हा मंत्र म्हणून तसेंच अनुमंत्रण करावें व सव्यानें पिंडशेष हुंगावे. नंतर आचमन करून दुसरीं पवित्रकें धारण केल्यावर अपसव्यानें 'शुन्धन्तां०' इत्यादि जसें सूत्र असेल तसें पूर्वींप्रमाणें उदकासिंचन करावें. या पिंडदानाविषयीं ब्राह्मणांनीं भोजन केल्यावर —जर अन्नशेष नसेल तर—दुसऱ्या द्रव्यानें पिंडदान करावें. कवठ, बेलफळ, कुक्कुटांड, (कोंबडीचें अंडें) आंवळा व बोर यांपैकीं यथाशक्तीनें कोणत्या तरी एका प्रमाणाचे पिंड करावे. त्रयीच्या तीन पिंडांविषयीं पहिल्यापेक्षां दुसरा मोठा, असें उत्तरोत्तर अधिक प्रमाण सांगतात. हस्तलेपाचा अभाव असल्यास दर्भांचे ठायीं हस्त पुसावाच असें मधोतिथि सांगतो. व एकोद्दिष्ट श्राद्धांत हस्तलेप नाहीं असें सुमंतु म्हणतो. येथें नेसलेल्या वस्त्राची गांठ सोडून अभ्यंजनादिक करावें असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. पिंडाची पूजा केल्यावर व उपस्थानाच्यापूर्वीं नीवी (कमरेच्या धोतराची) गांठ सोडावी, असें श्राद्धसागरांत म्हटलें आहे.

**अथास्मत्पितरमुकनामगोत्ररूपाभ्यङ्क्ष्वेतियथालिङ्गमन्त्रावृत्त्यापिंडेषुतैलं-वृतंवाभ्यञ्जनंदर्भैर्दत्वातथैवाङ्क्ष्वेतिकज्जलंदद्यात् आपस्तम्बानामादावञ्जनंततो-भ्यञ्जनम् एतद्वःपितरोवासइतिमन्त्रंप्रतिपिण्डंपठन्वासोदशांवात्रिगुणसूत्रंवा-प्रतिपिण्डेदद्यादितिहेमाद्रिः सकृन्मन्त्रंपठन्सकृदेवदद्यादित्यन्ये कातीयैस्तु-मन्त्रेणप्रतिपिण्डंनामगोत्राद्युच्चार्यत्रिगुणंसूत्रंदेयम् ततः कशिपूपबर्हणेनिवेद्या-स्मत्पितृभ्यइतिचतुर्थ्याक्षतगन्धपुष्पधूपदीपसर्वप्रकारकनैवेद्यताम्बूलदक्षिणादि-भिर्पिण्डपूजांसव्येनापसव्येनवाकुर्यात् यत्किंचित्पच्यतेभक्ष्यंभोज्यमन्नमग-र्हितम्। अनिवेद्यनभोक्तव्यंपिण्डमूलेकथंचन १ ततोनमोवःपितरइषेत्यादिमन्त्रैः पिण्डानुपस्थायोत्तानहस्तेनपरेतनइतिमन्त्रेणसकृद्दुक्तेनयुगपत्प्रवाहयेत् ॥**

**पिण्डपूजा**—यावर "अस्मत् पितरममुकनामगोत्ररूपाभ्यंक्ष्व" याप्रमाणें जसा लिंग-भेद असेल त्याप्रमाणें मंत्रावृत्तीनें पिंडांना तेल अथवा घृत यांचें अभ्यंजन दर्भांनीं देऊन व 'अंक्ष्व' असें म्हणून काजळ द्यावें. आपस्तंबांनीं पूर्वीं अंजन व नंतर अभ्यंजन द्यावें. 'एतद्वः पितरोवासो०' हा मंत्र प्रत्येक पिंडास पठण करून वस्त्र अथवा वस्त्राची दशा किंवा त्रिगुणसूत्र प्रत्येक पिंडास द्यावें, असें हेमाद्रींत म्हटलें आहे व एकच वेळ मंत्र म्हणून एकच वेळ द्यावें, असेंही कांहीं ग्रंथकार म्हणतात. कात्यायनांनीं प्रत्येक पिंडास नामगोत्रादिकांचा उच्चार करून मंत्रानें त्रिगुणसूत्र द्यावें. नंतर गादी, उशी, वगैरे पदार्थ निवेदन करून 'अस्मत् पितृभ्यः' अशा चतुर्थी विभक्तीनें अक्षता, गंध, पुष्प, धूप, दीप, सर्व प्रकारचा नैवेद्य, तांबूल व दक्षिणा, इत्यादि उपचारांनीं पिंडांची पूजा सव्यानें किंवा अप-

सव्यानें करावी. भक्ष्य, भोज्य असें शुद्ध अन्न जें सिद्ध केलें असेल तें पिंडांच्या पुढें निवेदन केल्याशिवाय कधींही भक्षण करूं नये. नंतर 'नमोवः पितर इषे०' या मंत्रानें पिंडांची प्रार्थना करून उताण्या हातानें 'परेतनः०' हा मंत्र एकदां म्हणून एकदम पिंड लोटावे.

ततोदक्षिणाग्निहोमपक्षेऽग्नेतमद्याश्वमित्यग्निसमीपमागत्यदन्तरिक्षमितिमन्त्रेणगार्हपत्योपस्थानम् औपासनेहोमपक्षेगार्हपत्यपदरहिततन्मन्त्रेणोपस्थानम् इदंबह्वृचानामेव पाणिहोमेतुतेषामपिनास्त्येव वीरंमेदत्तपितरइतिमन्त्रेणमध्यममेकंपिण्डंपार्वणद्वयेमध्यपिण्डद्वयमन्वष्टक्यादौमध्यपिण्डत्रयमादायपत्न्यैदद्यात् पत्नीआधत्तपितरइतिमन्त्रेणसकृत्पठितेनैवापिण्डमेकमनेकंवाप्राशयेत् आपस्तम्बस्त्वपांत्वौषधीनांरसंप्राशयामिभूतकृतंगर्भंधस्त्वेतिमध्यपिण्डंपत्न्यैप्रयच्छति प्राशनमन्त्रःसएव यथेहपुरुषोअसदितिपाठमात्रंभिद्यते इत्थमेवकातीयानाम् इदंभार्यायाःपिण्डप्राशनंप्रजाकामत्वएव केचिन्नित्यमाहुः भार्यानेकत्वेपिण्डंविभज्यप्रतिपत्निमन्त्रेणप्राशयेत् पार्वणद्वयेपिण्डद्वयंद्वाभ्यांदेयम् पत्नीबहुत्वेगुणतोवयसाचयोग्यायैपिण्डोदेयः बह्वीनांयोग्यत्वेएकस्मिन्दर्शेएकस्यैअन्यस्मिन्नपरस्यैइति पत्नीरुग्णान्यदेशस्थागर्विणीसूतिकापिवा । तदातंजीर्णवृषभश्छागोवाभोक्तुमर्हति १ इतरौजलेक्षिपेत् पुत्रादिकामनाभावेक्षिपेदग्नौजलेपिवा। पिण्डांस्तुगोजविप्रेभ्योवायसेभ्यःप्रदापयेत् १ तीर्थश्राद्धेसदापिण्डान्क्षिपेत्तीर्थेसमाहितः ॥

**प्रजाकामत्वाथ पिण्डभक्षण**—दक्षिणाग्नींत होम करण्याचा पक्ष असेल तर 'अग्नेतमद्याश्व०' हा मंत्र म्हणून अग्नीच्या संनिध यावें व 'अदंतरिक्षं०' या मंत्रानें गार्हपत्याग्नीचें उपस्थान करावें. गृह्याग्नींत होम करण्याचा पक्ष असल्यास गार्हपत्यपदरहित मंत्र म्हणून उपस्थान करावें. हें उपस्थान ऋग्वेदीयांसच आहे. पाणिहोम असेल तर ऋग्वेदीयांसही उपस्थान नाहींच. 'वीरं मे दत्त पितरः' या मंत्रानें मध्यपिंड एक किंवा दोन व अन्वष्टक्यादि श्राद्धांत मधले तीन पिंड घेऊन पत्नीस द्यावेत. नंतर पत्नीनें 'आदत्त पितरः' या एकदां म्हटलेल्या मंत्रानें एक किंवा अनेक पिंड खावे. आपस्तंब तर 'अपांत्वौषधीनां रसंप्राशयामि भूतकृतं गर्भंदत्स्व' या मंत्रानें मध्यम पिंड पत्नीस द्यावा असें सांगतो. खाण्याचा मंत्र तोच पण त्याचा 'यतेहपुरुषोअसत्' असा निराळा पाठ मात्र होतो. असा कात्यायनांचा निर्णय जाणावा. प्रजाकामत्व म्हणजे संततीची इच्छा असेल तरच स्त्रियेस हे पिंड खायला सांगितलें आहे. कित्येकांच्या मतें तें नित्य आहे. भार्या अनेक असतील तर पिंड विभागून प्रत्येक स्त्रियेनें मंत्रानें प्राशन करावा. दोन भार्या असतील तर दोन पिंड दोन स्त्रियांस द्यावे. बहुत स्त्रिया असतील तर गुणांनीं व वयानें योग्य असेल तिलाच पिंड द्यावा. बहुत योग्य असतील तर एका दर्शांत एकीस व दुसऱ्या दर्शांत दुसरीस याप्रमाणें द्यावा. पत्नी रोगट, देशांतरीं राहणारी, गर्भिणी किंवा बाळंतीण असेल तर वृद्ध बैल किंवा बोकड यांजकडून तो पिंड भक्षण करवावा-

इतर दोन पिंड उदकांत टाकावे. पुत्रादिकांची इच्छा नसेल तर अग्नि किंवा जल यांत पिंड टाकावेत. अथवा गाई, बोकड किंवा कावळे यांस द्यावे. तीर्थी श्राद्ध असतां सर्वकाल पिंड तीर्थांत टाकावे.

अथपिण्डोपघातेश्वसृगालखरैःस्पृष्टःपिण्डोभिन्नःप्रमादतः । मार्जारमूषकैः-स्पृष्टश्चाण्डालपतितादिभिः ॥ १ ॥ प्राजापत्यंचरेत्स्नात्वापुनःपिण्डान्यथाविधि । पाकान्तरेणतेनपाकेनवापिण्डदानमात्रंपुनःकार्यंनसर्वश्राद्धावृत्तिरितिसर्वसंमतम् काकस्पर्शेतुनदोषः ॥

**पिण्डोपघात**— आतां पिंडोपघाताविषयीं सांगतों. कुत्रा, कोल्हा, गर्दभ, मांजर, उंदीर, चांडाल व पतित इत्यादिकांनीं पिंडास स्पर्श केला असतां व प्रमादानें पिंड फुटला असतां स्नान करून प्राजापत्य प्रायश्चित करावें. व दुसऱ्या पाकानें किंवा त्याच पाकानें पिंडदान मात्र पुनः करावें, सर्व श्राद्धाची आवृत्ति करूं नये, हें सर्वसंमत आहे. कावळ्याचा स्पर्श होईल तर दोष नाहीं.

अथपिण्डनिषेधः । विवाहव्रतचूडासुवर्षमर्धंतदर्धकम् । संस्कारेषुतथान्येषुवृद्धि-मात्रेचमासकम् ॥ १ ॥ पिण्डदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणम् श्राद्धाङ्गतर्पणं-नित्यतर्पणंचतिलैर्नकार्यमित्यर्थः महालयेगयायांपित्रोःप्रत्यब्देयस्यकस्यापि-मृतस्यसपिण्डीषोडशमासिकान्तेषुप्रेतकृत्येषुकृतमङ्गलोपिपिण्डान्दद्यात् केचित्-भ्रात्रादिवार्षिकेप्याहुः पिण्डयज्ञेचयज्ञेचसपिण्ड्यांदद्युरेवच । तथाविकृतावन्व-ष्टकादौयत्रपुनःपिण्डदानविधिःयत्रवापूर्वेद्युःश्राद्धादौपिण्डपितृयज्ञविकृतित्वंत-त्रापिनपिण्डदाननिषेधइतिसिन्धुः तेनाष्टकाश्राद्धेपिननिषेधइतिभाति अयंच-मङ्गलोत्तरंपिण्डदानतिलतर्पणनिषेधस्त्रिपुरुषसपिण्डानामितिभाति ॥

**पिण्डनिषेध**—विवाह, उपनयन, चौल हीं झालीं असतां अनुक्रमें एक वर्ष, सहा महिने व तीन महिने आणि इतर संस्कार व केवळ वृद्धि-श्राद्ध असतांही एक मासपर्यंत पिंडदान, मृत्तिकास्नान, तिलतर्पण हीं करूं नयेत. श्राद्धांगतर्पण व नित्यतर्पण हीं तिलांनीं करूं नयेत असा याचा अर्थ आहे. मंगल-कार्य केलेल्यांनीं—महालय, गयाश्राद्ध, मातापितरांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, कोणीही मृत झाल्यास त्याची सपिंडी व षोडश मासिकांतलीं प्रेतकृत्यें यांत पिंडदान करावें. भ्राताइत्यादिकांचे वार्षिक श्राद्धीं पिंडदान करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. पिंडयज्ञ, यज्ञ व सपिंडी यांत पिंड द्यावेतच. त्याचप्रमाणें विकृतिरूप अन्वष्टका इत्यादिक जेथें पुनः पिंडदानविधि सांगितला आहे. किंवा जेथें पूर्वेद्युः श्राद्धादिकांत पिंड-पितृयज्ञास विकृतित्व सांगितलें आहे तेथेंही पिंडदानाचा निषेध नाहीं असें निर्णय-सिंधूंत जें सांगितलें आहे, यावरून अष्टकाश्राद्धींही पिंडदानाचा निषेध नाहीं असें वाटतें. मंगलकार्य केल्यावर पिंडदान व तिलतर्पण यांचा जो निषेध सांगितला आहे, तो त्रिपुरुष सपिंडांसच आहे असें वाटतें.

अथपिण्डोद्वासनान्तेविकिरोदेयः उपवीतीदैविकद्विजसन्निधौसदर्भभुवि असोमपाश्चयेदेवाइतिमन्त्रेणसजलयवमन्नंविकिरेत् प्राचीनावीतीपित्र्यद्विज-सन्निधौसदर्भभुवि येअग्निदग्धायेअनग्निदग्धेतिऋचासतिलमन्नंविकीर्य अग्नि-दग्धाश्चयेजीवायेप्यदग्धाःकुलेमम। भूमौदत्तेनतृप्यन्तुतृप्तायान्तुपरांगतिम् १ इतिकातीयसौत्रमन्त्रेणसतिलजलेनप्लावयेत् पिण्डवद्विकिरोपिसार्ववर्णिकान्नस्यैव केचिदसोमपाइतिदैवेविकिरंदत्वा असंस्कृतप्रमीतायेतिपौणरामन्त्रेणपित्रेदत्वा-येअग्निदग्धाइत्यृचापृथगुच्छिष्टपिण्डंकुशोपरिदद्यादित्याहुः ॥

**पिण्डाविसर्जन व विकिर**—उपवीति होऊन देवाकडील ब्राह्मणाजवळ भूमीवर दर्भ द्यावा व त्यावर 'असोमपाश्चयेदेवाः०' या मंत्रानें उदक व यव यांनीं युक्त असलेलें अन्न टाकावें. प्राचीनावीती करून पितरांकडचे ब्राह्मणाजवळ भूमीवर दर्भ देऊन त्यावर 'ये अनग्निदग्धा' या मंत्रानें तिलांसहित अन्न टाकावें व 'अग्निदग्धाश्च येजीवाः याप्यदग्धः कुलेमम भूमोदत्तेन तृप्यन्तु' या कात्यायनसूत्रोक्त मंत्रानें सतिलजलानें तें अन्न भिजवावें. पिंडाप्रमाणें विकिरही सर्व अन्नाचाच द्यावा. 'असोमपा०' या मंत्रानें देवांकडे विकिर देऊन 'असंस्कृत प्रमीताये०' या पौराणमंत्रानें पितराकडे द्यावें आणि 'ये अग्निदग्धा०' या ऋचेनें निराळा उच्छिष्ट पिंड दर्भावर द्यावा, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात.

हस्तौप्रक्षाल्य द्विराचम्यान्यपवित्रेधृत्वाहरिंस्मरेत् विकिरंपृथगेवनिष्कास्य-केभ्यउत्सृजेदितिकाशिका देवद्विजहस्तेशिवाआपःसन्त्वित्यादिभिरपोगन्ध-पुष्पयवान्दत्वाभूमौतेषुत्यक्तेष्वन्येक्षताआशीरर्थंदेयाः एवंपित्र्यहस्तेष्वपसव्ये-नापोगन्धपुष्पतिलदानादिकृत्वासव्येनामुकगोत्रशर्माहमभिवादयामिअस्म-द्गोत्रंवर्धतामित्यादि केचिदत्रपित्र्यहस्तेगन्धतिलादिदानंसव्येनाहुः कातीया-स्तुहस्तेऽक्षतदानान्तेअक्षय्योदकंदत्वाअघोराःपितरःसन्त्वित्युक्त्वाभिवादनं-दातारोनोभिवर्धन्तामित्यादिकमाहुः ॥

**ब्राह्मणाशीर्वादाक्षतादान**—नंतर हस्त प्रक्षालन करून दोनदां आचमन करावें, व दुसरीं पवित्रकें धारण करून हरीचें स्मरण करावें. विकिराचें अन्न निराळेंच काढून कावळ्यास द्यावें असें काशिका ग्रंथांत आहे. देवाकडच्या ब्राह्मणांचे हातांवर 'शिवाआपःसन्तु' इत्यादि वाक्यांनीं उदक, गंध, पुष्प व यव देऊन ब्राह्मणांनीं ते भूमीवर टाकल्यावर आशीर्वादाकरितां अक्षता द्याव्या. याप्रमाणें पितराकडचे ब्राह्मणाचे हातावर अपसव्यानें उदक, गंध, पुष्प, तिल इत्यादिक देऊन सव्यानें 'अमुक गोत्रशर्माहमभिवादयामि अस्मत् गोत्र-वर्धतां' इत्यादि म्हणावें. पितरांकडचे ब्राह्मणाचे हातावर गंध, तिल, इत्यादि देणें तें सव्यानें द्यावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. हातावर अक्षता दिल्यावर अक्षय्यो-दक घेऊन 'अघोराः पितरःसंतु' असें म्हणून अभिवादन केल्यावर 'दातारोनोभि-वर्धतां' असें म्हणण्यास कात्यायनशाखी सांगतात.

एवमाशिषोगृहीत्वाक्षतान्मूर्धनिधृत्वास्वयंशिष्यादिभिर्वाभोजनपात्राणि-चालयित्वाचामेत् अनुपनीतोनारीचासजातिश्चनचालयेत् सव्येनदैवेपित्र्येच-स्वस्तिवाचनम् देवेभ्य:स्वस्तीतिब्रूत पितृभ्योऽमुकनामगोत्रादिभ्य:स्वस्तीतिब्रू-तेति तत:सव्यापसव्याभ्यांतत्तदुच्चारपूर्वकमक्षय्योदकदानम् ततोन्युब्जपात्रमु-त्तानंकृत्वातत:परंसर्वमुपवीत्येवकुर्यात् द्विजेभ्य:सकर्पूरताम्बूलादिदत्वापितृ-पूर्वकंनामगोत्राद्युच्चार्यदक्षिणांदद्यात् अमुकशर्माहममुकनामगोत्रपित्रादिस्थानो-पविष्टायविप्रायरजतदक्षिणांप्रतिपादयामीत्यादि दैवेसुवर्णम् अशक्तावुभयत्र-यज्ञोपवीतंदक्षिणादक्षिणा:पान्त्वित्युक्त्वास्वधांवाचयिष्येइतिपृष्ट्वावाच्यता-मित्युक्तेपितृपितामहेत्यादुच्चार्यस्वधोच्यतामित्युक्त्वाऽस्तुस्वधेतितैरुक्तेपिण्ड-समीपेजलंनिषिच्यस्वधासंपद्यन्तामितिसंपत्तिंवाचयेत् कातीयसूत्रेदातारोनो-भिवर्धन्तामित्याशिषोर्थनंस्वधावाचनंन्युब्जपात्रमुत्तानीकरणंदक्षिणादानंचेति क्रम: ॥

**स्वधावाचन**—याप्रमाणें आशीर्वाद घेऊन व अक्षता मस्तकावर धारण करून आपण स्वत: भोजनपात्रें काढून किंवा शिष्यादिकांकडून काढवून आचमन करावें. उपनयन न झालेल्यानें, स्त्रिया व विजातीयानें भोजनपात्रें काढूं नयेत. नंतर सव्यानें देवांकडे व पितरांकडे 'देवेभ्य: स्वस्तीतिब्रूत' 'पितृभ्योमुकनामें-गोत्रादिभ्य: स्वस्तीति ब्रूत' असें स्वस्तिवाचन करावें. नंतर सव्यानें व अपसव्यानें तो तो उच्चार पूर्वी करून अक्षय्य उदक द्यावें. यानंतर उपडें ठेवलेलें पात्र उताणें करावें व यापुढील सर्व कर्म उपवीतीनेंच करावें. ब्राह्मणांस कर्पूरयुक्त तांबूल इत्यादि दिल्यावर पितृपूर्वक नामगोत्र इत्यादिकांचा उच्चार करून दक्षिणा द्यावी. 'अमुक शर्माहममुकनामगोत्रपित्रादि स्थानोपविष्टाय विप्राय रजतदक्षिणां प्रतिपादयामि' असें दक्षिणा देतांना म्हणावें. देवाकडील ब्राह्मणास सुवर्णदक्षिणा द्यावी. शक्ति नसेल तर दोहोंकडे यज्ञोपवीतदक्षिणा द्यावी. 'दक्षिणा: पांतु' असें म्हणून व 'स्वधा वाचयिष्ये' असा प्रश्न करून 'वाच्यतां' असें प्रतिवचन मिळाल्यावर 'पितृपितामह' इत्यादिक उच्चार करावा. 'स्वधोच्यतां' असें म्हणून 'अस्तु स्वधा' असें ब्राह्मणांनीं प्रतिवचन दिल्यावर पिंडासमीप उदक सिंचन करून 'स्वधासंपद्यन्तां' असें संपत्ति-वाचन ब्राह्मणांकडून वदवावें. 'दातारो नोभिवर्धन्तां' या मंत्रानें आशीर्वाद मागावे व नंतर स्वधावाचन, उपडें पात्र उताणें करणें व दक्षिणा देणे असा क्रम कात्यायन-सूत्रांत सांगितला आहे.

ततोदेवादिप्रीतिंवाचयित्वापिण्डस्थानेऽक्षतादिक्षिप्त्वासव्येनैववाजेवाजेइति मन्त्रेणोत्तिष्ठन्तुपितरोविश्वेदेवै:सहेतियुगपद्व्र्मेणपितृपूर्वंविप्रान्स्पृशन्विसृजेत् आमावाजस्येतिप्रदक्षिणीकृत्य ततोदातारोनोभिवर्धन्तामित्यादिवरयाचनम् येषांविसर्जनान्तेपिण्डदानंतेषामाचान्तेषु सौमनस्यदक्षिणादिकाक्षय्यस्व-धावाचनान्तेदातारोनोभिवर्धन्तामित्यादि तत: पिण्डदानादीतिक्रम: हिरण्य-केशीयानांपिण्डदानादिप्रयोगोविस्तृतत्वान्नोक्त: । विप्रैर्वरेदत्तेस्वादुषंस०

ब्राह्मणासःपितरः० इतिमन्त्रौपठेत् विप्राः इहैवस्तं० आयुःप्रजामितिवदेयुः आशीर्भिर्नन्दितोविप्रान्पादाभ्यङ्गादिनासंतोष्यनत्वाऽद्यमेसफलंजन्म० मन्त्रहीनं० यस्यस्मृत्येत्यादिविष्णुस्मरणपूर्वकंकर्मार्पयित्वाविप्रान्क्षमापयेत् अष्टौपदान्यनुव्रज्यदक्षिणीकृत्यचागतः दीपंहस्तेननिर्वाप्यपवित्रत्यागपूर्वकम् ॥१॥ पादशुद्धिर्द्विराचामेदुच्छिष्टोद्वासनंततः । बह्वृचोवैश्वदेवंतुयथाविधिचरेत्ततः ॥ २ ॥ ततस्तुवैश्वदेवान्तेसभृत्यसुतबान्धवः भुञ्जीतातिथिसंयुक्तःसर्वंपितृनिषेवितम् ॥ ३ ॥ श्राद्धशेषान्नंशिष्यायज्ञातिभ्यश्चदेयम् नशूद्राय द्विजभुक्तावशिष्टंतुशुचिभूमौनिखानयेत् ॥

**ब्राह्मणाशीर्वादग्रहण**—आचमन केल्यावर—सौमनस्य दक्षिणादिक अक्षय्य स्वधावाचनाचें कर्म झाल्यावर, 'दातारो नोभिवर्धंतां' असें म्हणून पिंडदानादिक कर्म करावें, असा क्रम आहे. हिरण्यकेशीयांचा पिंडदानादिक प्रयोग विस्तृत असल्यामुळें तो येथें सांगितला नाहीं. ब्राह्मणांनीं वर दिल्यावर 'स्वादुषं स० ब्राह्मणः सः पितरः०' हे मंत्र पठण करावे. ब्राह्मणांनीं 'इहैवस्तं० आयुः० प्रजां०' हे मंत्र म्हणावे. आशीर्वादांनीं आनंदित होऊन ब्राह्मणाचे पायास अभ्यंगादिक लावून ब्राह्मणांस संतुष्ट करावें व नमस्कार करून 'अद्यमे सफलं जन्म० मंत्रहीनं यस्यस्मृत्या०' इत्यादि मंत्र म्हणून विष्णूचें स्मरण करावें व सर्व कर्म ईश्वरास अर्पण करून ब्राह्मणांची क्षमा मागावी. ब्राह्मणांच्या पाठीमागून त्यांना उजवें घालून स्वस्थानीं यावें. पवित्रें काढून टाकून हातानें दीप मालवावा व पादप्रक्षालन करून दोनदां आचमन केल्यावर उष्टीं काढावीत व मग ऋग्वेद्यानें यथाविधि वैश्वदेव करावा. वैश्वदेव झाल्यावर सेवक, पुत्र, बांधव, अतिथि यांसह पितरांनीं सेविलेल्या अन्नाचें भोजन करावें. श्राद्धशेषान्न ज्ञाति व शिष्य यांसच द्यावें, शूद्रास देऊं नये. ब्राह्मणांनीं भोजन करून शेष राहिलेलें अन्न शुद्ध भूमींत पुरावें.

अत्रपर्वादौनिषिद्धंमाषाद्यपिभोक्तव्यंवैधत्वेननिषेधाप्रवृत्तेरितिकेचित् अनिषिद्धभोजनेनापिश्राद्धशेषभोजनविधिसिद्धिरित्यन्ये श्राद्धशेषभोजनाकरणेदोषः श्राद्धदिनेउपवासनिषेधाच्छ्राद्धशेषाभावेपाकान्तरेणभोजनम् एकादश्यादाववघ्राणम् यत्रतूपवासोनावश्यकस्तत्रैकभक्तम् श्राद्धशेषंदिवैवभोक्तव्यंनरात्रौ तेननक्तव्रतेऽवघ्राणमेव श्राद्धावशिष्टभोक्तारस्तेवैनिरयगामिनः । सगोत्राणांसकुल्यानांज्ञातीनांचनदोषकृत् १ ब्रह्मचारियतिविधवानांनित्यंनिषिद्धम् ज्ञातिगोत्रसंबन्धिभिन्नगृहेश्राद्धशेषभोजनेप्राजापत्यंप्रायश्चित्तम् यतीनांवपनंलक्षप्रणवजपश्चगुरोर्योगिनोवाश्राद्धशेषंगृहिणोनदोषाय नशूद्रंभोजयेत्तस्मिन्गृहेयत्नेतनद्दिने। श्राद्धशेषंनशूद्रेभ्यःप्रदद्यादखिलेष्वपि ॥१॥ इतिश्रीमदनन्तोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिन्धुसारेपार्वणश्राद्धप्रक्रिया ॥

**श्राद्धशेषान्नभक्षण**—निषिद्ध असें जें माषादिक अन्न तें श्राद्धदिवशीं व पर्वादि दिवशीं सेवन करावें. जें विधीनें प्राप्त झालें त्यास निषेधाची प्रवृत्ति नाहीं, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. अनिषिद्ध भोजनानें श्राद्धशेष-

भोजनाचे विधीची सिद्धि होते, असें दुसरे ग्रंथकार म्हणतात. श्राद्धशेषाचें भोजन न केल्यास दोष प्राप्त होतो. श्राद्धदिवशीं उपोषणाचा निषेध असल्यानें श्राद्धशेषाचा अभाव असेल तर दुसरा पाक करून भोजन करावें. एकादशी, इत्यादि दिवशीं अवघ्राण ( हुंगणें ) करावें. ज्या दिवशीं उपोषण आवश्यक नाहीं त्या दिवशीं एकभुक्त करावें. श्राद्धशेष दिवसासच भक्षण करावा. रात्रीं भक्षण करूं नये. यावरून नक्तव्रत असतांहि अवघ्राणच करावें. श्राद्धशेषाचें भोजन न करणारे नरकास जातात. पण सगोत्र, सकुल्य व ज्ञाति यांस श्राद्धशेषभोजनाचा दोष नाहीं. ब्रह्मचारी, संन्यासी व विधवा यांस नेहमींच निषेध आहे. ज्ञाति, सगोत्र व संबंधी यांहून इतरांच्या घरीं श्राद्धशेषाचें भोजन केल्यास प्राजापत्य प्रायश्चित्त करावें. संन्याशानें वपन व एक लक्ष प्रणवाचा जप करावा. गुरु किंवा योगी यांचा श्राद्धशेष गृहस्थाश्रमी पुरुषास दोषकारक नाहीं. श्राद्धदिवशीं श्राद्धघरीं शूद्रास भोजन देऊं नये. कोणत्याही श्राद्धांत शूद्रास श्राद्धशेष देऊं नये. याप्रमाणें अनन्तोपाध्यायाचा मुलगा जो काशीनाथोपाध्याय त्यानें रचिलेल्या धर्मसिन्धुसारांतली पार्वणश्राद्धप्रक्रिया येथें पुरी झाली.

**अथश्राद्धदिनेवैश्वदेवनिर्णयः । तत्रतावच्छ्रौताग्निमतांबह्वृचानांश्राद्धात्पूर्वंपृथक्पाकेनवैश्वदेवः स्मार्ताग्निमतांनिरग्निकानांचबह्वृचानांश्राद्धान्तएवश्राद्धशेषेणपृथक्पाकेनवा कातीयानांतुस्मार्तश्रौताग्निमतांश्राद्धीयपाकेनपूर्वमेव निरग्निकानामन्तेश्राद्धशेषेणपृथक्पाकेनवा तैत्तिरीयाणांतुसाग्निकानांसर्वत्रादौवैश्वदेवः पञ्चमहायज्ञास्त्वन्ते अन्येषामादावन्तेवेतिविकल्पः तैत्तिरीयाणामेववैश्वदेवात्पञ्चयज्ञाभिन्नाः सर्वशाखिनांवृद्धिश्राद्धेपाकेनक्रियमाणेपूर्वमेववैश्वदेवः बह्वृचानामन्तेवापूर्ववा आमादिनावृद्धिश्राद्धेसर्वेषांपूर्वमन्तेवेतिभाति नित्यश्राद्धेपूर्वमेव एकादशाहाद्येकोद्दिष्टेषु साग्निरनग्निश्चसर्वोपिश्राद्धशेषंद्विजार्थीनंकृत्वापाकान्तरेणैववैश्वदेवादिकुर्यात् ॥**

**श्राद्धदिनवैश्वदेवनिर्णय**—श्रौताग्नींनीं युक्त असलेल्या सर्व ऋग्वेद्यांनीं निराळा पाक करून श्राद्धाच्या पूर्वीं वैश्वदेव करावा. स्मार्ताग्नींनीं युक्त व निरग्निक अशा ऋग्वेद्यांनीं श्राद्धाच्या शेवटींच श्राद्धशेषानें अथवा निराळ्या भातानें वैश्वदेव करावा. स्मार्ताग्नि व श्रौताग्नि यांनीं युक्त असलेल्या कात्यायनांनीं श्राद्धाच्या पाकानें श्राद्धाच्या पूर्वींच वैश्वदेव करावा. निरग्निक कात्यायनांनीं श्राद्धाच्या शेवटीं श्राद्धशेषानें किंवा पृथक् पाकानें वैश्वदेव करावा. साग्निक अशा तैत्तिरीय शाखीयांनीं सदा श्राद्धाच्याच पूर्वीं वैश्वदेव करावा, पण पंचमहायज्ञ श्राद्धाच्या अंतीं करावे. इतरांनीं आरंभीं किंवा अंतीं करावे, असा विकल्प आहे. तरी तैत्तिरीयशाखीयांचे पंचमहायज्ञ वैश्वदेवाहून निराळेच आहेत. वृद्धिश्राद्ध पाकानें कर्तव्य असतां सर्व शाखीयांनीं अगोदरच वैश्वदेव करावा. ऋग्वेद्यांनीं आधीं किंवा नंतर करावा. आमान्नानें जर वृद्धिश्राद्ध करणें असेल तर सर्वांनीं आधीं किंवा नंतर करावा असें वाटतें. नित्य श्राद्धांत पूर्वींच करावा. एकादशादिक एकोद्दिष्ट श्राद्धांत साग्निक

व निरग्निक अशा सर्वांनीं श्राद्धशेष ब्राह्मणांच्या हवालीं करून, दुसऱ्या पाकानें वैश्वदेव करावा.

**अथनित्यश्राद्धम् वार्षिकादिश्राद्धदिनेश्राद्धात्पश्चात्तेनैवपाकेनपाकान्तरेण वा नित्यश्राद्धंकार्यम् नित्यश्राद्धीयसर्वदेवतानांप्रथमश्राद्धेप्रवेशेप्रसङ्गसिद्धिरेव तथाचदर्शादिषुमहालयान्वष्टकादिषुनित्यश्राद्धलोपएव एतच्चदेवहीनंदर्शवत्षड्दैवतंद्वावेकंवाविप्रंनिमन्त्र्यदेशकालान्ननियमहीनंपुनर्भोजनब्रह्मचर्यादिकर्तृभोक्तृनियमरहितं यादृशतादृशेनैवानिषिद्धान्नेनदिवैवरात्रौ प्रहरपर्यन्तंवाकार्यम् स्वस्याशक्तौपुत्रादिना सूतकेदर्शादिवल्लोपः वृद्ध्युत्तरंमण्डपोत्थानावधिसपिण्डैर्नकार्यम् नित्यवैश्वदेवान्तर्गतपितृयज्ञोत्तरंमनुष्ययज्ञात्प्रागेवभाति तत्रदर्शवत्षट्पितॄन्देवहीनानुच्चार्यनित्यश्राद्धंकरिष्येइति शिष्यादिश्चेद्यजमानस्यपितृपितामहेत्याद्युच्चार्यसंकल्पयेत् पितॄणामिदमासनं नित्यश्राद्धेक्षणः क्रियतामितिक्षणः पूर्वोच्चारिताःपितरःअयंवोगन्धइत्येवंगन्धादिभिर्विप्रमभ्यर्च्यवर्तुलेचतुरस्रेवामण्डलेपात्रेऽन्नंपरिविष्यपृथ्वीतेपात्रमित्यादिब्रह्मार्पणान्तंदर्शवत् भोजनान्तेदक्षिणांदत्वानमस्कारेणविसर्जयेत् ॥**

**नित्यश्राद्ध**—वार्षिकादिक श्राद्धदिवशीं श्राद्धानंतर त्याच पाकानें किंवा दुसऱ्या पाकानें नित्यश्राद्ध करावें. नित्यश्राद्धिय सर्व देवतांचा पहिल्या श्राद्धीं प्रवेश झाल्यास प्रसंगसिद्धिच होते. तसेंच दर्शादिक श्राद्धें, महालय, अन्वष्टका, इत्यादि श्राद्धांत नित्यश्राद्धाचा लोपच करावा. हें नित्यश्राद्ध—देवहीन व दर्शासारखें सहा देवतांनीं युक्त, दोन किंवा एक ब्राह्मण निमंत्रित करून, देशकाल व अन्न, यांच्या नियमानें रहित असें पुनर्भोजन, ब्रह्मचर्य, इत्यादिक जे कर्त्याचे व भोक्त्याचे नियम त्याशिवाय अनिषिद्ध अन्नानें दिवसास किंवा रात्रौ प्रहरपर्यंत करावें व स्वतः असमर्थ असेल तर पुत्रादिकांकडून करवावें. सूतक (अशौच) असतां दर्शासारखा लोप करावा वृद्धिश्राद्धानंतर मंडपादवासनापर्यंत सपिंडांनीं करूं नये. नित्य वैश्वदेवांतील पितृयज्ञ झाल्यावर व मनुष्ययज्ञाच्या पूर्वींच हें करावें असें वाटतें. नित्यश्राद्धांत दर्शाप्रमाणें सहा पितरांचा देवरहित उच्चार करून, 'नित्यश्राद्धं करिष्ये' असा संकल्प करावा. कर्ता जर शिष्य असेल तर 'यजमानस्य पितृपितामह' इत्यादि उच्चार करून संकल्प करावा. पितॄणां इदमासनं' असें म्हणून आसन, 'नित्यश्राद्धे क्षणःक्रियतां' असा क्षण व 'पूर्वोच्चारितः पितरः अयं वो गंधः' याप्रमाणें गंधादि उपचारांनीं ब्राह्मणांची पूजा करून वर्तुल किंवा चतुष्कोन मंडल करावें, व त्यावर पात्र मांडून त्यांत अन्न वाढावें आणि 'पृथिवीते पात्रं०' यापासून ब्रह्मार्पणापर्यंतचीं कर्में दर्शाप्रमाणेंच करावींत. भोजनांतीं दक्षिणा देऊन किंवा न देऊन नमस्कार करून विसर्जन करावें.

**विप्रस्यालाभेवाऽभावेयथाशक्त्यन्नमुद्धृत्यषोढाविभज्यास्मत्पितृपितामहेत्यादिचतुर्थ्यंतषड्देवताउच्चार्येदमन्नंस्वधानममेतित्यजेत् तदन्नंविप्रायगो-**

**योवादेयंजलादौवात्याज्यम् अन्नत्यागस्यापिलोपेआर्चन्नत्रमरुतइतिऋचो-दशवारंजपेत् इतिनित्यश्राद्धविधिः ॥**

**अन्नब्राह्मणाभाव**—ब्राह्मणाचा किंवा अन्नाचा अभाव असल्यास यथाशक्ति अन्न घेऊन त्या अन्नाचे सहा भाग करावे व 'अस्मत्पितृपितामह' इत्यादि चतुर्थीविभक्त्यंत सहा देवतांचा उच्चार करून 'इदमन्नं स्वधानमम' असें म्हणून अन्नत्याग करावा. नंतर तें अन्न ब्राह्मण किंवा गाई यांस द्यावें, किंवा उदकादिकांत टाकावें. अन्नत्यागाचाही लोप झाल्यास 'आर्चन्नत्र मरुत०' या ऋचेचा दहा वेळां जप करावा. याप्रमाणें नित्यश्राद्धाचा विधि सांगितला.

**अथश्राद्धानुकल्पाः। अनेकविप्रालाभेदेवस्थानेशालग्रामादिकंस्थापयित्वैक-विप्रेपित्रादित्रयंमतामहादिसहितदेवताषट्कंचावाह्यसर्वश्राद्धंकार्यमियुक्तम् सर्वथाविप्रालाभेदर्भबटुश्राद्धमित्याद्यप्युक्तम् ॥**

**श्राद्धानुकल्प**—अनेक ब्राह्मण न मिळाल्यास देवस्थानीं शालग्रामादिक स्थापावे, व एका ब्राह्मणाचे ठायीं पित्रादित्रयी व मातामहादिसहित सहा देवता यांस आवाहन करून सर्व श्राद्ध करावें, असें सांगितलें आहे. मुळींच ब्राह्मण न मिळाल्यास दर्भांचे बटु करून श्राद्ध करावें, इत्यादिकही सांगितलें आहे.

**अथामश्राद्धम् तत्रकेनचित्संकटेनपाकासंभवेजातकर्मणिचग्रहणनिमित्तक-श्राद्धेचामश्राद्धंकार्यम् सपिण्डनश्राद्धंमासिकंप्रतिवार्षिकंमहालयाष्टकान्वष्टका-दिश्राद्धंचामेननकार्यम् शूद्रस्यतुदशाहपिण्डादिश्राद्धमात्रमामेन नकदापि-पाकेन तत्रपितॄनुद्दिश्यामुकश्राद्धंसदैवंसपिण्डमामेनहविषाकरिष्यइतिसंकल्पः अन्यःप्रयोगःपूर्वोक्तएव पाकप्रोक्षणस्थानेआमप्रोक्षणम् आवाहनेउशंतस्त्वेति-मन्त्रेहविषेअत्तवेइत्यत्रहविषेस्वीकर्तवेइत्यूहः भस्ममर्यादान्तंप्राग्वत् विप्रहस्तेषु तण्डुलैरग्नौकरणम् अन्नाच्चतुर्गुणंद्विगुणंसमंवातत्तदामंपात्रेषुसंस्थाप्यपाणिहोम शेषंपिण्डार्थंसंस्थाप्यपात्रेषुदत्वापृथ्वीतेपात्रमित्यादि इदमामंहव्यंकव्यमि-त्यादि इदमाममृतरूपंस्वाहेत्यादियथाधर्ममधिवत्यन्तं प्राक्कृतम् यथासुखंजु-षध्वनित्यस्यापोशनप्राणाहुतितृप्तिप्रश्नानांलोपःसंपन्नवाचनान्तेन्नशेषप्रश्नलोपः सर्वमतेतण्डुलैःसक्तुभिर्वापिण्डदानम् केचिद्गृहसिद्धान्नेनपायसेनवापिण्डानाहुः॥**

**आमान्नश्राद्ध**—कांहीं संकटामुळें पाक करणें अशक्य असलें तर व जातकर्म आणि ग्रहणनिमित्तक श्राद्ध या वेळीं आमश्राद्ध करावें. सपिंडीश्राद्ध, मासिक, प्रतिसांवत्सरिक, महालय, अष्टका व अन्वष्टका, हीं श्राद्धें आमान्नानें करूं नयेत. शूद्रानें दशाहापिंडादि सर्व श्राद्धें आमान्नानेंच करावींत, पाकान्नानें करूं नयेत. आमश्राद्धांत पितरांस उद्देशून ' अमुक श्राद्धं सदैवं सपिंडमामेन हविषा करिष्ये ' असा संकल्प करावा. बाकीचा प्रयोग पूर्वीं सांगितलाच आहे. पाकप्रोक्षण-स्थानीं आमान्न प्रोक्षावें. आवाहनाचे कालीं 'उशंतस्त्वा०' या मंत्रांत 'हविषे अत्तवे ' या ऐवजीं ' हविषे स्वीकर्तवे ' असा फरक करावा. भस्ममर्यादा घालीपर्यंतचें कर्म पूर्वीप्रमाणेंच करावें. ब्राह्मणाच्या हातावर तांदुळांनीं अग्नौकरण करावें.

अन्नापेक्षां चौपट, दुप्पट किंवा सारखें प्रत्येक आमान्न पात्रावर ठेवावें व पाणिहोम करून शेष राहिलेलें पिंडासाठीं ठेवून, पात्रावर ठेवून 'पृथिवीते पात्रं०' इत्यादि 'मधु०' येथपर्यंत पूर्वींप्रमाणेंच करावें. 'यथासुखं जुषध्वं' या वाक्याचा व आपोशन, प्राणाहुति आणि तृप्तिप्रश्न यांचा लोप करावा. संपन्नवाचन झाल्यावर अन्नशेषप्रश्नाचा लोप करावा. आमान्नश्राद्धांत तांदुळांनीं किंवा सातूच्या पिठानें पिंडदान करावें असें सर्वांचें मत आहे. घरांत सिद्ध केलेल्या अन्नानें किंवा पायसानें पिंड करावे, असेंही कांहीं ग्रंथकार म्हणतात.

**एवंविप्रसमीपेपिण्डदानान्तेनमोवःपितरइषेइत्यत्रोपस्थानमन्त्रइषेस्थाने-आमद्रव्यायेत्यूहः पिण्डोद्वासनान्तेपिण्डजातीयद्रव्येणविकिरदानम् आम-श्राद्धेस्वतीतिब्रूतेतिवर्ज्यम् वाजेवाजेइतिमन्त्रेतृप्तायातेतिस्थानेतृप्स्यथयाते-त्यूहः ततः प्राग्वच्छेषंसमापयेत् आमश्राद्धंद्विजैःपूर्वाह्णेकार्यम् शूद्रैरपराह्णएव आमान्नाभावेहिरण्यश्राद्धमप्येवमेव संकल्पादौसर्वत्रहिरण्यपदमामपदस्थाने योज्यम् ॥**

**आमान्नश्राध्दविशेष**—ब्राह्मणासमीप वरीलप्रमाणें पिंडदान केल्यावर 'नमोवः पितरइषे' या उपस्थानाच्या मंत्रांत 'इषे'या पदा-ऐवजीं 'आमद्रव्याय' असा फरक करावा. पिंडांचें विसर्जन झाल्यावर ज्या द्रव्यांचे पिंड दिले असतील त्या द्रव्यांनीं विकिर द्यावे. 'स्वस्तीति ब्रूत' हें वाक्य आमश्राद्धांत वर्ज्य करावें. 'वाजे वाजे' या मंत्रांत 'तृप्तायात' याऐवजीं 'तृप्स्यथ यात' असा फरक करावा व नंतर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें शेषकर्म संपूर्ण करावें. ब्राह्मणांनीं आमश्राद्ध पूर्वाह्णीं करावें; शूद्रांनीं तें अपराह्णींच करावें. आमान्नाचा अभाव असेल तर हिरण्यश्राद्धही असेंच करावें. संकल्प करितांना सर्वत्र 'आम' या शब्दाऐवजीं 'हिरण्य' या शब्दाची योजना करावी.

**आमवद्धेमप्रोक्षणम् अत्तवइत्यादिमन्त्रत्रयोहःप्राग्वदेव तण्डुलादिभिर्हस्ते-ऽग्नौकरणम् हिरण्यमन्नादष्टगुणंचतुर्गुणंद्विगुणंसमंवादेयम् हिरण्यश्राद्धेदक्षिणा-स्त्येव श्राद्धीयमामंहेमवाद्विजदत्तंयथेष्टंविनियोज्यम् शूद्रदत्तंतुभोजनादन्यत्र-विनियोज्यम् श्राद्धीयामेनपञ्चयज्ञाःश्राद्धंचनकार्यम् हेमश्राद्धेआमश्राद्धेच-पिण्डदानविकल्पात्सांकल्पिकविधिनाप्येतद्द्वयम् ॥**

**हिरण्यश्राध्द**—हिरण्याचें (द्रव्य) प्रोक्षण आमान्नाप्रमाणें करावें. 'अत्तव' इत्यादि तीन मंत्रांचा फरकही पूर्वींसारखाच करावा. तांदुळांनीं हातावर अग्नौकरण करावें. अन्नापेक्षां हिरण्य आठपट, चौपट, दुप्पट किंवा सारखें द्यावें. हिरण्यश्राद्धीं दक्षिणा हेंच श्राद्धासंबंधीं आमान्न किंवा हिरण्य (सोनें) जर द्विजानें दिलें असेल तर त्याची मनाप्रमाणें व्यवस्था करावी. शूद्रानें दिलेलें असेल तर भोजनाव्यतिरिक्त कृत्यांकडे त्याची योजना करावी. श्राद्धसंबंधीं आमान्नानें पंचमहायज्ञ व श्राद्ध हीं करूं नयेत. हिरण्यश्राद्ध व आमान्नश्राद्ध यांत पिंडदान वैकल्पिक असल्यानें सांकल्पिक विधीनेंही हीं दोन्ही करावींत.

सांकल्पिकेचसमन्त्रकावाहनार्घ्याग्नौकरणपिण्डदानविकिराक्षय्यस्वधावा प्रश्नेत्येतत्सप्तकंवर्ज्यम् तत्रामुकश्राद्धमामेनहविषाहिरण्येनवासांकल्पिकां नाकरिष्यइतिसंकल्पः शूद्रगृहेऽन्यदीयमपिक्षीराद्यपिनभक्ष्यम् किमुततदी मादि तद्गृहेपक्त्वानभक्ष्यमिति तस्माच्छूद्राल्लब्धंद्विजगृहेपक्त्वाभक्ष्यम् इ श्राद्धहेमश्राद्धविधिः ॥

**सांकल्पिक विधि**—सांकल्पिक विधींत समंत्रक आवाहन, अर्घ्य, अ पिंडदान, विकिर, अक्षय्य व स्वधावाचन प्रश्न हे वर्ज्य होत. सांकल्पिक विधि असतां 'अमुक श्राद्धमामेनहविषा०' वगैरे संकल्प शूद्राचे घरीं दुसऱ्यानें दिलेलें दूधसुद्धां पिऊं नये; मग शूद्रानें दिलेल्या आ त्याचे घरीं पाक करून भक्षण करूं नये, हें सांगायलाच पाहिजे काय ? य शूद्रापासून मिळालेलें आमान्न ब्राह्मणांचे घरीं पाक करून भक्षण करावें, अ होतें. याप्रमाणें आमश्राद्ध व हेमश्राद्ध यांचा विधि सांगितला.

अथपक्वान्नद्रव्यकसांकल्पिकश्राद्धविधिः तत्रयेषुसंक्रान्तियुगमन्वादि द्व्युत्तरकालिकदर्शादिषुवापिण्डदानंनिषिद्धंतत्रसर्वत्रसांकल्पिकविधिः य पिण्डदानादिबहुविस्तृतंश्राद्धमनुष्ठातुमशक्तःसोपिसांकल्पिकंकुर्यात् तद अमुकंश्राद्धंसांकल्पिकविधिनान्नेनहविषाकरिष्ये इतिसंकल्प्यतृतीयक्षणदान पूर्ववत्कृत्वार्घ्यदानसमन्त्रकावाहनंचवर्जयेत् देवानावाहयामीतिपितॄनाव यामीत्येवावाह्यगन्धादिपूजनादिभस्ममर्यादान्तेऽग्नौकरणंवर्जयित्वा परिवेष दिसंपन्नवचनान्तेउत्तरापोशनंविकिरपिण्डदानवर्जमक्षय्यवचनान्तंकृत्वा स्व वाचयिष्येस्वधोच्यतामितिवाक्यरहितंसर्वपूर्ववत्समापयेत् । इतिसांकल्पि प्रयोगः ॥

**सांकल्पिक श्राद्धविधि**—संक्रांती, युगादि व मन्वादि श्राद्धें किंवा श्राद्धानंतर करायचीं जीं दर्शादि श्राद्धें त्यांत दानाचा निषेध असल्यानें या सर्व श्राद्धांत सांकल्पिक विधि करावा. तसेंच नादि अति विस्तृत श्राद्ध करण्यास जो समर्थ नसेल त्यानेंही जो सांकल्पिक करावा. तो असाः—'अमुकश्राद्धं सांकल्पिकविधिनान्नेन हविषा करिष्ये' संकल्प करून, तिसरा क्षण देण्यापर्यंतचा प्रयोग पूर्वीप्रमाणेंच करावा, व अर्घ्यदान समंत्रक आवाहन हीं वर्ज्य करावींत 'देवानावाहयामि' 'पितॄन् आवाहयामि' असेंच हन करून गंधादि उपचारांनीं पूजनापासून पिशंगीपर्यंत कर्म झाल्यावर, अग्नौकरण करून परिवेषणासून संपन्नवचनापर्यंत कर्म करावें, व नंतर उत्तरापोशन, विकि पिंडदान हीं वर्ज्य करून, अक्षय्यवाचनापर्यंत कर्म केल्यावर 'स्वधां वाचयिष्ये स च्यतां' या वाक्यानें रहित असा सर्व प्रयोग पूर्वीप्रमाणें समाप्त करावा. अस सांकल्पिक प्रयोग आहे.

अथान्येप्यनुकल्पाः तत्रद्विजाद्यभावेदर्भबटुविधानेनपिण्डदानमात्रमुक्तः अथवाद्रव्यविप्रयोरभावेपक्वान्नस्यपैतृकसूक्तेनहोमःकार्यः यद्वाश्राद्धदिनेप्राप्ते भवेन्निरशनःपुमान् । किंचिद्दद्यादशक्तोवाउदकुम्भादिकंद्विजे १ तृणानिवा

सांकल्पिकेचसमन्त्रकावाहनार्घ्याग्नौकरणपिण्डदानविकिराक्षय्यस्वधावाचन-प्रश्नेत्येतत्सप्तकंवर्ज्यम् तत्रामुकश्राद्धमामेनहविषाहिरण्येनवासांकल्पिकविधिनाकरिष्यइतिसंकल्पः शूद्रगृहेऽन्यदीयमपिक्षीराद्यपिनभक्ष्यम् किमुततदीयमामादि तद्गृहेपक्त्वानभक्ष्यमिति तस्माच्छूद्राल्लब्धंद्विजगृहेपक्त्वाभक्ष्यम् इत्यामश्राद्धहेमश्राद्धविधिः ॥

**सांकल्पिक विधि**—सांकल्पिक विधींत समंत्रक आवाहन, अर्घ्य, अग्नौकरण पिंडदान, विकिर, अक्षय्य व स्वधावाचन प्रश्न हे प्रकार वर्ज्य होत. सांकल्पिक विधि असतां 'अमुक श्राद्धमामेनहविषा०' वगैरे संकल्प करावा. शूद्राचे घरीं दुसऱ्यानें दिलेलें दूधसुद्धां पिऊं नये; मग शूद्रानें दिलेल्या आमान्नाचा त्याचे घरीं पाक करून भक्षण करूं नये, हें सांगायलाच पाहिजे काय ? यावरूनच शूद्रापासून मिळालेलें आमान्न ब्राह्मणांचे घरीं पाक करून भक्षण करावें, असें सिद्ध होतें. याप्रमाणें आमश्राद्ध व हेमश्राद्ध यांचा विधि सांगितला.

अथपक्वान्नद्रव्यकसांकल्पिकश्राद्धविधिः तत्रयेषुसंक्रान्तियुगमन्वादिषुवृद्ध्युत्तरकालिकदर्शादिषुवापिण्डदानंनिषिद्धंतत्रसर्वत्रसांकल्पिकविधिः यश्चपिण्डदानादिबहुविस्तृतंश्राद्धमनुष्ठातुमशक्तःसोपिसांकल्पिकंकुर्यात् तद्यथा अमुकंश्राद्धंसांकल्पिकविधिनान्नेनहविषाकरिष्ये इतिसंकल्प्यतृतीयक्षणदानान्तं पूर्ववत्कृत्वार्घ्यदानसमन्त्रकावाहनंचवर्जयेत् देवानावाहयामीतिपितॄनावाहयामीत्येवावाह्यगन्धादिपूजनादिभस्ममर्यादान्तेऽग्नौकरणंवर्जयित्वा परिवेषणादिसंपन्नवचनान्तेउत्तरापोशनंविकिरपिण्डदानवर्जमक्षय्यवचनान्तंकृत्वा स्वधांवाचयिष्येस्वधोच्यतामितिवाक्यरहितंसर्वंपूर्ववत्समापयेत् । इतिसांकल्पिकप्रयोगः ॥

**सांकल्पिक श्राध्दविधि**—सक्रांती, युगादि व मन्वादि श्राद्धें किंवा वृद्धिश्राद्धानंतर करावयाचीं जीं दर्शादि श्राद्धें त्यांत पिंडदानाचा निषेध असल्यानें या सर्व श्राद्धांत सांकल्पिक विधि करावा. तसेंच पिंडदानादि अति विस्तृत श्राद्ध करण्यास जो समर्थ नसेल त्यानेंही जो सांकल्पिक विधि करावा. तो असाः—'अमुकश्राद्धं सांकल्पिकविधिनान्नेन हविषा करिष्ये' असा संकल्प करून, तिसरा क्षण देण्यापर्यंतचा प्रयोग पूर्वींप्रमाणेंच करावा, व अर्घ्यदान आणि समंत्रक आवाहन हीं वर्ज्य करावींत 'देवानावाहयामि' 'पितॄन् आवाहयामि' असेंच आवाहन करून गंधादि उपचारांनीं पूजनापासून पिशंगीपर्यंत कर्म झाल्यावर, अग्नौकरण वर्ज्य करून परिवेषणासून संपन्नवचनापर्यंत कर्म करावें, व नंतर उत्तरापोशन, विकिर व पिंडदान हीं वर्ज्य करून, अक्षय्यवाचनापर्यंत कर्म केल्यावर 'स्वधां वाचयिष्ये स्वधोच्यतां' या वाक्यानें रहित असा सर्व प्रयोग पूर्वींप्रमाणें समाप्त करावा. असा हा सांकल्पिक प्रयोग आहे.

अथान्येप्यनुकल्पाः तत्रद्विजाद्यभावेदर्भवटुविधानेनपिण्डदानमात्रमुक्तम् अथवाद्रव्यविप्रयोरभावेपक्वान्नस्यपैतृकसूक्तेनहोमःकार्यः यद्वाश्राद्धादिनेप्राप्ते-भवेन्निरशनःपुमान् । किंचिद्दद्यादशक्तोवाउदकुम्भादिकंद्विजे १ तृणानिवाग-

वेदद्यात्पिण्डान्वाप्यथनिर्वपेत् । तिलदर्भैः पितॄन्वापितर्पयेत्स्नानपूर्वकम् ॥ २ ॥ अथवातृणभारंदहेत् । धान्यंवातिलान्वास्वल्पांदक्षिणांवाद्विजायदद्यात् अथवा संकल्पादिसर्वश्राद्धप्रयोगंपठेत् सर्वाभावेवनंगत्वोर्ध्वबाहुःस्वकक्षंदर्शयन्निदं पठेत् नमेऽस्तिवित्तंनधनंनचान्यच्छ्राद्धोपयोगिस्वपितॄन्नतोस्मि । तृप्यन्तु-भक्त्यापितरोमयैतोभुजौकृतौवर्त्मनिमारुतस्य ॥ १ ॥ इति प्रभासखण्डेऽन्येपि-मन्त्राउक्ताः । इत्यनुकल्पाः ॥

**अन्यानुकल्प**—ब्राह्मणादिकांचा अभाव असेल तर दर्भबटुविधीनें पिंडदान मात्र करावें, असें सांगितलें; श्राद्धपदार्थ व ब्राह्मण यांचा श्राद्धाच्या दिवशीं अभाव असल्यास—पक्वान्नाचा पितृसूक्तानें होम करावा, उपोषित रहावें, अशक्त असल्यास ब्राह्मणास उदकुंभ इत्यादि अल्पदान करावें, गाईस गवत घालावें. पिंड-प्रदान करावें. तिल व दर्भ यांनीं स्नानपूर्वक पितरांचें तर्पण करावें, तिलांची रास जाळावी धान्य किंवा तिल किंवा अल्प दक्षिणा द्यावी, अथवा संकल्पापासून सर्व श्राद्धप्रयोग पठण करावा, या सर्वांचाच जर अभाव असेल तर अरण्यांत जाऊन हात वर करून व स्वतःच्या काखा दाखवून 'नमेस्तिवित्तंनधनंनचान्यच्छ्राद्धोपयोगी०' हा श्लोक म्हणावा. प्रभासखंडांत दुसरेही मंत्र सांगितले आहेत असें हें अनुकल्प प्रकरण ( गौणश्राद्ध ) आहे.

अथश्राद्धभोजनेप्रायश्चित्तानि दर्शश्राद्धेषट्प्राणायामाः महालयादिश्राद्धे-षुत्रिवर्षोर्ध्वंप्रतिवार्षिकेषुचषट्प्राणायामाः गायत्र्यादशकृत्वोभिमन्त्रितस्य-जलस्यपानंवा एवमन्येष्वप्यनुक्तप्रायश्चित्तश्राद्धेषूक्तजलपानमेव वृद्धिश्राद्धे-प्राणायामत्रयम् जातकर्मादिचूडान्तसंस्काराङ्गवृद्धिश्राद्धेसान्तपनकृच्छ्रम् जात-कर्माङ्गश्राद्धेचान्द्रायणंवा अन्यसंस्काराङ्गश्राद्धेउपवासः सीमन्तसंस्कारेतत्सं-स्काराङ्गश्राद्धेचचान्द्रायणम् आपदिदशाहान्तर्नवसंज्ञकश्राद्धेषु एकादशा-हेचश्राद्धभोजनेप्राजापत्यकृच्छ्रम् द्वादशाहिकसपिण्डीश्राद्धेऊनमासेचपादोन-कृच्छ्रः द्वितीयमासिकत्रैपक्षिकोनषाण्मासिकोनाब्दिकेष्वर्धकृच्छ्रः अन्यमासि-केषुप्रथमाब्दिकेवर्षान्तसपिण्डश्राद्धेचपादकृच्छ्रः उपवासोवा गुरवेद्रव्यंदातु-श्राद्धभोजनेसर्वत्रोक्तार्धम् जपशीलेतदर्धम् अनापद्यूनमासान्तेषुचान्द्रायणंप्राजा-पत्यंच द्विमासाद्युक्तचतुर्षुपादोनकृच्छ्रः त्रिमासादिषुपूर्वोक्तेष्वर्धकृच्छ्रः प्रथमा-ब्दिकेपादोनकृच्छ्रः द्वितीयतृतीयाब्दिकेएकोपवासः क्षत्रियश्राद्धेएतद्द्विगुणम् वैश्यश्राद्धेत्रिगुणम् शूद्रश्राद्धेसर्वत्रचतुर्गुणम् चाण्डालविषजलसर्पपश्वादि-हतपतितक्लीबादिनवश्राद्धेचान्द्रायणम् एकादशाहान्तपराकश्चान्द्रंच द्वाद-शाहादौपराकः द्विमासादिचतुर्ष्वतिकृच्छ्रः अन्यमासिकेषुकृच्छ्रः आब्दिके-पादः अभ्यासेसर्वत्रसर्वंद्विगुणम् आमहेमश्राद्धेसांकल्पिकेचतत्तदुक्तप्रायश्चित्ता-र्धम् यतिश्चब्रह्मचारीचपूर्वोक्तप्रायश्चित्तंकृत्वोपवासत्रयंप्राणायामशतंघृत-प्राशनंचाधिकंचरेत् अनापदिद्विगुणंचरेत् दर्शादौगृहिवदेव ब्रह्मचारिणश्चौल-

**संस्कारेभोजने कृच्छ्रःसीमन्तेचान्द्रम् अन्येषूपवासः एकादशाहश्रभोश्राद्ध-भोजनेचान्द्रंपुनःसंस्कारश्चेतिहेमाद्रिः ॥**

**श्राद्धभोजनप्रायश्चित्त**—दर्शश्राद्धीं सहा प्राणायाम, महालयादि श्राद्धीं व तीन वर्षांनंतरच्या प्रतिसांवत्सरिक श्राद्धांत भोजन केल्यास सहा प्राणायाम किंवा गायत्रीमंत्रानें दहा वेळ अभिमंत्रित केलेलें पाणी प्राशन करावें. याप्रमाणें प्रायश्चित्तें न सांगितलेल्या इतर श्राद्धांतहि असेंच जलपान करावें. वृद्धिश्राद्धांत भोजन केल्यास तीन प्राणायाम करावे. जातकर्मापासून चौलापर्यंत-च्या संस्कारांत वृद्धिश्राद्धीं सांतपनकृच्छ्र करावें, किंवा जातकर्मांगभूत श्राद्धीं चांद्रायण करावें. इतर संस्कारांगभूत वृद्धिश्राद्धीं उपवास करावा. सीमंतसंस्कारांत व त्या संस्काराच्या अंगभूत श्राद्धांत चांद्रायण करावें. आपत्कालीं दहा दिवसपर्यंत असलेलीं नवसंज्ञक श्राद्धें व एकादशाह श्राद्ध यांत श्राद्धभोजन केलें असतां प्राजा-पत्यकृच्छ्र करावें. बाराव्या दिवशीं असलेल्या सपिंडीश्राद्धांत व ऊनमासिक श्राद्धांत भोजन केल्यास पादोनकृच्छ्र करावें. द्वितीय मासिक, त्रैपक्षिक, ऊनषाण्मासिक व ऊनाब्दिक या श्राद्धीं अर्धकृच्छ्र करावें. इतर मासिकें प्रथमाब्दिक व वर्षांतीं केलेल्या सपिंड श्राद्धीं भोजन केल्यास पादकृच्छ्र किंवा उपोषण करावें. गुरूस द्रव्य देण्यासाठीं श्राद्धभोजन केल्यास सर्वत्र उक्त प्रायश्चित्ताचें अर्ध प्रायाश्चित्त करावें. जप करणारा असेल तर त्यानें चतुर्थांश करावें. आपत्काल नसतां ऊनमासिकपर्यंत श्राद्धीं चांद्रायण व प्राजापत्य हीं दोन्ही करावींत. द्वितीयमासिकादि चार श्राद्धीं पादोनकृच्छ्र करावें. त्रैमासिकादिक पूर्वीं सांगितलीं त्यांत अर्धकृच्छ्र करावें. प्रथमाब्दिक श्राद्धीं पादोनकृच्छ्र व द्वितीय आणि तृतीय या अधिक श्राद्धीं एक उपोषण करावें. क्षत्रियाचें श्राद्ध असेल तर याहून दुप्पट, वैश्यश्राद्धीं तिप्पट व शूद्रश्राद्धीं सर्वत्र चौपट प्रायश्चित्त जाणावें. चांडाल, विष, जल, सर्प, पशु, यांपासून मृत, पतित किंवा क्लीब, इत्यादिकांच्या नवश्राद्धीं भोजन केल्यास चांद्रायण करावें. एकादशाहांत श्राद्धीं पराक व चांद्रायण करावें. द्वादशाहादि श्राद्धीं पराक करावा. द्विमासिकादिक चार श्राद्धीं अतिकृच्छ्र करावा. इतर मासिक श्राद्धीं कृच्छ्र, व आब्दिक श्राद्धीं पादकृच्छ्र करावें. अभ्यास असतां सर्व द्विगुण करावें. आमश्राद्ध, हिरण्यश्राद्ध व सांकल्पिक श्राद्ध यांत त्या त्या उक्त प्रायश्चितांचें अर्धें प्रायश्चित्त जाणावें. यति व ब्रह्मचारी यांनीं पूर्वोक्त प्रायश्चित्तें करून तीन उपवास शंभर प्राणायाम व घृतप्राशन हें अधिक करावें व आपत्ति नसतां दुप्पट करावें. दर्शादि श्राद्धीं संन्यासी व ब्रह्मचारी यांनीं गृहस्थाश्रम्याप्रमाणेंच प्रायश्चित्त करावें. ब्रह्मचाऱ्यानें चौलसंस्कारीं भोजन केल्यास कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. सीमंतसंस्कारीं चांद्रायण करावें व अन्य संस्कारीं उपवास व एकादशाह श्राद्धीं भोजन केलें असतां चांद्रायण व पुनः संस्कार करावे, असें हेमाद्रिग्रंथांत सांगितलें आहे.

**अथक्षयाहश्राद्धेविशेषः । तत्रयस्यपित्रादेर्मरणंयन्मासेयत्पक्षेयात्तिथौतद्दिनं-तस्यमृताहस्तत्रपित्रादित्रिदैवत्यंवार्षिकश्राद्धंपुरूरवार्द्रवदेवसहितंकार्यम् नचात्र**

सपत्नीकत्वंपित्रादीनाम् नाप्यत्रमातामहादित्रयम् अत्रतिथिद्वैधेनिर्णयोरात्रा-
वपिकार्यत्वंग्रहणदिनेतत्प्राप्तौनिर्णयोमलमासादिनिर्णयोदर्शदिनेतत्प्राप्तौनिर्णयः
शुद्धिश्राद्धनिर्णयश्चश्राद्धकालनिर्णयप्रसङ्गेनपूर्वोक्तोऽनुसंधेयः पारणेमरणेचै-
वतिथिस्तात्कालिकीमतेतिवचनात् मरणकालिकतिथेरपराह्णादिव्याप्त्याब्दिक-
श्राद्धनिर्णयोज्ञेयः पित्रोःप्रथमाब्दिकश्राद्धंविभक्तैर्भ्रातृभिःपृथक्कार्यम् अवि-
भक्तत्वेज्येष्ठेनैव मातृमृताहेमात्रादित्रिदैवत्यंश्राद्धम् मातापित्रोर्मृताहैक्येपूर्वं-
पितुःश्राद्धंकृत्वास्नात्वामातुःश्राद्धंकार्यम् एवमेकदिनेपित्रोर्मरणेमातु-
र्भर्त्रासहदाहकरणेपिज्ञेयम् सहगमनेत्वेकमेवपाकंकृत्वापितृमातृपार्वणद्वययुतं-
श्राद्धम् षट्पिण्डाअर्घ्याश्च विश्वेदेवास्तुनभिन्नाः सहगमनेसुवासिनीमरणेच-
विप्रपङ्क्तौसुवासिनीमधिकांभोजयेत् सुवासिन्यैकुङ्कुमादिस्त्र्यलंकारान्दद्यात्
सर्वत्रस्त्रीणांश्राद्धेवस्त्रयज्ञोपवीतगन्धादिकमेवविप्रेभ्योदेयंनकुङ्कुमादि एवं-
सापत्नमातुर्मातामहतत्पत्न्योर्मातुलस्यपितृव्यतत्पत्न्योर्भ्रातुःश्वश्रूश्वशुरयोर्गुरोः
पितृष्वसुर्मातृष्वसुर्भार्यायाभर्तुर्भगिन्यादेश्चैतेषामपुत्रत्वेपार्वणविधिनैवप्रतिवा-
र्षिकंश्राद्धंकार्यम् केचित्पितृमातृमातामहमातामहीव्यतिरिक्तानांसर्वेषामेकोद्दि-
ष्टविधानेनैवेत्याहुः अत्रदेशाचारानुसारेणव्यवस्थापित्रादिवार्षिकदिनेपितृव्या-
दिवार्षिकप्राप्तौस्वयंपित्रादिश्राद्धकार्यं पितृव्यादिश्राद्धंतु पुत्रशिष्यादिद्वारा-
कार्यंदिनान्तरेवास्वयंकार्यं संन्यासिनोप्याब्दिकादिपुत्रः कुर्यात्सपार्वणम् ।
प्रथमेवर्षेवर्षान्तसपिण्डनपक्षेमृताहात्पूर्वदिनेसपिण्डनमब्दपूर्तिश्राद्धंचकृत्वा-
परेद्युर्वार्षिकंकार्यम् ॥

**क्षयाहश्राध्दविशेष**—पिता इत्यादिकांचें ज्या मासांत, ज्या पक्षांत व ज्या तिथीस मरण झालें असेल तो त्याचा मृतदिवस होय. म्हणून त्या दिवशीं पित्रादि तीन देवतांनीं युक्त असें सांवत्सरिक श्राध्द पुरुरवार्द्रवदेवसहित करावें. सांवत्सरिक श्राद्धीं पित्रादि त्रयीस सपत्नीकत्व नाहीं व येथें मातामहादि त्रयीही नाहीं. दोन दिवस तिथि असतां, श्राध्द रात्रींही कर्तव्य असतां, ग्रहणदिवस प्राप्त झाला असतां, मलमासादिक असतां व दर्शाचे दिवशीं सांवत्सरिक श्राध्द आलें असतां काय करावें याचा निर्णय, शुध्दिश्राध्दाचा निर्णय व श्राद्धकालाचा निर्णय पूर्वीं जो सांगितला आहे तोच जाणावा. पारणा व मरण यांविषयीं तत्कालव्यापिनी तिथि घ्यावी, असें वचन असल्यानें मरणकालक तिथीच्या अपराह्णकालव्याप्तीनें आब्दिकश्राद्धाचा निर्णय जाणावा. मातापितरांचें प्रथमाब्दिक श्राध्द विभक्त बंधूंनीं पृथक् करावें व विभक्त नसल्यास ज्येष्ठानेंच करावें. मातेच्या मृतदिवशीं मात्रादि तीन देवतांनीं युक्त श्राध्द करावें. माता व पिता यांचा मृतदिवस एक असेल तर आधीं पित्याचें श्राध्द करून मग स्नान केल्यावर मातेचें श्राध्द करावें. याप्रमाणें एके दिवशीं मातापितरास मरण आल्यानें मातेचें दहन भर्त्यासहित केलेलें असतांही असाच निर्णय जाणावा. सहगमन केलें असेल तर एकच पाक करून पिता व माता या दोन पार्वणांनीं युक्त श्राध्द करावें. पिंड व अर्घ्यें सहा करावींत. विश्वेदेव निराळे

करूं नयेत. सहगमन किंवा सुवासिनी असें मरण असतां ब्राह्मणांच्या पंक्तींत एक सुवासिनी भोजनास सांगावी व तिला कुंकुमादिक स्त्रियेचे अलंकार द्यावे. सर्वत्र श्राध्दांत ब्राह्मणांस वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, इत्यादिक उपचार द्यावेत, कुंकुमादिक देऊं नये. याप्रमाणेंच सापत्न माता, मातामह, मातामहपत्नी, भ्राता, सासू, सासरा, गुरु, आत, मावशी, भार्या, भर्ता, भगिनी, इत्यादिकांस पुत्र नसतील तर पार्वण-विधीनेंच त्यांचें प्रतिवार्षिक श्राध्द करावें. कित्येक ग्रंथकारांचें असें म्हणणें आहे कीं, पिता, माता, मातामह व मातामही, यांशिवाय इतर सर्वांचें एकोद्दिष्टविधीनें श्राद्ध करावें. यासंबंधींची व्यवस्था देशाचारानुरूप जाणावी. पिता, इत्यादिकांच्या वार्षिक श्राद्धदिवशीं पितृव्यादिकांचें जर वार्षिक श्राद्ध येईल तर पुत्रानें स्वतः पिता इत्यादिकांचें श्राद्ध करावें. पितृव्य इत्यादिकांचें श्राद्ध पुत्र किंवा शिष्य यांजकडून करवावें किंवा स्वतः दुसऱ्या दिवशीं करावें. संन्याशाचें आब्दिकादि श्राद्ध पार्वणा-सहित पुत्रानेंच करावें. पहिल्या वर्षान्तीं सपिंडी करण्याचा पक्ष असेल तर मृत दिवसाच्या पूर्वदिवशीं सपिंडी व अब्दपूर्तिश्राद्ध करून दुसऱ्या दिवशीं वार्षिक श्राद्ध करावें.

**अथक्षयाहाज्ञानेनिर्णयः । यस्यमृतस्यदेशान्तरमरणादिनामासोज्ञायतेतिथिर्नज्ञायतेतस्यतन्मासेदर्शेशुक्लैकादश्यांकृष्णैकादश्यांवाप्रतिवार्षिकश्राद्धम् मृततिथिर्ज्ञातामासोनज्ञातस्तदामार्गशीर्षेमाघेवाभाद्रेवाऽऽषाढेवातत्तिथौवार्षिकम् तिथिमासयोरज्ञानेयद्दिनेदेशान्तरंप्रस्थितस्तन्मासदिवसौग्राह्यौ प्रस्थानदिनादेरज्ञानेमृतवार्ताश्रवणतिथिमासौ प्रस्थानवार्ताश्रवणयोर्मासज्ञानेतिथेरज्ञानेतन्मासे दर्शादौ प्रस्थानादिमासविस्मरणेतिथिस्मरणेमार्गशीर्षादिषूक्तचतुर्षुतत्तिथौ-वार्षिकम् मरणतच्छ्रवणप्रस्थानानांदिनमासयोरज्ञानेमाघस्यमार्गस्यवादर्शे-श्राद्धम् द्वादशादिवर्षप्रतीक्षोत्तरंप्रतिकृतिदाहेदाहदिनेवार्षिकादि ॥**

**क्षयदिनाज्ञाननिर्णय**—देशांतरीं मरण पावल्यामुळें ज्या मृत झालेल्याचा मास माहीत असून तिथि जर माहीत नसेल तर त्या मासांत दर्श, शुक्ल एकादशी किंवा कृष्ण एकादशी यांतून कोणत्याही दिवशीं त्याचें वार्षिक श्राद्ध करावें. मृततिथि माहीत असून मास माहीत नसेल तर मार्गशीर्ष, माघ, भाद्रपद अथवा आषाढ या मासांत त्या तिथीस वार्षिक श्राद्ध करावें. तिथि व मास हे दोन्हीही माहीत नसतील तर ज्या दिवशीं देशांतरीं प्रस्थान केलें तो दिवस व मास घ्यावा. प्रस्थानदिवसही माहीत नसेल तर मृत झाल्याची वार्ता ज्या तिथीस ऐकली ती तिथि व तो मास घ्यावा. प्रस्थान व वार्ताश्रवण यांच्या मासाचें ज्ञान व तिथीचें अज्ञान असेल तर त्या मासांत दर्शादि तिथीस वार्षिक श्राद्ध करावें. प्रस्थानादि मासांचें विस्मरण असून तिथीचें स्मरण असेल तर मार्गशीर्षादि सांगितलेल्या चार मासांत त्या तिथीस वार्षिक श्राद्ध करावें. मृतवार्ताश्रवण व प्रस्थान यांचा दिवस व मास यांचें अज्ञान असेल तर माघ किंवा मार्गशीर्ष या मासांत अमावास्येस वार्षिक श्राद्ध करावें. १२ वर्षे वाट पाहिल्यावर पलाशविधीनें दहन केलें असतां, दहनदिवशींच वार्षिक श्राद्ध करावें.

अथश्राद्धविघ्नेनिर्णयः । निमन्त्रणोत्तरंविप्रस्यसूतकेमृतकेवाप्राप्तेआशौचन निमन्त्रणंचद्वितीयक्षणरूपंसमन्त्रकंग्राह्यंनलौकिकमितिभाति कर्तुस्तुपाकपरिक्रियोत्तरमाशौचाभावः पाकपरिक्रियाचसमन्त्रकंपाकप्रोक्षणमित्याहुः कर्तुर्गृहेभोजनारम्भोत्तरंजननेमरणेवाभोजनशेषंत्यक्त्वापरकीयजलेनाचामेत् ममतुप्रतिभातिसर्वस्याप्याशौचापवादस्यानन्यगतिविषयत्वात्संकटाभावेपाकपरिक्रियोत्तरमपिकर्तुराशौचेतदन्तेश्राद्धम् भोक्तुस्तुभोजनारम्भात्प्रागाशौचज्ञानेन्योनिमन्त्रणीयः भोजनारम्भोत्तरमाशौचेतुकर्त्रातथैवश्राद्धंसमापनीयम् भोक्त्रातुभोजनान्तेआशौचप्रकरणेवक्ष्यमाणंप्रायश्चित्तंकार्यम् संकटेतुपूर्वोक्तमितियुक्तंचेत्ग्राह्यम् ॥

**श्राद्धविघ्ननिर्णय**—निमंत्रण केल्यावर ब्राह्मणांत जननाशौच किंवा मृताशौच प्राप्त झाल्यास अशौच नाहीं. निमंत्रण शब्दानें दुसरा समंत्रक क्षण देतात तो घ्यावा. याचा लौकिक निमंत्रण असा अर्थ घेऊं नये, असें वाटतें. ( श्राद्ध ) कर्त्यास पाकक्रियेनंतर म्हणजे मंत्रानें पाकप्रोक्षण झाल्यानंतर अशौच नाहीं. कर्त्याचे घरीं भोजनास प्रारंभ झाल्यावर जनन किंवा मरण झालें तर पात्रावरील शेष अन्न टाकून दुसऱ्याच्या जलानें आचमन करावें. मला तर असें वाटतें कीं, अशौचाचा अपवाद अनन्यगतिविषयक असल्यानें संकट नसल्यास पाकप्रोक्षण झालें असलें तरी कर्त्यास अशौच प्राप्त झाल्यास त्याची निवृत्ति झाल्यावर श्राद्ध करावें. भोजन करणाऱ्या ब्राह्मणास भोजनास आरंभ होण्यापूर्वीं अशौचाचें ज्ञान झाल्यास दुसरा ब्राह्मण बोलवावा. भोजनास आरंभ झाल्यावर जर अशौच प्राप्त होईल तर कर्त्यानें तसेंच श्राद्ध समाप्त करावें व भोक्त्यानें भोजनांतीं अशौचप्रकरणीं सांगण्यांत येणारे प्रायश्चित्त करावें. संकट असेल तर पूर्वीं सांगितलेलें योग्य वाटल्यास घ्यावें.

अथसिन्धौपाकोत्तरमाशौचाभाववचनस्यकर्तुमात्रपरत्वाद्भोक्तुः प्रायश्चित्तमाशौचंचोक्तम् तद्यथा ब्राह्मणस्याशौचेश्राद्धेसकृत्कामतोन्नभोजनेसान्तपनकृच्छ्रम् अभ्यासेमासंकृच्छ्रंचरेत् अज्ञानाद्विप्रादीनांज्ञाताशौचानामन्नभक्षणे एकाहंत्र्यहंपञ्चाहंसप्ताहंक्रमेणाभोजनमन्तेपञ्चगव्याशनंच अभ्यासेद्विगुणम् आशौचंतुब्राह्मणादीनामाशौचेयः सकृदेवान्नमश्नातितस्यतावदाशौचंयावत्तेषामाशौचंतदन्तेप्रायश्चित्तंकुर्यादितिविष्णूक्तंज्ञेयम् श्राद्धकालेऽन्यकालेचैतत्समेवेतिज्ञेयम् दातृभोक्तृभ्यामुभाभ्यामाशौचंज्ञातंचेन्नदोषः आशौचमध्येश्राद्धदिनपातेआशौचान्तेएकादशाहेकार्यम् एकदशाहोमलमासेचेन्मलेपिकार्यम् तत्रातिक्रमे शुद्धमासे एतन्मासिकेप्रतिवार्षिकेचज्ञेयम् दर्शादीनांतुपञ्चमहायज्ञादिवल्लोपएवनाशौचान्तेकर्तव्यत्वंनापिप्रायश्चित्तम् आशौचंविनादर्शादीनांलोपेपय्युवासादिरूपंप्रायश्चित्तमेवनकालान्तरेनुष्ठानम् एकादशाहेऽसंभवेऽमावास्यायांशुक्लकृष्णैकादश्योर्वा वार्षिकम् मासिकंचोदकुम्भंचयद्यदन्तरितंभवेत् । तत्तदुत्तरसातंत्र्यादनुष्ठेयंप्रचक्षते १ केचिदाब्दिकमप्यन्तरितंदर्शादिकालारम्भत्रेऽग्रिममासे-

तत्तिथौकार्यमित्याहुः आशौचेतरव्याध्यादिविघ्नेविस्मृतौचैवमेव केचिद्व्या-ध्यादिविघ्नेपुत्रादिनातद्दिनेएवान्नेनाब्दिकमाहुः ॥

**भोक्त्याचें अशौचप्रायश्चित्त**—पाकप्रोक्षणानंतर अशौच नाहीं असें जें निर्णयसिंधूंत वचन आहे तें कर्तृपर असल्यानें भोक्त्यास प्रायश्चित्त व अशौच जें सांगितलें आहे तें असें:—अशौची श्राद्धांत ब्राह्मणानें एकदां स्वेच्छेनें भोजन केल्यास सांतपनकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. सराव असल्यास मासपर्यंत कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. ज्यांस अशौच समजलें आहे अशा ब्राह्मणादिकांचें अन्न नकळत भक्षण केल्यास ब्राह्मणान्नाच्या भोजनीं १ दिवस, क्षत्रियान्नाच्या भोजनीं ३ दिवस, वैश्यान्नाच्या भोजनीं ५ दिवस व शूद्रान्नाच्या भोजनीं ७ दिवस उपवास करून अंतीं पंचगव्यप्राशन करावें. संवय असल्यास द्विगुणित प्रायश्चित्त करावें. अशौचतर ब्राह्मणादिकांचे अशौचांत एकवार जो अन्नभक्षण करितो त्यानें अशौचीयांस जितकें अशौच असेल तितकें अशौच धरून अंतीं प्रायश्चित्त करावें, असें विष्णूनें सांगितलेलें जाणावें. श्राद्धकालीं व इतर कालींहि हें सारखेंच आहे असें जाणावें. दाता व भोक्ता या उभयतांस अशौच समजलें नसल्यास दोष नाहीं. अशौचांत श्राद्धदिवस प्राप्त झाल्यास अशौचनिवृत्ति झाल्यावर ११ व्या दिवशीं तें श्राद्ध करावें. ११ वा दिवस मलमासांत आल्यास मलमासांतही तें करावें. ११ व्या दिवसाचें उल्लंघन झालें तर शुद्ध मासांत करावें. हाच निर्णय मासिक आणि प्रतिसांवत्सरिक श्राद्धाविषयींही जाणावा. दर्शादि श्राद्धांचा तर पंचमहादि यज्ञाप्रमाणें जरी लोपच करावा, तरी तो अशौचांतीं करूं नये, व लोकप्रायश्चित्तही करूं नये. दर्शादिश्राद्धाचा लोप झाल्यास अशौचाशिवाय उपवासादिरूप प्रायश्चित्त करावेंच. इतर कालीं दर्शादि श्राद्ध करूं नये. ११ व्या दिवशीं असंभव असेल तर अमावास्या किंवा शुक्ल अथवा कृष्ण एकादशी या दिवशीं वार्षिक श्राद्ध करावें. मासिक श्राद्ध, उदकुंभ श्राद्ध, वगैरे जें जें अंतरलें असेल तें तें पुढच्या तंत्रासह करावें, असें सांगतात. अंतरलेलें वार्षिक श्राद्धही दर्शादिकालाचा असंभव असल्यास पुढील मासांत त्या त्या तिथीस करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. अशौचाव्यतिरिक्त इतर विघ्न आल्यास किंवा विस्मरण झाल्यास असाच निर्णय जाणावा. व्याधि, इत्यादि विघ्न प्राप्त झाल्यास पुत्रादिकानें त्या दिवशींच अन्नानें वार्षिक श्राद्ध करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात.

अथभार्यारजोदोषे । तत्रदर्शयुगादिमन्वाद्यष्टकान्वाष्टकादिश्राद्धानिपाककर्त्रन्तरसत्त्वेऽन्नेनतद्दिनेकार्याण्यन्यथामादिद्रव्येण कालादर्शोदर्शश्राद्धंपञ्चमेहनीतिपक्षान्तरमाह सकृन्महालयस्तुदर्शेभार्यारजसिमुख्यकालातिक्रमभियात-त्रैवकार्यः एवमाश्विनीशुक्लपञ्चम्यन्तकालेप्यूह्यम् अष्टम्यादौसकृन्महालयो-भार्यारजोदोषेनकार्यः कालान्तरसत्त्वादित्यादिमहालयप्रकरणोक्तमनुसंधेयम् प्रत्याब्दिकंमासिकंचरजोदोषेपि तद्दिनएवकार्यमित्येकःपक्षः पञ्चमेहनिकार्य-मित्यपरः पक्षद्वयेपिग्रन्थसंमतिःशिष्टाचारसंमतिश्च भार्यान्तरसत्त्वेतद्दिनएवे-

तिसर्वसंमतम् तद्दिनेकरणपक्षे श्राद्धकालेरजस्वलादर्शनादिकंवर्ज्यम् तेनतादृशगृहासंभवेयोग्यपाककर्त्रसंभवेचपञ्चमेह्ननीतिपक्षःश्रेयान् अपुत्रास्त्रीरजोदोषेभर्तुराब्दिकंपञ्चमेहनिकुर्यान्नत्वन्यद्वारातद्दिने ॥

**भार्यारजोदोषनिर्णय**—दर्श, युगादि, मन्वादि, अष्टका, अन्वष्टका, इत्यादि श्राद्धें, पाक करणारा दुसरा असेल तर, अन्नानें त्या दिवशींच करावींत. पाक करणारा नसल्यास आमान्नादि द्रव्यानें करावींत. दर्शश्राद्ध पांचव्या दिवशीं करावें, असा दुसरा पक्ष कालादर्शग्रंथांत सांगितला आहे. सकृन्महालय तर स्त्री रजस्वला असतांही, मुख्य कालाचें उल्लंघन होतें या भीतीस्तव त्याच दिवशीं करावा. आश्विन शुद्ध ५ पर्यंतच्या कालाविषयीं असाच निर्णय जाणावा. स्त्री रजस्वला असल्यास अष्टमी इत्यादि तिथींस सकृन्महालय करूं नये. कारण, त्यास दुसरा काल ( सांगितलेला ) आहे; महालयप्रकरणांत सांगितलेला हा निर्णय जाणावा. प्रतिसांवत्सरिक व मासिक हीं श्राद्धें स्त्री रजस्वला असतांही त्याच दिवशीं करावींत असा एक पक्ष आहे व पांचव्या दिवशीं करावींत. असा दुसराही पक्ष आहे. या दोन्ही पक्षांस ग्रंथसंमति व शिष्टाचारसंमति आहे. दुसरी स्त्री असल्यास त्या दिवशींच करावें हें सर्वसंमत आहे. त्या दिवशीं करण्याचा पक्ष असेल तर श्राद्धकालीं रजस्वला दर्शनादिक वर्ज्य करावें, यावरून रजस्वलादर्शन होणार नाहीं असें जर घर नसेल व यथायोग्य पाक करणारा नसेल तर ५ व्या दिवशीं श्राद्ध करावें हा पक्ष उत्तम. अपुत्रा स्त्री रजस्वला असल्यास तिनें भर्त्याचें वार्षिकादि श्राद्ध पांचव्या दिवशीं करावें पण दुसऱ्याकडून त्या दिवशीं करवूं नये.

अथपतिमुद्दिश्याग्निप्रवेशे तत्रसहगमनमेवविप्राणाम् क्षत्रियादेस्तुसहगमननमनुगमनंच एकचित्यारोहेणदंपत्योःसहैवमन्त्रवद्दाहःसहगमनम् भर्तुःसमन्त्रकदाहोत्तरंपृथक्चितावग्निप्रवेशोनुगमनम् तत्रोभयत्रापितिथ्यैक्येएकदिनेएवतन्त्रेणपाकादि कृत्वादर्शवत्षट्पिण्डषडर्घ्यविप्रभेदयुतंपितृपार्वणमातृपार्वणविशिष्टंश्राद्धंकार्यम् विश्वेदेवास्तुनभिन्नाभिन्नावा तिथिभेदेपिश्राद्धदिनैक्येएवमेव तिथिभेदाच्छ्राद्धदिनभेदेतुवार्षिकादिपृथगेवकार्यम् केचित्तुसहगमनेतिथिभेदेपिभर्तुःक्षयाहश्राद्धदिनेएवपत्न्याः श्राद्धंनतुदिनान्तरइत्याहुस्तदल्पकालव्यवधानेयोज्यंनतुद्वित्र्यादितिथिव्यवधाने ॥

**सहगमनश्राद्ध**—ब्राह्मणास सहगमनच विहित आहे. क्षत्रियादिकांस सहगमन व अनुगमन विहित होय. एका चितेवर आरोहण करून दंपत्याच्या बरोबरच समंत्रक दाहास सहगमन असें म्हणतात. भर्त्याचा समंत्रक दाह झाल्यावर निराळ्या चितेंत अग्निप्रवेश करणें यास अनुगमन असें म्हणतात. त्यांत दोहोंचीही एक तिथी असेल तर एके दिवशींच एकतंत्रानें पाक इत्यादि करून दर्शप्रमाणें ६ पिंड, ६ अर्घ्य, पृथक् पृथक् ब्राह्मणांचे ठायीं पितृपार्वण व मातृपार्वण यांनीं विशिष्ट असें श्राद्ध करावें. विश्वेदेव भिन्न किंवा अभिन्न असावे, असा भेद आहे. तिथि जरी निराळी असली तरी श्राद्धदिवस जर एकच असेल तर असाच

निर्णय जाणावा. तिथि निराळी असल्यामुळें श्राद्धदिवस निराळा असेल तर वार्षिकादि श्राद्ध निराळेंच करावें. सहगमनाची तिथि निराळी असली तरी भर्त्याच्या क्षयाहश्राद्धदिवशीं पत्नीचें श्राद्ध करावें, अन्य दिवशीं करूं नये, असें जें कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें आहे, तें कालाचें अंतर अल्प असल्यास योजावें, २–३ इत्यादि तिथींचें अंतर असल्यास योजूं नये.

अथश्राद्धसंपातेनिर्णयः । तत्रपित्रोर्मृताहैक्येपूर्वंपितुःश्राद्धंततःपाकभेदेन-मातुरित्युक्तम् गृहदाहादिनासपिण्डानांयुगपन्मरणेसंबन्धसामीप्यक्रमेणश्राद्धा-निपाकभेदेनपृथक्कुर्यात् पृथक्पाकेनभिन्नश्राद्धाशक्तौ तन्त्रेणश्रपणंकृत्वाश्राद्धं-कुर्यात्पृथक्पृथक् । क्रमेणैकदिनेमरणेमरणक्रमेण तत्रैकदिनेएकस्त्रयाणांश्राद्धा-निनकुर्यात् वार्षिकश्राद्धत्रयप्राप्तौश्राद्धद्वयंस्वयंकुर्यात् तृतीयादिभ्रात्रादिनाकार-येद्दिनान्तरेवाकुर्यात् पित्रोःसपिण्डस्यचसंपातेतूक्तम् श्राद्धंकृत्वातुतस्यैवपुनः श्राद्धंनतद्दिने । नैमित्तिकंतुकर्तव्यंनिमित्तोत्पत्त्यनुक्रमात् १ तथाषण्णवतिश्रा-द्धेषुसमानदेवताकत्वेतन्त्रेणश्राद्धानि अधिकदेवताकत्वेपृथक्श्राद्धानि वार्षिक-मासिकोदकुम्भश्राद्धेषुनित्यश्राद्धंदर्शादिश्राद्धंच देवतानांभेदात्पृथक्कार्यम् महालयेतीर्थश्राद्धेदर्शादिषण्णवतिषुचनित्यश्राद्धस्य प्रसङ्गसिद्धिः मासिकेनो-दकुम्भश्राद्धस्यप्रसङ्गसिद्धिः तत्रप्रसङ्गसिद्धिस्थलेदर्शादिकंप्रसाङ्गिश्राद्धमेव-संकल्पपूर्वंसाङ्गमनुष्ठेयम् प्रसंगसिद्धंतुनित्यादिकंन संकल्पादावुच्चार्यमिति-लोपापरपर्यायएवप्रसङ्गसिद्धिपदेनोच्यते तन्त्रसिद्धौ तुप्रकारद्वयंभाति दर्श-व्यतीपातश्राद्धयोस्तन्त्रानुष्ठानेषट्पुरुषानुद्दिश्यदर्शश्राद्धंव्यतीपातश्राद्धंचतन्त्रे-णकरिष्येइतिसंकल्प्यदर्शपातश्राद्धयोःदेवार्थेक्षणःकरणीयइतिदैवेनिमन्त्र्यदर्श-पातश्राद्धयोःपित्राद्यर्थेक्षणः करणीयइतिवर्गद्वयार्थंविप्रद्वयादिकंनिमन्त्र्यैक-मेवश्राद्धंकार्यमित्येकः प्रकारः अथवापूर्ववत्संकल्प्यदैवेतन्त्रेणैकमेवविप्रंनि-मन्त्र्यषोडशमासिकतन्त्रवत्दर्शश्राद्धेक्षणःकरणीयइतिदर्शविप्रनिमन्त्रणानन्त-रंव्यतीपातश्राद्धेक्षणइतिविप्रान्तरंनिमन्त्र्यविप्रचतुष्टयादियुतंपातश्राद्धेपिण्डा-भावात्षडर्घ्यपिण्डयुतंश्राद्धमेकेनैवपाकेनकार्यमित्यपरःप्रकारः एवंत्रिचतुरादि-श्राद्धानांतन्त्रेऊह्यम् अत्रपक्षद्वयेविचार्ययुक्ततरपक्षःसद्भिरनुष्ठेयः ॥

**श्राद्धसंपातनिर्णय**—मातापितरांचा मृत दिवस एक असेल तर पूर्वीं पित्याचें श्राद्ध व नंतर निराळा पाक करून मातेचें श्राद्ध करावें, असें पूर्वीं सांगितलेंच आहे. घर जळाल्याकारणानें सपिंडांस एकाच कालीं मरण आल्यास, संबंधाच्या जवळच्या क्रमानें निरनिराळा पाक करून श्राद्धें करावींत. निरनिराळा पाक करून निरनिराळीं श्राद्धें करण्यास शक्ति नसेल तर एकतंत्रानें पाक करून मात्र श्राद्धें निरनिराळीं करावींत. क्रमानें एकाच दिवशीं मरण आल्यास मरणाच्या क्रमानेंच श्राद्धें करावींत. एका दिवशीं एकानें तिघांचीं श्राद्धें करूं नयेत. तीन वार्षिक श्राद्धें एका दिवशीं प्राप्त झाल्यास २ श्राद्धें स्वतः करावींत व तिसरें भ्राता इत्यादिकांकडून करवावें. किंवा दुसऱ्या दिवशीं स्वतः करावें. मातापितरांचें

व सपिंडांचें श्राद्ध एकाच दिवशीं आल्यास त्याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. ज्याचें श्राद्ध एकदां केलें त्याचें श्राद्ध पुनः त्या दिवशीं करूं नये, नैमित्तिक असेल तरच करावें; कारण निमित्ताच्या उत्पत्तीचा अनुक्रम आहे. षण्णवति श्राद्धांत समान देवता असल्यास एकतंत्रानें श्राद्धें करावींत. अधिक देवता असल्यास (श्राद्धें) निरनिराळीं करावींत. वार्षिक, मासिक व उदकुंभ हीं श्राद्धें असतां नित्यश्राद्ध व दर्शश्राद्ध हीं निराळीं करावींत. कारण त्यांच्या देवता भिन्न आहेत. महालय, तीर्थश्राद्ध व दर्शादि षण्णवति श्राद्धें हीं असतां नित्यश्राद्धाची प्रसंगसिद्धि होते. मासिक श्राद्धानें उदकुंभ श्राद्धाची प्रसंगसिद्धि होते. प्रसंगसिद्धिस्थळीं दर्शादि प्रसंगीं श्राद्धनिश्चयानें संकल्पपूर्वक सांग (श्राद्ध) करावें. नित्यादिक संकल्पादिकांत प्रसंगसिद्धि उच्चारूं नये, असा लोपाचा जो दुसरा पर्याय त्यालाच प्रसंगसिद्धि असें म्हणतात. तंत्रसिद्धीविषयीं २ प्रकार दिसतात. दर्शश्राद्ध व व्यतीपातश्राद्ध एकतंत्रानें कर्तव्य असतां ६ पुरुषांचा उद्देश करून—'दर्शश्राद्धं व्यतिपातश्राद्धंच तंत्रेण करिष्ये' —असा संकल्प केल्यावर, 'दर्शपातश्राद्धेवहदेवार्थे क्षणःकरणीयः' असें म्हणून देवब्राह्मणांस निमंत्रण करून, 'दर्शपातश्राद्धेवहपित्राद्यर्थे क्षणः करणीयः' याप्रमाणें दोन त्रयींसाठीं दोन ब्राह्मणांसह एकच श्राद्ध करावें, असा एक प्रकार, अथवा पूर्वींप्रमाणेंच संकल्प करून देवाकडे एकतंत्रानें एकाच ब्राह्मणास निमंत्रण करून षोडश मासिक श्राद्धाच्या तंत्राप्रमाणें 'दर्शश्राद्धे क्षणः करणीयः' असें दर्शाच्या ब्राह्मणाचें निमंत्रण केल्यावर 'व्यतीपातश्राद्धे क्षणः०' असें दुसऱ्या ब्राह्मणास निमंत्रण करून, चार ब्राह्मण व सहा अर्घ्य यांसह सपिंडकश्राद्ध एकाच पाकानें करावें; कारण, व्यतीपातश्राद्धांत पिंडदान नाहीं हा दुसरा प्रकार. याप्रमाणें ३।४ इत्यादि श्राद्धांचे तंत्राविषयीं असाच प्रकार जाणावा. या दोन्ही पक्षांपैकीं, विचारांतीं जो योग्य वाटेल तो विद्वानांनीं ग्रहण करावा.

मयूखेतुसपिण्डकेनदर्शश्राद्धेनापिकस्यव्यतीपातादिश्राद्धस्यैकदेवताकस्य-प्रसङ्गसिद्धिरेवनतन्त्रसिद्धिस्तन्त्रोदाहरणंतुपातसन्क्रान्त्यादिरित्युक्तम् यत्त्वष्ट-क्येनपितृमातृवार्षिकमासिकयोः प्रसङ्गसिद्धिरित्युक्तंतन्महालयेनवार्षिक-सिद्धयापत्त्याबहुग्रन्थविरुद्धम् । यत्रचदर्शवार्षिकश्राद्धादौदेवताभेदाच्छ्राद्ध-भेदस्तत्र निमित्तानियतिश्चात्रपूर्वानुष्ठानकारणमितिवाक्यात् पूर्ववार्षिकंततोदर्शः यत्सर्वान्प्रत्येकरूप्येणैकदानप्राप्नोतितदनियतनिमित्तकंवार्षिकंमासिकंवापूर्वकार्य मितिवाक्यार्थः वार्षिकमासिकादीनांसंपातेपितृपूर्वकत्वंसंबन्धसामीप्यादि-कंचानुपदमेवोक्तम् दर्शमहालययोः संपातेपूर्वंमहालयस्ततोदर्शः दर्शवार्षिक-महालययोःप्राप्तौपूर्ववार्षिकंततोमहालयस्ततोदर्शइतित्रयंपाकभेदेन विस्तरो-महालयप्रकरणे तथा काम्यतन्त्रेणानित्यस्यतन्त्रंश्राद्धस्यसिद्ध्यति ॥

**मयूखीय श्राद्धसंपातनिर्णय**—मयूखांत असें सांगितलें आहे कीं, सपिंडक दर्शश्राद्धानें अपिंडक एक देवताक व व्यतिपातादि श्राद्धांची प्रसंगसिद्धि होते, पण तंत्रसिद्धि होत नाहीं. तंत्राचें उदाहरण

व्यतीपात, संक्रांती, इत्यादिक सांगितलें आहे. अन्वष्टक्य श्राद्धानें पित्याचे व मातेचे वार्षिक व मासिक श्राद्धांची प्रसंगसिद्धि होते असें जें सांगितलें, तें महालयश्राद्धानें वार्षिकांची सिद्धि मानल्यामुळें बहुतेक ग्रंथांशीं विरुद्ध होतें. देवताभिन्नत्वामुळें दर्श व वार्षिकश्राद्ध यांत जो श्राद्धभेद होतो, तो तेथें निमित्ताचा अनियम असल्यानें होतो. येथें पूर्वानुष्ठानाचें कारण आहे असें वाक्य आहे, म्हणून पूर्वी वर्षश्राद्ध करून नंतर दर्शश्राद्ध करावें. सर्वांस एकोरूपानें एका कालीं प्राप्त न होणारें जें अनियमित अनिमित्तक वार्षिक श्राद्ध तें पूर्वी करावें, असा याचा वाक्यार्थ आहे. वार्षिक व मासिक इत्यादिक एका दिवशीं प्राप्त झाल्यास पितृपूर्वकत्व व संबंधसामीप्यादिक असें सांगितलेंच आहे. दर्श व महालय हीं एके दिवशीं प्राप्त झाल्यास पूर्वी महालयश्राद्ध व नंतर दर्शश्राद्ध करावें. दर्शदिवशीं वार्षिक व महालय प्राप्त झाल्यास आधीं वार्षिक, नंतर महालय व नंतर दर्श अशीं तीन श्राद्धें निरनिराळ्या पाकानें करावींत. याचा विस्तार महालयप्रकरणांत केलाच आहे. तसेंच काम्यतंत्रानें नित्यश्राद्धाचें तंत्र सिद्धि पावतें.

**अथसंक्रान्त्ययनद्वयविषुवद्वययुगादिमन्वादिभाद्रकृष्णत्रयोदशीश्रोत्रियागमनप्रयुक्तमघाभरणीमघायुतत्रयोदशीवैधृतिव्यतीपातोपरागपुत्रोत्पत्तिनिमित्तकालभ्ययोगनिमित्तकश्राद्धानिप्रोष्ठपदीभिन्नसर्वपौर्णिमासीश्राद्धानिचैतानि श्राद्धानिपिण्डरहितानिसांकल्पविधिनाकार्याणि एषुदर्शवत्षट्पुरुषोद्देशः तेनैषामेककालसंपातेतन्त्रेणसिद्धिः नित्यश्राद्धस्यप्रसङ्गसिद्धिः उपरागश्राद्धस्यभिन्नकालत्वेपृथगनुष्ठानम् उपरागश्राद्धेनसंक्रान्तिदर्शादिश्राद्धानांप्रसङ्गसिद्धिरितिप्रथमपरिच्छेदेमतान्तरमुक्तम् पुत्रोत्पत्तिनिमित्तकश्राद्धस्यनवदेवताकत्वात्पृथगनुष्ठानम् तच्चहेम्नैवकार्यम् नत्वामेनाप्यन्नेनेति इतिश्राद्धसंपातनिर्णयः॥**

**श्राद्धसंपातशेषनिर्णय**—संक्रांति, दोन अयनें, दोन विषुव, युगादि, मन्वादि, भाद्रपद कृष्ण १३, श्रोत्रीयाचे आगमननिमित्तक, मघायुक्त त्रयोदशी, वैधृति, व्यतीपात, ग्रहण, पुत्रजन्मनिमित्तक व अलभ्ययोगनिमित्तक हीं श्राद्धें व प्रौष्ठपदीव्यतिरिक्त सर्व पौर्णिमासी श्राद्धें पिंडरहित व संकल्पविधीनें करावींत. या श्राद्धांत दर्शाप्रमाणें ६ पुरुषांचा उच्चार करावा. यावरून हीं एककालीं प्राप्त झालीं असतां तंत्रानें सिद्धि होते. नित्यश्राद्धाची प्रसंगसिद्धि करावी. ग्रहणश्राद्ध भिन्नकालीं असतां पृथक् करावें. ग्रहणश्राद्धानें संक्रांति, दर्श, इत्यादि श्राद्धांची प्रसंगसिद्धि होते, असें प्रथम परिच्छेदांत दुसरें मत सांगितलें आहे. पुत्रजन्मनिमित्तक श्राद्धाच्या देवता नऊ आहेत, म्हणून तें निराळें व हिरण्यानेंच करावें; आमान्नानें किंवा अन्नानें करूं नये. याप्रमाणें श्राद्धसंपाताचा निर्णय सांगितला.

**अथतिलतर्पणम् । तच्चयच्छ्राद्धेयावन्तःपितरस्तर्पितास्तावत्पितृगणोद्देशेनतच्छ्राद्धाङ्गत्वेनतिलैस्तर्पणंकार्यम् तत्रकालनियमःपूर्वंतिलोदकंदर्शेप्रत्यब्देतुपरेहनि । इत्यादि तदयंनिष्कर्षः दर्शश्राद्धेश्राद्धात्पूर्वंश्राद्धाङ्गतिलतर्पणम् तत्रविप्रनिमन्त्रणोत्तरं पाकारम्भोत्तरंवाब्रह्मयज्ञकरणेब्रह्मयज्ञांगनित्यतर्पणेनैव**

दर्शांगतिलतर्पणस्यसिद्धिः ततःपूर्ववैश्वदेवोत्तरंवाब्रह्मयज्ञकरणेश्राद्धीयषट्पुरुषोद्देशेनश्राद्धांगतर्पणंकृत्वाश्राद्धारंभःकार्यःप्रत्याहिकंसर्वपितृतर्पणंतुब्रह्मयज्ञकालेकार्यम् एवंयुगादिमन्वादिसंक्रान्तिपौर्णमासीवैधृतिव्यतीपातश्राद्धेषुदर्शवत्पूर्वमेव तीर्थश्राद्धेसर्वपित्रुद्देशेनपूर्वम् वार्षिकश्राद्धेपरेद्युरेवश्राद्धीयदेवतात्रयोद्देशेन वार्षिकश्राद्धदिनेनित्यतर्पणंतिलैर्नकार्यम् सकृन्महालयेसर्वपित्रुद्देशेनपरेद्युरेव अन्येषुमहालयपक्षेष्वष्टकान्वष्टकापूर्वेद्युः श्राद्धेषुमाध्यावर्षार्धोदयगजच्छायाषष्ठीभरणीमघाश्राद्धेषुहिरण्यश्राद्धेचानुव्रज्यतर्पणंश्राद्धीयदेवतोद्देशेन श्राद्धसंपातेतुयदितत्प्रसङ्गसिद्धिस्तदातदीयमेवतर्पणम् तन्त्रत्वेतुपूर्वतर्पणवतां पाश्चात्तर्पणवतांचश्राद्धानांसमसंख्यत्वंआदावन्तेवातर्पणम् विषयसंख्यत्वेबह्वनुरोधेन संक्रान्तिषुग्रहणेपित्रोः श्राद्धेदर्शेव्यतीपातेपितृव्यादिश्राद्धेमहालयेचनिषिद्धापिदिनेश्राद्धाङ्गतिलतर्पणंकार्यमितिकेचित् अन्येतुसर्वत्रश्राद्धांगतर्पणेकोपितिथ्यादिनिषेधोनेत्याहुः ॥

**तिलतर्पणनिर्णय**—ज्या श्राद्धांत जितके पितर तृप्त झाले असतील तितक्या पितृगणांचे उद्देशानें त्या श्राद्धाङ्गत्वानें जें तिलतर्पण करावें, त्याविषयीं कालाचा नियम दर्शश्राद्ध असतां पूर्वी व प्रतिसांवत्सरिक श्राद्ध असतां दुसऱ्या दिवशीं. त्याचें तात्पर्य हें आहे कीं, दर्शश्राद्धीं श्राद्धाचे पूर्वी श्राद्धांगतिलतर्पण करावें. त्यांतही ब्राह्मणांस निमंत्रण केल्यावर किंवा पाकास आरंभ केल्यावर ब्रह्मयज्ञ कर्तव्य असल्यास ब्रह्मयज्ञांगभूत नित्यतर्पणानेंच दर्शश्राद्धांगभूत तिलतर्पणाची सिद्धि होते. ब्राह्मणांस निमंत्रण करण्यापूर्वी किंवा वैश्वदेवानंतर ब्रह्मयज्ञ कर्तव्य असेल तर श्राद्धसंबंधीं ६ पुरुषांच्या उद्देशानें श्राद्धांगतर्पण करून श्राद्धास आरंभ करावा. प्रत्याहिक पितृतर्पण ब्रह्मयज्ञकालींच करावें. याप्रमाणें युगादि, मन्वादि, संक्रांती, पौर्णमासी, वैधृति व व्यतीपात या श्राद्धांत दर्शाप्रमाणें पूर्वींच तर्पण करावें. तीर्थश्राद्धीं सर्व पितरांच्या उद्देशानें पूर्वी करावें. वार्षिक श्राद्धाचे दिवशीं नित्यतर्पण तिलानें करूं नये. सकृन्महालयश्राद्धीं सर्व पितरांच्या उद्देशानें दुसऱ्या दिवशींच तिलतर्पण करावें. इतर महालय, पक्ष, अष्टका, अन्वष्टका, पूर्वेद्युः श्राद्ध, माध्यावर्ष, अर्धोदय, गजच्छाया, षष्ठी, भरणी, मघा, हीं श्राद्धें व हिरण्यश्राद्ध यांत श्राद्धीय देवतांचे उद्देशानें श्राद्धानंतर तत्कालींच तिलतर्पण करावें; श्राद्धसंपात असून त्या श्राद्धाची प्रसंगसिद्धि जर असेल तर तेंच तर्पण करावें. तंत्र असेल तर पूर्वतर्पणयुक्त व पश्चात्तर्पणयुक्त अशा श्राद्धांची संख्या सारखी असल्यास पूर्वी किंवा अंतीं तर्पण करावें व विषमसंख्या असेल तर ज्यांची संख्या अधिक असेल त्याप्रमाणें पूर्वी किंवा अंतीं करावें. संक्रांती, ग्रहण, मातापितरांचें श्राद्ध, दर्श, व्यतीपात, पितृव्यादिक श्राद्ध व महालय यांत निषिद्ध दिवस असला तरी श्राद्धांगतिलतर्पण करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. व सर्वत्र श्राद्धांगतिलतर्पणाविषयीं तिथी इत्यादिकांचा कोणताही निषेध नाहीं, असें दुसरे ग्रंथकार सांगतात.

अथश्राद्धाङ्गतर्पणनिषेधः । वृद्धिश्राद्धेसपिण्ड्यांचप्रेतश्राद्धेनुमासिके । संवत्सरविमोकेचनकुर्यात्तिलतर्पणम् १ तत्रतर्पणप्रकारः परेहनितर्पणेस्नात्वातर्पणं-

कृत्वानित्यस्नानंप्रातःसंध्यांचकुर्यात् यद्वानित्यस्नानंप्रातःसंध्योत्तरंश्राद्धाङ्ग-तर्पणंसंबन्धनामगोत्ररूपाणिद्वितीयान्तान्युच्चार्यस्वधानमस्तर्पयामितिबहृचैर्द-क्षिणहस्तेनान्यैरञ्जलिनात्रिस्त्रिस्तर्पयेत् प्रत्यञ्जलिमन्त्रावृत्तिः एवंनित्यतर्पणे-पिज्ञेयम् ॥

**श्राद्धांगतर्पणनिषेध**—वृद्धिश्राद्ध, सपिंडी, प्रेतश्राद्ध, अनुमासिक व संवत्सरविमोक या श्राद्धांत तिलतर्पण करूं नये. त्यांतल्या तर्पणाचा प्रकार असा—दुसऱ्या दिवशीं तर्पण कर्तव्य असल्यास स्नान करून, तर्पण केल्यावर नित्यस्नान व प्रातःसंध्या करावी, अथवा नित्यस्नान व प्रातःसंध्या केल्यावर जें श्राद्धांगतर्पण करावें, तें असें:—संबंध, नाम, गोत्र व रूप हीं द्वितीया विभक्तींत उच्चारून—'स्वधानमस्तर्पयामि' अशा उच्चारानें ऋग्वेदीयांनीं उजव्या हातानें व इतर शाखी-यांनीं अंजुळीनें ३–३ वेळ तर्पण करावें. प्रत्येक ओंजळीस मंत्र म्हणावा. पुन्हा नित्यतर्पणाविषयींही असाच निर्णय जाणावा.

अथब्रह्मयज्ञाङ्गेनित्यतर्पणेतिलयुक्ततर्पणानिषेधकालः रविभौमभृगुवारेषु-प्रतिपत्षष्ठ्येकादशीसप्तमीत्रयोदशीषुभरणीकृत्तिकामघासुनिशिसंध्यासुगृहे-जन्मनक्षत्रेशुभकार्यदिनेऽन्यदीयेशोभनयुतगृहेमन्वादिषुयुगादिषुगजच्छायाया-मयनद्वयेचलतिलतर्पणंमृदास्नानंपिण्डदानंचनकार्यम् केचिदयनद्वयेयुगादि-मन्वादिषुतिलतर्पणंनदोषायेत्याहुः विवाहव्रतचूडासुसुवर्षमर्धंतदर्धकमन्यत्रसं-स्कारेमासंमासार्धंवातिलतर्पणादिकंमहालयगयाक्षयाहश्राद्धंविनानकार्यमित्यु-क्तम् अत्रनिषिद्धदिनेतिलाभावेवाहेमरौप्ययुतहस्तेनदर्भयुतहस्तेनवा नित्य-तर्पणंकार्यम् ॥

**तिलतर्पणनिषेधकाल**—ब्रह्मयज्ञांगभूत नित्यतर्पणांतल्या तिलयुक्त तर्पणाच्या निषेधाचा काल पुढीलप्रमाणें:—रविवार, भौमवार, भृगुवार, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, सप्तमी, त्रयोदशी, भरणी, कृत्तिका, मघा, रात्री, संधिकाळ, गृह, जन्मनक्षत्र, शुभकार्यांचा दिवस, शुभकार्ययुक्त परकीयगृह, मन्वादि तिथि, युगादि तिथि, गजच्छाया व दोन अयनदिवस या कालीं तिलतर्पण, मृत्तिकास्नान व पिंडदान, हीं करूं नये. २ अयनदिवस, युगादि व मन्वादि या दिवशीं तिलतर्पण केल्यास दोष नाहीं, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. विवाह, मौंजी व चौल हीं झालीं असतां क्रमानें १ वर्ष, ६ मास व ३ मास व इतरसंस्कारीं १ किंवा अर्धमासपर्यंत महालय, गयाश्राद्ध व क्षयदिवसश्राद्ध, यांशिवाय तिलतर्पण करूं नये असें म्हटलें आहे. या निषिद्धदिनीं अथवा तिलांचा अभाव असतां सुवर्ण व रौप्ययुक्त हातानें किंवा दर्भयुक्त हातानें नित्यतर्पण करावें.

अथतिथ्यादिनिषेधापवादः तीर्थेतिथिविशेषेचगयायांप्रेतपक्षके । निषिद्धे-पिदिनेकुर्यात्तर्पणंतिलमिश्रितम् १ इतितिथिविशेषोष्टकादिरितिमयूखे अत्रका-तीयानांकेषांचिद्वार्षिकादौपरेहनिभरण्यादौविसर्जनान्तेचश्राद्धांगतर्पणाचारो-नदृश्यतेतत्रमूलंमृग्यम् क्षयाहश्राद्धदिनेनित्यतर्पणेतिलग्रहणंतुबहुग्रन्थविरुद्धम् ॥

**तिथ्यादिनिषेधापवाद**—तीर्थ, तिथिविशेष, गयाश्राद्ध व प्रेतपक्ष (अपरपक्ष) असतां निषिद्ध दिवस असला तरी तिलतर्पण करावें. तिथिविशेष म्हणजे अष्टकादि तिथि असें मयूखांत सांगितलें आहे. याविषयीं वार्षिकादि श्राद्धीं दुसऱ्या दिवशीं व भरणीश्राद्धीं विसर्जनानंतर श्राद्धांगतर्पण करण्याचा जो आचार कात्यायनांचा आढळत नाहीं, त्याविषयीं मूळ शोधून पहावें. क्षयाहश्राद्धदिवशीं नित्यतर्पणांत तिलग्रहण करणें अनेक ग्रंथविरुद्ध आहे.

अथनान्दीश्राद्धेयद्वक्तव्यंतत्पूर्वार्धेप्रपञ्चितम् एतच्चोपनयनादिमहाकर्मसुपूर्वेद्युः कार्यं जातकर्माद्यल्पकर्मसुतदहरेव तत्रदेशकालौसंकीर्त्यसत्यवसुसंज्ञकाविश्वेदेवानान्दीमुखाः मातृपितामहीप्रपितामह्योनान्दीमुख्यः पितृपितामहप्रपितामहानान्दीमु० मातामहमातु० पत्नीसहितानान्दी० एतानुद्दिश्यपार्वणविधानेनसपिण्डंनान्दीश्राद्धंकरिष्येइतिसंकल्पः अर्घ्यकालेनवैवपात्राण्यासाद्यतेषद्वौद्वौकुशौनिधाययवोसिसोमदैवत्यइतिपूर्वोक्तोहेनयवानोप्योशन्तस्त्वेतिद्वयोर्द्वयोरावाह्यामुकविश्वेदेवाःप्रीयन्तांनान्दीमुखामातरःप्रीयन्तानान्दीमुखाःपितामह्यः प्रीयन्तामित्यादिनायथालिङ्गपात्राणिपुरतोन्यसेत् नान्दीमुखामातरइदंवोर्घ्यमित्यादिनायथालिंगंद्वाभ्यामर्घ्यपात्रंविभज्यदेयम् द्विर्द्विर्गन्धदानम् चतुर्थ्यन्तानुद्दिश्यस्वाहव्यंनममेत्यादिदेववन्नदानम् । पिण्डदानकालेनान्दीमुखाभ्योमातृभ्यःस्वाहानान्दीमुखाभ्यःपितामहीभ्यःस्वाहेत्येवंप्रत्येकंद्वौद्वावित्यष्टादशपिण्डान्दद्यात् अत्रानुमन्त्रणंकृताकृतम् एवंसर्वपित्र्यमपिसव्यादिनादैवधर्मेणैवकार्यमित्यादिसर्वंपूर्वार्धतोज्ञेयम् तत्रानुक्तोविशेषएवात्रोक्तः ॥

**नान्दीश्राद्धविशेष**—नांदीश्राद्धाविषयीं जें सांगावयाचें त्याचा विस्तार पूर्वार्धांत केलाच आहे. उपनयनादि मोठीं कार्यें कर्तव्य असतां पूर्वदिवशीं नांदीश्राद्ध करावें. जातकर्मादि अल्प कार्यें असतां त्या दिवशींच तें करावें. देशकालांचा उच्चार करून 'सत्यवसुसंज्ञका नांदीश्राद्धं करिष्ये.' असा संकल्प करावा. अर्घ्यकालीं नऊ पात्रें स्थापून त्यावर दोन दोन कुश ठेवावे. व 'यवोसिसोमदैवत्य०' या पूर्वीं सांगितलेल्या ऊहानें त्या पात्रांत यव टाकून 'उशंतस्त्वा०' या मंत्रानें आवाहन करावें, व 'अमुक विश्वेदेवाः प्रीयन्तां' इत्यादि वाक्यांनीं जसें लिंग असेल त्याप्रमाणें पुढें मांडावींत व नंतर 'नांदीमुखामातरइदंवोर्घ्य०' या वाक्यानें जसें लिंग असेल त्याप्रमाणें दोघांस अर्घ्यपात्र विभागून द्यावें. २।२ वेळ गंध द्यावें. चतुर्थी विभक्त्यंत उद्देशानें 'स्वाहा हव्यंनमम' इत्यादि प्रकारानें देवाप्रमाणें अन्नदान करावें. पिंडदानकालीं 'नांदीमुखाभ्यो मातृभ्यःस्वाहा नांदीमुखाभ्यः पितामहीभ्यः स्वाहा' असे प्रत्येकास दोन दोन पिंड याप्रमाणें अठरा पिंड द्यावेत. येथें अनुमंत्रण कृताकृत आहे. या रीतीनें सर्व पित्र्यकर्महीं सव्यादिकानें व दैवधर्मानें करावें, इत्यादि सर्व प्रकार पूर्वार्धांतील जाणावा. पूर्वार्धांत न सांगितलेला विशेष प्रकार मात्र येथें सांगितला आहे.

अथविभक्ताविभक्तनिर्णयः तत्रजीवत्पितृकनिर्णयेश्राद्धाधिकारिनिर्णयेच प्रायेणोक्तम् विशेषस्तूच्यते विभक्तधनानांभ्रात्रादीनांसर्वेधर्माः पृथगेव सपिण्डयन्त

प्रेतकर्मषोडशमासिकानिचैकस्यैवेत्यादितुप्रागुक्तम् अविभक्तानांतुधननिर-पेक्षाणिस्नानसंध्याब्रह्मयज्ञमन्त्रजपोपवासपारायणादीनिनित्यनैमित्तिककाम्या-निपृथगेव अग्निसाध्यंश्रौतस्मार्तनित्यकर्मापिपृथगेव पितृपाकोपजीवीस्याद्भ्रा-तृपाकोपजीविकः । इतिपक्षान्तरंकात्यायनादिपरम् पञ्चमहायज्ञमध्येदेवभूत-पितृमनुष्ययज्ञाज्येष्ठस्यैव पाकभेदेआश्वलायनानांवैश्वदेवभेदोविकल्पेन ज्येष्ठे-नकृतेवैश्वदेवेकनिष्ठस्यपाकसिद्धौतेनतूष्णींकिंचिदन्नमग्नौक्षिप्त्वाविप्रायदत्त्वा-भोक्तव्यमितिकेचित् देवपूजातुपृथगेकत्रवा प्रतिवार्षिकदर्शसंक्रान्तिग्रहणादि-श्राद्धानिज्येष्ठस्यैव तीर्थश्राद्धाद्यपियुगपत्सर्वेषामविभक्तानांप्राप्तावेकस्यैव भेदेनप्राप्तौभिन्नम् एवंगयाश्राद्धेपियोज्यम् काम्येदानहोमादौद्रव्यसाध्येभ्रात्रा-द्यनुमत्याधिकारः मघात्रयोदशीश्राद्धंपृथगेवेत्युक्तम् ॥

**विभक्ताविभक्तनिर्णय**—जीवत्पितृनिर्णयप्रसंगीं व श्राद्धाधिकारनिर्णयप्रसंगीं जें या बाबतींत बहुतेक सांगितलेंच आहे, त्याहून विशेष मात्र आतां येथें पुढीलप्रमाणें सांगतों:—धन विभागून घेतलेल्या भ्रात्यादिकांचे सर्व धर्म निराळेच होत. सपिंडीपर्यंत प्रेतकर्म, षोडश मासिकें हें कर्म एकासच आहे, इत्यादि पूर्वीं सांगितलेंच आहे. द्रव्याची अपेक्षा ज्यास्त नाहीं अशी जी स्नान, संध्या, ब्रह्मयज्ञ, मंत्र, जप, उपवास, पारायण, इत्यादिक नित्यनैमि-त्तिक व काम्य कर्में तीं अविभक्तांनीं निराळींच करावींत. अग्निसाध्य असें श्रौत व स्मार्त हीं नित्यकर्मेंही निराळींच करावीत, पितृपाकानें व भ्रातृपाकानें उपजीविका करणारा जो दुसरा पक्ष सांगितला तो कात्यायनादिपर होय. पंचमहायज्ञांत देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ व मनुष्ययज्ञ हे ज्येष्ठासच होत. पाक निराळा असेल तर आश्वलायन-शाखीयांस पृथक् वैश्वदेव विकल्पानें सांगितला आहे. ज्येष्ठानें वैश्वदेव केला असतां कनि-ष्ठाचा पाक सिद्ध असेल तर कनिष्ठानें मुकाट्यानें अल्प अन्न अग्नींत टाकून ब्राह्मणांस अन्नभोजन द्यावें व आपण भोजन करावें, असें कोणी म्हणतात. देवपूजा निराळी किंवा एकत्र करावी. प्रतिसांवत्सरिक, दर्श संक्रांती, ग्रहण, इत्यादि श्राद्धें ज्येष्ठानेंच करावींत. अविभक्त भ्राते एकाच काळीं तीर्थास गेल्यास, तीर्थश्राद्धादिक एकानेंच करावें. पृथक् गेल्यास पृथक् करावें. गयाश्राद्धाविषयींही अशीच योजना करावी. द्रव्यानें साध्य असें जें दानहोमादि काम्यकर्म तें करण्याचा भ्राता इत्यादिकांच्या अनुमतीनें कनिष्ठास अधिकार आहे. मघायुक्त त्रयोदशीचें श्राद्ध निराळेंच करावें, असें सांगितलें आहे.

अथतीर्थश्राद्धम् तत्रगङ्गादितीर्थप्राप्तावर्घ्यावाहनद्विजाङ्गुष्ठनिवेशनतृप्ति-प्रश्नविकिरविसर्जनदिग्बन्धवर्ज्यंसकृन्महालयवत्सर्वपितृगणोद्देशेनधूरिलोचन-संज्ञकविश्वेदेवसहिततीर्थश्राद्धंकुर्यात् अग्नौकरणंकृताकृतम् करणपक्षेतीर्थजल-समीपेश्राद्धंचेत्तदाप्राकृतमन्त्रयुतंतीर्थजलेकार्यम् अन्यथाहस्तादौ पिण्डानांतीर्थे पक्षेपएवप्रतिपत्तिः अत्रतीर्थवासिनएवविप्राविगुणाअपिमुख्याः तदभावेऽन्ये अत्रश्राद्धीयेदेशेऽन्नादिद्रव्येचकाकश्वादिभिर्दृष्टेऽपिनदोषः तीर्थश्राद्धाङ्गतर्पणंदर्श-

वत्पूर्वंकार्यम् देशकालौसंकीर्त्यसर्वपितृगणमुच्चार्यएतेषाममुकतीर्थप्राप्तिनिमित्त-कंतीर्थश्राद्धंसपिण्डंसदैवंसद्यःकरिष्येइतिसंकल्पः धूरिलोचनविश्वेदेवादिसर्व-सकृन्महालयवत् तीर्थयात्रायांसाग्नेःसपत्नीकस्यैवाधिकारः निरग्निकस्यत्वपत्नी-कस्यापि स्त्रियाःस्नानदानतीर्थयात्रानामस्मरणादिकंपुत्राद्यनुमत्यैव सधवाया-यात्रादिकंपत्यासहैव ॥

**तीर्थश्राद्ध**—गंगादि तीर्थांवर गेलें असतां-अर्घ्य, आवाहन, द्विजांगुष्ठनिवेदन, तृप्तिप्रश्न, विकिरविसर्जन व दिग्बंध, हीं वर्ज्य करून सकृन्महालया-प्रमाणें सर्व पितृगणांस उद्देशून धूरिलोचनसंज्ञक विश्वेदेवासहित तीर्थश्राद्ध करावें. अग्नौकरण कृताकृत आहे. अग्नौकरणकरणांत तीर्थजलासमीप जर श्राद्ध कर्तव्य असेल तर प्राकृत मंत्रयुक्त तीर्थजलांत करावें, नाहीं तर ब्राह्मणाचे हस्तादिकांवर करावें. पिंड तीर्थांत टाकावेत असें वचन आहे. तीर्थवासी ब्राह्मण गुणहीन असले तरी तीर्थश्राद्धाविषयीं तेच मुख्य होत. ते न मिळतील तर दुसरे सांगावेत. तीर्थश्राद्धीं श्राद्धभूमि व अन्नादि द्रव्यें—कावळे, कुत्रे इत्यादिकांनीं जरी पाहिलीं तरी त्यांस दोष नाहीं. तीर्थश्राद्धांगतर्पण दर्शप्रमाणें आधीं करावें. देशकालांचा व सर्व पितृगणांचा उच्चार करून 'एतेषाममुक तीर्थप्राप्तिनिमित्तकं तीर्थश्राद्धं सपिंड सदैवं सद्यःकरिष्ये' असा संकल्प करावा. धूरिलोचनविश्वेदेवादि सर्व कृत्य सकृन्महालयाप्रमाणें करावें. साग्निक सपत्नीकांसच तीर्थयात्रेविषयीं अधिकार आहे. निरग्निक असेल तर अपत्नी-कांसही अधिकार आहे. स्नान, दान, तीर्थयात्रा, नामस्मरण, इत्यादिक पुत्रादिकांच्या अनुमतीनेंच स्त्रियेनें करावें. सौभाग्यवती स्त्रीनें पतीबरोबरच यात्रादिक करावींत.

अथतीर्थयात्राविधिः तीर्थयात्रांचिकीर्षुःप्राग्विधायोपोषणंगृहे । पारणाहे-घृतश्राद्धंवृद्धिधर्मयुतंचरेत् १ तथाचषट्दैवतंनवदैवतंद्वादशदैवतंवाबहुसर्पिर्यु-तेनान्नेनश्राद्धं कुर्यात् निवेदनकालेइदंघृतंसान्नंदत्तंदास्यमानंचेत्यावदेत् गणेशं-विप्रान्साधूंश्चशक्त्यासंपूज्ययात्रासंकल्पंकृत्वाश्राद्धशेषेणपारणांकृत्वाव्रजेदि-तिकेचित् अन्येतुश्राद्धान्तेयात्रासंकल्पंकृत्वाश्राद्धशेषघृतमात्रमादायग्रामान्तरं-क्रोशन्यूनंगत्वातत्र श्राद्धशेषघृतसहितान्नान्तरेणपारणामित्याहुः श्रीपरमेश्वर-प्रीतिकामःपितृमुक्तिकामोवाऽमुकप्रायश्चित्तार्थंवामुकतीर्थयात्रांकरिष्येइतिया-त्रासंकल्पऊह्यः उपवासात्पूर्वंमुण्डनंकार्यमिति केचित् अन्येतुप्रायश्चित्तार्थ यात्रायामेवमुण्डनमित्याहुः एवंगयोद्देश्यकयात्रायामपिमुण्डनविकल्पः उद्यतस्तु-गयांगन्तुंश्राद्धंकृत्वाघृताधिकम् । विधायकार्पटीवेषंग्रामंकृत्वाप्रदक्षिणम् १ ततः प्रतिदिनंगच्छेत्प्रतिग्रहविवर्जितः । यश्चान्यंकारयेच्छक्त्यातीर्थयात्रांनरेश्वरः २ स्वकीयद्रव्ययानाभ्यांतस्यपुण्यंचतुर्गुणम् । यात्रामध्येआशौचेरजोदोषेवाशुद्धि-पर्यन्तंस्थित्वातदन्तेगच्छेत् विषममार्गेतुनदोषः ॥

**तीर्थयात्राविधि**—तीर्थयात्रा करूं इच्छिणारानें पूर्वीं घरीं उपोषण करून पारणेच्या दिवशीं धर्मानें युक्त असें वृद्धिश्राद्ध घृतश्राद्ध करावें. षड्दैवत, नवदैवत किंवा द्वादशदैवत व बहुत घृतानें युक्त अशा अन्नानें श्राद्ध करावें. अन्ननिवेदन-

कालीं 'इदंघृतं सान्नंदत्तं दास्यमानंच'' असें म्हणावें व गणेश, विप्र व साधु यांची यथाशक्ति पूजा करून यात्रेचा संकल्प करावा आणि श्राद्धशेषानें पारणा करून प्रयाण करावें असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. दुसऱ्या ग्रंथकारांचें असें मत आहे कीं, श्राद्ध केल्यावर यात्रेचा संकल्प करून श्राद्धशेष घृत मात्र घ्यावें व एक कोसापेक्षां कमी अशा दुसऱ्या गांवीं जाऊन तेथें श्राद्धशेष अशा घृतसहित दुसऱ्या अन्नानें पारणा करावी. 'श्रीपरमेश्वरः प्रीतिकामः पितृमुक्तिकामोवाअमुकप्रायश्चित्तार्थंवा तीर्थयात्रांकरिष्ये' असा संकल्पांत ऊह करावा. उपवासापूर्वीं मुंडण करावें असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. दुसऱ्या ग्रंथकारांचें मत असें आहे कीं, प्रायश्चित्तार्थ यात्रेच्या वेळींच मुंडन करावें. याप्रमाणें गयेच्या उद्देशानें केलेल्या यात्रेंत मुंडनाचा विकल्प आहे. गयेस जाण्यास उद्युक्त झालेल्यानें घृतादिक श्राद्ध करून तीर्थाटन करणाराचा वेष धारण करावा, व आपल्या राहात्या गांवाला प्रदक्षिणा करून प्रतिग्रह विवर्जित होऊन प्रतिदिवशीं प्रयाण करावें. जो राजा आपल्या शक्त्यनुसार द्रव्यानें व वाहनानें दुसऱ्याकडून यात्रा करवील त्यास चतुर्गुण पुण्य प्राप्त होतें. यात्रेंत अशौच किंवा रजोदोष प्राप्त झाल्यास त्याच्या शुद्धीपर्यंत तेथेंच राहून नंतर प्रयाण करावें. विषम मार्ग असेल तर दोष नाहीं.

संकल्पितयात्रामध्येतीर्थान्तरप्राप्तौश्राद्धादिकंकार्यमेव वाणिज्यार्थंगतेनापिमुण्डनोपवासादिकार्यम् कार्यान्तरप्रसंगेनतीर्थगमनेर्धफलम् वाणिज्यार्थगमनेपादफलम् मार्गेद्विभोजनादिकरणेछत्रोपानहसेवनेचपादोनम् यानमारुह्यगमनेऽर्धम् अनुषङ्गेणतीर्थप्राप्तौतीर्थस्नानात्स्नानजंफलंनतीर्थयात्राफलम् मार्गेतरानदीप्राप्तौस्नानादिपरपारतः। अर्वागेवसरस्वत्याएषमार्गगतोविधिः॥

**तीर्थयात्रामार्गविधि**—संकल्पित यात्रेस जात असतां मार्गांत अन्य तीर्थ लागल्यास श्राद्धादिक अवश्य करावें. व्यापारासाठीं तीर्थास गेलेल्यांनींही मुंडन, उपोषण, इत्यादि करावें. दुसऱ्या कार्यप्रसंगानें तीर्थास गेल्यास अर्धें फल, व्यापारासाठीं गेल्यास चतुर्थांश फल, मार्गांत द्विवार भोजन, इत्यादिक केलें व छत्री, जोडा यांचें सेवन केलें तर चतुर्थांश कमी फल, वाहनांतून प्रयाण केल्यास अर्धें फल. दुसऱ्याच्या अनुषंगानें तीर्थ प्राप्त झाल्यास तीर्थस्नानानें स्नानसंबंधीं फल मिळतें, तीर्थयात्रेचें फल मिळत नाहीं. मार्गांत नदी आल्यास तिच्या पलीकडील तीरावर स्नानादिक करावें. सरस्वती नदीच्या अलीकडील तीरावरच स्नानादिक करावें. हा मार्गसंबंधीं विधि झाला.

तीर्थसामीप्यप्राप्तौविधिः। यानानितुपरित्यज्यभाव्यंपादचरैर्नरैः। भक्त्याचविलुठेत्तत्रकुर्याद्वेषंचकार्पटम् १ तीर्थप्राप्तिपूर्वदिनेतीर्थप्राप्तिदिनेवोपवासः कार्यः तीर्थेमुसलस्नानंकृत्वोदङ्मुखःप्राङ्मुखोवाकेशश्मश्रुनखलोमान्युदक्संस्थानिवापयेत् ततःसमन्त्रकंस्नानम् तत्रप्रणवेनजलमालोड्यतीर्थमावाह्य ॐ नमोदेवदेवायशितिकण्ठायदण्डिने। रुद्रायचापहस्तायचक्रिणे वेधसेनमः १ सरस्वतीचसावित्रीवेदमातागरियसी। सन्निधात्रीभवत्वत्रतीर्थेपापप्रणाशिनी

इतिमन्त्रेणस्नायात् शेषःस्नानविधिर्नित्यवत् ततस्तर्पणादितीर्थश्राद्धम् श्राद्धोत्तरदिनेततोगमनंनश्राद्धदिने मुण्डनंचोपवासश्चसर्वतीर्थेष्वयंविधिः । वर्जयित्वाकुरुक्षेत्रंविशालंविरजंगयाम् १ सर्वतीर्थेष्वितिप्रसिद्धमहातीर्थेष्वित्यर्थः दशमासोत्तरंपुनस्तीर्थप्राप्तौमुण्डनादितीर्थविधिः प्रयागेतुयोजनत्रयादागतस्य-दशमासादर्वागपि प्रयागेजीवत्पितृकगर्भिणीपतिकृतचूडबालानामपिसभर्तृकस्त्रीणामपिप्रथमयात्रायांवपनम्। केचित्सभर्तृकस्त्रीणांसर्वान्केशान्समुध्दृत्य छेदयेदङ्गुलद्वयमित्याहुः तत्रवेणीदानविधिर्द्वितीयपरिच्छेदेउक्तः यतिभिस्तुतीर्थेप्यृतुसंधिष्वेवकक्षोपस्थवर्जंवपनंकार्यम् तीर्थप्राप्तावविलम्बेनस्नानपितृतर्पणश्राद्धादिकुर्यात् नपर्वादिकालंविचारयेत् आकस्मिकमहातीर्थप्राप्तौद्वित्रिदिनादिवासासंभवेभुक्तेनापिरात्रावपिसूतकिनापिग्रहणपर्वणीस्नानंहिरण्यादिना तीर्थश्राद्धंचकार्यम् एवंमलमासेपियोज्यम् ॥

**तीर्थसामीप्यविधि**—वाहनांचा त्याग करून मनुष्यांनीं पादचारी होऊन भक्तीनें जमिनीवर लोळावें व कार्पटिक (तीर्थाटन करणाराचा) वेश धारण करावा. तीर्थासमीप जाण्याच्या आदल्या किंवा त्याच दिवशीं उपवास करावा. व नंतर तीर्थास मुसलस्नान करून ( अमंत्रकस्नान ) उत्तराभिमुख किंवा पूर्वाभिमुख झाल्यावर केश, स्मश्रु, लोम व नखें यांचें तीर्थाजवळ वपन करावें. त्यानंतर समंत्रक स्नान करावें. प्रणवमंत्रानें उदक ढवळून तीर्थाचें आवाहन करावें व त्यांत अवगाहन करून 'ॐ नमोस्तुदेवदेवाय ... प्रणाशिनी'—या मंत्रानें स्नान करावें. शेषस्नानविधि नित्याप्रमाणेंच करावा व नंतर तर्पणांनीं तीर्थश्राद्ध करावें. श्राद्धाचे दुसरे दिवशीं तेथून प्रयाण करावें; श्राद्धदिवशीं करूं नये. कुरुक्षेत्र, विशाल, विरज व गया हीं तीर्थें सोडून सर्व तीर्थीं मुंडण व उपवास हे विधि आहेत. सर्व तीर्थीं या शब्दानें प्रसिद्ध महातीर्थीं असा अर्थ घ्यावा. दहा मासांनंतर पुनः तीर्थ प्राप्त झाल्यास मुंडनादि तीर्थविधि करावा. तीन योजनांवरून प्रयागास आलेल्यानें १० महिन्यांच्या पूर्वींही तो करावा. जीवत्पितृक, गर्भिणीपति, चौलसंस्कार झालेला बाळ व सौभाग्यवती स्त्रिया यांसही प्रयागास वपन आहे. सौभाग्यवती स्त्रियांचे सर्व केश विंचरून शेवटचे दोन अंगुळें छेदावे, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. प्रयगास वेणीदान करण्याचा विधि आहे तो दुसऱ्या परिच्छेदांत सांगितला आहे. संन्याशांनीं तीर्थावर ऋतूंचे संधिकाळींच कक्षोपस्थ वर्ज्य करून वपन करावें. तीर्थ प्राप्त झाल्यास त्वरेनें स्नान, पितृतर्पण व श्राद्धादिक करावें. पर्वकालाचा विचार करूं नये. अकस्मात् महातीर्थ प्राप्त झाल्यास व तेथें २।३ दिवस राहणें अशक्य असल्यास, भोजन केलेल्यानें रात्रीं, व अशौचीयानेंही ग्रहणपर्वासारखें स्नान व हिरण्यादिकानें तीर्थश्राद्ध करावें. मलमासाविषयींही अशीच योजना करावी.

अथपरार्थस्नानम् । मातरंपितरंजायांभ्रातरंसुहृदंगुरुम् । तीर्थेस्नायाद्यमुद्दिश्यसोष्टमांशंलभेन्नरः १ यद्वाप्रतिकृतिंदर्भमयींसतीर्थवारिषु । मज्जयेच्चयमुद्दिश्यसोष्टमांशफलंलभेत् ॥

**परार्थस्नानफल**—माता, पिता, भार्या, भ्राता, सुहृद व गुरु यांतून ज्याच्या उद्देशानें जो तीर्थस्नान करील त्या मनुष्यास त्याचें अष्टमांश फळ मिळेल; अथवा ज्याचे उद्देशानें दर्भमयी प्रतिमा करून त्या प्रतिमेस महातीर्थोदकीं स्नान घालील त्यास अष्टमांश फळ मिळेल.

पक्वान्नेनतीर्थेश्राद्धेतेनैव पिण्डाः हिरण्यादिनाकृतेपिण्डद्रव्याणि सक्तसंयावपायसपिण्याकगुडान्यतमानि पिण्डानांतीर्थेप्रक्षेपएव नान्याप्रतिपत्तिः एतच्चापुत्रयाविधवयाकार्यम् सपुत्रयानकर्तव्यंभर्तुःश्राद्धंकदाचनइतिस्मृतेः अनुपनीतेनापिकार्यम् यतिनातुनकर्तव्यम् दण्डंप्रदर्शयेद्भिक्षुर्गयांगत्वानपिण्डदः । दण्डस्पर्शाद्विष्णुपदेपितृभिःसहमुच्यते ॥ १ ॥ एवंकूपवटादिष्वपिदण्डप्रदर्शनमेव तीर्थेवृत्तिदौर्बल्येनप्रतिग्रहेदशमांशदानेनशुद्धिः ॥

**अपुत्राविधवातीर्थश्राद्ध**—पक्वान्नानें तीर्थी श्राद्ध केल्यास त्याच अन्नानें पिंडप्रदान करावें; हिरण्यादिकानें श्राद्ध केल्यास पिंडप्रदानाचीं द्रव्यें सातूचें पीठ, पायस, पिण्याक, (पेंड, केशर, हिंग, ऊद, धूप,) व गूळ यांपैकीं कोणतेंही घ्यावें. पिंड तीर्थांतच टाकावे. दुसरा निर्णय नाहीं. हें तीर्थश्राद्ध अपुत्रविधवेनें करावें. कारण पुत्रवतीनें भर्त्याचें श्राद्ध कधींही करूं नये अशी स्मृति आहे. हें श्राद्ध उपनयन न झालेल्यानेंही करावें. पण संन्याशानें करूं नये. संन्याशानें गयेस जाऊन श्राद्ध करूं नये. त्यानें दंडाचेंच प्रदर्शन करावें. विष्णुपदीं दंडस्पर्श केल्यानें तो पितरांसह मुक्त होतो. याप्रमाणेंच कूप, वट, इत्यादिकींही दंडप्रदर्शनच करावें. उपजीविकेच्या दुर्बलतेमुळें तीर्थी प्रतिग्रह केल्यास त्याच्या दशमांशानें शुद्धि होते.

अथाशौचनिर्णयः श्रीविठ्ठलंरुक्मिणींचपितरौदीनवत्सलौ । ध्यात्वेष्टसिद्धयेनत्वावक्ष्येऽथाशौचनिर्णयम् ॥

**अशौचनिर्णयसूचना**—इष्टसिद्धीकरितां श्रीविठ्ठल व रुक्मिणी यांचें ध्यान करून व दीनदयाळु अशा मातापितरांस नमस्कार करून आतां अशौचनिर्णय सांगतों.

तत्रादौगर्भनाशजननाद्याशौचम् । आचतुर्थाद्भवेत्स्रावःपातःपञ्चमषष्ठयोः अतऊर्ध्वंप्रसूतिःस्यात्तत्राशौचंविविच्यते १ तत्रगर्भस्रावेआद्यमासत्रयेमातुस्त्रिरात्रंचतुर्थमासेचतूरात्रमस्पृश्यत्वरूपमाशौचम् पित्रादिसपिण्डानांस्रावमात्रेस्नानाच्छुद्धिः पञ्चमषष्ठमासयोर्गर्भपातेगर्भिण्यामासमसंख्यंक्रमेणपञ्चषट्दिनान्यस्पृश्यत्वलक्षणमाशौचम् पित्रादिसपिण्डानांतुत्रिदिनंजननाशौचंमृताशौचंतुनास्ति इदंस्रावपाताशौचंसर्ववर्णसाधारणम् गर्भिण्याःसप्तममासप्रभृतिप्रसवेमातुःपित्रादिसपिण्डानांचसंपूर्णजननाशौचम् तच्चविप्रेदशाहम् क्षत्रियेद्वादशाहम् वैश्येपञ्चदशाहम् शूद्रेमासः सङ्करजातीनांशूद्रवत् विज्ञानेश्वरस्तुनैषामाशौचंकिंतुस्नानमात्रमित्याह सर्ववर्णेषुदशाहंवा जननाशौचेगर्भिण्यादशाहमस्पृश्यत्वम् कर्मानधिकारस्तुकन्योत्पत्तौमासंपुत्रोत्पत्तौविंशतिरात्रम् इदंस्व-

स्वाशौचोत्तरमितिविप्रस्त्रियाःक्रमेणचत्वारिंशत्त्रिंशद्दिनान्यनधिकारः पितुःसापत्नमातुश्च कन्यायाःपुत्रस्यैवोत्पत्तौसचैलस्नानात्प्रागस्पृश्यत्वम् पित्रादिसपिण्डानांजननाशौचेकर्मानधिकारमात्रम् कर्माद्यतिरिक्तकालेस्पर्शेदोषोन जातकर्मणिदानेचनालच्छेदनात्पूर्वंपितुरधिकारः एवंपञ्चमषष्ठदशमदिनेषुदानेजन्मदापूजनेचाधिकारः तत्रविप्राणां प्रतिग्रहेऽपिदोषोन ॥

**गर्भनाशजननाशौच**—चार महिन्यांपर्यंतचा जो गर्भनाश तो स्राव होय व पांचव्या आणि सहाव्या मासांतील जो गर्भनाश तो पात होय. सातव्या मासापासून प्रसूति होय. यांविषयीं अशौचाचें आतां विवेचन करितों:—गर्भस्राव असतां पहिल्या तीन मासांत मातेस त्रिरात्र; चौथ्या मासांत चार रात्री; अस्पृश्यत्वरूप अशौचस्राव झाल्यास पिता इत्यादि सर्व सपिंडांची स्नानानें शुद्धि होते. ५ व्या व ६ व्या मासांत गर्भपात झाल्यास गर्भिणीस मासतुल्य क्रमानें पांच सहा दिवसपर्यंत अस्पृश्यत्व लक्षण अशौच जाणावें, पिता इत्यादि सपिंडांस तीन दिवस जननाशौच; मृताशौच नाहीं. स्राव व पात यांचें अशौच सर्वसाधारण आहे. गर्भिणीचा प्रसव ७ व्या महिन्यापासून झाल्यास माता व पिता इत्यादि सपिंडांस संपूर्ण जननाशौच आहे, हें जननाशौच (सुव्हेर) ब्राह्मणांस दहा दिवस, क्षत्रियांस बारा, वैश्यांस पंधरा दिवस, शूद्रांस १ मास व संकर जातीस शूद्राप्रमाणेंच अशौच आहे. विज्ञानेश्वराचें मत तर असें आहे कीं, संकर जातीस अशौचच नाहीं. स्नान मात्र आहे अथवा वर्णास दहा दिवस अशौच आहे. जननाशौचांत गर्भिणीस दहा दिवस अस्पृश्यत्व जाणावें. कन्या झाल्यास एक मासपर्यंत व पुत्र झाल्यास वीस रात्रीपर्यंत ती कोणत्याही कर्माला अनधिकारी आहे. हा निर्णय अशौचनिवृत्तीनंतरचा जाणावा. ब्राह्मणस्त्रियेस क्रमानें ४०।३० दिवसपर्यंत अधिकार नाहीं. कन्या किंवा पुत्र झाल्यावर पिता व सापत्न माता यांस सचैल स्नानापूर्वी अस्पृश्यत्व आहे. जननाशौच असतां त्याला कर्माधिकार मात्र नाहीं. कर्मादिकालाहून अन्यकालीं स्पर्श झाल्यास दुसऱ्यास दोष नाहीं. नालच्छेदनापूर्वीं जातकर्म व दान यांविषयीं पित्यास जसा अधिकार आहे, त्याप्रमाणेंच पांचवा, सहावा व दहावा या दिवशीं दान व जन्मादि देवतांचें पूजन यांविषयीं त्याला अधिकार आहे. त्या दिवशीं ब्राह्मणांस प्रतिग्रहाविषयीं दोष नाहीं.

कूटस्थमारभ्यसप्तमपुरुषपर्यन्ताःसपिण्डाः ततःसप्तसमानोदकाःततःसप्तैकविंशतिपर्यन्ताःसगोत्राः तत्रसपिण्डानांदशाहमित्युक्तम् सोदकानांत्रिरात्रम् सगोत्राणामेकरात्रमितिनागोजीभट्टीये अन्येतुसगोत्राणांनाशौचमित्याहुः अयंसपिण्डसोदकाद्याशौचविभागोजननेमरणेचसमानः मरणेत्वाशौचविच्छेदेपिस्नानमात्रंयावदेककुलत्वज्ञानंतावद्भवत्येवेतिविशेषः अत्रेदंबोध्यम् कूटस्थादारभ्यसंततिभेदएकसंततौकश्चिदष्टमोपरसंततौचकश्चित्सप्तमस्तयोश्चैकतःसापिण्ड्यानुवृत्तिःपरतोनिवृत्तिरित्युक्तम् तत्राष्टमेननिवृत्तसापिण्ड्यकेनसप्तमादीनां परसंततिस्थानांजननेमरणेत्रिदिनमाशौचंकार्यम् सप्तमेनत्वनुवृत्तसापिण्ड्यके-

नाष्टमादीनांजननेमरणेवादशाहमेवकार्यम् एवंसोदकत्रिरात्रादौकन्याविषयक-त्रिपुरुषसापिण्ड्येचोह्यम् तत्राष्टमस्यमृतपितृकत्वेजीवत्पितृकत्वेपिचत्रिदिन-मेव त्र्यम्बकीयेभट्टोजीयेनागोजीयेचाशौचप्रकरणेऽन्यत्रचपित्रादिजीवना-जीवनकृतविशेषादर्शनादितिकेचित् अपरेतुनिर्णयसिन्धौसापिण्ड्यप्रकरणे-आदशमाद्धर्मविच्छित्तिरित्यादिसुमन्तुवाक्यस्यशूलपाणिकृतव्याख्यानेएक-पिण्डदानक्रियान्वयित्वरूपसापिण्ड्यलक्षणमनुसृत्यजीवत्पित्रादित्रिकस्यप्र-पितामहात्परेत्रयःपिण्डभाजस्तदूर्ध्वंत्रयोनवपुरुषपर्यन्तालेपभाजःश्राद्धकर्ताच-दशमइतिदशमादूर्ध्वंसापिण्ड्यनिवृत्तिः पितृपितामहजीवनेनवपुरुषपर्यन्तं-पितृजीवनेष्टपुरुषपर्यन्तसापिण्ड्यमितिप्रतिपादनादष्टमादेः पित्रादिजीवन-दशायांदशाहमाशौचंपित्रादिमरणोत्तरमेवत्रिदिनमितिवदन्ति अत्रममद्वितीय-पक्षएवयुक्तोभाति ॥

**सापिण्ड्यसोदकजननाशौचनिर्णय**—मूळपुरुषापासून आरंभ करून सातव्या पुरुषापर्यंतचे जे ते सपिंड होत. आठ-व्या पुरुषापासून सात पुरुष समानोदक होत. पंधरा पासून सात पुरुषपर्यंत म्हणजे एकवीस पुरुषपर्यंत ते सगोत्र होत. त्यांत सपिंडांस दहा दिवस, सोदकांस त्रिरात्र व सगोत्रांस एक रात्र अशौच आहे, असें नागोजीभट्टकृत अशौचनिर्णयांत सांगितलें आहे. दुसऱ्या ग्रंथकारांचे मतें सगोत्रांस अशौच नाहीं. सपिंड व सोदक इत्यादिकांचा अशौचविभाग जननाशौच व मरणाशौच यांविषयीं समान आहे. मरणाशौचाविषयीं तर अशौचाचा विच्छेद झाला असला म्हणजे पिढ्या तुटल्यामुळें अशौच धरणें नसलें तरी जोंपर्यंत एका कुलाचें ज्ञान आहे तोंपर्यंत स्नान आहेच, हा विशेष जाणावा. येथें हें जाणणें अवश्य आहे कीं, मूळपुरुषापासून आरंभ करून संततिभेद असतां एका संततीचे ठायीं कोणी एक पुरुष आठवा व दुसऱ्या संततीचे ठायीं कोणी एक सातवा असें असेल तर त्यांची एकीकडून सापिंड्याची अनुवृत्ति होते, व दुसरीकडून निवृत्ति होते असें सांगितलें आहे. त्यापैकीं, सापिंड्यांतून निवृत्त झालेल्या आठव्या पुरुषानें दुसऱ्या संततींतील सप्तमादिकांचें जनन व मरण झालें असतां तीन दिवस अशौच धरावें. अनुवृत्त सापिंड्य असलेल्या सातव्यानें आठवा इत्यादिकांचें जननमरण झालें असतां दहा दिवसच अशौच धरावें. याप्रमाणें सोदक त्रिरात्रादिकांविषयीं व कन्याविषयक त्रिपुरुष सापिंड्यविषयींही असाच निर्णय जाणावा. आठवा मृतपितृक किंवा जीवत्पि-तृक असेल तर त्यानें तीन दिवसच अशौच धरावें. कारण त्र्यंबकभट्टकृत त्र्यंबकींत, भट्टोजीदीक्षितकृत व नागोजीभट्टकृत अशौचप्रकरणांत व इतर ग्रंथांतही पित्रादिक जिवंत किंवा मृत असल्याविषयींचा विशेष कोठें आढळत नाहीं, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. दुसरे ग्रंथकार तर निर्णयसिंधूंत सापिंड्यप्रकरणीं—दहाव्या पुरुषापासून धर्म विच्छित्ती—इत्यादि सुमंतूच्या वाक्यावर शूलपाणीनें केलेल्या व्याख्यानांत एक पिंडदान क्रियान्वयित्वरूप म्हणजे एका पिंडदानक्रियेचा संबंध ज्यांस आहे असें सापिंड्यलक्षण स्वीकारून, ज्याचे पितामह व प्रपितामह जिवंत आहेत त्याचे प्रपिता-

महापलीकडचे तीन पिंडभाक् होत असें म्हणतात. पिंडभाक् जे त्यापासून तीन नऊ पुरुषांपर्यंत लेपभाक् होत, व श्राद्धकर्ता दहावा याप्रमाणें दहाव्या पुरुषानंतर सापिंड्य-निवृत्ति होते. पिता व पितामह जिवंत असल्यास नऊ पुरुषांपर्यंत सापिंड्य, व पिता जिवंत असल्यास आठ पुरुषांपर्यंतच सापिंड्य, असें प्रतिपादिलें आहे, म्हणून आठवा इत्यादिकाचा पिता जिवंत असेल तर त्या आठव्यास दहा दिवसपर्यंत अशौच. पिता इत्यादि मृत झाल्यावरच तीन दिवस अशौच, असें म्हणतात. याविषयीं मला दुसरा पक्षच योग्य वाटतो.

पितृगृहेकन्याप्रसूतौ पित्रोस्तद्गृहवर्तिभ्रातॄणांचैकाहः पितृगृहवर्तिपितृव्यादीनांसर्वेषांपितृसपिण्डानामेकाहइतिस्मृत्यर्थसारे एवंभ्रात्रादिगृहेभगिन्यादिप्रसवेऽपितेषामेकाहः माधवस्तुपितृगृहेकन्याःप्रसूतौपित्रोस्त्रिरात्रंतद्गृहवर्तिभ्रातॄणामेकाहइत्याह कन्यायाःपतिगृहेप्रसवेपित्रादीनांनाशौचम् मृतजातेशिशौसपिण्डानांसंपूर्णमेव जननाशौचम् मृताशौचंनास्ति जननोत्तरंनालच्छेदनात्पूर्वं शिशुमरणेपित्रादिसपिण्डानांत्रिदिनंजननाशौचं मातुस्तुदशाहमेव मृताशौचंतुनास्ति नालच्छेदनोत्तरंदशाहाभ्यन्तरेशिशुमरणेसपिण्डादीनांसंपूर्णमेवजननाशौचंमरणाशौचंतुनास्ति ॥

**बापाच्या घरीं कन्या प्रसूत झाल्यास**—मातापितरांस व त्या घरीं असणाऱ्या भ्रात्यांस एक दिवस जननाशौच. पित्याचे घरीं राहणारे पितृव्यादिक पित्याचे सर्व सपिंडास एक दिवस, असें स्मृत्यर्थसारांत म्हटलें आहे. याप्रमाणें भ्राता इत्यादिकांचे घरीं भगिनी प्रसूत झाल्यास भ्रात्यास एक दिवस जननाशौच. माधवाचे मतें पित्याचे घरीं कन्या प्रसूत झाल्यास मातापितरांस त्रिरात्र जननाशौच व त्या घरीं राहणाऱ्या भ्रात्यांस एक दिवस जननाशौच. पतीच्या गृहीं कन्या प्रसूत झाल्यास पित्रादिकांस अशौच नाहीं. शिशु मृत होऊन उत्पन्न झाल्यास सपिंडांस संपूर्णच जननाशौच आहे, मृताशौच नाहीं. जन्मानंतर नालच्छेदन करण्यापूर्वीं शिशु मृत झाल्यास पिता इत्यादि सपिंडांस तीन दिवस जननाशौच. मातेस दहा दिवसच जननाशौच, मृताशौच नाहीं. नालच्छेदन झाल्यास दहा दिवसांच्या आंत शिशु मृत झाल्यास सपिंडादिकांस संपूर्ण जननाशौच, मृताशौच नाहीं.

अथमृताशौचम् तत्रमृताशौचवतामस्पृश्यत्वंकर्मानधिकारश्च दशाहानन्तरंनामकरणात्प्राक्शिशुमरणेसपिण्डानांस्नानमात्रम् मातापित्रोस्तुपुत्रमृतौत्रिरात्रंकन्यामृतौचैकाहः सापत्नमातुः सर्वत्रापितृवत् नाम्नःपूर्वंखननमेव नित्यम् नामकरणानन्तरंचूडाकरणपर्यन्तंतदभावेवर्षत्रयपूर्तिपर्यन्तंदाहखननयोर्विकल्पः नामकरणोत्तरं दन्तोत्पत्तेःप्राक्पुत्रमरणेदाहेसपिण्डानामेकाहःखननेतुस्नानाच्छुद्धिः मातापित्रोरुभयत्रापित्रिरात्रम् कन्यामृतौतुत्रिपुरुषसपिण्डानामुभयत्रस्नानाच्छुद्धिः मातापित्रोःकन्यामृतौदन्तोत्पत्तिपर्यन्तमुभयत्रैकाहः अत्रनामकरणंद्वादशदिनोपलक्षणम् दन्तजननंसप्तममासोपलक्षणम् तेनद्वादशदिनमारभ्यषण्मासपर्यन्त-

मेकाहादिफलितम् सप्तममासप्रभृतिचूडाकरणपर्यन्तंतदभावेतृतीयवर्षपूर्तिपर्यन्तं-दाहेखननेवासपिण्डानामेकाहःकेचित्खननेएकाहोदाहेत्रिरात्रमित्याहुःमातापित्रोरु-भयत्रत्रिरात्रम् एततत्पुत्रमृतौकन्यामृतौतुवर्षत्रयपर्यन्तंसपिण्डानांस्नानाच्छुद्धिः मातापित्रोःसप्तममासप्रभृतिकन्यामृतौत्रिरात्रम् विज्ञानेश्वरस्त्वेकादशदिनमार-भ्ययावदुपनयनंपुत्रमृतौकन्यामृतौतुयावद्विवाहंमातापित्रोस्त्रिरात्रमेवेत्याह प्रथम वर्षादौकृतचूडस्यपुत्रस्मरणेपित्रादीनांसर्वेषांत्रिदिनंनियतंदाहश्चनियतः त्रिव-र्षोर्ध्वंकृतचूडस्याकृतचूडस्यवामरणेप्रागुपनयनात्पित्रादिसर्वसपिण्डानांत्रिदिनम् दाहोनियतः सोदकानांत्वनुपनीतमरणेऽनूढकन्यामरणेचनाशौचंकिंतुस्नानमा-त्रम् अनुपनीतभ्रातृमरणेभगिन्यानाशौचम् ऊनद्विवर्षस्यखननंमुख्यम् अनु-गमनंवैकल्पिकम् पूर्णद्विवर्षस्यदाहोमुख्यः अनुगमनंनित्यम् अत्रदाहोदक-दानादितूष्णीमेव कृतचूडायपूर्णत्रिवर्षायच्चभूमौपिण्डदानम् दन्तजननपर्यन्तं-तत्तुल्यवयस्केभ्योद्वितीयदिनेतदुद्देशेनदुग्धदानम् त्रिवर्षान्तंचौलान्तंवापायस-दानम् तदूर्ध्वमुपनयनपर्यन्तमाशौचान्तेसवयोभ्यस्तदुद्देशेनभोजनादिदानम् ॥

**मृताशौच**—ज्यांस मृताशौच आहे ते स्पर्शास योग्य नाहींत व त्यांस कर्मांचाही अधिकार नाहीं. दहा दिवसांनंतर नामकरणापूर्वीच शिशु मरण पावल्यास सपिंडांनीं फक्त स्नान करावें. मातापितरांना पुत्र मृत झाल्यास त्रिरात्र व कन्या मृत झाल्यास एक दिवस अशौच धरावें. सापत्न मातेस सर्वत्र पित्याप्रमाणेंच अशौच. नामकरणापूर्वीं नित्यखननच (पुरणें) नामकरणानंतर चौलकरणापर्यंत व चौल झालें नसल्यास तीन वर्षें पूर्ण होईपर्यंत दहन व खनन यांचा विकल्प आहे. म्हणजे दहन करावें किंवा पुरावें. नामकरणानंतर दांत येण्यापूर्वीं पुत्रमरणीं दहन असल्यास सपिंडांस एक दिवस अशौच. खनन असेल तर स्नानानें शुद्धि. दहन व खनन या उभयपक्षींही मातापितरांस त्रिरात्र. कन्यामरणीं तर त्रिपुरुष सपिंडांची उभयपक्षीं स्नानानें शुद्धि. कन्यामरणीं दांत उत्पन्न होईपर्यंत उभयपक्षीं मातापितरांस एक दिवस अशौच. येथें नामकरण हें बाराव्या दिवसाचें उपलक्षण आहे. दांत येणें हें सातव्या मासाचें उपलक्षण आहे. यावरून बाराव्या दिवसापासून सहा महिनेपर्यंत एक दिवस अशौच इत्यादि फलितार्थ निघतो. सातव्या मासापासून चूडाकर्मापर्यंत व चूडाकर्म झालें नसेल तर पूर्ण तीन वर्षें होईपर्यंत दहन किंवा खनन असतां सपिंडांस एक दिवस अशौच. कांहीं ग्रंथकारांच्या मतें खनन असतां एक दिवस व दहन असतां त्रिरात्र, असें आहे. मातापितरांस उभयपक्षीं त्रिरात्र, अशौच पुत्रवर्णीं जाणावें. कन्यावर्णीं तीन वर्षेपर्यंत सपिंड स्नानानें शुद्ध होतात. कन्या मृत असतां सातव्या मासापासून मातापितरांस त्रिरात्र अशौच, अकराव्या दिवसापासून उपनयन होईपर्यंत पुत्र मृत असतां व विवाहापर्यंत कन्या मृत असतां त्रिरात्र अशौच, असें विज्ञानेश्वर यानें म्हटलें आहे. प्रथम वर्ष इत्यादि कालीं चूडाकर्म केलेला पुत्र मृत झाल्यास पिता इत्यादि सर्वांस निश्चयानें तीन दिवस अशौच व निश्चयानें दहन आहे. तीन वर्षांनंतर चूडाकर्म केलेला किंवा न केलेला पुत्र उपनयनापूर्वीं मृत झाल्यास पित्रादि सर्व सपिंडांस तीन दिवस अशौच धरावें, व दहनही अवश्य करावें.

उपनयन न झालेला पुत्र व अविवाहित कन्या मृत झाल्यास सोदकांस अशौच नाहीं. त्यांनीं स्नान मात्र करावें. उपनयन न झालेला भ्राता मरण पावल्यास भगिनीस अशौच नाहीं. ज्यांस पूर्ण दोन वर्षें झालीं नाहींत त्यांस खनन मुख्य होय. अनुगमन वैकल्पिक आहे. दोन वर्षें पूर्ण झालेल्यास दहन मुख्य होय. व अनुगमन नित्य आहे. याविषयीं दहन, तिलांजली, इत्यादि अमंत्रकच करावें. चूडाकर्म केलेला व पूर्ण तीन वर्षांचा यास पिंडदान भूमीवर करावें. दंतोत्पत्तीपर्यंत त्याचे वयाचे असतील त्यांस त्याच्या उद्देशानें दुग्धदान करावें. तीन वर्षांपर्यंत किंवा चौलापर्यंत पायस दान करावें व नंतर उपनयनापर्यंतच्या अशौचनिवृत्तीपर्यंत त्याच्या समान वयाचे जे असतील त्यांस त्याच्या उद्देशानें भोजनादिक द्यावें.

स्त्रीशूद्रयोस्तुकृतचूडयोरप्युदकदानादिवैकल्पिकम् शूद्रस्यत्रिवर्षपर्यन्तमेतदेवाशौचम् अस्योपनयनस्थानेविवाहः तथाचत्रिवर्षोर्ध्वंविवाहपर्यन्तंतदभावे षोडशवर्षपर्यन्तंवा शूद्रस्यमरणेत्रिदिनंतदूर्ध्वंजात्याशौचम् कन्यायावर्षत्रयानन्तरंवाग्दानात्प्राङ्मरणेत्रिपुरुषसपिण्डानामेकाहः मातापित्रोस्त्रिदिनम् दाहादितूष्णीम् वाग्दानोत्तरंविवाहात्प्राक्कन्यामरणेपितृसपिण्डानांभर्तृसपिण्डानांचत्रिदिनम् अत्रोभयकुलेपिसाप्तपुरुषं सापिण्ड्यम् दाहादितूष्णीमेव जननेऽनुपनीतमरणेचातिक्रान्ताशौचंनास्ति पितुरपत्यजननश्रवणेदेशान्तरेकालान्तरेस्नानंभवत्येव अनुपनीतमरणेतिक्रान्तेऽपिस्नानंभवत्येवेतिस्मृत्यर्थसारःअनुपनीतस्यानूढकन्यायाश्चमातापितृमरणेएवदशाहाशौचम् अन्यमरणेतु नकिमपि उपनयनोत्तरंमरणेसपिण्डानांदशाहम् सोदकानांत्रिरात्रम् सगोत्राणामेकाहंस्नानाच्छुद्धिर्वेत्यादिविशेषःप्रागुक्तोत्रानुसन्धेयः ॥

**अनुपनीतपुत्र आणि अविवाहित कन्या यांस अशौच**—स्त्री व शूद्र चूडाकर्म झालें असलें तरी त्यांस उदकदानादिक वैकल्पिक आहे. शूद्रास तीन वर्षेंपर्यंत हेंच अशौच जाणावें. ह्यास उपनयनस्थानीं विवाह आहे. म्हणजे तीन वर्षांनंतर विवाहापर्यंत किंवा विवाह झाला नसेल तर सोळा वर्षेंपर्यंत शूद्र मृत झाल्यास तीन दिवस अशौच. सोळा वर्षांनंतर किंवा विवाहानंतर जात्य शौच जाणावें. तीन वर्षांनंतर वाक्दानापूर्वीं कन्या मृत झाल्यास त्रिपुरुष सपिंडांस एक दिवस व मातापितरांस तीन दिवस अशौच. दहन, वगैरे अमंत्रक करावें. वाग्दानानंतर विवाहापूर्वीं कन्या मृत झाल्यास पित्याचे सपिंड व भर्त्यांचे सपिण्ड यांस तीन दिवस अशौच. याविषयीं दोनही कुलांमध्यें सप्तपुरुषसापिंड्य आहे. दाहादि अमंत्रकच करावें. जनन व उपनयन न झालेल्याचें मरण याविषयीं अतिक्रांताशौच नाहीं. अपत्य झाल्याचें पित्यानें श्रवण केलें असतां देशांतरीं व कालांतरीं त्यानें अवश्य स्नान करावें. अनुपनीत पुत्र मृत असेल तर अतिक्रांत असतांही स्नान करावें. असें स्मृत्यर्थ सारांत म्हटलें आहे. अनुपनीत पुत्र व अविवाहित कन्या यांस मातापितर मृत असतांच दहा दिवस अशौच. अन्य कोणी मृत असेल तर त्यास कोणतेंही अशौच नाहीं. उपनयन झाल्यावर मृत असतां सपिंडांस दहा

दिवस, सोदकांस त्रिरात्र व सगोत्रास एक दिवस किंवा स्नानानें शुद्धि, इत्यादि विशेष पूर्वी सांगितलेला या स्थलीं जाणावा.

स्त्रीशूद्रयोर्विवाहोत्तरंमरणेदशाहः शूद्रस्यविवाहाभावेषोडशवर्षोत्तरमित्युक्तम् विवाहोर्ध्वं कन्यायाःपितृगृहेमरणे मातापित्रोःसापत्नमातुःसापत्नभ्रातुःसोदरभ्रातुश्च त्रिरात्रम् पितृव्यादीनांतद्गृहवर्तिनामेकाहः तद्गृहवर्तिनामपिसपिण्डानामेकाहइतिकेचित् ग्रामान्तरमृतौपित्रोःपक्षिणीतिकेचित् ऊढायाः कन्यायाःपतिगृहेमरणेपित्रोःसापत्नमातुश्चत्रिरात्रम् भ्रातुःपक्षिणी पितृव्यादीनामेकाहइतिकेचित् ॥

**विवाहित स्त्रीशूद्रांचें अशौच**—स्त्री व शूद्र विवाहानंतर मृत होतील तर दहा दिवस अशौच. शूद्राचा विवाह झाला नसल्यास सोळा वर्षांनंतर असें पूर्वी सांगितलेंच आहे. विवाह झाल्यावर कन्या पित्याचे घरीं मरण पावल्यास मातापितर, सापत्नमाता, सापत्नभ्राता व सोदर ( सख्खा ) भ्राता यांस त्रिरात्र अशौच. पित्याचे घरीं राहणारे पितृव्यादिकांस एक दिवस अशौच. पित्याचे घरीं राहणाऱ्या सपिंडांसही एक दिवस अशौच आहे, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. दुसऱ्या गांवीं कन्या मृत झाल्यास मातापितरांस पक्षिणी अशौच असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. विवाहित कन्या पतिगृहीं मृत झाल्यास मातापितरांस व सापत्न मातेस त्रिरात्र, भ्रात्यास पक्षिणी व पितृव्यादिकांस एक दिवस अशौच, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात.

मातापित्रोर्मरणेसापत्नमातुर्मृतौचोढकन्यायास्त्रिरात्रंदशाहान्तःदशाहोर्ध्वेकालान्तरेपिपक्षिणी भ्रातुरुपनीतस्यविवाहितभगिन्याश्चपरस्परगृहमरणेपरस्परस्य त्रिरात्रम् गृहान्तरमृतौपरस्परस्यपक्षिणी ग्रामान्तरेत्वेकाहः अत्यन्तनिर्गुणत्वे एकग्रामेपिस्नानम् एवंसापत्नभ्रातृभगिन्योरपि भगिनीमृतौभगिन्याअप्येवमेवेतिभाति ऊढकन्यायाःपितामहपितृव्यादिमरणेस्नानमेव मातुलमरणेभगिनीपुत्रस्यभकन्यायाश्चपक्षिणी उपकारकमातुलमरणेस्वगृहेमातुलमरणेचत्रिरात्रम् अनुपनीतमातुलमरणेग्रामान्तरेमातुलमरणेचैकरात्रम् एवंसापत्नमातुलमरणेऽपिमातुलानीमरणेभर्तृभगिन्यपत्यस्यस्त्रीपुंसरूपस्यपक्षिणी सापत्नमातुलानीमरणे तुनाशौचम् उपनीतभागिनेयमरणेमातुलस्यमातुलभगिन्याश्चत्रिरात्रम् एवंसापत्नभागिनेयेमृतेपि अनुपनीतभागिनेयमरणेमातुलस्यमातुलभगिन्याश्चपक्षिणी एवंसापत्नभागिनेये मृतेपि अनुपनीतपदेनावशिष्टोपनयनमात्रःकृतचूडश्चूडायाअभावेत्रिवर्षोर्ध्ववयस्कोवाग्राह्यइतिभाति एवमग्रेप्यनुपनीतदस्यार्थोबोध्यः भागिनेयीमरणेतुस्नानमात्रमितिभाति मातामहमरणेदुहित्रपत्यस्यपुत्ररूपस्यकन्यारूपस्यवात्रिरात्रम् ग्रामान्तरेपक्षिणी मातामह्यांमृतायांदौहित्रस्थदौहित्र्याश्चपक्षिणी अत्रसर्वत्रपुरुषस्योपनीतस्यैवस्त्रियाश्चविवाहितायाएवमातापित्रातिरिक्ताशौचेधिकारइत्युक्तम् अत्रमातुलमातुलानीमातामहादिमृतौस्त्र्यपत्यस्याशौचोक्तिस्त्र्यम्बकीयानुसारेणान्यत्रतुनैवंस्पष्टमुपलभ्यते उपनीतदौहित्रमरणे-

**मातामहस्यमातामह्याश्चत्रिरात्रम् अनुपनीतेदौहित्रेमृतेमातामहस्यमातामह्याश्च-पक्षिणी दौहित्रीमरणेतुनाशौचमितिभाति ॥**

**मृताशौचप्रकरण भाग पहिला**—माता, पिता व सापत्न माता, हीं मृत झाल्यास विवाहित कन्येस दहा दिवसांपूर्वी त्रिरात्र व दहा दिवसांनंतर अन्यकालीं व वर्षांतींही पक्षिणी अशौच. उपनयन झालेला भ्राता व विवाहित भगिनी हीं परस्परांच्या घरीं मृत झाल्यास परस्परांस त्रिरात्र अशौच, दुसऱ्याचे घरीं मृत झाल्यास परस्परांस पक्षिणी. दुसऱ्या गांवीं मृत झाल्यास एक दिवस अशौच आणि अत्यंत निर्गुणत्व असेल तर एका गांवीं असतांही स्नान करावें. याप्रमाणें सापत्न भगिनी व सापत्न भ्राता यांविषयींही असाच निर्णय जाणावा. भगिनी मृत झाली असतां भगिनीसही याचप्रमाणें अशौच असावेंसें वाटतें. पितामह, चुलता, इत्यादि मरण पावल्यास विवाहित कन्येनें स्नानच करावें. मातुल मृत झाल्यास भाचा व भाची यांस पक्षिणी अशौच. उपकारक मातुल मरण पावल्यास व स्वगृहीं म्हणजे भाच्याचे गृहीं मातुल मृत झाल्यास त्रिरात्र अशौच. अनुपनीत मुंज न झालेला मातुल मृत झाल्यास व दुसऱ्या गांवीं मातुल मृत झाल्यास एक रात्र अशौच. सापत्न मातुल मृत झाल्यासही असाच निर्णय जाणावा. मामी मरण पावल्यास भाचा व भाची यांस पक्षिणी अशौच. सापत्न मातुलांनीं म्हणजे सावत्र मामी मरण पावल्यास अशौच नाहीं. उपनयन झालेला भाचा मृत झाल्यास मातुल व मातुलभगिनी म्हणजे मावशी यांस त्रिरात्र अशौच. याप्रमाणें सापत्न भाचा मृत असतांही असेंच जाणावें. अनुपनीतपदानें उपनयन मात्र होण्याचें राहिलेलें असून चूडाकर्म झालेला किंवा चूडाकर्माचा अभाव असतां तीन वर्षांहून अधिक वयाचा असा अर्थ घ्यावा, असें वाटतें. यापुढेंही उपनीतपदाचा असाच अर्थ घ्यावा. भाची मृत असेल तर फक्त स्नान करावें असें वाटतें. मातामह मरण पावल्यास कन्येचीं अपत्यें जीं पुत्र व कन्या त्यांस त्रिरात्र अशौच. अन्य ग्रामीं असतां पक्षिणी. मातामही मरण पावल्यास दौहित्र व दौहित्री यांस पक्षिणी. येथें सर्वत्र उपनयन झालेला पुरुष व विवाहित स्त्री यांसच मातापितरांचें अशौचावांचून इतर अशौचाविषयीं अधिकार आहे, असें सांगितलें आहे. येथें मातुल, मातुलानी व मातामहादिक मृत झाले असतां स्त्रीरूप अपत्यास जें अशौच सांगितलें तें त्र्यंबकीस अनुसरून आहे. इतर ग्रंथांत इतकें स्पष्ट कोठेंही आढळत नाहीं. उपनयन झालेला दौहित्र मृत झाल्यास मातामह व मातामही यांस त्रिरात्र अशौच. अनुपनीत दौहित्र मरण पावल्यास मातामह व मातामही यांस पक्षिणी. दौहित्री मृत झाल्यास अशौच नाहीं, असें वाटतें.

**श्वश्रूश्वशुरयोर्मरणेजामातुःसन्निधौ त्रिरात्रम् असन्निधौतुपक्षिणी उपकारकयोर्मरणेत्वसन्निधावपित्रिरात्रमेव ग्रामान्तरेएकरात्रम् भार्यामरणेननिवृत्तसम्बन्धयोःश्वश्रूश्वशुरयोरनुपकारकयोर्मृतेतुपक्षिण्येकाहोवेतिभाति जामातरिमृतेश्वश्रूश्वशुरयोरेकरात्रंस्नानच्छुद्धिर्वा स्वगृहेजामातृमरणेत्रिरात्रम् उपनीतेशालकेमृतेभगिनीभर्तुरेकाहः अनुपनीतेतुशालकेस्नानम् ग्रामान्तरेमृतेपिस्नानम्**

भार्यामरणेननिवृत्तसंबन्धे शालकेस्नानमितिनागोजीभट्टीयेशालकसुतमरणे-स्नानम् कश्चिच्छालिकायां मृतायांशालयवदेकाहादिकमाहमातुःस्वसरि-मृतायांस्वस्रपत्ययोःकन्यापुत्रयोःपक्षिणीएवंसापत्नमातुःस्वसृमरणेपि पितुः स्वसरिमृतायांभ्रात्रपत्ययोःकन्यापुत्रयोःपक्षिणीपितुःसापत्नस्वसृमरणेतुस्नान-मात्रम् भ्रात्रपत्यमरणेतुपितृष्वसुःस्नानम् स्वगृहेपितृष्वसृमातृष्वसृमरणे-त्र्यहम् ॥

**मृताशौचप्रकरण—भाग दुसरा**—सासू व श्वशुर मृत असतां जामाता सन्निध असेल तर त्रिरात्र व सन्निध नसल्यास पक्षिणी. उपकार करणारे सासू व श्वशुर मृत झाल्यास सन्निध नसतांही त्रिरात्रच अशौच. दुसऱ्या गांवीं असल्यास एक रात्र अशौच. भार्या मृत झाल्यानें ज्यांचा संबंध सुटला आहे व जे उपकार करणारे नाहींत असे सासू व श्वशुर मृत झाल्यास पक्षिणी किंवा एक दिवस अशौच असें वाटतें. जामात मृत झाल्यास सासू व सासरा यांस एक रात्र अशौच किंवा स्नानानें शुद्धि. जामाता आपल्या घरीं मृत झाल्यास त्रिरात्र अशौच. उपनीत शालक (पत्नीचा भ्राता) मृत झाल्यास भगिनीचे भर्त्यास एक दिवस अशौच. अनुपनीत शालक मृत झाल्यास स्नान व अन्यग्रामीं असतांही स्नानच. भार्या मृत झाल्यानें ज्याचा संबंध सुटला आहे असा शालक मृत झाल्यास स्नान करावें, असें नागोजीभट्टकृत अशौचग्रंथांत आहे. शालकाचा पुत्र मरण पावल्यास स्नान करावें. शालिका म्हणजे पत्नीची बहीण मृत झाल्यास शालकाप्रमाणेंच एक दिवस अशौच आहे, असें एक ग्रंथकार म्हणतो. मातृष्वसा म्हणजे मावशी मृत झाल्यास भगिनीचे अपत्यांस—कन्या व पुत्र यांस—पक्षिणी अशौच, सापत्न मावशी मृत असतांही असाच निर्णय जाणावा. पितृष्वसा म्हणजे आत मृत झाल्यास भ्रात्याच्या अपत्यास—कन्या व पुत्र यांस—पक्षिणी अशौच. पित्याची सापत्न भगिनी मृत झाल्यास फक्त स्नान. भावाचें अपत्य मृत झाल्यास पितृष्वसेस म्हणजे पित्याचे भगिनीस स्नान. आपल्या घरीं आत व मावशी, ह्या मृत होतील तर प्रत्येकीबद्दल तीन दिवस अशौच.

उपनीतबन्धुत्रयमरणेपक्षिणी अनुपनीतस्यगुणहीनस्यवाबन्धुत्रयस्यमरणेएकाहः स्वगृहेमरणेतुत्रिरात्रम् अत्रबन्धुत्रयपदेनात्मबन्धुत्रयंपितृबन्धुत्रयंमातृबन्धुत्रय-मितिनवबन्धवोग्राह्याः तेयथा आत्मपितृष्वसुः पुत्राआत्ममातृष्वसुःसुताः। आत्म-मातुलपुत्राश्चविज्ञेयाआत्मबान्धवाः १ पितुःपितृष्वसुःपुत्राःपितुर्मातृष्वसुःसुताः पितुर्मातुलपुत्राश्चविज्ञेयाःपितृबान्धवाः २ मातुःपितृष्वसुःपुत्रामातुर्मातृष्वसुः सुताः। मातुर्मातुलपुत्राश्चविज्ञेयामातृबान्धवाः ३ इति पितृष्वस्रादिकन्यानांतु विवाहितानांमरणेतद्बन्धुवर्गस्त्वेकेनेतिवचनबलादेकाहोऽनूढानांतुमरणेस्नान-मात्रमितिनिर्णयसिन्ध्वाशयः नागोजीभटास्तुबन्धुत्रयवाक्येपुत्रपदंकन्योपलक्ष-कमित्याहुः तन्मतेपितृष्वस्रादिकन्यानामूढानांमरणेपक्षिणी अनूढानामेकाह-इत्यादि पितृष्वस्रादिकन्याभिस्तुबन्धुत्रयमरणेस्नानमात्रंकार्यमितिसिन्ध्वाशयेन सिध्यतिभट्टमतेतुपुत्रपदवत्तद्वाक्यस्थात्मपदस्यापिकन्यापरत्वापत्त्याकन्याभिरपि-

बन्धुत्रयाशौचंकार्यमित्यापतति तत्रच बहुशिष्टाचारविगानमितिसिन्ध्वाशयो-युक्तोभाति ॥

**मृताशौचप्रकरण-भाग तिसरा**—उपनयन झालेले बंधुत्रय मृत झाल्यास पाक्षिणी; उपनयन न झालेले किंवा गुण-हीन बंधुत्रय मृत झाल्यास एक दिवस अशौच. आपल्या घरीं मृत असेल तर त्रिरात्र. येथें बंधुत्रय या पदानें आत्मबंधुत्रय, पितृबंधुत्रय, मातृबंधुत्रय, असें जें नऊ बंधुत्रय तें असें:—आपल्या आतेचे पुत्र, आपल्या मावशीचे पुत्र व आपल्या मातुलाचे पुत्र हे आत्मबांधव, पित्याच्या आतेचे पुत्र, पित्याच्या मावशीचे पुत्र व पित्याच्या मातुलाचे पुत्र हे पितृबांधव होत व मातेच्या आतेचे पुत्र, मातेच्या मावशीचे पुत्र, आणि मातेच्या मातुलाचे पुत्र हे मातृबांधव होत. आतेच्या विवाहित कन्या मृत झाल्यावर त्यांचा बंधुवर्ग एक दिवसानें शुद्ध होतो, या वचनाच्या बलानें एक दिवस अशौच. अविवाहित मृत झाल्यास स्नान मात्र करावें, असा निर्णयसिंधूचा अभिप्राय आहे. बंधुत्रयाच्या वाक्यांत पुत्रपदानें कन्येचें उपलक्षण आहे, असें नागोजीभट्ट म्हणतात. त्यांच्या मतें आत इत्यादिकांच्या विवाहित कन्या मृत असतां पक्षिणी, अविवाहित मरण पावल्यास एक दिवस, इत्यादि. बंधुत्रय मृत असतां आत इत्यादिकांच्या कन्यांनीं स्नानच करावें, असें निर्णयसिंधूच्या आशयावरून सिद्ध होतें. पुत्रपदाप्रमाणें त्या वाक्यांतील आत्मपदाचाही कन्यापरार्थ प्राप्त झाल्यामुळें कन्यांनींही बंधुत्रयाचें अशौच धरावें, असें नागोजीभट्टाच्या मतानें जरी ठरतें, तरी पण त्याविषयीं बहु-शिष्टाचार नसल्यानें निंदा होते, म्हणून निर्णयसिंधूचाच अभिप्राय योग्य आहे, असें वाटतें.

अत्रेदंतत्त्वम् देवदत्तीयबन्धुनवकमध्ये आत्मबन्धुत्रयेसंबन्धसाम्यात्परस्परमा-शौचम् अवशिष्टबन्धुषट्केतुबन्धुषट्कमरणेदेवदत्तस्यआशौचंदेवदत्तस्यमरणे-तुबन्धुषट्कस्यनाशौचंसंबन्धाभावादितिसुधीभिरूह्यम् दत्तकस्यमरणेपूर्वापरपित्रो-स्त्रिरात्रंसपिण्डानामेकाहमाशौचम् नीलकण्ठीयेदत्तकनिर्णयेतूपनीतदत्तकमरणादौ पालकपित्रादिसपिण्डानांदशाहादिकमेवाशौचमित्युक्तम् दत्तकेनापिपूर्वापर-पित्रोर्मृतौत्रिरात्रंपूर्वापरसपिण्डानांमरणेएकाहः पित्रोरौर्ध्वदेहिककरणेतुकर्माङ्गं-दशाहमेव दत्तकस्यपुत्रपौत्रादेर्जननेमरणेवापूर्वापरसपिण्डानामेकाहः एवंपूर्वा-परसपिण्डमरणादावपिदत्तकपुत्रपौत्रादेरेकाहः इदंसपिण्डसमानोदकाभिन्ने दत्ती-कृतेज्ञेयम् सगोत्रसपिण्डेसोदकेचदत्तीकृतेयथाक्रमंदशाहंत्रिरात्रंचयथाप्राप्तं-भवत्येव ॥

**दत्तकाशौचनिर्णय**—देवदत्ताच्या नऊ बंधूंमध्यें आत्मबंधुत्रयाविषयीं संबंध सारखा असल्यानें परस्पर अशौच आहे. अवशिष्ट बंधु-षट्काविषयीं तर बंधुषट्क मृत झाल्यास देवदत्तास अशौच आहे. पण देवदत्त मृत झाल्यास बंधुषट्कास अशौच नाहीं. कारण संबंधाचा अभाव आहे असें बुद्धिवंतांनीं जाणावें. दत्तक मृत झाल्यास पूर्वापर मातापितरांस त्रिरात्र व सपिंडांस एक दिवस

अशौच. उपनयन झालेले दत्तकाचें मरणादिक झाल्यास पालक पिता इत्यादि सपिंडांस दहा दिवसादिकच अशौच आहे, असें नीलकंठकृत दत्तकनिर्णयांत सांगितलें आहे. दत्तकानें पूर्वापर मातापितर मृत झाल्यास त्रिरात्र, व पूर्वापर सपिंड मृत झाल्यास एक दिवस अशौच धरावें. मातापित्याचें और्ध्वदेहिक कर्म करणें असेल तर कर्मसंबंधीं दहा दिवसच अशौच धरावें. दत्तकाचे पुत्रपौत्र इत्यादिकांचें जनन किंवा मरण पावल्यास पूर्वापर सपिंडांस एक दिवस अशौच. याप्रमाणें पूर्वापार सपिंडांचें मरणादिक असतां दत्तकाचे पुत्रपौत्र इत्यादिकांसही एक दिवस अशौच. हा निर्णय सपिंड, समानोदक यापेक्षां निराळा दत्तक घेतला असल्यास त्याविषयींचा आहे, असें जाणावें. सगोत्र, सपिंड व सोदक दत्तक घेतला असल्यास क्रमानें १० दिवस त्रिरात्र किंवा जसें प्राप्त असेल तसें अशौच आहे.

आचार्येमृतेत्रिरात्रम् ग्रामान्तरेमृतेपक्षिणी उपनीयवेदाध्यापकआचार्यः स्मार्तकर्मनिर्वाहकोप्याचार्यः आचार्यभार्यासुतयोर्मरणेएकाहः मन्त्रोपदेशकगुरुमरणेत्रिरात्रं ग्रामान्तरेपाक्षिणी शास्त्राध्यापकोव्याकरणज्योतिःशास्त्राद्यङ्गाध्यापकश्चानूचानसंज्ञकस्तन्मरणेएकाहः सकलवेदाध्यापकगुरुमरणेपक्षिणी वेदैकदेशाध्यापकउपाध्यायस्तन्मरणेएकाहः शिष्यस्योपनीयाध्यापितस्यमृतौत्रिरात्रम् निवृत्ताध्ययनस्यमृतौपक्षिणी परोपनीतस्यबहुकालमध्यापितस्यमरणेएकाहः सहाध्यायिमृतौपक्षिणी ऋत्विज्यनिवृत्तर्त्विक्कर्मणिमृतेत्रिरात्रम् ग्रामान्तरेपक्षिणी कर्मानिवृत्तौग्रामान्तरेएकाहः एकग्रामेपक्षिणी एवंयाज्यमरणेपि सार्थवेदाध्यायीश्रौतस्मार्तकर्मनिष्ठश्चश्रोत्रियस्तयोर्मरणेमैत्रीगृहानन्तर्यादिसंबन्धेत्रिरात्रम् एकतरसंबन्धेपक्षिणी संबन्धाभावेएकाहः सवर्णमित्रमरणेएकाहः यतिमरणेसर्वसापिण्डानांस्नानमात्रम् स्वगृहेउदासीनासापिण्डमरणेएकाहः स्वाधिष्ठितस्वगृहेअसापिण्डमरणेत्र्यहम् आशौचप्रयोजकसंबन्धिनिस्वगृहेमृतेत्रिरात्रम् ग्रामाधिपदेशाधिपादेर्मृतौसज्योतिः दिवामरणेरात्रौस्नानाच्छुद्धिः रात्रिमरणेदिवाशुद्धिरितिसज्योतिःपदार्थः पक्षिणीपदार्थस्तुदिवामरणेसदिवसः सारात्रिर्द्वितीयदिवसेनक्षत्रदर्शनपर्यन्तमिति आगामिवर्तमानाहर्द्वययुतामध्यगता रात्रिः रात्रिमरणेसारात्रिस्तदुत्तरमहोरात्रिश्चेतिपक्षिणी केचित्तुरात्रिमरणेपिमरणादिनाद्द्वितीयदिनस्थनक्षत्रपर्यन्तमेवपाक्षिणीपदार्थइत्याहुः एवमतिक्रान्तेविषयेदिवारात्रौवामरणज्ञानानुसारेणपक्षिणीव्यवस्थायोज्या ॥

**गुरु व शिष्य यांचें परस्परांस अशौच**—आचार्य मृत झाल्यास त्रिरात्र व तो अन्यग्रामीं मृत झाल्यास पक्षिणी.

उपनयन करून वेद पढविणारा तो आचार्य. स्मार्त कर्मांचा निर्वाहक तोही आचार्यच होय. आचार्यांची स्त्री किंवा पुत्र मरण पावल्यास एक दिवस अशौच. मंत्रोपदेश करणारा गुरु मरण पावल्यास त्रिरात्र व तो दुसऱ्या गांवीं असल्यास पक्षिणी अशौच. शास्त्र पढविणारा, व्याकरण, ज्योतिःशास्त्र, इत्यादि अंगें शिकविणारा व अनुचानसंज्ञक मृत झाल्यास एक दिवस अशौच. सर्व वेद पढविणारा गुरु मृत झाल्यास पक्षिणी.

वेदाचा कांहीं भाग पढविणारा जो उपाध्याय तो मृत झाल्यास एक दिवस अशौच. उपनयन करून अध्ययन शिकविलेला शिष्य मरण पावल्यास त्रिरात्र अशौच. अध्ययन समाप्त झालेला शिष्य मरण पावल्यास पक्षिणी. दुसऱ्यानें उपनयन केलेला असूनही पुष्कळ दिवस अध्ययन शिकविलेला शिष्य मृत झाल्यास एक दिवस अशौच. सहाध्यायी मृत असतां पक्षिणी. ऋत्विक् कर्म समाप्त न केलेला ऋत्विक मृत झाल्यास त्रिरात्र व तो दुसऱ्या गांवीं असेल तर पक्षिणी. कर्मनिवृत्ति असेल तर अन्यग्रामीं एक दिवस व एकाच गांवांत पक्षिणी. याप्रमाणें याज्य म्हणजे यजमान मृत असतांही असाच निर्णय जाणावा. वेदाचें सार्थ अध्ययन करणारा, व श्रौतस्मार्त कर्मनिष्ठ श्रोत्रिय मरण पावल्यास मैत्री व गृहसान्निध्यादि संबंध असेल तर त्रिरात्र अशौच. दोहोंतून एक संबंध असल्यास पक्षिणी व संबंधाचा अभाव असेल तर एक दिवस. आपल्या वर्णांतील मित्र मृत असल्यास एक दिवस अशौच. संन्यासी मरण पावल्यास सर्व सपिंडांनीं स्नान मात्र करावें. आपल्या घरीं उदासीन असा असपिंड मरण पावल्यास एक दिवस अशौच. आपल्या राहाण्याच्या घरीं असपिंड मरण पावल्यास तीन दिवस अशौच. अशौचाचा उत्पादकसंबंधी स्वगृहीं मृत झाल्यास त्रिरात्र; ग्रामाधिपति, देशाधिपति, इत्यादिक मरण पावले असतां सज्ज्योति शुद्धि म्हणजे दिवसां मेलेला असतां रात्रौ स्नानानें शुद्धि व रात्रौ मृत असतां दिवसा शुद्धि, असा सज्ज्योति या पदाचा अर्थ आहे. दिवसां मरण असतां तो दिवस, ती रात्र व दुसऱ्या दिवशीं नक्षत्रदर्शनापर्यंतचा काळ असा पक्षिणी या पदाचा अर्थ आहे. येणारा व वर्तमान अशा दोन दिवसांनीं युक्त मध्यगत रात्र ती पक्षिणी. रात्रीं मृत असेल तर ती रात्र व तिच्यापुढील अहोरात्र मिळून पक्षिणी, रात्रीं मृत असतांही मरणाच्या दिवसापासून दुसऱ्या दिवसाच्या नक्षत्रापर्यंतच पक्षिणी, असा कांहीं ग्रंथकार पक्षिणी या पदाचा अर्थ करितात. याप्रमाणें अतिक्रांत अशौचाविषयीं दिवसां अथवा रात्रीं जसें मरणाचें ज्ञान होईल म्हणजे मृत झाल्याचें समजेल त्याप्रमाणें पक्षिणीची व्यवस्था योजावी. ( पक्षिणी म्हणजे स्थूल मानानें दीड दिवस, छत्तीस तास असा अर्थ समजावा )

आचार्यमातुलादीनांत्रिरात्राद्याशौचमन्यस्मिन्नन्त्यकर्मकर्तरिज्ञेयम् शिष्यादीनामन्त्यकर्मकर्तृत्वेतुदशाहाद्येव ॥

**त्रिरात्राशौचविशेष**—आचार्य, मातुल, इत्यादिकांचें जें त्रिरात्रादिक अशौच सांगितलें तें अंत्यक्रिया करणारा दुसरा असतां जाणावें. शिष्यादिक अंतक्रिया करणारे असतील तर दहा दिवसच अशौच जाणावें.

ग्राममध्येयावच्छवस्तिष्ठतितावद्ग्रामस्याशौचम् नगरेतुनैवम् ग्रामनगरलक्षणान्यन्यत्र गृहेगवादिपशुमृतौयावच्छवस्तिष्ठेत्तावदाशौचम् द्विजगृहेशुनोमृतौगृहस्यदशरात्रमाशौचम् शूद्रमरणेमासम् पतितमृतौमासद्वयम् म्लेच्छादिमृतौमासचतुष्टयम् दासानांगृहजातक्रीतऋणमोक्षितलब्धत्वादिप्रकाराणांस्वामिमरणेस्वजातीयाशौचम् युद्धेशस्त्रघातेनसद्योमृतेस्नानमात्रंनाशौचमन्त्य

कर्मापिदशाहादिकंसद्यएवकर्तव्यम् युद्धक्षतेनकालान्तरेमरणेएकाहः त्र्यहादूर्ध्वं-युद्धक्षतेनमरणेपराङ्मुखहतेयुद्धेकपटेनहतेचत्रिरात्रम् युद्धक्षतेनसप्तरात्रादूर्ध्वं-मृतौदशाहमित्याहुः शिष्टास्तुयुद्धेहतस्यसद्यःशौचादिकंलोकविद्विष्टत्वान्न-वदन्ति प्रयागादौकाम्यमरणेस्नानमात्रम् प्रायश्चितार्थमग्न्यादिमरणेएकाहः महारोगपीडाक्षमाणांजलादिप्रवेशेत्रिरात्रम् अत्रापिनशिष्टाचारसंमतिः एवं-कारागृहेमृतस्यैकरात्रेऽपि ॥

**इतराशौचनिर्णय**—गांवांत जोंपर्यंत प्रेत असेल तोंपर्यंत गांवास अशौच आहे. पण नगरास अशौच नाहीं. गांव व नगर यांचीं लक्षणें दुसऱ्या ग्रंथांत पहावीं. गाई, इत्यादि पशु मरण पावले असतां जोंपर्यंत त्या पशूचें प्रेत घरांत राहील तोंपर्यंत गृहस्थास अशौच. ब्राह्मणांच्या घरीं कुत्रा मरण पावल्यास घरास दहा रात्रीं अशौच, शूद्र मृत झाल्यास एक मास, पतित मृत झाल्यास दोन मास व म्लेंच्छादिक मृत झाल्यास चार मास अशौच आहे. घरीं झालेला, विकत घेतलेला कर्जांतून सोडविलेला, मिळालेला, इत्यादि प्रकारचे जे दास त्यांनीं स्वामी मृत असतां सजातीय अशौच धरावें. युद्धांत शस्त्रप्रहारानें तात्काल मृत झाल्यास स्नान मात्र करावें, अशौच नाहीं. त्याचें दशाहादि अंत्यकर्महीं तत्कालींच करावें. युद्धसंबंधीं क्षतानें कालांतरानें मृत झाल्यास एक दिवस अशौच. युद्धसंबंधीं क्षतानें तीन दिवसांनंतर मरण पावल्यास, युद्धांतून पळून जाणारा मारला गेल्यास किंवा युद्धांत कपटानें मारला गेल्यास त्रिरात्र अशौच. युद्धाच्या क्षतानें सात रात्रींनंतर मरण पावल्यास दहा दिवस अशौच असें म्हणतात. कांहीं शिष्ट युद्धांत मृत झालेल्याची सद्यःशुद्धि लोकविद्विष्टत्वामुळें सांगत नाहींत. प्रयागादि क्षेत्रीं कामनिक मरण आल्यास फक्त स्नान करावें. प्रायश्चित्तार्थ अग्नि इत्यादिकांनीं मरण प्राप्त झाल्यास १ दिवस अशौच. महारोगादि पीडा सहन करण्यास असमर्थ होऊन उदकादिकांत प्रवेश करून मरण पावल्यास त्रिरात्र अशौच. याविषयीं शिष्टाचाराची संमति नाहीं. याप्रमाणें तुरुंगांत मृत झालेल्याचें जे एक रात्र अशौच, त्याविषयींही शिष्टाचारसंमति नाहीं.

अथातिक्रान्ताशौचम् तत्रजननाशौचेऽतिक्रान्ताशौचंनास्ति पितुःस्नान-मात्रंतत्रापिभवति मृताशौचेप्यनुपनीतमरणादिनिमित्तेषुत्रिरात्रैकरात्रेषुमातुलादि-परगोत्रीयमरणनिमित्तकेषुपक्षिणीत्रिरात्रादिषुचातिक्रान्ताशौचं नास्ति तत्रोढ-कन्यायाःपित्रोर्मरणेत्रिरात्रेऽतिक्रान्तेपिदशाहातस्त्र्यहम् तदूर्ध्वंवत्सरान्तरेपि-पक्षिणीत्युक्तम् एवंसोदकादिविषयत्रिरात्रादिष्वतिक्रान्ताशौचंन स्नानमात्रं-त्वत्रापिकालान्तरेपिभवत्येव किंतुदशाहादिमृताशौचविषयमेवातिक्रान्ता-शौचंकर्तव्यम् तत्रदशाहाद्याशौचानांत्रिरात्रादीनांचतत्तदाशौचमध्येज्ञानेऽ-वशिष्टदिनैः शुद्धिः पुत्रादेरपिशेषदिनैरेवशुद्धिः अन्त्यकर्मापिशेषदिनैरेवस-मापनीयम् एवमस्थिपर्णशरसंस्कारोपिशेषेणैव एवंसोदकत्रिरात्रेपिशेषेण-शुद्धिः त्रिरात्राद्युत्तरंतुदशाहन्यूनाशौचानांदशाहमध्येज्ञानेपि नातिक्रान्ता-शौचंकिंतुस्नानमात्रम् मातापित्रोर्मरणेदूरदेशेपिवत्सरान्तरेपिश्रवणेपुत्रस्य

श्रवणप्रभृतिदशाहादिपूर्णमेवाशौचम् दंपत्योःपरस्परंदेशान्तरेकालान्तरेपि- पूर्णदशाहमेव सपत्नीनांपरस्परंदेशकालविशेषानपेक्षंदशाहमेव सापत्नमातु- मरणेपुत्रस्यदशाहोर्ध्वंदेशकालानपेक्षंत्रिरात्रम् औरसपुत्रमृतौमातापित्रोर्वत्स- रान्तरेपित्रिरात्रम् दशाहोर्ध्वमेकदेशेसपिण्डमरणेज्ञातेमासत्रयपर्यन्तंत्रिरात्रम् षण्मासपर्यन्तंपक्षिणी नवमासपर्यन्तमेकरात्रम् ततोवर्षपर्यन्तं सज्योतिःस्नान- मात्रंवा माधवमतेपक्षत्रयपर्यन्तंत्रिरात्रम् षण्मासपर्यन्तंपक्षिणी वर्षपर्यन्तमेक रात्रम् वर्षोर्ध्वंस्नानमात्रमिति अत्रापदनाद्विषयत्वेनव्यवस्था ॥

**अतिक्रांताशौच**—जननाशौचांत अतिक्रांत अशौच नाहीं. पित्यास स्नान मात्र जें आहे तें जननाशौचांतही आहे. मृताशौचांतही उपनयन न झालेल्याचें मरणाचें निमित्त असल्यास त्रिरात्र, एक रात्र व परगोत्रांतील मातुलादि- कांच्या मरणनिमित्तक जी पक्षिणी, त्याविषयीं व त्रिरात्रादिक अशौचाविषयीं अति- क्रांत अशौच नाहीं. मातापितर मृत झाल्यास विवाहित कन्येस त्रिरात्र अशौच व तें जरी अतिक्रांत असलें तरी दहा दिवसांचे आंत त्रिरात्र अशौच आहेच. दहा दिवसां- नंतर वर्षांतींही पक्षिणी असें सांगितलें आहे. याप्रमाणें सोदकादिविषयक जीं त्रिरात्रा- दिक त्यांचेविषयींही अतिक्रांत अशौच जरी नाहीं तरी कालांतर असतांही स्नानमात्र आहेच. दहा दिवसांचें जें मृताशौच तद्विषयक अतिक्रांत अशौच धरावें. दहा दिवसां- चीं अशौचें व त्रिरात्राचीं अशौचें यांचें त्या त्या अशौचांत ज्ञान झाल्यास अविशिष्ट दिवसांनीं शुद्धि जाणावी. त्रिरात्रादि अशौचानंतर दहा दिवसांहून कमी अशौचाचें दहा दिवसांत ज्ञान झाल्यास अतिक्रांत अशौच नाहीं. स्नान मात्र करावें. मातापितर मरण पावल्याचें, दूर देशीं असतांही दुसऱ्या वर्षानंतरही श्रुत झाल्यावर समजल्या- दिवसापासून पुत्रास दहा दिवसांचें संपूर्ण अशौच आहे. सपत्नीचें (सवत) परस्परांस देशकाल यांच्या अपेक्षेवांचून दहा दिवसच अशौच आहे. सापत्न माता मृत झाल्यास पुत्रास दहा दिवसांनंतर देशकालाच्या अपेक्षेवांचून त्रिरात्र अशौच. औरसपुत्र मरण पावल्यास मातापितरांस दुसऱ्या वर्षींही त्रिरात्र अशौच. दहा दिवसानंतर एकदेशीं सपिंडाचें मरण समजल्यास तीन मासपर्यंत त्रिरात्र, सहा मासांपर्यंत पक्षिणी, नऊ मासां- पर्यंत एक रात्र, नऊ मासांनंतर एक वर्षपर्यंत सज्ज्योति किंवा स्नान मात्र करावें. माधवाच्या मतानें पक्षत्रयपर्यंत त्रिरात्र, सहामासपर्यंत पक्षिणी, वर्षपर्यंत एक रात्र व वर्षानंतर स्नान मात्र. आपत्ति व अनापत्ति यांचा विचार करून या दोन्ही मतांची व्यवस्था लावावी.

अथदेशान्तरेसपिण्डमरणेदशाहोर्ध्वंज्ञातेपक्षत्रयपर्यन्तंत्रिरात्रम् षण्मास- पर्यन्तंपक्षिणीनवमासपर्यन्तमेकाहः वर्षपर्यन्तंसज्योतिरितिमाधवमतम् विज्ञाने- श्वरस्तुदेशान्तरेसपिण्डमरणेदशाहोर्ध्वंज्ञातेस्नानमात्रमित्याह अत्रमाधवमतमे- वयुक्तम् अतिक्रान्ताशौचंवयोवस्थानिमित्तकाशौचंचसर्ववर्णसाधारणम् देशा- न्तरंतुविप्रस्यविंशतियोजनात्परम् क्षत्रियादेःक्रमेणचतुर्विंशत्रिंशत्षष्टियोजनैः केचिद्विप्रस्यत्रिंशद्योजनोत्तरंदेशान्तरमाहुः भाषाभेदसहितमहागिरिणाभाषा-

भेदसहितमहानद्याद्यव्यवधानमपिदेशान्तरम् यत्तुकेचिद्भाषाभेदरहितमपि-
गिरिनदीव्यवधानंदेशान्तरमाहुः तद्योजनगतविंशत्यादिसंख्यायांत्रिचतुरादि-
न्यूनत्वेऽपिदेशान्तरत्वसंपादकतयायोज्यमितिभाति अन्यथामहानदीपरपूर्व-
तीरवासिनामेकयोजनमध्येपिदेशान्तरत्वापत्तेः अत्रसगोत्रविषयाशौचान्येव-
भार्यापतिपुत्रादिभिःसर्वैरनुष्ठेयानि यानितुमातुलत्वभगिनीत्वादिप्रयुक्तानि
भिन्नगोत्राशौचानितेषुजायापतिपुत्रादिषुमध्येतत्संबन्धियत्तत्तेनैवानुष्ठेयंनसर्वैः

**देशान्तरसपिण्डमरणाशौच**—देशांतरीं सपिंडांचें मरण दहा दिवसांनंतर समजल्यास दीड महिनापर्यंत त्रिरात्र, सहा-मासपर्यंत पक्षिणी, नऊ मासपर्यंत एक दिवस व वर्षपर्यंत सज्योति असें माधवाचें मत आहे. देशांतरीं सपिंडाचें मरण दहा दिवसांनंतर समजल्यास स्नान मात्र करावें. असें विज्ञानेश्वर म्हणतो. या बाबतींत माधवाचें मतच योग्य आहे. अतिक्रांत अशौच व वयोवस्थानिमित्तक अशौच हीं सर्व वर्णांना साधारणच आहेत. ब्राह्मणास वीस योजनांपलीकडे व क्षत्रियादिकांस क्रमानें २४–३०–६० योजनें यानें देशांतर जाणावें. तीस योजनांपलीकडे ब्राह्मणांस देशांतर आहे असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. भाषा निराळी व मध्यें मोठा पर्वत किंवा भाषा निराळी असून मध्यें नदी असेल तर तेंही देशांतरच होय. भाषा निराळी नसली तरी पर्वत किंवा नदी हीं जर मध्यें असतील तर तें देशांतर होय असें जें म्हणतात तें योजनाच्या वीस संख्येंत तीन चार योजनें जरी कमी असलीं तरी देशांतर संपूर्ण होईल, अशा अर्थानें योजावें, असें वाटतें. असें न योजल्यास महानदीच्या पलीकडच्या तीरीं व अलीकडच्या तीरीं जे राहणारे त्यांस एका योजनामध्येंही देशांतर घडेल. अशा प्रसंगीं सगोत्रविषयक अशौचें मात्र—भार्या, पति, पुत्र, इत्यादि सर्वांनीं धरावींत. मातुलत्व, भगिनीत्व वगैरे जीं निरनिराळ्या गोत्रांतील अशौचें तीं—भार्या, पति, पुत्र इत्यादिकांपैकीं जें कोणी ज्याचे संबंधी असेल त्यानेंच धरावींत, सर्वांनीं धरूं नयेत.

रात्रौजननमरणेरात्रौमरणज्ञानेवारात्रिंत्रिभागांकृत्वाप्रथमभागद्वयेपूर्वदिनं-
तृतीयभागेउत्तरदिनमारभ्याशौचम् यद्वार्धरात्रात्प्राक्पूर्वदिनंपरतः परदिनम्
अत्रदेशाचाराद्व्यवस्था ॥

**जननमरणाशौचरात्रीनिर्णय**—रात्रीं जर जनन व मरण यांपैकीं कांहीं झालें तर रात्रीचे तीन भाग करून पहिल्या दोन भागांतला ( बारा वाजेपर्यंतचा ) पहिला व तिसरा भाग सुरू झाल्यावर नवा दिवस धरून त्या दिवसापासून अशौच धरावें, किंवा अर्धरात्रीपूर्वीचा पहिला दिवस धरून, नंतर पुढला दुसरा दिवस धरावा. याविषयींही देशाचारावरूनच व्यवस्था जाणावी.

आहिताग्नेर्मन्त्रवद्दाहदिनमारभ्यपुत्रादिभिराशौचंकार्यम् अत्राहिताग्निपदेन-
श्रौताग्नित्रयवान्ग्राह्यः तद्भिन्नोगृह्याग्निमानप्यनाहिताग्निपदेनग्राह्यः आहिताग्ने-
र्विदेमरणेमन्त्रवद्दाहात्पूर्वंपुत्रादीनामाशौचंसंध्यादिनित्यकर्मलोपश्चनास्ति

मन्त्रवद्दाहमारभ्यतुपुत्रादिसपिण्डानांदुहितृदौहित्रादिभिन्नगोत्राणांचाशौचं-भवत्येव नत्वतिक्रान्तनिमित्तकआशौचाभावस्तस्यह्रासोवा अतएवाहिताग्नेः पर्णशरदाहेऽपिदशाहमेवदेशान्तरेकालान्तरेपिसिद्धयति अनाहिताग्नेर्मरणदिनादारभ्यपुत्रादिभिराशौचंकार्यम् अनाहिताग्नेर्देशान्तरेमरणेअतिक्रान्ताशौचं-मरणश्रवणातन्तरमेवपूर्वोक्तव्यवस्थयाकार्यम् अनाहिताग्नेरस्थिदाहपर्णशरदा-हयोस्तुपूर्वमगृहीताशौचयोर्भार्यापुत्रयोर्दशाहमेव गृहीताशौचयोस्तुसंस्कार-कर्तृभिन्नयोर्दाहकालेत्रिरात्रम् सपत्न्योर्मिथश्चैवम्पत्नीसंस्कारेपत्युश्चैवम् एत-द्भिन्नसपिण्डानांतुपूर्वमगृहीताशौचानामनाहिताग्निसंस्यारकालेत्रिरात्रम् गृहीता-शौचानांतुसपिण्डानांदाहकालेस्नानमात्रम् इदंसपिण्डानांत्रिरात्रादिकंपुत्रादेर्दशा-हादिकंचदशाहोर्ध्वसंस्कारकरणेज्ञेयम् दशाहमध्येसंस्कारकरणेतुशेषदिनैरेवशुद्धिः-कर्मसमाप्तिश्च आहिताग्नेरेवदशाहमध्येपिशरीरदाहेऽस्थिदाहेपर्णशरदाहेवाशेषे-णनशुद्धिःसमन्त्रकदाहदिनस्यैवप्रथमदिनत्वादित्युक्तम् दशाहोर्ध्वदेशान्तरमृता-नाहिताग्निवार्ताश्रवणदिनात्कृतत्रिरात्राशौचानांसपिण्डानां चतुर्थादिदिनेषुसं-स्कारारम्भेदाहकालेस्नानम् अगृहीताशौचानांत्रिदिनमेव भार्यापुत्रादेःश्रवणदि-नादारभ्यदशाहम् द्वितीयादावहन्यारम्भेचतुर्थदिनेसपिण्डशुद्धिःभार्यादेर्दशा-हमेवश्रवणदिनादित्यूह्यम् देशान्तरगतस्यद्वादशवर्षादिप्रतीक्षोत्तरंपर्णशरदाहे-प्येवमेवपुत्रादेःसपिण्डानांचदशरात्रंत्रिरात्रादिकमूह्यम् प्रतीक्षाचयदारभ्यवार्ता-नश्रूयतेतदारभ्यपञ्चदशवर्षाणिमातापित्रोः अन्येषांपूर्वेवयसिविंशतिः मध्यमे-पञ्चदश उत्तरेवयसिद्वादशप्रतीक्षायुक्त्यादिभिर्मरणनिश्चयासंभवेकार्या ॥

**आहिताग्न्याशौचनिर्णय**—आहिताग्निचें समंत्रक दहन झाल्या दिवसापासून पुत्रादिकांनीं अशौच धरावें. येथें आहिताग्नि या पदानें तीन श्रौताग्नींनीं युक्त असा अर्थ घ्यावा. त्याहून निराळा जो गृह्याग्नि-मान्, तोही अनाहिताग्नि जर विदेशीं मरण पावला तर दाहापूर्वी पुत्रादिकांस अशौच व संध्यादि नित्य कर्मांत समंत्रक लोप नाहीं. समंत्रक दहनाचे आरंभापासून पुत्रादिक सपिंड, कन्या, दौहित्र इत्यादि भिन्नगोत्रीयांस अशौच आहे. अतिक्रांत-निमित्तक अशौचाचा अभाव व त्या अशौचाचा ऱ्हास म्हणजे कमीपणा करूं नये. म्हणूनच आहिताग्नींचा जरी पर्णशर (पालाशाविधि) दाह झाला असला तरी देशांतर व कालांतर असतांही दहा दिवस अशौच धरावें असें सिद्ध होतें. अनाहिताग्नीच्या मरणदिवसापासूनच पुत्रादिकांनीं अशौच धरावें. अनाहिताग्नि जर देशांतरीं मरण पावला तर मरण ऐकल्यानंतरच पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अतिक्रांताशौच धरावें. अनाहिताग्नीचा जर अस्थिदाह किंवा पर्णशरदाह करणें असेल तर पूर्वीं अशौच न धरलेले भार्या व पुत्र यांनीं दहा दिवस अशौच धरावें. भार्यापुत्रांनीं पूर्वींच जर अशौच धरलेलें नसेल तर संस्कारकर्त्याशिवाय जीं स्त्रीपुत्र त्यांनीं दहनकालीं त्रिरात्र अशौच धरावें. सवतीचेंही असेंच अशौच जाणावें व स्त्रियेच्या संस्कारीं पतीसही याप्रमाणेंच जाणावें. याहून निराळ्या असलेल्या सपिंडांनीं पूर्वीं जर अशौच धरलें

नसेल तर अनाहिताग्नीच्या संस्कारकालीं त्रिरात्र अशौच धरावें. ज्या सपिंडांनीं अशौच धरलें असेल त्यांनीं मात्र स्नान मात्र करावें. सपिंडांस हें त्रिरात्राचें व पुत्रादिकांस दहा दिवस सांगितलेलें अशौच दहा दिवसांनंतर संस्कार करणें असेल तरच जाणावें. दहा दिवसांत संस्कार केला तर शेष दिवसांनींच शुद्धि व कर्मसमाप्ति होते. आहिताग्नीचाच दहा दिवसांतही जरी शरीरदाह, अस्थिदाह किंवा पालाशविधि-दाह केला तरीही शेष दिवसांनीं शुद्धि होत नाहीं, कारण, आहिताग्नीचा समंत्रक दाह ज्या दिवशीं होतो तोच त्याचा पहिला दिवस असें सांगितलें आहे. देशांतरीं मरण पावलेला जो अनाहिताग्नि त्याच्या मरणाची वार्ता दहा दिवसानंतर जर समजली तर ती ऐकल्या दिवसापासून तीन दिवस सपिंडांनीं अशौच धरलें असून चौथ्या दिवशीं जर क्रियेस आरंभ असेल तर सपिंडांनीं दहनकालीं स्नान मात्र करावें व अशौच न धरलेल्या सपिंडांनीं तीन दिवसच अशौच धरावें. भार्यापुत्रादिकांनीं ऐकलेल्या दिवसापासून दहा दिवस अशौच धरावें. दुसऱ्या दिवशीं संस्कारास आरंभ झाल्यास सपिंडांची शुद्धि चौथ्या दिवशीं होते. भार्यादिकांची शुद्धि ऐकल्या दिवसापासून दहा दिवसांनींच होते असें जाणावें. देशांतरीं गेलेल्याची बारा वर्षें वाट पाहून पालाशविधीनें दाह केला असतां, असाच निर्णय जाणावा. पुत्रादिक व सपिंड यांस क्रमानें दशरात्र, त्रिरात्र इत्यादिक जाणावें. ज्या दिवसापासून वार्ता ऐकली गेली नाहीं त्या दिवसापासून पंधरा वर्षें मातापितरांची वाट पहावी, इतरांची पूर्व वय असतां वीस वर्षें, मध्यम वय असतां पंधरा वर्षें, उत्तर वय असतां बारा वर्षें व मरणकाल निश्चयाचा असंभव असतां युक्ति इत्यादिकेंकरून प्रतीक्षा करावी.

अथशौचसंपातेनिर्णयः दशाहमृताशौचेदशाहस्यततोन्यूनस्यवामृताशौचस्यसंपातेपूर्वप्रवृत्ताशौचसमाप्त्याशुद्धिः १ दशाहजननाशौचेदशाहंन्यूनंवाजननाशौचंपततिचेत्पूर्वप्रवृत्तसमाप्त्याशुद्धिः २ दशाहमृताशौचेजननाशौचंदशाहंत्र्यहंवासंपतेत्तदामृताशौचसमाप्त्याशुद्धिः ३ त्र्यहमृताशौचेत्र्यहंततोन्यूनंवामृताशौचंत्र्यहंजननाशौचंवासंपतेत्तदापूर्वप्रवृत्तान्तेशुद्धिः ४ त्रिदिनजननाशौचेत्रिदिनजननाशौचपातेपूर्वान्तेशुद्धिः ५ पक्षिणीमृताशौचेपक्षिण्येकाहान्यतरमृतकपातेपूर्वान्तेशुद्धि जननाशौचेनसमेनाधिकेनवामृताशौचंनापैतिः पक्षिण्यादिरूपमृतकेनत्रिदिनंदशाहंचजननाशौचंत्रिदिनमृताशौचेनदशाहंजाताशौचंचनापैतीतिबहवः कश्चित्तुन्यूनेनापिमृतकेनाधिकस्यापिजाताशौचस्यनिवृत्तिरित्याह त्रिदिनमृताशौचेनदशाहंमृतकंननिवर्तते । एवंपक्षिण्यात्रिदिनमेकाहेनपक्षिणींचनापैति त्रिदिनजाताशौचेनदशाहंजाताशौचंननिवर्तते ॥

**अशौचसंपातनिर्णय**—दहा दिवसांचें मृताशौच असतां त्यांत दहा दिवसांचे किंवा त्यांहून कमी असें जर दुसरें मृताशौच समजली तर पूर्वीच्या अशौचाची समाप्ति झाल्यानें त्याची शुद्धि होते. दहा दिवसांचे जननशौचांत जर दहा दिवसांचें किंवा त्याहून कमी दिवसांचें जननाशौच जर येईल तर पूर्वीच्या जननाशौचाची समाप्ति झाल्यानें त्याची शुद्धि होते. दहा दिवसांच्या मृता-

शौचांत जर दहा दिवसांचें किंवा तीन दिवसांचें जननाशौच आलें तर मृताशौचाची समाप्ति होतांच त्याचीही समाप्ति होते. तीन दिवसांचें मृताशौच असतां, तीन दिवसांच किंवा त्याहून कमी असें मृताशौच किंवा तीन दिवसांचें जननाशौच आल्यास पूर्वीच्या अशौचाची समाप्ति होतांच शुद्धि होते. तीन दिवसांच्या जननाशौचांत तीन दिवसांचें-च जननाशौच जर आलें तर पूर्वीच्या अशौचाच्या अंतीं त्याची शुद्धि होते. पक्षिणी-मृताशौचांत पक्षिणी व एक दिनात्मक यांतून जर एखादें मृताशौच आलें तर त्याची पूर्वीच्या अशौचाच्या अंतीं शुद्धि होते. समान किंवा अधिक अशीं जननाशौचें मृताशौचांत दूर होत नाहींत. पक्षिण्यादिरूप मृताशौचानें तीन दिवसांचें व दहा दिवसांचें जननाशौच व तीन दिवसांचे मृताशौचानें दहा दिवसांचें जननाशौच हीं जात नाहींत असें बहुत ग्रंथकार म्हणतात. कांहीं ग्रंथकार असें म्हणतात कीं, कमी अशा मृताशौचानें अधिक अशा जननाशौचाची निवृत्ति होते. तीन दिवसांच्या मृताशौचानें दहा दिवसांचें मृताशौच जसें जात नाहीं, त्याचप्रमाणें पक्षिणीअशौचानें तीन दिवसांचें व एक दिवसाच्या अशौचानें पक्षिणी अशौच जात नाहीं. तीन दिवसांच्या जननाशौचानें दहा दिवसांचें जननाशौच जात नाहीं.

अत्रेदंबोध्यम् संपातोनामाशौचिनामेकाशौचित्वज्ञानेपराशौचित्वज्ञानं तेनपूर्वाशौचमध्येउत्पन्नमपिपराशौचंपूर्वाशौचान्तेज्ञातंचेत्पूर्वेणननिवर्ततेसंपा-ताभावात् पूर्वत्वपरत्वेतूत्पत्तिकृतेनज्ञानकृते तेनपूर्वोत्पन्नस्यपरोत्पन्नज्ञानोत्तरं-ज्ञानेपिपूर्वोत्पन्नेनपरोत्पन्नंतन्मध्येज्ञातंनिवर्ततएव संपातएवज्ञानकृतोनतुपूर्व-त्वादिकमितिसिद्धान्तादिति दशाहन्त्यरात्रौयदिनिवृत्तियोग्यदशाहसंपातस्त-दादिनद्वयमधिकंकार्यम् दशमरात्रेश्चतुर्थयामेनिवृत्तियोग्यदशाहान्तरसंपाते-दिनत्रयमधिकम् दशाहान्त्यरात्रौचतुर्थयामेवानिवृत्तियोग्यात्रिरात्राशौचपाते-तुपूर्वेणशुद्धिर्नद्व्यहादिवृद्धिः एवंत्र्यहाद्याशौचानांनिवृत्तियोग्यागांपरस्परंतृतीय रात्रौतृतीयरात्रिशेषेवासंपातेपूर्वेणशुद्धिर्नद्व्यहादिवृद्धिः वर्धितद्वित्रिदिनेदशाहा-न्तरपातेपूर्वेणाद्विरात्रेणत्रिरात्रेणवाननिवृत्तिः वर्धितद्विरात्रेणपक्षिण्यानिवृत्तिः वर्धितत्रिरात्रेणान्यत्रिरात्रस्यनिवृत्तिः ॥

**अशौचान्तर्गताशौचनिर्णय**—अशौचीयास एका अशौचित्वाचें ज्ञान असतां दुसऱ्या अशौचित्वाचें जें ज्ञान होणें त्याचें नांव संपात. यावरून असें ठरतें कीं, पूर्वीच्या अशौचांत जरी दुसरें अशौच आलें तर त्याचें ज्ञान जर पूर्वीच्या अशौचाच्या अंतीं होईल तर पूर्वाशौचानें तें अशौच निवृत्त होत नाहीं. कारण संपाताचा अभाव आहे. पूर्वत्व व परत्व हीं उत्पत्तिकृत आहेत, ज्ञानकृत नाहींत. या न्यायानें पूर्वीं उत्पन्न झालेल्याचे ज्ञान पुढें उत्पन्न झालेल्याचे ज्ञानानंतर जरी होईल तरी पूर्वी उत्पन्न झाल्यामुळें पुढें उत्पन्न झालेलें मध्येंच समजलें तर तें निवृत्त होतेंच. कारण संपातच ज्ञानकृत आहे व पूर्वत्वादिक ज्ञानकृत नाहीं असा सिद्धान्त आहे. दहा दिवसांच्या अशौचाच्या शेवटच्या रात्रीं निवृत्त होण्यास योग्य असें दहा दिवसांचें अशौच प्राप्त झाल्यास त्याबद्दल २ दिवस अधिक

अशौच धरावें. दहाव्या रात्रीच्या चौथ्या प्रहरीं निवृत्त होण्यास योग्य असें दहा दिवसांचें दुसरें अशौच प्राप्त झाल्यास २ दिवस अधिक धरावें. दहा दिवसांचे अशौचाच्या शेवटच्या रात्रीं अथवा चौथ्या प्रहरीं निवृत्त होण्यास योग्य असें त्रिरात्राशौच प्राप्त झाल्यास पूर्वीच्या अशौचानें शुद्धि होते. त्याबद्दल दोन दिवस अधिक धरण्याचें कारण नाहीं. याप्रमाणें निवृत्ति होण्यास योग्य अशीं त्रिदिनादिक अशौचें परस्पर तिसऱ्या रात्रीं किंवा तिसऱ्या रात्रींच्या अंतीं समजल्यास पूर्वींच्या अशौचानें दुसऱ्याची शुद्धि होते. दोन दिवस अधिक धरण्याचें कारण नाहीं. अधिक धरलेले दोन तीन दिवस अशौच असतां दहा दिवसांचें अशौच समजल्यास पूर्वींच्या दोन किंवा तीन दिवसांच्या अशौचानें तें निवृत्ति होत नाहीं, अधिक धरलेल्या दोन रात्रींच्या अशौचानें पक्षिणीची निवृत्ति होते, अधिक धरलेल्या त्रिरात्र अशौचानें दुसऱ्या त्रिरात्राची निवृत्ति होते.

यदातुभागिनेयादिर्मातुलादेरन्त्यकर्मकरोतितदातन्निमित्तेदशाहाद्याशौचे-
सतियदिसपिण्डमरणनिमित्तंदशाहादिकंपततितदातस्यपूर्वेणशुद्धिर्नभवति
कर्माङ्गाशौचस्यास्पृश्यतामात्रप्रयोजकत्वेनसंध्यादिकर्मलोपाभावेनलघुत्वात्
लघुनागुरोर्निवृत्त्यभावात् एवंत्रिरात्रपातेपिजननात्रिरात्रस्यानिवृत्तिर्मृतकात्रिरात्रस्यनेत्यादिकमूह्यम् पुत्रस्यसपिण्डाशौचेनमातापित्रोराशौचंनापैति एवंभार्याया भर्त्राशौचंनापैति केचित्पत्युर्भार्याशौचमपिनापैतीत्याहुः मात्राशौचमध्ये पित्राशौचपातेपूर्वान्तेशुद्धिः स्मृत्यर्थसारादयस्तुपितुःसंपूर्णमेवाशौचंकार्यमित्याहुः पित्राशौचेमातुर्मरणेपित्राशौचंसमाप्यपक्षिणीमधिकांकुर्यात् इयंपक्षिणीवृद्धिर्दशमरात्रेरर्वाक्मरणेतज्ज्ञानेवाभवति दशमरात्रौतद्रात्रिचतुर्थयामेवामातृमरणादौतुद्विरात्रत्रिरात्रावेवनपक्षिणी मातुरनाहिताग्निभर्तुर्मरणाद्द्वितीयादिदिनेषुसहगमनेपिनाधिकापक्षिणी भर्त्राशौचान्तेशुद्धिः नवश्राद्धपिण्डादिकंयुगपत्समापयेत् भर्त्राशौचोत्तरमन्वारोहणेत्रिरात्रम् एतत्त्रिरात्रंसपिण्डानामेव पुत्रस्यतुमात्राशौचंसंपूर्णमेवेतिभाति सहगमनेसपिण्डानामपिपूर्णमेवाशौचंत्रिरात्रंत्वनुगमनपरमितिगौडाः इदमेवयुक्तम् इयंसंपातेपूर्वेणशुद्धिः सूतिकाया अग्निदस्यचनास्ति यदादेशान्तरमृतपितुर्वार्तां श्रुत्वापुत्रैर्दशाहमाशौचंकृतंसंस्कारस्त्वस्वस्थ्यलाभादिहेत्वन्तरवशान्नकृतोदशाहोत्तरंचसंस्कारआरब्धस्तत्रसंस्कारकर्तुःपुत्रस्यकर्माङ्गंदशाहमाशौचम् तदाशौचमध्येसपिण्डमरणेपूर्वान्तेशुद्धिर्न मातुर्मरणेपिनाधिकापक्षिणी किंतुसपिण्डाशौचंमात्राशौचंच संपूर्णमेवकार्यम् अतिक्रान्तकालाद्वर्तमानस्यबलवत्त्वात् एवंद्वादशवर्षादिप्रतीक्षोत्तरंपुत्रादिभिः क्रियमाणपित्रादिसंस्काराङ्गदशाहाशौचेऽन्यसपिण्डादिमरणेपीतिपूर्वशेषेणशुद्धेरपवादःसिन्धुक्तः जननाशौचेमृताशौचेवामृतकसंपातेपिण्डदानाद्यन्तकर्मप्रतिबन्धोनास्ति मृताशौचेजाताशौचेवापुत्रजननेजातकर्मादिप्रतिबन्धोनास्तीत्येके पूर्वाशौचान्तेजातकर्मेत्यन्ये मातुर्याधिकापक्षिणीतन्मध्ये पितुरेकोद्दिष्टश्राद्धंवृषोत्सर्गशय्यादानादिकंचकुर्यात् अन्यसपिण्डाशौचेत्वेकादशाहकृत्यंनकार्यमितिमहच्चः कार्यमितिकश्चित् ॥

**सर्वसाधारण जननमृताशौचनिर्णय**—जेव्हां भाचा इत्यादिक मातुलादिकांचें अंत्यकर्म करितो तेव्हां त्यास अंत्यकर्मसंबंधीं दहा दिवस अशौच असतां त्या अशौचांतच जर त्याला सपिंडमरणनिमित्तक दहा दिवस अशौच आलें तर पूर्वींच्या अशौचानें त्याची शुद्धि होत नाहीं. कारण, कर्मांगभूत अशौच अस्पृश्यतेस मात्र कारण असल्यानें व त्यांत संध्यादिक कर्मांचा लोप नसल्यानें तें लघु आहे. म्हणून लघु (अल्प) अशौचानें गुरु (मोठ्या) अशौचाची निवृत्ति होत नाहीं. याप्रमाणें त्रिरात्र अशौच असतांही त्रिरात्र जननाशौचाची निवृत्ति व त्रिरात्र मृताशौचाची निवृत्ति होत नाहीं असें जाणावें. सपिंडाच्या अशौचानें पुत्राचें मातापित्यांचें अशौच नाहींसें होत नाहीं: याप्रमाणेंच स्त्रियेचेंही भर्त्यासंबंधीं अशौच दूर होत नाहीं. पतीचें स्त्रीसंबंधीं अशौचही निवृत्त होत नाहीं, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. मातेच्या अशौचांत पित्याचें अशौच आल्यास पूर्वींचें अशौच संपतांच शुद्धि होते. पित्याचें अशौच संपूर्ण धरावें असें स्मृत्यर्थसारादि ग्रंथांत म्हटलें आहे. पित्याचे अशौचांत माता मृत झाल्यास पित्याचें अशौच संपल्यावर मातेचें पक्षिणी अधिक अशौच धरावें. हें पक्षिणी अधिक अशौच धरणें तें दहाव्या रात्रीच्यापूर्वीं मरण असतां किंवा समजलें असतां धरावें. पण दहाव्या रात्रीं किंवा दहाव्या रात्रीच्या चौथ्या प्रहरीं माता मृत झाल्यास किंवा मेल्याचें समजल्यास दोन तीन रात्री अधिक धरावें, पक्षिणी धरूं नये. अनाहिताग्नि भर्त्याचे मरणापासून दुसऱ्या दिवशीं मातेनें जर सहगमन केलें तर मातेचें अशौच अधिक पक्षिणी धरल्यानें त्याची भर्त्याचे अशौचाअंतीं शुद्धि होते. नवश्राद्ध पिंडादिक एकदाच समाप्त करूं नये. भर्त्याचे अशौचानंतर स्त्री सती गेल्यास त्रिरात्र अशौच धरावें व हें त्रिरात्र अशौच सपिंडांनींच धरावें. पुत्रास तर मातेचें अशौच संपूर्ण आहेसें वाटतें. सहगमन असतां सपिंडासही पूर्णच अशौच आहे. त्रिरात्र अशौच अनुगमनपर आहे असें गौड म्हणतात, व हेंच त्यांचें म्हणणें योग्य आहे. संपात असतां पूर्वींच्या अशौचानें नंतरच्या अशौचाची शुद्धि होते पण ती सूतिकेची व अग्नि देणाराची होत नाहीं. देशांतरीं मृत झालेल्या पित्याची वार्ता ऐकून पुत्रानें दहा दिवस अशौच धरलें व अस्थि न मिळाल्यामुळें किंवा इतर कारणामुळें संस्कार जर केला नाहीं व दहा दिवसांनंतर संस्कार आरंभिला तर संस्कार करणाऱ्या पुत्रास कर्मांगभूत दहा दिवसांचें अशौच आहे. याच अशौचांत जर सपिंड मृत झाला तर पूर्वाशौचाचे अंतीं शुद्धि होत नाहीं. माता मृत असतांही अधिक पक्षिणी अशौच नाहीं, तर सपिंडाशौच व मातेचें अशौच संपूर्णच धरावें, कारण, गतकालापेक्षां वर्तमानकाल बलवान् आहे. १२ वर्षें वाट पाहिल्यावर पुत्रादिकांनीं जो पित्रादिकांचा संस्कार करायचा त्याचे अंगभूत असलेल्या दहा दिवसांच्या अशौचांत अन्य सपिंडादिकांचें मरण असतांही आर्धींच्या शेषानें शुद्धीचा अपवाद निर्णयसिंधूंत सांगितला आहे. जननाशौच किंवा मृताशौच यांमध्यें मृताशौच आल्यास पिंडदानादिक अंत्यकर्मांचा प्रतिबंध नाहीं. मृताशौच किंवा जननाशौच यांमध्यें पुत्रजनन

झाल्यास जातकर्मादि करण्याविषयीं प्रतिबंध नाहीं, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. पूर्वीच्या अशौचाच्या अंतीं जातकर्म करावें असें दुसरे ग्रंथकार म्हणतात. मातेचें जें अधिक पक्षिणी अशौच त्यांतही पित्याचे महैकोद्दिष्ट श्राद्ध, वृषोत्सर्ग, शय्यादान इत्यादि करावें. अन्य सपिंडाचे अशौचांत अकराव्या दिवसाचें कृत्य करूं नये, असें बहुत ग्रंथकार म्हणतात. व एक ग्रंथकार करावें असें म्हणतो.

अथशवस्पर्शानुगमनादिसंसर्गाशौचम् संसर्गाशौचेनित्यकर्मानधिकारोनास्ति किंत्वस्पृश्यत्वमात्रम् तदपितदीयभार्यापुत्रादीनांनास्ति किंतुसंसर्गकर्तुरेव एवंतद्गृहवर्तितत्स्वामिकान्नादिद्रव्याणांनाग्राह्यत्वम् तत्रसजातीयशवस्पर्शे-सज्योतिराशौचम् हीनवर्णस्पर्शेऽधिकंकल्प्यम् ॥

**शवसंसर्गाशौचनिर्णय**—संसर्गाशौचांत म्हणजे प्रेताला शिवण्यांत नित्य कर्में करण्यास हरकत नाहीं. अस्पृश्यत्व मात्र प्रेताला स्पर्श करणाऱ्यासच आहे. त्याच्या भार्यापुत्रादिकांस नाहीं. याप्रमाणें त्याच्या घरांतील त्याचें स्वामित्व असलेले अन्नादि पदार्थ घेऊं नयेत. त्यांत आपल्या जातींतील शवाचा स्पर्श झाल्यास सज्योति अशौच आणि हीनवर्ण शवाचा स्पर्श असल्यास अधिक आहे.

अथानुगमने सजातीयस्याविजातीयस्यशवस्यानुगमनेस्नात्वाग्निसंस्पर्शंघृत-प्राशनंचकृत्वापुनःस्नात्वाप्राणायामंकुर्यात् विप्रस्यशूद्रानुगमनेत्रिरात्रंनद्यां-स्नानंघृतप्राशनंप्राणायामशतंच नात्रनित्यकर्मलोपः ॥

**शवानुगमनाशौचनिर्णय**—सजातीय अथवा विजातीय शवाच्या मागून गेलें असतां स्नान करून अग्निस्पर्श व घृतप्राशन करून पुनः स्नान व प्राणायाम हीं करावीं. ब्राह्मणानें शूद्राच्या शवाच्या मागून गमन केल्यास त्रिरात्र नदीमध्यें स्नान, घृतप्राशन व शंभर प्राणायाम हें करावें, यांत नित्यकर्माचा लोप नाहीं.

अथनिर्हरणे स्नेहनसजातीयशवनिर्हरणेतदन्नाशनेतद्गृहवासेचदशाहः तद्गृहवासमात्रेन्नाशनमात्रेवात्रिरात्रम् अन्नाशनगृहवासयोरभावेएकाहः ग्रा-मान्तरस्थंशवंनिर्हृत्यग्रामान्तरवासेसज्योतिः मौल्यग्रहणेनसजातीयनिर्हरणेद-शाहः विजातीयनिर्हारेशवजातीयम् भृतिग्रहणेनहीनजातीयनिर्हरणेशवजाती-यद्विगुणम् सोदकशवनिर्हरणेपिदशाहः शवालंकारकरणेपादकृच्छ्रम् अज्ञाना-दुपवासःअशक्तौस्नानम् धर्मार्थमनाथद्विजशवनिर्हरणेदाहकरणेचाश्वमेधादि-पुण्यंस्नानमात्राच्छुद्धिः अग्निस्पर्शोघृताशनंचात्रापि धर्मार्थमपिशूद्रशवनिर्हर-णेद्विजस्यैकाहः धर्मार्थमनाथशवानुगमनादौनदोषः ब्रह्मचारिणस्तुपितृमातृ-मातामहाचार्योपाध्यायभिन्नशवनिर्हरणादौव्रतलोपः पूर्वोक्तरीत्याशौचंच तत-स्तेनकृच्छ्रप्रायश्चित्तंपुनरुपनयनंचकार्यम् पित्रादेर्निर्हरणेपिब्रह्मचारिणाआशौ-चिनामन्नंनभक्ष्यम् तेषांस्पर्शोपिनकार्यः अत्रापिनित्यकर्मलोपोन ॥

**शवनिर्हरणनिर्णय**—स्नेहानें सजातीय शवास खांदा दिल्यास त्याच्या घरचें अन्न भक्षण केलें असतां व त्याचे घरीं राहिलें असतां दहा दिवस अशौच. त्याच्या घरीं वास मात्र केल्यास किंवा अन्न मात्र भक्षण केल्यास त्रिरात्र अशौच. अन्न भक्षण करणें व घरीं वास करणें हीं दोन्ही नसल्यास एक दिवस अशौच. दुसऱ्या गांवांतील शवास खांदा देऊन दुसऱ्या गांवीं वास केल्यास व हमाली घेऊन सजातीय शवास खांदा दिल्यास दहा दिवस अशौच. विजातीय शवास खांदा दिल्यास शवजातीचें अशौच धरावें. हमाली घेऊन हीन जातीच्या शवास खांदा दिल्यास शवजातीचे दुप्पट अशौच धरावें. सोदकाचे शवास खांदा दिल्यास दहा दिवस अशौच. शवास अलंकार केले असतां पादकृच्छ्र करावें व अज्ञानानें तसें केल्यास उपोषण करावें. उपोषण करण्यास असमर्थ असल्यास स्नान करावें. अनाथ द्विजाचें शव धर्मार्थ वाहून दहन केल्यास अश्वमेधादि पुण्य प्राप्त होतें व केवळ स्नानानें शुद्धि होते. याबद्दल अग्निस्पर्श करून घृतप्राशनही करावें. शूद्राचें शव द्विज जरी धर्मार्थ वाहील तरी त्यानें एक दिवस अशौच धरावें. धर्मार्थ अशा अनाथ शवाच्या मागें गेल्यास दोष नाहीं. पिता, माता, मातामह, आचार्य व उपाध्याय यांवाचून इतरांचे शवांस ब्रह्मचाऱ्यानें खांदा दिल्यास त्याचे वृत्तीचा लोप होतो. त्यानें पूर्वोक्त रीतीनें अशौच धरावें. व नंतर त्या ब्रह्मचाऱ्यानें कृच्छ्र प्रायश्चित व पुनरुपनयन करावें. पिता इत्यादिकांचें प्रेत वाहिलें तरी ब्रह्मचाऱ्यानें सुतक्यांचें अन्न भक्षण करूं नये आणि त्यांस स्पर्शही करूं नये. या अशौचांतही नित्यकर्मांचा लोप नाहीं.

अथदाहादौ समोत्कृष्टवर्णप्रेतस्यस्नेहादिनादाहोदकदानादिसकलौर्ध्वदेहिककरणेतत्तज्जात्याशौचम् तदन्तेस्नेहलोभाद्यनुसारेणगुरुलघुप्राजापत्यादीनां त्रयम् स्नेहादिनासवर्णानांदाहमात्रकरणे तद्गृहवासेत्रिरात्रम् तदन्नभक्षणेदशरात्रम् तदुभयाभावेएकाहः हीनवर्णेनोत्तमवर्णस्यदाहमात्रकरणेशवजात्याशौचम् भृतिग्रहणेनसवर्णस्यदाहमात्रकरणेपिदशाहाद्येव मौल्येनोत्तमवर्णदाहेद्विगुणम् उत्तमेनाधमवर्णदाहनिर्हरणकरणेतज्जात्याशौचंतदन्तेक्रमेणद्विगुणंत्रिगुणंचतुर्गुणंप्रायश्चित्तम् मौल्येनहीनवर्णदाहादौतुप्रायश्चित्तमाशौचंचोक्तापेक्षयाद्विगुणम् धर्मार्थेसमोत्कृष्टवर्णप्रेतस्यदाहादिसकलौर्ध्वदेहिककरणेपिनाशौचं नित्यपिण्डदानाद्यनन्तरंस्नानमात्राच्छुद्धिः द्विजेनशूद्रस्यधर्मेणापिदाहादिनकार्यम्॥

**स्नेहदहनाशौचनिर्णय**—दहनादिक केल्यास—समान किंवा उच्च वर्णांतील प्रेताचें दहन व उदक देणें, इत्यादि सर्व और्ध्वदेहिक कर्म स्नेहानें केल्यास त्या जातीचें अशौच धरावें; व अशौचानंतर स्नेह, लोभ जसा असेल त्याप्रमाणें गुरु, लघु प्राजापत्य इत्यादि तीन प्रायश्चित्तें करावींत. स्नेहादि कारणानें सवर्णांचा दाह मात्र केल्यास व त्याचे घरीं वास केला असल्यास त्रिरात्र अशौच धरावें. त्याचें अन्न भक्षण केलें असल्यास दहा रात्र अशौच धरावें. दहन व अन्नभक्षण या दोहोंचा अभाव असेल तर एक दिवस अशौच. हीन वर्णानें

उत्तम वर्णाचें दाह मात्र करणें असल्यास शवाचे जातीचें अशौच धरावें. मूल्य घेऊन सवर्ण शवाचें दहन मात्र करणें असल्यास दहा दिवस इत्यादिकच अशौच धरावें. मौल्य घेऊन उत्तम वर्णाचें दहन केल्यास दुप्पट अशौच धरावें, उत्तम वर्णानें अधम वर्णाचें दहन, खांदा देणें हीं केल्यास त्याचे जातीचें अशौच धरावें, व अशौचाअंतीं क्रमानें दुप्पट, तिप्पट व चौप्पट प्रायश्चित्त करावें. मौल्य घेऊन हीन वर्णाचें दहन इत्यादि केल्यास प्रायाश्चित व अशौच उक्तापेक्षेनें दुप्पट करावें. समान व उत्कृष्ट वर्णांतील प्रेताचें धर्मार्थ दहनादि सर्व और्ध्वदेहिक कर्म केलें तर अशौच नाहीं. नित्य पिंडदानादिक केल्यावर स्नानानेंच शुद्धि होते. द्विजानें शूद्राचें दहनादिक कर्म धर्मार्थही करूं नये.

अथब्रह्मचारिणापितृमातृमातामहादीनामन्याधिकार्यभावेदाहाद्यन्त्यकर्मकार्यम् तदाकर्माङ्गंदशाहमस्पृश्यत्वलक्षणमाशौचंचकार्यम् तदापितेषामाशौचिनामन्नं-ब्रह्मचारिणानभोक्तव्यम् आशौचिस्पृष्टतयावासश्चनकार्यः तदुभयकरणेप्राय-श्चित्तंपुनरुपनयनंच ब्रह्मचारिणापूर्वोक्तपित्रादिभिन्नानांदाहाद्यन्त्यकर्मकरणे कृच्छ्रत्रयप्रायश्चित्तं पुनरुपनयनंचाशौचान्तेकार्यम् पित्रादेर्दाहमात्रकरणेएका-हमाशौचंकार्यम् अत्रसर्वत्रब्रह्मचारिणःसंध्याग्निकार्यादिकर्मलोपोन ब्रह्मचारि-भिन्नस्यापिदाहादिनिमित्तकसंसर्गाशौचेब्रह्मयज्ञादिनित्यकर्मलोपोनेत्युक्तम् तत्र देवपूजावैश्वदेवादिकमन्येनकारणीयम् स्वयंकर्तुंयोग्यंतुस्वेनैवकार्यम् ब्रह्मचारिणः पित्राद्यन्त्यकर्माकरणेतुपित्रादिमरणेआशौचंन समावर्तनोत्तरंपूर्वमृतानांपित्रा-दिसपिण्डानांत्रिरात्रमाशौचंकार्यम् ॥

**ब्रह्मचाऱ्याचा अशौचनिर्णय**—दुसरा कोणी अधिकारी नसेल तर पिता, माता, मातामह, इत्यादिकांचें दहनादिक अंत्यकर्म ब्रह्मचाऱ्यानें करावें, व कर्मांगभूत दहा दिवस अस्पृश्यत्वलक्षण म्हणून अशौच धरावें. त्या कालींही ब्रह्मचाऱ्यानें सुतक्यांचें अन्न भक्षण करूं नये व अशौचीयांस स्पर्श होईल असें एकत्र राहूंही नये. अन्नभक्षण व एकत्र राहणें हीं दोन्हीं केल्यास प्राय-श्चित्त व पुनरुपनयनही करावें. पूर्वोक्त पिता इत्यादिकांव्यतिरिक्तांचें दहनादिक अंत्यकर्म केल्यास ब्रह्मचाऱ्यानें अशौचानंतर कृच्छ्रत्रय प्रायाश्चित्त व पुनरुपनयन करावें. पित्रादिकांनें दहन मात्र करणें असतां एक दिवस अशौच धरावें. अशा प्रसंगीं ब्रह्मचाऱ्यानें संध्या, अग्निकार्य इत्यादि कर्मांचा लोप करूं नये. ब्रह्मचाऱ्याहून अन्यांसही दहनादिनिमित्त संसर्गाचें अशौच असल्यास ब्रह्मयज्ञादि नित्यकर्मांचा लोप नाहीं, असें सांगितलें आहे. मात्र देवपूजा व वैश्वदेव हीं त्यानें दुसऱ्याकडून करवावींत, व स्वतः करण्यास जें योग्य असेल तें स्वतःच करावें. ब्रह्मचाऱ्यानें पिता इत्यादिकांचें अंत्यकर्म केलें नाहीं, तर त्यास पिता इत्यादिकांचें मरण-निमित्तक अशौचहि नाहीं. सोडमुंज झाल्यावर पूर्वी मरण पावलेल्या पिता इत्यादि सपिंडाचें त्रिरात्र अशौच धरावें.

अथरोदनेआशौचादिविप्रादिभिःसवर्णमरणविषयेऽस्थिसंचयनात्पूर्वरोदने स्नानम् तदुत्तरमाचमनम् विप्रस्यशूद्रविषयेऽस्थिसंचयनात्प्राक्त्रिरात्रम् शूद्रस्य विषयेतद्गृहवासादिसंबन्धेऽस्थिसंचयनात्प्रागेकरात्रम् तदूर्ध्वस्नानम् सपिण्डानांत्वनुगमनरोदनादौनदोषः नात्रापिकर्मलोपः अत्रसर्वत्रयस्ययावानाशौचकालस्तंनिर्वाह्यस्नात्वैवसविशुद्ध्यतिनतुस्नानंविनातावत्कालमात्रातिक्रमेणशुद्धिः अन्त्यकर्मकर्तुरस्थिसंचयनात्प्राक्स्त्रीसङ्गेचान्द्रायणंप्रायश्चित्तम् ऊर्ध्वंप्राजापत्यत्रयम् अन्येषांमृताशौचिनांसंचयनात्प्राक्संगमेत्रिरात्रमुपवासः ऊर्ध्वमेकरात्रम् ॥

**रोदनाशौचनिर्णय**—ब्राह्मणादिकांनीं आपल्या सवर्णांतील मृताच्या अस्थि गोळा करण्यापूर्वीं रोदन केल्यास स्नान व त्यानंतर रोदन केल्यास आचमन करावें. शूद्राच्या अस्थि गोळा करण्यापूर्वीं रोदन करणाऱ्या ब्राह्मणास त्रिरात्र व अस्थिसंचयनानंतर एक रात्र अशौच. अस्थिसंचयनापूर्वीं शूद्राच्या घरीं राहणें इत्यादि संबंध असतां एक रात्र व त्यानंतर स्नान करावें. सपिंडांनीं अनुगमन व रोदन केल्यास दोष नाहीं. या अशौचांतही कर्मलोप नाहीं. अशा वेळीं ज्यांस जितका अशौचकाल सांगितला तितका पाळल्यावर स्नानानेंच तो शुद्ध होतो. स्नान केल्यावांचून तितका काळ मात्र घालविल्यानें शुद्धि होत नाहीं. अंत्यकर्म करणारानें अस्थिसंचयनापूर्वीं स्त्रीसंग केल्यास चांद्रायण व अस्थिसंचयनानंतर तीन प्राजापत्यें प्रायश्चित्त करावें. अन्यमृताशौचीयांचीं अस्थिसंचयनापूर्वीं स्त्रीसंग केल्यास त्रिरात्र उपोषण करावें. व अस्थिसंचयनानंतर एक रात्र उपोषण करावें.

अथाशौच्यन्नभक्षणे असगोत्रोनापदिबुद्धिपूर्वसकृदप्याशौचिस्वामिकंपक्वमन्नंयस्मिन्दिनेभुङ्क्तेतदारभ्यतेनयावत्तेषामाशौचमवशिष्टं तावदाशौचंकार्यम् आशौचान्तेचविप्राशौचेसांतपनंप्रायश्चित्तम् शूद्राशौचेचान्द्रायणम् क्षत्रियादेःकलावभावान्नलिख्यते क्वचिल्लिखस्तुव्युत्पादनमात्रार्थोनेदानीमुपयुज्यते इतिप्रायउपेक्ष्यते मत्याभ्यासेविप्रशूद्राशौचयोःक्रमेणमासंषण्मासंकृच्छ्रादिव्रताचरणम् अमत्याभोजनेयावदन्नपाकमाशौचंक्रमेणैकरात्रंसप्तरात्रंचोपोषणंदशशतंचप्राणायामाः अमत्याभ्यासेद्विगुणम् आपद्यमत्याभोजनेतदहराशौचमेकः प्राणायामः शूद्राशौचेऽष्टाधिकसहस्रगायत्रीजपःज्ञानतआपदित्रिरघमर्षणमष्टोत्तरसहस्रगायत्रीजपः शूद्राशौचेप्राजापत्यम् शूद्रस्यद्विजाशौचेस्नानंपञ्चगव्याशनंच सर्वमिदंजननाशौचेन्यूनंयोज्यम् एवमाहिताग्न्याशौचेपिन्यूनमितिस्मृत्यर्थसारे सर्वमिदमाशौचिस्वामिकान्नभोजने ॥

**अशौचान्नभक्षणप्रायश्चित्तनिर्णय**—गोत्र भिन्न असून आपत्काल नसतां जाणून बुजून जर सुतक्याचें अन्न भक्षण केलें तर तें खाणारानें सुतक्याचें सुतक संपेपर्यंत आपण स्वतः सुतक धरावें व तें सुतक जर ब्राह्मणाचें असलें तर सुतक फिटल्यावर त्यानें सान्तपन प्रायश्चित्त करावें आणि तें जर शूद्राचें असेल तर चान्द्रायण करावें. क्षत्रियांचा कलियुगांत अभाव असल्यानें त्यांच्याविषयीं लिहीत नाहीं. क्वचित् ग्रंथांतून त्या बाबतींत जरी कांहीं

सांगितलेलें आहे, तरी तें केवळ स्पष्टीकरणार्थ असून सद्यःकालीं त्याचा मुळींच उपयोग नसल्यानें, त्याकडे बहुधा दुर्लक्ष्य केलें आहे. जाणूनबुजून किंवा संवयीनें जर सुतक्याचें अन्न भक्षण केलें व तें जर ब्राह्मण किंवा शूद्र यांपैकीं कोणाचें असलें तर अनुक्रमें एक महिना व सहा महिने कृच्छ्रादि व्रताचरण करावें. न समजतां जर भोजन केलें गेलें असलें तर भात तयार होण्याला जितका वेळ लागतो तितका वेळपर्यंत सुतक धरून ब्राह्मणाच्या अन्नदोषार्थ एक रात्र सुतक धरून दहा प्राणायाम करावेत व शूद्रान्न-भक्षणार्थ सात रात्रीं उपोषण करून शंभर प्राणायाम करावेत व अभ्यास म्हणजे संवय असल्यास दुप्पट प्रायश्चित्त करावें. आपत्कालीं अजाणपणें ब्राह्मणाकडे भोजन केलें गेल्यास तो दिवस अशौच धरून एक प्राणायाम करावा व शूद्राकडच्याकरितां एक हजार आठ गायत्रीजप करावा. आपत्कालीं समजून उमजून ब्राह्मणान्न जेवल्यास तीन वेळ अघमर्षण व एक हजार आठ गायत्रीजप करावा. आणि शूद्रान्नासाठीं प्राजापत्य करावें. ब्राह्मणाचें सुतक असतां (त्यांत जेवल्यास) शूद्रानें स्नान करून पंचगव्य घ्यावें. सोयरांत हीं सर्व प्रायश्चित्तें कमी प्रमाणांत करावींत. आहिताग्नीच्या अशौचांत हें सर्व कमी प्रमाणांत करण्याबद्दल स्मृत्यर्थसार ग्रंथांत सांगितलें आहे. मालक अशौची असतां त्याचें अन्न खाणारानेंच हा निर्णय समजावा.

यदातुतदस्वामिकमाशौचिस्पृष्टमात्रमन्नंभुङ्क्तेतदामत्याभोजनेकृच्छ्रम् अमत्यार्धमितिस्मृत्यर्थसारेउक्तम् आशौचिस्पृष्टाशौचिस्वामिकान्नभोजीतुतत्स्वामिकान्नाशननिमित्तंतत्स्पृष्टान्नाशननिमित्तंचेतिप्रायश्चित्तद्वयंसमुच्चयेनकुर्यात् आशौचिस्वामिकामान्नप्रतिग्रहेतूक्तप्रायश्चित्तार्धम् आशौचंतुनास्ति दातृभोक्तृभ्यामुभाभ्यामज्ञातेजननेमरणेवानदोषः अन्यतरेणज्ञातेदोषः तत्रदातुर्ज्ञानेभोक्तुरज्ञानेभोक्तुरल्पंप्रायश्चित्तम् दातुरज्ञानेपिभोक्तुर्ज्ञानेपूर्णमेवभोजननिमित्तकाशौचेपिकर्मलोपोन ॥

**अशौचस्पर्शान्नभक्षणदोषनिर्णय**—अशौचीयाचें अन्न नसून त्यानें स्पर्श केलेलें अन्न जो बुद्धिपूर्वक खातो, त्यानें कृच्छ्र प्रायश्चित्त करावें व न कळत खाणारानें अर्धकृच्छ्र करावें, असें स्मृत्यर्थांत सांगितलें आहे. अशौचीयानें स्पर्श केलेलें अशौची धन्याचें अन्न खाणारानें, अशौची धन्याचें अन्न खाल्लें म्हणून व तें अशौचीयाचा स्पर्श झालेलें होतें म्हणून दोन प्रायश्चित्तें एकदम करावींत. अशौची धन्याचें आमान्न ( शिधा ) घेतल्यास, सांगितलेल्या प्रायश्चित्तांचें अर्धें प्रायश्चित्त करावें. देणारा व घेणारा या दोघांनाही जर सोयर व सुतक यांपैकीं कोणचेंही माहीत नसेल तर दोष नाहीं व दोहोंतून एकास ठाऊक असतांही जरी दोष नाहीं, तरी दात्यास ( देणारा ) माहीत असून भोक्त्यास ( घेणारास ) जर तें माहीत नसेल, तर भोक्त्यास अल्पप्रायश्चित्त आणि ( देणारास ) अज्ञात ( माहीत नसणें ) असूनही भोक्त्यास जर माहीत असेल, तर त्यानें पूर्ण प्रायश्चित्त करावें. अशा तऱ्हेचें भोजननिमित्तक जरी अशौच असलें तरी त्याला ( नित्य ) कर्मलोप नाहीं.

अथतुकथमपिस्वल्पसंबन्धयुक्तेस्नानंवासोयुतंस्यादितित्रिंशच्छ्लोकी स्मृत्यर्थसारेप्येवम् अयमस्यार्थः स्वल्पेनापिएकाहाद्याशौचप्रयोजकेनसंबन्धेनयुक्ते शालकजामात्रादौमृतेसचैलंस्नानंकार्यम् सर्वत्रगुरुणोलघुनोवामृताशौचस्यप्राप्तिकालेसमाप्तिकालेचस्नातव्यमितियावत् अथवास्वल्पैर्दशाहभिन्नपक्षिणीत्रिदिनाद्याशौचप्रयोजकैःसंबन्धैर्युक्तेबन्धुत्रयमातुलानुपनीतसपिण्डादौमृते देशान्तरेकालान्तरेपिस्नानंभवत्येव तथाचयस्यसन्निहितकाले आशौचप्राप्तिस्तस्यातिक्रान्तकालेस्नानम् यस्यतुसन्निहितकालेपिस्नानमात्रंतस्यकालान्तरेस्नानमपिनेत्यर्थः यद्वास्वल्पआशौचप्रयोजकसंबन्धभिन्नसंबन्धःयथाशालकसुतत्वं ऊढकन्यायाः पितृव्यतत्पुत्रत्वादिभागिन्याभ्रातृपुत्रत्वादिभ्रातृपुत्रत्वादितद्युक्ते आशौचाभावेपिस्नानमात्रंभवत्येव यत्किंचित्संबन्धेआशौचाभावेपिस्नानमात्रं सन्निधौसर्वत्रकार्यमित्यर्थः पक्षत्रयमपिइदंशिष्टाचारेदृश्यते इतियुक्तंभाति ॥

**अल्पसंबंधाशौचप्रायश्चित्त**—कसलाही थोडकासा संबंध असलेला गृहस्थ मेल्यास सचैल स्नान करावें, असें त्रिंशश्लोकींत व स्मृत्यर्थसारांत जें सांगितलें आहे, त्याचा अर्थ असा कीं, एकच दिवस अशौच उत्पन्न करणारे जे अल्पसंबंधी शालक ( बायकोचा भाऊ ) व जामात ( जांवई ) हे मेल्यास सचैल स्नान करावें. मृताशौच केव्हांही आल्यास तावडतोब व तें संपण्याच्या वेळीं असें ( दोनदां ) स्नान करावें, किंवा दहा दिवसांच्या सुतकावांचून इतर जीं तीन दिवसांचीं व पक्षिणी सुतकें धरण्याचे संबंधी जें ( मागें सांगितलेलें ) बंधुत्रय, मामा व मुंज झालेले सपिंड त्यांतून कोणीही मेल्यास, देशांतरीं किंवा कालांतरीं स्नान हें केलेंच पाहिजे. ज्यांच्या मृत्यूसाठीं फक्त जवळ असत्यानेंच स्नान करावें लागतें त्यांच्याकरितां तशा प्रसंगीं स्नानही नाहीं. अशौच धरण्याच्या संबंधाहून इतर संबंधी म्हणजे—बायकोच्या भावाचें, लग्न झालेल्या मुलीस तिच्या चुलत भावाचें व बहिणीस भावाच्या मुलाचें अशौच नाहीं, फक्त स्नान आहे. अलस्वल्प संबंधाचें जरी अशौच नाहीं, तरी समीप असतां स्नान आहे. हे तिन्ही पक्ष शिष्टाचारांत आढळतात व ते योग्यही आहेत असें दिसतें.

अथाशौचापवादः सपञ्चधा १ कर्तृतः २ कर्मतः ३ द्रव्यतः ४ मृतदोषतः ५ विधानत इति ॥

**अशौचापवाद**—हा—(१) कर्त्यापासून, (२) कर्मापासून, (३) द्रव्यापासून (४) मृतदोषापासून आणि (५) विधानापासून—असा पांच प्रकारचा आहे.

तत्रकर्तृतोयथा यतीनांब्रह्मचारिणांचसपिण्डजननमरणयोर्नाशौचम् मातापितृमरणेतुयतिब्रह्मचारिणोःसचैलंस्नानमात्रंभवत्येव ब्रह्मचारिणःसमावर्तनोत्तरंब्रह्मचर्यदशायांमृतानांपित्रादिसपिण्डानांत्रिरात्रमाशौचमुदकदानंचकार्यम् अनुगमननिर्हरणनिमित्तकत्वाशौचंब्रह्मचारिणोऽप्यस्त्येव पित्राद्यन्त्यकर्मकरणेब्रह्मचारिणआशौचमप्यस्त्येव आरब्धप्रायश्चित्तानांप्रायश्चित्तानुष्ठान-

समयेआशौचंन समाप्तेतुप्रायश्चित्तेत्रिरात्रमतिक्रान्ताशौचम् कृतकर्माङ्गनान्दीश्राद्धनांतत्कर्मसमाप्तिपर्यन्तंतत्कर्मोपयोगिकार्येआर्त्यादिसंकटेआशौचंन जाताशौचमृताशौचवतोमरणसमयप्राप्तौनाशौचम् तेनदानादिकंसतिवैराग्येआतुरस्यसंन्यासोऽपिभवतीतिसिन्ध्वादयः देशविप्लवदुर्भिक्षादिमहापदिसद्यःशौचम् आपदपगमेआशौचावशेषेअवशिष्टाशौचमस्त्येव ॥

**( १ ) कर्तृतोपवाद**—संन्यासी व ब्रह्मचारी यांस सपिंडाचें जननाशौच व मृताशौच नाहीं. माता व पिता मृत झाल्यास संन्यासी व ब्रह्मचारी यांनीं अवश्य सचैल स्नान करावें. ब्रह्मचाऱ्याची सोडमुंज झाल्यावर ब्रह्मचर्यदशेंत असतां जे पिता इत्यादि सपिंड मरण पावले असतील त्यांचें त्रिरात्र अशौच धरून त्यांस त्यानें उदकदान करावें. शवामागून जाणें व शव पाहणें या निमित्तांचें अशौच ब्रह्मचाऱ्यासही आहेच. पिता इत्यादिकांचें अंत्यकर्म केल्यास ब्रह्मचाऱ्यास अशौच आहेच. ज्यांनीं पूर्वीं प्रायश्चित्तें आरंभिलीं असतील त्यांस प्रायश्चित्तानुष्ठानसमयीं अशौच नाहीं. प्रायश्चित्ताची समाप्ति झाल्यावर त्यानें त्रिरात्र अतिक्रांत अशौच धरावें. कर्मांगभूत नांदीश्राद्ध ज्यांनीं केलें असेल त्यांस तें कर्म समाप्त होईपर्यंत त्या कर्मास उपयोगी जें कार्य त्यांत पीडा, संकट इत्यादि असतां अशौच नाहीं. जननाशौचांत व मृताशौचांत असतां मरणसमय प्राप्त झाल्यास अशौच नाहीं. यावरून दानादिक व वैराग्य असतां आतुरास संन्यासही होतो, असें निर्णयसिंधु ग्रंथांत सांगितलें आहे. देशपीडा, दुष्काळ इत्यादि मोठी आपत्ति असतां तात्कालिक शुद्धि होते व आपत्ति दूर झाल्यावर जर अशौच दोष असेल तर अवशिष्ट अशौच आहेच.

अथकर्मतः । अन्नसत्रिणामन्नादिदानेषुनाशौचम् प्रतिग्रहीतुस्तुआमान्नग्रहणेदोषोन पक्वान्नभोजनेतुत्रिरात्रंक्षीरपानम् गृहीतेऽनन्तव्रतादावेकादश्यादौचारब्धकृच्छ्रादिव्रतेचनाशौचम् तत्रस्नानादिशारीरनियमाःस्वयंकार्याः अनन्तपूजादिकमन्येनकारणीयम् ब्राह्मणभोजनादिकमाशौचान्तेराजादीनांप्रजापालनादौनाशौचम् ऋत्विजांमधुपर्कपूजोत्तरंतत्कर्मणिनाशौचम् तेनयेष्वाधानपशुबन्धादिषुमधुपर्कोनोक्तस्तेषुकृतेपिवरणेतानुत्यक्त्वान्येऋत्विजःकार्याः दीक्षितानांदीक्षणीयोत्तरमवभृथस्नानपर्यन्तंयज्ञकर्मणिनाशौचम् दीक्षितर्त्विग्भ्यास्नानमात्रंकर्ममध्येकार्यम् अवभृथात्पूर्वमेवाशौचाभावः अवभृथंतुनभवत्येवेतिसिन्धुः कर्मान्तेतुत्रिरात्रपूर्वन्यायात् रोगभयराजभयादिनाशार्थेशान्तिकर्मणिनाशौचम् क्षुत्पीडितकुटुम्बस्यप्रतिग्रहेनाशौचम् विस्मरणशीलस्याधीतवेदशास्त्राध्ययनेपिनाशौचम् वैद्यस्यनाडीस्पर्शनेनाशौचम् श्राद्धेतूक्तम् मूर्तिप्रतिष्ठाचौलोपनयनविवाहाद्युत्सवतडागाद्युत्सर्गकोटिहोमतुलापुरुषदानादिककर्मसुनान्दीश्राद्धोत्तरंनाशौचम् संकल्पितेपुरश्चरणजपेऽविच्छेदेनसंकल्पितहरिवंशश्रवणादौचप्रारम्भोत्तरंनाशौचम् कालादिनियमाभावेतुस्तोत्रहरिवंशादिकमाशौचेहेयमेवसर्वोप्ययमाशौचापवादोनन्यगतिकत्वेआर्तौचज्ञेयइति-

सिन्धौनागोजीयेचोक्तम् तेनानन्यगतिकत्वादिमालोच्यैवाशौचाभावोयोज्यः अत्रयद्वक्तव्यंतत्पूर्वार्धेतत्रतत्रोक्तमेव ॥

( २ ) **कर्मतोपवाद**—ज्याचें अन्नसत्र आहे त्यास अन्नादि दानाविषयीं अशौच नाहीं. प्रतिग्रह करणाऱ्यास आमान्नग्रहणाविषयीं दोष नाहीं. पक्वान्नाचें भोजन केलें तर तीन रात्र दुग्धपानव्रत करावें. पूर्वीं ग्रहण केलेलें अनंतव्रतादिक, एकादशी इत्यादि व आरंभिलेलें कृच्छ्रादिव्रत यांविषयीं अशौच नाहीं. त्यांतही स्नानादिक शरीरसंबंधीं नियम स्वतः पाळावेत. अनंतपूजादिक दुसऱ्याकडून करवावें. ब्राह्मणभोजनादि करणें तें अशौचनिवृत्तीनंतर करावें. राजाला प्रजापालनासाठीं अशौच नाहीं. ऋत्विजांस मधुपर्कपूजेनंतर त्या कर्माविषयीं अशौच नाहीं. यावरून आधान, पशुबंध इत्यादिक ज्या यज्ञांत मधुपर्कपूजा सांगितली नाहीं त्या यज्ञांत ऋत्विक् जरी ठरवला असला तरी त्यास टाकून दुसरा ऋत्विज करावा. यज्ञदीक्षा घेतलेल्यास दीक्षेची इष्टि झाल्यावर अवभृथ स्नानापर्यंत यज्ञकर्माविषयीं अशौच नाहीं. दीक्षित व ऋत्विक् यांनीं फक्त स्नान करावें. अवभृथाचे पूर्वीं अशौच नाहींच. अवभृथस्नान अशौचांत होत नाहीं, असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. कर्माची समाप्ति झाल्यावर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्रिरात्र अशौच धरावें. रोगभय व राजभय यांचा नाश करण्यासाठीं आरंभलेल्या शांतिकर्मांत अशौच नाहीं. ज्याचें कुटुंब क्षुधेनें पीडित झालें असेल त्यास प्रतिग्रहाविषयीं अशौच नाहीं. पुनः पुनः अध्ययन विसरणारांस वेदशास्त्रांच्या अध्ययनाविषयीं अधीताशौच नाहीं. वैद्यास नाडीस्पर्शाविषयीं अशौच नाहीं. श्राद्धाविषयीं तर पूर्वीं सांगितलेंच आहे. मूर्तीची अर्चा, चौल, उपनयन, विवाहादि उत्सव, तडागादिकांचा उत्सर्ग, कोटिहोम, तुलापुरुषदान, इत्यादि कर्मांविषयीं नांदीश्राद्ध झाल्यावर अशौच नाहीं. पूर्वीं संकल्पिलेला पुरश्चरणजप व अविच्छेदानें संकल्पिलेलें जें हरिवंशश्रवणादिक हीं एकदां आरंभिल्यावर मग अशौच नाहीं. कालादि नियमाचा अभाव असेल तर स्तोत्रपठन, हरिवंशश्रवण हीं वर्ज्य करावींत. हा सर्व अशौचाचा अपवाद अनन्यगतिक व रोगी यांविषयीं जाणावा, असें निर्णयसिंधु व नागोजीभट्टकृत अशौचनिर्णय यांत सांगितलें आहे. यावरून अनन्यगतिकत्व पाहूनच अशौचाचा अभाव योजावा. याबद्दल जें सांगायचें तें पूर्वार्धांत त्या त्या स्थलीं सांगितलेंच आहे.

केचित्तुव्रतेष्विददीक्षितानामृत्विजामरथोत्सवादीनांचस्वरूपतआरम्भत‍श्चावश्यकत्वादार्त्याद्यभावेप्याशौचाभावइत्याहुःकन्यायाऋतुशङ्कादिसंकटेमुहूर्तान्तराभावेकूष्माण्डहोमादिनाजाताशौचेविवाहारम्भोपिकार्यइत्युक्तम् विवाहादिषुनान्दीश्राद्धोत्तरमाशौचेपातेपूर्वसंकल्पितान्नमसगोत्रैर्दातव्यंभोक्तव्यंच दातारंभोक्तारंसिद्धान्नंचसूतकीनस्पृशेत् विवाहादौतदन्यत्रवाभुञ्जानेषु विप्रेषुदातुराशौचपातेपात्रस्थमन्यन्नंत्यक्त्वान्यगेहोदकाचान्ताःशुध्यन्तीत्यादि पूर्वार्धेउक्तम् एवंसहस्रभोजनादावपिपूर्वसंकल्पितान्नेषुज्ञेयम् पार्थिवशिवपूजायांनाशौचम् आशौचेसंध्याश्रौतस्मार्तहोमादिविषयेपूर्वार्धेउक्तम अग्नि-

समारोपप्रत्यवरोहावाशौचयोर्नकार्यौ तेन समारोपोत्तरमाशौचपातेपुनराधा-मेव समारोपप्रत्यवरोहयोरन्यकर्तृकत्वस्याशौचापवादस्यचाभावात् इदंबह्वृ-चानांद्वादशाहंहोमलोपेऽन्येषांत्र्यहंहोमलोपेएवपुनराधानंज्ञेयम् ग्रहणनिमित्त-केस्नानश्राद्धदानादौनाशौचम् कश्चित्स्नानमात्रंकार्यंनश्राद्धादीत्याहसंक्रान्ति-स्नानादावपिनाशौचम् नित्यकृत्येषुस्नानाचमनभोजननियमास्पृश्यस्पर्शनादि-नियमेषुनाशौचम् अन्यद्वैश्वदेवब्रह्मयज्ञदेवपूजादिनित्यंनैमित्तिकं काम्यंचा-शौचेषुनकार्यम् भोजनकालेआशौचापाकजननमरणश्रवणेमुखस्थंग्रासंत्यक्त्वा स्नायात् मुखस्थग्रासभक्षणेएकोपवासः सर्वान्नभोजनेत्रिरात्रोपवासः इतिकर्मत-आशौचसदसद्भावविचारः ॥

**कर्मतोपवादनिर्णय**—व्रतारंभ केला असतां जसें अशौच नाहीं, तद्वतच दीक्षित व ऋत्विज यांना, त्यांनीं पूर्वी आरंभिलेल्या उत्सवादिकांत—कृत्यस्वरूप व कृत्यारंभ यांवरून, आवश्यकता असल्यामुळें, पीडा वगैरे कांहीं नसतांही अशौच नाहीं, असें कित्येक ग्रंथकार सांगतात. कन्येला नहाण येण्या-सारख्या संकटप्रसंगीं, मुहूर्त नसतां कूष्मांडहोम करून सोयरांतही विवाहारंभ करावा असें म्हटलें आहे. विवाहविधींतल्या नान्दीश्राद्धानंतर अशौच असल्यास, पूर्वी संकल्पिलेलें अन्न परगोत्रांतल्यांनीं द्यावें व तें खावें पण तें देणाऱ्यास, खाणाऱ्यास किंवा तयार केलेल्या अन्नास सुतक्यानें स्पर्श करूं नये. विवाहकार्यांत अथवा अन्य प्रसंगीं ब्राह्मण जेवीत असतांना जर यजमानाला ( दात्याला ) सुतक समजलें, तर ( ब्राह्मणांनीं ) पानांतलें अन्न टाकून दुसऱ्याच्या घरांतल्या पाण्यानें आंचवलें असतां ब्राह्मण शुद्ध होतात ही गोष्ट पूर्वार्धांत सांगितलीच आहे. सहस्रभोजनांतल्या पूर्वसंक-ल्पित अन्नाबद्दलही असाच निर्णय समजावा. पार्थिव शिवाच्या पूजेला अशौच नाहीं. अशौचांतल्या—सन्ध्या व श्रौतस्मार्तहोम याबद्दल पूर्वी सांगितलेंच आहे. अग्निसमा-रोप व प्रत्यवरोह हीं अशौचांत करूं नयेत. समारोप केल्यावर अशौच समजल्यास पुनराधान करावें; कारण, समारोप व प्रत्यवरोह हीं दुसऱ्यांकडून करवूं नयेत असें असल्यानें त्याविषयीं अपवाद नाहीं. हें जें पुनराधान करणें तें—ऋग्वेद्यांचा बारा दिवस व इतर शाखीयांचा तीन दिवस होमलोप झाल्यासच करावें. ग्रहणनिमित्तक स्नान, श्राद्ध व दान याला अशौच नाहीं. रोजचें स्नान, आचमन, भोजन, नियम, अस्पृश्य-स्पर्शन यांच्या नियमांत अशौच नाहीं. वैश्वदेव, ब्रह्मयज्ञ व देवपूजा हीं जीं नित्यकर्में तीं व नैमित्तिक आणि काम्यकर्में हीं अशौचांत करूं नयेत. जेवीत असतांना जनना-शौच किंवा मृताशौच समजल्यास तोंडांतला घांस टाकून स्नान करावें. तोंडांतला घांस खाल्ल्यास एक उपास करावा व पानांतलें सर्व अन्न भक्षण केल्यास तीन रात्रीं उपास करावा असा हा कर्माशौचाचा निर्णय आहे.

अथद्रव्यतः पुष्पफलमूललवणमधुमांसशाकतृणकाष्ठोदकक्षीरदधिघृतौषध-तिलतद्विकारेक्षुतद्विकाराणांलाजादिभर्जितान्नस्यलड्डुकादीनांचाशौचिस्वामिका-नामाशौचिगृहस्थितानांचग्रहणेदोषोन आशौचिहस्तात्किमप्येतन्नग्राह्यम्

पण्येतुवणिजादेराशौचेपितद्धस्ताल्लवणादेरामान्नस्यचक्रयेनदोषः जलदधिलाजादिकंतुक्रयेणापितद्धस्तान्नग्राह्यम् ॥

**द्रव्यतोपवाद**—पुष्प, फल, मूल, लवण, मधु, मांस, शाक, तृण, काष्ठ, उदक, दूध, दहीं, घृत, औषध, तिल व त्याचे विकार (तेल इत्यादि), ऊंस व त्याचे विकार (गूळ, काकवी इ०), लाह्या इत्यादि भाजलेलें अन्न व लाडू इत्यादिक पदार्थ अशौची–स्वामीचे व अशौचीयाचे घरांतील ग्रहण करण्यास दोष नाहीं. अशौचीयाचे हातांतून कोणतेही पदार्थ ग्रहण करूं नयेत, पण बाजारांत दुकानदार इत्यादिकांस अशौच असलें तरी त्यांचे हातून लवणादिक आमान्न विकत घेण्याविषयीं जरी दोष नाहीं, तरी उदक, दहीं, लाह्या, इत्यादिक पदार्थ त्याच्या हातून किंमत देऊनही घेऊं नयेत.

अथमृतदोषतः शास्त्रानुज्ञांविनाशस्त्राग्निविषजलपाषाणभृगुपातानशनादिभिर्बुद्धिपूर्वकंस्वेच्छयात्मघातकानांनाशौचम् तच्चात्मघातनंक्रोधात्परोद्देशेनवास्तुस्वतएवेष्टसाधनताभ्रमेणवा तथाचौर्यादिदोषेराजहतानांपारदार्येतत्पत्यादिहतानांविद्युद्धतानांचनाशौचम् अन्यैर्निषिद्धोपिगर्वान्नदीतरणवृक्षाधिरोहादौप्रवृत्तोमृतस्तस्यापिनाशौचम् योगवादिहरणार्थंतद्धननार्थंवा प्रवृत्तोगोसर्पनखिशृङ्गिदंष्ट्रिगजचोरविप्रान्त्यजादिभिर्हतस्तस्यानाशौचम् महापातकिनांतत्संसर्गिणांचमहापापितुल्यानांचपतितानांनपुंसकानांचमरणे नाशौचम् स्त्रीणांचपत्यादिहन्त्रीणांहीनजातिगामिनीनांगर्भघ्नीनांकुलटानांयपूर्वोक्तात्मघातादिपापयुक्तानांचमृतौनाशौचम्तत्रैषांशवानांस्पर्शाश्रुपातवहनदहनान्त्यकर्माणिनकुर्यात् स्पर्शादिकरणेज्ञानाज्ञानाभ्यासादितारतम्येनकृच्छ्रातिकृच्छ्रसांतपनचान्द्रायणादिप्रायश्चित्तानिसिन्ध्वादिग्रन्थान्तरतोज्ञेयानि तेनैषांमृतदेहस्यजलेप्रक्षेपः ततःसंवत्सरोत्तरंपुत्रादिस्तदीयात्मघातादिपापानुसारेणप्रायश्चित्तंतस्यकृत्वानारायणबलिंचकृत्वापर्णशरदाहादिपूर्वकमाशौचमौर्ध्वदेहिकंचकुर्यात् केचित्प्रेतशरीरंदग्ध्वादाहनिमित्तंचान्द्रायणत्रयंकृत्वाऽस्थीनिसंस्थाप्याब्दान्तेपूर्वोक्तरीत्यौर्ध्वदेहिकमित्याहुः ॥

**मृतदोषोपवाद**—शास्त्रानुज्ञेवांचून शस्त्र, अग्नि, विष, उदक, पाषाण, भृगुपात (पर्वताचे कड्यावरून खालीं उडी टाकणें), उपोषण, इत्यादिकांनीं बुद्धिपूर्वक स्वेच्छेनें आत्महत्या करून मरण पावलेल्यांचें अशौच नाहीं. मग ती आत्महत्या क्रोधानें किंवा दुसऱ्याच्या उद्देशानें अथवा स्वतःचें इष्टसाधन होईल अशा भ्रमानें कां झाली असेना. त्याचप्रमाणें चोरी इत्यादि दोषांसाठीं राजानें मारलेले, परस्त्रीलंपट झाल्यामुळें त्या स्त्रीचा पति इत्यादिकानें मारलेले व वीज पडून मेलेले यांचें अशौच नाहीं. दुसऱ्यानें निषेध केला असतांही गर्वानें नदींत पोहून, वृक्षावर चढून व विहीर इत्यादिकांत उतरून जो मरण पावला असेल त्याचेंही अशौच नाहीं. गाई इत्यादि चोरण्याकरितां किंवा गाई मारण्यास प्रवृत्त झालेला असा गाई, साप, व्याघ्रादिक नखी, वृषभादिक शृंगी, सूकरादि दंष्ट्री, हत्ती, चोर, ब्राह्मण व

चांडाल इत्यादिकांनीं मारला गेला तर त्याचें अशौच नाहीं. महापातकी, महापाप्यांचे संसर्गी, महापाप्यांचे बरोबरीचे पापी पतित व नपुंसक हे मरण पावले असतां त्यांचें अशौच नाहीं. पतिहत्या करणाऱ्या, हीनजातींशीं गमन करणाऱ्या, कुलटा व गर्भहत्या करणाऱ्या, पूर्वोक्त आत्महत्यादि पातकें करणाऱ्या अशा स्त्रिया मरण पावल्यास त्यांचें अशौच नाहीं. त्यांच्या प्रेतांस स्पर्श करणें, रडणें, वाहणें, दहन व अंत्यकर्म हीं करूं नयेत. जाणून न जाणून व अभ्यास असतां तारतम्यानें तशा शवास स्पर्श केल्यास कृच्छ्र, अतिकृच्छ्र, सांतपन, चांद्रायण, इत्यादि प्रायश्चित्तें निर्णयसिंधु इत्यादि ग्रंथांतून जाणावीत. यावरून असें सिद्ध होतें कीं, त्यांचीं प्रेतें उदकांत टाकावींत. एक वर्षानंतर त्यांचीं आत्महत्यादिक जशीं पातकें असतील त्याप्रमाणें त्यांचें पुत्रानें प्रायश्चित्त करून व नारायणबली करून पर्णशरविधीनें दहनपूर्वक अशौच व अंत्यकर्म करावें, प्रेतशरीराचें दहन करून दहननिमित्तक २ चांद्रायणें करावींत. आणि एक वर्षानंतर पूर्वोक्तरीतीनें, ठेवलेल्या अस्थींचें अंत्यकर्म करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात.

अथवालौकिकाग्निनातूष्णींदग्ध्वास्वजीवनसंदेहाद्वाभक्त्यावा पुत्रादयः संवत्सरादर्वागपितत्तदात्मघातादिपापोक्तद्विगुणप्रायश्चित्तपूर्वकंनारायणबलिंकृत्वापर्णशरदाहमस्थिदाहंवाकृत्वाशौचमौर्ध्वदेहिकंचकुर्युः इदंचप्रायश्चिताहाणामेव प्रायश्चित्तामर्हाणांघटस्फोटेनबहिष्कृतानांचदासीद्वारापतितोदकविध्यनन्तरंसपिण्डीकरणवर्जमौर्ध्वदेहिकम् तेनसांवत्सरिकमप्येकोद्दिष्टविधिनैव यद्वात्मघातिनांपुत्रादिर्मृतजातीयवधोक्तब्रह्महत्यादिप्रायश्चित्तसहितंचान्द्रायणंतप्तकृच्छ्रद्वयंचकृत्वानारायणबलिपूर्वकंतंदहेत्तथाचात्मघातिनांगोगजव्याघ्रादिहेतुकदुर्मरणवतांचपतितादीनांचपूर्वोक्तानांसर्वेषांनभमरणदिनादारभ्याशौचंकिंतुतत्तत्प्रायश्चित्तनारायणबलिपूर्वकसमन्त्रकदाहदिनमारभ्यैवाशौचम् जलाग्न्यादिभिःप्रमादमृतानांतुमरणदिनादारभ्याशौचादिकमस्त्येव तच्चत्रिरात्रमितिकेचित् दशाहमितिबहवः किंतुप्रमादमरणस्यापिदुर्मरणत्वात्तन्निमित्तप्रायश्चितपूर्वकमेवदाहादिकार्यम् तदुक्तंस्मृत्यर्थसारे चण्डालगोब्राह्मणचोरपशुदंष्ट्रिसर्पाग्न्युदकादिभिःप्रमादान्मरणेचान्द्रायणंतप्तकृच्छ्रद्वयंचतत्प्रायश्चित्तंकृत्वापञ्चदशकृच्छ्राणिवाप्रायश्चित्तंकृत्वाविधिवद्दहनाशौचोदकदानादिसर्वकार्यमेवेति प्राणान्तिकप्रायश्चित्तेनमृतस्यदशाहमाशौचंसर्वाणिप्रेतकर्माणिचकर्तव्यानि प्रायश्चित्तेनतस्यशुद्धत्वात् एवमारब्धप्रायश्चित्तस्यप्रायश्चित्तमध्येमरणेपिशुद्धत्वादिकंज्ञेयम् ॥

**आत्महत्यादोषापवाद**—लौकिकाग्नीनें अमंत्रक दहन करून आपण (पुत्रादि अधिकारी) जगूं किंवा नाहीं या संशयानें किंवा भक्तीनें पुत्रादिकांनीं वर्षापूर्वींही त्या त्या आत्महत्यादि पातकास उक्त प्रायश्चित्ताचे दुप्पट प्रायश्चित्तपूर्वक पर्णशरदहन किंवा अस्थिदहन करून अशौच व अंत्यकर्म

करावें. हा निर्णय प्रायश्चित्तास योग्य असणारांविषयींच आहे. प्रायश्चित्तास अयोग्य असणारांचा व घटस्फोट करून बहिष्कृत झालेल्यांचा दासीकडून पतितोदकविधि केल्यावर त्यांचें सपिंडीविरहित और्ध्वदेहिक कर्म करावें. यावरून त्यांचें सांवत्सरिक श्राद्धही एकोद्दिष्टविधीनेंच करावें असें सिद्ध होतें. अथवा आत्महत्या करून मेलेल्यांच्या पुत्रादिकांनीं मृताचे जातीचे वधाविषयीं उक्त असलेलें ब्रह्महत्यादिकांचे प्रायश्चित्तासह चांद्रायण व दोन तप्तकृच्छ्र असें प्रायश्चित्त करून नारायणबलिपूर्वक त्याचें दहन करावें. तसेंच आत्महत्येनें मरण पावलेले, गाई, हत्ती, व्याघ्र इत्यादि निमित्तक दुर्मरणानें मेलेले व पूर्वोक्त पतितादिक या सर्वांचें मरणदिवसापासून अशौच नसून, तें तें प्रायश्चित्त व नारायणबलिपूर्वक समंत्रक दहन ज्या दिवशीं होईल त्या दिवसापासूनच धरावें. उदक, अग्नि, इत्यादिकानें असावधपणानें मरण पावल्यास त्यांचें अशौच मरणदिवसापासूनच आहे व तें त्रिरात्र आहे असें कोणी ग्रंथकार म्हणतात तर दहा दिवस आहे असें बहुत ग्रंथकार म्हणतात. असावधपणानें मरणें हेंही दुर्मरणच आहे म्हणून तन्निमित्तक प्रायश्चित्त पूर्वी करूनच दहनादिक करावें. तें प्रायश्चित्त स्मृत्यर्थसारग्रंथांत जें सांगितलें आहे, तें असेंः——चांडाल, गाई, ब्राह्मण, चोर, पशु, दंष्ट्री, सर्प, अग्नि, उदक इत्यादिकानें असावधपणानें मरण प्राप्त झाल्यास चांद्रायण व २ तप्तकृच्छ्र असें प्रायश्चित्त करून, अथवा पंधरा कृच्छ्र प्रायश्चित्तें करून यथाविध दहन, अशौच व उदकदान इत्यादि सर्व कर्म करावेंच. प्राणांतिक प्रायश्चित्तानें मरण पावलेल्याचें दहा दिवस अशौच व सर्व प्रेतकार्येंही करावींत. कारण, तो प्रायश्चित्तानें शुद्ध झालेला आहे. याप्रमाणेंच ज्यानें प्रायश्चित्त आरंभिलें आहे अशा मनुष्यास प्रायश्चित्तांतच जर मरण आलें तर तो शुद्ध आहे असें जाणावें.

**आहिताग्नेस्तुपतितादेर्मरणेदर्पादिनाचाण्डालशृङ्गिचोरादिहेतुकेचमरणेविशेषः त्रेताग्नीन्प्रक्षिपेदप्सुआवसथ्यंचतुष्पथे। पात्राणितुदहेदग्नौसाग्निकेपापकर्मणि ततःप्रायश्चित्तार्हत्वानर्हत्वादिपूर्वोक्तव्यवस्थयानिर्मथ्याग्निनादाहाद्यन्तकर्मेति महापातकसंयुक्तःसाग्निकोयदिजीवति। पुत्रादिःपालयेदग्नीन्प्रायश्चित्तक्रियावधि १ प्रायश्चित्तंनकुर्याद्यःकुर्वन्वाम्रियतेयदि। जलेग्नीन्प्रक्षिपेदग्नौपात्राणितुजलेषुवा १ माधवीये आहिताग्नेर्दुर्मरणेप्यात्मघातेचतंलौकिकाग्निनातूष्णींदग्ध्वातदस्थीनिक्षीरेणप्रक्षाल्यतत्प्रायश्चित्तंकृत्वाश्रौताग्निभिः समन्त्रकंदाहादिकार्यमित्युक्तम् इदंनिरग्नेरपिदुर्मरणेयोज्यम् ॥**

**आहिताग्निपतितदहन**——साग्निक पापकर्मी झाल्यास दक्षिणाग्नि, गार्हपत्य व आहवनीय हे तीन अग्नि उदकांत टाकावे. गृह्याग्नि चवाठ्यावर टाकावा, व पात्रें अग्नींत दहन करावींत. नंतर प्रायश्चित्त, योग्यता, अयोग्यता इत्यादि पूर्वी सांगितलेल्या व्यवस्थेनें मंथनानें उत्पन्न केलेल्या अग्नीनें त्याचें दहन व अंत्यकर्म करावें. महापातकयुक्त साग्निक जिवंत असेल तर तो प्रायश्चित्त घेईपर्यंत पुत्रादिकानें त्याचे अग्नीचें रक्षण करावें. जो प्रायश्चित्त घेणार नाहीं किंवा

प्रायश्चित्त घेत असतां मरण पावेल त्याचे अग्नि जलांत टाकावे. पात्रें अग्नींत किंवा जलांत टाकावीं. दुर्मरण व आत्महत्या यांनीं आहिताग्नि मरण पावल्यास त्याचें लौकिकाग्नीनें अमंत्रक दहन करून त्याच्या अस्थि दुग्धानें प्रक्षालन कराव्या व त्याचें प्रायश्चित्त केल्यावर श्रौताग्नीनें समंत्रक दहनादि करावें, असें माधवाच्या ग्रंथांत सांगितलें आहे. निरग्निकांस दुर्मरण प्राप्त झाल्यासही हाच निर्णय योजावा.

अथसर्पहतेविशेषः प्रमादेनवादर्पादिनावासर्पेतोमृतावाशौचादिनकार्यम् वक्ष्यमाणंनागपूजाव्रतंकृत्वा नारयणबलिसौवर्णनागदानप्रत्यक्षगोदानानिकृत्वा दाहाशौचादिकार्यम् सर्वत्रदुर्मरणेपतितादिमरणेचतत्तत्प्रायश्चित्तादिकृत्वा-दाहाशौचादिकार्यमित्युक्तम् ॥

**सर्पदंशमृतविशेष**—असावधपणानें किंवा गर्वादिकांच्या योगानें सर्पापासून मरण प्राप्त झाल्यास अशौच धरूं नये. पुढें सांगण्यांत येणारें नागपूजाव्रत करून नारायणबलि, सुवर्णनागाचें दान व प्रत्यक्ष गोदान हीं करून, दहन, अशौच इत्यादि करावें. दुर्मरण व पतितादि मरण असतां तें तें प्रायश्चित्त करून दहन, अशौच इत्यादि करावें. असें सांगितलें आहे.

तत्रत्प्रायश्चित्तानिप्रसङ्गादुच्यंते। बुद्धिपूर्वकमात्मघातेनमृतानांत्रिंशत्कृच्छ्राणिप्रायश्चित्तंएतच्चजातिवधप्रायश्चित्तेनसमुच्चितंकार्यम्. तद्यथा ब्राह्मणेनात्मघातेकृतेद्वादशाब्दं ब्रह्महत्याप्रायश्चित्तंत्रिंशत्कृच्छ्रमात्मघातप्रायश्चित्तंचतत्पुत्रादिःकुर्यात् ब्राह्मणस्त्रियात्मघातेकृते ब्राह्मणस्त्रीवधप्रायश्चित्तंत्रिंशत्कृच्छ्राणिच एवंशूद्राद्यात्मघातेप्यूह्यम् अशक्तावात्मघातेचान्द्रायणद्वयंतप्तकृच्छ्रचतुष्कंच प्रमादेनजलादिमरणेपञ्चदशकृच्छ्राणि चान्द्रायणपूर्वकंतप्तकृच्छ्रद्वयंवा पतितमृतेषोडशकृच्छ्राणि ब्रह्महत्यादिपापिनांप्रायश्चित्तात्पूर्वंमरणेतत्तत्पापप्रायश्चित्तंपुत्रेणकार्यम् प्रायश्चित्तानर्हाणांतुपतितोदकदानविधिरेवनप्रायश्चित्तादीत्युक्तम् सिन्धौतुप्रायश्चित्तानर्हाणामपिपुत्रादिर्नारायणबलिपूर्वंसर्वमौर्ध्वदेहिकंसपिण्डीकरणंदर्शादिश्राद्धंगयादिश्राद्धंचकुर्यादेव एवंम्लेच्छीकृतस्यापि पतितोदकविधिरपुत्रविषयइत्युक्तम् इदमेवयुक्तम् ॥

**आत्महत्याप्रायश्चित्त**—बुद्धिपूर्वक आत्महत्या करून मरणाराविषयीं तीस कृच्छ्र प्रायश्चित्त. हें प्रायश्चित्त जातिवधाचे प्रायश्चित्तासह जें करावें, तें असें:—ब्राह्मणानें आत्महत्या केल्यास द्वादशाब्द असें ब्रह्महत्याप्रायश्चित्त व तीस कृच्छ्रें आत्महत्या प्रायश्चित्त, अशीं दोन प्रायश्चित्तें त्याच्या पुत्रांनीं करावींत. ब्राह्मणस्त्रीनें आत्महत्या केल्यास ब्राह्मणस्त्रीवधाचें प्रायश्चित्त व तीस कृच्छ्र हीं करावींत. याप्रमाणेंच शूद्रादिकानें आत्महत्या केली असतांही जाणावें. आत्महत्या केली असतां पूर्वोक्त प्रायश्चित्तें करण्यास सामर्थ्य नसेल तर दोन चांद्रायणें व चार तप्त कृच्छ्रें हीं करावींत. असावधपणानें जलादिकापासून मरण आल्यास पंधरा कृच्छ्र किंवा चांद्रायणपूर्वक दोन तप्त कृच्छ्रें करावींत. पतित मृत असतां सोळा कृच्छ्रें.

ब्रह्महत्यादि पातक्यांस प्रायश्चित्तापूर्वी मरण आल्यास त्या त्या पापाचें प्रायश्चित्त पुत्रानें करावें. प्रायश्चित्तास अयोग्य असणारांचा पतितोदकविधिच करावा, प्रायश्चित्तादि करूं नये, असें सांगितलें आहे. प्रायश्चित्तास अयोग्य असले तरी त्यांचे पुत्रादिकांनीं नारायणबलिपूर्वक सर्व अंत्यकर्म, सपिंडीकरण, दर्शश्राद्ध व गयादिश्राद्ध हीं करावींच, असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें म्लेंच्छ झालेल्याचेंही पूर्वोक्त सर्व कर्म करावें. पतितोदकविधि जो सांगितला तो अपुत्रविषयक आहे, असें जें सांगितलें आहे, योग्य आहे.

यस्तुकिंचित्कालंम्लेंच्छीकृतःप्रायश्चित्तार्हस्तस्यषोडशकृच्छ्रादिप्रायश्चित्तंपुत्रेण कृत्वापर्णशरदाहादिकार्यम् प्रमादमरणभिन्नेषुचौर्यपारदार्यादिहेतुकेषुदुर्मरणेषु-चान्द्रायणद्वयंतप्तकृच्छ्रंवेत्याकरतोविचार्ययोज्यम् किंचव्याघ्रादिहेतुकदुर्मरणेषु-शातातपोक्तदानादिविधिरपिकार्यः तथाहि व्याघ्रहतेविप्रकन्याविवाहदानम् गजहतेचतुर्निष्कपरिमितहेमनिर्मितगजदानम् राजहतेसौवर्णपुरुषदानम् चोर-हतेप्रत्यक्षधेनुदानम् वैरिहतेवृषदानम् वृषभेणहतेयथाशक्तिहेमदानम् शय्या-यांचमृतेदेयाशय्यातूलीसमन्विता निष्कहेमनिर्मितविष्णुप्रतिमाधिष्ठिताच शौचहीनमरणेद्विनिष्कहैमविष्णुदानम् संस्कारहीनेमरणविप्रपुत्रोपनयनम् अश्व-हतेनिष्कत्रयहेमकृताश्वदानम् शुनाहतेक्षेत्रपालस्थापनम् सूकरहतेमहिषदानम् कृमिभिर्हतेपञ्चखारीमितगोधूमदानम् वृक्षहतेवस्त्रयुतसौवर्णवृक्षदानम् शृङ्गिणा-हतेवस्त्रयुतवृषभदानम् शकटहतेसोपस्करंकिंचितद्रव्यदानम् भृगुपातमृतेधान्य-पर्वतदानम् अग्निनामृतेउदपानोत्सर्गविधिः काष्ठहतेधर्मार्थसभाकरणम् शस्त्र-हतेमहिषीदानम् अश्महतेसवत्सपयस्विन्यागोर्दानम् विषेणहतेहेमनिर्मितपृथ्वी-दानम् उद्बन्धनेनमृतेहेमकपिदानम् जलेमृतेद्विनिष्कहेमनिर्मितवरुणदानम् विषू-चिकामृतेस्वाद्वन्नेनशतविप्रभोजनम् कण्ठस्थितकवलस्यमरणे घृतधेनुदानम् कासरोगमृतेऽष्टकृच्छ्राणि अतिसारमृतेलक्षगायत्रीजपःशाकिन्यादिग्रहैर्मृतेरुद्रै-कादशिनीजपः विद्युत्पातमृतेविद्यादानम् अन्तरिक्षमृतेवेदपारायणम् पतिते-मृतेषोडशकृच्छ्राणि अस्पृश्यस्पर्शयुक्तमरणेसच्छास्त्रपुस्तकदानमित्यादि ॥

**पतितादिकमृतदहनप्रायश्चित्त**—जो मनुष्य कांहीं काल म्लेंच्छ झालेला असून प्रायश्चित्तास योग्य असेल त्याचे सोळा कृच्छ्र इत्यादि प्रायाश्चित्त पुत्रानें करून पलाशविधीनें दहनादिक करावें. प्रमादमरणावांचून चौर्य, परस्त्रीगमन, इत्यादि कारणांवरून आलेल्या दुर्मरणाविषयीं दोन चांद्रायणें किंवा तप्तकृच्छ्र अशीं प्रायश्चित्तें मोठ्या ग्रंथांतून पाहून योजावींत. व्याघ्रादिकापासून झालेल्या दुर्मरणाविषयीं शातातपानें सांगितलेला जो दानादिक विधि करावा, तो असाः—व्याघ्रानें मारल्यास ब्राह्मणकन्येचा विवाह करावा. हत्तीनें मारला गेल्यास चार निष्क सुवर्णाचा हत्ती करून त्याचें दान करावें. राजानें मारल्यास सुवर्णपुरुष करून त्याचें दान करावें. चोरानें मारल्यास प्रत्यक्ष धनदान करावें. शत्रूनें मारल्यास वृषभदान करावें. वृषभानें मारल्यास यथाशक्ति सुवर्णदान करावें. शय्येवर मृत

झाल्यास निष्क सुवर्णाची विष्णुमूर्ति करून ती शय्येवर ठेवून गादीसहित शय्या दान करावी. अशौचावस्थेंत मरण आल्यास दोन निष्क सुवर्णाचे विष्णुमूर्तीचें दान करावें. संस्कारहीन मरण आल्यास ब्राह्मणाचे पुत्राची मुंज करावी. अश्वानें मारल्यास तीन निष्क सुवर्णाचा अश्व करून त्याचें दान करावें. कुत्र्यानें मारल्यास क्षेत्रपालाची स्थापना करावी. डुकरानें मारल्यास महिषाचें दान करावें. कीटकांनीं मारल्यास पांच खारी परिमित गव्हाचें दान करावें. वृक्षानें मरण पावल्यास वस्त्रसहित सुवर्ण-वृक्षाचें दान करावें. शृंगयुक्त पशूनें मारल्यास वस्त्रयुक्त वृषभाचें दान करावें. गाडीनें मरण पावल्यास उपस्करयुक्त किंचित् द्रव्याचें दान करावें. कड्यावरून पडून मेल्यास धान्यपर्वताचें (धान्याचा राशि) दान करावें. अग्नीनें मरण पावल्यास विहीर, तलाव इत्यादिकांचा उत्सर्गविधि करावा. काष्ठानें मरण पावल्यास धर्मशाळा बांधावी. शस्त्रानें मेल्यास महिषीदान करावें. पाषाणानें मृत झाल्यास सवत्स दुभत्या गाईचें दान करावें. विषानें मरण पावल्यास सुवर्णाची पृथ्वी करून तिचें दान करावें. गळफांसानें मेल्यास सुवर्णमय वानराचें दान करावें. जलांत मरण पावल्यास दोन निष्क सुवर्णाची वरुणमूर्ति करून तिचें दान करावें. मोडशीनें मेल्यास मधुसन्नानें शंभर ब्राह्मणांस भोजन घालावें. घशांत घास अडकून मेल्यास घृतधेनूचें दान करावें. खोकल्यानें मेल्यास आठ कृच्छ्रें करावीं. अतिसारानें मेल्यास लक्ष गायत्रीजप करावा. शाकिनी इत्यादि ग्रहांच्या पीडेनें मेल्यास रुद्रैकादशिनीचा जप करावा. वीज पडून मेल्यास विद्यादान करावें. अंतरिक्षमृत असतां वेदाचें पारायण करावें. पतित होऊन मरण पावल्यास सोळा कृच्छ्रें करावीं. अस्पृश्यास स्पर्श करून मरण पावल्यास सच्छास्त्राच्या पुस्तकाचें दान करावें.

अत्रशय्यामरणेशौचहीनसंस्कराहीनमरणेकृमिविषूचिकाकण्ठकवलकासातिसाररोगग्रहणैर्मरणेन्तरिक्षमृतेऽस्पृश्यस्पर्शमरणेचदानादिविधिरेवनप्रायश्चित्तंनैवनारायणबलिर्नापिवर्षादिकालप्रतीक्षा व्याघ्रादिहेतुकंविषजलशस्त्रादिहेतुकंचमरणंप्रमादेनदर्पादिनाबुद्ध्याचेत्यनेकधासंभवति तत्रोक्तव्यवस्थयाप्रायश्चित्तंनारायणबलिर्दानादिविधिश्चेतित्रयाणांसमुच्चयः यदिपुत्रादिःपितुर्जलादिदुर्मरणप्रायश्चित्तंब्रह्महत्यादितत्तत्पापप्रायश्चित्तंवात्मघातप्रायश्चित्तंवाकर्तुं नशक्नोति तदोक्तदानादिविधिंनारायणबलिंचकृत्वाऽत्यशक्तौनारायणबलिमात्रंकृत्वौर्ध्वदेहिकंकुर्यात् तावतापुत्रादिसपिण्डानांशुद्धिसिद्धेः पित्रादेस्तुपुत्रादिभिस्तत्तत्प्रायश्चित्ताकरणेनरकादिभोगःस्यादेवेतिबोध्यम् ॥

**अन्यकारणमरणप्रायश्चित्त**—शय्यामरण, शौचहीन व संस्कारहीन मरण, कीटक, मोडशी, घशांत घांस अडकणें, खोकला, अतिसार, शाकिनी ग्रहांची पीडा, अंतरिक्ष व अस्पृश्यस्पर्श यांपासून आलेल्या मरणाबद्दल दानादि विधिच करावा. प्रायश्चित्त, नारायणबलि, किंवा वर्षादि कालाची प्रतीक्षा हीं करूं नयेत. व्याघ्रादिक विष, उदक व शस्त्रादिक यांपासून आलेलें मरण, असावधपणानें गर्वादिकानें व बुद्धिपूर्वक असें जें अनेक प्रकारांनीं मरण संभवतें, त्यांत पूर्वोक्त

व्यवस्थेनें प्रायश्चित्त, नारायणबलि व दानादि विधि याप्रमाणें तीन करावीत. पित्याचे उदकादि दुर्मरणाचें प्रायश्चित्त, किंवा ब्रह्महत्यादि पापाचें प्रायश्चित्त किंवा आत्महत्येचें प्रायश्चित्त करण्यास जर पुत्र समर्थ नसेल तर पूर्वोक्त दानादि विधि व नारायणबलि हीं दोन करून व अत्यंत असामर्थ्य असेल तर फक्त नारायणबलि तेवढाच करून अंत्यकर्म करावें. कारण तेवढें केल्यानें पुत्रादि सपिंड शुद्ध होतात. पुत्रांनीं तें तें प्रायश्चित्त जरी केलें तरी पित्यास नरकादि भोग प्राप्त होतातच, असें जाणावें.

**अथविधिविहितजलादिमरणे तत्रप्रयागेसर्ववर्णानांरोगिणामरोगिणांच-भागीरथीप्रवेशादिनामरणेकामिकमहाफलम्‌ शूद्रस्यारोगिणोपिप्रयागभिन्ने-पिमरणमनुज्ञातम्‌ व्याधितोभिषजात्यक्तोविप्रोवृद्धोथवायुवा। तनुंत्यजेज्जला-ग्न्याद्यैःसयथेष्टफलंलभेत्‌ ॥ १ ॥ दुश्चिकित्स्यैर्महारोगैःपीडितोजीवनाक्षमः । प्रविशेज्ज्वलनंदीप्तंकरोत्यनशनंतथा ॥२॥ अगाधतोयराशिंचभृगोःपतनमेवच । गच्छेन्महापथंवापितुषारगिरिमादरात्‌ ॥ ३ ॥ प्रयागवटशाखाग्राद्देहत्यागं-करोतिच । उत्तमान्प्राप्नुयाल्लोकान्नात्मघातीभवेत्क्वचित्‌ ॥ ४ ॥ नराणामथ-नारीणांसर्ववर्णेषु सर्वदा । आशौचंस्यात्त्र्यहंतेषांवज्रानलहतेतथा ॥५॥ वाराण-स्यांम्रियेद्यस्तुप्रत्याख्यातभिषक्क्रियः । काष्ठपाषाणमध्यस्थोजाह्नवीजल-मध्यगः ॥६॥ अविमुक्तोन्मुखस्तस्यकर्णमूलगतोहरः । प्रणवंतारकंब्रूतेइत्यादि-वचनोच्चयः ॥ ७ ॥ पुराणस्थोमाधवादिनिबन्धेषूद्युदाहृतः । अत्रानुज्ञातेबुद्धि-पूर्वकात्मघातेगृहस्थादीनामेवाधिकारः यतेस्तुनाधिकारः त्र्यहाद्याशौचविधानात्‌ यतेःकाम्यकर्मण्यनधिकाराच्चेतिनिर्णयसिन्धुः ॥**

**विधिविहित जलसमाधिनिर्णय**—रोगी व निरोगी अशा सर्व वर्णांस प्रयाग-क्षेत्रीं भागीरथींत प्रवेश (जलसमाधि) केल्यानें मरण प्राप्त झाल्यास इच्छित फल मिळतें. शूद्र रोगी नसला तरी त्यास प्रयागावांचून अन्य उदकादिकांतही मरण विहित आहे. व्याधिष्ठ व वैद्यानें टाकिलेला असा ब्राह्मण वृद्ध असो वा तरुण असो, तो जर जल, अग्नि इत्यादि साधनांनीं देह विसर्जन करील तर त्यास यथेष्ट फल मिळेल. चिकित्सा करण्यास अशक्य अशा महारोगांनीं पीडलेला व म्हणून वांचण्यास असमर्थ झालेल्या मनुष्यानें प्रदीप्त अग्नींत प्रवेश करावा, उपोषण करावें, खोल उदकाच्या डोहांत प्रवेश करावा किंवा उंच कड्या-वरून उडी टाकावी, उत्तरयात्रा करावी किंवा आदरानें हिमालयास जावें. प्रयाग-क्षेत्रीं वटवृक्षाचे शाखांवरून जो भागीरथींत देहत्याग करितो तो आत्मघाती होत नाहीं व त्यास उत्तम लोक प्राप्त होतात. याप्रमाणें देहत्याग करणारे सर्व वर्णांतील पुरुष व स्त्रिया व विजेनें मेलेले यांचें तीन दिवस अशौच धरावें. असाध्य झाल्यामुळें औषधोपचार बंद केले असतां जान्हवीचे उदकाच्या मध्यभागीं राहून किंवा काष्ठ व पाषाण यांत असतां जो वाराणशी क्षेत्रांत मरण पावतो व काशीस जाण्याविषयीं जो उत्सुक असतो त्याच्या कानांत विश्वेश्वर तारक प्रणवाचा उपदेश करतो, इत्यादि पुराणांतील वाक्यें माधवादिकांचे ग्रंथांत सांगितलीं आहेत. येथें शास्त्रानें अनुज्ञात

जी बुद्धिपूर्वक आत्महत्या तिजविषयीं गृहस्थादिकांसच अधिकार आहे, संन्याशादिकांस अधिकार नाहीं. कारण, या अशौचाचें विधान तीन दिवसांचें केलें आहे, व संन्याशास काम्यकर्माचा अधिकार नाहीं, असें निर्णयसिंधूंत म्हटलें आहे.

इदानींतुनशिष्टास्तुरोगादिपीडांसोढुमशक्तौसंन्यासाश्रमंगृहीत्वातीर्थादिनात्मघातंकुर्वन्ति गृहस्थविधुरादयश्चनकुर्वन्ति केचित्त्वपरिहार्यरोगादिग्रस्तवृद्धादेर्जलादिनाबुद्ध्यात्मघातःकलौप्रयागभिन्नदेशेनभवति भृग्वग्निपतनैश्चैववृद्धादिमरणंतथेतिकलिवर्ज्येषुपरिगणनादित्याहुः एतन्मतेमरणान्तप्रायश्चित्तविधयः काशीखण्डादौविप्रादेर्देहत्यागविधयश्चयुगान्तरपराः प्रयागमरणंस्त्रीणांसगमनंचकलियुगेसर्वसंमतम् अत्रसर्वत्रसहगमनभिन्नेविधिवाक्यानुज्ञातेदेहत्यागेत्रिरात्रमाशौचमितिबहवः दशाहमितिकेचित् एवंफलकामनयाविहितेकाम्यप्रयागमरणेपिपक्षद्वयंज्ञेयम् ॥

**फलेच्छाकामनिकमरण**—रोगादिकांची पीडा सहन करण्यास असमर्थ झाले असतां सध्यां शिष्टजन संन्यासाश्रम घेऊन तीर्थादि साधनानें आत्महत्या करितात. गृहस्थाश्रमी विधुर करीत नाहींत. अपरिहार्य रोगानें ग्रस्त झालेल्या वृद्धादिकांची जलादि साधनानें बुद्धिपूर्वक आत्महत्या कलियुगांत प्रयागावांचून अन्यत्र होत नाहीं. कारण भृगु, अग्नि, इत्यादिकांचे ठायीं जीं पतनें त्यांनीं वृद्धादिकांचें मरण कलिवर्ज्यांत परिगणन (मोजदाद) केलें आहे, असें कोणी ग्रंथकार म्हणतात. या मतानें मरणान्तप्रायश्चित्तविधि व काशीखंड इत्यादि ग्रंथांत ब्राह्मणांस सांगितलेले देहत्यागविधि हे अन्य युगपर होत. प्रयागमरण व स्त्रियांचें सहगमन हीं कलियुगांत सर्वसंमत आहेत. सहगमनाशिवाय इतर जो विधिवाक्यानुसार देहत्याग, त्याविषयीं त्रिरात्र अशौच आहे, असें पुष्कळ ग्रंथकार म्हणतात व दहा दिवस असल्याचेंही कांहीं ग्रंथकार सांगतात. याप्रमाणें फलेच्छेनें विहित कामनिक प्रयागमरणाविषयींही दोन पक्ष जाणावे.

अथयःपतितोघटस्फोटेनबहिष्कृतोयश्चम्लेच्छीकृतोयश्चप्रायश्चित्तानर्हपापी तस्यत्रिविधस्यपितृमातृभिन्नस्यपतितोदकविध्यनन्तरंसपिण्डीकरणवर्ज्यमन्त्यकर्मपितुर्मातुश्चत्रिविधस्यापिनारायणबलिपूर्वकंसपिण्डीकरणसहितंसर्वंभवतीत्युक्तम् तत्रपतितोदकदानविधिर्यथा सर्वगांदासीमाहूयतस्यैवेतनंदत्वाअशुद्धपूर्णघटहस्तांतांब्रूयात् हेदासिगच्छमूल्येनतिलान्तोयपूर्णमिमंघटंचशीघ्रमानय ततोदक्षिणामुखीउपविश्यवामपादेनतंघटंसतिलंक्षिप घटक्षेपणकालेचामुकसंज्ञकपतितप्रेतंपिबपिबेतिमुहुरुच्चारयेति सादासीतद्वाक्यंश्रुत्वामूल्यंगृहीत्वातथाकुर्यात् एवंकृतेपतिततृप्तिर्नान्यथा एतच्चपतितस्यमृतदिनेकार्यम् इतिपतितोदकविधिः इतिमृतदोषतआशौचापवादःसप्रसङ्गःसविस्तरोनिरूपितः ॥

**पतितोदकदानविधि**—घटस्फोट करून बहिष्कृत केलेला, म्लेंच्छ झालेला व प्रायश्चित्तास अयोग्य असलेला असे मातापित्याहून निराळे जे ३ प्रकारचे पापी त्यांचा पतितोदकविधि झाल्यावर सपिंडीकरण वर्ज्य

करून अंत्यकर्म व पिता, माता आणि तीन प्रकारचे पापी यांचेंही नारायणबलिपूर्वक व सपिंडीकरणासहित सर्व अंत्यकर्म होतें, असें जें सांगितलें आहे, त्यांतला पतितोदकदानाचा विधि असाः—सर्वांप्रत गमन करणारी अशी दासी बोलावून आणून तिला वेतन देऊन अशुद्ध जलानें भरलेला घट हातांत घेतलेल्या त्या दासीस असें म्हणावें कीं, हे दासि, जा, उदकानें भरलेला घट व तिल किंमत देऊन लवकर घेऊन ये. नंतर दक्षिणदिशेस सन्मुख बसून डाव्या पायानें तो घट तिलासहित ढकलून देवघट ढकलण्याच्या कालीं 'अमुकसंज्ञक पतितप्रेत पिबपिब' (अमुक नांवाच्या पतितप्रेता, प्राशन कर, प्राशन कर) असा वारंवार उच्चार कर. नंतर त्या दासीनें तें वाक्य श्रवण करून मूल्य घेऊन तसें करावें. असें केलें असतां पतिताची तृप्ति होते, नाहीं तर होत नाहीं. हा विधि पतिताचे मृत दिवशीं करावा. असा पतितोदकदानाचा विधि व त्याप्रमाणेंच मृतदोषानें अशौचाचा अपवाद हे प्रसंगासह व सविस्तर येथें निरूपण केले.

**अथविधानतः यतेर्मृतावाशौचंनास्ति तस्यप्रेतक्रियोदकदानाशौचसपिण्डीकरणादेर्निषिद्धत्वात् सपिण्डीस्थानएकादशेऽहनिपार्वणश्राद्धमात्रंकार्यम् प्रतिसांवत्सरिकश्राद्धदर्शश्राद्धादिकंतुपार्वणविधिनासपिण्डकंभवत्येव अत्रविस्तरोग्रन्थान्तरेवक्ष्यते एतच्चत्रिदण्डिनामेकदण्डिनांहंसपरमहंसादीनांसर्वेषामेवज्ञेयम् एवंवानप्रस्थमरणेपिनाशौचम् कृतजीवच्छ्राद्धेमृतेसपिण्डैराशौचादिकर्तव्यंनवेतिविकल्पः ब्रह्मचारिमृतौत्वाशौचमस्त्येव युद्धमृतेप्याशौचंनेतिसर्वग्रन्थेषूपलभ्यतेनत्वेवंब्राह्मणेषुशिष्टाचारः इतिपञ्चधाशौचापवादोनिरूपितः ॥**

**(५) विधानतोपवाद**—संन्यासी मरण पावल्यास अशौच नाहीं कारण त्याची प्रेतक्रिया, उदकदान, अशौच व सपिंडीकरण यांचा निषेध आहे. अकराव्या दिवशीं सपिंडीच्या ऐवजीं पार्वणश्राद्ध मात्र करावें. प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, दर्शश्राद्ध, इत्यादिक तर पार्वणविधीनें सपिंडक होतेंच. याचा विस्तार ग्रंथांतरीं सांगण्यांत येईल. हा निर्णय—त्रिदंडी संन्यासी, एकदंडी, हंस, परमहंस वगैरे सर्वांविषयीं जाणावा. याप्रमाणें वानप्रस्थ मरण पावला असतांही अशौच नाहीं. जिवंत असतां ज्यानें आपलीं श्राद्धें केलीं तो मरण पावल्यावर सपिंडांनीं त्याचें अशौच धरावें किंवा धरूं नये, असा विकल्प आहे. ब्रह्मचारी मरण पावल्यास अशौच आहेच. युद्धांत मरण पावल्यास अशौच नाहीं, असें सर्व ग्रंथांत आढळतें. पण ब्राह्मणांत मात्र तसा शिष्टाचार नाहीं. याप्रमाणें पांच प्रकारचा अशौचाचा अपवाद समजावा.

**अथजीवतोप्याशौचम् । यथापतितस्यघटस्फोटकालेसर्वसपिण्डानामेकाहमाशौचम् ॥**

**जीवन्ताशौच**—पतिताच्या घटस्फोटसमयीं सर्व सपिंडांस जिवंताचें एक दिवस अशौच आहे.

इत्याशौचंसापवादंयथामतिनिरूपितम् । समर्पितंरुक्मिणीशश्रीमद्विठ्ठलपादयोः १ इति सापवादाशौचप्रकरणम् ॥

**सापवादाशौचनिर्णयसमाप्ति**—याप्रमाणें अपवादासह अशौच यथामति निरूपण केलें तें रुक्मिणीपति श्रीविठ्ठलचरणीं समर्पित असो. याप्रमाणें अपवादासह अशौचप्रकरण येथें संपलें.

अथौर्ध्वदेहिकारम्भोपयोगिनारायणबल्यादिप्रकारउच्यते तत्रदुर्मरणेष्वात्मघातेजलादिभिः प्रमादमरणेपतितादिमरणेचपूर्वोक्तव्यवस्थयामुकगोत्रस्यामुकशर्मणोमुकदोषनाशार्थमौर्ध्वदेहिकेसंप्रदानत्वयोग्यतासिद्ध्यर्थममुकप्रायश्चित्तममुकदानंवाकरिष्यइत्यादिसंकल्पपूर्वकंतत्तत्प्रायश्चित्तंदानंचकार्यम् अशक्तौदानमेवकार्यम् ततोऽमुकगोत्रामुकशर्मणोमुकदुर्मरणदोषनाशार्थमौर्ध्वदेहिकप्रदानत्वयोग्यतासिद्ध्यर्थंनारायणबलिंकरिष्यइतिसंकल्प्य पूर्वार्धोक्तसंततिफलककाम्यनारायणबलिवत्सर्वंकुर्यात् एतत्तुवर्षान्तेकरणपक्षे सद्यःकरणपक्षेतुपूर्वोक्तद्विगुणप्रायश्चित्तंसंकल्प्यशुक्लैकादश्यादिकालमनपेक्ष्यैवसमनन्तरोक्तसंकल्पंकृत्वाविधिनास्थापितेकलशद्वयेहेमप्रतिमयोर्विष्णुंवैवस्वतंयमंचावाह्यपुरुषसूक्तेनयमायसोममितिचक्रमेणषोडशोपचारैःसंपूज्यतत्पूर्वभागेरेखायांदक्षिणाग्रकुशानास्तीर्यशुन्धन्तांविष्णुरूप्यमुकप्रेतइतिदशस्थानेष्वपोनिनीयमधुघृततिलमिश्रानोदनपिण्डान्दशामुकगोत्रामुकशर्मन्प्रेतविष्णुदैवतायंतेपिण्डइतिदक्षिणसंस्थान्प्राचीनावीतीत्यादिपैतृकधर्मेणदद्यात् गन्धादिभिरभ्यर्च्य प्रवाहणान्तंकृत्वानद्यांक्षिपेत् श्वःसद्योवापूर्वस्थापितंविष्णुमभ्यर्च्यैकंविप्रंविप्रालाभेदर्भबटौवा पादक्षालनादितृप्तिप्रश्नान्तंविष्णुरूपप्रेतावाहनपूर्वकंकृत्वाविप्रसमीपेतूष्णींरेखाःकृत्वा दर्भास्तरणेअपोनिनयनंचकृत्वा दर्भेषुसव्येनविष्णवेब्रह्मणेशिवायचसपरिवाराययमायचेतिचतुर्भ्यः पिण्डचतुष्टयंदत्वापसव्येन विष्णुरूपिप्रेतामुकगोत्रनामायंतेपिण्डइत्येकंपञ्चमंपिण्डंदत्वातथैवाभ्यर्च्य प्रवाहणान्तेविप्राचान्ततादिश्राद्धशेषसमापनान्तेप्रेतबुद्ध्याविप्रायवस्त्राभरणादिदत्वाविप्रेणप्रेतायतिलाञ्जलिंदापयेत् अमुकगोत्रायामुकशर्मणेविष्णुरूपिणेप्रेतायायंतिलतोयाञ्जलिरितिमन्त्रेण विप्रालाभे स्वयंदद्यात् ततोविप्रान्वाचयेत् अनेननारायणबलिकर्मणाभगवान्विष्णुरिममुकंप्रेतंशुद्धमपापमर्हंकरोत्वितिकाम्यप्रयोगेचास्मिन्प्रयोगेप्यसंकल्पेगोत्रोच्चारेचविशेषः स्पष्टएव पूर्वत्रकाश्यपगोत्रदेवदत्तप्रेतेत्याद्युच्चारः अत्रतुगोत्रनामज्ञानसत्वाद्दुर्मरणेनमृतस्ययन्नामगोत्रंतदेवोच्चारयेदितिसंकल्पेविशेषेपिहेतुःस्पष्टएवेति इतिदुर्मरणेऔर्ध्वदेहिकाधिकारार्थंनारायणबलेःप्रयोगः ॥

**और्ध्वदेहिकारम्भोपयोगी नारायणबलि**—दुर्मरणें, आत्महत्या, असावधपणानें मरणें, उदकादिकापासून मरणें व पतितादि मरणें, अशा प्रकारचीं मरणें असतां पूर्वोक्त व्यवस्थेनें "अमुकगोत्रस्यामुकशर्मणोऽमुकदोषनाशार्थमौर्ध्वदेहिके......करिष्ये" इत्यादि संकल्प करून

तें तें प्रायश्चित्त व दान करावें. प्रायश्चित्त करण्यास असमर्थ असल्यास दानच करावें. व नंतर 'अमुक गोत्रामुकशर्मणोमुकदुर्मरणदोषनाशार्थमौर्ध्वदेहिकप्रदानत्वयोग्यतासिद्ध्यर्थं नारायणबलिं करिष्ये' असा संकल्प करून पूर्वार्धांत सांगितलेला जो संततिफलक कामनिक नारायणबलि त्याचें सर्व कर्म करावें. वर्षांतीं करणें असल्यास असें करावें व तत्कालीं करणें असेल तर पूर्वीं सांगितल्याच्या दुप्पट प्रायश्चित्ताचा संकल्प करून शुक्ल पक्षांतील एकादशीची अपेक्षा न करितां लागलींच सांगितलेला संकल्प करून यथाविधि स्थापित केलेल्या दोन कलशांवर दोन सुवर्णप्रतिमा स्थापाव्या व त्या प्रतिमांवर विष्णु व वैवस्वतयम यांचें आवाहन करून पुरुषसूक्तानें व 'यमाय सोमं०' या मंत्रानें क्रमानें षोडशोपचारें पूजा करावी आणि त्याच्या पूर्वेस रेखेवर दक्षिण दिशेस अग्रें होतील असे दर्भ पसरून 'शुन्धन्तां विष्णुरूपी अमुक प्रेत' असें म्हणून दहा ठिकाणीं उदक द्यावें व मध, घृत व तिल मिश्र केलेले भाताचे दहा पिंड, 'अमुकगोत्राऽमुकशर्मप्रेत विष्णुदेवतायंतेपिंडः' असें म्हणून दक्षिणसंस्थ असें प्राचीनावीतीच्या पितृधर्मानें द्यावे. नंतर गंधादिक उपचारांनीं त्या पिंडांची पूजा करावी व पिंडप्रवाहनापर्यंत कर्म करून, ते पिंड नदींत टाकावे. दुसऱ्या दिवशीं किंवा तत्कालीं पूर्वीं स्थापिलेल्या विष्णूची पूजा करून एका ब्राह्मणाचे ठायीं किंवा ब्राह्मण न मिळेल तर दर्भवटूचे ठायीं विष्णुरूपी प्रेताचे पूर्वीं आवाहन करून पादप्रक्षालनापासून तृप्तिप्रश्नापर्यंतचें कर्म करावें. नंतर त्या ब्राह्मणाचे समीप रेखा काढून त्यावर दर्भ पसरावे व त्या दर्भांवर उदक देऊन त्यावर सव्यानें 'विष्णवे ब्रह्मणे शिवायच सपरिवाराय यमायच' असें म्हणून चौघांस चार पिंड द्यावे व अपसव्यानें 'विष्णुरूपीप्रेतामुकगोत्रनामायं ते पिंडः' असें म्हणून पांचवा पिंड द्यावा व तशीच पूजा करून पिंडप्रवाहनान्त कर्म केल्यावर, ब्राह्मणाचें आंचवणें इत्यादि श्राद्धशेषसमाप्तीपर्यंतचें कर्म झालें म्हणजे प्रेतबुद्धीनें ब्राह्मणांस वस्त्रें, आभरणें, इत्यादि देऊन, ब्राह्मणांकडून प्रेतास तिलांजलि देववावा. तिलांजलि देतांना 'अमुकगोत्रायामुकशर्मणे विष्णुरूपिणे प्रेताय तिलतोयांजलिः' असा मंत्र म्हणावा व ब्राह्मण न मिळाल्यास स्वतः द्यावा. नंतर 'अनेन नारायणबलिकर्मणा भगवान् विष्णुरिममुकं प्रेतं शुद्धमपापमर्हं करोतु' असें ब्राह्मणांकडून वदवावें. काम्यप्रयोगांत व या प्रयोगांत संकल्प व नामगोत्रांचा उच्चार यांविषयींचा विशेष प्रकार स्पष्टच आहे. पूर्वींच्या काम्यप्रयोगांत 'काश्यप गोत्र देवदत्त प्रेत' इत्यादि उच्चार करावा व या प्रयोगांत तर गोत्र व नाम यांचें ज्ञान असल्यामुळें दुर्मरणानें मृत झालेल्याचें जें नाम व गोत्र असेल तेंच उच्चारावें. याप्रमाणें संकल्पविशेषाविषयीं हेतु स्पष्टच आहे. याप्रमाणें दुर्मरण असतां अंत्यकर्मांच्या अधिकारासाठीं नारायणबलीचा प्रयोग कसा करावा तो सांगितला.

**अथसर्पहतेव्रतम्। प्रतिमासंशुक्लपञ्चम्यांउपवासंनक्तंवाकृत्वापिष्टमयंनागंपञ्चफणमनन्तवासुकिशङ्खपद्मकम्बलकर्कोटकाश्वतरधृतराष्ट्रशङ्खपालकालियतक्षककपिलेतिद्वादशनामभिर्द्वादशमासेषुसंपूज्यपायसेनविप्रान्संभोज्यवत्सरान्तेहेमनागंप्रत्यक्षांगांचदत्वानारायणबलिपूर्वकंदाहःशौचादिकंकार्यम् अथवा-**

नमोअस्तुसर्पेभ्यइतितिस्रआज्याहुतीर्जुहुयात् पञ्चम्यांपन्नगंहैमंस्वर्णेनैकेनकारयेत् । क्षीराज्यपात्रमध्यस्थंपूज्यविप्रायदापयेत् १प्रायश्चित्तमिदंप्रोक्तंनागदष्टस्यशंभुना । इति ततोनारायणबल्यादि ॥

**सर्पहतव्रत**—प्रत्येक मासांत शुक्ल पंचमीच्या दिवशीं उपोषण किंवा नक्त करून पांच फणा असलेला पिठाचा नाग करावा व अनंत, वासुकी, शंख, पद्म, कंबल, कर्कोटक, अश्वतर, धृतराष्ट्र, शंखपाल, कालिय, तक्षक व कपिल, याप्रमाणें बारा नांवांनीं बारा महिन्यांत पूजा करून पायसानें ब्राह्मणांस भोजन घालावें आणि वर्षांतीं सुवर्णनाग व प्रत्यक्ष गाय यांचें दान करून नारायणबलीनें दहन, अशौच, इत्यादिक करावें, अथवा 'नमो अस्तु सर्पेभ्यो०' या मंत्रानें तीन घृतांच्या आहुतींनीं होम करावा. पंचमीस ऐंशी गुंजा सुवर्णाचा नाग करून दूध व घृत यांनीं युक्त असलेल्या पात्रांत तो ठेवावा व त्याची पूजा करून तो ब्राह्मणांस द्यावा. नागदंशानें मृत झाला असतां हें प्रायश्चित्त शंभूनें सांगितलें आहे. हें केल्यानंतर नारायणबलीचा विधि करावा.

अथपालाशप्रतिकृतिदाहादिविधिः तत्रदेशान्तरमरणेपराकद्वयमष्टौकृच्छ्रान्वाकृत्वास्थीनिदहेत् अस्थ्नांचाण्डालश्वादिस्पर्शेपञ्चगव्योदकादिभिःप्रक्षाल्यदहेत् यस्यास्थीनिसर्वथानलभ्यन्तेतस्यपर्णशरदाहः कुर्याद्दर्भमयंप्रेतंकुशैस्त्रिशतषष्टिभिः । पालाशीभिःसमिद्भिर्वासंख्याचैवंप्रकीर्तिता १ तत्रभूमौकृष्णाजिनमास्तीर्यतत्रशरंदक्षिणायतंनिवेश्यतत्रपलाशवृन्तानिन्यसेत् शिरसिचत्वारिंशत् ४० ग्रीवायांदश १० बाह्वोःप्रत्येकंपञ्चाशदेवंशतं १०० कराङ्गुलीषुदश १० उरसिविंशतिः २० जठरेत्रिंशत् ३० शिश्नेचत्वारि ४ अण्डयोस्त्रयंत्रयम् ६ ऊर्वोःप्रत्येकंपञ्चाशदेवंशतम् १०० जङ्घातःपादतलान्तंप्रत्येकंपञ्चदशैवम् ३० पादाङ्गुलीषुदश १० एवंषष्ट्यधिकशतत्रयमितैर्दर्भैःपालाशसमिद्भिर्वाशरीरंकृत्वाऊर्णावस्त्रेणबध्वा जलमिश्रपिष्टेनलिम्पेत् शक्तौसत्यांनारिकेलादीन्यपि तथाहि शिरसिनारिकेलफलंवर्तुलालाबुवा ललाटेकदलीपत्रम् दन्तेदाडिमबीजानि कर्णयोःकङ्कणं ब्रह्मपत्रंवा चक्षुषोः कपर्दौ २ नासिकायांतिलपुष्पम् नाभावब्जम् स्तनयोर्जम्बीरफलद्वयम् वातेमनःशिलाम् पित्तेहरितालम् कफेसमुद्रफेनम् रुधिरेमधु पुरीषेगोमयम् मूत्रेगोमूत्रम् रेतसिपारदम् वृषणयोर्वृन्ताकद्वयम् शिश्नेगृञ्जनम् केशेषुवनसूकरसटावटप्ररोहावा लोमसुऊर्णाम् मांसेमाषपिष्टलेपः पञ्चगव्यैःपञ्चमृतैश्चसर्वतः सिञ्चनम् पुनर्नोअसुं०असुनीतेइत्यृग्भ्यांप्राणप्रवेशंभावयेत् यद्वा यत्तेयममितिसूक्तेनशुक्रमसीतिपारदंक्षिप्त्वाअक्षीभ्यामितिशरीरंस्पृशेत् शरीरंस्नापयित्वाचन्दनमनुलिप्यवस्त्रोपवीतेपरिधाप्यअयंसदेवदत्तइत्यभिमृश्यइदंचास्योपासनमितिध्यात्वाविधिवद्दाहादिकार्यम् अत्राहिताग्नेरस्थिदाहेपर्णशरदाहेवादशाहमाशौचमनाहिताग्नेस्त्र्यहमित्यादिप्रागुक्तमनुसंधेयम् द्वादशाब्दादिप्रतीक्षोत्तरंपर्णशरदाहादिक्रियतेचेत्तदात्रिंशत्कृच्छ्राणिचांद्रायणत्रयंवाकृत्वाकार्यम् ॥

**पालाशप्रतिमादाहविधि**—देशांतरीं मरण पावलेल्याचें दोन पराक किंवा आठ कृच्छ्र प्रायश्चित्त करून अस्थींचें दहन करावें. चांडाळ, कुत्रा, इत्यादिकांचा स्पर्श अस्थींस झाला असेल तर पंचगव्य, उदक इत्यादिकांनीं त्या प्रक्षालन करून त्यांचें दहन करावें. ज्याच्या अस्थि मुळींच मिळत नाहींत त्याचें पर्णशरविधीनें दहन करावें. तीनशेंसाठ कुशांचें किंवा तीनशेंसाठ पळसाच्या समिधांचें प्रेत करावें, अशी संख्या सांगितली आहे. भूमीवर कृष्णाजिन पसरून त्यावर एक शरसंज्ञक तृण दक्षिणायत ठेवून त्यावर पळसाचीं वृंतें स्थापावींत तीं अशीं:—मस्तकावर चाळीस, मानेवर दहा, प्रत्येक बाहूवर पन्नास एकूण शंभर; हाताचे बोटांवर दहा, वक्षःस्थळावर वीस, जठरावर तीस, शिश्नावर चार, अंडावर तीन तीन मिळून सहा, प्रत्येक मांडीवर पन्नास मिळून शंभर, जंघेपासून पायांचे तळव्यापर्यंत प्रत्येकास पंधरा एकूण तीस व पायाचे बोटांवर दहा; याप्रमाणें तीनशें साठ दर्भांचें किंवा पळसाच्या समिधांचें शरीर करून तें लोंकरीच्या वस्त्रानें बांधावें व त्यास उदकमिश्र पीठ लिंपावें. शक्ति असल्यास नारळ वगैरेही त्यांत घालावेत ते असे:—मस्तकाचे ठिकाणीं नारळ किंवा वाटोळा भोंपळा; ललाटाचे ठिकाणीं केळीचें पान; दांतांचे ठिकाणीं डाळिंबाच्या बिया, कानांचे ठिकाणीं कंकण किंवा ब्रह्मपत्र, नेत्रांचे ठिकाणीं दोन कवड्या, नासिकास्थानीं तिलपुष्प, नाभिस्थानीं कमल, स्तनांचे ठिकाणीं दोन जांभळें, वातस्थानीं मनशीळ, पित्तस्थानीं हरताळ, कफस्थानीं समुद्रफेन, रुधिरस्थानीं मध, पुरीषस्थानीं गोमय, मूत्रस्थानीं गोमूत्र, रेतस्थानीं पारा, वृषणस्थानीं दोन वांगीं, शिश्नस्थानीं गाजर, केशस्थानीं रानडुकराचे केश अथवा वडाच्या पारंब्या, लोमस्थानीं लोकर व मांसस्थानीं उडदाचे पिठाचा लेप करून पंचगव्य व पंचामृत यांचें सर्वत्र सिंचन करावें. नंतर 'पुनर्नोअसुं' व 'असुनीते०' या दोन ऋचा म्हणून प्राणाचा प्रवेश झाला अशी भावना करावी. अथवा 'यत्तेयमं०' या सूक्तानें व 'शुक्रमसि०' या मंत्रानें पारा घालून 'अक्षीभ्यां०' या मंत्रानें शरीरास स्पर्श करावा. त्यानंतर शरीरास स्नान घालून चंदनाचा लेप करावा व वस्त्र आणि यज्ञोपवीत परिधान करवून 'अयंसदेवदत्तः' असें म्हणून स्पर्श करावा. 'इदंस्योपासनं०' असें म्हणून ध्यान करावें व यथाविधि दहनादिक करावें. या स्थळीं आहिताग्नीचा अस्थिदाह किंवा पर्णशरदाह असतां दहा दिवस अशौच व अनाहिताग्नीचें तीन दिवस अशौच, इत्यादि पूर्वोक्त निर्णय जाणावा. बारा वर्षेंपर्यंत वाट पाहिल्यावर पर्णशरदाह कर्म करणें असेल तर तीस कृच्छ्रें व तीन चांद्रायणें करून तें काम करावें.

अथातीतप्रेतसंस्कारकालः। प्रत्यक्षशवसंस्कारेदिनंनैवविशोधयेत्। आशौचमध्येसंस्कारेदिनंशोध्यंतुसंभवे ॥१॥ दशाहोत्तरंतुदिनंसंशोध्यैवग्राह्यम् तत्रवत्सरादूर्ध्वंक्रियमाणप्रेतकर्मण्युत्तरायणमेवश्रेष्ठम् तत्रापिकृष्णपक्षएव तत्रनन्दात्रयोदशीचतुर्दशीदिनक्षयान्वर्जयेत् शुक्रशनिवारौवर्ज्यौ भौमवारोपिवर्ज्यइत्येके नक्षत्रेषुभरणीकृत्तिकार्द्राश्लेषामघाज्येष्ठामूलंधनिष्ठोत्तरार्धशततारकादिचतुष्टयंचेतिनक्षत्राणि त्रिपुष्करयोगश्चेत्यतिदुष्टानिसर्वथात्यजेत् कृत्तिकापुनर्वसूत्तराफल्गु-

**नीविशाखोत्तराषाढापूर्वाभाद्रपदाचेतित्रिपादनक्षत्राणि द्वितीयासप्तमीद्वादशीचातिथिः कुजशनिरविविवाराश्चेतित्रयाणायोगेत्रिपुष्करः कैश्चिद्रविस्थानेगुरुवारउक्तः एतेष्वेवतिथिवारेषुमृगचित्राधनिष्ठायोगेद्विपुष्करः त्रिपुष्करयोगोवृद्धौलाभेनष्टेहृतेमृतौचत्रिगुणफलदः द्विपुष्करोद्विगुणफलदः तेनप्रेतकार्येद्वावपित्याज्यौ द्वयोर्योगेद्विपुष्करइतिकश्चित् गुरुशुक्रास्तपौषमासमलमासावैधृतिव्यतीपातपरिघयोगाःविष्टिःकरणंचतुर्थाष्टमद्वादशचन्द्रश्चेत्यपिसर्वथात्यजेत् रोहिणीमृगपुनर्वसुपूर्वोत्तराफल्गुनीचित्राविशाखाऽनुराधापूर्वोत्तराषाढाधनिष्ठेतिकिंचिद्दुष्टानिसंभवेत्यजेत् भौमवारोपित्याज्यइत्येके कर्तुस्तिसृषुजन्मतारासुप्रत्यरितारायांचपर्णशरादिदाहोनेष्टः ॥**

**अतिक्रान्तप्रेतसंस्कारकाल**—प्रत्यक्ष शवसंस्कार करायचा असतां दिनशुद्धीचा विचार करूं नये, पण तो जर अशौचात करणें तर मात्र दिनशुद्धीचा विचार करावा आणि दहा दिवसांनंतर दिनशुद्धि पाहूनच दिवस घ्यावा. वर्षानंतर प्रेतकर्म करावयाचें असल्यास उत्तरायण श्रेष्ठ होय. त्यांतही कृष्णपक्ष घ्यावा व त्यांतल्या त्यांत नंदा (प्रतिपदा, षष्ठी, एकादशी), त्रयोदशी, चतुर्दशी व दिनक्षय हे वर्ज्य करावेत. शुक्र व शनि हे वार घेऊं नयेत. कित्येकांच्या मतें भौमवारही वर्ज्य आहे. नक्षत्रांपैकीं भरणी, कृत्तिका, आर्द्रा, आश्लेषा, मघा, ज्येष्ठा, मूळ, धनिष्ठाचें उत्तरार्ध व शततारकादि चार नक्षत्रें व त्रिपुष्कर योग अशीं अत्यंत दुष्ट हीं सर्वथा वर्ज्य करावींत. कृत्तिका, पुनर्वसु, उत्तराफाल्गुनी, विशाखा, उत्तराषाढा व पूर्वाभाद्रपदा हीं त्रिपाद नक्षत्रें, द्वितीया, सप्तमी व द्वादशी या तिथी आणि मंगळ, शनि व रवि या तिहींचा योग असतां त्रिपुष्कर योग होतो. कित्येकांनीं रविस्थानीं गुरुवार सांगितला आहे. ह्याच तिथी व वार असून मृग, चित्रा व धनिष्ठा यांचा योग आल्यास द्विपुष्कर योग होतो. वृद्धि, लाभ, नष्ट, चोरी व मरण यांच्या ठायीं त्रिपुष्कर योग असल्यास तो त्रिगुण फल देतो व द्विपुष्कर योग द्विगुण फल देतो. म्हणून प्रेतकार्य करितांना हे दोनही वर्ज्य करावेत. दोहोंचा योग असतांही द्विपुष्कर होतो, असें एक ग्रंथकार म्हणतो. गुरुशुक्रांचे अस्त, पौषमास, मलमास, वैधृति, व्यतिपात, परिघयोग, भद्राकरण, चौथा, आठवा व बारावा चंद्र हीं सर्व वर्ज्य करावींत. रोहिणी, मृग, पुनर्वसु, पूर्वा, उत्तराफाल्गुनी, चित्रा, विशाखा, अनुराधा, पूर्वाषाढा, उत्तराषाढा व धनिष्ठा हीं नक्षत्रें किंचित् दुष्ट आहेत म्हणून शक्य असल्यास तीं टाकावींत. मंगळवारही टाकावा, असें कांहींजण म्हणतात. कर्त्याच्या तीन जन्मतारा म्हणजे जन्मनक्षत्र, जन्मनक्षत्रापासून दहावें व एकोणिसावें नक्षत्र यांवर व प्रत्यरितारा यांवर पर्णशरादि दहन इष्ट नाहीं.

**तथाचार्कगुरुचन्द्रवाराअश्विनीपुष्यहस्तस्वातीश्रवणभानिचप्रशस्तानि मध्यमानिसर्वथात्याज्यानिचोक्तानि नन्दायांशुक्रवारेचतुर्दश्यांत्रिजन्मताराप्रत्यरितारासुचैकोद्दिष्टश्राद्धमतिनिन्द्यम् साक्षादेकादशाहेनकोपिनिषेधः ॥**

**प्रशस्ताप्रशस्तयोग**— रवि, गुरु व सोम हे वार आणि अश्विनी, पुष्य, हस्त, स्वाति व श्रवण हीं नक्षत्रें प्रशस्त होत. मध्यम व सर्वथा त्याज्य हीं सांगितलींच आहेत. नंदा तिथी, शुक्रवार, चतुर्दशी, तीन जन्मतारा व प्रत्यरितारा, यांवर एकोद्दिष्ट श्राद्ध अत्यंत निंद्य होय. प्रत्यक्ष अकराव्या दिवशीं कोणताही दोष नाहीं.

**अस्यनिषिद्धनक्षत्रादेरपवादः युगमन्वादिसंक्रान्तिदर्शेचप्रेतकर्मणि । पुनः-संस्कारादिकेपिनक्षत्रादिनशोधयेत्॥१॥ गुरुभार्गवयोर्मौढ्येपौषमासेमलिम्लुचे। नातीतःपितृमेधःस्याद्गयागोदावरींविना २ इतिपुनःसंस्कारकालः ॥**

**पुनःसंस्कारकाल**—युगादि, मन्वादि, संक्रांति, दर्श, प्रेतकर्म व पुनःसंस्कारादि, यांविषयीं नक्षत्रादिकांचा विचार करूं नये. गुरुशुक्रांचे अस्त, पौषमास व मलमास हीं असतां, अतिक्रांत पितृकर्म गया गोदावरी यांवांचून होत नाहीं. असा हा पुनःसंस्काराचा काल आहे.

**साग्निकस्यपर्णशरदाहेकृतेपश्चाद्देहलाभेपर्णशरदाहीयार्धदग्धकाष्ठैस्तंदहेत् तादृशकाष्ठालाभेलौकिकाग्निनादग्ध्वातदस्थीनिमहाजलेक्षिपेत् एवमन्येषांनिरग्नीनामपिपर्णशरदाहोत्तरंशरीरलाभेस्थिलाभेवायोज्यम् अमृतंमृतमाकर्ण्यकृतंयस्यौर्ध्वदेहिकम् । प्रायश्चित्तमसौस्मार्तंकृत्वाग्नीनादधीतच ॥ १ ॥ अत्रपुनः-संस्कारादिप्रकारःपूर्वार्धेउक्तः आधानान्तेआयुष्मतेष्टिः अनाहिताग्नेस्तुचरुः भर्तरिजीवत्येवमरणवार्तांश्रुत्वायदिस्त्रियासहगमनंकृतंतदातत्स्त्रीमरणमवैधमेव ज्ञातमरणमेवहिसहगमनेनिमित्तं नतुमरणज्ञानमात्रम् अतस्तस्याभार्याया आत्मघातादिदोषप्रायश्चित्तं तत्पुत्रादिभिःकृत्वानारायणबलिपूर्वकमौर्ध्वदेहिकंकार्यम् भर्तुस्तुदाहाद्यौर्ध्वदेहिककरणनिमित्तमुक्तपुनःसंस्कारादिकार्यम् ॥**

**अमृतमृतवार्तानिर्णय**—साग्निकाचा पर्णशरदाह केल्यावर मग जर त्याचें शरीर मिळालें तर पर्णशरदहनाच्या अर्धदग्ध काष्ठांनीं त्या शरीराचें दहन करावें. तशीं काष्ठें न मिळाल्यास लौकिकाग्नीनें दहन करून त्याच्या अस्थि मोठ्या उदकांत टाकाव्या. याप्रमाणेंच इतर निरग्निकांचाही पर्णशरदाह झाल्यावर शरीर मिळाल्यास किंवा अस्थि मिळाल्यास असाच निर्णय जाणावा. मृत नसतां मृत झाला अशी वार्ता श्रवण करून ज्याचें अंत्यकर्म केलें त्यानें स्मृत्युक्त प्रायश्चित्त करून अग्न्याधान करावें. याविषयींचा पुनःसंस्कारादिक प्रकार पूर्वार्धांत सांगितलाच आहे. आधान केल्यावर आयुष्मतेष्टि करावी. अनाहिताग्नि असल्यास चरु करावा. भर्ता जिवंत असतांच मरणाची वार्ता ऐकून जर स्त्रीयेनें सहगमन केलें तर तो अविधिच होय. ज्ञातमरण हेंच सहगमनास निमित्त आहे. केवळ मरणाची वार्ता ऐकणें हें निमित्त नाहीं. म्हणून त्या स्त्रीयेचे आत्महत्यादि दोषांचें प्रायश्चित्त तिच्या पुत्रादिकांनीं करून नारायण बलिपूर्वक अंत्यकर्म करावें. भर्त्याचें रतदहनादिक अंत्यकर्म केलें म्हणून तन्निमित्तक सांगितलेले पुनः संस्कारादिक करावें.

क्वचिज्जीवतोप्यन्त्यकर्मविहितम् यथाप्रायश्चित्तानिच्छोःपतितस्यघटस्फोटे-तथाहिमहापातकेनोपपातकेनवा पतितोयदिप्रायश्चित्तंनकरोतितदातंगुरूणां-बान्धवानांराज्ञश्चसमक्षमाहूयतत्पापंप्रकटीकृत्यतंपुनःपुनरुपादिशेत् प्रायश्चित्तं कुरुस्वाचारंलभस्वेति सयद्येवमाषिनाङ्गीकरोतितदारिक्तादिनिन्द्यतिथौसायाह्ने-सपिण्डाबान्धवाश्चसंभूयदासीहस्तेनानीतममेध्यकुत्सितजलादिपूर्णघटंसर्वतो-दास्याद्यन्वारम्भंकुर्वन्तोदास्यादासस्यवावामपादेनन्युब्जंछिन्नाग्रदर्भेषुकारयि-त्वादासीसंहितावदेयुरमुमनुदकंकरोमीतिनामग्रहणपूर्वकंप्राचीनावीतिनोमुक्त-शिखाश्चसन्तः ततोधिकारीकर्तादाहवर्ज्यंजीवन्तमेवोद्दिश्यपिण्डोदकदानादि-प्रेतकार्याण्येकादशाहान्तानिनाम्नैवकुर्यात् मिताक्षरायांप्रेतकार्योत्तरंघटनिनयन-मुक्तम् एकाहमाशौचंसर्वेषाम् यस्यघटस्फोटःकृतस्तेनसहसंभाषणस्पर्शादि-संसर्गोनकेनापिकार्यः करणेपतिततुल्यता घटस्फोटप्रयोजनंतुपूर्वार्धान्तेउक्तम् घटस्फोटनिश्चयोत्तरंघटस्फोटदिनात्प्राक्पतितज्ञातीनांधर्मकार्येष्वनधिकारइति कश्चित् ॥

**जीवतोन्त्यकर्म**—कधीं कधीं जिवंताचेंही अंत्यकर्म करावें असें सांगितलें आहे. उदाहरणार्थः—प्रायश्चित्त घेण्याची इच्छा न करणाऱ्या पतिताचा घटस्फोट केला असतां तो जिवंत असतांहि त्याचें अंत्यकर्म करावें. तो घटस्फोटविधि असाः—महापातकानें किंवा उपपातकानें पतित झालेला गृहस्थ जर प्रायश्चित्त करणार नाहीं तर गुरु, बांधव व राजा यांच्या समक्ष त्या पतितास बोलावून त्याचें पाप प्रकट करावें व त्यास पुनः पुनः उपदेश करावा. प्रायश्चित्त कर, आपला आचार ग्रहण कर, असा उपदेश केला असतांही जर तो त्याचा अंगिकार न करील, तर रिक्तादि निंद्य तिथीच्या दिवशीं सायंकाळीं सपिंडांनीं व बांधवांनीं एकत्र मिळून दासीच्या हातून आणविलेला अशुद्ध व कुत्सित जलानें भरलेला घट ( सर्वत्र दासी इत्यादि-कांस स्पर्श करून ) दास अथवा दासी यांतून कोणा एकाच्या डाव्या पायानें अग्रें तोडलेल्या दर्भांवर उपडा करवावा, व प्राचीनावीतीनें शेंडी सोडून दासीसहित सर्वांनीं त्याचें नांव घ्यावें व 'अमुमनुदकं करोमि' असें म्हणावें; नंतर अधिकारी कर्त्यानें दहन वर्ज्य करून जिवंताच्याच उद्देशानें पिंड, उदकदान, इत्यादि अकराव्या दिवसापर्यंतचीं प्रेतकार्यें नांवांनींच करावींत. प्रेतकार्यें झाल्यावर घट न्यावा असें मिताक्षरेंत सांगितलें आहे. सर्वांना एक दिवस अशौच आहे. ज्याचा घटस्फोट केला त्याबरोबर संभाषण, स्पर्श इत्यादि संसर्ग कोणींही करूं नये. केल्यास तो पतिततुल्य होतो. घटस्फोटाचें कारण पूर्वार्धाच्या अंतीं सांगितलें आहे. घटस्फोट करण्याचा निश्चय झाल्यावर, तो करण्याच्या दिवसापूर्वीं ज्ञातीस धर्मकार्य करण्याचा अधिकार नाहीं, असेंही एक ग्रंथकार म्हणतो.

कृतघटस्फोटस्यपुंसोनुतापेतत्पापप्रायश्चित्तान्तेसंग्रहविधिरुच्यते तत्रादौशुद्धि-परीक्षा कृतप्रायश्चित्तोज्ञातिसमक्षंगोभ्यस्तृणभारंदद्यात् गोभिस्तृणेभक्षिते-शुद्धिः भक्षणाभावेपुनः प्रायश्चित्तंचरेत् एतंनिश्चितसंशुद्धौसमानेयुर्नवंघटम् ।

हैमंवामृन्मयंवापिपवित्रजलपूरितम् १ ततःसपिण्डास्तंघटंसंस्पृश्याभिमन्त्र्यत-ज्जलैःपावमानीभिरापोहिष्ठेत्यादिभिस्तरत्समन्दीभिश्चपापिनमाभिषिच्यतेन-सहसर्वेस्नात्वातंजलघटस्ममैदद्युः सचशान्ताद्यौःशान्तापृथिवीशान्तंविश्वमन्त-रिक्षंयोरोचनस्तंमिहगृह्णामीतियजुर्भिस्तंघटंगृह्णीयात् ततस्तदुदकंतेनैवसाकंस-र्वेपिबेयुः ततःसकूश्माण्डमन्त्रैराज्यहोमंकृत्वासुवर्णंगांचदद्यात् ततस्तस्यजात-कर्मादिव्रतबन्धांताविवाहान्तावासंस्काराःकार्याःएवंकृतेशुद्धेनतेनसंभोजनादिव्य-वहारंकुर्यात् एवमुपपातकेमहापातकेचकृतघटस्फोटस्यशुद्धिर्ज्ञेया इतिसंक्षेपतः कृतघटस्फोटशुद्धिः ॥

**घटस्फोटपश्चात्तापशुद्धिकरणविधि**—ज्याचा घटस्फोट केला त्यास पश्चाताप झाला असतां प्रायश्चित्त केल्यावर त्यास जातींत घेण्याविषयींच्या विधींतल्या पाहिल्या शुद्धीची परीक्षाः—प्रायश्चित्त करून ज्ञातीच्या समक्ष तृणाचा भारा गाईस द्यावा. गाईनें तृण भक्षण केल्यास शुद्धि आहे व भक्षण न केल्यास पुनः प्रायश्चित्त करावें. याप्रमाणें शुद्धीचा निश्चय झाला असतां, सुवर्णाचा किंवा मृत्तिकेचा नवीन घट शुद्ध उदकानें भरलेला आणावा. नंतर सपिंडांनीं त्या घटास स्पर्श करून त्याचें अभिमंत्रण केल्यावर त्यांतल्या उदकांनीं पावमानी ऋचा, 'आपोहिष्ठा०' इत्यादि ऋचा, व तरत्समंदी ऋचा यांनीं त्या पाप्यावर अभिषेक करून, त्या पाप्यासह सर्वांनीं स्नान करावें व तो उदकाचा घट पाप्यास द्यावा व त्यानें 'शांता द्यौः शांता पृथिवी शांतं विश्वमंतरिक्षं योरोचन-स्तामिह गृह्णामि' या यजुमंत्रांनीं तो घट घ्यावा. नंतर तें उदक त्या पाप्यासह सर्वांनीं प्राशन करावें. यावर त्यानें कूष्मांडमंत्रांनीं आज्याचा होम करून सुवर्ण व गाई यांचें दान करावें. त्यानंतर जातकर्मापासून मौंजीपर्यंत किंवा विवाहापर्यंत त्याचे सर्व संस्कार करावेत असा विधि केल्यावर शुद्ध झालेला जो त्याच्याशीं एका पंक्तीला बसून भोजनव्यवहार करावा. उपपातक व महापातक याबद्दल ज्याचा घटस्फोट केला त्याचीही अशी शुद्धि जाणावी अशी ही थोडक्यांत घटस्फोटाची शुद्धि आहे.

वन्देश्रीमदन्ताभिधगुरुचरणौसतांमताचरणौ । जननीमथान्नपूर्णासंपूर्णा-सद्गुणैर्वन्द्याम् ॥

**ग्रंथकर्त्याचें नमन**—ज्यांचें आचरण साधूंस मान्य आहे अशा श्रीमत् अनंत नामक पित्याचे चरण व पातिव्रत्यादि सद्गुणांनीं संपूर्ण व वंदनास योग्य अशी अन्नपूर्णा नामक माता या उभयतांस मी नमस्कार करितों.

---

श्रीविठ्ठलंनमस्कृत्यविघ्नकक्षहुताशनम् । अन्त्येष्टिनिर्णयंवक्ष्येसर्वशाखोपयो-गिनम् ॥

**ग्रंथकाराचें देवतानमन व पुढील कार्यक्रम**—विघ्नरूप शुष्क तृणास केवळ अग्नि असा जो श्रीविठ्ठल त्यास नमस्कार करून सर्व शाखोपयोगी अंत्येष्टिनिर्णय सांगतों.

तत्रान्त्यक्रियाधिकारिणःश्राद्धारम्भेएवोक्ताः सर्वाभावेधर्मपुत्रः कार्यः तत्र-पुत्राद्यधिकारिणापित्रादिकमासन्नमरणंदृष्ट्वासार्धाब्दादिप्रायश्चित्तंमोक्षधेन्वादि-दानानिचतेनकारणीयानिस्वयंवातमुद्दिश्यकर्तव्यानि तत्प्रायश्चित्तप्रयोगः प्रायश्चित्तप्रकरणेद्रष्टव्यः शक्तौसत्यांप्रायश्चित्तान्तेदशदानानिकार्याणि तत्रग-वामङ्गेषुतिष्ठन्तिइतिगोदानमन्त्रः सर्वभूताश्रयाभूमिर्वराहेणसमुद्धृता । अनन्त-सस्यफलदाअतःशान्तिप्रयच्छमे १ इतिभूमेःमहर्षेर्गोत्रसंभूताःकाश्यपस्यतिलाः स्मृताः । तस्मादेषांप्रदानेनममपापंव्यपोहतु १ इतितिलानाम् हिरण्यगर्भगर्भ-स्थमितिहिरण्यस्य कामधेनुषुसंभूतंसर्वक्रतुषुसंस्थितम् । देवानामाज्यमाहारम-तःशान्तिप्रयच्छमे १ इत्याज्यस्य शरणंसर्वलोकानांलज्जायारक्षणंपरम् । सुवे-षधारिवस्त्रत्वमतः० इतिवस्त्रंदेयम् सर्वदेवमयंधान्यंसर्वोत्पत्तिकरंमहत् । प्राणि-नांजीवनोपायमतःशान्तिप्रयच्छमे १ इतिधान्यम् तथारसानांप्रवरःसदैवेक्षुर-सोमतः । ममतस्मात्परांलक्ष्मींददस्वगुडसर्वदा १ इतिगुडः प्रीतिर्यतःपितृणां-चविष्णुशंकरयोःसदा । शिवनेत्रोद्भवंरूप्यमतः० १ इतिरजतम् यस्मादन्न-रसाःसर्वेनोत्कृष्टालवणंविना । शंभोःप्रीतिकरंनित्यमतः० इतिलवणम् भूम्या-दिप्रमाणानितुजननशान्तिप्रकरणेउक्तानि प्रायश्चित्तादिकर्मसुविष्णवादिनाम-कीर्तनात्साङ्गता प्रायश्चित्ताद्यसंभवेपिमरणकालेविष्णुशिवनामकीर्तनमात्रात्स-र्वपापक्षयोमुक्तिश्चेतिसर्वपुराणादिसिद्धान्तः तथाचश्रीभागवते यस्यावतारगुण-कर्मविडम्बनानिनामानियेऽसुविगमेविवशागृणन्ति । तेनैकजन्मशमलंसहसै-वहित्वासंयान्त्यपावृतमृतंतमजंप्रपद्ये १ इत्यादि मुमूर्षुपितरंपुत्रोयदिदानंप्रदा-पयेत् । तद्विशिष्टंगयाश्राद्धादश्वमेधशतादपि १ तानिच तिलपात्रदानंऋण-धेनुमोक्षधेनुपापधेनुवैतरणीधेनूत्क्रान्तिधेनुदानादीनि व्यतीपातोथसंक्रान्तिस्तथैव ग्रहणंरवेः । पुण्यकालास्तथासर्वेयदामृत्युरुपस्थितः १ आसन्नमृत्युनादेयागौः सवत्सातुपूर्ववत् । तदभावेतुगौरेकनरकोत्तारणायवै २ शुक्लपक्षेदिवाभूमौगङ्गा-यांचोत्तरायणे । धन्यास्तातमरिष्यन्तिहृदयस्थेजनार्दने १ इत्यादिवचनात् १ मुमूर्षोर्दानादौशक्त्यभावेपुत्रादिर्दद्यात् ॥

**आसन्नमरणाकडून दशदानें**—अंत्यकर्मांचे अधिकारी श्राद्धाचे आरंभींच जे सांगितले आहेत, त्या सर्वांचा अभाव असल्यास धर्मपुत्र करावा. पिता इत्यादिकांचें मरण समीप आलें असें पाहून पुत्रादिक अधिकाऱ्यांनीं पित्याकडून सार्धाब्द प्रायश्चित्त व मोक्षधेनु इत्यादि दानें करवावीत, किंवा त्याच्या उद्देशानें स्वतः करावींत. प्रायश्चितप्रयोग प्रायश्चित्तप्रकरणीं पहावा. सामर्थ्य असल्यास प्रायश्चित्त केल्यावर दशदानें जीं करावींत, त्यांविषयीं मंत्र—'गवामंगेषुतिष्ठन्ति०' हा गोदानाचा मंत्र, 'सर्वभूताश्रयाभूमिर्वराहेण...शांतिं प्रयच्छमे,' हा भूमिदानाचा मंत्र, 'महर्षेर्गोत्रसंभूता...व्यपोहतु' हा तिलांचा, 'हिरण्य-गर्भगर्भस्थं०' हा सुवर्णाचा, 'कामधेनुषु...शांतिं प्रयच्छमे०' हा घृताचा, 'शरणं सर्वलोकानां...वस्त्रत्वं मतः०' या मंत्रानें वस्त्र द्यावें, 'सर्वदेवमयं...शांतिं प्रयच्छमे'

या मंत्रानें धान्याचें दान करावें. 'तथारसानां प्रवरः...गुड सर्वदा' हा मंत्र म्हणून गुळाचें दान करावें, 'प्रीतियतः पितॄणांच...रूप्य मतः०' या मंत्रानें रौप्यदान करावें, 'यस्मादन्नरसाः...नित्यमतः' या मंत्रानें लवणदान करावें. भूमि इत्यादिकांचीं प्रमाणें जननशांतिप्रकरणांत सांगितलीं आहेत. प्रायश्चित्तादि कर्मांत विष्णु इत्यादिकांचे नामसंकीर्तनानें कर्मांची सांगता होते. प्रायश्चित्तादिक करणें अशक्य असलें तरी मरणकालीं विष्णु व शिव यांच्या नामसंकीर्तनानें सर्व पापांचा क्षय होऊन मुक्ति प्राप्त होते, असा सर्व पुराणांचा सिद्धांत आहे. तसेंच श्रीभागवतांत असें सांगितलें आहे कीं, अवतार, गुण व कर्म यांचें विडंबन म्हणजे अनुकरण ज्यांचे ठायीं आहे अशीं ज्या परमेश्वराचीं नामें प्राणोत्क्रमणकालीं पराधीन असतांही जे उच्चारितात ते अनेकजन्मार्जित पातकें एकाएकीं टाकून अज, निरुपाधि व सत्य अशा ज्या ब्रह्मा-प्रत पावतात, त्या परमेश्वरास मी शरण जातों. ज्याचें मरण जवळ आलें आहे अशा पित्याकडून जर पुत्र दान देववील तर तें दान गयाश्राद्ध व शंभर अश्वमेध यांहून अधिक होतें. तीं दानें अशीं:—तिलपात्रदान, ऋणधेनु, मोक्षधेनु, पापधेनु, वैतरणि-धेनु, उत्क्रांतिधेनु, इत्यादि. मृत्यु प्राप्त होतो त्या कालीं व्यतिपात, सूर्यसंक्रांती, सूर्य-ग्रहण व दुसरे इतर पुण्यकाल असतात. ज्याचा मृत्यु जवळ आला त्यानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें सवत्स गाय द्यावी. सवत्स गाय नसेल तर नरकोद्धार होण्यासाठीं केवळ गायच द्यावी. शुक्लपक्षांत, दिवसा, भूमीवर, गंगेजवळ व उत्तरायणांत हृद-यस्थ जनार्दन असतां जे मरतील ते धन्य होत, असें वचन आहे. मुमुक्षूस दानादिक करण्यास सामर्थ्य नसल्यास पुत्रादिकांनीं तीं द्यावींत.

तत्रतिलपात्रदानविधिः यथाशक्तिकांस्यपात्रेताम्रपात्रेवातिलान्प्रक्षिप्त्वासुवर्णंचप्रक्षिप्यममजन्मप्रभृतिमरणान्तंकृतनानाविधपापप्रणाशार्थंतिलपात्रदानंकरिष्ये विप्रंसंपूज्यममजन्मप्रभृतिमरणान्तंकृतनानाविधपापनाशार्थमिदंतिलपात्रंस-सुवर्णंसदक्षिणंअमुकशर्मणेतुभ्यंसंप्रददे । तिलाःपुण्याःपवित्राश्चतिलाःसर्वकराः स्मृताः । शुक्लावायदिवाकृष्णाऋषिगोत्रसमुद्भवाः १ यानिकानिचपापानि-ब्रह्महत्यासमानिच । तिलपात्रप्रदानेनममपापंव्यपोहतु १ नममेतिविप्रहस्ते-जलंक्षिपेत् पुत्रादिस्त्वस्यजन्मप्रभृत्यादिसंकल्पमस्यपापंव्यपोहत्वितिमन्त्रंच-वदेत् ऐहिकामुष्मिकंयच्चसप्तजन्मार्जितंऋणम् । तत्सर्वंशुद्धिमायातुगामेकांदद-तोमम १ इतिऋणधेनुदानमन्त्रः अन्यसर्वसामान्यगोदानवत् तद्विधिस्तुद्वितीय-परिच्छेदेउक्तः मोक्षंदेहिहृषीकेशमोक्षंदेहिजनार्दन । मोक्षधेनुप्रदानेनमुकुन्दः प्रीयतांमम १ इतिमोक्षधेनुमन्त्रः आजन्मोपार्जितंपापंमनोवाक्कायकर्मभिः । तत्सर्वंनाशमायातुगोप्रदानेनकेशव १ इतिपापधेनुदानमन्त्रः ॥

**तिलपात्रदानविधि**—यथाशक्ति कांस्यपात्र किंवा ताम्रपात्र घेऊन त्यांत तिल व सुवर्ण हीं घालावींत आणि 'ममजन्मप्रभृति...तिलपात्र-दानं करिष्ये' असा संकल्प करून ब्राह्मणाची पूजा केल्यावर 'ममजन्मप्रभृति मरणान्तं ...नमम' असे मंत्र म्हणून ब्राह्मणाचे हातावर उदक घालावें. पुत्रानें तर 'अस्य

जन्मप्रभृति०' इत्यादि संकल्प व 'अस्यपापं व्यपोहतु०' हा मंत्र म्हणावा. 'ऐहिकामुष्मिकं यच्च...ददतु मम' असा ऋणधेनुदानाचा मंत्र म्हणावा. इतर सर्व विधि सामान्य गोदानाप्रमाणेंच जाणावा. तो सामान्य गोदानाचा विधि सामान्य दुसऱ्या परिच्छेदांत सांगितला आहे. 'मोक्षं देहिहृषीकेश...प्रियतां मम' हा मोक्षधेनुदानाचा मंत्र व 'आजन्मोपार्जितं...गोप्रदानेन केशव' हा पापधेनुदानाचा मंत्र होय.

**अथवैतरणीविधिः अद्येत्याद्यमुकस्यममयमद्वारस्थितवैतरण्याख्यनद्युत्तारणार्थंगोदानंकरिष्ये विप्रपादप्रक्षालनवस्त्रगन्धमाल्यादिभिरभ्यर्च्यतद्धस्तेशिवाआपःसन्तु सौमनस्यमस्तु अक्षतंचारिष्टंचास्तु यच्छ्रेयस्तदस्तु यत्पतपंतत्प्रतिहतमस्त्वितिकृत्वा धेनुकेत्वंप्रतीक्षस्वयमद्वारेमहापथे । उत्तितीर्षुरहंदेविवैतरण्यैनमोस्तुते ॥ १ ॥ इतिधेनुंप्रार्थ्य विष्णुरूपद्विजश्रेष्ठभूदेवद्विजपावन । तर्तुंवैतरणीमेतांकृष्णांगांप्रददाम्यहम् ॥ १ ॥ इतिविप्रंप्रार्थ्य वैतरणीसंतारणार्थमिमांगांकृष्णवस्त्ररक्तमाल्याद्यलंकृतांयथाशक्तिदक्षिणायुतांतुभ्यमहंसंप्रददे यमद्वारेपथेघोरेघोरावैतरणीनदी । तांततुंकामोयच्छामिकृष्णांवैतरणींतुगाम् १ नममेतिविप्रहस्तेजलंक्षिपेत् कृष्णायाअभावेऽन्यवर्णादेया गोरभावेद्रव्यंदेयम् पुत्रादिर्दाताचेत्प्रथमेमन्त्रेउत्तितीर्षुरयमितिपठेत् द्वितीयेतर्तुंवैतरणीमस्येति तृतीयेतांततुंमस्येति ॥**

**वैतरणीविधि**—'अद्येत्यादि० अमुकस्य यमद्वारस्थित वैतरण्याख्यनद्युत्तारणार्थं गोदानं करिष्ये' असा संकल्प करून ब्राह्मणाची पादप्रक्षालन, वस्त्र, गंधमाल्य, इत्यादि उपचारांनीं पूजा करावी व ब्राह्मणाचे हातावर 'शिवाआपः संतु सौमन्यस्यमस्तु...तत्प्रतिहतमस्तु' असें म्हणून उदक द्यावें व 'धेनुकेत्वं प्रतीक्षस्य...नमोस्तुते' या मंत्रानें धेनूची प्रार्थना करावी व 'विष्णुरूप द्विजश्रेष्ठ... कृष्णांगांप्रददाम्यहम्' या मंत्रानें ब्राह्मणाची प्रार्थना करावी आणि 'वैतरणीसंतारणार्थ इमांगांकृष्णवस्त्र...नमम' असे मंत्र म्हणून ब्राह्मणाचे हातावर उदक घालावें. कृष्णवर्ण गाय न मिळाल्यास अन्यवर्णा द्यावी. गायच न मिळाल्यास द्रव्य द्यावें. दान देणारा जर पुत्रादिक असेल तर पहिल्या मंत्रांत 'उत्तितीर्षुरयं' दुसऱ्या मंत्रांत 'तर्तुंवैतरणीमस्य' व तिसऱ्या मंत्रांत 'तांततुंमस्य' असें म्हणावें.

**अथोत्क्रान्तिधेनुः । अद्येत्याद्यमुकस्य सुखेनप्राणोत्क्रमणप्रतिबन्धकसकलपापक्षयद्वारासुखेनप्राणोत्क्रमणाय यथाशक्त्यलंकृतामिमामुत्क्रान्तिधेनुंरुद्रदैवत्यामसुकशर्मणेतुभ्यंसंप्रददे गवामंगेष्वितिमन्त्रान्तेनममेतिवदेत् धेन्वभावेद्रव्यंदेयम् ॥**

**उत्क्रांतिधेनु**—"अद्येत्याद्यमुकस्य सुखेनप्राणोत्क्रमणप्रतिबन्धकसकलपापक्षयद्वारा सुखेन प्राणोत्क्रमणाय यथाशक्तिलंकृतामिमामुत्क्रांतिधेनुं रुद्रदैवत्याममुकशर्मणेतुभ्यं संप्रददे । गवामंगेषु०' असा मंत्र म्हटल्यावर 'नमम' असें म्हणावें व गोदान करावें. गाय न मिळाल्यास द्रव्य द्यावें.

उक्तप्रायश्चित्तादिदानान्तविधिमकृत्वापित्रादिमरणेपुत्रादिनाप्रायश्चित्तं-कृत्वादाहादिकर्तव्यम् दानान्येकादशाहेकार्याणि पितुःपापाभावनिश्चयेप्राय-श्चित्तंनावश्यकम् केचिदुत्क्रान्तिवैतरण्यौचदशदानानिचैवहि मृतेपिकृत्वातंप्रेतं दहेदित्याहुः तुलसींसन्निधौकुर्याच्छालग्रामशिलांतथा । केचित्तिललोहहेमका-र्पासलवणभूमिधेनुसप्तधान्येत्यष्टदानान्याहुः क्वचिन्मुमूर्षोर्मधुपर्कदानमुक्तम् ॥

**अप्रायश्चित्तमृत्यु**—प्रायश्चित्तापासून दानापर्यंत पूर्वीं सांगितलेला विधि केल्या-शिवाय पित्रादिकांस मरण प्राप्त झाल्यास पुत्रानें प्रायश्चित्त करून दहनादिक करावें व दानें करणें तीं अकराव्या दिवशीं करावींत. पित्याचें पापाचरण नाहीं असा निश्चय असल्यास प्रायश्चित्त आवश्यक नाहीं. उत्क्रांतिधेनु, वैतरणी धेनु व दशदानें हीं मृत झाल्यावरही करून, त्या प्रेताचें दहन करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. मरणसमयीं तुळशी व शाळिग्रामशिळा जवळ ठेवावी. कित्येक ग्रंथकार तीळ, लोखंड, सुवर्ण, कापूस, लवण, भूमि, धेनु व सप्त धान्यें, याप्रमाणें आठ दानें सांगतात. मुमुक्षूनें मधुपर्कदान करावें, असेंही क्वचित् ग्रंथांत म्हटलें आहे.

पुत्रादिःकर्तान्त्यकर्माधिकारार्थंकृच्छ्रत्रयादिकंवपनंचकुर्यात् तत्रमातापित्रोः सापत्नमातुःपितृव्यस्यज्येष्ठभ्रात्रादेश्चान्त्यकर्मकरणेक्षौरमावश्यकम् पुत्राणां-कर्तृभिन्नानामपिक्षौरंनित्यम् तथादत्तकस्यपूर्वापरयोर्मात्रोःपित्रोर्मृतौक्षौरम् रात्रौतुदग्ध्वापिण्डान्तंकृत्वावपनवर्जितम् । वपनंवर्जितंरात्रौश्वस्तनीवपनक्रिया १ पत्नीपुत्रकनिष्ठभ्रात्रादेरन्त्यकर्मणिक्षौरंनकार्यम् अन्यत्रकृताकृतम् ॥

**अन्त्यकर्माधिकारप्राप्ति**—अंत्यकर्माचा अधिकार प्राप्त होण्यास पुत्रादि कर्त्यानें तीन कृच्छ्र प्रायश्चित्त व वपन करावें. माता, पिता, सापत्न माता, पितृव्य आणि ज्येष्ठभ्राता इत्यादिकांचें अंत्यकर्म करणें असल्यास क्षौर आवश्यक आहे. कर्त्याशिवाय अन्य पुत्रांसही क्षौर आवश्यक आहे. याप्रमाणें स्त्रीसही प्रथम दिवशीं अथवा दहाव्या दिवशीं क्षौर आवश्यक आहे. तसेंच दत्तकास पूर्वींचे व पुढचे मातापितर मृत असतां क्षौर आहे. रात्र असेल तर दहन करून वपनावांचून पिंडान्त क्रिया करावी. रात्रीं वपन करूं नये, दुसऱ्या दिवशीं वपन करावें. पत्नी, पुत्र व कनिष्ठ भ्राता, यांचें अंत्यकर्म करणें असल्यास क्षौर नाहीं. इतरत्र कृता-कृत आहे.

स्मशानेनीयमानशवस्यशूद्रस्पर्शेशूद्रेणवहनेवा कुम्भेसलिलमादायपञ्च-गव्यंतथैवच । सुमन्त्रैरभिमन्त्र्यापस्तेनसंस्नाप्यदाहयेत् ॥ १ ॥ कृच्छ्रत्रयंच-कुर्यात् सूतिकारजस्वलयोःस्पर्शेप्येवमेव प्रायश्चित्तंतुपञ्चदशकृच्छ्राः शूद्रेण-द्विजदाहेतुचान्द्रायणपराकप्राजापत्यानिसमुच्चयेनपुत्रादिःकृत्वास्थीनिपुनर्दहेत्-अस्थ्यभावेपालाशविधिः ऊर्ध्वोच्छिष्टाधरोच्छिष्टोभयोच्छिष्टेषुकृच्छ्रत्रयम् अस्पृश्यस्पर्शेनेषट्कृच्छ्राः अन्तरालमृतौनव खट्वामरणेद्वादश निगडमृतौपञ्च-दश रजकादिसप्तविधान्त्यजादिस्पृष्टमरणेत्वेकात्रिंशत्कृच्छ्राणि देशान्तरमरणे-

पराकद्वयमष्टौकृच्छ्रवा कृच्छ्रत्रयंप्रकुर्वीतआशौचमरणेपिच । अर्धदग्धेशवेचितेरस्पृश्यस्पर्शेकृच्छ्रत्रयम् एवंपुत्रादयःपित्रादेःपापिनःपापानुसारेणप्रायश्चित्तकाण्डोक्तंप्रायश्चित्तंदुर्मरणात्मघातादिनिमित्तेपूर्वोक्तप्रायश्चित्तंनारायणबल्यादिकंचकृत्वैवान्त्यकर्मकुर्युः एवमुक्तप्रायश्चित्तंविनादाहादिकृतंव्यर्थंभवेत् उभयोश्चनरकः ॥

**अस्पृश्यस्पर्शितप्रेतदहनप्रायश्चित्त**—स्मशानांत नेले जाणारे शवास शूद्रस्पर्श झाल्यास किंवा शूद्रानें खांदा दिल्यास कुंभांत उदक व पंचगव्य घालून तें सुमंत्रांनीं अभिमंत्रित करावें व त्यानें प्रेताला स्नान घालून तें दहन करावें. व तीन कृच्छ्रें प्रायश्चित्त करावें. बाळंतीण व रजस्वला यांचा स्पर्श झाल्यासही असाच निर्णय जाणावा. मात्र प्रायश्चित्त पंधरा कृच्छ्रें करावें. शूद्रानें द्विजाचें वहन केल्यास चांद्रायण, पराक व प्राजापत्य हीं एकामागून एक प्रायश्चित्तें पुत्रानें करून त्याच्या अस्थींचें पुनः दहन करावें. अस्थि न मिळाल्यास पालाशविधि करावा. उर्ध्वोच्छिष्ट अधरोच्छिष्ट व उभयोच्छिष्ट हीं असतां तीन कृच्छ्र, अस्पृश्याचा स्पर्श झाल्यास सहा कृच्छ्रें, अंतराळीं मरण असल्यास नऊ कृच्छ्रें, बाजेवर मरण आल्यास बारा कृच्छ्रें, तुरुंगांत मरण आल्यास पंधरा कृच्छ्रें; रजकादि (रजक, चर्मकार, नट, बुरूड, कैवर्त, मेद व भिल्ल) सात प्रकारच्या अंत्यजादिकांचा स्पर्श होऊन मरण आल्यास एकतीस कृच्छ्रें; व देशांतरीं मरण आल्यास दोन पराक किंवा आठ कृच्छ्रें प्रायश्चित्त करावें. अशौचांत मरण आल्यास तीन कृच्छ्रें करावें. शव अर्धें दग्ध झाल्यावर चितेस अस्पृश्यस्पर्श झाल्यास तीन कृच्छ्र करावें. याप्रमाणें पुत्रादिकांनीं पिता इत्यादिक पाप्यांचें जसें पाप असेल त्याप्रमाणें प्रायश्चित्तकांडांत सांगितलेलें प्रायश्चित्त करावें. दुर्मरण, आत्महत्या इत्यादि निमित्त असल्यास पूर्वोक्त प्रायश्चित्त व नारायणबलि करून अंत्यकर्म करावें. याप्रमाणें उक्त प्रायश्चित्त केल्याशिवाय दहनादिक केल्यास तें कर्म व्यर्थ होईल व दोघांसही नरक प्राप्त होईल.

पतिपत्न्योरेककालेदहनेप्राप्तेभार्यायाःपत्यासहद्विवचनान्तमन्त्रोहेनदाहंकृत्वापिण्डादिकंपतिपूर्वकंपृथक्कार्यम् एवंसपत्नीनामेककालेमृतौसहैवदाहः पिण्डादिकंतुज्येष्ठक्रमेणपृथगेव एवंपितापुत्रयोर्भ्रात्रोश्चलौकिकाग्निदाह्ययोर्दाहःसहैव पिण्डादिपितृपूर्वंज्येष्ठपूर्वंचपृथक्पुंबालानांस्त्रीबालानांचदहनेखननेचैवमेवेतिनागोजीभट्टीये रजस्वलागर्भिण्यादिमरणेसहगमनेचवक्ष्यते ॥

**पतिपत्नींचें एकाच काळीं दहन**—पति व स्त्री यांचें दहन एकाच काळीं करणें झाल्यास पतीसहवर्तमान स्त्रियेला द्विवचनान्त मंत्राचे ऊहानें दहन करून पिंडादिक कर्म पतिपूर्वक निराळें करावें. याप्रमाणें बहुत सवती एकाकाळीं मृत झाल्यास त्यांचें दहन बरोबरच करावें. पिंडादिक कर्म ज्येष्ठक्रमानें निरनिराळेंच करावें. याप्रमाणें लौकिकाग्नीनें दहन करण्यास योग्य असे पिता व पुत्र किंवा दोन भ्राते यांचें दहन बरोबरच करून पिंडादिक कर्म पितृपूर्वक व ज्येष्ठपूर्वक निराळें करावें. पुरुषबालकें व स्त्रीबालकें यांचें दहन व खनन

असतांही असाच निर्णय जाणावा, असें नागोजीभट्टकृत ग्रंथांत म्हटलें आहे. रजस्वला, गर्भिणी इत्यादिकांचें मरण व सहगमन यांविषयीं पुढें सांगण्यांत येईल.

अथगोमयोपलिप्तभूमौकुशेषूपविष्टोदक्षिणाशिराः शयितोवागोपीचन्दनादिमृदाकृततिलकःश्रीविष्णुंस्मरन् पुण्यसूक्तंगीतांसहस्रनामादिस्तोत्राणिपठेच्छृणुयाद्वा अमृतत्वप्राप्त्यर्थंपुण्यसूक्तस्तोत्रादीनांपाठंश्रवणंवाकरिष्येइतिसंकल्पः श्रोतुःसंकल्पाशक्तौश्रावयितास्यामुकशर्मणोमृतत्वप्राप्तयेऽमुकंश्रावयिष्यइतिसंकल्पयेत् नानानमितिसूक्तंपुरुषसूक्तंविष्णुसूक्तमुपनिषद्भागाइत्यादिपुण्यसूक्तानि रामकृष्णादिनामस्मरणेजातिमात्रस्याधिकारः ॥

**सहगमनदाहानंतरचें कर्म**—गोमयानें सारवलेल्या भूमीवर दर्भ घालून त्यावर बसावें किंवा दक्षिण दिशेस शिर करून निजावें व गोपीचंदनादि मृत्तिकेचा तिलक लावून श्रीविष्णूचें स्मरण करीत असतां पुण्यसूक्त, गीता, सहस्रनामादि स्तोत्रें पठण करावींत अथवा श्रवण करावींत. 'अमृतत्वप्राप्त्यर्थंपुण्यसूक्तस्तोत्रादीनां पाठं श्रवणंवाकरिष्ये' असा त्या वेळीं संकल्प करावा. श्रवण करणारास जर संकल्प करण्याचें सामर्थ्य नसेल तर श्रवण करविणारानें 'अस्यामुकशर्मणोऽमृतत्वप्राप्तयेऽमुकंश्रावयिष्ये' असा संकल्प करावा. 'नानानं०' हें सूक्त, पुरुषसूक्त, विष्णुसूक्त व उपनिषद्भाग हीं पुण्यसूक्तें होत. रामकृष्ण इत्यादि नामस्मरणास सर्व जातिमात्रास अधिकार आहे.

अथसाग्नेर्विशेषः गृह्याग्निमतोगृह्याग्निनाश्रौताग्निमतस्त्रेताग्निभिर्दाहःकार्यः तत्रगृह्याग्निमतःश्रौताग्निमतश्चकृष्णपक्षेमरणेतदैवसायंकालाहुतीर्दर्शसायंकालपर्यन्ताःपक्षहोमवत्सकृद्ग्रहणेनैवहुत्वापुनःसंकल्पपूर्वकंप्रातराहुतीश्चप्रतिपत्प्रातर्होमान्तास्तद्वदेवहुत्वादर्शयागंकुर्यात् यागासंभवेआज्यंसंस्कृत्यस्रुचिचतुर्वारंगृहीत्वापुरोनुवाक्यायाज्याभ्यामेकैकांप्रधानाहुतिंजुहुयात् स्मार्तेतुचतुर्गृहीताज्येनाग्नयेस्वाहेन्द्राग्निभ्यांस्वाहेतिनाग्नैवप्रधानाहुतिद्वयम् शुक्लपक्षेरात्रौमरणे सायंहोमस्यकृतत्वात्प्रातर्होममात्रमाकृष्यतदैवकुर्यात् नात्रपौर्णिमान्तानांदर्शान्तानांवाहोमानामिष्टिप्रधानपूर्णाहुतीनांवाकरणम्शुक्लपक्षेदिवामरणेतुनकस्यापिहोमस्याकर्षणम् एवंकृष्णपक्षमरणेपिदैवात्पूर्णमासेष्टयतिक्रमेहोमापकर्षप्रधानपूर्णाहुत्यादिकंचकृताकृतसनारब्धत्वादितिभाति करणपक्षेऽतिक्रान्तपूर्णमासपूर्णाहुतीर्हुत्वापक्षहोमान्कृत्वादर्शपूर्णाहुतयःकार्याः अग्न्यावरण्योरारूढे प्रमीयेतपतिर्यदि । प्रेतंस्पृष्ट्वामथित्वाग्निंजप्त्वाचोपावरोहणम् ॥ १ ॥ वृतंच द्वादशोपात्तंतूष्णींहुत्वाशवक्रिया । विच्छिन्नश्रौताग्नेर्मृतौतुप्रेताधानंकार्यम् तद्यथाग्नेस्त्वाग्न्यालयेक्षिप्त्वारणीसंनिधाय यस्याग्नयोजुह्वतोमांसकामाःसंकल्पयन्तेयजमानमांसं जायंतुतेहविषेसादितायस्वर्गंलोकमिमंप्रेतंनयन्त्वितियजुर्मन्त्रेणमथित्वाग्निमायतनेप्रणीय द्वादशगृहीताज्येनतूष्णींहुत्वातेनदाहादिकार्यम् नष्टेष्वग्निष्वथारण्योर्नाशेस्वामीम्रियेतचेत् । आहरेदरणीद्वन्द्वंमनाज्योतिर्श्चाततः १ शेषंप्राग्वत् ॥

**साग्निकविशेष**—जो गृह्याग्नियुक्त असेल त्याचा गृह्याग्नीनें व श्रौताग्नियुक्त असेल त्याचा तीन श्रौताग्नींनीं दाह करावा. गृह्याग्निमान् व श्रौताग्निमान् यांचें मरण कृष्णपक्षांत झाल्यास तत्कालींच सायंकाळच्या आहुति, दर्शसायंकाळपर्यंतच्या पक्षहोमाप्रमाणें एकदांच घेऊन होम करावा. व पुनः संकल्पपूर्वक प्रातःकाळच्या आहुति घेऊन प्रतिपदेच्या प्रातर्होमानंतर तसेंच हवन करून दर्शयाग करावा. यागाचा असंभव असल्यास आज्यास संस्कार करून तें स्रुचिपात्रांत चार वेळ घ्यावें व 'पुरोन वाक्या'० व 'याज्या'० या दोन मंत्रांनीं एकेक प्रधानाहुति द्यावी. स्मार्ताग्नींत चार वेळ घेतलेल्या आज्यानें 'अग्नये स्वाहा इंद्राग्निभ्यां स्वाहा' अशा नाममंत्रानेंच दोन प्रधानाहुति द्याव्या. शुक्ल पक्षांत रात्रीं मरण आल्यास सायंकाळचा होम केला असल्यामुळें प्रातःकाळचा होम मात्र अपकर्षानें तत्कालींच करावा. शुक्लपक्षीं पौर्णिमान्त अथवा दर्शान्त होम अथवा इष्टि, प्रधान असलेल्या पूर्णाहुतींनीं करण्याचें कारण नाहीं. शुक्लपक्षांत दिवसा मरण आल्यास कोणत्याही होमाचा अपकर्ष नाहीं. याप्रमाणें कृष्णपक्षांत मरण आल्यासही दैववशात् पूर्णमासेष्टीचा अतिक्रम असल्यास होमाचा अपकर्ष करणें हें प्रधान पूर्णाहुति इत्यादिक आरंभ झाला नसल्यामुळें कृताकृत आहे, असें वाटतें. करणपक्ष असल्यास अतिक्रांत पूर्णमास व पूर्णाहुति यांचें हवन करून पक्षहोम केल्यावर पूर्णाहुति करावी. अरणीवर अग्निसमारोप केला असतां जर पति मृत होईल तर प्रेतास स्पर्श करून अग्निमंथन करावें व प्रत्यवरोहमंत्राचा जप करून बारा वेळ घृत घेऊन अमंत्रक हवन करावें आणि प्रेतक्रिया करावी. विच्छिन्न श्रौताग्नीस मरण आल्यास जें प्रेताधान करावें, तें असें:—प्रेतास अग्निशाळेंत ठेवून जवळ अरणी ठेवावी आणि 'यस्याग्नयो जुव्हतो प्रेतं जयन्तु' या यजुर्मंत्रानें मंथन करून अग्निकुंडांत नेल्यावर बारा वेळ घेतलेल्या आज्यानें अमंत्रक होम करावा व त्या अग्नीनें दहनादिक करावें. अग्नि नष्ट झाले असतां व अरणीचा नाश झाला असतां यजमान मृत झाल्यास 'मनोज्योति०' या ऋचेनें दोन अरणी कराव्या. शेषकर्म पूर्वीप्रमाणेंच करावें.

स्मार्ताग्निमतःस्मार्ताग्निर्यदिविच्छिन्नस्ततोयतोविच्छेदस्तावत्कालगणनया-पूर्वाधोक्तरीत्याप्रायश्चित्तंतदैवकुर्यात्संकल्पयेद्वा प्रायश्चित्तान्तेहोमद्रव्यंस्थालीपाकद्रव्यंचतावत्कालगणनयादेयम् ततोरणिपक्षेपूर्ववदरणीमन्थनम् पक्षान्तरेऽमुकशर्मणोऽग्निविच्छेदनिमित्तकंदाहायाग्निसिद्ध्यर्थंप्रेताधानंकरिष्येइतिसंकल्प्यायतनेसंभाराक्षिक्षिप्यलौकिकाग्निंप्रतिष्ठाप्याज्यंसंस्कृत्यायाश्चेतिमन्त्रेणयस्याग्नयइतिपूर्वोक्तमन्त्रेणचहुत्वाव्याहृतिचतुष्टयंजुहुयात् एवमौपासनःसिद्धोभवति पत्नीमरणेप्येवमेवेतिभट्टाः एवंविधुरस्यापिश्रौताग्निगृह्याग्निपरिग्रहसत्त्वे यथायथंतत्तदग्निभ्यांदाहः विधुरस्याग्निपरिग्रहोत्तरंतद्विच्छेदेपूर्वोक्तरीतिभ्यांतत्तदग्न्योराधानम् ॥

**स्मार्ताग्निविच्छेद**—ज्यास स्मार्ताग्नि असेल त्याचा स्मार्ताग्नि विच्छिन्न झाला असेल तर ज्या दिवसापासून अग्नीचा विच्छेद झाला तितके दिवस

भोजून पूर्वार्धांत सांगितल्याप्रमाणें तत्कालींच प्रायश्चित्त करावें किंवा संकल्प करावा. प्रायश्चित्त केल्यावर तितक्या कालाची गणना करून होमद्रव्य व स्थालीपाकद्रव्य द्यावें. नंतर अरणीपक्ष असेल तर पूर्वीप्रमाणेंच अरणीचें मंथन करावें. दुसरा पक्ष असल्यास 'अमुक शर्मणोऽग्निविच्छेदनिमित्तकं दाहायाग्निसिद्ध्यर्थं प्रेताधानं करिष्ये' असा संकल्प करावा व त्या स्थानीं सर्व सामग्री सिद्ध करून लौकिकाग्नीची स्थापना केल्यावर आज्यास संस्कार करून 'अयाश्च०' या मंत्रानें व 'यस्याग्नयो'० या पूर्वोक्त मंत्रानें हवन करून चार व्याहृतिमंत्रांनीं होम करावा. असें केलें असतां औपासनाग्नि सिद्ध होतो. पत्नी मृत असतांही असाच निर्णय जाणावा, असें भट्ट म्हणतात. विधुरानेंही श्रौताग्नि धारण केले असतील तर यथायोग्य त्या त्या अग्नीनें दहन करावें. विधुरानें अग्नि धारण केल्यानंतर त्याचा नाश झाल्यास पूर्वोक्त रीतींनीं त्या त्या अग्नीचें आधान करावें.

**अगृहीतगृह्याग्निकयोःसभार्यविधुरयोर्ब्रह्मचारिसमावृत्तयोश्चानुपनीताविवाहितपुत्रकन्ययोश्चनिरग्निकभार्याविधवयोश्चकपालाग्निनालौकिकाग्निनावा-दाहः अग्निवर्णकपालेकरीषादिनोत्पादितोभूर्भुवःस्वःस्वाहेत्याज्याहुत्या-संस्कृतोग्निःकपालाग्निः लौकिकाग्निश्चान्त्यजाग्निपतिताग्निसूतिकाग्निचिताग्न्य-मेध्याग्निभिन्नोग्राह्यः यस्यानयतिशूद्रोग्निंतृणकाष्ठहवींषिवा । प्रेतत्वंचसदा-तस्यशूद्रःपापेनलिप्यते ॥ १ ॥ आहिताग्निदंपत्योःपूर्वपतिमरणेपत्युःसर्वाग्नि-भिर्दाहः पश्चान्मृतभार्यायास्तु निर्मंथ्याग्निनाकपालाग्निनावा पूर्वभार्यामरणे-तुतस्याअपिसर्वाग्निभिर्दाहःकार्यः सर्वपात्राण्यपितस्यैदेयानि पश्चान्मृतस्यतु-पत्युःपुनराधानेनत्रेताग्निसत्वेतेनदाहःआधानाकरणेनिर्मंथ्येनलौकिकाग्निनावे-तिकेचित् याज्ञिकाचारोपिप्रायेणैवमेव ॥**

**कापालाग्नि**—गृह्याग्नि धारण न केलेला सपत्निक व विधुर, ब्रह्मचारी व समावर्तन झालेला, अनुपनीत पुत्र व अविवाहित कन्या, निरग्निक भार्या व विधवा यांचा दाह कपालाग्नीनें किंवा लौकिकाग्नीनें करावा. अग्निवर्ण कपालांत गोवरी इत्यादि साधनानें उत्पन्न केलेला व 'भुर्भुवः स्वःस्वाहा' या मंत्रानें आज्याहुतीनें संस्कार केलेला जो अग्नि तो कापालाग्नि होय. लौकिक अग्नि घेणें तो अंत्यजाग्नि, पतिताग्नि, सूतिकाग्नि, चिताग्नि व अशुद्धाग्नि यांवांचून घ्यावा. अग्नि, तृण, काष्ठें व होमद्रव्यें हीं ज्याचीं शूद्र आणितो त्याचें प्रेतत्व सर्वकाळ राहतें व तो शूद्र पापानें लिप्त होतो. आहिताग्निदंपतींतून पूर्वी पति मृत झाल्यास सर्व अग्नींनीं पतीचें दहन करावें. पश्चात् मृत झालेल्या स्त्रीचें दहन निर्मंथ्याग्नीनें किंवा कपालाग्नीनें करावें. पूर्वी स्त्री मृत झाल्यास सर्व अग्नींनीं तिचें दहन करावें व सर्व पात्रेंही द्यावींत. स्त्रीच्या मागून पति मृत झाल्यास पुनराधान करून तीन अग्नींनीं दहन करावें. आधान केलें नसल्यास निर्मंथ्याग्नि किंवा लौकिकाग्नि यांतून एकानें दहन करावें, असें कोणी ग्रंथकार म्हणतात व याज्ञिकांचा आचारही बहुधा असाच आहे.

अत्रनिर्णयसिन्धुः साग्नेःपत्नीमृतौद्वौपक्षौ पुनर्विवाहेच्छायांपूर्वाग्निभिर्भार्यां दग्ध्वापुनर्दारक्रियांकुर्यात्पुनराधानमेवचेत्येकःपक्षः दाहयित्वाग्निहोत्रेणस्त्रियं-वृत्तवतींपतिः । इत्यादिवचनजातानिपुनर्विवाहेच्छुपराण्येव पुनर्विवाहाशक्तौ निर्मथ्याग्निनातांदग्ध्वापूर्वाग्निष्वेवाग्निहोत्रहोमेष्ट्यादिचातुर्मासादि कार्यम् सोम-यागोनकार्यः पूर्वाग्न्येकदेशेनदहेदितियज्ञपार्श्वदेवयाज्ञिकादयःयानितुतस्माद पत्नीकोप्यग्निहोत्रमाहरेदितिश्रुतिस्मृत्यादिवचनानितानिपूर्वाग्निष्वेवाग्निहोत्र-पराणिनत्वपत्नीकस्याधानार्थानि अपत्नीकस्याधाननिधायकमूलवचनाभावा-त्दारकर्मणियद्यशक्तआत्मार्थमग्न्याधेयमित्यापस्तम्बसूत्रंतु पुनर्विवाहाशक्तौ-पूर्वकृतमग्न्याधेयमात्मार्थमेवस्थाप्यंनपत्न्यैदद्यादित्येवंपरम् ब्राह्मणभाष्या-परार्काशार्करामाण्डारादिमतमप्येवमेव येत्वपत्नीकस्याधानमाहुस्तदाशयंन-विद्मइति इदंनिर्णयसिन्धुमतमेवयुक्तंभाति याज्ञिकानामाचरस्त्वन्तर्गूढविवाहे-च्छामूलकोनप्रामाण्यापादकः पुनर्विवाहाशयासर्वाग्निदानेपश्चाद्विवाहासंभवे सिन्धुमतेआधानाभावान्निर्मथ्याग्निरेवशरणम् केषांचिन्मतेपुनराधानम् अत्र-निर्मथ्यादिनापूर्वमृतभार्यादाहपक्षेपूर्वाग्नीनामुत्सर्गेष्ट्यात्यागंकृत्वापुनराधानं-कृत्वाग्निहोत्रंकार्यमितिकेचिदाहुः एवंस्मार्ताग्निमतःपूर्वभार्यामरणेपि गृह्याग्न्ये-कदेशेनतांदहेदवशिष्टाग्नौनित्यहोमस्थालीपाकाग्रयणानिकार्याणि अत्रसर्वत्र श्रौतस्मार्तेचकुशपत्नीविधानेनैवाधानादिकर्माधिकारः ॥

**कुशपत्नीविधानाधानकर्माधिकार**—साग्निकाची स्त्री मृत झाल्यास जे दोन पक्ष आहेत त्यांपैकीं पहिला पक्ष–पुनः विवाह करण्याची इच्छा असल्यास पूर्वींच्या अग्नीनें स्त्रीचें दहन करून पुनः विवाह करून पुनराधान करावें, व दुसरा पक्ष पतीनें सुशील अशा स्त्रियेचें अग्निहोत्रानें दहन करावें, इत्यादिक जीं सर्व वचनें तीं पुनः विवाह करूं इच्छिणाराविषयींच होत. पुनः विवाह करण्यास असमर्थ असल्यास निर्मथ्याग्नीनें तिचें दहन करून पूर्वींच्या अग्नीचे ठायींच अग्निहोत्र, इष्टि व चातुर्मास्यादिक करावें. सोमयाग करूं नये. पूर्वींच्या अग्नींतून अल्प अग्नि घेऊन त्यानें दहन करावें, असें यज्ञपार्श्व व देवयाज्ञिकादिक म्हणतात, म्हणून अपत्निकानेंही अग्निहोत्र धारण करावें, अशीं जीं श्रुतिस्मृत्यादि वचनें आहेत तीं पूर्वींचे अग्नीचे ठायींच अग्निहोत्र धारण करणाराविषयीं होत. अपत्निकास आधानाचें विधान सांगणारीं नव्हत. कारण, अपत्निकास आधानाचा विधि सांगणारें मूळ वचन नाहीं. विवाहास जर असमर्थ असेल तर आपणासाठीं अग्नीचें आधान करावें, असें जें आपस्तंब सूत्र तें पुनः विवाह करण्यास सामर्थ्य नसतां पूर्वीं केलेल्या अग्नीचें आधान आपणासाठींच ठेवावें, स्त्रियेस देऊं नये, याविषयीं आहे. ब्राह्मणभाष्य, अपरार्क, आशार्क, रामांडार इत्यादि ग्रंथांचें मतही असेंच आहे. अपत्निकानें आधान करावें असें जे ग्रंथकार म्हणतात तें आम्ही जाणत नाहीं, असें जें निर्णयसिंधूचें मत तेंच योग्य आहे असें वाटतें. याज्ञिकांचा आचार तर अंतर्गत जी गुप्त विवाहाची इच्छा तन्मूलक आहे. प्रामाण्य दाखविणारा नाहीं. पुनः विवा-

हाचे आशेनें जर सर्व अग्नि दिले तर मग विवाहाचा असंभव असेल तर निर्णय-सिंधूच्या मतानें आधानाचा अभाव असतां निर्मंथ्याग्नीच ग्रहण करावा. कित्येकांच्या मतें पुनराधान करावें, याविषयीं निर्मंथ्याग्नीनेंच पूर्वी मृत झालेल्या स्त्रियेचें दहन करावें, अशा पक्षीं पूर्वींच्या अग्नीचा उत्सर्गेष्टीनें त्याग केल्यावर पुनराधान करून अग्निहोत्र करावें, असें कांहींचें म्हणणें आहे. याप्रमाणेंच स्मार्ताग्निमानाची स्त्री पूर्वी मरण पावली असतांही गृह्याग्नीच्या एक अंशानें तिचें दहन करावें व अवशिष्टाग्नीचे ठायीं नित्य होम, स्थालीपाक व आग्रयण हीं करावींत. येथें सर्व ठिकाणीं श्रौतस्मार्ता-विषयींही कुशपत्नीविधानानेंच आधानादि कर्माचा अधिकार आहे.

अनेकभार्यस्यज्येष्ठायांजीवन्त्यांकनिष्ठभार्यामरणेनिर्मथ्यादिनातांदहेत् न-श्रौतस्मार्ताग्निभिः केचित्पूर्वसर्वाग्निभिःकनिष्ठांदग्ध्वाज्येष्ठयासहपुनराधानं-कार्यमित्याहुस्तदग्निद्वयसंसर्गपरंमतांतरपरंवाबोध्यम् दाहकालेऽग्निनाशेतु यज-मानेचितारूढेपात्रन्यासेकृतेसति । वर्षाद्यभिहतेवह्नौचितादिस्थेकथंचन ॥ १ ॥ तदार्धदग्धकाष्ठानितानिनिर्मथ्यतंदहेत् ॥

**निर्मथ्याग्निदहन**—ज्यास अनेक भार्या असतील त्याची ज्येष्ठ भार्या जिवंत असून कनिष्ठ भार्या मरण पावल्यास निर्मथ्याग्नीनेंच तिचें दहन करावें, श्रौतस्मार्ताग्नींनीं करूं नये. पूर्वी सर्व अग्नींनीं कनिष्ठेचें दहन करून ज्येष्ठ पत्नीसहवर्तमान पुनराधान करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. तें दोन अग्नींचा संसर्ग जेथें असतो तत्पर किंवा दुसरें जें मत तत्पर आहे, असें जाणावें. दहनकालीं अग्नीचा नाश होईल तर यजमान चितारूढ करून यज्ञपात्रें स्थापन केलीं असतां चितेवरील अग्नि पर्जन्यवृष्टि इत्यादिकानें नष्ट झाल्यास तीं अर्धदग्ध झालेलीं काष्ठें मंथन करून त्या अग्नीनें त्याचें दहन करावें.

अथगृहात्स्मशानेशवनयनादिप्रकारः । तत्रविप्रप्रेतंनगरपश्चिमद्वारेणशूद्रं-दक्षिणद्वारेणनिःसार्यसजातीयाःशवंप्रच्छादितमुखंप्राक्शिरसंदाहदेशंनयेयुः पूर्वोक्तोग्निःशवाग्रेन्येननेतव्यः प्रेताग्न्योर्मध्येन्येननगन्तव्यम् सर्वेसपिण्डाद-योधः कृतोपवीतामुक्तकेशाज्येष्ठपुरःसराःप्रेतमनुगच्छेयुः प्रेतश्चनग्नोनदग्धव्यः निःशेषतश्चनदाह्यः शववस्त्रंचस्मशानवासिभ्योदेयम् प्रेतश्चकेशनखादिवाप-यित्वासंस्नाप्यगन्धपुष्पाद्यैरलंकृत्यदग्धव्यः दिनेमृतोदिवैवदाहोरात्रिमृतस्य-रात्रावेव दिवावारात्रौवास्थितःशवःपर्युषितः पर्युषितशवंपञ्चगव्येनस्नापयित्वा-प्राजापत्यत्रयंकृत्वादहेत् मुखस्थसप्तच्छिद्राणिहिरण्यशकलैराच्छादयेत् अत्र-पात्रन्यासोमन्त्रवद्दाहादिविधिश्चस्वस्वसूत्रानुसारिश्रौतस्मार्तान्त्येष्टिप्रयोगेषु-ज्ञेयः ततोदाहान्तेघटस्फोटादिकंकार्यम् शिलाविपर्ययेपिघटस्फोटस्यनावृत्तिः ततश्चितामप्रदक्षिणंसर्वेपर्यावृत्यसचैलंस्नात्वाचम्यसगोत्रसपिण्डसमानोदकानां-मातामहीमातामहयोराचार्यादेश्चदुहितृभगिन्योश्चावश्यंतिलाञ्जलिंदद्युः त-द्यथा वृद्धपूर्वादक्षिणामुखाअमुकगोत्रनामाप्रेतस्तृप्यत्वितिमन्त्रेणाञ्जलिनास-कृत्पाषाणेसिञ्चेयुः अत्रस्नानोदकदानेऽपनःशोशुचदघमितिमन्त्रेण स्नानमेव-

तेनमन्त्रेणेत्यन्ये स्त्रीणांतुमन्त्रोनास्तिमातुलपितृष्वसृमातृष्वसृस्वस्रीयश्वशुर-मित्रयाजकादीनामुदकदानंकृताकृतम् करणपक्षेपिनाश्मन्येवेतिनियमः व्रात्य-ब्रह्मचारिपतितव्रतिक्लीबचोराश्चनोदकंदद्युः तत्रव्रात्यायथाकालमुपनयनहीनाः व्रतिनःप्रक्रान्तप्रायश्चित्ताः चोराःसुवर्णतत्समद्रव्यापहारिणः ब्रह्मचारिभि-र्मातापितृपितामहमातामहगुर्वाचार्यादीनामुदकदानंकार्यम् प्रक्रान्तप्रायश्चित्तै-स्तुतदन्तेउदकदानंत्रिरात्राशौचंचकार्यम् व्रात्यादिभिःप्रेतस्पर्शवहनदाहादिण्डा-दिकमपिनकार्यम् अन्याभावे ब्रह्मचार्यपिपित्रादेर्दाहमाशौचंकुर्यात् कर्मलोप-स्तुनास्तीत्युक्तम् इदंचोदकदानमेकवाससापसव्येनैव उदकदानोत्तरंपुनःस्नात्वा-वस्त्राणिनिष्पीड्यकुलवृद्धाः पुत्रादीन्पूर्वेतिहासैःसमाश्वास्य विप्रानुमत्या-कनिष्ठानुक्रमेणगृहंगत्वानिम्बपत्राणिशनैर्भक्षयित्वाचम्याग्न्युदकगोमयादीन्-स्पृष्ट्वा द्वाराश्मनिपदंनिधायगृहंप्रविशेयुः निम्बपत्रभक्षणंकृताकृतम् ततस्तद्दिने उपवसेयुः उपवासाशक्तावयाचितलब्धेनान्यगृहपक्केनवैकेनैवहविष्यान्नेनवर्तेरन् ॥

**प्रेतनयनप्रकार**—तोंड झांकलेलें व पूर्वेकडे मस्तक केलेलें असें ब्राह्मणाचें प्रेत नगराच्या पश्चिम दारानें व शूद्राचें दक्षिण दारानें बाहेर काढून स्मशानांत न्यावें. पूर्वी सांगितलेला अग्नि प्रेताच्या पुढें दुसऱ्यानें न्यावा. प्रेत व अग्नि यांच्यामधून दुसऱ्यानें जाऊं नये. मेलेल्याच्या सर्व सपिंडांनीं अधोभागीं उपवीति करून व केश मोकळे सोडून ज्येष्ठांच्या मागून प्रेताच्या मागें जावें. नग्नशव दहन करूं नये व अगदींच निःशेषही जाळूं नये. शववस्त्र स्मशानवाशाला द्यावें. प्रेताची केश व नखें काढून व त्याला स्नान घालवून त्याची गंधपुष्पादिकांनीं पूजा केल्यावर त्याला जाळावें. दिवसां मेल्यास दिवसासच व रात्रीं मेल्यास रात्रींच दहन करावें. दिवसां किंवा रात्रीं प्रेत जाळणें राहिल्यास तें शिळें ( पर्युषित ) होतें. तशा स्थितींतल्या प्रेताला पंचगव्याचें स्नान घालून तीन प्राजापत्यें केल्यावर तें दहन करावें. तोंडावरचीं सात छिद्रें (एक तोंड, दोन नाकपुड्या, दोन डोळे व दोन कान) सोनें घालून झांकावींत. पात्रस्थापन व दहनविधि ज्याच्या त्याच्या सूत्राप्रमाणें श्रौत व अन्त्येष्टि प्रयोगांत पहावेत. दहनोत्तर घट फोडणें वगैरे करावें. अश्मा हरवला तरी घट फोडण्याची द्विरावृत्ति करूं नये. सर्वांनीं चितेला उलटी प्रदक्षिणा घालून व वस्त्रासह स्नान करून आचमन केल्यावर—सगोत्र, सपिंड, समानोदक, मातामही, मातामह, आचार्यादिक, कन्या व बहीण यांस जो अवश्य तिलांजलि द्यावा तो असा—'अमुक गोत्र-नामा प्रेतस्तृप्यतु' या मंत्रानें ओंजळीनें अश्म्यावर पाणी सोडावें. स्नानोदक देणें असल्यास—'आपनः शोशुदघं' या मंत्रानें द्यावें. कोणी याच मंत्रानें स्नान करण्यास सांगतात. स्त्रियांनीं मंत्रावांचूनच उदक द्यावें. मामा, आत, मावशी, भाचा, सासरा, मित्र व उपाध्याय यांस उदकदान कृताकृत आहे. देणें असलें तरी तें अश्म्यावरच द्यावें असें नाहीं, व्रात्य, ब्रह्मचारी, पतित ( बाट्या ), व्रती, षंढ व चोर यांनीं तिलांजलि देऊं नये. योग्य वेळीं मुंज न झालेले ते व्रात्य होत. प्रायश्चित्ताला आरंभ केलेले ते व्रती होत. सोनें व त्या सारखेंच द्रव्य उपटणारे ते चोर होत.

ब्रह्मचाऱ्यांनीं—आई, बाप, आजा, आईचा बाप, गुरु व आचार्य यांना उदकदान करावें. ज्यांनीं प्रायश्चित्ताला आरंभ केला आहे अशांनीं प्रायश्चित्ताची समाप्ति झाल्यावर तिलांजलि देऊन तीन रात्री सुतक धरावें. व्रात्यांनीं प्रेताला स्पर्श, त्याचें दहन, वहन व पिंड—हीं करूं नयेत. दुसरा अधिकारी नसला तरच ब्रह्मचाऱ्यानें आपला बाप वगैरेंचें प्रेतदहन करावें व सुतक धरावें, पण कर्मलोप करूं नये, असें सांगितलें आहे. तिलोदक अपसव्यानें व एक वस्त्रानेंच द्यावें. तिलोदकदानानंतर स्नान करून वस्त्रें पिळून, कुळांतल्या वृद्धांनीं पूर्वेतिहास सांगत पुत्रादिकांचें समाधान करावें. ब्राह्मणाच्या परवानगीनें कनिष्ठामागून ज्येष्ठांनीं घराकडे जाऊन कडुनिंबाचीं पानें सावकाश खावीं व मग आचमन केल्यावर—अग्नि, उदक व गोमय यांना स्पर्श करून दाराच्या दगडी पायरीवर ( अश्मा ) पाय देऊन घरांत शिरावें. निंबाचीं पानें खावींत किंवा खाऊं नयेत, पण त्या दिवशीं उपास मात्र जरूर करावा. उपास करणें अशक्य असल्यास, याचनेवांचून मिळालेलें व दुसऱ्याच्या घरीं शिजलेलें असें एकच हविष्यान्न खावें.

तत्राशौचमध्येमाषमांसापूपमधुरलवणदुग्धाभ्यङ्गताम्बूलक्षाराणिवर्ज्यानि क्षाराणितु तिलमुद्गादृतेशैम्ब्यंसस्येगोधूमकोद्रवौ । धान्याकंदेवधान्यंचशमीधान्यंतथैवच ॥ १ ॥ स्विन्नधान्यंतथापण्यंमूलंक्षारगणःस्मृतः । केचित्सैन्धवंभक्ष्यमित्याहुः आदर्शस्त्रीसङ्गद्यूतादिहसनरोदनोच्चासनानिनित्यंत्यजेयुः बालवृद्धातुरवर्जंतृणकटास्तीर्णभूमौपृथक्शयीरन् नकम्बलाद्यास्तीर्णभूमौ मार्जनादिरहितमेवस्नानम् अस्थिसंचयनादूर्ध्वंभार्यापुत्रव्यतिरिक्तानांशय्यासनादिभोगोस्त्येव स्त्रीसंगस्तुनास्ति ॥

**अशौचवर्तन**—अशौचांत माष, मांस, अपूप, मधुर, लवण, दूध, अभ्यंग, तांबूल व क्षार हे पदार्थ वर्ज्य करावेत. तिल व मूग, यांशिवाय शेंगेंत उत्पन्न होणारें धान्य, कोंड्यासकट गहूं व कोद्रु हीं धान्यें आणि धन, देवधान्य, शमीधान्य , ( मूग, उडीद, राजमाष, कुळीथ, हरभरे, तिल, वाटाणा व तूर ) स्विन्नधान्य, पण्य, मालकांगोणी व मुळा हे क्षारपदार्थ जाणावेत. सैंधव भक्षण करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. आरसा, स्त्रीसंग, द्यूतादिक, हंसणें, रडणें, उच्चासन हीं नित्य वर्ज्य करावींत. बाल, वृद्ध व रोगी वर्ज्य करून तृणाच्या हंऱ्या पसरलेल्या भूमिवर निरनिराळी निद्रा करावी. कांबळें अंथरलेल्या भूमीवर निद्रा करूं नये. मार्जनादिक न करितां स्नान करावें. अस्थिसंचयन झाल्यावर भार्या व पुत्र यांहून इतरांस आंथरूण, आसन इत्यादि भोग आहेत पण स्त्रीसंग करूं नये.

अस्थिसंचयनंतुसमन्त्राग्निदाहदिनादारभ्यप्रथमदिनेद्वितीयेतृतीयेचतुर्थेसप्तमे नवमेवागोत्रजैःसहस्वस्वसूत्रोक्तप्रकारेणकार्यम् तत्रद्विपादत्रिपादनक्षत्राणिकर्तुर्जन्मनक्षत्रंचवर्ज्यम् संभवेर्कभौममन्दवारावर्ज्याः पालाशदाहास्थिदाहयोः सद्यःसंचयनम् अस्थ्नांगङ्गांभसितीर्थान्तरेवाप्रक्षेपःतद्विधिर्वक्ष्यते अरण्येवृक्षमूलेनिखननंवा अस्थीन्यन्यकुलस्यस्यनीत्वाचान्द्रायणंचरेत् । दययान्यस्यापि-

नयनेमहापुण्यम् अस्थ्नांश्वसूकरशूद्रादिस्पर्शेपञ्चगव्यशालग्रामतुलस्युदकैः प्रोक्षणम् अशौचमध्येस्वगोत्रजैःसहभोक्तव्यंतच्चदिवैव भोजनंचमृन्मयेषुपर्ण-पुटकेषुवाकार्यम् नतुधातुपात्रेषु ॥

**अस्थिसंचयनविधि**—समंत्रक अग्नीनें दहन झाल्या दिवसापासून पहिला, दुसरा, तिसरा, चौथा, सातवा अथवा नववा या दिवशीं गोत्रजांसहवर्तमान आपापल्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें अस्थिसंचयन करावें व तें करतांना द्विपाद व त्रिपाद नक्षत्रें व कर्त्याचें जन्मनक्षत्र हीं वर्ज्य करावींत. शक्य असल्यास रवि, भौम व शनि हे वार वर्ज्य करावेत. पालाशविधीनें दहन व अस्थि-दहन असतां तत्कालीं अस्थिसंचयन करावें. अस्थि गंगेच्या उदकांत अथवा दुसऱ्या तीर्थांत टाकाव्या. त्याविषयीं विधि पुढें सांगेन. अरण्यांत अथवा वृक्षमूळाचे ठायीं अस्थि पुरून ठेवाव्या. अन्य कुळांतील मनुष्याच्या अस्थि नेल्यास चांद्रायण करावें. दुसऱ्याच्याही अस्थि दयेनें नेल्या असतां महापुण्य प्राप्त होतें. कुत्रा, डुक्कर, शूद्र इत्यादिकांचा अस्थींस स्पर्श झाल्यास पंचगव्य, शालग्राम व तुलसी यांच्या उदकाचें प्रोक्षण करावें. अशौचांत आपल्या गोत्रजांसहवर्तमान दिवसांच भोजन करावें. भोजन मृत्तिकापात्रांत अथवा पत्रावळीवर करावें, धातुपात्रांत करूं नये.

दाहदिनादारभ्यदशपिण्डादशदिनमध्येदर्भास्तीर्णभूमावमन्त्रकंदेयाः क्षत्रिया-दीनांनवपिण्डानवदिनान्तंदशमपिण्डस्त्वाशौचान्त्यदिने प्रथमेऽहनियोदेशो-यश्चकर्तायच्चतण्डुलादिद्रव्यंयच्चोत्तरीयाशिलापाकपात्रादितदेवदशाहान्तम् एत-दन्यतमव्यत्ययेयतोव्यत्ययस्ततः पुनरावृत्तिःशिलाविपर्ययेपिघटस्फोटादेर्ना-वृत्तिरित्युक्तेर्लौकिकशिलाग्राहणम् तेनापिण्डदानातिलाञ्जल्यादिकस्यैवावृत्तिर्न-दाहस्य केचिदाचार्यविपर्ययेप्यावृत्तिमाहुः यत्रपुत्रादिमुख्यकर्तुरसान्निधानाद-मुख्याधिकारिणापिण्डदानक्रियारब्धातत्रमध्येपुत्रादिसन्निधानेप्यमुख्यकर्त्रैव-दशाहान्ताक्रियासमापनीया एकादशाहादिकंतुपुत्रादिमुख्येनैव समन्त्रकदाह-मात्रेऽन्येनकृतेतुपिण्डदानादिदशाहकृत्यंसन्निकृष्टमुख्येनैवकार्यमितिमिताक्षरा-दयःअन्येतुसगोत्रोऽसगोत्रोवा यःसमन्त्रकदाहकर्तासएवदाशाहकत्यंकुर्यादि-त्याहुः पत्न्याःकर्तृत्वे रजोदर्शनेजातेसातदन्तेकुर्यात् कर्तुरस्वास्थ्येन्येनसर्वाः क्रियाःपुनःकार्याः पिण्डद्रव्येषुतण्डुलामुख्याः तदभावेफलमूलशाकतिलमिश्र-सक्तवोपि प्रेतश्राद्धेषुपितृशब्दस्वधाशब्दानुशब्दाःपुष्पधूपदीपदानादौमन्त्रा-श्चनवाच्याःत्र्यहाशौचेपर्णशरदाहादौप्रथमेदिनेएकःपिण्डः द्वितीयेचत्वारः तृतीयेपञ्चेतिक्रमोबोध्यः पुत्रेणपर्णशरदाहेकृतेतुतस्यदशाहाशौचान्तेनत्र्यह-मध्येपिण्डसमाप्तिर्नकार्या शिरस्त्वाद्येनपिण्डेनप्रेतस्यक्रियतेसदा । द्वितीयेनतु-कर्णाक्षिनासिकाः तृतीयेनकण्ठस्कन्धभुजवक्षांसि चतुर्थेननाभिलिङ्गगुदानि पञ्चमेनजानुजङ्घपादम् षष्ठेनमर्माणि सप्तमेननाडयः अष्टमेनदन्तलोमानि नवमेनवीर्यम् दशमेनतुपूर्णत्वंतृप्तताक्षुद्विपर्ययः । जलंदशाहमाकाशेस्थाप्यं-क्षीरंचमृन्मये १ प्रेतात्रस्नाहीत्युदकम् इदंपिबेतिचक्षीरम् इदंचकृताकृतम्

**ततःप्रेतोपकृतयेदशरात्रमखण्डितम् । कुर्यात्प्रदीपंतैलेनवारिपात्रंचमार्तिकम् १ भोज्याद्भोजनकालेतुभक्तमुष्टिंचनिर्वपेत् । नाममोत्रेणसंबुद्ध्याधरित्र्यांपितृयज्ञवत् २ भूर्लोकात्प्रेतलोकंतुगन्तुंश्राद्धंसमाचरेत् । तत्पाथेयंहिभवतिमृतस्यमनुजस्यच ॥ ३ ॥**

**प्रेतक्रिया व पाथेयश्राद्ध**—दहनाच्या दिवसास आरंभ करून दहा दिवसांत दहा पिंड दर्भ पसरलेल्या भूमीवर अमंत्रक द्यावे. क्षत्रियादिकांनीं नऊ दिवसपर्यंत नऊ पिंड द्यावे व दहावा पिंड अशौचाच्या शेवटच्या दिवशीं द्यावा. पहिल्या दिवशीं जें स्थल, जो कर्ता, जें तंदुलादि द्रव्य, जी उत्तरी, जो अश्मा व जें पाक करण्याचें पात्र, असतील तींच दहा दिवसपर्यंत घ्यावींत. त्यांतून एखाद्याचा विपर्यास झाल्यास ज्या दिवसापासून विपर्यास झाला त्या दिवसापासून पुनरावृत्ति करावी. अश्म्याचा विपर्यास झाला तरी घट फोडणें इत्यादिकांची आवृत्ति करूं नये, असें सांगितलें आहे. म्हणून दुसरा दगड ( अश्मा ) घ्यावा. यावरून पिंडदान, तिलांजलि इत्यादि कर्मांचीच आवृत्ति करावी. दहनाची करूं नये असें ठरतें. आचार्यांचा म्हणजे क्रिया सांगणाराचा विपर्यास झाला तरी आवृत्ति करावी, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. जेव्हां पुत्रादिक मुख्य कर्ता जवळ नसल्यानें अमुख्य अधिकाऱ्यानें पिंडदानक्रिया आरंभिली असेल तेव्हां पुत्रादिकांचें मध्यंतरीं सान्निध्य झालें तरी अमुख्य कर्त्यानेंच दहा दिवसपर्यंतची क्रिया समाप्त करावी. पण अकराव्या दिवसाची क्रिया पुत्रादिक मुख्यानेंच करावी, समंत्रक दहन मात्र दुसऱ्यानें केलें असल्यास पिंडदानादिक दहा दिवसांची क्रिया समीपस्थ मुख्यानेंच करावी, असें मिताक्षरादिक ग्रंथ म्हणतात. सगोत्र किंवा असगोत्र जो समंत्रक दहन करणारा त्यानेंच दहा दिवसपर्यंत क्रिया करावी, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. क्रिया करणारी पत्नी असून ती रजस्वला झाल्यास रजोदर्शनशुद्धीनंतर तिनें क्रिया करावी. कर्त्यास अस्वास्थ्य असल्यास दुसऱ्यानें सर्व क्रिया पुनः कराव्या. पिंडाच्या द्रव्यांत तांदूळ हे मुख्य होत. तांदूळ नसल्यास फल, मूल, शाक किंवा तिलमिश्र असलेल्या यवांचें पीठही घ्यावें. प्रेतश्राद्धाचे ठायीं पितृशब्द, स्वधाशब्द, अनुशब्द व पुष्प, धूप, दीपदान, इत्यादिकांविषयीं मंत्र म्हणूं नयेत. तीन दिवसांचे अशौचांत पालाशविधि दहनादिक झालें असल्यास पहिल्या दिवशीं एक पिंड, दुसऱ्या दिवशीं चार पिंड व तिसऱ्या दिवशीं पांच पिंड देण्याचा क्रम जाणावा. पुत्रानें पालाशविधीनें दहन केलें असतां त्यास दहा दिवस अशौच आहे. म्हणून तीन दिवसांत पिंडांची समाप्ति करूं नये. प्रथम पिंडानें प्रेतास सर्वकालशिर प्राप्त होतें, दुसऱ्या पिंडानें कर्ण, नेत्र व नासिक, तिसऱ्या पिंडानें कंठ, स्कंध, भुज व वक्षस्थळ, चौथ्या पिंडानें नाभिलिंग व गुद, पांचव्यानें गुडघे, मांड्या व पाय, सहाव्यानें मर्मस्थानें, सातव्यानें नाड्या, आठव्यानें दांत व लोम, नवव्यानें वीर्य व दहाव्या पिंडानें पूर्णपणा, तृप्तता व क्षुधेचा विपर्यास हीं होतात. मातीच्या भांड्यांत उदक व दूध घालून दहा दिवस आकाशांत म्हणजे अंतरालांत ठेवावें. 'प्रेतात्रस्नाहि' असें म्हणून उदक व 'इदंपिब'

असें म्हणून दूध ठेवावें. हें करावें किंवा न करावें. नंतर प्रेतावर उपकार करण्यासाठीं दहा रात्रींपर्यंत तेलाचा अखंड दीप लावावा. मातीचें भांडें उदकानें भरून ठेवावें. भोजनसमयीं भक्षण करण्याचे अन्नांतून भाताची मूठ घेऊन संबोधन—विभक्तीनें नामगोत्राचा उच्चार केल्यावर ती पितृयज्ञाप्रमाणें भूमीवर द्यावी. भूलोकापासून प्रेतलोकापर्यंत जाण्यासाठीं मृत मनुष्याचें जें श्राद्ध करावें तें पाथेयश्राद्ध होय.

अथदशाहमध्येदर्शपातेनिर्णयः पिण्डदानादौप्रारब्धेयदिमध्येदर्शप्राप्तिस्तदामातापितृव्यतिरिक्तानांसर्वदशाहकृत्यमाकृष्य दर्शएवसमापनीयम् मातापितृविषयेतुत्र्यहमध्येदर्शपातेनापकर्षः त्रिरात्रात्परंदर्शपातेतुपित्रोरपिसर्वंदर्शेएवसमापनीयमितिकेचित् अन्येतुत्रिरात्रोर्ध्वमपिदर्शपातेऔरसपुत्रेणपित्रोस्तन्त्रसमाप्तिर्नकार्येत्याहुः अत्रदेशाचाराद्व्यवस्थेतिसिन्ध्वादयः यदिदैवाद्दर्शात्पूर्वं पिण्डदानादितन्त्रंनारब्धंतदादाहमात्रेसमन्त्रकेजातेपिनदर्शेतन्त्रसमाप्तिनियमइतिभाति दर्शोत्तरमेवतन्त्रारम्भसमाप्तिसंभवेन द्विरैन्दवेतुकुर्वाणःपुनः शावंसमश्नुतइत्युक्तदोषाप्रसक्तेः एवंदर्शेपकृष्यतन्त्रसमाप्तावप्यग्निपिण्डदातुर्दशाहामाशौचमस्त्येव पुत्रादेःसपिण्डस्यतुसुतराम् दशाहप्रेतपिण्डान्प्रदायास्नात्वाभुक्तावसपिण्डस्यत्रिरात्रोपवासः सपिण्डस्योपवासएकः मत्याद्विगुणम् प्रेतकृत्यंकुर्वतासंचयनादर्वाक्स्त्रीसङ्गेकृतेचान्द्रायणम् ऊर्ध्वंकृच्छ्रत्रयम् अन्येषामाशौचिनांसंचयनादर्वाक्त्रिरात्रंद्रुत्तरमेकोपवासः ॥

**सुतकांतील दर्शनिर्णय**—पिंडदान इत्यादि कर्मांचा आरंभ केला असतां मध्येंच दर्श प्राप्त झाला तर मातापिताव्यतिरिक्तांचें दहा दिवसांचें सर्व कृत्य अपकर्षानें दर्शदिवशींच संपवावें, पण मातापितरांविषयीं तीन दिवसांत दर्श प्राप्त झाल्यास अपकर्ष करूं नये. तीन दिवसांनंतर दर्श प्राप्त झाल्यास मातापितरांचेंही कृत्य दर्शदिवशींच संपवावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. तीन दिवसांनंतरही दर्श प्राप्त झाल्यानें औरस पुत्रानें मातापितरांची तंत्रसमाप्ति म्हणजे अपकर्षानें कृत्य समाप्त करूं नये, असें कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें आहे. यासंबंधीं देशाचारानुरूप व्यवस्था करावी, असें निर्णयसिंधु इत्यादि ग्रंथकार म्हणतात. दैववशानें दर्शाचे पूर्वीं पिंडदानादि तंत्र आरंभिलें नाहीं व दहनमात्र समंत्रक झालें तरी दर्शदिवशीं तंत्रसमाप्तीविषयीं नियम नाहीं, असें वाटतें. कारण दर्शानंतरच तंत्राचा आरंभ व समाप्ति होणार असल्यानें २ चंद्रांनीं युक्त अशा कालीं कर्म करणारास पुनः अशौच प्राप्त होतें असा जो दोष सांगितला आहे तें जमत नाहीं. याप्रमाणें दर्शदिवशीं अपकर्ष करून तंत्रसमाप्ति असतां अग्नि व पिंड देणारास दहा दिवस अशौच आहेच. पुत्रादिक सपिंडांस तर निःसंशयच आहे. प्रेतास दहा दिवसपर्यंत पिंड देऊन स्नान न करितांच भोजन केल्यास असपिंडांनीं त्रिरात्र उपवास करावा व सपिंडांनीं एक उपवास करावा. समजून स्नान न करितां भोजन केल्यास दुप्पट उपवास करावे. प्रेतकृत्य करणारानें अस्थिसंचयनापूर्वीं स्त्रीसंग केल्यास चांद्रायण करावें, व अस्थिसंचयनानंतर तीन कृच्छ्र करावें. इतर अशौचीयांस अस्थिसंचयनापूर्वीं त्रिरात्र उपवास व त्यानंतर एक उपवास.

अथनवश्राद्धम्। प्रथमेह्नितृतीयेचपञ्चमेसप्तमेतथा। नवमैकादशेचैवतन्नवश्राद्धमुच्यते ॥ १ ॥ नवश्राद्धानिपञ्चाहुराश्वलायनशाखिनः। आपस्तम्बाः षडित्याहुर्विभाषाम्बितरेषुहि ॥ २ ॥ पञ्चपक्षेएकादशाहेनवश्राद्धंनकार्यम् एतान्येवविषमश्राद्धानीत्युच्यन्ते नवश्राद्धानिदशाहान्तर्नवमिश्रंतुवत्सरइत्यन्यत्र अकृत्वातुनवश्राद्धंप्रेतत्वान्नैव मुच्यते। नवश्राद्धंत्रिपक्षंचषण्मासंमासिकानिच। नकरोतिसुतोयस्तुस्याधःपितरोगताः ॥ १ ॥ अर्घ्यहीनमधूपंचगन्धमाल्याविवर्जितम्। नवश्राद्धममन्त्रंस्यादवनेजनवर्जितम् २ आशिषोद्विगुणादर्भाजयाशीःस्वस्तिवाचनम् पितृशब्दःस्वसंबन्धःशर्मशब्दस्तथैवच ॥ ३ ॥ पात्रालम्भोवगाहश्चउल्मुकोल्लेखनादिकम् तृप्तिप्रश्नश्चविकिरः शेषप्रश्नस्तथैवच ॥ ४ ॥ प्रदक्षिणाविसर्गश्चसीमान्तगमनंतथा। अष्टादशपदार्थाश्चप्रेतश्राद्धेविवर्जयेत् ॥ ५ ॥ तिलोसीतिमन्त्रेस्वधानमःपितृशब्दाननवाच्याः किंतु प्रेतशब्दोहेनतूष्णींवातिलावपनम् तूष्णीमर्घ्यदानम् अमुष्मैस्वाहेतिप्रेतनाम्नापाणिहोमः बह्वृचानांसर्वैकोद्दिष्टेष्वग्नौकरणमस्त्येव अन्यशाखिनांतुतन्निषेधः नाम्नैकःपिण्डः निनयनमन्त्रेऊहः अनुमन्त्रणादिकंत्वमन्त्रकम् अभिरम्यतामितिविसर्जनम् एवंनवश्राद्धवर्ज्यैकोद्दिष्टेषु नवश्राद्धंत्वमन्त्रकंसर्वमितिनारायणवृत्तिः उत्तानंस्थापयेत्पात्रमेकोद्दिष्टसदाबुधः। न्युब्जंतुपार्वणेकुर्यात्तस्योपरिकुशान्न्यसेत् १ सपिण्डीकरणान्तानिप्रेतश्राद्धानिलौकिकाग्नावित्याश्वलायनमतम् नवश्राद्धानिसंभवेऽन्नेनकुर्यादन्यथामान्नेन ॥

**नवश्राद्ध**—पहिला, तिसरा, पांचवा, सातवा, नववा व अकरावा या दिवशीं जें श्राद्ध तें नवश्राद्ध होय. आश्वलायनशाखी नवश्राद्धें पांच सांगतात, अपस्तंबशाखी सहा म्हणतात व इतर शाखीयांस विकल्पच सांगतात. पांच या पक्षीं अकराव्या दिवशीं नवश्राद्ध करूं नये. या नवश्राद्धासच विषम श्राद्धें असें म्हणतात. नवश्राद्धें दहा दिवसांचे आंत करावींत. व नवमिश्रश्राद्ध वर्षांतीं करावें, असें दुसरीकडे सांगितलें आहे. नवश्राद्ध केलें नाहीं तर प्रेतत्वापासून मुक्त होत नाहीं. नवश्राद्ध, त्रयपक्षिक, षाण्मासिक व मासिकें हीं श्राद्धें जो पुत्र करीत नाहीं त्याचे पितर अधोयोनीस जातात. अर्घ्यविरहित, धूपरहित, गंधपुष्पवर्जित, अमंत्रक व पाद्यरहित असें नवश्राद्ध जाणावें. आशीर्वाद, द्विगुणधर्म, जप, आशीर्वादस्वस्तिवाचन, पितृशब्द, स्वसंबंध, शर्मशब्द, पात्रालंभ, अवगाह, उल्मुक, उल्लेखनादिक, तृप्तिप्रश्न, विकिर, शेषप्रश्न, प्रदक्षिणा, विसर्जन, व सीमेपर्यंत जाणें या अठरा गोष्टी प्रेतश्राद्धांत वर्ज्य कराव्या. 'तिलोसि' या मंत्रांत स्वधाशब्द, व पितृशब्द यांचा उच्चार करूं नये. प्रेतशब्दाच्या ऊहानें किंवा अमंत्रक तिल टाकावे. अर्घ्यदान अमंत्रक करावें. 'अमुष्मै स्वाहा' या मंत्रानें प्रेताच्या नांवानें पाणिहोम करावा. ऋग्वेदांत सर्व एकोद्दिष्ट श्राद्धांत अग्नौकरण आहेच व इतर शाखीयांस याविषयीं निषेध आहे. त्रिनयनमंत्रांत म्हणजे उदक देण्याचे मंत्रांत ऊह करावा. अनुमंत्रणादिक अमंत्रक करावें. 'अभिरम्यतां०' या मंत्रानें विसर्जन करावें, असें नवश्राद्ध वर्ज्य करून एकोद्दिष्ट श्राद्धाचे ठायीं

जाणावें. नवश्राद्ध सर्व अमंत्रक करावें, असें नारायणवृत्तींत म्हटलें आहे. शहाण्या मनुष्यानें एकोद्दिष्ट श्राद्धांत पात्र उताणें मांडावें, पण पार्वणश्राद्धीं पात्र उपडें मांडून त्यावर कुश ठेवावे. सपिंडीकरणापर्यंत प्रेतश्राद्धें लौकिकाग्नीवर करावींत असें आश्वलायनाचें मत आहे. शक्य असल्यास नवश्राद्धें अन्नानें करावींत व अशक्य असल्यास आमान्नानें करावींत.

**विघ्नेतु नवश्राद्धंमासिकंचयद्यदन्तरितंभवेत्तत्तदुत्तरश्राद्धेनसहतन्त्रेणकार्यम् शावेआशौचान्तरप्राप्तौनवश्राद्धानिकुर्यादेव सहगमनेतु नवश्राद्धानिभिन्नानि-सपिण्डीकरणंपृथक् । एकएववृषोत्सर्गोगौरेकातत्रदीयते १ शूद्रस्यामन्त्रकंसर्व-द्विजवन्नाम्नैवकार्यमितिस्मृत्यर्थसारः अत्रवयोधिकमरणेतत्कनिष्ठानांसपिण्डा-नांदशमेहनिमुण्डनंकेचिदाहुः मातापित्राचार्येषुमृतेषुनियमेनदशमेहनिमुण्डनम् एवंभर्तरिमृतेस्त्रियाअपिमुण्डननियमः पुत्राणांसर्वेषांदाहकर्तुश्चदाहाङ्गभूतंप्रथम-दिनेदशमदिनेचमुण्डनम् अत्रदेशाचाराद्व्यवस्था अत्ररात्रिमृतस्यरात्रौदाहेपि-प्रातरेवमुण्डनमित्युक्तम् ॥**

**विघ्नांतरितनवश्राध्दविधि**—विघ्न असल्यास नवश्राद्ध मासिक व जें जें अंतरित श्राद्ध असेल तें तें पुढच्या श्राद्धासह एकतंत्रानें करावें. मृताशौचांत अन्याशौच प्राप्त झाल्यास नवश्राद्धें करावींतच. सहगमन असल्यास सर्व नवश्राद्धें करावींत सपिंडीकरण निरनिराळें करावें. वृषोत्सर्ग एकच करावा. स्त्रीच्या वृषोत्सर्गांत एक गाय द्यावी. शूद्राचें सर्व कर्म अमंत्रक नाममंत्रानेंच द्विजासारखें करावें, असें स्मृत्यर्थसारग्रंथांत म्हटलें आहे. या स्थलीं वयानें अधिक असा मृत झाल्यास मृताच्या कनिष्ठ सपिंडांनीं दहाव्या दिवशीं मुंडन करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. मातापिता व आचार्य हे मरण पावले असतां नियमानें दहाव्या दिवशीं मुंडण करावें. भर्ता मृत असतांही नियमानें स्त्रियेनेंही मुंडण करावें. सर्व पुत्रांनीं व दहनकर्त्यानें पहिल्या दिवशीं व दहाव्या दिवशीं दहनांगभूत मुंडण करावें. याविषयीं देशाचाराप्रमाणें व्यवस्था करावी. रात्रीं मृत झालेल्याचें रात्रीं दहन केलें तरी दुसऱ्या दिवशीं प्रातःकालींच मुंडण करावें, असें म्हटलें आहे.

**ततोदशमेहनिपूर्ववस्त्रशुद्धिंगृहशुद्धिंचकृत्वागौरसर्षपतिलकल्केनसशिरः-स्नानंकृत्वानववस्त्रेपरिधायपरिहितवस्त्राणिप्रेतवस्त्राणिचान्त्यजेभ्यआश्रितेभ्य-श्चदत्वासुवर्णादीनिमङ्गलवस्तूनिस्पृष्ट्वागृहंप्रविशेत् ॥**

**दहाव्या दिवसाचें कर्म**—दहाव्या दिवशीं पूर्ववस्त्रशुद्धि व गृहशुद्धि करून पांढरे शिरस व तीळ यांच्या कल्कानें डोकीवरून स्नान करावें, व नवीं वस्त्रें परिधान करून पूर्वीं धारण केलेलीं वस्त्रें व प्रेताचीं वस्त्रें अंत्यजास व आश्रितांस देऊन सुवर्णादिक मंगलवस्तूंस स्पर्श करून गृहांत प्रवेश करावा.

**अथास्थिक्षेपविधिः तत्रादौसंचयनदिनेऽस्थिस्थापनप्रकारः प्रेतस्थानेबलिं-दत्वाक्षीरेणाभ्युक्ष्यवाग्यतः । प्रेतस्यास्थीनिगृह्णीयात्प्रधानाङ्गोद्भवानिच १ पञ्च-**

गव्येनसंस्नाप्यक्षौमवस्त्रेणवेष्टयच । प्रक्षिप्यमृन्मयेभाण्डेनवेसाच्छादनेशुभे २ अरण्येवृक्षमूलेवाशुद्धेसंस्थापयेदथ । सूक्ष्माण्यस्थीनि तद्भस्मनीत्वातोये विनिक्षिपेत् ३ततःसंमार्जनंभूमेःकर्तव्यंगोमयाम्बुभिः । पूजांचपुष्पधूपाद्यैर्बलिभिः पूर्ववच्चरेत् ४ तत्स्थानाच्छनकैर्नीत्वातीर्थेवाजाह्नवीजले । कश्चिच्चप्रक्षिपेत्पुत्रो-दौहित्रोवासहोदरः ५ मातुःकुलंपितृकुलंवर्जयित्वानराधमः । अस्थीन्यन्यकुल-स्थस्यनीत्वाचान्द्रायणंचरेत् ६ गङ्गातोयेषुयस्यास्थिक्षिप्यतेशुभकर्मणः । नतस्यपुनरावृत्तिर्ब्रह्मलोकात्सनातनात् ७ अस्तंगतेगुरौशुक्रेतथामासेमलिम्लुचे गङ्गायामस्थिनिक्षेपंनकुर्यादितिगौतमः ८ दशाहान्तरस्थिप्रक्षेपेतुनास्तादिदोषः दशाहाभ्यन्तरेयस्यगङ्गातोयेस्थिमज्जति गङ्गायांमरणंयादृक्तादृक्फलमवा-प्नुयात् ॥

**अस्थिक्षेपविधि**—मौन धारण करून व प्रेताचे स्थानीं बळी देऊन दुधानें चितास्थान प्रोक्षण करावें. प्रेताच्या मुख्य अंगांच्या अस्थि घ्याव्या व नंतर त्यास पंचगव्यानें स्नान घालून क्षौम ( रेशमी ) वस्त्रांत बांधल्यावर मृत्तिकेच्या नवीन चांगल्या भांड्यांत घालून त्यावर झांकण घालावें व अरण्यांत अथवा शुद्ध वृक्षाच्या मुळाशीं तें भांडें पुरून ठेवावें व नंतर सूक्ष्म अस्थि व रक्षा नेऊन उदकांत टाकावींत. यावर गोमययुक्त उदकानें भूमीचें संमार्जन करून पुष्प, धूप इत्यादिक व बळी यांनीं पूर्वीप्रमाणें तिची पूजा करावी. नंतर पुत्र, दौहित्र किंवा सखा किंवा भ्राता ह्यांतून कोणीही त्या स्थानापासून अस्थि नेऊन तीर्थांत किंवा जान्ह-वीच्या उदकांत टाकाव्या. मातेचें कुल व पितृकुल यांवांचून अन्य कुलांतील मनुष्याच्या अस्थि नेणारा नराधम होय. त्यानें चांद्रायण करावें. ज्या पुण्यवंताच्या अस्थि गंगेच्या उदकांत पडल्या त्याची शाश्वत अशा ब्रह्मलोकापासून पुनरावृत्ति होत नाहीं. गुरुशुक्रांचे अस्त व मलमास असतां गंगेंत अस्थि टाकूं नयेत, असें गौतम म्हणतो. दहा दिवसांच्या आंत अस्थि टाकणें असल्यास अस्तादि दोष नाहीं. दहा दिवसांचे आंत ज्याच्या अस्थि गंगेंत टाकल्या त्यास गंगेच्या ठायीं मरण प्राप्त झालें असतां जें फळ मिळतें तेंच मिळेल.

अथतीर्थेस्थिक्षेपंकर्तुंतत्पूर्वाङ्गविधिः यत्रास्थीनिनिखातानितांभूमिंसचैल-स्नानपूर्वकंपृथग्गोमूत्रादिभिःप्रोक्षयेत् तत्रगायत्र्यागोमूत्रेण गन्धद्वारामितिगो-मयेन आप्यायस्वेतिक्षीरेण दधिक्राव्णइतिदध्ना घृतंमिमिक्षइतिघृतेन उपसर्प-तिचतसृणामृचांशङ्खःपितरस्त्रिष्टुप् भूप्रार्थनखननमृद्भुद्धरणास्थिग्रहणेषुक्रमेण-विनियोगः ताभिर्ऋग्भिः क्रमेणास्थिग्रहणांतानिकर्माणिकृत्वास्वयंजलाशये-गृह्योक्तविधिनास्नायात् ततोस्थिशुद्धिंकुर्यात् सायथा अस्थीनिस्पृष्ट्वैतोन्विंद्र-मितितृचावृत्त्यापञ्चगव्यैःस्नात्वास्पृष्ट्वैवदशस्नानानिकुर्यात् तत्रगायत्र्यादिपञ्च-मन्त्रैर्गोमूत्रगोमयक्षीरदधिसर्पिःस्नानानिकृत्वा देवस्यत्वेतिकुशोदकेन मान-स्तोकेतिभस्मना अश्वक्रान्तेरथक्रान्तेइतिमृदा मधुवाताइतिमधुना आपोहिष्ठेति-शुद्धोदकेनचस्नायात् एवंदशस्नानानिकृत्वाऽस्थ्नांकुशैर्मार्जनंकुर्यात् तत्रमन्त्रः

अतोदेवाइत्यृक् अथसप्तसूक्तानि एतोन्विंद्रं० ३ शुचीवो० ३ नतमंहोन० ८ इतिबाइति० १३ स्वादिष्टयेति० १० ममाग्नेवर्चो० ९ कद्रुदायप्र० ९ ततोयदीयान्यस्थीनितस्यकृतसपिण्डीकरणस्यपार्वणविधिनाश्राद्धमस्थिप्रक्षेपाङ्गभूतंहिरण्येनकुर्यात् सक्तुनाचपिण्डदानं दशाहान्तरस्थिक्षेपकरणेएकोद्दिष्टविधिनाश्राद्धम् ततस्तिलतर्पणंकृत्वापञ्चगव्यपञ्चामृतशुद्धोदकैरस्थीनिप्रक्षाल्ययक्षकर्दमेनालिप्यपुष्पैःप्रपूज्याऽजिनकम्बलदर्भभूर्जपत्रशाणपट्टवस्त्रताडपत्राणांक्रमेणसप्तधासंवेष्टयताम्रसंपुटेस्थापयेत् तत्रयक्षकर्दमलक्षणम् द्वादशकर्षचन्दनंकुङ्कुमंचषट्कर्षःकर्पूरश्चतुःकर्षाकस्तूरीचैतेषांमेलनाद्यक्षकर्दमः ततोस्थिषुहेमरौप्यखण्डानिमौक्तिकप्रवालनीलमणींश्चप्रक्षिप्यस्वसूत्रोक्तविधिनास्थण्डिलाग्निप्रतिष्ठादिकृत्वाष्टोत्तरशतंतिलाज्याहुतीर्जुहुयात् उदीरतांशंखःपितरस्त्रिष्टुप् अस्थिप्रक्षेपाङ्गतिलाज्यहोमेविनियोगः उदीरतामितिसूक्तस्यचतुर्दशऋग्भिःप्रत्यृचमाहुतिरित्येवंसूक्तस्यसप्तावृत्तिभिरवशिष्टदशाहुतीः प्रथमऋगावृत्त्येत्येवमष्टोत्तरशतंतिलाहुतिरष्टोत्तरशतमाज्याहुतीश्चजुहुयात् सवेष्टनास्थिसमुच्चययुतंताम्रसंपुटमादायतीर्थंगच्छेत् तत्रानियमाः मूत्रपुरीषोत्सर्गकालेआचमनकालेचनास्थीनिधारयेत् शूद्रयवनान्त्यजादिकांस्वहीनजातिमस्थिधारणकालेनस्पृशेदिति काशीखण्डे ततस्तीर्थंप्राप्यतीर्थप्राप्तिनिमित्तकंस्नानादिविधायास्थीनिस्नापयित्वामुकगोत्रस्यामुकशर्मणोब्रह्मलोकादिप्राप्तयेऽमुकतीर्थेस्थिप्रक्षेपमहंकरिष्येइतिसंकल्प्यपलाशपर्णपुटेपञ्चगव्येनास्थीन्यासिच्यहिरण्यशकलमाल्यघृततिलमिश्रितास्थीनिमृत्पिण्डेनिधायदक्षिणांदिशमेवक्षमाणोनमोस्तुधर्मायेतिवदंस्तीर्थेप्रविश्यनाभिमात्रजलेस्थित्वासमेप्रीतोस्त्वित्युक्त्वातीर्थेक्षिपेत् ततःस्नात्वाजलाद्बहिरागत्यसूर्यंदृष्ट्वाहरिंस्मृत्वाविप्राययथाशक्तिरजतंदक्षिणांदद्यात् अमुकस्यास्थिक्षेपःकृतस्तत्साङ्गतार्थंरजतमिदंतुभ्यंसंप्रददेइति इत्यस्थिप्रक्षेपप्रकारः

**अस्थिक्षेपाचा पूर्वाङ्गविधि**—आधीं सचैल स्नान करून जेथें अस्थि पुरून ठेवल्या असतील ती भूमि निरनिराळ्या गोमूत्रादिकांनीं प्रोक्षण करावी. गायत्रीमंत्रानें गोमूत्रानें, 'गंधद्वारा' या मंत्रानें गोमयानें, 'आप्यायस्व' या मंत्रानें दुधानें, 'दधिक्राव्णो' मंत्रानें दह्यानें व 'घृतं मिमिक्षे' या मंत्रानें घृतानें प्रोक्षण करावें. नंतर 'उपसर्पेति चतसृणांऋची... क्रमेण विनियोगः' या चार ऋचांनीं क्रमानें भूमीची प्रार्थना करून भूमि खणून माती एकीकडे सारावी व अस्थि काढून घेतल्यावर कर्त्यानें जलाशयांत गृह्योक्तविधीनें स्नान करावें. नंतर अस्थींची शुद्धि करावी ती अशी:—अस्थींस स्पर्श करून 'एतोन्विंद्रं.' या तीन ऋचांचे आवृत्तीनें पंचगव्यानें स्नान करून स्पर्श करूनच दहा स्नानें करावींत याविषयीं वर सांगितलेल्या गायत्र्यादि पांच मंत्रांनीं गोमूत्र, गोमय, दूध, दधि व घृत, यांनीं स्नानें करावींत व 'देवस्यत्वा०' या मंत्रानें कुशोदकानें, 'मानस्तोके०' या मंत्रानें भस्मानें, 'अश्वक्रांते०' या मंत्रानें मृत्तिकेनें 'मधुवाता०' या मंत्रानें मधानें व 'आपोहिष्ठा०' या मंत्रानें शुद्धोदकानें स्नान करावें. अशीं दहा स्नानें केल्यावर अस्थींवर दर्भांनीं

मार्जन करावें. मार्जनमंत्रः—'अतोदेवा०' ही ऋचा, व 'एतोन्विंद्रं० ३' शुचि ओ. ३ नतमंहोन ८ इति वा इति० १३ स्वादिष्टया० १० ममाग्नेवर्चो० ९ कद्रुद्राय प्र० ९' हीं सात सूक्तें. नंतर ज्याच्या अस्थि असतील त्याचें सपिंडीकरण झालें असल्यास पार्वणविधीनें अस्थिक्षेपांगभूत जें श्राद्ध तें हिरण्यानें करावें, व पिठाचे पिंड द्यावे. दहा दिवसांचे आंत अस्थि टाकणें असल्यास एकोद्दिष्टविधीनें श्राद्ध करावें. नंतर तिलतर्पण करून पुनः पंचगव्य, पंचामृत व शुद्धोदक यांनीं अस्थि धुऊन यक्षकर्दमांनीं लिप्त कराव्या व पुष्पांनीं त्यांची पूजा करावी. कृष्णाजिन, कंबल, दर्भ, भूर्जपत्र, तागाचें वस्त्र व ताडपत्र यांचीं क्रमानें सात वेळ वेष्टनें देऊन तांब्याचे करंड्यांत त्या ठेवाव्या. त्यांतलें यक्षकर्दमाचें लक्षण सांगतोंः—बारा तोळे चंदन, बारा तोळे केशर, सहा तोळे कापूर व चार तोळे कस्तुरी हे पदार्थ एकत्र मिळवून केलेला तो यक्षकर्दम होय. नंतर अस्थींच्या ठायीं सोन्यारुप्याचे तुकडे, मोतीं, पोवळीं, व नीलमणी हीं टाकून आपल्या सूत्रांत सांगितलेल्या विधीनें स्थंडिलावर अग्निस्थापनादि केल्यावर अष्टोत्तरशत तिल व आज्य यांच्या आहुतींनीं होम करावा. 'उदीरतां शंखः पितरस्त्रिष्टुप। अस्थिप्रक्षेपांगतिलाज्यहोमेविनियोगः' हा मंत्र म्हणून 'उदीरतां' या सूक्ताच्या पंधरा ऋचांनीं प्रत्येक ऋचेस एक आहुति याप्रमाणें सूक्ताच्या सात आवृत्ति करून व शेष दहा आहुति पहिल्या ऋचांच्या आवृत्तीनें, याप्रमाणें अष्टोत्तरशत (१०८) तिलाहुति व अष्टोत्तरशत आज्याहुति यांचा होम करावा. नंतर वेष्टनासहित अस्थियुक्त तो तांब्यांचा करंडा घेऊन तीर्थास जावें, त्याविषयीं नियमः—मूत्रपुरीषोत्सर्गकालीं व आचमनकालीं अस्थि जवळ ठेवूं नयेत, अस्थि धारण केल्या असतील तेव्हां शूद्र, यवन, अंत्यज इत्यादिकांस व आपणांहून हीनजातीयांस स्पर्श करूं नये, असें काशीखंडांत सांगितलें आहे. नंतर तीर्थास जाऊन तीर्थप्राप्तनिमित्तक स्नानादिक करून अस्थींस स्नान घालावें व 'अमुकगोत्रस्यामुकशर्मणो ब्रह्मलोकादिप्राप्तयेऽमुकतीर्थये अस्थिप्रक्षेपमहं करिष्ये'—असा संकल्प करून पळसाचे द्रोणांतल्या पंचगव्यानें अस्थींस सिंचन करून, सुवर्णशकलें, पुष्पें, घृत व तिल यांनीं मिश्रित अशा त्या अस्थि मृत्तिकेच्या पिंडांवर ठेवून दक्षिण दिशेस पाहात असतां 'नमोऽस्तु धर्माय' असें म्हणून तीर्थांत प्रवेश करावा व नाभिप्रमाण उदकांत उभें राहून 'समेप्रीतोऽस्तु' असें म्हणून तीर्थांत अस्थि टाकाव्या. नंतर स्नान करून उदकांतून बाहेर येऊन सूर्याचें दर्शन घेऊन हरीचें स्मरण करावें. व 'अमुकस्यास्थिक्षेपः कृततत्सांगतार्थं रजतमिदं तुभ्यं संप्रददे' असें म्हणून ब्राह्मणास यथाशक्ति रौप्यदक्षिणा द्यावी. असा हा अस्थि टाकण्याचा प्रकार आहे.

अथैकादशाहकृत्यम् एकादशाहेप्रातरुत्थायगृहानुलेपनंकृत्वास्पृष्टसर्ववस्त्रक्षालनपूर्वकंसर्वसपिण्डानांसचैलस्नानान्तेसंध्यापञ्चमहायज्ञादिकर्माणि शुद्धिः एकादशाहेसङ्गवकालेस्नानाच्छुद्धिरितिकेचित् एकादशाहेपुत्रादेः कर्तुरपिपञ्चमहायज्ञाद्यधिकारः सपिण्डानांदर्शवार्षिकश्राद्धेष्वप्यधिकारः नान्दीश्राद्धमात्रंचतुःपुरुषसपिण्डैःसपिण्डीकरणात्प्राक्नकार्यम् ॥

**अकराव्या दिवसाचें कृत्य**—अकराव्या दिवशीं प्रातःकालीं उठून घराचें सारवण केल्यावर अशौचास स्पर्श केलेलीं वस्त्रें धुऊन सचैल स्नान करावें. स्नानानंतर संध्या व पंचमहायज्ञादि कर्मास सपिंडांची शुद्धि होते. अकराव्या दिवशीं संगवकालीं स्नानानें शुद्धि होते, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. अकराव्या दिवशीं पुत्रादि कर्त्यासही पंचमहादि कर्मांचा अधिकार जसा प्राप्त होतो, तसाच सपिंडांसही दर्श व वार्षिक श्राद्धाचा अधिकार प्राप्त होतो, पण नांदीश्राद्ध मात्र चार पुरुषांपर्यंतच्या सपिंडांनीं सपिंडीकरणाचे पूर्वी करूं नये.

**ततोदशाहकर्मकारीअमुख्यःकर्तामुख्योवापुत्रादिः कर्मावृषोत्सर्गाद्येकादशाहिकंसर्वकर्मकुर्यात् एकादशाहेप्रेतस्ययस्यनोत्सृज्यतेवृषः । प्रेतत्वंसुस्थिरंतस्यदत्तैः श्राद्धशतैरपि १ अत्रस्वयमेवसर्वंकुर्यान्नतुकाम्यवृषोत्सर्गवदाचार्यवरणम् अयंगृहेनकार्यः अयंद्वादशाहेप्युक्तः क्वचिन्मृताहेप्युक्तः विषुवद्वितयेचैवमृताहेबान्धवस्यचेति वत्सराभ्यन्तरेपित्रोर्वृषस्योत्सर्गकर्मणि । वृद्धिश्राद्धंनकुर्वीततदन्यत्रसमारभेत् ॥**

**वृषोत्सर्ग**—दहा दिवसांचें कर्म करणाऱ्या अमुख्य कर्त्यानें किंवा मुख्य पुत्रादिक कर्त्यानें अकराव्या दिवसाचें वृषोत्सर्गादिक सर्व कर्म करावें. ज्या प्रेताच्या उद्देशानें अकराव्या दिवशीं वृषोत्सर्ग केला जात नाहीं, त्याचीं शतशः श्राद्धें केलीं तरी त्याचें प्रेतत्व राहतें. ह्या वृषोत्सर्गाचे कालीं सर्व कर्म स्वतःच करावें. काम्य वृषोत्सर्गाप्रमाणें आचार्यवरण करूं नये. हा वृषोत्सर्ग घरीं करूं नये. हा बाराव्या दिवशींही सांगितला आहे. क्वचित् ग्रंथांत मृतदिवशींही सांगितला आहे. तूळ व मेष या संक्रांतीच्या दिवशीं किंवा बांधवाचे मृतदिवशीं हा करावा. एक वर्षाचे आंत मातापितरांचे वृषोत्सर्गकर्मांत वृद्धिश्राद्ध करूं नये. वर्षानंतर करावें.

वृषलक्षणंतु लोहितोयस्तुवर्णेनमुखेपुच्छेचपाण्डुरः । श्वेतःखुरविषाणाभ्यांसनीलोवृषउच्यते ॥ १ ॥ अथवाश्वेतवर्णस्यमुखपुच्छादिश्यामत्वेनीलवृषत्वम् यद्वासर्वश्यामस्यमुखादिश्वेतत्वेनीलवृषत्वम् केचित्तुवृषाभावेमृद्भिःपिष्टैर्वावृषंकृत्वाहोमादिविधिनावृषोत्सर्गइत्याहुः यथाकालाभेयथालाभोद्विवर्षएकवर्षोवावृषोवर्षाधिकाश्चतस्रएकावावत्सतरीस्यात् प्रयोगस्तुस्वस्वसूत्रानुसारीग्राह्यः सव्येनपाणिनापुच्छंसमादायवृषस्यतु । दक्षिणेनापआदायसतिलाःसकुशास्ततः ॥ १ ॥ प्रेतगोत्रंसमुच्चार्यामुकस्मैवृषएषमयादत्तस्तंतारयत्वितिवदन्सहेमजलंभूमावुत्सृजेत् विधारयेन्नतंकश्चिन्नचकश्चनवाहयेत् । नदोहयेच्चतांधेनुंनचकश्चिन्नबन्धयेत् ॥ १ ॥ पतिपुत्रवत्याःसुवासिन्यानवृषोत्सर्गः तत्स्थानेएकापयस्विनीगौर्देया पतिपुत्रयोरन्यतराभावेतुस्त्रीणामपिवृषोत्सर्गः सहगमनेतुस्त्रीणांवृषोत्सर्गस्थानेगौरेव वृषोत्सर्गसाङ्गतार्थंतिलोदकुम्भधेनुवस्त्रहिरण्येतिपञ्चदानानि आशौचान्तरंचेदेकादशाहेप्राप्नोतितदावृषोत्सर्गादिकमाद्यमासिकंशय्यादिदानानिचकुर्यादेव एवंकृतेवृषोत्सर्गफलंवाजिमखोदितम् । यमुद्दिश्योत्सृजेन्नीलंसलभेतपरांगतिम् १ वृषोत्सर्गःपुनात्येवदशातीतान्दशापरान् । इतिवृषोत्सर्गः ॥

**वृषलक्षण**— ज्याचा वर्ण आरक्त असून मुख व पुच्छ यांचा वर्ण पांडुर असेल व ज्याचे खूर व शिंगें पांढरीं असतील तो, अथवा ज्याचा वर्ण श्वेत असून मुख व पुच्छ हीं श्यामवर्ण असतील तो, किंवा सर्वांग श्यामवर्ण असून मुख व पुच्छ श्वेतवर्ण असेल तर तो नीलवृष ( निळा बैल ) होय. वृषाचा अभाव असल्यास मृत्तिकेचा किंवा पिठाचा वृष करून होमादिविधीनें वृषोत्सर्ग करावा, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. यथोक्त वृष न मिळाल्यास जसा मिळेल तसा दोन वर्षांचा, एक वर्षांचा किंवा एक वर्षाहून अधिक वयाचे चार किंवा एक वत्स (कालवड) तरी असावा. याविषयींचा प्रयोग आपापल्या सूत्राप्रमाणें पाहून करावा. डाव्या हातानें वृषाचें पुच्छ धरून उजव्या हातानें तिल व कुश यांसहित उदक घेऊन प्रेताचे गोत्राचा उच्चार केल्यावर 'अमुकस्मै वृष एष मया दत्तस्तं तारयतु' असें म्हणून सुवर्णसहित उदक भूमीवर सोडावें. त्या वृषास कोणीं धरूं नये व त्यास कोणीं कामाला लावूं नये. त्या गाईचें दोहन करूं नये व तिला कोणीं बांधूं नये. पति असून पुत्रयुक्त अशा सुवासिनीचा वृषोत्सर्ग करूं नये. वृषोत्सर्गस्थानीं एक दूध देणारी गाय द्यावी. पति व पुत्र यांतून एक नसेल तर स्त्रियांचाही वृषोत्सर्ग करावा. सहगमन असल्यास स्त्रियांचे वृषोत्सर्गस्थानीं गायच द्यावी. वृषोत्सर्गाच्या सांगतेसाठीं तिल, उदकुंभ, गाय, वस्त्र व हिरण्य हीं पांच दानें करावींत. अकराव्या दिवशीं दुसरें अशौच प्राप्त झाल्यास वृषोत्सर्गादिक आद्य मासिक व शय्यादिक दानें करावींतच. अशा रीतीनें वृषोत्सर्ग केल्यानें अश्वमेधयज्ञाचें फल मिळतें व ज्याच्या उद्देशानें नीलवृषाचा उत्सर्ग केला असतो, तो उत्तम गतीस जातो. वृषोत्सर्ग मागच्या दहा व पुढच्या दहा पुरुषांस पवित्र करितो. असें हें वृषोत्सर्ग कर्म आहे.

अथैकादशाहेमहैकोद्दिष्टम् ॥ इदंचमहैकोद्दिष्टंषोडशश्राद्धेभ्योभिन्नमेव अतएवेदंकरिष्यमाणसर्वैकोद्दिष्टप्रकृतिभूतमित्युच्यते इदंचपाकेनैव अत्रसंति- संभवेविप्रोभोजयितव्यः असंभवेऽग्नौहोमः ब्राह्मणंभोजयेदाद्येहोतव्यमनलेऽथवा । इत्युक्तेः श्मश्रुकर्मतुकर्तव्यंनखच्छेदस्तथैवच । स्नपनाभ्यञ्जनेदद्याद्विप्रायविधिपूर्वकम् ॥ ततःक्षणपाद्यार्घ्यासनगन्धपुष्पाच्छादनान्येवदद्यात् नात्र- धूपदीपौ एकोद्दिष्टंदैवहीनमित्युक्तेरेकएवविप्रः दिवैवचनिमन्त्रणम् एकमर्घ्य- पात्रम् स्वधाशब्दनमःशब्दपितृशब्दानसन्ति तेनप्रत्तः प्रेतइमांल्लोकान्प्रीणया- हिनइतिमन्त्रोहोर्घ्यपात्रे नाभिमन्त्रणम् सर्वप्राचीनावीतिनैवकार्यम् देवकार्या- भावात् अग्नौकरणविकल्पःतत्रचपाणिहोमेपिनतस्यभक्षणंकिंत्वग्नौप्रक्षेपः एक- एवपिण्डःअनुमन्त्रणादिसर्वंमन्त्रकम् स्वदितमितितृप्तिप्रश्नःकात्यायनानाम् अक्षय्यस्थानेउपतिष्ठतामितिवदेत् अभिरम्यतामितिविसर्जनम् अभिरताः स्मेतिविप्रप्रतिवचनम् श्राद्धशेषभोजनंनास्ति अन्तेस्नानम् नवश्राद्धेकोद्दिष्टेतु- सर्वममन्त्रकमित्युक्तम् विप्राभावेत्वग्नावेकोद्दिष्टंयथा अग्नौपायसंश्रपयित्वा- ज्यभागान्तेऽग्नेश्राद्धप्रयोगंकृत्वाग्नौप्रेतपावाह्यगन्धाद्यैःसंपूज्यपृथ्वीतेपात्र- मित्यादिनान्नसंकल्प्योदीरतामवरइत्यष्टाभिश्चतुरावृत्ताभिर्द्वात्रिंशदाहुतीर्हुत्वापिण्डदानादिश्राद्धंसमापयेदिति एवमेतदेकोद्दिष्टंस्त्रीणामपि ॥

**महैकोद्दिष्ट**—हें महैकोद्दिष्ट श्राद्ध सोळा श्राद्धांहून निराळेंच आहे. म्हणून पुढें करावयाचीं जीं सर्व एकोद्दिष्टश्राद्धें त्यांचें हें प्रकृतिभूत (मूळ) आहे असें म्हटलें आहे. हें पाकानेंच करावें. शक्य असल्यास या श्राद्धीं ब्राह्मण भोजनास सांगावा. शक्य नसल्यास अग्नींत होम करावा. कारण, आद्यमासिकांत ब्राह्मणास भोजन घालावें किंवा अग्नींत होम करावा, असें वचन आहे. ब्राह्मणाचें विधिपूर्वक स्मश्रूकर्म व नखच्छेदन करवून स्नान व अभ्यंग हीं त्यास द्यावींत, व नंतर क्षण, पाद्य, अर्घ्य, आसन, गंध, पुष्प, आच्छादन इतके उपचार त्याला द्यावेत. या श्राद्धांत धूपदीप देऊं नयेत. एकोद्दिष्ट देवहीन करावें, असें वचन आहे म्हणून एकच ब्राह्मण सांगावा. त्याला दिवसाच निमंत्रण करावें. अर्घ्यपात्र एकच असावें. स्वधा, नमः व पितृ हे शब्द नसल्यामुळें 'प्रत्तःप्रेत इमांलोकान् प्रीणयाहिनः' असा अर्घ्यपात्राविषयीं मंत्रांत ऊह करावा. अभिश्रवण नाहीं. सर्व कर्म प्राचीनावीतीनेंच करावें. कारण, देवकार्याचा अभाव आहे. अग्नौकरणाचे बाबतींत विकल्प आहे. या श्राद्धांत पाणिहोम केला असतांही तें पिऊं नये, अग्नींत टाकावें. पिंड एकच द्यावा. अनुमंत्रणादिक सर्व अमंत्रक करावें. 'स्वदितं' असा तृप्तिप्रश्न कात्यायनांस युक्त आहे. अध्यक्षस्थानीं 'उपतिष्ठतां' असें म्हणावें. व 'अभिरम्यतां' या मंत्रानें विसर्जन करावें. ब्राह्मणांनीं 'अभिरमताःस्म' असें प्रतिवचन द्यावें. श्राद्धशेषभोजन नाहीं. शेवटीं स्नान करावें. नवश्राद्धसंबंधी एकोद्दिष्टांत सर्व कर्म अमंत्रक करावें असें म्हटलें आहे. ब्राह्मणाचा अभाव असल्यास अग्नींत एकोद्दिष्ट करावें. तें असें:— अग्नींत पायस शिजवून आज्यभागान्त कर्म केल्यावर अग्नीच्या पुढें श्राद्धप्रयोग करून अग्नींत प्रेताचें आवाहन करावें व गंधादिक उपचारानें पूजा करून 'पृथिवीते पात्रं०' या मंत्रानें अन्नाचा संकल्प करावा व 'उदीरतामवर' याप्रमाणें चार आवृत्तींनीं युक्त अशा आठ ऋचांनीं बत्तीस आहुतींनीं हवन करून, पिंडदानादि श्राद्ध समाप्त करावें. अशा रीतीनें हें एकोद्दिष्ट स्त्रियांचेंही करावें.

अथाद्यमासिकम्। तस्यामासादौमासिकंकार्यमितिवचनान्मृताहोमुख्यःकालः सचाशौचप्रतिबन्धादतिक्रान्तइति तदन्तेएकादशेह्नितत्कार्यम् अतएव ब्राह्मणंभोजयेदाद्येहोतव्यमनलेथवा। पुनश्चभोजयेद्विप्रंद्विरावृत्तिर्भवेदिह १ इतिप्रथममासिकार्थे।द्वितीयावृत्तिरुक्त अत्रचद्विरावृत्तिर्भवेदिहेत्युक्तिःषोडशमासिकानांसपिण्डयधिकारार्थमपकृष्यकर्तव्यानांद्वादशाहादौकरणपक्षेयोज्या तेषामेकादशाहएवकरणपक्षेतुषोडशमासिकानांषोडशावृत्तयएकंमहैकोद्दिष्टमितिसप्तदशावृत्त्यापत्त्या।द्विरावृत्तिर्भवेदिहेत्युक्तेरसङ्गतेः तथाचसपिण्डयधिकारार्थापकृष्याणांमासिकानांद्वादशाहेकरणेएकादशाहेमहैकोद्दिष्टोत्तरमतिक्रान्तमाद्यमासिकंकरिष्यइतिसंकल्प्याद्यमासिकमात्रमन्नेनामेनवाविप्रेदर्भबटौवाप्रेतमावाह्यकार्यम् नत्वाद्यमासिकंस्याग्नौहोमः पुनश्चभोजयेद्विप्रमितिविशेषवचनात् इत्थंचमहैकोद्दिष्टमेकमाद्यमासिकमेकमित्येकोद्दिष्टस्यद्विरावृत्तिःस्पष्टैव येत्वाद्यमासिकातिरेकेणमहैकोद्दिष्टस्यैवद्विरावृत्तिंवदन्तितेभ्रान्ताः अत्र-

केचिदाद्याब्दिकस्यापिमृताहएव कालइतितस्याप्यतिक्रान्तत्वादेकादशाहे- आद्यमासिकमाद्याब्दिकंचतन्त्रेणकरिष्यइतिसंकल्प्यद्वयमपितन्त्रेणकार्यमित्याहुः अन्येतुमासादौमासिकंकार्यमाब्दिकंवत्सरेगते इतिवचनाद्द्वितीयवर्षारम्भेप्रथ- माब्दिकमितिनाब्दिकस्यैकादशाहेऽनुष्ठानमित्याहुः एवंत्रिपक्षेसपिण्डीकरण- पक्षेएकादशाहेआद्यमासिकमूनमासे ऊनमासिकंद्वितीयमासारम्भेद्वितीयमासिकं- पक्षत्रयेत्रैपाक्षिकंचैकोद्दिष्टविधिनाकृत्वावशिष्टद्वादशमासिकान्यपकृष्यतथैव- कृत्वासपिण्डीकरणम् एवंपक्षान्तरेषूह्यम् ॥

**मासिकश्राद्ध**—मासाचे प्रथम दिवशीं मासिक करावें, असें वचन असल्यामुळें मृत- दिवस हा मासिकाचा मुख्य काळ आहे पण तो अशौचाचे प्रति- बंधानें अंतरतो म्हणून तें अशौचानंतर अकराव्या दिवशीं करावें. या आद्यमासिकश्राद्धीं ब्राह्मणास भोजन घालावें किंवा अग्नींत होम करावा व पुनः ब्राह्मणास भोजन घालावें अशी या श्राद्धांत द्विरावृत्ति होते, यास्तव प्रथममासिकासाठीं ही अशी द्विरावृत्ति सांगितली. या वचनांत येथें द्विरावृत्ति होईल असें जें सांगितलें तें सपिंड्यधिकारांत अपकर्ष करून कर्तव्य असलेलीं जीं षोडश मासिकें तीं बाराव्या दिवशीं करण्याचा पक्ष असल्यास त्याविषयीं योजावें. षोडशमासिकें अकराव्या दिवशींच करण्याचा पक्ष असल्यास सोळा मासिकांच्या सोळा आवृत्ति व महैकोद्दिष्ट मिळून सतरा आवृत्ति होतात. यास्तव या स्थळीं द्विरावृत्ति होईल या वचनाची संगति लागणार नाहीं. तसेंच सपिंडयधिकारांत अपकर्षानें करावयाचीं मासिकें बाराव्या दिवशीं करणें असल्यास अकराव्या दिवशीं महैकोद्दिष्ट केल्यावर 'अतिक्रांतमाद्यमासिकं करिष्ये' असा संकल्प करून आद्यमासिक मात्र ब्राह्मण किंवा दर्भबटु यांजवर प्रेताचें आवाहन करून अन्नानें किंवा आमान्नानें करावें. आद्यमासिकाचा अग्नींत होम करूं नये. कारण 'पुनः ब्राह्मणास भोजन घालावें' असें वचन विशेष आहे. तात्पर्यः—एक महैकोद्दिष्ट व एक आद्यमासिक याप्रमाणें एकोद्दिष्टाची द्विरावृत्ति स्पष्टच आहे. आद्यमासिकावांचून महैकोद्दिष्टाचीच द्विरावृत्ति करावी, असें जें म्हणतात तें चुकीचें आहे. प्रथमाब्दिकाचाही मृत दिवसच काळ असल्यानें तोही अतिक्रांत होतो, म्हणून अकराव्या दिवशीं 'आद्यमासिकमाद्याब्दिकंच तंत्रेण करिष्ये' असा संकल्प करून, दोन्हीही तंत्रानें करावींत, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. दुसऱ्या ग्रंथकारांचे मतें मासाचे प्रथम दिवशीं मासिक करावें व संवत्सर झाल्यावर वार्षिक करावें असें वचन असल्यामुळें दुसऱ्या वर्षाचे आरंभीं प्रथमाब्दिक करावें. अकराव्या दिवशींच प्रथमा- ब्दिक करावें असेंही आहे. तिसऱ्या पक्षांत सपिंडीकरणाचा पक्ष असतां अकराव्या दिवशीं आद्यमासिक, ऊनमासीं ऊनमासिक, दुसऱ्या मासाच्या आरंभीं द्वितीय मासिक व पक्षत्रयाचे ठायीं त्रैपक्षिक, हीं एकोद्दिष्ट विधीनें करून, अवशिष्ट बारा मासिकें अपकर्षानें तशींच करून सपिंडी करावी. याप्रमाणें दुसऱ्या पक्षाविषयींही जाणावें.

एकादशाहेतन्त्रेणषोडशमासिकापकर्षपक्षेमहैकोद्दिष्टोत्तरंदेशकालौसंकीर्त्या- तिक्रान्तमाद्यमासिकंसपिण्डयधिकारार्थमपकृष्योनमासिकादीन्यूनाब्दिकान्तानि-

पञ्चदशमासिकानिचतन्त्रेणैकोद्दिष्टेनविधिनाकरिष्यइतिसंकल्प्यतन्त्रेणषोडशा-
पिकुर्यात् केचिन्मतेत्वतिक्रान्तेआद्यमासिकाद्याब्दिकेऊनमासिकादीनिचेत्या-
दिसंकल्पः ॥

**एकतंत्रानें सोळा मासिकें**—अकराव्या दिवशीं तंत्रानें षोडश मासिकांचा अपकर्ष करून करण्याचा पक्ष असल्यास महैकोद्दिष्ट केल्यावर देशकालाचा उच्चार करून 'अतिक्रांतमाद्यमासिकं सपिंडयधिकारार्थमपकृष्योन...करिष्ये' असा संकल्प करून तंत्रानें सोळाही मासिकें करावीत. कित्येकांच्या मतें आद्यमासिक व आद्याब्दिक अतिक्रांत असतां 'ऊनादि मासिकादीनिच असा संकल्प करावा, असें आहे.

मासिकानितु आद्यमासिकम् १ ऊनमासिकम् २ द्वितीयमासिकम् ३ त्रैपाक्षिकम् ४ तृतीयमासिकम् ५ चतुर्थमासिकम् ६ पञ्चममासिकम् ७ षष्ठम् ८ ऊनषाण्मासिकम् ९ सप्तममासिकम् १० अष्टमम् ११ नवमम् १२ दशमम् १३ एकादशम् १४ द्वादशम् १५ ऊनाब्दिकम् १६ चेतिक्रमेणज्ञेयानि ॥

**मासिकांचीं नांवें**—१ आद्यमासिक, २ ऊनमासिक, ३ द्वितीय मासिक ४ त्रैपक्षिक, ५ तृतीय मासिक, ६ चतुर्थ मासिक, ७ पंचम मासिक, ८ षष्ठ मासिक, ९ ऊनषाण्मासिक, १० सप्त मासिक, ११ अष्टम मासिक, १२ नवम, १३ दशम, १४ एकादश, १५ द्वादश, १६ ऊनाब्दिक, अशीं क्रमानें 'मासिकांचीं नांवें' जाणावीं.

अथैकादशाहेरुद्रगणश्राद्धम् तच्चैकादशरुद्रोद्देशेनरुद्ररूपप्रेतोद्देशेनवा रुद्रोद्देशपक्षेसव्येन रुद्ररूपप्रेतोद्देशपक्षेऽपसव्येन वीरभद्रः १ शम्भुः २ गिरीशः ३ अजैकपात् ४ अहिर्बुध्न्यः ५ पिनाकी ६ अपराजितः ७ भुवनाधीश्वरः ८ कपाली ९ स्थाणुः १० भगः ११ इत्येकादशरुद्राः अत्रशक्तेनैकैकरुद्रनाम्नैकोविप्रइत्येकादशविप्राभोज्याः अशक्तेनतुसर्वोद्देशेनैकएवविप्रोभोज्यः आमान्नान्येकादशैकंवामान्नंदेयम् अत्रश्राद्धेपिण्डदानार्घ्याग्नौकरणविकिराणामभावः एवमेवाष्टवसुश्राद्धम् एतच्चकृताकृतम् वसुनामान्यप्यन्यत्र एतदेकादशाहकृत्यंत्र्यहाशौचेचतुर्थदिनेकर्तव्यम् द्वितीयदिनेप्रथमदिनेवास्थिसंचयनम् पञ्चमदिनेसपिण्डीकरणम् ॥

**रुद्रगणश्राद्ध**—हें रुद्रगणश्राद्ध एकादश रुद्रांचे उद्देशानें किंवा रुद्ररूप प्रेताचे उद्देशानें करावें. रुद्राचे उद्देशानें करण्याचा पक्ष असल्यास सव्यानें व रुद्ररूप प्रेताच्या उद्देशानें करणें असल्यास अपसव्यानें करावें. १ वीरभद्र, २ शंभु, ३ गिरीश, ४ अजैकपात्, ५ अहिर्बुध्न, ६ पिनाकी, ७ अपराजित, ८ भुवनाधीश, ९ कपाली, १० स्थाणु व ११ भग, असे अकरा रुद्र जाणावे. या श्राद्धीं सामर्थ्य असणारानें एक एक रुद्राचे नांवानें एकक ब्राह्मण असे अकरा ब्राह्मण भोजनास सांगावे. असमर्थानें सर्वांचे उद्देशानें एकच ब्राह्मण भोजनास सांगावा. आमान्नें देणें

असतां अकरा किंवा एक द्यावें. या श्राद्धीं पिंडदान, अर्घ्य, अग्नौकरण व विकिर हीं करूं नयेत. अष्टवसुश्राद्धही असेंच करावें. हें अष्टवसुश्राद्ध कृताकृत आहे. अष्टवसूंचीं नांवेंही दुसऱ्या ग्रंथांत पहावींत. हें अकराव्या दिवसाचें कृत्य तीन दिवसांचें अशौच असतां चवथ्या दिवशीं करावें. दुसऱ्या दिवशीं किंवा पहिल्या दिवशीं अस्थिसंचयन करावें. पांचव्या दिवशीं सपिंडी करावी.

अत्रैकादशाहेद्वादशाहेवापददानानिकार्याणि तेनप्रेतस्यमार्गेसुखंगतिः आसनोपानहच्छत्रंमुद्रिकाचकमण्डलुः । यज्ञोपवीताज्यवस्त्रंभोजनंचान्नभाजनम् ॥ १ ॥ दशकंपदमेतत्स्यात्पदान्येवंत्रयोदश । देयानिवायथाशक्तितेनासौप्रीणितोभवेत् ॥ २ ॥ अन्नंचैवोदकुम्भंचोपानहौचकमण्डलुः । छत्रंवस्त्रंतथायष्टिंलोहदण्डंचदापयेत् ॥ ३ ॥ अग्नीष्टिकांप्रदीपंचतिलांस्ताम्बूलमेवच । चन्दनंपुष्पमालांचोपदानानिचतुर्दश ॥ ४ ॥ वैतरणीधेनूत्क्रान्तिधेनुमोक्षधेन्वादिदानानिगोभूम्यादिदशदानानितिलपात्रदानादीनिमरणकालेनकृतानिचेदेकादशाहादौपुत्रादिभिः प्रेतोद्देशेनकार्याणि अश्वंरथंगजंधेनुंमहिषींशिबिकादिकम् । शालग्रामंपुस्तकंचकस्तुरीकुंकुमादिकम् ॥ १ ॥ दासींरत्नंभूषणादिशय्यांछत्रंचचामरम् । दद्याद्वित्तानुसारेणप्रेतस्तत्तत्सुखंलभेत् ॥ २ ॥

**पददानें**—अकराव्या दिवशीं अथवा बाराव्या दिवशीं पददानें करावींत. म्हणजे प्रेताचे मार्गीं सुखकारक गमन होतें. आसन, उपानह, छत्री, अंगठी, तांब्या, यज्ञोपवीत, घृत, वस्त्र, अन्न व अन्नपात्र हे दहा पदार्थ मिळून पददान होतें. याप्रमाणें तेरा पददानें द्यावींत. किंवा यथाशक्ति द्यावींत म्हणजे मृत सुखी होतो. अन्न, उदकुंभ, उपानह, कमंडलू, छत्री, वस्त्र, काठी, लोहदंड, शेगडी, दीप, तिल, तांबूल, चंदन व पुष्पमाला हीं चौदा उपदानें द्यावीं. वैतरणीधेनु, उत्क्रांतिधेनु, मोक्षधेनु इत्यादिक दानें व गाय, भूमि इत्यादि दशदानें आणि तिलपात्रदानादिक हीं मरणकाळीं केलीं नसल्यास अकराव्या दिवशीं पुत्रादिकांनीं प्रेताचे उद्देशानें करावींत. अश्व, रथ, हत्ती, गाय, महिषी, पालखी, शालग्राम, पुस्तक, कस्तुरी, केशर, दासी, रत्नें, भूषणें, शय्या, छत्री व चवरी हीं दानें जसें द्रव्य असेल त्याप्रमाणें द्यावींत. म्हणजे प्रेतास तें तें सुख प्राप्त होतें.

अथशय्यादानम् एकादशाहेशय्यायादानेएषविधिःस्मृतः । तेनोपभुक्तं यत्किंचिद्वस्त्रवाहनभाजनम् ॥ १ ॥ यद्यदिष्टंचतस्यासीत्तत्सर्वंपरिकल्पयेत् । प्रेतंचपुरुषंहैमंतस्यांसंस्थापयेत्तदा ॥ २ ॥ पूजयित्वाप्रदातव्यामृतशय्यायथोदिता । तस्माच्छय्यांसमासाद्यसारदारुमयींदृढाम् ॥ ३ ॥ दन्तपत्राचितांरम्यांहेमपट्टैरलंकृताम् । हंसतूलिप्रतिच्छन्नांशुभगण्डोपधानिकाम् ॥ ४ ॥ प्रच्छादनपटीयुक्तांगन्धधूपादिवासिताम् । उच्छीर्षकेघृतभृतंकलशंपरिकल्पयेत् ॥ ५ ॥ ताम्बूलकुङ्कुमक्षोदकर्पूरागरुचन्दनम् । दीपिकोपानहच्छत्रचामरासनभाजनम् ॥ ६ ॥ पार्श्वेषुस्थापयेद्भक्त्यासप्तधान्यानिचैवहि । शयनस्थस्यभवतियदन्यदुपकारकम् ॥ ७ ॥ भृङ्गारकरकाद्यंतत्पञ्चवर्णवितानकम् । संपूज्य

**द्विजदाम्पत्यंनानाभरणभूषितम्॥८॥उपवेश्यतुशय्यायांमधुपर्कंततोवदेत् । दानमन्त्रतु । यथानकृष्णशयनं शून्यंसागरजातया । शय्यातस्याप्यशून्यास्तुतथाजन्मनिजन्मनि ॥ १ ॥ यस्मादशून्यशयनंकेशवस्यशिवस्यच । शय्यातस्याप्यशून्यास्तुतथाजन्मनिजन्मनि ॥ २ ॥ दत्त्वैवंतस्यसकलंप्रणिपत्यविसर्जयेत् । पाद्मेतु अस्थिललाटकंगृह्यसूक्ष्मंकृत्वासपायसम् ।भोजयेद्विजदांपत्यंविधिरेषसनातनः ॥ १ ॥ इत्युक्तम् नैतन्महाराष्ट्रदेशादिशिष्टैराद्रियतेयद्देशेतदाचारस्तत्रास्तु स्वर्गेपुरंदरपुरेलोकपालालयेतथा । सुखंवसत्यसौजन्तुःशय्यादानप्रभावतः । आभूतसंप्लवंयावत्तिष्ठत्यातङ्कवर्जितः ॥ १ ॥ प्रेतशय्याप्रतिग्राही नभूयःपुरुषोभवेत् । गृहीतायांतुतस्यांवैपुनःसंस्कारमर्हति ॥**

**शय्यादानविधि**—मृतानें उपभोगिलेलीं वस्त्रें, वाहनें, भाजनें व मृतास इष्ट असलेल्या सर्व वस्तु सिद्ध कराव्या. सुवर्णाचा प्रेतपुरुष करून शय्यादानकालीं शय्येवर स्थापावा; नंतर पूजा करून मृतशय्येचें यथाविधि दान करावें. मजबूत काष्ठांची, दृढ हस्तिदंती पट्ट्यांनीं युक्त व सुशोभित असलेली भरजरी किनखाप इत्यादिकांनीं अलंकृत केलेली परांच्या गाद्यांनीं आच्छादिलेली, उत्तम प्रकारच्या उशा व गिरद्या यांनीं युक्त असलेली, पलंगपोसानें युक्त व गंध, धूप इत्यादि पदार्थांनीं सुवासित अशी शय्या करावी व उशाकडचे भागास घृतानें भरलेला कलश ठेवावा. तांबूल, केशर, बुका, अर्गजा इत्यादिक सुगंधि चूर्णें, कापूर, कृष्णागरु, चंदन, समई, चर्मी, जोडा, छत्री, चवरी, आसन, पात्र व सप्तधान्यें, हे पदार्थ, भक्तीनें पार्श्वभागीं ठेवावेत. शय्येवर राहणारास जे दुसरे उपकारक पदार्थ होतील तेही जवळ ठेवावे. झारी, कमंडलु इत्यादिक द्यावें, व पंचरंगी चांदवा वर बांधावा. नंतर नानाविध आभरणांनीं भूषित असें द्विजदांपत्य त्या शय्येवर बसवून त्या स्त्रीपुरुषांची पूजा करून मधुपर्क करावा. दानाचा मंत्र 'यथानकृष्ण शयनं शून्यं सागरजातया... तथा जन्मनि जन्मनि ॥' असें म्हणून त्या द्विजदांपत्यास ते सर्व पदार्थ देऊन नमस्कार करून विसर्जन करावें. पद्मपुराणांत तर कपाळाच्या अस्थींचें चूर्ण करून पायसासहित त्याचें द्विजदंपतीस भोजन घालावें, हा विधि सनातन आहे असें सांगितलें आहे. पण महाराष्ट्र देशादिकांतील शिष्टांस हें संमत नाहीं. म्हणून त्याचा ज्या देशांत प्रचार असेल तेथें तो असो. शय्यादानप्रभावानें मृत झालेला प्राणी स्वर्ग, इंद्रपुरी, लोकपालांचीं स्थानें यांत आनंदानें पृथ्वीवर प्राणी आहेत तोंपर्यंत सुखानें राहतो. प्रेतशय्येचा प्रतिग्रह करणारा पुरुष शुद्ध रहात नाहीं. म्हणून ती शय्या दान घेतली असतां पुनः तो संस्कारास पात्र होतो.

**अथोदकुम्भः एकादशाहात्प्रभृतिघटस्तोयान्नसंयुतः । दिनेदिनेप्रदातव्योयावत्संवत्सरंसुतैः ॥ १ ॥ यस्यसंवत्सरादर्वाक्सपिण्डीकरणंभवेत् । मासिकंचोदकुम्भंचदेयंतस्यापिवत्सरम् ॥ २ ॥ अपिश्राद्धशतैर्दत्तैरुदकुम्भंविनानराः। दरिद्रादुःखिनस्तातभ्रमन्तिचभवार्णवे ॥ ३ ॥ यावदब्दंचयोदद्यादुदकुम्भंविमत्सरः । प्रेतायान्नसमायुक्तंसोश्वमेधफलंलभेत् ॥ ४ ॥ इदंचोदकुम्भश्राद्धं-**

सपिण्डीकरणात्प्रागेकोद्दिष्टविधिना सपिण्ड्युत्तरंतुपार्वणविधिना इदंत्रयोदशदिनादारभ्यकर्तव्यमितिभट्टाः अत्रपिण्डदानंकृताकृतम् देवहीनंचैतत् अदैवंपार्वणश्राद्धंसोदकुम्भमधर्मकम्। कुर्यात्प्रत्याब्दिकाच्छ्राद्धात्संकल्पविधिनान्वहम् ॥ १ ॥ इतिवचनात् प्रायश्चित्ताङ्गविष्णुश्राद्धवदत्रश्राद्धेसर्वेश्राद्धधर्मान सन्तिकिंतुवाचनिकमात्राः तेनसंकल्पविधिनासंकल्पक्षणपाद्यासनगन्धाच्छादनान्त पूजनान्नपरिवेषणान्तेपृथ्वीतेपात्रमित्याद्युक्त्वाएषउदकुम्भइदमन्नं दत्तंचेत्त्यागविधिः अन्तेताम्बूलदक्षिणादि नात्रब्रह्मचर्यपुनर्भोजनादिनियमाः वृद्धिनिमित्तेनमासिकापकर्षेउदकुम्भश्राद्धानामप्यपकर्षः प्रेतश्राद्धत्वात् प्रत्यहंसोदकुम्भान्नदानाशक्तेनाप्येकस्मिन्दिनेतावद्भिरामान्नैरुदकुम्भैश्च तावदामान्नोदकुम्भनिष्क्रयेणवापकृष्योदकुम्भश्राद्धानिकार्याणि अब्दमध्येप्रत्यहमुदकुम्भश्राद्धंकुर्वतोमध्येआशौचप्राप्तौतावच्छ्राद्धानांलोपएवदर्शादिवत् आशौचोत्तरंप्रतिबन्धादकरणेतदुत्तरोदकुम्भेनसहतन्त्रतयातिक्रान्तोदकुम्भानांप्रयोगः अतिक्रान्तोदकुम्भश्राद्धान्यद्यतनोदकुम्भश्राद्धंचतन्त्रेणकरिष्यइति संकल्पः॥

**उदकुंभश्राद्ध**—अकराव्या दिवसापासून एक वर्षपर्यंत रोज उदक व अन्न यांसहित पुत्रानें कुंभ द्यावा. ज्याची सपिंडी वर्षापूर्वीं होईल त्याचेंही मासिकश्राद्ध व उदकुंभ हीं वर्षभर करावींत. शतशः श्राद्धें केलीं व उदकुंभ श्राद्ध केलें नाहीं तर तीं मनुष्यें दरिद्री व दुःखी अशीं या भवार्णवांत भ्रमण करितात. मत्सररहित होऊन जो एक वर्षपर्यंत प्रेतासाठीं अन्नयुक्त उदकुंभाचें दान करील त्यांस अश्वमेधफळ मिळेल. हें उदकुंभश्राद्ध सपिंडीकरणापूर्वीं एकोद्दिष्ट विधीनें करावें. पण सपिंडीनंतर पार्वणविधीनें करावें. हें उदकुंभश्राद्ध तेराव्या दिवसापासून करावें, असें भट्ट म्हणतात. या श्राद्धीं पिंडदान कृताकृत आहे व हें देवहीनही आहे. कारण हें पार्वणश्राद्ध, उदकुंभयुक्त देवहीनश्राद्ध धर्मविरहित प्रत्याब्दिक श्राद्धापर्यंत प्रत्यहीं संकल्पविधीनें करावें, असें वचन आहे. या श्राद्धीं विष्णुश्राद्धाप्रमाणें प्रायश्चित्तांगभूत सर्व श्राद्धधर्म नाहींत, वाचनिक मात्र आहेत. यावरून संकल्पविधीनें संकल्प, क्षण, पाद्य, आसन, गंध व आच्छादन इतकी पूजा झाल्यावर अन्न वाढण्यापर्यंत कर्म झालें म्हणजे ‘पृथिवीते पात्रं’ असें म्हणून ‘त्वउदकुंभ इदमन्नंदत्तंच’ असें म्हणावें. व अन्नत्यागविधि करावा. शेवटीं तांबूलदक्षिणादि द्यावी. या श्राद्धांत ब्रह्मचर्य, पुनर्भोजन इत्यादि नियम नाहींत. वृद्धिश्राद्धाचे निमित्तानें मासिकांचा अपकर्ष करणें असल्यास उदकुंभ श्राद्धाचाही अपकर्ष करावा. कारण, तीं प्रेतश्राद्धें आहेत. प्रत्यहीं उदकुंभासह अन्नदान करण्यास जो असमर्थ असेल त्यानें एकाच दिवशीं तितकीं आमान्नें व तितके उदकुंभ किंवा तितक्या आमान्नांचा किंवा उदकुंभांचा निष्क्रय करून ( द्रव्य करून ) अपकर्षानें उदकुंभ श्राद्धें करावींत. वर्षपर्यंत प्रत्यहीं उदकुंभश्राद्ध करणारास मध्यंतरीं अशौच प्राप्त झाल्यास दर्शादि श्राद्धाप्रमाणें तितक्या श्राद्धांचा लोपच करावा. अशौचानंतर प्रतिबंधामुळें न केल्यास त्याच्या पुढील जें उदकुंभश्राद्ध त्यासह एकतंत्रानें अंतरलेल्या उदकुंभाचा प्रयोग करावा. ‘अतिक्रांतोदकुंभश्राद्धान्यद्यतनोदकुंभश्राद्धंच तंत्रेण करिष्ये’ असा संकल्प करावा.

तथाप्रथमाब्देदीपदानमुक्तम् प्रत्यहंदीपकोदेयोमार्गेतुविषमेनरैः । यावत्सं-
वत्सरंवापिप्रेतस्यसुखलिप्सया १ प्राङ्मुखोदङ्मुखंदीपंदेवागारेद्विजालये ।
कुर्याद्याम्यमुखंपित्र्येअद्भिः संकल्प्यसुस्थिरम् २ इति ॥

**दीपदान**—तसेंच प्रथम वर्षी दीपदान करण्यास सांगितलें आहे. प्रेतास विषम मार्गीं सुख व्हावें या इच्छेनें मनुष्यांनीं वर्षपर्यंत दीप द्यावा. देव, ब्राह्मण, यांचे मंदिरांत पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख दीप लावावा. पित्याचे उद्देशानें दीप लावावयाचा तो उदकानें संकल्प करून दक्षिणाभिमुख सुस्थिर असा लावावा.

अथषोडशमासिकानि द्वादशप्रतिमास्यानिऊनमासंत्रिपक्षकम् । ऊनषा-
ण्मासिकंचोनाब्दिकंचापीतिषोडश २ अत्रमतान्तराणिसिन्धौ अथैषां कालः
मासादौमासिकंकार्यमाद्यंत्वेकादशेहनि । एकद्वित्रिदिनैरूनेत्रिभागेनोनएववा १
ऊनमासिकमूनाब्दमूनषाण्मासिकंचरेत् । त्रैपक्षिकंत्रिपक्षेस्यादूनमास्यंद्वादशेह्निवा
२ तत्रोनमासिकोनषाण्मासिकोनाब्दिकानामेकादिनेनोनपक्षेपञ्चम्यांमृतस्यतृती-
यायांद्वाभ्यामूनत्वपक्षेद्वितीयायां त्रिभिर्न्यूनेप्रतिपदायामनुष्ठानमितिकेचित्
माधवस्तूनषाण्मासिकमूनाब्दिकंचमृताहात्पूर्वेद्युःकार्यमित्याह त्रैपक्षिकंत्रिपक्षे-
तीतेमृताहेकार्यम् ॥

**षोडशमासिकें**—प्रत्येक महिन्याचें एक याप्रमाणें बारा महिन्यांचीं बारा व ऊनमासिक, त्रैपक्षिक, ऊनषाण्मासिक व ऊनाब्दिक, अशीं हीं सोळा मासिकें जाणावीत. यांविषयीं दुसरीं मतें निर्णयसिंधूंत सांगितलीं आहेत. आतां यांचे काळ सांगतोः—महिन्याच्या पहिल्या दिवशीं मासिक करावें. पहिलें मासिक अकराव्या दिवशीं करावें. एक, दोन अथवा तीन दिवसांनीं कमी किंवा तिसऱ्या भागांनीं कमी अशा काळीं ऊनमासिक व ऊनषाण्मासिक हीं करावींत. त्रैपक्षिक तीन पक्षांनीं म्हणजे पंचेचाळीस दिवसांनीं करावें किंवा ऊनमासिक बाराव्या दिवशीं करावें. त्यांत ऊनमासिक, ऊनषाण्मासिक व ऊनाब्दिक या मासिकांचा एक दिवसानें कमी अशा दिवशीं करण्याचा पक्ष असल्यास पंचमीस मृत झालेल्याचें तृतीयेस, दोन दिवसांनीं करण्याचा पक्ष असल्यास द्वितीयेस, व तीन दिवसांनीं कमी अशा दिवशीं करण्याचा पक्ष असल्यास प्रतिपदेस करावें, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. ऊनषाण्मासिक व ऊनाब्दिक हीं मृतदिवसाचे पूर्वदिवशीं करावींत. असें माधव म्हणतो. तीन पक्ष अतिक्रांत झाल्यावर मृतदिवशीं त्रैपाक्षिक करावें.

अत्राहिताग्नेर्विशेषः त्रैपाक्षिकपर्यन्तानिसंस्कारतिथौ ततःपराणिप्रत्याब्दिकं-
चमृततिथौ तेनाद्यंदाहादेकादशेह्नि त्रिमासादूर्ध्वसंस्कारेत्वेवंभाति त्रिपक्षपर्य-
न्तानिदाहतिथौ कृत्वापराण्यतिक्रान्तानिमृततिथौप्राप्तमासिकेनसहकार्याणीति॥

**षोडशमासिकाहिताग्निविशेष**—ज्या तिथीस अग्निसंस्कार झाला त्या तिथीस त्रैपक्षिकापर्यंतचीं मासिकें करावींत व त्याच्या पुढचीं मासिकें व प्रत्याब्दिक हीं मृततिथीवर करावींत, असा विशेष आहे. यावरून

तीन मासांनंतर अग्निसंस्कार असेल तर दहनदिवसापासून अकराव्या दिवशीं आद्य-मासिक करावें असें वाटतें. त्रैपक्षिकापर्यंत मासिकें दहनतिथीस करून त्यांचे पुढचीं अंतरलेलीं मासिकें मृततिथीस येणाऱ्या मासिकासह करावीत.

ऊनश्राद्धेषुवर्ज्यानि त्रिपुष्करेषुनन्दासुसिनीवाल्यांभृगोर्दिने । चतुर्दश्यांचनोनानिकृत्तिकासुद्विपुष्करे त्रिपुष्करद्विपुष्करयोगयोर्लक्षणंप्रागुक्तम् आद्यमासिकमाद्याब्दिकंचैकादशेह्नीत्येकंमतम् आद्यमासिकमेवैकादशेह्निप्रथमाब्दिकंतुद्वितीयवर्षारम्भएवेत्यपरमतमित्युक्तम् ॥

**ऊनश्राद्धवर्ज्यदिन**—त्रिपुष्कर, नंदातिथी, अमावास्या, शुक्रवार, चतुर्दशी, कृत्तिका नक्षत्र व द्विपुष्कर हीं असतां ऊनश्राद्धें करूं नयेत. त्रिपुष्कर व द्विपुष्कर यांचें लक्षण पूर्वीं सांगितलेंच आहे. आद्यमासिक व प्रथमाब्दिक हीं अकराव्या दिवशीं करावींत असें एक मत व आद्यमासिकच अकराव्या दिवशीं करावें व प्रथमाब्दिक दुसऱ्या वर्षाचे आरंभीं करावें, असें दुसरें मतही पूर्वीं सांगितलें आहे.

एतानिषोडशश्राद्धानिवर्षान्तसपिण्डनपक्षे उक्तेषुस्वस्वकालेष्वेकोद्दिष्टविधिनाकार्याणि द्वादशाहादिकालेषुसपिण्डनापकर्षपक्षेएकदिनेएवापकृष्ययुगपदेकोद्दिष्टविधिनाकार्याणि श्राद्धानिषोडशादत्वानतुकुर्यात्सपिण्डनमितिषोडशश्राद्धैर्विनासपिण्डनेधिकाराभावबोधनात् एतानिपक्वान्नेनामान्नेनवाकार्याणि पाकपक्षेयुगपत्करणेसर्वेषामेकएवपाकोविप्रा अर्घ्याःपिण्डाश्चषोडश एतानिद्वादशाहादौसपिण्डनात्पूर्वंकृतान्यपिपुनः सपिण्डनोत्तरंस्वस्वकालेपार्वणविधिनाकार्याणि यस्यसंवत्सरादर्वाक्विहितातु सपिण्डता । विधिवत्तानिकुर्वीतपुनःश्राद्धानिषोडश ॥ १ ॥ अर्वाक्संवत्सराद्यस्यसपिण्डीकरणंकृतम् । षोडशानांद्विरावृत्तिं कुर्यादित्याहगौतमः ॥ २ ॥ इत्यादिवचनात् षोडशानांद्विरावृत्तिस्त्वंचैकादशाहसपिण्डनपक्षेज्ञेयम् तत्राद्यमासिकस्यकालसत्वात् द्वादशाहेसपिण्डनपक्षेतुपञ्चदशानांद्विरावृत्तिः त्रिपक्षेसपिण्डनपक्षेआद्यमासिकद्वितीयमासिकानांस्वकालेकृतत्वातदपकृष्य कृतानामेवपुनरावृत्तिविधानात्तेषांकालाभावाच्चत्रयोदशानामेवपुनरावृत्तिःएवमन्यपक्षेष्वपियथासंभवमूह्यम् ॥

**षोडशश्राद्धें**—हीं सोळा मासिकश्राद्धें वर्षातीं सपिंडीकरणाचा पक्ष असल्यास आपापल्या उक्तकालीं एकोद्दिष्ट विधीनें करावींत. बाराव्या दिवशीं सपिंडीचा अपकर्ष करणें असल्यास एके दिवशींच अपकर्ष करून एककालीं एकोद्दिष्टविधीनें करावींत. कारण षोडशश्राद्धें केल्यावांचून सपिंडी करूं नये, या वचनानें षोडशश्राद्धें केल्याशिवाय सपिंडीस अधिकार नाहीं, असा बोध होतो. हीं श्राद्धें पक्वान्नांनीं किंवा आमान्नांनीं करावींत. पाकानें करण्याच्या पक्षीं एककालीं करणें असल्यास सर्वांचाच एकच पाक करून ब्राह्मण, अर्घ्यें व पिंड हीं सोळा सोळा करावीं. बाराव्या दिवशीं सपिंडी करण्यापूर्वीं हीं श्राद्धें केलीं असलीं तरी सपिंडीनंतर पुनः स्वस्व ( त्या त्या योग्य ) कालीं पार्वणविधीनें करावींत. ज्याची सपिंडी वर्षापूर्वीं

केली त्यांचीं षोडश श्राद्धें पुनः यथाविधि करावींत व ज्याची सपिंडी वर्षापूर्वी केली त्याच्या षोडशमासिक श्राद्धाची द्विरावृत्ति करावी, असें गौतमाचें वचन आहे. म्हणून षोडश श्राद्धांची द्विरावृत्ति करावी, असें जें सांगितलें तें अकराव्या दिवशीं सपिंडी करण्याच्या पक्षीं जाणावें. कारण अकरावा दिवस आद्यमासिकाचा काल आहे. बाराव्या दिवशीं सपिंडी करण्याचा पक्ष असल्यास पंधरा मासिकांची द्विरावृत्ति करावी. पंचेचाळिसाव्या दिवशीं सपिंडी करण्याचा पक्ष असल्यास आद्यमासिक, ऊनमासिक व द्वितीय मासिक हीं स्वस्वकालीं केलीं असल्यानें जीं अपकर्षानें केलीं त्यांचीच पुनरावृत्ति करावी, असा विधि आहे व त्यांच्या स्वकीय कालाचा अभाव आहे म्हणून तेरा मासिक श्राद्धांचीच पुनरावृत्ति करावी. याप्रमाणें इतर पक्षांविषयींही जसा संभव असेल त्याप्रमाणें जाणावें.

येतुद्वादशाहेसपिण्डनंकृत्वात्रयोदशाहादावाद्यमासिकसहितानांषोडशानां-पुनरावृत्तिंकुर्वन्तितेभ्रान्ताः यदामरणादारभ्यद्वादशमासमध्येकश्चिदधिकमासः पतेत्तदातन्मासस्थंमासिकश्राद्धमधिकेशुद्धेमासेचेतिद्विवारंकार्यमितिसप्तदश-श्राद्धानिभवन्ति मलमासेमृतस्यतु एकादशाहेआद्यमासिकंकृत्वाद्वितीयमास-मृततिथौतत्पुनःकृत्वाकिंचिदूनेद्वितीयमासेऊनमासिकंतृतीयमासारम्भेद्वितीय-मासिकंसार्धद्विमासान्तेत्रैपक्षिकम् सपिण्डयुत्तराण्यवशिष्टमासिकानिस्वस्व-कालेएवकार्याणि चतुःपुरुषमध्येसपिण्डेषुनान्दीश्राद्धप्राप्तौतुतत्प्राप्तिमासेएवै-कस्मिन्नेवदिनेसर्वाण्यपकृष्यकार्याणि प्रेतश्राद्धानिसर्वाणिसपिण्डीकरणंतथा। अपकृष्यापिकुर्वीतकर्तुंनान्दीमुखंद्विजः १ इत्युक्तेः तत्रैकःपाकःषोडशश्राद्ध-पक्षेषोडशब्राह्मणाअष्टचत्वारिंशत्पिण्डाः पुरूरवार्द्रवविश्वेदेवार्थमेकोविप्र-इतिसर्वेषामनुष्ठानम् एवंपक्षान्तरेषुश्राद्धसंख्यानुसारेणविप्राद्यूह्यम् केचित्पाक-भेदमाहुः उदकुम्भश्राद्धानामप्यनुमासिकवत्प्रेतोद्देश्यकश्राद्धत्वात्तेषामप्यप-कर्षइत्युक्तम् वृद्धिंविनानुमासिकापकर्षेतुदोषमाहोशनाः वृद्धिश्राद्धविहीनस्तु-प्रेतश्राद्धानियश्चरेत् सश्राद्धीनरकेघोरेपितृभिःसहमज्जति १ इति चतुःपुरुष-सपिण्डेष्वाधानादिप्राप्तिनिमित्तोप्यपकर्षःकार्यः अत्रविशेषपूर्वार्धेउक्तः यद्य-न्मासिकंसूतकादिनातिक्रान्तंभवेत्तत्तदुत्तरमासिकेनसहतन्त्रेणकार्यमित्युक्तम् ॥

**वृद्धिश्राद्ध**—बाराव्या दिवशीं सपिंडी करून तेराव्या दिवशीं आद्यमासिकसहित जी सोळा मासिकांची पुनरावृत्ति करितात ते भ्रांत होत. मरणापासून आरंभ करून बारा महिन्यांत एखादा अधिक मास प्राप्त झाल्यास अधिकमासा-संबंधीं मासिकश्राद्ध अधिक व शुद्ध या दोन मासांत दोन वेळ करावें. अशीं सतरा श्राद्धें होतात. मलमासांत मृत झाल्यास अकराव्या दिवशीं आद्यमासिक करून दुसऱ्या मासाचे मृततिथीस तें पुनः करावें व किंचिन्न्यून अशा दुसऱ्या मासांत ऊनमासिक, तृतीय मासाचे आरंभीं द्वितीय मासिक व अडीच महिन्यांचे अंतीं त्रैपक्षिक याप्रमाणें करावींत. सपिंडीनंतरचीं अवशिष्ट मासिकें स्वस्व कालींच करावींत.

सपिंडांचे ठायीं चार पुरुषांत नांदीश्राद्ध प्राप्त झाल्यास तें नांदीश्राद्ध ज्या मासांत प्राप्त झालें असेल त्याच मासांत पहिले दिवशींच अपकर्ष करून सर्व मासिकें करावींत. कारण, द्विजानें नांदीमुख करण्यासाठीं सर्व प्रेतश्राद्धें अपकर्ष करूनही सपिंडी करावी, असें वचन आहे. त्यांत षोडश श्राद्धांचा पक्ष असतां १–५–१६ ब्राह्मण, अठेचाळीस पिंड व पुरूरवार्द्रव विश्वेदेव यांसाठीं एक ब्राह्मण याप्रमाणें सर्वांचें अनुष्ठान करावें. अन्य पक्ष असतांही जशी श्राद्धसंख्या असेल त्याप्रमाणें ब्राह्मणादिक जाणावे. कित्येक ग्रंथकारांच्या मतें पाक निराळा करावा असें आहे. उदकुंभश्राद्धींही अनुमासिकाप्रमाणें प्रेतोद्देशक श्राद्धें असल्यानें त्यांचाही अपकर्ष करावा, असें सांगितलें आहे. वृद्धिश्राद्धावांचून अनुमासिकाचा जर अपकर्ष असेल तर ऊशनाऋषि दोष सांगतो. जो कोणी वृद्धिश्राद्धहीन होऊन अपकर्षानें प्रेतश्राद्धें करील तो श्राद्धकर्ता पितरांसह घोर नरकांत बुडतो. चतुःपुरुषसपिंडांत आधानादिप्रातिनिमित्तकही अपकर्ष करावा. याविषयीं विशेष प्रकार पूर्वार्धांत सांगितलाच आहे. जें जें मासिकश्राद्ध सूतकादिकानें अंतरेल तें तें पुढच्या मासिकासह एकतंत्रानें करावें, असें सांगितलें आहे.

अथसपिण्डीकरणविचारः तत्रसपिण्डनकालः नासपिण्ड्याग्निमान्पुत्रःपितृयज्ञंसमाचरेदितिवचनात् पित्रादीनांमात्रादीनां त्रितयमध्येऽन्यतममरणेसाग्निकोद्वादशाहेसपिण्डनंकृत्वागामिदर्शेपिण्डपितृयज्ञादिकंकुर्यात् अत्रस्मार्ताग्निमानपिसाग्निकोग्राह्यइतिभाति तस्यापिपिण्डपितृयज्ञावश्यकत्वात् साग्नेःप्रेतस्यतुत्रिपक्षेएव प्रेतश्चेदाहिताग्निःस्यात्कर्तानग्निर्यदाभवेत् । सपिण्डीकरणंतस्यकुर्यान्पक्षेतृतीयके १ इत्युक्तेः अत्रसाग्निः श्रौताग्निमानेव द्वयोः साग्नित्वेद्वादशाहएव साग्निकस्तुयदाकर्ताप्रेतोवाप्यग्निमान्भवेत् । द्वादशाहेतदाकुर्यात्सपिण्डीकरणंपितुः १ इत्युक्तेः द्वयोरप्यनग्नित्वेत्वनेकेकालाः सपिण्डीकरणंकुर्याद्यजमानस्त्वनग्निमान् । अनाहिताग्नेःप्रेतस्यपूर्णेसंवत्सरेऽथवा १ एकादशेमासिषष्ठेत्रिमासेवात्रिपक्षके । मासान्तेद्वादशेवाह्निकुर्याद्वैकादशेहनि २ यदहर्वृद्धिरापन्नातदहर्वेतिनिश्चितम् । अत्रवृद्धिनिमित्तापकर्षोनिरग्नेरेवोक्तस्तथापिसाग्नेरपिसंभवेयोज्यः अत्रवृद्धिपदंचूडोपनयनविवाहमात्रपरं सीमन्तादिसंस्कारेषुवृद्धिश्राद्धस्यलोपएवकार्योनतुतदर्थंसापिण्डनापकर्षइतिकेचित् अन्येतुगर्भाधानपुंसवनादिष्वन्नप्राशनान्तेषुसंस्कारेष्वतरणेदोषोक्तेरावश्यकेषुवृद्धिश्राद्धस्याप्यावश्यकत्वात्सपिण्डनापकर्षःकार्यएव तथाचचतुःपुरुषसपिण्डेषुसपिण्डीकरणाभावेगर्भाधानादिकमपिनकार्यमित्याहुः तेनपितामहमरणेपौत्रस्यवृद्धौप्राप्तायामप्यपकर्षःसापिण्डीकरणानुमासिकादीनांसिद्धः एवमावश्यकवृद्धियुतकर्मप्राप्तौकनिष्ठः पुत्रोवाभ्रातावाभ्रातृपुत्रोवान्यःसपिण्डोवाशिष्योवागौणकर्तापिकुलप्राप्तवृद्धिसिद्ध्यर्थंसपिण्डनाद्यपकर्षंकुर्यात् तत्रचकृतेमुख्यस्यपुत्रादेर्नपुनःकरणम् वृद्धिनिमित्तापकर्षेपुनःकरणाभावात् येवाभद्रंदूषयंतिस्वधाभिरितिदोषश्रुतेः वृद्धिंविनागौणाधिकारिणासपिण्ड्यादिकरणेतुमुख्याधिकारिणापुत्रादिनापुनरावर्त-

नीयम् एकादशाहान्तकर्मणस्तुनपुनरावृत्तिरित्युक्तम् तत्रावश्यकपदेनानन्यगतिकंवृद्धिकर्मग्राह्यम् तेनसगतिकेष्टापूर्तादौसगतिकोपनयनविवाहादौचनापकर्षः अगतिकेचविवाहादावप्यपकर्षइतिव्यवस्थायोज्या आनन्त्यात्कुलधर्माणांपुंसांचैवायुषःक्षयात् । अस्थिरत्वाच्छरीरस्यद्वादशाहःप्रशस्यते १ अत्रकुलधर्मपदेनवृद्धिश्राद्धयुतंकर्मग्राह्यम् नतुपञ्चमहायज्ञदेवपूजाश्राद्धादि अस्यवर्णधर्मत्वेननित्यत्वात्सपिण्डीकरणनिमित्तकप्रतिबन्धायोगात् सपिण्डीकरणात्पूर्वंपञ्चमहायज्ञादिधर्मोनकार्यइतिक्वापिस्मृतिवचनेनुपलम्भाच्च एतेनसपिण्डीकरणाभावेसपिण्डेषुदेवपूजाश्राद्धादिधर्मलोपंवदन्तोनिर्मूलत्वादुपेक्ष्याः अत्रद्वादशाहपदेनाशौचसमाप्त्युत्तरादिनंग्राह्यम् तेनत्रिदिनाशौचेपञ्चमदिनेसपिण्डीकरणम् द्वादशाहादिकालेषुप्रमादादननुष्ठितम् । सपिण्डीकरणंकुर्यात्कालेषूत्तरभाविषु १इदमुत्तरकालविधानंसाग्निनिरग्निसाधारणम् सपिण्डीकरणश्राद्धमुक्तकालेकृतंनचेत् । हस्तार्द्रारोहिणीमेवानुराधायांचतच्चरेत् १ इदमपिसाधारणम् स्मृत्यर्थसारेवर्षान्तसपिण्डनपक्षेवर्षान्त्यदिनेपूर्वसंवत्सरविमोक्षश्राद्धंकृत्वासपिण्डनंचकृत्वापरेद्युर्मृताहेवार्षिकंकार्यमित्युक्तम् इतिकालविचारः ॥

**सपिंडीकरणकाल**—साग्निक पुत्रानें सपिंडी केल्यावांचून पितृयज्ञ करूं नये, असें वचन आहे, म्हणून पित्रादिक त्रयी व मात्रादिक त्रयी या त्रयींतून कोणीही मृत असतां साग्निकानें बाराव्या दिवशीं सपिंडी करून पुढें येणाऱ्या अमावस्येस पिंडपितृयज्ञादिक करावें. त्यांत साग्निक स्मार्ताग्निमानही घ्यावा असें वाटतें. त्यासही पिंडपितृयज्ञ अवश्य आहे. साग्निक मृताची सपिंडी तर तिसऱ्या पक्षांतच करावी. कारण मृत झालेला साग्निक असून कर्ता अनग्निक असेल तर त्याची सपिंडी तिसऱ्या पक्षांत करावी, असें वचन आहे. येथें साग्निक म्हणजे श्रौताग्निमानच समजावा. मृत व कर्ता हे दोघेही जर साग्निक असतील तर बाराव्या दिवशींच ती करावी, असें वचन आहे. कारण जेव्हां कर्ता व मृत दोघेही साग्निक असतील तेव्हां पित्याची सपिंडी बाराव्या दिवशींच करावी, असें वचन आहे. दोघेही अनग्निक असतील तर अनेक काल सांगितले आहेत. अनग्निमान् कर्त्यानें अनाहिताग्नि मृताची सपिंडी पूर्ण वर्षांतीं अकराव्या मासीं, सहाव्या मासीं, तिसऱ्या मासीं, तिसऱ्या पक्षीं, मासांतीं, बाराव्या दिवशीं, अकराव्या दिवशीं किंवा ज्या दिवशीं वृद्धि (नांदीश्राद्ध) प्राप्त होईल त्या दिवशीं करावी, असें निश्चित समजावें. येथें नांदीश्राद्धनिमित्तक अपकर्ष निरग्निकांसच जरी सांगितला तरी साग्निकांसही संभव असल्यास योजावा. या वचनांत 'वृद्धि' असें जें पद आहे तें चूडा, उपनयन व विवाह एतद्विषयकच आहे. सीमंतादि संस्कारांत वृद्धिश्राद्धाचा लोपच करावा. त्यासाठीं सपिंडीचा अपकर्ष करूं नये, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. उलट दुसरे ग्रंथकार—गर्भाधान, पुंसवन इत्यादि अन्नप्राशनापर्यंतचे संस्कार न केल्यास दोषोक्ति आहे म्हणून आवश्यक संस्कारांत वृद्धिश्राद्धासही आवश्यकत्व असल्यानें सपिंडीचा अपकर्षच करावयाचा. तसेंच सपिंडीकरण न झाल्यास चतुःपुरुष सपिंडांत

गर्भाधानादिकही करूं नये, असें म्हणतात. यावरून पितामह मृत असतां पौत्रांस वृद्धिश्राद्ध प्राप्त होतांच सपिंडीकरण, अनुमासिक इत्यादिकांचाही अपकर्ष सिद्ध होतो. याप्रमाणें आवश्यक असें वृद्धिश्राद्धयुक्त कर्म प्राप्त झाल्यास कनिष्ठ पुत्र किंवा भ्राता किंवा भ्रातृपुत्र किंवा अन्य सपिंड अथवा शिष्य अशा गौण कर्त्यानेंही कुलांत प्राप्त झालेल्या वृद्धिश्राद्धाची सिद्धि होण्यासाठीं सपिंडीचा अपकर्ष करावा. तो केल्यास पुत्रादि मुख्य कर्त्यानें पुनः करूं नये. कारण वृद्धिनिमित्तक अपकर्ष असतां पुनः करण्याचा अभाव आहे. जे स्वधा शब्दांनीं मंगल दूषित करितात, असें या मंत्रांत दोषश्रवण आहे. वृद्धिश्राद्धावांचून गौण अधिकाऱ्यानें सपिंडी केली तर पुत्रादि मुख्याधिकाऱ्यांनीं पुनः ती करावी. अकराव्या दिवसापर्यंतच्या कर्मांची पुनरावृत्ति करूं नये. त्यांत आवश्यक पदानें अनन्यगतिक असें वृद्धिकर्म घ्यावें. यावरून सगतिक असें इष्टापूर्तादिक व सगतिक उपनयनविवाहादिक असतां अपकर्ष करूं नये व अगतिक असे विवाहादिक असतील तरअपकर्ष करावा, अशी व्यवस्था योजावी. कुलधर्म अनंत असल्यानें पुरुषाचे आयुष्याचा क्षय असल्यानें व शरीरास अस्थिरत्व असल्यानें बारावा दिवसच प्रशस्त होय. या वाक्यांत कुलधर्म या पदानें वृद्धिश्राद्धयुक्त कर्म घ्यावें. पंचहायज्ञ, देवपूजा, श्राद्ध इत्यादिक घेऊं नयेत. कारण, वर्णधर्मत्वानें या कर्मांस नित्यत्व आहे. म्हणून सपिंडीनिमित्तक प्रतिबंधाचा योग नाहीं. कारण सपिंडी करण्यापूर्वी पंचमहायज्ञादिक धर्म करूं नये, असें स्मृतिवचनांत कोठेंही आढळत नाहीं. यावरून सपिंडीकरण न झाल्यास सपिंडांत देवपूजा व श्राद्धादि या धर्मांचा लोप करावा असें जे म्हणतात त्यांच्या म्हणण्यास मूळांत आधार नसल्यानें तिकडे लक्ष देण्याचें कारणच नाहीं. या वचनांतील 'द्वादशाह' या पदानें ज्या दिवशीं अशौचप्राप्ति होईल त्याच्या पुढचा दिवस घ्यावा. यावरून तीन दिवस अशौच असल्यास पांचव्या दिवशीं सपिंडी करावी. प्रमादानें बाराव्या दिवशीं सपिंडी करण्याची राहिल्यास पुढें येणाऱ्या कालीं ती करावी, हें उत्तरकालाचें विधान साग्निक व निरग्निक यांस साधारण आहे. सपिंडीश्राद्ध उक्तकालीं न केल्यास हस्त, आर्द्रा, रोहिणी किंवा अनुराधा या नक्षत्रीं तें करावें हेंही साधारण आहे. वर्षांतीं सपिंडी करण्याचा पक्ष असल्यास वर्षाचे शेवटल्या दिवशीं अब्दपूर्तिश्राद्ध करून व सपिंडी करून दुसरे दिवशीं, मृत तिथीवर वार्षिक श्राद्ध करावें, असें स्मृत्यर्थसारग्रंथांत म्हटलें आहे. याप्रमाणें सपिंडी कालाचा विचार आहे.

तच्चसपिण्डनंपुत्रेविदेशस्थेपिसातिनान्यःकुर्यात् एवंज्येष्ठपुत्रेविदेशस्थेपिनकनिष्ठःकुर्यात् षोडशश्राद्धानितुज्येष्ठासन्निधानेकनिष्ठेनकार्याणि पुनर्ज्येष्ठेननकार्याणि आहिताग्निःकनिष्ठोपिसपिण्डनंकुर्यादेव वृद्धिनिमित्तेतुकनिष्ठादिभिरपिण्डनंकार्यमित्युक्तम् वृद्धिंविनाकनिष्ठपुत्रेणकृतेसपिण्डनेज्येष्ठपुत्रेणपुनःकार्यम् आहिताग्निनापितृयज्ञार्थंकृतेसपिण्डनेपिज्येष्ठेनपुनःकार्यमितिभाति तत्र पुनःकरणेप्रेतशब्दोनवाच्यः देशान्तरस्थपुत्राणांश्रुत्वातुवपनंभवेत् । दशाहंसूतकंचैवतदन्तेचसपिण्डनम् ॥

**सपिण्ड्यधिकार**—पुत्र देशांतरस्थ असतांही दुसऱ्यानें सपिंडी करूं नये. ज्येष्ठ देशांतरस्थ असतांही कनिष्ठानें करूं नये. पण ज्येष्ठ समीप नसतां कनिष्ठानें षोडश श्राद्धें करावींत. ज्येष्ठानें तीं पुनः करूं नयेत. आहिताग्नि कनिष्ठानेंही सपिंडी करावीच. वृद्धिनिमित्त असल्यास कनिष्ठादिकांनींही सपिंडी करावी, असें सांगितलें आहे. वृद्धीशिवाय कनिष्ठपुत्रानें सपिंडी केल्यास ज्येष्ठानें ती पुनः करावी. आहिताग्नि कनिष्ठानें पिंडपितृयज्ञासाठीं सपिंडी केली तरी ज्येष्ठानें ती पुनः करावी, असें वाटतें. त्या पुनः सपिंडी करण्यांत प्रेत शब्द उच्चारूं नये. देशांतरीं राहणाऱ्या पुत्रांनीं श्रवण केल्यावर वपन करावें व दहा दिवस अशौच धरून अशौचांतीं सपिंडी करावी.

अथव्युत्क्रममृतौ मृतेपितरियस्याथविद्यतेचपितामहः । तेनदेयास्त्रयः पिण्डाःप्रपितामहपूर्वकाः १ तेभ्यश्चपैतृकःपिण्डोनियोक्तव्यस्तुपूर्ववत् । मातर्यथमृतायांतुविद्यतेचपितामही २ प्रपितामहीपूर्वस्तुकार्यस्तत्राप्ययंविधिः । एवं प्रपितामहजीवनेतत्पित्रादिभिःकार्यःयत्तुव्युत्क्रमात्तुप्रमीतानांनैवकार्यासपिण्डतेतितन्मातापितृभर्तृभिन्नविषयम् प्रपितामहादिभिःपितुःसपिण्डनेकृतेपश्चात्पितामहमरणेपिपुनःपितामहेनसह पितुःसपिण्डनंकार्यम् यदातुपितुःसपिण्डनात्प्राक्पितामहोमृतस्तदापितामहसपिण्डनंकृत्वापितामहादिभिःसहपितृसपिण्डनंकार्यम् यदाच पितुर्मरणोत्तरंपितामहःप्रपितामहोवामृतस्तयोश्चपुत्रान्तरंसपिण्डनाधिकारीदेशान्तरेतिष्ठतितदादाहाद्येकादशाहान्तमात्रंकर्मकृत्वासपिण्डनहीनाभ्यामपिपितामहप्रपितामहाभ्यांसहपितुःसपिण्डनंकुर्यात् पितामहप्रपितामहयोः पुत्रान्तराभावेतुपौत्रःप्रपौत्रोवातयोःसपिण्डनंकृत्वैवपितुःसपिण्डनंकार्यात् पितामहस्यपुत्रान्तराभावेपौत्रेणसपिण्डनषोडशानुमासिकान्तमेवकर्मकार्यम् पितामहवार्षिकादिकंतुनावश्यकम् इच्छयापितामहवार्षिकादिकरणेतुफलातिशयः ॥

**व्युत्क्रममरण**—ज्याचा पिता मरण पावला असून पितामह जिवंत असेल त्यानें प्रपितामहपूर्वक तीन पिंड द्यावे व त्या तीन पिंडांत पित्याचे पिंडाची योजना पूर्वीप्रमाणें करावी. ज्याची माता मरण पावली असून पितामही जिवंत असेल त्यानें हा विधि प्रपितामहीपूर्वक करावा. म्हणजे प्रपितामहीपूर्वक तीन पिंड देऊन त्यांत मातृपिंडाची योजना करावी. याप्रमाणें प्रपितामह जिवंत असल्यास त्याची योजना पित्रादिकांसह करावी. व्युत्क्रमानें मरण पावलेल्यांची सपिंडी करूं नये, असें जें वचन आहे तें माता, पिता व भ्राता यांहून भिन्न असणारांविषयींचें आहे. प्रपितामहादिकांसह सपिंडी केल्यानंतर पितामह मरण पावल्यास पुनः पितामहासह पित्याची सपिंडी करावी. पित्याची सपिंडी करण्यापूर्वी पितामह मरण पावल्यास पितामहाची सपिंडी केल्यावर पितामहादिकांसह पित्याची सपिंडी करावी. जेव्हां पिता मृत झाल्यावर पितामह किंवा प्रपितामह मरण पावेल व त्यांचा दुसरा पुत्र सपिंडी करण्याचा अधिकारी देशांतरीं राहत असेल तेव्हां दहनापासून अकरावे

दिवसाचे कृत्यापर्यंत मात्र कर्म करून सपिंडीहीन असे पितामह व प्रपितामह असले तरी त्यांसह पित्याची सपिंडी करावी. पितामह व प्रपितामह यांस दुसरा पुत्र नसल्यास पौत्रानें किंवा प्रपौत्रानें त्यांची सपिंडी करून पित्याची सपिंडी करावी. पितामह व प्रपितामह यांस दुसरा पुत्र नसेल तर पौत्रानें सपिंडी षोडशानुमासिकांतच कर्म करावें. पितामहाचें वार्षिकादिक आवश्यक नाहीं. इच्छेनें पितामहाचे वार्षिकादिक केल्यास फलातिशय आहे.

पितृदशाहंकुर्वन्यदिपुत्रोमृतस्तदातत्पुत्रः स्वपितुरौर्ध्वदेहिकंकृत्वापितामहौर्ध्वदेहिकंपुनःसर्वमावर्तयेत् अतीतेदशाहेतुनपुनरावृत्तिःपुत्रान्तराभावे पितामहसपिण्डनोत्तरंपितृसपिण्डनमित्युक्तम् अशक्तिवशात्पित्रानुज्ञातने पौत्रेणपितामहदशाहकर्मण्यारब्धेपश्चात्पितृमृतौपित्राशौचंवहन्नेवपौत्रःपितामहौर्ध्वदेहिकंकुर्यात् प्रक्रान्तत्वात्पितृदशाहादिकर्मापिकुर्यात्प्राप्तत्वात् ॥

**सपिंडयधिकार**—पित्याचें दहा दिवसांचें कर्म करीत असतां जर पुत्र मरण पावला तर त्याचे पुत्रानें त्या आपल्या पित्याचें अंत्यकर्म करून पितामहाचें सर्व अंत्यकर्म पुनः करावें. दहावा दिवस गेला असल्यास पुनः कर्म करूं नये. दुसरा पुत्र नसेल तर पितामहाची सपिंडी केल्यावर पित्याची सपिंडी करावी असें सांगितलें आहे. असामर्थ्यामुळें पित्यानें आज्ञा केलेल्या पौत्रानें पितामहाचें दहा दिवसांचें कर्म आरंभिल्यावर तो मरण पावल्यास पित्याचें अशौच धरीत असतांच पौत्रानें पितामहाचें अंत्यकर्म करावें. कारण त्या कर्मास प्रारंभ झालेला आहे. पित्याचें दहा दिवसांचें कर्महीं करावें, कारण तें करणेंच प्राप्त झालें आहे.

अथस्त्रीषूच्यते पितामह्यादिभिःसार्धंमातरंतुसपिण्डयेत् । केचित्पितृमरणोत्तरंमातृमरणेपित्रैवसहमातृसपिण्डनमाहुः दौहित्रःसपिण्डनकर्ताचेन्मातामहेनसहसपिण्डनमित्यपरे सहगमनेतुभर्त्रैवसहसपिण्डनम् येनकेनापिसपिण्डनेऽप्यन्वष्टक्यप्रतिवार्षिकादिश्राद्धेषु पितामह्यादिभिःसहैवमातुःपार्वणंकार्यम् अत्रकेचित्स्वपुत्रसपत्नीपुत्रयोःपत्युश्चाभावेस्त्रीणांसपिण्डनंनास्तीत्याहुः अत्रान्वारोहणेभर्त्रासहपत्नीसंयोजनमितिपक्षेमतद्वयम् पितृपिण्डस्यपितामहादिषुत्रिषुसंयोजनंप्रथमंकृत्वापश्चान्मातृपिण्डंपितामहादिषुसंयोजयेदित्येकः प्रथमंमातृपिण्डंपित्रैवसंयोज्यमातृपिण्डेनैकीकृतंपितृपिण्डंपितामहादिषुसंयोजयेदित्यपरः पक्षःअत्रद्वितीयपक्षएवयुक्तः ॥

**स्त्रीसपिण्डीकरण**—पितामही इत्यादिकांसह मातेची सपिंडी करावी. पिता मृत झाल्यावर माता मृत झाल्यास पित्यासहच मातेची सपिंडी करावी असे कांहीं ग्रंथकार म्हणतात. कन्येचा पुत्र जर सपिंडीकर्ता असेल तर मातामहासह सपिंडी करावी, असें दुसरे ग्रंथकार म्हणतात. सहगमन असल्यास भर्त्यासहवर्तमानच सपिंडी करावी, कोणाचीही सपिंडी असली तरी अन्वष्टक्य व प्रतिसांवत्सरिक श्राद्धीं पितामही इत्यादिकांसहच मातेचें पार्वण करावें. येथें स्वपुत्र, सपत्नीपुत्र व पति यांतून कोणीही नसल्यास स्त्रियांस सपिंडी नाहीं असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. या स्थलीं अन्वारोहण

म्हणजे सहगमन असल्यास 'भर्त्यासह पत्नीचें संयोजन' असा जो पक्ष त्याविषयीं दोन मतें आहेत. पितृपिंडाचें पितामहादि त्रयींच्या पिंडांशीं संयोजन करून नंतर मातृपिंडाचें पितामहादि त्रयीच्या पिंडांशीं संयोजन करणें हा एक पक्ष व पहिल्यानें मातेचा पिंड पित्याशींच संयुक्त करून मातेच्या पिंडानें एकत्र केलेला पित्याचा पिंड पितामहादिकांचे पिंडांशीं संयुक्त करावा हा दुसरा पक्ष. या दोहोंत दुसराच पक्ष योग्य आहे.

केचित्सहगमनेएकदिनमरणेवास्त्रियाःसपिण्डननास्ति भर्तुःकृतेसपिण्डने-भार्यायाअपिकृतंभवतीतिमतान्तरमाहुः सर्वाभावेस्वयंपत्न्यःस्वभर्तृणाममन्त्र-कम् । सपिण्डीकरणंकुर्युस्ततःपार्वणमेवच ॥ १ ॥ ब्रह्मचारिणामनपत्यानांच-व्युत्क्रममृतानांचसपिण्डनंनकार्यमितिमतान्तरम् अत्रसर्वत्रसपिण्डनाभावपक्षो-नशिष्टाचारेदृश्यते यतीनांसपिण्डीकरणंनास्तिकिंतुतत्स्थानेएकादशेह्निपार्वणं कार्यम् इदंसपिण्डीकरणश्राद्धंपार्वणैकोद्दिष्टरूपं तेनपितामहादित्रयार्थंत्रयोविप्रा-अर्घ्याःपिण्डाश्चत्रयः प्रेतार्थमेकोविप्रःपिन्डोऽर्घ्यश्च देवार्थंद्वौ यद्वापार्वणेएकः प्रेतेएकोदेवार्थमेकोविप्रः अत्रकामकालौविश्वेदेवौ प्रेतस्यपित्रादेरर्घ्यपात्रंपिता-महाद्यर्घ्यपात्रत्रयेसंयोज्यम् एवंप्रेतपिण्डोऽपिपितामहादिपिण्डत्रयेसंयोज्यः पितृविप्रकरेहोमः साग्नेरपिभवेदिह । सपिण्डीकरणश्राद्धमन्नेनैवकार्यंनत्वामा-दिना अनुमासिकान्यप्यन्नेनैवकार्याणि ॥

**सहगमनसपिंडीकरणनिर्णय**—सहगमन असल्यास किंवा एका दिवशीं दंपती मरण पावल्यास स्त्रियेची सपिंडी करूं नये, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. भर्त्याची सपिंडी केली असतां स्त्रियेची सपिंडी केल्या-सारखें होतें असें दुसरें मत आहे. औरस किंवा दत्तक पौत्रप्रपौत्र या सर्वांचा अभाव असल्यास स्त्रियांनीं आपल्या भर्त्यांची सपिंडी अमंत्रक करावी. सपिंडीनंतर पार्वण-श्राद्धच करावें. ब्रह्मचारी, अपत्यहीन व व्युत्क्रममृत यांची सपिंडी करूं नये, असें दुसरें मत आहे. अशा प्रसंगीं सपिंडी न करण्याचा पक्ष शिष्टाचारांत दिसत नाहीं. संन्यासी यांचें सपिंडीकरण नाहीं. पण त्यांच्या अकराव्या दिवशीं पार्वणश्राद्ध करावें. हें सपिंडीश्राद्ध, पार्वण व एकोद्दिष्ट असें दोन प्रकारचें आहे. यावरून पितामहादि तिघांकरितां तीन ब्राह्मण व अर्घ्ये आणि पिंडही तीनच असावे. प्रेतासाठीं एक ब्राह्मण, एक पिंड व एक अर्घ्य. देवासाठीं दोन ब्राह्मण असावे, अथवा पार्वणासाठीं एक, प्रेतासाठीं एक व देवासाठीं एक असे ब्राह्मण सांगावे. या सपिंडीश्राद्धांत कामकाल विश्वेदेव घ्यावेत. पित्रादिक प्रेताचें अर्घ्यपात्र पितामहादिकांच्या तीन अर्घ्य-पात्रांत मिळवावें. तसेंच प्रेताचा पिंडही पितामहादिकांच्या तीन पिंडांत मिळवावा. या सपिंडीश्राद्धांत पितृस्थानीं असलेल्या ब्राह्मणाचे हातावर साग्निकानेंही होम करावा. सपिंडीश्राद्ध अन्नानेंच करावें, आमान्नादिकानें करूं नये. अनुमासिक श्राद्धेंही अन्नानेंच करावींत.

प्रेत:सपिण्डनादूर्ध्वंपितृलोकंसगच्छति । कुर्यात्तस्यचपाथेयंद्वितीयेह्निसपिण्डनात् १ इतिवचनात्त्रयोदशेह्निपाथेयश्राद्धंकृत्वापुण्याहवाचनादिकंकृत्वा-वर्षपर्यन्तंप्रत्यहमुदकुम्भश्राद्धंकुर्यात् अशक्तौमासिकश्राद्धेष्वेकोदकुम्भोदेयः सपिण्डनोत्तरानुमासिकानांपार्वणविधिनानुष्ठानं वृद्धिप्राप्तौतेषामप्यपकर्षः सच-चतुःपुरुषसपिण्डेष्वेवेत्युक्तम् एवंवर्षपर्यन्तंकृत्वावर्षान्त्यदिनेसंवत्सरविमोक्ष-श्राद्धंपार्वणविधिनाकार्यम् इदमेवाब्दपूर्तिश्राद्धमित्युच्यते वृद्धिश्राद्धेसपिण्ड्यां-चप्रेतश्राद्धेऽनुमासिके । संवत्सरविमोकेचनकुर्यात्तिलतर्पणम् १ इदमूनाब्दिका-न्तषोडशश्राद्धेभ्योभिन्नमेव अतएवास्यप्रेतश्राद्धत्वाभावाद्वृद्धिप्राप्तावपिनाप-कर्षः ततोवर्षान्त्यदिनेशक्त्याभूरिब्राह्मणभोजनंचकार्यमित्यन्त्येष्टिपद्धतौभट्टाः युक्तंचैतत् जीवतोवाक्यकरणात्प्रत्यब्दंभूरिभोजनात् । गयायांपिण्डदानाच्च त्रिभिःपुत्रस्यपुत्रता १ इतिवाक्येनभूरिभोजनपदेनप्रत्याब्दिकश्राद्धातिरिक्त-स्यैवबहुविप्रभोजनस्यविहितत्वात् श्राद्धेकुर्यान्नविस्तरमितिनिषेधाच्छ्राद्धस्य भूरिभोजनपदाभिधेयत्वासंभवात् ॥

**पाथेयश्राद्ध**—सपिंडी झाल्यावर मरण पावलेला पितृलोकास जातो, म्हणून सपिंडीचे दुसऱ्या दिवशीं त्याचे पाथेयश्राद्ध करावें, असें वचन आहे. यासाठीं तेराव्या दिवशीं पाथेयश्राद्ध करून पुण्याहवाचन करावें. नंतर एक वर्षभर उदकुंभश्राद्ध करावें. प्रत्यहीं करण्याचें सामर्थ्य नसल्यास मासिक श्राद्धाचे वेळीं एक उदकुंभ द्यावा. सपिंडी झाल्यावर अनुमासिकें पार्वणविधीनेंच करावींत व वृद्धिश्राद्ध प्राप्त झाल्यास त्याचाही अपकर्ष करावा. हा अपकर्ष चार पुरुषांपर्यंत असलेल्या सपिंडांविषयींच होय. वर्षभर असें केल्यावर वर्षाचे शेवटच्या दिवशीं संवत्सरविमोक्षश्राद्ध पार्वणविधीनेंच करावें. संवत्सरविमोक्ष हेंच अब्दिपूर्तिश्राद्ध असेंही म्हणतात. वृद्धिश्राद्ध, सपिंडी, प्रेतश्राद्ध, अनुमासिक व संवत्सरविमोक्ष या श्राद्धीं तिलतर्पण करूं नये. ऊनाब्दिकापर्यंतच्या षोडश श्राद्धांहून हें अब्दिपूर्तिश्राद्ध भिन्न असल्यामुळें हें प्रेतश्राद्ध नाहीं. म्हणून वृद्धि प्राप्त असतांही या श्राद्धाचा अपकर्ष करूं नये. वर्षाचे शेवटचे दिवशीं शक्त्यनुसार बहुत ब्राह्मणभोजन घालावें असें अंत्येष्टिपद्धतींत भट्ट सांगतात व तें योग्यही आहे. कारण पिता जिवंत असतां त्याची आज्ञा मानणें, प्रत्यब्दश्राद्धीं बहुत ब्राह्मणभोजन करणें व गयेंत पिंडदान करणें, या तीन कृत्यांनीं पुत्रास पुत्रपणा येतो, या वाक्यांतील 'भूरि-भोजन' या पदानें प्रत्याब्दिक श्राद्धाव्यतिरिक्तही बहुत ब्राह्मणांस भोजन घालणें उक्त आहे. श्राद्धांत विस्तार करूं नये असा निषेध आहे, म्हणून श्राद्धास भूरिभोजनपदा-भिधेयत्वाचा असंभव आहे.

अथप्रथमाब्देनिषिद्धानि ॥ मातापित्रोर्मरणेवर्षपर्यन्तंपरान्नंगन्धमाल्यादि-भोगंमैथुनमभ्यङ्गस्नानंचवर्जयेत् ऋतौभार्यामुपेयादेव आर्त्विज्यंलक्षहोममहा-दानादिकाम्यकर्माणितीर्थयात्राविवाहादिवृद्धिश्राद्धयुतकर्ममात्रंशिवपूजांच वर्जयेत् संध्योपासनदेवपूजापञ्चमहायज्ञातिरिक्तकर्ममात्रंवर्ज्यम् प्रमीतौ पितरौ

**यस्यदेहस्तस्याशुचिर्भवेत् । नदैवंनापिवापित्र्यंयावत्पूर्णोनवत्सरः १ इति केचित् महातीर्थस्यगमनमुपवासव्रतानिच । सपिण्डीश्राद्धमन्येषांवर्जयेद्वत्सरं बुधः १ अस्यापवादः पत्नीपुत्रस्तथापौत्रोभ्रातातत्तनयःस्नुषा । मातापितृव्य-श्चैतेषांमहागुरुनिपातने १ कुर्यात्सपिण्डनंश्राद्धंनान्येषांतुकदाचन । एकादशाह-पर्यन्तंप्रेतश्राद्धंचरेत्सदा २ पित्रोर्मृतौहन्यान्येषांकुर्याच्छ्राद्धंतुपार्वणम् । गया-श्राद्धंमृतानांतुपूर्णेत्वब्देप्रशस्यते ३ गारुडे तीर्थश्राद्धंगयाश्राद्धंश्राद्धमन्यच्च-पैतृकम् । अब्दमध्येनकुर्वीतमहागुरुविपत्तिषु १ केचिद्वर्षान्तसपिण्डनपक्षापि-सर्वएतेनिषेधानतुद्वादशाहसपिण्डनपक्षइत्याहुः अपरेतुद्वादशाहसपिण्डनपक्षेऽ-पिसर्वएतेनिषेधाइत्याहुः अत्रैवंव्यवस्थावृद्धिप्राप्तिंविनाऽर्वाक्सपिण्डनापकर्षेपि प्रेतस्यपितृत्वप्राप्तिर्वर्षान्तएव कृतेसपिण्डीकरणेनरःसंवत्सरात्परम् । प्रेतदेहं-परित्यज्यभोगदेहंप्रपद्यते १ इत्यादिवचनात् तेनसपिण्डीकरणसत्त्वेपिवृद्धि-दैवपित्र्येष्वनधिकारः वृद्धिनिमित्तापकर्षेतुवृद्ध्यादावधिकारइति अतएवकाल-तत्त्वनिर्णये संकटादौमृतपितृकापत्यानांसंस्काराभ्युदयिकंमृतमातापितृकेणपुत्रे-णस्वापत्यसंस्कारादिकंच प्रथमाब्देपिकार्यमित्युक्तम् दर्शमहालयादिश्राद्धस्य-नित्यतर्पणस्यचाप्येवमेवव्यवस्थाज्ञेया ॥**

**पहिल्या वर्षाचीं निषिद्धें**—माता व पिता हीं मरण पावल्यास एक वर्षपर्यंत परान्न, गंधमाल्यादि भोग, मैथुन व अभ्यंग-स्नान हीं वर्ज्य करावींत. तीर्थयात्रा, विवाहादिक, वृद्धिश्राद्धयुक्त सर्व कर्मे व शिव-पूजा हीं वर्ज्य करावींत. संध्या, उपासन, देवपूजा व पंचमहायज्ञ यांशिवाय इतर सर्व कर्में वर्ज्य करावींत. ज्याचे माता, पिता मृत झाले त्याचा देह एक वर्षपर्यंत अशुचि होतो, म्हणून त्यानें कोणतेंही देवकर्म व पितृकर्म करूं नये, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. महातीर्थाची यात्रा, उपवास, व्रतें व दुसऱ्याचें सपिंडीश्राद्ध हीं शहाण्या पुरुषानें एक वर्षपर्यंत वर्ज्य करावींत. यास अपवाद,—माता व पिता हीं मरण पावलीं असतां पत्नी, पुत्र, पौत्र, भ्राता, भ्रातृपुत्र, सून, माता व पितृव्य यांची सपिंडी करावी, इतरांची कधींही करूं नये. अकराव्या दिवसापर्यंतचीं श्राद्धें जरूर करावींत. माता व पिता मरण पावलीं असतां इतरांचें पार्वणश्राद्ध करूं नये. मृतांचें गयाश्राद्ध पूर्ण वर्षानंतर प्रशस्त आहे. तीर्थश्राद्ध, गयाश्राद्ध व अन्य पितृश्राद्ध हीं माता, पिता मृत असतां वर्षामध्यें करूं नयेत, असें गरुडपुराणांत सांगितलें आहे. वर्षांतीं सपिंडी करण्याचा पक्ष असेल तरच हे सर्व निषेध होत; बाराव्या दिवशीं सपिंडी करण्याचा पक्ष असल्यास हे निषेध नाहींत, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. उलट, बाराव्या दिवशीं सपिंडी करण्याचा पक्ष असतांही हे निषेध आहेत, असें दुसरे ग्रंथकार म्हणतात, तर याची व्यवस्था अशी:—वृद्धिप्राप्तीवांचून पूर्वी सपिंडीचा अपकर्ष केला तरी प्रेतास पितृत्वाची प्राप्ति वर्षांतींच होते. कारण, सपिंडी केली असतां मनुष्य वर्षानंतर प्रेतदेह सोडून भोगदेहास जातो असें जें वचन आहे, त्यावरून सपिंडी केली तरी वृद्धिसंज्ञक दैवकर्म व पित्र्यकर्म यांस अधिकार नाहीं.

वृद्धिनिमित्तानें अपकर्ष केला तरी वृद्धिकर्मास अधिकार आहे. यासाठींच संकटादिक असतां मृतपितृक अपत्याचें संस्काररूप मंगलकार्य व मृतमातापितृक पुत्रानें आपल्या अपत्याचे संस्कारादिक प्रथम वर्षींही करावें, असें कालतत्त्वनिर्णयांत सांगितलें आहे. दर्श, महालय, इत्यादि श्राद्ध व नित्यतर्पण यांचीही व्यवस्था अशौच जाणावी.

अथविधानानि तत्रपञ्चकमृतौ पञ्चकंनामधनिष्ठोत्तरार्धमारभ्यरेवत्यन्तंसार्धनक्षत्रचतुष्टयम् तत्रदाहनिषेधाद्दर्भमयपुत्तलैर्यवपिष्टानुलिप्तैःपञ्चोर्णासूत्रवेष्टितैःसह शवंदहेत् तत्रतिथ्यादिसंकीर्त्यामुकस्यधनिष्ठापञ्चकादिमरणसूचितवंशारिष्टविनाशार्थंपञ्चकविधिंकरिष्यइतिसंकल्प्योक्तविधाः प्रतिमानक्षत्रमन्त्रैरभिमन्त्र्यगन्धपुष्पैः संपूज्यदाहसमये प्रेतोपरिन्यसेत् प्रथमांशिरसि द्वितीयांनेत्रयोःतृतीयांवामकुक्षौ चतुर्थींनाभौ पञ्चमींपादयोः तदुपरिनाममन्त्रैर्घृताहुतीर्जुहुयात् तत्रनामानिक्रमेण प्रेतवाहः प्रेतसखःप्रेतपःप्रेतभूमिपः प्रेतहर्ताचेति ततउदकंदत्वायमायसोमं त्र्यंबकमिति मन्त्राभ्यांप्रत्येकंप्रतिमास्वाज्याहुतिर्जुहुयात् ततः प्रेतमुखेपञ्चरत्नंदत्वा पुत्तलैःसहप्रेतंदहेत् सूतकान्तेतिलहेमघृतानिदत्वाकांस्यपात्रेतैलंप्रक्षिप्यतत्रात्मप्रतिबिम्बंवीक्ष्यविप्रायदद्यात् शान्तिंचकुर्यात् ॥

**दहनपंचकविधि**—पंचक म्हणजे धनिष्ठा नक्षत्राचे उत्तरार्धास आरंभ करून रेवतीच्या अंतापर्यंत असणारीं जीं साडेचार नक्षत्रें, तें होय. या पंचकांत दहनाचा निषेध आहे, म्हणून दर्भमय पुतळे करून ते यवाचे पिठानें लिप्त करावे व पांच ऊर्णासूत्रांनीं (लोंकर) त्यांस वेष्टन करून त्यासह शवाचें दहन करावें. त्यांविषयीं तिथि इत्यादिकांचा उच्चार करून—'अमुकस्य धनिष्ठापंचकादिमरणसूचित वंशारिष्टविनाशार्थं पंचकविधिं करिष्ये'—असा संकल्प करावा व उक्त प्रकारच्या प्रतिमा नक्षत्रमंत्रांनीं अभिमंत्रित करून गंधपुष्पांनीं पूजा करावी व दहनकालीं त्या प्रेतावर ठेवाव्या. पहिली मस्तकावर, दुसरी नेत्रांवर, तिसरी वामकुक्षीवर, चवथी नाभीवर व पांचवी पायांवर, याप्रमाणें ठेवून त्या प्रतिमांवर नाममंत्रांनीं घृताहुति ज्या हवन कराव्या, त्यांचीं नांवें 'प्रेतवाहः, प्रेतसखः, प्रेतपः, प्रेतभूमिपः, प्रेतहर्ता,' अशीं नांवें क्रमानें जाणावीं. नंतर उदक देऊन "यमायसोमं०" व "त्र्यंबकं०" या दोन मंत्रांनीं प्रत्येक प्रतिमेवर घृताहुतींनीं हवन करावें. नंतर प्रेताचे मुखांत पंचरत्नें घालून पुतळ्यासह प्रेताचें दहन करावें. सूतकाच्या अंतीं तिल, सुवर्ण व घृत यांचीं दानें करून कास्यपात्रांतल्या तेलांत आपलें प्रतिबिंब पाहावें व तें (पात्र) ब्राह्मणास द्यावें आणि शांतिही करावी.

अत्रायंविशेषः नक्षत्रान्तरेमृतस्यपञ्चकेदाहप्राप्तौपुत्तलाविधिरेवनशान्तिकम् पञ्चकमृतस्याश्विन्यांदाहप्राप्तौशान्तिकमेवनपुत्तलाविधिः शान्तिश्चलक्षहोमरुद्रजपान्यतररूपायथाविभवंकार्या अथवाकुम्भेयमप्रतिमांसंपूज्यस्वगृह्योक्तविधिनाग्निप्रतिष्ठापनान्वाधानादिचरुश्रपणान्तंकृत्वाज्यभागान्तेनामभिश्चतुर्दशचर्वाहुतीर्जुहुयात् यमायस्वाहा १ धर्मराजाय २ मृत्यवे ३ अन्तकाय

४ वैवस्वताय ५ कालाय ६ सर्वभूतक्षयाय ७ औदुम्बराय ८ दध्नाय ९ नीलाय १० परमेष्ठिने ११ वृकोदराय १२ चित्राय १३ चित्रगुप्ताय १४ एवंहुत्वाहोमशेषंसमाप्य कृष्णांगांकृष्णवस्त्रांचहेमनिष्कसमन्विताम्। दद्याद्विप्रायशान्ताय यमोमेप्रीयतामिति ॥

**दहनपंचकविधिविशेष**—अन्य नक्षत्रीं मरण पावलेल्याचा दाह पंचकांत प्राप्त झाल्यास पुतळे करावे, शांति करूं नये. पंचकांत मरण पावलेल्याचा दाह अश्विनी नक्षत्रांत प्राप्त झाल्यास शांतिच करावी, पुतळे करूं नयेत. शांति करायची ती लक्षहोम किंवा रुद्रजप यांतून कोणतीही शक्त्यनुसार करावी अथवा कलशावर यमाच्या प्रतिमेची पूजा करून आपल्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधीनें अग्निस्थापन, अन्वाधान व चरु शिजविणें येथपर्यंतचें कर्म करून, आज्यभागांत कर्म केल्यावर 'यमायस्वाहा ...' वगैरे चौदा नाममंत्रांनीं चरूच्या चवदा आहुतींनीं होम करावा. याप्रमाणें होम करून होमशेष समाप्त केल्यावर 'कृष्णांगां कृष्णवस्त्रांच० ...' या मंत्रानें गोदान करावें.

त्रिपाद्दक्षेप्येतदेवशान्तिकं यदिभद्रातिथीनांस्याद्भानुभौमशनैश्चरैः । त्रिपाद्दक्षैश्चसंयोगस्तदायोगस्त्रिपुष्करः १ द्विपुष्करोद्वयोर्योगेथवायंस्याद्विपादभैः। त्रिपादनक्षत्राणितु पुनर्वसूत्तराषाढाकृत्तिकोत्तरफाल्गुनी। पूर्वभाद्राविशाखाच ज्ञेयमेतत्त्रिपादभम् १ मृगचित्राधनिष्ठाचज्ञेयमेतद्द्विपादभम् । त्रिपुष्करयोगेद्विपुष्करयोगेच मृतौकृच्छ्रत्रयंप्रायश्चित्तंकृत्वायवपिष्टमयपुरुषत्रयेणसहप्रेतदाहः पुरुषत्रयस्यप्रेतेन्यासआज्याहुतयश्चपूर्ववत् कनकहीरकनीलपद्मरागमौक्तिकेतिपञ्चरत्नस्यमुखेप्रक्षेपोपि रत्नाभावेकर्षार्धस्वर्णम् स्वर्णाभावेघृतम् एवंपूर्वत्रापि दहनेमरणेत्रिद्विपुष्करेत्रिगुणंफलम्। द्विगुणंखननेप्येवमेतद्दोषोपशान्तये१सुवर्णदक्षिणांदद्यात्कृष्णवस्त्रमथापिवा। शान्तिकुर्यात्सूतकान्तेपूर्वोक्तांतेनमङ्गलम् ॥

**त्रिपादनक्षत्रशान्ति**—त्रिपादनक्षत्रीं अशीच शांति करावी. भद्रा तिथींचा (२।७।१२), रवि, भौम व शनि हे वार आणि त्रिपाद नक्षत्रें यांचा संयोग झाल्यास, त्रिपुष्कर योग होतो. दोहोंचा योग असतां किंवा द्विपाद नक्षत्रांचा योग असतां द्विपुष्कर योग होतो. पुनर्वसु, उत्तराषाढा, कृत्तिका, उत्तरा, पूर्वाभाद्रपदा व विशाखा हीं त्रिपाद नक्षत्रें होत. मृग, चित्रा व धनिष्ठा हीं द्विपाद नक्षत्रें होत. त्रिपुष्कर योग व द्विपुष्कर योग यांवर मरण प्राप्त झाल्यास तीन कृच्छ्रें प्रायश्चित्त करून यवाचे पिठाच्या तीन पुरुषप्रतिमांसह प्रेताचें दहन करावें. तीन पुतळे प्रेतावर ठेवणें व आज्याहुति देणें हें पूर्वींप्रमाणेंच करावें. सुवर्ण, हिरा, नीलमणी, माणिक व मौक्तिक हीं पांच रत्नें प्रेतमुखांत टाकावीत. रत्नांचा अभाव असल्यास अर्ध तोळा सुवर्ण व सुवर्णाच्या अभावीं घृत घालावें. याप्रमाणें पूर्वींही करावें. त्रिपुष्कर व द्विपुष्कर योगांवर मरण आल्यास त्रिगुण व द्विगुण फल होतें. व खनन असतांही असेंच फल प्राप्त होतें या दोषाची शांति होण्यासाठीं सुवर्णदक्षिणा द्यावी किंवा काळें वस्त्र दान करावें. सूतकांतीं पूर्वीं सांगितलेली शांति केली असतां मंगल होतें.

**मृतस्यश्मशानेनयनोत्तरंपुनर्जीवनेसतियस्यगृहेसप्रविशतितस्यमरणम् तत्र सक्षीरघृताक्तौदुम्बरसमिधांसावित्र्यष्टसहस्रेणहोमः अन्तेकपिलादानंतिलपूर्ण-कांस्यपात्रदानंच एकाशीतिपलंकांस्यंतदर्धंवातदर्धकम । नवषट्त्रिपलंवापि-दद्याद्विप्रायशक्तितः ।**

**मृतपुनर्जीवनप्रायश्चित्त**—मृतास स्मशानांत नेल्यावर तो पुनः जिवंत झाल्यास तो ज्याच्या घरांत प्रवेश करितो त्यास मरण प्राप्त होईल, त्यासाठीं दूध व तूप यांत भिजविलेल्या उंबराच्या समिधांचा सावित्री मंत्रानें आठ हजार होम करावा व शेवटीं कपिला गाईचें व तिलपूर्ण कांस्यपात्राचें दान करावें. एक्यायशीं पलें, साडे चाळीस पलें, सव्वासव्वीस पलें, नऊ, सहा किंवा तीन पलें, असें यथाशक्ति कांस्यपात्र ब्राह्मणांस द्यावें.

**अथब्रह्मचारिमृतौ ॥ ब्रह्मचारिमरणेद्वादशषट्त्रीणिवाब्दानिशक्त्याप्राय-श्चित्तंकृत्वादेशकालौस्मृत्वामुकगोत्रामुकनाम्नोब्रह्मचारिणोमृतस्यव्रतविसर्ग-करिष्येतदङ्गनान्दीश्राद्धंकरिष्यइत्युक्त्वाहिरण्येननान्दीश्राद्धंकृत्वाग्निप्रतिष्ठापना-द्याघारान्तेचतसृभिर्व्याहृतिभिराज्यंहुत्वाग्नयेव्रतपतयेस्वाहा अग्नयेव्रतानुष्ठान-फलसंपादनायस्वाहाः । विश्वेभ्योदेवेभ्यः स्वाहेतितिस्रआज्याहुतीर्हुत्वास्विष्ट-कृदादिसमाप्यम् ॥**

**ब्रह्मचारिमृति**—ब्रह्मचारी मरण पावल्यास बारा, सहा किंवा तीन अब्दें सामर्थ्यानुरूप प्रायश्चित्त केल्यावर देशकालांचें स्मरण करावें व 'अमुकगोत्रनाम्नो ब्रह्मचारिणो' असा संकल्प करून, हिरण्यानें नांदीश्राद्ध करावें व अग्निस्थापनापासून आघारांत कर्म झाल्यावर चार व्याहृतिमंत्रांनीं घृताचा होम करून 'अग्नये व्रतपतये स्वाहा, अग्नये व्रतानुष्ठानफलसंपादनाय स्वाहा, विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा' असें घृताच्या तीन आहुतींनीं हवन केल्यावर, स्विष्टकृदादि कर्म समाप्त करावें.

**पुनर्देशकालौस्मृत्वामुकस्यौर्ध्वदेहिकाधिकारार्थमर्कविवाहंकरिष्ये इत्यादि-हिरण्येननान्दीश्राद्धान्तेर्कसमीपेनीत्वार्कशाखांवागृहीत्वार्कब्रह्मचारिणौहरिद्र-यानुलिप्यपीतसूत्रेणसंवेष्ट्यवस्त्रयुग्मेनाच्छाद्याग्निप्रतिष्ठाद्याघारान्तेआज्यहोमः अग्नयेस्वाहा १ बृहस्पतये० २ विवाहविधियोजकाय० ३ यस्मैत्वाकामकामायवयं-सम्राडयजामहे । तमस्मभ्यंकामंदत्त्वाथेदंत्वंघृतंपिबस्वाहा कामायेदं० ४ ततो-व्यस्तसमस्तव्याहृतिहोमः एवमष्टाहुत्यन्तेस्विष्टकृदादिकृत्वार्कशाखांब्रह्म-चारिशवंचतुषाग्निनाविधिवद्दहेत् स्नातकमरणेप्येवमितिकेचित् एतन्निर्मूलमि-त्यन्ये सूतकान्तेत्रिंशद् ब्रह्मचारिभ्यःकौपीनकृष्णाजिनकर्णभूषणादिपादुकाछत्र-गोपीचन्दनमाल्यमणिविद्रुममालायज्ञोपवीतादियथासंभवंदद्यात् ॥**

**ब्रह्मचारिप्रेतार्कविवाह**—पुनः देशकालांचें स्मरण करून 'अमुकस्य और्ध्व-देहिकाधिकारार्थं अर्कविवाहं करिष्ये' असा संकल्प करावा व हिरण्यानें नांदीश्राद्धांत कर्म केल्यावर रुईचे झाडाजवळ नेऊन रुईची खांदी घ्यावी व रुई व ब्रह्मचारी यांस हळद लावून पिंवळ्या सूत्रानें वेष्टन करावें

व दोन वस्त्रांनीं आच्छादन केल्यावर अग्निस्थापनापासून आघारांत कर्म झाल्यावर 'अग्नयेस्वाहा०,'...'कामायेदं०' या मंत्रांनीं आज्यहोम करावा. त्यानंतर व्यस्तसमस्त-व्याहृतिमंत्रांनीं होम करावा. आठ आहुति दिल्यावर स्विष्टकृदादि कर्म करून रुईची खांदी व ब्रह्मचाऱ्याचें शव यांचें तुषाग्नीनें ( गवत ) यथाविधि दहन करावें. स्नातक मेला असतांही असाच विधि करावा, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात, तर हें निर्मूल आहे असें दुसरे ग्रंथकार म्हणतात. सूतकाच्या अंतीं तीस ब्रह्मचाऱ्यांस कौपिनें, कृष्णाजिनें, कर्णभूषणादिक, पादुका, गोपीचंदन, माळा, मणि, पोंवळ्याच्या माळा, यज्ञोपवीत, इत्यादि यथासंभव द्यावीं.

**अथकुष्टिमृतौ मृतस्यकुष्टिनोदेहंतीर्थेवाभुविवाक्षिपेत् । नदाहनोदकंपिण्डं नचदानंक्रियांचरेत् १ यदिस्नेहाच्चरेद्दाहंयतिचान्द्रायणंचरेत् । तथाचशक्त्य-नुसारेणषडब्दादिप्रायश्चित्तंकृत्वाकुष्टादिमहारोगमृतस्यदाहादिक्रियांकुर्यान्ना-न्यथेति ॥**

**मृतकुष्ठीदहनविधि**—कुष्ठी मरण पावल्यास त्याचा देह तीर्थांत टाकावा किंवा भूमींत पुरावा. त्याचें दहन, उदक, पिंडदान, दानें व क्रिया हीं करूं नयेत. स्नेहामुळें जर दहन केलें तर यतिचांद्रायण करावें. त्याचप्रमाणें सामर्थ्यानुरूप षडब्दादिक प्रायश्चित्त करून कुष्ठादिक महारोगानें मरण पावलेल्याची दहनादि क्रिया करावी, अन्यथा करूं नये.

**अथरजस्वलादिमरणे रजस्वलायाःप्रेतायाःसंस्कारादीनिनाचरेत् । ऊर्ध्वं त्रिरात्रात्स्नातांतांशवधर्मेणदाहयेत् ॥ १ ॥ अथवारजस्वलांसूतिकांचमलं प्रक्षाल्यस्नापयित्वाकाष्ठवदमन्त्रकंदग्ध्वास्थीनिमन्त्राग्निनादहेत् उभयत्रचान्द्रा-यणत्रयंप्रायश्चित्तमस्त्येव तदैवमन्त्रवद्दाहकरणेच्छायांतु अद्येत्याद्यमुकगोत्रा-यारजस्वलावस्थामरणनिमित्तप्रत्यवायपरिहारार्थमौर्ध्वदेहिकयोग्यत्वार्थंचचान्द्रा-यणत्रयप्रायश्चित्तपूर्वकंशूर्पेणाष्टोत्तरशतस्नानानिकारयिष्येतिसंकल्प्यचान्द्रायण त्रयंप्रत्याम्नायेनकृत्वायवपिष्टेनप्रेतमनुलिप्यस्वयंस्नात्वाशूर्पोदकैरष्टोत्तरशतवारं-स्नापयेत् ततोभस्मगोमयमृत्तिकाकुशोदकैःपञ्चगव्यैःशुद्धोदकैश्चसंस्नाप्य यदंति यच्चदूरकइत्यादिपावमानीभिरापोहिष्ठेतितृचेनकयानइत्यादिभिश्चसंस्नाप्यपूर्व-वस्त्रंपरित्यज्यान्यवस्त्रेणसंवेष्ट्यदहेत् सूतिकायामप्येवम् ॥**

**रजस्वलाप्रेतदहन**—रजस्वला स्त्री मरण पावल्यास तिचीं संस्कारादि कर्मे करूं नयेत. तीन रात्रींनंतर तिला स्नान घालून शवधर्मानें तिचें दहन करावें, अथवा रजस्वला व सूतिका(बाळंतीण) यांचा मल प्रक्षालन करून त्यांना स्नान घालावें व काष्ठाप्रमाणें अमंत्रक दहन करून, मंत्राग्नीनें अस्थींचें दहन करावें. दोन्हीही वेळीं म्हणजे अमंत्रकदहन व अस्थिदहन या वेळीं तीन चांद्रायणें प्राय-श्चित्त करावेंच. मरणकालींच समंत्रक दहन करण्याची इच्छा असल्यास 'अद्येत्यादि-अमुकगोत्राया रजस्वलावस्थामरणनिमित्त०' असा संकल्प करून, तीन चांद्रायणें प्रत्याम्नायानें करावींत व यवाचे पिठानें प्रेत लिप्त करून आपण स्नान करावें व

सुपांतील उदकांनीं शवास अष्टोत्तरशतवार ( १०८ वेळां ) स्नान घालावें. नंतर भस्म, गोमय, मृत्तिका, कुशोदक, पंचगव्यें व शुद्धोदक यांनीं स्नान घातल्यावर 'यदंति यच्चदूरके०' या पवमानी ऋचा, 'आपोहिष्ठा०' या तीन ऋचा व 'कयान०' इत्यादि मंत्रांनीं स्नान घालवून पूर्वीचें वस्त्र टाकून दुसऱ्या वस्त्रानें वेष्टन केलेला देह दहन करावा. सूतिका म्हणजे बाळंतीण मरण पावल्यासही असाच विधि करावा.

सूतिकायाआद्यत्र्यहमरणेत्र्यब्दंप्रायश्चित्तम् द्वितीयत्र्यहेद्व्यब्दम् तृतीयत्र्यहेएकाब्दम् दशमदिनेतुकृच्छ्रत्रयमितिविशेषः क्वचिदुक्तः मासपर्यन्तमपिकृच्छ्रत्रयमित्यन्ये मिताक्षरायांतुकुम्भेजलमादायपञ्चगव्यंक्षिप्त्वापुण्यमन्त्रैरापोहिष्ठावामदेव्यवारुणादिभिरभिमन्त्र्यपूर्वोक्तमन्त्रैः संस्नाप्यविधिनासूतिकांदहेदितिविशेषउक्तः इतिरजस्वलासूतिकयोर्विधिः ॥

**सूतिकामरण–प्रायश्चित्त**---बाळंतीण पहिल्या तीन दिवसांत मरण पावल्यास त्र्यब्द प्रायश्चित्त, दुसऱ्या तीन दिवसांत मरण पावल्यास व्द्यब्द प्रायश्चित्त, तिसऱ्या तीन दिवसांत मरण पावल्यास एकाब्द प्रायश्चित्त व दहाव्या दिवशीं मरण पावल्यास तीन कृच्छ्रें, याप्रमाणें विशेष कांहीं ग्रंथांत सांगितला आहे. एक मासपर्यंत मरण पावल्यासही तीन कृच्छ्रें करावींत, असें दुसरे ग्रंथकार म्हणतात. मिताक्षराग्रंथांत तर असें सांगितलें आहे कीं, कुंभांत उदक घेऊन त्यांत पंचगव्य घालावें व 'आपोहिष्ठा०, वामदेव्य०, व वारुण०,' या पुण्यमंत्रांनीं अभिमंत्रण करून पूर्वोक्त मंत्रांनीं स्नान घालावें आणि सूतिकेचें दहन विधियुक्त करावें. असा हा रजस्वला व सूतिका यांचा दहनविधि आहे.

अथगर्भिणीमरणे गर्भिण्यामृतायाःशुद्ध्यर्थंत्रयस्त्रिंशत्कृच्छ्राणिकृत्वागांभूमिं सुवर्णंचदत्त्वागर्भंपृथक्कृत्यतांदहेत् सगर्भदहनेतत्तद्वधप्रायश्चित्तम् सगर्भाया-दाहेकर्तुरब्दत्रयंप्रायश्चित्तम् ॥

**मृतगर्भिणीदहन**—गर्भिणी मरण पावल्यास तिच्या शुद्धीसाठीं तेहतीस कृच्छ्रें प्रायश्चित्त करून गाय, भूमि व सुवर्ण यांचीं दानें करावींत व निराळा गर्भ करून तिचें दहन करावें. गर्भासह दहन केल्यास गर्भाच्या वधाचें प्रायश्चित्त आहे. सगर्भेचें दहन केल्यास कर्त्यास तीन अब्द प्रायश्चित्त.

अथान्वारोहणंस्त्रीणामात्मनोभर्तुरेवच ।सर्वपापक्षयकरंनिरयोत्तारणायच १ अनेकस्वर्गफलदंमुक्तिदं चतथैवच । जन्मान्तरेचसौभाग्यधनपुत्रादिवृद्धिदम् २ तिस्रःकोट्योर्धकोटीचयावन्त्यङ्गरुहाणिवै । तावन्त्यब्दसहस्राणिस्वर्गलोके महीयते ३ मातृकंपैतृकंचैवयत्रकन्याप्रदीयते । कुलत्रयंपुनात्येषाभर्तारंयानुगच्छति ४ इत्यादिमहिमा विस्तरोमिताक्षरादौज्ञेयः अत्रनिष्कामत्वेमुक्तिः सकामत्वेस्वर्गादिफलानीतिव्यवस्था ॥

**अन्वारोहण**—स्त्रियांचें अन्वारोहण म्हणजे सती जाणें हें स्वतःचें व भर्त्याचें सर्व पाप दूर करणारें असून नरकोद्धारार्थ आहे. तसेंच तें अनेक स्वर्ग-

फल देणारें व मुक्ति देणारें असून जन्मांतरीं सौभाग्य, घन व पुत्रादिकांची वृद्धि करणारें असें होतें. जी स्त्री भर्त्याप्रत अनुगमन करिते ती आपलें मातृकुल, पितृकुल व ज्या कुलांत तिला दिली तें भर्तृकुल ह्या तिन्ही कुलांस पावन करून साडेतीन कोटी वर्षेंपर्यंत किंवा जितके केश अंगावर आहेत तितकीं सहस्रवर्षेंपर्यंत स्वर्गलोकीं राहते, इत्यादि त्याचा महिमाविस्तार मिताक्षरादि ग्रंथांत पहावा. अन्वारोहण निष्काम असेल तर मुक्ति व सकाम असेल तर स्वर्गादि फलें प्राप्त होतात, असें जाणावें.

अथप्रयोगः देशकालौस्मृत्वामातृपितृश्वशुरादिकुलपूतत्वब्रह्महत्यादिदोषदूषितपतिपूतत्वपत्यवियोगारुन्धतीसमाचारत्वसार्धकोटित्रयसहस्रसंवत्सरस्वर्महीयमानत्वादिपुराणोक्तानेकफलप्राप्तयेश्रीलक्ष्मीनारायणप्रीतिद्वाराविमुक्तिप्राप्तयेवापतिचितान्वारोहणंकरिष्येइतिसंकल्प्यहरिद्राकुङ्कुमवस्त्रफलादियुतानिशूर्पाणिसुवासिनीभ्योदद्यात् तत्रमन्त्रः लक्ष्मीनारायणोदेवोबलसत्त्वगुणाश्रयः। गाढंसत्त्वंचमेदेयाद्वायनैःपरितोषितः१सोपस्काराणिशूर्पाणिवायनैःसंयुतानिच। लक्ष्मीनारायणप्रीत्यैसत्त्वकामाददाम्यहम् २ अनेनसोपस्करशूर्पदानेनलक्ष्मीनारायणौप्रीयेताम् ततोऽञ्जलेपञ्चरत्नंनीलाञ्जनंचबध्वामुखेमौक्तिकंन्यस्याग्निसमीपंगत्वाग्निप्रार्थनांकुर्यात् स्वाहासंश्लेषनिर्विण्णशर्वगोत्रहुताशन । सत्त्वमार्गप्रदानेननयमांपत्युरन्तिकम् १ इति अथाग्नावाज्येनजुहुयात् अग्नये-तेजोधिपतयेस्वाहा १ विष्णवेसत्त्वाधिपतयेस्वाहा २ कालायधर्माधिपतये० ३ पृथिव्यैलोकाधिष्ठात्र्यै० ४ अद्भ्योरसाधिष्ठात्रीभ्यः० ५ वायवे बलाधिपतये० ६ आकाशायसर्वाधिपतये० ७ कालायधर्माधिष्ठात्रे० ८ अद्भ्यःसर्वसाक्षिणीभ्यः० ९ ब्रह्मणेवेदाधिपतये० १० रुद्रायस्मशानाधिपतयेस्वाहा ११ इत्येकादशाहुतीर्हुत्वाग्निंप्रदक्षिणीकृत्य दृषदमुपलां संपूज्यपुष्पांजलिंगृहीत्वाग्निंप्रार्थयेत् त्वमग्नेसर्वभूतानामन्तश्चरसिसाक्षिवत् । त्वमेवदेवजानीषेनविदुर्यानिमानुषाः १ अनुगच्छामिभर्तारं वैधव्यभयपीडिता। सत्त्वमार्गप्रदानेननयमांभर्तुरन्तिकम् २ मन्त्रमुच्चार्यशनकैःप्रविशेच्चहुताशनम्। विप्राश्चइमानारीरविधवाइत्यृचं इमाःपतिव्रताःपुण्याःस्त्रियोयायाःसुशोभनाः। सहभर्तृशरीरेणसंविशन्तुविभावसुम् १ इतिचपठेत् कातरांतुप्रेतोत्तरतःसुप्तांदेवरःशिष्योवाउदीर्ष्वेतिमन्त्राभ्यामुत्थापयेत् अनुव्रजतिभर्तारंस्मशानंयागृहान्मुदा। पदेपदेश्वमेधस्यफलंप्राप्नोतिसाध्रुवम् १ यत्तु यास्त्रीब्राह्मणजातीयामृतंपतिमनुव्रजेत् । सास्वर्गमात्मघातेनात्मानंनपतिनयेत् १ इत्यादिब्राह्मण्यानिषेधवचनजातंतत्पृथक्चितिपरम् भर्तुर्मन्त्राग्निदाहोत्तरमनुगमनंपृथक्चितिः मन्त्राग्निदाहात्पूर्वमस्थिभिः पर्णशरेणवासहगमनमेकचितिरेव अस्थ्यादेःपतिस्थानापत्त्यापतिशरीरतुल्यत्वात् इयमेकचितिःसर्ववर्णानाम् पृथक्चितिस्तु क्षत्रियवैश्यशूद्रादेरेव नतुब्राह्मणीनाम् पृथक्चितिविधिस्तु देशान्तरमृतेपत्यौसाध्वीतत्पादुकाद्वयम्। निधायोरसिसंशुद्धाप्रविशेज्जातवेदसमिति ॥

**अन्वारोहणप्रयोग**—देशकालांचें स्मरण करून, 'मातृपितृश्वशुरादिकुलपूतत्वब्रह्महत्यादिदोषदूषितपूतत्वपत्य...अन्वारोहणं करिष्ये,' असा संकल्प करावा, व 'लक्ष्मीनारायणो देवो०' या मंत्रांनीं हळद, कुंकुम, वस्त्र, फल इत्यादिकांनीं युक्त असलेलीं सुपें सुवासिनींस द्यावींत. नंतर वस्त्रांत पंचरत्नें व नलिांजन बांधून व मुखांत मौक्तिक घालून अग्नीजवळ जावें आणि 'स्वाहासंश्लेषनिर्विण्ण शार्वगोत्रहुताशन०' या प्रार्थनामंत्रानें अग्नीची प्रार्थना करावी. त्यानंतर अग्नयेतेजोधिपतयेस्वाहा०' या प्रकारा आहुतींनीं अग्नींत आज्याचा होम करावा व अग्नीस प्रदक्षिणा करून दृषद व उपल म्हणजे पाटावरवंटा यांची पूजा करावी आणि हातांत पुष्पांजलि घेऊन 'त्वमग्ने सर्वभूतानामंतश्चरासि' या मंत्रांनीं अग्नीची प्रार्थना करावी. हे मंत्र हळुहळू म्हणून अग्नींत प्रवेश करावा. नंतर ब्राह्मणानें 'इमानीरविधवा०' ही ऋचा व 'इमाः पतिव्रताः पुण्या' या मंत्राचा पाठ करावा. भयानें चंचल झाल्यास प्रेताच्या उत्तरप्रदेशीं निजलेल्या त्या स्त्रियेस दिरानें किंवा शिष्यानें 'उदीर्ष्वा०' या दोन मंत्रांनीं उठवावी. घरापासून जी स्त्री आनंदानें भर्त्याच्या पाठीमागून स्मशानांत जाते तिला पदोपदीं अश्वमेधाचें फल निश्चयानें मिळतें. ब्राह्मणी स्त्री मृतपतीच्या पाठीमागून जाईल तर ती आत्महत्येनें आपणास व पतीस स्वर्गास नेणार नाहीं, इत्यादि ब्राह्मणीस निषेध करणारीं जीं वचनें आहेत, तीं पृथक्चितिपर आहेत. भर्त्याचें मंत्राग्नीनें दहन झाल्यावर पाठीमागून जें सती जाणें ती पृथक्चिति होय. मंत्राग्नीनें दहन होण्यापूर्वीं अस्थींनीं किंवा पलाशविधीनें जें सहगमन ती एकचिति होय. कारण अस्थि इत्यादिक पतिस्थानापन्न असल्यानें त्यांस पतिशरीराची साम्यता आहे. ही एकचिति सर्व वर्णांस उक्त आहे. पण पृथक् चिति क्षत्रिय व वैश्यशूद्रादिकांसच उक्त आहे, ब्राह्मणी स्त्रियांस उक्त नाहीं. देशांतरीं पति मरण पावला असतां साध्वी स्त्रियेनें त्याच्या दोन पादुका वक्षस्थलीं धारण करून शुद्ध व्हावें आणि अग्निप्रवेश करून पृथक् चितीचा विधि करावा.

पतितेनप्रायश्चित्तार्थमृतेनवाभर्त्रासहान्वारोहणंनभवति यत्तु ब्रह्मघ्नोवाकृतघ्नोवामित्रघ्नोवाभवेत्पतिः।पुनात्यविधवानारीइत्यादिवाक्यंतज्जन्मान्तरीयब्रह्महत्यादिपापशोधनपरम् दिनैकगम्यदेशस्थासाध्वीचेत्कृतनिश्चया । नदहेत्स्वामिनंतस्यायावदागमनंभवेत् १ तृतीयेह्निउदक्यायामृतेभर्तरिवैद्विजाः। तस्याःसहगमार्थंतंस्थापयेदेकरात्रकम् १ रजस्वलायाःप्रथमद्वितीयदिनेपतिमृतौलौकिकाग्निभिरमन्त्रकंतंदग्ध्वापञ्चमेह्निअस्थिभिःसहान्वारोहणम् यदि रजस्वलादेशकालवशाद्दिनातदैवानुगन्तुमिच्छतिनशुद्धिंप्रतीक्षतेतदासैकद्रोणमितव्रीहीन्मुसलैरवहत्यतदाघातैःसर्वरजोनिवृत्तौपञ्चमृत्तिकाभिःशौचंकृत्वादिनक्रमेणत्रिंशद्विंशतिर्दशवाधेनूर्दत्वाविप्रवचनाच्छुद्धिंलब्ध्वासहगमनंकुर्यात् अत्रावहननेनरजोनिवृत्तिरतीन्द्रियेतीदंयुगान्तरपरंयोज्यमितिभाति जननमृताशौचयोस्तुसहगमनंनेतिकेचित् कालतत्वविवेचनेतुपूर्वप्रवृत्ताशौचमध्येभर्तृमरणे आशौचवतीनामपिभार्याणांसहगमनंभवति सूतिकोदक्ययोस्तुनेत्युक्तम्

इदमेवयुक्तंभाति इदंचसहगमनंगर्भिणीबालापत्यासूतिकाभिरदृष्टरजोभिःपतिताभिर्व्यभिचारिणीभिर्भर्तृदुष्टभावाभिश्चनकार्यम् केचिदत्रपतिव्रतानामेवाधिकारः वर्तन्तेयाश्चसततंभर्तॄणांप्रतिकूलतः । कामात्क्रोधाद्भयान्मोहात्सर्वाः पूताभवन्तिताः १ इत्यादितुवाक्यमर्थवादइत्याहुः तत्रपृथक्चित्यारोहणेभर्त्राशौचमध्येतदूर्ध्वंवाकृतेत्रिरात्रमाशौचंपिंडाश्च सहगमने तु तस्याःपिण्डादिकंशौचं पतिपिण्डादितःक्रमात् । अन्वारोहेतुनारीणांपत्युश्चैकोदकक्रिया १ पिण्डदानक्रियातद्वच्छ्राद्धंप्रत्याब्दिकंतथा । अन्वारोहेकृतेपत्न्याःपृथक्पिण्डांस्तिलाञ्जलीन् २ पृथक्शिलेनकुर्वीतदद्यादेकशिलेतथा । तत्रावयवपिण्डार्थपाकैक्यं भिन्नपिण्डता ३ नवश्राद्धानिभिन्नानिसापिण्डीकरणंपृथक् । एकएववृषोत्सर्गो गौरेकातत्रदीयते ४ सपिण्डीकरणंतुनकार्यम् अथवाभर्त्रैवसहकार्यम् यद्वाभर्त्रादिभिस्त्रिभिःसहकार्यमित्यादिपक्षाउक्ताः मासिकसांवत्सरिकादौ पाकैक्यकालैक्यादिव्यवस्थापि श्राद्धप्रकरणेउक्ता इतिसहगमनेनिर्णयः ॥

**अन्वारोहणापवाद**—पतित किंवा प्रायश्चित्तासाठीं मरण पावलेल्या भर्त्याबरोबर अन्वारोहण नाहीं. 'ब्रह्महत्या करणारा, कृतघ्न व मित्रघ्न, असा जरी पति असला तरी त्यास सौभाग्यवती स्त्री पावन करिते' असें जें वचन आहे तें अन्यजन्मार्जित ब्रह्महत्यादि पातक्यांच्या शुद्धीविषयीं आहे. एका दिवसांत पोहोंचतां येईल अशा देशीं राहणाऱ्या साध्वी स्त्रीचा सहगमनाचा निश्चय असेल तर ती येईपर्यंत पतीचें दहन करूं नये. हे द्विजहो, रजस्वलेच्या तिसऱ्या दिवशीं पति मरण पावल्यास तिच्या सहगमनासाठीं एक रात्र प्रेत ठेवावें. रजस्वलेच्या पहिल्या व दुसऱ्या दिवशीं पति मृत झाल्यास त्याचें लौकिकाग्नींनीं अमंत्रक दहन करून पांचव्या दिवशीं अस्थींसह अनुगमन करावें. रजस्वला, देश व काल इत्यादिकांच्या अनुकूलतेनें स्त्री जर तत्कालींच सहगमनाची इच्छा करीत असेल व शुद्धीची प्रतीक्षा करीत नसेल तर त्या कालीं त्या स्त्रीनें एक द्रोण म्हणजे ८ पायल्या भात मुसळानें कांडून त्याच्या आघातांनीं सर्व रजोनिवृत्ति झाली असतां पंचमृत्तिकांनीं शुद्धता करावी व दिवसाच्या क्रमानें म्हणजे पहिल्या दिवशीं तीस, दुसऱ्या दिवशीं वीस व तिसऱ्या दिवशीं दहा गोप्रदानें करून ब्राह्मणांच्या वचनानें शुद्धिग्रहण केल्यावर सहगमन करावें. भाताच्या आघातानें जी रजोनिवृत्ति होते ती अतींद्रिय असल्यानें हा निर्णय युगांतरीं योजावा असें वाटतें. जननाशौच व मृताशौच असतां सहगमन करूं नये, असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. पूर्वीं प्राप्त झालेल्या अशौचांत भर्ता मरण पावल्यास अशौचयुक्त स्त्रियांनींही सहगमन करावें, बाळंतीण अथवा रजस्वला असतां करूं नये, असें कालतत्त्वविवेचन ग्रंथांत म्हटलें आहे व तेंच योग्य आहे असें वाटतें. गर्भिणी, बालापत्या म्हणजे बालकें असलेली स्त्री, बाळंतीण, रजोदर्शन न झालेल्या, बाटलेल्या, व्यभिचारिणी व पतीशीं दुष्टभाव करणाऱ्या स्त्रियांनीं सहगमन करूं नये. कित्येक ग्रंथकारांच्या मतें पतिव्रतांसच सहगमनाचा अधिकार आहे. ज्या स्त्रिया काम, क्रोध, भय व मोह यांनीं भर्त्याशीं सदोदित प्रतिकूल वृत्तीनें

आचरण करीत असतील त्या सर्व पवित्र होतात, हें वाक्य अर्थवाद आहे असें म्हणतात. त्यांत भर्त्याच्या अशौचांत किंवा अशौचानंतर पृथक् चित्यारोहण केलें तर त्रिरात्र अशौच व पिंड; सहगमन असल्यास त्या स्त्रीचें अशौच पिंडादि क्रिया पतीच्या पिंडादि क्रमानें जाणावी. अन्वारोहण असेल तर स्त्रियेची व पतीची उदकक्रिया, पिंडदानक्रिया व प्रतिसांवत्सरिक श्राद्ध हीं एकच करावींत. अन्वारोहण केलें असतां स्त्रीस निराळे पिंड व निराळ्या अश्म्यावर तिलांजलि देऊं नये. तिलांजलि एकच अश्म्यावर द्याव्या. अवयव पिंडासाठीं पाक करावयाचा तो दोघांचा एकत्र करून पिंड निरनिराळे द्यावे. नवश्राद्धें व सपिंडी निरनिराळीं करावीं. सहगमन असतां वृषोत्सर्ग एकच करून स्त्रीच्या वृषोत्सर्गांत एक गाय द्यावी, पण सपिंडी करूं नये, किंवा भर्त्यासहवर्तमानच करावी, अथवा भर्ता इत्यादि तिघांसह करावी. हे पक्ष पूर्वीं सांगितलेच आहेत. मासिक व सांवत्सरिक श्राद्धांत एक पाक व एक काल इत्यादि व्यवस्था श्राद्धप्रकरणांत सांगितली आहे. असा हा सहगमनाविषयीं निर्णय आहे.

**काशीनाथउपाध्यायइत्थमन्त्यक्रियाविधिम् । निर्णीयभगवत्पादेचार्पयत्तद्विशुद्धये ॥ १ ॥ इत्यन्त्येष्टिनिर्णयः ॥**

**अन्त्येष्टिनिर्णयसमाप्ति**—याप्रमाणें काशीनाथोपाध्याय यांनीं अंत्यविधीचा निर्णय करून तो निर्णय शुद्ध होण्यासाठीं भगवच्चरणीं अर्पण केला. याप्रमाणें अंत्येष्टिनिर्णय येथें संपला.

**अथविधवाधर्माः पत्यौमृतेतुभार्याणांविधिद्वयमुदीरितम् । वैधव्यंपालयेत्सम्यक्सहाग्निगमनंतुवा ॥ १ ॥ पत्यौमृतेचयायोषिद्वैधव्यंपालयेत्सदा । सापुनःप्राप्यभर्तारंस्वर्गलोकंसमश्नुते ॥ २ ॥ विधवापालकेच्छीलंशीलभङ्गात्पतत्यधः । तद्वैगुण्यादपिस्वर्गात्पतिःपततिसर्वथा ॥ ३ ॥ तस्याःपिताचमाताच भ्रातृवर्गस्तथैवच । विधवाकबरीबन्धोभर्तृबन्धायजायते ॥ ४ ॥ शिरसोवपनंतस्मात्कार्यंविधवयासदा । एकवारंसदाभुक्तिरुपवासव्रतानिच ॥ ५ ॥ पर्यङ्कशयनान्नारीविधवापातयेत्पतिम् । नैवाङ्गोद्वर्तनंकार्यंगन्धद्रव्यस्यसेवनम् ॥ ६ ॥ नाधिरोहेदनड्वाहंप्राणैःकण्ठगतैरपि । कञ्चुकंनपरीदध्याद्वासोनविकृतंवसेत् ॥७॥ वैशाखेकार्तिकेमाघेविशेषनियमंचरेत् । ताम्बूलाभ्यञ्जनेचैवकांस्यपात्रेचभोजनम् ॥ ८ ॥ यतिश्चविधवाचैववर्जयेच्चन्दनादिकम् । अपुत्राविधवाभर्त्रादित्रयमुद्दिश्यप्रत्यहंतिलकुशोदकैस्तर्पणंकुर्यात् श्राद्धादौतुप्रागुक्तम् ॥**

**विधवाधर्म**—पति मृत झाला असतां स्त्रियांस दोन प्रकार सांगितले आहेत. उत्तम प्रकारें वैधव्यपालन करावें किंवा सहगमन करावें. जी स्त्री पति मरण पावला असतां सदोदित वैधव्य रक्षण करील ती पुनः भर्त्याप्रत प्राप्त होऊन स्वर्गलोकास जाते. विधवा स्त्रीनें सदाचरण पाळावें. सदाचरणाचा भंग झाल्यास ती अधोयोनीस जाते. त्यांत वैगुण्य झालें असतांही स्वर्गलोकापासून पति सर्वथा पतित होतो व तिचा पिता, माता व भ्रातृवर्ग हेही पतन पावतात. विधवेचा कबरीबंध म्हणजे केशाचा बुचडा पतीच्या बंधनास कारण होतो, म्हणून विधवेनें सदोदित

केशांचें वपन करावें. विधवेनें सदा एकदां भोजन, उपवास, व्रतें हीं आचरण करावींत. पलंगावर निद्रा करणारी विधवा स्त्री आपल्या पतीस अधोयोनीस पाडिते. विधवेनें अंगास तैलादि लावूं नये किंवा सुगंधी द्रव्यांचें सेवन करूं नये. कंठगत प्राण झाले तरी वृषभावर बसूं नये. तिनें कंचुकी म्हणजे चोळी धारण करूं नये, व चित्रविचित्र रंगांचें वस्त्र परिधान करूं नये. वैशाख, कार्तिक व माघ या मासांत तिनें विशेष नियम आचरावेत. तांबूल, काजळ, कांस्यपात्रांत भोजन व चंदनादिक हीं यति व विधवा यांनीं वर्ज्य करावींत. पुत्ररहित विधवा स्त्रीनें भर्ता इत्यादि त्रयीच्या उद्देशानें प्रत्यहीं तिलकुशोदकानें तर्पण करावें. श्राद्धादिकाविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे.

**अथसंन्यासः तत्रब्रह्मचर्यंकृत्वासमावर्तनांतेकृतदारः पुत्रानुत्पाद्ययज्ञैरिष्ट्वा-वानप्रस्थाश्रमंचकृत्वासंन्यसेदित्याश्रमसमुच्चयपक्षः ब्रह्मचर्यादेवप्रव्रजेत्गृहा-द्वावनाद्वा अथपुनरव्रतीवाव्रतीवास्नातकोवास्नातकोवोत्सन्नाग्निरनग्निकोवाय-दहरेवविरजेत्तदहरेवप्रव्रजेदित्याश्रमविकल्पपक्षः प्रव्रजेद्ब्रह्मचर्याद्वाप्रव्रजेच्चगृहा-दपि। वनाद्वाप्रव्रजेद्विद्वानातुरोवाथदुःखितः ॥१॥ इतिवाक्येआतुरोमुमूर्षुः दुःखित-श्चोरव्याघ्रादिभीतइत्यर्थः आतुराणांचसंन्यासेनविधिर्नैवचक्रिया । प्रेषमात्रं-समुच्चार्यसंन्यासंतत्रकारयेत् ॥ १ ॥ संन्यासेदण्डग्रहणादिरूपेविविदिषाख्ये विप्रस्यैवाधिकारः विद्वत्संन्यासेतुक्षत्रियवैश्ययोरपि कलियुगे संन्यासनिषेध-स्त्रिदण्डिसंन्यासपरइतिप्राञ्चः ॥**

**संन्यास**—ब्रह्मचर्य पाळल्यावर समावर्तन करावें व नंतर स्त्रीपरिग्रह करून पुत्रोत्पत्ति केल्यावर यज्ञांनीं यजन करावें व यानंतर वानप्रस्थाश्रम स्वीकारून संन्यास घ्यावा, असा आश्रमांचा समुच्चयपक्ष आहे. ब्रह्मचर्यापासूनच किंवा गृहस्थाश्रमापासून अथवा वानप्रस्थाश्रमापासून संन्यास घ्यावा. तसेंच पुनः अव्रती किंवा व्रती, स्नातक, किंवा अस्नातक, विच्छिन्नाग्नि किंवा अनग्निक कसेंही असलें तरी ज्या दिवशीं कडकडीत वैराग्य उत्पन्न होईल त्याच दिवशीं संन्यास घ्यावा, असाही आश्रमाचा विकल्पपक्ष सांगितला आहे. विद्वानानें ब्रह्मचर्यापासून, गृहस्थाश्रमापासून किंवा वानप्रस्थाश्रमापासून संन्यास घ्यावा, अथवा आतुर किंवा दुःखित असतां संन्यास ग्रहण करावा. या वाक्यांत आतुर म्हणजे मरण्यास टेकलेला व दुःखित म्हणजे चोर, व्याघ्र इत्यादिकांस भ्यालेला असा अर्थ घ्यावा. आतुराच्या संन्यासाविषयीं विधि व क्रिया नाहीं. प्रेषमात्र उच्चारून संन्यास करवावा. दंडग्रहणादिरूप विविदिषाख्य संन्यासाचा अधिकार ब्राह्मणासच आहे. पण विद्वत्संन्यासाचा अधिकार क्षत्रिय व वैश्य यांसही आहे. कलियुगांत जो संन्यासाचा निषेध केला आहे तो त्रिदंडीसंन्यासपर आहे, असें प्राचीन म्हणतात.

**सचसंन्यासश्चतुर्धा । कुटीचकोबहूदकोहंसःपरमहंसश्चेति अत्रोत्तरोत्तरः श्रेष्ठः बहिःकुट्यांगृहेवावसन्काषायवासास्त्रिदण्डीशिखायज्ञोपवीतवान्बन्धुषुगृहे वाभुञ्जानआत्मनिष्ठोभवेत्सकुटीचकः पुत्रादीन्हित्वासप्तागाराणिभैक्षंचरन्पूर्वो-क्तकाषायवस्त्रादिवेषवान्बहूदकः हंसस्तुपूर्वोक्तवेषोप्येकदण्डः परमहंसस्तुशिखा-**

यज्ञोपवीतहीनएकदण्डीस्यात् काषायवस्त्रंचतुर्णामपि हंसपरमहंसयोः शिखायज्ञोपवीतसत्त्वासत्त्वाभ्यांभेदः एकदण्डस्तुद्वयोरपि परमहंसस्यदण्डधारणंविविदिषादशायांनित्यम् विद्वत्तादशायांतुकृताकृतम् नदण्डंनशिखांनाच्छादनंचरति परमहंसइतिश्रवणात् वैराग्यंविनाजीवनाद्यर्थंसंन्यासेतुनरकः एकदण्डंसमाश्रित्य जीवन्तिबहवोनराः । नरकेरौरवेघोरेकर्मत्यागात्पतन्तिते १ काष्ठदण्डो धृतोयेन सर्वाशीज्ञानवर्जितः । सयातिनरकान्घोरानित्यादिस्मरणात् ॥

**चार प्रकारचे संन्यास**—कुटीचक, बहूदक, हंस व परमहंस असे संन्यासाचे चार प्रकार आहेत व ते उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत. बाहेर पर्णकुटींत किंवा घरांत राहून भगवीं वस्त्रें धारण करणारा त्रिदंडी. शिखा व यज्ञोपवीत यांनीं युक्त असून बांधवाचे घरीं किंवा घरीं भोजन करणारा जो आत्मनिष्ठ असेल तो कुटीचक होय. पुत्रादिकांचा त्याग करून सात घरें भिक्षा मागून पूर्वीं सांगितलेलीं वस्त्रें इत्यादि वेष धारण करणारा बहूदक होय. पूर्वोक्त वेष धारण करणारा असून एकदंडी असणारा हंस, व शिखायज्ञोपवीतविरहित एकदंडी असणारा तो परमहंस होय. भगवें वस्त्र चारही संन्यासांत आहेच. हंस व परमहंस यांचा भेद—शिखा व यज्ञोपवीत असणारा हंस व हीं नसणारा परमहंस. एकदंड उभयतांसही आहेच. विविदिषादशेंत परमहंसास दंड धारण करणें नित्य आहे व विद्वत्तादशेंत कृताकृत आहे. कारण, दंड, शिखा व आच्छादन हीं परमहंस धारण करीत नाहींत असें ऐकण्यांत आहे. वैराग्य नसतां उपजीविकेसाठीं संन्यासग्रहण केल्यास नरकप्राप्ति होते. कारण, एकदंडाचा आश्रय करून जे पुष्कळ लोक उपजीविका करितात ते कर्मत्यागानें घोर रौरव नरकांत पडतात व ज्ञानशून्य असतां काष्ठदंड धारण करून जो भक्ष्याभक्ष्य विचार न करितां सर्वभक्षक होतो, तो घोर नरकास जातो, इत्यादि स्मृति आहे.

अथसंन्यासग्रहणविधिः तत्रोत्तरायणंप्रशस्तम् आतुरस्यतुदक्षिणायनमपि तत्रादौगृह्याग्निमन्तंताद्दशविधुरंप्रतिचप्रयोगः तत्रशान्त्यादिलक्षणंगुरुंसंशोध्य तन्निकटेत्रिमासंयतिधर्मान्संवीक्ष्यगायत्रीजपरुद्रजपकूष्माण्डहोमादिभिःशुद्धिं लब्ध्वारिक्तातिथौदेशकालौस्मृत्वामुकस्यममकरिष्यमाणसंन्यासेधिकारार्थंचतुःकृच्छ्रात्मकंप्रायश्चित्तंप्रतिकृच्छ्रंतत्प्रत्याम्नायैकैकगोनिष्क्रयद्वाराहमाचरिष्ये कृच्छ्रप्रत्याम्नायगोनिष्क्रयंद्रव्यंविप्रेभ्योदातुमहमुत्सृजेइतिसंकल्पपूर्वकंरजतनिष्कतदर्धतदर्धान्यतमंप्रतिधेनुंदद्यात् एकादश्यांद्वादश्यां वायथाब्रह्मरात्रिःस्यात्तथाश्राद्धान्यारभेत् अत्रानाश्रमिणश्चतुःकृच्छ्रमन्यस्यतप्तकृच्छ्रमितिसिन्धुः स्वस्यनवश्राद्धषोडशश्राद्धसपिण्डीकरणानिसाग्निःपार्वणविधिनानिरग्निरेकोद्दिष्टविधिनाकुर्यादितिकेचिन्नेत्यन्ये ॥

**संन्यासग्रहणविधि**—संन्यासग्रहणास उत्तरायण हा प्रशस्त काल होय. आतुरास दक्षिणायनही प्रशस्त आहे. आतां गृह्याग्निमंत व गृह्याग्निविधुर यांविषयींचा प्रयोग सांगतों. शांत्यादि लक्षणांनीं युक्त असा उत्तम गुरु पाहून त्याच्याजवळ तीन महिनेपर्यंत सर्व यतिधर्म चांगले अवलोकन करावेत व

गायत्रीजप, रुद्रजप व कूष्मांडहोम इत्यादिकांनीं देहशुद्धि केल्यावर रिक्ता तिथीस देशकालांचें स्मरण करून, 'अमुकस्य मम करिष्यमाणसंन्यासेधिकारार्थं' असा संकल्प केल्यावर रुप्याचा निष्क, अर्धा निष्क किंवा पाव निष्क, यांतून कोणत्याही प्रमाणाचें प्रत्येक गोनिष्क्रय द्यावें. एकादशीस किंवा द्वादशीस जशी ब्रह्मरात्री प्राप्त होईल त्याप्रमाणें श्राद्धें आरंभावींत. येथें अनाश्रमी असल्यास चार कृच्छ्रें व इतरांस तप्तकृच्छ्र असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. आपल्या नवश्राद्धांत षोडशश्राद्धें व सपिंडीकरण हीं साग्निकानें पार्वणविधीनें व निरग्निकानें एकोद्दिष्टविधीनें करावींत, असें कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें आहे व करूं नयेत, असें दुसऱ्या ग्रंथकारांचें मत आहे.

अथाष्टौश्राद्धानि ॥ तत्रापस्तम्बहिरण्यकेशीयाशीयादीनामग्नौकरणपिण्डादिरहितःसांकल्पिकःप्रयोगः आश्वलायनादीनांसपिण्डकःपार्वणप्रयोगः तत्रादौसव्येनसयवजलेनश्राद्धाङ्गतर्पणम् ब्रह्माणंतर्पयामि विष्णुं० महेश्वरं० देवर्षीन्० ब्रह्मर्षीन्० क्षत्रर्षीन्० वसून्० रुद्रान्० आदित्यान्० सनकं० सनन्दनं० सनातनं० पञ्चमहाभूतानि० चक्षुरादिकरणानि० भूतग्रामं० पितरं० पितामहं० प्रपितामहं० मातरं० पितामहीं० प्रपितामहीं० आत्मानं० पितरं० पितामहं० इतिनद्यादौकृत्वा गृहमागत्यदेशकालौ स्मृत्वाकरिष्यमाणसंन्यासाङ्गत्वेनाष्टौश्राद्धानिपार्वणविधिनाऽन्नेनामेनवाकरिष्येइतिसंकल्प्यक्षणंदद्यात् अत्रसर्वंनान्दीश्राद्धवत् ॥ तेननापसव्यम् तिलस्थानेयवाः युग्माविप्राः तथाचदेवस्थानेविप्रौ द्वौश्राद्धाष्टकेषोडशेत्यष्टादशविप्राः तत्रसत्यवसुसंज्ञकाविश्वेदेवानान्दीमुखाः स्थानेक्षणःकर्तव्यःइत्येकंवृत्वाद्वितीयंवृणुयात् एकमग्रेपि प्रथमेदेवश्राद्धेब्रह्मविष्णुमहेश्वरानान्दीमुखाःस्थानेक्षणः० १ द्वितीयेऋषिश्राद्धेदेवर्षिब्रह्मर्षिक्षत्रर्षयःनान्दी० २ दिव्यश्राद्धेवसुरुद्रादित्यानान्दी० ३ मनुष्यश्राद्धेसनकसनन्दनसनातनानान्दी० ४ पञ्चमेभूतश्राद्धेपृथिव्यादिपञ्चमहाभूतान्येकादशचक्षुरादिकरणानिचतुर्विधभूतग्रामानां० ५ षष्ठेपितृपितामहप्रपितामहानान्दी० ६ मातृश्राद्धेमातृपितामहीप्रपितामहीनां० ७ अष्टमेआत्मश्राद्धेआत्मपितृपितामहानान्दी० ८ आत्मान्तरात्मापरमात्मेतिकेचित् इतिद्वौद्वौविप्रौवृणुयात् सर्वत्रनान्दीमुखत्वंविशेषणम् युग्माविप्राः सत्यवसूदक्षक्रतूवादेवौ ततःसर्वेषांपाद्यंदत्वा प्राङ्मुखानुदक्संस्थानुपवेश्यप्रार्थयेत् संन्यासार्थमहंश्राद्धंकुर्वे ब्रूतद्विजोत्तमाः । अनुज्ञांप्राप्ययुष्माकंसिद्धिंप्राप्स्यामिशाश्वतीम् १ कुरुइति प्रत्युक्तःसयवऋजुदूर्वादियुग्मेनाब्दानपूर्वकंसंबुध्यन्तेइदमासनमित्यष्टादशस्वासनंदद्यात् तत आश्वलायनानामर्घ्यपात्रासादनम् आपस्तम्बादीनांसांकल्पिकत्वान्नार्घ्यम् देवार्थमेकंपार्वणाष्टकार्थमष्टावित्येवंनवपात्राणि सर्वत्रपवित्रद्वयान्तर्हितेषुशन्नोदेवीरित्यपआसिच्यविश्वदेवपात्रेयवोसीतियवाः अष्टपात्रेषुतिलोसीतिमन्त्रस्योहेनयवानोप्यगन्धादिपूजनम् ऊहस्तु यवोसिसोमदेवत्योगोसवेदेवनिर्मितः । प्रत्नवद्भिःप्रत्तःपुष्ट्यानान्दीमुखान्देवान्प्रीणयाहिनः स्वाहानमः इतिप्रथमपात्रे द्वितीयेनान्दीमुखानृषीन्० तृतीयेनान्दीमुखान्

दिव्यान्प्री० चतुर्थे नान्दीमुखान्मनुष्यान्प्रीण० पञ्चमेनान्दीमुखानिभूतानिप्री० षष्ठसप्तमाष्टमेषुनान्दी० पितृन्प्रीणयेत्यादि० एकैकपात्रेद्विधाविभज्यसर्वत्रया-दिव्याइतिमन्त्रान्तेविश्वेदेवानान्दीमुखाइदंवोर्घ्यमितिदत्वाब्रह्माविष्णुमहेश्वरा-नान्दीमुखाइदंवोर्घ्यंस्वाहानमइत्यादिनायथायथंषोडशविप्रहस्तेषुदद्यात् या-दिव्याइतिस्रवदनुमन्त्रणम् पात्रंन्युब्जीकृत्यगन्धाद्याच्छादनान्तपूजा तत्रसर्वत्र-संबुध्यन्तोनान्दीमुखविशेषणयुक्तउच्चारः भोजनपात्राण्यासाद्यब्रह्मादिषोडश-विप्रकरेष्वग्नयेकव्यवाहनायस्वाहासोमायपितृमतेस्वाहेतिमन्त्राभ्यमाहुतिद्वयं-द्वयंदद्यात् नेदमापस्तम्बादीनाम् उपस्तीर्यान्नंपरिविष्यान्नाभावेआमंतन्निष्क्रयं-वाप्रोक्ष्यपृथ्वीतेपात्रमित्यादिनायथादैवतमन्नस्यामादर्वात्यागः येदेवास० प्रजापतेन० ब्रह्मार्पणंब्रह्म० अनेनाष्टश्राद्धेननान्दीमुखादेवादयःप्रीयन्ताम् आपोशनदानान्तेबलिदानवर्ज्यंभुंजीयुः तृप्तेषूपास्मै० अक्षन्नमी० संपन्नमिति पृष्टेरुचिरमितिसर्वेब्रूयुः नेदमामान्ने आचान्तेषुयवलाजदधिबदरियुतान्नेनाष्ट-चत्वारिंशत्पिण्डान्कृत्वाप्रागायताउदक्संस्थाअष्टौरेखाः कृत्वाभ्युक्ष्यकुशा-न्दूर्वावास्तीर्यपिण्डस्थानेषुचतुर्विंशतौजलंसिञ्चेत् तद्यथा शुन्धन्तांब्रह्मणोनान्दी-मुखाः शुन्धन्तांविष्णवोनान्दी० शुन्धन्तांमहेश्वरानां० इतिप्रथमरेखायाम् तदुत्तररेखासुशुन्धन्तांदेवर्षयोनां० शुन्धन्तांब्रह्मर्षयोनां० इत्याद्यूहोज्ञेयः ततो-ब्रह्मणेनान्दीमुखायस्वाहेत्येकंपिण्डंदत्वाद्वितीयएवमेवदेयस्तूष्णींवेतिप्रतिदैवतं-पिण्डद्वयम् एवमग्रेपिविष्णवेनान्दीमुखायस्वाहेत्यादयःस्वाहान्ताःपिण्डदान-मन्त्राऊह्याःअत्रपितरोमादयध्वमित्यादिपुनः शुन्धंतांतन्त्रमञ्जनमभ्यञ्जनंचकृता-कृतम् पिण्डान्गन्धादिनासंपूज्य नत्वोपसंपन्नमितिविसृज्यविप्रेभ्योदक्षिणादि-तन्त्रम् नेदंपिण्डदानाद्यापस्तम्बादीनाम् कात्यायनानामाश्वलायनवत् ॥

**आठ श्राद्धें**—आपस्तंब व हिरण्यकेशीय यांचा अग्नौकरणाचा प्रयोग पिंडरहित व सांकल्पिक आहे व आश्वलायनांचा प्रयोग सपिंडक पार्वणाचा आहे. त्यांत प्रथमतः सव्यानें यवोदकानें श्राद्धांगतर्पण करावें. तर्पणाच्या देवताः—' ब्रह्माणं तर्पयामि' वगैरे आहेत. नदी इत्यादि तीर्थी तर्पण करून घरीं आल्यावर देशकालांचें स्मरण करावें व ' करिष्यमाण संन्यासांगत्वेनाष्टौ श्राद्धानिपार्वणविधिनान्नेनामेन वा करिष्ये ' असा संकल्प करून क्षण द्यावा. या श्राद्धांतलें सर्व कर्म नांदीश्राद्धाप्रमाणेंच करायचें असल्यानें यांत अपसव्य नाहीं. तिळांच्या ऐवजीं यव घ्यावेत. ब्राह्मणांची संख्या सम असावी म्हणजे, देवस्थानीं दोन व आठ श्राद्धांचे सोळा मिळून अठरा ब्राह्मण सांगावेत. ' सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवा नांदीमुखाःस्थाने क्षणः कर्तव्यः ' असें म्हणून एका ब्राह्मणास पसंत करून दुसऱ्या ब्राह्मणास पसंत करावें व पुढेंही तसेंच करावें. पहिल्या देवश्राद्धीं, ' ब्रह्मविष्णुमहेश्वरा नांदीमुखाः स्थाने क्षणः ' दुसऱ्या ऋषिश्राद्धीं ' देवर्षिब्रह्मर्षि क्षत्रर्षयः नांदीमुखाः स्थाने० ' तिसऱ्या दिव्यश्राद्धीं ' वसुरुद्रादित्यानांदी० ' चवथ्या मनुष्यश्राद्धीं ' सनकसनंदनसनातना नांदी० ' पांचव्या भूतश्राद्धीं ' पृथिव्यादि पंचमहाभूतान्येकादशचक्षुरादिकरणादिचतुर्विधभूतग्रामानांदी० '

सहाव्या पितृश्राद्धीं 'पितृपितामहप्रपितामहानांदी०' सातव्या मातृश्राद्धीं 'मातृपितामही प्रपितामह्यो नांदी०' व आठव्या आत्मश्राद्धीं 'आत्मपितृपितामहा नांदी०' 'पितृपितामह' या स्थानीं 'आत्मांतरात्मापरमात्मा' असा उच्चार करावा, असें कोणी म्हणतात. याप्रमाणें दोन दोन ब्राह्मण वरावे. सर्व ठिकाणीं नांदीमुख हें विशेषण योजावें. ब्राह्मणांची संख्या सम असावी व देव सत्यवसु किंवा दक्षक्रतु घ्यावे. नंतर सर्व ब्राह्मणांस पाद्य देऊन पूर्वाभिमुख व उत्तराभिमुख बसवून, 'संन्यासार्थमहं श्राद्धं कुर्वे ब्रूत द्विजोत्तमाः०' वगैरे त्यांची प्रार्थना करावी. अशी प्रार्थना केल्यावर 'कुरु' असें ब्राह्मणांनीं प्रतिवचन दिल्यावर यवासह सरळ दोन दूर्वा घेऊन उदकदान करावें व 'संबुध्यंत' उच्चार केल्यावर 'इदमासनं' असें म्हणून अठरा ब्राह्मणांस आसन द्यावें. नंतर आश्वलायनांनीं अर्घ्यपात्रें मांडावीत. आपस्तंबादिकांचा सांकल्पिक विधि असल्यास अर्घ्य नाहीं. देवांकरितां एक व आठ पार्वणांकरितां आठ मिळून नऊ पात्रें मांडावीत. दोन दोन पवित्रकांनीं आच्छादिलेल्या सर्व पात्रांत 'शंनोदेवी०' या मंत्रानें उदक घालून विश्वेदेवपात्रांत 'यवोसि०' या मंत्रानें यव टाकावेत. आठ 'पात्रांत 'तिलोसि०' या मंत्राच्या ऊहानें यव टाकून गंधादिकानें पूजा करावी. तो ऊह असा:—'यवोसि सोमदेवत्यो गोसवे देवनिर्मितः। प्रत्नवद्भिःप्रत्तः पुष्टया नांदीमुखान् देवान् प्रीणयाहि नः स्वाहानमः' या मंत्रानें पहिल्या पात्रांत, 'नांदीमुखानृषीन्०' असा दुसऱ्या पात्रांत, तिसऱ्यांत 'नांदीमुखान्दिव्यान्प्री०', चौथ्यांत 'नांदीमुखान्मनुष्यान्प्री०', पांचव्यांत 'नांदीमुखानि भूतानि प्री०', सहाव्यांत, सातव्यांत व आठव्यांत 'नांदी० पितृन्प्रीणया०' असा फरक ( ऊह ) जाणावा. एकेक पात्र दोन दोन वेळ वांटून सर्वत्र 'यादिव्या०' हा मंत्र म्हटल्यावर 'विश्वेदेवानांदीमुखाइदंवोर्घ्यं०' असें म्हणून अर्घ्य द्यावे, व 'ब्रह्मविष्णुमहेश्वरा नांदीमुखा इदं वोर्घ्यं स्वाहानमः' इत्यादि प्रकारानें यथायोग्य सोळा ब्राह्मणांचे हातांवर अर्घ्य द्यावें. नंतर 'या दिव्या०' या मंत्रानें स्रवणाऱ्या उदकाचें अनुमंत्रण केल्यावर पात्र उपडें करून गंधादिकापासून आच्छादनापर्यंत पूजा करावी. पूजा करतांना सर्वत्र संबुध्यंत नांदीमुख विशेषणयुक्त उच्चार करावा. भोजनपात्रें मांडून ब्रह्मादिक सोळा ब्राह्मणांचे हातांवर 'अग्नयेकव्यवाहनाय स्वाहा' व 'सोमाय पितृमते स्वाहा' या दोन मंत्रांनीं दोन आहुति द्याव्या. आपस्तंबांस हें अग्नौकरण नाहीं. पात्राला तूप लावून अन्न वाढावें. अन्न नसल्यास आमान्न किंवा त्याचा निष्क्रय प्रोक्षण करून 'पृथिवीते पात्रं०' इत्यादि मंत्रांनीं दैवतानुसार अन्नाचा किंवा आमान्नाचा त्याग करावा. यावर 'ये देवास० प्रजापतेन० ब्रह्मार्पणं ब्रह्म० अनेनाष्ट श्राद्धेच नांदीमुखा देवादयः प्रीयंतां'—असें म्हणून उदक सोडावें. आपोशन दिल्यावर चित्राहुति वर्ज्य करून ब्राह्मणांनीं भोजन करावें. तृप्त झाल्यावर 'उपास्मै० अक्षन्नमी० संपन्नं०' असें विचारिलें असतां, सर्व ब्राह्मणांनीं 'रुचिरं' असें म्हणावें. आमान्न असल्यास हें म्हणूं नये. आंचवल्यावर यव, लाह्या, दहीं व बोरें यांनीं युक्त असलेल्या अन्नाचे अठ्ठेचाळीस पिंड करून, पश्चिमेकडून पूर्वेकडे काढलेल्या व उत्तरेकडे समाप्त केलेल्या अशा आठ रेषा काढून त्यांवर उदक सिंचन करावें व कुश

किंवा दूर्वा पसरून चोवीस पिंडस्थानीं उदक सिंचन करावें. तें असें:—'शुंधंता ब्रह्मणोनांदीमुखाः शुंधंता विष्णवोनांदीमुखाः शुंधंता महेश्वरानांदी०' असें म्हणून पहिल्या रेषेवर व त्याच्या उत्तर रेषांवर 'शुंधंतां देवर्षयोनां० शुंधंता ब्रह्मर्षयोनांदी०' इत्यादि ऊह जाणावा. नंतर 'ब्रह्मणेनांदीमुखाय स्वाहा' असें म्हणून एक पिंड द्यावा व दुसराही असाच द्यावा किंवा मंत्ररहित द्यावा. याप्रमाणें प्रत्येक देवतेस दोन पिंड द्यावे व पुढेंही 'विष्णवेनांदीमुखाय स्वाहा' इत्यादि स्वाहांत पिंड देण्याचे मंत्र जाणावे. 'अत्र पितरो मादयध्व' इत्यादिकांपासून पुनः 'शुंधंता' येथपर्यंत तंत्र, अंजन व अभ्यंजन हीं कृताकृत आहेत. पिंडांची गंधादिकानें पूजा करून नमस्कार करावा व 'उपसंपन्नं' असें म्हणून पिंडांचें विसर्जन करावें व ब्राह्मणांस दक्षिणा देणें इत्यादि तंत्र करावें. हें पिंडदानादिक आपस्तंबादिकांस नाहीं. कात्यायनशाखीयांस आश्वलायनांप्रमाणेंच पिंडदानादिक आहे.

**अष्टश्राद्धोत्तरंतद्दिनेद्वितीयेवाषट्शिखाकेशान्स्थापयित्वा कक्षोपस्थवर्ज-केशश्मश्रुनखादिवापयित्वास्नात्वाकौपीनाच्छादनादिहोमद्रव्यंचविनान्यद्धना-दिविप्रादिभ्यःपुत्रादिभ्यश्चत्यजेत् कौपीनादिकंगैरिकरञ्जितंकृत्वावैणवंदण्डं-सत्वचंशिरोभ्रूललाटान्यतमप्रमाणंसमूलमङ्गुलिस्थूलंविप्रानीतमेकादशनचतुः सप्तान्यतमपर्वकंपर्वग्रन्थियुतंसंपाद्यशङ्खोदकेनप्रणवपुरुषसूक्तकेशवादिनामभि-रभिषिच्यस्थापयेत् ततःकमण्डलुकौपीवाच्यादनकन्थापादुकाःस्थापयेत् शिक्यपात्रादिकमपिकेचित् ॥**

**संन्याशाची सामुग्री**—अष्टश्राद्धें झाल्यावर त्या दिवशीं किंवा दुसऱ्या दिवशीं शिखेचे सहा केश ठेवून कक्षोपस्थ केश, श्मश्रु, नखें इत्यादिकांचें वपन करवून स्नान करावें व कौपीन, आच्छादनादि व होमद्रव्यें यांखेरीज इतर सर्व द्रव्यादिक ब्राह्मण व पुत्र यांस द्यावें. कौपीन, छाट्या इत्यादि-कांस कावेचा रंग देऊन त्वचायुक्त बांबूचा दंड, शिर, भिंवया किंवा ललाट यांतून कोणत्याही प्रमाणाच्या उंचीचा समूल असून अंगुलपरिमित जाड व ब्राह्मणानें आणलेला असावा. अकरा, नऊ, चार किंवा सात यांतून कोणत्याही परिमित पेरांच्या गांठींनीं युक्त व मुद्रायुक्त असा दंड मिळवून, त्याला प्रणव, पुरुषसूक्त व केशवादि नामांनीं शंखोदकानें स्नान घालून ठेवावा. नंतर कमंडलु, कौपीन, आच्छादन, कंथा व पादुका ठेवाव्या. शिंकें व पात्रादिकही ठेवावींत असेंही कोणी म्हणतात.

**देशकालौसंकीर्त्याशेषदुःखनिवृत्तिरतिशयानन्दप्राप्तिपरमपुरुषार्थप्राप्तये-परमहंसाख्यसंन्यासग्रहणं करिष्ये तदङ्गतयागणपतिपूजनपुण्याहवाचनमातृ-कापूजननान्दीश्राद्धानिकरिष्ये तानिकृत्वाजपेत् ब्रह्मणेनमः विष्णवे० रुद्राय० सूर्याय० सोमाय० आत्मने० अन्तरात्मने० परमात्मने० अग्निमीळेऋक् इषे-त्वोर्जेत्वा० अग्नआयाहिऋक् जपित्वासक्तुपिष्टमुष्टित्रयंप्रणवेनाद्भिःप्राश्यना-भिमालभेत् आत्मनेस्वाहा अन्तरात्मने० परमात्मनेस्वा० प्रजापतयेस्वाहेति मन्त्रैः ततःपयोदधिमिश्रमाज्यंजलमेववात्रिवृदसीतिप्रथमंप्राश्यप्रवृदसीति-**

द्वितीयंविवृदसीतितृतीयंप्राश्यापःपुनन्त्विवतिजलं प्राश्याचम्योपवासंकरिष्येइति संकल्पयेत् ॥

**संन्याससंस्कार**—देशकालांचें संकीर्तन केल्यावर 'अशेषदुःखनिवृत्ति निरतिशयानंदप्राप्तिपरमपुरुषार्थप्राप्तये परमहंसाख्यसंन्यासग्रहणं करिष्ये' वगैरे असा संकल्प करून, नांदीश्राद्ध केल्यावर, 'ब्रह्मणेनमः विष्णवे०' वगैरे जप करावा. जप झाल्यावर सातूंचें पीठ तीन मुठी प्रणवमंत्रानें तीनदां प्राशन करून 'आत्मने स्वाहा, अन्तरात्मने स्वाहा, परमात्मने स्वाहा, प्रजापतये स्वाहा' या मंत्रानें नाभीस स्पर्श करावा. नंतर दूध व दहीं यांनीं मिश्रित घृत किंवा उदकच 'त्रिवृदसि' या मंत्रानें पहिल्यानें, 'प्रवृदसि' या मंत्रानें दुसऱ्यानें व 'विवृदसि' या मंत्रानें तिसऱ्यानें प्राशन करावें. त्यानंतर 'आपःपुनंतु०' या मंत्रानें उदक प्राशन करून आचमन केल्यावर 'उपवासं करिष्ये' असा संकल्प करावा.

अथसावित्रीप्रवेशः । ॐभूःसावित्रींप्रविशामि ॐतत्सवितुर्वरेण्यं ॐभुवः सावित्रींप्र० ॐभर्गोदेवस्य० ॐस्वःसावित्रीं० ॐधियोयो० ॐभूर्भुवःस्वः सावित्रींप्र० ॐतत्सवितुर्वरेण्यं० ऋक्ततोस्तात्प्राक्गृह्याग्निंसमिध्यविच्छिन्नश्चेत्पुनःसंधानविधिनानिरग्निर्वाविधुरादिर्वापृष्टोदिविविधानेनाग्निंसंपादयेत् पृष्टोदिविविधानंचकात्यायनवैश्वदेवप्रसङ्गेपूर्वार्धेउक्तम् ॥

**सावित्रीप्रवेश**—'ॐभूः सावित्रीं प्रविशामि ॐतत्सवितुर्वरेण्यं ॐभुवः सावित्रीं प्र०' वगैरे प्रार्थना केल्यावर सूर्यास्तापूर्वी गृह्याग्नि प्रदीप्त करून किंवा तो विच्छिन्न असल्यास पुनः संधानविधीनें, निरग्नि किंवा विधुरादिक असल्यास पृष्टोदिविविधानानें अग्नि उत्पन्न करावा. पृष्टोदिविविधान कात्यायनाच्या वैश्वदेवप्रसंगीं पूर्वार्धांत सांगितलेंच आहे.

अथास्तात्पूर्वंब्रह्मान्वाधानम् संन्यासंकर्तुं ब्रह्मान्वाधानंकरिष्येइतिसंकल्प्याग्निध्यानाद्याज्यंसंस्कृत्य स्रुक्स्रुवौसंमृज्य स्रुचिचतुराज्यंगृहीत्वा ॐस्वाहेतिहुत्वापरमात्मनइदं० परिषेचनादि इतिब्रह्मान्वाधानम् ॥

**ब्रह्मान्वाधान**—सूर्यास्तापूर्वी 'संन्यासं कर्तुं ब्रह्मान्वाधानं करिष्ये' असा संकल्प करून अग्नीचें ध्यानादि कर्म करावें. नंतर आज्यसंस्कार करून स्रुचि व स्रुवा या पात्रांस संस्कार करावा आणि स्रुचि पात्रांत चार वेळ तूप घेऊन 'ॐस्वाहा' या मंत्रानें आहुति दिल्यावर 'परमात्मन इदं०' असें म्हणून त्याग करावा व नंतर उदकसिंचनादि कर्म करावें. याप्रमाणें ब्रह्मान्वाधान सांगितलें.

ततःसायंसंध्याहोमवैश्वदेवान्कृत्वाग्निसमीपेजागरंकुर्यात् ॥

**अग्निजागरण**—ब्रह्मान्वाधानानंतर सायंसंध्या, होम व वैश्वदेव हीं करून अग्नीसमीप जागरण करावें.

प्रातर्नित्यहोमान्तेवैश्वदेवादिकंकृत्वाग्नेयंवैश्वानरंवास्थालीपाकंकुर्यात् तत्रकरिष्यमाणसंन्यासपूर्वाङ्गभूतमग्नेयस्थालीपाकंकरिष्यइतिसंकल्पः ध्यात्वा-

चक्षुषीआज्येनेत्यन्तेऽत्रप्रधानमग्निंचरुणाशेषेणेत्यादि अग्नयेत्वाजुष्टंनिर्वपामी-त्यादिनाम्नानिर्वापादि नाम्नैवप्रधानहोमः एवंवैश्वानरपक्षेप्यूह्यम् ततस्तरत्स-मन्दीतिजपित्वाकुशहेमरूप्यजलैःस्नात्वादेशादिस्मृत्वासंन्यासाङ्गभूतंप्राणादि-होमंपुरुषसूक्तहोमंविरजाहोमंचतन्त्रेणकरिष्येइतिसंकल्प्यान्वाधानेआज्येनेत्यन्ते प्राणादिपञ्चदेवताःसमिच्चर्वाज्यैः पुरुषंपुरुषसूक्तेनप्रत्यृचंषोडशवारंसमिच्चर्वा-ज्यैःप्राणाद्येकोनाविंशतिदेवताविरजामन्त्रैःप्रतिद्रव्यमेकैकसंख्यसमिच्चर्वाज्याहु-तिभिःप्रजापतिं सकृदाज्येनशेषेणेत्यादि षष्ट्युत्तरशतवारंतूष्णींनिरूप्य तथैव प्रोक्ष्यश्रपयित्वाज्यभागान्तेप्राणायस्वाहेत्यादिपञ्चमन्त्रैर्द्रव्यत्रयंसकृद्धुत्वायथा-दैवंत्यक्त्वासहस्रशीर्षेतिषोडशर्चेनप्रत्यृचंपृथक्पृथक्द्रव्यत्रयंहुत्वापुरुषाये-दंनममेतिसर्वत्रत्यजेत् ॥

**प्रातःकालाग्निकर्म**— प्रातःकाली नित्यहोम केल्यावर वैश्वदेवादिक करून आग्नेय किंवा वैश्वानर स्थालीपाक करावा. 'करिष्यमाणसंन्यासपूर्वांग-भूतमाग्नेयस्थालीपाकं करिष्ये'—असा संकल्प करून, ध्यान केल्यावर 'चक्षुषीआज्ये-नेत्यंतेत्रप्रधानमग्निं चरुणा शेषेण०'—असें अन्वाधान करावें व 'अग्नयेत्वाजुष्टं निर्वपामि' या नामानें निर्वापादिक करावें. प्रधानहोम नाममंत्रानेंच करावा. याचप्रमाणें वैश्वानर-स्थालीपाकाबद्दलही जाणावें. नंतर 'तरत्समंदी०' या मंत्राचा जप करून कुश, सुवर्ण व रौप्य यांनीं युक्त असलेल्या उदकानें स्नान करावें व देशकालाचें स्मरण करून 'संन्यासांगभूतं प्राणादिहोमं पुरुषसूक्तहोमं विरजाहोमं च तंत्रेण करिष्ये'—असा संकल्प करावा व अन्वाधानांत 'आज्येनेत्यंते प्राणादि०' हा एकशेंसाठ वेळां मंत्ररहित निर्वाप करून, मंत्ररहित प्रोक्षण करावें व चरु शिजवून आज्यभागांत कर्म केल्यावर 'प्राणाय स्वाहा०' इत्यादि पांच मंत्रांनीं समिधा, चरु व आज्य या तीन द्रव्यांचा होम एकदां केल्यावर, देवतेनुसार त्याग म्हणून 'सहस्रशीर्षा०' ह्या सोळा ऋचांनीं प्रत्येक ऋचेनें निरनिराळ्या तीन द्रव्यांचा होम करावा आणि 'पुरुषायेदंनमम' असा प्रत्येक वेळीं त्याग म्हणावा.

अथविरजाहोमः । प्राणापानव्यानोदानसमानामेशुध्यन्तांज्योतिरहंविरजाविपाप्माभूयासꣳस्वाहा प्राणादिभ्यइदं० वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिह्वाघ्राणरेतोबुद्ध्या-कूतिःसंकल्पामेशुद्ध्यन्तांज्योति० त्वगादिभ्यइदं० त्वक्चर्ममाꣳसरुधिरमेदो-मज्जास्नायवोऽस्थीनिमेशुद्ध्यन्तां० त्वगादिभ्यइदं० शिरःपाणिपादपार्श्वपृष्ठोरूद-रजङ्घशिश्नोपस्थपायवोमेशुद्ध्यं० शिरआदिभ्य० उत्तिष्ठपुरुषहरितपिङ्गललो-हिताक्षदेहिदेहिददापयितामेशुद्ध्यं० पुरुषादिभ्य० पृथिव्यादिभ्य० शब्दस्पर्श रूपरसगन्धामेशुद्ध्यं०शब्दादिभ्य०मनोवाक्कायकर्माणिमेशुद्ध्यंतां०मनआदि-कर्मभ्य०अव्यक्तभावैरहंकारैर्ज्योतिरहं०अव्यक्तादिभ्य०आत्मामेशुद्ध्यंतांज्यो० आत्मनइदं०अंतरात्मामे०अंतरात्मन०परमात्मामे०परमात्मन०क्षुधेस्वाहाक्षुधइदं० क्षुत्पिपासायस्वाहा क्षुत्पिपासायेदं० विविट्यैस्वा० विविट्या० ऋग्विधानाय० कषोत्कायस्वा० क्षुत्पिपासामलंज्येष्ठामलक्ष्मींनाशयाम्यहं । अभूतिमसमृ[illegible]

चसर्वोनिर्णुदमेपाप्मानꣳस्वाहा अग्नयइदं० अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञान-मयमानंदमयमात्मामेशुद्ध्यंतां० अन्नमयादिभ्य० एवंसमिच्चर्वाज्यैःप्रतिद्रव्यं-चत्वारिंशदाहुतीर्हुत्वा यदिष्टंयच्चपूर्तंयच्चापद्यनापदि प्रजापतौतन्मनसिजुहो-मिविमुक्तोहंदेवकिल्बिषात्स्वाहेत्याज्यंहुत्वा प्रजापतयइदमितित्यजेत् ततः पुरुषसूक्तं अग्निमीळेइत्यादिचतुर्वेदादींश्चजपित्वास्विष्टकृदादिहोमशेषंसमाप्य ब्रह्मचार्यादिभ्योगोहिरण्यवस्त्रादिदत्वासमासिञ्चन्तुमरुतइतिमन्त्रेणगृह्याग्निमुप-स्थायतत्रदारुपात्राणिदहेत्तैजसानिगुरवेदद्यात् ततआत्मन्यग्निसमारोपं अयंतेयो-निरित्यृचा याते अग्नेयज्ञियातनूस्तयेह्यारोहात्मात्मानमित्यादियजुषाचत्रिरुक्ते-नाग्नेर्ज्वालांप्राश्नन्कुर्यात् कृष्णाजिनमादायगृहान्निष्क्रम्य सर्वेभवन्तुवेदाढ्याः-सर्वेभवन्तुसोमपाः । सर्वेपुत्रमुखंदृष्ट्वासर्वेभवन्तुभिक्षुकाः १ इतिपुत्रादिभ्य आशिषंदत्वानमेकश्चिन्नाहंकस्यचित्पुत्रादीनुक्त्वाविसृजेत् जलाशयंगत्वा-ञ्जलिनाजलमादायाशुःशिशानइति सूक्तेनाभिमन्त्र्यसर्वाभ्योदेवताभ्यःस्वाहेति-त्यजेत तिथ्यादिस्मृत्वाऽपरोक्षब्रह्मावाप्तयेसंन्यासंकरोमीतिसंकल्प्यजला-ञ्जलिंगृहीत्वा ॐएषहवाअग्निःसूर्यःप्राणंगच्छस्वाहा ॐस्वांयोनिंगच्छस्वाहा ॐआपोवैगच्छस्वाहेतिमन्त्रत्रयेणजलेष्वञ्जलित्रयंदद्यात् पुत्रेषणावित्तेषणालो-केषणासर्वेषणामयापरित्यक्ताअभयंसर्वभूतेभ्योमत्तःस्वाहाइत्यञ्जलिंजलेक्षिपेत् पुनरेवमभयंदत्त्वावदेत् यत्किंचिद्बन्धनंकर्मकृतमज्ञानतोमया । प्रमादलास्य-दोषोत्थंतत्सर्वंसंत्यजाम्यहम् । त्यक्तसर्वोविशुद्धात्मागतस्नेहशुभाशुभः । एष-त्यजाम्यहंसर्वंकामभोगसुखादिकम् । रोषंतोषंविवादंचगन्धमाल्यानुलेपनम् । भूषणंनर्तनंगेयंदानमादानमेवच । नमस्कारंजपंहोमंयाश्चनित्याःक्रियामम । नित्यंनैमित्तिकंकाम्यंवर्णधर्माश्रमाश्रये । सर्वमेवपरित्यज्यददाम्यभयदक्षिणाम् ।४ पद्भ्यांकराभ्यांविहरन्नाहंवाक्कायमानसैः । करिष्येप्राणिनांपीडांप्राणिनःसन्तु-निर्भयाः । सूर्यादिदेवान्विप्रांश्चसाक्षित्वेन ध्यात्वानाभिमात्रेजलेप्राङ्मुखः-सावित्रीप्रवेशंपूर्ववत्कृत्वातरत्समन्दीतिसूक्तंपठित्वापुत्रेषणायावित्तेषणाया-लोकेषणायाश्चव्युत्थितोहंभिक्षाचर्यंचरामीतिजलेजलंजुहुयात् ॥

**विरजाहोम**—'प्राणापानव्यानोदानसमानामेशुध्यन्तांज्योतिरहंविरजाविपाप्माभूयासꣳस्वाहा प्राणादिभ्यइदं०' याप्रमाणें समिधा, चरु व आज्य यांपैकीं प्रत्येक द्रव्याच्या चाळीस आहुतींनीं होम करून 'यदिष्टं यच्च पूर्तं यच्चा-पद्यनापदि०' या मंत्रानें आज्याची आहुति देतांना 'प्रजापतयइदं०' असा त्याग म्हणावा. नंतर पुरुषसूक्त, 'अग्निमीळे०' इत्यादि चार वेदादिकांचा जप करून स्विष्ट-कृदादि होमशेष समाप्त करावा. व ब्रह्मचारी इत्यादिकांस गाई, हिरण्य व वस्त्रादिक देऊन 'समासिंचन्तुमरुत०' या मंत्रानें गृह्याग्नीचें उपस्थान करावें व त्यांत काष्ठपात्रें दहन करावींत. धातूचीं पात्रें असतील तर तीं गुरूला द्यावींत. 'अयंते योनि०' ही ऋचा व 'याते अग्नि यज्ञियातनूस्तयेह्यारोहमानं०' हा यजुर्मंत्र तीन वेळ म्हणून अग्नीची ज्वाला प्राशन करीत आपले ठिकाणीं अग्नीचा समारोप करावा. यावर कृष्णाजिन

घेऊन घरांतून बाहेर निघावें. व 'सर्वे भवन्तुवेदाढ्याः । सर्वेभवन्तु सोमपाः । सर्वे पुत्रमुखं दृष्ट्वा सर्वे भवन्तु भिक्षुकाः' या मंत्रानें पुत्रादिकांस आशीर्वाद देऊन 'नमे कश्चित् नाहं कस्यचित् (माझा कोणी नाहीं व मी कोणाचा नाहीं.) असें पुत्रादिकांस सांगून विसर्जन करावें. नंतर जलाशयाजवळ जाऊन ओंजळीनें उदक घ्यावें व 'आशुःशिशान' या सूक्तानें अभिमंत्रण करून 'सर्वाभ्यो देवताभ्यः स्वाहा' असें म्हणून उदक सोडावें. तिथ्यादिकांचें स्मरण करून "अपरोक्ष ब्रह्मवातयेसंन्यासं करोमि' असा संकल्प करून उदकाची अंजलि घेऊन 'ॐएष हवाग्निः सूर्यः प्राणं गच्छ स्वाहा०' या तीन मंत्रांनीं उदकांत तीन अंजलि द्याव्या. 'पुत्रेषणा, वित्तेषणा०' या मंत्रानें उदकांजलि जलांत टाकावा; याप्रमाणें पुनः अभय देऊन—

यत्किंचिद्बन्धनंकर्मकृतमज्ञानतोमया । प्रमादालस्य दोषोत्थंतत्सर्वंसंत्यजाम्यहम् ॥ १ ॥ त्यक्तसर्वोविशुद्धात्मागतस्नेहशुभाशुभः । एषत्यजाम्यहंसर्वं कामभोगसुखादिकम् ॥ २ ॥ रोषंतोषंविवादंचगन्धमाल्यानुलेपनम् । भूषणं नर्तनंगेयंदानमादानमेवच ॥ ३ ॥ नमस्कारंजपंहोमंयाश्चनित्याःक्रियामम । नित्यंनैमित्तिकंकाम्यंवर्णधर्माश्रमाश्रये ॥ ४ ॥ सर्वमेवपरित्यज्यददाम्यभयदक्षिणाम् । पद्भ्यांकराभ्यांविहरन्नाहंवाक्कायमानसैः ॥ ५ ॥ करिष्येप्राणिनां पीडांप्राणिनःसन्तुनिर्भयाः ॥

**जलाहुति**—असें म्हणावें व सूर्य, देव आणि ब्राह्मण यांच्या साक्षित्वानें ध्यान करून बेंबीपर्यंतच्या पाण्यांत सूर्याभिमुख उभें राहून, पूर्वीप्रमाणें सावित्रीप्रवेश केल्यावर 'तरत्समंदी०' या सूक्ताचा पाठ करावा, व 'पुत्रेषणाया लोकेषणायाश्च व्युत्थितोहं भिक्षाचर्यं चरामि' असें म्हणून उदकांत जलाची आहुति द्यावी.

अथप्रेषोच्चारः । ॐभूःसंन्यस्तंमया ॐभुवःसंन्यस्तं० ॐस्वःसंन्यस्तं० ॐभुर्भुवःस्वः संन्यस्तंमयेतित्रिर्मन्दमध्योच्चस्वरेणोक्त्वाऽभयंसर्वभूतेभ्योमत्तः स्वाहेति जलंजलेक्षिपेत् शिखामुत्पाटययज्ञोपवीतमुद्धृत्यकरेगृहीत्वाआपोवै सर्वादेवताःसर्वाभ्योदेवताभ्योजुहोमिस्वाहा ॐभूःस्वाहेतिजलेजलैःसहहुत्वा प्रार्थयेत् त्राहिमांसर्वलोकेशवासुदेवसनातन । संन्यस्तंमेजगद्योनेपुण्डरीकाक्षमोक्षद ॥ १ ॥ युष्मच्छरणमापन्नंत्राहिमांपुरुषोत्तम । ततोदिगम्बरः पञ्चपदान्युदङ्मुखोगच्छेत् विविदिषुश्चेत्तस्मै आचार्योनत्वाकाषायकौपीनाच्छादने दत्वा दण्डंदद्यात् सचकौपीनंवासश्चपरिधाय ॐ इंद्रस्यवज्रोसिसखेमांगोपायेतिदण्डंगृह्णीयात् वार्तघ्नःशर्ममेभवयत्पापंतन्निवारय प्रणवेनगायत्र्यावाकमण्डलुम् इदंविष्णुरित्यासनम् ततः समित्पाणिर्गुरुंनत्वागरुडासनोपविष्टोगुरुं वदेत् त्रायस्वभोजगन्नाथगुरोसंसारवह्निना । दग्धंमांकालदष्टंचत्वामहंशरणागतः १ योब्रह्माणंविदधातिपूर्वंयोवैवेदांश्चप्रहिणोतितस्मै । तंहदेवमात्मबुद्धिप्रकाशंमुमुक्षुर्वैशरणमहंप्रपद्येइतिगुरुमुपस्थायदक्षिणंजान्वाच्यपादावुपसंगृह्य-अधीहि भगवोब्रह्मेतिवदेत् गुरुरात्मानंब्रह्मरूपंध्यात्वाजलपूर्णशङ्खंद्वादशप्रणवै-

रभिमन्त्र्यतेनशिष्यमभिषिच्यशन्नोमित्रइतिशांतिंपठित्वातच्छिरसिहस्तंदत्त्वा-पुरुषसूक्तंजपित्वा शिष्यहृदयेहस्तंकृत्वा ममव्रतेहृदयंतेदधामीत्यादिमन्त्रं जप्त्वादक्षिणकर्णेप्रणवमुपदिश्य तदर्थंचपञ्चीकरणाद्यवबोध्य प्रज्ञानंब्रह्म अयमात्माब्रह्म तत्त्वमसि अहंब्रह्मास्मीतिऋग्वेदादिमहावाक्येष्वन्यतमंशिष्य-शाखानुसारेणोपदिश्यतदर्थंबोधयेत् ततस्तीर्थाश्रमादिसंप्रदायानुसारेणनाम-दद्यात् ततःपर्यङ्कशौचंकारयित्वायोगपट्टंदद्यात् ॥

**प्रैषोच्चार**—'ॐभूः संन्यस्तं मया ॐभुवः संन्यस्तं मया ॐभूर्भवः स्वः संन्यस्तं मया' असें त्रिवार मंद, मध्य व उच्च अशा स्वरांत म्हणून 'अभयं सर्व भूतेभ्यो मत्तः स्वाहा' या मंत्रानें उदक उदकांत टाकावें. नंतर शिखा उपटून व यज्ञोपवीत हातांत घेऊन 'आपो वै सर्वा देवताः सर्वाभ्यो देवताभ्यो जुहोमि स्वाहा ॐभूः स्वाहा' या मंत्रानें उदकांत उदकांसह हवन करावें आणि मग 'त्राहिमां सर्व लोकेश वासुदेव सनातन' अशी प्रार्थना केल्यावर दिगंबर होऊन उत्तराभिमुख पांच पावलें जावें. विविदिषु असेल तर त्यास आचार्यानें नमस्कार करून भगवें कौपीन आच्छादन देऊन दंड द्यावा. नंतर त्यानें कौपीन व वस्त्र परिधान करून 'ॐ इंद्रस्य वज्रोसि सखे मां गोपाय' या मंत्रानें दंड घ्यावा व वार्तघ्नः शर्म मे भव यत्पापं तन्निवारय' हा मंत्र म्हणून प्रणवानें किंवा गायत्रीमंत्रानें कमंडलु घ्यावा, 'इंदविष्णु०' या मंत्रानें आसन घ्यावें. नंतर समित्पाणि होऊन गुरूला नमस्कार करावा व गरुडासन घालून बसून 'त्रायस्व भो जगन्नाथ गुरो संसारवन्हिना' असें गुरूस म्हणावें. अशी गुरूची प्रार्थना केल्यावर उजवा गुडघा जमिनीला टेकून गुरूचे पाय धरावे व 'अधीहि भगवोब्रह्मा' असें म्हणावें. आपण ब्रह्मरूप आहों असें गुरूनें ध्यान करून जलानें भरलेला शंख बारा प्रणवमंत्रांनीं अभिमंत्रित करावा व त्या उदकानें शिष्यास अभिषेक करून 'शन्नोमित्र०' या मंत्रानें शांति पठन केल्यावर शिष्याच्या मस्तकावर हात ठेवून पुरुषसूक्ताचा जप करावा. नंतर हृदयावर हात ठेवून 'मम व्रते हृदय ते दधामि०' मंत्राचा जप केल्यावर उजव्या कानांत प्रणवाचा उपदेश करून प्रणवाचा अर्थ व पंचीकरणादिकांचा बोध करून शिष्याची शाखा असेल तिला अनुरूप 'प्रज्ञानं-ब्रह्म अयमात्मा ब्रह्म तत्त्वमसि अहं ब्रह्मास्मि' अशीं जीं ऋग्वेदादिक महावाक्यें आहेत त्यांतील कोणत्याही एका वाक्याचा अर्थबोध शिष्यास करावा. नंतर तीर्थाश्रमादि सांप्रदायानुसार नांव ठेवावें. त्यानंतर पर्यंकशौच करवून योगपट्ट द्यावें.

अथपर्यङ्कशौचप्रयोगः । कस्मिंश्चित्पुण्यदिनेकश्चिद्गृहस्थः स्वाग्रेपीठादौ यतिमुपवेश्यगुर्वनुज्ञातोयतयेपर्यङ्कशौचंकरिष्येइतिसंकल्प्यवामभागेप्राक्संस्था-न्पञ्चमृद्भागान्दक्षिणभागेपितथैवपंचसंस्थाप्योभयत्रशुद्धोदकंचसंस्थाप्यवाम-प्रथममृद्भागेनपञ्चवारंमृज्जलाभ्यांयतिजानुद्वयंकराभ्यांयुगपत्क्षालयेत् चरम-क्षालनेमृद्भागसमाप्तिः एवमग्रेपि ततोदक्षिणभागस्थप्रथमभागार्धेनस्ववामकरं-मृज्जलाभ्यांदशवारंप्रक्षाल्यापरार्धेनतेनेवजलेनोभौकरौसप्तवारंक्षालयेत् एवमग्रे पियोज्यम् संख्यायांविशेषस्तूच्यते वामद्वितीयभागेनचतुर्वारंयतिजङ्घाद्वयं-

युगपत्प्रक्षाल्यदक्षिणद्वितीयभागार्धेनसप्तवारंवामकरमर्धान्तरेणचतुर्वारमुभौच-करौक्षालयेत् वामतृतीयेनयतिगुल्फौत्रिवारंदक्षिणभागार्धेनवामकरं षड्वारमुभौ-करौचतुर्वारम् वामचतुर्थेनयतिपादपृष्ठौद्विवारंदक्षिणार्धेन स्ववामकरंचतु-र्वारमुभौद्विवारमवशिष्टार्धेन वामपञ्चमेनयतिपादतलेसकृद्दक्षिणपञ्चमार्धेन-वामस्यद्विवारमुभयोश्चापरार्धेनसकृत्क्षालनमिति ॥

**पर्यंकशौचप्रयोग**—कोणत्याही पुण्य दिवशीं एखाद्या गृहस्थानें आपल्यापुढें संन्याशास आसनावर बसवून 'गुर्वनुज्ञातो यतये पर्यंकशौच करिष्ये' असा संकल्प करावा. नंतर डावीकडेच प्राक्संस्थ असे पांच मृत्तिकाभाग व दक्षिणभागींही तसेच पांच मृत्तिकाभाग ठेवावेत. वामदक्षिण भागीं शुद्धोदक ठेविल्यावर वामभागाकडील पहिल्या भागानें पांच वेळ मृत्तिका व उदक यांनीं यतीचे दोन जानु दोन हातांनीं एकेच वेळीं धुवावेत. शेवटच्या प्रक्षालनाचे काळीं मृत्तिकाभाग संपवावा. असेंच पुढील भागाविषयींही जाणावें. नंतर उजव्या भागा-कडील पहिल्या भागांतील अर्ध्या मृत्तिकेनें आपला डावा हात मृत्तिका व उदक यांनीं दहा वेळ प्रक्षालन करून दुसऱ्या अर्ध्या भागानें त्याच उदकानें दोन हात सात वेळ प्रक्षालन करावेत. अशीच योजना पुढेंही करावी. संख्येविषयीं विशेष प्रकारः—डाव्या बाजूकडील दुसऱ्या भागानें चार वेळां दोन्ही जंघा एकाच काळीं प्रक्षालन करून दक्षिणेकडील दुसऱ्या अर्ध्या भागानें सात वेळां डावा हात प्रक्षालन करावा व दुसऱ्या अर्ध्या भागानें चार वेळां हात प्रक्षालन करावेत. डाव्या बाजूच्या तिसऱ्या भागानें यतीचे घोटे तीनदां धुतल्यावर दक्षिणेकडील अर्ध्या भागानें डावा हात सहा वेळ व दोन्हीही हात चारदां धुवावेत. डाव्या बाजूच्या चौथ्या भागानें यतीचे पादपृष्ठ दोनदां व दक्षिणेकडील अर्ध्या भागानें आपला डावा हात चार वेळां व दोन हात दोन्ही वेळ अवशिष्ट अर्ध्या भागानें प्रक्षालन करावे. डाव्या बाजूच्या पांचव्या भागानें यतीचीं पादतलें एकदां व उजव्या बाजूच्या अर्ध्या पांचव्या भागानें डाव्या पायाचें दोनदां व अवशिष्ट अर्ध्या भागानें दोन पायांचें एकदां प्रक्षालन करावें.

अथयोगपट्टः । कारितपर्यङ्कशौचोयतिःकटिशौचंकृत्वाकटिसूत्रकौपीने धृत्वावस्त्रेणावगुण्ठ्यगुर्वनुज्ञयोच्चासनेउपविश्यसभ्यैःसहवेदान्तोकिंचिदुपन्यसेत् गुरुर्यतिःशिष्यंयतिंशिरसिशङ्खेनपुरुषसूक्तेनाभिषिच्यवस्त्रगन्धपुष्पदीपनैवेद्यैःसं-पूज्यवस्त्रमुपरिधृत्वायतिभिःसहाविश्वरूपाध्यायंपश्यामिदेवानित्यारभ्यभुङ्क्ष्व-राज्यंसमृद्धमित्यन्तंपठित्वापूर्वकल्पितंनामदद्यात् ततःशिष्यंवदेत् इतःपरंत्वया संन्यासाधिकारिणेसंन्यासोदेयोदीक्षायोगपट्टादिकंचकार्यम् ज्येष्ठयतयोनम-स्कार्याः ततोगुरुःकटिसूत्रंपञ्चमुद्रालंकृतंपूर्वदण्डंचशिष्यायदत्त्वाशिष्यंयथा-संप्रदायंनमस्कुर्यात् अन्येयतयोगृहिणश्चनमस्कुर्युः शिष्योनारायणेत्युक्त्वो-च्चासनादुत्थायतत्रगुरुमुपवेश्ययथाविधिनत्वान्ययतीन्नमेत् इतिगृह्याभिमतो विधुरादेश्चाविविदिषासंन्यासप्रयोगः ॥

**योगपट्ट**—पर्यंकशौच करविलेल्या यतीनें कटीची शुद्धता करून कटिसूत्र व कौपीन धारण करावें व कमरेला वस्त्र गुंडाळल्यावर गुरूच्या आज्ञेनें उंच आसनावर बसून सभासदांशीं वेदांताविषयीं किंचित् उपन्यास करावा. गुरु असलेल्या यतीनें शिष्ययतीचे मस्तकावर शंखानें पुरुषसूक्तानें अभिषेक करावा व वस्त्र, गंध, धूप, दीप आणि नैवेद्य या उपचारांनीं त्याची पूजा करावी. नंतर वस्त्र वर धरून यतींसह 'पश्यामि देवान्' येथपासून 'भुंक्ष्वराज्यं समृद्धं' येथपर्यंत विश्वरूपाचा अध्याय पठण करून पूर्वी कल्पिलेलें नांव ठेवावें. यानंतर शिष्यास असें सांगावें कीं, इतःपर संन्यासास अधिकारी असणारास त्वां संन्यासदीक्षा द्यावी व योगपट्टादिक करावें. ज्येष्ठ यतींना नमस्कार करावा. नंतर गुरूनें कटिसूत्र व पंचमुद्रालंकृत पूर्वीचा दंड शिष्यास द्यावा व सांप्रदायानुसार त्यास नमस्कार करावा. यानंतर संन्यासी व इतर गृहस्थाश्रमी पुरुषांनीं त्यास नमस्कार करावा. शिष्यानें 'नारायण' असें म्हणून उंच आसनावरून उठून त्यावर गुरूस बसवावें व यथाविधि नमस्कार करून अन्य यतींस नमस्कार करावा. याप्रमाणें गृह्याग्निमान् व विधुरादिक यांचा विविदिषासंन्यासप्रयोग सांगितला.

**अथाग्निहोत्रिणोविशेषः तत्रश्रौताग्नयोविच्छिन्नाश्चेत्पुनराधानंपावमानेष्ट्यन्तं-पूर्णाहुत्यन्तंवाकृत्वाप्रायश्चित्तादिसावित्रीप्रवेशान्तंपूर्ववत्कुर्यात् ॥**

**अग्निहोत्रिविशेष**—श्रौताग्नि विच्छिन्न असल्यास पावमानेष्टीपर्यंत किंवा पूर्णाहुतीपर्यंत पुनराधान करून प्रायश्चित्तादि सावित्रीप्रवेशापर्यंतचें पूर्वीप्रमाणेंच कर्म करावें.

**अथब्रह्मान्वाधानं अग्नित्रयंसमिध्यसंस्कृतमाज्यंस्रुचिचतुर्वारंगृहीत्वाहवनीये पूर्णाहुतिंॐस्वाहापरमात्मनइदमितिकुर्यात् सायंसंध्याग्निहोत्रहोमान्ते-उत्तरेणगार्हपत्यंद्वन्द्वशःपात्राण्यासाद्याहवनीयदक्षिणतःकौपीनदण्डाद्यासादयेत् रात्रिजागरान्तेप्रातर्होमादिकृत्वापौर्णमास्यांब्रह्मान्वाधानंचेत्पौर्णमासेष्टिंकृत्वादर्शेष्टिमपिपक्षहोमापकर्षपूर्वकमपकृष्यतदैवकुर्यात् दर्शेचेद्दर्शेष्टिरेव ॥**

**ब्रह्मान्वाधान**—तीन अग्नि प्रदीप्त केल्यावर संस्कार केलेलें आज्य स्रुचिपात्रांत चार वेळ घेऊन आहवनीय अग्नींत 'ॐस्वाहा परमात्मन इदं०' असें म्हणून पूर्णाहुति करावी. सायंसंध्या व अग्निहोत्रहोम हीं झाल्यावर गार्हपत्य अग्नीच्या उत्तरेस दोन दोन पात्रें मांडून आहवनीय अग्नीच्या दक्षिणेस कौपीन व दंड इत्यादि ठेवावे. रात्रीं जागरण केल्यावर प्रातःकालीं होमादिक करून पूर्णिमेस ब्रह्मान्वाधान केलें असल्यास पौर्णमासेष्टि करावी व दर्शेष्टीही, पक्षहोमापकर्षपूर्वक अपकर्ष करून त्या कालींच करावी. ब्रह्मान्वाधान दर्शदिनीं असल्यास दर्शेष्टिच करावी.

**अथपूर्णमास्यांदर्शेवादेशकालौस्मृत्वासंन्यासपूर्वाङ्गभूतयाप्राजापत्येष्ट्या-वैश्वानर्येष्ट्याचसमानतन्त्रयायक्ष्ये इतिसंकल्प्यसमुच्चयेनेष्टिद्वयम् अत्रवैश्वा-नरोद्वादशकपालःपुरोडाशः प्राजापत्यश्चरुर्वैष्णवोनवकपालःपुरोडाशःअथवा केवलप्राजापत्येष्टिः अत्रप्रयोगःस्वस्वसूत्रानुसारेणोह्यः बौधायनसूत्रानुसारेण किंचिदुच्यते पवनपावनपुण्याहावचनादिपूर्वाङ्गान्तेकेवलवैश्वानरेष्ट्याःकेवल-**

प्राजापत्यायावासंकल्पः व्रीहिमयःपुरोडाशोद्रव्यम् पञ्चप्रयाजाः अग्निर्वैश्वानरःप्रजापतिर्वादेवता पञ्चदशसामिधेन्यः व्रतग्रहणान्तेध्वर्युराज्यंसंस्कृत्य स्रुचिचतुर्गृहीतं गृहीत्वापृथीवीहोतेत्यादिचतुर्होतृहोमंकूष्माण्डहोमसारस्वतहोमौच-कृत्वानिर्वापादि वैश्वानरोद्वादशकपालःपुरोडाशः प्राजापत्यश्चरुः वैश्वानराय-प्रतिवेदयामइतिपुरोनुवाक्या वैश्वानरःपवमानःपवित्रैरितियाज्या प्राजापत्यायां प्रधानमुपांशुधर्मकम् सुभूःस्वयंभूरित्याद्यनुवाक्याः प्रजापतेनत्वदेवतामिति-याज्या अथस्रुवेणाष्टावुपहोमावुभयत्र वैश्वानरोनऊतयआप्रयातुपरावतः। अग्निरुक्थेनवाहसास्वाहा१ वैश्वनरायेदमितित्यागःसर्वत्रऋतावानंवैश्वानरमृत-स्यज्योतिषस्पतिम्। अजस्रंघर्ममीमहेस्वाहा२ वैश्वानरस्यदस०३ पृष्टोदिविपृष्टो अग्निः ४ जातोयदग्ने०५ त्वमग्नेशोचिषा० अस्माकमग्ने०७ वैश्वानरस्यसुमतौ०८ अथैनमुपतिष्ठेतसहस्रशीर्षेतिसूक्तेनततःस्विष्टकृदादिशेषंसमापयेत् सर्वोवैरुद्रः० विश्वंभूतमिति द्वाभ्याग्न्युत्सर्गः आयुर्दाअग्नेइतिमन्त्रेणदर्भस्तम्बयजमान-भागात्किंचिदादायसहस्रशीर्षेत्यनुवाकेनप्राश्य ओमितिब्रह्म ओमितीदंसर्व-मित्यनुवाकेनहुतशेषमाहवनीये प्रक्षिपेत् एवंवैश्वानर्याद्यन्यतरामिष्टिंकृत्वौपास-नाग्नौसर्वाधानेदक्षिणाग्नौप्राणादिहोमादिविरजाहोमान्तंकार्यमन्यत्प्राग्वत् आह-वनीयेअरणीमुसलोलूखलातिरिक्तदारुपात्राणांदाहः ततआत्मन्याहवनीयाग्नि-समारोपः पूर्ववत् अरणीद्वयंगार्हपत्येप्रक्षिप्यतत्समारोपंकृत्वादक्षिणाग्नौमुस-लोलूखलेहुत्वादक्षिणाग्नेरपिसमारोपः ततऔपासनाग्नेःसमारोपः इतिक्रमः अत्र विशेषोन्यत्रज्ञातव्यः इतिसाग्निकप्रयोगः स्नातकंप्रतिब्रह्मान्वाधानविरजा-होमादिरहितोवाप्रयोगोग्न्यभावात् ॥

**अग्निपात्रादि हवन**—नंतर पूर्णिमेस किंवा दर्शदिनीं देशकालांचें स्मरण करून 'संन्यासपूर्वांगभूतया प्रजापत्येष्ट्या वैश्वानर्येष्ट्या च समानतंत्रया यक्ष्ये' असा संकल्प करून समुच्चयानें दोन इष्टि कराव्या. तेथें वैश्वानरास उद्देशून द्वादशकपाल पुरोडाश करावा किंवा केवल प्राजापत्येष्टि करावी. याविषयींचा प्रयोग आपआपल्या सूत्रानुसार जाणावा. बौधायनसूत्राच्या अनुसारानें तो किंचित् सांगतों:— पवन, पावन व पुण्याहवाचन हें पूर्वांग झाल्यावर केवल वैश्वानरेष्टीचा किंवा केवल प्राजापत्येष्टीचा संकल्प करावा. व्रीहिमय पुरोडाश द्रव्य, पांच प्रयाज, अग्निवैश्वानर अथवा प्रजापति देवता व पंधरा सामिधेनी यांना व्रतग्रहणानंतर अध्वर्यूनें आज्यसंस्कार करून स्रुचिपात्रांत चारदां घेतलेलें तूप घ्यावें व 'पृथिवी होता०' हें चतुर्होतृहोम, कूष्मांड होम व सारस्वतहोम करून निर्वापादिक करावें. वैश्वानर द्वादशकपाल पुरोडाश, प्राजापत्य चरु, 'वैश्वानराय प्रति वेदयाम०' ही पुरोनुवाक्या, 'वैश्वानरः पवमानः पवित्रैः' ही याज्या, प्राजापत्य इष्टींत प्रधान कर्म उपांशुधर्मक (हळू उच्चार करून) 'सुभूः स्वयंभूः' इत्यादि अनुवाक्या जाणाव्या. 'प्रजापतेन त्वदेतां०' ही याज्या होय. नंतर स्रुवापात्रानें आठ उपहोम दोन्ही ठिकाणीं करावे. 'वैश्वानरोनऊतयआप्रयातुपरा-वतः। अग्निरुक्थेन वाहसास्वाहा वैश्वानरायेदं ॥' असा सर्वत्र त्याग म्हणावा.

'ऋतावानं वैश्वानरमृतस्य ज्योतिषस्पतिं । अजस्रं घर्म मीमहे स्वाहा २ वैश्वानरस्यदस० ३ पृष्टोदिवि पृष्टो अग्निः ४ जातोयदग्ने० ५ त्वमग्नेशोचिषा० ६ अस्माकमग्ने० ७ वैश्वानरस्य सुमतौ० ॥' आहुत्या दिल्यानंतर 'सहस्रशीर्षा०' या सूक्तानें देवतेची प्रार्थना करून स्विष्टकृदादि होमशेष समाप्त करावा, नंतर 'सर्वोवैरुद्रः०' व 'विश्वंभूतं०' या दोन मंत्रांनीं अग्नीचा उत्सर्ग करावा. 'आयुर्दा अग्ने०' या मंत्रानें दर्भाच्या स्तंबावर ठेवलेला जो यजमानाचा भाग त्यांतून किंचित् घ्यावा व 'सहस्रशीर्षा०' या अनुवाकानें तो खाऊन 'ओमिति ब्रह्म ओमितीदं सर्वं' या अनुवाकानें हुतशेष आहवनीय अग्नींत टाकावें. याप्रमाणें वैश्वानर इत्यादि दोन इष्टींतून एक इष्टि करून औपासनाग्नींत व सर्वाधानपक्ष असल्यास दक्षिणाग्नींत प्राणादिहोमापासून विरजाहोमापर्यंतचें कर्म करावें. इतर पूर्वीप्रमाणें जाणावें. अरणी, मुसळ व उखळ यांवांचून बाकीचीं काष्ठपात्रें आहवनीय अग्नींत दहन करावीत. नंतर पूर्वीप्रमाणें आहवनीय अग्नीचा समारोप आपल्या ठिकाणीं करावा. दोन अरणी गार्हपत्य अग्नींत टाकून त्या गार्हपत्याचा समारोप करावा व दक्षिणाग्नींत मुसळ व उखळ यांचें हवन करून दक्षिणाग्नीचाही समारोप केल्यावर औपासनाग्नीचा समारोप करावा, असा क्रम आहे. याविषयीं विशेष दुसऱ्या ग्रंथांत पहावा. याप्रमाणें साग्निकाविषयीं प्रयोग सांगितला. स्नातकाविषयीं ब्रह्मान्वाधान व विरजाहोम यांनीं रहित प्रयोग जाणावा; कारण त्यास अग्नि नाहीं.

**अथातुरसंन्यासः ॥ आतुरसंन्यासेसंकल्पप्रैषोच्चाराभयदानेतित्रयंप्रधानमवश्यंकार्यम् अष्टश्राद्धादिदण्डग्रहणान्तमङ्गभूतंयथासंभवंकार्यम् ॥**

**आतुरसंन्यास**––आतुर संन्यास घेतांना संकल्प, प्रैषोच्चार व अभयदान, हीं तीन प्रधानकर्में अवश्य करावींत व अष्टश्राद्धांपासून दंडग्रहणापर्यंतचें अंगभूत कर्म यथासंभव करावें.

**तत्प्रयोगः मन्त्रस्नानंकृत्वाशुद्धवस्त्रंधृत्वाज्ञानप्राप्तिद्वारामोक्षसिद्ध्यर्थमातुरविधिनासंन्यासमहंकरिष्ये पञ्चशिखाकेशानवशेष्यवपनं कृत्वास्नात्वासंध्याद्यौपासनहोमान्तंयथासंभवंसंपाद्यात्मनिसमारोपंकुर्यात् अग्निहोत्रीतुप्राजापत्यादिस्थानेपूर्णाहुतिंकृत्वाश्रौताग्निमात्मनिसमारोपयेत् उच्छिन्नाग्नीनां पुनराधानसंभवेसमारोपोन्यथातुनसमारोपः विधुरादीनामग्न्यभावादेवसमारोपोनावश्यकः ततस्तोयमादायाप्सुजुहोति एषहवाअग्नेर्योनिर्यःप्राणःप्राणं गच्छस्वाहा १ आपोवैसर्वादेवताःसर्वाभ्योदेवताभ्योजुहोमि स्वाहा २ भूःस्वाहेतिजलेजलैर्हुत्वाहुतशेषंजलमाशुःशिशानइत्यनुवाकेनाभिमन्त्र्य पुत्रेषणावित्तेषणालोकेषणामयात्यक्ताःस्वाहेतिकिंचित्पिबेत् अभयं सर्वभूतेभ्योमत्तःस्वाहेति द्वितीयंपिबेत् संन्यस्तंमयेतिनिःशेषंतृतीयम् ततःपूर्ववत्सावित्रीप्रवेशः ततः प्राङ्मुखऊर्ध्वबाहुःप्रैषोच्चारंपूर्ववत्कुर्यात् अभयंसर्वभूतेभ्योमत्तःस्वाहेतिप्राच्यांजलंक्षिपेत् शिखामुत्पाटययज्ञोपवीतंछित्त्वाभूःस्वाहेत्यप्सुहुत्वापुत्रगृहेनतिष्ठेत् अत्यन्तमातुरश्चेत्प्रैषमात्रंवावदेत् जीवतिचेत्स्वस्थःसन्महावाक्योपदेशदण्डग्रहणादिसर्वंकुर्यात् एवमातुरविधिनासंन्यासेमृतस्ययतिवत्संस्कारः ॥**

**आतुरसंन्यासप्रयोग**—मंत्रस्नान करून शुद्ध वस्त्र परिधान केल्यावर 'ज्ञानप्राप्तिद्वारा मोक्षसिद्ध्यर्थमातुरविधिना संन्यासमहं करिष्ये' असा संकल्प करावा व नंतर पांच केश शिल्लक ठेवून वपन करावें व औपासनहोमापर्यंत संध्यादि यथासंभव कर्म करून त्याचा आपले ठिकाणीं समारोप करावा. अग्निहोत्री असल्यास प्राजापत्यादि स्थानीं पूर्णाहुति करून आपले ठायीं श्रौताग्नीचा समारोप करावा. उच्छिन्न अग्नीचा समारोप पुनराधानाचा संभव असल्यास करावा व तसें नसल्यास समारोप करूं नये. विधुरास अग्नि नसल्यानें समारोप आवश्यक नाहीं. नंतर उदक घेऊन त्यांत 'एषह्वाअग्नेर्योनिर्यः प्राणः प्राणंगच्छ स्वाहा १ आपोवैसर्वादेवताः सर्वाभ्योजुहोमि स्वाहा २ भूः स्वाहा' या मंत्रानें हवन करावें व हुतशेषजल 'आशुः शिशान०' या अनुवाकानें अभिमंत्रण करून 'पुत्रेषणा वित्तेषणा लोकेषणा मया त्यक्ताः स्वाहा' या मंत्रानें थोडेंसें उदक प्राशन करावें. 'अभयं सर्वभूतेभ्यो मत्तः स्वाहा' या मंत्रानें दुसऱ्यानें प्राशन करावें. 'संन्यस्तंमया' या मंत्रानें तिसऱ्यानें सर्व प्राशन करून पूर्वीप्रमाणें सावित्रीप्रवेश करावा. नंतर पूर्वाभिमुख ऊर्ध्वबाहु होऊन पूर्वीप्रमाणें प्रैषोच्चार केल्यावर 'अभयं सर्वभूतेभ्यो' या मंत्रानें पूर्वेस उदक टाकावें. शिखा उपटून यज्ञोपवीत तोडावें व 'भूः स्वाहा' या मंत्रानें उदकांत आहुति द्यावी. पुत्राचे घरीं राहूं नये, अथवा अत्यंत आतुर ( आजारी ) असल्यास प्रैषोच्चार मात्र करावा. वांचल्यास स्वस्थ होऊन महावाक्यांचा उपदेश, दंडग्रहण इत्यादि सर्व विधि करावा. याप्रमाणें आतुरविधीनें संन्यास घेऊन मरण पावल्यास मृतयतीसारखाच संस्कार करावा.

अथमृतयतिसंस्कारः । पुत्रःशिष्योवास्नात्यावपनंकृच्छ्रत्रयंचाधिकारार्थं कुर्यात् पुत्रातिरिक्तस्यवपनंकृताकृतम् देशकालौस्मृत्वाब्रह्मीभूतस्ययतेःशौनकोक्तविधिना संस्कारंकरिष्ये नवंकलशंतीर्थेनापूर्य गंगेचयमुने० नारायणःपरंब्रह्म० यच्चकिंचिज्जगत्सर्वं० इतिमन्त्रैरभिमन्त्र्यरुद्रसूक्तविष्णुसूक्तापोहिष्ठादिभिर्यतेःस्नानंविधायचन्दनादिभिःकलेवरंसंपूज्यमाल्यादिभिरलंकृत्यवाद्यघोषादिभिः शुद्धदेशंनयेत् जलेस्थले वा समाहितंकुर्यात् स्थलपक्षेगर्तंव्याहृतिप्रोक्षितभुविदण्डप्रमाणंकृत्वामध्येसूक्ष्मगर्तंसार्धहस्तंकृत्वा समन्व्याहृतिभिःपञ्चगव्येनत्रिःप्रोक्ष्यजलपक्षेनद्यांपञ्चगव्यंप्रक्षिप्यकुशानास्तीर्य सावित्र्यादेहंप्रोक्ष्यशङ्खोदकेनपुरुषसूक्तेनाष्टोत्तरशतावृत्तप्रणवैश्वसंस्नाप्याष्टाक्षरेणषोडशोपचारैःसंपूज्यतुलसीमालाद्यैरलंकृत्यविष्णोहव्यंरक्षस्वेतिदेहंगर्ते नद्यांवाक्षिपेत् इदंविष्णुरितिदण्डंत्रेधाभग्नंदक्षिणहस्तेस्थापयेत् हंसः शुचिषदितिपरेणनाकंनिहितंगुहायांविभ्राजदेतद्यतयोविशन्ति । वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाःसंन्यासयोगाद्यतयःशुद्धसत्वाः १ इतिहृदयेजपेत् पुरुषसूक्तं भ्रुवोर्मध्येजपेत् ब्रह्मज्ञानमितिमूर्धनि मूर्धानंभूर्भुवःस्वश्चेत्युक्त्वाशङ्खेनभेदयेत् अथवाभूमिर्भूमिमगान्मातामातरमप्यगात् भूयास्मपुत्रैःपशुभिर्योनोद्वेष्टिसभिद्यतामितिमन्त्रेणपरश्वादिनाभेदयेत् शिरोभेत्तुमशक्तःशिरस्थापितंगुडपिण्डादिकं

भिद्यात् गर्तंपुरुषसूक्तेनलवणेनप्रपूरयेत् सृगालश्वादिरक्षार्थंसिकतादिभिःप्रपूरयेत् नद्यादौचेच्छिरोभेदनोत्तरंदर्भैराच्छाद्यव्याहृतिभिरभिमन्त्र्यपाषाणंबध्वा ॐस्वाहेतिह्रदेन्यसेत् ततोऽग्निनाग्निःस० त्वंह्यग्नेअग्निना० तंमर्जयंतसुक्रतुं० यज्ञेनयज्ञं० इत्यृक्चतुष्टयेनाचित्तिःस्रुगित्यादिभिर्दशहोत्रादिसंज्ञकयजुर्मन्त्रैश्चाभिमंत्रयेत् अतोदेवाइतिजपित्वापापैर्मुक्ताअश्वमेधादिफलभागिनोवयमितिभावयन्तोवभृथबुद्ध्यासर्वेनुगामिनः स्नात्वागन्धादिधृत्वावासोत्सवागृहंगच्छेयुः अत्रपरमहंसस्यस्थलेसमाधिर्मुख्यः जलेमध्यमः कुटीचकंतुप्रदहेत्पूरयेच्चबहूदकम् । हंसोजलेतुनिक्षेप्यः परमहंसंप्रपूरयेत् १ इतिवचनात् अत्रपरमहंसंप्रकीरयेदितिक्वचित्पाठः एकोद्दिष्टंजलंपिण्डमाशौचंप्रेतसत्क्रियाम् । नकुर्याद्वार्षिकादन्यद्ब्रह्मीभूतायभिक्षवे १ कुटीचकातिरेकेणनदहेद्यतिनं क्वचित् ॥

**मृतयतिसंस्कार**—पुत्रानें किंवा शिष्यानें स्नान करून अधिकारासाठीं वपन व तीन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. पुत्रव्यतिरिक्तास वपन कृताकृत आहे. देशकालांचें स्मरण करून 'ब्रह्मीभूतस्य यतेः शौनकोक्तविधिना संस्कारं करिष्ये' असा संकल्प करून व नूतन कलश तीर्थानें भरून 'गंगेचयमुने०' या मंत्रांनीं त्याचें अभिमंत्रण केल्यावर रुद्रसूक्त, विष्णुसूक्त व आपोहिष्ठादि ऋचा यांनीं यतीस स्नान घालावें व चंदनादि उपचारांनीं त्याच्या कलेवराची पूजा करून माला इत्यादिकांनीं तें अलंकृत करावें. व वाद्यघोषादिकांनीं शुद्ध देशीं नेऊन पाण्यांत किंवा जमिनीवर ठेवावें. यतीचें कलेवर स्थलीं ठेवल्यास व्याहृतिमंत्रानें भूमि प्रोक्षण करून दंडप्रमाण खाडा करावा व त्या खाड्याच्या मध्यभागीं लहान दीडहात खड्डा करून सात व्याहृतिमंत्रांनीं पंचगव्यानें तीनदां प्रोक्षण करावें. जलपक्ष असल्यास नदींत पंचगव्य टाकून दर्भ पसरावे व सावित्रीमंत्रानें देह प्रोक्षण करून शंखोदकानें पुरुषसूक्त व अष्टोत्तरशत प्रणवमंत्र यांनीं स्नान घालावें. नंतर अष्टाक्षरमंत्रांनीं षोडशोपचारांनीं पूजा करून तुलसीमाला इत्यादिकांनीं अलंकृत केल्यावर 'विष्णो हव्यं रक्षस्व' या मंत्रानें तीन ठिकाणीं मोडलेला दंड उजव्या हातावर ठेवावा. 'हंसः शुचिषत्०' व 'परेणनाकं निहितं०' हे मंत्र हृदयाचे ठायीं जपावे. भ्रुकुटीच्या मध्यें पुरुषसूक्ताचा जप करावा. 'ब्रह्मजज्ञानं०' या मंत्राचा जप मस्तकाच्या ठायीं करावा व 'भूर्भुवः स्वाहा' हा मंत्र म्हणून शंखानें मस्तक फोडावें, अथवा 'भूमिर्भूमिमगान्मातामातरमप्यगात्०' या मंत्रानें परशु इत्यादिकानें मस्तक फोडावें; मस्तक फोडण्यास असमर्थ असल्यास मस्तकावर गुळाची ढेप ठेवून ती फोडावी. पुरुषसूक्त म्हणून मिठानें खाडा भरावा. कोल्हें, कुत्रें इत्यादिकांपासून रक्षण व्हावें म्हणून वाळू इत्यादिकांनीं खड्डा भरावा. नदी इत्यादिकांत देह ठेवणें असल्यास मस्तकाचा भेद केल्यावर दर्भांनीं आच्छादन करून व्याहृतिमंत्रांनीं अभिमंत्रण करावें व पाषाण बांधून 'ॐ स्वाहा' या मंत्रानें डोहांत शवाची स्थापना करावी व नंतर 'अग्निनाग्निःस०' 'त्वंह्यग्ने अग्निना०' 'तंमर्जयंतसुक्रतुं० यज्ञेनयज्ञं०' या चार ऋचांनीं व 'चित्तिःस्रुक०' इत्यादिक दशहोत्रादि संज्ञक यजुर्मंत्रांनीं अभिमंत्रण करावें

'अतोदेवा०' या मंत्राचा जप करून, आम्ही पापमुक्त व अश्वमेधादिफलभागी झालों अशा भावनेनें सर्व पाठीमागून जाणाऱ्यांनीं अवभृथबुद्धीनें स्नान करून गंधादिक धारण करावें व उत्सवानें घरीं जावें. या स्थलीं परमहंसाच्या समाधीला भूमि मुख्य होय. जलांत मध्यम. कारण कुटीचकाचें दहन करावें, बहूदकांस पुरावें, हंसास जलसमाधि द्यावी व परमहंसाचे स्थलीं प्रपूरण करावें—असें वचन आहे. या वचनांत 'प्रपूरयेत्' या शब्दाऐवजीं 'प्रकीरयेत्' असाही कोठें पाठ आहे. ब्रह्मीभूत भिक्षूंसाठीं वार्षिक श्राद्धाहून इतर एकोद्दिष्ट उदक, पिंड, अशौच, प्रेतक्रिया वगैरे करूं नयेत. कुटीचकाखेरीज (सकुटुंबी त्रिदंडी संन्यास) दुसऱ्या कोणाही यतीचें कधींही दहन करूं नये.

**ततःकर्तास्नात्वाचम्यसिद्धिंगतस्यब्रह्मीभूतभिक्षोस्तृप्त्यर्थंतर्पणंकरिष्येइति संकल्प्यसव्येनदेवतीर्थेनैवात्मानमन्तरात्मानंपरमात्मानमितिचतुश्चतुस्तर्पयित्वा शुक्लपक्षेमृतस्यकेशवादिद्वादशनामभिःकृष्णपक्षेमृतस्यसंकर्षणादिद्वादशनामभिः कृष्णपक्षेमृतस्यसंकर्षणादिद्वादशनामभिःकेशवंतर्पयामीत्येवंद्वितीयान्तैःकुर्यात् इदंक्षीरेणेतिकेचित् ततःसिद्धिंगतस्यभिक्षोस्तृप्त्यर्थंनारायणपूजनंबलिदानंघृतदीपदानंचकरिष्येइतिसंकल्प्य देवयजनोपरितीरेवामृन्मयलिङ्गंकृत्वापुरुषसूक्तेनाष्टाक्षरेणचषोडशोपचारपूजांकृत्वाघृतमिश्रपायसबलिंदत्वाघृतदीपंचसमर्प्य पायसबलिंजलेक्षिपेत् ततः ॐब्रह्मणेनमइतिशङ्खेनाष्टावर्घ्यान्दत्वागृहंव्रजेदिति प्रथमदिनकृत्यम् एवंदशदिनान्तंप्रत्यहंतर्पणंलिङ्गपूजनंपायसबलिदीपदानानि कुर्यात् ॥**

**मृतयतिदशदिनक्रिया**—नंतर कर्त्यानें स्नान करून आचमन केल्यावर 'सिद्धिंगतस्य ब्रह्मीभूतभिक्षोस्तृप्त्यर्थं तर्पणं करिष्ये' असा संकल्प करावा व सव्यानें देवतीर्थानें 'आत्मानमंतरात्मानं परमात्मानं' असें वाक्य म्हणून चार चारदां तर्पण करून शुक्लपक्षीं मृत झालेल्याचें केशवादि द्वादशनामांनीं व कृष्णपक्षांत मृत झालेल्याचें संकर्षणादि द्वादश नामांनीं 'केशवंत०' असें द्वितीया विभक्तीनें तर्पण करावें. हें तर्पण दुधानें करावें असें कांहीं ग्रंथकार म्हणतात. यानंतर 'सिद्धिंगतस्य भिक्षोस्तृप्त्यर्थं नारायणपूजनं बलिदानं घृतदीपदानंच करिष्ये' —असा संकल्प करून देवयज्ञ भूमीवर किंवा तीरावर मृण्मय लिंग करून पुरुषसूक्तानें व अष्टाक्षरमंत्रानें—षोडशोपचारपूजा करावी व घृतमिश्र पायसाचा बलि देऊन घृतदीप समर्पण केल्यावर पायसाचा बलि उदकांत टाकावा. नंतर 'ॐनमो ब्रह्मणे नमः' या मंत्रानें शंखानें आठ अर्घ्य देऊन घरीं जावें. याप्रमाणें पहिल्या दिवसाचें कृत्य सांगितलें. याचप्रमाणें दहा दिवस प्रत्यहीं तर्पण, लिंगपूजन, पायसबलि व दीपदान हीं करावींत.

**अथैकादशेहनिपार्वणश्राद्धम् तत्रमध्याह्नेनद्यादौश्राद्धाङ्गतिलतर्पणं कृत्वा-देशकालौस्मृत्वाप्राचीनावीतीअमुकगोत्रस्यामुकशर्मणोब्रह्मीभूतस्यास्मत्पितुः-करिष्यमाणदर्शादिसर्वश्राद्धाधिकारार्थमद्यपार्वणश्राद्धंकरिष्येइतिपुत्रादिः संकल्पयेत् शिष्यस्तुब्रह्मीभूतगुरोःप्रत्यब्दादिश्राद्धाधिकारार्थंतत्पितृसंबन्धिनाम-**

गोत्रोद्देश्यतासिद्ध्यर्थंचपार्वणश्राद्धमितिसंकल्पयेत् अन्यत्समानम् पुरूरवार्द्रव-संज्ञकाविश्वेदेवाः पितृपितामहप्रपितामहानांनामगोत्रादिसहितानामुच्चारः सर्वत्रपितुर्ब्रह्मीभूतइतिविशेषणमात्रमधिकम् शेषंप्रत्यब्दश्राद्धवत् केचिच्छिष्यः कर्ताचेदात्मान्तरात्मपरमात्मनउद्दिश्यसाधुरुरुसंज्ञकदेवयुतंसव्येनदेवधर्मकंना-न्दीश्राद्धवदेकादशाहेपार्वणश्राद्धंकुर्यादित्याहुः अत्रसर्वत्रविस्तरस्ततोरोकृत-संन्यासपद्धतौद्रष्टव्यः ॥

**मृतयतिपार्वणश्राद्ध**—अकराव्या दिवशीं मध्यान्हकालीं नद्यादिकांचे ठायीं श्राद्धांग तिलतर्पण करून देशकालांचें स्मरण केल्यावर प्राचीनावीती करून 'अमुक गोत्रस्यामुकशर्मणो:०' असा पुत्रादिकानें संकल्प करावा. श्राद्धकर्ता शिष्य असल्यास त्यानें 'ब्रह्मीभूत गुरोः०' असा संकल्प करावा. इतर सर्व सारखेंच. पुरूरवार्द्रसंज्ञक विश्वेदेव घ्यावे. पिता, पितामह, प्रपितामह यांचा नाम-गोत्रादिकांसह उच्चार करावा. सर्वत्र पित्यास 'ब्रह्मीभूत' असें विशेषण मात्र अधिक योजावें. इतर सर्व कर्म प्रतिसांवत्सरिक श्राद्धाप्रमाणें जाणावें. शिष्य कर्ता असल्यास आत्मा, अंतरात्मा व परमात्मा यांस उद्देशून सव्यानें साधुरुरुसंज्ञक देवयुक्त असें देवधर्म व नांदीश्राद्धाप्रमाणें अकराव्या दिवशीं पार्वणश्राद्ध करावें असें कोणी ग्रंथकार म्हणतात. या श्राद्धाविषयीं सर्वत्र ठिकाणीं विस्तार तोरोकृत संन्यासपद्धति या ग्रंथांत पहावा.

अथद्वादशाहेनारायणबलिः देशादिस्मृत्वाऽसिद्धिंगतस्यभिक्षोःसंभावित-सर्वपापक्षयपूर्वकंविष्णुलोकावाप्तिद्वाराश्रीनारायणप्रीत्यर्थंनारायणबलिंकरिष्ये इतिसंकल्प्यत्रयोदशयतीन्विप्रान्वानिमन्त्र्यशुक्लपक्षेकेशवरूपिगुर्वर्थे त्वयाक्षणः कर्तव्यइत्येवं दामोदरान्तकेशवादिद्वादशनामभिःक्षणोदेयः कृष्णेतुसंकर्षणादि-द्वादशनामभिः त्रयोदशेविप्रेविष्ण्वर्थेत्वयाक्षणःकर्तव्यइतिनिमन्त्र्य पादान् प्रक्षाल्यप्राङ्मुखानुपवेशयेत् विप्राग्रेस्थण्डिलेऽग्निप्रतिष्ठापनादि अन्वाधाने-चक्षुषीआज्येनेत्यन्तेऽग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचव्यस्तसमस्तव्याहृतिभिरेकैकपायसा-हुत्याविष्णुमतोदेवाइतिषड्भिःप्रत्यृचमेकैकपायसाहुत्यानारायणंपुरुषसूक्तेन-प्रत्यृचमेकैकपायसाहुत्याशुक्लेकेशवादिद्वादशदेवताः कृष्णेसंकर्षणादिद्वादश-देवताःएकैकपायसाहुत्याशेषेणेत्यादि द्विपञ्चाशदधिकशतमुष्टीन्निरूप्यबलि-पर्याप्ततण्डुलानोप्याष्टत्रिंशदाहुतिपर्याप्तंपुरुषाहारमितविष्णुनैवेद्यपर्याप्तंचक्षीरे श्रपयित्वाज्यभागान्तेऽग्निपूर्वतःशालग्रामेविष्णुंपुरुषसूक्तेनाष्टाक्षरेणचषोडशोप-चारैःसंपूज्यस्रुवाहस्तेनवान्वाधानानुसारेणहोमंत्यागोविदध्यात् एवंशुक्लकृष्ण-भेदेनकेशवादिद्वादशान्ताःसंकर्षणाद्यन्तावाऽष्टत्रिंशदाहुतीर्हुत्वास्विष्टकृदादि-शेषंसमाप्यपुनःशालग्रामंसंपूज्यविष्णुगायत्र्याविष्णवेऽर्घ्यंदत्वाहुतशेषपायसेन-विष्णवेबलिंदत्वानिमन्त्रितत्रयोदशविप्रान्केशवादिक्रमेणकेशवरूपिगुरवेनम-इदमासनमित्यादिनासनगन्धपुष्पधूपदीपाच्छादनानिदत्वात्रयोदशेविप्रेपुरुष-सूक्तेनप्रत्यृचान्तेविष्णवेनमइत्येवमादिनाविष्णुंदीपान्तोपचारैःपूजयेत् चतुरस्र-

अमण्डलेषुत्रयोदशभोजनपात्राण्यासाद्योपस्तीर्यान्नंपरिषिच्यपृथिवीतेपात्र-मित्यादिनाकेशवादिद्वादशोद्देशेनविष्णूद्देशेनचान्नं त्यक्त्वा अतोदेवा० ॐतत्-ब्रह्मॐतद्वायुर्ब्रह्मार्पणमित्याद्यापोशनादिप्राणाहुत्यन्तेनारायणाद्युपनिषद्भागा-न्पठेत् तृप्तिप्रश्नान्तेआचान्तेषुप्रागग्रान्दर्भानास्तीर्याष्टाक्षरेणाक्षतोदकंदत्त्वाकेश वरूपिणेगुरवेऽयंपिण्डःस्वाहानमइत्येवंद्वादशपिण्डान्दद्यात् कृष्णेतुसंकर्षणा-दिनामभिरितिसर्वत्र पिण्डेषुविष्णुंसंपूज्यपुरुषसूक्तेनस्तुत्वा विसर्जयेत् विप्रेभ्य-स्ताम्बूलदक्षिणादिदत्त्वात्रयोदशायविप्रायनाभ्याआसीदित्यादृक्त्रयेणफलता-म्बूलदक्षिणांदत्त्वानमस्कृत्यतांशालग्राममूर्तिमाचार्यायदद्यात् इति नारायण-बलिविधिः ॥

**मृतयतिनारायणबलि**—बाराव्या दिवशीं देशकालांचें स्मरण करून 'सिद्धिं गतस्य भिक्षोः संभावितसर्वपापक्षयपूर्वकं विष्णुलोकावाप्तिद्वारा श्रीनारायणप्रीत्यर्थं नारायणबलिं करिष्ये' असा संकल्प करून तेरा संन्यासी किंवा तेरा ब्राह्मण यांना निमंत्रण करून शुक्लपक्षांत 'केशवरूपिगुर्वर्थे त्वया क्षणः कर्तव्यः' याप्रमाणें दामोदर नांवापर्यंत केशवादि द्वादश नांवांनीं क्षण द्यावा व कृष्णपक्षांत संकर्षणादि द्वादश नांवांनीं क्षण द्यावा. तेराव्या ब्राह्मणास 'विष्णवर्थे त्वया क्षणः कर्तव्यः' असें निमंत्रण करून पादप्रक्षालन केल्यावर ब्राह्मणांस पूर्वाभिमुख बसवावें. ब्राह्मणाच्या पुढें स्थंडिलावर अग्निस्थापनादिक करावें. अन्वाधानांत 'चक्षुषी आज्येनेत्यंतेग्निं' असें अन्वाधान करून एकशें बावन्न मुष्टि निर्वाप करावा व बलीची पूर्तता होईल इतके तांदूळ घेऊन अडतीस आहुति होतील इतका व पुरुषाहारपरिमित विष्णुनैवेद्य पूर्ण होईल इतका चरु दुधांत शिजवून आज्यभागांत कर्म झाल्यावर, अग्नीच्या पूर्वेस शालग्रामावर विष्णूची पुरुषसूक्तानें व अष्टाक्षरमंत्रांनीं षोडशोपचारांनीं पूजा केल्यावर स्रुचीनें किंवा हातानें अन्वाधानांत सांगितलें आहे त्यास अनुसरून होम व त्याग करावे. याप्रमाणें शुक्लकृष्णभेदानें केशवादि बारा किंवा संकर्षणादि बारा अशा अडतीस आहुतींनीं होम करावा. नंतर स्विष्टकृदादि होमशेष संपवून पुनः शालग्रामाची पूजा करावी. विष्णुगायत्रीनें विष्णूस अर्घ्य देऊन होम करून शेष राहिलेल्या पायसानें विष्णूस बलि द्यावा. निमंत्रित ब्राह्मणांस केशवादिक्रमानें 'केशवरूपिगुरवेनम इदमासनं' इत्यादि वाक्यांनीं आसन, गंध, पुष्प, धूप, दीप व आच्छादन हे उपचार देऊन तेराव्या ब्राह्मणाचे ठायीं पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेच्या अंतीं 'विष्णवेनमः इत्यादि प्रकारानें दीपापर्यंत उपचारांनीं विष्णूची पूजा करावी. चतुष्कोण मंडलें करून त्यावर तेरा भोजनपात्रें मांडावींत व त्यांस घृत लावून त्यावर अन्न वाढल्यावर 'पृथिवीते पात्रं०' इत्यादि वाक्यांनीं केशवादि द्वादश देवतांस व विष्णूस उद्देशून अन्नाचा त्याग करावा. नंतर 'अतोदेवा, ॐतद्ब्रह्म ॐतद्वायुः, ब्रह्मार्पणं'या वाक्यांनीं आपोशनापासून प्राणाहुतीपर्यंतचें कर्म झाल्यावर, नारायणादिक उपनिषद्भागांचें पठण करावें. तृप्तिप्रश्नापर्यंतचें कर्म करून ब्राह्मणांचें आंचवणें झाल्यावर पूर्वेस अग्रें होतील असे दर्भ पसरून त्यांवर अष्टाक्षरमंत्रानें अक्षता व

उदक देऊन 'केशवरूपिणे गुरवेऽयपिंडः स्वाहा न मम' असें म्हणून बारा पिंड द्यावे. कृष्णपक्षांत संकर्षणादि नांवानें पिंड द्यावे, असें सर्वत्र जाणावें. पिंडाचे ठायीं विष्णूची पूजा करून पुरुषसूक्तानें स्तुति केल्यावर त्यांचें विसर्जन करावें. ब्राह्मणांस तांबूल, दक्षिणा इत्यादिक देऊन तेराव्या ब्राह्मणास 'नाभ्या आसी०' या तीन ऋचांनीं फळ, तांबूल व दक्षिणा देऊन नमस्कार करावा व ती शालग्राममूर्ति आचार्यास द्यावी. याप्रमाणें नारायणबलि करावा.

अथद्वादशाहेत्रयोदशाहेवायथाचारमाराधनम् तत्रप्रयोगः देशकालौस्मृत्वा श्रीनारायणप्रीत्यर्थमाराधानंकरिष्यइतिसंकल्प्य गुर्वर्थेक्षणःकर्तव्यः एवंपरमगुर्वर्थेपरमेष्ठिगुर्वर्थेपरात्परगुर्वर्थे एवंविप्रचतुष्टयंनिमन्त्र्य शुक्लेकेशवादिनामभिः कृष्णे संकर्षणादिनामभिःद्वादशविप्रान्निमन्त्रयेत् एवंषोडशविप्राःयतयोवा अशक्तौयथाशक्तिविप्रान्निमन्त्र्ययथायथंषोडशक्षणादेयाःषोडशानांपादक्षालनंकृत्वाचम्यपादक्षालनोदकंपात्रान्तरेगृहीत्वागन्धपुष्पादिभिःपूजयेत् विप्रान्प्राङ्मुखानुदङ्मुखान्वोपवेश्यषोडशोपचारैर्गंधादिपंचोपचारैर्वासंपूज्यसपरिकरमन्नंपरिविष्यगायत्र्याप्रोक्ष्य गुरवेइदमन्नंपरिविष्टं परिवेक्ष्यमाणंचातृप्तेः स्वाहाहव्यंनमम एवंपरमगुर्वादिभ्यःपञ्चदशभ्योन्नत्यागंकृत्वाब्रह्मार्पणमित्यादि भुक्तेष्वाचान्तेषुतेषुताम्बूलदक्षिणावस्त्रादिभिःपूजयेत् अत्रकेचित्पूर्वस्थापितपादोदकतीर्थपूजांकुर्वन्ति तद्यथा तीर्थपात्रंतण्डुलादिकृतमण्डले संस्थाप्य पुरुषसूक्तेनतीर्थराजायनमइतिषोडशोपचारैःसंपूज्यतत्पात्रंशिरसि धृत्वाबन्धुभिः सहविप्रान्प्रदक्षिणीकृत्यगुरुर्ब्रह्मागुरुर्विष्णुरितिनत्वाप्रथमविप्रहस्तात्तत्तीर्थंपिबेत् तत्रमन्त्रः अविद्यामूलशमनंसर्वपापप्रणाशनम् । पिबामिगुरुपत्तीर्थंपुत्रपौत्रप्रवर्धनम् १ इति कर्मेश्वरार्पणंकृत्वासुहृद्युतोभुञ्जीत वर्षपर्यन्तंप्रतिमासंमृततिथावेवमेवाराधनंकार्यंनतुप्रतिमासिकश्राद्धम् प्रत्यब्दंतु पार्वणश्राद्धंकृत्वाराधनमपिकार्यम् ततोदर्शमहालयादिश्राद्धान्यपिसर्वसाधारण्येनकार्याणि नतत्रविशेषः इत्याराधनविधिः ॥

**आराधनप्रयोग**—बाराव्या किंवा तेराव्या दिवशीं देशकालांचें स्मरण करून 'श्रीनारायणप्रीत्यर्थमाराधनं करिष्ये' असा संकल्प करावा व 'गुर्वर्थे क्षणः कर्तव्यः' याप्रमाणें 'परमगुर्वर्थे क्षणः' असें चार ब्राह्मणांस निमंत्रण करून शुक्लपक्षांत केशवादि नामांनीं व कृष्णपक्षांत संकर्षणादि नामांनीं बारा ब्राह्मणांस निमंत्रण करावें. याप्रमाणें सोळा ब्राह्मण किंवा संन्यासी सांगावे. सामर्थ्य नसल्यास यथाशक्ति ब्राह्मणांस निमंत्रण करून यथायोग्य सोळा क्षण द्यावे. सोळा ब्राह्मणांचें पादप्रक्षालन करून आचमन करावें. पादक्षालनाचें उदक दुसऱ्या पात्रांत घेऊन गंध, पुष्प इत्यादिकांनीं त्या उदकाची पूजा करावी. ब्राह्मणांस पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख बसवून त्यांची षोडशोपचारांनीं किंवा गंधादि पंचोपचारांनीं पूजा केल्यावर सोपस्कर अन्न वाढावें व तें गायत्रीमंत्रानें प्रोक्षण करावें. नंतर 'गुरवेइदमन्नं परिविष्टं परिवेक्ष्यमाणं चातृप्तेः स्वाहा हव्यंनमम' असा परमगुर्वादि पंधरा ब्राह्मणांस

अन्नत्याग केल्यावर 'ब्रह्मार्पण०' इत्यादि कर्म करावें. भोजन करून आंचवल्यावर त्या ब्राह्मणांची तांबूल, वस्त्र, दक्षिणा इत्यादिकांनीं पूजा करावी. येथें कित्येक शिष्ट पूर्वी स्थापिलेल्या पादोदकतीर्थाची पूजा करितात. तांबूलादिकांच्या केलेल्या मंडलावर तीर्थपात्र ठेवून पुरुषसूक्तानें व 'तीर्थराजाय नमः' या मंत्रानें त्याची षोडशोपचारांनीं पूजा केल्यावर तें पात्र मस्तकावर धारण करावें व बंधूंसह ब्राह्मणांस प्रदक्षिणा करून 'गुरुर्ब्रह्म गुरुर्विष्णु०' या मंत्रानें नमस्कार करावा व 'अविद्यामूलशमनं सर्वपापप्रणाशनं०' या मंत्रानें तें तीर्थ पहिल्या ब्राह्मणाचे हातून प्राशन करावें व कर्म ईश्वरास समर्पण करून आप्तेष्टांसह भोजन करावें. याप्रमाणें वर्षभर प्रतिमासी मृततिथीचे दिवशीं अशीच आराधना करावी. प्रतिमासिक श्राद्ध करूं नये. प्रतिवर्षी पार्वणश्राद्ध करून आराधनाही करावी. नंतर दर्श, महालयादि श्राद्धें हीं सर्वसाधारणपणें करावींत. त्याविषयीं विशेष नाहीं. याप्रमाणें आराधनविधि आहे.

**अत्रनारायणबलिपार्वणश्राद्धयोरेकदिनानुष्ठानपक्षेएकादशेद्वादशेवादिने पूर्वंनारायणबलिंकृत्वाततःपार्वणश्राद्धंकार्यम् दिनद्वयेकरणपक्षेत्वेकादशे- पार्वणंद्वादशेनारायणबलिः द्वादशेत्रयोदशेवा दिनेआराधनम् ऊनमासिकादि- कालेष्वप्याराधनमितिकेचित् प्रतिमासमाराधनमित्यन्ये पार्वणश्राद्धंत्वेकाद- शाहप्रत्यब्दयोरेव तच्चपुत्रादीनामेवनियतं शिष्यादीनांतुनावश्यकम् अपुत्रय- तेस्तुशिष्येणापिप्रत्यब्दंपार्वणश्राद्धं कार्यम् तदर्थंचनामगोत्रोल्लेखाधिकारार्थमे- कादशेपिशिष्येणपार्वणश्राद्धंकार्यम् ॥**

**नारायणबलिपार्वणसंपात**—नारायणबलि व पार्वणश्राद्ध हीं दोन्ही एकाच दिवशीं करण्याचा पक्ष असल्यास अकराव्या किंवा बाराव्या दिवशीं आधीं नारायणबलि करावा व नंतर पार्वणश्राद्ध करावें. दोन दिवशीं करण्याचा पक्ष असल्यास अकराव्या दिवशीं पार्वणश्राद्ध व बाराव्या दिवशीं नारायणबलि करावा. बाराव्या किंवा तेराव्या दिवशीं आराधन करावें. ऊनमासिकादिकांच्या कालींही आराधन करावें, असें कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें आहे. प्रत्येक महिन्यास आराधन करावें, असें दुसऱ्या कित्येक ग्रंथकारांचें म्हणणें आहे. पार्वणश्राद्ध अकरावा दिवस किंवा प्रतिवार्षिक या कालींच करावें, आणि तें पुत्रादिकासच आवश्यक आहे. शिष्यादिकांस आवश्यक नाहीं. पण पुत्ररहित यतीचें पार्वणश्राद्ध शिष्यानेंही प्रतिवर्षी करावें. त्यासाठीं व नामगोत्राच्या उल्लेखाचा अधिकार प्राप्त होण्यासासाठीं शिष्यानें अकराव्या दिवशीं पार्वणश्राद्ध करावें.

**नारायणबल्यादेर्द्वादशाहादावसंभवेशुक्लपक्षस्थद्वादशीश्रावणपञ्चम्यःपूर्णिमा- मावास्याचेतिगौणकालाः अत्रपूर्वपूर्वःश्रेयान् भार्याकन्यास्नुषादेःस्त्रियाः यतिसंस्कारकर्तृत्वेतुविधवायाःवपनपूर्वकंकृच्छ्रत्रयाचरणम् सधवायास्तुकृच्छ्रा- चरणमेव ॥**

**यतिसंस्कारक स्त्रीकर्म**—बारावा इत्यादि दिवशीं नारायणबलि इत्यादिकांचा असंभव असल्यास शुक्लपक्षांतील द्वादशी, श्रवणनक्षत्र,

पंचमी, पूर्णिमा किंवा अमावास्या हे गौण काल आहेत. यांत पहिला ब
अधिक प्रशस्त होय. भार्या, कन्या, सून इत्यादिक स्त्रिया यतिसंस्कार करणा
असतील तर विधवा असल्यास तिनें पूर्वी वपन करून तीन कृच्छ्रें प्रायश्चित्त क
सौभाग्यवती असल्यास तिनें एक कृच्छ्रच प्रायश्चित्त करावें.

देशान्तरस्थपुत्रःपितुर्यतेःसिद्धिवार्ताश्रुत्वा वपनपूर्वकंस्नात्वा क्षीरतर्पण
पूजनादिदशाहान्तंकृत्वैकादशाहादौपार्वणनारायणबल्यादिसर्वमाविकृतंकुर्यात
सन्निहितेनज्येष्ठेनकृतंचेत्कनिष्ठोनकुर्यात् ॥

**देशान्तरस्थ मृतयतिपुत्रकर्म**—देशांतरीं असणाऱ्या पुत्रानें आपल्या
पित्याची सिद्धिवार्ता ऐकून वपनपूर्वक
करावें व दुग्धतर्पण, पूजा, इत्यादि दशाहांत कर्म करून अकराव्या दिवशीं पा
श्राद्ध, नारायणबलि इत्यादि सर्व कर्म यथाविधि करावें. समीप असलेल्या
पुत्रानें हें कर्म केलें असेल तर कनिष्ठानें करूं नये.

शुक्लकृष्णादिभेदेनकेशवादिनामानिमृततिथ्यनुरोधेनैवग्राह्याणि नतुवार्त
श्रवणतिथ्यनुरोधेन मृततिथ्यज्ञानेतुवार्ताश्रवणानुरोधेनैव यतिसंस्कारकरणेऽश्व
मेधसहस्रादिफलम् । असंस्कृतंविशीर्येतयतेर्यत्रकलेवरम् । धर्मलोपोभवेत्त
दुर्भिक्षंमरणंतथा ॥१॥ दिवंगतेगुरौशिष्यउपवासं तदाचरेत् । नस्नानमाचरेद्भिक्षु
पुत्रादिनिधनेश्रुते ॥ २ ॥ पितृमातृक्षयंश्रुत्वास्नानाच्छुद्ध्यतिसाम्बरात् ॥

**मृतयतिसंस्कारफल**—शुक्लकृष्णादि भेदानें केशवादि नांवें मृततिथी
अनुरोधानें घ्यावींत; वार्ताश्रवणतिथीच्या अनु
घेऊं नयेत व मृततिथीचें अज्ञान असेल तर वार्ताश्रवणाच्या अनुरोधानेंच य
यतीचा संस्कार केल्यास अश्वमेध सहस्रादिकांचें फल आहे. ज्या प्रदेशांत संन्य
शरीर संस्काररहित पडून राहील, त्या प्रदेशांत धर्मलोप, दुर्भिक्ष व मरण हें
होतील. गुरु स्वर्गस्थ झाल्यास शिष्यानें उपवास करावा. पुत्रादिकांचें मरण
केलें असतां यतीनें स्नान करूं नये. मातापितरांचें श्रवण केलें असतां
स्नान केल्यावर शुद्धि होते.

अथप्रसङ्गाद्यतिधर्माः प्रातरुत्थायब्रह्मणस्पतइतिजपित्वादण्डादीनिमृद्
दायमूत्रपुरीषयोर्गृहस्थचतुर्गुणंशौचंकृत्वाचम्यपर्वद्वादशीवर्ज्यंप्रणवेनद
धावनंकृत्वा मृदाबहिःकटिंप्रक्षाल्यजलतर्पणवर्ज्यंस्नात्वापुनर्जङ्घेप्रक्षाल्यव
दीनिगृहीत्वाप्रणवेनप्राणायाममार्जनादिकृत्वाकेशवादिनमोन्तनामभिस्तर्प
त्वाभूस्तर्पयामीत्यादिव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्महर्जनस्तर्पयामीतितर्पयेत् उ
विशेषोमाधवादौचज्ञेयः सूर्योपस्थानादिकंत्रिकालविष्णुपूजादिकंच सिन्ध
यम् विधूमेसन्नमुसलेव्यङ्गारेभुक्तवज्जने । कालेपराह्णभूयिष्ठेनित्यंभिक्षा
श्चरेत् १ अत्रभिक्षाभेदाःग्रन्थान्तरेज्ञेयाः अत्रविविदिषोर्दण्डिनःमाधु
मुख्या दण्डवस्त्रादिपरिग्रहणरहितस्यतुकरपात्रंमुख्यम् अन्येपक्षाःअ
विषयाः तत्रमाधुकरीपक्षेदण्डादिगृहीत्वापञ्चभ्यःसप्तभ्योवागृहेभ्योभिक्षा

त्वान्नंप्रोक्ष्यभूःस्वधानमइत्यादिव्यस्तसमस्तव्याहृतिभिः सूर्यादिदेवेभ्योभूते-भ्यश्चभूमौक्षिप्त्वाशेषमन्नंविष्णुनिवेदितंभुञ्जीत चण्डीविनायकादिनैवेद्यंन-भुञ्जीत भुक्त्वाचम्यषोडशप्राणायामान्कुर्यादितिसंक्षेपः ॥

**यतिधर्मसंक्षेप**—प्रातःकालीं उठून यतीनें 'ब्रह्मणस्पते०' या मंत्राचा जप केल्यावर दंडादिक व मृत्तिका घेऊन मूत्रपुरीषनिमित्तक शुद्धि गृहस्थाच्या चौपट करावी. नंतर आचमन केल्यावर, पर्व व द्वादशी वर्ज्य करून प्रणवानें दंतधावन करावें. मृत्तिकेनें बाहेरील कटिप्रदेश प्रक्षालन करून, जलतर्पणावांचूनच स्नान करावें व पुनः जंघा प्रक्षालन करावी. नंतर वस्त्रादि ग्रहण करून, प्रणवमंत्रानें प्राणायाम, मार्जन इत्यादि केल्यावर केशवादि नमोंत नाममंत्रांनीं व 'भूस्तर्पयामि' इत्यादि व्यस्तसमस्त व्याहृतिमंत्रांनीं 'महर्जनस्तर्पयामि' असें तर्पण करावें. या विषयींचा विशेष प्रकार माधवादिक व विश्वेश्वर्यादिक यांच्या ग्रंथांत पहावा. सूर्योपस्थानादिक व त्रिकाल विष्णुपूजा इत्यादि निर्णयसिंधूंत पहावें. धूर झाल्यावर, मुसलाचे आघात (सडणें) बंद झाल्यावर, अग्नि विझाल्यावर व लोकांचें भोजन झाल्यावर मोठ्या अपराह्णकालीं यतीनें नित्य भिक्षा मागावी. भिक्षेचे भेद दुसऱ्या ग्रंथांत पहावेत. त्यांत विविदिषु संन्याशास मधुकरीभिक्षा मुख्य होय. दंडवस्त्रादिकांचा स्वीकार न करणाऱ्या संन्याशास करपात्रभिक्षा मुख्य होय. इतर भिक्षेचे पक्ष अशक्तविषयक आहेत. त्यांत मधुकरी मागणें असतां दंडादिक घेऊन पांच किंवा सात घरीं भिक्षा मागावी व त्या अन्नाचें प्रोक्षण केल्यावर 'भूःस्वधानमः' इत्यादि व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं सूर्यादि देवतांना व भूतांना भूमीचे ठायीं अन्न देऊन शेष अन्न विष्णूस निवेदित केलेलें असें भक्षण करावें. चंडी व विनायक या देवतांचा नैवेद्य खाऊं नये. भोजन करून आचमन केल्यावर सोळा प्राणायाम करावेत. असा हा यतिधर्मसंक्षेप आहे.

यतिहस्तेजलंदद्याद्भिक्षांदद्यात्पुनर्जलम् । भैक्ष्यंपर्वतमात्रंस्यात्तज्जलंसागरोपमम् ॥ १ ॥ एकरात्रंवसेद्ग्रामेनगरेपञ्चरात्रकम् । वर्षाभ्योन्यत्रवर्षासुमासांश्च चतुरोवसेत् ॥ २ ॥ अष्टौमासान्विहारःस्याद्यतीनांसंयतात्मनाम् । महाक्षेत्रप्रविष्टानांविहारस्तुनविद्यते ॥ ३ ॥ भिक्षाटनंजपःस्नानंध्यानंशौचंसुरार्चनम् । कर्तव्यानिषडेतानिसर्वथानृपदण्डवत् ॥ ४ ॥ मञ्चकंशुक्लवस्त्रंचस्त्रीकथालौल्यमेवच । दिवास्वापश्चयानंचयतीनांपतनानिषट् ॥ ५ ॥ वृथाजल्पंपात्रलोभं संचयं शिष्यसंग्रहम् । हव्यंकव्यंतथान्नंचवर्जयेच्चसदायतिः ॥ ६ ॥ यतिपात्राणिमृद्वेणुदार्वलाबुमयानिच । नतीर्थवासीनित्यंस्यान्नोपवासपरोयतिः ॥७॥ नचाध्ययनशीलस्यान्नव्याख्यानपरोभवेत् । एतद्वेदार्थभिन्नपरम् एतेसंक्षेपतोयतिधर्माःअन्येपिमाधवीयमिताक्षरादौज्ञेयाः ॥

**यतिकालक्षेप**—यतीचे हातावर उदक घालून भिक्षा द्यावी व पुन्हा उदक घालावें. तें भिक्षान्न पर्वततुल्य व तें उदक सागरोपम होतें. वर्षाकालाखेरीज इतर कालीं यतीनें गांवांत एकरात्र व नगरांत पांच रात्रि रहावें. वर्षाकालीं

म्हणजे पावसाळ्यांत चार महिने रहावें. मनाचें नियमन करणाऱ्या यतींनीं आठ महिने भ्रमण करावें. महाक्षेत्रांत राहणाऱ्यांनीं भ्रमण करूं नये. भिक्षाटन, जप, स्नान, ध्यान, शुचिर्भूतपणा व देवपूजन हीं सहा राजदंडाप्रमाणें अवश्य करावींत. मंचक, श्वेतवस्त्र, स्त्रियांच्या गोष्टी, चंचलता, दिवसास निद्रा व वाहन हीं सहा कृत्यें यतींस पापी बनविणारीं आहेत. वृथा भाषण, पात्रलोभ, संचय, शिष्यसंग्रह, हव्य, कव्य व तसेंच अन्न हीं यतीनें वर्ज्य करावींत. यतीचीं पात्रें मृत्तिका, वेणु, काष्ठ व भोंपळा, यांचीं होत. संन्याशानें नित्य तीर्थवासी व तसेंच उपवासतत्पर असूं नये. संन्याशानें अध्ययन करूं नये व व्याख्यान देऊं नये. म्हणजे वेदार्थाहून भिन्न विषयांचें अध्ययन करूं नये व वेदार्थाहून भिन्न विषयांवर व्याख्यान देऊं नये. असें हे यतिधर्म संक्षेपानें सांगितले. दुसरेही यतिधर्म माधव व मिताक्षरा या ग्रंथांत पाहावेत.

**ग्रंथोपसंहारः । प्रथमेऽत्रपरिच्छेदेकालसामान्यनिर्णयः । द्वितीयेथपरिच्छेदेविशेषात्कालनिर्णयः ॥ १ ॥ तृतीयस्यचपूर्वार्धेगर्भाधानादिसंस्क्रियाः । आह्निकंचप्रकीर्णार्थाआधानाद्याः सविस्तराः ॥ २ ॥ देवप्रतिष्ठाशान्त्यादि नित्यंनैमित्तिकंतथा । तार्तीयकोत्तरार्धेस्मिन्जीवत्पितृकनिर्णयः ॥ ३ ॥ श्राद्धाधिकारकालादेर्निर्णयःश्राद्धपद्धतिः । सूतकादेर्निर्णयश्चनिर्णयोदुर्मृतावपि ॥४॥ अन्त्येष्टिसंस्कारविधिःसंन्यासःसहविस्तरः । प्रायश्चित्तंव्यवहृतिंसर्वदानविधिंविना ॥ ५ ॥ कृत्स्नोपिधर्मशास्त्रार्थःसंक्षेपेणात्रनिर्मितः । विबुधानांचबालानां तुष्टये कष्टहानये ॥ ६ ॥ मूलभूतानिपद्यानिविकृतानिक्वचित्क्वचित् । निर्विकाराण्यपिनवान्यप्युक्तान्यत्रकानिचित् ॥ ७ ॥**

**ग्रन्थोपसंहार**—या धर्माब्धिसार ग्रंथाच्या पहिल्या परिच्छेदांत कालाचा सामान्य निर्णय सांगितला, दुसऱ्या परिच्छेदांत विशेषतः कालनिर्णय सांगितला, तिसऱ्या परिच्छेदाच्या पूर्वार्धांत, गर्भादानादि संस्कार, आन्हिक आधान इत्यादि सविस्तर मिश्रविषय, देवप्रतिष्ठा, शांत्यादिक व नित्यनैमित्तिक कर्मे इतके विषय सांगितले व तिसऱ्या परिच्छेदाच्या उत्तरार्धांत जीवत्पितृकाचा निर्णय, श्राद्धाधिकार, काल इत्यादिकांचा निर्णय श्राद्धपद्धति, सूतकादिकांचा निर्णय, दुर्मरण असतांही निर्णय, अंत्येष्टिसंस्कारादि विधि व विस्तारसहित संन्यास, असे विषय सांगितले. विद्वानांच्या संतोषार्थ व शास्त्रव्युत्पत्ति नसणाऱ्या अज्ञान्यांचें शास्त्राज्ञानुरूप कष्ट दूर व्हावे म्हणून या ग्रंथांत प्रायश्चित्त, व्यवहार व सर्व दानांचा विधि, यांशिवाय सर्वेही धर्मशास्त्रार्थ संक्षेपतः सांगितला आहे. मूळचे श्लोक क्वचित् क्वचित् अशुद्ध असल्यानें या ग्रंथांत कित्येक नवेही श्लोक शुद्ध करून लिहिले आहेत.

**मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोनलसाबुधाः । कृतकार्याःप्राग्निबन्धैस्तदर्थंनायमुद्यमः ॥ ७ ॥ येपुनर्मन्दमतयोलसाअज्ञाश्चनिर्णयम् । धर्मेवदितुमिच्छन्ति रचितस्तदपेक्षया ॥९॥ निबन्धोयंधर्मसिन्धुसारनामासुबोधनः । अमुनाप्रीयतां श्रीमद्विठ्ठलोभक्तवत्सलः ॥ १० ॥**

**ग्रन्थप्रयोजन**—मीमांसा व धर्मशास्त्र जाणणारे लोक बुद्धिमान् व निरलस पंडित महाविद्वान् यांनीं केलेले पूर्वींचे ग्रंथ पाहून कृतकार्य होतात, म्हणून माझा हा ग्रंथ करण्याचा उद्योग त्यांच्याकरितां नाहीं. तर जे मंजबुद्धि, आळशी व अविद्वान् असून धर्माचे बाबतींत निर्णय जाणण्याची इच्छा करितात अशांच्यासाठीं मीं हा धर्मसिंधुसार नांवाचा सुबोधग्रंथ केला आहे; या ग्रंथानें भक्तवत्सल श्रीमद्विठ्ठल संतुष्ट असो.

**प्रेम्णासद्भिर्ग्रन्थःसेव्यःशब्दार्थतःसदोषोपि । संशोध्यवापिहरिणासुदामसुनिसतुषपृथुकमुष्टिरिव॥ श्रीकाश्युपाध्यायवरोमहात्माबभूवविद्वद्द्विजराजराजः। तस्माद्दुपाध्यायकुलावतंसोयज्ञेश्वरोनन्तइमावभूताम्॥यज्ञेश्वरोयज्ञविधानदक्षोदैवज्ञवेदाङ्गसुशास्त्रशिक्षः।भक्तोत्तमोनन्तगुणैकधामानन्ताह्वयोनन्तकलावतारः॥ एषोन्त्यजज्जन्मभुवंस्वकीयांतांकौङ्कणाख्यांसुविरक्तिशाली । श्रीपाण्डुरङ्गेवसतिंविधायभीमातटेमुक्तिमगात्सुभक्त्या ॥**

**ग्रन्थकारकुलनिवेदन**—माझा ग्रंथ क्वचित् स्थळीं शब्दार्थानें जरी सदोष असला तरी कोंड्यानें युक्त असलेले सुदाम्याचे पोहे जसे श्रीहरीनें चांगले शुद्ध करून भक्षण केले त्याप्रमाणें हा माझा ग्रंथ विद्वानांनीं विचारपूर्वक शोध करून प्रेमानें स्वीकारावा. विद्वान् ब्राह्मणांत केवळ सार्वभौम असे जे महात्मे श्रीकाश्युपाध्याय होऊन गेले त्यांच्यापासून उपाध्यायकुलावतंस असे यज्ञेश्वरोपाध्याय व अनंतोपाध्याय असे दोन पुत्र झाले. त्यांत श्रौतमार्गांत निष्णात, ज्योतिषी आणि वेदांगाचें जें उत्तम शास्त्र व्याकरण, त्यांत चांगले पढलेले असे यज्ञेश्वरोपाध्याय होते. भक्तांत श्रेष्ठ असून अनंताचा अंशभूत अवतार असल्यानें अनंत गुणांचें वसतिस्थान असे अनंतोपाध्याय होते. अनंतोपाध्याय वैराग्यशाली होते. त्यांनीं आपली कोंकण नांवाची जन्मभूमि सोडून व श्रीपंढरीक्षेत्रांत श्रीपांडुरंगाच्याजवळ वास्तव्य करून, पांडुरंगाच्या भक्तीनेंच भीमानदीच्या तटाकीं ते मुक्तिप्रत जाते झाले.

**तस्यानन्ताभिधानस्योपाध्यायस्यसुतःकृती । काशीनाथाभिधोधर्मसिन्धुसारंसमातनोत् ॥**

**ग्रंथकारनामाभिधान**— त्या अनंतोपाध्यायांचा काशिनाथ नामक जो पुत्र त्यानेंच हा धर्मसिंधुसार नांवाचा ग्रंथ रचिला आहे.

**इतिश्रीमत्काश्युपाध्यायसूरिसूनुयज्ञेश्वरोपाध्यायानुजानन्तोपाध्यायसूरिसुतकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिन्धुसारेतृतीयपरिच्छेदोत्तरार्धंसमाप्तम् ॥**

**ग्रन्थसमाप्ति**—काश्युपाध्याय सूरींचा पुत्र जो यज्ञेश्वरोपाध्यायसूरि त्यांचे धाकटे बंधु जे अनन्तोपाध्यायसूरि त्यांच्या काशीनाथ नामक पुत्रानें जो धर्मसिन्धुसार नांवाचा ग्रन्थ लिहिला, त्या ग्रन्थाचा उत्तरार्ध येथें समाप्त झाला.

**॥ श्री गुरुपांडुरङ्गार्पणमस्तु ॥**

**॥ श्रीगुरुपांडुरंगाला हा ग्रन्थ अर्पण असो ॥**

## भाषान्तरकाराची सज्जनविज्ञप्ति

अमन्त्र तें अक्षर नाहिं ऐसें। जायु मतीमूळिं वसेच तैसें ॥
अयोग्य तो पूरुष नाहिं ऐसा। त्यां पाहिजे योजक मात्र तैसा ॥१॥

तो दोषि तो कुटिल तो सम तो कलंकी।
मित्रावसानसमयीं उदयस्थ लोकीं ॥
तो चन्द्र मस्तकिं शिव प्रियसा विलोकी।
साह्यांत थोर गुणदोष नः पाहती कीं ॥ २ ॥

दाता परोपकृतिनिर्भरचित्त ऐसा।
दूरी समीप न च भाव तयासि तैसा ॥
भानु प्रफुल्ल करि पंक्ति सरोरुहांची।
पाणिस्थ पंकज तशी भुवनान्तरीची ॥ ३ ॥

कर्मा कराया प्रभु इच्छि जेव्हां।
साह्यार्थ कोणी नलगेचि तेव्हां ॥
पांचालजेच्या पटसंविधानीं।
वेमातुरी चालविल्या न कोणी ॥ ४ ॥

दोषांप्रती साधुसुवृत्ति ल्याया। ज्ञात्यांप्रती प्रार्थि क्षमा कराया ॥
आज्ञेप्रती द्या मज मत्कृतीला। धर्माप्रती कर्म समर्पिण्याला ॥५॥

